


# ।। विज्ञान व तंत्रज्ञान आणि शिक्षण ।।

इतिहास । राजकारण । प्रशासन । समाजकारण । धर्म व अध्यात्म । कृषी । पत्रकारिता । कला । साहित्य । क्रीडा । विज्ञान व तंत्रज्ञान आणि शिक्षण । भविष्यवेध



# आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
# शिल्पकार चरित्रकोश

खंड ३
भाग - १

# विज्ञान व तंत्रज्ञान

संपादक
डॉ. बाळ फोंडके
डॉ. अ. पां. देशपांडे

प्रमुख प्रायोजक
निर्माण ग्रुप ऑफ कंपनीज
सहप्रायोजक
दि सारस्वत को-ऑप. बँक. लि.

प्रकाशक
साप्ताहिक विवेक
(हिंदुस्थान प्रकाशन संस्था)

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
शिल्पकार चरित्रकोश, खंड ३,
भाग-१ : विज्ञान व तंत्रज्ञान



**पहिली आवृत्ती :**
ज्येष्ठ शु. नवमी, शके १९३२; २० जून २०१०

**प्रकाशक**
**साप्ताहिक विवेक** (हिंदुस्थान प्रकाशन संस्था)
५/१२, कामत औद्योगिक वसाहत,
३९६, स्वा. सावरकर मार्ग, प्रभादेवी,
मुंबई - ४०० ०२५.

दूरध्वनी : (०२२) २४२२ ९४५१
फॅक्स : (०२२) २४३६ ३७५६
e-mail : charitrakosh@gmail.com
Website : www.maharashatranayak.com

**संगणकीय अक्षरजुळणी :**
आस्वाद प्रकाशन प्रा. लि., प्रभादेवी, मुंबई - २५.

**मुद्रक :**
सिद्धी ऑफसेट प्रा. लि., प्रभादेवी, मुंबई - २५.

**मुद्रितशोधन :**
मिलिंद केसरीनाथ वेलिंगकर

**मुखपृष्ठ :**
आशुतोष सरपोतदार

**मूल्य :** ९०० रुपये



# विज्ञान व तंत्रज्ञान खंड

**संपादक**
डॉ. बाळ फोंडके
डॉ. अ. पां. देशपांडे

**कार्यकारी संपादक**
दीपक हनुमंत जेवणे

**संपादन साहाय्य**
राजेश प्रभु-साळगांवकर
सुपर्णा कुलकर्णी

**खंड सहयोग :**
पिनॅकल ग्रूप, पुणे

**विशेष आभार :**
रवि पंडित
कार्यकारी संचालक, के.पी.आय.टी., पुणे

# भूमिका



'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण-शिल्पकार चरित्रकोश' या प्रकल्पाचा तिसरा खंड वाचकांच्या हाती देत असताना आम्हाला आनंद होत आहे. महाराष्ट्राच्या ऐतिहासिक जडणघडणीपासून भविष्यकालीन महाराष्ट्राचा वेध घेण्यापर्यंत या प्रकल्पाची व्याप्ती आहे. महाराष्ट्राचा इतिहास, वर्तमान व भविष्य या संबंधीची एक व्यापक जाणीव या निमित्ताने महाराष्ट्राच्या वाचकांपुढे ठेवत आहोत.

विज्ञानाच्या बळावर छोट्या-छोट्या युरोपीय देशांनी आपल्या आकारमानाच्या व लोकसंख्येच्या अनेक पट असलेल्या आशिया, अमेरिका व अन्य खंडांतील देशांवर आपले साम्राज्य प्रस्थापित केले. त्यामुळे आपला देश व समाज समर्थ व्हावयाचा असेल तर त्याकरिता मूलभूत संशोधन करणाऱ्या व त्याचे व्यावहारिक उपयोजन करणाऱ्या वैज्ञानिकांची, तंत्रज्ञांची व नवतंत्रज्ञानाधिष्ठित उद्योग उभ्या करणाऱ्या उद्योजकांची गरज असते. या खंडाच्या रूपाने अशा वैज्ञानिकांची व तंत्रज्ञांची परंपरा वाचकांसमोर ठेवण्याचे काम आम्ही मराठी विज्ञान परिषदेवर सोपविले आणि त्यांनी ते दिलेल्या काळात अत्यंत कार्यक्षमतेने पार पाडले. याबद्दल आम्ही मराठी विज्ञान परिषदेचे आणि डॉ. बाळ फोंडके व डॉ. अ. पां. देशपांडे या संपादकद्वयांचे मनःपूर्वक आभार मानतो.

आधुनिक शिक्षणाची जाणीव हा प्रबोधन काळातील महत्त्वाचा टप्पा होता. इंग्रजी राजवटीचे आव्हान पुढे आल्यानंतर पुढील प्रगतीसाठी नव्या शिक्षण पध्दतीचा स्वीकार केला पाहिजे याची जाणीव समाजधुरिणांना होऊ लागली. जात, वर्ण व लिंग यांचा विचार न करता सर्वांना शिक्षणाचा समान अधिकार आहे ही भूमिका व धर्मशास्त्राधारित शिक्षणपध्दतीऐवजी इहवादी शिक्षणपध्दती ही नव्या शिक्षणपध्दतीची वैशिष्टये होती. समाजाच्या ऐहिक व मानसिक प्रगतीसाठी व आधुनिक जीवनमूल्यांवर समाजनिर्मिती करण्यासाठी आधुनिक शिक्षण हा रामबाण उपाय आहे हे समाजधुरिणांना पटले होते. या शिक्षणातून राष्ट्रीय अस्मिता जागृत होत नाही म्हणून या शिक्षणाच्या जोडीला राष्ट्रीय अस्मितेचे शिक्षण देण्याचेही प्रयोग झाले. त्यामुळे स्वातंत्र्यपूर्वकाळात शिक्षणप्रसार हे समाजसेवेचे प्रमुख माध्यम बनले. स्वातंत्र्योत्तरकाळात नवराष्ट्र उभारणीचे आव्हान देशापुढे उभे होते. स्वाभाविकच नवराष्ट्र उभारणीसाठी आवश्यक असलेले मनुष्यबळ उभे करणे हे शिक्षणाचे प्रमुख अंग बनले. त्या दृष्टीने शैक्षणिक क्षेत्रात नवनवे प्रयोग करण्यात आले. गेल्या वीस-पंचवीस वर्षांत व्यावसायिक तत्त्वावर चालणाऱ्या शिक्षणसंस्था उभ्या राहिल्या आहेत. या सर्व स्थित्यंतराचा आलेख शिक्षण खंडातील विविध शिल्पकारांच्या चरित्रांतून वाचकांसमोर उभा राहणार आहे. ही सर्व माहिती एकत्रित करण्याचे काम अत्यंत जिकिरीचे, कष्टाचे व चिकाटीचे होते. या खंडाच्या संपादक मंडळाने ते यशस्वीरित्या पार पाडले आहे. याबद्दल त्यांचेही आम्ही मनःपूर्वक आभार मानतो.

हा प्रकल्प यशस्वी करण्यासाठी स्वयंप्रेरणेने किंवा आमच्या विनंतीला मान देऊन विविध विषयांतील तज्ज्ञ, पुरस्कर्ते व ग्राहक यांचे सहकार्य लाभले आहे, लाभत आहे; त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. अशा प्रकारचा प्रकल्प भरीव अर्थसाहाय्याशिवाय पूर्ण होऊ शकत नाही. या साहाय्यासाठी प्रमुखतः निर्माण ग्रूप ऑफ कंपनीज, दि सारस्वत को-ऑप. बँक व कीर्तने - पंडित इन्फार्मेशन टेक्नॉलोजी यांनी तसेच अन्य प्रायोजकांनी सहकार्य दिले. त्यामुळे हा प्रकल्प थोडा अधिक काळ घेऊन का होईना, पण निश्चितपणे पूर्ण होईल असा आम्हाला विश्वास वाटतो.

**- दिलीप करंबेळकर**

## साप्ताहिक विवेक

**प्रबंध संपादक**
दिलीप करंबेळकर

**कार्यकारी संपादक**
किरण शेलार

**व्यवस्थापक**
शहाजी जाधव

**प्रतिनिधी प्रमुख**
राहूल पाठारे

**संपादकीय विभाग**
दत्ता पंचवाघ, दीपक हनुमंत जेवणे, शीतल पालकर, रवींद्र गोळे, सपना कदम

**कार्यालयीन साहाय्य**
अनंत मालप, आदिनाथ पाटील, सुशांत डोके,
दयानंद शिवशिवकर, संजय पवार
प्रशांत उपासनी (पुणे)

**व्यवसाय प्रतिनिधी**
सचिन जाधव, अजय कोतवडेकर, राकेश सोनार, प्रदीप निकम, किरण वाकचौरे, केशव शेटे, भाऊसाहेब मते

## हिंदी विवेक
अमोल पेडणेकर
*मुख्य कार्यकारी अधिकारी*

# प्रकल्प समिती

### मार्गदर्शक समिती
एकनाथ ठाकूर (माजी खासदार)
सुरेश हावरे
डॉ. गिरीश वासुदेव
राधाकृष्ण विखे-पाटील

### सल्लागार मंडळ
श्रीराम दांडेकर
अनिल गचके
देवेंद्र देवस्थळे
संजय हेगडे
रवींद्र प्रभुदेसाई
राहुल सोलापूरकर
(संपर्क समन्वयक)

### संपादकीय समिती
डॉ. रा.श्री. मोरवंचीकर
न्या. नरेंद्र चपळगावकर
डॉ. बाळ फोंडके
डॉ. सुभाष भेण्डे
डॉ. चंद्रकांत वर्तक
डॉ. अशोक रानडे
डॉ. भा. र. साबडे
डॉ. द. र. बापट
डॉ. अरुण टिकेकर
प्रा. वसंत रोकडे
सुहास बहुळकर
सुधीर नांदगावकर
जयराज साळगावकर
सूर्यकांत पाठक
विद्याधर ताठे
डॉ. अरुणा ढेरे
ले.ज.द.ब. शेकटकर
वासुदेव कुलकर्णी
हेमंत जोगदेव

### सुकाणू समिती

**प्रबंध संपादक**
दिलीप करंबेळकर

**मुख्य कार्यकारी संचालक**
सी. ए. मिलिंद आगरकर

**प्रकल्प समन्वयक**
महेश पोहनेरकर

**प्रकल्प कार्यकारी संपादक**
दीपक हनुमंत जेवणे

**प्रकल्प संपादकीय साहाय्यक**
सुपर्णा कुलकर्णी
राजेश प्रभु साळगांवकर

**व्यवस्थापकीय समन्वयक**
शहाजी जाधव

**कार्यालयीन व विक्री समन्वयक**
सुशांत डोके

**संकेतस्थळ समन्वयक**
संध्या लिमये



# निर्माण ग्रुप ऑफ कंपनीज

**"To be among the top 5 builder-developers in India, and among the top 25 in the world while being the leader in the affordable housing segment by creating better lifestyles and better environments through state of the art townships at affordable rates."**

हे ब्रीदवाक्य घेऊन आज निर्माणची वाटचाल सुरू आहे. १९९५ साली अजित मराठे आणि राजेंद्र सावंत या दोन युवकांनी भागीदारीत सुरू केलेल्या ह्या फर्मचे रूपांतर आता निर्माण रिअल्टर्स अ‍ॅण्ड डेव्हलपर्स लिमिटेड या कंपनीत झाले आहे. येत्या २ ते ३ वर्षांत या कंपनीचा पब्लिक इश्यू बाजारात येणार आहे. अनेक कंपन्यांचा हा निर्माण ग्रुप विविध क्षेत्रांत यशस्वीपणे वाटचाल करीत आहे. सतीश गानू हे ग्रुपचे संचालक असून मुख्यत्वे ब्रँडिंग अँड मार्केटिंग स्ट्रॅटेजी या महत्त्वाच्या खात्यांची धुरा ते समर्थपणे सांभाळीत आहेत.

निर्माण रिअल्टर्स अ‍ॅन्ड डेव्हलपर्स लि. मुख्यत: बिल्डर-डेव्हलपर म्हणून विविध ठिकाणी जागा विकत घेऊन तेथे विविध प्रकारचे प्रकल्प, मुख्यत: निवासी प्रकल्प उभे करते. असे ४५ प्रकल्प विविध ठिकाणी सुरू आहेत. कांदिवली, मालाड, जोगेश्वरी, महालक्ष्मी, पार्ले, मुलुंड, गोवंडी, नेरळ, रत्नागिरी, गणपतीपुळे, माणगाव (गोरेगाव), गोवेले, चिपळूण या ठिकाणी प्रकल्पांचे काम सुरू आहे. झोपडपट्टी पुनर्विकास, जुन्या चाळींचे पुनर्वसन, बंगलो स्कीम, सेकंड होम प्रोजेक्टस अशा विविध प्रकारांत हे प्रकल्प येतात. यांतील ९०% प्रकल्प हे अ‍ॅफोर्डेबल हाउसिंग या प्रकारात मोडतात. यातील महालक्ष्मीचा प्रोजेक्ट मात्र क्लास हाउसिंग या प्रकारात गणला जातो. मुंबईच्या रेसकोर्ससमोर तसेच महालक्ष्मी स्टेशनजवळ २०३ भाडेकरूंच्या पुनर्वसनाचा हा प्रकल्प आहे, ज्याचा दुसरा टप्पा लवकरच सुरू होत आहे.

टाटांचा राष्ट्रउभारणी कार्याचा आदर्श डोळ्यासमोर ठेवून निर्माण ग्रुप कार्यरत आहे. बांधकाम क्षेत्रात खऱ्या अर्थाने निर्माण ग्रुपचे नाव झाले ते नेरळ येथील सेकंड होम प्रोजेक्टमुळे. या प्रकल्पाला २००८ चे बेस्ट सेकंड होम्स प्रोजेक्ट हे ऑकोमोडेशन टाईम्सचे अ‍ॅवॉर्ड मिळाले. या प्रकल्पा अंतर्गत नेरळ येथे 'निर्माण नगरी', 'निसर्ग निर्माण' तसेच 'माथेरान व्हॅली' हे प्रकल्प दिमाखात उभे आहेत. आर्थिक मंदीच्या काळात देखील निर्माण ग्रुपने सर्वसामान्य लोकांना परवडतील अशा चार ते साडे चार लाख रुपये किंमतीच्या घरांचा 'निर्माण नॅनो सिटी' हा प्रकल्प हाती घेऊन यशस्वी करून दाखविला व बांधकाम क्षेत्रांत 'निर्माण नॅनो सिटी' प्रकल्पामुळे सेकंड होम प्रोजेक्टची संकल्पना रूढ झाली.

'बिल्डरच्या हाताखाली बिल्डर' ही संकल्पना निर्माणने उत्तमरित्या राबवून अधिकाधिक मराठी लोकांनी बांधकाम व्यवसायात यावे यासाठी 'निर्माण ट्रेनिंग अ‍ॅकेडमी' प्रयत्न करते. व्यवसायाबरोबरच सामाजिक बांधिलकीच्या उद्देशाने आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीयांसाठी 'निर्माण चॅरिटेबल ट्रस्ट'ची स्थापना झाली. घराच्या प्रत्येक बुकिंगमागे रु.५०००/– हे ट्रस्टकडे जमा होतात. यातून माणगावचे १०० विद्यार्थी व मुंबईतील काही अनाथ विद्यार्थ्यांना दत्तक घेतले आहेत. कोकणातील उद्योगांना प्रशिक्षित मनुष्यबळ उपलब्ध व्हावे यासाठी केंद्र शासनाच्या सहयोगाने माणगाव (जि. रायगड) येथे आय.टी.आय.च्या केंद्रात पर्यटन, संगणक, इंग्रजी संभाषण, कृषीविषयक नवीन अभ्यासक्रम सुरू केले आहेत. 'निर्माण' व मा. द. मा. सुकथनकर यांच्या प्रेरणेने काही कोकणप्रेमी युवकांनी एकत्र येऊन सेव्ह कोकण लॅण्ड लिमिटेड या कंपनीची स्थापना केली आहे. व्यवसायाभिमुख शिक्षणप्रणालीला चालना मिळावी या उद्देशाने निर्माण ग्रुप विविध उपक्रम राबविण्याकरिता प्रयत्न करीत असल्याचे संचालक सतीश गानू यांनी सांगितले. याच सामाजिक दृष्टिकोनातून 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण - शिल्पकार चरित्रकोश' या प्रकल्पास 'निर्माण' सहकार्य करीत आहे.

# महात्मा गांधी मिशन

## शिक्षणाच्या सार्वत्रीकरणाचा यशस्वी प्रकल्प



महात्मा गांधी मिशन हे नाव आता महाराष्ट्रातील सर्वसामान्यांना अभिमानाचे नाव झाले आहे. उच्च आणि तंत्रशिक्षणाची गंगा सर्वसामान्यांपर्यंत घेऊन जाण्याचे मोठे काम या संस्थेने आधुनिक महाराष्ट्रात केले आहे. नांदेड तालुक्यातील लिंबगाव या छोट्या गावात कमलकिशोर कदम या द्रष्ट्या व्यक्तीच्या मनात महात्मा गांधींच्या विचारांच्या प्रेरणेने एक स्वप्न तरळलं. या देशातल्या सामान्य माणसाला रोजगार मिळवून देणारं तंत्रशिक्षण, उच्चशिक्षण आपल्या भागात उपलब्ध असलं पाहिजे. पारंपरिक शिक्षणाबरोबरच कला, सांस्कृतिक, क्रिडा आदी क्षेत्रातही आपले कौशल्य विकसित करून देशासाठी चमकदार कामगिरी करण्याची संधी मुलांना उपलब्ध झाली पाहिजे. त्यासाठी १९८२ साली त्यांनी नांदेड येथे महात्मा गांधी मिशन या संस्थेची स्थापना केली. त्यावेळी लावलेल्या रोपाचा आज महावृक्ष झाला आहे. संस्थेचे चेअरमन कमलकिशोर कदम, सचिव अंकुशकुमार कदम आणि अन्य सर्व विश्वस्तांच्या परिश्रमातून आज नांदेड, परभणी, औरंगाबाद, नवी मुंबई आणि नोएडा अशा ठिकाणी संस्थेचा मोठा विस्तार झाला असून सर्व ठिकाणी अनेक महत्त्वाचे अभ्यासक्रम सर्वांसाठी खुले आहेत. केजी ते पीजी म्हणजे प्राथमिक पूर्व शिक्षणापासून ते पदव्युत्तर शिक्षणापर्यंत सर्व प्रकारच्या शिक्षणाची सोय महात्मा गांधी मिशनने आपल्या संकुलामध्ये उपलब्ध करून दिली आहे.

**अभियांत्रिकी, बायोसायन्स, व्यवस्थापनशास्त्र, वैद्यकीय शिक्षण** या शाखाअंतर्गत येणारे विविध अभ्यासक्रम औरंगाबाद, नांदेड, नवी मुंबई, नोएडा या ठिकाणी चालतात. या शिवाय शिक्षणशास्त्र, फाईन आर्ट, व्होकेशनल कोर्सेस, पॅरा मेडिकल, एलएल.बी.चा अभ्यासक्रम, पत्रकारिता व संज्ञापन अभ्यासक्रम, दंतवैद्यकीय पदवी अभ्यासक्रम, बीएससी नर्सिंग पदविका, कृषी जैवतंत्रज्ञानातील विषयांचे अभ्यासक्रमही औरंगाबाद, नांदेड, नवी मुंबई या ठिकाणी चालतात.

**वैद्यकीय शिक्षण** विषयात एमजीएमचे अभिमत विद्यापीठच स्थापन झालेले आहे. यासाठी एमजीएम मेडिकल कॉलेज, एमजीएम स्कूल ऑफ फिजिओथेरेपी, एमजीएम स्कूल ऑफ बायोमेडिकल सायन्सेस, एमजीएम न्यू बॉम्बे कॉलेज ऑफ नर्सिंग या नावाने नवी मुंबई व औरंगाबाद या ठिकाणी सुसज्ज इमारती, कुशल व तज्ज्ञ अध्यापकवर्ग, संशोधनाच्या सर्व सुविधा, अभ्यासाशिवाय कला, क्रिडा, अभिनय, लेखन अशा सर्व गुणांना वाव देणारे उपक्रम सतत चालू असतात.

नृत्याच्या क्षेत्रात प्रशिक्षण देणारी महागामी ही संस्था औरंगाबाद येथे कार्यरत आहे. याशिवाय विपश्यना, निसर्गोपचार या संदर्भातही उपक्रम चालविले जातात. टेक्सास विद्यापीठाच्या सहकार्याने एडस् संशोधन केंद्र, आयआयटी मुंबईसह दूरशिक्षणाचे उपक्रम, इंडो जर्मन टूलरूमशी करारामुळे विद्यार्थ्यांना अद्यायावत यंत्रनिर्मिती व सॉफ्टवेअर विकासाच्या क्षेत्रात काम करण्याची संधी, अशा अनेक क्षेत्रात संस्थेने वरचेवर नवे नवे करार करून शिक्षणाबाबत जगासोबत आपले विद्यार्थी अद्ययावत ज्ञान संपादन करत राहिले पाहिजेत असा प्रयत्न चालविला आहे. या सर्व वाटचालीत उत्कृष्टता आणि गुणवत्तेला सतत महत्त्व दिल्यामुळे गुणवत्तेचे आयएसओ ९००१-२००० प्रमाणपत्र, महागामीला युनेस्कोचे सभासदत्व, सर्व अभियांत्रिकी महाविद्यालयांना नॅकची मान्यता असे यश मिळाले आहे.

एमजीएम ही आता केवळ एक संस्था नसून शिक्षणाचे सर्व पैलू समाजासमोर घेऊन जाणारी, जीवनात उभे करणारे व्यावसायिक उच्च शिक्षण उपलब्ध करणारी, शिक्षणाच्या सार्वत्रीकरणाची एक परिणामकारक चळवळ बनली आहे.

**अधिक माहितीकरिता संपर्क :-** एमजीएम, एन- ६, सिडको, औरंगाबाद ४३१००३.

**दूरध्वनी:** ९१/०२४०-६६०११००, २४८४६९३ **फॅक्स:** ९१/०२४०-२४८४४४५,

**website:-** www.themgmgroup.com, **E mail:-** mgmadmn@themgmgroup.com

# संपादकीय



हीरक महोत्सवी साप्ताहिक विवेकने हाती घेतलेल्या 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण – शिल्पकार चरित्रकोश' या प्रकल्पातील या खंडांच्या मालिकेतील तिसरे पुष्प हा 'विज्ञान व तंत्रज्ञान खंड आणि शिक्षण खंड' हे एकत्रितपणे प्रकाशित होत आहे.

यातील विज्ञान व तंत्रज्ञान खंडाची संपादकीय जबाबदारी मराठी विज्ञान परिषदेने घ्यावी असे चरित्रकोश प्रकल्पाच्या प्रकल्प समितीच्या मनात होते. त्याला अनुसरून २००६ मध्ये साप्ताहिक विवेकचे प्रबंध संपादक दिलीप करंबेळकर आणि तत्कालीन प्रकल्प समन्वयक मकरंद मुळे यांनी मराठी विज्ञान परिषदेत येऊन आमची भेट घेतली व या खंडाविषयी सविस्तर चर्चा केली. आम्ही दोघांनी मिळून या खंडाचे संपादन करावे असा प्रस्ताव तेव्हा मांडला. त्याला आम्ही सहर्ष होकार दिला. साधारणतः इ.स.१८०० पासून ते २००० पर्यंतच्या काळात ज्यांनी महाराष्ट्र घडविला अशा वैज्ञानिक व तंत्रज्ञांची चरित्रे या खंडात द्यायची असे ठरले. याच बैठकीत मराठी विज्ञान परिषदेने तयार करून ठेवलेली संभाव्य चरित्रनायकांची सूची त्यांच्यासमोर मांडण्यात आली. या सूचीत एकूण १२१ चरित्रनायकांचा समावेश करण्यात आला होता. पण खंडाचे काम पुढे सरकत गेले तसतशी यात भर पडत ही सूची १६३ पर्यंत जाऊन पोहोचली.

एक गोष्ट मात्र खरी की, महाराष्ट्राला जेवढी राजकारणी लोकांची, गायकांची, समाजसुधारकांची, नट आणि नाटककारांची, साहित्यिकांची आणि खेळाडूंची परंपरा लाभली आहे तेवढी काही वैज्ञानिकांची आणि तंत्रज्ञांची परंपरा लाभली नाही. अन्यथा २०० वर्षांच्या दीर्घ कालावधीचा आढावा घेताना ही चरित्रनायकांची सूची किमान ५०० पर्यंत तरी जायला हवी होती. या सूचीत महाराष्ट्राच्या सर्व भागांतील मान्यवरांचा समावेश करण्याचा प्रयत्न केला आहे. तरीही काही नावे अनवधानाने राहून गेली असण्याची शक्यता नाकारता येणार नाही. असे झाले असल्यास त्यासाठी अगोदरच आम्ही उभयता क्षमा मागत आहोत. कारण तसे मुद्दाम करण्याचा आमचा कोणाचा यत्किंचितही हेतू नव्हता.

चरित्रनायक सूची तयार करताना केवळ मराठी मातृभाषा असणारे तेच महाराष्ट्रीय असा निकष न ठेवता जे जे महाराष्ट्रात जन्मले, मग ते अन्य भाषा बोलणारे असले तरी त्यांची कर्मभूमी महाराष्ट्र असल्यामुळे त्यांचाही यात अंतर्भाव केला आहे. उदाहरणार्थ अणु संशोधनाचे साम्राज्य उभे करणारे डॉ. होमी भाभा आणि कारखानदारीचा पाया घालणारे जमशेदजी टाटा. जे इतरत्र जन्मले पण पुढे महाराष्ट्रात यऊन ज्यांनी आपल्या कर्तृत्वाने महाराष्ट्र घडवला त्यांचाही यात अंतर्भाव केला आहे. उदाहरणार्थ कोकण रेल्वे साकार करणारे इ.श्रीधरन आणि बी. राजाराम. जे महाराष्ट्रातून परदेशात गेले आणि ज्यांनी तेथे झेंडे लावले असे राजेंद्र शेंडे, जयंत साठे इत्यादींचाही यात समावेश आहे. काही व्यक्ती या बहुपेडी असतात. त्यांचे वर्गीकरण शिल्पकार कोशात कसे करायचे ही समस्या पहिल्या दिवसापासून उद्भवली होती. उदाहरणार्थ बाळशास्त्री जांभेकरांची नोंद पत्रकार म्हणून करायची की गणिती म्हणून की शिक्षणतज्ज्ञ म्हणून? मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयात ते गणित शिकवत आणि त्यांचे विभाग प्रमुख आजारी पडून इंग्लंडला परत गेल्यावर त्यांच्या जागी या २५ वर्षाच्या तरुण माणसाला विभाग प्रमुख म्हणून नेमले गेले होते.

डॉ. जयंत नारळीकर यांच्यावरची नोंद खगोलशास्त्रज्ञात करायची की विज्ञान साहित्यिकात? प्रा. श्रीराम अभ्यंकरांची नोंद गणितज्ञात करायची की शिक्षणतज्ज्ञात करायची? प्रा. गो. रा. परांजपे यांची नोंद विज्ञान प्रसारकात करायची की शिक्षणतज्ज्ञात करायची? डॉ. व. रा. खानोलकरांची नोंद डॉक्टरांच्यात करायची की संशोधकात करायची? प्रा. श्री. अ. दाभोलकरांची नोंद शेती तज्ज्ञात करायची की शिक्षणज्ज्ञात करायची? शंतनुराव किर्लोस्कर आणि वालचंद हिराचंद यांची नोंद आघाडीचे तंत्रज्ञान शोधून काढणाऱ्यात करायची की उद्योगपती म्हणून भागवून न्यायचे? मग यातून एक असा तोडगा काढला की ज्याचे ज्या क्षेत्रात अधिक काम असेल त्याची विस्तृत नोंद त्या विषयाच्या कोशात द्यावी आणि तुलनेने दुय्यम कामगिरी असलेल्या दुसऱ्या क्षेत्राची माहिती इतर विषयाच्या खंडात द्यावी.

या शिल्पकार चरित्रकोशमालेतील विज्ञान व तंत्रज्ञान कोशासाठी मराठी विज्ञान परिषदेसारखी संस्था मिळाल्याने सर्वच कामे फार सुकर झाली. कारण चरित्रनायकांचा व लेखकांचा एक डेटा बेस परिषदेकडे कायमचा उपलब्ध असतो आणि अशा सर्व प्रकारच्या लोकांची उठबस परिषदेत नित्यनेमाने चालू असते. एखादा प्रकल्प आल्यावर त्याची जुळणी करत बसायला लागत नाही. त्यामुळे १६३ चरित्रे लिहून घेण्यासाठी पन्नासेक लेखकांची फौज मराठी विज्ञान परिषद सहजपणे उभी करू शकली. हे लेखकही केवळ मुंबईतले नव्हते तर ते संपूर्ण महाराष्ट्रात विखुरलेले असे आहेत, त्याची प्रचिती आपल्याला या खंडाच्या शेवटी दिलेल्या लेखकांच्या सूचीवरून येईल. इतक्या लेखकांकडून त्यांच्या शैलीत परंतु एका विशिष्ट पद्धतीने लेख लिहवून घेणे हा एक मोठा वाद्यमेळाच असतो आणि त्यातून सुमधुर संगीताची निर्मिती करणे किती अवघड असते हे एक झुबिन मेहताच जाणू शकतात. आम्ही त्यात किती यशस्वी झालो आहोत हे आपण वाचकच ठरवू शकणार. या कोशाच्या लिखाणाचे काम अत्यंत चटकन झाले. परंतु या कोशाची सांगड अन्य विषयाबरोबर घातली गेली असल्यामुळे तो वाचकांपर्यंत पोहोचण्यात अंमळ उशीरच झाला आहे.

या खंडाच्या लेखकांना संदर्भ म्हणून मराठी विज्ञान परिषदेच्या मध्यवर्ती कार्यालयातून प्रदीप म्हात्रे यांनी न कंटाळता, अक्षरश: अनेकवेळा अनेक ठिकाणाहून माहिती मिळवून ती उपलब्ध करुन दिली आहे. चरित्रनायकांची छायाचित्रे मिळवणे, विशेषत: जे काळाच्या पडद्याआड जाऊन बरीच वर्षे लोटली अथवा जे निधन पावून फारसा काळ लोटला नाही अशांच्या नातेवाईकांचे पत्ते मिळाले नाहीत ही कसरतही प्रदीप म्हात्रे आणि अजय दिवेकर यांनी सांभाळली. बऱ्याच चरित्रनायकांच्या जन्म आणि मृत्यू तारखा मिळवणेही सोपी गोष्ट नव्हती. त्यासाठीही खास शोध पथके पाठवावी लागली. प्रसंगी चित्रगुप्तालाही इ-मेल करावे लागले. सर्व लेखांचे डीटीपी श्रीमती आशा शिराळ यांनी केले. सर्व चरित्रांचे मुद्रणशोधन मिलिंद वेलिंगकर यांनी दोन दोन-तीन तीन वेळा न कंटाळता केले असून त्यात क्वचितच मुद्रणदोष राहिले असतील. तरीही शंभर टक्के मुद्रणदोषविरहीत एकादे प्रकाशन असणे ही तर आम्हाला वाटते कल्पनातीत गोष्ट असावी. त्या दृष्टीने क्वचित काही मुद्रणदोष मिळाले तर तो अपघात समजावा.

शेवटी, विवेक साप्ताहिकाने मोठया विश्वासाने हे काम मराठी विज्ञान परिषदेकडे सोपवले त्यास आम्ही किती पात्र ठरलो हे वाचकांनीच ठरवावे.

**– बाळ फोंडके / अ.पां.देशपांडे**

# कोशरचना



कोणत्याही कोशाचे कथा अथवा कादंबरीप्रमाणे सलग असे वाचन सामान्यपणे केले जात नाही. वाचकास हवा असलेला संदर्भ सुलभपणे आणि शीघ्रतेने उपलब्ध करून देणे हे कोशाचे प्रमुख प्रयोजन समजले पाहिजे. वाचकांना या कोशाचा उपयोग करणे सोपे आणि सुलभ व्हावे या हेतूने येथे या चरित्रकोशाच्या रचनेबाबत आणि स्वरूपाबाबत माहिती देत आहोत.

**कोशाचे स्वरूप**

कोशाचे दोन मुख्य प्रकार असतात. पहिला प्रकार म्हणजे विशिष्ट विषयाचा व दुसरा प्रकार म्हणजे सर्वविषयसंग्राहक. ‘आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण - शिल्पकार चरित्रकोश’ हा प्रकल्प पहिल्या प्रकारचा म्हणजे विशिष्ट विषयाचा कोश आहे. या प्रकारच्या कोशरचनेचे काही स्वाभाविक फायदे आहेत. भारंभार माहितीतून आपणास हवी असलेली माहिती शोधून काढणे वाचकाला सुलभ आणि सोपे होणे हा सर्वांत मोठा फायदा आहे. प्रस्तुत कोश हा या प्रकल्पातील साहित्य खंड आहे. या प्रकल्पाचा आणखी एक विशेष म्हणजे हा व्यक्तिचरित्रकोश आहे. त्यामुळे यात व्यक्तींच्या चरित्रनोंदी दिल्या आहेत.

**संपादकीय भूमिका**

या खंडाच्या संपादक मंडळाने त्या खंडाची एकंदर पृष्ठसंख्या लक्षात घेऊन चरित्रनायकांच्या नोंदींची चरित्रनोंद, टिपण नोंद आणि नामोल्लेख नोंद अशी विभागणी केलेली आहे. वास्तविक पाहता कोणत्याही चरित्रनायकाच्या एकंदर कार्याचा आवाका हा त्याच्या चरित्रकाराशिवाय अथवा चरित्रअभ्यासकाशिवाय अन्य थोरामोठ्या अभ्यासकांनाही पूर्णपणे सर्व बारकाव्यांनिशी लक्षात घेऊन त्याच्या नोंदींची शब्दसंख्या ठरवून अशी विभागणी करणे हे जिकिरीचे कार्य होते. कारण अशा विषयाधारित चरित्रकोशात एखाद्या चरित्रनायकाचे सर्वक्षेत्रीय योगदान व कार्यकर्तृत्वाचा सांगोपांग तपशीलवार उल्लेख करण्याचे सूत्र स्वीकारले तर त्या कार्याला काही अंतच राहत नाही. तसेच प्रत्येक चरित्रनायकांचे सर्वक्षेत्रीय योगदान कथन करणे हे विषयाधारित कोशाचे उपयोजन नाही व नसते हे लक्षात घेतले पाहिजे. विषयाधारित कोश त्या व्यक्तीच्या अन्यक्षेत्रीय पैलूंबाबत काही ठरावीक मर्यादेपर्यंतच मार्गदर्शन करू शकतो,चरित्रनायकाचे विशिष्ट क्षेत्रातील कार्यकर्तृत्त्वाचे नेमके चित्रण करण्याचा एक प्रयत्न म्हणजे विषयाधारित कोश असतो. तरी संपादक मंडळाने आपले सर्व कौशल्य वापरून या सूचीला अंतिम रूप दिलेले आहे.

**विषयाधारित वर्गीकरण**

चरित्रनायकांचे विषयाधारित वर्गीकरण करताना जाणवणारी अडचण अशी की, एका चरित्रनायकाचे योगदान त्या विशिष्ट कार्यक्षेत्रापुरतेच मर्यादित नसून अन्यही क्षेत्रांत त्याने लक्षणीय अथवा भरीव कामगिरी केलेली आहे असे दिसले. अशा परिस्थितीत एकाच चरित्रनायकाच्या नोंदीची वेगवेगळ्या खंडांत पुनरावृत्ती होऊ नये म्हणून अशा सरमिसळ होऊ शकणाऱ्या चरित्रनोंदींसाठी काही मर्यादा व निकष ठरविण्यात आले. त्यानुसार भिन्न खंडांच्या संपादक मंडळास तशा सूचना देण्यात आल्या. मात्र अन्य खंडात या चरित्रनायकांची त्या क्षेत्रातील कामगिरी अधोरेखित

करणारी टिपणनोंद घेतली जाईल याचीही दक्षता घेण्यात आली व अशा सर्व टिपणांच्या सुरुवातीलाच सदरच्या चरित्रनायकाची मुख्य नोंद ज्या खंडात आहे त्या खंडाचे नाव देण्याचीही दक्षता घेण्यात आलेली आहे. जेणेकरून वाचकांना ती संपूर्ण नोंद त्या त्या टिपणासोबत वाचता येईल.

मुख्य चरित्रनोंद ही एकाच खंडात घेण्याचा निर्णय हा मुख्यत्त्वे सामायिक मुद्द्यांची उदा. जन्म, बालपण, शिक्षण, कौटुंबिक पार्श्वभूमी, मृत्यू यांची पुनरावृत्ती टाळण्यासाठीच घेण्यात आलेला आहे. याचबरोबर मुख्य चरित्रनोंद व टिपणनोंद यांच्या ठिकाणी आणखी एक सुविधा देण्यात आलेली आहे, ती म्हणजे चरित्रनायकाचा एका ओळीत परिचय. हा परिचय वाचल्यानंतर त्या व्यक्तीचे बहुआयामी कार्य वाचकांच्या लक्षात येईल व त्या क्षेत्रांच्या अनुषंगाने त्या त्या विषयांच्या खंडात चरित्रनायकाच्या टिपणनोंदी त्यांना वाचता येतील.

या टिपणनोंदीत नेमकेपणाने चरित्रनायकाच्या त्या विशिष्ट क्षेत्रातील कार्याची माहिती देईल व त्या व्यक्तीच्या मुख्य नोंदीत त्याचा चरित्रविषयक तपशील व सोबत त्याचे छायाचित्र देण्यात येईल असा निर्णय साहित्य खंडाच्या निर्मितीच्या वेळेस घेण्यात आला होता. पण काही चरित्रनायकांच्या कार्याला, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीला विशिष्ट पार्श्वभूमी असते. त्या विशिष्ट परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर त्या व्यक्तीच्या कार्याचे महत्त्व समजून घेणे आवश्यक असते आणि त्याच्या कार्याचे मूल्यमापन त्या विशिष्ट परिस्थितीच्या संदर्भात करणे उचित असते. अन्यथा अर्धवट माहितीच्या आधारावर चुकीची प्रतिमा वाचकांच्या मनात निर्माण होण्याचा धोका संभवतो. यावर साधकबाधक विचार करून या खंडात दोन महत्त्वाचे बदल स्वीकारण्यात आले आहेत. पहिला बदल म्हणजे चरित्रनायकाच्या कार्याची पार्श्वभूमी विशद होण्याच्या दृष्टीने काही प्रमाणात पुनरुक्तीचा दोष पत्करून पुरेशी माहिती टिपणनोंदीत समाविष्ट करण्यात आलेली आहे. तसेच वाचकांच्या सुविधेसाठी या टिपणनोंदीसोबत संबंधित चरित्रनायकांची छायाचित्रेही देण्यात आलेली आहेत.

शिक्षण खंडाच्या संदर्भातील आणखी एक महत्त्वाचा बदल म्हणजे यातील काही नोंदीत जोडचरित्रे देण्यात आलेली आहेत. जर पती आणि पत्नी मिळून अथवा दोन भगिनींनी मिळून एखाद्या कार्याची उभारणी संयुक्तपणे एकमेकांच्या सहकार्याने केली असेल अथवा एकाच कार्याला वाहून घेतले असेल तर त्यांची एकत्रित नोंद येथे घेण्यात आलेली आहे. कारण या दोन चरित्रनायकांचे एकूण कार्यातील नेमक्या सहभागाचे मूल्यमापन करताना त्याच्यावर अथवा त्याच्या सहयोगी चरित्रनायकावर अन्याय होण्याची शक्यता असते. असे होऊ नये म्हणून वेगवेगळी चरित्रे घेण्याऐवजी या जोडचरित्रांच्या नोंदी संपादक मंडळाच्या निर्णयानुसार येथे समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत.

**चरित्रनोंदींचे स्थूल स्वरूप**

चरित्रकोशातील नोंदींचे स्थूल स्वरूप पुढीलप्रमाणे आहे.

कोशातील नोंदी सर्वसाधारणपणे आडनावांनी दिल्या आहेत.

पहिल्या ओळीत चरित्रनायकाचे नाव (आडनाव प्रथम) दिले आहे. त्यानंतर खालच्या ओळीत त्याचे टोपणनाव दिलेले आहे. तसेच या टोपणनावांनी नामोल्लेख नोंदीही देण्यात आलेल्या आहेत. कारण काही चरित्रनायकांचे मूळ संपूर्ण नाव वाचकांना माहीत नसते वा अन्य नावांनीही ते चरित्रनायकांना ओळखत असतात. त्यासाठी येथे अशी काळजी घेण्यात आलेली आहे.

उदा. **छत्रे, विनायक लक्ष्मण**

***केरूनाना छत्रे***

काही ठिकाणी चरित्रनायकाच्या अतिपरिचित नावाने नोंद देण्यात आलेली आहे.

उदा. **कर्मवीर भाऊराव पाटील**

***पाटील, भाऊराव पायगोंडा***

ज्या नावाने नोंद देण्यात आलेली आहे ते नाव मोठ्या जाड ठशात पहिल्या ओळीत दिलेले आहे. नंतरच्या दुसऱ्या ओळीत त्या व्यक्तीचे मूळ नाव-उपनाव-टोपणनाव तिरप्या जाड ठशात दिलेले आहे.

यानंतरच्या ओळीत त्या व्यक्तीचे एकंदर योगदान दर्शविणाऱ्या क्षेत्रांचा उल्लेख केलेला आहे. त्यापुढच्या ओळीत चरित्रनायकाच्या जन्म व मृत्यूच्या तारखा(दिवंगत असल्यास) दिल्या आहेत. जेथे जन्म अथवा मृत्यूच्या तारखा उपलब्ध नाहीत तेथे केवळ साल व शक्य झाल्यास महिनासुद्धा दिलेला आहे. यानंतर चरित्रनोंदीच्या मजकुराची सुरुवात करून त्यात चरित्रनायकाची व्यक्तिगत माहिती, शिक्षण, कार्यक्षेत्राची ठिकाणे व पदे, त्यांचे साहित्यिक कार्य, उल्लेखनीय ग्रंथ व पुस्तके यांची माहिती, त्यांना मिळालेले मानसन्मान आणि पुरस्कार यांचा उल्लेख केला आहे. काही ठिकाणी चरित्रनायकांशी संबंधित संस्थेचे अथवा त्यांच्या साहित्यकृतीचे चित्र देण्याचा प्रयत्न केला आहे.

## संदर्भसूची

चरित्रनोंदीत समाविष्ट माहितीची विश्वसनीयता आणि अधिकृतपणा लक्षात यावा या हेतूने नोंदीच्या शेवटी सदर नोंद लिहिण्यासाठी ज्या संदर्भसाधनांचा वापर केला गेला आहे त्याची सूची दिलेली आहे. या संदर्भलेखनात पुढीलप्रमाणे शिस्त पाळण्यात आलेली आहेः

*लेखकाचे नाव, संपादक असल्यास तसा उल्लेख;‘साहित्यकृतीचे नाव’, साहित्यकृतीचा प्रकार; प्रकाशक, प्रकाशनस्थळ; आवृत्ती, प्रकाशनवर्ष.*

हाती आलेल्या अपुऱ्या माहितीमुळे अपवादाने काही ठिकाणी सदरची शिस्त पाळता आलेली नाही, हे वाचकांनी ध्यानात घ्यावे.

ज्या ठिकाणी नामोल्लेख नोंद घेण्यात आलेली आहे. तेथे दोन प्रकार संभवतातः

१. जर त्या व्यक्तीची अन्य खंडात मुख्य चरित्रनोद दिलेली असेल तर तर्जनी चिन्हाचा उपयोग करून तेथे ‘मुख्य चरित्रनोंद समाजकारण खंड, पत्रकारिता खंड’ आदी नमूद करण्यात आलेले आहे.

२. जर त्या व्यक्तीची नोंद याच खंडात अन्यत्र वेगळ्या नावाने दिलेली असेल, तर तर्जनी चिन्हाचा उपयोग करून ज्या नावाने ती नोंद आढळेल ते नाव देण्यात आले आहे.

## अकारविल्हे

चरित्रकोशातील वर्णमाला, सर्व नावांचा अकारविल्हे स्वरानंतर व्यंजने असा पुढीलप्रमाणे असेलः

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ | ॲ | आ | ऑ | इ | ई | उ | ऊ | ऋ |
| ए | ऐ | ओ | औ | ं (अनुस्वार) | :(विसर्ग) | | | |
| क | ख | ग | घ | ङ | | | | |
| च | छ | ज | झ | | | | | |
| ट | ठ | ड | ढ | ण | | | | |
| त | थ | द | ध | न | | | | |
| प | फ | ब | भ | म | | | | |

य र ल व श

ष स

ह ळ

क्ष ज्ञ

कोशात स्वरांचा एक विभाग केलेला आहे व पुढे क, ख, ग... असे व्यंजनानुसार विभाग केलेले आहेत. ज्या अक्षराखाली एकही नोंद नाही ते अक्षर वगळले आहे. वाचकांच्या सोयीसाठी कोशात अनुक्रमणिकेचाही अंतर्भाव केलेला आहे.

**अनुक्रमणिका**

अनुक्रमणिकेची रचना पुढीलप्रमाणे आहे. यात चरित्रनोंदीला अनुक्रमांक न देता पहिल्या स्तंभात चरित्रनायकाचे नाव देण्यात आलेले आहे. या नावाच्या आधी मुख्य चरित्रनोंदीसाठी ‘ ’, नामोल्लेख नोंदीसाठी ‘ ’, टिपणनोंदीसाठी ‘ ’अशा खुणा देण्यात आलेल्या आहेत. चरित्रनायकाच्या नावानंतरच्या स्तंभात या नोंदींचे पृष्ठक्रमांक दिलेले आहेत. या अनुक्रमणिकेतील शेवटचा स्तंभ ‘मुख्य नोंद’ असा आहे. पृष्ठक्रमांकावर जर नामोल्लेख नोंद असेल व त्या चरित्रनायकाची मुख्य नोंद याच खंडात जेथे असेल तो पृष्ठक्रमांक या स्तंभात दर्शविलेला आहे व त्या चरित्रनायकाची मुख्य नोंद अन्य खंडात असेल तर त्या विशिष्ट खंडाचे नाव या स्तंभात दर्शविले आहे. या आधीचा चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र असा एक मोठा स्तंभ आहे.

विज्ञान व तंत्रज्ञान खंडात, या स्तंभाचे अनुक्रमे भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र, वैद्यकशास्त्र, अभियांत्रिकी, गणित असे पाच उपविभाग पाडले आहेत. आणि सहावा उपविभाग संकिर्ण असून त्यात विविध कार्यक्षेत्र समाविष्ट आहेत. ज्यांना केवळ भौतिकशास्त्रज्ञांचा अभ्यास करायचा आहे अथवा गणितींचा अभ्यास करावयाचा आहे त्या वाचकांना या वर्गीकरणाचा विशेष उपयोग होऊ शकतो. चरित्रनायकांची संख्या लक्षात घेऊन हे उपविभाग पाडले आहेत.

तसेच शिक्षण खंडात, चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र या स्तंभाचे शिक्षक, मुख्याध्यापक, प्राचार्य; शिक्षणतज्ज्ञ, शिक्षण प्रसारक, विचारवंत; संचालक, व्यवस्थापक, प्रशासक; संस्थापक आणि संकिर्ण असे पाच उपविभाग केले आहेत. या वर्गीकरणाचाही वाचकांना यथायोग्य उपयोग होईल असा विश्वास आहे.

**- दीपक हनुमंत जेवणे**

# अनुक्रमणिका





**अनुक्रमणिकेतील संक्षेपांचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आहे :-** मुख्य नोंद टिपण नोंद नामोल्लेख नोंद भौतिक. = भौतिकशास्त्र जीव. = जीवशास्त्र हवा. = हवामानशास्त्र पोषण. = पोषणशास्त्र वैद्यक. = वैद्यकशास्त्र अभि. = अभियांत्रिकी रसा. = रसायनशास्त्र विमान. = विमानविद्या प्राणि. = प्राणिशास्त्र कृषि. = कृषिशास्त्र वास्तुरचना. = वास्तुरचनाशास्त्र कर्करोग. = कर्करोगशास्त्र वि. लेखन = विज्ञान लेखन खगोल. = खगोलशास्त्र वि.कथा = विज्ञान कथा वनस्पती. = वनस्पतीशास्त्र प.ल.सा. = पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड.

| चरित्रनायकाचे नाव | पृ. | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कुलकर्णी जतकर शंकर खंडो | ७१ | – | रसा. | – | – | – | – | |
| कुलकर्णी विनायक गोपाळ | ७३ | भौतिक. | – | – | – | – | शिक्षण | |
| के. वेंकटरामन | ७५ | – | रसा. | – | – | – | – | |
| केरुनाना छत्रे | ७७ | – | – | – | – | – | – | पृ. १२२ |
| केळकर पुरुषोत्तम काशीनाथ | ७७ | – | – | – | अभि. | – | शिक्षण | |
| केळकर रंजन रत्नाकर | ८० | – | – | – | – | – | हवामान. | |
| कोकटनूर वामन रामचंद्र | ८२ | – | रसा. | – | – | – | – | |
| कोगेकर नारायण वासुदेव | ८३ | – | रसा. | – | – | – | वि. लेखन | |
| कोरिया चार्लस् मार्क | ८४ | – | – | – | – | – | वास्तुरचना. | |
| कोसंबी दामोदर धर्मानंद | ८७ | – | – | – | – | गणित | नाणकशास्त्र | |
| खानोलकर वसंत रामजी | ९० | – | – | वैद्यक. | – | – | कर्करोग. | |
| गांगल सुधा गजानन | ९३ | – | – | वैद्यक. | – | – | कर्करोग. | |
| गाडगीळ माधव धनंजय | ९४ | – | – | – | – | – | प्राणी. | |
| गायतोंडे भिकाजी बळवंत | ९७ | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| गुपचूप विजय नरहर | ९८ | – | – | – | अभि. | – | – | |
| गुप्ते रामचंद्र भालचंद्र | ९९ | – | – | – | – | – | भूशास्त्र | |
| गोगटे मधुकर नारायण | १०१ | – | – | – | अभि. | – | स्थापत्य. | |
| गोवारीकर वसंत रणछोडदास | १०३ | – | – | – | अभि. | – | हवा./उपग्रह. | |
| गोवारीकर शंकर रणछोडदास | १०५ | – | – | – | अभि. | – | – | |
| गोविंद स्वरूप | १०६ | भौतिक. | – | – | – | – | खगोल. | |
| घाटगे विष्णु माधव | १०९ | – | – | – | अभि. | – | – | |
| घाटे निरंजन सिंहेंद्र | ११० | – | – | – | – | – | वि. लेखन | साहित्य |
| चिटणीस एकनाथ वसंत | ११२ | – | – | – | – | – | उपग्रह. | |
| चिटणीस चेतन एकनाथ | ११३ | – | – | – | – | – | जीव. | |
| चितळे माधव आत्माराम | ११४ | – | – | – | अभि. | – | – | |
| चित्रे शशिकुमार मधुसूदन | ११७ | भौतिक. | – | – | – | – | खगोल. | |
| चिपळोणकर मोरेश्वर वासुदेव | ११९ | भौतिक. | – | – | – | – | – | |
| छत्रे विनायक लक्ष्मण | १२२ | – | – | – | – | गणित | – | |
| जांभेकर बाळशास्त्री गंगाधरशास्त्री | १२५ | – | – | – | – | गणित | संपादक | प. ल. सा. |
| जोगळेकर श्रीकृष्ण वासुदेव | १२६ | – | – | वैद्यक. | – | – | शिक्षण | |
| जोशी आत्माराम भैरव | १२८ | – | – | – | – | – | कृषी. | |
| जोशी जेष्ठराज भालचंद्र | १३१ | – | रसा. | – | – | – | – | |
| जोशी श्रीधर सर्वोत्तम | १३२ | भौतिक. | – | – | – | – | – | |

| चरित्रनायकाचे नाव | पृ. | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| टाटा जमशेटजी नुसरवानजी | १३५ | – | – | – | – | – | यंत्र अभि. | उद्योग |
| टिळक बाळ दत्तात्रय | १३७ | – | रसा. | – | – | – | – | |
| ठोसर बाजीराव विनायक | १४१ | भौतिक. | – | – | – | – | – | |
| डहाणूकर शरदिनी | १४३ | – | – | वैद्यक. | – | – | शिक्षण | |
| तळपदे चंद्रकांत रामचंद्र | १४६ | – | रसा. | – | – | – | – | |
| तळपदे शिवकर बापूजी | १४७ | – | – | – | अभि. | – | विमान. | |
| ताकवले मुरलीधर गोविंद | १४८ | भौतिक. | – | – | – | – | – | |
| ताकवले राम गोविंद | १४९ | भौतिक. | – | – | – | – | शिक्षण | |
| तुळपुळे पुरुषोत्तम गोपाळ | १५१ | – | – | – | – | – | पोषण. | |
| थत्ते रघुनाथ परशुराम | १५३ | भौतिक. | – | – | – | गणित | – | |
| थत्ते विनायक नारायण | १५४ | भौतिक. | – | – | – | गणित | – | |
| दाणी श्रीकृष्ण गोपाळ | १५६ | – | – | – | – | गणित | – | |
| दाते केशवराव कृष्णराव | १५७ | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| दाते शंकर रामचंद्र | १५९ | – | – | – | – | – | मुद्रण | |
| दाभोळकर दत्तप्रसाद अच्युत | १६१ | – | रसा. | – | – | – | – | |
| दाभोळकर श्रीपाद अच्युत | १६३ | – | – | – | – | गणित | कृषी. | |
| दीक्षित भालचंद्र बाबाजी | १६४ | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| दीक्षित शंकर बाळकृष्ण | १६६ | – | – | – | – | – | खगोल. | |
| देव माधव गजानन | १६७ | – | – | वैद्यक. | – | – | कर्करोग. | |
| देवधर प्रभाकर शंकर | १६९ | – | – | – | अभि. | – | – | |
| देवबागकर दिलीप | १७१ | – | – | – | – | – | जीव. | |
| देवरस पुरुषोत्तम जयकृष्ण | १७२ | – | – | – | – | – | जीव. | |
| देशपांडे अनंत पांडुरंग | १७४ | – | – | – | – | – | विज्ञानप्रसार | |
| देशपांडे बाळकृष्ण गंगाधर | १७६ | – | – | – | – | – | भूशास्त्र | |
| देशपांडे रमेश गणेश | १७७ | – | रसा. | – | – | – | – | |
| देशमुख स्नेहलता शामराव | १७९ | – | – | वैद्यक. | – | – | शिक्षण | |
| दोशी बाळकृष्ण विठ्ठलदास | १८० | – | – | – | – | – | वास्तुरचना. | |
| दोशी वालचंद हिराचंद | १८२ | – | – | – | – | – | यंत्रनिर्मिती | उद्योग |
| धायगुडे रामचंद्र गोविंद | १८५ | – | – | वैद्यक. | – | – | शिक्षण | |
| धारप नारायण | १८६ | – | – | – | – | – | वि. कथा | साहित्य |
| नारळीकर अनंत विष्णू | १८८ | भौतिक. | – | – | – | – | – | |
| नारळीकर जयंत विष्णू | १८९ | – | – | – | – | – | खगोल. | |
| नारळीकर विष्णू वासुदेव | १९२ | भौतिक. | – | – | – | – | शिक्षण | |

| चरित्रनायकाचे नाव | पृ. | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| निगवेकर अरुण शंकर | १९४ | भौतिक. | – | – | – | – | शिक्षण | |
| नेने यशवंत लक्ष्मण | १९६ | – | – | – | – | – | कृषी. | |
| पंत आदिती | १९८ | – | – | – | – | – | समुद्रशास्त्र | |
| परांजपे रघुनाथ पुरुषोत्तम | २०० | – | – | – | – | गणित | शिक्षण | |
| परांजपे कपिल हरी | २०३ | – | – | – | – | गणित | – | |
| परांजपे गोपाळ रामचंद्र | २०४ | भौतिक. | – | – | – | – | – | |
| परांजपे विजय गोपाळ | २०६ | – | – | – | – | – | धातुशास्त्र | |
| परांजपे श्रीकांत रामचंद्र | २०७ | भौतिक. | – | – | – | – | – | |
| पाटणकर प्रभाकर गणेश | २१० | – | – | – | अभि. | – | – | |
| पाटील जयंत शामराव | २११ | – | – | – | – | – | कृषी. | |
| पाटील हरिश्चंद्र गोपाळ | २१३ | – | – | – | – | – | शिक्ष./कृषी. | |
| पानसे विनायक गोविंद | २१५ | – | – | – | – | – | सांख्यिकी | |
| पुरंदरे भालचंद्र नीळकंठ | २१६ | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| पेठे वसंत अवधूत | २१७ | – | – | – | अभि. | – | – | |
| फडके दत्तात्रय यशवंत | २१९ | भौतिक. | – | – | – | – | – | |
| फोंडके गजानन पुरुषोत्तम | २२१ | – | – | – | – | – | जीवभौतिक. | |
| बर्वे परशुराम महादेव | २२४ | – | रसा. | – | – | – | – | |
| बापट रवींद्र दिनकर | २२६ | – | – | वैद्यक. | – | – | शिक्षण | |
| बाळ दत्तात्रेय वामन | २२८ | – | – | – | – | – | जीव. | |
| बी. राजाराम | २३० | – | – | – | अभि. | – | – | |
| बोधे जनार्दन गणपत | २३२ | – | – | – | अभि. | – | स्थापत्य. | |
| भटकर विजय पांडुरंग | २३४ | – | – | – | अभि. | – | – | |
| भवाळकर दिलीप देवीदास | २३६ | भौतिक. | – | – | – | – | – | |
| भाभा होमी जहांगीर | २३७ | भौतिक. | – | – | – | – | अणुशास्त्र | |
| भालेराव शरच्चंद्र मनोहर | २४१ | – | – | – | अभि. | – | – | |
| भिडे विष्णू गणेश | २४३ | भौतिक. | – | – | – | – | विज्ञानप्रसार | |
| भिसे अविनाश नारायण | २४५ | – | – | वैद्यक. | – | – | कर्करोग. | |
| भिसे शंकर आबाजी | २४७ | – | – | – | – | – | मुद्रण | |
| भोजे शिवराम बाबूराव | २४९ | – | – | – | अभि. | – | – | |
| महाजनी गणेश सखाराम | २५१ | – | – | – | – | गणित | शिक्षण | |
| महाबळे त्र्यंबक शंकर | २५३ | – | – | – | – | – | वनस्पती. | |
| मांडके नित्यनाथ वसंत | २५४ | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| मांडे चिंतामणी अनंत | २५५ | भौतिक. | – | – | – | – | – | |

| चरित्रनायकाचे नाव | पृ. | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| □ मांडे शेखर चिंतामणी | २५८ | – | – | – | – | – | जीवभौतिकी | |
| □ माशेलकर रघुनाथ अनंत | २५९ | – | रसा. | – | – | – | – | |
| □ मोडक नारायण विनायक | २६२ | – | – | – | अभि. | – | – | |
| □ मोदी अमृत विठ्ठलदास | २६३ | – | – | वैद्यक. | – | – | औषध. | |
| □ मोक्षगुंडम् विश्वेश्वरय्या | २६६ | – | – | – | अभि. | – | – | |
| □ म्हात्रे गजानन बाबूराव | २६८ | – | – | – | – | – | वास्तुरचना. | |
| □ रणदिवे कमल जयसिंग | २७१ | – | – | वैद्यक. | – | – | कर्करोग. | |
| □ रत्नासामी पॉल | २७२ | – | रसा. | – | – | – | – | |
| □ राऊत सखाराम अर्जुन | २७३ | – | – | – | – | – | वनस्पती. | |
| □ राजगुरु शरद नरहर | २७४ | – | – | – | – | – | पुरातत्त्व. | |
| □ राजे अनंत दामोदर | २७६ | – | – | – | – | – | वास्तुरचना. | |
| □ रानडे विवेक विनायक | २७७ | – | रसा. | – | – | – | – | |
| □ रायकर रमेशचंद्र नारायण | २७८ | – | – | – | – | – | स्थापत्य. | |
| □ राव शांता श्रीनिवास | २७९ | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| □ लाड भाऊ दाजी | २८१ | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| □ लिमये दत्तात्रेय बाळकृष्ण | २८४ | – | रसा. | – | – | – | – | |
| □ लेले रामचंद्र दत्तात्रेय | २८५ | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| □ वझे गोपाळ हरी | २८८ | – | – | – | अभि. | – | – | |
| □ वर्तक वामन दत्तात्रेय | २८९ | – | – | – | – | – | वनस्पती. | |
| □ वाडिया आर्देशीर करसेटजी | २९० | – | – | – | अभि. | – | जहाज अभि. | उद्योग |
| □ वाडिया आवाबाई बोमजी | २९२ | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| □ वाडेगावकर विश्वनाथ नारायण | २९३ | – | – | – | – | – | मुद्रण | |
| □ वालचंद हिराचंद | २९४ | – | – | – | – | – | – | पृ. १८२ |
| □ विश्वेश्वरैय्या | २९४ | – | – | – | – | – | – | पृ. २६६ |
| □ वेंकटरामन | २९४ | – | – | – | – | – | – | पृ. ७५ |
| □ वेंकटवर्धन व्ही.एस. | २९४ | – | – | – | – | – | खगोल. | |
| □ शर्मा मनमोहन | २९७ | – | रसा. | – | – | – | – | |
| □ शास्त्री बापूदेव | २९८ | – | – | – | – | गणित | – | |
| □ शिरोडकर वि.ना. | ३०० | – | – | वैद्यक. | – | – | – | |
| □ शेंडे राजेंद्र | ३०३ | – | – | – | अभि. | – | – | |
| □ शेट्ये सतीश | ३०४ | – | – | – | अभि. | – | – | |
| □ श्रीधरन | ३०५ | – | – | – | – | – | – | पृ. ४३ |
| □ सखाराम अर्जुन | ३०६ | – | – | – | – | – | – | पृ. २७३ |

# प्रस्तावना



कोणत्याही प्रदेशाची जडणघडण अनेक अंगांनी होत असते. त्या जडणघडणीचे अनेक पैलू असतात. 'सब भूमी गोपाल की इसमें अटक कहाँ?' असं अलंकारिक अर्थानं विचारलं जात असलं, तरी आपल्या या धरतीची भूमी सलग, एकसंध नाही हे वास्तव आहे. वैज्ञानिकांना विचाराल तर ते 'प्लेट टेक्टॉनिक्स' या सिद्धान्ताचा दाखला देत धरतीचा पृष्ठभाग अनेक छोट्या-छोट्या तुकड्यांचा, प्लेट्सचा बनलेला आहे, हे सप्रमाण दाखवून देतील. पण तो विचार बाजूला ठेवला तरी या भूमीवर अनेक कृत्रिम आणि स्वनिर्मित अटका निर्माण झालेल्या आहेत हे वास्तव टाळता येत नाही.

काही सीमारेखा निसर्गानंच आखून दिलेल्या आहेत. भूभागावरून आस्ते कदम करत जावं, तर एका क्षणी तो भूभाग संपून सागराचं साम्राज्य सुरू होतं. तो किनारा मग एक अडसर बनतो. तो ओलांडून सागरावरून सहजगत्या वाटचाल करणं अशक्य बनतं. दुसरीकडे जावं, तर सपाट वाटणारा भूभाग अकस्मात आकाशगामी झेप घेत, वाटेत आडवा येतो. ती उत्तुंग पर्वतराजी उल्लंघून पलीकडे जाणं सहजसाध्य नसतं. ती पार करण्यासाठी एखादी सोईस्कर खिंड सापडत नाही तोवर तो नगाधिराजही एका लक्ष्मणरेखेचं रूप धारण करतो. कुठं घनदाट, निबिड अरण्य मार्ग खंडित करतं, तर कुठं चालणंही अवघड करणारी मरुभूमी. एक ना अनेक. यांसारख्या चतु:सीमांनी आखलेला तो प्रदेश जरासा अलग पडतो, तिथलं हवामान वेगळं असतं, तिथली सजीवसृष्टी आगळी असते. तो प्रदेश मग स्वत:ची वेगळी ओळख सांगू लागतो.

पण सगळ्याच अटकसीमा अशा भौगोलिक नसतात, नैसर्गिक नसतात. इतिहास, समाजसंघटन, त्या समाजाचे नीतिनियम, कुटुंबव्यवस्था, अंगीकारलेली जीवनशैली, राहणीमान, आरोग्य, कला, संगीत, साहित्य, अनेक पैलूंनी त्या प्रदेशाची स्वत:ची वेगळी ओळख अधोरेखित होत असते. या प्रत्येक पैलूचे विभ्रम खुलवणाऱ्या, त्यांची झळाळी लक्षणीयरीत्या वृद्धिंगत करणाऱ्या महाभागांना त्या प्रदेशाचे शिल्पकार म्हणणं क्रमप्राप्त होतं. महाराष्ट्राचे असे जे कोणी शिल्पकार आहेत, त्यांचा अल्पचरित्रात्मक परिचय करून देणं हेच या बहुखंडात्मक प्रकल्पाचं अधिष्ठान ठरतं.

तरीही, महाराष्ट्र आणि शिल्पकार या दोन कळीच्या शब्दांची नेटकी आणि नेमकी व्याख्या केल्याशिवाय या प्रकल्पाची नांदी म्हणता येणार नाही. महाराष्ट्राची स्वत:ची वेगळी ओळख पटवण्यासाठी ज्या पैलूंचा विचार करावयास हवा, तो करूनच या प्रकल्पातील निरनिराळ्या खंडांची आखणी करण्यात आली आहे; आणि त्या प्रत्येक पैलूच्या विकासात बहुमोल भर घालणाऱ्या दिग्गजांची ओळख शिल्पकार अशी केली गेली आहे.

इतर पैलूंबाबत अशी ओळख पटवणं सोपं आहे. कारण, मराठी संगीत, मराठी साहित्य, मराठी समाज, मराठी राजकारण, महाराष्ट्राचा भूगोल यांची वेगळी, स्वतंत्र ओळख पटवणं सहजसाध्य आहे, त्यांची अधिष्ठानं इतर प्रदेशांपेक्षा वेगळी आहेत. त्यामुळं त्यांचे निकष ठरवणं अवघड जात नाही. विज्ञान आणि सुरुवातीला त्याला समांतर, पण आजकाल त्याचं बोट धरूनच वाटचाल करणारं तंत्रज्ञान, यांच्या बाबतीत ते निकष बाद ठरतात. इंग्रजीत ज्यांना 'नॉनस्टार्टर' म्हणता येईल, असे ठरतात.

याचं तसं ठोस कारणही आहे. विज्ञान हे जागतिक, नव्हे वैश्विक आहे, यच्चयावत विश्वाला त्याचे नियम, त्याचे

आविष्कार लागू पडणारे आहेत. हे विज्ञान आपलं, हे परक्यांचं, असा दुजाभाव आपण त्यात करू शकत नाही. ज्या गुरुत्वाकर्षणाचा साक्षात्कार महाराष्ट्रात होतो, तोच इतर प्रदेशांमध्येही होतो. त्याचं नियमबद्ध स्वरूप उलगडून दाखवणारा आयझॅक न्यूटन इंग्रज होता किंवा त्याहून वेगळ्या भूमितिबद्ध रूपड्याचं दर्शन घडवणारा अल्बर्ट आइन्स्टाइन प्रथम जर्मन आणि नंतर अमेरिकन होता म्हणून गुरुत्वाकर्षणावर इंग्लंडचा, जर्मनीचा, अमेरिकेचा, कोणाचाच स्वामित्वहक्क (कॉपीराइट) निर्धारित होऊ शकत नाही.

तंत्रज्ञानाच्या बाबतीत परिस्थिती थोडीशी वेगळी आहे. तंत्रज्ञानाचा विकास उपभोग्य वस्तूंच्या उत्पादनासाठी सहसा केला जातो. अशा उत्पादनाची निकड ज्या प्रदेशात भासते, तिथं त्याचा विकास आणि वापर होण्याची शक्यता जास्त असते. त्यामुळं त्या तंत्रज्ञानाची ओळख त्या प्रदेशावरून पटवता येते. तरीही, आजच्या जागतिकीकरणाच्या जमान्यात असं तंत्रज्ञान त्या प्रदेशाच्या सीमा बंदिस्त करून ठेवू शकत नाहीत. त्या सीमा सच्छिद्र बनतात. त्यातून ते तंत्रज्ञान सहजासहजी सीमापार जाऊ शकतं. आज चीन किंवा भारत इथं 'मोबाइल फोन'चा वापर सर्वाधिक आहे, पण त्यापोटी हे तंत्रज्ञान चिनी किंवा भारतीय असं आपण म्हणू शकत नाही. पण त्याच्या विकासाला हातभार लावणारी मंडळी कोणत्याही प्रदेशातली असू शकतात. ती चिनी किंवा भारतीयही असू शकतात. पण त्यापायी या तंत्रज्ञानाला आपण भारतीय म्हणू शकत नाही. ते तंत्रज्ञान जागतिक स्वरूपाचंच राहतं.

शेतीच्या बाबतीतही साधारण अशीच परिस्थिती आहे. शेतीचा उगम तैग्रिस आणि युफ्राटिस या नद्यांच्या दोआबाच्या प्रदेशात, म्हणजेच एकेकाळी मेसोपोटेमिया म्हणून, पण आज इराक या नावानं ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशात झाला. तरीही, शेती हे त्या प्रदेशाचं व्यवच्छेदक लक्षण मानता येत नाही. त्याचा उगम तिथं झाला एवढंच आपण म्हणू शकतो. ती शेती करण्याची एक पद्धत एका प्रदेशात विकसित होते. ती त्या प्रदेशाच्या नावानं ओळखली जाते. म्हणूनच जपानी भातशेती वेगळी, चिनी भातशेती त्याहून निराळी, भारतीय भातशेती आणखी तिसरीच, अशी त्या-त्या शेती करण्याच्या पद्धतींची ओळख असू शकते. तरीही जपानी भातशेतीचा विकास एखाद्या भारतीयाकडून होण्याची शक्यता नाकारता येत नाही किंवा बासमती तांदळाचं हेक्टरी उत्पादन वाढविण्यासाठीचे यशस्वी प्रयत्न एखाद्या अमेरिकनानं केले म्हणून बासमती अमेरिकन बनत नाही. तरीही, त्याच्या बासमती या नावापुरताच कॉपीराइटचा हक्क भारत बजावू शकतो.

या परिस्थितीत विज्ञान-तंत्रज्ञान या विषयांतील महाराष्ट्राच्या शिल्पकारांची निवड कशी करायची?, त्यासाठी कोणते निकष लावायचे?, या प्रश्नांची सर्वमान्य उत्तरं देणं वाटतं तितकं सोपं नाही. जिनं मानवी ज्ञानसंग्रहात मोलाची भर घातली आहे किंवा जिनं एखाद्या विज्ञानसूत्राचा मागोवा घेत नवोन्मेषशाली तंत्रज्ञान विकसित केलं आहे ती व्यक्ती मराठी भाषक असेल, तर तिचा समावेश आपण महाराष्ट्राच्या शिल्पकारात करणार आहोत की नाही? मग भलेही त्याची कर्मभूमी महाराष्ट्राबाहेर असो. उलटपक्षी, ज्या व्यक्तीची कर्मभूमी महाराष्ट्र आहे अशी व्यक्ती मराठी भाषक नाही किंवा तिची जन्मभूमी महाराष्ट्र नाही म्हणून आपण तिला वगळणार आहोत का? काही अशीही मंडळी आढळतात, की ज्यांचा जन्म महाराष्ट्रात झाला आहे, त्यांच्या गुणवत्तेला महाराष्ट्रातच कंगोरे पडले आहेत, त्यांनी आपली वैज्ञानिक कामगिरीही महाराष्ट्राच्या भूमीतच पार पाडली आहे, पण त्यांची मातृभाषा मात्र मराठी नाही. अशांचा विचार आपण महाराष्ट्राचे शिल्पकार म्हणून करणार आहोत की नाही? महाराष्ट्राच्या उदारमतवादी परंपरेपोटी मराठी भाषेचे ज्ञान न प्राप्त करताही आपलं सारं आयुष्य याच भूमीत व्यतीत करण्याचं स्वातंत्र्य आपण सर्वांनाच दिलं आहे. सर्जनशील नवनिर्मितीला या स्वातंत्र्यापोटीच धुमारे फुटत असतात. मग अशा अमराठी दिग्गजांना त्यांचं योग्य स्थान नाकारताना आपण या महाराष्ट्राच्या वैशिष्ट्यपूर्ण परंपरेलाचा नाकारत तर नाही ना?

यांसारख्या अनेक प्रश्नांचा ऊहापोह महाराष्ट्राच्या विज्ञान-तंत्रज्ञान क्षेत्रातील शिल्पकारांची निवड करताना करणं

आवश्यक ठरतं. त्याचबरोबर, एकंदरीत विज्ञानाची वाटचाल, महाराष्ट्रात, देशात आणि जागतिक स्तरावरही, कशी झाली याचाही विचार करणं आवश्यक ठरतं.

विज्ञानाच्या इतिहासाचे दोन मुख्य कालखंड आहेत. आपल्या अवतीभोवती पसरलेल्या निसर्गाच्या अनेक आविष्कारांचं गूढ मानवाला सतावत आलं आहे. धरतीवर वावरणाऱ्या प्रत्येक प्राण्यालाच त्याचं कुतूहल वाटत असतं. किमानपक्षी, अशा आविष्कारांपासून आपल्याला धोका नाही याची खातरजमा करून घेण्याची आवश्यकता त्यांना वाटत असते आणि ती पटली नाही तर जेव्हा-जेव्हा असे आविष्कार होतात, तेव्हा-तेव्हा स्वसंरक्षणासाठी योग्य तो पवित्रा घेण्याची उपजत ऊर्मी प्रत्येक सजीवाच्या अंगी असते. पण, या आविष्काराचं गूढ उकलण्याची बौद्धिक क्षमता मात्र केवळ मानवप्राण्याच्याच ठायी आहे. एवढंच नाही, तर एकदा का त्या सतावणाऱ्या कोड्याची उकल झाली की त्यापाठील मूलभूत सूत्राचा वापर स्वत:च्या विधायक भल्यासाठी आणि प्रसंगी विघातक बुऱ्यासाठीही, करण्याची प्रेरणा मानवप्राणी बाळगून आहे. या दिशेनं केलेल्या प्रयासालाच विज्ञान आणि तंत्रज्ञान अशी नामाभिधानं प्राप्त झाली आहेत.

या गूढांविषयीचं चिंतन करून त्यांच्याविषयीची एक सैद्धान्तिक भूमिका मांडण्याचे प्रयत्न प्राचीन काळी झाले. त्या काळात, जगाच्या पाठीवर, निरनिराळ्या ठिकाणी ज्या वेगवेगळ्या संस्कृती उदयाला आल्या, त्या सर्वांमध्येच अशा प्रकारचं तत्त्वचिंतन केल्याचं आढळतं. कोहं, कुतो आयात:, या दोन प्रश्नांनी प्रामुख्यानं मानवाला या ज्ञानसंपादनाच्या सुरुवातीच्या कालखंडात सतावलं होतं. मी कोण, आजूबाजूला, या जमिनीवर, वर आकाशात दिसणाऱ्या या अखिल विश्वात माझं नेमकं स्थान काय आहे, या विश्वाशी माझं नातं कोणतं आहे, माझा या विश्वावर आणि त्या विश्वाचा माझ्यावर नेमका कोणता प्रभाव पडतो आहे, मी कोठून आलो, कुठे जाणार आहे, या माझ्या हालचालींचं नियंत्रण करणं माझ्या हाती आहे की यदृच्छयाच ही सारी भलीबुरी कामगिरी माझ्या हातून घडत आहे, यांसारख्या मूलभूत प्रश्नांची पटणारी उत्तरं शोधण्याचे प्रयास या कालखंडात झाले आणि त्यांची जी उत्तरं दिली गेली, ती बहुधा त्याविषयी केलेल्या तत्त्वचिंतनातून दिली गेली किंवा अनुभवजन्य अनुमानांमधून, 'एम्पिरिकल कन्सिडरेशन'मधून दिली गेली. तत्त्वचिंतनाची बैठक वैयक्तिक होती, पण त्या चिंतनाचं फलित व्यक्तीपुरतंच सीमित राहणारं नव्हतं. ते सामूहिक होतं. समष्टीला लागू पडणारं होतं. सर्वांनाच ते समजावून सांगणं समाजहिताच्या दृष्टिकोनातून आवश्यक होतं. त्याचं अनुबोधन गुरुशिष्य परंपरेमधून केलं गेल्यामुळं त्याचा प्रसार झाला. दररोजच्या जीवनकलहातून मुक्त होऊन असं चिंतन साध्य करणारे महाभाग संख्येनं कमीच होते. त्यांनी दाखवलेला मार्ग इतरांनी अनुसरला. त्यांच्या चिंतनाच्या फलिताला या मूलभूत प्रश्नांच्या समर्पक उत्तरांचं स्थान प्राप्त झालं. त्या प्रतीचं चिंतन करण्याची क्षमता असलेला दुसरा कोणी महाभागच त्यामधील काही विसंगतींचा किंवा त्रुटींचा निर्देश करून वेगळी वाट चोखाळण्याचा प्रयास करू धजत असे.

अनुभवजन्य अनुमानांची स्थिती थोडीशी वेगळी होती. हे अनुभव वैयक्तिक नव्हते. सामूहिक होते. अनेकांना तेच अनुभव वारंवार आले होते. किंबहुना, विज्ञानानं नेहमीच सार्वत्रिक, सार्वकालिक, सामूहिक अनुभवांचाच मागोवा घेतला आहे. त्यातून मग नैसर्गिक आविष्कारांपाठच्या निसर्गनियमांचं जे ज्ञान प्राप्त होतं, त्याचा प्रभाव सर्व समाजावर सारखाच होतो. अशा सार्वत्रिक अनुभवाच्या आविष्कारांची पार्श्वभूमीही ध्यानात आली होती. एका विशिष्ट परिस्थितीत एक विवक्षित आविष्कार होतो याची साक्ष मिळाली होती. वैयक्तिक परिस्थितीवर, गुणवत्तेवर या आविष्कारांचं स्वरूप अवलंबून नव्हतं. त्यातूनच मग कार्यकारणभावाचं अनुमान काढणं शक्य होत होतं. आकाशात नेहमीच दिसणारे सूर्य आणि चंद्र या तेजोगोलांचं स्थान कायमस्वरूपी नाही. ते एका जागी स्थिर राहत नाहीत. त्यांचं अवकाशातलं स्थान बदलत जातं. सर्वांनाच याचा अनुभव येतो आणि या बदलांचंही एक आवर्तन होतं. त्या

चक्रानुसार आपल्या परिसरातही बदल होत असतात आणि त्यांचंही एक आवर्तन होतं. या दोन आवर्तनांची परस्परात सांगड आहे हा अनुभव सर्वांनीच घेतला होता. त्यातलंच मग एक कार्य आणि दुसरं कारण असं अनुमान काढणं तर्कसंगत वाटत होतं. अशा अनुभवांचीही मानवाच्या ज्ञानसंग्रहात भर पडत गेली. ही भर घालण्याचं मौलिक कार्य करणारे महाभाग त्या कालखंडातले विज्ञानाचे बिनीचे शिलेदार होते. शिल्पकार होते.

त्यांनी हा ज्ञानसंग्रह स्वत:पुरताच सीमित न ठेवता, त्याचा प्रसार करण्याचं कामही केलं होतं. त्यातूनच गुरुकुल परंपरा निर्माण झाली होती. काहींना त्या काळचा राजाश्रयही मिळाला होता. तरीही हा प्रसार मुख्यत्वे मौखिक पद्धतीनं होत असल्यामुळं त्याची व्याप्ती मर्यादित राहिली होती. भूर्जपत्रांवरील प्राथमिक स्वरूपाच्या लेखनातून यांपैकी काहींना अक्षरस्थान प्राप्त झालं होतं. त्यांतील जे काही टिकून राहिलं आहे, ते आज हस्तगत करण्यात यश मिळालं आहे. त्याच्या अध्ययनातून त्या काळच्या विज्ञान-तंत्रज्ञानाच्या विकासाचा परिचय होऊ शकतो.

ही परिस्थिती साधारणपणे इसवी सनाच्या पहिल्या पाच-सहा शतकांपर्यंत राहिली. पण, तिची गती मंदावत असल्याची चिन्हंही दिसत होती. ज्ञानलालसेच्या प्रेरणेला दुय्यम-तिय्यम स्थान प्राप्त झालं होतं. मानवप्राण्याच्या इतर ध्यासांना अधिक महत्त्व प्राप्त झालं होतं. निसर्गाची सर्वच गूढं उकलल्यामुळं ही परिस्थिती समोर उभी राहिली होती किंवा नवनवीन अनुभव येणं थांबलं होतं अशातला भाग नव्हता, पण तत्त्वचिंतनासाठी लागणारं वातावरण लुप्त होत चाललं होतं हे मात्र मागं वळून पाहता स्पष्ट होतं.

त्यानंतर जणू ज्ञानप्रकाश एकाएकी लुप्तच झाला. एका अंधकारमय कालखंडात मानवप्राणी चाचपडत राहिला. ज्ञानसंग्रह नष्ट झाला नाही, पण त्यात मोलाची भरही पडली नाही की त्याला खास महत्त्वही दिलं गेलं नाही. मानवी सर्जनशील प्रेरणेलाच जणू ग्रहण लागलं. या ज्ञानापाय 'वसुधैव कुटुंबकम्' या तत्त्वाचा प्रसार होण्याऐवजी मानवातील प्राणी जातीची वैशिष्ट्यं उफाळून वर आली. प्रादेशिक स्वामित्वाला महत्त्व प्राप्त झालं. ते प्रस्थापित करण्याच्या नादात मानवजातीचं विविध कळपांमध्ये गठन झालं. या कळपांच्या, खरं तर टोळ्यांच्या आपापसातील युद्धांना प्रारंभ झाला. त्याला धार्मिक वरिष्ठतेच्या भूमिकेचं प्रोत्साहन मिळालं. त्यापायी मानवजातीच्या पुढच्या काही शतकांचा इतिहास अशा प्रकारच्या संघर्षांनीच भारलेला राहिलेला आहे. संस्कृती संवर्धनाच्या प्रवाहाला अटकाव होत राहिला. जगाच्या जवळजवळ सर्वच भागांत ही परिस्थिती होती.

त्यात बदल झाला तो मुख्यत्वे युरोपात चौदाव्या-पंधराव्या शतकात सुरू झालेल्या सर्जनशील नवनिर्मितीच्या पुनरुत्थानातून, रेनेसान्समधून. कला, साहित्य, विज्ञान या मानवाच्या सर्जनशीलतेची प्रचीती देणाऱ्या सर्वच क्षेत्रांनी काजळी झटकून टाकली. एका नव्या क्रांतीचं वारं सर्वत्र वाहू लागलं. विज्ञानाच्या विकासातील दुसऱ्या कालखंडाचा प्रारंभ झाला. या कालखंडात एक महत्त्वाचा बदल झाला. तत्त्वचिंतन आणि अनुभवजन्य अनुमान या दोन आधारस्तंभांना प्रायोगिक परीक्षेची जोड मिळाली आणि या नव्या पद्धतीनंच पाहतापाहता अग्रस्थान मिळवलं. अनुभव येण्याची वाट न पाहता, वास्तव परिस्थितीत नियंत्रित बदल करून त्याच्या परिणामांचा अनुभव घेत त्यांची परीक्षा करण्याचं आणि त्यातून मिळालेल्या निष्कर्षांच्या आधारावर मूलतत्त्व शोधून काढण्याची नवीन पद्धत विकसित होत गेली. नियंत्रित बदल करण्याचा प्रयोग व्यक्तिनिष्ठ नसे, तो वस्तुनिष्ठ असे, तो क़रण्याची मुभा आणि क्षमता कोणाकडेही असे. यामुळंच या पद्धतीला सर्वमान्यता मिळत गेली. त्यामुळंही असेल कदाचित, जी विज्ञानाची घोडदौड सुरू झाली, ती आजतागायत राहिली आहे.

आपल्या देशातील विज्ञान अध्ययनाचेही असेच दोन कालखंड पडतात. प्राचीन काळात देशात विज्ञानाचा विकास झाला होता, परंतु वेदकाळातही आपल्या देशात आजच्या अत्याधुनिक विज्ञान-तंत्रज्ञानाचा सर्वदूर प्रसार झाला होता या दाव्याची पुष्टी करणारे विश्वासार्ह पुरावे आढळत नाहीत. रामायणात 'पुष्पक' विमानाचा उल्लेख आहे. त्या

आधारावर त्या काळी विमानविद्येनं या देशात चांगलंच बाळसं धरलं होतं असा दावा केला जातो. तो खरा मानायचा तर गुरुत्वाकर्षणाच्या बलाची ओळख त्या काळात पटली होती, त्याचं स्वरूप अवगत झालं होतं आणि त्याचे नियम, सूत्र यांचाही परिचय झाला होता असं मानायला हवं. त्या गुरुत्वाकर्षणाच्या ओढीवर मात करत आकाशगामी कसं व्हायचं हेही अवगत होतं, त्यासाठी आवश्यक क्षमता असणाऱ्या इंजिनाची बांधणी कशी करायची याचं तंत्रज्ञान विकसित झालेलं असायला हवं, असं विमान चालवण्याचं शिक्षण देणाऱ्या विद्यालयांची स्थापना झालेली असायला हवी, त्या विमानाचा सांगाडा बांधण्यासाठी योग्य ते गुणधर्म असणाऱ्या धातूची निर्मिती करण्याचं ज्ञान आणि त्याचं उत्पादन करणारे कारखाने स्थापित झालेले असावयास हवेत, या विमानांच्या उड्डाणासाठी विमानतळ बांधलेले असावयास हवेत, आकाशातल्या त्याच्या उड्डाणाचं नियंत्रण करणारे कक्ष हवेत. हे सारं तंत्रज्ञान विकसित झालेलं असेल तरच विमानविद्या अवगत होती असं अनुमान काढता येतं. तसं करण्यास मदत करणारी कागदपत्रं वा इतर विश्वासार्ह पुरावे सापडलेले नाहीत. तीच बाब महाभारतात असलेल्या वायव्यास्त्र किंवा अग्न्यस्त्र वगैरेंची. त्यामुळं आज आधुनिक युगात उपलब्ध असलेलं तंत्रज्ञान त्या काळात विकसित झालं होतं किंवा त्यासाठी आधारभूत असणारी विज्ञानसूत्रं अवगत झालेली होती असं मानण्यास जागा नाही.

पण याचा अर्थ त्या काळात काहीच प्रगती झालेली नव्हती किंवा ज्ञानसंग्रहाचं दालन रिकामं होतं असंही म्हणण्याचं कारण नाही. आयुर्वेद ही आरोग्यप्रणाली त्या काळात संपूर्ण विकसित झाली होती. ती त्याच काळातील सर्वात प्रगत प्रणाली होती. एवढंच नाही, तर त्यातील अनेक सूत्रं आजही तितकीच लागू पडतात हे सिद्ध करणारे अनेक पुरावे उपलब्ध आहेत. आयुर्वेद ज्यांना प्रमाण मानतं असे ते ग्रंथ म्हणजे चरकसंहिता (इसवी सनाचे पहिले शतक), सुश्रूतसंहिता (इसवी सनाचे दुसरे शतक) आणि वाग्भट (इसवी सनाचे सातवे शतक) हे होत आणि तेव्हापासून आजवर आयुर्वेदाची एक अखंड परंपरा आपल्याला दाखवता येते. जागतिक प्रदूषण आणि आधुनिक ॲलोपथिक औषधांच्या जाणवणाऱ्या दुष्परिणामांच्या संदर्भात जेव्हा आपण विचार करू लागतो, तेव्हा जगभर परत एकदा लोक आयुर्वेदाच्या मागे का लागले आहेत ते लक्षात येते. मात्र, आयुर्वेदाला आधुनिक विज्ञानाची जोड देऊन औषधात प्रमाणीकरण आणणे, औषधांच्या सर्व बाटल्यांवर औषधात असलेले घटक दाखविणे आणि औषधे बनविणाऱ्या कारखान्यात गुणवत्ता नियंत्रण करणे ह्या गोष्टी कराव्या लागतील. आयुर्वेदाची मूलभूत तात्त्विक बैठक पाश्चात्त्य वैद्यक प्रणालीच्या म्हणजेच ॲलोपथीच्या तात्त्विक बैठकीपेक्षा कशी वेगळी आहे हे सप्रमाण सिद्ध करावं लागेल. त्यामुळं आयुर्वेदातील निदान आणि उपचार या दोन्हींचीही परीक्षा करण्यासाठीचे निकष व पद्धती वेगळी का असावी हे तर्कसंगतरीत्या जगापुढं मांडावं लागेल आणि त्याच्या समीक्षेचे रूपबंधही आधुनिक विज्ञानपद्धतीशी सुसंगत रीतीनं विकसित करावे लागतील.

आयुर्वेदातील श्लोकांचा आधुनिक विज्ञानाच्या दृष्टिकोनातून अर्थ लावून तो कसा सुसंगत आहे हे दर्शवणारं संशोधन आज होत आहे. चरकसंहितेतील सूत्रानुसार बनवलेली औषधं आजही काही व्याधींवर सर्वात गुणकारी सिद्ध होत आहेत. त्यांचं औद्योगिक स्तरावर उत्पादन होत आहे आणि जगभर त्यांचं वितरणही होत आहे. सुश्रूतानं शस्त्रक्रियेसाठी वापरलेली उपकरणं सापडलेली आहेत. आजचे शल्यविशारद वापरत असलेल्या उपकरणांपेक्षा ती फारशी वेगळी नाहीत. दिल्लीचा पाचव्या-सहाव्या शतकातला लोहस्तंभ त्या काळातल्या विकसित धातुविज्ञानाची साक्ष देत उभा आहे. कोणार्क येथील सूर्यमंदिर त्या काळातल्या प्रगत वास्तुशिल्पाची ग्वाही देत आहे. भास्कराचार्य, लीलावती यांचे ग्रंथ गणितातील प्रगतीचे साक्षीदार आहेत. हे विज्ञान निश्चितच विकसित झालं होतं आणि ते करण्यात ज्यांनी कळीचं योगदान दिलं, त्यांचा समावेश शिल्पकारांमध्ये करण्यास प्रत्यवाय नसावा.

खगोल विज्ञानातही आपल्या वैज्ञानिकांनी गरुडझेप घेतली होती हे पटवून देणारे ग्रंथ उपलब्ध आहेत. वराहमिहिर,

आर्यभट्ट, ब्रह्मगुप्त, भास्कराचार्य यांच्या संशोधनाची माहिती आजही अनेकांना स्तिमित करून सोडते. त्यांनी उद्‌घोषित केलेल्या कितीतरी संकल्पना आज जगन्मान्य झालेल्या खगोलशास्त्रीय आणि विश्वरचनाशास्त्रीय संकल्पनांशी सुसंगत आहेत. आर्यभट्ट ते भास्कराचार्य हा ८०० वर्षांचा काळ आहे. इ.स.११५०मध्ये भास्कराचार्यांनी 'सिद्धान्त शिरोमणी' हा ग्रंथ लिहिला. यातील गोलाध्याय भागात खगोलशास्त्र आहे. चंद्राची त्रिज्या, त्याचे पृथ्वीपासूनचे अंतर, त्यावरील दिवसरात्रीची लांबी, बुध-शुक्र-मंगळ-गुरू-शनी या ग्रहांच्या प्रदक्षिणेस लागणारा काळ हे सारं त्यात आहे. ही मापनं आधुनिक मापनाशी खूप मिळतीजुळती आहेत. कार्ल सॅगाननं आपल्या 'कॉसमॉस' या ग्रंथात प्राचीन भारतीय कालमापनाचं परिमाण आधुनिक विश्वरचनाशास्त्राच्या परिमाणाशी मिळतंजुळतं आहे असं म्हटलं आहे.

पायथॅगोरसचा काटकोन त्रिकोण सिद्धान्त हा इ.स.पूर्व ५५०चा आहे, तर या सिद्धान्ताचा उल्लेख भारतीय शूल्बसूत्रात आहे. शूल्बसूत्राचा काळ हा इ.स.पूर्व १५००चा आहे. आर्यभट्ट प्रथम (सहावे शतक), ब्रह्मगुप्त (इ.स.६२८), महावीराचार्य (इ.स.८५०), आर्यभट्ट द्वितीय (इ.स.८७५), श्रीधर (इ.स.१०००), भास्कराचार्य (इ.स.११५०) आणि रामानुजन (इ.स.१९००) अशी गणितातील भारतीयांची परंपरा आहे. शून्याचा शोध भारतानं लावला ही आधुनिक गणिताला वाटणारी एक क्रांतिकारी घटनाच आहे. शून्याविना गणितातील आकडे मांडणं आणि हिशेब करणं ही अशक्यप्राय गोष्ट आहे. शून्याचा शोध लागण्यापूर्वी I, II, III, IV, V, VI...X...L...C...D असे आकडे अनुक्रमे १,२,३,४,५,६..१०,५०,१००,५०० वगैरेला वापरत आणि याचे गुणाकार करण्यासाठी गावातल्या तज्ज्ञांची फौज आणून बसवावी लागे आणि दोन, चार गुणाकार करायला त्यांना दोन-दोन दिवस लागत. शून्याच्या एका शोधामुळं आज पाचवी-सहावीतला मुलगाही भराभर गुणाकार करतो आणि आता गणकयंत्र (कॅल्क्युलेटर) आल्यावर तर तो ते निमिषमात्रात करतो. संपूर्ण संगणक ० आणि १ या दोन आकड्यांवर काम करणारा आहे. अशा वेळी शून्याचं महत्त्व आणखीच प्रकर्षानं जाणवतं.

अजंठा-वेरूळची लेणी, हळ्ळेबीड मंदिरातील शिल्पकाम, श्रवणबेळगोळची बाहुबलीची प्रचंड मूर्ती, दिल्लीतील कुतुबमीनारसमोरील न गंजणारा पाचव्या-सहाव्या शतकातील लोहस्तंभ, पोरस राजानं  अलेक्झांडरला भेट दिलेला १४ किलो वजनाचा पोलादी तुकडा, हरप्पा- मोहोंजोदरो संस्कृतीत वापरलेले ब्राँझ, तेथील गृहरचना, पाणीपुरवठा आणि सांडपाण्याची व्यवस्था, त्या वेळी वापरली जाणारी स्वयंपाकाची भांडी, तेथले जवळचे बंदर (मोहोंजोदरो संस्कृतीचा काळ इ.स.पूर्व ३२०० ते २५०० वर्ष होय) आणि अगदी अलीकडच्या काळातील म्हणजे सतराव्या शतकात श्रीरंगपट्टणमला टिपू सुलतानाच्या काळातील क्षेपणास्त्रे. ही भारतात जुन्या काळी वेगवेगळ्या शास्त्रात झालेली प्रगती दाखवितात.

परंतु, यांपैकी किती जणांची ओळख महाराष्ट्रीय अशी करता येईल, याबद्दल संदेह आहे. एक तर, महाराष्ट्र अशीच या प्रदेशाची ओळख त्या काळात झाली नव्हती. एवढंच काय, पण 'उत्तरं यत्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणम्' अशी भारतवर्षाची व्याख्या जरी आपण करत असलो, तरी तो तसा एकसंध प्रदेश होता की काय याविषयी शंका घेण्यास जागा आहे. कारण, तसा तो असता तर मगध, कलिंग, कामरूप, दंडकारण्य अशा वेगवेगळ्या आणि एकमेकांशी झगडत असलेल्या प्रदेशांचा उल्लेख झाला नसता. त्यामुळं, त्या काळातील ज्या शिल्पकारांच्या योगदानाविषयी यत्किंचितही संदेह नाही, अशांचा महाराष्ट्राच्या शिल्पकारांत समावेश करण्याबाबत दुविधा उत्पन्न होऊ शकते.

त्यामुळं आधुनिक रेनेसान्स पश्चात काळातील विज्ञानाच्या वाटचालीचाच मागोवा घ्यावयास हवा. महाराष्ट्र अशी ज्या प्रदेशाची आज आपण ओळख सांगतो, ती साधारण बाराव्या, तेराव्या शतकात दृग्गोचर झाली होती असं इतिहास सांगतो. संतवाङ्मयाचा आढावा घेतल्यास याची पुष्टी होते. पण, त्या काळात विज्ञान संशोधन होण्यासाठी

आवश्यक ती सामाजिक परिस्थिती आणि शांतीचं वातावरण महाराष्ट्रात नव्हतं. शिवाय, पाचव्या-सहाव्या शतकापासून पुढची दहा शतकं आपल्या देशातही एक अंधारयुगच अवतरलं होतं. या काळात सांस्कृतिक क्षेत्राच्या कोणत्याही पैलूला झळाळी दिली गेल्याच्या कोणत्याच खुणा नाहीत. त्यात परकीय आक्रमण आणि प्रशासन यांपोटी एकोणिसाव्या शतकापर्यंत सर्जनशील कृतींचा अभावच आढळतो.

अशा प्रतिकूल परिस्थितीतही महाराष्ट्रात काही प्रमाणात विज्ञान-तंत्रज्ञानाचा विकास होत राहिला होता, याचे काही प्रत्यय मिळतात. महाराष्ट्रात शिवाजीच्या काळी प्रत्येक गड-किल्ल्यावर पाण्याची व्यवस्था केलेली आढळते. पेशव्यांनी पुण्यात कात्रजच्या घाटातून शहरापर्यंत पाण्याची भूमिगत सोय केली होती आणि आज २०० वर्षे झाल्यानंतरही ती अजूनही वापरात येऊ शकेल इतकी धड अवस्थेत आहे. अशीच सोय अन्य शहरांतूनही आहे. दि.मा. मोरे यांनी महाराष्ट्रातील जुन्या काळच्या पाणी योजनेवर आणि अ.शं. पाठकांनी 'महाराष्ट्राची बारव संस्कृती' यावर पुस्तकं लिहिली आहेत. वालचंद हिराचंद आणि किर्लोस्कर बंधू यांनी महाराष्ट्रात कारखानदारी सुरू केली. मुंबईतही कापडगिरण्या सुरू झाल्या. द.बा. लिमये यांनी रसायनशास्त्रात काम केलं, तर वि.ना. शिरोडकर यांनी सूतिकाशास्त्राच्या शस्त्रक्रियेत विकसित केलेला 'शिरोडकर स्टिच' आंतरराष्ट्रीय पातळीवर वापरला गेला.

अभियांत्रिकी क्षेत्रात अलीकडे कोकण रेल्वेनं बांधलेले उंच-उंच पूल हे जागतिक पातळीवर चर्चेचे विषय झाले. कोयना धरणात दोन वर्षांपूर्वी लेक टॅपिंगचा प्रयोग यशस्वी झाला. नगर जिल्ह्यात हिवरे बाजार या गावात ज्या ठिकाणी जमिनीखाली पाणी साठत नव्हतं, अशा ठिकाणी जमिनीखाली सुरुंग लावून चिरा पाडल्या आणि आता तेथे पाणी साठू लागलं आहे.

त्यामुळं आधुनिक विज्ञान अध्ययनाच्या मुहूर्तमेढीसाठी आपल्याला एकोणिसाव्या शतकाच्या मध्याकडे ध्यान द्यावं लागतं. 'हिंदुस्थान' या नावानं ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशावर आता इंग्लंडच्या राणीचं साम्राज्य प्रस्थापित झालं आहे आणि ती सम्राज्ञी व्हिक्टोरिया या नावानं देशाचा कारभार करण्यास सज्ज झाली आहे, अशी दवंडी पिटली जात असतानाच, देशात तीन विद्यापीठांच्या स्थापनेची घोषणा क़रण्यात आली. १८५७ सालच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या समाप्तीनंतर बॉम्बे - आताचं मुंबई., मद्रास - आताचं चेन्नई आणि कलकत्ता - आताचं कोलकाता या ठिकाणी उच्च शिक्षण देणारी विद्यापीठं स्थापन केली गेली.

या तीन विद्यापीठांचा जन्म जरी एकाच वेळी झाला असला, तरी पुढील प्रवास मात्र वेगवेगळ्या मार्गानं होत गेला. विज्ञान - संशोधनानं जोम धरला तो कोलकाता विद्यापीठात. भौतिकशास्त्र व जीवशास्त्र या दोन्ही क्षेत्रांमध्ये संशोधन करणारे विभाग तिथं प्रस्थापित झाले. अभियांत्रिकी आणि तंत्रज्ञान यांच्या उच्च शिक्षणालाही तिथं प्रारंभ झाला. त्याचीच परिणती पुढं त्या क्षेत्रांना वाहिलेल्या विद्यापीठाच्या स्थापनेत झाली. प्रयोगशाळा आणि संशोधनसंस्था यांचीही स्थापना होत गेली. जगदीशचंद्र बोस, प्रफुल्लचंद्र रे, मेघनाद साहा, महेन्द्रलाल सरकार यांच्यासारख्या बिनीच्या शिलेदारांनी विज्ञानाची पताका फडकवत ठेवली. कोलकाता विद्यापीठ आणि विज्ञान संशोधन यांची इतकी एकजीव सांगड बसली की नोबेल पुरस्कारविजेते चंद्रशेखर व्यंकटरमन यांचं शिक्षण मद्रास विद्यापीठात झालेलं असतानाही संशोधनासाठी त्यांनी कोलकात्याचीच वाट धरली. त्यांचं नोबेल पुरस्कारानं सन्मानित केलं गेलेलं संशोधनही तिथंच झालं. ज्यांनी महाराष्ट्रात विज्ञानवर्धिनीची प्रतिष्ठापना केली, त्या वनस्पतिशास्त्रज्ञ शंकर पुरुषोत्तम आघारकरांची कारकीर्दही तिथंच फुलली, फोफावली आणि ती मान्यता मिळाल्यानंतरच ते महाराष्ट्रात आले.

मुंबई विद्यापीठात मानव्यविद्या आणि कायदा या क्षेत्राला मान देण्यात आला. स्वातंत्र्यलढ्यातील कित्येक धुरिणांनी या विषयात मुंबई विद्यापीठातून पदवी मिळवूनच आपल्या सामाजिक़, राजकीय कारकिर्दीला प्रारंभ केला होता. मुंबई विद्यापीठात विज्ञान-संशोधनाचे विभाग सुरूझाले ते एकोणीसशे सत्तरच्या दशकात. त्यानंतर गेल्या तीस-

चाळीस वर्षांमध्येही या विभागांनी देशातल्या आघाडीच्या संशोधनशाळांमध्ये स्थान मिळवलेलं नाही.

याला एक उल्लेखनीय अपवाद आहे तो विद्यापीठाच्या रसायन-तंत्रज्ञान विभागाचा. पण, त्याचीही स्थापना स्वातंत्र्यप्राप्तीच्या आसपासच झाली. सुरुवातीपासून त्यानं जवळजवळ स्वतंत्रपणे आपला कारभार हाकला आणि आज तर तो स्वायत्त झाला आहे. आता तो 'इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी' झाला आहे.

विज्ञान-संशोधनाचा संस्थात्मक विकास महाराष्ट्रात फारसा झाला नाही. मुंबईत स्थापन झालेली हाफकिन इन्स्टिट्यूट ही महाराष्ट्रातली पहिली संशोधनसंस्था. पुण्याला आघारकरांनी स्थापन केलेली 'महाराष्ट्र असोसिएशन फॉर कल्टिव्हेशन ऑफ सायन्स' ही महाराष्ट्रीय वैज्ञानिकांनी स्थापन केलेली पहिली संस्था म्हणावयास हरकत नाही. हाफकिन इन्स्टिट्यूटचे प्रणेते युरोपियन असल्यामुळं त्या संस्थेला थोडाफार राजाश्रय तरी मिळाला. पण, आघारकरांच्या संस्थेला ना राजाश्रय ना लोकाश्रय. त्यामुळं तिची व्हावी तशी भरभराट झाली नाही. केंद्र सरकारच्या विज्ञान-तंत्रज्ञान विभागानं तिचं मुखत्यारपत्र स्वीकारल्यानंतरच त्या संस्थेला काही बळ प्राप्त झालं आहे.

याचा अर्थ, महाराष्ट्रात विज्ञान-संशोधन झालंच नाही किंवा महाराष्ट्रीय वैज्ञानिकांनी लक्षणीय योगदान दिलेलं नाही असा होत नाही. पण, महाराष्ट्रीय वैज्ञानिकांना लक्षवेधी संशोधनासाठी महाराष्ट्राबाहेरच्या व क्वचितप्रसंगी देशाबाहेरच्या संस्थांकडे प्रयाण करावं लागलं ही वस्तुस्थिती आहे. तसंच, महाराष्ट्रात आज कार्यरत असलेल्या आणि जगभरात ज्यांनी नाव कमावलं आहे अशा विज्ञानसंस्था या मुख्यत्वे राष्ट्रीय स्वरूपाच्या केंद्र सरकारच्या विविध विभागांनी स्थापन केलेल्या आहेत. त्यांचे अध्वर्यू कित्येक वेळा महाराष्ट्र ही जन्मभूमी नसलेले राहिले आहेत, परंतु त्यांची संपूर्ण वैज्ञानिक कारकीर्द महाराष्ट्रातच व्यतीत झालेली आहे. प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे त्यांनी आधुनिक महाराष्ट्राच्या वैचारिक विकासाला हातभार लावलेला आहे. पुणे विद्यापीठ, नागपूर विद्यापीठ, महाराष्ट्रातील कित्येक कृषी विद्यापीठे या संस्थांतील विज्ञान संशोधन, तंत्रज्ञान विकास उल्लेखनीय आहेत. त्यांच्या अनुषंगानं महाराष्ट्रात अलीकडच्या काळात विज्ञान-संशोधनानं मूळ धरलं आहे, पण महाराष्ट्रातील विज्ञानसंस्था म्हटल्यानंतर ज्यांची नावं सर्वप्रथम नजरेसमोर येतात, त्या टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फण्डामेन्टल रिसर्च, भाभा ॲटॉमिक रिसर्च सेन्टर, नॅशनल केमिकल लॅबोरेटरी, नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ व्हायरॉलाजी, नॅशनल एन्व्हायर्नमेन्टल इंजिनीअरिंग रिसर्च इन्स्टिट्यूट, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, इंडियन इन्स्टिट्यूट फॉर सायन्स एज्युकेशन ॲण्ड रिसर्च, कॅन्सर रिसर्च इन्स्टिट्यूट यांसारख्या संस्था केंद्रीय संस्था आहेत. त्या महाराष्ट्रात आहेत म्हणून त्यांना महाराष्ट्रीय मानायचं की काय, हा वादाचा विषय होईल, पण त्यांच्या स्थापनेच्या काळात आणि नंतरही त्यांच्या विकासात महाराष्ट्रीय वैज्ञानिकांचं योगदान लक्षणीय राहिलेलं आहे. महाराष्ट्रीय समाजाच्या मानसविश्वात या संस्थांनी लोभाचं स्थान प्राप्त केलेलं नाही हे एकंदरीतच विज्ञान-संशोधनाच्या बाबतीतल्या महाराष्ट्रीय समाजाच्या अनास्थेचं द्योतक आहे. अशीच अनास्था महाराष्ट्रातील शासनकर्त्यांनीही दाखवलेली आहे. शासनाच्या स्तरावर विज्ञान व तंत्रज्ञान विकासाच्या कोणत्याच योजना राबविण्यात आल्या नाहीत. त्यापायी संशोधनसंस्थांचीही स्थापना झाली नाही. विद्यापीठांमधील संशोधनविकासाकडेही शासकीय स्तरावर दुर्लक्षच झालं आहे.

तेव्हा, महाराष्ट्राचे विज्ञान-तंत्रज्ञान शिल्पकार यांची निवड करताना या वास्तवाची दखल न घेणं परवडणारं नाही. म्हणूनच जन्मभूमी महाराष्ट्र किंवा कर्मभूमी महाराष्ट्र किंवा दोन्हीही असणाऱ्या दिग्गजांचा महाराष्ट्राच्या शिल्पकारांमध्ये समावेश करण्याचा व्यापक दृष्टिकोन बाळगणं आवश्यक आहे.

असाच विस्तारित दृष्टिकोन विज्ञान-तंत्रज्ञान विषयांची व्याप्ती ठरवण्यासाठीही आवश्यक आहे. भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, सूक्ष्मजीवविज्ञान यांसारख्या विज्ञानाच्या मूलभूत शाखांना, तसंच त्यांच्या आपापसातील सहयोगापायी स्थापन झालेल्या जैवरसायनशास्त्र, जैवभौतिकशास्त्र, रेण्वीयजीवशास्त्र यांसारख्या

अत्याधुनिक शाखांचा समावेश तर करायलाच हवा. तीच बाब उपयोजित विज्ञानशाखांची व तंत्रज्ञानशाखांचीही आहे. या विषयांमध्ये मूलभूत संशोधन करून मोलाची भर घालणाऱ्या महाभागांना शिल्पकार म्हणून गणलं जाणं स्वाभाविकच होतं, पण विज्ञान शिक्षण आणि विज्ञान प्रसार या समाजात विज्ञानाची वेल रुजण्यासाठी आवश्यक असणाऱ्या क्षेत्रांमध्ये देदीप्यमान कामगिरी करणाऱ्या महाभागांनाही त्या पंक्तीत स्थान देणं आवश्यक ठरतं.

तरीही, लक्षणीय किंवा देदीप्यमान कामगिरीचे निकष कोणते, असा सवाल उभा राहण्याचा संभव आहे. त्या बाबतीत मात्र संदिग्धता नाही. ते निकष ठोक आहेत. राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय स्तरावर ज्यांना मानसन्मान प्राप्त झालेले आहेत, राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय संस्थांचं संचालकत्व ज्यांनी भूषविलं आहे, ज्यांच्या संशोधनाचा गौरवपर उल्लेख मान्यताप्राप्त आंतरराष्ट्रीय नियतकालिकांमधून झालेला आहे, ज्यांनी प्रयोगशाळेतील संशोधन घराघरापर्यंत पोहोचवलेलं आहे, खास करून शेतकीमध्ये महाराष्ट्रातील शेतीच्या समस्यांवर तोडगे शोधण्याचे विशेष प्रयत्न ज्यांनी केले आहेत, ज्यांनी विज्ञानाधिष्ठित उद्योगधंद्यांची स्थापना करून तंत्रज्ञान विकासात मोलाची भर घातली आहे, ज्यांनी विज्ञानशिक्षणाचा पाया भक्कम करण्याची कामगिरी बजावलेली आहे, अशांना शिल्पकारांमध्ये स्थान मिळालेलं आहे. समाजात वैज्ञानिक दृष्टिकोन रुजविण्याच्या प्रयत्नांमध्ये मात्र महाराष्ट्र आघाडीवर राहिला आहे. यातील बहुतेक योगदान स्वयंसेवी संस्थांचंच आहे. त्यांच्या कार्यामध्ये महत्त्वाची भूमिका बजाविणाऱ्या दिग्गजांनाही शिल्पकार मानणं आवश्यक आहे.

हे निकष जरी ठोस असले, तरी त्यानुसार ज्यांची निवड होऊ शकते अशा सर्वांचाच समावेश या कोशात आहे, असा दावा मात्र करता येणार नाही. दस्तऐवजांच्या दफ्तरीकरणाबाबत आपल्या देशातच एकंदरीत भयानक अनास्था आहे. अनेक धडाडीच्या धुरिणांची विश्वासार्ह चरित्रविषयक माहिती मिळणं त्यामुळंच दुरापास्त झालं आहे. त्यांच्या वैज्ञानिक कार्याची बरीचशी माहिती मिळत असली तरी त्यांच्या वैयक्तिक माहितीची वानवाच आहे. कित्येकांच्या वैज्ञानिक शोधनिबंधांचा उल्लेख इतरत्र आढळतोय, पण ते मूळ शोधनिबंध अवलोकनासाठीही उपलब्ध नाहीत. ज्यांच्या काही निकटच्या नातलगांचा वा वारसांचा वा शिष्यांचा ठावठिकाणा लागणं शक्य आहे, अशांकडून काही माहिती मिळू शकते. कित्येक वेळा तीही तुटपुंजी असते किंवा त्यावर भावनात्मक जवळिकीचं सावट पडलेलं असतं. अशा वेळी काही अतिशय अवघड निर्णय घ्यावे लागतात. जी माहिती मिळाली, तिच्या विश्वासार्हतेची खात्री नसतानाही तिचा समावेश करावा की ती वगळण्याचा मार्ग पत्करावा, अशा दुविधेत पडल्यावर ती वगळण्याचा सोईस्कर मार्ग पत्करण्याचा मोह होतो.

महाराष्ट्रात विज्ञान प्रसाराचं काम अनेक संस्था गेली कित्येक वर्षं जोमानं करीत आहेत. 'मराठी विज्ञान परिषद' हे त्यांतील एक ठळक नाव. ही संस्था गेली ४४ वर्षे नाना प्रकारे विज्ञान प्रसार करीत आहे. १९६६पासून २०१०पर्यंत मराठी विज्ञान परिषदेनं अखंडपणे चव्वेचाळीस अधिवेशनं भरवली आहेत. इतर संमेलनांत पडला, तसा खंड एकदाही न पडता या अधिवेशनांचं अध्यक्षपद मराठी भाषक वैज्ञानिकानं भूषविलं आहे. (अपवाद १९९५ सालचे अध्यक्ष श्री. अरविंद गुप्ता आणि २०१० सालचे अध्यक्ष माजी राष्ट्रपती डॉ. अब्दुल कलाम.) या अधिवेशन परंपरेनं वैद्यक, अभियांत्रिकी, भौतिकी, रसायन, जीव, शेती, समुद्रतळ, लोकसंख्या, संरक्षण, शिक्षण, आहार, भूशास्त्र, पर्यावरण, अर्थशास्त्र, रेल्वे इत्यादी विषयांतील वैज्ञानिकांना अध्यक्षपद देऊन त्या-त्या विषयातील त्यांच्या कामाच्या निमित्तानं हे विषय ग्रामीण आणि शहरी समाजापुढे आणून त्या-त्या विषयात समाजाचं प्रबोधन केलं. याचा आणखी एक फायदा असा झाला की, ही क्षेत्रं पालकांना माहीत झाल्यानं, ही क्षेत्रं शैक्षणिकदृष्ट्या महत्त्वाची आहेत, हे ध्यानात आलं आणि व्यावसायिक आणि शैक्षणिक ह्या दोन्ही दृष्टींनी वैद्यकीय आणि अभियांत्रिकी या क्षेत्रांना विविध पर्याय उपलब्ध झाले.

या साऱ्या चक्रव्यूहातून मार्ग काढत, महाराष्ट्राच्या विज्ञान-तंत्रज्ञान क्षेत्रांतील शिल्पकारांचा अल्पचरित्रात्मक कोश आज वाचकांपुढं सादर होत आहे. यातील अल्पचरित्र या संज्ञेकडे वाचकांचं लक्ष वेधणं आवश्यक वाटतं. या कोशांच्या नोंदींचं स्वरूप आणि व्याप्ती यांचे निकष निश्चित करण्यासाठी प्रबंध संपादक मंडळानं काही नियम केले होते. त्यानुसार प्रत्येक नोंदींची कमाल मर्यादा १२०० शब्दांवर सीमित केली होती. उपलब्ध माहिती, शिल्पकाराच्या कार्याचं स्वरूप यांनुसार ही मर्यादा किमान ३५० शब्दांची असावी असाही नियम होता. या नियमांचं काटेकोर पालन ह्या विज्ञानकोशाच्या संपादनाच्या वेळी केलं गेलं आहे. या कोशाची समीक्षा करताना संपादनावर पडलेल्या या मर्यादांचंही भान ठेवणं आवश्यक ठरावं. तरीही त्यावरची वाचकांची वा समीक्षकांची भलावण करणारी प्रतिक्रिया त्या शिल्पकारांच्या महनीय कामगिरीपोटी असेल पण आलोचना करणाऱ्या प्रतिक्रियांचं उत्तरदायित्व संपादकांनी स्वीकारायला हवं, अशीच आमची भावना आहे.

**– बाळ फोंडके / अ. पां. देशपांडे**




## अरविंदकुमार

**भौतिकशास्त्रज्ञ**

**१५ ऑक्टोबर १९४३**



भारतातील विज्ञान शिक्षणक्षेत्रात मोलाची कामगिरी करणाऱ्या प्रा.अरविंदकुमार यांचा जन्म दिल्लीला झाला. त्यांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण दिल्लीला झाले. १९६९ साली मुंबई विद्यापीठातून त्यांनी भौतिकशास्त्र या विषयात पीएच.डी. संपादन केली.

लंडन विद्यापीठात आणि जिनिव्हातील सर्न येथून पोस्ट-डॉक्टरल काम केल्यानंतर, प्रा.अरविंदकुमार भारतात परतले. त्यानंतर १२ वर्षे त्यांनी मुंबई विद्यापीठाच्या भौतिकविज्ञान विभागात अध्यापनाचे काम केले. १९८४ साली प्रा.अरविंदकुमार यांनी टाटा मूलभूत संशोधन संस्थेच्या (टी.आय.एफ.आर.च्या) होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र येथे आपल्या कामाला सुरुवात केली. त्यानंतर अल्पावधीतच म्हणजे १९९४ साली त्यांच्यावर होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्राच्या संचालकपदाची जबाबदारी सोपवण्यात आली. ३१ ऑक्टोबर २००८ या दिवशी होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्रातून ते ज्येष्ठ प्राध्यापक आणि संचालक म्हणून निवृत्त झाले.

आपल्या कारकिर्दीच्या पहिल्या टप्प्यात अरविंदकुमार यांनी सैद्धान्तिक भौतिकशास्त्र या विषयामध्ये संशोधन केले व याच विषयाचे अध्यापनही केले. शिवाय सैद्धान्तिक भौतिकशास्त्र शाखेतील अनेकविध विषयांवरील पीएच.डी.च्या प्रबंधांना मार्गदर्शन केले. परंतु प्रा.अरविंदकुमार यांनी मुख्यत्वेकरून, विज्ञान शिक्षणाच्या क्षेत्रात विविध प्रकारचे काम केले. विज्ञान शिक्षणावर संशोधन आणि सुधारणा होण्याच्या दृष्टीने अधिक काम व्हायला हवे, या विचाराला त्यांनी चालना दिली आणि पुढे होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्रात, ‘विज्ञान शिक्षण’ या विषयावर पीएच.डी.च्या पदवीसाठी काम करण्याची सुविधा उपलब्ध केली गेली. २००५ सालचा राष्ट्रीय अभ्यासक्रमाचा आराखडा तयार करण्याच्या समितीचे ते सदस्य होते. त्या आराखड्यातील विज्ञान शिक्षणाशी संबंधित भागाचे काम करणाऱ्या विशेष गटाचे ते अध्यक्ष होते. अनेक वर्षे त्यांनी राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन आणि प्रशिक्षण परिषदेची (एन.सी.ई.आर.टी.) पदार्थविज्ञानाची पुस्तके लिहिण्यातही सहभाग घेतला. त्यांच्या प्रोत्साहनामुळे होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्रातल्या त्यांच्या इतर सहकाऱ्यांनी शालेय विज्ञान शिक्षणाला दिशा देणारा स्वत:चा असा अभ्यासक्रम तयार केला.

विज्ञानाचे उत्कृष्ट विद्यार्थी घडण्यासाठी राष्ट्रीय पातळीवरून केल्या जाणाऱ्या अनेक प्रयत्नांमध्ये प्रा.अरविंदकुमार यांचे महत्त्वाचे योगदान आहे. त्याच दृष्टीने त्यांनी उचललेले महत्त्वाचे पाऊल म्हणजे राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर होणाऱ्या ‘विज्ञान ऑलिम्पियाड’ या स्पर्धा परीक्षेची, भारतातील युवा पिढीला प्रशिक्षित करण्यासाठी, त्यांनी उभी केलेली चळवळ! १९९७ सालापासून त्यांच्या नेतृत्वाखाली, होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्रामध्ये देशातले विज्ञान ऑलिम्पियाड प्रशिक्षण केंद्र उभे केले गेले. जीवशास्त्र,



ऑलिम्पियाड विजेते विद्यार्थी

रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, गणित आणि खगोलशास्त्र या विषयांतील ऑलिम्पियाड स्पर्धा परीक्षेची तयारी करून घेण्यासाठी आणि भारतीय विद्यार्थ्यांना आंतरराष्ट्रीय पातळीवर यश मिळवता यावे, यासाठी होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्रातील तज्ज्ञ, वर्षभर अनेक आव्हानात्मक अशा प्रयोगांचे आणि माहितीचे संकलन आणि अभ्यास करत असतात. २००१ सालच्या तेहेतिसाव्या आंतरराष्ट्रीय रसायनशास्त्र ऑलिम्पियाडचे, २००६ सालच्या अकराव्या आंतरराष्ट्रीय खगोलशास्त्र ऑलिम्पियाडचे आणि २००८ सालच्या एकोणिसाव्या आंतरराष्ट्रीय जीवशास्त्राच्या भारतात भरलेल्या ऑलिम्पियाडचे नेतृत्व प्रा.अरविंदकुमार यांनी केले. त्या प्रत्येक वेळी, जगभरातील तज्ज्ञांकडून केंद्राच्या कार्याचे कौतुक केले गेले. तसेच अरविंदकुमार यांनी बंगलोर येथील इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स या संस्थेतर्फे घेतल्या जाणाऱ्या किशोर वैज्ञानिक प्रोत्साहन योजनेच्या अनेक उपक्रमांत सक्रिय सहभाग घेतला.

प्रा.अरविंदकुमार यांना २००३ साली इंडियन न्यूक्लियर सोसायटीचे विज्ञान प्रसाराचे पारितोषिक प्राप्त झाले. त्यांनी मराठी विज्ञान परिषदेच्या २००६ सालच्या अखिल भारतीय मराठी विज्ञान अधिवेशनाचे अध्यक्षस्थान भूषवले. २००६ साली कुसुमाग्रज प्रतिष्ठानतर्फे दिला जाणारा 'ज्ञान' या विभागातला 'गोदावरी' पुरस्कार प्राप्त झाला आणि २००८ साली शिक्षण या विषयासंबंधी 'थर्ड वर्ल्ड अकॅडमी ऑफ सायन्सेस'चे क्षेत्रीय पारितोषिक मिळाले. विज्ञान आणि गणिताच्या अनेक संकल्पना स्पष्ट करणाऱ्या विविध पुस्तकांचे लेखनही प्रा.अरविंदकुमार यांनी केले आहे. 'सायन्स - अ ह्यूमन सागा' या विज्ञानाचा इतिहास सांगणाऱ्या प्रदर्शनाची संकल्पना त्यांनी मांडली आणि ती पूर्णत्वाला नेण्यासाठी मार्गदर्शनही केले.

विज्ञान शिक्षणाशी संबंधित असे अनेक उपक्रम त्यांनी योजले आणि यशस्वी केले. भारतातल्या विज्ञान शिक्षणाला जगाच्या नकाशावर मानाचे स्थान मिळवून दिले.

— डॉ. मानसी राजाध्यक्ष

***संदर्भ :***

*१. दै. सकाळ; २८ फेब्रुवारी २०००.*
*२. दै. लोकसत्ता; ८ फेब्रुवारी २०१०.*

## अर्णीकर, हरी जीवन

**रसायनशास्त्रज्ञ**

**६ ऑक्टोबर १९१२ - २१ नोव्हेंबर २०००**



प्रा.हरी जीवन अर्णीकर यांची बनारस हिंदू विद्यापीठ आणि पुणे विद्यापीठातील रसायनशास्त्राचे ज्येष्ठ अध्यापक, अण्वीय रसायनशास्त्रातील एक अग्रगण्य संशोधक आणि प्रभावी वक्ते अशी ओळख आहे. युनेस्कोच्या एका शैक्षणिक प्रकल्पात आंतरराष्ट्रीय सल्लागार म्हणून त्यांची नियुक्ती झाली होती.

प्रा.अर्णीकर यांचा जन्म आंध्र प्रदेशातील श्रीकाळहस्ती या गावी झाला. ते सात वर्षांचे होते तेव्हा त्यांच्या वडिलांचे निधन झाले. त्यामुळे त्यांचे बालपण कष्टात गेले. शिक्षणासाठी त्यांना गावोगावी फिरावे लागले. त्यांच्या आत्याने सतत प्रोत्साहन दिल्यामुळे

त्यांचे शालान्त शिक्षण पूर्ण झाले. मदनपल्लीच्या बेझंट थिऑसॉफिकल महाविद्यालयाचे प्राचार्य चिंतामणी त्रिलोकेकर यांनी अर्णीकरांचे गुण आणि बुद्धी लक्षात घेऊन त्यांची बनारस हिंदू विद्यापीठात पुढील शिक्षणाची सोय करून दिली. तेथे बी.एस्सी. आणि एम.एस्सी. या दोन्ही पदव्या त्यांनी पहिल्या श्रेणीत, पहिल्या क्रमांकाने उत्तीर्ण होऊन डॉक्टरेट पदवीसाठी संशोधन सुरू केले. त्यांना प्रा.श्रीधर सर्वोत्तम जोशी यांनी मार्गदर्शन केले. त्यांच्या प्रबंधाचे शीर्षक होते, 'कोरोना प्रेशर अँड दी जोशी इफेक्ट इन गॅसेस अंडर डिस्चार्ज.' त्यांचा प्रबंध सातशे पृष्ठांचा होता आणि तीन परदेशी प्राध्यापकांनी त्याची प्रशंसा केली होती.

१९५५ साली त्यांना भारत सरकारची 'ओव्हरसीज मॉडिफाइड स्कॉलरशिप' मिळाली. त्यानुसार ते पॅरिसमधील मेरी क्यूरी यांनी स्थापन केलेल्या प्रयोगशाळेत रुजू झाले. तेथे त्यांना प्रा.फ्रेडरिक जुलिएट क्यूरी आणि प्रा.इरेन क्यूरी या नोबेल मानकरी असलेल्या पति-पत्नीबरोबर संशोधन करण्याची संधी मिळाली. 'सेपरेशन ऑफ आयसोटोप बाय इलेक्ट्रोमायग्रेशन इन फ्युज्ड सॉल्ट्स' हा प्रबंध त्यांनी तेथे लिहिला. पॅरिस विद्यापीठाने त्यांच्या प्रबंधाचे मूल्यमापन करून त्यांना 'डॉक्टरेट ऑफ सायन्स' ही पदवी दिली. १९५८ साली ते बनारस हिंदू विद्यापीठामध्ये प्रपाठक म्हणून रुजू झाले. या ठिकाणी त्यांनी अणुरसायनशास्त्र विभागाची उभारणी केली. डॉ. के.एन. उडुपा यांच्याबरोबर वैद्यकशास्त्रामध्ये जेथे-जेथे कल्पकतेने किरणोत्सर्गी समस्थानिकांचा (आयसोटोपचा) उपयोग करता येईल, तेथे-तेथे यशस्वीपणे करून दाखवला. त्या सुमारास पुणे विद्यापीठातील रसायनशास्त्र विभागामध्ये त्यांना प्राध्यापक आणि विभागप्रमुख म्हणून कार्य करण्याची संधी मिळाली. ३१ जुलै १९६२ रोजी त्यांनी पदभार स्वीकारला.

मुंबईच्या भाभा अणुसंशोधन केंद्राच्या सहकार्याने त्यांनी पुणे विद्यापीठामध्ये अणुरसायनशास्त्राच्या अध्ययन व संशोधनासाठी आवश्यक असणाऱ्या पायाभूत सुविधा विकसित केल्या. त्यांच्या मार्गदर्शनाखाली ३३ विद्यार्थ्यांनी 'डॉक्टरेट' पदवी मिळवली. त्यातून ३०० शोधनिबंध प्रकाशित झाले. १९७७ साली ते सेवानिवृत्त झाले. तरीही विद्यापीठाने त्यांना मानद प्राध्यापक म्हणून अध्यापन - संशोधन करण्याच्या सुविधा उपलब्ध करून दिल्या होत्या. त्यामुळे प्रा.अर्णीकरांना 'हॉट ॲटम केमिस्ट्री', 'ॲक्वाल्युमिनेसन्स', 'फ्युज्ड इलेक्ट्रोलाइट्स', 'जोशी इफेक्ट' आदी विषयांमध्ये संशोधन करणे शक्य झाले. 'युनिव्हर्सिटी केमिकल सोसायटी'च्या वतीने त्यांनी काही उपक्रम राबवून विज्ञान प्रसारासाठी फिरत्या प्रयोगशाळेचाही उपयोग केला होता.

१९६२ साली त्यांना अमेरिकेतील विस्कॉन्सिन-मॅडिसन विद्यापीठात मॅनहॅटन प्रकल्पातील शास्त्रज्ञ प्रा. जॉन विलार्ड यांच्या प्रयोगशाळेत संशोधन करण्यासाठी फुलब्राइट शिष्यवृत्ती मिळाली होती. रसायनशास्त्राच्या अध्यापनात मौलिक सुधारणा करण्यासाठी 'युनेस्को'ने त्यांची 'पायलट प्रोजेक्ट ऑन टीचिंग केमिस्ट्री' या प्रकल्पात आंतरराष्ट्रीय सल्लागार म्हणून नेमणूक केली होती. हा प्रकल्प खास करून आशियातील संस्थांसाठी होता आणि त्याचे कार्य बँकॉक येथे होत असे. त्यांनी विद्यापीठ अनुदान मंडळाच्या अनेक प्रकल्पांत आणि उपक्रमांत सातत्याने भाग घेतला.

कृत्रिम किरणोत्सर्गाच्या शोधाला ५० वर्षे पूर्ण झाल्यामुळे त्यांनी १९८५ साली भाभा अणुसंशोधन केंद्र यांच्या सहकार्याने एक भव्य आंतरराष्ट्रीय चर्चासत्र यशस्वीपणे पार पाडले होते. १९८८ साली लंडनच्या 'रॉयल सोसायटी ऑफ केमिस्ट्री'चे (एफ.आर.एस.सी.) ते मानद सदस्य झाले. १९७४ साली उत्कृष्ट शिक्षक म्हणून महाराष्ट्र राज्य सरकारने त्यांचा गौरव केला. पुणे विद्यापीठाच्या सुवर्ण महोत्सवाच्या निमित्ताने त्यांना १९९९ साली 'जीवन साधना गौरव पुरस्कार' प्रदान करण्यात आला. 'विद्या व्यास पुरस्कार', 'एम.व्ही. रमणय्या पुरस्कार', 'शारदा ज्ञानपीठ पुरस्कार', 'प्रो.फ्रेडरिक ज्योलियो क्यूरी एंडोमेंट अवॉर्ड', 'फुलब्राइट शिष्यवृत्ती' आदी सन्मानांचे ते मानकरी ठरले.

'इसेन्शियल्स ऑफ न्यूक्लिअर केमिस्ट्री अँड आयसोटोप्स इन दी अॅटॉमिक एज' या त्यांच्या पुस्तकाचे युरोपातील सहा देशांनी भाषांतर केले आहे. १९०८ साली डॉ.लेडबीटर आणि अॅनी बेझंट यांनी गूढ रसायनशास्त्रावर एक 'ऑकल्ट केमिस्ट्री' हा ग्रंथ लिहिलेला होता. १९१९ साली या ग्रंथाची एक सुधारित आवृत्तीही निघाली होती. त्या ग्रंथातील निष्कर्षाचा आधुनिक विज्ञानाच्या कसोटींवर अर्णीकर यांनी अभ्यास केला. त्यावर आधारलेला 'एसेन्शियल्स ऑफ ऑकल्ट केमिस्ट्री' हा ग्रंथ त्यांनी २००० साली, वयाच्या अठ्ठ्याऐंशीव्या वर्षी लिहून पूर्ण केला. प्रा.अर्णीकरांना मराठी, तेलुगू, हिंदी, इंग्रजी आणि फ्रेंच या भाषा अस्खलितपणे बोलता येत असत. त्यांचे वक्तृत्व प्रभावी होते. त्यामुळे त्यांनी सर्वसामान्य लोकांमध्ये जाऊन विज्ञान प्रसाराचे कार्यही केले. नोबेल पुरस्काराचे मानकरी ठरलेल्या अनेक जणांशी त्यांचा व्यक्तिगत परिचय होता.

प्रा.हरी जीवन अर्णीकर यांचे पुणे येथे वृद्धापकाळाने निधन झाले.

– डॉ. अनिल लचके

## आघारकर, शंकर पुरुषोत्तम

**वनस्पतीशास्त्रज्ञ, प्राणिशास्त्रज्ञ**

**१८ नोव्हेंबर १८८४ - २ सप्टेंबर १९६०**



शंकर पुरुषोत्तम आघारकर यांचा जन्म कोकणात, मालवण येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण वडिलांच्या बदल्यांमुळे सहा-सात ठिकाणच्या शाळांमध्ये झाले. महाविद्यालयीन शिक्षण मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयात झाले. वनस्पतिशास्त्र आणि प्राणिशास्त्र घेऊन ते प्रथम वर्गात बी.ए. झाले. तेव्हा त्यांना इंग्रजीतील नैपुण्याबद्दल बेल पारितोषिक मिळाले. १९०७ साली 'लिस्बोआ स्कॉलर' म्हणून मुंबईच्या ग्रँट वैद्यकीय महाविद्यालयामध्ये ते प्रायोगिक वनस्पतिशास्त्र शिकवत. वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र आणि भूशास्त्र हे विषय घेऊन ते १९०९ साली ते एम.ए. झाले आणि त्याच महाविद्यालयामध्ये जीवशास्त्राचे अध्यापक झाले.

आघारकर यांना प्राणी आणि वनस्पतींचे नमुने गोळा करण्याची अत्यंत आवड होती. त्यांनी प्रत्येक सुट्टीमध्ये ठिकठिकाणचे नमुने गोळा केले आणि परिसराचा अभ्यास केला. सह्याद्रीच्या डोंगरात फिरताना त्यांनी गोड्या पाण्यातील जलपुष्प प्राण्यांतील (स्पंज सिलेंटराटा) एका नव्या जातीचा शोध लावला. हा प्राणी (लिम्नोक्निडा इंडिका) कोयना, वेण्णा, कृष्णा या नद्यांच्या आणि धोमच्या पाण्यांत सापडतो, हे त्यांचे संशोधन 'नेचर' या आघाडीच्या जगविख्यात अशा शास्त्रीय नियतकालिकात प्रसिद्ध झाले.

महाविद्यालयातील चार वर्षांची हंगामी नोकरी पूर्ण झाल्यावर त्यांना शाळेत शिक्षक होण्याची 'संधी' मिळाली. त्या काळात सरकारी नोकरी ही मोठी संधी मानली जायची; पण आघारकर यांनी ती नाकारली आणि कलकत्त्यातील इंडियन म्यूझियममध्ये जाणे पसंत केले. म्यूझियममधील सिलेंटराटा विषयाचे ख्यातनाम तज्ज्ञ डॉ.अॅनेडेल यांनी त्यांना स्पंजांचे नमुने गोळा करून टिकवण्याचे विशेष शिक्षण दिले. शिवाय काश्मीरहून आणलेल्या 'मीज' माशीचे नमुनेही पुढील अभ्यासासाठी दिले. आघारकरांनी सह्याद्रीतून शोधून आणलेल्या इंगळीच्या एका जातीला डॉ.ग्रॅव्हेली यांनी 'क्रिप्टोहिप्टॉस आघारकरी' असे नाव देऊन आदर व्यक्त केला.

कलकत्ता विद्यापीठात 'रासबिहारी घोष प्राध्यापक पदा'साठी त्यांचे नाव डॉ.सी.व्ही. रमण यांनी सुचवले आणि सर आशुतोष मुखर्जी यांच्याशी त्यांची ओळख करून दिली. मुखर्जींनी आघारकरांना जर्मनीला जाऊन शिक्षण घेण्यास सांगितले. इंडियन सायन्स काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनाला हजर राहून आघारकर १९१४ साली जर्मनीला गेले. दुर्दैवाने त्याच वर्षी पहिले महायुद्ध सुरू झाले आणि शत्रुराष्ट्राचे नागरिक (ब्रिटिश



**आघारकर रिसर्च इन्स्टिट्यूट**

पारपत्रधारक) म्हणून त्यांना तीन वर्षे निरनिराळ्या बंदिस्त छावण्यांत राहावे लागले. युद्ध संपल्यावर दोन वर्षे जर्मनीतील ख्यातनाम वनस्पती शास्त्रज्ञांच्या मार्गदर्शनाखाली काम करून त्यांनी १९१९ मध्ये पीएच.डी. मिळवली. त्यासाठी त्यांचा विषय होता, 'राजस्थान आणि वायव्य भारतातील शुष्क वाळवंटी प्रदेशातील वनस्पती जातींची वाढ, प्रसार आणि संभाव्य मूलस्थान.' त्यानंतर युरोप आणि इंग्लंड येथील वनस्पती उद्योगांना भेटी, दुर्मीळ वनस्पती संकलन, अशी कार्ये करून परतल्यावर ते १९२० सालापासून कलकत्ता विद्यापीठात 'घोष प्राध्यापक' झाले. डोंगर-रानात जाऊन त्यांनी वनस्पतींचे निरीक्षण आणि संग्रह केला. नेपाळमधील वनस्पतींचा पथदर्शी अभ्यास केला, संकलन केले.

आसपासच्या घटनांकडे लक्ष ठेवण्याची त्यांची वृत्ती होती. सिबदूर (हावरा) येथील वनस्पती उद्यानातील दुर्मीळ वनस्पतींचे नमुने लंडनच्या क्यू गार्डनमध्ये हालविण्याची योजना असल्याचे समजल्यावर त्याला विरोध करून ते नमुने देशातच राहतील याची त्यांनी व्यवस्था केली. ब्रिटिश राष्ट्रकुलातील वनस्पती अभ्यासकांना '१८५१ प्रदर्शनी' शिष्यवृत्ती मिळत असे; पण प्रामुख्याने ऑस्ट्रेलिया आणि कॅनडा येथील विद्यार्थ्यानाच ती दिली जात असे. आघारकरांच्या प्रयत्नाने त्यांतील दोन शिष्यवृत्त्या आपल्या देशासाठी मंजूर झाल्या.

भारतातील दानशूर व्यक्तींनी आणि संस्थानिकांनी दिलेल्या रकमेतून दिल्या जाणाऱ्या शिष्यवृत्त्या भारतीयांना मिळत नसत. या निधीचा सखोल अभ्यास केल्यावर इंडिया काउन्सिलचे सभासद असलेल्या रँग्लर रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे यांच्या मदतीने त्यांनी ही व्यवस्था बदलून घेतली. परिणाम म्हणजे भारतीयांनाही 'लंडन १८५१ प्रदर्शनी' या परदेशातील शिष्यवृत्त्या मिळू लागल्या. सुरुवातीच्या स्कॉलरमध्ये डॉ. होमी भाभा, डॉ.के. आर. सुरंगे यांचा समावेश होता.

आघारकर शिक्षक म्हणून विद्यार्थ्यांमध्ये प्रिय होते. पण ते या स्पष्टवक्त्याला वचकूनही असत. त्यांच्या विद्यार्थ्यांनी भात, ज्यूट, आंबा, केळी अशा महत्त्वाच्या पिकांवर संशोधन केले. इंडियन सायन्स काँग्रेसच्या १९२४ सालच्या अधिवेशनात ते वनस्पतिशास्त्र विभागाचे अध्यक्ष होते. त्याच संस्थेचे मानद कार्यवाह म्हणून त्यांनी अकरा वर्षे कार्य केले आणि १९४६ सालापर्यंत ते कार्यकारिणीचे सभासद राहिले. देशातील वनस्पतिशास्त्र शिक्षणातील त्रुटी दाखवून त्यांनी त्यावर उपाययोजनाही सुचवली. १९३८ साली 'नॅशनल हर्बेरियम'चे अध्यक्ष असताना, त्यांच्या पुढाकारामुळे देशाचा 'हर्बेरियम' मार्गावर तर आलाच, पण प्रादेशिक हर्बेरियमही सुरूझाले. त्यांच्या या कार्याबद्दल बंगालच्या रॉयल एशियाटिक सोसायटीने त्यांना विशेष पदक देऊन त्यांचा सन्मान केला.

ते इंडियन इकोलॉजिकल सोसायटीचे १९४०-१९४५ दरम्यान अध्यक्ष होते. १९३४ साली इंडियन बोटॅनिकल सोसायटीचे ते अध्यक्ष होते. योजना आयोगाच्या मृदसंधारण आणि वनीकरण समितीचे सचिव म्हणून १९३४ साली त्यांची नियुक्ती झाली होती.

आघारकर १९४६ साली कलकत्ता विद्यापीठातून निवृत्त झाले आणि पुण्यास आले. प्रा.आजरेकर, प्रा.जोशी, डॉ.पु.ज. देवरस, डॉ.मुकुंदराव जयकर, प्रा.घारपुरे यांच्या सहकार्याने स्थापन केलेल्या महाराष्ट्र

सायन्स इन्स्टिट्यूटचे ते संचालक झाले. हीच संस्था वाढून तिचे 'विज्ञानवर्धिनी', महाराष्ट्र अथवा 'महाराष्ट्र असोसिएशन फॉर दि कल्टिव्हेशन ऑफ सायन्स' असे नाव झाले. या संस्थेत वनस्पतिविज्ञान, कीटकविज्ञान, सूक्ष्मजीवशास्त्र, कवकशास्त्र, वनस्पतिरोगविज्ञान, पोषणशास्त्र, पुराजीवशास्त्र इत्यादी विज्ञान शाखांमध्ये मौलिक संशोधन होत असून केंद्र सरकारच्या विज्ञान - तंत्रज्ञान मंत्रालयाकडून आर्थिक साहाय्य मिळत असते.

भारतातील त्या वेळच्या अग्रगण्य शास्त्रीय नियतकालिकांच्या संपादक मंडळांवर आघारकरांनी योगदान दिले आहे. त्यांनी बॉम्बे गॅझेटीयरसाठी 'औषधी वनस्पती' (१९५३) आणि 'इमारती लाकूड' (१९५७) हे भाग तयार केले. वयाच्या पासष्टाव्या वर्षी त्यांनी 'हाय अल्टिट्यूड रिसर्च एक्सपिडिशन'मध्ये भाग घेतला.

आघारकर आणि त्यांचे सहकारी यांच्या अथक प्रयत्नांमुळे पुण्याची 'विज्ञानवर्धिनी' वाढली, नावारूपाला आली. त्या संस्थेला आता 'आघारकर रिसर्च इन्स्टिट्यूट' हे त्यांचेच नाव देऊन त्यांचा गौरव करण्यात आला आहे. ही संस्था पुणे विद्यापीठ आणि महात्मा फुले कृषी विद्यापीठ यांच्याशी संलग्न आहे.

१९६० साली डॉ.आघारकर यांचे कर्करोगामुळे निधन झाले. त्यांच्या पत्नीने त्यांना सतत साथ दिली. त्यांच्या पत्नीनेही तिच्यासाठी करून ठेवलल्या बेगमीतून, काटकसरीने वाचवलेले धन आणि घरातले दागदागिने विकून आलेली रक्कम आघारकर यांच्या संस्थेला १९८१ साली आपल्या निधनापूर्वी अर्पण केली.

– डॉ. शरद चाफेकर

***संदर्भ :***


१. *फोंडके, डॉ.बाळ, शर्मा, कोलेगाला; संपादक, 'अचिव्हमेंट्स इन ॲनॉनिमिटी'; निस्कॉम; १९९७.*

२. *'बायोग्राफिकल मेमॉयर्स ऑफ फेलोस ऑफ इन्सा'; १९८४.*


## आचवल, माधव भास्कर

**वास्तुरचनाकार, समीक्षक, ललित लेखक**

**३ नोव्हेंबर, १९२५ - २१ जानेवारी, १९८०**



माधव आचवल यांचा जन्म व शालेय शिक्षण कल्याण येथे झाले. चित्रकला आणि भाषा हे दोन विषय माधव आचवल यांच्या आवडीचे होते. मॅट्रि-कची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर माधवरावांनी मुंबईच्या सर ज.जी. महाविद्यालयामध्ये वास्तुशिल्पकलेच्या अभ्यासासाठी प्रवेश घेतला. त्या काळी गव्हर्नमेंट डिप्लोमा इन आर्किटेक्चर- जी.डी. आर्च-हा चार वर्षांचा अभ्यासक्रम होता. पण 'बिल्डिंग कन्स्ट्रक्शन' हा विषय त्यांना विशेष प्रिय होता. शेवटच्या परीक्षेत या विषयात त्यांना मेयो सुवर्णपदक मिळाले होते. आचवलांची जी.डी. आर्च अभ्यासक्रमातील असामान्य प्रगती बघून आर.आय.बीए. या संस्थेने त्यांना भाग एक व दोन या परीक्षांमधून सूट दिली. प्रोफेशनल प्रॅक्टिस या विषयाची परीक्षा त्यांना द्यावी लागली. या विषयातील त्यांची उत्तरपत्रिका इन्स्टिट्यूटने एक आदर्श म्हणून नावाजली होती.

त्यानंतर त्यांनी मुंबईत स्वतंत्र व्यवसायाला सुरुवात केली. आणंद येथील वल्लभ विद्यानगरच्या इमारतींचे काम त्यांच्याकडे आले. मुंबई व आसपासच्या उपनगरांतील लहानमोठी कामेही होती. कल्याणच्या प्रभाकर ओक मनोऱ्याचे काम तेव्हा त्यांनी केले. निओक्लासिकल शैलीतील हा मनोरा कल्याण नगराची शान वाढवणारा ठरलाच; पण महाराष्ट्रात स्वातंत्र्योत्तर काळात बांधलेली ही वास्तू प्रमाणबद्धतेचा उत्कृष्ट नमुना आहे असे म्हटले, तर वावगे ठरणार नाही.

१९५४ साली ते महाराजा सयाजीराव विद्यापीठात कलाभवनाच्या वास्तुशिल्पकला विभागामध्ये त्या विभागाचा प्रपाठक म्हणून रुजू झाले आणि डिपार्टमेंटचे स्वरूपच पालटू लागले. तेव्हा अहमदाबादमध्ये व्यवसाय

करणारे प्रख्यात आर्किटेक्ट्स म्हणजे बाळकृष्ण दोशी, तलाठी, अनंत राजे यांना त्यांनी विभागामध्ये पाहुणे व्याख्याते म्हणून आणले. इंग्लंडमधील लेस्टर विद्यापीठामधून आर.आय.बी.ए. करून बडोद्यात आलेल्या सूर्यकांत पटेल यांना व मुंबईच्या पी.एम. पाठारे यांना पूर्णवेळ प्राध्यापक म्हणून विभागामध्ये आणले. १९६२ सालापासून आचवल तेथे प्राचार्य पदावर काम करू लागले.

ते इमारत बांधणी, वास्तुशिल्पकला संरचना व नगर नियोजन (बिल्डिंग कन्स्ट्रक्शन, आर्किटेक्चरल डिझाइन व टाउन प्लॅनिंग) हे विषय शिकवीत. विषय सोपा करून तो विद्यार्थ्यांना समजवण्यात त्यांची हातोटी होती. त्यांचे वक्तृत्व श्रवणीय होते. त्यामुळे वास्तुशिल्पकलेचा अभ्यास आनंददायक असल्याचा अनुभव ते विद्यार्थ्यांना देत. आखीव अभ्यासक्रमाच्या चाकोरीतून विद्यार्थ्यांना बाहेर काढून वास्तुशिल्पकला या विषयाची गोडी निर्माण करण्याचा त्यांचा प्रामाणिक प्रयत्न असे.

कलाभवनामध्ये अध्यापन करत असताना, त्यांचा वास्तुशिल्पकार म्हणून व्यवसायही चालू होता. अर्थात, त्याचा पसारा आटोपशीर होता. तशी त्यांनी मोजकीच कामे केली; पण त्यांचा दर्जा उच्च प्रतीचा होता. आणंदचे कृषी महाविद्यालय, बडोद्याचे ॲलेम्बिक स्कूल, आणंद येथील डेअरी, महुवा येथील टाउन हॉल या वास्तुरचना वाखाणल्या गेल्या. या वास्तुरचनांमध्ये त्यांची स्वतंत्र शैली जाणवते. 'वास्तू ही अतिशय नाजूक तंतुवाद्यासारखी असते. ते नीट असेल, तरच आपल्या सर्व मन:स्थितीला अनुरूप असे झंकार त्यांतून निघू शकतात,' असे त्यांनी लिहून ठेवले आहे.

१९५६ साली भारत सरकारने गौतम बुद्धाच्या २५०० व्या जयंतीच्या निमित्ताने दिल्लीमध्ये स्मारक उभारण्याचे ठरविले. त्यासाठी जगभरातील वास्तुशिल्पकारांकडून स्मारक योजनेचे आराखडे मागवले होते. त्या स्पर्धेमध्ये आचवलांनी शिल्पकार सदाशिव साठे यांच्या सहकार्याने स्मारक योजनेचा आराखडा पाठविला. निवड समितीच्या सर्व सभासदांनी त्याला प्रथम पसंती दर्शवली. आचवलांना समितीने मुलाखतीला बोलावले आणि संकल्पनेमध्ये एक बदल सुचवला. काचेच्या घुमटाऐवजी प्रस्तावित घुमट सिमेंट काँक्रीट किंवा विटांमध्ये बांधायची सूचना केली. काचेचा घुमट हा तर संकल्पनेचा मूळ गाभा होता. त्यांनी सूचना साफ नाकारली. अन्यथा, त्यांना पहिले पारितोषिक व ते कामही मिळाले असते.

बडोद्यातील एका अनोख्या मंदिराची उभारणी त्यांच्या संकल्पनेतून साकारली. ते मिलिटरी इंजिनिअरिंग सर्व्हिसेससाठी होते. मंदिराला सभोवती भिंती नाहीत. सर्व धर्मांच्या प्रतीकांमधून मंदिराचा आकार साकारलेला आहे. देवाला बंदिस्त केलेले नाही. अपारंपरिक रचनेमुळे आजही लोकांना ते आकर्षित करते. देवाचे अस्तित्व भोवतालच्या आखीवरेखीव उद्यानाशी, प्रसन्न परिसराशी जोडलेले आहे. असाच अनोखा प्रयोग त्यांनी पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयाच्या परिसरामध्ये एक लहानसे वास्तुशिल्प उभारून केला.

१९५९-६० साली त्यांना फ्रेंच सरकारची एक शिष्यवृत्ती मिळाली. जवळपास सहा महिने ते फ्रान्समध्ये होते. युरोपियन वास्तुशिल्पकलेचा अभ्यास व वास्तुशिल्पकला अभ्यासक्रमाची पाहणी, असा त्या शिष्यवृत्तीचा उद्देश होता. फ्रान्सला जाण्याआधी ना.गो. कालेलकरांकडे ते फ्रेंच भाषा शिकले. १९६८ साली आचवलांना ब्रिटिश कौन्सिलतर्फे इंग्लंडला जाण्याचा योग आला. त्यातूनच पुढे अविकसित देशांतील निवारा समस्येवरील अभ्यास करून त्यावर उपाययोजना कशा तऱ्हेने करता येईल, यासाठी आफ्रिका व लॅटिन अमेरिका या देशांचा दौरा करण्याची त्यांना युनेस्कोकडून संधी मिळाली.

इतर शहरांप्रमाणे झोपडपट्टीचा प्रश्न बडोद्यातही होता. काहीही व कितीही उपाय केले तरी झोपडपट्ट्यांचे निर्मूलन होऊ शकत नाही हे आचवलांनी महानगरपालिकेच्या लक्षात आणून दिले. मलनि:सारण, पाणीपुरवठा या सुविधा तेथे योग्य प्रकारे पुरवून झोपडपट्ट्यांची सुधारणा होऊ शकते. त्याप्रमाणे, महानगरपालिकेने आचवलांच्या

मार्गदर्शनाखाली झोपडपट्टी सुधारण्याचे प्रयोग राबविले. स्वस्त घरबांधणी हा विषय त्यांनी तळमळीने अभ्यासला. बांधकाम साहित्यांच्या किमतीमध्ये बचत करून स्वस्त घरबांधणीच्या तंत्रात सुधारणा केल्या. स्थानिक बांधकाम साहित्याचा जास्तीत जास्त वापर करण्याच्या धोरणावर भर देऊन स्वस्त घरबांधणीचे प्रयोगही त्यांनी काही ठिकाणी केले. बडोदा सिटिझन्स कौन्सिलची स्थापना करून त्या स्थानिक लोकांना व संस्थांना स्वस्त घरबांधणीच्या प्रयोगामध्ये सामील केले.

१९७४ साली त्यांना फोर्ड फाउंडेशनने अनुदान देऊन दक्षिण अमेरिकेच्या दौऱ्यावर पाठवले. 'लो कॉस्ट हाउसिंग' या विषयावर त्या दौऱ्यामध्ये त्यांनी बरीचशी माहिती जमा केली. हाउसिंग-एज्युकेशन-ॲक्शन-रिसर्च-ट्रेनिंग हार्ट नावाने त्यांनी एक विभाग कार्यान्वित केला. त्यासाठी युनिसेफ, ऑक्सफॅम या संस्थांकडून आर्थिक मदतीची सोय केली. त्यामुळे विभागातर्फे दोन संशोधन प्रकल्प व एक कृती प्रकल्प त्यांना हाती घेता आले.

१९८० साली आचवलांचा अकाली मृत्यू झाला. त्यांनतर आठ वर्षांनी, म्हणजे १९८८ सालापासून इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ आर्किटेक्ट्स या संस्थेने माधव आचवलांच्या नावाने दरवर्षी सुवर्णपदक द्यायला सुरुवात केली. वास्तुशिल्पकलेच्या शैक्षणिक क्षेत्रात अथवा सामाजिक क्षेत्रात ज्या वास्तुशिल्पकाराने भरीव योगदान दिले असेल, त्याला हे पदक दिले जाते.

आचवलांनी लक्षणीय ललित आणि समीक्षा लेखनही केलेले आहे.

- भास्कर द. साठे

## आजगावकर, श्रीधर शांताराम

**वैद्यकशास्त्रज्ञ**

**१७ जून १९०६ - १२ जून १९९४**

डॉ. श्रीधर शांताराम आजगावकर यांचा जन्म, तसेच प्राथमिक व माध्यमिक शिक्षण मालवणमध्ये झाले. इंटर सायन्सपर्यंतचे महाविद्यालयीन शिक्षण सांगलीत व



वैद्यकीय शिक्षण पुण्याच्या बी.जे. वैद्यकीय महाविद्यालयामध्ये झाले. त्यांनी उच्च वैद्यकीय शिक्षण डब्लिन व विएन्ना येथे घेतले. त्यांनी 'डोळ्यांचे विकार' या विषयात प्रावीण्य मिळविले. त्यानंतर मालवणला येऊन त्यांनी वैद्यकीय व्यवसाय सुरू केला. पण ढोबळ व्यवसायापेक्षा वाचन व संशोधन यांत त्यांना विशेष रस वाटे. मालवणला १५ वर्षे व्यवसाय करत असताना, त्या काळात त्यांचे काका व वडील मधुमेहाने वारले. त्या वेळी भारतात मधुमेहाविषयी खास माहिती नव्हती. रुग्णही फार कमी होते. त्यामुळे आजच्यासारखे खास मधुमेहतज्ज्ञही नव्हते. आपले काका व वडील मधुमेहाने वारल्यामुळे डॉ.आजगावकरांना मधुमेहाविषयी कुतूहल वाटले व नंतर जिद्दीने त्या रोगावर काम करण्यासाठी ते मुंबईत आले.

मुंबईत आल्यावर ते ग्रॅण्ट वैद्यकीय महाविद्यालयामधील वैद्यकशास्त्राचे तज्ज्ञ डॉ.रा.वि. साठे यांना भेटले. डॉ.साठेंमध्ये त्यांना गुरू भेटला. डॉ.साठेंनी त्यांना सांगितले, ''पश्चिम महाराष्ट्रात मला आता मधुमेही दिसू लागले आहेत. पण त्यांच्यावर उपचार करायला कोणी डॉक्टर नाहीत. तुम्ही नेत्रविशारद म्हणून काम न करता, मधुमेहावर लक्ष केंद्रित करा. चाचण्या, उपचार शोधून काढा.'' १९४५ साली आजगावकरांनी नेत्रविकारतज्ज्ञ म्हणून करत असलेला व्यवसाय थांबवला आणि मधुमेहावर काम सुरू केले. त्या काळी अशी ध्येयाने प्रेरित झालेली खूप माणसे असायची. डोळ्याचे मर्यादित क्षेत्र सोडून मधुमेहासारखे विशाल क्षेत्र संशोधनाला मिळाले म्हणून डॉ.आजगावकर खूप समाधानी होते. संशोधन चालू असताना त्यांच्या लक्षात आले, की दृक्पटलावर (रेटायना) काही बदल दिसून आले होते, ते रुग्णाला झालेल्या मधुमेहामुळे असावेत. जसे वाचन व संशोधन वाढले, तसे त्यांच्या लक्षात आले

की मधुमेह हा सर्व शरीरव्यापी रोग आहे. त्याचा शरीरावर होणारा प्रसार वेळीच नियंत्रित केला पाहिजे. त्यासाठी ते आयुर्वेदाकडे वळले. आयुर्वेदाने मधुमेहाबद्दल काय विचार केला आहे, यावर त्यांनी लक्ष केंद्रित केले.




आयुर्वेदातील जसद भस्माच्या उपचारपद्धतीचा डॉक्टरांनी ॲलोपथीच्या पद्धतीने अभ्यास सुरू केला. हे सर्व प्रयोग त्यांनी डॉ.साठेंच्या मार्गदर्शनाखाली जे.जे. रुग्णालयात केले. १९४५ ते १९६० या कालावधीत डॉ.आजगावकर सातत्याने मधुमेहावर काम करत होते. १९४८ साली प्रायोगिक पद्धतीवर त्यांनी स्वत:चे केंद्र सुरूकेले. १९६० साली जे.जे. रुग्णालयात मधुमेह उपचाराचे केंद्र सुरू झाले. डॉ.आजगावकरांनी डॉ.साठेंचे स्वप्न पुरे केले. या केंद्रामुळे मधुमेहावर उपचार करणारे डॉक्टर्स तयार झाले. डॉ.आजगावकरांच्या संशोधनास १९६० साली 'इंडियन कौन्सिल ऑफ मेडिकल रिसर्च'ने मान्यता दिली.

आजगावकरांचे कार्य 'रोग्यांवर फक्त उपचार करणे' एवढ्यापुरते मर्यादित नव्हते. त्या काळी सामान्य लोकांना मधुमेहाविषयी काहीच माहिती नव्हती. लोकांना मधुमेहाची सबंध माहिती देऊन सज्ञान करणे आवश्यक होते. ते काम त्यांनी हातात घेतले. मधुमेहाची लक्षणे कोणती, त्याचे निदान पक्के करण्यासाठी काय चाचण्या करायच्या, औषधे कोणती व कधी घ्यायची, आहारावरील पथ्ये काय असावीत, व्यायाम कसा, केव्हा व किती करायचा, ही सर्व माहिती त्यांनी भाषणरुपात देण्यास सुरुवात केली. सुरुवातीला मुंबई आणि नंतर सबंध भारतात फिरुन ते भाषणे देत असत. त्यासाठी त्यांनी स्लाइड्स केल्या होत्या व स्वत:चा स्लाइड प्रोजेक्टर बरोबर घेऊन जात असत. भाषणे मराठी व इंग्रजीतून असत. विशेषत: वैद्यकीय महाविद्यालये, इंडियन मेडिकल कौन्सिल व सामाजिक संस्था यांमध्ये जाऊन त्या काळी नवीन असणाऱ्या या रोगाविषयी माहिती देणे त्यांना फार आवडे. जणू या प्रेषणकार्याचे त्यांनी व्रतच घेतले होते. या कार्यात मानधनाची अपेक्षा न करता, त्यांनी स्वत:ला झोकून दिले होते.

त्यांनी तज्ज्ञांसाठी चर्चासत्रे आयोजित केली. या कार्याची व्याप्ती वाढल्यावर त्यांनी 'डायबेटिक असोसिएशन ऑफ इंडिया' या संस्थेची स्थापना केली. त्यानंतर त्यांनी 'ऑल इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ डायबिटीझ'ची स्थापना केली. या संस्थेत त्यांनी कार्यवाह, उपाध्यक्ष, अध्यक्ष अशा निरनिराळ्या पदांवर काम केले. भारताच्या वेगवेगळ्या राज्यांत या संस्थेच्या ३२ शाखा काढल्या.

आजगावकरांनी मधुमेहावर मराठी व इंग्रजीत पुस्तके लिहिली. या पुस्तकांना पाठ्यपुस्तकांचे महत्त्व प्राप्त झाले. डॉक्टरांनी पुढाकार घेऊन मुंबईतील माहीम येथे खास मधुमेहींसाठी २०० खाटांचे अद्ययावत रहेजा रुग्णालय काढले.

'आंतरराष्ट्रीय मधुमेह संस्थे'च्या कार्यकारिणीचे ते १९६४ सालापासून सभासद होते. त्यानंतरच्या २६ वर्षांमधील सर्व वार्षिक परिषदांना त्यांची उपस्थिती होती. त्यांच्या प्रयत्नाने १९७६ साली दिल्लीत आंतरराष्ट्रीय मधुमेह परिषद भरली होती. त्या परिषदेत आंतरराष्ट्रीय संस्थेचे उपाध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली व पुढे १९७९ साली अध्यक्ष म्हणूनही निवड झाली.

मराठी विज्ञान परिषदेच्या स्थापनेपासून (१९६६) ते परिषदेशी निगडित होते. कार्यकारिणी सभासदापासून विश्वस्त व सन्माननीय सदस्य अशी वेगवेगळी पदे त्यांनी भूषविली.

१९५२ साली आजगावकरांच्या पत्नीचा मृत्यू झाला. त्यानंतर त्यांनी मधुमेहाच्या संस्था, 'मराठी विज्ञान परिषद', 'मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय' इत्यादी संस्थांसाठी आयुष्य वेचले.

- डॉ. शशिकांत प्रधान

***संदर्भ :***

*१. देशपांडे, अ.पा..ल 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन; २००५*
*२. दै. लोकसत्ता; १९ जून १९९४*

## आठवले, विक्रम त्र्यंबक

**रसायनशास्त्रज्ञ**

**जन्म-मृत्यू दिनांक अनुपलब्ध**



डॉ.विक्रम त्र्यंबक आठवले यांनी रसायनशास्त्र या विषयातील पीएच.डी. पदवी इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स, बंगळूरू येथून १९४५ साली प्राप्त केली. त्यानंतर कोलकाता येथील नॅशनल टेस्ट हाउस या प्रयोगशाळेत त्यांनी रसायन विश्लेषण पद्धतीच्या अद्ययावत पद्धतीवर संशोधनकार्य केले. १९४९ साली डॉ.भाभा यांनी त्यांना अणू संशोधन संस्थेत काम करण्याकरिता म्हणून बोलावून घेतले व त्या काळात त्यांना 'ॲनॅलिटिकल केमिस्ट्री' या विषयावर संशोधन करणाऱ्या शास्त्रज्ञांच्या गटाचे प्रमुख नेमण्यात आले. त्या वेळी त्यांची संशोधन शाळा मुंबईत केनिलवर्थ येथे होती. पुढे सर्व रसायनशास्त्राचे संशोधनकार्य करणाऱ्या प्रयोगशाळा स्वा. सावरकर मार्ग (कॅडल रोड) येथे हालविण्यात आल्या व तेथे गेल्यावर त्यांना स्वतंत्र विभाग प्रमुख म्हणून नेमण्यात आले (१९५५). १९६० सालाच्या सुरुवातीस रसायन प्रयोगशाळा तुर्भे येथील मॉड्युलर लॅबोरेटरी येथे हालविण्यात आल्या. त्यांच्या विभागावर अणुशक्तीच्या उपयोगात येणाऱ्या सर्व रासायनिक पदार्थांची शुद्धता तपासणे ही महत्त्वाची जबाबदारी टाकण्यात आली. नवीन प्रशस्त प्रयोगशाळेत त्यांनी नवीन उपकरणे आणून त्यांच्या प्रयोगशाळेचे एका अद्ययावत रसायन विश्लेषण विभागात रूपांतर केले.

स्पेक्ट्रोस्कोपी, इलेक्ट्रोकेमिस्ट्री, मास स्पेक्ट्रोग्राफी, क्ष-किरण यंत्रे, तसेच इतर सर्व संशोधनपद्धतींचा वापर करण्यास येथे सुरुवात झाली. १९५८ साली 'अप्सरा' अणुभट्टी सुरू झाल्यावर तिचा वापर करून 'न्यूट्रॉन ॲक्टिव्हेशन ॲनॅलिसिस' पद्धत विकसित करण्यात आली.

अणुभट्टीत वापरण्यासाठी उपयोगात येणारे जवळजवळ सर्वच पदार्थ अतिशय शुद्ध स्वरूपात वापरले जातात. अशा पदार्थांतील अशुद्धता ही दहा लाखांत एक (पार्ट्स पर मिलियन) ते शंभर कोटी भागांमागे एक (पार्ट्स पर बिलियन) इतकी कमी असावी लागते. अर्थात, इतक्या कमी असलेल्या अशुद्धीचा शोध घेणे हे फार जिकिरीचे काम असते. ते अतिशय अवघड, परंतु अतिशय गरजेचे काम आठवले यांनी यशस्विरीत्या पार पाडले. अणुऊर्जा क्षेत्रासाठी लागणारे तंत्रज्ञान कोणीही विकत नाही किंवा उदारहस्ते देत नाही. ते स्वत:च विकसित करावे लागते. आठवले यांनीही या पदार्थशुद्धीच्या क्षेत्रासाठी लागणारी नवनवीन तंत्रे देशातच विकसित केली. त्यासाठी भौतिकशास्त्रातील संशोधनासाठी वापरल्या जाणाऱ्या अनेक उपकरणांचा उपयोग त्यांनी कल्पकतेने करून घेतला. या उभरत्या नवीन क्षेत्रात तज्ज्ञ म्हणून काम करू शकणाऱ्या अनेक तरुणांची एक नवीन पिढीच त्यांनी तयार केली.

सुरुवातीला इंधनयुक्त युरेनियम व थोरियम यांची शुद्धता तपासण्याकरिता लागणाऱ्या धातूंवर त्यांनी संशोधन केले. विश्लेषण पद्धती विकसित करून त्या प्रमाणित करण्याचे संशोधन डॉ.आठवले यांच्या मार्गदर्शनाखाली केले गेले. जड पाण्याची शुद्धता मापण्याच्या पद्धतीवर संशोधन करून ती प्रमाणित करण्यात आली. त्यातूनच 'वॉटर केमिस्ट्री' या एका नवीन क्षेत्राचा उदय आणि विकास देशात झाला. झिरकोनियम धातूचा उपयोग इंधन नलिका बनविण्याकरिता होतो. अर्थात त्याच्या शुद्धतेत परीक्षण व मापनही महत्त्वाचे असते. यावरील संशोधन डॉ. आठवले यांच्या प्रयोगशाळेत प्रमाणित करण्यात आले. इतर महत्त्वाचे धातू म्हणजे ॲल्युमिनिअम, कॅडमियम, बोरॉन, बेरेलियम व स्टील. यांची शुद्धता तपासण्याकरिता लागणारी प्रणालीसुद्धा डॉ.आठवले यांच्या प्रयोगशाळेत प्रमाणित करण्यात आली. गुन्हे विश्लेषण शास्त्रातही निरनिराळ्या मूल्यांची अचूक मोजणी महत्त्वाची असते. तेथे आठवले यांनी प्रमाणित केलेल्या कार्यप्रणालीचा




वापर सुरू झाल्यानंतर त्याकरिता लागणारे संशोधनही याच प्रयोगशाळेत सुरू करण्यात आले.

विविध उद्योगधंदे, तसेच इतर सरकारी खात्यांमधून अशा प्रकारच्या रासायनिक विश्लेषण पद्धतीची गरज भासल्यास त्यांना मदत करण्याचे, तसेच तेथील प्रयोगशाळेतील शास्त्रज्ञांना शिक्षण देण्याचे कामही डॉ. आठवले यांच्या प्रयोगशाळेत केले गेले.

डॉ. आठवले एक कार्यक्षम प्रशासक व शास्त्रज्ञ होतेच; पण ते एक उत्तम शिक्षकही होते. भाभा अणू संशोधन केंद्रात भरती होणाऱ्या शास्त्रज्ञांसाठी विश्लेषण रसायनशास्त्राकरिता त्यांनी एक अभ्यासक्रम तयार केला व या प्रशिक्षणावर चांगले नियंत्रणही केले.

डॉ. आठवले हे उत्तम संघटक होते. याचे प्रत्यंतर त्यांनी संपादित केलेल्या 'अणुयुग' या पुस्तकावरून दिसून येते. अणू संशोधन केंद्रातील वेगवेगळ्या पंधरा विषयांत संशोधन करणाऱ्या मराठी भाषक शास्त्रज्ञांच्या मदतीने त्यांनी हे पुस्तक तयार केले व महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे त्याचे प्रकाशन केले गेले. आजतागायत 'अणुशक्ती' या विषयावरील मराठीतील ते एकमेव व परिपूर्ण पुस्तक आहे.

- डॉ. श्री. बा. मनोहर

***संदर्भ :***

*१. सुंदरम्, सी.व्ही. आणि इतर; 'अ‍ॅटॉमिक एनर्जी इन इंडिया-५० इयर्स'; १९९८.*

## आपटे, अच्युत शंकर

**गणितज्ञ**

**८ नोव्हेंबर, १९१९ - ७ जानेवारी २०००**

कुशाग्र बुद्धिमत्तेचे वरदान आणि गणित विज्ञानात सर्जनशील प्रतिभा असणाऱ्या डॉ. अच्युतराव आपटे



यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील जमखिंडी येथे झाला. त्यांचे माध्यमिक शिक्षण जमखिंडी येथे झाले, तसेच महाविद्यालयीन शिक्षण स.प. महाविद्यालय, पुणे येथे झाले. त्यांना महाविद्यालयात अनेक पारितोषिके मिळाली. त्यांनी १९४२ सालच्या स्वातंत्र्य चळवळीत भाग घेतल्यामुळे त्यांना कारावास घडला. तथापि, तुरुंगातून सुटल्यावर ते थेट बंगळूरच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये डॉ. होमी भाभा यांच्या मार्गदर्शनाखाली 'मेसॉन फील्ड्स' या भौतिकशास्त्रातल्या विषयावर संशोधन करू लागले आणि पुढे त्यांनी पीएच.डी. पदवी मिळवली. मात्र स्वतंत्र गणिती संशोधनास वाहून घेण्याची प्रज्ञा असताना, १९४९ सालापासून खडकवासला येथल्या भारत सरकारच्या केंद्रीय जलविद्युत संशोधन संस्थेच्या गणित विभागात संशोधन अधिकारीपदाची त्यांनी जी जबाबदारी स्वीकारली, ती १९७९ साली संगणक विभागप्रमुख म्हणून पायउतार होईतो, त्यांनी समर्थपणे निभावली. तीस वर्षांच्या या कार्यकाळात अनेक समाजोपयोगी समस्यांची उकल करण्यासाठी अथक प्रयत्न करून अच्युतरावांनी गणिती प्रतिकृतीच्या (मॅथेमॅटिकल मॉडेल्स) अनेकविध प्रणाली निर्माण केल्या. त्यांपैकी काही तर आव्हानात्मक होत्या. अशा गणिती प्रतिकृती विकसित करून संशोधनाच्या या क्षेत्रात त्यांनी केलेल्या प्रगतीचा भारत सरकारने गौरवपूर्ण उल्लेख केला आहे.

या प्रतिकृतींचा योग्य प्रकारे वापर करण्यासाठी संगणकाची आवश्यकता होती. मात्र १९६० सालच्या दशकात भारतात तुरळक ठिकाणीच ते उपलब्ध होते. त्यांपैकी मुंबईच्या टाटा मूलभूत संशोधन संस्थेत असलेल्या संगणकावर डॉ. आपटे यांच्या प्रतिकृती अभ्यासता आल्या. पुढे १९७० सालच्या दशकात या कामात त्यांनी झपाट्याने लक्षणीय प्रगती केल्यामुळे,




तत्पूर्वी जलविद्युत केंद्रात जलीय प्रमाणित प्रतिकृतीच्या (हायड्रॉलिक स्केल मॉडेल्स) संशोधनासाठी होणारा वापर दहा वर्षाच्या काळात ९० टक्क्यांवरून ५० टक्क्यांवर आला व गणिती प्रतिकृतींचा वापर जो सुरुवातीस नगण्य होता, तो ५० टक्क्यांपर्यंत वाढला. परिणामी, केंद्राची वेळ व खर्च या दोहोंतही बचत होऊ लागली. याचे सारे श्रेय डॉ.आपटे यांच्या दूरदृष्टीला जाते.

भारत व बांगला देशांच्या सरहद्दीतून वाहणाऱ्या ब्रह्मपुत्रा व निम्नगंगा (लोअर गँजेस) या नद्यांना सालोसाल येणाऱ्या महापुराचा तडाखा दोन्ही राष्ट्रांना दरसाल बसतो. त्यातून होणारी अपरिमित वित्त व जीवितहानी वाचवण्यासाठी उभय राष्ट्रातल्या पुराची झळ बसणाऱ्या प्रदेशात संयुक्तरीत्या पूरनियंत्रण प्रकल्प राबवण्याचे युनेस्कोने सुचवले. या समस्येची उकल करण्यासाठी ३५० अव्यक्ते (चले) व सुमारे ७१५ समीकरणे एकसमयावच्छेदेकरून सोडवणे अपरिहार्य होते. त्यासाठी गणिती प्रतिकृतींची आखणी करून प्रकल्प मार्गी लावण्याचे शास्त्रज्ञांपुढे असलेले जबरदस्त आव्हान भारत सरकारने विश्वासाने जलविद्युत केंद्रापुढे ठेवले. अर्थातच, अखंड परिश्रम करून सहा महिन्यांच्या अल्पावधीत अच्युतरावांनी या कामात यश मिळवले इतकेच नव्हे, तर त्यांनी त्यांच्या प्रतिकृतीतून युनेस्कोच्या मूळ प्रणालीतल्या त्रुटी दाखवून दिल्या.

अच्युतरावांनी सोडवलेला दुसरा आव्हानात्मक प्रश्न होता हुगळी नदीतल्या उपसा केंद्रातून कोलकाता शहराला पुरवल्या जाणाऱ्या पिण्याच्या पाण्याचा. बंगालच्या उपसागरातून हुगळी नदीत येणाऱ्या पाण्यात क्षाराचे प्रमाण खूप असल्याने ते पिण्यायोग्य नसे. सागरातून येणारे पाणी कमीतकमी क्षारयुक्त असावे यासाठी अच्युतरावांच्या प्रतिकृतीच्या माध्यमातून आधीच्या दहा वर्षांच्या काळातल्या सागराच्या भरती व ओहोटीचा अभ्यास करणे सुकर झाले. परिणामी, हुगळी नदीवरील सर्वात कमी क्षार असलेले पाण्याचे ठिकाण निवडणे शक्य झाले व तिथल्या उपसा केंद्रातून मिळणारे पाणी पिण्यायोग्य ठरले.

१९५२-१९५५ या अवधीत फ्रान्समधील ग्रिनोबल विद्यापीठात गणिती संशोधनासाठी अच्युतराव राहिले असताना, त्यांनी लिहिलेल्या शोधनिबंधांवर त्यांचे मार्गदर्शक अत्यंत खूष झाले. या काळात गणिताच्या कुशल प्राध्यापक असलेल्या त्यांच्या पत्नी मधुमालतीबाईदेखील उच्च बीजगणितावर संशोधन करण्यासाठी फ्रान्समध्ये गेल्या. दोघेही अनुक्रमे बी.एस्सी. व पीएच.डी. या उच्च पदव्या संपादन करून स्वदेशी आले. अच्युतरावांच्या संपूर्ण सामाजिक कार्यामागची केवळ प्रेरणाच नव्हे, तर परिपूर्ण शक्ती अशी भूमिका त्यांच्या जीवनात मधुमालतीबाईंनी बजावली.

जगात कुठेही भूकंप झाला तरी जमिनीखाली विशिष्ट खोलीवर बसवलेल्या भूकंपमापन यंत्रावर त्यांची नोंद होते. त्यावर उमटलेला आलेख पाहून भूकंपाची तीव्रता, संभाव्य ठिकाण (एपीसेंटर) व बहुमजली इमारतींना असलेला धोका ओळखता येतो. मात्र, असे यंत्र जमिनीखाली बसवण्यापूर्वीच जर भूकंप झाला, तर आलेखावरून अशी माहिती मिळत नाही. १९६७ साली, १०/११ डिसेंबरच्या रात्री कोयनेस झालेल्या भूकंपाबाबत असेच घडले. यंत्र जमिनीखाली बसवण्यापूर्वी भिंतीतल्या उंच जागी ठेवले होते. एवढ्यात, रात्री ६.९ तीव्रतेचा भूकंप झाला आणि उंच जागी ठेवलेल्या यंत्रावर जो आलेख आला त्यावरून मूळ आलेख मिळवणे, ही शास्त्रज्ञांची एक कसोटीच होती. अशा प्रसंगी, प्रयत्नांची शिकस्त करून अच्युतरावांनी मूळ संभाव्य आलेख मिळवण्यात यश संपादन केले.

फ्रान्समध्ये असतानाच, फ्रेंच सरकार विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठी राहण्या-जेवण्याची मोफत सोय करते हे

लक्षात घेऊन अच्युतरावांच्या मनात विद्यार्थी साहाय्यक समितीचे बीज अंकुरले असावे. गणितात मूलभूत संशोधन करून मोठे नाव मिळवण्याची संधी असताना, त्याकडे पाठ फिरवून अच्युतराव समाजकार्याकडे वळले. 'विद्यार्थी साहाय्यक समिती', 'इन्व्हेस्टमेन्ट इन मॅन' आणि 'फ्रेंच मित्र मंडळ' ही त्यांची तीन सामाजिक अपत्ये. शिक्षणाची इच्छा असूनही गरिबीमुळे ग्रामीण भागातल्या असंख्य मुलांना शहरात राहण्या-जेवण्याच्या सोयीअभावी शिक्षण सोडावे लागते. हे जाणून १९५६ साली विद्यार्थी साहाय्यक समितीची स्थापना करून अच्युतरावांनी विद्यार्थ्यांची अल्पदरात ही सोय केली. उत्तम संस्कार, व्यक्तिविकासाबरोबर श्रमशक्तीची जाणीव करून देताना समितीच्या मनात ना उपकाराची भावना ना विद्यार्थ्यांच्या लेखी लाचारीची, असे वातावरण ठेवले. गेल्या ४०/४२ वर्षांत मुलांसाठी दोन व मुलींसाठी एक अशी तीन वसतिगृहे बांधली आहेत. तेथे ४०० ते ५०० विद्यार्थ्यांची शैक्षणिक गरज भागवली जाते.

अशाच प्रकारे मनुष्यबळातली गुंतवणूक (इन्व्हेस्टमेन्ट इन मॅन) ही दुसरी सामाजिक संस्था, पुणे जिल्ह्याच्या पूर्व भागातील ग्रामीण परिसरात, फुगेवाडी येथे अच्युतरावांनी काढली. तेथे निराधार बालकांवर सुसंस्कार करण्यासाठी बालसदन, नरसी मोनजी तंत्रशाळा उभारण्याबरोबरच ग्रामीण भागातील तरुणांना शेती, दुग्धव्यवसाय, छपाई व इतर औद्योगिक व्यवसायांतले कसब आत्मसात करण्याचे प्रशिक्षण देण्याची ही व्यवस्था केली. त्यांतून अनेकांना रोजगार, स्वयंरोजगार उपलब्ध झाले. दोन्ही संस्थांत अच्युतराव निर्मळ वृत्तीने विश्वस्त राहून, संस्थांच्या विश्वासार्हतेला तडा जाणार नाही याबद्दल दक्ष असत.

फ्रान्समधील वास्तव्याच्या काळात फ्रेंच सभ्यता, ख्रिस्ती धर्माबद्दल आस्था आणि फादर दलरी, लेदर्ले यांच्याबरोबर केलेल्या तत्त्वचिंतनातून अच्युतरावांनी फ्रेंच मित्र मंडळ काढले. उभय देशांतल्या नागरिकांत वेगवेगळ्या विषयांवर आदानप्रदान होऊन परस्परांच्या देशाबद्दल योग्य ज्ञान व्हावे, हा यामागचा उद्देश होता. दरवर्षी काही काळ भारतीय नागरिक फ्रान्समध्ये, तर फ्रेंच नागरिक भारतामध्ये ठेवणे अशी आखणी होऊन आजवर हजारो नागरिकांना परस्परांच्या देशांतल्या समाजजीवनाचा परिचय झालेला आहे.

फ्रेंच मित्र मंडळातर्फे गेली पस्तीस वर्षे फ्रान्सचे नागरिक भारतात येणे आणि भारतीय नागरिक फ्रान्समध्ये जाणे ही व्यवस्था चालू आहे. यामुळे ह्या दोन देशांत सौहार्दाचे वातावरण निर्माण व्हायला मदत झाली.

यातून अच्युतरावांच्या आंतरभारती दृष्टीची साक्ष पटते.

- प्रा. स. पां. देशपांडे

## आपटे, मोहन हरी
**भौतिकशास्त्र, विज्ञानलेखक**
**५ डिसेंबर १९३८**



प्रा. मोहन हरी आपटे यांचा जन्म कुवेशी, ता. राजापूर (जि. रत्नागिरी) येथे झाला. त्यांचे इयत्ता तिसरीपर्यंतचे शिक्षण कुवेशीत झाले. मॅट्रिकपर्यंतचे पुढील शालेय शिक्षण साताऱ्याला झाले. महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते पुण्यात आले आणि फर्ग्यसन महाविद्यालयातून त्यांनी पदार्थविज्ञानात बी.एस्सी. केले. एक वर्ष रत्नागिरीच्या गोगटे-जोगळेकर महाविद्यालयात नोकरी करून मग त्यांनी एम.एस्सी.साठी अहमदाबाद गाठले. तिथून एम.एस्सी. करताना त्यांनी प्रथम वर्ग मिळवला. १९६४ साली एम.एस्सी. झाल्यावर त्यांनी प्रत्येकी एक वर्ष सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयात आणि सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयात अध्यापन केले.

१९६६ साली ते मुंबईत आले, तेव्हापासून ते डिसेंबर १९९८ मध्ये निवृत्त होईपर्यंत भारतीय विद्याभवनच्या सोमाणी महाविद्यालयात भौतिकशास्त्राचे प्राध्यापक



मोहन आपटे यांची ग्रंथसंपदा

होते. निवृत्तीच्या वेळी ते भौतिकशास्त्राचे विभागप्रमुख होते. याच दरम्यान १९८९ ते १९९९ अशी दहा वर्षे ते मुंबई विद्यापीठाच्या अधिसभेचे (सिनेटचे) सभासद होते. तसेच, १९९० ते १९९४ या काळात प्रा.आपटे मुंबई विद्यापीठाच्या बहि:शाल शिक्षण मंडळाचे सदस्य होते. १९८१ साली ब्रिटिश कौन्सिलतर्फे इंग्लंडला जाऊन तेथील शिक्षणपद्धतीची माहिती घेण्याची संधी त्यांना मिळाली. त्यांनी विशेष पाठयवृत्ती मिळवून ते काम केले. १९९८ सालापासून ते उत्तन-भाईंदरच्या रामरत्ना विद्यामंदिराच्या शिक्षण मंडळाचे सदस्य आहेत. याखेरीज, टाटा मूलभूत संशोधन केंद्रात ‘फोटो इलेक्ट्रिक क्रिस्टल्सवर’ त्यांनी एक वर्ष काम केले.

शैक्षणिक क्षेत्रात अशी कामगिरी करणाऱ्या प्रा.आपटे यांची सामाजिक संस्था आणि विज्ञान प्रसाराची बाजू तितकीच मोठी आहे. अखिल भारतीय विद्यार्थी परिषद, मुंबईचे ते १९७० ते १९७२ या काळात अध्यक्ष होते. त्याचबरोबर त्यांनी स्थापन केलेल्या जनसेवा समितीचे १९८८ ते १९९९ अशी अकरा वर्षे ते अध्यक्ष होते. तसेच लोकमान्य सेवा संघ, विलेपार्ले या संस्थेचे ते १९९६ ते १९९८ या काळात विश्वस्त होते.

खगोलशास्त्र हा त्यांच्या आवडीचा विषय. त्यामुळे आकाशदर्शनाचे शेकडो कार्यक्रम करणाऱ्या आपटे यांनी ह्या विषयावर किती लेख लिहिले आणि किती भाषणे दिली, याची मोजदाद करता येणार नाही. महाराष्ट्र टाइम्स, तरुण भारत, विवेक, धर्मभास्कर, किर्लोस्कर या नियतकालिकांत त्यांनी सातत्याने लेख लिहिले आहेत. अजूनही त्यांचे लिखाण सुरुच आहे. प्रा.आपटे हे फर्डे वक्ते म्हणूनही प्रसिद्ध आहेत. खणखणीत वाणी आणि अभ्यासपूर्ण विवेचन ही त्यांच्या भाषणाची वैशिष्ट्ये आहेत. तशीच त्यांनी लिहिलेली पुस्तकेसुद्धा अभ्यासपूर्ण आहेत. त्यांची मराठीत ४६ पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत. त्यांतील पहिली दोन पुस्तके वगळता, सर्व पुस्तके विविध प्रकाशकांनी छापलेली आहेत. खगोलशास्त्र, गणित, विज्ञान या विषयांवर त्यांनी पुस्तके लिहिली आहेत. त्यांमध्ये खगोलशास्त्रावरील निम्म्यापेक्षा अधिक आहेत.

‘शतक शोधांचे’ हे विसाव्या शतकातील महत्त्वपूर्ण निवडक शोध, शास्त्रज्ञ आणि वैज्ञानिक घटनांचा मागोवा घेणारे ६२० पानी, तर ‘चंद्रलोक’ हे चंद्र आणि चांद्रमोहिमांचा वेध घेणारी अनोखी सफर घडवणारे ३४० पानांचे पुस्तक; ही दोन्ही पुस्तके त्यांच्या लिखाणातील सुलभता आणि त्यांचा गाढा व्यासंग यांचा परिचय देतात. म्हणूनच ह्या मोठ्या पुस्तकांच्या विक्रीबाबत प्रकाशक निश्चिंत असतात. लोकमान्यतेबरोबर त्यांच्या पुस्तकांना राजमान्यताही मिळाली आहे. १९८५-८६, १९८६-८७ आणि १९९०-९१, असे तीन वेळा भौतिकशास्त्र, ललितविज्ञान आणि सर्वसामान्य ज्ञान, छंद आणि शास्त्रे अशा तीन वेगवेगळ्या गटांत त्यांच्या पुस्तकांना राज्यशासनाचे उत्कृष्ट वाङ्मय पुरस्कार मिळालेले आहेत. या लेखन कामगिरीमुळेच त्यांना नाशिक सार्वजनिक वाचनालयाचा ग.वि. अकोलकर पुरस्कार १९९७ साली, तर पुणे मराठी ग्रंथालयाचा स्वातंत्र्यवीर सावरकर पुरस्कार १९९८ साली मिळाला. याखेरीज खगोलशास्त्रातील उल्लेखनीय कामगिरीसाठी मुंबईच्या खगोल मंडळाने पहिल्या भास्कराचार्य पुरस्काराने २००५ साली त्यांना सन्मानित केलेले आहे.

त्यांनी इंग्रजीतही चार पुस्तके लिहिली आहेत.

याव्यतिरिक्त, आजच्या काळाशी सुसंगत अशा सीडीसुद्धा त्यांनी काढल्या आहेत. त्यांमध्ये, 'सूर्यमालेची काल्पनिक सफर' आणि 'पृथ्वी' मराठीत व इंग्रजीत स्वतंत्रपणे, तर 'स्पेस शटल' ही एकत्रित स्वरुपात उपलब्ध आहे.

आकाशवाणी आणि दूरदर्शनच्या माध्यमातूनही त्यांनी श्रोत्यांशी संवाद साधला आहे. आकाशवाणीवर गेली दोन वर्षे सुरू असलेल्या पृथ्वी आणि खगोल यांविषयीच्या मालिकांचे ते तज्ज्ञ म्हणून काम पाहत आहेत. १९९० साली मराठी विज्ञान परिषदेने वार्षिक अधिवेशनात त्यांचा विज्ञान प्रसार क्षेत्रातील उल्लेखनीय कामाबद्दल त्यांच्या 'सन्मानकरी' म्हणून गौरव केलेला आहे.

लिखाण, भाषणे, समाजकार्य, खगोलविषयक कामगिरी याचबरोबर नियमित व्यायामाची सवय, हायकिंग-ट्रेकिंगमधील रुची, चित्रकलेतील प्रावीण्य ह्या आणखी काही क्षेत्रांत प्रा.आपटे यांना गती आहे. तरुणांना कार्यप्रवण करणे, हे कार्य ते सातत्याने विविध संस्थांच्या माध्यमातून, उत्साहाने करत आहेत. इंटरनेटसारखे नवीन माध्यम आत्मसात करून त्यावरही त्यांनी एक पुस्तक लिहिले आहे. बदलत्या काळात स्लाइड्स, चित्रे यांचा मुबलक वापर करून ते व्याख्याने देतात. अध्यापन आणि विज्ञान प्रसार या दोन्ही क्षेत्रांत तितकीच तोलामोलाची कामगिरी प्रा.आपटे यांनी केली आहे.

- दिलीप हेर्लेकर

***संदर्भ :***

१. *पंचविसावे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; १९९१.*

## इलाटूवलापिल श्रीधरन

***इ. श्रीधरन***

**अभियंता**

**१२ जुलै १९३२**

डॉ.इ. श्रीधरन यांचा जन्म केरळ राज्यातील पलक्कड जिल्ह्यातील करुकापुथुर येथे झाला. श्रीधरन आणि भारत



सरकारचे माजी प्रमुख निवडणूक आयुक्त टी.एन. शेषन हे शाळेत एकत्रच शिकले. शालेय शिक्षणानंतर श्रीधरन यांनी पालघाटच्या व्हिक्टोरिया महाविद्यालयात शिक्षण घेतले आणि नंतर काकिनाडा येथील सरकारी अभियांत्रिकी महाविद्यालयातून ते पदवीधर झाले. कोझिकोड येथील तंत्रनिकेतनात अल्पकाळ स्थापत्य अभियांत्रिकी विषय शिकवल्यावर ते वर्षभर मुंबईच्या पोर्ट ट्रस्टमध्ये काम करीत होते. त्यानंतर त्यांनी भारतीय रेल्वेच्या अभियांत्रिकी सेवेत प्रवेश केला. त्यासाठी राष्ट्रीय स्तरावर झालेल्या परीक्षेत त्यांची निवड झाली होती. या निवडीनंतर डिसेंबर १९५४ साली दक्षिण रेल्वेत त्यांची नोकरी सुरू झाली.

तामीळनाडूतील रामेश्वरमला जाणारा पम्बनचा रेल्वे पूल १९६३ साली आलेल्या महापुराने वाहून गेला होता. हा पूल सहा महिन्यांत दुरुस्त करून चालू करायचा होता. पण श्रीधरनच्या वरिष्ठांनी हा पूल तीन महिन्यांत दुरुस्त करून द्यायचे ठरविले. या कामावर श्रीधरन यांची नेमणूक झाली. त्यांनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी रात्रंदिवस काम करून हा पूल ४६ दिवसांत सुरू केला. या कामगिरीसाठी त्यांना रेल्वेमंत्र्यांचा खास पुरस्कार मिळाला. १९७० साली श्रीधरन मुख्य अभियंता असताना त्यांना कोलकाता मेट्रो रेल्वेचा आराखडा, नियोजन आणि उभारणीचे काम देण्यात आले. भारतातील ही पहिली मेट्रो रेल्वे आहे. त्यानंतर त्यांना कोचीन शिपयार्डाचे अध्यक्ष आणि कार्यकारी संचालक म्हणून नेमले गेले. त्या वेळी राणी पद्मिनी हे पहिले जहाज तेथे बांधले गेले. १९९० साली भारतीय रेल्वेतून श्रीधरन निवृत्त झाले, तेव्हा ते रेल्वे मंडळावर अभियांत्रिकेचे सभासद होते.

निवृत्तीनंतर लगेच कोकण रेल्वेत अध्यक्ष आणि कार्यकारी संचालक पदावर त्यांची नेमणूक झाली. या



मेट्रो रेल्वे, दिल्ली

काळात त्यांनी सात वर्षांत कोकण रेल्वेची पूर्ण उभारणी करून देऊन आगगाडी सुरू करून दिली. हा प्रकल्प अनेक अर्थी वैशिष्ट्यपूर्ण ठरला आहे. 'बांधा, वापरा आणि हस्तांतरित करा' या तत्त्वावर, राष्ट्रीय स्तरावर झालेला हा पहिला प्रकल्प आहे. भारतीय रेल्वेत असणाऱ्या मनुष्यबळपद्धतीपेक्षा येथे वेगळ्या पद्धतीची रचना केली होती; कारण १९५४ ते १९९० अशी छत्तीस वर्षे रेल्वेत काम केल्यामुळे त्या यंत्रणेचे फायदे-तोटे श्रीधरन यांना अवगत होते. या प्रकल्पात बासष्ट किलोमीटर लांबीत त्र्याण्णव बोगदे आहेत. हे बोगदे पहाड खोदून झालेले नसून भुसभुशीत मातीच्या डोंगरातून काढलेले आहेत. ७६० कि.मी. लांबीच्या या रेल्वेमार्गावर १५० पूल आहेत. आशियातील सर्वाधिक उंच रेल्वे पूल (रत्नागिरी जिल्हा), आशियातील सर्वाधिक लांबीचा बोगदा (रत्नागिरी जिल्हा) आणि आशियातील नदीवरील सर्वाधिक लांबीचा पूल (कारवार जवळ शरावती नदीवर, द. कन्नड जिल्हा) असे शिरपेच कोंकण रेल्वेला लाभले आहेत. हा प्रकल्प मंजूर झालेल्या रकमेपेक्षा कमी रकमेत आणि कमी वेळात झाल्याने या प्रकल्पाची प्रशंसा जागतिक स्तरावर झाली.

त्यानंतर १९९७ साली दिल्ली मेट्रो प्रकल्पावर त्यांची नेमणूक झाली आणि या रेल्वेच्या नियोजित आराखड्यातील सर्व कामे २००५ सालाच्या मध्यावर पुरी झाली. तसेच, अंदाजित खर्चापेक्षा कमी रकमेत पुरा झालेला हा दुसरा प्रकल्प. या प्रकल्पाच्या यशस्वी उभारणीमुळे ते श्रीधरनऐवजी 'मेट्रोमॅन' म्हणून ओळखले जाऊ लागले. फ्रांस सरकारने या कामाबद्दल त्यांना 'नाइट ऑफ द लेजिऑन ऑफ ऑनर' हा सन्मान समर्पित केला. वस्तुतः हा टप्पा होईतो श्रीधरन त्र्याहत्तर वर्षांचे झाले होते आणि आपण निवृत्त होणार, असे त्यांनी जाहीरही केले होते. परंतु सरकारने त्यांचा कार्यकाळ आणखी तीन वर्षांनी वाढवून, दिल्ली मेट्रोचा दुसरा टप्पा पुरा करण्याचे काम त्यांना दिले. त्यांना पाकिस्तान सरकारनेही बोलावले होते आणि लाहोर मेट्रोबद्दल त्यांचा सल्ला घेतला होता. २००५ साली संयुक्त अरब अमिरातीने (युएई) त्यांना बोलावून दुबई मेट्रो प्रकल्पाचे प्रमुखपद देऊ केले होते. पण दिल्ली मेट्रोच्या कामामुळे हे काम त्यांनी नाकारले.

श्रीधरन प्रकल्पाचे काम सह व्यवस्थापकांना वाटून देतात आणि ती-ती कामे केव्हा पुरी झाली पाहिजेत, त्याच्या तारखा त्यांना देतात. प्रकल्पातील प्रमुख अधिकारी आणि कंत्राटदारांना ते दर आठवड्याला भेटून त्यांच्या कामाची प्रगती पाहतात. आलेल्या अडचणी सोडवण्यासाठी ताबडतोब नवी व्यूहरचना करतात, त्यामुळे कामाची प्रगती विनाअडथळा होत जाते. कोकण रेल्वेच्या मुंबई ते मंगलोर या ७६० कि.मी.च्या अंतरात असणाऱ्या त्यांच्या ४००-५०० कार्यालयांत रोज, आता हे काम संपायला किती दिवस बाकी आहेत, ते फळ्यावर लिहिले जाऊन कामगारांपासून अधिकाऱ्यांपर्यंत सर्वांना सूचना दिली जाई.

आयुष्यभरातील सातत्याने केलेल्या उत्तम कामासाठी त्यांना अनेक पुरस्कार मिळाले आहेत. १९६३ साली रेल्वेमंत्र्यांचा पुरस्कार, २००१ साली 'पद्मश्री' पुरस्कार, २००२ साली टाइम्स ऑफ इंडियाचा 'मॅन ऑफ द इयर' पुरस्कार, २००३-२००४ सालचा 'कॉन्फिडरेशन ऑफ इंडियन इंडस्ट्रीज'चा पायाभूत सोयी तयार करण्यात दाखवलेल्या नेतृत्वासाठीचा पुरस्कार, २००३ सालचा टाइम मासिकातर्फे 'आशिया खंडातील नेता' पुरस्कार, २००३ सालचा ऑल इंडिया मॅनेजमेंट असोसिएशनतर्फे 'सार्वजनिक सेवेतील उत्तमता' यासाठी पुरस्कार, २००४ साली आय.आय.टी. दिल्लीतर्फे सन्माननीय 'डॉक्टरेट', २००५ साली चंदीगडच्या शिरोमणी संस्थेतर्फे 'भारत

शिरोमणी’ पुरस्कार, २००५ साली फ्रान्स सरकारचा ‘चेव्हालियर डी ला लेजिऑन डी ऑनर’, २००८ सालचा सी.एन.एन.-आय.बी.एन. टीव्ही चॅनलतर्फे ‘इंडियन ऑफ द इयर’ सन्मान, २००८ सालचा ‘पद्मविभूषण’ पुरस्कार हे त्यांपैकी काही प्रमुख होत.

– अ. पां. देशपांडे

## उदगावकर, जयंत भालचंद्र

**जीवशास्त्रज्ञ**

**२२ मार्च, १९६०**



जयंत भालचंद्र उदगावकर यांचा जन्म मुंबईत झाला. शालेय आणि पदवीपर्यंतचे शिक्षणही मुंबईत झाले. अतिशय बुद्धिमान असलेल्या उदगावकरांनी १९७९ साली मुंबई विद्यापीठातून रसायनशास्त्र घेऊन बी.एस्सी. पदवी मिळवली. त्या वेळी विद्यापीठातून प्रथम क्रमांक मिळवून सुवर्णपदक पटकावले. पदवी परीक्षेतील या यशामुळे त्यांना पुढील शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मिळाली. त्यामुळे त्यांनी मद्रास (चेन्नई) आय.आय.टी.त एम.एस्सी.करिता प्रवेश घेतला. तिथे १९८१ साली त्यांनी रसायनशास्त्रात एम.एस्सी. पदवी संपादन केली. त्यानंतर अमेरिकेतील कॉर्नेल विद्यापीठात जीवरसायनशास्त्र विभागातील पेशी आणि रेण्वीय जीवशास्त्र उपविभागात संशोधन केले. या पाच वर्षांतील जीवरसायनशास्त्रातील संशोधनामुळे कॉर्नेल विद्यापीठातून त्यांना १९८६ साली पीएच.डी. पदवी प्रदान करण्यात आली. त्यानंतर १९८९ सालापर्यंत त्यांनी अमेरिकेतील स्टॅनफोर्ड विद्यापीठात पोस्ट डॉक्टरल फेलो म्हणून ‘प्रोटीन फोल्डिंग’ या विषयावर संशोधन केले. त्या वेळी त्यांना जेन कॉफिन चाइल्ड्स मेमोरियल फंडाची फेलोशिप मिळाली होती.

१९९० साली ते भारतात परतले. त्यानंतर ते ‘टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फंडामेंटल रिसर्च’च्या बंगलोर येथील ‘सेंटर फॉर बायोलॉजिकल सायन्सेस’ येथे ‘रीडर’ या पदावर रुजू झाले. सहप्राध्यापक, प्राध्यापक आणि विभागप्रमुख अशा बढत्या मिळवत ते तिथे कार्यरत आहेत. १९९७ सालापासून या केंद्रात होणाऱ्या संशोधन कार्याचे प्रमुखपद त्यांच्याकडे सोपवण्यात आले आहे.

या कामगिरीमुळे उदगावकर यांना अनेक वेळा फेलोशिप, पारितोषिके आणि पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात आले आहे. त्यामध्ये १९९१ ते १९९५ सालांदरम्यान मिळालेली रॉकफेलर फाउंडेशनची फेलोशिप, १९९७ साली भारत सरकारच्या जैवतंत्रज्ञान विभागाकडून मिळालेली फेलोशिप (या फेलोशिपसाठी जैवतंत्रज्ञान क्षेत्रातील पन्नास वर्षांखालील वयाच्या फक्त दोनच भारतीय शास्त्रज्ञांची निवड झाली होती,) १९९६ साली मिळालेला बी.एम. बिर्ला पुरस्कार, १९९८ साली, भारतीय स्वातंत्र्याच्या सुवर्ण महोत्सवानिमित्त दिलेली स्वर्णजयंती फेलोशिप (भारतातील ४० वर्षांखालील निवडक अकरा शास्त्रज्ञ, डॉक्टर व अभियंता यांमधील एक) आणि २००० साली जीवशास्त्रातील उत्कृष्ट कामगिरीकरिता तरुण शास्त्रज्ञ म्हणून मिळालेला शांतिस्वरूप भटनागर पुरस्कार यांचा प्रामुख्याने समावेश आहे. इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेसचे ते १९९६ सालापासून व इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचे २००२ सालापासून फेलो आहेत. त्यांचे त्र्याहत्तरच्यावर शोधनिबंध देशातील व परदेशातील नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले आहेत.

जयंत उदगावकरांच्या संशोधनासंबंधी थोडक्यात माहिती जीवविज्ञानातील एक कुतूहल निर्माण करणारी गोष्ट म्हणजे प्रत्येक क्षणाक्षणाला हजारो प्रथिने स्वत:च स्वत:चा विशिष्ट आकार धारण करतात, जो त्यांच्या कार्याची गुरुकिल्ली ठरतो. नवीन अमायनो आम्लांची साखळी वाकते, स्वत:भोवतीच गुंडाळली जाऊन वलय रूप घेते, पिळवटते, स्वत:तच कोसळते व स्वत:चा अंतिम आकार साकारते. अमायनो आम्लांतील रासायनिक आकर्षणामुळे ही पुनर्रचना होते. डी.एन.ए.

ज्या तऱ्हेने अमायनो आम्लांची गणिती अचूकतेने क्रमवारी लावतो, त्याचे आपणांस ज्ञात असलेल्या ज्ञानाच्या संपूर्ण विरोधात रासायनिक दाब, जो या दुमडण्यास दिशा देतो, त्याविषयी अपूर्ण ज्ञान आहे. तसेच ही प्रक्रिया गुंतागुंतीची आहे.

प्रथिनांच्या रचनेचा अपेक्षित नमुना हा शास्त्रातला 'होलीएस्ट ग्रेल' समजला जातो. याच्यामुळे जीव-आयुर्विज्ञानात अविश्वसनीय फायदे मिळण्याची अपेक्षा आहे. त्यांच्या प्रयोगशाळेत या विषयावर लक्ष्य केंद्रीत केले आहे. खऱ्या घटनांवरील निरीक्षणांवर, ज्यामध्ये प्रथिनांचे दुमडणे, उलगडणे, अर्धवट दुमडणे, चक्षुर्वैसत्यं चालते, हा पूरक व गणनविधीवर आधारित असलेल्या प्रतिकृतीजवळ जाण्याचा खरा मार्ग. अगदी लहान प्रथिने वापरून व जे तंत्रज्ञान नॅनो ते मायक्रोसेकंदात पृथक्करण मापू शकते, ते वापरून हे विशिष्ट आकार घेण्याचे कोडे सोडवण्याविषयी निर्माण होणारे प्रश्न उदगावकर आणि त्यांचे सहकारी हाताळत आहेत. प्रथिने हळूहळू आकार घेतात की झटक्या-झटक्यात घेतात? प्रत्येक प्रथिनाचा दुमडण्याचा एकच क्रम असतो का? हे दुमडणे पेशीय स्थितीला किती संवेदनशील असते? अगोदर काय होते? आकाराचा बाह्य आराखडा की संपूर्ण तपशील? त्यांची निपुणता त्यांनी, प्रथिन दुमडण्याकडे व अगदी अलीकडे अपूर्ण दुमडण्याकडे, लावली आहे. या अपूर्ण दुमडण्याकडे प्रथिने एकमेकांना चिकटून तंतुमय पुंज तयार करतात. अल्झायमर्स हा चेतातंतुऱ्हासाचा रोग हा त्याचा परिणाम. अल्झायमर्ससारखा रोग का होतो ते शोधण्याचे ध्येय उदगावकर आणि त्यांचे सहकारी यांच्यासमोर आहे. आपल्या वडिलांचा - प्रा.भालचंद्र उदगावकरांचा - संशोधनाचा वारसा जयंत उदगावकर समर्थपणे चालवत आहेत.

- मृणालिनी साठे / दिलीप हेर्लेकर

***संदर्भ :***


१. *इंडिया टुडे; २७ डिसेंबर १९९९.*

२. *चाळिसावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, मुंबई; २००५.*


## उदगावकर, भालचंद्र माधव

**भौतिकशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**१४ सप्टेंबर १९२७**



'टाटा मूलभूत संशोधन संस्था (टी.आय.एफ.आर.) नावाच्या मुंबईतील आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या संस्थेतील ज्येष्ठ प्राध्यापक व बुद्धिप्रामाण्याच्या आधारे मराठीतून उत्कृष्ट वैज्ञानिक प्रबोधन करणारे भौतिकीचे नामवंत संशोधक असलेल्या भालचंद्र माधव उदगावकरांचा जन्म, शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षण मुंबईतच झाले. शालेय जीवनातही ते अतिशय हुशार म्हणून गणले गेले. तेव्हाच्या मॅट्रिकच्या परीक्षेनंतर दोन वर्षांनी घेतल्या जाणाऱ्या इंटर सायन्स परीक्षेत, पहिल्या वर्गात, पहिल्या क्रमांकाने ते उत्तीर्ण झाले. त्यांनी अभियांत्रिकीचा मार्ग न निवडता, बी.एस्सी., एम.एस्सी. या पदव्या उच्च श्रेणीत संपादन केल्या. प्रा.उदगावकरांनी १९४९ सालापासून जवळजवळ ४० वर्षे मुंबईच्या टाटा मूलभूत संशोधन संस्थेमध्येच संशोधन व अध्यापन केले.

आपल्या संशोधन कारकिर्दीच्या सुरुवातीस डॉ. होमी भाभा यांच्या मार्गदर्शनाखाली जरी त्यांनी मूलभूत कणांच्या गुणधर्मासंबंधीचा अभ्यास सुरू केला तरी लवकरच, त्या काळी नव्याने उदयास येणाऱ्या अणुऊर्जेच्या संदर्भातील भारतातील विकास व संशोधनकार्याकडे ते आकर्षित झाले. १९५३-५५ दरम्यान फ्रान्समधील सॅक्ले येथील अणुशक्ती केंद्रात, तत्कालीन आघाडीच्या विचारांसंबंधीचे प्रशिक्षण घेऊन भारतात परतल्यावर उदगावकरांनी अणुभट्ट्यांतील विविध आण्विक प्रक्रियांच्या सैद्धान्तिक अभ्यास करणाऱ्या वेगळ्या गटाची, भारतीय अणुसंशोधन विभागात पायाभरणी केली. त्या अंतर्गत अतिउच्च स्तरावरील ऊर्जेसंबंधीच्या सैद्धान्तिक-भौतिकीच्या

अभ्यासाकडे ते १९६० साली वळले. अमेरिकेत १९६०-६२ सालांदरम्यान बर्कले, १९६२ साली प्रिन्स्टन व १९६३ साली आरगॉन राष्ट्रीय प्रयोगशाळेत त्यासंबंधीचे काम करून भारतात परतल्यावर टाटा संस्थेमध्ये सैद्धान्तिक-भौतिकी विभाग प्रमुख म्हणून कामास लागले. अण्वस्त्रस्पर्धा काबूत ठेवण्यासाठी आंतरराष्ट्रीय वैज्ञानिकांनी स्थापिलेल्या या चळवळीच्या कामाला १९९५ साली शांततेचे नोबेल पारितोषिक मिळाले. पगवॉश चळवळीच्या कार्यात ते सक्रिय होते.

सैद्धान्तिक-भौतिकी हा जरी त्यांच्या अभ्यासाचा मुख्य विषय असला, तरी त्यावर आधारित प्रायोगिक कार्यात ते रस घेत. टी.आय.एफ.आर.मधील सैद्धान्तिक-भौतिकीचा वेगळा विभाग सुरू होण्याआधी उदगावकर तुर्भे येथील अणुशक्ती विभागाच्या 'रिॲक्टर फिजिक्स ग्रूप'मध्ये कार्यरत होते. त्यांच्या शिफारसपत्रामुळे अनेक तरुण शास्त्रज्ञांना, तसेच विद्यापीठातील शिक्षकांना, कॅलिफोर्नियातील लॉरेन्स बर्कले प्रयोगशाळेसारख्या नामांकित संस्थांमधून प्रायोगिक विज्ञानाचे धडे गिरवता आले. १९८३ साली टी.आय.एफ.आर. व बी.ए.आर.सी.तील शास्त्रज्ञांनी संयुक्तपणे 'मेहिया' नावाच्या एका प्रवेगयंत्राच्या उभारणीचे कार्य जेव्हा हाती घेतले, त्या वेळी तो प्रकल्प जागतिक दर्जाचा व्हावा, यासाठी उदगावकर संबंधित ज्येष्ठ शास्त्रज्ञांशी सतत संपर्क साधून असत.

उदगावकरांनी शैक्षणिक क्षेत्रात केलेले कार्य विशेष उल्लेखनीय आहे. १९७१ साली भौतिकीच्या विविध शैक्षणिक अंगांच्या परिणामकारक विकासासाठी स्थापन झालेल्या इंडियन फिजिक्स असोसिएशनचे ते पहिली दोन वर्षे संस्थापक अध्यक्ष होते तसेच असोसिएशनने नव्याने सुरू केलेल्या 'फिजिक्स न्यूज' या त्रैमासिकाचे संपादक होते. ठरावीक पाठ्यक्रमानुसार शास्त्रीय विषय विद्यार्थ्यांच्या गळी उतरवून त्यांच्या परीक्षा घेण्यात सदैव गुंतलेले विद्यापीठातील प्राध्यापक व टी.आय.एफ.आर.सारख्या प्रगत संशोधन संस्थेतील शास्त्रज्ञ, यांनी समन्वयाने चांगल्या विद्यार्थ्यांमध्ये



**टाटा मूलभूत संशोधन संस्था, मुंबई**

शास्त्रीय शाखांमधील आधुनिक विचारांबद्दल कुतूहल निर्माण करणे किती अगत्याचे आहे, याची आत्यंतिक जाण त्यांना सदैव असते.

सैद्धान्तिक-भौतिकशास्त्र, सापेक्षता सिद्धान्त, क्वांटम भौतिकी अशा प्रगत विज्ञानाच्या शाखांचे परिणामकारक उच्च शिक्षण देण्यास विद्यापीठीय अभ्यासक्रमात राष्ट्रीय स्तरावर काही मूलभूत बदल करण्यासाठी त्यांनी विद्यापीठ अनुदान मंडळामार्फत जागृती कार्यक्रम हाती घेतले. परिणामी, १९७३-७९ सालांदरम्यान त्यांना विद्यापीठ अनुदान मंडळाचे सदस्यत्वच देण्यात आले. १९७७-७९ या काळात त्यांनी भारतीय नियोजन आयोगाच्या उपाध्यक्षांचे विशेष सल्लागार म्हणूनही काम केले. १९८० ते १९८६ अशी सहा वर्षे उदगावकर भारतीय समाजशास्त्र संशोधन परिषदेचेही सदस्य होते. ठिकठिकाणच्या विद्यापीठांशी संलग्न असलेल्या महाविद्यालयांतून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या संख्येत लक्षणीय वाढ झाल्यामुळे प्रभावी शिक्षकांच्या अभावी, शिक्षणाच्या गुणवत्तेत घट होणे स्वाभाविक असते. त्यावर परिणामकारक तोडगा म्हणून फक्त अभ्यासक्रमातील सुधारणांच्याच मागे न लागता, कर्तबगार शिक्षकांची निकड भागवायला प्राध्यापकांना संशोधनासाठी विशेष अनुदान मिळावे म्हणून तरतुदींसाठी ते आग्रही बनले. १९७९-८६ या काळात भारतातील ठिकठिकाणच्या विद्यापीठातील



होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र, मुंबई

प्राध्यापकांना, आण्विक विज्ञानासंबंधीच्या संशोधनासाठी भारत सरकारच्या अणुशक्ती विभागांतर्गत अनुदान देणाऱ्या मंडळाच्या अध्यक्षपदी त्यांची नियुक्ती झाली.

दहा वर्षांपूर्वी महाविद्यालयीन शिक्षणासाठी वयाने पात्र असलेल्या तरुणांचे प्रमाण भारतात फक्त सहा टक्के होते. त्यात अजूनही फारसा बदल झालेला नाही. या परिस्थितीचा दरडोई उत्पन्नाशी कितपत संबंध असू शकतो याचा तपास त्यांनी सुरू केला. राष्ट्रीय प्रगतीनुसार जागतिक स्तरावर ज्ञानसंचयाची वाढ जर दुप्पट व्हायला हवी असेल, तर ज्ञान आणि तंत्रज्ञान या बाबतींतही भारतातील मनुष्यबळ अद्ययावत करण्याची निकड उदगावकरांनी हेरली. प्रत्येक शैक्षणिक संस्थेने आपण देत असलेल्या शिक्षणाचा दर्जा उत्तम राखण्यात कुठलीही तडजोड न स्वीकारण्याची जबाबदारी स्वत:वरच घेतली तर पाठ्यपुस्तकी अभ्यासक्रम नुसते शिकवण्याऐवजी, त्यांतील मूलतत्त्वे ओळखायला व ती समजून घ्यायला मार्गदर्शन करणारे जबाबदार शिक्षक निर्माण होण्यास फार मोठी चालना मिळेल, असे त्यांना मनोमन वाटते.

पदव्युत्तर विभागांना आवश्यक ती स्वायत्तता हा विषय दुर्दैवाने मुंबई विद्यापीठात अजूनही फक्त चर्चेचीच बाब राहते. याबद्दल प्रा.उदगावकर वारंवार खंत व्यक्त करतात. याखेरीज, निर्णयांच्या विद्यापीठीय स्तरावरील अंमलबजावणीस लागणारा प्रशासकीय विलंब, प्रयोगशील महाविद्यालयांच्या गुणवत्तावर्धनाच्या कामात मोठा अडसर बनतो. आय.आय.टी., इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेन्ट, जवाहरलाल नेहरू विद्यापीठ इत्यादी केंद्रशासित संस्थांचा दर्जा, राज्यशासित शिक्षणसंस्थांपेक्षा सरस असण्यामागचे कारण, त्यांना मिळणारी स्वायत्तता व पुरेसे आर्थिक बळ यांचा संयुक्त परिणाम असे ते मानतात.

आण्विक रसायनशास्त्र, औद्योगिक रासायनिक चाचणी अशा विशिष्ट विषयांसाठीच्या प्रयोगशाळा स्थापन करायला, तिथे तज्ज्ञ प्राध्यापकांसाठी खास अध्यासने निर्माण करण्यासाठी उद्योगांकडून मोलाची मदत मिळू शकते, हे काही शिक्षणसंस्थांनी समर्थपणे सिद्ध केल्याचा आनंद उदगावकर नि:संकोचपणे व्यक्त करतात. प्रशिक्षित मनुष्यबळ तयार करण्यासाठी, किंबहुना एकूणच राष्ट्रीय प्रगतीसाठी केलेली गुंतवणूक म्हणून उच्च शिक्षणाच्या अनुदानाकडे आपण पाहिले पाहिजे, असे ते ठासून सांगतात. खरे तर, राष्ट्रीय प्रगतीसाठी विज्ञान व वैज्ञानिक यांचा पुरेसा उपयोग करण्याच्या आवश्यकतेचीच भारतात होत असलेली उपेक्षा त्यांना सतत अस्वस्थ करते.

पायाभूत शैक्षणिक सुधारणा शालेय स्तरापासूनच करणे अगत्याचे आहे हे जाणून, १९७२ साली त्यांच्या प्रेरणेने, मध्यप्रदेशातील होशंगाबाद येथेही शिक्षकांसाठी विज्ञान शिक्षणाचा एक अनोखा कार्यक्रम हाती घेण्यात आला. विद्यार्थ्यांची बौद्धिक गुणवत्ता वाढविण्यासाठी शालेय शिक्षकांना आवश्यक ते प्रशिक्षण देणारे होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र, सर दोराबजी टाटा ट्रस्टच्या आर्थिक मदतीने, १९७४ साली मुंबईत स्थापन करण्यात उदगावकरांनी पुढाकार घेतला. या केंद्राचे ते संस्थापक अध्यक्ष आहेत. १९७५ ते १९९१ दरम्यान त्यांच्या कार्यकाळात १९८१ सालापासून या केंद्राला भारत सरकारच्या अणुशक्ती विभागांतर्गत अर्थसाहाय्यही मिळू लागल्यावर, ते केंद्र टी.आय.एफ.आर.चा एक भाग म्हणून कार्यरत झाले. मुंबईतील अणुशक्ती विभागाच्या शैक्षणिक संस्थेचे उदगावकर १९८८-९० साली अध्यक्ष

होते. मुंबई विद्यापीठाच्या पश्चिम क्षेत्रीय उपकरण विकास देखभाल केंद्राच्या निर्मितीच्या प्रक्रियेलाही उदगावकरांचे मोलाचे साहाय्य लाभले.

वैज्ञानिक संकल्पना सर्वसामान्यांना सहज समजाव्यात यासाठी प्रा. उदगावकरांनी सुबोध मराठीतून अनेक व्याख्याने दिली, वर्तमानपत्रातून लेख लिहिले, तसेच चर्चासत्रात भाग घेऊन तरुणांना मार्गदर्शन केले. मराठी विज्ञान परिषद या संस्थेचे ते १९८२-९१ अशी नऊ वर्षे अध्यक्ष होते. १९८५ साली त्यांना पद्मभूषण पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. १९८७ साली 'भारत जन विज्ञान जथ्था' या नावाने एक देशव्यापी उपक्रम राबविण्यात आला, त्याच्या राष्ट्रीय समन्वय समितीचे ते अध्यक्ष होते.

वेळोवेळी विविध पातळ्यांवर जनमानसात विज्ञान प्रसाराच्या निमित्ताने ज्या अनेक संस्थांशी त्यांचा संबंध आला, तेथे काम करणारे सर्व कार्यकर्ते नियोजित वेळेत ध्येय साध्य होण्यासाठी एकत्रितपणे कसे काम करतील, यासाठी ते नेहमी आस्थेने मार्गदर्शन करतात. मानवी जीवन दिवसेंदिवस अधिकाधिक समृद्ध करण्यासाठी, मूलभूत वैज्ञानिक संशोधनाद्वारे जी नित्यनवी तंत्रे विकसित होत असतात, त्यांची माहिती जनसामान्यांना करून द्यायलाच हवी, यावर त्यांची अढळ निष्ठा आहे. त्यांचे वडील जसे स्वत:चा वैद्यकीय व्यवसाय सांभाळून हिरिरीने समाजकार्य करीत, तो वारसा प्राध्यापक उदगावकर चालवत आहेत.

- डॉ. अच्युत थत्ते

***संदर्भ :***

*१. देशपांडे, अ.पां.; 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन; २००५.*
*२. दै. लोकसत्ता; ९ सप्टेंबर २००७.*
*३. दै. डिएनल; ११ सप्टेंबर २००७.*

## एम. विश्वेश्वरय्या

☞ **मोक्षगुंडम, विश्वेश्वरय्या**

✻✻✻

क

# क

## कणेकर, चंद्रकांत रामचंद्र
### भौतिकशास्त्रज्ञ
### २१ जून १९१९ - १३ जानेवारी १९७२



डॉ.चंद्रकांत रामचंद्र कणेकर यांचा जन्म आणि शालेय शिक्षण कल्याणला झाले. महाविद्यालयीन शिक्षण, मुंबई येथील एल्फिन्स्टन महाविद्यालय आणि रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये (आताची इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स) झाले. तेथून बी.एस्सी. आणि एम.एस्सी. या पदव्या त्यांनी सुवर्णपदकासह मिळविल्या. काही काळ त्याच संस्थेत ते साहाय्यक प्राध्यापक म्हणून रुजू झाले. नंतर तेथेच प्रा.माताप्रसाद यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन करून त्यांनी रसायनशास्त्रातली पीएच.डी. पदवी मिळविली. नंतर ब्रिटिश कौन्सिलच्या शिष्यवृत्तीवर डॉ.कणेकरांनी, लंडन विद्यापीठात सर आर.एस. नायहोल्म, एफ.आर.एस., यांच्या मार्गदर्शनाखाली, चुंबकीय रसायनशास्त्रात पोस्ट-डॉक्टरेट कार्यक्रमांतर्गत संशोधन केले. तेथेही त्यांनी पीएच.डी. पदवी मिळविली. त्यांनी ऑस्टेलियातील प्रा.आर. एल. मार्टिन यांच्याबरोबरही संशोधन केले.

१९५५ साली ॲटॉमिक एनर्जी एस्टॅब्लिशमेंट (आताचे भाभा अणुसंशोधन केंद्र) या संस्थेत प्रकल्पाधिकारी म्हणून ते रुजू झाले. १९४५ साली मुंबईच्या टाटा मूलभूत संशोधन संस्थेची स्थापना झाली आणि त्यात देश-विदेशांत संशोधन करीत असलेले आघाडीचे भारतीय वैज्ञानिक रुजू झाले होते. प्रा.धर्मट्टी त्या वेळी अमेरिकेतील स्टॅन्फोर्ड विद्यापीठात प्रा. फेलिक्स ब्लॉक यांच्या मार्गदर्शनाखाली न्यूक्लिअर मॅग्नेटिक रेझोनन्स (एन.एम.आर.) क्षेत्रात संशोधन करीत होते. ते १९५० सालच्या सुमारास भारतात परत येऊन, टाटा मूलभूत संशोधन संस्थेत रुजू झाले. तेथे त्यांच्या निर्देशनाखाली, या तंत्रक्षेत्रात संशोधन करणाऱ्या शास्त्रज्ञांचा एक गट निर्माण केला गेला, त्यात डॉ.कणेकर रसायनशास्त्राचे प्राध्यापक या नात्याने १९५७ साली सामील झाले. स्वतंत्र भारताच्या विज्ञान आणि तंत्रज्ञान क्षेत्रात हे फार मोठे संक्रमण घडत होते. जगभरचे आघाडीचे भारतीय शास्त्रज्ञ, भारतात परत येऊन, मूलभूत आणि उपयोजित विज्ञान आणि तंत्रज्ञान क्षेत्रातील आवश्यक सेवासुविधांची पायाभरणी करू लागले होते. प्रा. धर्मट्टींनी रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स या संस्थेत असताना चुंबकीय प्रवणता मॅग्नेटिक ससेप्टेबिलिटी या क्षेत्रात असेंद्रिय कॉम्प्लेक्सेसवरही संशोधन केले होते. त्याच वेळी डॉ.कणेकर हेही रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स येथे असल्यामुळे प्रा.धर्मट्टींना डॉ.कणेकरांच्या संशोधनकार्याचा आणि उत्कृष्ट प्रयोगशीलतेचा परिचय होता.

रसायनशास्त्राच्या ज्या शाखांत डॉ.कणेकरांनी विशेष संशोधन केले, त्यांपैकी सर्वात महत्त्वाचे क्षेत्र म्हणजे चुंबकीय रसायनशास्त्र (मॅग्नेटो केमिस्ट्री). त्यांनी धातूंचे अणू असलेली अनेक अकार्बनी संयुगांची (चुंबकीय प्रवणता) ससेब्लिटी मोजून त्यांची संरचना आणि जडणघडण यासंबंधीचा अभ्यास केला. परीक्षण नमुन्यांची चुंबकीय प्रवणता मोजण्यासाठी एल.जी. गॉय या फ्रेंच शास्त्रज्ञाने एक तराजू बनविला. पदार्थाचा परीक्षण नमुना, प्रबळ चुंबकीय क्षेत्रात ठेवला असता,



**एन.एम.आर. स्पेक्ट्रोमीटर**

त्याच्या वजनात होणारी वाढ किंवा घट, या तराजूमुळे मोजता येते आणि पदार्थाच्या अणुरेणूंच्या संरचनेसंबंधी माहिती मिळते. या गॉय तराजूची मूलभूत सुविधा डॉ.कणेकरांनी भारतातील अनेक प्रयोगशाळांत बसविली आणि संशोधनाची अचूकता आणि व्याप्ती वाढविली.

त्यांनी अनेक कार्बनी संयुगांच्या संरचनेची माहिती मिळविण्यासाठी हाय रेझोल्यूशन एन.एम.आर. प्रयोगांची आखणी करून एका नव्याच क्षेत्राची मुहूर्तमेढ रोवली. त्यांनी या प्रकारच्या अनेक कार्बनी संयुगांच्या काही मूलभूत गुणधर्माच्या यशस्विरीत्या नोंदी केल्या. त्या काळी 'एन.एम.आर. स्पेक्ट्रोस्कोपी' हे तंत्र नवीनच होते. ज्या कार्बनी पदार्थात, हायड्रोजन किंवा कार्बन-१३ यांसारखे अणुगर्भीय परिवलन (न्यूक्लिअर स्पिन) असलेले अणू असतात ते पदार्थ चुंबकीय क्षेत्रात ठेवले असता, चुंबकक्षेत्राच्या ठरावीक प्रबलतेवर, त्यांचे सहस्पंदन (रेझोनन्स) होऊन, रासायनिक विस्थापन या मूलभूत गुणधर्माचे मोजमाप करता येते आणि पदार्थांच्या संरचनेसंबंधी संशोधन करता येते. पदार्थांच्या मिश्रणातील घटकांचा अभ्यास, गतिशील परिणामांचा, म्हणजे पदार्थाच्या तापमानातील बदल किंवा रासायनिक क्रियांच्या वेगातील बदल वगैरेंचा, तसेच प्रथिने आणि न्यूक्लिइक आम्लांची संरचना आणि कार्ये यांचाही अभ्यास करता येतो.

त्याव्यतिरिक्त डॉ.कणेकरांनी द्रव स्फटिक (लिक्विड क्रिस्टल) एन.एम.आर. वगैरे सुविधा उपलब्ध करून दिल्या. काही रासायनिक संयुगांचे द्रव स्फटिक वापरून रासायनिक विस्थापनांची मोजमापे तर केलीच; शिवाय प्रायोगिक निरीक्षणांची शास्त्रीय स्पष्टीकरणे देऊन, अनेक संशोधन निबंध, देश-विदेशांतील शास्त्रीय मासिकांत प्रसिद्ध केले. त्या काळात नव्यानेच ओळख झालेल्या मॉस्बॉर परिणामावरही त्यांनी संशोधन करून अनेक असेंद्रिय कॉम्प्लेक्सेस यांचे रासायनिक गुणधर्म प्रथमच अभ्यासिले. डॉ.कणेकरांनी पीएच.डी. पदवीसाठी अनेक तरुण वैज्ञानिकांना मार्गदर्शन करून त्यांच्याकडून संशोधन करून घेतले. हे सर्व विद्यार्थी नंतर अनेक भारतीय विज्ञान संस्थांत, उच्चपदांवर कार्यरत होते. अशा रितीने, डॉ. कणेकरांनी त्यांच्या संशोधन क्षेत्रातली परंपरा आणि एक प्रकारचे गुरुकुलच निर्माण केले.

प्रा.कणेकर आंतरराष्ट्रीय कीर्तीचे रसायनशास्त्रज्ञ होते. चुंबकीय रसायनशास्त्र या त्यांच्या आवडीच्या विषयात त्यांचे अनेक प्रबंध देशी-विदेशी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले असून या विषयावरील अनेक आंतरराष्ट्रीय परिषदांत त्यांनी भाग घेतला होता. रसायनशास्त्राच्या शिक्षणाबद्दल त्यांना विशेष तळमळ होती. भारतातील अनेक विद्यापीठांना, संशोधनात आणि प्रयोगशाळा आधुनिक सुविधांनी सुसज्ज करण्यात, डॉ. कणेकरांनी सक्रिय मदत केली. डॉ. कणेकर मराठी विज्ञान परिषदेचे सदस्य होते. डॉ.कणेकरांना संगीताचीही बऱ्यापैकी जाण होती. ते हार्मोनियम वाजवीत, गायकांना उत्तम साथ करीत असत.

आय.आय.टी. कानपूर येथे, काही संशोधकांच्या पीएच.डी. पदवीसाठी ते मौखिक परीक्षा घेण्यासाठी गेले असता, त्यांचे हृदयविकाराच्या तीव्र झटक्याने वयाच्या अवघ्या बावन्नाव्या वर्षी आकस्मिक निधन झाले.

- गजानन वामनाचार्य

***संदर्भ :***


१. *मराठी विज्ञान परिषद-पत्रिका; जानेवारी व फेब्रुवारी १९७२ (जोड अंक).*

क

## कर्वे, आनंद दिनकर
**वनस्पतीशास्त्रज्ञ**
**७ ऑगस्ट १९३६**



'ग्रीन ऑस्कर' समजला जाणारा 'ॲश्डेन पुरस्कार' दोनदा मिळविणाऱ्या पुण्यातील 'ॲप्रोप्रिएट रूरल टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट' (आरती) या संस्थेचे प्रवर्तक डॉ.आनंद दिनकर कर्वे यांचा जन्म पुण्यातील सुप्रसिद्ध समाजसुधारक महर्षी कर्व्यांच्या घराण्यात झाला. वडील दिनकर पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयाचे प्राचार्य, तर आई डॉ.इरावती प्रसिद्ध मानववंश शास्त्रज्ञ.

पुणे विद्यापीठातून वयाच्या विसाव्या वर्षी त्यांनी बी.एस्सी. पदवी मिळवून उच्च शिक्षणासाठी ते जर्मनीच्या ट्यूबिंगेन विद्यापीठात गेले व तिथे १९६० साली त्यांनी वनस्पतिशास्त्रात डॉक्टरेट मिळविली. त्यानंतरची चार वर्षे ते पंजाब विद्यापीठात व मराठवाडा विद्यापीठात व्याख्याते होते. १९६४ ते १९६६ या दोन वर्षांसाठी त्यांनी कोल्हापूरच्या शिवाजी विद्यापीठात वनस्पतिशास्त्र विभागाचे प्रमुखपद भूषविले. पुढे १९८२ सालापर्यंत ते फलटण येथील निंबकर सीड्सचे संशोधन - संचालक म्हणून कार्यरत राहिले. याच काळातील अखेरच्या दोन वर्षात त्यांनी म्यानमार येथे 'युनायटेड नेशन्सच्या फूड ॲन्ड ॲग्रिकल्चर ऑर्गनायझेशन'च्या वतीने भुईमूगतज्ज्ञ काम पाहिले होते व 'इंटरनॅशनल रॉस्टर ऑफ सॅफ्लॉवर एक्सपर्ट'चे ते सदस्यदेखील होते.

१९८३ साली त्यांनी जर्मनीतील 'अलेक्झांडर फॉन हुंबोल्ट फाउण्डेशन सीनियर रिसर्च फेलो' या नात्याने फ्रायबुर्ग विद्यापीठाच्या वनस्पतिशास्त्र विभागात संशोधन केले. १९८४-१९८८ दरम्यान त्यांनी हिंदुस्थान लिव्हर लिमिटेड कंपनीत कृषिसंशोधन विभागाच्या व्यवस्थापक पदाची जबाबदारी सांभाळली. नंतर त्यांनी १९८८ साली भारत सरकारच्या विज्ञान व तंत्रज्ञान विभागातर्फे चालविण्यात येणाऱ्या 'सेंटर फॉर ॲप्लिकेशन ऑफ सायन्स ॲन्ड टेक्नॉलॉजी फॉर रूरल डेव्हलपमेन्ट' या प्रकल्पात सहभाग घेतला. १९९२ साली ते त्या प्रकल्पाचे उपसंचालक व नंतर संचालक झाले. १९९३ साली त्यांनी इंद्रायणी बायोटेक लि., पुणे या कंपनीच्या संचालकपदाची जबाबदारी स्वीकारली

ॲप्रोप्रिएट रूरल टेक्नॉलॉजी इन्स्टिट्यूट (आरती) या अग्रगण्य संशोधन केंद्राची स्थापना १९९२ साली झाली. १९९६ साली आनंद कर्वे यांनी या संस्थेच्या अध्यक्षपदाची जबाबदारी स्वीकारली. डॉ. कर्वे यांनी आपल्या सहकाऱ्यांसमवेत स्वयंपाकघरातील भाजीपाल्याचा कचरा, उष्टे-खरकटे व खराब झालेले अन्न वापरून बायोगॅस तयार करण्याचे क्रांतिकारी संयंत्र शोधले आहे. पारंपरिक बायोगॅस संयंत्राना लागणाऱ्या ४० किलो शेणाऐवजी, या प्रणालीला फक्त एक किलो जैव खाद्य लागते आणि त्यातूनच ५०० ग्रॅम गॅस तयार होतो. त्यामुळे ब्रिटनच्या राजवाड्यात या संयंत्राची प्रस्थापना करण्यासाठी इंग्लंडचे प्रिन्स चार्ल्स यांनी डॉ. कर्वे यांना आमंत्रित केले होते. महाराष्ट्र राज्यात अशी ७०० च्यावर संयंत्रे उभारण्यात आली असून, ग्रामीण भागाबरोबरच शहरी भागातही ती उपयुक्त ठरत आहेत.

महाराष्ट्रातील सांगली, सातारा, कोल्हापूर हा पट्टा उसाच्या उत्पादनासाठी ख्यातकीर्त आहे. उसाचे पीक घेतल्यानंतर दरवर्षी साधारणत: ४५ लाख टन कचरा पाचटाच्या (वाळलेल्या पात्याच्या) रूपाने मागे उरतो व तो शेतातच जाळला जातो. देशभरात गव्हाचे काड, मक्याच्या बुरकुंड्या, बाजरीचे सरमाड, भाताचा पेंढा, तसेच गळीत धान्ये, कडधान्ये, भाज्या, केळी, हळद, कपाशी इ. पिकांचा शेतात उरणारा भाग, बोरे व द्राक्षांची छाटणी केल्यावर मिळणाऱ्या काड्या व फांद्या, फळबागांचा पालापाचोळा, नारळाच्या झावळ्या व करवंट्या, कडधान्याच्या शेंगांची टरफले वगैरे टाकाऊ शेतमाल दरवर्षी साठ कोटी टनांवर जातो. वर्षानुवर्षे हा कचरा जाळून नष्ट करण्याची पद्धत चालू आहे. 'आरती'ने या पालापाचोळ्याच्या कचऱ्यापासून



**कांडीकोळसा भट्टी**

कांडीकोळसा निर्माण करण्याची वैज्ञानिक शक्कल शोधून काढली.

स्टेनलेस स्टीलच्या पिंपात हा जैव कचरा घालून त्यांना भट्टीत घालून बाहेरून उष्णता दिली, की ऑक्सिजनच्या गैरहजेरीत त्याचे विघटन होते व त्यातून ७० टक्के ज्वलनशील पदार्थ वायुरूपाने बाहेर पडतात व जैवभाराचा जो अवशेष उरतो, तो कोळसा असतो. जैवभार पेटविण्यासाठी लागणारी उष्णता जैवभार पेटवूनच मिळविली जाते. आरतीने तयार केलेल्या भट्ट्या आकाराने छोट्या असल्यामुळे सहज हलविता येतात. या भट्टीतून एकूण आत जाळलेल्या जैवभाराच्या २० टक्के कोळसा मिळतो, म्हणजेच देशातील ६० कोटी कृषिकचऱ्यातून १२ कोटी टन कोळसा मिळविता येऊ शकतो. या कोळशाचा बारीक भुगा करून त्यात थोडे शेण किंवा खळ मिसळल्यास साच्याच्या साहाय्याने कांडीकोळसा किंवा इंधन विटा तयार करता येतात. तंदूर, बार्बेक्यू किंवा साध्या कोळशाच्या शेगडीत, तसेच लोहार कामासाठीसुद्धा हा कोळसा वापरता येतो. हा कोळसा जळताना धूर येत नाही. शेतकऱ्यांसाठी हा एक प्रकारे जोडउद्योग होऊ शकतो व सध्याच्या अन्य इंधनाच्या कडाडत्या भावाच्या काळात हा कोळसा एक प्रकारे वरदान ठरू शकतो. आता हा कांडीकोळसा गावोगावी ‘सराई’ नावाच्या निर्धूर शेगडीत जाळण्यासाठी वापरतात व त्यातून लाकडाची जळणापासून बचत होते. तसेच, घरात चुलीमुळे होणारे वायुप्रदूषणही टळते हे खूप महत्त्वाचे आहे.

कर्वे यांनी आजपावेतो सुमारे पन्नासहून अधिक संशोधन प्रकल्प राबविले आहेत. सुमारे १२५ संशोधनपर निबंध व २५० शास्त्रीय लेख लिहिले आहेत. त्यांची चार मराठी पुस्तके, एक व्हिडिओ फीत व १५ सीडीज प्रकाशित झालेल्या आहेत. १९८० साली त्यांना ‘ऑइल टेक्नॉलॉजीस्ट्स असोसिएशन ऑफ इंडिया’द्वारे प्रा. जे.जी. काणे पारितोषिक बहाल करण्यात आले होते. त्याच वर्षी त्यांना वॉशिंग्टनच्या ‘युनायटेड स्टेट्स डिपार्टमेन्ट ऑफ ॲग्रिकल्चर’द्वारा सर्टिफिकेट ऑफ मेरिट बहाल करण्यात आले होते. १९९५ साली ते नवी दिल्ली येथील ‘इंडियन नॅशनल अकॅडमी’द्वारा प्रदान करण्यात येणाऱ्या ‘डॉ.बी. डी. टिळक’ पुरस्काराचे मानकरी ठरले. जर्मनीतील हाले या ठिकाणी २००० साली भरलेल्या ‘विज्ञान तंत्रज्ञान व मानव’ या भाषणमालिकेत पहिले भाषण करण्याचा मान त्यांनी पटकावला होता.

- जोसेफ तुस्कानो

***संदर्भ :***


१. *देशपांडे, अ.पां., संपादक; ‘विज्ञान आणि वैज्ञानिक’; मनोविकास प्रकाशन; २००५.*

२. *दै. लोकमत; १७ नोव्हेंबर २००७.*


## कर्वे, चिंतामण श्रीधर

**भौतिकशास्त्रज्ञ**

**२५ डिसेंबर १९१५ - १९ जून १९९०**

डॉ.चिंतामण श्रीधर कर्वे यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण पुणे येथे झाले. त्यानंतर त्यांचे महाविद्यालयीन शिक्षणही पुण्याच्या सर परशुरामभाऊ



महाविद्यालयात झाले. त्यांनी भौतिकशास्त्र विषयात पुणे विद्यापीठातून एम.एस्सी. पदवी प्राप्त केली. त्यानंतर त्यांनी पुण्याचे सर परशुरामभाऊ महाविद्यालय, मुंबईचे रुइया महाविद्यालय आणि खालसा महाविद्यालय येथे भौतिकशास्त्र अध्यापनाचे काम केले. काही वर्षे ते खालसा महाविद्यालयाचे प्राचार्यही होते. ते एक लोकप्रिय, कार्यक्षम आणि प्रभावी प्राध्यापक होते. महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी त्यांनी प्रा. शहा यांच्यासोबत लिहिलेली भौतिकशास्त्रावरील पुस्तके दोन तपे लोकप्रिय होती. मुंबई विद्यापीठाच्या अधिसभेचे ते वीस वर्षांहून अधिक काळ सभासद होते. विद्यापीठाचे ते फेलोही होते. विद्यापीठाच्या बहि:शाल विभागाचे व्याख्याते म्हणून ते बाहेरगावी जाऊन भाषणे देत.

प्राचार्य डॉ.कर्वे हे विज्ञान प्रसारकांच्या पहिल्या पिढीतील एक धडाडीचे कार्यकर्ते होते. विज्ञानाच्या अनेक विषयांवर वर्तमानपत्रे, मासिके यांत लेख लिहिणे, विज्ञान लोकप्रिय करण्यासाठी त्या-त्या वेळी प्रचलित असणाऱ्या विषयांवर पुस्तके लिहिणे, जाहीर भाषणे देणे, आकाशवाणीवर भाषणे, चर्चा, प्रश्नोत्तरे यांसारखे कार्यक्रम करणे यांत डॉ.कर्वे अखंडपणे गुंतलेले असत. त्यांनी विज्ञानावर विसाहून अधिक पुस्तके लिहिली. ‘निळे आकाश’, ‘मानवाचे भवितव्य’, ‘नवविज्ञानाच्या परिसरात’, ‘बालचंद्र’, ‘अणूतून अनंताकडे’, ‘विज्ञान शलाका’, अशी त्यांच्या पुस्तकांची काही शीर्षके आहेत. यांतील काही पुस्तकांच्या दोन-दोन, तीन-तीन आवृत्त्याही निघाल्या आहेत. त्यांना तीनवेळा महाराष्ट्र शासनाच्या उत्कृष्ट विज्ञान पुस्तकासाठीचे पुरस्कार मिळाले आहेत. यांतील काही पुस्तके स्वतंत्र, तर काही अनुवादित आहेत; पण त्यांच्या लिखाणाची भाषा सोपी, डौलदार आणि विवरण सुगम असे.

महाराष्ट्र शासनाच्या परिभाषा समितीवर ते तज्ज्ञ म्हणून काम करीत होते, तर विश्वकोश निर्मितीच्या प्रारंभिक समितीचे ते सभासद होते. महाविद्यालयीन पाठ्यपुस्तके (भौतिकशास्त्र) समितीचे ते सभासद होते. मराठी विज्ञान परिषदेशी ते स्थापनेपासून निगडित होते. परिषदेचे ते काही काळ उपाध्यक्षही होते. डॉ.कर्वे यांचा परिषदेच्या १९७१ सालच्या वार्षिक संमेलनात ‘विज्ञान प्रसारक’ म्हणून सन्मानही झाला होता. परिषदेच्या ‘पत्रिके’चे संपादक म्हणून त्यांनी पाच वर्षे काम केले. कोणताही लेख आवश्यक शब्दसंख्येत अत्यंत कमी कालावधीत लिहिण्यात डॉ.कर्वे वाकबगार होते.




मराठी विज्ञान परिषद, ठाणे विभागाचे ते संस्थापक अध्यक्ष होते. विभागाची स्थापना १९६७ सालची. तेव्हापासून १९८७ सालापर्यंत ते या विभागाचे अध्यक्ष होते. या दरम्यानच्या काळात त्यांनी मराठी विज्ञान परिषदेची दोन वार्षिक संमेलने मोठ्या दिमाखात साजरी केली.

१९६४ सालापासून ते ठाण्याच्या सरस्वती मंदिर या शाळेच्या ट्रस्टचे कार्यकारी विश्वस्त होते. प्रकृती अस्वास्थ्यामुळे शेवटची काही वर्षे ते पुण्यात जाऊन राहिले. तेथेच त्यांचा मृत्यू झाला.

- अ. पां. देशपांडे

***संदर्भ :***

*१. सहावे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, मुंबई;१९७१.*

*२. मराठी विज्ञान परिषद-पत्रिका; सप्टेंबर १९९०.*

## कर्वे, दिनकर धोंडो

**रसायनशास्त्रज्ञ**

**१३ जुलै १८९९ - ५ जुलै १९८०**

दिनकर धोंडो कर्वे हे महर्षी धोंडो केशव कर्वे यांचे तृतीय पुत्र होते. त्यांच्या आईचे नाव आनंदी होते.



दिनकर कर्वे यांचे शिक्षण पुणे येथे झाले. ते बी. एस्सी. पदवी प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाल्यामुळे त्यांना बंगलोर येथील 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' या संस्थेची शिष्यवृत्ती मिळाली. त्यांची रसायनशास्त्रविषयक जाण उत्तम असल्यामुळे, ते जर्मनीच्या लॅपझिग युनिव्हर्सिटीमध्ये उच्च शिक्षणासाठी गेले होते. तेथे त्यांनी केलेल्या संशोधनाबद्दल त्यांना त्या विद्यापीठाने डी. फिल. पदवी प्रदान केली. डॉ.दिनकर कर्वे पुण्याला परत आल्यावर डेक्कन एज्युकेशन सोसायटी या संस्थेचे आजीव सदस्य झाले. ते रसायनशास्त्राचे नामवंत प्राध्यापक, शिक्षणतज्ज्ञ, विज्ञान प्रसारक होते. पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयाचे ते वीस वर्षे प्राचार्य होते.

शिक्षणक्षेत्रातच उत्तम कामगिरी करण्याचा ध्यास डॉ. कर्वे यांनी घेतला. फर्गसन महाविद्यालयामध्ये ते भौतिकी रसायनशास्त्र हा विषय शिकवीत होते. त्यांचा अनुभव, विज्ञानाधारित अभ्यासू वृत्ती आणि शिस्तप्रियता लक्षात घेऊन फर्गसन महाविद्यालयाच्या प्राचार्यपदी त्यांची नेमणूक करण्यात आली. त्यांनी सुरू केलेल्या अनेक उपक्रमांमुळे त्यांच्या विद्यार्थ्यांना वैज्ञानिक विषयामध्ये आवड निर्माण झाली. फर्गसन महाविद्यालयामधील त्यांची कारकीर्द संस्मरणीय ठरली. त्यांच्या कडक शिस्तप्रियतेचा अनुकूल परिणाम महाविद्यालयाच्या प्रांगणात दिसून आला. दर्जाबाबत डॉ.दिनकर कर्वे यांनी कधीही तडजोड केली नाही. ते त्यांचे एक वैशिष्ट्य ठरले. त्यांच्यामुळे दर्जेदार शिक्षण संस्थांमध्ये फर्गसन महाविद्यालयाचे नाव अग्रगण्य झाले.

त्या काळामधील विज्ञानाच्या समविचारी प्राध्यापकांचे सहकार्य मिळवून त्यांनी 'सृष्टिज्ञान' या नियतकालिकाचा दर्जा अधिकाधिक चांगला करण्याचा यशस्वी प्रयत्न केला. 'सृष्टिज्ञान'मध्ये त्यांनी विज्ञान विषयावर बरेच लेख लिहिले. त्यायोगे विज्ञान प्रसारही केला. वीस वर्षे प्राचार्यपदाची जबाबदारी पार पाडून ते निवृत्त झाले. तथापि त्यांनी त्यानंतर सुमारे दहा वर्षे 'अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन स्टडीज' या संस्थेचे भारतातील संचालक म्हणून कार्य केले.

डेक्कन महाविद्यालयामधील प्रसिद्ध मानववंश शास्त्रज्ञ प्रा.इरावती कर्वे या डॉ.दिनकर धोंडो कर्वे यांच्या पत्नी होत्या. 'हिंदू सोसायटी - ॲन इंटरप्रिटेशन' हा ग्रंथ प्रा. इरावती कर्वे यांनी लिहिला होता. त्याचे मराठीकरण डॉ.दिनकर कर्वे यांनी केले. 'हिंदू समाज - एक अन्वयार्थ' त्या ग्रंथाचे शीर्षक होते. त्याचे प्रकाशन असे ११ ऑगस्ट, १९७५ रोजी झाले होते. १९५९ साली त्यांचे ज्येष्ठ बंधू रघुनाथ कर्वे यांनी 'संतती नियंत्रण: विचार व आचार' हे पुस्तक लिहिलेले होते त्याची अभ्यासपूर्ण आणि विज्ञानाधिष्ठित प्रस्तावना डॉ.दिनकर कर्वे यांनी लिहिलेली होती.

१९६४ साली प्रकाशित झालेल्या 'ए हिस्टरी ऑफ एज्युकेशन इन इंडिया ॲण्ड पाकिस्तान' या पुस्तकाचे डॉ.दिनकर कर्वे सहलेखक होते. त्यांनी 'दि न्यू ब्राह्मणस्: फाइव्ह महाराष्ट्रीयन फॅमिलीज' महत्त्वपूर्ण ग्रंथ लिहिलेला होता. या पुस्तकात त्यांनी त्यांच्या वडलांसह तत्कालीन सामाजिक कार्याला झोकून देणाऱ्या पाच कुटुंबीयांच्या कार्याचा आढावा घेतला होता.

१९७४ साली वैद्यकशास्त्रातील नोबेल विजेते शास्त्रज्ञ कोनराड झचारियस लॉरेंझ यांनी 'सिव्हिलाइझ्ड मॅन्स एट डेडली सिन्स' हे पुस्तक प्रकाशित केले होते. डॉ.कर्वे यांनी त्याचे भाषांतर केले होते. मानववंश शास्त्रज्ञ



**फर्गसन महाविद्यालय, पुणे**

ब्रोनिस्लाव्ह मॅलिनोवस्की यांनी लिहिलेल्या 'सेक्स अॅन्ड रिप्रेशन इन सॅव्हेज सोसायटी' या पुस्तकाचा मराठी अनुवाद 'असंस्कृत समाजातील लैंगिकता' या शीर्षकाखाली डॉ.कर्वे यांनी केला. १९७८ साली महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळातर्फे ते पुस्तक प्रकाशित झाले.

बुद्धिप्रामाण्य आणि विचारांची तर्कशुद्धता यांवर डॉ. दिनकर कर्वे यांचा संपूर्ण विश्वास होता. त्याचा परिपाक म्हणून धार्मिक कर्मकांड; समाज ज्याला धर्म मानतो, त्याची सबंध चौकट, देवाच्या अस्तित्वावर विश्वास या सर्व गोष्टी त्यांनी नाकारल्या होत्या. ते कट्टर निरीश्वरवादी होते. आपल्या मतीला जे पटेल तेच करण्याकडे त्यांचा कल होता. त्यामुळे ते प्रवाहपतित झाले नाहीत.

– डॉ. अनिल लचके

***संदर्भ :***

*१. नववे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; तळेगाव; १९७४.*

## काकोडकर, अनिल पुरुषोत्तम

**अभियंता**

**११ नोव्हेंबर, १९४३**



भारताच्या अणु उर्जा आयोगाचे अध्यक्ष आणि भारत सरकारच्या अणु उर्जा विभागाचे सचिव म्हणून परिचित असलेले डॉ.अनिल पुरुषोत्तम काकोडकर यांचे व्यक्तिमत्त्व बहुआयामी आहे. मध्यप्रदेशातील बडवाणी इथे जन्मलेल्या काकोडकरांचे शालेय शिक्षण खरगोण इथल्या देवी श्री अहिल्याबाई हायस्कूलमध्ये व महाविद्यालयीन शिक्षण मुंबईतील रूपारेल महाविद्यालयात झाले. १९६३ साली त्यांनी मुंबईच्या वीरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजिकल इन्स्टिट्यूटमधून यंत्र अभियांत्रिकी (मेकॅनिकल इंजिनीअरिंग) मध्ये (ऑनर्स) पदवी संपादन केली. अणुऊर्जा विभागातर्फे चालवण्यात येणाऱ्या भाभा अणू संशोधन केंद्राच्या प्रशिक्षण केंद्रात एक वर्षाचा पदव्युत्तर विशेष शिक्षणक्रम पूर्ण केला. त्या वर्षीच्या उत्तीर्ण झालेल्या एकूण प्रशिक्षणार्थींच्या तुकडीमध्ये काकोडकर प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले.

भाभा अणू संशोधन केंद्रात अणुभट्ट्यांच्या विविध बांधणी प्रकल्पांसाठी काम करण्याची उत्तम संधी काकोडकरांना लाभली. आपल्या पंचेचाळीस वर्षांच्या व्यावसायिक कारकिर्दीत, विशेष करून, जड पाण्यावर आधारित अणुभट्टीच्या (आण्विक रिॲक्टर)च्या निरनिराळ्या यांत्रिक संरचना, त्यांची क्षमता उंचावण्यासाठीच्या सुधारणा व अनपेक्षित, अपघाती कारणांनी होऊ शकणाऱ्या किरणोत्सारामुळे होणाऱ्या दुष्परिणामांपासूनच्या सुरक्षिततेसाठी आवश्यक उपायांची तरतूद या क्षेत्रांतील संशोधनात डॉ.काकोडकरांनी मोलाची भर घातली आहे. अणुऊर्जेशी संबंधित अभियांत्रिकी राबवताना, सुरक्षिततेकडे सदैव बारकाईने लक्ष ठेवावे लागते. त्या बाबतीतील आंतरराष्ट्रीय अणुऊर्जा संस्थेच्या (इंटरनॅशनल ॲटॉमिक एनर्जी एजन्सी - आय.ए.ई.ए.) निरनिराळ्या समित्यांच्या कामांत त्यांचा सातत्याने सहभाग असतो. आण्विक अभियांत्रिकी (न्यूक्लिअर इंजिनिअरिंग) मधील गुणवत्ता प्रमाणित करण्याकरिता लागणारा मसुदा आय.ए.ई.ए.तर्फे तयार करण्यातही काकोडकरांचा महत्त्वाचा वाटा आहे.

तुर्भे येथे कार्यरत झालेल्या 'अप्सरा' नावाच्या भारतातील पहिल्या अणुभट्टीत, साध्या पाण्याचे (नॅचरल वॉटरचे) आवरण वापरण्यात आले (म्हणूनच अशा प्रकारच्या अणुभट्ट्यांना 'स्विमिंग पूल रिॲक्टर' अशी संज्ञा आहे). त्यानंतर तुर्भे येथे कार्यान्वित झालेली दुसरी सी.आय.आर. (कॅनडा इंडिया रिॲक्टर) ही अणुभट्टी, कॅनडातून आयात केलेल्या जड पाण्याच्या उपयोगावर आधारित (हेवी वॉटर मॉडरेटेड) आहे. आता तिचे 'सायरस' असे नाव प्रचलित आहे.

काकोडकरांनी १९६४ साली भाभा अणू संशोधन केंद्र



**ध्रुव अणुभट्टी**



**पोखरण अणुस्फोट १९९८**

उपयोजित अभियांत्रिकी स्वरूपाच्या प्रत्यक्ष कामाला सुरुवात केली, त्या वेळी भाभा अणू संशोधन केंद्राच्या (रिॲक्टर इंजिनिअरिंग) अणुभट्टी अभियांत्रिकी प्रभागात नव्याने रुजू झालेल्या बहुतेक सर्व हुशार, होतकरू अभियंत्यांना, 'हेवी वॉटर मॉडरेटेड' प्रकारच्या अणुभट्ट्यांच्या संरचनांच्या प्रगत, प्रात्यक्षिक अनुभवासाठी कॅनडात पाठवण्याचे धोरण राबविण्यात येत होते. पण अणुभट्टी अभियांत्रिकीशी संबंधित सर्व मूलभूत तत्त्वांच्या पायाभूत ज्ञानाच्या आवश्यकतेची जाणीव सुरुवातीपासूनच वेळोवेळी त्यांना होऊ लागली होती व त्यासाठी पद्धतशीर क्रमिक अभ्यासाद्वारे, अणुभट्टी बांधणीसंबंधीच्या विशेष अभियांत्रिकीच्या पदव्युत्तर शिक्षणाचा त्यांनी ध्यास घेतला. त्यामुळे कनेडियन सहकार्याच्या करारांतर्गत कॅनडात जाण्याऐवजी, अन्य परदेशी विद्यापीठात पदव्युत्तर अभ्यासासाठी जाण्याचा त्यांनी आग्रह धरला व त्यासाठी संयमाने काही दिवस धीरही धरला. अखेरीस त्यांना अमेरिकेतील नॉटिंगहॅम विद्यापीठाची शिष्यवृत्ती मिळाली व तिथे प्रायोगिक ताण विश्लेषण (एक्सपरिमेंटल स्ट्रेस ॲनालिसिस)द्वारा वेगवेगळ्या परिस्थितीत पदार्थांवरील ताणमापनाच्या तंत्राचा सखोल अभ्यास करून १९६९ साली काकोडकरांनी एम.एस्सी. पदवी मिळवली.

सुरुवातीपासूनच विद्युत ऊर्जानिर्मिती हे भारतीय अणुऊर्जा विकास कार्यक्रमाचे प्रमुख ध्येय आहे. त्या अंतर्गत आण्विक प्रक्रियांद्वारे, देशात विविध ठिकाणी विद्युत ऊर्जानिर्मिती केंद्राच्या उभारणीबरोबरच, त्यासाठी लागणाऱ्या इंधनाची आवश्यकता पूर्ण करण्याच्या दिशेनेही योजनाबद्ध कार्यक्रम भारतात राबविण्यात येत आहे. विशेषत: युरेनियम व झिरकोनियम धातूच्या निर्मिती उद्योगाची वाढ करण्याच्या कामाचे नेतृत्व काकोडकरांनी समर्थपणे केलेले आहे. जड पाणी वापरणाऱ्या प्रगत अणुभट्टी बांधणीच्या कामात गुंतलेल्या अभियंत्यांचे ते प्रमुख प्रेरणास्रोत आहेतच, त्याचबरोबर ऊर्जानिर्मितीसाठी थोरियमचा उपयोग वाढवण्याच्या प्रयत्नांमध्ये ते सक्रिय आहेत. भारतातील अणुऊर्जानिर्मितीच्या कार्यक्रमाचा तिसरा टप्पा, थोरियमच्या उपयोगातून समृद्ध करण्याच्या महत्त्वाच्या पर्यायाचे पथदर्शक म्हणून डॉ. काकोडकरांची भूमिका वादातीत ठरते. त्या दिशेने देशात व्यापारी तत्त्वावर 'फास्ट ब्रीडर रिॲक्टर' (एफ.बी.टी.आर.) चा वापर यशस्वी करण्याचे प्रमुख श्रेयही त्यांना आहेच. भारतात उपलब्ध असलेला थोरियमचा मुबलक साठा विचारात घेता, त्याच्या जोडीला देशातील युरेनियम साठा वापरून, एफ.बी.टी.आर.द्वारे साध्य होणाऱ्या विद्युतपुरवठ्यात लक्षणीय वाढ होईल ती वेगळीच. परिणामी, डॉ.काकोडकरांच्या कुशल प्रयत्नांनी, प्रगत अणू तंत्रज्ञानाचा यशस्विरीत्या वापर करणारा देश म्हणून भारताला आता आंतरराष्ट्रीय स्तरावर मानाचे स्थान लाभले आहे. भारताने अमेरिकेबरोबर केलेल्या नागरी अणुऊर्जेसाठीच्या सहकार करारासाठी, तसेच हे करार

कार्यान्वित करण्यास आय.ए.ई.ए.बरोबर असे करार करण्यासाठी, काकोडकरांनी मोलाचे साहाय्य केलेले आहे.

उपयोजित अणुविज्ञानाचे प्रगत शिक्षण घेतलेले असल्याने, आधुनिक तंत्रज्ञानाच्या प्रभावी वापरांसाठी, ठिकठिकाणच्या प्रयोगशाळा व संशोधन संस्थांमधील कार्यकुशल अनुभवाचा विधायक उपयोग कसा करून घेता येईल, याचा ते सतत वेध घेत असतात. ऊर्जा विभागांतर्गत, आण्विक प्रक्रियासंबंधीचे वैज्ञानिक उच्च संशोधन करणाऱ्या, देशातील ठिकठिकाणच्या केंद्रांतून, विशेष गरजांच्या पूर्ततेसाठी, वेळोवेळी तऱ्हेतऱ्हेचे तंत्रज्ञान विकसित केले जाते. कोलकातास्थित 'सायक्लोट्रॉन'च्या निर्मितीत, शेकडो टन वजनाच्या इलेक्ट्रो-मॅग्नेटसाठी विकसित केलेले तंत्रज्ञान, तिरुचेरापल्ली येथील एम.एच.डी. ऊर्जा निर्मिती संयंत्राच्या उभारणीच्या वेळी, तसेच इंदूरच्या 'राजा रामण्णा सेंटर फॉर ॲडव्हॉन्स टेक्नॉलॉजी' (आर. आर. कॅट) मधील 'इंडस' नावाच्या प्रवेग यंत्रासाठी कामी आले.

जाड स्टेनलेस स्टीलच्या प्लेट्सचे 'हाय व्हॅक्युम टाइट वेल्डिंग' करण्यास तुर्भे येथील भाभा अणू संशोधन केंद्रात सिद्ध झालेल्या 'प्लाझमा टॉर्च'च्या स्वदेशी तंत्रज्ञानाचा पुढे अनेक ऊर्जा प्रकल्पांत मोलाचा उपयोग झाला. 'ऑक्सिजन फ्री हाय कंडक्टिव्हिटी कॉपर' या एका विशिष्ट प्रकारच्या तांब्याचे (ओ.एफ.एच.सी.) जाड विद्युत्वाहक रूळ न वापरता, एकमेकांना इंडक्शन वेल्डिंगने जोडण्याचे, कोलकात्याच्या सायक्लोटॉनसाठी आत्मसात केलेले स्वदेशी कौशल्य तर देशातील अनेक उद्योगांनादेखील वरदायी ठरले. या सर्व अनुभवांतून वेळोवेळी भारतात विकसित होत असलेल्या प्रगत तंत्रज्ञानाचे औद्योगिक महत्त्व चांगलेच अधोरेखित झालेले असल्याने, नवनवीन तंत्रज्ञानाला अनुरूप अशा बहुउद्देशीय प्रशिक्षणाचे एक नवे, अनोखे केंद्र भुवनेश्वर येथे काकोडकरांच्या प्रयत्नांनी साकार होत आहे.

तुर्भे येथील भाभा अणू संशोधन केंद्रातील 'ध्रुव' या नावाच्या १०० मेगावॅट क्षमतेच्या अणुभट्टीच्या उभारणीत काकोडकरांचा सिंहाचा वाटा होता. अगदी नवीन संकल्पनेवर आधारित या अणुभट्टीची रचना व बांधणीमध्ये त्यांनी सुरुवातीपासून महत्त्वाची भूमिका तर बजावलीच; परंतु त्याखेरीज त्याच्या उभारणीसाठी भिन्न गुणधर्मांच्या धातूंचे भाग जोडायला, भारतात प्रथमच विकसित केलेल्या, 'इलेक्ट्रॉन बीम वेल्डिंग'सारख्या आघाडीच्या अनेक आधुनिक तंत्रांचा मोठ्या प्रमाणावर यशस्वी उपयोग केला. चेन्नईजवळील कल्पक्कम येथील अणुभट्टीच्या दोन्ही संयत्रांमधील अनपेक्षित बिघाडांमुळे, तो प्रकल्प जेव्हा मोडकळीच्या मार्गावर होता, त्या वेळी काकोडकरांनी जिद्दीने त्याचे पुनर्वसन करून दाखवले.

प्रगत अभियांत्रिकी मार्गांनी अवघड प्रश्नांची उकल करण्याचे काकोडकरांच्या अंगी असलेले कौशल्य, त्या संदर्भात उल्लेखनीय ठरले आहे. आण्विक विज्ञान व तंत्रज्ञानातील अनेकविध बारकाव्यांचा काकोडकरांनी केलेला सखोल अभ्यास व तत्संबंधीच्या त्यांच्या अभियांत्रिकीतील कौशल्याच्या गौरवार्थ, मैसूर, मंगळूर, गुरुनानक देव इत्यादी विद्यापीठे, तसेच विश्वेश्वरय्या तंत्रशास्त्र विद्यापीठ (टेक्नॉलॉजी युनिव्हर्सिटी), इंदिरा गांधी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठ, प्रवरा वैद्यकीय विज्ञान संस्था, आय.आय.टी. मुंबई, अशा अनेक शिक्षणसंस्थांनी, त्यांच्या सन्माननीय 'डॉक्टर ऑफ सायन्स' पदव्या काकोडकरांना प्रदान केलेल्या आहेत. त्याशिवाय टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पंडित रविशंकर शुक्ला विद्यापीठ, गोवा विद्यापीठ, शिवाजी विद्यापीठ यांच्या डी.लिट. पदव्यांनीही ते सन्मानित आहेत.

१९९८ साली 'पद्मश्री', १९९९ साली 'पद्मभूषण' व २००९ साली 'पद्मविभूषण' असे तिन्ही उच्च राष्ट्रीय नागरी सन्मान डॉ.काकोडकरांना लाभले. ते इंडियन नॅशनल अकॅडमी ऑफ इंजिनिअरिंगचे आय.एन.ए.ई. १९९९- २००० सालांदरम्यानचे अध्यक्ष होते, इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस, द नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेस, महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेस, इत्यादी मान्यवर व्यावसायिक संस्थांचे ते 'फेलो' आहेत. शिवाय

इंडियन न्यूक्लिअर सोसायटी, इन्स्टिट्यूशन ऑफ इलेक्ट्रॉनिक ॲन्ड टेलिकम्युनिकेशन इंजिनिअर्स (आय.ई.टी.ई.) इंडिया या संस्थांनीही त्यांना मानद फेलोशिप प्रदान केलेली आहे. इंटरनॅशनल न्यूक्लिअर एनर्जी अकॅडमी, वर्ल्ड इनोव्हेशन फाउण्डेशन, कौन्सिल ऑफ ॲडव्हाइजर ऑफ वर्ल्ड न्यूक्लिअर युनिव्हर्सिटी, इंटरनॅशनल न्यूक्लिअर सेफ्टी ग्रूप (आय.एन.एस.जी.) इत्यादी आंतरराष्ट्रीय संस्थांचे ते सभासद आहेत.

१९८८ साली त्यांना हरी ओम आश्रम प्रेरित, 'विक्रम साराभाई पारितोषिक' मिळाले. मटेरिअल रिसर्च सोसायटी ऑफ इंडिया (एम.आर.एस.आय.) संस्थेच्या १९९७ सालच्या वार्षिक पारितोषिकाचे, तसेच 'रॉकवेल मेडल फॉर एक्सलन्स इन टेक्नॉलॉजी-१९९७' चे ते मानकरी आहेत. त्याच वर्षी सायन्स ॲन्ड टेक्नॉलॉजीतील उत्कृष्ट कामगिरीसाठीचा 'फिरोदिया पुरस्कार' व न्यूक्लिअर इंजिनिअरिंग ॲण्ड टेक्नॉलॉजीतील अद्वितीय कामगिरीसाठीचा १९९७ - १९९८ सालचा 'एफ.आय.सी.सी.आय. पुरस्कार', अशा दोन मानाच्या पारितोषिकांनी त्यांना सन्मानित करण्यात आले आहे. पाठोपाठ, १९९८ साली आण्विक शास्त्रातील कामगिरीबद्दलचा 'ॲनाकॉनचा आजीवन पुरस्कार' व सर्वोत्कृष्ट संशोधकाला 'नाफेन'तर्फे दिला जाणारा पुरस्कार काकोडकरांनाच मिळाला. इंडियन सायन्स काँग्रेस असोसिएशनचा १९९९-२००० साठीचा 'होमी भाभा स्मृती पुरस्कार', श्रीराम शास्त्रीय व औद्योगिक संशोधन प्रतिष्ठानच्या २००० सालच्या सुवर्णजयंतीनिमित्तचा पुरस्कार, 'गोदावरी पुरस्कार', २००१ सालचा सर्वोत्कृष्ट 'राष्ट्रीय नागरिक पुरस्कार', २००६ सालासाठीचा 'आय.एन.ए.ई.चा आजीवन अत्युत्कृष्ट अभियांत्रिकीचा पुरस्कार', २००७ सालासाठीचे राममोहन मिशन, यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, सिंघानिया यांचे पुरस्कार, अभियांत्रिकी व शैक्षणिक संशोधनासाठीचे २००९ सालचे महाराष्ट्र अकादमीचे 'भारत अस्मिता श्रेष्ठत्व पुरस्कार', अशी काकोडकरांना मिळालेल्या विविध सन्मानांची मोठी यादी आहे.

आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित अनेक प्रयत्नांमुळे सामान्य लोकांच्या राहणीमानात लक्षणीय सुधारणा होते, हा विकसित तसेच विकसनशील असा दोन्ही प्रकारच्या देशवासीयांचा अनुभव लक्षात घेऊन, ऊर्जानिर्मितीबरोबरच अणुशक्तीच्या वापराद्वारे होणाऱ्या इतर विधायक उपयोगांकडे डॉ.काकोडकरांनी विशेष लक्ष पुरविले आहे. आण्विक प्रक्रियांसाठी वापरण्यात येणाऱ्या अणुभट्टीचे तापमान नियंत्रित करण्यास क्षारविरहित पाण्याची आवश्यकता असते. त्यासाठी १९६० सालच्या दशकापासून भाभा अणू संशोधन केंद्रात 'डिसॅलिनेशन ॲन्ड एफ्लुएन्ट इंजिनिअरिंग डिव्हिजन' (डी.ई.ई.डी.) नावाचा एक स्वतंत्र विभागच कार्यरत आहे. तेथे झालेल्या प्रदीर्घ संशोधनावर आधारित, 'रिव्हर्स ओसमोसिस' (आर.ओ.) तंत्रज्ञानाद्वारे खारे पाणी गोड करण्याची कार्यप्रणाली भाभा अणु संशोधन केंद्राने विकसित केली. त्या संशोधनावर आधारित नागरी व ग्रामीण वस्त्यांतील लोकांना शुद्ध पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करणारी 'आरओ' उपकरणे आता भारतभर ठिकठिकाणी वापरात दिसतात.

भारतातील अनेक विद्यापीठात विज्ञानाचे उच्चशिक्षण नीट देण्यात यावे यासाठी काकोडकरांनी प्रयत्न केले. किरणोत्साराचा उपयोग करून मिळणाऱ्या संकरित बियाणांचा पुरवठा, कांदे, बटाटे, फळफळावळ अशा नाशवंत पिकांची दीर्घकालीन साठवणूक, कॅन्सरसारख्या असाध्य रोगांशी परिणामकारक मुकाबला करणाऱ्या आरोग्यकेंद्रांची ठिकठिकाणी स्थापना, अशा इतर अनेक आवश्यक बाबींची पूर्तता करण्याचे उत्तरदायित्वही ऊर्जा विभागाचेच आहे असे ठामपणे मानून, त्यासाठी झटणारी डॉ.काकोडकरांसारखी व्यक्तिमत्त्वे आपल्या देशाची खरी भूषणे आहेत.

- डॉ. अच्युत थत्ते

***संदर्भ :***

*१. दै. महाराष्ट्र टाईम्स; १५ नोव्हेंबर २०००*

## काणे, गोविंद पांडुरंग

**रसायनशास्त्रज्ञ**

**२ मार्च १९११ - २५ जून १९९१**



विज्ञान आणि तंत्रज्ञान यांची महाविद्यालयातील शिक्षणाशी योग्य सांगड घालून खऱ्या अर्थाने ते जनताभिमुख करणाऱ्यांमध्ये डॉ.गोविंद पांडुरंग काणे यांचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागेल.

डॉ.काणे यांचा जन्म कोकणातील दापोली या गावी झाला. या गावाचे वैशिष्ट्य असे की, या गावातले दोघेजण 'भारतरत्न' म्हणून सन्मानित झाले. महर्षी धोंडो केशव कर्वे आणि महामहोपाध्याय पांडुरंग वामन काणे हे दोघेही दापोलीचे. डॉ.गोविंद काणे हे महामहोपाध्याय पांडुरंग वामन काणे यांचे पुत्र होत.

त्यांचे शालेय शिक्षण मुंबईच्या विल्सन शाळेत, तर बी.एस्सी.पर्यंतचे शिक्षण रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स (सध्याची इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स) आणि सेंट झेवियर्स महाविद्यालय येथे झाले. एम.एस्सी.साठी मात्र ते बंगळूर येथील इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स येथे गेले. भारतातील विज्ञानाचे पहिले नोबेल पारितोषिक विजेते सर सी.व्ही. रमण त्या वेळी त्या इन्स्टिट्यूटचे संचालक होते. नंतर काणे यांनी इंग्लंडच्या इंपीरियल महाविद्यालयातून प्रा. बोन यांच्या मार्गदर्शनाखाली इंधन (फ्युएल) या विषयावर संशोधन करून पीएच.डी. ही पदवी मिळवली.

या काळात दुसरे महायुद्ध सुरू झाले होते आणि भारतातदेखील स्वातंत्र्याचे वारे वाहायला लागले होते. डॉ.काणे या सुमारास मुंबईच्या माटुंगा येथील इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजीमध्ये (आय.सी.टी.) सहयोगी प्राध्यापक म्हणून रुजू झाले. नंतर याच संस्थेमध्ये त्यांनी प्राध्यापक आणि प्रभारी संचालक म्हणून काम केले. जवळपास १९ वर्षे ते या संस्थेमध्ये काम करीत होते. विविध पदांवर कार्य करतांना अध्ययन व अध्यापनाव्यतिरिक्त त्यांनी रूढ परंपरेच्या चाकोरीपासून दूर जाऊन जे काम केले, ते महत्त्वाचे आहे.

इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी येथे काम करीत असताना एका आगळ्यावेगळ्या कल्पनेने त्यांच्या मनात जन्म घेतला. वैद्यकीय शिक्षण घेत असताना, प्रात्यक्षिकांसाठी महाविद्यालयाला एक रुग्णालय उपलब्ध असते. अशी सोय अभियांत्रिकीच्या विद्यार्थ्यांना का उपलब्ध नसावी, असा विचार डॉ.काणे यांच्या मनात आला. त्यासाठी अभियांत्रिकीच्या विद्यार्थ्यांना शिक्षण कालावधीत विविध कारखान्यांना आणि उद्योगांना भेटी देता येतील, असे अभ्यासक्रम आणि योजना त्यांनी तयार केल्या. त्यासाठी त्यांना शिक्षणतज्ज्ञ एच.एल. रॉय यांचे सहकार्य लाभले. यामुळे तेव्हापर्यंत साध्य न झालेल्या अनेक गोष्टी साध्य झाल्या. शिक्षण घेत असतानाच विद्यार्थ्यांना विविध कारखान्यांना आणि उद्योगधंद्यांना भेटी देण्याच्या संधी उपलब्ध झाल्या. परिणामी, विद्यार्थ्यांना आणि प्राध्यापकांना कारखानदारांच्या अडचणी समजू लागल्या, तर दुसऱ्या बाजूने कारखानदारांना त्यांचे प्रश्न सोडवताना अभ्यासू आणि हुशार प्राध्यापकांची मदत होऊ लागली. अशा मदतीमुळे मग प्राध्यापकांना त्यांच्या संशोधनासाठी उद्योजकांकडून भरपूर निधीदेखील उपलब्ध होऊ लागला.

डॉ.काणे यांच्या अशा प्रयत्नांमुळे अभियांत्रिकी शिक्षण देणाऱ्या शिक्षणसंस्था, उद्योजक आणि, कारखानदार यांच्यामध्ये परस्परपूरक वातावरण निर्माण झाले. तथापि ही प्रक्रिया एवढ्यापुरतीच मर्यादित राहिली नाही, तर शिक्षण घेतलेल्या संस्थेबरोबर विद्यार्थ्यांचे एक भावनिक नाते निर्माण झाले. याचा परिपाक म्हणून विद्यार्थ्यांनी आपापल्या मातृसंस्थेला भरघोस देणग्या द्यायला प्रारंभ केला. त्यामुळे या संस्था केवळ शासकीय मदतीवर अवलंबून न राहता आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण झाल्या. भारतातल्या विविध आय.आय.टी. आणि

मुंबईची आय.सी.टी. या जणू भारताच्या 'ब्रँड ॲम्बॅसेडर' आहेत असे म्हटले, तर वावगे होणार नाही.

हा एक प्रकारचा 'कास्केडिंग इफेक्ट' होता आणि त्याचे श्रेय काणे यांनी तयार केलेल्या अभियांत्रिकीच्या अभ्यासक्रमाला जाते. आजकाल आपापल्या शिक्षणसंस्थांना विद्यार्थ्यांनी 'अल्मामॅटर' म्हणण्याची जणू फॅशन निघाली आहे. पण 'अल्मामॅटर' ही विद्यार्थ्यांची भावना केवळ शाब्दिक न राहता, डॉ.काणे यांच्या दूरदृष्टीमुळे प्रत्यक्षात उतरली आणि उद्योजक, कारखानदार व शिक्षणसंस्था या तिघांचाही फायदा झाला.

डॉ.काणे यांच्या अशा कल्पक योजनांची कीर्ती त्या वेळचे भारताचे केंद्रीय उद्योगमंत्री टी.टी. कृष्णम्माचारी यांच्या कानांवर गेली आणि त्यांनी डॉ.काणे यांना केंद्र सरकारच्या उद्योग मंत्रालयात रासायनिक उद्योगांचे सल्लागार म्हणून काम पाहण्याची विनंती केली. ती स्वीकारून डॉ.काणे दिल्लीला गेले. १९५४ ते १९६९ या त्यांच्या पंधरा वर्षांच्या दिल्लीतील वास्तव्यात त्यांचे कर्तृत्व पुन्हा एकदा अनेक अंगांनी फुलले. औषधे, अल्कोहोल्स, कोळशावर आधारित रसायने, पेट्रोरसायने, खते, कागद इत्यादी विविध वस्तूंचे उत्पादन करणाऱ्या कारखान्यांच्या गरजांचा अभ्यास करणाऱ्या अनेक समित्यांवर डॉ.काणे यांनी अध्यक्ष म्हणून काम पाहिले. शिवाय हे कारखाने भारतातील विविध राज्यांमध्ये कार्यरत होणार होते. त्यामुळे राज्य आणि केंद्र सरकार यांच्यामध्ये समन्वय साधण्याचे एक अवघड कामदेखील त्यात अंतर्भूत होते. असा समन्वय साधला गेला तरच हे उद्योग स्थापन करायच्या जागा आणि ठिकाणे ठरवता येणार होती. शिवाय या उद्योगधंद्यांना आणि कारखान्यांना लागणारे आधुनिक तंत्रज्ञान परदेशातून आयात करण्याचे महत्त्वाचे कामसुद्धा होते. डॉ.काण्यांनी या सगळ्या जबाबदाऱ्या समर्थपणे पेलल्या. त्यासाठी अनेक वेळा परदेश दौरे केले. त्यांच्या काम करण्याच्या पद्धतीवर आणि क्षमतेवर कारखानदारांचा एवढा विश्वास बसला, की १९६९ साली सल्लागार या पदावरून निवृत्त झाल्यावरही त्यांना अनेक उद्योगसमूहांनी त्यांच्या संचालक मंडळावर घेतले होते. ही जबाबदारी डॉ.काणे यांनी आपल्या मृत्यूपर्यंत निभावली.

डॉ.काणे यांच्या चौफेर कर्तृत्वामुळे आणि त्यांना १९६९ साली 'पद्मश्री' पुरस्काराने गौरवण्यात आले.

डॉ. काणे यांचा विज्ञान आणि तंत्रज्ञान क्षेत्रातील दबदबा लक्षात येण्यासाठी एक उदाहरण पुरेसे आहे. भारतामध्ये एखाद्या कोरड्या किंवा शुष्क हवेच्या ठिकाणी चलनी नोटा छापायचा कारखाना काढण्याचे निश्चित झाल्यावर जागा ठरवण्यासाठी इंग्लंडहून काही तज्ज्ञ आले होते. त्या तज्ज्ञांबरोबर डॉ.काणे यांची विविध ठिकाणी भ्रमंती चालू होती आणि अर्थातच चर्चापण होत होती. डॉ.काणे यांचे त्या क्षेत्रातील ज्ञान आणि व्यासंग पाहून ते परदेशी तज्ज्ञ आश्चर्यचकित झाले आणि त्यांच्याकडील नोटांचे कारखाने पाहण्यासाठी त्यांनी डॉ. काणे यांना आमंत्रण दिले. डॉ.काणे यांनी या आमंत्रणाचा स्वीकार केला; पण अनेक वेळा इंग्लंडला जाऊनही त्यांना तेवढी सवड मिळाली नाही आणि ही भेट मूर्त स्वरूपात येऊ शकली नाही. नंतरच्या भेटीत त्यांना एक दिवस मोकळा वेळ मिळाला; पण तो दिवस नेमका रविवार होता. पण डॉ.काणे यांना पुन्हा वेळ मिळणार नाही म्हणून त्या रविवारी टाकसाळ चालू ठेवली गेली आणि तेथील अधिकाऱ्यांनी त्यांच्याशी विस्तृत चर्चा केली.

पण खरी कमाल पुढेच घडली. डॉ.काणे यांचा अभिप्राय नोंदवण्यासाठी टाकसाळीच्या अधिकाऱ्यांनी जी वही त्यांच्यापुढे ठेवली, त्या वहीमध्ये त्यापूर्वी फक्त दोघांचे अभिप्राय नोंदवले गेले होते. एक होती ब्रिटनची महाराणी आणि दुसरे होते ब्रिटनचे अर्थमंत्री. टाकसाळीच्या अधिकाऱ्यांनी डॉ.काणे यांच्यासाठी आजवरच्या प्रथा मोडल्या होत्या. परंपरांना घट्ट धरून ठेवणाऱ्या ब्रिटिश अधिकाऱ्यांना डॉ.काणे यांच्यासाठी अपवाद करावासा वाटला, असाच त्यांचा दबदबा होता.

डॉ.काणे यांचे आयुष्यात खूप सन्मान झाले. तथापि त्यांतला एक आणि आगळावेगळा सन्मान होता, त्यांना मराठी विज्ञान परिषदेच्या पहिल्या मराठी विज्ञान संमेलनाचे अध्यक्षपद मिळणे. 'भारतापुढील काही समस्या, विज्ञानाला एक आव्हान' या विषयावर डॉ. काणे यांनी अध्यक्षीय भाषण केले.

डॉ.काणे यांनी त्यांच्या भाषणात भारतापुढील सर्व समस्यांचा ऊहापोह केला होता. दुभती जनावरे खूप, पण त्यांची दूध देण्याची क्षमता कमी, ती वाढवायला हवी; कापडाच्या वार्षिक उत्पादनात वाढ व्हायला हवी, त्यासाठी सुती कापडाला नायलॉन, टेरिलीन इत्यादी कृत्रिम धाग्यांची जोड द्यायला हवी, पेट्रोरसायनांचे उद्योग सुरू करून त्यातून मिळालेल्या उत्पादनाची जोड नैसर्गिक उत्पादनाला द्यायला हवी, जागोजागी उग्र होणाऱ्या पाणीपुरवठ्याच्या प्रश्नाला सांडपाण्यावर प्रक्रिया करून ते वापरता येऊ शकेल का, याची शक्यता पडताळून पाहणे, लोकांना पुरेसा प्रोटीनयुक्त आहार मिळावा यासाठी नापीक, पडीक जमीन लागवडीखाली आणणे, अशा भेडसावणाऱ्या अनेक प्रश्नांचा आणि त्यांवरील उत्तरांचा त्यांच्या भाषणात विस्तृत अंतर्भाव होता. पण सर्वात महत्त्वाची आणि श्रोत्यांचे लक्ष वेधून घेणारी खंत डॉ.काणे यांनी भाषणात व्यक्त केली ती अशी होती- ''आज दूरदर्शन, संगणक, पेट्रोरसायनांचे कारखाने, अणुऊर्जा केंद्रे, प्रतिजैविक औषधे, प्लॅस्टिक इत्यादींमुळे आपले जीवन सुखी झाले आहे,'' असे सांगून त्यांनी खंत व्यक्त केली होती की, ''यांतील एकही शोध भारताने लावला नाही.'' वैयक्तिक बघायला गेले, तर एकेक भारतीय शास्त्रज्ञ परदेशी शास्त्रज्ञांच्या तोडीचा आहे. पण काम करण्यासाठी लागणारी उपकरणे आणि प्रशिक्षित मनुष्यबळ आपल्याला उपलब्ध नाही, याचे त्यांना विलक्षण वाईट वाटायचे.

– डॉ. यशवंत देशपांडे

***संदर्भ :***

*१. देशपांडे अ.पा.; 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन, २००५.*

## कानविंदे, अच्युत पुरुषोत्तम

**वास्तुरचनाकार**

**९ फेब्रुवारी १९१६ - २८ डिसेंबर २००२**



आधुनिक वास्तुकलेतील भारतातील अग्रगण्य तज्ज्ञ समजले जाणारे अच्युत कानविंदे यांचा जन्म कोकणातील सिंधुदुर्ग जिल्ह्यात आचरा या गावी झाला. कलेचा वारसा त्यांनी आपल्या चित्रकार वडिलांकडून घेतला होता. उत्तम रेखाटन, चित्रकलेची हातोटी, विचारांची झेप व त्याला कल्पकतेची जोड हे सर्व पूरकच ठरले. कलाशिक्षणाकरिता आशियात प्रसिद्ध असलेल्या मुंबईतील सर ज. जी. कला महाविद्यालयाच्या वास्तुकला विभागात १९३६ साली त्यांनी प्रवेश घेतला. चार वर्षांचा पूर्णवेळ डिप्लोमा कोर्स त्याच वर्षी सुरू झाला होता. शिक्षण संपल्यावर सर ज.जी. कला महाविद्यालयाच्या वास्तुकलेचे मुख्य अध्यापक प्रा. क्लॉड बॅटले यांनी कानविंदे यांना शिफारसपत्र दिले. ते घेऊन ते इंग्लिश वास्तुविशारद डब्ल्यू.डब्ल्यू. वुड्स यांच्याकडे नवी दिल्लीला पोहोचले व पुढे तेथेच स्थायिक झाले.

भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या मार्गदर्शनाखाली विज्ञान तंत्रज्ञान संशोधनाचे धोरण आखण्यात येत होते. 'वैज्ञानिक प्रयोगशाळे'च्या अभ्यासासाठी कानविंदे यांची निवड करण्यात आली. शिष्यवृत्ती देऊन १९४६ साली त्यांना हार्वर्ड विद्यापीठाच्या 'ग्रॅज्युएट स्कूल ऑफ डिझाइन' येथे उच्च शिक्षणासाठी पाठविण्यात आले.

'बाहाउस' चळवळीचे प्रणेते व पोस्ट मॉडर्न पद्धतीचे प्रवर्तक वॉल्टर ग्रोपियस त्या वेळी तेथे प्राध्यापक होते. त्या काळात वास्तुकलेच्या समकालीन विचारांवर त्यांचा बराच प्रभाव होता. कानविंदे यांनी प्रवेश घेतला तेव्हा दुसऱ्या महायुद्धानंतर आधुनिक वास्तुकलेवर मंथन चालू

होते. अवकाशाची संकल्पना, आधुनिक तंत्रज्ञान, औद्योगीकरण यांवर आधारित वास्तुकला मूर्तरूप घेत होती. अशा समकालीन विचारांचा त्यांच्यावर प्रभाव पडणे क्रमप्राप्तच होते. प्रसिद्ध वास्तुविशारदांचे विविध प्रकल्प अमेरिकेत उभे राहत होते. त्यांच्या हाताखाली मिळत असलेल्या शिक्षणाचा त्यांना फायदा झाला. अनेक नावाजलेले वास्तुविशारद-अध्यापक तेथे शिकवीत. हुषार व तल्लख विद्यार्थ्यांचा संचच तयार झाला होता. त्यात आय.एम. पाय, पॉल रूडॉल्फ यांसारखे विद्यार्थी कानविंदे यांचे वर्गबंधू होते. शेवटच्या वर्षाचे अध्यापक मार्सल ब्रुअर यांनी कानविंदे यांना प्रवेश देताना अट घातली, ''तुझे काम समाधानकारक झाले नाही, तर खालच्या वर्गात जावे लागेल.'' पण कानविंदे यांची आकलनशक्ती, रेखाटनावरील प्रभुत्व व कल्पकता यांमुळे त्यांना मागे पाहावे लागले नाही.

हार्वर्डमधून शिक्षण संपवून ते परतले व 'कौन्सिल ऑफ सायंटिफिक ॲन्ड इंडस्ट्रियल रिसर्च' या वैज्ञानिक संशोधनाच्या शिखर संस्थेमध्ये प्रमुख वास्तुविशारद म्हणून रुजू झाले. या संस्थेची दिल्लीतील कार्यालयाची इमारत, रूरकी येथील संशोधन संस्थेचे संकुल, पिलानी येथील केंद्रीय इलेक्ट्रॉनिक अभियांत्रिकी संस्थेची रचना, या सर्वांच्या संकल्पना त्यांच्यावर सोपविण्यात आल्या.

हार्वर्डमधील शिक्षणाचा प्रभाव त्यांच्या सुरुवातीच्या कामावर दिसू लागला. पुनरुज्जीवित विचारांवर आधारलेल्या वास्तुकलेपासून पुढे जाऊन आधुनिक व समकालीन विचारांवर संकल्पलेले स्थापत्य उभे राहिले पाहिजे. त्यात नवे-नवे प्रयोग व आधुनिक तंत्रज्ञानाचा उपयोग इमारतींच्या मांडणीवर दिसावयास हवा, असे त्यांना वाटे. १९५३ साली नवी दिल्लीतील 'इंडियन कौन्सिल फॉर कल्चरल रिलेशन' (आझाद भवन)च्या इमारतीची वास्तुरचना त्यांनी तयार केली. या संकल्पनेवर बाहाउस विचारसरणीवर आधारलेली उपयुक्तता, मूलभूत आकार, अवकाशाची योजना या सर्व घटकांचा आविष्कार निश्चितच आहे. उपलब्ध तंत्रज्ञान व पारंपरिक प्रतीकांचा सुंदर मेळ या वास्तूमध्ये दिसून येतो.



आय.आय.टी., कानपूर

१९५६ साली समविचारांचे स्थापत्य अभियंता शौकत राय हे त्यांचे 'कौन्सिल ऑफ सायंटिफिक ॲन्ड इंडस्ट्रियल रिसर्च'मधील सहाध्यायी होते. त्या दोघांनी मिळून स्वतंत्र व्यवसाय करण्यास सुरुवात केली. विशेष म्हणजे दोघेही निवृत्त होईपर्यंत त्यांनी बरोबरीने खांद्याला खांदा लावून सहकार्याने काम केले व वास्तुविशारदांच्या व्यवसायात नावलौकिक मिळविला.

१९६०-१९७० या दशकातील कामांवर पूर्वीच्या विचारांचा प्रभाव जाऊन त्यांना त्यांची स्वत:चीच ओळख झाल्याचे जाणवू लागले. या काळात त्यांच्या संकल्पनांमध्ये परिवर्तन झाल्याचे दिसून आले. डॉ.विक्रम साराभाई व उद्योगपती कस्तुरभाई लालभाई यांच्याबरोबर झालेल्या ओळखीमुळे अहमदाबाद येथील 'अहमदाबाद टेक्स्टाइल इंडस्ट्रीज रिसर्च असोसिएशन' व 'फिजिकल रिसर्च लॅबोरेटरी' यांसारखे प्रकल्प त्यांच्या संयोजनातूनच उभे राहिले. या प्रकल्पांच्या संकल्पनेवर ग्रोपियस यांच्या विचारांचा प्रभाव असला, तरी त्यांत अनुकरण दिसत नव्हते. बाहाउसचा पगडा व नवीन स्वतंत्र भारताच्या आकांक्षांचा नावीन्यपूर्ण मेळ या प्रकल्पांत जमून आलेला दिसतो. त्यांच्या या प्रकल्पाची संकल्पना त्या काळातील भारतीय आधुनिक वास्तुकलेच्या कलाविष्काराची सुंदर सुरुवात म्हणून ओळखली जाते.

त्याच सुमारास जगप्रसिद्ध फ्रेंच वास्तुविशारद ल कॉर्ब्युझिए यांची पंडित नेहरूंनी चंदिगड उभारण्यासाठी

निवड केली. त्यांची बरीच कामे पुढे भारतात इतरत्रही चालू झाली. यामुळे त्यांच्याबरोबर चर्चा करण्याची संधी कानविंदे यांना मिळत गेली. कॉर्ब्युझिए यांचे अहमदाबादमध्ये काही प्रकल्प चालले होते, त्या सुमारास तेथे कानविंदे यांचे प्रकल्पसुद्धा चालू होते. एकदा त्यांच्या 'अहमदाबाद टेक्स्टाइल इंडस्ट्रीज रिसर्च असोसिएशन' (अटिरा) या प्रकल्पाला ल कॉर्ब्युझिए यांनी भेट दिली व त्या संकल्पनेबाबत अनुकूल प्रतिसाद दिला. कोणत्याही प्रथितयश वास्तुविशारदाकरिता ती अभिमानाची बाब होती.

१९६० साली ललित कला अकादमीने स्वतंत्र भारतातील वास्तुकला, नागरीकरण व नगररचनांच्या विकासाविषयी विचारमंथन करण्याकरिता परिसंवादाचे आयोजन केले होते. त्याला पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू, त्यांच्या मंत्रिमंडळातील सहकारी, शिक्षणक्षेत्रातील मान्यवर, शास्त्रज्ञ, विचारवंत, वास्तुविशारद व नगररचनाकार हे उपस्थित होते. काही परदेशी तज्ज्ञही आले होते. त्या परिसंवादात कानविंदे यांनी पुनरुज्जीवन व गतकाळातील वास्तुकलेवर जोर न देता, नवीन विचारांची झेप व प्रगती आणि आधुनिकतेकडे असलेली त्यांची मते समर्थपणे मांडली. त्याची दखल विविध क्षेत्रांतील तज्ज्ञांनी घेतली. या विचारांकडे कानपूर आय.आय.टी.चे डायरेक्टर डॉ.पु.का. केळकर यांचे लक्ष वेधले गेले. त्यांनी आपल्या नवीन शैक्षणिक संकुलाचे काम कानविंदे यांच्याकडे सोपविले. हा प्रकल्प फलद्रूप होण्यामागे या दोघांमधील सामंजस्य व राष्ट्र उभारण्याच्या कार्यावरील निष्ठा कारणीभूत ठरली. कॅम्पस डिझाइनचा हा राष्ट्रीय प्रतिष्ठेचा पहिला प्रकल्प. एक्स्पोइड काँक्रीट व जवळच उपलब्ध असलेल्या विटांचा अप्रतिम मेळ घालून प्रमाणबद्ध वास्तुशिल्पकलेचा उच्चांक त्यांनी गाठला. यातून आधुनिक भारताची प्रतिमा उभी करण्यात ते यशस्वी झाले.

यानंतर त्यांनी पुणे येथील 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ बँक मॅनेजमेंट' व 'नॅशनल इन्शुरन्स अकॅडमी' या संस्थांची संकुले, असे महत्त्वाचे प्रकल्प उभे केले. या अनुभवावर त्यांनी 'कॅम्पस डिझाइन इन इंडिया' हा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला. दूध उत्पादन क्षेत्रातील अग्रेसर व्यक्तिमत्त्व डॉ.कुरियन यांच्या मेहसाणा व आणंद येथील प्रकल्पाचे काम हा त्यांच्या वास्तुकला जीवनातील फार महत्त्वाचा टप्पा होता. त्यांनी दूध डेअरीतील कामाची मांडणी, वायुविजनासाठी उंच मनोरे यांचा कौशल्यपूर्ण उपयोग यात केला.

अहमदाबाद येथील बाळकृष्ण हरिवल्लभदास यांचे घर, राहुरीचे महात्मा फुले कृषी विद्यापीठ, बंगलोर येथील कृषी विद्यापीठ, मुंबई व दिल्ली येथील नॅशनल सायन्स सेंटर, शेर-ए-काश्मीर इन्स्टिट्यूट ऑफ मेडिकल सायन्स, 'इस्कॉन'करिता दिल्लीतील मंदिर व वैदिक संस्था, ट्रान्स यमुना एरिया, (दिल्ली) येथील शहररचनेचा प्रकल्प, असे अनेक राष्ट्रीय जडणघडणीतील महत्त्वाचे प्रकल्प त्यांनी यशस्वीपणे साकारून राष्ट्राच्या प्रगतीसाठी महत्त्वाचे योगदान दिले. तसेच दिल्लीच्या अर्बन आर्ट कमिशनसाठी सक्रिय योगदान दिले. वास्तुशिल्पकलेच्या इतिहासात त्यांना मानाचे स्थान राहील.

वास्तुकलेतील असामान्य कामगिरी व राष्ट्रीय उभारणीतील त्यांच्या अथक कार्यासाठी भारत सरकारने त्यांना पद्मश्री हा बहुमान देऊन गौरव केला. भारताच्या वास्तुविशारद संस्थेने त्यांना सुवर्णपदक दिले, तर जे.के. इंडस्ट्रीजचे 'ग्रेट मास्टर्स अवॉर्ड' त्यांना बहाल करण्यात आले. अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ आर्किटेक्चरने त्यांना 'फेलोशिप' देऊन त्यांच्या कामाच्या गुणवत्तेला मान्यता दिली, तर इन्स्टिट्यूट ऑफ इंजिनिअर्सने त्यांना राष्ट्रीय पुरस्कार दिला.

शहरांची वाढ, शहररचना, सध्याची शिक्षणपद्धती, वास्तुकलेच्या व्यवसायातील समस्या यांवर ते वेळोवेळी आपले विचार मांडून मार्गदर्शन करीत. त्यांचे विचार वैश्विक स्तरावरचे असत. एक चिंतनशील प्राध्यापक म्हणून त्यांचा लौकिक होता. तरुणांना संधी उपलब्ध करून देण्यात ते सदैव पुढाकार घेत.

आधुनिक भारतीय वास्तुकलेचे प्रवर्तक म्हणून आंतरराष्ट्रीय कीर्ती त्यांना प्राप्त झाली होती. व्यावसायिक जीवनात सामाजिक बांधीलकी, नैतिकता व सर्जनशीलता यांमुळे त्यांचे समाजात अढळ स्थान होते. आयुष्यभर मानवी मूल्यांची जपणूक करणारे व अहंभाव नसलेले असे त्यांचे व्यक्तिमत्त्व म्हणावे लागेल. सहाव्या शतकातील 'मानसार' या वास्तुशास्त्रावरच्या ग्रंथात म्हटले आहे, 'स्थपती आपल्या विषयात तज्ज्ञ असावा. त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे तो शुद्धाचरणी, सत्यवादी व अप्रमादी असावा व लोभी नसावा.' 'मानसारा'त वर्णिलेल्या आदर्श स्थपतीचे मूर्तिमंत रूप असलेल्या कानविंदे यांनी दिल्ली मुक्कामी वयाच्या शहाऐंशीव्या वर्षी जगाचा निरोप घेतला.

- चिंतामण गोखले

## कापरेकर, दत्तात्रय रामचंद्र

**गणिततज्ज्ञ**

**१७ जानेवारी १९०५ - ४ जुलै १९८६**



'संख्यांशी लीलया खेळणारा खेळीया' असे ज्यांचे सार्थ वर्णन केले गेले आहे, ते दत्तात्रय रामचंद्र कापरेकर हे गेल्या पिढीत होऊन गेलेले देवळालीच्या शाळेतील एक शिक्षक, परंतु त्यांचे जीवनकार्य रामानुजम यांच्याप्रमाणेच संपूर्णतया संख्यामय झालेले होते. ६० वर्षांच्या कार्यरत आयुष्यात कापरेकरांनी शोधून काढलेल्या भिन्न प्रकारच्या संख्या, त्यांचे गुणधर्म, आकृतिबंध व मनोरंजक जादूच्या आकृत्या, यांमुळे ते भारतातील करमणूकप्रधान गणिताचे अग्रणी ठरतात.

कापरेकरांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण ठाणे येथे, तर उच्चशिक्षणाची सुरुवात मुंबईच्या सेंट झेवियर महाविद्यालयापासून झाली. ते १९३० साली पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयातून बी.एस्सी. झाले. मात्र आजन्म खादी वापरणे व इंग्रज सरकारची नोकरी न करणे, ही दोन तत्त्वे त्यांनी कटाक्षाने पाळली. ते १९३० सालापासून १९६२ सालापर्यंत देवळालीच्या शाळेत शिक्षक होते. शाळेच्या वेळात अध्यापनाचे कर्तव्य चोखपणे बजावून बाकीचा क्षण न् क्षण कापरेकर संशोधनात इतके मग्न असत. की, स्वत:च्या पोशाखाकडे लक्ष द्यावयासही त्यांना वेळ मिळत नसे. कित्येक वेळा महत्त्वाच्या व्याख्यानासाठीही ते गबाळ्या पोशाखात हजर होत असत.

'मुलाचे पाय पाळण्यात दिसतात', या म्हणीचा प्रत्यय कापरेकरांच्या गणू मास्तरांना आला होता. आकड्यांशी खेळणे, गुंतागुंतीच्या गणिती क्रिया पटकन करणे व गणिती कोडी सहज सोडविणे यांतील लहानग्या दत्तूचे कौशल्य या चाणाक्ष मास्तरांनी तेव्हाच हेरले होते. बाळपणीचा हा छंद, नादिष्टपणा म्हणता येईल इतक्या पराकोटीला जाऊन व्यसनासक्त माणसाला दुसरे काही सुचत नाही, तशी संख्यांच्या आहारी गेलेल्या कापरेकरांची स्थिती झाली. इतक्या परिश्रमांनंतर काढलेले निष्कर्ष जाणकारास दाखवावेत, तर शाबासकीऐवजी 'फारच बाळबोध'सारखे कुत्सित शेरे त्यांच्याकडून ऐकावे लागत. मात्र जागोजागी असा हिरमोड होत असताना, कापरेकरांच्या कामाचे कौतुक करून पुढील वाटचालीसाठी प्रोत्साहन देणाऱ्या प्रा.मो.ल. चंद्रात्रेय यांच्या रुपाने त्यांना एक देवमाणूस भेटला.

१९२३ साली पहिल्या वर्षासाठी मुंबईच्या सेंट झेवियर महाविद्यालयात डोंबिवलीहून जाण्या-येण्यात कापरेकरांचा सुमारे तीन तास वेळ जात असे. मात्र या काळात गाडीत कोणत्या ना कोणत्यातरी संख्येसंबंधी त्यांचे चिंतन चालू असे. एकदा तर त्यांनी गाडीचे डबे, इंजीन, प्रवासी तिकीट यांच्यावरील संख्यांचे निरीक्षण आरंभिले. आश्चर्य म्हणजे बऱ्याच दिवसांच्या अशा निरीक्षणाअंती एक दिवस आगगाडीच्या डब्यातच कापरेकरांना डेम्लो संख्या गवसल्या! पुढे त्यांच्यावर बरेच मनन-चिंतन करून त्यांनी त्या विषयावर लिहिलेले

क

5200 - 0025 = 5175
7551 - 1557 = 5994
9954 - 4599 = 5355
5553 - 3555 = 1998
9981 - 1899 = 8082
8820 - 0288 = 8532
8532 - 2358 = 6174
7641 - 1467 = 6174

कापरेकर स्थिरांक

| संख्या (N) | L | R | M = L + R | वारंवारता |
|---|---|---|---|---|
| १६५ | १ | ५ | ६ = १ + ५ | एकदा |
| २६१११८५ | २६ | ८५ | १११ = २६+८५ | तीन वेळा |
| २४३१ | २४ | ३१ | ५५ = २४ + ३१ | शून्य |
| ७२६५९४ | ०७२ | ५९४ | ६६६ = ०७२ + ५९४ | एकदा |

डेम्लो संख्या

दोन ग्रंथ मुंबई विद्यापीठाच्या अर्थसाहाय्याने प्रकाशित केले. ही डेम्लो संख्या त्यांच्या नावाशी इतकी चिकटली, की कापरेकर नाव उच्चारताच ते डेम्लो संख्यावाले का? असे विचारले जाऊ लागले. अशा भिन्न संख्यांचा शोध घेत असताना, कापरेकरांनी स्वयंभू, संगम, द्विमुखी, कापरेकर, दत्तात्रय, हस्तलाघव, रिक्तपदभरण वगैरे कल्पक नावाच्या १३/१४ संख्यांबरोबरच आकडेमोडीच्या लघुरीती शोधून काढल्या. त्यांच्यापाशी जमा झालेले हे ज्ञानभंडार त्यांनी मुक्तहस्ताने शालेय विद्यार्थ्यांपुढे सादर करावयास सुरुवात केली. त्याचा इतका बोलबाला झाला, की कापरेकरांना निरनिराळ्या शाळा व गणितप्रेमी मंडळांकडून आमंत्रणे येऊ लागली. या कार्यक्रमांतून सोप्या रीती कळल्याने मुलांच्या मनांतील गणिताची अढी दूर होऊन त्यांना विषयाची गोडी वाटू लागली.

योगायोगाने ज्या फर्गसन महाविद्यालयातून कापरेकरांनी पदवी घेतली, तेथे रँ.महाजनी अध्यक्ष व श्रोतृवृंदात प्रा.मो.ल. चंद्रात्रेय, अशा सभेत व्याख्यान द्यायची कापरेकरांना संधी मिळाली. व्याख्यानानंतर दोन्ही गणितज्ञांनी मोकळ्या मनाने त्यांचे कौतुक करून उत्तेजन दिले. याशिवाय इंडियन मॅथेमॅटिकल सोसायटीच्या वार्षिक अधिवेशनांना जाऊन तेथे आपले संशोधन मांडावे, असे महाजनींनी सुचविले. त्यांचा हा सल्ला शिरोधार्य मानून १९३८ सालच्या लखनौ अधिवेशनापासून कापरेकर दरवर्षी या गणिती संमेलनांना हजर राहून त्या-त्या वर्षाचे आपले संशोधनाचे निष्कर्ष मान्यवरांपुढे मांडू लागले. भिन्न प्रांतांतून आलेल्या प्रतिनिधींनी कापरेकरांच्या या उपक्रमाचे स्वागत केले, त्यावर ते चर्चा करू लागले. अशा मंडळींत पी.एल. भटनागर, डी.एस. कोठारी, वेंकटरमण, हंसराज गुप्ता, के. रामचंद्र, एस. श्रीनिवासन हे काही तत्कालीन थोर गणितज्ञ त्यांना मार्गदर्शनही करू लागले. तसेच ‘मॅथेमॅटिक्स स्टुडण्ट्स’, ‘सायन्स टुडे’ या भारतीय व ‘स्क्रिप्टा मॅथेमॅटिका’, ‘अमेरिकन मॅथेमॅटिकल मंथली’, ‘जर्नल ऑफ रिक्रिएशनल मॅथेमॅटिक्स’ या अमेरिकी नियतकालिकांतून कापरेकरांच्या कामाला प्रसिद्धी मिळू लागली. परिणामी एच. हासे, जी.डी. प्रिशेट, ए.एल. लुडिंग्टन, ए.मॅकोवस्की, मार्टिन गार्डनर, सॅम्युअल याटस वगैरे पाश्चात्त्य गणित लेखकांनी कापरेकरांच्या संशोधनावर लेखन केले. त्यांपैकी मार्टिन गार्डनरने म्हटले की, ‘‘कापरेकर स्थिरांका’मुळे ते बहुपरिचित झाले,’’ तर सॅम्युअल याटसने म्हटले की, ‘‘असामान्य गणितज्ञांची सर्जकता तारुण्यात बहरून येते, पण वृद्धावस्थेत ती लयाला जाते. मात्र कापरेकर पंचाहत्तराव्या वर्षीदेखील तितक्याच जोमाने सर्जनशील आहेत.’’

कापरेकरांनी हाताळलेला करमणूकप्रधान गणितातील मनाला सर्वात जास्त भावणारा प्रकार म्हणजे ३, ३, ४, ४, ५, ५ चे चौरस, पंचकोनी चांदणी, षट्कोन अशा आकृत्यांत भरलेल्या अंकांची बेरीज निरनिराळ्या प्रकारे केली असता एकच उत्तर येते त्यांच्या कोपर्निकस,

रँ.परांजपे, म.गांधींवरील चौरसांतील आकड्यांची २०/२२ प्रकारे केलेली बेरीज एकच येते. यावरून याचा प्रत्यय येतो. जादूगार एखाद्या कार्यक्रमास येताना रंगीत चेंडू, पत्ते वगैरे घेऊन येतो, तद्वत मुडपलेल्या टाचण्या, फिरत्या तबकड्या, घरंगळणारे ठोकळे इत्यादी साधनांच्या मदतीने कापरेकर मुलांना भुरळ पाडीत; पण खरे म्हणजे तेव्हा ते एखादे गणिती तत्त्व मुलांच्या गळी उतरवीत असत. शाळांव्यतिरिक्त कापरेकरांना विविध महाविद्यालये, विद्यापीठे, संशोधन संस्था, मॅथेमॅटिक्स कलोक्वियम येथे निमंत्रित व्याख्याते म्हणून पाचारण केले जाई.

कापरेकरांच्या काही गणिती कृतींचा निर्देश यथोचित ठरेल.

**१) कापरेकर स्थिरांक :** कोणतीही चार अंकी संख्या (मात्र ४४४४ सारखे चारी अंक समान अशा वगळून) घेऊन ६१७४ हा स्थिरांक येईपर्यंत ‘उलटक्रम वजाबाकी’ ही प्रक्रिया वारंवार करावयाची. जसे :

(अ) ४८३९, निवडलेली संख्या, (ब) ९८४३ ती उतरत्या क्रमाने (क) ३४८९ उलट क्रमाने लिहून (ड) ९८४३ - ३४८९ = ६३५४ मोठयातून लहान वजा करून हीच क्रिया ६३५४ वर करून ३०८७, ३०८७ वरून ८३५२ व ८३५२ वरून शेवटी ६१७४ हा स्थिरांक चौथ्या पायरीत मिळतो. जास्तीत जास्त ७ पायऱ्यांचा दावा कापरेकर करतात.

टीप : (अ) निवडलेल्या संख्येत सर्व अंक क्रमवार विषम (उदा. ९७५३) किंवा क्रमवार सम (उदा. ८६४२) असतील, तर स्थिरांक ६१७४ एकाच पायरीत येतो.

(ब) संख्या उतरत्या क्रमाने लिहिल्यावर डावीकडून उजवीकडे जाताना, लागोपाठच्या अंकातील फरक ३,२,१ ; ४,२,० अथवा उलट असतील, तर स्थिरांक एकाच पायरीत मिळतो.

**२) डेम्लो संख्या :** ज्या संख्येत अंकांचे डावा (**L**), मधला (**M**), उजवा (**R**) असे तीन गट पाडता येतात व **L+R = M** मध्ये वारंवार येणारे अंक या अटीची पूर्तता होते, ती डेम्लो संख्या. जसे :

**३) स्वयंभू संख्या :** ‘अंक बेरीज प्रक्रिये’ने नवी संख्या मिळवता येते. ज्या संख्येवरून ती मिळते, तिला ‘जनक’ किंवा ‘उत्पादक’ संख्या आणि नव्या संख्येस ‘उत्पादित’ संख्या म्हणतात. परंतु, ज्या संख्येस उत्पादक संख्या नाही म्हणजे जी खरोखर ‘स्वनिर्मित’, स्वत: उपजलेली ती स्वयंभू संख्या. जसे : २६ ची २२ ही जनक संख्या. कारण, २२ + २ + २ = २६, २२ ची २० ही जनक संख्या. कारण, २० + २ + ० = २२ परंतु, २० ची जनक संख्या कोणती याचा शोध घेतला, तर अशी संख्या आढळत नाही. पाहा : १६ + १ + ६ = २३ ; १५ + १ + ५ = २१ ; १४ + १ + ४ = १९ वगैरे. स्वयंभू संख्या ओळखण्याची कसोटी कापरेकरांनी दिली आहे. त्यानुसार २००७ ही २१ व्या शतकातील वर्षसंख्या स्वयंभू आहे.

**४) द्विमुखी संख्या :** उजवीकडून डावीकडे अथवा डावीकडून उजवीकडे वाचल्या किंवा लिहिल्या तरी ज्यांच्यात बदल होत नाही, त्या द्विमुखी संख्या. जसे : ५३५, १३४३१. द्विमुखी संख्या काढण्याच्या कापरेकरांनी काही रीती दिल्या आहेत. नवव्या शतकात होऊन गेलेल्या महावीराचार्य या थोर गणितज्ञाच्या ‘गणितसारसंग्रह’ ग्रंथात २७९९४६८७४४१ = १२३४५६४३२१ अशा पुष्कळ द्विमुखी संख्या आहेत.

**५) १३ संख्येचे मनोरंजक गुणधर्म :** (i) १३ वर्ग = १६९ अंक उलट करून ३१ वर्ग = ९६१. १३ व ३१ प्रमाणे १६९ व ९६१ एकमेकांच्या आरशातल्या प्रतिमा. (ii) १३ = ३ + २ + ८, (३२८) वर्ग = १०७५८४ मग १० + ७५ + ८४ = १६९ = १३ वर्ग. अशी १३ ची ६ प्रकारे फोड करून आलेल्या वर्गसंख्यांतील गटसंख्यांची बेरीज १६९ म्हणजे १३ वर्ग काढलेली आहे.

एखादी घटना अथवा दृश्य पाहून त्यास आपल्या कल्पनाशक्तीची जोड देऊन कलाकार आपल्या प्रतिभेच्याद्वारे निर्मिलेल्या कलाकृतीच्या माध्यमातून जो परिणाम साधतो, अगदी तशीच कापरेकरांच्या मनात एखादी संख्या घर करू लागली, की त्या संख्येच्या

आरपार त्यांची नजर भिडली जाऊन काहीतरी नवीन लेणे घेऊन येत असे. उदाहरणार्थ, त्यांनी ६ प्रकारे व्यक्त केलेली १७२९ ही रामानुजन संख्या.

विद्यार्थिदशेत १९२७ साली कापरेकरांना, 'थिअरी ऑफ एन्व्हलप्स' या निबंधाबद्दल 'रँ.परांजपे पारितोषिक' मिळाले होते. तर मुंबई-पुणे विद्यापीठ आणि विद्यापीठ अनुदान मंडळ यांनी त्यांना अल्पकाळ अनुदान दिले होते.

शिक्षकी पेशाच्या तुटपुंज्या मिळकतीत अयाचित वृत्तीने आजन्म गणिताला वाहून घेणाऱ्या कापरेकरांनी नाशिक येथे अखेरचा श्वास घेतला.

– प्रा. स. पां. देशपांडे

***संदर्भ :***

*१. चौथे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, नाशिक, १९६९*

## काळे, प्रमोद पुरुषोत्तम

**उपग्रह शास्त्रज्ञ**

**४ मार्च १९४१**



प्रमोद पुरुषोत्तम काळे यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण बडोद्यात झाले. पहिली दोन वर्षे महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते पुण्यात होते. फर्गसन महाविद्यालयातून इंटर सायन्सची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर ते पुन्हा शिक्षणासाठी बडोद्याला गेले. १९६० साली त्यांनी पदार्थविज्ञान या विषयात बी.एस्सी. ही पदवी महाराजा सयाजीराव विद्यापीठातून घेतली. त्यानंतर एम.एस्सी. करण्यासाठी ते अहमदाबाद येथे गेले. तेथे त्यांनी इलेक्ट्रॉनिक्स या खास शाखेत पदव्युत्तर शिक्षण पूर्ण केले.

एम.एस्सी. करीत असतानाच, त्यांना अहमदाबाद येथील फिजिकल रिसर्च लॅबोरेटरीज (पी.आर.एल.) येथे काम करण्याची संधी मिळाली. यामुळे




इलेक्ट्रॉनिक्स तसेच अवकाश विज्ञानातील संशोधन त्यांना जवळून पाहता आले. या काळात मानवनिर्मित उपग्रह प्रदक्षिणा घालू लागले होते. त्यांचा मागोवा घेण्याचे शिक्षणही काळे यांना मिळाले. १९६२ साली त्यांना गुजरात विद्यापीठाची एम.एस्सी.ची पदवीही मिळाली.

एम.एस्सी. झाल्यानंतर त्यांनी डॉ.विक्रम साराभाई यांच्या मार्गदर्शनाखाली अवकाश विज्ञानातील संशोधन सुरू केले. याच काळात भारतात थुंबा इक्वेटोरियल रॉकेट लाँचिंग स्टेशनच्या (टर्ल्स) उभारणीची सुरूवात झाली होती. तिथे तरुण शास्त्रज्ञांची गरज होती. या शास्त्रज्ञांच्या चमूत प्रमोद काळे यांची निवड झाली. त्यामुळे ते त्रिवेंद्रमला गेले. थुंबा येथून पहिला अग्निबाण अवकाशगामी बनला, ते दृश्य पाहण्याचे भाग्य काळे यांना लाभले.

ज्या तरुण भारतीय शास्त्रज्ञांना अवकाश संशोधनातील प्रगत शिक्षणासाठी अमेरिकेत पाठविण्यात आले, त्यात श्री.काळे यांचा समावेश होता. अमेरिकेत नासा (नॅशनल एअरोनॉटिक्स अ‍ॅण्ड स्पेस अ‍ॅडमिनिस्ट्रेशन) या संस्थेच्या गोडार्ड स्पेस फ्लाइट सेंटर येथे प्रगत शिक्षण घेऊन काळे भारतात परतले. गोडार्ड स्पेस फ्लाईट सेंटर हे अमेरिकेच्या मेरिलँड राज्यात ग्रीन बेल्ट येथे काळे नंतर 'इस्रो' म्हणजे भारतीय अवकाश संशोधन संस्थेमध्ये कार्यरत झाले. भारतीय अवकाश संशोधन संस्थेत त्यांनी अनेक महत्त्वाची पदे भूषविली.

ते १९६७ ते १९६९ या काळात तिरुवअनंतपुरम

येथील उपग्रह प्रणालीच्या इलेक्ट्रॉनिक्स विभागाचे प्रमुख होते, तर १९६९ - १९७२ या काळात गोडार्ड स्पेस फ्लाईट सेंटर येथे ते इस्रोचे स्थायी प्रतिनिधित्व करीत होते.

यानंतर १९७७ ते १९८७ या काळात 'इन्सॅट-१' या कार्यक्रमात अवकाशखंडाचे प्रकल्प संचालक म्हणून त्यांनी काम केले. १९८७ ते १९९४ दरम्यान ते अहमदाबाद येथील अवकाश उपयोजित केंद्र (स्पेस ॲप्लिकेशन सेंटर)चे संचालक म्हणून कार्यरत होते. यानंतर ते तिरुवअनंतपुरम इथल्या विक्रम साराभाई अवकाश केंद्राचे संचालक बनले.

दरम्यानच्या काळात विद्यापीठ अनुदान मंडळाच्या देशव्यापी दूरशिक्षण योजनेसाठी (कंट्रिवाईड क्लास रूम) त्यांनी विविध विषयांवर शैक्षणिक कार्यक्रम तयार केले. त्याचबरोबर, अवकाशातून संदेशवहन, दूर नियंत्रण, जलस्रोत संशोधन अशा विविध विषयांत महत्त्वपूर्ण योगदान दिले. त्यांना त्यांच्या संशोधनाची पावती म्हणून इ.स. १९८४ मध्ये 'पद्मश्री' पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. याशिवाय विक्रम साराभाई पुरस्कार, आर.एल. वाधवा सुवर्णपदक इत्यादी सन्मानही त्यांना प्राप्त झाले.

इ.स. २००१ साली निवृत्तीनंतर त्यांनी खाजगी क्षेत्रात प्रवेश केला; पण त्यांच्या ज्ञानाचा फायदा पुणे विद्यापीठातील विद्यार्थ्यांना मिळावा म्हणून त्यांनी विद्यापीठात शिकवणेही सुरू केले. निवृत्तीनंतर पुणे विद्यापीठात त्यांनी अवकाश शास्त्राचा पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरू केला. याशिवाय त्यांनी अनेक मानद पदे भूषविली असून विद्यार्थ्यांना स्वत: प्रयोग करून विज्ञानात रस निर्माण व्हावा म्हणून चालविण्यात येणाऱ्या 'विज्ञान संशोधिका' या पुण्यातील संस्थेतही ते मार्गदर्शन करतात.

– प्रा. निरंजन घाटे

***संदर्भ :***

*१. देशपांडे, अ.पां., संपादक; 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन; २००५.*

## किर्लोस्कर, शंतनु लक्ष्मण

**उद्योजक**

**२८ मे १९०३ - २४ एप्रिल १९९४**




शंतनु लक्ष्मण किर्लोस्कर यांचा जन्म सोलापूरला झाला. शालेय शिक्षण औंध येथे झाले आणि पुण्यात झाल्यावर त्यांनी अमेरिकेतील 'मॅसॅच्युसेट्स इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी'मधून यंत्र अभियांत्रिकीमधील पदवी १९२७ साली प्राप्त केली.

पारतंत्र्याच्या काळात स्वदेशी तंत्रज्ञानाचा विकास करून यंत्रनिर्मिती करण्याचे धाडस करणारा उद्योगसमूह म्हणूनच 'किर्लोस्कर उद्योग समूहा'ची ओळख करून द्यायला हवी. 'किर्लोस्कर ब्रदर्स लिमिटेड' ही भारतातील पहिली कंपनी, की ज्यांनी स्वत:चेच गुणवत्ता मापदंड निश्चित करून 'चारा कापण्याचे यंत्र' आणि 'लोखंडी नांगर' अशी दोन अवजारे बाजारात आणली. विशेष म्हणजे, त्या काळी अशाच प्रकारच्या ब्रिटिश अवजारांशी स्पर्धा करून 'किर्लोस्कर ब्रदर्स लिमिटेड'चे नाव सातासमुद्रापलीकडे प्रसिद्धी पावले. भारतात जणू स्वदेशी यंत्रयुगाला सुरुवात झाली. शेंगदाण्याची टरफले काढणारे यंत्र, उसाचा रस काढणारे यंत्र, पाणी उपसण्याचा पंप, अशा हातयंत्रांची निर्मिती करून नव्या अर्थव्यवस्थेच्या भारतीय उद्योगजगतात किर्लोस्कर कंपनीने क्रांतीच घडवून आणली. आता गरज होती ती या यंत्रांना ऊर्जा देऊन गतिमान करण्याची. हेही आव्हान किर्लोस्कर ब्रदर्सने स्वीकारले आणि भारतीय उद्योगजगतात स्वयंचलित यंत्रयुगाला सुरुवात झाली. डीझेल इंजीन, कोलगॅस जनरेटर्स, विद्युत मोटर अशा स्वदेशी यंत्रांच्या साहाय्याने भारतीय उद्योगात चैतन्याचे वारे वाहू लागले, त्याला एक वेगळीच गती प्राप्त झाली. पंप आणि झडपा (व्हाल्व्ह्स) तयार करणारा सर्वात

मोठा भारतीय उद्योगसमूह म्हणून किर्लोस्कर ब्रदर्स उदयाला आला.

जागतिक युद्धकालीन परिस्थितीत भारतीय उद्योगांची अवस्था खूपच बिकट झाली होती. आमच्याकडे स्वदेशी तंत्रज्ञानाचा अभाव आणि ब्रिटिश सरकारने ब्रिटिश बनावटीची यंत्रसामग्री भारतात पाठवण्यास घातलेली बंदी अशा अवस्थेत किर्लोस्करचे योगदान वाखाणण्याजोगे आहे. या दृष्टीने भारतीय उद्योगपतीने 'मशीन टूल्स' तयार करण्याचा धाडसी निर्णय घेऊन ब्रिटिश सरकारला चकित केले. शेतीची अवजारे बनवणारे किर्लोस्कर, मशीन टूल्सकडे वळले हे भारतीय उद्योगजगतातील क्रांतिकारक वळणच म्हणायला हवे. यासाठी त्यांनी 'हरिहर' येथे 'मैसूर किर्लोस्कर लिमिटेड' ही कंपनी सुरू केली. या कामी मैसूरचे महाराजा त्यांना हितचिंतक म्हणून लाभले. त्या वेळी तयार केलेली सातही 'लेथ मशीन्स' हातोहात विकली गेली.

भारताची वाटचाल वसाहतवादाकडून स्वातंत्र्याकडे सुरू झाली. १९४० साली भारताचे राजकीय वातावरण बदलले. महाराजांच्या आशीर्वादाची आता गरज उरली नाही. भारताचे औद्योगिक धोरण बदलले आणि त्याचा किर्लोस्कर ग्रूपला खूपच मोठा फायदा झाला. शंतनुराव किर्लोस्कर यांनी अखेर पुणे गाठले आणि डीझेल इंजीन तयार करण्यावर लक्ष केंद्रित केले. उद्योग उभारण्यासाठी पुणे येथे जमीन मिळविण्यासाठी त्यांना जनतेच्या विरोधाला आणि नोकरशाहीवृत्तीला तोंड द्यावे लागले. माणसापेक्षा उद्योगधंद्यांचे आयुष्य दीर्घकालीन असते असे लोकांना पटवून शंतनुरावांनी 'किर्लोस्कर ऑइल इंजीन लिमिटेड'साठी जागा मिळवली. यासाठी त्यांना 'असोसिएटेड ब्रिटिश ऑइल इंजीन एक्स्पोर्ट लिमिटेड' या इंग्लंडच्या कंपनीशी करार करावा लागला. या करारानंतर तब्बल एका वर्षाने किर्लोस्करांना जागा ताब्यात मिळाली. परदेशी कंपनीशी करार करून तंत्रज्ञानाची दरी 'टेक्नॉलॉजी ट्रान्स्फर'द्वारा भरून काढण्याचा प्रयत्न करणारा पहिला भारतीय उद्योगपती म्हणून शंतनुरावांचे नाव घ्यायला हवे. १९४६ साली किर्लोस्कर ऑइल इंजीन लिमिटेड कंपनी अस्तित्वात आली आणि या कंपनीने भारताला पहिले स्वदेशी असे 'व्हर्टिकल हाय स्पीड इंजीन' प्रदान केले. हे पहिले इंजीन खरेदी करणारे ब्रिजलाल सारडा यांनी ४० वर्षे हे इंजीन उत्तम चालल्याची पावतीसुद्धा दिली आहे.

विद्युत मोटारी तयार करणे हे लक्ष्मणरावांचे स्वप्न होते, ते १९४६ साली पूर्ण झाले. लक्ष्मणरावांचा धाकटा मुलगा रवी याने १० हेक्टर जागेवर किर्लोस्कर इलेक्ट्रिक कंपनी लिमिटेड उद्योग सुरू केला. पुढे १९५८ साली एअर कॉम्प्रेसर्स तयार करण्याचा परिपूर्ण कारखाना शंतनुरावांचे धाकटे चिरंजीव श्रीकांत यांनी समर्थपणे सांभाळला. इंग्लंडच्या ब्रूम अॅण्ड वेड या कंपनीच्या सहकार्याने किर्लोस्कर न्यूमॅटिक कंपनी लिमिटेडने एअर कॉम्प्रेसर्स आणि न्यूमॅटिक साधनांचे उत्पादन सुरू केले.

आज अमेरिकेच्या 'ट्विन डिस्क' या कंपनीच्या सहकार्याने किर्लोस्कर न्यूमॅटिकने टॉर्क इन्व्हर्टर्स, मरीन गिअर बॉक्स आणि रेल ट्रॅक्शन ट्रान्समिशन्स यांचेदेखील उत्पादन सुरू केले आहे. आता मात्र किर्लोस्कर उद्योगाच्या एवढ्या प्रचंड ज्ञान, तंत्रज्ञान आणि कौशल्याचा उपयोग भारतातील उदयोन्मुख उद्योजकांना होणे गरजेचे होते. यातूनच १९६३ साली 'किर्लोस्कर कन्सल्टंट्स लिमिटेड' ही कंपनी उदयाला आली. गेल्या २५ वर्षांत किर्लोस्कर समूहाने संरक्षण, पर्यावरण, रस्ते आणि शेती या क्षेत्रांत महत्त्वपूर्ण योगदान दिलेले आहे. १९६४ साली किर्लोस्कर समूहाने सेवा उद्योग क्षेत्रात पदार्पण केले. 'पुणे इंडस्ट्रियल हॉटेल लिमिटेड' कंपनीतर्फे पुण्यात 'हॉटेल ब्लू डायमंड' आणि कोल्हापुरात 'हॉटेल पर्ल' सेवाक्षेत्रात रुजू झाले. यातूनच पुढे 'बेकर्स बास्केट कन्फेक्शनरी चेन' आणि 'हॉटेल अॅण्ड कॅटरिंग कन्सल्टन्सी सर्व्हिसेस' या सेवा संस्था अस्तित्वात आल्या. आज शेती, पाणीपुरवठा, ऊर्जा आणि शेतकीकरण या क्षेत्रांत किर्लोस्कर समूहाने कमावलेल्या नावाचे श्रेय शंतनुराव किर्लोस्कर यांनाच जाते.

किर्लोस्कर उद्योग समूहाचा व्याप त्यांनी देशी-परदेशी वाढवल्याने ते केवळ किर्लोस्कर समूहाचे नेते नव्हते, तर पुण्यात ज्यांना उद्योग करायचा, त्या सर्वांना ते सल्ला देत. त्यासाठी त्यांनी वेगळे खातेच सुरू केले होते. ते वेगवेगळ्या वीस कंपन्यांच्या संचालक मंडळांवर होते. १९६५-१९६६ साली भारतीय उद्योगांची शिखर संस्था असलेल्या 'फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर ऑफ कॉमर्स'चे ते अध्यक्ष होते. 'बोर्ड ऑफ ट्रेड'वर ते सल्लागार होते. 'इंडो अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स'चे ते अध्यक्ष होते. पुण्याच्या 'ज्ञानप्रबोधिनी' या शिक्षणसंस्थेचे ते १५ वर्षे अध्यक्ष होते. वयाच्या नव्वदाव्या वर्षी त्यांचे निधन झाले.

– डॉ. रंजन गर्गे

***संदर्भ :***

१. *मराठी विज्ञान परिषद-पत्रिका; जून १९९४*

## कुलकर्णी - जतकर, शंकर खंडो

**रसायनशास्त्र**

**२३ सप्टेंबर १८९७ - २० एप्रिल १९९४**



शंकर खंडो कुलकर्णी-जतकर हे पुणे विद्यापीठाच्या रसायनशास्त्र विभागाचे पहिले विभागप्रमुख होते. सर चंद्रशेखर व्यंकट रमण यांचे सहकारी होते.

त्यांच्या नावातील 'एस.के.के.' या आद्याक्षरांमुळे किंवा फक्त 'प्रा. जतकर' या नावाने अधिक परिचित असलेल्या जतकरांचा जन्म सांगली जिल्ह्यातील जत नावाच्या छोट्या गावात झाला. त्यांचे शालेय शिक्षण सांगली हायस्कूलमध्ये झाले. सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालय आणि नंतर पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण झाले. विज्ञान हा त्यांचा अत्यंत आवडीचा विषय असल्यामुळे, त्यांनी बंगळुरू येथील 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' येथे प्रवेश घेऊन एम.एस्सी. पदवी मिळवली. १९२४ साली ते नोकरीसाठी हैद्राबादला गेले. निजाम महाविद्यालयात ते अध्यापक म्हणून रुजू झाले. परंतु संशोधन करण्याची आस त्यांना परत बंगळुरूला 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स'मध्ये घेऊन आली. सुरुवातीला त्यांनी प्रा. एच. वॅटसन यांच्याबरोबर संशोधन केले. सर सी.व्ही. रमण यांच्याकडे 'रमण परिणाम'शी संबंधित संशोधन करण्याची संधी त्यांच्याकडे चालून आली. त्यामुळे, त्यांचे स्वत:चे असे अभ्यास आणि ज्ञानसंपन्न व्यक्तिमत्त्व विकसित झाले. त्यांनी स्वतंत्रपणे संशोधन केले. त्यात खास करून इन्स्ट्रुमेंटल ॲनालिसिस आणि विविध पायलट प्लँट प्रॉजेक्टविषयक संशोधन होते. त्यांतून मिळालेल्या निष्कर्षांवर आधारित दर्जेदार शोधनिबंध त्यांनी आंतरराष्ट्रीय नियतकालिकांमध्ये प्रसिद्ध केले. त्यांच्या या शोधनिबंधांचे परीक्षण करून त्यांना डी.एस्सी. ही पदवी मिळाली.

१९४९ साली पुणे विद्यापीठ स्थापन झाले. त्या विद्यापीठातील रसायनशास्त्र विभाग सुरू करण्यासाठी कुलगुरू बॅ. मु. रा. जयकर यांनी प्रा.जतकर यांना आमंत्रित केले. १९५० ते १९६२ या काळात त्यांनी अहोरात्र मेहनत करून रसायनशास्त्र विभाग नावारूपाला आणला. मेहनत, चिकाटी, आशावाद, दूरदर्शीपणा आणि बुद्धिमत्ता या गुणांच्या जोरावर त्यांनी सुमारे १५० शोधनिबंध आघाडीवरील वैज्ञानिक नियतकालिकांमध्ये प्रसिद्ध केले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली २५ विद्यार्थ्यांनी रसायनशास्त्राच्या विविध समस्यांवर उच्चदर्जाचे संशोधन करून पीएच.डी. पदवी मिळवली. त्यांनी शिक्षणसंस्था आणि औद्योगिक उत्पादन क्षेत्र यांच्यामध्ये समन्वय साधण्याचा विचार आणि प्रत्यक्ष कृती केली. त्यांनी शर्करा उत्पादन तंत्रज्ञान, स्फोटकांचे रसायनशास्त्र, काचेचे उत्पादन, अशा वेगळ्या विषयांच्या अध्ययनाची सोय केली.

प्राध्यापक आणि विद्यार्थी यांनी अभ्यासक्रमापुरते किंवा संशोधनासाठी केवळ एकत्र न येता, सामाजिकदृष्ट्या उपयुक्त विषयाचादेखील विचार

करावा, असे त्यांना प्रकर्षाने वाटे. त्या दृष्टीने त्यांनी 'युनिव्हर्सिटी केमिकल सोसायटी'ची स्थापना केली. चर्चासत्रे, वक्तृत्व स्पर्धा, प्रात्यक्षिके, खेड्यात विज्ञान प्रसार करण्यासाठी फिरती प्रयोगशाळा यांसारखे निरनिराळे उपक्रम त्यातून सुरू झाले.

संकटप्रसंगी धीराने वागण्याचा त्यांचा गुण विशेषत्वाने जाणवत असे. १९६१ सालच्या पानशेतच्या जलप्रलयानंतर पूरग्रस्तांना मदत करण्याच्या उपाययोजना ठरविण्यासाठी प्रा. जतकर यांनी विद्यार्थ्यांची ताबडतोब बैठक भरविली. त्या वेळी पुणे शहरात बऱ्याच ठिकाणी नळाला गढूळ पाणी यायचे. प्रा. जतकरांनी विद्यार्थ्यांना विचारले: 'पुण्यातील काही भागांत पिण्याचे पाणी अशुद्ध आहे. अशा प्रसंगी रसायनशास्त्राचे विद्यार्थी म्हणून तुम्ही काय प्रयत्न कराल?' विद्यार्थी चर्चा करू लागले. त्यांनी मदतकार्याची रूपरेषा ठरविली आणि तिची कार्यवाहीपण लगेच गाजावाजा न करता सुरू झाली. पुण्याच्या काही भागांतील लोकांना बिकट प्रसंगी पिण्याचे पाणी मिळाले. प्रा. जतकर यांचा विषय रसायनशास्त्र होता, तरी त्यांनी भौतिक शास्त्राच्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले होते. स्पेक्ट्रोस्कोपी, रेण्वीय संरचना, शास्त्रीय उपकरणशास्त्र हे त्यांच्या संशोधनाचे विषय होते. 'केमिस्ट्री ऑफ स्टाँग इलेक्ट्रोलाइट्स, डायपोल मोमेंट अँड मॉलेक्युलर स्ट्रक्चर' हे त्यांच्या व्यक्तिगत आवडीचे विषय होते. या संदर्भात त्यांनी विकसित केलेली गणिती पद्धत ही 'जतकर इक्वेशन' म्हणून ओळखली जाते. पॉलिमर तंत्रज्ञान आणि जैवतंत्रज्ञानासंबंधी अद्ययावत माहिती ते गोळा करून ठेवायचे. अनेक गरजू विद्यार्थ्यांना त्याचा उपयोग होत असे.

रॉयल केमिकल सोसायटी आणि अमेरिकन केमिकल सोसायटी यांनी प्रा. जतकर यांना सन्मान्य फेलोशिप प्रदान केलेली होती. त्यामुळे त्यांना मिळणाऱ्या सुविधांचा उपयोग विद्यार्थ्यांसाठी करण्याचा त्यांचा कटाक्ष असे. त्यांनी पुढाकार घेऊन विद्यार्थ्यांकरिता विभागात स्थापन केलेले ग्रंथालय 'जतकर लायब्ररी' म्हणून ओळखले जाते. रसायनशास्त्र विभागातील सर्व प्रगत उपकरणे-यंत्रसामग्री चालू स्थितीत ठेवण्यासाठी ते स्वत: प्रयत्नशील असत. कोणतेही यंत्र बिघडले, की त्यांना ते एक आव्हानच वाटे. यंत्रे - उपकरणे बिघडली, की विद्यार्थी आणि अकुशल कर्मचाऱ्यांना मदतीला घेऊन ते दुरुस्त करायचे. त्यांच्या प्रात्यक्षिकांमुळे अनेकांना प्रशिक्षण मिळत असे.

वय वर्षे ९३ झाल्यावर ते हृदयविकाराने आजारी पडून अंथरुणाला खिळून बसले. हृदयाचे ठोके लयबद्ध करणारा पेसमेकर शरीरात बसवून घेण्याचा सल्ला डॉक्टरांनी दिला. शरीराच्या आत महागडा पेसमेकर बसवण्याऐवजी तेच कार्य करणाऱ्या, पण शरीराच्या बाहेर, खिशात ठेवता येणाऱ्या पेसमेकरचे डिझाइन प्रा. जतकरांनी केले. अल्पावधीत ते बनवून ते हिंडू - फिरू लागले. शस्त्रक्रिया तर टळलीच, पण पंधरा हजार रुपयांऐवजी त्यांना केवळ दीडशे रुपये खर्च आला! स्वत: संशोधन केलेल्या स्वस्त अशा पेसमेकरचा उपयोग गरजू, गरीब रुग्णांना व्हावा, अशी त्यांची इच्छा होती. रुग्णाला स्वत:च्या तब्येतीमधील घडणाऱ्या चढ-उतारांना अनुकूल बदल केवळ बटण फिरवून करता येईल, अशी सोय त्या पेसमेकरमध्ये होती!

प्रा. जतकर कामाच्या बाबतीत काटेकोर होते. त्यामुळे विद्यार्थी आणि सेवकांना त्यांच्याबद्दल आदरयुक्त भीती वाटे. एखाद्याची मेहनती वृत्ती आणि कौशल्य जेव्हा त्यांच्या लक्षात यायचे, तेव्हा ते त्याचे कौतुक करून प्रोत्साहन द्यायचे. एवढेच नव्हे, तर त्यांच्या विकासाच्या दृष्टीने ते जाणीवपूर्वक प्रयत्न करीत असत. परीक्षेचे मानधन व्यक्तिगत कारणासाठी न वापरता, त्यांनी रसायनशास्त्र विभागातील ग्रंथालयात नवीन पुस्तके घेण्यासाठी वापरले. निवृत्त होताना दिला गेलेला गौरवनिधी त्यात स्वत:ची भर घालून सेवकवर्गासाठी कायमस्वरूपी ठेव म्हणून त्यांनी विभागाला परत केला. त्यांच्या सहृदय माणुसकीचा अनुभव त्यांच्या विद्यार्थ्यांना आणि सहकारी सेवकवर्गाला वारंवार आलेला होता.

क

१९५० सालानंतर प्रा. जतकर यांनी फारसे आर्थिक पाठबळ नसताना आणि साधनसामग्री तुटपुंजी असताना, पुणे विद्यापीठाच्या रसायनशास्त्र विभागाची उभारणी केली. व्यावसायिक किंवा औद्योगिक दृष्टीने रसायनशास्त्राचा उपयोग जनसामान्यांसाठी किंवा राष्ट्र उभारणीसाठी कसा करता येईल, याचे प्रशिक्षण त्यांनी विद्यार्थ्यांना सप्रयोग दिले. हे करीत असताना, त्यांनी 'जर्नल ऑफ अमेरिकन केमिकल सोसायटी', 'जर्नल ऑफ इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स', अशा अनेक अव्वल दर्जाच्या वैज्ञानिक नियतकालिकांत शोधनिबंध प्रसिद्ध केले.

वृद्धापकाळामुळे त्यांचे पुणे येथे निधन झाले.

— डॉ. अनिल लचके

## कुलकर्णी, विनायक गोपाळ

**भौतिकशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**४ सप्टेंबर १९३२ - १३ जुलै २००२**



विनायक गोपाळ कुलकर्णी हे होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र या विज्ञान शिक्षणाच्या क्षेत्रातील अग्रगण्य संस्थेचे संस्थापक - संचालक होते. बेळगावला जन्मलेल्या कुलकर्णींचे शालेय शिक्षण बेळगाव, धारवाड आणि रत्नागिरी अशा तीन ठिकाणी झाले. शाळेत अत्यंत हुशार असलेल्या कुलकर्णींना लहानपणी अभ्यासासाठी जसे उत्तेजन मिळाले, तसे खेळासाठीही मिळायला हवे होते, असे प्रौढपणी नेहमीच वाटत राहिले. यामुळेच की काय, सुदृढ आरोग्यासाठी खेळ हवेत आणि शिक्षण हे खेळाचा समावेश असलेले सर्वांगीण हवे, असे कुलकर्णी कटाक्षाने सांगत.

भाषा आणि विज्ञान या दोन्हींवर प्रभुत्व असलेल्या कुलकर्णींनी महाविद्यालयीन शिक्षणात विज्ञानाला पसंती दिली. मुंबईच्या इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समधून बी.एस्सी. परीक्षेत ते विद्यापीठातून पहिले आले आणि टाटा मूलभूत संशोधन संस्थेमध्ये संशोधनवृत्ती मिळवून त्यांनी प्रवेश केला. तो काळ टाटा संस्थेचा, भारतातील भौतिकशास्त्रीय आणि वैज्ञानिक संशोधनाचा आणि एकूणच राष्ट्र उभारणीचा होता. त्या काळचे वैज्ञानिक विज्ञानाकडे एक 'करिअर' म्हणून नाही, तर राष्ट्र उभारणीचे महत्त्वाचे अंग म्हणून पाहत असत. लवकरच एम.एस्सी.साठीचे संशोधन पूर्ण करून कुलकर्णी संस्थेच्या अणु भौतिकी विभागात स्थिर झाले. प्रा.बी.व्ही. ठोसर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी 'बीटा' किरणांच्या ध्रुवणावर महत्त्वाचे संशोधन केले. इलेक्ट्रॉन या मूल कणांच्या, त्यांच्याइतकेच वस्तुमान, परंतु धन विद्युतभार असलेल्या, प्रतिकणाला पॉझिट्रॉन म्हणतात. पॉझिट्रॉन कणाच्या अन्य द्रव्याशी होणाऱ्या आंतरक्रियेवर जगात नव्याने संशोधन चालू झाले होते. भारतात या विषयावर संशोधन करणाऱ्या पहिल्या गटातील प्रा. कुलकर्णी हे आघाडीचे संशोधक होते. कॅनडातील क्वीन्स विद्यापीठात अभ्यागत संशोधक म्हणून त्यांनी काम केले.

१९६७-६८ सालांच्या सुमारास वि. गो. कुलकर्णी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी मुंबई महानगरपालिकेच्या शाळांतील शिक्षणासाठी प्रशिक्षण वर्गात भाग घ्यायला सुरुवात केली. त्यांची विज्ञान शिक्षणातील रुची आणि सहभाग वाढतच गेला. टाटा संस्थेसारख्या जागतिक दर्जाच्या संशोधन संस्थेतील वैज्ञानिकांनी सामाजिक बांधीलकी मानून सर्वसामान्यांसाठी विज्ञान शिक्षण सुरू केले आणि या प्रयत्नांचे कुलकर्णी सुरुवातीपासूनचे प्रमुख होते. दोराबजी टाटा ट्रस्टने केंद्राला आर्थिक पाठबळ दिले.

या दरम्यान जागतिक स्तरावर मान्यता मिळत असलेल्या आपल्या संशोधनाला आणखी पुढे नेण्याची संधी कुलकर्णींकडे चालून आली होती. क्वीन्स विद्यापीठाने त्यांना अभ्यागत प्राध्यापक म्हणून दीर्घमुदतीकरिता आमंत्रण दिले होते. पण ते न स्वीकारता, प्रा. कुलकर्णींनी विज्ञान शिक्षणाला



होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र

संपूर्णपणे वाहून घेण्याचा निर्णय घेतला. या सर्व प्रयत्नांत प्रा.कुलकर्णी यांना टाटा संस्थेचे ज्येष्ठ प्राध्यापक प्रा. भा. मा. उदगावकर यांचे सातत्याने मार्गदर्शन होत आले. १९८१ साली होमी भाभा केंद्र हा प्रकल्प न राहता, टाटा संस्थेचा एक विभाग बनला आणि १९८७ साली ते संस्थेचे एक केंद्र बनले. १९९२ साली केंद्राला मानखुर्द येथे स्वत:ची भव्य वास्तू प्राप्त झाली. या वास्तूच्या उभारणीसाठी प्रा. कुलकर्णी यांनी जिवापाड मेहनत केली. १९९४ साली ते केंद्राचे संचालक म्हणून निवृत्त झाले.

विज्ञान कसे शिकवावे, प्रयोग कसे करावेत, पुस्तके कशी असावीत यांवर प्रत्यक्ष वर्गातील अनुभवाधारित संशोधन प्रकल्प प्रा.कुलकर्णी यांनी हाती घेतले. खिरोदा, जि. जळगाव येथील ग्रामीण शाळांतील विज्ञान शिक्षण, मुंबई महानगरपालिकेच्या शाळांतील शिक्षकांचे प्रशिक्षण इत्यादी प्रकल्पांतून त्यांनी विज्ञान शिक्षणाच्या नव्या पद्धती विकसित केल्या. चांगल्या विज्ञान शिक्षणासाठी भाषेचे संवर्धन महत्त्वाचे आहे, हे त्यांच्या संशोधनातील एक मुख्य सूत्र होते. भाषा आणि विज्ञान यांतील परस्परपूरक नाते शोधण्याचा प्रयत्न त्यांच्याएवढा दुसऱ्या कुणी क्वचितच केला असेल. शिक्षक बहुतकरून क्रमिक पुस्तकावरून शिकवतात हे हेरून त्यांनी विज्ञान पुस्तकाची भाषा सोपी करून त्याचे पुनर्लेखन करण्याचा प्रयत्न केला. महानगरपालिकेच्या उच्च प्राथमिक स्तरावरच्या १०,००० पेक्षा अधिक विद्यार्थ्यांना ही पुनर्लिखित पुस्तके वापरण्यास देण्यात आली. वर्षभर चाललेल्या या प्रकल्पाने पुस्तकाची भाषा सोपी केल्यास मुलांचे आकलन सुधारते शिवाय शिक्षक आणि विद्यार्थी यांचा वर्गातील संवादही सुधारतो, असे त्यांनी दाखवून दिले.

महापालिकेच्या शाळेतील अनुसूचित जाती-जमातीच्या विद्यार्थ्यांच्या बाबतीत त्यांनी एक वेगळा प्रकल्प घेतला. आर्थिक आणि सामाजिकदृष्ट्या दुर्बळ घटकांतून आलेले हे विद्यार्थी उच्चवर्णीय घरांतील विद्यार्थ्यांना घरून जे पाठबळ असते, त्याला पूर्णपणे वंचित असतात. अशा विद्यार्थ्यांना आठवड्यातून फक्त एकदा, परंतु नियमितपणे होमी भाभा केंद्रात बोलावले जाई. त्यांना वाचायला, वाचनालयातून संदर्भ शोधायला, गणिते सोडवायला, बोलायला, अगदी मोठ्या शास्त्रज्ञांशी चर्चा करायला, फावल्या वेळेचा सदुपयोग करायला, मदत केली जाई. प्रत्येक विद्यार्थी आठवीपासून दहावीपर्यंत तीन वर्षे सातत्याने आठवड्याला ३-४ तास केंद्रात घालवत असे. तीन वर्षांच्या कालावधीच्या शेवटी प्रत्येक विद्यार्थ्याच्या अभ्यासात, अभ्यासाच्या क्षमतेत, संवाद कौशल्यात, महत्त्वाकांक्षेत लक्षणीय फरक दिसून आला. त्यांची सरासरी शैक्षणिक संपादन पातळी उच्चवर्णीय विद्यार्थ्यांच्या सरासरी पातळीइतकी उंचावली.

या विद्यार्थ्यांना घरून मिळत असलेल्या मदतीप्रमाणेच मदत मिळाली, तर सरासरी संपादन पातळीत उच्चवर्णीय व मागासलेले विद्यार्थी असा फरक राहत नाही, असे या प्रयोगाने दाखवून दिले. या प्रयोगाला जागतिक परिमाण होते. कारण त्या काळी अमेरिकेत कृष्णवर्णीय व श्वेतवर्णीय यांच्या उपजत बुद्धिमत्तेतच फरक असतो आणि त्यामुळेच कृष्णवर्णीय मागासलेले असतात, असे मानसशास्त्रीय संशोधनाद्वारे सिद्ध करण्याचा प्रयत्न चालू होता. याचेच प्रतिबिंब आपल्याकडे उच्चवर्णीय व मागासलेले विद्यार्थी यांच्या बुद्धिमत्तेत जन्मत:च फरक असतो, या समजुतीत दिसून येत होते.

प्रा. कुलकर्णी पीएच.डी.चे मार्गदर्शक होते. त्यांच्या

क

एका विद्यार्थिनीने शालेय विद्यार्थ्यांना रासायनिक संज्ञांचे व समीकरणांचे वास्तविक आकलन कितपत असते व ते कसे सुधारता येईल, यावर संशोधन केले, तर दुसऱ्या विद्यार्थिनीने विद्यार्थिनींच्या, विशेषत: ग्रामीण भागातील, व्यवसाय निवडीविषयी संशोधन केले. सातवी-आठवीपर्यंत स्वत:च्या भावी व्यवसायासंबंधी मोठी स्वप्ने पाहणारे विद्यार्थी-विद्यार्थिनी पुढे परिस्थितीशी जुळते घेऊन स्वत:च्या अपेक्षांच्या बाबतीत कशी तडजोड करतात, हे या संशोधनातून स्पष्ट दिसून आले. आपल्या संशोधनातून मिळालेल्या निष्कर्षाचा उपयोग समाजाला कसा होईल, त्यांचा वापर मोठया प्रमाणात कसा करता येईल, याचा प्रा. कुलकर्णी सातत्याने विचार करीत असत.

निवृत्तीनंतर त्यांनी लेखनाकडे लक्ष केंद्रित केले. ‘लोकसत्ता’ या दैनिकात त्यांनी ‘तिसरे पाऊल’, ‘संधिप्रकाश’ या साप्ताहिक लेखमाला डॉ. बाळ फोंडके यांच्या सहकार्याने लिहिल्या. नंतर ‘अनोखा उंबरठा’ आणि ‘संस्कार’ या साप्ताहिक लेखमाला स्वतंत्रपणे लिहिल्या. त्यांनी खास मुलांसाठी ‘गाथा शोधांची’ हे दैनिक सदर डॉ. बाळ फोंडके आणि डॉ.अंजली कुलकर्णी यांच्या सहकार्याने चालवले. यातील प्रत्येक लेखमाला वर्षभर चालणारी होती. ‘गाथा शोधांची’ला प्रचंड लोकप्रियता लाभली. ‘गाथा शोधांची’नंतर ‘गाथा मुहूर्तमेढीची’ या वर्षभर चाललेल्या सदराला तशीच लोकप्रियता मिळाली. त्यांच्या वृत्तपत्रीय लिखाणाची भाषा अत्यंत सोपी आणि ओघवती असे. परिचित उदाहरणे हे त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य होते. श्रोतृवर्गाच्या क्षमतेचा आणि मन:स्थितीचा अंदाज घेऊन भाषा लवचीकपणे वापरण्याचे कसब त्यांनी कमावले होते. मनुष्याचे भाषिक कौशल्याच्या विकासाचे ठळक टप्पे असतात आणि त्यांतील सर्वांत प्रगत टप्पा असतो तो गणिती, तार्किक भाषेचा, असे ते मानत.

त्यांचे साठहून अधिक शोधनिबंध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले. त्यांनी लिहिलेल्या व संपादन केलेल्या पुस्तकांची संख्या तीस आहे. यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ, इंदिरा गांधी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठ, मुंबई, पुणे, पाँडीचेरी विद्यापीठे, नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन रिसर्च अ‍ॅण्ड ट्रेनिंग इत्यादी संस्थांतून त्यांनी महत्त्वाची पदे भूषविली. महाराष्ट्र राज्य विश्वकोश मंडळ आणि राज्य मराठी विकास संस्थेचे नियामक मंडळ यांचे ते सदस्य होते. महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेसचे ते संस्थापक सदस्य होते. मराठी विज्ञान परिषदेचे ते उपाध्यक्ष आणि तेविसाव्या अखिल भारतीय मराठी विज्ञान संमेलनाचे ते अध्यक्ष होते. त्यांना १९८५-८७ सालचा गोवर्धनदास पारीख पुरस्कार मिळाला होता.

- प्रा. हेमचंद्र प्रधान

***संदर्भ :***

*१. दै. सकाळ; २८ फेब्रुवारी २०००.*

## के. वेंकटरामन

**रसायनशास्त्रज्ञ**

**७ जून, १९०१ - १२ मे, १९८१**



भारतातील रसायनशास्त्राच्या विश्वात पुणे येथील ‘राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा’ अर्थात ‘नॅशनल केमिकल लॅबोरेटरी’ या संस्थेचे एक वेगळे स्थान आणि महत्त्व आहे. या प्रयोगशाळेला असे मानाचे स्थान प्राप्त करून देण्यामध्ये या प्रयोगशाळेचे पहिले भारतीय वंशाचे संचालक डॉ.के. वेंकटरामन यांचा सिंहाचा वाटा आहे.

डॉ. के. वेंकटरामन यांना त्यांचे सहकारी आपुलकीने आणि आदराने ‘के.व्ही.’ म्हणत असत. त्यांचा जन्म मद्रास (आताचे चेन्नई) येथे एका उच्चभ्रू कुटुंबात झाला. तीन मुलांत ते मधले होते.

केव्हींचे प्रारंभीचे शिक्षण चेन्नई येथे झाले. त्यांनी १९२३ साली रसायनशास्त्रात एम. ए. ही पदवी प्राप्त केली. त्या काळात प्रेसिडेन्सी महाविद्यालय

शिकवणाऱ्या प्रा. बी. बी. डे यांचा त्यांच्यावर खूपच प्रभाव पडला होता. याच बी. बी. डे यांचे दुसरे नावाजलेले विद्यार्थी म्हणजे डॉ. टी. आर. शेषाद्री. नंतर मद्रास सरकारची शिष्यवृत्ती मिळवून केव्ही मँचेस्टर विद्यापीठामध्ये गेले. तेथील नावाजलेले रसायनशास्त्रज्ञ सर रॉबर्ट रॉबिन्सन यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी एम.एस्सी. (टेक्नॉलॉजी), पीएच.डी. आणि डी.एस्सी. या पदव्या प्राप्त केल्या.

१९२७ साली भारतात परत आल्यावर, एक वर्ष केव्ही यांनी बंगलोर येथील 'इंडियन इन्स्टिट्यूटट ऑफ सायन्स' या संस्थेत 'फेलो' म्हणून काम केले. नंतर १९२८ साली त्यांनी लाहोर येथील त्या वेळच्या नावाजलेल्या ख्रिश्चन महाविद्यालयामध्ये अधिव्याख्याता म्हणून नोकरी पत्करली. लाहोर येथे या काळात केलेल्या संशोधनावर आधारित 'ए सिन्थेसिस ऑफ फ्लेवर अ‍ॅट रूम टेंपरेचर' हा त्यांचा शोधनिबंध 'करंट सायन्स' या संशोधनपत्रिकेत १९३३ साली प्रकाशित झाला. त्यांचे हे रसायनशास्त्रातील एक मूलभूत संशोधन कार्य होते. परंतु योगायोग असा की, त्याच सुमारास डब्ल्यू. बेकर नावाच्या संशोधकानेसुद्धा केव्हींसारखेच काम करून एक शोधनिबंध 'जर्नल ऑफ केमिकल सोसायटी' या संशोधनपत्रिकेत प्रकाशित केला. फ्लेवोन्स ही रसायने तयार करण्याची प्रक्रिया त्यामुळे या दोघांच्याही नावांवर नोंदली गेली. 'बेकर-वेंकटरामन ट्रान्सफॉर्मेशन' किंवा 'बीव्ही ट्रान्सफॉर्मेशन' नावाने ओळखली जाणारी ही प्रक्रिया वापरून आजही रसायनशास्त्रज्ञ फ्लेवोन्स तयार करतात.

केव्हींच्या या मूलभूत आणि उच्च दर्जाच्या संशोधनामुळे १९३४ साली मुंबई विद्यापीठाने त्यांना 'इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजीमध्ये' (आय.सी.टी.) मध्ये प्रपाठक म्हणून नेमणूक दिली. त्या वेळी आय. सी. टी.चे संचालक विख्यात वैज्ञानिक आर. बी. फोस्टर हे होते. ते १९३८ साली निवृत्त झाल्यावर प्राध्यापक आणि आय. सी. टी.चे संचालक म्हणून केव्हींनी धुरा सांभाळली. नंतरची १९ वर्षे ते या पदावर होते. त्यांचे रसायनशास्त्राचे सखोल ज्ञान, प्रशासकीय कामावरील पकड, नेतृत्वगुण आणि कर्तव्यकठोर वृत्ती यांमुळे अल्पावधीतच आय.सी.टी. नावारूपाला आली. त्यामुळे कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आय.सी.टी.च्या सभागृहाला २४ डिसेंबर २००६ रोजी केव्हींचे नाव देण्यात आले.

आय. सी. टी.तल्या या वास्तव्यात केव्हींनी फ्लेवोनाइडस जातीच्या रंगावर संशोधन तर केलेच; पण त्याबरोबर त्याची संरचना, ते वापरण्याच्या पद्धती इत्यादी वस्त्रोद्योगांना लागणाऱ्या विविध प्रक्रियांवरदेखील संशोधन केले. त्यांच्या ऋणातून अंशत: मुक्त होण्यासाठी त्यांच्या काही विद्यार्थ्यांनी मुंबई येथे 'इंडियन डायस्टफ इंडस्ट्रीज लिमिटेड' या संस्थेची स्थापना केली. भारतीय उद्योगविश्वाने स्वावलंबी आणि स्वयंपूर्ण व्हावे असे केव्हींना वाटत असे. त्याविषयी ते आग्रही होते. त्यांनी 'डाइज'मधल्या सखोल ज्ञानाचा वापर करून 'केमिस्ट्री ऑफ सिन्थेटिक डाय अँड अ‍ॅनालिटिकल केमिस्ट्री ऑफ सिन्थेटिक डाय' असे शीर्षक असलेले आठ भागांचे पुस्तक लिहिले. त्यांच्या डाइज आणि डाइज इंडस्ट्रीच्या व्यासंगामुळे दुसऱ्या महायुद्धात अपरिमित हानी होऊन जवळपास उद्ध्वस्त झालेल्या आय.जी.फारबिन इंडस्ट्री (ए.जी.) या जर्मन उद्योगाने त्यांना बोलावले आणि उद्योगाचा विकास कसा करता येईल, यावर त्यांच्याशी सखोल चर्चा केली.

१९५७ साली केव्हींनी पुण्याच्या राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेचे संचालक म्हणून सूत्रे हाती घेतली. त्यांच्याआधी प्रा. जी. आय. फिंच हे संचालक होते. एकदा राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेत आल्यावर मात्र केव्ही शेवटपर्यंत तिथेच रमले. ते १९६६ साली तेथूनच निवृत्त झाले. त्याच सुमारास त्यांना दम्याचा त्रास सुरू झाला. तरीही त्यानंतर कितीतरी काळ, म्हणजे जवळपास दहा वर्षे त्यांनी स्वत:ला संशोधनकार्यात गुंतवून घेतले होते. केव्ही त्यांच्या मृत्यूपर्यंत कार्यमग्न होते.

केव्हींची संशोधनकार्यावरची निष्ठा, ध्येय आणि

उद्दिष्ट निश्‍चित केल्यावर अविश्रांतपणे त्यांचा पाठपुरावा करण्याची वृत्ती आणि प्रशासकीय कामातले कौशल्य यांमुळे पुण्याची राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा थोड्याच कालावधीत रसायनशास्त्रातील संशोधकांचे मोहोळ बनले. भारतातील नावाजलेले रसायनशास्त्रज्ञ तेथे आले. ‘नॅचरल प्रॉडक्ट्स अँड सिन्थेटिक ऑरगॅनिक केमिस्ट्री’ या क्षेत्रात राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेची कीर्ती सर्वदूर पसरली. तो दबदबा आणि कीर्ती अद्यापही कायम आहे.

केव्ही नुसतेच नावाजलेले संशोधक नव्हते, तर ते एक उत्कृष्ट शिक्षकपण होते. त्यांच्यापासून अनेक विद्यार्थ्यांनी स्फूर्ती घेतली. प्रयोगशाळेत विद्यार्थ्यांबरोबर काम करता करता, ते त्यांना संशोधनपत्रिकांमधून शोधनिबंध कसे लिहावेत, प्रयोगांमधून आणि प्रात्यक्षिकांद्वारे मिळालेले निष्कर्ष कसे नोंदवून ठेवावेत आणि त्यांचा शोधनिबंध लिहिण्यासाठी कसा उपयोग करावा, हे समजावून सांगत. शासकीय समित्यांवर काम करण्याऐवजी विद्यार्थ्यांच्या सहवासात वेळ व्यतीत करणे त्यांना आवडत असे. विद्यार्थ्यांबरोबर वेळ घालवण्याच्या काळात एखाद्या शासकीय समितीची बैठक असली, तर केव्ही त्या बैठकीला गैरहजर राहात. आय.सी.टी.मध्ये असताना अनेक नवनवीन अभ्यासक्रमांची त्यांनी तेथे सुरुवात केली. अनेक उद्योजक आणि कारखानदार यांच्याबरोबर त्यांनी स्नेहाचे आणि आपुलकीचे संबंध प्रस्थापित केले. अभ्यासक्रमातील विषयांचा ‘प्युअर’ आणि ‘अप्लाइड’ असा फरक दूर करून त्यांनी दोन्हींचा संगम घडवून आणला.

देशातील तसेच परदेशातील नावाजलेल्या वैज्ञानिकांनी, उद्योजकांनी आणि शास्त्रज्ञांनी तेथे येऊन विद्यार्थ्यांबरोबर संवाद करावा, त्यांच्यासमोर भाषणे द्यावीत यांसाठी केव्ही सतत प्रयत्नशील होते. त्यांच्या संशोधनकार्याचे अगदी थोडक्यात वर्णन करायचे झाले तर, ८५ विद्यार्थ्यांना त्यांनी पीएच.डी. पदवीसाठी मार्गदर्शन केले आणि राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या संशोधनपत्रिकांमधून २५० शोधनिबंध प्रकाशित केले.

केव्हींना आयुष्यात अनेक मानसन्मान मिळाले. इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमी, नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्स, इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस, पोलिश अकॅडमी ऑफ सायन्स आणि इतर अनेक संस्थांचे ते फेलो होते. इंडियन केमिकल सोसायटीचे ते अध्यक्ष होते, तर इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचे उपाध्यक्ष होते. अनेक शास्त्रज्ञांच्या आणि वैज्ञानिकांच्या स्मृतिप्रीत्यर्थ ठेवली गेलेली पदके त्यांना मिळाली होती. भारत सरकारचा ‘पद्मभूषण’ हा सन्मानही त्यांना मिळाला होता. ‘इंडियन जर्नल ऑफ केमिस्ट्री’ या संशोधनपत्रिकेच्या संपादकीय मंडळावर त्यांनी अनेक वर्षे काम केले.

- डॉ. यशवंत देशपांडे

**केरुनाना छत्रे**

☞ **पहा - छत्रे, विनायक लक्ष्मण**

**केळकर, पुरुषोत्तम काशीनाथ**
**अभियंता, शिक्षणतज्ज्ञ**
**१ जून १९०९ - २३ ऑक्टोबर १९९०**



तंत्रविज्ञान क्षेत्रातील अग्रगण्य विद्वान शास्त्रज्ञ आणि भारतामध्ये तंत्रविज्ञान क्षेत्रात अद्ययावत शिक्षण देणाऱ्या संस्थांची मुहूर्तमेढ रोवणारे कर्तबगार तंत्रज्ञ म्हणून पुरुषोत्तम काशीनाथ केळकर परिचित आहेत.

डॉ. पुरुषोत्तम काशीनाथ केळकर यांचा जन्म धारवाड येथे झाला. त्यांचे वडील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते. सुरुवातीचे शिक्षण धारवाडला पार पडल्यावर १९३० साली त्यांनी मुंबईच्या ‘रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स’ (इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स) येथे भौतिकी विषयात बी. एस्सी. पदवी प्राप्त केली. त्यानंतर विद्युत अभियांत्रिकीत उच्चशिक्षण घेण्यासाठी ते बंगळुरूच्या ‘इंडियन

इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' या संस्थेत दाखल झाले. अभियांत्रिकी आणि तांत्रिक क्षेत्रात पदव्युत्तर शिक्षण आणि संशोधन करणाऱ्या मोजक्या संस्थांमध्ये 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' ही अग्रगण्य होती. ह्या संस्थेतील अभ्यासक्रम उत्तमरितीने पार पाडून अधिक संशोधनासाठी त्यांनी इंग्लंडमधील लिव्हरपूल विद्यापीठाकडे प्रयाण केले. १९०६ साली त्यांना पीएच.डी. ही पदवी मिळाली.

विद्युत अभियांत्रिकीमध्ये डॉक्टरेट मिळविली असूनही शिक्षण व संशोधनात रस असल्यामुळे, भारतात परतल्यावर आर्थिक सुबत्ता देणाऱ्या उद्योगधंद्याकडे न वळता, डॉ. केळकर बंगळुरूला 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' संस्थेत व्याख्याता म्हणून रुजू झाले. या ठिकाणी नोबेल पारितोषिक विजेते सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ, सर चंद्रशेखर व्यंकट रमण हे संचालक होते. डॉ. होमी भाभा हे इंग्लंडहून सुटीमध्ये भारतात आले होते. दुसरे महायुद्ध सुरू झाल्यामुळे त्यांना इंग्लंडला जाता येईना, म्हणून त्यांनी बंगलोरच्या भारतीय विज्ञान संस्थेत संशोधन चालू ठेवले. याच वेळी डॉ. विक्रम साराभाई हे त्याच संस्थेत भौतिकशास्त्रात संशोधन करत होते. विज्ञान क्षेत्रात पुढे नेतृत्व गाजविणाऱ्या या शास्त्रज्ञांचा सहवास डॉ.केळकरांना लाभला हा एक दुर्मीळ योग होता.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पं. नेहरूंनी विज्ञान व तंत्रज्ञान क्षेत्रामध्ये प्रगती करण्यासाठी अनेक योजना आखल्या. या योजनांच्या अंतर्गत विज्ञान आणि तंत्रज्ञानामध्ये संशोधनाला चालना देण्यासाठी सरकारने 'वैज्ञानिक व औद्योगिक संशोधन विभाग' (कौन्सिल ऑफ सायंटिफिक ॲण्ड इंडस्ट्रियल रिसर्च-सी.एस.आय.आर) स्थापन केला. डॉ. शांतिस्वरूप भटनागर या महान शास्त्रज्ञावर या विभागाची जबाबदारी सोपविण्यात आली. त्यांनी भारतामध्ये वेगवेगळ्या क्षेत्रामध्ये अद्ययावत संशोधन करणाऱ्या प्रयोगशाळांचे जाळे निर्माण केले. तंत्रज्ञानाच्या शिक्षण व संशोधन क्षेत्रात 'भारतीय तंत्रविज्ञान संस्था' (इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी - आय.आय.टी.) उभारण्याची महान कामगिरी डॉ. पु. का. केळकर यांच्यावर सोपविण्यात आली व मुंबई आणि कानपूर येथे नमुनेदार संस्था स्थापन करून त्यांनी ती पार पाडली.

१९४३ साली डॉ. केळकर मुंबईच्या व्ही.जे.टी.आय. या तंत्रशिक्षण संस्थेत विद्युत अभियांत्रिकी विभागाचे प्रमुख म्हणून रुजू झाले. या संस्थेची वाढ घडवून आणण्याच्या दिशेने त्यांनी यशस्वी पावले उचलली. त्यांनी देशातील पहिली इंपल्स टेस्टिंग उपकरण प्रणाली उभारली. त्यांनी मुंबईच्या परिसरातील उद्योगधंद्यांशी संस्थेचे संबंध दृढ करण्याचे यशस्वी प्रयत्न केले. मुंबई विद्यापीठाशी संलग्न अभियांत्रिकी पदवी आणि पदव्युत्तर अभ्यासक्रमाची आखणी व अंमलबजावणी करण्यात त्यांचा महत्त्वाचा सहभाग होता.

राष्ट्रीय पातळीवर उच्च दर्जाच्या अत्याधुनिक तंत्रशिक्षण व संशोधनाला वाहिलेली एक संस्था स्थापन करण्याचे सरकारने ठरविले. या कल्पनेप्रमाणे मुंबईमध्ये इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी-आय.आय.टी. उभारण्याचे सरकारने ठरविले. या कामी युनेस्कोमार्फत सोव्हिएट युनियनची मदत उपलब्ध होणार होती. १९५५ साली भारत व युनेस्कोच्या संयुक्त शिष्टमंडळाने सोव्हिएट युनियनला दीर्घ भेट दिली. डॉ. केळकर त्या शिष्टमंडळाचे सदस्य होते. १९५६ साली मुंबईच्या तंत्रविज्ञान संस्थेचे योजना अधिकारी म्हणून केळकरांची नेमणूक झाली व संस्थेचा आराखडा तयार करून तिची उभारणी करण्याचे काम त्यांच्यावर सोपविण्यात आले. मुंबईमध्ये पवई तलावाच्या काठी, रम्य परिसरामधील जागेची निवड करण्यात आली.

संस्थेची प्राथमिक आखणी, अध्यापकवर्गाची निवड इत्यादी पायाभरणीची कामे करून १९५८ साली प्रवेश देण्यासाठी वैशिष्ट्यपूर्ण प्रवेश परीक्षा घेऊन अत्यंत हुशार विद्यार्थ्यांनाच प्रवेश देण्याची परंपरा या पहिल्या तुकडीपासूनच सुरू झाली. पहिल्या वर्षी डॉ. केळकरांना संस्थेचे उपसंचालक पद देण्यात आले. परंतु पुढील वर्षी एका बाहेरच्या व्यक्तीला संचालक पद दिले गेले. त्यामुळे नाराज होऊन डॉ. केळकर संस्थेतून बाहेर पडले. परंतु, मुंबईची संस्था उभारण्यात त्यांनी केलेल्या कष्टांचे फळ



**आय.आय.टी., कानपूर**

त्यांना लवकरच मिळाले.

मुंबईप्रमाणेच कानपूर येथेही आय.आय.टी. स्थापन करण्याचे ठरले. या कामात अमेरिकन आंतरराष्ट्रीय विकास योजनेमार्फत मदत मिळणार होती आणि नऊ अमेरिकन विद्यापीठांचे एक मंडळ या कामी भारताशी सहकार्य करणार होते. डिसेंबर १९५९ मध्ये डॉ. केळकरांची कानपूर आय.आय.टी.चे संस्थापक-संचालक म्हणून नेमणूक झाली. डॉ. केळकरांनी मुंबईप्रमाणे याही ठिकाणी अगदी कोऱ्या पाटीवर सुरुवात करून संस्थेची वर्षभरातच उभारणी केली व पहिल्या तुकडीचे वर्ग सुरूकेले.

त्यांनी अमेरिकेतील नामवंत विद्यापीठांना भेटी दिल्या व प्राध्यापकांची देवाणघेवाण घडवून आणली. थोड्याच काळात देशातील प्रथम दर्जाच्या शिक्षण व संशोधन संस्थांमध्ये कानपूर आय. आय. टी.ने वरचे स्थान मिळविले. कानपूर येथील डॉ. केळकरांची कारकीर्द १९७० सालापर्यंत चालली.

मुंबईप्रमाणे कानपूर येथील संस्था ही निवासी संस्था असल्यामुळे संस्थेचे विद्यार्थी, प्राध्यापक व इतर कर्मचारी यांच्यासाठी आवास संकुलाची उभारणी करावयाची होती. हे कामही डॉ. केळकरांनीच पूर्ण केले. नामवंत वास्तुशिल्पी श्री. अच्युत कानविंदे ह्यांच्या मार्गदर्शनाखाली उभारलेल्या या वास्तुसंकुलाच्या तपशिलातही डॉ. केळकरांनी लक्ष घातले व एक वैशिष्ट्यपूर्ण वास्तुरचना असलेले परिपूर्ण शैक्षणिक संकुल उभारले. हे संकुल आधुनिक भारतातील उत्कृष्ट वास्तूंमध्ये गणले जाते.

१९७० साली डॉ. केळकर यांना मुंबई आय. आय. टी.चे संचालक पद देण्यात आले. त्यांनीच स्थापन केलेली संस्था आता चांगली नावारूपाला आली होती. डॉ.केळकरांनी आपल्या कारकिर्दीत अनेक सुधारणा घडवून आणल्या. येथे असताना सोव्हिएट विज्ञान अकादमीच्या निमंत्रणावरून त्यांनी सोव्हिएट युनियनला भेट दिली. अकादमीतर्फे सायबेरियातील नवसिबिर्स्क येथे खास विज्ञान शहर उभारले गेले होते. ते पाहून डॉ. केळकर फार प्रभावित झाले होते.

मूळचे सुसंस्कृत व्यक्तिमत्त्व, विविध विषयांवरील वाचन, देशात व परदेशात घेतलेले अत्युच्च शिक्षण, तसेच शिक्षण व संशोधन ह्या क्षेत्रांची जन्मजात आवड असल्यामुळे त्यांनी प्रशिक्षण-संशोधन संस्था स्थापन करण्याची नवीन जबाबदारी आनंदाने स्वीकारली आणि उच्च दर्जाची शिक्षण-संशोधन संस्था कशी असावी, ह्याची त्यांची कल्पना साकार केली. मुंबई व कानपूर येथील संस्था उभारताना त्यांना सोव्हिएट व अमेरिकन समाजव्यवस्था व त्या देशांतील शिक्षणसंस्थांचे जवळून निरीक्षण करण्याची संधी लाभली. त्यातून भारतीय संदर्भात योग्य ते स्वीकारण्याचा व अयोग्य ते बाजूला ठेवण्याचा संतुलित दृष्टिकोन स्वीकारून त्यांनी शिक्षणसंस्थांचा आदर्श निर्माण केला. त्यांनी निर्माण केलेल्या मार्गावरूनच भारतात इतरही ठिकाणी तंत्रविज्ञान संस्था स्थापन केल्या गेल्या.

अभियांत्रिकीत प्रगती करण्यासाठी आधुनिक काळात विज्ञानाचा पाया मजबूत हवा, त्याचबरोबर सामाजिक विज्ञान आणि मानसशास्त्र या विषयांची यथोचित जाणीव हवी, अशा व्यापक भूमिकेतून त्यांनी भारतीय तंत्रविज्ञान संस्थेतील केवळ अभ्यासक्रमच नव्हे, तर इतरही सोयीसुविधांची आखणी केली. त्यासाठी लागणारी शैक्षणिक व व्यवस्थापकीय लवचीकता, तसेच साधनसामग्री गोळा करण्याचे कौशल्यही दाखविले. गणित, भौतिकी, रसायन, समाजशास्त्र, विज्ञानाचे तत्त्वज्ञान इत्यादी विषयांचे भारतीय तंत्रविज्ञान संस्थांतील विभाग आज अनेक विद्यापीठांतील या विषयांच्या

विभागांपेक्षा अधिक कार्यक्षमतेने व सर्जनशीलतेने कार्य करताना आढळतात, हे त्यांच्या व्यापक दृष्टीचे फलित आहे. विज्ञान व तंत्रज्ञान याच समाजात रुजून वाढले पाहिजे. ते नुसते आयात केल्यास आपण तंत्रवैज्ञानिक गुलामगिरीस बळी पडू, असा सावधगिरीचा इशाराही त्यांनी दिला होता. या दृष्टीने समाजात वैज्ञानिक दृष्टिकोन रुजविणाऱ्या संस्थांच्या कार्यामध्ये ते रस घेत असत. मराठी विज्ञान परिषदेच्या कार्याबद्दल त्यांना आस्था होती. १९७० साली मराठी विज्ञान परिषदेच्या नागपूर येथे भरलेल्या पाचव्या अधिवेशनाचे अध्यक्षपदही त्यांनी भूषविले होते.

— श्री. र. म. भागवत

***संदर्भ :***

*१. देशपांडे अ.पां.; संपादक, 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन; २००५*

## केळकर, रंजन रत्नाकर

**हवामानशास्त्रज्ञ**

**१९ डिसेंबर १९४३**



डॉ. रंजन रत्नाकर केळकर यांचा जन्म मुंबई येथे झाला. मुंबईतील दादर येथील बालमोहन विद्यामंदिर आणि पुण्यातल्या सेंट जॉन्स या शाळांमधून त्यांनी शालेय शिक्षण घेतले. पदार्थविज्ञान आणि त्यातही संशोधनाची विशेष आवड असल्यामुळे शालेय शिक्षणानंतर त्यांनी फर्गसन महाविद्यालय, पुणे येथून पदार्थविज्ञान या विषयात बी.एस्सी. आणि एम.एस्सी. केले. यानंतर मात्र डॉ.रंजन केळकर आपण पुढे कोणत्या क्षेत्रात काम करावे याविषयी विचार करत असताना, त्यांचे वडील रत्नाकर हरी केळकर यांनी त्यांना एक मोलाचा सल्ला दिला. दैनंदिन व्यवहारात प्रतिकूल असणाऱ्या एखाद्या परिस्थितीतून किती सकारात्मक विचार करता येतो, हेच या सल्ल्यातून दिसून येते. यासाठीच त्या सल्ल्याची पार्श्वभूमी जाणून घेणे महत्त्वाचे आहे.

डॉ. रंजन केळकर यांचे वडील अलिबाग येथे राहत होते. त्यांना त्यांच्या शाळेच्या दिवसांत मेणबत्तीच्या प्रकाशात अभ्यास करावा लागे. त्या काळी अलिबागमध्ये वीज नसण्याचे प्रमुख कारण, भारतीय हवामानशास्त्र विभाग म्हणजेच इंडिया मीटिओरोलॉजिकल डिपार्टमेंट आय.एम.डी. ही संस्था होती. त्या काळात हवामान वेधशाळा अलिबाग येथे होती. वेधशाळेत भूचुंबकीय मोजमापने होत असत. त्या मोजमापनांवर विद्युत तारांमधून वाहणाऱ्या विद्युत ऊर्जेचा परिणाम होत असे व मोजमापनांमध्ये अडथळा निर्माण होत असे; म्हणून अलिबागमध्ये विद्युत ऊर्जा वापरण्यावर बंदी होती. जेव्हा या वेधशाळेमध्ये विद्युत ऊर्जेबाबत फारशी संवेदनशील नसलेली उपकरणे दाखल झाली तेव्हाच, म्हणजे १९५० साली अलिबागमध्ये वीज अवतरली. या सर्व प्रकारामुळे रत्नाकर हरी केळकर यांच्या मनात हवामान खाते आणि त्याच्या कामाविषयी प्रचंड कुतूहल निर्माण झाले होते. या पार्श्वभूमीवर त्यांनी आपल्या पदार्थविज्ञानात एमएस्सी झालेल्या मुलाला, रंजन यांना, हवामान खात्यात दाखल होऊन संशोधन करण्याविषयी सुचवले. त्यानुसार त्यांनी हवामान खात्यात दाखल होण्याचे ठरवले.

१९६५ साली केळकर यांना आय.एम.डी. येथे वैज्ञानिक साहाय्यक म्हणून काम करण्याची संधी, तसेच पीएच.डी.साठी काम करण्याची संधी मिळाली. त्यानंतरची ३८ वर्षे, कृषी हवामानशास्त्र, उपग्रह हवामानशास्त्र, पुर्वानुमान सेवा, हवामानविषयक उपकरणे, मान्सून मॉडेलिंग, अशा हवामान खात्याच्या विविध क्षेत्रांत त्यांनी संशोधनाचे कार्य करत, सेवाकालाची शेवटची सहा वर्षे हवामान खात्याचे महासंचालक म्हणून काम पाहिले.

१९७१ साली त्यांना पुणे विद्यापीठातून पीएच.डी. ही पदवी प्रदान करण्यात आली. त्यांनी पीएच.डी.साठी 'वातावरणाच्या अभिसरणाशी असलेला विकिरणांचा



**हवामान अभ्यासाचे उपग्रह चित्र**

संबंध' या विषयावर प्रबंध लिहिला. पृथ्वीवरील हवामानात होणाऱ्या सर्व प्रकारच्या बदलांमागे सूर्याची ऊर्जा हा एक प्रमुख स्रोत आहे. परंतु तसे असले तरी पृथ्वीच्या वातावरणावर सूर्याच्या थेट उष्णतेचा परिणाम होत नाही. सूर्याकडून येणाऱ्या उष्णता-ऊर्जेमुळे पृथ्वीचा पृष्ठभाग तापतो. तापलेल्या पृष्ठभागाकडून जास्त तरंगलांबीच्या उष्णतेचे तरंग उत्सर्जित केले जातात. त्यांतील काही ऊर्जा अवकाशात परत फेकली जाते, तर काही ऊर्जा हवेच्या थरांतून आरपार जाऊ शकत नाही आणि परत पृथ्वीकडे पाठवली जाते. ही उष्णता-ऊर्जा पृथ्वीच्या वातावरणात साचून राहते. त्यामुळे हवेच्या थरांची हालचाल सुरू होते व हवामानात काही बरेवाईट बदल होतात. केळकर यांनी संगणकाच्या मदतीने या सर्व लहानमोठ्या बदलांच्या नोंदी आणि संगणन केले. त्यातून काही महत्त्वाचे निष्कर्ष काढले. हरितगृह परिणामांमुळे होणारे वातावरणीय बदल आणि वैश्विक तापमानवाढ यांविषयी सध्या बरेच संशोधन होत आहे; पण डॉ.केळकर हे काळाच्या बरेच पुढे होते, त्यांनी १९६५ सालीच या विषयावर संशोधन सुरू केले होते.

केळकर यांनी, मान्सूनच्या काळात भारतीय भूखंडातून उत्सर्जित होणाऱ्या उष्णता-ऊर्जेच्या जास्त तरंगलांबीच्या विकिरणांचे संगणन करून त्यावर 'इंडियन जर्नल ऑफ मीटिओरोलॉजी अँड जिओफिजिक्स' या जर्नलमधून शोधनिबंध लिहिला व त्या शोधनिबंधाला पुरस्कार प्राप्त झाला. भारताच्या हवामानशास्त्राच्या इतिहासातील, संपूर्णपणे संगणनांचा वापर करत निष्कर्ष काढणारा, तो पहिलाच शोधनिबंध होता. तसेच डॉ.केळकर यांनी भारतीय मान्सूनसंबंधी तयार केलेले पहिलेच सांख्यिकी प्रारूप तयार करण्यात सक्रिय सहभाग घेतला होता.

१९९७ ते १९९९ या कालावधीत केळकर यांनी इंडियन मीटिओरोलॉजी सोसायटीचे अध्यक्षपद भूषविले. त्यांची कुशाग्र बुद्धिमत्ता आणि संशोधनाचा प्रदीर्घ अनुभव लक्षात घेऊन, भारत सरकारने त्यांना १९९९ ते २००३ या कालावधीत वर्ल्ड मीटिओरोलॉजिकल ऑर्गनायझेशन, जिनिव्हा येथे भारताचे प्रतिनिधी म्हणून पाठवले होते. तसेच संयुक्त राष्ट्र संघाच्या कार्यकारी परिषदेचे सभासद म्हणूनही त्यांची निवड झाली होती.

२००३ साली हवामान खात्यातून निवृत्त झाल्यानंतर, त्यांनी भारतीय उष्णकटिबंधीय हवामानशास्त्र संस्थेच्या नियामक समितीचे, तसेच इस्रोच्या अवकाशशास्त्र सल्लागार समितीचे सदस्यपद आणि वसुंधरा ट्रस्टचे विश्वस्तपदही स्वीकारले. सध्या ते पुणे येथील इस्रो अवकाश अध्यासनात प्राध्यापक म्हणून मार्गदर्शन करत आहेत. नव्या पिढीला किंवा सर्वसामान्यांनासुद्धा हवामानविषयक अनेक संकल्पनांची माहिती व्हावी या उद्देशाने ते लोकसत्ता, सकाळ यांसारख्या दैनिकांतून सातत्याने लिखाण करत असतात. २००६ साली 'उपग्रह हवामानशास्त्र' या विषयावर त्यांचे एक पुस्तक प्रसिद्ध झाले आहे.

– डॉ. मानसी राजाध्यक्ष

***संदर्भ :***

*१. 'ड्रीम २०४७'; विज्ञान प्रसार, नवी दिल्ली; जून २००३.*

क

## कोकटनूर, वामन रामचंद्र
**रसायनशास्त्रज्ञ**
**१८८७ - १४ एप्रिल १९५०**

आंतरराष्ट्रीय ख्यातीचे रसायनशास्त्रज्ञ व प्रेशर कूकरचे संशोधक डॉ. कोकटनूर यांचा जन्म भूतपूर्व मुंबई इलाख्यातील अथणी या गावी झाला. १९११ साली मुंबई विद्यापीठाची बी.एस्सी. पदवी संपादन केल्यावर त्यांनी एक वर्ष पुण्याच्या रानडे औद्योगिक संस्थेमध्ये रसायनतज्ज्ञ म्हणून काम केले. नंतर लगेच ते शिष्यवृत्तीवर अमेरिकेत कॅलिफोर्निया राज्यातील ऑकलंड शहरात गेले. परंतु ज्या पिकावर संशोधन करायचे ते बटाट्याचे पीक त्या वर्षी साफ बुडाल्याने त्यांना शिष्यवृत्ती सोडावी लागली. मग त्यांनी जगप्रसिद्ध कॅलिफोर्निया फ्रूट कॅनर्स असोसिएशनच्या कारखान्यात संशोधक म्हणून नोकरी मिळवली. तेथे त्यांनी नानाविध प्रयोग केले.

पुढे ती नोकरी सोडून त्यांनी उच्चशिक्षण संपादन करण्यासाठी मिनेसोटा विद्यापीठात प्रवेश मिळवला. या विद्यापीठात ते १९१४ व १९१५ साली 'शेवलीन फेलो' म्हणून होते. एम.एस्सी. पदवी संपादन केल्यावर, त्यांनी १९१६ साली याच विद्यापीठात पीएच.डी. पदवी संपादन केली. डॉ.कोकटनूरांची उल्लेखनीय बाब म्हणजे ते विद्यापीठात शिकत असताना, त्यांनी लिहिलेले प्रबंध अमेरिकन केमिकल सोसायटीच्या जर्नलमध्ये प्रसिद्ध झाले. इतकेच नव्हे, तर त्यांच्या पीएच.डी.चा प्रबंध त्या जर्नलमध्ये आवर्जून प्रसिद्ध करण्यात आला.

विद्यापीठातून शिक्षण घेत असताना त्यांनी अनेक नामांकित रासायनिक कंपन्यांत संशोधक म्हणून काम केले. १९२२ साली त्यांनी रसायनशास्त्राच्या अनेक शाखांचे सल्लागार म्हणून स्वत:ची कंपनी काढली. दरम्यान, १९२१ साली त्यांनी अमेरिकन नागरिकत्व स्वीकारले. १९२८ साली क्लोरीन व कॉस्टिक सोडा वापराबाबत खास तज्ज्ञ म्हणून ते पंचवार्षिक योजनेला मदत करण्यासाठी रशियाला गेले होते. ही बाब त्यांच्या रसायनशास्त्रातील बुद्धिमत्तेची कल्पना देणारी ठरते. नंतर दोन वर्षांनी त्यांनी भारतातील श्रीशक्ती अल्कली कारखान्यात सल्लागार व्यवस्थापक म्हणून काम केले. याखेरीज १९३३ सालापर्यंत भारतातील अमेरिकन ट्रेड कमिशनवर त्यांनी मानद सल्लागार म्हणून काम पाहिले.

डॉ. कोकटनूरांच्या नावावर डझनभर विशेष शोध आणि तीसच्यावर एकस्वे आहेत. हे शोध औद्योगिक क्षेत्राला उपयुक्त ठरणारे आहेत. यांमधील उल्लेखनीय शोध म्हणजे पेट्रोलमध्ये एका खास मार्गाने पाणी मिसळल्यास पेट्रोलची क्षमता वाढणारी ठरते. विमानाच्या पंख्याला 'डोप' नावाचे द्रव्य लागे. त्याची निर्मिती प्रक्रिया त्या काळात धोकादायक मानली जाई. कोकटनूरांनी केलेल्या शोधामुळे ते बिनधोक व्यापारी पातळीवर उपयोगात येऊ शकले. तसेच 'रेड डाय' नावाच्या तांबड्या रंगाबाबत. हा रंग कापसाच्या व लोकरीच्या कापडांत मिसळण्यासाठी उपयोगी पडे. त्याची प्रक्रिया खर्चिक होती. कोकटनूरांनी हा रंग कमी किमतीत उत्पादित होईल असा शोध लावला. तसेच, साबण तयार करताना त्यातून 'ग्लिसरीन' नावाचे द्रव्य निघे. ते गोळा करण्यासाठी मोठ्या कारखान्याची गरज भासे. कोकटनूरांनी हे द्रव्य छोट्या प्रमाणातही मिळविता येते, असा शोध लावला. महिलांना स्वयंपाकघरात लागणाऱ्या प्रेशर कुकरचे ते मूळ उत्पादक मानले गेले. त्याचे त्यांनी मुंबईत एकस्व घेतले होते. अशा अनेक शास्त्रीय शोधामुळे कोकटनूरांचे नाव अमेरिकेतील नावाजलेल्या रसायनशास्त्रज्ञांच्या नामावलीत झळकले गेले. त्यामुळे त्यांचे नाव अमेरिकेत 'मॅन ऑफ सायन्स', 'हूज हू ऑफ ईस्ट'मधील प्रसिद्ध व्यक्तींत अंतर्भूत झाले आहे. याखेरीज अमेरिकन केमिकल सोसायटी, अमेरिकन इलेक्ट्रोकेमिकल सोसायटीसारख्या मातब्बर संस्थांनी त्यांना आपले सभासद करून घेतले, तर अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ केमिस्ट, इत्यादी संस्थांनी त्यांना आपले सन्माननीय फेलो करून घेतले. १९४० साली अग्रगण्य संशोधक म्हणून 'युनायटेड स्टेट्स पेटंट ऑफिस'च्या समारंभात त्यांना गौरविण्यात आले आणि न्यूयॉर्कला भरलेल्या जागतिक मेळाव्यात 'वॉल ऑफ

फेम' म्हणून त्यांची निवड करण्यात आली.

डॉ.कोकटनूर अमेरिकेतील अनेक मान्यवर कंपन्यांचे व संस्थांचे सल्लागार होते. तसेच ते भारतातून कार्यरत असणाऱ्या वटूमल फाउंडेशनच्या संचालक मंडळाचे सल्लागारही होते. असा हा थोर शास्त्रज्ञ वयाच्या त्रेसष्टाव्या वर्षी अमेरिकेत निधन पावला.

- ज. बा. कुलकर्णी

***संदर्भ :***

१. *मराठी विज्ञान परिषद-पत्रिका; एप्रिल १९९८.*

## कोगेकर, नारायण वासुदेव

**भौतिकशास्त्रज्ञ, विज्ञानलेखक**

**७ ऑगस्ट १९११**



भौतिकशास्त्राचे प्राध्यापक, 'मराठी विज्ञान परिषदे'चे एक संस्थापक आणि प्रभावी विज्ञानप्रसारक अशी नारायण वासुदेव कोगेकरांची ओळख आहे.

सर्वसामान्य जनतेसाठी मराठी भाषेतून विज्ञान-तंत्रज्ञानविषयक माहितीचा प्रसार करून ज्यांनी लोकजागृतीचे कार्य केले, त्यांमध्ये प्रा.ना.वा. कोगेकर यांचे प्रयत्न विशेष उल्लेखनीय आहेत. त्यांचा जन्म खामगाव येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण आणि महाविद्यालयीन शिक्षण पुणे आणि मुंबई येथे झाले. भौतिकशास्त्र या विषयाची निवड करून त्यांनी मुंबई विद्यापीठाची एम.एस्सी. पदवी मिळवली. सुरुवातीला त्यांनी तत्कालीन मुंबई सरकारच्या उद्योगखात्यामध्ये नोकरी केली. तथापि, अध्यापन हे त्यांचे आवडते क्षेत्र होते म्हणून त्यांनी महर्षी दयानंद महाविद्यालय आणि नंतर मिठीबाई महाविद्यालयात भौतिकशास्त्र विभागप्रमुख म्हणून कार्य केले. स्वातंत्र्योत्तर काळात जनतेत वैज्ञानिक दृष्टिकोन रुजवण्यासाठी त्यांनी विविध वृत्तपत्रांमध्ये लेख लिहायला सुरुवात केली. जनमानसामध्ये त्याचा




अनुकूल परिणाम दिसून आला. तसेच, विविध व्यासपीठांवरून आणि आकाशवाणीसारख्या प्रभावी माध्यमांचा आधार घेऊन त्यांनी विज्ञानातील घडामोडी सर्वसामान्य श्रोत्यांपुढे आणल्या. त्यांच्या आकाशवाणीवरील 'श्रुतिका' लोकप्रिय झालेल्या होत्या.

आपण निसर्गातील अनेक मनोहारी किंवा कधी इंद्रधनुष्यासारखे गूढरम्य आविष्कार पाहतो. प्रा.कोगेकरांनी त्यांच्यामध्ये दडलेले विज्ञान सोप्या भाषेत लिहिले. त्यांतील निवडक लेखन त्यांनी संकलित केले आणि 'निसर्गाचा प्रपंच' आणि 'निसर्ग-नवलाई' ही दोन पुस्तके प्रसिद्ध केली.

कुमार वाङ्मयनिर्मितीसाठी त्यांनी 'संशोधकांचे बालपण', 'विज्ञानयुगातील शिल्पकार', 'विज्ञानाचे अलंकार' अशा शीर्षकांची पुस्तके लिहिली. 'विज्ञान युगातील शिल्पकार' या पुस्तकाचे एकूण आठ भाग आहेत. त्यांमध्ये आर्किमिडीज, पायथॅगोरस, कोपर्निकस, गॅलिलिओ, कॅव्हेंडिश, न्यूटन, हूक, बॉइल, पाश्चर, मेरी क्यूरी अशा अनेक थोर शास्त्रज्ञांचा परिचय त्यांनी सुबोध भाषेत करून दिला आहे. शास्त्रज्ञांच्या कथा आपल्या विद्यार्थ्यांना स्फूर्तिदायक ठराव्यात, अशी त्यांची अपेक्षा होती. आपल्या देशातही अनेक मान्यवर शास्त्रज्ञ-तंत्रज्ञ होऊन गेले. 'भारतीय विज्ञान-तपस्वी', 'विज्ञान युगाचे निर्माते' या त्यांच्या पुस्तकांत मान्यवर भारतीय शास्त्रज्ञांची एक मालिका त्यांनी प्रस्तुत केली होती.

आधुनिक विज्ञानातील घडामोडींचा परामर्ष घेण्यासाठीही त्यांनी 'विज्ञानाची वाटचाल', 'किरणांच्या दुनियेत', 'अंतरिक्ष प्रवास', 'विज्ञान दीप' यांसारखी अनेक पुस्तके लिहिली. त्यामुळे अद्ययावत

माहितीचा खजिना गरजू वाचकांना सातत्याने उपलब्ध होत असे. त्यांची काही पुस्तके रूपांतरित आहेत, तर काही स्वतंत्र आहेत. ‘जग बदलले या शोधांनी’ या त्यांच्या पुस्तकाचे इंग्रजीमध्ये अली मीर नजबान यांनी भाषांतर केले आणि ते नॅशनल बुक ट्रस्ट या संस्थेने प्रकाशित केले. त्यामुळे त्यांचा वाचकवर्ग अधिकच विस्तृत होत गेला. विश्वाची उत्पत्ती, व्यापकता आणि रचना या गूढ विषयांमधील विज्ञान वाचकांना खिळवून ठेवते, हे लक्षात घेऊन प्रा.कोगेकरांनी ‘आपल्या ग्रहमालेतील नवग्रह’, ‘चंद्रावर सफर’, ‘सूर्य आणि सूर्यशक्तीचे उपयोग’, अशी अनेक पुस्तके लिहिली. ‘चंद्रावर सफर’ ही एक वैज्ञानिक कादंबरी आहे. विज्ञान-तंत्रज्ञानातील रंजकता, कथा आणि कादंबऱ्यांच्या स्वरूपात त्यांनी वाचकांपुढे सादर केली. महाराष्ट्रातील आघाडीच्या वृत्तपत्रांमध्ये त्यांनी दर महिन्यात, रात्रीच्या आकाशात ग्रह-तारे-नक्षत्र यांचे स्थान कुठे आहे, यासंबंधीचे मार्गदर्शन करणारे लेख लिहिले. या दीर्घकाळ चाललेल्या उपक्रमामुळे अनेकांना खगोलशास्त्राचा परिचय झाला. एवढेच नव्हे, तर या विषयांमधील गूढरम्यता लक्षात आली.

भारतामध्ये दि. १ एप्रिल १९५७ पासून दशमान पद्धतीचा वापर सुरू झाला. त्यामधील सुलभता लोकांना चटकन कळावी म्हणून त्यांनी ‘मोजमापनाची उत्क्रांती आणि दशमान पद्धती’ हे पुस्तक लिहिले. भारतात दशमान पद्धतीचा अवलंब एका रात्रीत सहजतेने झाला होता. कुठेही गोंधळ, घोटाळा झाला नव्हता. याचे काही प्रमाणात श्रेय प्रा.कोगेकर यांच्यासारख्या नि:स्पृह विज्ञान-तंत्रज्ञानाचा प्रसार करणाऱ्या लेखकांकडे जाते. त्यांनी वेळोवेळी प्रासंगिक विषयांवर लेखन करून जनप्रबोधन केले होते. पुणे विद्यापीठाच्या बहि:शाल शिक्षण मंडळ आणि पुणे विद्यार्थी गृह यांच्यातर्फे प्रकाशित झालेल्या नऊ लोक प्रबोधन पुस्तिकांचे त्यांनी लेखन केले. त्यांच्या काही पुस्तकांच्या नवीन आवृत्त्या काढाव्या लागल्या, तर काही पुस्तकांचे पुनर्मुद्रण करावे लागले. त्यांच्या निवडक पुस्तकांना महाराष्ट्र शासनातर्फे पुरस्कार मिळाला.

त्यांच्या लेखनाची शैली रंजक आणि सुबोध होती. त्यांनी वैज्ञानिक लेखन करताना आवश्यक असलेला काटेकोरपणा, अचूकता आणि नेमकेपणा कधी सोडला नाही. विज्ञान प्रसार करण्यासाठी त्यांनी ‘मराठी विज्ञान परिषदे’ची स्थापना करण्यासाठी प्रयत्न केले. ते ‘मविप’चे आजीव सदस्य होते आणि काही काळ त्यांनी परिषदेच्या कार्यकारी मंडळावर काम केले होते. अखेरपर्यंत अविश्रांत परिश्रम करून प्रा.ना.वा. कोगेकर यांनी विज्ञान प्रसार करून लोकप्रबोधनाचे कार्य चालू ठेवलेले होते.

– डॉ. अनिल लचके

***संदर्भ :***

*१. सहावे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, मुंबई; १९७१.*

## कोरिया, चार्ल्स मार्क

**वास्तुरचनाकार**

**१ सप्टेंबर, १९३०**



चार्ल्स मार्क कोरिया यांचे घराणे गोव्यातील. त्यांचा जन्म सिकंदराबाद येथे झाला. शिक्षणासाठी ते मुंबईत आले. शालेय व महाविद्यालयीन अभ्यासक्रम त्यांनी ‘सेंट झेवियर्स’ या शिक्षणसंस्थेत पूर्ण केला. वास्तुशिल्पकलेच्या पुढील अध्ययनासाठी त्यांनी अमेरिकेतील मिशिगन येथे प्रवेश घेतला. नंतर मॅसॅच्युसेट्स इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजीमधून ‘मास्टर्स’ पदवी घेतली. १९५८ साली त्यांनी मुंबईत वास्तुविशारद म्हणून व्यवसायास सुरुवात केली. त्यांच्या एकापेक्षा एक अप्रतिम व उत्कृष्ट वास्तू भारतात व जगभर पाहावयास मिळतात.

एका वेगळ्या शैक्षणिक वातावरणातून व दृष्टिकोनातून आलेल्या विशीतील तरुणाला मुंबईच्या फोर्टमधील हॅन्डलूम हाउसचे छोटेसे इंटिरियरचे काम



**'आयुका'ची इमारत, पुणे विद्यापीठ परिसर**

मिळाले. त्यातून त्यांनी आपले वेगळेपण व कल्पकता निदर्शनास आणून दिली. पाश्चिमात्य शिक्षण घेऊन आलेल्या कोरियांनी तेथील आधुनिक वास्तुकलेशी फारकत घेतली. येथील संस्कृतीशी, हवामानाशी व आर्थिक बंधनाशी निगडित अशा वास्तू उभारण्याचे त्यांनी व्रत घेतले.

परंपरागत बांधकामाच्या प्रदीर्घ व सखोल निरीक्षणात्मक अभ्यासातून आधुनिक वास्तुकलेची संकल्पना विचारांती संपुष्ट होत गेली. ते त्यांचे स्वत:चे विचार होते. त्यामुळे त्यांची वास्तुशिल्पकला ही कोणा इतरांसारखी वाटत नाही, तर ती कोरियांचीच वाटते. वास्तुकलेला त्यांनी नवा संदर्भ दिला. ती पारंपरिक ढाच्याची वाटत नाही. तरीपण त्या विचारांची अभ्यासाशी जोड असल्याचे स्पष्ट दिसते. काही पाश्चिमात्य वास्तुविशारदांनी भारतात उभारलेल्या अपकृतीसारखी वाटत नाही. ती भारतीय मातीतून उभारलेली वाटते. त्याचे सुंदर उदाहरण म्हणजे, १९६३ साली त्यांचे पहिलेवहिले नावाजलेले साबरमतीमधील गांधी स्मारक संग्रहालय. त्याने साबरमती नदीच्या काठावर गांधी आश्रमाच्या वातावरणाशी, गांधीजींच्या सत्य व अहिंसेशी सरळ व साधे नाते जोडले. अनेक चौरस दालने एकमेकांशी मोकळ्या किंवा जलमय चौकोनांनी सांधलेली आहेत. विटांच्या खांबावर उभारलेली कौलारू छपरे नावीन्यपूर्ण आकार घेतात. त्यातून एक शांत, गंभीर वातावरणाची अनुभूती येते. यावर पाश्चिमात्य वास्तुकलेचा प्रभाव तसूभरही जाणवत नाही. आपली वास्तुकला आपल्या संस्कृतीवर व जनमानसावर आधारित असावी, ही त्यांची दृढ निष्ठा सिद्ध होते. या त्यांच्या पहिल्याच प्रकल्पाने त्यांना अपूर्व कीर्ती प्राप्त करून दिली. कोरियांच्या वास्तुकलेच्या व्यवसायाची वाटचाल व राष्ट्रप्रगतीचा काळ समांतर राहिला.

ब्रिटिश साम्राज्याच्या दीडशे वर्षांच्या काळात संवेदनशील कलाकृती निर्माण झाली नाही. येथील वास्तुकलेला आलेली मरगळ, आपल्या संस्कृती व समृद्ध वास्तुकलेविषयीची उदासीनता कधी संपेल अशा मानसिकतेत वास्तुविशारद असताना, चार्ल्स कोरिया, बाळकृष्ण दोशी, अच्युत कानविंदेंसारख्यांनी वास्तुकलेत चैतन्य आणले.

संस्कृती, हवामान, वातावरण, स्थानिक साधनसामग्री या संदर्भात अवकाशनिर्मितीच्या विषयाचा विचार व सर्जनशील संकल्पना यांवर त्यांच्या कलाकृती नावारूपाला येऊ लागल्या. भोपाळमधील 'विधानसभा भवन' ही त्यांपैकी एक लक्षणीय वास्तू म्हणावी लागेल. थोड्या अंतरावरील प्रसिद्ध बौद्ध स्तूपाचा गोलाकार या संदर्भातून या भवनाची संकल्पना साकारली गेली व तिला गोलाकार बाह्यरूप प्राप्त झाले. वास्तूच्या अंतरंगाचे निरीक्षण करताच अवकाशाचे वेगळेच रूप दृष्टीस पडते. घुमटामधील मोकळ्या सोडलेल्या जागेतून येणारी प्रकाशकिरणे अंतरंग सचेतन करतात. कोरियांनी प्रकाशाबरोबर साधलेला मेळ किती परिणामकारक होऊ शकतो, याची जाणीव होते. या उत्कृष्ट कलाकृतीला आगाखान पारितोषिक मिळाले.

उष्ण कटिबंधातील मॉरिशस या बेटावर आयुर्विमा महामंडळाच्या कार्यालयाच्या वास्तुसंकल्पनेत, हैदराबादच्या ई.सी.आय.एल. कार्यालय, चेन्नईच्या एम.आर.एफ. कार्यालय येथे छायाप्रकाशाचा प्रयोग परिणामकारक झालेला दिसतो. छतावर थोड्या-थोड्या अंतरावर ठेवलेल्या काँक्रीटच्या तुळईच्या छायारेषा

सूर्यप्रकाशात एक अद्‌भुत परिणाम करून जातात. छाया - प्रकाशाचा विलोभनीय खेळ ते आपल्या वास्तूत सहज हाताळतात. यातून विविध प्रतिमा पाहावयास मिळतात.

जयपूर येथील जवाहर कला केंद्राची संकल्पना अठराव्या शतकातील विद्याधर या नगर-रचनाकाराच्या शहर मांडणीवर आधारित आहे. उत्स्फूर्त, वेगळेच आकृतिबंध या त्यांच्या कामातून दिसतात. त्यात त्यांच्या विचारांची झेप दिसते. नऊ चौकोनांत नवग्रह मंडळ व मध्यभागी सूर्यकुंड असा प्रतिमात्मक आलेख येथे आयोजिला आहे. वास्तुपुरुषमंडलाशी संबंधित या वास्तूला वेगळीच प्रमाणबद्धता दिसून येते. त्यांच्या इतरही वास्तू नावीन्यपूर्ण वाटल्या, तरी परकीय वाटत नाहीत.

दिल्लीतील ब्रिटिश कौन्सिलची वास्तू अशीच डोळ्यांत भरण्यासारखी आहे. वैदिक काळातील कुंडाची कल्पना, मोगलांचे चारबाग, पाश्चिमात्यांचा विज्ञानावरील भर यांचा सुंदर मिलाफ प्रतीत करणारी संकल्पना येथे साकार झाली आहे. या प्रकल्पाचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे दर्शनी भागावर चितारलेले वटवृक्षासारखे म्युरल. पुण्यातील 'आयुका' प्रकल्प असाच मध्यवर्ती पाषाणकुंडाभोवती उभारला आहे. खगोलशास्त्राचा अभ्यास व संशोधनकार्य चालणाऱ्या या संस्थेची वास्तू त्यांच्या कल्पकतेची व प्रतिभेची उत्तुंगता दाखविते.

आकाशाशी जडलेले कोरियांचे नाते त्यांच्या गृहरचनेत पाहावयास मिळते. मोकळ्या निळ्या आकाशाशी भारतीयांचा संबंध अनादी काळापासूनचा आहे. त्यामुळे हा अजोड संबंध येथील वास्तुकलेशी निगडित आहे. ते तत्त्व त्यांनी संकल्पित केलेल्या सर्व गृहबांधणींत पाहावयास मिळते. मुंबईतील बहुमजली 'कांचनगंगा' ही धनिकांसाठीची गृहरचना, यात सुखसोयींबरोबर हवामान व आकाशाशी नाते या संकल्पनांचा अंतर्भाव दिसतो. ती अनेक मजल्यांवरील घरकुलेच, दोन-तीन बेडरूम्सचे फ्लॅट्स नव्हेत. त्यात उंच, सखल पातळीवरील दालने, तसेच दोन मजली उंचीची घराच्या परिघात गच्ची, ज्यातून स्वच्छ निळे आकाश पाहता येईल, पश्चिमेचा वारा इकडून तिकडे, सहज घरभर फिरावा, अशी खोल्यांची रचना केलेली आहे..

चार्ल्स कोरिया हे नावाजलेले वास्तुशिल्पी आहेतच; पण ते एक निष्णात नगर-रचनाकारही आहेत. सर्वसामान्यांकरिता गृहनिर्माण व स्वस्त घरबांधणी हे त्यांचे जिव्हाळ्याचे विषय. त्यांवरील स्वत:चे प्रगल्भ विचार त्यांनी वेळोवेळी प्रगट केले आहेत. लोकसंख्येचा ताण दुसऱ्या दिशेला वळविण्याच्या दृष्टीने मुंबई बेटाच्या पूर्वेकडील खाडीपलीकडे जुळ्या 'नवी मुंबई' या शहररचनेची संकल्पना वयाच्या पस्तिसाव्या वर्षी त्यांना सुचली. एक वास्तुविशारद व स्थापत्य अभियंता यांच्या साह्याने त्यांनी ही योजना स्वयंस्फूर्तीने मांडली. ती पुढे महाराष्ट्र सरकारने मान्य करून हा एक शहररचनेचा नावीन्यपूर्ण प्रयोग यशस्वी करून दाखविला. त्याला जगन्मान्यता प्राप्त झाल्यावर लिमामध्ये अल्प उत्पन्न गटातील लोकांसाठी गृहनिर्माण प्रकल्पासाठी पेरू सरकार व संयुक्त राष्ट्र यांनी त्यांना आमंत्रण दिले.

अमेरिकेतील 'टाइम' मासिकाने १९५४ साली जगातील १५० तरुणांची भविष्यातील 'पुढारी' म्हणून निवड यादी तयार केली होती. त्यात चार्ल्स कोरिया यांचा समावेश होता.

राजीव गांधी पंतप्रधान असताना, त्यांनी 'नॅशनल कमिशन फॉर अर्बनायझेशन' या आयोगावर अध्यक्ष म्हणून कोरियांची नियुक्ती केली होती. कमिशनने सखोल अभ्यासातून एक उत्तम अहवाल सरकारला सादर केला होता.

आर्टिस्ट कॉलन (बेलापूर), नवी मुंबई, सॉल्टलेक सिटी सेंटर (कोलकाता), जीवनभारती (नवी दिल्ली), कोवालम बीच रिसॉर्ट (केरळ), बे आयलंड रिसॉर्ट (अंदमान), एमआयटी परिसरातील नवीन संशोधन केंद्र, इमाईली सेंटर (टोरॅन्टो, कॅनडा) असे विविध बरेच कौशल्यपूर्ण प्रकल्प त्यांनी आपल्या पन्नास वर्षांच्या व्यावसायीक जीवनात उभारले आहेत. त्यांच्या

सर्जनशील वास्तुकलेबद्दल जगातील अनेक मानसन्मान त्यांना मिळाले. त्यांत प्रामुख्याने आगाखान अवॉर्ड फॉर आर्किटेक्चर, प्रीमियम इंपिरियल पारितोषिक (जपान), रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ ब्रिटिश आर्किटेक्चर व इन्टरनॅशनल युनियन ऑफ आर्किटेक्चरची सुवर्णपदके यांचा समावेश होतो.

वास्तुशास्त्राशी संबंधित अशा जगातील बहुतेक संस्थांनी त्यांचा सत्कार केला आहे. भारतीय वास्तुकलेला विश्वप्रतिष्ठा मिळवून देणाऱ्या या वास्तुशिल्पीला भारत सरकारने 'पद्मविभूषण' पुरस्काराने गौरविले. हा मान मिळालेले ते भारतातील पहिलेच वास्तुविशारद.

शहररचना संदर्भात ते सामाजिक उन्नतीचे भाष्यकार झाले आहेत. एक द्रष्टा विचारवंत, बदलत्या काळाचे भान ठेवून वास्तुनिर्मिती व नगर नियोजन करणारा प्रवर्तक, एक उत्तम लेखक, उच्च प्रतीचा शिक्षक व प्रतिभावंत, अशी त्यांची प्रतिमा आहे. विकसनशील तिसऱ्या जगाचे वास्तुकला, नगररचना यांचे ते प्रवक्तेच झाले आहेत.

- चिंतामण गोखले

## कोसंबी, दामोदर धर्मानंद

**गणितज्ज्ञ, नाणक शास्त्रज्ञ**

**३१ जुलै १९०७ - २८ जून १९६६**



दामोदर धर्मानंद कोसंबी हे एक जागतिक प्रतिष्ठा प्राप्त केलेले गणित आणि सांख्यिकी विषयातले तज्ज्ञ होते. त्याचबरोबर, एक इतिहासतज्ज्ञ, प्राच्य भारत शास्त्राचे (इंडॉलॉजीचे) व संस्कृतचे गाढे अभ्यासक म्हणूनही त्यांना मान्यता लाभली होती. मार्क्सवादी विचारवंत आणि डाव्या चळवळीतील एक क्रियाशील नेते म्हणूनही त्यांचे नाव घ्यावे लागेल.

त्यांचा जन्म गोव्यातील कोसबेन या गावी झाला. त्यांचे वडील, धर्मानंद कोसंबी हे संस्कृतचे, पाली भाषेचे आणि बौद्ध तत्त्वज्ञानाचे गाढे विद्वान होते. अत्यंत खडतर परिस्थितीशी झुंजून धर्मानंदांनी या विषयाचे शिक्षण प्राप्त केले होते व या विषयातील त्यांचा अधिकार भारतात आणि युरोप- अमेरिकेतही मान्यता पावला होता. धर्मानंदांसारख्या विद्वान आणि संशोधनाची नेमकी शिस्त असणाऱ्या पित्याच्या सहवासात मोठे झाल्याचा फार मोठा फायदा दामोदरांना झाला. अभ्यासाची व संशोधनाची पद्धत त्यांना लहानपणापासूनच बघता आली, शिकता आली.

पाली भाषेतील ग्रंथाचे संशोधन करण्यासाठी धर्मानंदांना अमेरिकेत हॉर्वर्ड विद्यापीठात निमंत्रण आले. त्या वेळी अकरा वर्षांच्या असलेल्या दामोदरला ते बरोबर घेऊन गेले. मग दामोदरने तिथल्या प्राथमिक शाळेत शिक्षण घ्यायला सुरुवात केली व नंतर तिथल्या 'केंब्रिज हाय अ‍ॅण्ड लॅटिन स्कूल' या माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळेत प्रवेश घेतला. चार वर्षांनंतर धर्मानंद भारतात परतले, ते दामोदरला अमेरिकेत ठेवूनच. मग दामोदरने अमेरिकेतच हॉर्वर्ड विद्यापीठात गणित विषयाचे पदवीपर्यंत शिक्षण घेतले. प्रा. जॉर्ज बरकॉफ हे त्यांचे गणितातले गुरू. 'गणित' या विषयाने दामोदरला झपाटून टाकले होतेच; पण त्याच्या जोडीलाच त्याने इतिहास, समाजशास्त्र, अनेक भाषा यांचाही अभ्यास केला. विद्यापीठातील प्रसिद्ध ग्रंथालयाचा पुरेपूर लाभ घेतला. कोणत्याही विषयाचा अभ्यास मुळापासून करण्याची शिस्त अंगी बाणवून घेतली. वयाची ११ ते २१ अशी अत्यंत महत्त्वाची वर्षे दामोदरांनी अमेरिकेत काढली व तिथले संस्कार आणि शिक्षणासोबत १९२९ साली ते गणितातली पदवी घेऊन भारतात परतले.

दामोदरांना पदवी परीक्षेत अतिशय उत्तम यश मिळाले. पण त्याच वेळेला अमेरिकेत मंदीची लाट आली असल्यामुळे त्यांना अमेरिकेत राहून उच्चशिक्षण घेणे अथवा गणितातले संशोधन करणे शक्य झाले नाही. त्यांना भारतात परतावे लागले. याचा परिणाम म्हणून की

काय, त्यांच्या स्वभावात कडवटपणाची छटा आली.

भारतात आल्यावर प्रथम ते बनारस हिंदू विद्यापीठात गणिताचे अध्यापन करू लागले. नंतर ते अलिगड मुस्लीम विद्यापीठात गेले. पण दोन-अडीच वर्षातच ते पुण्याला आले व फर्गसन महाविद्यालयात विद्यार्थ्यांना गणित शिकवू लागले. फर्गसन महाविद्यालयात त्यांनी १९३३ ते १९४५ अशी बारा वर्षे अध्यापन केले. महाविद्यालयात 'विद्यार्थिप्रिय' शिक्षक अशी त्यांची ओळख नव्हती. जो विद्यार्थी स्वत: परिश्रम करायला तयार असेल, त्यालाच त्यांच्या मार्गदर्शनाचा फायदा होत असे. याच कालखंडात त्यांच्या संशोधनाला बहर आला. दामोदरांच्या संशोधनाचा प्रवास थक्क करून टाकणारा आहे. एक माणूस एका आयुष्यात इतक्या विविध विषयांत संशोधन करू शकतो यावर विश्वास ठेवणे कठीण आहे.

दामोदर कोसंबींचा पहिला संशोधनपर लेख भौतिकशास्त्रातला होता. त्यानंतर ते गणितावरचे संशोधन करूलागले. अलिगड विद्यापीठात असताना, दोन वर्षांत त्यांचे आठ संशोधनपर लेख प्रसिद्ध झाले. गणितामधील संशोधनाचे त्यांचे काम आयुष्यभर चालूच होते. 'टेन्सॉर ॲनॅलिसिस' व 'पाथ जॉमेट्री' या गणिताच्या दोन शाखांमध्ये त्यांचे काम होते. आयुष्यभरात त्यांनी गणितावर एकूण ४८ संशोधनपर लेख लिहिले. पण गणिताची उपयोजित शाखा म्हणून त्यांना सांख्यिकीचे आकर्षण वाटू लागले. सांख्यिकीचा अभ्यास करण्यासाठी त्यांनी प्राचीन नाण्यांचा एक सांख्यिकी प्रश्न निवडला. नाणी जितका काळ हाताळली जातात, त्या प्रमाणात त्यांचे वजन कमी होते. त्यामुळे प्राचीन नाण्यांचा अभ्यास करून, त्या राजवटींचा काळ निश्चित करता येतो. हा अभ्यास करून त्यांनी 'नाणकशास्त्र' या शास्त्राचा पाया घातला.

सांख्यिकीचा वापर करून त्यांनी गुणसूत्रांच्या संदर्भात 'कोसंबी फॉर्म्युला' शोधला, ज्याचा आजही अभ्यास केला जातो.

नाणकशास्त्राच्या अभ्यासातून नाण्याचा काळ ठरवता येऊ लागला. पण त्या वेळेला कोणत्या राजांच्या राजवटी होत्या, हे नेमके कळत नव्हते. यातून कोसंबी प्राचीन भारताच्या इतिहासाच्या प्रांतात शिरले. राजवटींचा नेमका शोध घेण्यासाठी ते संस्कृत शिकले; पण संस्कृत ग्रंथांच्या अनेक आवृत्त्या मिळत होत्या व त्यात पाठभेद होते. मग कोसंबींनी संस्कृत ग्रंथांच्या चिकित्सक आवृत्त्या बनवण्याचे काम केले. भर्तृहरीच्या काव्यावरचे त्यांचे काम आदर्श मानले जाते. विस्मृतीच्या गर्तेत गेलेल्या निदान ५० संस्कृत कवींचे काम त्यांनी उजेडात आणले.

या अभ्यासातून कोसंबींना जाणवले, की संस्कृत कवींच्या रचना आणि प्रत्यक्ष समाज यांचा काहीच संबंध नव्हता, म्हणून त्या वेळच्या समाजाची व्यवस्था जाणून घेण्यासाठी त्यांनी काम सुरू केले. म्हणजेच ते इंडॉलॉजीच्या क्षेत्रात आले. अनागरी क्षेत्रातील, संस्कृतीच्या परिघावर असणाऱ्या समाज-घटकांमधील लोककथा, चालीरीती आणि मिथके यांचा त्यांनी अभ्यास केला व त्यांतून अब्राह्मणी अशा भारताच्या लोकसंस्कृतीचा वेध घेतला. प्राचीन भारताच्या अभ्यासाची हीच कोसंबींची प्रसिद्ध मार्क्सवादी पद्धत होय.

याशिवाय सामाजिक प्रश्नांवरही कोसंबींनी विपुल लेखन केले. अण्वस्त्रांच्या विरोधात साम्यवादी मंडळींनी १९५० सालाच्या सुमाराला 'जागतिक शांतता चळवळ' सुरू केली. त्यात कोसंबी सक्रिय होते. अण्वस्त्रांच्या व पर्यायाने अणुऊर्जेच्या विरोधात आणि सौरऊर्जेचा पुरस्कार करणारे लेखही त्यांनी लिहिले आहेत.

कोसंबींचे आयुष्यभरात सुमारे दीडशे लेख प्रसिद्ध झाले. त्यांतले साठ गणित व सांख्यिकी या विषयांवरचे होते. सुमारे साठ लेख इतिहास, नाणकशास्त्र व प्राचीन संस्कृत साहित्य या विषयांवर होते. एक अनुवंशशास्त्रावर होता. बाकीचे लेख विज्ञान व समाज यांच्या परस्परसंबंधांवर होते.

कोसंबींनी लिहिलेली, संपादित केलेली व त्यांच्या लेखांचा संग्रह असलेली चौदा पुस्तके त्यांच्या नावावर

आहेत. त्यांतले 'ॲन इंट्रोडक्शन टू द स्टडी ऑफ इंडियन हिस्टरी', 'मिथ ॲण्ड रिॲलिटी' आणि 'कल्चर ॲण्ड सिव्हिलायझेशन ऑफ एन्शन्ट इंडिया' हे ग्रंथ मान्यता पावलेले आहेत. होमी भाभा यांच्याबरोबर 'टाटा मूलभूत संशोधन संस्थे'च्या उभारणीतही कोसंबींचा मोलाचा वाटा होता. १९४५ सालापासून ते या संशोधन संस्थेत होते. मात्र पुढे होमी भाभांशी त्यांचे मतभेद झाल्याने, त्यांना १९६२ साली संस्था सोडावी लागली.

शेवटपर्यंत त्यांचे बहुविध संशोधनकार्य अखंड चालू होते. विशुद्ध गणित, सांख्यिकी, नाणकशास्त्र, अनुवंशशास्त्र, प्राचीन संस्कृत ग्रंथ, इतिहास, प्राचीन भारतशास्त्र, इतक्या विविध विषयांत मूलभूत संशोधन करणारा दुसरा कोणताही संशोधक साऱ्या जगाच्या इतिहासात दुसरा झालेला नाही.

– डॉ. सुधीर पानसे

***



ख

## खानोलकर, वसंत रामजी
**कर्करोगतज्ज्ञ**
**१३ एप्रिल १८९५ - २९ ऑक्टोबर १९७८**



भारतात आधुनिक वैद्यक संशोधनाची पायाभरणी करणारे आघाडीचे वैद्यकशास्त्रज्ञ डॉ. वसंत रामजी खानोलकर यांचा जन्म रत्नागिरीजवळच्या मठ या लहानशा गावात झाला. त्यांचे वडील ब्रिटिश सरकारच्या लष्करात शल्यचिकित्सक (सर्जन) होते. त्या निमित्ताने खानोलकर कुटुंबाचे वास्तव्य पूर्वीच्या अविभाज्य हिंदुस्थानातील, सध्या पाकिस्तानात असलेल्या क्वेट्टा या शहरात होते. शालेय व महाविद्यालयीन शिक्षण तेथेच पूर्ण झाल्यावर खानोलकर ग्रॅन्ट वैद्यकीय महाविद्यालयामध्ये वैद्यकीय शिक्षणासाठी दाखल झाले. तेथून एम.बी.बी.एस. ही पदवी उत्तम गुणांनी मिळवल्यावर पुढील शिक्षणासाठी ते इंग्लंडला रवाना झाले. लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेज हॉस्पिटल व मेडिकल स्कूल या संस्थेत त्यांनी विकृतिशास्त्र (पॅथॉलॉजी) या विषयात विशेष प्रावीण्य मिळविले. त्यापूर्वी सतत तीन वर्षे विकृतिशास्त्र या विषयात एकाही विद्यार्थ्यास परीक्षेत यश मिळाले नव्हते. त्यानंतर १९२३ साली विकृतिशास्त्र विषय घेऊन एम.डी. परीक्षेत उत्तीर्ण होण्याचा मान एकाच विद्यार्थ्यास मिळाला. हा बहुमान मिळवणारी व्यक्ती म्हणजे खानोलकर. स्वातंत्र्यपूर्व काळातील त्यांचे हे यश केवळ देदीप्यमान होते.

परीक्षेतील यशामुळे खानोलकरांना पुढील अभ्यासासाठी ग्रॅहम संशोधन शिष्यवृत्ती सहजच मिळाली. या शिष्यवृत्तीमुळे त्यांची दृष्टी वैद्यकीय संशोधनाकडे वळली. या काळातच वैद्यकशास्त्राच्या प्रगतीसाठी मूलभूत संशोधन करणे आवश्यक आहे, हा विचार त्यांच्या मनात पक्का रुजला. स्वदेशाच्या प्रगतीसाठी वैद्यकीय संशोधन करण्याचा निश्‍चय करून खानोलकर मुंबईस परतले. ज्या ग्रॅन्ट वैद्यकीय महाविद्यालयामधून त्यांनी पदवी मिळवली होती, तेथेच त्यांनी स्वत:ची वैद्यकीय कारकीर्द सुरू केली. ग्रॅन्ट वैद्यकीय कॉलेजमध्ये प्राध्यापक असताना त्यांनी अनेक तरुण डॉक्टरांना वैद्यकीय संशोधन करण्याची प्रेरणा दिली.

मुंबई महानगरपालिकेने १९२६ साली, किंग एडवर्ड मेमोरियल (के.ई.एम.) हॉस्पिटल व सेठ गोवर्धनदास सुंदरदास वैद्यकीय कॉलेजची नव्याने स्थापना केली. तेथे एका तरुण, व्यासंगी व वैद्यकीय संशोधनाची आवड असणाऱ्या विकृतिशास्त्रज्ञाची (पॅथॉलॉजिस्टची) गरज होती. या पदासाठी खानोलकरांना निवडण्यात आले. जी.एस. वैद्यकीय कॉलेजमध्ये विकृतिशास्त्र विभागात त्यांनी मानवी शरीरातील ऊतींच्या नमुन्यांची मांडणी करून म्यूझियम उभारले. या संग्रहालयाचा उपयोग रोगनिदानासाठी, तसेच शवचिकित्सेच्या आधारे मृत्यूचे कारण निश्‍चित करण्यासाठीही होऊ लागला. त्यांनी रुग्णांच्या सोईसाठी रोगचिकित्सा कक्ष सुरू केला. विकृतिशास्त्र शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना विकृत ऊतींची माहिती देण्यासाठी शवविच्छेदन करण्याचे तंत्र शिकविले. विद्यार्थ्यांमध्ये व्यायाम व खेळाची आवड निर्माण करण्यासाठी त्यांनी एक जिमखाना बांधून घेतला.

डॉक्टरांना बऱ्याचदा पेशंट, तसेच ऊती किंवा पेशींची छायाचित्रे घ्यावी लागतात. त्यासाठी डॉ. खानोलकरांनी छायाचित्रण विभाग सुरू केला. आज हे सर्व विभाग रुग्णालयात असणे गृहीत धरले जाते. परंतु विसाव्या शतकाच्या सुरुवातीस या विभागांची निर्मिती करणे क्रांतिकारक तर होतेच, पण व्यावहारिकही होते. खानोलकर शिस्तीचे भोक्ते होते. त्यामुळेच के.ई.एम. रुग्णालयामधील प्राध्यापकपद स्वीकारताना त्यांनी आपणांस नियमाप्रमाणे पंचावन्नाव्या वर्षी निवृत्त करण्यात यावे, अशी अट घातली होती.

के.ई.एम. रुग्णालय व जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयामध्ये असताना त्यांच्या आयुष्यात एक दु:खद घटना घडली. १९३५ साली क्वेट्टा येथे झालेल्या भूकंपात त्यांच्या सर्व निकटवर्तीयांचा मृत्यू झाला. या संकटावर त्यांनी धीरोदात्तपणे मात केली. वडिलांचा संस्कृत व इतर भाषांतील मौल्यवान ग्रंथसंग्रह डॉ. खानोलकरांनी मुंबई विद्यापीठास प्रदान केला. खानोलकरांचे मराठी व इंग्रजीप्रमाणेच जर्मन, फ्रेंच, उर्दू, पर्शियन इत्यादी भाषांवरही प्रभुत्व होते.

जी.एस. वैद्यकीय महाविद्यालय व के.ई.एम. रुग्णालयामध्ये असताना त्यांनी 'इंडियन चाइल्डहुड सिरोसिस' या रोगावर महत्त्वपूर्ण संशोधन केले, तसेच कुष्ठरोगावरील संशोधनाची सुरुवात केली. कुष्ठरोगाचे जंतू मज्जापेशीत वसतात हे त्यांनी प्रयोगशाळेत ऊती संवर्धनाचे तंत्र वापरून दाखवून दिले. त्यांच्या या कार्याचा गौरव जागतिक स्तरावर करण्याकरिता सीबा फाउंडेशनने एक परिसंवाद आयोजित केला होता.

के.ई.एम. रुग्णालयामध्ये कार्यरत असताना, खानोलकरांपुढे एक आव्हान नव्याने उभे राहिले. ते म्हणजे कर्करोग संशोधन व रोग्यावर उपचार करण्यासाठी नव्याने बांधलेल्या टाटा स्मारक रुग्णालयाची स्थापना.

पंधरा वर्षांच्या योगदानानंतर त्यांनी के.ई.एम. रुग्णालय स्वेच्छेने सोडून टाटा स्मारक रुग्णालयाच्या विकृतिशास्त्र विभागाचे संचालकपद स्वीकारले.



**कर्करोग संशोधन संस्था**

खानोलकरांच्या सहभागामुळे टाटा स्मारक रुग्णालयाला प्रतिष्ठा लाभली. वैद्यकीय संशोधन हे वैद्यकीय शास्त्राच्या प्रगतीसाठी अत्यंत आवश्यक आहे याबद्दल त्यांची खात्री होती. त्यांना मिळालेल्या जागतिक प्रसिद्धीमुळे कित्येक तरुण विकृतिशास्त्र व संशोधन या विषयाकडे आकर्षित झाले. यांतील एक महत्त्वाची व्यक्ती म्हणजे दिवंगत धन्वंतरी डॉ.दोराब दस्तूर. त्यांनी खानोलकरांच्या मार्गदर्शनाखाली मज्जातंतुविकृतिशास्त्र (न्युरोपॅथॉलॉजी) या विषयात एम.डी. पदवी मिळवली व संपूर्ण आयुष्य कुष्ठरोग संशोधनासाठी वेचून जगन्मान्यता मिळवली.

टाटा स्मारक रुग्णालयामध्ये डॉ. खानोलकरांनी नव्याने आधुनिक विभागाची मांडणी केली. विविध प्रकारच्या कर्करोगांचे अचूक निदान होण्यासाठी शिक्षण देऊन कुशल विकृतिशास्त्रज्ञाची (पॅथॉलॉजिस्ट) नवी पिढी तयार केली. कर्करोग्यांना योग्य तऱ्हेचा व वेळीच उपचार मिळावा या हेतूने संशोधनाचा पाया घातला. विकृतिशास्त्र या विषयाची उंची वाढविण्यासाठी त्यांनी 'टीचिंग पॅथॉलॉजिस्ट' ही चळवळ उभी केली. यात त्या-त्या विभागातील तज्ज्ञांच्या अनुभवावर चर्चा, वादविवाद होत असत व शोधनिबंध वाचले जात. तसेच भारतातील सर्व विकृतिशास्त्रज्ञांना एकत्रित करण्यासाठी 'इंडियन असोसिएशन ऑफ पॅथॉलॉजिस्ट्स' हे व्यासपीठ तयार केले. मानवाच्या सवयी, राहणीमान यांमुळे कर्करोग उद्भवतो, हे त्यांनी

दाखवून दिले. स्वत:च्या निरीक्षणातून त्यांनी अनुमान काढले, की तंबाखूच्या व्यसनाने मुखाचा कर्करोग होतो, वर्षानुवर्षे धोतराची घट्ट गाठ बांधलेल्या जागी त्वचेला इजा पोहोचून त्या ठिकाणी त्वचेचा कर्करोग होतो, तसेच काश्मीरमध्ये थंडीपासून रक्षण करण्यासाठी बाहेरील डगल्याच्या आत कांगरी नावाची निखाऱ्यांनी भरलेली शेगडी सतत ठेवल्यानेदेखील त्वचेचा कर्करोग होतो. जीवनशैली व कर्करोग यांचा घनिष्ठ संबंध पुढील काळात जगभरातील वैज्ञानिकांनी दाखवून दिला असला, तरी या क्षेत्रात खानोलकर अग्रेसर होते. त्यांनी सुरू केलेल्या लहानशा विकृतिशास्त्र विभागाचे १९५२ साली 'इंडियन कॅन्सर रिसर्च सेंटर' या नवीन संस्थेत रूपांतर झाले. या संस्थेचे संस्थापकपद स्वीकारल्यावर त्यांनी वेगवेगळे उपक्रम हाती घेतले. यासाठी तंत्रज्ञ व वैज्ञानिक या दोन गटांची गरज होती. कर्करोग संशोधनाच्या सुरुवातीस त्यांनी हुशार विद्यार्थी निवडून त्यांच्याकरवी उत्तम संशोधन करून घेतले. पीएच.डी. करणाऱ्या विद्यार्थ्यांना कर्करोग संशोधनाचे पैलू दाखवून प्रत्येक शाखेत नेतृत्व तयार केले. त्यांच्या दूरदृष्टीमुळे 'कॅन्सर रिसर्च इन्स्टिट्यूट'ला जागतिक मान्यता मिळाली. या संस्थेत त्यांनी टिश्युकल्चर, इलेक्ट्रॉन मायक्रोस्कोपी, बायोफिजिक्स, इम्युनोलॉजी, केमोथेरपी, एन्डोक्राइनॉलॉजी, एम्ब्रायॉलॉजी व ह्यूमन जेनेटिक्स विभाग निर्माण केले.

कर्करोग संशोधनात प्राण्यांचा वापर आवश्यक असतो. याकरिता खानोलकरांनी संस्थेत प्राणिगृहाची स्थापना केली. या विभागाच्या देखरेखीसाठी एका तंत्रज्ञाला इंग्लंड येथे एका वर्षाकरिता शिक्षण व अनुभव घेण्यासाठी पाठवले. या तंत्रज्ञाने मायदेशी आल्यावर अनेक शिक्षित तयार केले व कर्करोग संशोधनास उपयुक्त अशा कितीतरी जातींची निपज केली. त्याचप्रमाणे, संस्थेचा छायाचित्रण विभाग (फोटोग्राफी डिपार्टमेंट) अद्ययावत असावे, या हेतूने एका तंत्रज्ञास इंग्लंड व युरोपमधील प्रयोगशाळांत धाडून प्रशिक्षित केले व उत्तम छायाचित्रण विभागाची स्थापना केली. कर्करोग संशोधनासाठीदेखील खानोलकरांनी कुशल नेतृत्व तयार केले. संस्थेतील प्रत्येक संशोधकाने परदेशातील प्रयोगशाळांत काम करून अनुभव व ज्ञानाची कक्षा वाढवावी, ही त्यांची धारणा होती. कर्करोगावरील जागतिक संशोधनाची त्यांना सखोल माहिती असे व आपल्या देशात कोणत्या प्रकारचे संशोधन केले पाहिजे, याबद्दल त्यांचे विचार पक्के होते.

खानोलकरांनी वैद्यकशास्त्रातील वैज्ञानिक चळवळ उभारली. यातूनच नॅशनल इन्स्टिट्यूट फॉर रिसर्च इन रिप्रॉडक्टिव्ह हेल्थ (एन.आय.आर.आर.एच.), नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ इम्युनोहिमॅटोलॉजी या संस्था निर्माण झाल्या. या संस्थांचे तसेच भाभा अणू संशोधन केंद्रातील बायोमेडिकल ग्रूपचे बीज त्यांच्या प्रेरणेने टाटा स्मारक रुग्णालयाच्या सुरुवातीच्या विकृतिशास्त्र प्रयोगशाळेत व नंतर कर्करोग संशोधन केंद्रातच रोवले गेले. देशापुढील वैद्यकीय समस्या ओळखून त्यांचे निराकरण करण्यासाठी अचूक दृष्टी असणाऱ्या खानोलकरांना देश-विदेशांत अनेक सन्मान मिळाले. इंटरनॅशनल युनियन अगेन्स्ट कॅन्सर (यु.आय.सी.सी.) या जागतिक संस्थेच्या स्थापनेत त्यांनी मोलाची कामगिरी बजावली. या संस्थेचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. अणुविभाजनातून उद्‌भवणाऱ्या वाईट परिणामांपासून संरक्षण करण्याबाबतच्या वैज्ञानिक समितीवर भारताचे प्रतिनिधी व नंतर उपाध्यक्ष म्हणून त्यांची नेमणूक झाली. अमेरिका, युरोपातील देश, ऑस्ट्रेलिया इत्यादी देशांतील वैज्ञानिकांनी त्यांचा सन्मान केला. भारत सरकारने त्यांना 'पद्मभूषण' पदवीने गौरविले. ते १९६० ते १९६३ या काळात मुंबई विद्यापीठाचे कुलगुरू होते. मराठी विज्ञान परिषदेने आपल्या १९६७ सालच्या मराठी विज्ञान संमेलनात त्यांचा सन्मान केला होता.

— डॉ. रजनी भिसे

***संदर्भ :***

*१. दुसरे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, पुणे; १९६७.*

✻✻✻

## ग





### गांगल, सुधा गजानन

**कर्करोगतज्ज्ञ**

**२५ ऑगस्ट १९३४**



डॉ. सुधा गांगल यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांचे शालेय शिक्षण आणि इंटरसायन्सपर्यंतचे दोन वर्षांचे महाविद्यालयीन शिक्षण पुण्यात झाले. १९५२ साली लग्न झाल्यावर त्या मुंबईला स्थायिक झाल्या. १९५४ साली त्यांनी प्राणिशास्त्र विषयात मुंबई विद्यापीठाची बी.एस्सी. पदवी मिळवली. या विषयात विद्यापीठात त्यांनी प्रथम क्रमांक पटकावला. त्यांचा कल संशोधनाकडे असल्यामुळे त्यांनी कर्करोग संशोधन संस्थेत (कॅन्सर रिसर्च इन्स्टिट्यूट) प्रवेश घेतला. तिथे कर्करोगाच्या पेशी शरीराबाहेर वाढवून त्यांचे गुणधर्म मूलपेशीप्रमाणे आहेत का यावर संशोधन करून १९५९ साली एम.एस्सी. पदवी मिळवली. याच संस्थेत कर्कपेशीविरुद्ध शरीरात प्रतिकारशक्ती निर्माण करता येईल का या विषयावर संशोधन करून त्यांनी १९६३ साली पीएच.डी. पदवी प्राप्त केली.

कर्करोग संशोधन संस्थेत डॉ. कमल रणदिवे यांच्या मार्गदर्शनाखाली आणि त्यांच्याबरोबर हे संशोधनाचे काम केले. या कामगिरीमुळे त्यांना अमेरिकेतील मिशिगन विद्यापीठात शिष्यवृत्तीसह पोस्ट डॉक्टरल संशोधनासाठी बोलावणे आले. १९६४ ते १९६६ असे दोन वर्षे मिशिगन विद्यापीठात संशोधन करून त्या भारतात परत आल्या. त्यानंतर त्यांनी कर्करोग संशोधन संस्थेत भारतातील पहिली कॅन्सर इम्युनॉलॉजी लॅब सुरू केली. कर्करोगाविरुद्ध प्रतिकारशक्ती करण्याच्या कामाला त्यांनी त्यांचे सहकारी आणि विद्यार्थी यांच्या सहकार्याने सुरुवात केली.

डॉ.सुधा गांगल यांनी कर्करोग पेशी शोधण्यासाठी स्थिर मार्कर (स्टेबल मार्कर) शोधली. हा कर्करोग पेशी संशोधनाचा महत्त्वाचा टप्पा ठरला. त्यांनी मुख्यत्वे भारतात मोठ्या प्रमाणात आदळणाऱ्या, तोंडाच्या कर्करोगावर काम केले. एकूण २५ विद्यार्थिनींनी त्यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन करून एम.एस्सी./पीएच.डी. पदव्या मिळवल्या.

कर्करोग संशोधन संस्थेतील आपल्या प्रदीर्घ चाळीस वर्षाच्या कारकिर्दीत त्यांचे १५० च्यावर संशोधन निबंध प्रकाशित करण्यात आलेले आहेत. त्यापैकी काही शोधनिबंध त्यांनी परदेशातील परिषदांमध्ये सादर केलेले आहेत. यावरून त्यांच्या संशोधन कामाचे जगभर असलेले महत्त्व अधोरेखित होते. त्यांनी १९८४ साली झालेल्या भोपाळ वायू दुर्घटनेच्या चौकशी समितीमध्ये त्यांनी काम केले. अनेकांच्या रक्त तपासण्या करून, विषारी वायूमुळेच श्वास घुसमटून त्यांचा मृत्यू झाल्याचे सिद्ध केले.

त्या इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस, महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेस, इंडियन कॉलेज ऑफ ॲलर्जी आणि अप्लाइड इम्युनॉलॉजीच्या फेलो आहेत. इंडियन विमेन सायंटिस्ट असोसिएशनच्या कामात १९७५ सालापासून अनेक वर्षे त्या सहभागी आहेत. त्या संस्थेचे अध्यक्षपद १९९२ ते १९९४ या कालावधीत त्यांनी भूषवले आहे. १९६५ साली शकुंतला अमीरचंद पारितोषिक, १९७४ साली राजा रवीशेर सिंग मेमोरियल

कॅन्सर रिसर्च अ‍ॅवार्ड आणि १९९१ साली रॅनबॅक्सी फाउंडेशन पुरस्कार असे सन्मान त्यांना लाभले आहेत. त्यांनी राष्ट्रीय स्तरावरच्या अनेक समित्यांमध्ये सल्लागाराचे काम केले आहे. तसेच राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय पातळीवरच्या वैज्ञानिक नियतकालिकांच्या (जर्नल्सच्या) संपादक मंडळावरही काम केले आहे.

बी.जे. वाडिया रुग्णालयामध्ये सहा वर्षे त्यांनी संशोधन संचालक म्हणून काम पाहिले. त्यांची संशोधकवृत्ती त्यांना स्वस्थ बसू देत नव्हती. तेथे त्यांनी बालकांना गर्भावस्थेत होणाऱ्या थॅलेसेमिया या रोगाचे निदान कसे करता येईल, यावर संशोधन केले. तसेच जनुकीय आजारांवर उपचार करण्यास जेनेटिक क्लिनिक स्थापन केले. २००१ साली त्या पुण्याला स्थायिक झाल्या. तेथे त्यांनी मुव्हींग अकॅडमी ऑफ मेडिसीन अ‍ॅण्ड बायोमेडिसीन (एम.ए.एम.बी.) या नावाची संस्था स्थापन केली. डॉ. माधव देव यांच्याबरोबर या संस्थेच्या त्या उपाध्यक्ष व कोषाध्यक्ष म्हणून कार्यरत होत्या. पुरंदर तालुक्यातील स्त्रियांच्या जनुकीय आजारावर त्यांनी संशोधन केले. २००७ साली भारती विद्यापीठाच्या राजीव गांधी जैवतंत्रज्ञान संस्थेच्या सन्माननीय व्याख्यात्या म्हणून रूजू झाल्या. डॉ. गांगल यांनी संशोधनात योगदान देताना गृहिणी म्हणूनही आपली जबाबदारी समर्थपणे पार पाडली.

– मृणालिनी साठे / दिलीप हेर्लेकर

## गाडगीळ, माधव धनंजय

**जीवशास्त्रज्ञ, प्राणीशास्त्रज्ञ**

**२४ मे १९४२**

माधव धनंजय गाडगीळ यांचा जन्म पुणे येथे झाला. प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ डॉ. धनंजयराव गाडगीळ हे त्यांचे वडील. माधव गाडगीळांचे शालेय आणि बी.एस्सी.पर्यंतचे शिक्षण पुण्यात झाले. त्यानंतर ते एम.एस्सी. करण्यासाठी मुंबईच्या इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये गेले आणि त्यांनी मरीन बायोलॉजीमध्ये एम.एस्सी. केली. वडील धनंजयराव गाडगीळ यांना



विज्ञान, पक्षिनिरीक्षण, इतिहास, समाजशास्त्र, अर्थशास्त्र अशा अनेक विषयांत रस होता. १९२८ साली पुण्यात सुरू झालेल्या सृष्टिज्ञान मासिकाचे, मुंबईतील बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटीचे वडील आजीव सभासद असल्याने ती आणि अन्य मासिके, पुस्तके माधवरावांना सहजी वाचायला मिळाली. त्यांतून माधवरावांची विज्ञानाची आवड वाढीला लागली. पक्षितज्ज्ञ डॉ. सलिम अली वडिलांचे मित्र होते. माधवरावांच्या लहानपणी त्यांना एका पक्ष्याच्या नावाबद्दल शंका होती. त्यांनी आपली ही शंका वडिलांना विचारली. वडिलांनी ही शंका डॉ. सलिम अली यांना माधवरावांनी पत्र लिहून विचारावी, असे सुचविले. माधवरावांनी पत्र लिहिल्यावर त्यांना एका आठवडयात सलिम अलींचे उत्तर आले होते.

प्रसिद्ध जीवशास्त्रज्ञ प्रा.जे.बी.एस. हाल्डेन भारतात स्थायिक झाले होते. त्यांची आणि माधवरावांच्या वडिलांची ओळख होती. माधवरावांच्या शालेय वयात त्यांच्या घरी एक रशियन अर्थशास्त्रज्ञ उतरायला आले होते. त्यांनी तेरा वर्षांच्या माधवरावांना ''तू पुढे कोण होऊ इच्छितोस,'' म्हणून प्रश्न विचारल्यावर त्यांनी, ''मी पुढे जीवशास्त्रज्ञ होऊ इच्छितो,'' असे सांगितले होते. पुण्यातली वेताळ टेकडीजवळ माधवरावांचे घर होती. ते अनेकदा टेकडीवर जात आणि तेथून पक्षिनिरीक्षण करीत, झाडे पाहत. लहानपणापासून त्यांना निसदर्शनाची हौस होती, ती त्यांना पुढे आपल्या व्यवसायात उपयोगी पडली.

१९६५ साली माधवरावांचा सुलोचना फाटक यांच्याशी विवाह झाला. त्यांनी पुण्यातून गणित विषयात एम.एस्सी. केले होते. विवाहानंतर दोघेजण अमेरिकेत हार्वर्ड विद्यापीठात पीएच.डी. करायला गेले. माधवरावांनी जीवशास्त्रात आणि सुलोचनाबाईंनी

गणितात पीएच.डी. मिळवून ते दोघेही १९७१ साली भारतात परतले. वस्तुत: दोघांनाही हार्वर्डमध्ये प्राध्यापकपद मिळत होते; पण भारतातच येऊन काम करायची दोघांचीही प्रबळ इच्छा होती.

१९७१ साली परत आल्यावर दोघांनीही, 'विज्ञानवर्धिनी' या पुण्याच्या संशोधन संस्थेत दोन वर्षे संशोधनाचे काम केले. या काळात त्यांनी आणि त्यांचे महाविद्यालयातील प्राध्यापक डॉ.वा.द. वर्तक या दोघांनी मिळून खूप पायपीट करून महाराष्ट्रातल्या देवरायांचा अभ्यास केला आणि त्यांवरील आपले संशोधन निबंध प्रसिद्ध केले. नंतर १९७३ सालापासून माधवराव आणि सुलोचनाबाई, दोघेही बंगळुरू येथील इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये संशोधन आणि अध्यापनासाठी गेले. प्रथम ते दोघे तेथील सैद्धान्तिक अभ्यासकेंद्रात रुजू झाले. तेथे लोकोपयोगी विज्ञानावर फारसे काम झालेले नव्हते. ते करावे असे माधवरावांच्या मनात आले. ते त्यांनी संचालक प्रा. सतीश धवन यांना बोलून दाखवले. प्रा. धवन यांनी माधवरावांना प्रोत्साहन दिले. मग माधवरावांनी कर्नाटकातील बंदिपूरच्या जंगलातील हत्तींच्या सामाजिक जीवनाचा अभ्यास केला. त्यांच्या पुढाकाराने प्रथमच भारतातील हत्तींची मोजदाद झाली. माहुतांबरोबर बोलण्याच्या गरजेतून ते कानडी भाषा शिकले. त्यामुळे ते कानडीतून अस्खलित लिहू-बोलू शकतात.

१९७३ साली माधवराव साहाय्यक प्राध्यापक म्हणून रुजू झाले. १९७५ साली ते सहयोगी प्राध्यापक झाले आणि १९८१ साली प्राध्यापक झाले. १९८३ साली माधवरावांनी संस्थेत पारिस्थितिकी विज्ञान केंद्र (सेंटर फॉर इकॉलॉजिकल सायन्स) सुरू केले. पुढे ते त्या केंद्राचे दहा वर्षे अध्यक्षही होते. पारिस्थितिकी जीवशास्त्राचे भारतातील आद्य संशोधक म्हणून माधवरावांचा उल्लेख करायला हरकत नाही. प्रा.राघवेंद्र गदगकर, आर. सुकुमार हे त्यांचे विद्यार्थी होत.

कर्नाटकात बांबूच्या संबंधात काही समस्या निर्माण झाली. त्याच्या चौकशी समितीवर माधवराव होते. पण




त्या चौकशी समितीच्या कामावर माधवराव समाधानी नव्हते. मग त्यांनी महाविद्यालयीन विद्यार्थी आणि शिक्षक घेऊन त्या प्रश्नाचा मुळापासून अभ्यास केला आणि त्याची तड लावली. मेंढपाळ आणि धनगरांच्या जीवनाचा पारिस्थितिकीवर काय परिणाम होतो, याचा त्यांनी अभ्यास केला. त्यांच्या सामाजिक जातिव्यवस्थेबद्दलही त्यांनी अभ्यास केला. कैलाश मल्होत्रा या प्रसिद्ध मानववंश शास्त्रज्ञाबरोबर त्यांनी १९८० साली भारताला भेडसावणाऱ्या विविध पर्यावरणीय समस्यांचा अभ्यास केला. त्या वेळी केंद्र सरकारात नव्याने स्थापन झालेल्या पर्यावरण विभागाला त्यांनी त्या संबंधातील अहवाल सादर केला. त्यासाठी त्यांनी केरळ-कर्नाटक-महाराष्ट्रात असणारा पश्चिम घाट, राजस्थानचे वाळवंट, हिमालय, मध्य भारतातील वने आणि दख्खनच्या पठारावरील शेती यांचा स्वत: फिरून अभ्यास केला. हा त्यांचा अहवाल आधुनिक भारतामधील विविध प्रकारच्या पर्यावरणीय ऱ्हासाचा सांगोपांग विचार करणारा अभ्यास म्हणून ओळखला जातो. त्यासाठी त्यांनी नैसर्गिक संपत्तीचे व्यापारीकरण न करता, लोकशाहीकरण करण्याचा आणि त्यात लोकसहभाग मिळवण्याचा आग्रह धरला.

एखादा प्रकल्प सुरू करण्यापूर्वी त्याचा पर्यावरण, तांत्रिक, सामाजिक, आर्थिक अंगांच्या दृष्टिकोनातून अभ्यास व्हावा म्हणून तसा कायदा येण्यापूर्वी अंतराळ संशोधन केंद्राच्या एका प्रकल्पाचा अभ्यास माधवरावांनी प्रा. सतीश धवन यांच्या सांगण्यावरून केला. तो भारतातील तसा पहिला अभ्यास. त्यानंतर केंद्र सरकारने

तसा कायदाच आणला. माधवरावांनी अशा अनेक समित्यांवर काम केले. अशाच सामाजिक भावनेतून त्यांनी चंडिप्रसाद भट्ट यांच्याबरोबर चिपको आंदोलनात, सायलेंट व्हॅली आंदोलनात आणि पश्चिम घाट बचाव मोहिमेत सक्रिय सहभाग दिला. गरिबांच्या पर्यावरणवादास त्यांनी बळ पुरविले. केवळ शिकविणे हा उद्देश न ठेवता, इतर संशोधक, शिक्षक, धोरणकर्ते, स्वयंसेवी संस्था, शेतकरी आणि सामान्य नागरिकांबरोबर त्यांनी अनेक प्रकल्प राबविले.

आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन विकसित करीत त्यांनी रोमिला थापर (इतिहास), रामचंद्र गुहा (समाजशास्त्र), के.सी. मल्होत्रा (मानववंशशास्त्र), चार्ल्स पेरिंग्ज (अर्थशास्त्र), मनोहरन (भाषाशास्त्र), सलिम अली (पक्षिशास्त्र), अशा अनेकांबरोबर काम केले. काही शेतकऱ्यांना बरोबर घेऊन त्यांनी लेखनही केले. हार्वर्डहून परत आल्यावर माधव गाडगीळांच्या कारकिर्दीचे अवलोकन केले तर असे लक्षात येते की, १९७०च्या दशकात त्यांचे काम पर्यावरण संवर्धनाशी संबंधित होते. १९८०च्या दशकात ते वननीतीशी संबंधित होते. १९९०च्या दशकात त्यांनी जैववैविध्य संवर्धन, आंतरराष्ट्रीय प्रयत्न आणि धोरणांविषयी काम केले, तर एकविसाव्या शतकात त्यांनी पर्यावरण शिक्षणाकडे लक्ष वळवून त्यात लहान मुलांना सहभागी करून घेण्याचे प्रयत्न केले.

विविध समाजामध्ये कित्येक पिढ्यांपासून टिकून असलेले परंपरागत ज्ञान आणि पद्धती यांची नोंद ठेवण्याचे कार्य त्यांनी केले. त्यातूनच देवरायांचे संरक्षण आणि संवर्धन करण्यासाठी त्यांनी दबावगट निर्माण केले. बांबूची परंपरागत पद्धतीने केली जाणारी छाटणी ही अधिक शाश्वत असल्याचे आणि कागद उद्योगाकडून होणारी बांबूंची तोड पर्यावरणाला मारक आहे हे त्यांनी दाखवून दिले. गाडगीळ यांच्या अभ्यासामुळे वनउद्योगासाठी दिले जाणारे अनुदान वनांसाठीच कसे मारक आहे, हे स्पष्ट झाले. विपुल जैवविविधतेच्या जगातील २५ प्रमुख देशांपैकी एक असलेल्या पश्चिम घाटातील जैवविविधतेची नोंद ठेवण्याचे काम त्यांनी हाती घेतले. त्यांनी तरंतुला प्रकारच्या कोळ्याची जात आणि टोरंट प्रकारच्या बेडकाची जात शोधली. त्यांच्या अभ्यासातून देशातील पहिला नीलगिरी बायोरिझर्व्ह स्थापन झाला.

त्यांनी विद्यार्थी आणि गावकरी यांच्या मदतीने अगदी गावपातळीवरील जैववैविध्याची नोंद करून ठेवण्यासाठी पीपल्स बायोडायव्हर्सिटी रजिस्टर (पी.बी.आर.) आणि स्टुडंट्स बायोडायव्हर्सिटी रजिस्टर (एस.बी.आर.) या दोन अभिनव संकल्पना प्रचलित करून नामशेष होण्यापूर्वी किमान आपल्याकडे कोणते जैववैविध्य होते, त्याचे ज्ञान प्राप्त होण्यासाठी व्यावहारिक प्रयत्न केले. वनविषयक धोरणांची निश्चिती, जैवविविधताविषयक २००२ सालचा कायदा, व्याघ्रकृती दल, केंद्रीय पर्यावरणाचा आराखडा, एन.सी.ई.आर.टी.चे शालेय शिक्षणात पर्यावरणविषयक धोरण, अशा विविध समित्यांवर गाडगीळांनी काम केले. कर्नाटकातील उत्तर कन्नड जिल्ह्यातील शिरसी या छोट्या शहरात फील्ड स्टेशन उभारून, स्थानिक लोकांच्या मदतीने मौलिक आणि उपयुक्त संशोधन केले. कन्नड भाषिकांत डॉ. गाडगीळांना खूप मानाचे स्थान आहे.

देशातील सर्व विज्ञान अकादम्यांवर त्यांनी काम केलेले आहे. थर्ड वर्ल्ड अकॅडमीज ऑफ सायन्सेस, यूएस नॅशनल अकॅडेमी ऑफ सायन्सेसवर त्यांनी काम केलेले आहे. पंतप्रधानांच्या विज्ञान सल्लागार समितीवरही त्यांनी काम केलेले आहे. अब्जावधी रुपयांच्या जागतिक पर्यावरण निधीचे विविध राष्ट्रांतील प्रकल्पांना कसे वाटप करावे याची शास्त्रीय बैठक आणि छाननी करण्यासाठीच्या समितीचे अध्यक्षपदही त्यांनी भूषविले होते. त्यांच्या एकूण कार्यासाठी त्यांना १९८१ साली ‘पद्मश्री’, तर २००५ साली ‘पद्मभूषण’ पुरस्कार मिळाला. २००२ साली त्यांना हार्वर्ड विद्यापीठाचा शतकवीर माजी विद्यार्थी पुरस्कार मिळाला. याशिवाय त्यांना शांतिस्वरूप भटनागर पुरस्कार, ईश्वरचंद्र विद्यासागर गोल्ड प्लेक, वसुंधरा

पुरस्कार, व्होल्व्हो पर्यावरण पुरस्कार, कर्नाटक सरकारचा राज्योत्सव पुरस्कार असे सन्मान मिळालेले आहेत.

वेळोवेळी अतिथी प्राध्यापक म्हणून अनेक परदेशी विद्यापीठांना भेटी देणारे प्रा. गाडगीळ विज्ञान आणि पर्यावरणासारखे विषय साध्या आणि सोप्या भाषेत सामान्यांपर्यंत पोहोचवण्यात वाकबगार आहेत. त्यांनी कन्नड, मराठी, इंग्रजी अशा विविध भाषांतून लेख लिहून जनजागृतीचे काम केले आहे. त्यांच्या पुस्तकांची भाषांतरे मराठी, कन्नड, हिंदी, गुजराती, मल्याळम, इंग्रजी अशा विविध भाषांतून झाली आहेत. 'दी हिंदू' या प्रसिद्ध वर्तमानपत्रातून मुलांसाठी त्यांनी लिहिलेला स्तंभ वाचकप्रिय झाला होता. मराठी विज्ञान परिषदेच्या १९८३ सालच्या उदगीर येथे भरलेल्या संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

आकाशवाणीवरून त्यांनी कन्नड आणि मराठीतून अनेक भाषणे आणि मुलाखती दिलेल्या आहेत. आकाशवाणीच्या 'पुरुषोत्तम मंगेश लाड' या प्रतिष्ठित व्याख्यानमालेत त्यांनी २००९ साली, जैवविविधतेच्या जोपासनेवर भाषण दिले होते. आकाशवाणीच्या संग्रहासाठी त्यांनी इंग्रजी आणि मराठीतून प्रत्येकी साडेसहा तासांच्या मुलाखती दिलेल्या आहेत.

२००४ साली बंगळुरू येथून निवृत्त झाल्यावर ते पुण्यात येऊन स्थायिक झाले असून, आघारकर संशोधन संस्थेत त्यांचे संशोधनाचे काम चालू आहे.

– शैलेश माळोदे

***संदर्भ :***


१. *देशपांडे, अ.पां.; 'विद्वजन'; मनोविकास प्रकाशन; २००५.*

२. *दै. सकाळ; ८ जुलै २००२.*

३. *दै. महाराष्ट्र टाइम्स; १२ जुलै २००२.*


## गायतोंडे, भिकाजी बळवंत

**वैद्यकतज्ज्ञ**

**२२ डिसेंबर १९२६**

डॉ. भिकाजी बळवंत गायतोंडे यांचा जन्म भूतपूर्व सावंतवाडी संस्थानातील बांदा या गोव्याच्या सरहद्दीवरील छोट्याशा खेड्यात, एका कनिष्ठ मध्यमवर्गीय शेतकरी कुटुंबात झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण खेड्यात व माध्यमिक शिक्षण मुंबईत झाले. शाळेत हुशार विद्यार्थी म्हणून त्यांची गणना होती. १९४५ साली त्यांनी जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयामध्ये प्रवेश केला. पाच वर्षांत तेथील अभ्यासक्रम उत्कृष्ट श्रेणीत पूर्ण केला. त्यानंतर १९५४ साली त्या महाविद्यालयामध्ये जागतिक आरोग्य संघटनेचे अतिथी प्राध्यापक डॉ. रॉजर लेविस यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी संशोधनासाठी औषधशास्त्र (फार्माकोलॉजी) या विषयाची निवड केली.



पुढे त्यांना लंडनच्या रॉयल कॉलेज ऑफ सर्जन या संस्थेत औषधशास्त्राच्या कार्यपद्धतीत संशोधन करण्यासाठी जागतिक आरोग्य संघटनेकडून फेलोशिप मिळाली. तेथे त्यांनी शरीरात हिस्टामिनचा स्राव सुरू होण्यास कारणीभूत ठरणारे पदार्थ (हिस्टॅमिन लिबरेटर्स) आणि त्यांचा चयापचयावर होणारा परिणाम यांचा अभ्यास केला. मार्गदर्शन करणारे प्रा. पॅटन यांच्या शिफारशीमुळे त्यांना जागतिक आरोग्य संघटनेची फिरती फेलोशिप मिळाली. यामुळे त्यांना ब्रुसेल्समधील प्राध्यापक हीमन्स यांची प्रयोगशाळा, स्टॉकहोम येथील कॅरोलिन्सका संस्था, बर्नमधील मलेरिया संशोधन संस्था, पॅरिस विद्यापीठाची अँटिबायोटिक प्रयोगशाळा व रोमची इन्स्टिट्यूट डी सानिटा यांसारख्या नामवंत प्रयोगशाळांना भेटी देता आल्या. याचबरोबर त्यांनी ब्रिटनमधील दुसऱ्या नामवंत संस्थांनाही भेटी दिल्या. यानंतर त्यांना अमेरिकेतील न्यू हॅम्पशायर राज्यातील हॅनोव्हर येथील डार्टमाउथ विद्यापीठातील प्राध्यापक हर्बट बोरिसन यांच्याबरोबर संशोधन करण्यासाठी प्रतिष्ठेची 'रॉकफेलर फाउंडेशन' शिष्यवृत्ती मिळाली. या ठिकाणी त्यांनी 'मज्जातंतूंचे औषधशास्त्र' (न्यूरो फार्माकोलॉजी) यांवर

संशोधन केले आणि नंतर अमेरिकेच्या औषधशास्त्र संस्थेच्या वार्षिक सभेपुढे ‘ओकारीचा मूळारंभ’ (मेकॅनिझम ऑफ व्हॉमिटिंग) यावर आपला संशोधनपर प्रबंध सादर केला. याच काळात त्यांनी कॅनडातील मॅकगिल विद्यापीठ आणि न्यूयॉर्क विद्यापीठाला भेटी देऊन प्रबंध सादर केले.

भारतात परतल्यावर त्यांची ‘इंडियन कौन्सिल ऑफ मेडिकल रिसर्च’ आणि भारतातील इतर अनेक संस्थांचे संशोधन सल्लागार म्हणून नियुक्ती झाली. तसेच ‘भारतीय औषधांच्या पद्धती व होमिओपॅथी’ या सेंट्रल ‘कौन्सिल ऑफ रिसर्च’ या संस्थेवर सदस्य म्हणून नेमण्यात आले.

डॉ. गायतोंडे यांचा औषधशास्त्राच्या उद्योगधंद्यातील अभ्यास व समृद्ध अनुभव लक्षात घेऊन भारत सरकारने नियुक्त केलेले तज्ज्ञ म्हणून ‘हाथी’ समितीवर, अमली पदार्थासंबंधी अभ्यास करण्यासाठी त्यांना स्वीकृत सदस्य म्हणून घेण्यात आले. पुढे त्यांची हाफकिन इन्स्टिट्यूटच्या संचालकपदी नियुक्ती करण्यात आली.

पुढे १९७८ साली त्यांची महाराष्ट्र शासनाच्या वैद्यकीय शिक्षण व संशोधन संस्थेवर संचालकपदी नियुक्ती झाली. या काळात त्यांना राष्ट्रकुल विद्यापीठांची फेलोशिप मिळाली आणि न्यू कॅसल विद्यापीठाचे अतिथी प्राध्यापक म्हणून निमंत्रण मिळाले. तेथे त्यांनी प्रा. जे.डब्ल्यू. थॉम्पसन यांच्याबरोबर ‘मूत्राशयाच्या मज्जातंतूंची संदेशवहन व्यवस्था’ (न्यूरो ट्रान्समिशन ऑफ ब्लॅडर) या विषयावर संशोधन केले आणि त्यावरील संशोधनाचा प्रबंध स्वित्झर्लंडमधील बर्न येथे भरलेल्या आंतरराष्ट्रीय परिषदेत सादर केला.

यानंतर १९७९ साली जागतिक आरोग्य संघटनेचे ज्येष्ठ सल्लागार म्हणून आरोग्यासंबंधी अनेक कार्यक्रम आयोजित केले. त्या निमित्ताने त्यांनी दक्षिणपूर्व आशिया, मध्य आशिया, जिनिव्हा, स्कॅण्डेनेव्हिया, ऑस्ट्रेलिया, अमेरिका, केनया, झिंबाब्वे इ. राष्ट्रांत भरलेल्या परिषदेत भाग घेतला.

त्यांना विज्ञान अकादमी, औषधशास्त्र अकादमी, आंतरराष्ट्रीय औषधशास्त्र अकादमी, न्यूयॉर्क विज्ञान अकादमी व महाराष्ट्र विज्ञान अकादमी यांचे फेलो म्हणून निवडण्यात आले. याशिवाय त्यांनी मराठी विज्ञान महासंघ, अमरावती येथे भरलेल्या अधिवेशनाचे अध्यक्षपद भूषविले होते. त्यांना प्रतिष्ठेचा डॉ.बी.सी. रॉय पुरस्कारही मिळालेला आहे.

— ज. बा. कुलकर्णी

## गुपचूप, विजय नरहर
**अभियंता**

**८ जानेवारी १९३७**



विजय नरहर गुपचूप हे संरचना अभियांत्रिकी (स्ट्रक्चरल इंजिनिअरिंग) आणि अभियांत्रिकी शिक्षण (इंजिनिअरिंग एज्युकेशन) या दोन्ही क्षेत्रांतील सुप्रसिद्ध व्यक्तिमत्त्व. मुंबई विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकीमधील पदवी परीक्षा प्रथम श्रेणीत प्रावीण्यासह उत्तीर्ण झाल्यानंतर त्यांनी अमेरिकेतील मॅसॅच्युसेट्स इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजीमधून डॉक्टरेट मिळविली. सॅन फ्रॅन्सिस्को, अमेरिका येथील बेक्टेल कॉर्पोरेशन व नवी दिल्ली येथील इंजिनिअर्स, इंडिया लिमिटेडमध्ये त्यांनी काम केले. कुशाग्र बुद्धिमत्ता, शिकवण्याची आवड आणि कौटुंबिक शैक्षणिक पार्श्वभूमी असल्यामुळे ते व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल इन्स्टिट्यूट (वीरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजिकल इन्स्टिट्यूट) या मुंबईतील सुप्रसिद्ध अभियांत्रिकी महाविद्यालयात, १९६७ साली ते प्राध्यापक आणि विभागप्रमुख (संरचना अभियांत्रिकी) या पदावर रुजू झाले.

अल्पावधीतच ते उत्कृष्ट प्राध्यापक म्हणून प्रसिद्ध झाले. चतुरस्र वाचन, व्यासंग, शब्दांची अचूक निवड, आकर्षक सादरीकरण या गुणांमुळे ते विद्यार्थ्यांत


**वीरमाता जिजाबाई तंत्रशिक्षण संस्था, मुंबई**

लोकप्रिय झाले. १९७३ साली त्यांची संस्थेचे उपप्राचार्य म्हणून नेमणूक झाली. व्यवस्थापन कौशल्य आणि शिस्तप्रियतेमुळे त्यांच्याविषयी कर्मचाऱ्यांत आदरयुक्त दरारा होता. १९८३ साली ते संस्थेचे प्राचार्य व सचिव बनले आणि १९९७ साली ते निवृत्त झाले. त्या वेळी संस्थेचे नाव वीरमाता जिजाबाई टेक्नॉलॉजिकल इन्स्टिट्यूट (आद्याक्षरे मात्र व्ही.जे.टी.आय.) असे होते. मध्यंतरी, १९९२ ते मे १९९५ या कालावधीत मुंबई विद्यापीठाचे प्र-कुलगुरुपदही (प्रो-व्हाइस चान्सलर) त्यांनी भूषविले.

मुंबई, पुणे, नागपूर, इंदूर विद्यापीठ, तसेच बी.ए.आर.सी., एस.इ.आर.सी. आदी संशोधन करणाऱ्या संस्थांशी त्यांचा संबंध आला. विविध शासकीय तसेच खाजगी संस्थांचे सल्लागार म्हणून त्यांनी काम केले. भारतात आणि अमेरिकेत राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये तांत्रिक विषयांवर त्यांनी शोधनिबंध सादर केले.

संरचना अभियांत्रिकी संशोधन केंद्र, चेन्नई (एस.इ.आर.सी.) च्या संशोधन परिषदेचे ते अध्यक्ष होते. विद्यापीठ अनुदान आयोगाशी त्यांचा संबंध होता.

१९९४-९५ सालचा अभियांत्रिकी महाविद्यालयासाठी असलेला महाराष्ट्र राज्य शिक्षण पुरस्कार, योजनेच्या पहिल्याच वर्षी पटकाविण्याचा मान त्यांना मिळाला. इन्स्टिट्यूट ऑफ इंजिनिअर्सने २००३ - ०४ या वर्षी 'एमिनंट इंजिनिअर' म्हणून त्यांचा गौरव केला. अभियांत्रिकी शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी केलेल्या प्रयत्नांची नोंद घेऊन आणि गुंतागुंतीच्या संरचना अभिकल्पाचे निर्माते म्हणून अमेरिकन कॉन्क्रीट असोसिएशनच्या भारतातील शाखेने त्यांना पुरस्कार दिला.

मे.आयन एक्स्चेंज इंडिया लिमिटेड, द महिन्द्रा युनायटेड वर्ल्ड कॉलेज ऑफ इंडिया आणि तोलानी मेरिटाइम इन्स्टिट्यूट, महाराष्ट्र या संस्थांच्या संचालक मंडळावर ते संचालक म्हणून कार्यरत आहेत.

अणुऊर्जा नियंत्रण मंडळाच्या स्थापत्य अभियांत्रिकी सुरक्षितता समितीचे ते अध्यक्ष आहेत. अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या पश्चिम विभागाचेही ते अध्यक्ष आहेत. तंत्रशिक्षण संदर्भात राष्ट्रीय स्तरावरील त्यांचे योगदान लक्षणीय आहे.

२००० ते २००३ या काळात ऑल इंडिया कौन्सिल ऑफ टेक्निकल एज्युकेशनने नेमलेल्या नॅशनल बोर्ड ऑफ ॲक्रिडिटेशनचे ते अध्यक्ष होते. मुंबई आणि मराठवाड्यातील बाबासाहेब आंबेडकर विद्यापीठाच्या अनेक समित्यांवर त्यांनी काम केले आहे.

— प्रा. भालचंद्र अवधूत नाईक

## गुप्ते, रामचंद्र भालचंद्र
**भूशास्त्रज्ञ**
**३० जुलै १९१९ - १२ ऑक्टोबर २००७**



प्रसिद्ध भूशास्त्रज्ञ डॉ.रामचंद्र भालचंद्र गुप्ते यांचा जन्म ऐतिहासिक सरदार घराण्यात झाला. तैल व चिकित्सक बुद्धी, त्याबरोबरच भूशास्त्रीय प्रश्नांची उकल करण्याची हातोटी व इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, यामुळे त्यांनी भूशास्त्रीय क्षेत्रात आदराचे स्थान मिळविले होते. डॉ.गुप्ते खऱ्या अर्थी निरीश्वरवादी होते. त्यांनी अनेक दुःखाचे प्रसंग धीराने पचविले. महाविद्यालयात शिकणाऱ्या त्यांच्या एकुलत्या एका मुलाचे आकस्मिक दुःखद निधन

झाल्याच्या दुसऱ्या दिवशी मुंबईला मंत्रालयात झालेल्या 'कोयना टेमर्स कमिटी'च्या बैठकीतील चर्चेत त्यांनी अविचल मनाने भाग घेतला होता.

पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयातून त्यांनी बी.एस्सी. पदवी मिळवली. त्यांना त्या परीक्षेत 'दक्षिणा फेलोशिप' मिळाली होती. संशोधन करून एम.एस्सी. पदवी प्राप्त केल्यावर काही महिने त्यांनी भारतीय भूशास्त्र संस्था (जी.एस.आय.) मध्ये काम केले. त्यानंतर १९६६ सालापर्यंत त्यांनी अहमदाबाद, नागपूर व पुण्याच्या शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयांत अधिव्याख्याता म्हणून काम केले. मार्च १९६६ पासून जुलै १९७७ मध्ये निवृत्त होईपर्यंत ते पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयात प्राध्यापक व भूशास्त्रीय विभागप्रमुख म्हणून होते.

१९५० सालापासून आयुष्याच्या शेवटपर्यंत महाराष्ट्राचा ८५ टक्के भूभाग व्यापणाऱ्या 'डेक्कन टॅप' खडकांविषयी त्यांनी मूलभूत संशोधन केले. त्यात खडकांचे विविध प्रकार, त्यांच्या क्षेत्रीय संरचना, त्यांचे विविध गुणधर्म याविषयी त्यांनी सखोल निरीक्षण व अभ्यास केला. त्यांच्या संशोधनामुळे या खडकांच्या बऱ्याच अज्ञात वैशिष्ट्यांविषयी नव्याने माहिती मिळाली. तसेच बऱ्याच जुन्या कल्पना चुकीच्या असल्याचे त्यांनी दाखवून दिले. संशोधनातील अप्रामाणिकपणा ते कधीच खपवून घेत नसत.

भूशास्त्र या विषयाचा अभ्यास प्रयोगशाळेपुरता मर्यादित न ठेवता, त्या संशोधनाचा उपयोग स्थापत्य अभियांत्रिकी कामात केला पाहिजे, असा त्यांचा आग्रह असे. खडकांच्या विविध गुणधर्मांविषयी त्यांनी जी अचूक माहिती मिळविली होती, त्या माहितीचा अभियांत्रिकी भूशास्त्र समजण्यास फार उपयोग झाला. गेरू, ज्वालामुखी, ब्रेशिया, डाइक, भरितकुहरी, बेसॉल्ट या खडकांबद्दल अभियंत्यांच्या मनात चुकीच्या कल्पना असल्यामुळे धरणांचा पाया घेताना त्यांच्या मनांत काहीशी भीती असे. त्यामुळे प्रकल्पावर निष्कारण बराच खर्च केला जाई. डॉ. गुप्ते यांच्या संशोधनामुळे कोट्यवधी रुपये वाचू शकले. त्यामुळेच स्थापत्य अभियंते त्यांचा सल्ला शिरसावंद्य मानत.

१९६२ सालापासून महाराष्ट्र सरकारचे पाटबंधारे खाते, सार्वजनिक बांधकाम खाते, मध्य रेल्वे, टाटा कन्सल्टिंग इंजिनिअर्स, टाटा इलेक्ट्रिसिटी कंपनीज, एम.आय.डी.सी., बृहन्मुंबई महानगरपालिका, न्युक्लिअर पॉवर कॉर्पोरेशन, इलेक्ट्रिसिटी टू लाओस यांसारख्या अभियांत्रिकी संघटनांसाठी अनेक धरणे, कालवे, बोगदे, रस्ते, लोहमार्ग, भूमिगत विद्युतगृहे व पूल यांसारख्या अनेक प्रकल्पांच्या ठिकाणी भूशास्त्रीय अभ्यास करून त्यांचे आराखडे व बांधकाम यांविषयी डॉ. गुप्ते यांनी मोलाचा सल्ला दिला. या प्रकल्पांव्यतिरिक्त बृहन्मुंबई पाणीपुरवठ्यासाठी भातसा, मध्य वैतरणा धरण, समुद्राखालील वसई खाडी बोगदा (क्रीक टनेल), केळशी बोगदा (अंडरक्रीक टनेल), सहार ते रेसकोर्स हा प्रमुख बोगदा व ५० कि.मी. लांबीचे पाण्यासाठीचे मुंबई शहरातील इतर बोगदे, वैतरणा जलविद्युत प्रकल्प, कोयना जलविद्युत प्रकल्पाचा तिसरा व चौथा टप्पा, पुण्याजवळील पानशेत, वरसगाव, टेमघर, भाभा आसखेड, चासकमान इत्यादी धरणांवर, तसेच मध्य रेल्वेच्या थळ आणि बोरघाटातील तिसरे रेल्वे मार्ग, तारापूर अणुऊर्जा प्रकल्पाच्या तिसऱ्या व चौथ्या अणुभट्टीच्या जागा, लाओसमधील सेसेल, सेलाबाम इत्यादी जलविद्युत प्रकल्पांवर त्यांनी तज्ज्ञ म्हणून काम केलेले आहे.

नर्मदा पाणी तंट्याविषयी लवादाच्या कामासाठी महाराष्ट्र सरकारचे भूशास्त्रीय सल्लागार म्हणून नवागाव व जलसिंधी येथील धरणांच्या जागेचा तौलनिक अभ्यास करून त्यांनी महाराष्ट्र सरकारला लवादांशी संबंधित बाबींविषयी मोलाचा भूशास्त्रीय सल्ला दिला.

महाराष्ट्र सरकारच्या 'कोयना ट्रेमर्स कमिटी' व 'एक्स्पर्ट कमिटी ऑन सिस्मॉलॉजी'चे एक तज्ज्ञ सदस्य म्हणून त्यांनी काम केले. कोयना भूकंप कोयना धरणामुळे झाला नाही हे भूशास्त्राच्या आधारे सिद्ध करण्यासाठी त्यांनी सखोल संशोधन केले. हा भूकंप

धरणामुळे झाला असणे कसे शक्य नाही हे त्यांनी शोधनिबंध लिहून व विविध चर्चासत्रांत भाग घेऊन दाखवून दिले.

महाराष्ट्र सरकारच्या 'सिंचन व जल आयोगा'चे सहयोगी तज्ज्ञ म्हणून त्यांनी आयोगाच्या अनेक कार्यशाळांत झालेल्या चर्चेत भाग घेतला व आयोगाला भूजलाच्या भूशास्त्रीय पैलूंविषयी टिप्पण्या तयार करण्यास सहकार्य केले.

भाषा संचालनालयाने मराठी भाषेत भूशास्त्रीय परिभाषा तयार करण्यासाठी नेमलेल्या समितीचे अध्यक्षस्थान त्यांनी भूषविले होते. परिभाषा तयार करण्याच्या चर्चांमध्ये त्यांनी सक्रिय सहभाग घेतला.

डेक्कन टॅप खडकांच्या मूलभूत स्वरूपाविषयी व त्यांच्या अभियांत्रिकी भूशास्त्रीय गुणधर्मांविषयी त्यांचे पंचवीसहून अधिक शोधनिबंध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय मासिकांत प्रसिद्ध झालेले आहेत. 'पी.डब्ल्यू.डी. हँड बुक प्रकरण क्र. ६', तसेच 'ए टेक्स्ट बुक ऑफ इंजिनिअरिंग जिऑलॉजी' व 'एजी सिरीज ऑफ जिऑलॉजिकल मॅप्स' ही त्यांची पुस्तके भूशास्त्रातील आधारभूत ग्रंथ मानले जातात.

भूशास्त्रातील ज्ञानकोश असलेले डॉ. गुप्ते कालवश झाल्याने डेक्कन टॅप बेसॉल्ट खडकांच्या एका अभ्याससपर्वाचा अंत झाला, असेच म्हणावे लागेल.

— डॉ. बा. मो. करमरकर

***संदर्भ :***

*१. मराठी विज्ञान परिषद–पत्रिका; डिसेंबर २००५.*

## गोगटे, मधुकर नारायण

**स्थापत्य अभियंता, विज्ञान प्रसारक**

**१० सप्टेंबर, १९३२**

मधुकर नारायण गोगटे यांचा जन्म आणि इंटरपर्यंतचे शिक्षण मुंबईत झाले. पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयामधून बी.ई. (स्थापत्य अभियांत्रिकी) केल्यावर त्यांनी लंडन विद्यापीठामधून एम.एस्सी. (अभियांत्रिकी) ही पदवी मिळविली. त्यानंतर १९५६ ते



१९९६ अशी चाळीस वर्षे त्यांनी वास्तुविशारद, व्हॅल्युअर आणि स्थापत्य अभियांत्रिकीमध्ये स्वत:चा व्यवसाय करून लोकांसाठी घरे, व्यापारी आस्थापनांसाठी इमारती आणि उद्योगपतींसाठी कारखाने बांधले. ही कामे त्यांनी प्रामुख्याने मुंबईत केली, पण तुरळकपणे उत्तर प्रदेश, केरळ, गुजरात आणि बहारीन येथेही केली. १९७० ते १९८१ या काळात त्यांनी वास्तुशास्त्रज्ञ आणि अभियंत्यांसाठी 'बिल्डिंग प्रॅक्टिस' नावाचे एक इंग्रजी अनियतकालिक चालविले.

१९६२-१९६६ या काळात ते मुंबई मराठी साहित्य संघाच्या कार्यकारिणीचे सदस्य होते. १९६३ साली स्थापन झालेल्या शास्त्रीय समितीचे ते कार्यवाह होते. त्या काळात विज्ञान विषयावर त्यांनी अनेक व्याख्याने आयोजित केली, संघाच्या प्रादेशिक संमेलनात एक शास्त्रीय संमेलन भरवले. 'मातीची धरणे' हे पुस्तक प्रसिद्ध केले. ' परिभाषेचा परिचय' ही १५-१६ लेखांची मालिका 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये प्रसिद्ध झाली. अशी ही विज्ञानविषयक कार्यक्रमांची मांदियाळी सुरू झाल्यामुळे पदाधिकाऱ्यांना प्रश्न पडला, की ही साहित्य संस्था आहे की विज्ञान संस्था? त्यातून मतभेद होऊन गोगटे १९६५ साली संघातून बाहेर पडले आणि डॉ.रा.वि. साठे, ज.ग. बोधे, डॉ.श्री.शां. आजगावकर, डॉ.म.आ. रानडे, प्रा.प.म. बर्वे, डॉ.चिं.श्री. कर्वे या समविचारी लोकांना घेऊन त्यांनी २४ एप्रिल, १९६६ रोजी 'मराठी विज्ञान परिषदे'ची स्थापना केली. डॉ.रा.वि. साठे (अध्यक्ष) आणि म.ना. गोगटे (कार्यवाह) यांनी १९६६ ते १९७६ अशी दहा वर्षे काम केले.

गोगटे यांनी या काळात तन, मन आणि धन ओतून काम केले. नायगाव-दादर येथे टेबल स्पेसमध्ये असलेले मराठी विज्ञान परिषदेचे कार्यालय ताडदेवला, आपल्या व्यवसायाच्या कार्यालयात नेले. पहिल्या वर्षातच



ग




धर्मादाय कायद्याखाली परिषदेची नोंदणी केली. मुंबईनंतर पुणे, नाशिक, नागपूर, ठाणे, सांगली, मडगाव येथे परिषदेच्या शाखा निर्माण केल्या. त्या-त्या शाखांत भाषणे, चर्चा, परिसंवाद होऊ लागले. जानेवारी १९६७ पासून शाखा-शाखांत जागोजागी होणाऱ्या कार्याची माहिती पोहोचावी म्हणून 'मराठी विज्ञान परिषद वार्तापत्र' छापायला सुरुवात करून एप्रिल १९६८ मध्ये त्याचे रूपांतर 'मराठी विज्ञान परिषद पत्रिका' असे केले.

पहिल्याच वर्षी मराठी विज्ञान संमेलन झाले. संमेलनात वैज्ञानिकांचा सन्मान करणे, तिसऱ्या दिवशी वैज्ञानिक स्थळाला सहल काढणे, एरवी अनुवाद शिबिर भरवणे, हे उपक्रम सुरू केले. परिषदेची वास्तू व्हावी म्हणून १९७३ सालापासून शासनाशी पत्रव्यवहार सुरू करून १९७५ साली शीव-चुनाभट्टीला १००० चौ.मी.ची जागा मिळवली. आयकर विभागाकडून देणगीवर करमाफी मिळवण्यासाठी सवलत मिळवली आणि महाराष्ट्र शासनाच्या शिक्षण आणि सांस्कृतिक खाते, तसेच मुंबई महानगरपालिकेकडून अनुदान मिळवले. परिषदेसाठी समाजाच्या सर्व क्षेत्रांतील प्रतिष्ठित व्यक्तींशी संपर्क ठेवला. एखादी सामाजिक संस्था मोठी व्हावी, नावारूपाला यावी यासाठी सर्व गोष्टी त्यांनी पहिल्या ८-१० वर्षांत केल्या. म.ना. गोगटे १९७६ ते १९८२ अशी सहा वर्षे परिषदेचे अध्यक्ष होते आणि परिषदेची वास्तू उभी करायला त्यांनी सुरुवात केली. नंतर ते परिषदेचे विश्वस्तही होते. १९९० साली परिषदेने त्यांना सन्मान्य सभासदत्व दिले.

म.ना. गोगटे १९९७ साली पुण्यात स्थायिक झाले. त्यांनी २००२ साली परिषदेची शाखा तेथे स्थापन केली. 'इन्स्टिट्यूशन ऑफ इंजिनिअर्स'च्या पुणे शाखेबरोबर दरमहा व्याख्यानाचे कार्यक्रम सुरू केले. 'राष्ट्रीय विज्ञान दिना'चा कार्यक्रम पुण्याच्या 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'बरोबर सुरू केला.

पुण्याच्या इंजिनिअरिंग कॉलेजात असल्यापासून म.ना. गोगटे यांना मराठी भाषा आणि व्याकरणाची आवड निर्माण झाली आणि मराठी भाषेच्या बाराखडीत 'ॲ, ऑ' नाहीत, बाराखडीत 'ॲ, ऑ' यांना स्थान मिळावे, मग भले ती चौदाखडी का होईना म्हणून दरवर्षी भरणाऱ्या मराठी साहित्य संमेलनात त्यांनी ठराव आणला; पण दुर्दैवाने तो तेथे मंजूर झाला नाही. दूरध्वनीच्या तबकडीवर, खेळातील पत्त्यांवर, घड्याळावर, तापमापकावर जर अरेबिक आकडे लिहिले जातात, तर आपणही ते स्वीकारले पाहिजेत, म्हणूनही साहित्य संमेलनात आणि विज्ञान संमेलनात ठराव आणले. १९७२ साली कोल्हापूरला भरलेल्या विज्ञान संमेलनात अखेर हा ठराव मंजूर होऊन परिषदेच्या कामकाजात अरेबिक आकडे वापरले जाऊ लागले. शालेय पाठ्यपुस्तकातही आता असे आकडे वापरले जातात.

भारताच्या सर्व राज्यांत वेगवेगळ्या भाषा आहेत. आपापसात संपर्क राहावा म्हणून आपण मराठी भाषा रोमन लिपीत लिहावी, अशी एक चळवळ त्यांनी 'रोमन लिपी परिषद' स्थापन करून केली. त्या परिषदेतर्फे त्यांनी संमेलने, चर्चासत्रे भरवली, भाषणे दिली, दूरदर्शनवर कार्यक्रम केले. तत्कालीन राष्ट्रपती व्यंकटरमन यांच्याशी चर्चाही केली. पण त्याला लोकमताचा पाठिंबा मिळाला नाही आणि अखेर त्यांनी तिचे विसर्जन केले. पण आज हजारो मराठी मुले परदेशी स्थायिक झाली असताना, त्यांच्या आया मुलांशी इ-मेलवरून रोमन लिपीचा आश्रय घेऊनच पत्रे लिहीत असतात. उदा. 'तू कसा

आहेस' हे, 'tu kasa aahes' असे लिहून विचारतात. संगणकात त्याचा उपयोग होईल, हे गोगट्यांनी पूर्वीच ओळखले होते. सैन्यात विविध भाषिक लोक असतात. त्यांच्यासाठी रोमन लिपी उपयोगी पडेल हे नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी ओळखून सैन्यात ते सुरूही केले होते. आधुनिक काळात ते गोगट्यांनी केले.

– अ. पां. देशपांडे

***संदर्भ :***

१. *देशपांडे, अ.पां., संपादक; 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन; २००५.*

## गोवारीकर, वसंत रणछोडदास

**हवामान शास्त्रज्ञ, उपग्रह शास्त्रज्ञ, अभियंता**

**२५ मार्च १९३३**



वसंत रणछोडदास गोवारीकरांचा जन्म कोल्हापूरचा आणि बालपणही तेथेच कोष्टी गल्लीत गेले. त्यांचे वडील इंजिनिअर होते. वडिलांना वाचनाची प्रचंड आवड होती. त्यामुळे घरात पुस्तकांचा जंगी खजिनाच होता. पुस्तकांच्या सहवासात राहून, वसंतरावांनाही लहानपणापासूनच वाचनाचा छंद लागला. या पुस्तकांमधूनच त्यांना हेन्री फोर्ड भेटला. वसंतराव म्हणतात, ''हेन्री फोर्ड हा माझा आदर्श होता आणि त्याच्यासारखाच आपणही मोटारीचा कारखाना काढायचा, असे माझे स्वप्न होते.''

त्या वेळी लहानग्या वसंतने मोटार बनवण्याचा. नुसता ध्यासच घेतला नाही, तर एक छोटेखानी मोटार तयार करून ती गल्लीत फिरवलीदेखील! एखाद्या गोष्टीचा ध्यास घेतल्याशिवाय तुम्ही आयुष्यात काहीही करूशकत नाही, यावर वसंतरावांचा पूर्ण विश्वास आहे. आयुष्यात अनेक क्षेत्रांमध्ये त्यांनी जे यश संपादन केले, त्यातून त्यांचे हे तत्त्वज्ञान त्यांनी सिद्ध करून दाखवले.

कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयातून एम.एस्सी. पदवी मिळविल्यानंतर लंडनला रसायन अभियांत्रिकीचे शिक्षण घेण्यासाठी ते रवाना झाले. १९५९ ते १९६७ या काळात लंडनमधील बर्मिंगहॅम विद्यापीठातून त्यांनी त्या विषयातील मास्टर्स आणि डॉक्टरेटची पदवी प्राप्त केली. त्यानंतर प्रथम त्यांनी हार्वेल येथील अॅटॉमिक एनर्जी रिसर्च एस्टॅब्लिशमेंटमध्ये आणि नंतर समरफिल्ड रिसर्च स्टेशन, ब्रिटिश मिनिस्ट्री ऑफ एव्हिएशन येथे संशोधनात्मक काम केले. त्याच दरम्यान डॉ.गोवारीकरांनी ऑक्सफर्ड आणि केंब्रिज विद्यापीठांच्या काही परीक्षांसाठी बाह्य-परीक्षक म्हणून काम पाहिले आणि परगॅमॉनच्या संपादक मंडळाचे सदस्य या नात्याने अनेक वैज्ञानिक पुस्तकांचे संपादनही केले.

संशोधन आणि विज्ञानविषयक साहित्य या दोन्ही क्षेत्रांमध्ये अनुभव घेत, डॉ.गोवारीकर रमून गेले होते. लंडनमध्येच संशोधनाच्या क्षेत्रात उत्तम कारकीर्द करून तिथेच स्थिर होण्याच्या विचारात असतानाच, त्यांना भारतीय अंतराळ संशोधन केंद्रात अर्थात इस्रो येथे पाचारण करण्यात आले. संस्थेचे संचालक डॉ.विक्रम साराभाई यांनी गोवारीकर यांची प्रगल्भ बुद्धी जोखली होती. वैज्ञानिक म्हणून स्वबळावर, स्वचातुर्याने, एखादे नवीन तंत्रज्ञान विकसित करण्याची गोवारीकरांची क्षमता लक्षात घेऊन त्यांच्यावर अग्निबाणासाठी लागणारे इंधन तयार करण्याची जबाबदारी सोपवली गेली. सुरुवातीला अग्निबाणाला लागणारे घनइंधन विकसित करण्यासाठी डॉ.वसंत गोवारीकर इस्रो येथे प्रॉपेलंट इंजिनिअर म्हणून रुजू झाले.

१९६७ साली केरळ राज्यातल्या थुंबा या गावी एका वापरात नसलेल्या जुन्या चर्चमध्ये त्यांच्या मार्गदर्शनाखाली भारतीय बनावटीच्या अग्निबाणासाठी लागणारे घनइंधन तयार करण्याच्या प्रकल्पाला सुरुवात झाली आणि त्यातूनच पुढे जगातले सर्वोत्कृष्ट दर्जाचे इंधन घडवले गेले. जुन्या चर्चचे पुढे भव्य वास्तूत रूपांतर झाले. तेथे संशोधन आणि विकसन विभाग स्थापन केला



**ग्रंथसंपदा**

गेला एवढेच नाही, तर त्यांनी तेथे प्रॉपेलंट इंधन कॉम्प्लेक्स, अमोनियम परक्लोरेट प्लांट यांसारखी युनिट्सही स्थापली आणि वाढवली. 'सॉलिड प्रॉपेलंट स्पेस बूस्टर प्लांट' हे युनिट तर नंतरच्या काळात जगातले सर्वात मोठे घनइंधन तयार करणारे युनिट ठरले. डॉ. वसंत गोवारीकर भारताच्या अवकाश प्रॉपेलंट तंत्रज्ञानाचे (एच.टी.पी.बी.) जनक मानले गेले.

पुढे १९७९ साली त्यांची विक्रम साराभाई अवकाश केंद्राच्या संचालकपदी नियुक्ती झाली. त्यांच्या संचालकपदाच्या कारकिर्दीत एसएलव्ही-३ प्रकल्प सुरू झाला. त्याद्वारे अग्निबाणाच्या साहाय्याने, भारताचा पहिला उपग्रह पृथ्वीभोवतालच्या कक्षेत स्थिर केला गेला आणि १९८३ साली एसएलव्ही-३ हा प्रकल्प यशस्वीरित्या पूर्ण झाला.

१९८६ ते १९९३ या कालावधीत डॉ. वसंत गोवारीकर यांची भारतीय शासनाच्या विज्ञान-तंत्रज्ञान विभागाचे सचिव आणि पंतप्रधानांचे वैज्ञानिक सल्लागार म्हणून नियुक्ती झाली. त्या कालावधीत सलग चार पंतप्रधानांसाठी त्यांनी हे काम केले. विज्ञान सर्वसामान्य जनमानसात रुजले पाहिजे, भारतातल्या प्रत्येक माणसाला वैज्ञानिक दृष्टिकोन असला पाहिजे, असे विचार या द्रष्ट्या शास्त्रज्ञाच्या मनात सतत रुंजी घालत होते. त्या विचारांतून त्यांना देशभरात एक वैज्ञानिक चळवळ रुजवण्याची कल्पना सुचली. त्यासाठी त्यांनी २८ फेब्रुवारी हा दिवस 'विज्ञान दिन' म्हणून साजरा केला जावा, असे आवाहन केले. त्यानुसार भारतात १९८७ सालापासून ही प्रथा अमलात आली आहे. दरवर्षी एखादी मध्यवर्ती वैज्ञानिक संकल्पना घेऊन देशभरातल्या गावागावांतून विद्यार्थ्यांसाठी, विविध प्रकारच्या स्पर्धा आयोजित केल्या जातात. सर्व वयोगटांतल्या लोकांमध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन निर्माण व्हावा, वाढावा या दृष्टीने अनेकविध कार्यक्रम राबवले जातात. त्यांमध्ये पथनाट्ये, व्याख्याने, प्रयोग मेळावे, विविध विषयांवरील कृतिसत्रे, सहली, अशा प्रकारच्या कार्यक्रमांचा अंतर्भाव असतो.

त्यांनी सुरू केलेला आणखी एक अत्यंत कल्पक, देशव्यापी कार्यक्रम म्हणजे राष्ट्रीय बालविज्ञान काँग्रेस! शालेय शिक्षण घेणाऱ्या तमाम भारतीय बालवैज्ञानिकांसाठी हा कार्यक्रम म्हणजे एक आनंदाची आणि ज्ञान संपादन करण्यासाठीची मोठी पर्वणीच असते. शालेय विद्यार्थ्यांप्रमाणेच, वैज्ञानिक दृष्टिकोन हा सर्व देशभरातल्या जनमानसात रुजवण्यासाठी, डॉ.गोवारीकरांच्या प्रयत्नाने एन.सी.एस.टी.एस.च्या जाळ्याची देशव्यापी घडी बसवण्यात आली, ज्यामध्ये आकाशवाणी, दूरदर्शन, स्वयंसेवी गट, स्वयंसेवी संस्था, अशा देशभरातल्या जवळपास ५० संस्थांनी एकत्र येऊन, देशात वैज्ञानिक चळवळ रुजवण्याच्या स्वप्नांना वास्तवात आणण्याचे प्रयत्न सुरू केले.

१९९० सालच्या इंडियन सायन्स काँग्रेसच्या वडोदरा येथे झालेल्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते आणि त्यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय 'भारताची लोकसंख्या' हा होता. भारताची लोकसंख्या आता स्थिरीकरणाकडे (जन्म आणि मृत्युदर समान झाल्याने लोकसंख्या तेवढीच राहणे) वाटचाल करीत आहे, हा त्यांचा निष्कर्ष आता जगन्मान्य झाला आहे.

१९९३ ते १९९५ या काळात खतांविषयीच्या एका प्रकल्पावर भारत सरकारने डॉ.वसंत गोवारीकर यांची एकसदस्यीय समिती नेमली होती. २००५ साली त्यांच्या प्रमुख संपादकपदाच्या नेतृत्वाखाली 'द फर्टिलायझर एनसायक्लोपीडिया' या प्रचंड ग्रंथाचे काम पुरे झाले. हा जगातील सर्व प्रकारच्या खतांची माहिती देणारा अतिशय परिपूर्ण असा ग्रंथ असून त्याचे काम अत्यंत सूक्ष्म

पातळीवर अभ्यास करून, नेटकेपणाने पुरे केलेले आहे. अशा प्रकारचा खतांसंबंधीचा संपूर्ण माहिती देणारा जगातला हा पहिलाच ग्रंथ आहे.

आज डॉ. वसंत गोवारीकर यांना मॉन्सूनचा अंदाज वर्तवणाऱ्या प्रारूपाचे जनक म्हणून सारा देश ओळखतो. नैर्ऋत्य मौसमी पावसाच्या आगमनासंबंधीचे अचूक आराखडे बांधण्याचे तंत्रज्ञान आणि पद्धत त्यांनी विकसित केली व त्यानुसार दरवर्षी मे महिन्यात आगामी मॉन्सूनचे भाकीत वर्तवण्यात येते. ते बहुतांशी अचूक ठरल्याने, समस्त भारतीय शेतकऱ्यांसाठी मोठीच मदत मिळाली आहे.

१९९५ ते १९९८ या तीन वर्षांच्या कालावधीत डॉ. गोवारीकरांनी पुणे विद्यापीठाचे कुलगुरू म्हणून काम पाहिले. सध्या ते इस्रोचे 'सतीश धवन डिस्टिंग्विश्ड प्राध्यापक' म्हणून इस्रोतील तरुण शास्त्रज्ञांना मार्गदर्शन करतात. महाराष्ट्र शासनाच्या राजीव गांधी विज्ञान तंत्रज्ञान आयोगाचे ते अध्यक्ष असून त्यांना कॅबिनेट दर्जा दिला गेला आहे. इंफाळ येथील मणिपाल विद्यापीठाच्या कोर्टावरही त्यांची नेमणूक झाली आहे. भारत सरकारच्या शुगर टेक्नॉलॉजी मिशनच्या स्थापनेपासून, म्हणजे १९९३ सालापासून ते त्याच्या सल्लागार समितीचे अध्यक्ष आहेत.

त्यांचे २०० हून अधिक विज्ञानविषयक शोधनिबंध, अनेक विज्ञान पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यांचे हे लेख आणि पुस्तके अनेक विद्यापीठांच्या आणि बोर्डाच्या पाठ्यपुस्तकांमधून अभ्यासासाठी लावले गेले आहेत.

'द अ‍ॅस्ट्रोनॉटिकल सोसायटी ऑफ इंडिया' या संस्थेतर्फे २००४ साली अग्निबाणाच्या इंधनासंबंधी त्यांनी विकसित केलेल्या तंत्रज्ञानाच्या महत्त्वपूर्ण कामगिरीबद्दल त्यांना 'आर्यभट्ट' हा अत्यंत मानाचा पुरस्कार मिळाला. त्यांना अनेक संस्थांची सुवर्णपदके, मानाच्या पदव्या, तसेच पद्मश्री आणि पद्मभूषण हे पुरस्कार मिळालेले आहेत.

आणखी काही काळाने राजकारण अकार्यक्षम ठरेल आणि देशाचा कारभार वैज्ञानिक चालवतील, हे अनेक वर्षांपूर्वी त्यांनी केलेले भाकीत आता हळूहळू खरे ठरण्याची चिन्हे दिसायला लागली आहेत. डॉ.विक्रम साराभाईंच्या हाताखाली घडत गेलेल्या या थोर वैज्ञानिकाचे राहणीमान, साराभाईंइतकेच साधे आहे.

– डॉ. मानसी राजाध्यक्ष

ग

***संदर्भ :***

१. *दै. महाराष्ट्र टाइम्स; ३० मार्च २००१.*
२. *दै. सकाळ; १८ नोव्हेंबर २००४.*
३. *श्री दीपलक्ष्मी दिवाळी अंक; २००४.*

## गोवारीकर, शंकर रणछोडदास

**अभियंता**

**९ जानेवारी, १९३१**



डॉ. शंकर गोवारीकर यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. विद्युत अभियांत्रिकी या विषयात पदवी प्राप्त केल्यानंतर अणू पदार्थविज्ञान या विषयात त्यांनी त्यांच्या मास्टर्स आणि डॉक्टरेट पूर्ण केले.

१९५५ साली महाविद्यालयीन शिक्षणानंतर शास्त्रज्ञ म्हणून त्यांच्या कारकिर्दीची सुरुवात अणुऊर्जा आस्थापन (एटॉमिक एनर्जी एस्टॅब्लिशमेंट), तुर्भे इथून झाली. त्यानंतर जवळजवळ तीन वर्षे डॉ.गोवारीकर यांनी अणुऊर्जा कार्यक्रमासाठी आवश्यक असलेले, न्यूट्रॉन काउण्टर विकसित करून तयार केले. या अनुभवाचा उपयोग त्यांना पुढे म्हणजे युरोपमधील बर्मिंगहॅम विद्यापीठात संशोधन सहायक (रिसर्च असोसिएट) म्हणून काम करताना झाला. बर्मिंगहॅम विद्यापीठात त्यांनी उच्च धारेचा प्रोटॉन स्रोत विकसित केला आणि त्याचे ब्रिटिश एकस्वही मिळवले. त्याच सुमारास भारत शासनाने डॉ. शंकरराव गोवारीकर यांना ब्रिटिश अणुऊर्जा संशोधन आस्थापना आणि फ्रेंच अणुऊर्जा संशोधन आस्थापना या ठिकाणी विद्युतचुंबकीय पद्धतीने समस्थानिके वेगळी

करण्याच्या प्रक्रियांविषयीच्या संशोधनात सहभागी होण्यासाठी पाठवले.

१९६१ साली डॉ. गोवारीकर भारतात परतले आणि त्यांच्याकडे भारताचा पहिला विद्युतचुंबकीय समस्थानिक विभाजक तयार करण्याच्या प्रकल्पाचे नेतृत्व सोपवले गेले. ही जबाबदारी त्यांनी अत्यंत उत्कृष्टपणे आणि मोठया कुशलतेने यशस्वी करून दाखवली. डॉ. होमी भाभा यांनी त्यांच्या या कामाचे मनापासून कौतुक केले. त्यानंतर त्यांना अमेरिकेतल्या टेक्सास येथे व्हेरिएबल एनर्जी सायक्लोट्रॉनच्या कामाचा अनुभव घेण्यासाठी एक वर्षासाठी पाठवण्यात आले. तिथल्या अनुभवाचा उपयोग त्यांनी कोलकाता येथील व्हेरिएबल एनर्जी सायक्लोट्रॉन तयार करण्याकरिता केला. कोलकाता येथील जबाबदारी यशस्वीपणे पार पाडल्यावर, त्यांनी बी.ए.आर.सी.तील तांत्रिक पदार्थविज्ञान आणि प्रोटोटाइप इंजिनिअरिंग डिव्हिजनच्या प्रमुखपदाची सूत्रे हाती घेतली.

१९८३ साली डॉ. शंकर गोवारीकर यांनी चंदिगडमधल्या सेंट्रल सायंटिफिक इन्स्ट्रुमेंट्स ऑर्गनायझेशन (सी.एस.आय.ओ.) या संस्थेच्या संचालकपदाचा भार सांभाळला. तेथे त्यांनी मायक्रोइलेक्ट्रॉनिक्स, ४ एम.इ.व्ही. लीनिअर ॲक्सलरेटरसारखी वैद्यकीय उपकरणे, अंतराळ संशोधनासाठी आणि शेतकी कामासाठी वापरल्या जाणाऱ्या उपकरणांसाठी ऑप्टिक साधने विकसित करणे, यांसारख्या अनेक राष्ट्रीय प्रकल्पांवर काम केले.

निवृत्त झाल्यानंतर, त्यांची पतियाळा येथील थापर कॉर्पोरेट संशोधन आणि विकसन केंद्राच्या कुलगुरू आणि संचालकपदी नियुक्ती झाली. त्यांनी पुढील चार वर्षे या पदाचा भार यशस्वीपणे सांभाळला. याशिवाय, ते इंडियन व्हॅक्युम सोसायटीचे सरचिटणीस आणि अध्यक्ष होते आणि डिफेन्स रिसर्च आणि डेव्हलपमेंट ऑर्गनायझेशनच्या (डी.आर.डी.ओ.) निवड समितीचे अध्यक्षही होते.

– डॉ.मानसी राजाध्यक्ष

## गोविंद स्वरूप
**खगोलशास्त्रज्ञ**
**२३ मार्च १९२९**



भारतातील रेडिओ-खगोलशास्त्राच्या विकासाचे श्रेय प्रा. गोविंद स्वरूप यांना जाते. उत्तर प्रदेशातील ठाकुरद्वार येथे जन्मलेल्या गोविंद स्वरूप यांनी आपले पदव्युत्तर शिक्षण अलाहाबाद येथून १९५० साली पूर्ण केले. पदव्युत्तर शिक्षणानंतर त्यांनी चार वर्षे दिल्ली येथील राष्ट्रीय भौतिकशास्त्र प्रयोगशाळेत, दोन वर्षे ऑस्ट्रेलियातील ‘राष्ट्रकुल वैज्ञानिक आणि संशोधन संघटने’त आणि एक वर्ष अमेरिकेतील हार्वर्ड विद्यापीठात संशोधनात्मक कार्य केले. त्यानंतर १९६१ साली त्यांनी अमेरिकेतील स्टॅन्फर्ड विद्यापीठातून पीएच.डी. ही पदवी प्राप्त केली.

स्टॅन्फर्ड विद्यापीठातील आणखी दोन वर्षांच्या कार्यानंतर ते १९६३ साली भारतातील टाटा मूलभूत संशोधन संस्थेत रुजू झाले. तेथे नवनिर्मित रेडिओ-खगोलशास्त्र विभागाचे प्रमुखपद त्यांनी सांभाळले. १९८९ साली टाटा मूलभूत संशोधन संस्थेने पुणे येथे रेडिओ खगोल भौतिकशास्त्रावरील संशोधनासाठी ‘नॅशनल सेंटर फॉर रेडिओ ॲस्ट्रोफिजिक्स’ (एन.सी.आर.ए.) हे केंद्र स्थापन केले. प्रा.स्वरूप यांच्या मार्गदर्शनाखाली स्थापन झालेल्या या केंद्राच्या संचालकपदाची जबाबदारी त्यांच्याकडेच आली. १९९४ साली या केंद्राच्या संचालकपदावरून निवृत्त झाल्यानंतरही प्रा.स्वरूप यांची याच केंद्रात ‘प्रोफेसर एमेरिटस’ या पदावर विशेष नियुक्ती केली गेली. या पदावर ते १९९९ पर्यंत कार्यरत होते. त्यानंतर ‘इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमी’तर्फेसुद्धा त्यांच्या अनुभवाचा उपयोग करून घेण्यासाठी त्यांना ‘सन्माननीय शास्त्रज्ञ’ हे विशेष पद देण्यात आले.

गोविंद स्वरूप यांचे संशोधन हे सुरुवातीस सौरविषयक रेडिओ खगोलशास्त्राशी संबंधित होते. या संशोधनात त्यांनी सूर्यावर घडणाऱ्या सौरज्वालांसारख्या विविध घटनांशी निगडित असलेल्या, तसेच सौरबिंबावरील विविध भागांतून होणाऱ्या रेडिओलहरींच्या वर्णपटाचा मागोवा घेतला. प्रा.गोविंद स्वरूपांचा पीएच.डी.चा प्रबंध सूर्याकडून उत्सर्जित होणाऱ्या सूक्ष्मलहरींच्या अँटेनाद्वारे केलेल्या दिशानुरूप निरीक्षणांवर आधारित होता. प्रा. स्वरूप यांनी सौरप्रभेतून होणाऱ्या रेडिओलहरींच्या 'यू' या नावे ओळखल्या जाणाऱ्या विशिष्ट उत्सर्जनाचा शोध लावलेला आहे. सौरप्रभेतील चुंबकीय क्षेत्राशी निगडित असणाऱ्या या उत्सर्जनाचे निरीक्षण सौरप्रभेचा अभ्यास करण्यासाठी उपयुक्त ठरते.

सौरसंशोधनाबरोबरच कालांतराने डॉ.स्वरूप यांनी स्पंदके (पल्सार्स), किंतारे (क्वेसार्स), दीर्घिकांची केंद्रस्थाने यांसारख्या इतरही अनेक प्रकारच्या रेडिओस्रोतांचा आपल्या संशोधनक्षेत्रात समावेश केला. वेगवेगळ्या भागात विभागलेल्या एकाच रेडिओदीर्घिकेतील दोन भागांचा एकमेकांशी असलेला संबंध त्यांनी रेडिओलहरींच्या निरीक्षणाद्वारे प्रथमच दाखवून दिला. रेडिओदीर्घिकांचा प्रा. स्वरूप यांनी निदर्शनास आणून दिलेला हा गुणधर्म आता सर्वमान्य झाला आहे. प्रा. स्वरूप यांचे शंभराहून अधिक शोधनिबंध आणि वैज्ञानिक लेख प्रसिद्ध झाले असून त्यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी. मिळवलेल्या विद्यार्थ्यांची संख्या विसाहून अधिक आहे.

प्रा. स्वरूप यांनी रेडिओलहरींचे निरीक्षण करण्यासाठी उपयुक्त ठरतील अशी साधनेही आपल्या संशोधनाद्वारे विकसित केली असून त्याचा उपयोग जगातल्या अनेक देशांतील वेधशाळांतून केला जातो. टाटा मूलभूत संशोधन संस्थेतल्या आपल्या कारकिर्दीच्या सुरुवातीच्या काळातच त्यांनी मुंबईजवळील कल्याण येथे, सौरसंशोधनाला उपयुक्त ठरणारे व्यतिकरणमापी (इंटरफेरोमीटर) साधन उभारले. प्रा.स्वरूप यांनी विकसित केलेल्या दोन साधनांना एकस्वाचा अधिकारही मिळाला आहे. रेडिओखगोलशास्त्रातील मूलभूत संशोधनासाठी आपल्या देशात रेडिओ दुर्बिणी असण्याची गरज ओळखून प्रा.स्वरूप यांनी त्या दृष्टीने तामीळनाडूमधील उटी आणि महाराष्ट्रातल्या नारायणगाव जवळच्या खोडाद येथे वैशिष्ट्यपूर्ण अशा प्रचंड रेडिओ दुर्बिणींची उभारणी केली.

उटी येथे उभारलेली रेडिओ दुर्बीण ही अन्वस्तीय नळकांड्यांपासून तयार केली गेलेली असून ती १९७० साली कार्यान्वित झाली. सुमारे ९२ सें.मी. लांबीच्या रेडिओलहरींचा वेध या दुर्बिणीतून घेतला जातो. विश्वनिर्मितीच्या स्थिर-स्थिती प्रारूपाचे खंडन करणारा पुरावा या दुर्बिणीने स्वतंत्रपणे मिळवला आणि महास्फोट सिद्धान्ताच्या प्रारूपाला बळकटी दिली.

खोडाद येथील 'जायंट मीटरवेव्ह रेडिओ टेलिस्कोप' या प्रचंड दुर्बिणीची उभारणी ही सर्वार्थाने प्रा.स्वरूप यांची अत्यंत महत्त्वाची कामगिरी म्हणता येईल. सहा मीटरपर्यंत लांबीच्या रेडिओलहरींचे निरीक्षण करू शकणारी ही दुर्बीण अंतराळातल्या अतिदूरवरच्या हायड्रोजनच्या विद्युतभाररहित अणूंचा वेध घेऊ शकते. परिणामी या दुर्बिणीद्वारे विश्वाच्या बाल्यावस्थेतील स्थितीसंबंधी संशोधन करणे शक्य झाले आहे. याबरोबरच ही दुर्बीण विविध प्रकारची स्पंदके, दीर्घिका अशा अनेक रेडिओस्रोतांची निरीक्षणे करू शकते. मोठ्या तरंगलांबीच्या रेडिओलहरींची निरीक्षणे करणारी ही जगातली सर्वांत मोठी दुर्बीण ठरली आहे.

प्रा.स्वरूप आंतरराष्ट्रीय खगोलशास्त्रीय संघटनेच्या रेडिओ खगोलशास्त्रावरील समितीचे १९७९ ते १९८२ या काळात अध्यक्ष होते. याच संघटनेने स्थापलेल्या मोठ्या खगोलशास्त्रीय दुर्बिणी व तत्सम सुविधा विकसित करण्यासंबंधीच्या समितीचे ते १९९४ ते २००० या काळात सदस्य होते. इंटरनॅशनल कौन्सिल फॉर सायन्स या संघटनेच्या विविध प्रकारच्या रेडिओलहरींच्या संशोधनात्मक वापरात सुसूत्रता आणणाऱ्या समितीवरही त्यांनी काम केले आहे.

ग

प्रा. स्वरूप हे विविध सन्मानांनी विभूषित केले गेले आहेत. १९७२ साली 'पद्मश्री' आणि १९७३ सालच्या 'शांतीस्वरूप भटनागर' पारितोषिकाचे ते मानकरी ठरले आहेत.

त्यांना इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचे 'प्रशांतचंद्र महालनोबीस पदक' आणि 'सी.व्ही. रमण पदक', नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेसचे 'मेघनाद साहा पदक', इंडियन फिजिक्स असोसिएशनचे 'बिर्ला पारितोषिक' असे अनेक राष्ट्रीय पुरस्कार दिले गेले आहेत. महाराष्ट्रातल्या मानाच्या फाय फाउंडेशन पुरस्कारानेही ते सन्मानित झाले आहेत.

प्रा. स्वरूप यांना मिळालेल्या आंतरराष्ट्रीय सन्मानांत रशियातील 'फेडरेशन ऑफ कॉस्मोनॉटिक्स' या संस्थेचे 'त्स्कोलावॉस्की पदक' (१९८७), आंतरराष्ट्रीय रेडिओविज्ञान संघटनेचे 'जॉन हॉवर्ड डेलिंगर सुवर्णपदक' (१९९०), इराणचे 'ख्वारीज्मी' आंतरराष्ट्रीय पारितोषिक (१९९९) आदींचा समावेश आहे. प्रा. स्वरूप यांची इंग्लंडच्या रॉयल सोसायटीचे 'फेलो' म्हणून १९९१ साली नियुक्ती केली गेली. 'थर्ड वर्ल्ड अकॅडमी ऑफ सायन्सेस' (इटली) या संस्थेकडूनही त्यांची 'फेलो' म्हणून नियुक्ती केली गेली. २००७ साली त्यांना ऑस्ट्रेलियातील विविध संस्थांतर्फे ग्रेट रेबेर या आद्य रेडिओ-खगोलतज्ज्ञाच्या स्मरणार्थ देण्यात येणारे पदक देऊन त्यांचा विशेष गौरव केला गेला.

– डॉ. राजीव चिटणीस

***संदर्भ :***

१. *http://www.ncra.tifr.res.in/gs*

✻ ✻ ✻






## घाटगे, विष्णु माधव

**अभियंता, विमानविद्या शास्त्राचे गाढे अभ्यासक व पहिले भारतीय विमानरचना शास्त्रज्ञ**

**२४ ऑक्टोबर १९०८ - ६ डिसेंबर १९९१**



आधुनिक भारतात आजपर्यंत केवळ एकच विमानरचना शास्त्रज्ञ होऊन गेले, ते म्हणजे डॉ.विष्णुपंत घाटगे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारतीय वायुसेनेला प्रशिक्षणार्थी विमाने - एचटी-२ व एचजेटी-१६ बनवून देण्याचे श्रेय त्यांना जाते. त्याचप्रमाणे पुष्पक व कृषक ही विमानेसुद्धा खूपच गाजली. भारतात विमानरचना संशोधनासाठी अत्यंत आवश्यक असलेल्या 'हवाई बोगद्यां'ची निर्मिती हेसुद्धा त्यांनीच साकारले आणि याहूनही महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्यांनी विमानरचनाशास्त्राची 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स, बंगळुरू' व 'हिंदुस्थान एअरोनॉटिक्स लिमिटेड, बंगळुरू' येथे नवीन विद्याशाखा सुरू करून भारतात याचा पाया घातला. त्यांच्या हाताखाली तयार झालेले शास्त्रज्ञ व तंत्रज्ञच आता या विभागांमधून महत्त्वाची कामगिरी बजावत आहेत.

त्यांचा जन्म हसूरचंपू (गडहिंग्लज तालुका, कोल्हापूर) येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण तेथेच झाले. त्यानंतर ते कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयाचे विद्यार्थी होते. पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामधून त्यांनी बी.एस्सी. व एम.एस्सी. या पदव्या घेतल्या. १९३२ ते १९३६ या काळात त्यांनी जर्मनीतील गेटिंजनच्या 'कायसर विल्हेम' या संस्थेतून विमानविद्या (एरोनॉटिकल इंजिनिअरिंग) शाखेची डॉक्टरेट मिळविली. त्यानंतर १९३६ ते १९४२ या काळात त्यांनी मुंबईच्या रुइया व एल्फिन्स्टन आणि पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयात अध्यापन केले. १९४२ साली ते बंगलोरला आले व तेथील इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये त्यांनी सर्वप्रथम विमानविद्या विभाग सुरू केला. विमानरचनाशास्त्राची मुहूर्तमेढही येथेच करण्यात आली. तुटपुंज्या सुविधांमुळे संशोधनास अडथळा येतो असे लक्षात येऊन त्यांनी तेथे 'हवाई बोगद्या'ची (विंड टनेल) निर्मिती केली. १९४६ साली एका ब्रिटिश माणसाची विभागप्रमुख म्हणून नेमणूक झाल्याने त्यांना दिलेल्या वागणुकीमुळे ते काही वेळ निराश व खट्टू झाले. पण लगेचच त्यांना बंगलोरच्याच 'हिंदुस्थान एअरक्राफ्ट' या वालचंद हिराचंद कारखान्यात विमानरचनाशास्त्र विभाग सुरू करण्याचे आमंत्रण आले व त्यांनी ते आव्हान म्हणून स्वीकारले.

१९४७ ते १९७१ या काळात त्यांनी विमानरचनाशास्त्र या विभागाचा पाया भक्कम केला. त्यांनी स्वतंत्र भारताला शेतीउपयोगी विमान व भारतीय वायुसेनेसाठी प्राथमिक प्रशिक्षणास आवश्यक असे विमान करण्याचे ठरविले व ती त्याच कारखान्यात बनविली. भारतीय वायुसेनेमध्ये एचटी-२ हे विमान १९९० सालापर्यंत कार्यरत होते. त्याचप्रमाणे नंतर त्यांनी एचजेटी-१६ हे प्रशिक्षणार्थी जेट विमान बनविले. १९६० सालाच्या आसपास कृष्ण मेनन हे संरक्षणमंत्री असताना त्यांनी जर्मनीच्या डॉ. कुर्ट टॅक यांना भारतीय वायुसेनेसाठी लढाऊ जेट विमान बनविण्यासाठी आमंत्रित केले. या

घ

घटनेने डॉ. घाटगे व्यथित झाले होते व भारतीय विमानरचना शास्त्रज्ञांवर दाखविलेला हा एक अविश्वासच आहे, असेच त्यांचे मत होते. त्याचप्रमाणे पुढेही भारतीय वायुसेनेसाठी परदेशातून परवाना घेऊन भारतात विमान बनविण्याची प्रक्रियासुद्धा त्यांना अजिबात पसंत नव्हती. भारतातच संशोधनासाठी संपूर्ण सुविधा निर्माण करून भारतीयांकडूनच तंत्रज्ञानविषयक प्रगती करून घ्यावी, असे त्यांचे ठाम मत होते.

डॉ. घाटगे यांचे व्यक्तिमत्त्व अतिशय साधे असून, निवृत्तीनंतर त्यांनी बऱ्याच संस्थांमधून योगदान दिले. ते एक उत्तम खेळाडू तर होतेच, पण त्याचबरोबर खिलाडूवृत्तीचेही होते. १९६५ साली त्यांना भारत सरकारने 'पद्मश्री' देऊन त्यांचा गौरव केला. १९७२ साली कोल्हापूरच्या मराठी विज्ञान संमेलनात त्यांचा गौरव करण्यात आला होता. बाकीही इतर बरेच गौरव त्यांना प्राप्त झाले. बऱ्याच संस्थांचे ते माननीय सदस्य होते.

- डॉ. सदानंद कुलकर्णी

***संदर्भ :***

*१. सातवे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; १९७२*
*२. दै. डेक्कन हेराल्ड; १६ डिसेंबर १९९१*

## घाटे, निरंजन सिंहेंद्र

**विज्ञानलेखक, प्रभावी विज्ञान प्रसारक**
**१० जानेवारी १९४६**
**मुख्य नोंद - साहित्य खंड**



आकाशवाणीच्या विविध केंद्रांवर कार्यक्रम अधिकारी आणि केंद्रप्रमुख आणि अनेक मराठी मासिकांचे संपादक म्हणून निरंजन घाटे परिचित आहेत. १५० पुस्तके, ३०० विज्ञानकथा आणि ३००० वैज्ञानिक लेख असे निरंजन घाटे यांचे विपुल प्रमाणात लेखन आहे.

मराठी भाषेतून विज्ञान-तंत्रज्ञानाचा प्रभावी प्रसार करण्यासाठी निरंजन घाटे यांनी सातत्याने ४० वर्षे लेखन केलेले आहे. त्यांनी आघाडीवरील विज्ञान-तंत्रज्ञानाची अद्ययावत माहिती विविध नियतकालिकांमधून आणि वृत्तपत्रांच्या रविवार पुरवण्यांमार्फत मराठी वाचकांपर्यंत पोहोचवण्यासाठी विशेष प्रयत्न केले. अग्रगण्य वैज्ञानिक शोधनिबंधांमधील इंग्रजी भाषा ही विशिष्ट क्षेत्रात संशोधन करणाऱ्या संशोधकाची माहिती आणि संदर्भासाठी योजलेली असते. त्यातील जटिल कल्पना अवजड शब्दांमध्ये व्यक्त झालेल्या असतात. घाटे यांनी मराठी वाचकांसाठी वैज्ञानिक संकल्पनांमधील क्लिष्ट आशय सोप्या आणि सुबोध मराठी भाषेत प्रकट करण्यासाठी लेख व विज्ञानकथाही लिहिल्या. त्यांनी २००९ सालापर्यंत लिहिलेल्या १५० पुस्तकांपैकी अनेक वैज्ञानिक पुस्तकांचे पुनर्मुद्रण करावे लागले किंवा आवृत्त्या काढाव्या लागल्या. देशी आणि परदेशी शास्त्रज्ञांची चरित्रे, त्यांना आलेल्या अडचणी, त्यांची अनन्यसाधारण व्यक्तिमत्वे, त्यांच्या वैज्ञानिक कामगिऱ्या त्यांनी उलगडून दाखविल्या आहेत. पर्यावरण, उत्क्रांती यांसंबंधीचे लेखन करून त्यांनी जनजागृतीचे कार्यही केलेले आहे.

निरंजन घाटे यांनी भूशास्त्र हा विषय घेऊन पुणे विद्यापीठाची एम.एस्सी. पदवी १९६८ साली मिळवली. त्यानंतर त्याच विभागात त्यांनी सतत ९ वर्षे प्रयोगदर्शक आणि व्याख्याता म्हणून कार्य केले.

१९७७ साली त्यांना कार्यक्रम अधिकारी म्हणून नागपूर, जळगाव आणि सांगली आकाशवाणीच्या केंद्रांवर काम करण्याची संधी मिळाली. नवव्या आशियाई क्रीडा स्पर्धेच्या निमित्ताने त्यांची १९८२ साली मराठी कार्यक्रम प्रमुखपदी निवड झाली. तेथे त्यांनी लक्षणीय कामगिरी केली. त्यांची सांगली आकाशवाणीच्या केंद्रप्रमुख पदावर नेमणूक करण्यात आली. आकाशवाणीचे पदाधिकारी म्हणून घाटे यांनी ६००पेक्षा अधिक उत्तम कार्यक्रम श्रोत्यांसाठी सादर केले. त्यांमध्ये रूपके, एकांकिका, संवाद आणि



विज्ञानविषयक भाषणांचा समावेश होता. १९८३ नंतर पुण्याच्या महात्मा फुले वस्तुसंग्रहालयामध्ये घाटे यांनी प्रारंभी उपसंचालक आणि नंतर संचालक म्हणून कार्य केले.

पंधरा वर्षांच्या सेवेनंतर त्यांनी पूर्ण वेळ लेखनासाठी द्यायचे ठरवले. तथापि पुढील काही वर्षे त्यांनी अनेक मराठी मासिकांसाठी संपादकाची भूमिका बजावली. घाटे यांनी ‘सृष्टिज्ञान’ (१९८३-९३), ‘बुवा’, ‘पैंजण’ (१९८६-९२), ‘अद्‌भुत कादंबरी’, ‘ज्ञानविकास’ (१९८६-९२), ‘किर्लोस्कर’ (१९९३-९४), ‘विज्ञानयुग’ या मासिकांच्या संपादक मंडळावर उत्साहाने काम केले.

त्यांनी सतत नावीन्याचा ध्यास बाळगल्याचे दिसून येते. त्यांच्या विज्ञान लेखनासाठी आवश्यक असणारी विशाल ग्रंथसंपदा त्यांनी मेहनतीने उभारलेली आहे. विज्ञान लेखनाप्रमाणे ते युद्धकथा, साहसकथा, हेरकथा आणि बालकुमार वाङ्मयनिर्मितीमध्ये रमतात. सभा, संमेलने, सत्कार अशा गोष्टींपासून घाटे अलिप्त असतात, परंतु अशा प्रकारच्या कार्यक्रमात भाग घेऊन त्यांनी भाषणातून सडेतोडपणे आपली आग्रही, आणि व्यवहारी मते मांडली आहेत. घाटे यांच्या ‘ज्ञानदीप’, ‘ऊर्जाविश्व’, ‘वसुंधरा’, ‘अंटार्क्टिका’, ‘आकाशगंगा’, ‘शोधवेडे शास्त्रज्ञ’, ‘जीवनचक्र’, ‘आत्मवेध’, ‘आधुनिक युद्धसाधने’, ‘स्पेसजॅक’, अशा अनेक उत्तम पुस्तकांना वाचकांची पसंती आणि विविध पुरस्कार मिळालेले आहेत. त्यांच्या पुस्तकांना आठ वेळा राज्य पुरस्कार मिळालेले आहेत. त्यांमध्ये यदुनाथ थत्ते, रेव्हरंड ना.वा. टिळक, पंजाबराव देशमुख, वि.म. गोगटे, गो.रा. परांजपे, र.द. आंबेकर यांच्या नावाने दिल्या जाणाऱ्या पुरस्कारांचा विशेष उल्लेख करायला पाहिजे.

त्यांना मिळालेले इतर काही सन्मान : ‘स्वातंत्र्यवीर सावरकर पुरस्कार’ (पुणे मराठी ग्रंथालय, १९९२), ‘मो.वा. चिपळोणकर पुरस्कार’ (इंडियन फिजिक्स असोसिएशन, १९९७). घाटे यांच्या विज्ञानकथांना अनेक स्पर्धांमध्ये बक्षिसे मिळालेली आहेत. उदाहरणार्थ : ‘नवयुग कथास्पर्धा’ (१९७१,७२,७३), ‘विरंगुळा कथा स्पर्धा’ (१९७४), ‘मराठी विज्ञान परिषद, विज्ञानकथा स्पर्धा’ (१९७१,७२,७४). घाटे पुणे विद्यापीठाच्या भूशास्त्र विभागामध्ये अध्यापन करीत असताना, त्यांच्या संशोधनावर आधारित असलेले नऊ शोधनिबंध त्यांनी भूशास्त्राशी संबंधित नियतकालिकात प्रकाशित केलेले आहेत.

निरंजन घाटे यांनी शालेय आणि महाविद्यालयीन जीवनात असताना क्रिकेटच्या अनेक स्पर्धांमध्ये भाग घेऊन त्यांचे प्रावीण्य दाखवले होते. पुण्यातील सदू शिंदे लीग क्रिकेट स्पर्धांमध्ये त्यांनी १९६६ ते १९७३ या काळात चार वेळा उत्कृष्ट गोलंदाज म्हणून मानपत्रेसुद्धा मिळवली आहेत.

– डॉ. अनिल लचके

***संदर्भ :***

१. *एकोणिसावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; १९८४.*

***

घ

# च





## चिटणीस, एकनाथ वसंत

**उपग्रहशास्त्रज्ञ, भौतिकशास्त्रज्ञ**

**२५ जुलै १९२५**



प्रा. एकनाथ वसंत चिटणीस हे भारतीय अंतराळ संशोधन संघटनेच्या अहमदाबाद येथील अवकाश उपयोजन केंद्राचे, (स्पेस ॲप्लिकेशन सेंटर) माजी संचालक आहेत. कोल्हापूर येथे जन्मलेल्या प्रा.चिटणीस यांचे शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे झाले. प्रथम रसायनशास्त्र आणि नंतर भौतिकशास्त्र या विषयांत पदवी संपादन केलेल्या प्रा. चिटणीसांनी त्यानंतर रेडिओसंपर्क क्षेत्रातील पदविकेचा अभ्यासक्रम पूर्ण करून इलेक्ट्रॉनिक्स या विषयातील पदव्युत्तर पदवीही प्राप्त केली. अहमदाबाद येथे डॉ. विक्रम साराभाईंनी स्थापन केलेल्या भौतिकशास्त्र संशोधन प्रयोगशाळेत त्यांनी आपल्या संशोधनास प्रारंभ केला. प्रा. चिटणीस हे भारतीय अंतराळ कार्यक्रमात अगदी सुरुवातीपासून सहभागी होते. अग्निबाण प्रक्षेपण केंद्रासाठी केरळमधील थुंबा या जागेची आणि उपग्रह प्रक्षेपण केंद्रासाठी श्रीहरिकोटा या जागेची निवड करण्यामागे मुख्यत्वे प्रा. चिटणीस यांचे परिश्रम कारणीभूत आहेत. भारताच्या अंतराळ क्षेत्रात अत्यंत यशस्वी ठरलेल्या 'इन्सॅट' मालिकेतील उपग्रहांच्या आखणीतही त्यांचे महत्त्वाचे योगदान आहे. अंतराळ तंत्रज्ञानाचा वापर शैक्षणिक आणि इतर क्षेत्रांत केला जाण्याच्या दृष्टीने त्यांनी बहुमोल कामगिरी केली आहे.

प्रा. चिटणीसांचे १९५०-१९६० या दशकातले संशोधन हे वैश्विक किरणांशी संबंधित होते. या संशोधनात तामीळनाडूमधील कोडाईकॅनॉल येथून केलेल्या वैश्विक किरणांच्या वर्षावाबद्दलच्या विशेष अभ्यासाचाही समावेश आहे. त्यांची पीएच.डी. ही पदवी याच विषयाशी संबंधित आहे. वैश्विक किरणांवरील संशोधनासाठी १९५८ ते १९६१ या तीन वर्षांच्या काळात ते अमेरिकेतील मॅसॅच्युसेट्स तंत्रज्ञान संस्थेतही राहिले होते. १९६०-१९७० या दशकांत प्रा. चिटणीसांनी क्ष-किरण खगोलशास्त्रावर आपले लक्ष केंद्रित केले. या संशोधनात अंतराळातील क्ष-किरणांच्या विविध स्रोतांचे वेध घेण्यासाठी अग्निबाणांवर बसवलेल्या उपकरणांचाही वापर केला गेला.

अंतराळ तंत्रज्ञानाचा शेती, हवामान, आरोग्य, शिक्षण, दूरसंपर्क, मनोरंजन, अशा विविध क्षेत्रांत वापर करण्याच्या दृष्टीने भारतीय अंतराळ संशोधन संघटनेने 'नासा'च्या सहकार्याने १९७०च्या दशकात 'साइट' (सॅटेलाइट इंस्टक्शनल टेलिव्हिजन एक्सपरिमेंट) हा बहुपयोगी प्रकल्प आखला होता. अवकाश उपयोजन केंद्राचे तत्कालीन संचालक प्रा. यशपाल यांच्या सक्रिय पुढाकारातून साकारलेल्या या महत्त्वाकांक्षी प्रकल्पाची अंमलबजावणी प्रा. चिटणीस यांनी यशस्विरीत्या पार पाडली. १९७५-१९७६ साली प्रत्यक्षात आलेल्या या प्रकल्पामुळे विविध राज्यांतील सुमारे २९०० खेड्यांतील दूरचित्रवाणी संच उपग्रहाद्वारे एकमेकांना जोडले जाऊन विविध कार्यक्रमांचे सर्वत्र एकाच वेळी प्रसारण करणे शक्य झाले. या प्रकल्पामुळे दूरचित्रवाणी हे नुसतेच करमणुकीचे माध्यम न राहता, या माध्यमाची राष्ट्रीय स्तरावरची सर्वंकष उपयुक्तता सिद्ध झाली.

भारतीय अंतराळ संशोधन कार्यक्रमात सुरुवातीपासून सहभागी असणारे प्रा. चिटणीस १९६२ साली अंतराळ संशोधनासाठी डॉ. विक्रम साराभाई यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन झालेल्या राष्ट्रीय समितीचे (इन्कोसपार) सभासद सचिव होते. प्रा. चिटणीसांचा संयुक्त राष्ट्रसंघासारख्या संघटनांशी निकटचा संबंध आला असून त्यांनी अनेक आंतरराष्ट्रीय अंतराळविषयक परिषदांतून भारताचे यशस्वी प्रतिनिधित्व केले आहे. १९८१-१९८५ या काळात प्रा. चिटणीस हे अहमदाबाद येथील अवकाश उपयोजन केंद्राचे संचालक होते. १९८५ साली या पदावरून निवृत्त झाल्यावर दोन वर्षांसाठी त्यांची याच संस्थेत सल्लागार म्हणून विशेष नेमणूक केली गेली होती. त्यानंतर त्या वेळी नुकत्याच सुरू झालेल्या 'कंट्रिवाइड क्लासरूम' या दूरदर्शनवरील शैक्षणिक कार्यक्रमाच्या संयोजनात त्यांचा सहभाग होता.

गेली अनेक वर्षे प्रा.चिटणीस हे पुणे विद्यापीठाच्या 'व्यवस्थापन', 'पत्रकारिता', 'मास कम्युनिकेशन', अशा विविध विषयांच्या अभ्यासक्रमांच्या आयोजनांस मार्गदर्शन करीत असून ते या विषयांत अध्यापनही करीत आहेत. १९८६ सालापासून 'प्रेस ट्रस्ट ऑफ इंडिया' या प्रतिष्ठित संस्थेच्या संचालक समितीवर असणाऱ्या प्रा. चिटणीसांनी २००८-२००९ या काळात या संस्थेचे अध्यक्षपदही भूषवले आहे. 'राष्ट्रीय भौतिकशास्त्र प्रयोगशाळा', 'राष्ट्रीय समुद्र विज्ञान संस्था' यांसारख्या राष्ट्रीय स्तरावरच्या विज्ञान संशोधन संस्थांपासून 'इंदिरा गांधी राष्ट्रीय विद्यापीठ', 'यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ', 'भारतीय चित्रपट आणि दूरचित्रवाणी संस्था' यांसारख्या दर्जेदार शैक्षणिक संस्थांच्या व्यवस्थापकीय समित्यांवरही त्यांनी काम केले आहे.

प्रा.चिटणीस हे आपल्या बहुविध कार्याद्वारे विविध सन्मानांचे मानकरी ठरले आहेत. विज्ञान आणि तंत्रज्ञान या क्षेत्रांतील बहुमोल योगदानाबद्दल १९८५ साली त्यांना भारत सरकारतर्फे 'पद्मभूषण' हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. विज्ञान आणि समाज यांच्यातील अन्योन्य संबंधांवर आधारित कार्याबद्दल त्यांना विद्यापीठ अनुदान आयोगाकडून विशेष पारितोषिकाने गौरवण्यात आले. प्रा. चिटणीसांना 'फाय फाउंडेशन'चा सन्मान व 'अ‍ॅस्ट्रॉनॉमिकल सोसायटी ऑफ इंडिया'चे 'आर्यभट्ट' पारितोषिकही मिळाले आहे. दूरसंपर्क क्षेत्रातील असामान्य कामगिरीबद्दल भारतीय अंतराळ संशोधन संस्थेकडून प्रा. चिटणीसांचा विशेष पदक देऊन गौरव करण्यात आला आहे.

– डॉ. राजीव चिटणीस

***संदर्भ :***

*१. दै. केसरी; २४ फेब्रुवारी १९८५.*

च

## चिटणीस, चेतन एकनाथ

**जीवशास्त्रज्ञ, जैव तंत्रज्ञान तज्ज्ञ**

**३ एप्रिल १९६१**



चेतन एकनाथ चिटणीस यांचे वडिल भौतिकतज्ज्ञ तर आई जैवरसायनतज्ज्ञ. अशा आईवडिलांचे गुण घेऊन चेतन चिटणीस जैवतंत्रज्ञान शाखेकडे वळले. शालेय शिक्षण अहमदाबादला तर आयआयटी मुंबई येथून भौतिकशास्त्रात एम.एस्सी. पदवी संपादन करून त्यांनी आपले पुढील शिक्षण राईस आणि बर्कले विद्यापीठांतून पूर्ण केले. चिटणीस पेशी आणि रेण्वीय जीवशास्त्र (सेल आणि मोलीक्युलर बायोलॉजी) यातील संशोधन कार्यक्रमाकडे वळले. राइस विद्यापीठात भौतिकशास्त्रात एम.ए. तर बर्कले येथील कॅलिफोर्निया विद्यापीठात जीवभौतिकीमध्ये त्यांनी पीएच.डी. मिळवली. फुप्फुसरोगांना कारणीभूत ठरणाऱ्या 'सुडोमोनॉस एरीगुनोसा' या परजीवीवर त्यांनी पीएच.डी.साठी संशोधन केले.

त्यानंतर भारतीयांना त्रस्त करणाऱ्या मलेरियावर डॉ. लुईस मिलर ह्यांच्या हाताखाली त्यांनी संशोधन केले. पाच वर्षांनंतर १९९५ मध्ये ते 'इंटरनॅशनल सेंटर फॉर

जेनेटिक इंजिनिअरींग आणि बायोटेक्नॉलॉजी' (आय.सी.जी.इ.बी) या संस्थेमध्ये दिल्ली येथे संशोधक म्हणून रुजू झाले.

मलेरियात रक्तातील तांबड्या रक्तपेशी नष्ट होऊन मलेरियाचे परजीवी का वाढतात? त्यावेळी पेशी, रेणू यांच्यामध्ये कोणत्या आंतरक्रिया किंवा कोणत्या अभिक्रिया होतात ह्याविषयीच्या संशोधनात त्यांना विशेष रस आहे. त्यामुळे त्यांनी मलेरिया नष्ट करण्याचा ध्यास घेतला.

च

डॉ. चिटणीस यांनी वॉशिंग्टनला असताना आपल्या सहकाऱ्यांसह रक्तातील तांबड्या पेशींच्या पृष्ठभागावर वाढणारे प्रतिजनुक (ॲन्टीजेन) शोधून काढले. ह्या प्रतिजैविकावरच मलेरियाचे सूक्ष्म परजीवी असतात. त्यांची संख्या रक्तामध्ये वाढत जाते. त्यामुळे रक्तातील तांबड्या रक्तपेशींची संख्या कमी होत जाऊन मलेरिया होतो. ह्या प्रक्रियेचा शोध लागताच डॉ. चिटणीस यांच्या संशोधक वृत्तीने उचल खाल्ली. ज्यायोगे हे मलेरियाचे परजीव तांबड्या रक्तपेशींना बांधले जाणार नाहीत. आणि असे द्रव्य शोधून काढले पाहिजे. आणि असे प्रतिद्रव्य मिळाले तर मलेरियावर निश्चित मात करता येईल, असे त्यांना वाटले.

भारतात परतल्यावर डॉ. चिटणीस यांनी याच दिशेने कार्य करण्यास सुरुवात केली. मलेरियाच्या परजीवीला बद्ध करणारे प्रथिन तर त्यांनी शोधलेच, त्याचबरोबर रक्तपेशीतील कोणते गुणसूत्र मलेरियास कारणीभूत होते, हेही त्यांनी शोधले. मलेरिया परजीवीला बद्ध करणारे प्रथिन इ-कोलाय द्रव्यात, प्रत्यक्ष प्रयोगशाळेतील नियंत्रित वातावरणात तयार करण्यात त्यांनी यश मिळविले आहे. हे प्रथिन केवळ शुद्ध स्वरुपातच नाही तर विशिष्ट तऱ्हेने रचण्यातही (गुंडाळण्यातही) त्यांनी यश मिळविले आहे. त्यामुळे मलेरियाची लस आता दृष्टीक्षेपात आली आहे.

डॉ. चिटणीसांची मलेरियानिर्मूलन विषयीची तळमळ अनेक मान्यवरांनी हेरली. इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ इम्युनोलॉजीचे संस्थापक शास्त्रज्ञ डॉ. जी. पी. तलवार यांनी त्यांच्या कार्याविषयी गौरवोद्गार काढले आहेत.

डॉ. चेतन चिटणीस यांना अनेक पारितोषिकांनी सन्मानित करण्यात आले आहे. १९९५ साली अमेरिकेतर्फे 'तरुण संशोधक' पुरस्कार, १९९७ साली भारतातील 'बी.एन. सिंग स्मृती' पुरस्कार, २००० सालातील 'अय्यंगार' पुरस्कार त्यांना मलेरियावरील संशोधनासाठी प्राप्त झाले आहेत. याखेरीज तरुण शास्त्रज्ञांना देण्यात येणारा 'शांतिस्वरूप भटनागर' पुरस्कार त्यांनी वैद्यकशास्त्रात केलेल्या संशोधनाबद्दल २००४ साली त्यांना मिळाला आहे.

- मृणालिनी साठे

***संदर्भ :***

*१. इंडिया टुडे; २७ डिसेंबर १९९९.*

*२. 'बायो स्पेक्ट्रम इंडिया; २००५.*

*३. मराठी विज्ञान परिषद-पत्रिका; दिवाळी अंक; २००५.*

## चितळे, माधव आत्माराम

**अभियंता, जलतज्ज्ञ**

**८ ऑगस्ट १९३४**



माधव आत्माराम चितळे म्हणजे रॉयल स्विडिश अकॅडमी ऑफ सायन्सेसद्वारा दिल्या जाणाऱ्या ४८ लक्ष रुपयांच्या जल पुरस्काराने सन्मानित नामवंत जलतज्ज्ञ. हा पुरस्कार नोबेल पुरस्काराच्या समकक्ष मानला जातो. कुशल अभियंता, विकास व पर्यावरण यांचे उत्कृष्ट समन्वयक, सामाजिक भान असलेले शासकीय अधिकारी असा त्याचा लौकिक आहे. महाराष्ट्र राज्य व संपूर्ण देशातल्या जलसंपत्तीच्या सर्वांगीण माहितीचा ज्ञानकोश असलेल्या माधवरावांचा जन्म आजोळी यवतमाळचा; पण शिक्षण चाळीसगावात झाले. घरातून देशप्रेम व धर्मप्रेमाचे संस्कार आणि शिक्षकांकडून सद्विचारांचे संस्कार त्यांच्यावर झाले. आईकडून

समाजसेवेचा वारसा असलेले चितळे, महाविद्यालयीन जीवनात अत्यंत हुशार विद्यार्थी म्हणून सर्वपरिचित होते. पुणे विद्यापीठाच्या बी.ई. परीक्षेत ते पहिल्या वर्गात पहिले आले.

१९५६ साली महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या अभियांत्रिकी सेवेच्या परीक्षेत चितळे प्रथम क्रमांकाने निवडून आले. शासकीय सेवेत असताना त्यांना विविध ठिकाणी नोकरीसाठी जावे लागले. १९६१ साली पुण्याला पाणीपुरवठा करणारी पानशेत व खडकवासला ही दोन धरणे फुटली. पुणे शहराचा पाणीपुरवठा बंद पडला. चितळे यांनी त्यांचे सर्व अभियांत्रिकी कौशल्य पणाला लावले. शासकीय नियमांत राहूनच, कंत्राटदारांवर विश्वास दाखवून त्यांनी अत्यंत थोड्या अवधीत, म्हणजे नियमाप्रमाणे १२० दिवसांच्या आत पुण्याचा पाणीपुरवठा पूर्ववत केला.




स्टॉकहोम जल पुरस्कार

१९६० साली जागतिक बँकेने मंजूर केलेल्या एका योजनेनुसार मुंबईला पाणीपुरवठा करणाऱ्या भातसा धरणाच्या कामाला सुरुवात झाली होती. मुंबई-नाशिक महामार्गावर, मुंबईपासून ६० किलोमीटर अंतरावर भर जंगलात हे धरण होणार होते. भातसाहून नळांद्वारे पाणी मुंबईत येणार होते. चितळे यांनी या योजनेत बदल सुचवले. ते बदल पटवून देण्यात ते यशस्वी झाले आणि सुधारित योजना मंजूर झाली. सुधारित योजनेनुसार मुंबईच्या पाणीपुरवठ्याबरोबरच आसपासच्या भागाला जलसिंचनासाठी पाणी मिळाले, कालवा तयार झाला, जलविद्युत केंद्र तयार झाले आणि पाण्याच्या प्रवाहासाठी बोगदा केला गेला. ही योजना पूर्ण करण्यासाठी चितळे यांनी आपले मुख्यालय भातसा येथील जंगलात हलवले; वन्यप्राण्यांच्या सहवासात राहून सहकाऱ्यांसमवेत काम केले. मुंबईला दररोज २० कोटी लिटर पाणीपुरवठा होऊ लागला, स्वस्त वीजनिर्मिती होऊ लागली आणि २५० चौरस किलोमीटर क्षेत्रातल्या शेतांना पाणी मिळाले.

१९६४ ते १९६६ या कालावधीत मुळा या मातीच्या धरणाच्या पायामधल्या खडकांमध्ये विवरे सापडली. त्यामुळे धरणाचा पाया नीट होत नव्हता. त्यासाठी लवचीक पायाची नवीन रचना करण्यात आली, त्यामध्ये चितळे यांचा सहभाग होता. १९६७ साली कोयनेत भूकंप झाला. धरण सुरक्षित होते, पण योजनेतल्या तिसऱ्या टप्प्यामध्ये वीजनिर्मिती होणार होती, तिथे डागडुजी आवश्यक होती. चितळे यांनी ते काम करून तो टप्पा कार्यान्वित केला. कोकणात उतारावरून पावसाचे पाणी वाहून थेट समुद्रात जाते. ते पाणी अडवून, छोट्या-छोट्या प्रकल्पांतून वीजनिर्मिती करावी, अशी योजना त्यांनी तयार केली.

चितळे पुणे विद्यापीठाच्या अभियांत्रिकी समितीचे दहा वर्षे सभासद होते. विद्यापीठातील स्थापत्य अभियांत्रिकीचा अभ्यासक्रम त्यांनी तयार केला. त्यांनी महाराष्ट्र शासनाच्या अभियांत्रिकी स्पर्धात्मक परीक्षांचे

च

काम बघितले. योजनांवर काम करत असताना त्यांच्या असे लक्षात आले की, बांधकाम करणाऱ्या श्रमिकांचे उन्नयन झाल्याशिवाय स्थापत्यांच्या रचनांचे उन्नयन होणार नाही. म्हणून श्रमिकांचे शिक्षण, त्यांच्या समस्या याबाबत त्यांनी अहवाल तयार केला. त्यांनी यंत्रबांधणी, तांत्रिक मदतीचा विकास, धरण सुरक्षा, महाराष्ट्रातील दुष्काळग्रस्त प्रदेश, इत्यादी विषयांवर अहवाल लिहिले आहेत. जुलै २००५ मध्ये मुंबईत पावसाने कहर केला, मिठी नदीच्या पुराने हाहाकार उडवला. कारण या नदीमध्ये अतिक्रमणे झाली होती. महाराष्ट्र शासनाने डॉ. चितळे यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती नेमली. अशी पूरपरिस्थिती निर्माण होऊ नये यासाठी समितीने उपाय सुचवले.

महाराष्ट्र शासनाच्या पाटबंधारे योजनांचे प्रमुख अभियंता आणि नंतर सचिव म्हणून काम करीत असताना त्यांनी राज्यात विविध योजना आखल्या, आंतरराज्य पाणी प्रकल्पाच्या वाटाघाटी केल्या. नाशिक येथील महाराष्ट्र इंजिनिअरिंग रिसर्च इन्स्टिट्यूट म्हणजे मेरी आणि इंजिनिअरिंग स्टाफ कॉलेज ऑफ महाराष्ट्र या संस्थांची पुनर्रचना केली, अभ्यासक्रम बदलले, सक्षम अभियंता घडविण्यासाठी उपयुक्त प्रशिक्षण देण्यास सुरुवात केली. त्या संस्था वाढवल्या, नावारूपाला आणल्या. महाराष्ट्र लँड डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन आणि डायरेक्टोरेट ऑफ इरिगेशन रिसर्च अँड डेव्हलपमेंट, पुणे या संस्थांनी त्यांच्या मार्गदर्शनाखाली चांगले बाळसे धरले. त्यांनी पाटबंधारे योजनांच्या व्यवस्थापनाला वाहिलेले एक त्रैमासिक १९८२ साली सुरू केले असून त्या मासिकाला तज्ज्ञांच्या वर्तुळात मोठी मान्यता मिळालेली आहे. त्या मासिकाचे नाव आहे ‘सिंचन.’ महाराष्ट्र जल आयोगाचे अध्यक्षपदही त्यांनी भूषवले आहे. त्यांच्या सूचनेनुसार आगामी ३० वर्षांत होऊ शकणाऱ्या पाणी विकास प्रकल्पांची आखणी करण्यात आली आहे.

चितळे यांनी ‘निळी क्रांती’ हे मराठी पुस्तक लिहिले भविष्यातले प्रकल्पांचे प्रयत्न सामाजिक परिवर्तनशील असले पाहिजेत, प्रकल्प तयार करताना केवळ व्यापारप्रधान विचार न करता, सामाजिक विचार करणे आवश्यक आहे, आर्थिक समृद्धीबरोबर पर्यावरणसमृद्धीही आवश्यक आहे, अशी चितळेंची भूमिका आहे.

१९८४ साली चितळे यांची नद्यांवर बांधलेल्या धरण प्रकल्पाचे आयुक्त म्हणून नियुक्ती झाली. त्या पदावरून काम करताना त्यांनी फराक्का, बेटवा, बनसागर, सरदार सरोवर व नर्मदा सागर या कामांकडे लक्ष पुरवले. नर्मदा सागर व सरदार सरोवर या प्रकल्पांविषयी जेव्हा न्यायालयात दावे-प्रतिदावे चालू होते, तेव्हा चितळे यांनी प्रकल्पांच्या योग्यतेविषयी तज्ज्ञ म्हणून उचित बाजू मांडली. १९८५ साली ते केंद्रीय जल आयोगाचे अध्यक्ष व पदसिद्ध सचिव झाले. जलसंपत्ती विकासविषयक ही देशातली सर्वोच्च संस्था आहे. १९८९ साली चितळे भारत सरकारच्या जलसंपत्ती मंत्रालयाचे सचिव झाले. त्यांनी केंद्रीय जलधोरण तयार केले. असे धोरण ठरवणारे फारच कमी देश आहेत. त्यानंतर १९९३ ते १९९७ या कालावधीत आंतरराष्ट्रीय सिंचन व निस्सारण आयोगाचे पूर्णकालीन महासचिव म्हणून त्यांनी काम बघितले. जगभरातल्या पाणी समस्यांचे अनुभव एकत्र करून ‘पाण्याची बचत’ हे पुस्तक संपादित केले. पाणी समस्या सोडवताना हे पुस्तक मार्गदर्शक ठरते. ‘पाणी आणि जमीन यांची उत्पादकता’ या पुस्तकाचे संपादनही त्यांनी केले.

महाराष्ट्र राज्यात काम करत असताना, ग्रामीण भागात दौऱ्यांवर त्यांनी जनमानसाचे जवळून निरीक्षण केले होते. पाणी योजना जर यशस्वी व्हायच्या असतील, तर लोकांना त्या का आवश्यक आहेत ते समजले पाहिजे व त्यासाठी लोकांशी संवाद हवा, योजनांमध्ये लोकांचा सहभाग हवा, यामुळे लोकसंवाद व लोकसहभाग व्हावा या उद्देशांनी त्यांनी राष्ट्रीय जलसंपत्ती परिषद भरवली. परिषदेत पाणी या विषयावर एक प्रदर्शन भरवलेले होते. सुमारे ६० हजार विद्यार्थ्यांनी या प्रदर्शनाला भेट दिली. परिषदेच्या निमित्ताने जनतेला आणि राज्यकर्त्यांना

पाण्याची उपलब्धता आणि गुणवत्ता यांचे महत्त्व पटवून दिले गेले. पाणी हा एक महत्त्वाच्या संपत्तीचा स्रोत आहे व तो सुरक्षित ठेवणे आवश्यक आहे हे संबंधितांना ठासून पटवून दिले गेले. पाण्याविषयी सामाजिक जागृती निर्माण झाली. तेव्हापासून दरवर्षी ७ जुलै हा दिवस 'जलसंपत्ती दिन' म्हणून साजरा करण्यात येतो. भारतीय जलपरिषदेच्या अंतर्गत, देशात विविध ठिकाणी २५ केंद्रे निर्माण केलेली असून तिथे पाण्याच्या विविध प्रश्नांवर दिशादर्शक चर्चा होत असतात. या उपक्रमामुळे दक्षिण आशियातली इतर राष्ट्रेही प्रभावित झाली. १९९८ ते २००२ या काळात चितळे 'विश्वजल सहभागिता' या आंतरराष्ट्रीय कार्यसंस्थेच्या दक्षिण आशिया समितीचे अध्यक्ष होते.

त्यांच्या या बहुविध कामगिरीमुळे १९८९ साली हैद्राबादच्या जवाहरलाल नेहरू तंत्रज्ञान विद्यापीठाने व १९९५ साली कानपूरच्या कृषी आणि तंत्रविज्ञान विद्यापीठाने त्यांना सन्माननीय डॉक्टरेट पदव्या दिल्या. प्रिन्स्टन विद्यापीठामध्ये त्यांना परवीन फेलोशिप मिळाली होती. तिथे त्यांना पाणी प्रश्नातले अर्थशास्त्र, पर्यावरण या विषयांचा अभ्यास करता आला. त्यातूनच 'पाण्याचे सामाजिक मूल्य' हा प्रबंध साकारला. स्वच्छता, सौंदर्य, रोजगारनिर्मिती, अर्थशास्त्र यांना वगळून पाणी योजना यशस्वी होऊ शकत नाही, असे त्यांनी म्हटले आहे. प्रकल्पाच्या योजनेतून विकासाच्या अनेक संधी मिळाल्या पाहिजेत. चितळेंच्या सूचनेनुसार यमुना नदीवर योजना तयार करून तिचे पाणी कृत्रिम कालव्यांच्या विविध शाखा तयार करून खेळवले गेले. त्यामुळे आजूबाजूच्या प्रदेशात, दिल्लीच्या पूर्वेला असलेल्या शेतजमिनीला फायदा झाला. डॉ. चितळेच गंगा नदी स्वच्छ करण्यासाठी आखण्यात आलेल्या योजनेचे प्रमुख होते.

डॉ. चितळे नॉर्वेमधील ऑस्लो येथील जलप्रबोधिनी या संघटनेचे सदस्य आहेत. कोणताही जलविवाद, पाण्याबाबत तणाव सामंजस्याने सोडवले जावेत या दृष्टीने प्रयत्न करण्यासाठी ही संघटना निर्माण झाली आहे. त्याचप्रमाणे, जगातल्या जलविषयक दहा प्रमुख संघटनांची एक जलपरिषद स्थापन करण्यात चितळे यांनी पुढाकार घेतला होता.

- जयंत एरंडे

***संदर्भ :***

१. *पंचविसावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; १९९१*

च

## चित्रे, शशिकुमार मधुसूदन
**खगोलशास्त्रज्ञ, भौतिकशास्त्रज्ञ**
**७ मे १९३६**



शशिकुमार मधुसूदन चित्रे यांचा जन्म, तसेच शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षणही मुंबईत झाले. १९५६ साली मुंबईतील एल्फिन्स्टन महाविद्यालयातून गणित विषयातली पदवी परीक्षा प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाल्याने ड्यूक ऑफ एडिंबरा फेलोशिपने त्यांना सन्मानित करण्यात आले. त्यानंतरचे गणितातले उच्चशिक्षण त्यांनी इंग्लंडमधील केंब्रिज विद्यापीठातून पूर्ण केले. १९६० साली म्हणजे गणिताच्या अध्ययनाच्या तिसऱ्या वर्षी त्यांनी मिळवलेल्या विशेष प्रावीण्यासाठी पीटरहाउस महाविद्यालयाकडून त्यांना गणिताचे पारितोषिक देण्यात आले. केंब्रिज विद्यापीठाची पीएच.डी. ही पदवी त्यांना १९६३ साली मिळाली. या पदवीसाठी त्यांनी सादर केलेला संशोधनात्मक प्रबंध हा सौरडागांच्या रचनेशी संबंधित आहे.

त्यानंतर तीन वर्षे इंग्लंडमधील लीड्स विद्यापीठात उपयोजित गणित या विषयाचे त्यांनी अध्यापन केले. त्यानंतर अमेरिकेतील कॅलिफोर्निया तंत्रज्ञान संस्थेत एक वर्ष संशोधन करून ते १९६७ साली भारतात परतले आणि मुंबईच्या टाटा मूलभूत संशोधन संस्थेत रुजू झाले आणि २००१ साली तेथूनच ज्येष्ठ प्राध्यापक या पदावरून निवृत्त झाले. त्यानंतर मुंबई विद्यापीठ आणि

अणुशक्ती विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने पायाभूत विज्ञानाच्या अभ्यासासाठी स्थापन झालेल्या केंद्रात, २००७ साली त्यांची 'डिस्टिंग्विश्ड फॅकल्टी' म्हणून नेमणूक केली जाऊन त्यांच्यावर विशेष जबाबदारी सोपवण्यात आली.

चित्रे यांचे आतापर्यंत विविध आंतरराष्ट्रीय नियतकालिकांतून सुमारे दीडशे संशोधनात्मक निबंध प्रसिद्ध झाले आहेत. सौरखगोलशास्त्रात त्यांचे महत्त्वाचे योगदान आहे. सौरडागांसंबंधी केलेल्या संशोधनातून त्यांनी सौरडागाचे प्रारूप मांडले असून सौरडागाद्वारे उत्सर्जित झालेल्या ऊर्जेच्या वहनामागील कार्यभाव स्पष्ट केला आहे. सूर्यावर होणाऱ्या सार्वत्रिक स्वरूपाच्या स्पदंनांच्या उगमासंबंधीही त्यांनी संशोधन केले आहे. सूर्याच्या अंतर्भागातील पदार्थ हे सूर्याच्या अक्षाभोवती वर्तुळाकार गतीने फिरत असतात. या सौरपदार्थांचा प्रदक्षिणाकाळ हा त्यांच्या स्थानावर अवलंबून असतो. चित्र्यांनी केलेल्या संशोधनाद्वारे या पदार्थांच्या अक्षाभोवतीच्या प्रदक्षिणाकाळात स्थानानुसार होणाऱ्या बदलाची, सूर्यावर होणाऱ्या सार्वत्रिक स्वरूपाच्या स्पंदनांच्या वारंवारितेशी सांगड घातली गेली आहे.

सूर्याच्या गाभ्यात घडत असलेल्या अणुगर्भीय संमिलनाच्या क्रियेत न्यूट्रिनो हे विद्युतभाररहित आणि अत्यल्प वस्तुमान असणारे कण निर्माण होतात. या कणांचे सूर्याकडून सतत उत्सर्जन होत असते. यातील पृथ्वीवर पोहोचणाऱ्या कणांची संख्या विशेष प्रकारच्या उपकरणांद्वारे मोजली जाते. निरीक्षणांद्वारे प्रत्यक्ष मोजलेली न्यूट्रिनो संख्या आणि गणिताद्वारे काढलेली संख्या यांत आढळलेल्या तफावतीचे स्पष्टीकरण चित्र्यांनी त्यांच्या संशोधनाद्वारे दिले आहे. मूलद्रव्यांच्या सूर्याच्या गाभ्यातील वैपुल्याच्या मर्यादेवरही त्यांनी सैद्धान्तिक विवेचन केले आहे. सूर्याच्या बाह्यभागातील वर्णावरणातील उष्णतेचा सूर्याभोवतालच्या चुंबकत्वाशी असलेल्या संबंधांवरील संशोधनाचाही चित्र्यांनी केलेल्या सौरसंशोधनात समावेश आहे. वयाच्या सत्तरीतही संशोधनात सक्रियरीत्या सहभागी राहून चित्र्यांनी २००८ साली पूर्ण झालेल्या सौरचक्राशी संबंधित संशोधनही केले आहे. या संशोधनाद्वारे त्यांनी सौरचक्राच्या कालखंडात होणाऱ्या सूर्यावरील पदार्थांच्या गतीतील बदलाचे विश्लेषण केले.

सौरखगोलशास्त्राशिवाय शशिकुमार चित्र्यांनी अतिघन स्वरूपातल्या ताऱ्यांसंबंधी संशोधन केले आहे. या संशोधनात त्यांनी न्यूट्रॉन ताऱ्यासारख्या अतिघन स्वरुपातल्या ताऱ्यांच्या स्वत:भोवतीच्या फिरण्याचा, त्यांच्या स्पंदनांच्या वारंवारितेवर होणारा परिणाम गणिती स्वरूपात मांडला आहे. चित्र्यांनी न्यूट्रॉन ताऱ्याच्या गाभ्याच्या घनीभवनाचे गणिती विश्लेषण केले आहे. ताऱ्यांच्या बाह्यभागात होणारे पदार्थांचे वहनही त्यांनी अभ्यासले आहे.

याशिवाय गुरुत्वीय भिंग हासुद्धा चित्र्यांनी केलेल्या संशोधनाचा विषय आहे. प्रचंड वस्तुमान असणाऱ्या अवकाशस्थ वस्तू आपल्या गुरुत्वाकर्षणामुळे आजूबाजूने जाणाऱ्या प्रकाशकिरणांच्या मार्गात बदल घडवून आणतात. या वस्तूंच्यापलिकडे असलेल्या दीर्घिका वा ताऱ्यांकडून येणाऱ्या प्रकाशकिरणांवर जेव्हा असा परिणाम घडून येतो, तेव्हा पलीकडील वस्तूच्या एकाहून अधिक प्रतिमा निर्माण होतात. हा परिणाम 'गुरुत्वीय भिंग' या नावे ओळखला जातो. यावर आधारित गणितानुसार, या प्रतिमांची एकूण संख्या ही विषम असायला हवी. परंतु प्रत्यक्ष निरीक्षणांत ही संख्या सम असल्याचे आढळले आहे. या बाबीचे स्पष्टीकरण चित्रे यांनी दिले आहे. या स्पष्टीकरणानुसार या प्रतिमांची संख्या ही प्रत्यक्षात विषमच असून त्यातील एक प्रतिमा ही अत्यंत अंधुक असल्यामुळे दिसू शकत नाही. गुरुत्वीय भिंगांचा वापर दीर्घिकांच्या परिसरातील चुंबकीय क्षेत्राचे मापन करण्यासाठी कसा करता येईल, हेसुद्धा त्यांनी दाखवून दिले आहे.

जर्मनीतील 'मॅक्स प्लांक इन्स्टिट्यूट ऑफ एक्स्ट्राटेरेस्टिअल फिजिक्स', तसेच अमेरिकेतील

'नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेस' यांसारख्या संस्थांनी त्यांना आमंत्रित करून आपल्या संशोधनात सहभागी करून घेतले होते. याचबरोबर इंग्लंडमधील केंब्रिज, ससेक्स, लंडन यांसारख्या आणि अमेरिकेतील प्रिंस्टन, कोलंबिया, व्हर्जिनिया यांसारख्या विद्यापीठांनी पाहुणे प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक केली होती. १९७५-७६ या काळात ते विद्यापीठ अनुदान आयोगाचे राष्ट्रीय पातळीवरचे अध्यापक होते. १९९९-२००० या काळात ते अहमदाबाद येथील फिजिकल रिसर्च लॅबोरेटरी येथेही अभ्यागत प्राध्यापक म्हणून नेमले गेले होते. २००१-०६ या काळात त्यांनी मुंबई विद्यापीठाच्या भौतिकशास्त्र विभागातली डॉ. राजा रामण्णा यांच्या नावे असलेली फेलोशिप भूषवली.

१९८६-८७ या काळात टाटा मूलभूत संशोधन संस्थेच्या भौतिकशास्त्र विभागाचे सहअधिष्ठाता असणाऱ्या शशिकुमार चित्र्यांनी इतर अनेक महत्त्वाच्या जबाबदाऱ्या सांभाळल्या आहेत. 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ ॲस्ट्रोफिजिक्स' आणि 'नॅशनल सेंटर फॉर रेडिओ ॲस्ट्रोफिजिक्स' या संस्थांच्या व्यवस्थापन समित्यांवर त्यांनी कार्य केले आहे. उदयपूरच्या सौर वेधशाळेच्या वैज्ञानिक सल्लागार समितीचे ते सदस्य होते. 'होमी भाभा विज्ञान शिक्षण संस्थे'च्या व्यवस्थापन समितीचेही ते सदस्य होते. 'इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमी'च्या समितीचे १९९७-१९९९ या काळात सदस्य, तर १९९८-२००३ या काळात ते इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेसचे उपाध्यक्ष होते. १९८५-१९८८ या काळात 'नेहरू तारांगणा'च्या सल्लागार समितीचे अध्यक्ष आणि १९९२-९४ या काळात 'ॲस्ट्रॉनॉमिकल सोसायटी ऑफ इंडिया' या संस्थेचे अध्यक्ष म्हणून त्यांची नियुक्ती झाली होती. याबरोबरच आंतरराष्ट्रीय खगोलशास्त्रीय संघटनेवरील भारतीय समितीचे अध्यक्षपद त्यांनी अनेक वर्षे सांभाळले आहे.

– डॉ. राजीव चिटणीस

***संदर्भ :***

१. *पंचविसावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; १९९१.*

## चिपळोणकर, मोरेश्वर वासुदेव

**भौतिकशास्त्रज्ञ**

**४ ऑगस्ट, १९०९ - २४ एप्रिल १९८८**



पुणे विद्यापीठाच्या स्थापनेनंतर भौतिकशास्त्र विषयात जे काही उल्लेखनीय कार्य शिक्षण व संशोधन या क्षेत्रात झाले, त्याचा पाया डॉ. मोरेश्वर वासुदेव चिपळोणकर यांनी रचला. त्यांचा जन्म अकोला, खानदेश येथे झाला. त्यांनी एम.एस्सी. पदवी बनारस विद्यापीठातून प्राप्त केल्यानंतर भौतिकशास्त्र विषयातील 'डॉक्टरेट ऑफ सायन्स' ही पदवी १९४२ साली मिळविली. एम.एस्सी. नंतर थेट डी.एस्सी. ही पदवी मिळविणे निश्चितच प्रशंसनीय बाब आहे. त्याचबरोबर त्यांनी उत्कृष्ट प्रबंधाबद्दल मुंबई विद्यापीठाचे मूस सुवर्णपदकही मिळविले. त्यानंतर काही काळ त्यांनी सर परशुरामभाऊ महाविद्यालयामध्ये 'स्कूल ऑफ रेडिओ फिजिक्स ॲण्ड इलेक्ट्रॉनिक्स' या विभागात प्राध्यापक व संचालक म्हणून काम केले. पुढे त्यांनी इन्स्टिट्यूट ऑफ मीटिऑरॉलॉजीमध्ये प्रथम श्रेणी अधिकारी म्हणून काम केले. त्यानंतरचा १९५२ ते १९६९ हा काळ त्यांनी पुणे विद्यापीठाच्या भौतिकशास्त्र विभागाचे प्रमुख या पदावर व्यतीत केला. त्यांनी केलेले संशोधनकार्य हे मुख्यत: रेडिओ फिजिक्स, नाइट एअर ब्लो, हवामानशास्त्र अभ्यास, खगोलशास्त्र आणि भारतीय संगीतातील विज्ञान इत्यादी विषयांशी निगडित होते. ढग, वीजवावटळी, विजांचा कडकडाट, जमिनीजवळील विद्युतक्षेत्र व निरनिराळ्या उंचीवरील हवेचे तापमान आणि दाब इत्यादी घटकांसंबंधीचा प्रायोगिक व तात्त्विक अभ्यास करून डॉ. चिपळोणकरांनी अनेक प्रबंध प्रसिद्ध केले आहेत. वाऱ्यापासून ऊर्जा मिळवण्याच्या उद्देशाने हिंदुस्थानच्या पश्चिम आणि दक्षिण प्रदेशावर वाहणाऱ्या वाऱ्यांचा

च

च

अभ्यासही त्यांनी केलेला आहे.

‘ओझोनोस्फिअर’मधील आणि जमिनीलगतच्या थरांतीलही ओझोन वायूसंबंधीची अचूक मोजमापे हिंदुस्थानात करणारे हे पहिलेच संशोधक होत. वारिसात तोफोंच्या नैसर्गिक आविष्कारात उत्पन्न झालेल्या ध्वनिलहरींच्या साहाय्याने ओझोनोस्फिअरमधील तापमानाचा त्यांनी अचूक अंदाज केलेला आहे व त्या आविष्काराचे उगमस्थानही निश्चित केले आहे. ‘ॲटमॉस्फेरिक्स’ किंवा रेडिओमध्ये ऐकू येणारा खडखडाट यासंबंधी व त्यावरून ‘आयनोस्फिअर’संबंधीचा प्रायोगिक अभ्यास त्यांनी स्वत: व अनेक विद्यार्थ्यांच्या मदतीनेही बरीच वर्षे करून या शाखेत भर घातली आहे.

संधीप्रकाशाच्यावेळी आकाशातून येणाऱ्या तेजाचेही अचूक मोजमाप अनेक वर्षे करून ‘स्ट्रॅटोस्फिअर’मधील निरनिराळ्या उंचीवरील हवेचे तपमान व घनताही अजमावली आहेत. त्याचप्रमाणे आयनोस्फिरमधील निरनिराळ्या थरांतून रात्रीच्या वेळी येत असलेल्या अत्यंत मंद प्रकाशाचे म्हणजेच रात्रीप्रकाशाचे मोजमाप निरनिराळ्या पद्धतींनी त्यांनी स्वत: आणि विद्यार्थ्यांकरवीही अनेक वर्षे केलेले आहे.

स्फोटक ध्वनिलहरींच्या परिणामामुळे धातूंच्या अंतर्रचनेत आणि त्यांच्या गुणधर्मात जे बदल घडून येतात त्यासंबंधीही त्यांनी संशोधन केले आहे. आकाश निरीक्षणासारख्या अनेक उपक्रमांत त्यांचा सहभाग होता.

पुणे विद्यापीठातील भौतिकशास्त्र विभाग हा देशातील अग्रगण्य विभाग म्हणून गणला जातो. या विभागाने अलीकडच्या काळात भौतिकशास्त्रातील शाखांमध्ये राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर आपला ठसा उमटविला आहे. त्यांपैकी हवामानशास्त्र आणि अलीकडच्या काळामध्ये विकसित झालेले अवकाशशास्त्र या विषयांत झालेल्या प्रगतीचा पाया चिपळोणकर यांनी अनेक दशकांपूर्वी घातला. ही परंपरा त्यांच्या अनेक विद्यार्थ्यांनी पुढे चालू ठेवली. डॉ. मो. वा. चिपळोणकर यांच्याकडून त्यांना मिळालेली संशोधनाची प्रेरणा ही त्यांच्यामध्ये असलेल्या गुणांची साक्ष देते.

१९७०च्या दशकानंतर संशोधनासाठी अनेक संधी उपलब्ध झाल्या. त्याचप्रमाणे नवीन विषयांचा विकास झाला. त्यात मटेरियल सायन्स, न्यूक्लिअर फिजिक्स, बायोफिजिक्स, लेझर त्याचप्रमाणे सैद्धान्तिक भौतिकी यांचा समावेश करता येईल. या पार्श्वभूमीवर विचार केला, तर मो. वा. चिपळोणकर यांच्या काळात संशोधन करणे ही अत्यंत जिकिरीची बाब होती. परंतु डॉ. मो. वा. चिपळोणकर यांच्यामध्ये असणारी संशोधनाची आवड, चिकाटी, कष्ट करण्याची तयारी, वागणुकीतील साधेपणा आणि सरळमार्गी व्यवहार या गोष्टींच्या बळावर त्यांनी संशोधन सुरू ठेवले. ते स्वत: अत्यंत कडक शिस्तीचे भोक्ते होते. त्यांचा व्यवहार हा अत्यंत सचोटीचा होता.

अध्यापन, संशोधन व इतर शैक्षणिक जबाबदाऱ्यांमधूनही डॉ. चिपळोणकर वाचन व अध्ययन चिकाटीने व जिद्दीने करीत. त्यांच्या दिनक्रमात सकाळचा वेळ हा वाचन आणि अध्ययनाकरिता राखून ठेवलेला असे. विभाग आणि विद्यापीठाचे अनुशासन व प्रशासन हे नेहमी दुपारी १२ ते ३ या वेळात असे. संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांशी चर्चा व त्यांना मार्गदर्शन या करता नंतरचे दोन-तीन तास वापरले जात. ते संध्याकाळी आणि रात्री आपल्या आवडीच्या शास्त्रीय विषयांचे वाचन करीत. त्यांचे ज्येष्ठ सहकारी व नामवंत रसायनशास्त्रज्ञ डॉ. शंकर खंडो कुलकर्णी-जतकर यांनी अध्ययन आणि वाचन निष्ठा जागृत ठेवण्याच्या त्यांच्या जिद्दीबद्दल खूपच प्रशंसोद्गार काढलेले आहेत. ज्येष्ठ व तरुण वैज्ञानिकांना एकत्र येता यावे व विचारांचे आदान प्रदान व्हावे याबाबत त्यांनी ‘विज्ञान’ नावाचा वैचारिक मेळावा भरवण्याचे कार्य केले. प्रत्येक वर्षी हा तीन दिवसीय मेळावा ते स्वखर्चाने भरवीत असत. अंगीकृत कार्य उत्कृष्टपणे व्हावे यासाठी पदरमोड करण्यास ते सदैव तयार असत.

'मराठीतून विज्ञान प्रसार' या विषयात त्यांनी केलेले योगदानही खूपच अमूल्य आहे. प्रसाराची साधने अत्यंत सीमित असतानाही त्यांनी केसरी, सकाळ, सृष्टिज्ञान, विज्ञानयुग, स्वराज्य यांसारख्या नियतकालिके आणि साप्ताहिकांमधून शंभरहून अधिक लेख लिहिले. विज्ञानातील अचूकपणावर त्यांचा कटाक्ष असे. सृष्टिज्ञान मासिकाच्या संपादक मंडळात त्यांनी अनेक वर्षे काम केले. इंडियन फिजिक्स असोसिएशन, पुणे विभागातर्फे विज्ञान प्रसाराचे कार्य करणाऱ्या व्यक्तीस 'डॉ. मो. वा. चिपळोणकर' हा पुरस्कार दिला जातो. या पुरस्काराला प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे आणि हा पुरस्कार मिळणे म्हणजे मराठीतून विज्ञान प्रसाराच्या क्षेत्रात केलेल्या कार्याचीच पावती समजली जाते. यातच चिपळोणकर यांच्या कार्याचे आणि निष्ठापूर्ण जीवनाचे महत्त्व सामावलेले आहे.

– डॉ. पंडित विद्यासागर

च

***

# छ



छ

## छत्रे, विनायक लक्ष्मण

***केरुनाना छत्रे***

**गणितज्ञ**

**१८२४ - १८८४**



विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक, सुधारकाग्रणी आगरकर यांचे गुरु विनायक लक्ष्मण ऊर्फ केरुनाना छत्रे यांचा जन्म अलिबाग तालुक्यातील नागाव येथे झाला. दुर्दैवाने आई-वडलांचे छत्र बालपणीच हरपल्यामुळे केरुनानांना शिक्षणासाठी कोकणातून मुंबईस, चुलत्याच्या आश्रयास यावे लागले. तेथे एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये आचार्य बाळशास्त्री जांभेकर व प्रो.आर्लिबार या व्यासंगी गुरूंच्या हाताखाली केरुनानांनी आधुनिक शिक्षणाचे धडे घेतले. गणितविद्येत त्यांचा एवढा लौकिक होण्याची पूर्वचिन्हे त्यांच्या विद्यार्थीदशेतच स्पष्ट दिसू लागली होती. विशेषत: गणित, खगोल व पदार्थविज्ञानासारख्या अवघड शास्त्रांत त्यांना पुढे जी विलक्षण गती प्राप्त झाली, त्याचा स्रोत आर्लिबारकडून घेतलेल्या मूलभूत ज्ञानात होता. नंतर मात्र त्या शिदोरीवर या विषयातील मूल ग्रंथांचा बारीकसारीक तपशिलांसह सर्वांगीण अभ्यास करून त्यांनी या शास्त्रावर प्रभुत्व मिळविले. लौकिक अर्थाने केरुनानांनी विद्यापीठाची (जे तेव्हा अस्तित्वात नव्हते) पदवी संपादन केलेली नव्हती, तरी पुढील आयुष्यात त्यांनी जी कर्तबगारी दाखविली, त्यावरून त्यांची असाधारण बुद्धिमत्ता दृग्गोचर होते.

अंतरिक्षातील चमत्कारिक वाटणाऱ्या घटना व लोहचुंबक यांचे अनुभव घेण्यासाठी आर्लिबार यांनी १८४० साली मुंबईत कुलाबा येथे एक वेधशाळा सुरू केली. तेथे त्यांनी केरुनानांना ‘सहाय्यक’च्या जागी नेमले. अवघ्या सोळाव्या वर्षी दरमहा ५० रुपये पगारावर लागलेल्या या नोकरीत केरूनानांनी पुढील दहा वर्षे जागरूकपणे हवामानशास्त्राचे शिक्षण घेतले. त्यामुळेच पुढील आयुष्यात कोणतेही शास्त्रीय तत्त्व प्रत्यक्ष प्रमाणाने सिद्ध झाल्याशिवाय किंवा त्याच्या सत्यतेचा पडताळा घेतल्याशिवाय ते स्वीकारीत नसत.

१८५१ मध्ये पुणे महाविद्यालयाच्या नॉर्मल स्कूल या विभागात केरोपंतांची सहाय्यक प्राध्यापकाच्या जागी नेमणूक झाली. तेथे ते गणित व सृष्टिशास्त्र हे विषय शिकवीत असत. पुढे नॉर्मल स्कूल, ज्यास तेव्हा ‘व्हर्नाक्युलर कॉलेज’ म्हणजे पुढे ‘ट्रेनिंग कॉलेज’ म्हणत असत, ते पुणे महाविद्यालयापासून वेगळे झाल्यावर तेथे प्रथम ते अध्यापक व मग काही वर्षे मुख्य अधिक्षक होते. त्याला जोडून अभियांत्रिकी महाविद्यालयातसुद्धा काही काळ त्यांनी सृष्टिशास्त्रावर व्याख्याने दिली होती. दरम्यान, अहमदनगरच्या इंग्रजी शाळेचे मुख्याध्यापक म्हणून काही काळ काढल्यावर १८६५ सालापासून परत पुणे महाविद्यालयात, ज्यास पुढे ‘डेक्कन महाविद्यालय’ म्हणू लागले, तेथे ते गणित व सृष्टिशास्त्राचे प्राध्यापक झाले. नंतर अल्पकाळ ते हंगामी प्राचार्य म्हणूनही नियुक्त झाले होते. अशी जबाबदारीची पदे सांभाळताना देखील त्यांनी आपल्या अध्यापनात कधी कसूर केली नाही, की खंड पडू दिला नाही.

टिळक-चिपळूणकर-आगरकर या केरुनानांच्या प्रख्यात विद्यार्थ्यांच्या चरित्रग्रंथांमध्ये व खुद्द आगरकरांनी

केरूनानांवर लिहिलेल्या मृत्युलेखात व्यासंग, शिकवण्याची विलक्षण हातोटी, स्वभावातील कमालीचे सौजन्य, गरजू व गरीब विद्यार्थ्यांना आधार देऊन प्रसंगी आर्थिक मदत करण्याची तत्परता, ह्या त्यांच्या विविध गुणांवर अधिक प्रकाश पडतो. एखाद्या विषयाच्या चिंतनात ते गढले म्हणजे त्यांना कशाचेच भान राहत नसे. याची प्रचिती म्हणजे एकदा एका कठीण उदाहरणाने त्यांना हैराण केले; त्या काळात त्यांना जेवण सुचेना की स्वस्थ झोप लागेना. अखेर पाच ते सहा दिवसांनी ते सुटले तेव्हा त्यांना झालेला अवर्णनीय आनंद सांगताना त्यांचा कंठ दाटून येत असे.

मुलांना सहज कळेल, अशा रितीने गणित समजावताना आवश्यक तो शास्त्रीय संदर्भ ते पुरवीत असत. मुलांनी कितीही विचित्र प्रश्न विचारला तरी त्यांच्यावर न रागावता, हर प्रयत्नाने ते त्यांचे शंकानिरसन करीत असत. लहान-थोर असा भेदभाव न करता, ते सर्वांशी सारख्याच खेळीमेळीने व निगर्वीपणे वागत असत. विद्यार्थ्यांना केवळ शंकासमाधानासाठीच नव्हे, तर जेवणाखाण्यासाठी देखील त्यांच्याकडे मुक्तद्वार असे. अनेक गरजू विद्यार्थ्यांना त्यांनी फी-पुस्तकांची मदत केलेली आहे. एकदा पहिल्या वर्षाच्या परीक्षेची फी भरण्यासाठी पैसे नसल्याने आगरकर एक नाटक लिहीत आहेत, असे केरुनानांच्या कानावर गेले. तेव्हा त्यांनी आगरकरांची फी भरून त्यांच्या हातातील नाटकलेखनाचे कागद काढून घेतले.

केरुनानांनी शालेय पातळीवर, गणित व पदार्थविज्ञानावर सुबोध भाषेत क्रमिक पुस्तके लिहिली होती. अंकगणिताच्या पुस्तकात मूलभूत क्रियांबरोबर कर्जव्यवहार, रोखे, सुतार व गवंडी यांच्या कामाची आकारणी इत्यादीचे व्यावहारिक ज्ञान समाविष्ट केलेले असून सरावासाठी दिलेला उदाहरणसंग्रह मुलांसाठी मनोरंजक भाषेत रचलेला आहे, तर पदार्थविज्ञानाची सुरुवात करताना, मुलांच्या मनांत निसर्गाबद्दल कुतूहल निर्माण होईल अशा ललित शैलीत आपल्या आजूबाजूला सृष्टीत घडणारे व्यापार, निसर्ग-चमत्कार व पदार्थांचे गुणधर्म यांचे उत्तम प्रकारे वर्णन केले आहे. संवादरूपाने विषयाची मांडणी करून एकेक संकल्पना रंजक भाषेत विशद केलेली आहे. विशेष बाब म्हणजे, सोप्यासोप्या प्रयोगांसाठी लागणाऱ्या वस्तूंची यादी व त्यांच्या किमतीसुद्धा परिशिष्टात दिलेल्या आढळतात.

स्वभाषेत शास्त्रीय विषय सुलभपणे मांडून ज्ञानप्रसार करण्यासाठी १८४८ साली मुंबईत स्थापन झालेल्या ‘ज्ञानप्रसारक सभे’पुढे केरुनानांनी हवा, भरती-ओहोटी, कालज्ञान या विषयांवर निबंध वाचले. ‘हवे’वर तर एकूण १७ निबंध असून त्यांत आकृत्यांसह सृष्टीतील अनेक चमत्कारांचे चित्तवेधक वर्णन केलेले आहे.

मुख्य म्हणजे अशा शास्त्रीय लेखनात परिभाषेसाठी केरुनानांची लेखणी कधी अडली नाही. उदाहरणार्थ, संवर्धन, स्नेहाकर्षण, केषाकर्षण, त्वरा, भरतीची समा, वातादिक दर्शक यंत्र, इत्यादी समर्पक, सुटसुटीत व अर्थवाही शब्द त्यांनी जागोजागी योजलेले आहेत.

जन्मतिथीवरून इंग्रजी तारीख वा तारखेवरून तिथी काढण्यासाठी ‘कालसाधनांची कोष्टके’, तर पंचांग तयार करण्यासाठी ‘ग्रहसाधनांची कोष्टके’, हे ग्रंथ त्यांनी लिहिले. मात्र ते लिहिताना आपल्याकडील ज्योतिष परिस्थितीस बाधा येणार नाही, याची त्यांनी काळजी घेतली. या ग्रंथावरून भारतीय युद्धाच्या वेळची ग्रहस्थिती व महाभारतात त्याच्याशी तंतोतंत जुळणारे वर्णन, याचा पडताळा एका अभ्यासकाने घेतला होता. श्रीक्षेत्र काशीतील भूस्थिरवाद्यांना उत्तर देण्यासाठी त्यांनी ‘कुभ्रम निर्णय’ पुस्तक लिहिले, तर ‘पृथ्वीवर पडणारा पाऊस व सूर्यावरील डाग’ यांवर केरुनानांनी सार्वजनिक सभेत निबंध वाचला होता.

केरुनानांचा ऐन उमेदीचा काळ वेधशाळेत सूक्ष्मयंत्रांच्या सहवासात गेल्याने, पंचांगातील गणितातून ऋतुकाळ व आकाशस्थ ग्रहांचा दृक्प्रत्यय येण्याबद्दल ते आग्रही होते. शिवाय धर्मकृत्य करण्यासाठी पंचांगात दाखवलेल्या वेळा निर्दोष असाव्यात म्हणून त्यांनी बडोद्याच्या आबासाहेब पटवर्धनांच्या मदतीने शुद्ध पटवर्धनी पंचांग काढले.

छ

केरूनाना प्रागतिक विचारसरणीचे होते. ते मुलींच्या शाळेच्या व्यवस्थापक मंडळावर होते व स्त्रियांच्या सामाजिक सुधारणांस त्यांचा पाठिंबा होता, श्रीमती रमाबाई रानडे यांच्या प्रेरणेने भरणाऱ्या स्त्रियांच्या साप्ताहिक सभेस नियमित हजर राहून ते स्त्रियांचे शिक्षण करीत असत. ते स्त्रियांना गृहजीवनोपयोगी शिक्षण द्यावे, अशा मताचे होते.

छ

शास्त्रीय विषयांत रमणाऱ्या केरुनानांचे व्यक्तिमत्त्व एकसुरी नव्हते, हे त्यांना असलेल्या शास्त्रीय संगीत व नाटकांची आवड यांवरून दिसून येते. इतकेच नव्हे, तर किर्लोस्कर मंडळींच्या नाटकांच्या तालमींना हजर राहून गायक नटांना, नाटकात गाण्याचा अतिरेक न करण्याचा ते सल्ला देत असत. त्यांच्या या गुणांवर लुब्ध होऊन कै. अण्णासाहेब किर्लोस्करांनी आपले 'सौभद्र' नाटक त्यांना अर्पण केलेले आढळते.

ते दिवंगत झाल्यावर 'टाइम्स ऑफ इंडिया'ने त्यांना 'जर प्रो.छत्रे यांना युरोपात पद्धतशीर शिक्षण मिळाले असते, तर ते एक युगप्रवर्तक शास्त्रज्ञ म्हणून गाजले असते, यात मुळीच शंका नाही', अशी श्रद्धांजली वाहिली होती.

- प्रा. स. पां. देशपांडे

***संदर्भ :***

*१. दै. महाराष्ट्र टाईम्स; १८ एप्रिल १९८४.*

*२. इंडियन जर्नल ऑफ हिस्टरी ऑफ सायन्स; खंड ३९, अंक ३; २००४.*

✻✻✻

# ज



## जांभेकर, बाळशास्त्री गंगाधरशास्त्री

**गणितज्ञ, पत्रकार**

**१८१२ - १७ मे १८४६**

☞ **मुख्य नोंद - पत्रकारिता व ललितेतर साहित्य खंड**



बाळशास्त्री गंगाधरशास्त्री जांभेकर मराठी वृत्तपत्र व्यवसायाचे जनक होते. पहिल्या आंग्लविद्याविभूषित पिढीतील ते अग्रगण्य विद्वान होते.

रत्नागिरी जिल्ह्यातील पोंबुर्ले गावी बाळशास्त्रींचा जन्म झाला. त्यांचे वडील गंगाधरशास्त्री हे विद्वान संस्कृत पंडित होते. बाळशास्त्रींचे प्राथमिक शिक्षण आपल्या वडिलांकडे झाले. बाळशास्त्री लहानपणापासून अतिशय हुशार होते. वडिलांजवळ संस्कृत व मराठी भाषांचे अध्ययन करून त्यांनी त्यावर प्रभुत्व मिळविले. पुढील शिक्षणासाठी ते मुंबईस आले व सन १८२५ च्या सुमारास 'बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी'च्या शाळेत दाखल झाले. तेथे त्यांनी सदाशिव काशीनाथ ऊर्फ बापू छत्रे व बापूशास्त्री शुक्ल यांच्याकडे अनुक्रमे इंग्रजी व संस्कृत विषयाचा अभ्यास केला. या दोन विषयांखेरीज गणित, शास्त्र, इतिहास, भूगोल या विषयांतही त्यांनी विशेष प्रावीण्य संपादन केले.

थोड्याच काळात, अल्पवयातच त्यांना त्याच संस्थेत गणिताच्या अध्यापकाची जागा मिळाली. त्यांची बुद्धिमत्ता पाहून इ.स. १८३० मध्ये नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या डेप्युटी नेटिव्ह सेक्रेटरीच्या जागेवर त्यांची नेमणूक करण्यात आली व दोन वर्षांतच त्यांना 'नेटिव्ह सेक्रेटरी'पदावर बढती मिळाली. तोपर्यंत केवळ युरोपियन लोकांनाच हा मान मिळत असे. सेक्रेटरी पदावर काम करत असताना त्यांनी अनेक ग्रंथांची भाषांतरेही केली. त्यानंतरच्या काळात त्यांनी उत्तरोत्तर प्रगती करून अनेक महत्त्वाच्या पदांवर काम करून आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटविला.



Published at the Messenger Press No.1 Kalbadevee Street without Fort by Ball G. Shastree, Editor"

THE BOMBAY DURPUN.

दर्पण

ADVERTISEMENT.

NOTICE.

THE DURPUN.

**'दर्पण' वृत्तपत्र**

एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये पहिले साहाय्यक प्राध्यापक, शाळातपासनीस, अध्यापक, शाळेचे संचालक इत्यादी प्रतिष्ठेच्या पदांवर त्यांनी काम केले व गणित आणि इंग्रजीचे उत्तम प्राध्यापक म्हणून लौकिक संपादन केला. रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेचे सचिव म्हणून त्यांची निवड झाली हा त्यांच्या कर्तृत्वाचा बहुमानच होता.

आपल्या सर्व जबाबदाऱ्या उत्तम रितीने पार पाडत असतानाच बाळशास्त्री जांभेकरांनी आपला व्यासंग वाढविला आणि महाराष्ट्रातील अग्रगण्य विद्वान म्हणून मान मिळविला. गणित, भूगोल, व्याकरण इत्यादी विषयांवर त्यांनी ग्रंथरचना केली, तसेच ज्ञानेश्वरीचा अभ्यास करून त्यांनी काही पाठभेदही सुचविले. रॉयल एशियाटिक सोसायटीच्या त्रैमासिकामध्ये भारतीय शिलालेख व ताम्रपट यांविषयी त्यांचे संशोधनात्मक


परिशिष्ट

१०३

FACSIMILE OF BALL SHASTREE' MARATHI HANDWRITING
20th July 1837
बाळशास्त्री यांचे मराठी हस्ताक्षर (२० जुलै १८३७)

श्री

वेदमूर्ति राजश्री पांडुरंगभट्ट पारा
शरे व नारायणभट्ट टिळक स्वामी चे सेवेसि

विद्यार्थी बाळशास्त्री जांभेकर साष्टांग नमस्कार
विज्ञापना विशेष आली सिंहस्थ यात्रेस श्री
नासिक क्षेत्री आलो तेव्हेस तुम्हा उभयतांपा
शी वडिलांचे लेख पाहून तीर्थोपाध्यपण
तुम्हास लिहून दिले असे आमचे वंशज

**बाळशास्त्री जांभेकरांचे हस्ताक्षर**

निबंध प्रकाशित होत असत.

ज्या विद्येपासून वंचित राहिल्यामुळे आपल्या देशाची अवनती झाली व ज्या विद्येमुळे पाश्चात्त्य देशांची आश्चर्यकारक प्रगती झाली, त्या विद्येचा प्रसार करणे हे बाळशास्त्रींनी आपले जीवितध्येय ठरविले. त्यासाठी त्यांनी इ.स. १८३२ मध्ये मुंबईत ‘दर्पण’ हे पहिले मराठी-इंग्रजी वृत्तपत्र सुरू केले. एकाच वेळी शेकडो लोकांपर्यंत आपले विचार पोहोचविण्याचे उत्कृष्ट साधन म्हणजे वृत्तपत्र! वृत्तपत्राची ही शक्ती ओळखून त्याच्याद्वारे त्यांनी ज्ञानाची क्षितिजे समाजापुढे खुली केली. त्याचबरोबर समाजाचे प्रबोधन करून आपले विचार खुलेपणाने व्यक्त करण्याचे साधन लोकांना उपलब्ध करून दिले. आपल्या वृत्तपत्राला ‘दर्पण’ हे नाव देऊन ते समाजाचे यथातथ्य प्रतिबिंब दाखविते हे सूचित केले. वृत्तपत्राबरोबरच इ.स. १८४० मध्ये त्यांनी ‘दिग्दर्शन’ हे मासिकही सुरू केले. आपल्या नियतकालिकांद्वारे त्यांनी सामाजिक सुधारणांचाही पुरस्कार केला आणि पुनर्विवाह, स्त्री-शिक्षण, स्त्री-पुरुष समान हक्क इ. विषयांना वाचा फोडली.

अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत कोणतीही पूर्वपरंपरा नसताना त्यांनी वृत्तपत्राची मांडणी, विषय, भाषा, अग्रलेख, स्फुटे यांविषयी निकषही ठरविले आणि वृत्तपत्राचा आदर्श समाजापुढे ठेवला. प्रकांडपंडित असूनही आपल्या लेखनात त्यांनी सर्वांना समजेल अशा सोप्या भाषेचाच उपयोग केला.

- र. म. भागवत

***संदर्भ :***

*१. मराठी विश्वकोश, महाराष्ट्र साहित्य आणि संस्कृती मंडळ.*

## जोगळेकर, श्रीकृष्ण वासुदेव

**वैद्यकशास्त्रज्ञ, अध्यापक, प्रशासक**

**३१ ऑगस्ट, १९१३**



डॉ. श्रीकृष्ण वासुदेव जोगळेकर यांचा जन्म हेदवी येथे झाला. अगदी बालपणीच ते मातृसुखाला वंचित झाले. त्यांचे वडील नोकरीनिमित्त फिरतीवर असत. मग छोटा श्रीकृष्ण आपल्या काका-काकूंच्या घरी वाढू लागला. ‘हेदवी’सारख्या छोट्या गावात, निसर्गाच्या सान्निध्यात, गुरांच्या सहवासात आणि नदीकाठी हुंदडण्यात त्यांचा बालपणीचा काळ सुखाचा गेला. वृक्षवेलींच्या सान्निध्याची आवड नंतर त्यांनी आयुष्यभर जोपासली.

पाचवीनंतरच्या शिक्षणासाठी त्यांच्या वडिलांनी त्यांना मुंबईत आणले. शालेय शिक्षण संपल्यावर त्यांनी विल्सन महाविद्यालयात प्रवेश घेऊन इंटर सायन्सपर्यंतचे शिक्षण घेतले. त्या परीक्षेत चांगले यश मिळाल्यामुळे त्यानंतर डॉक्टर होण्यासाठी त्यांनी जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश घेतला. ते उत्तम गुणांनी एम.बी.बी.एस. उत्तीर्ण झाले. पहिल्याच प्रयत्नात या परीक्षेत सर्व विषयांत उत्तीर्ण होणे ही गोष्ट तेव्हा अत्यंत कठीण होती. जोगळेकरांनी हे यश साध्य केले.

त्यानंतर ते राजे एडवर्ड स्मारक (के.ई.एम.) रूग्णालयमध्ये नोकरी करू लागले. अत्यंत मन लावून व प्रचंड मेहनत घेऊन ते आपले काम करीत असत. त्याचा त्यांना फायदा झाला. ‘सीनियर कॅज्युअल्टी ऑफिसर’

ही वरची जागा त्यांना देण्यात आली. तसेच 'न्याय वैद्यक' (फॉरेन्सिक मेडिसीन) हा विषय विद्यार्थ्यांना शिकवण्याची जबाबदारी त्यांच्यावर टाकण्यात आली. याच काळात त्यांनी प्रचंड जिद्दीने आणि मेहनतीने एम.एस.ची पदवी प्राप्त केली.

ते १९४५-४६ साल होते. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात शीव येथे बांधलेले, १५०० खाटांचे सैनिकी रुग्णालय आता ओस पडले होते. के.ई.एम. रुग्णालयाचे अधिष्ठाता डॉ. आर.जी. धायगुडे यांना त्या रुग्णालयाचा जीर्णोद्धार करण्याची जबाबदारी देण्यात आली. त्यांनी जोगळेकरांवर ही जबाबदारी सुपूर्द केली. त्यांच्यावर विश्वास टाकला. त्यांना आवश्यक त्या सुविधा दिल्या.

जोगळेकरांनीही हा विश्वास सार्थ ठरवला. पोटच्या अपत्यांवर करावे, तसे प्रेम त्यांनी या रुग्णालयावर केले. 'रुग्णालय व्यवस्थापना'चे तंत्र डॉक्टरांना जणू उपजतच अवगत होते. प्रत्येक रुग्णाला ते नावाने हाक मारीत. आपल्या कर्मचारीवर्गामध्ये त्यांनी भाषा वा धर्म यांवरून कधी भेदाभेद केला नाही. बाह्यरुग्ण विभागाबरोबरच क्ष-किरण विभाग, प्रयोगशाळा, नाक, कान, घसा, दंत, नेत्र, त्वचारोग यांचे विभाग सुरू झाले. या सर्व खात्यांसाठी तज्ज्ञ मिळेनात. मग या खात्यांसाठी प्रमुख म्हणून मानसेवी तज्ज्ञ नेमावेत, असे डॉ. जोगळेकरांनी सुचवले. ते मान्य झाले व सायन रुग्णालयाला सर्वोपचारी रुग्णालयाचे स्वरूप प्राप्त झाले.

रुग्णालयाच्या इमारतींची रचना करताना त्यांनी बागेलाही मध्यवर्ती स्थान दिले. बगिचा मध्यवर्ती ठेवून सभोवती बांधकाम केल्यामुळे प्रत्येक वॉर्डामधल्या रुग्णाला वृक्षवेलींची साथ असे. प्रत्येक इमारतीला तळघर असावे हेही त्यांनी बघितले. त्यात रुग्णालयाला लागणाऱ्या सामानाचा साठा करता येतो. तसेच प्रार्थनाकक्षालाही जागा ठेवली होती. तेथे सर्व धर्मांना स्थान होते.

दरम्यान के.ई.एम.मधील अधिष्ठात्याची जागा रिकामी झाली. जोगळेकरांनी अर्ज केला व खूप अभ्यास करून मुलाखत दिली. त्यांची नेमणूक त्या जागेवर झाली व जोगळेकर के.ई.एम.ला आले.



**राजे एडवर्ड स्मारक (के.ई.एम.) रुग्णालय, मुंबई**

१ जानेवारी १९५९ रोजी त्यांनी या पदाची सूत्रे हाती घेतली. त्यांच्या कार्यकाळात या रुग्णालयाचा चेहरामोहरा बदलला. जोगळेकरांनी आपल्या दहा वर्षांच्या कारकिर्दीत अनेक स्तुत्य उपक्रम राबवले. ईश्वरावर त्यांची श्रद्धा असली, तरी 'रुग्णसेवा हीच ईश्वरसेवा' असे ते मानीत असत. तसेच ते शिस्तीचेही भोक्ते होते.

त्यांनी रुग्णालयात उरो रोग व उरो शैल्य चिकित्सा या विभागाची स्थापना करून सामान्य माणसाला मोठा दिलासा दिला. तसेच अस्थिरोगाकरिता अस्थिरोगचिकित्सा केंद्राची स्थापना केली. शरीररचना व शरीरशास्त्र यांकरिता एक स्वतंत्र मजला उभा केला. मूत्रपिंडाचे रोग असणाऱ्या रुग्णांना दिलासा देणारा विभाग कार्यान्वित झाला. रुग्णालयाच्या मुख्य प्रवेशद्वारासमोर त्यांनी भव्य छत बांधले, ज्यामुळे येणाऱ्यांचे उन्हा-पावसापासून संरक्षण होऊ लागले. शिवाय त्याच्यावर त्वचारोग विभागाला संशोधनासाठी जागा उपलब्ध झाली.

के.ई.एम.मध्ये त्या वेळी पूर्णवेळ प्राध्यापक नेमण्यास सुरुवात झाली. त्यांच्यात व आधीपासून कार्य करणाऱ्या मानद प्राध्यापकांत वितुष्ट निर्माण झाले. जोगळेकरांनी पूर्णवेळ प्राध्यापकांची पाठराखण केली. यातून त्यांना

ज

खूप अडचणींना तोंड द्यावे लागले. प्रचंड मनस्ताप सहन करावा लागला. महानगरपालिकेच्या मनमानी कारभाराविरुद्ध न्यायालयात जावे लागले. सांसारिक जीवनात वादळे उठली. अखेर न्यायालयाने त्यांचे म्हणणेच उचलून धरले. मात्र त्याआधीच डॉ.जोगळेकरांनी नोकरीतून स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली.

त्यानंतरही त्यांनी आपले रुग्णसेवेचे व विद्यार्थ्यांना शिकवण्याचे कार्य वयाच्या पंचाऐंशीव्या वर्षांपर्यंत सुरू ठेवले.

– प्रा. सुधीर पानसे

*संदर्भ :*

१. *देशमुख, डॉ. स्नेहलता; 'स्नेहमयी'; समर्थ प्रकाशन, विलेपार्ले, मुंबई.*

## जोशी, आत्माराम भैरव
**कृषिशास्त्रज्ञ**
**१७ नोव्हेंबर १९१६**



डॉ. आत्माराम भैरव जोशी यांचा जन्म मध्यप्रदेशातील जबलपूर येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण १९२५ ते १९३२ या काळात रायपूरच्या सरकारी शाळेत झाले. नंतर ते महाविद्यालयीन शिक्षणासाठी नागपूरला आले आणि तेथील विज्ञान महाविद्यालयातून ते १९३७ साली बी.एस्सी. झाले.

वनस्पतिशास्त्रात बी.एस्सी. केल्यावर डॉ. जोशी दिल्लीला गेले आणि इम्पिरिअल अ‍ॅग्रिकल्चरल रिसर्च इन्स्टिट्यूट (आय.ए.आर.आय. - स्वातंत्र्यानंतर इम्पिरिअल शब्द जाऊन तेथे इंडियन हा शब्द आला) येथे त्यांनी डिप्लोमा ऑफ असोसिएटशिप ऑफ आय.ए.आर.आय. हा एम.एस्सी. समकक्ष असणारा अभ्यासक्रम पुरा केला. १९३७ सालापासून १९७७ सालापर्यंतची चाळीस वर्षे डॉ. जोशी आय.ए.आर.आय. आणि आय.सी.ए.आर. (इंडियन कौन्सिल ऑफ अ‍ॅग्रिकल्चरल रिसर्च) या संस्थांत राहिले. दरम्यान १९४७ ते १९५० अशी तीन वर्षे ते इंग्लंडच्या केंब्रिज विद्यापीठात गेले आणि तेथे त्यांनी वनस्पतिशास्त्रात पीएच.डी. केली. १९३७ ते १९७७ या काळात डॉ. जोशींनी वनस्पतींचे पेशीशास्त्र हा विषय शिकविला. ग्रेगर मेंडेलचा सिद्धान्त सांगून हा विषय ते शिकवीत असताना त्यात ते इतके रंगून जात, की खुद्द ग्रेगर मेंडेलच आपल्याला हा विषय शिकवीत आहेत, असा भास त्यांच्या विद्यार्थ्यांना होत असे. काही काळाने ते तेथे पेशीशास्त्र विभागाचे प्रमुख झाले.

१९६५-१९६६ आणि १९७२-१९७७ या काळात ते आय.ए.आर.आय.चे संचालक होते, तर १९६६-१९७२ या काळात ते आय.सी.ए.आर. या संस्थेचे उपमहासंचालक होते. या वेळी त्यांच्याकडे प्रशासकीय जबाबदारीबरोबर पीक विज्ञान विभागाचे प्रमुखपदही होते. राष्ट्रीय कृषी संशोधन पद्धतीला (नॅशनल अ‍ॅग्रिकल्चरल रिसर्च सिस्टीम) त्यांनी १९६० ते १९६६ सालांत दिलेले नेतृत्व द्रष्टेपणाचे होते. भारतभर कोणती पिके घ्यायची, एखाद्या पिकाची कोणती जात कोठे घ्यायची याची जी राष्ट्रीय समन्वय समिती होती, त्याचे नेतृत्व डॉ. जोशींकडे होते. यासाठी त्यांनी विस्तार योजना सुरू केली. शेतकी विद्यापीठाने आपल्या शेतावर एखादा प्रयोग करून दाखविणे आणि शेतकऱ्याने ते वाण नेऊन स्वत: आपल्या शेतावर लावणे यांत फरक असल्याचे डॉ. जोशींना जाणवले. अधिक उत्पादन देणारी जात आणून उत्पन्न वाढवून दिले की शेती शास्त्रज्ञांना आपले काम संपले असे वाटे. डॉ. जोशींना असे जाणवले की, उत्पन्न तर वाढलेच पाहिजे; पण धान्याची किंमतही कमी झाली पाहिजे. शेतातील धान्यावर जी रोगराई होते, ती औषधे फवारून कमी करण्याऐवजी जर त्या पिकातच आपल्याला रोगप्रतिकारक शक्ती निर्माण करता आली, तर रोगामुळे वाया जाणारे पीक वाचेल आणि औषधे फवारण्याचा खर्चही कमी होईल. खतेही कमी द्यावी लागली पाहिजेत.

या दृष्टीने त्यांनी आपल्या संशोधनाचा मोहरा बदलला. तसे त्यांनी केंद्र सरकारला आणि दिल्लीतील शेती शास्त्रज्ञांना पटवून दिले. त्यासाठी डॉ. जोशी यांनी भारतभर भेटी देऊन त्या-त्या ठिकाणच्या शास्त्रज्ञांच्या गळी ही कल्पना उतरवली.

ही कल्पना इतर शास्त्रज्ञांना पटल्यावर मग त्यांनीही त्यात भर घातली. गहू, मका, वरी, तांदूळ, कापूस, एरंडी, भुईमूग, सोयाबीन, ताग, डाळी, तीळ, जनावरांसाठी चारा इत्यादी पिकांच्या उत्पादकतेत डॉ. जोशी यांच्या सल्ल्यामुळे प्रचंड वाढ झाली. बियाणे, शेतीसाठी चांगली साधने, हवामान, पाणी देण्याच्या पद्धती, कीड नियंत्रण, खते, बँकांची वा सरकारी कर्जे, धान्याची साठवण, पावसाच्या पाण्याची साठवण अशा प्रत्येक बाबीवर संशोधन करून उत्पादन कसे वाढवता येईल, हेही त्यांनी पाहिले. त्यांच्या हाताखाली एम.एस्सी. आणि पीएच.डी. केलेल्या ४६ विद्यार्थ्यांच्या संशोधनाचे हे विषय होते. डॉ. जोशी वर्गात शिकवीत, प्रयोगशाळेत जाऊन विद्यार्थी करीत असलेल्या प्रयोगांची प्रगती पाहत, ते जेथे अडले असतील त्या प्रश्नांची चर्चा करून त्यांना पुढे जायचा मार्ग दाखवत आणि रविवार व अन्य सुट्टीच्या दिवशी विद्यार्थ्यांचे प्रयोग जेथे चालले असतील, त्या शेतावर जाऊन, चार-पाच तास त्यांची पाहणी करून तेथे त्यांना मार्गदर्शन करीत, सूचना देत. त्यांचे विद्यार्थी एम.व्ही. राव (गहू), जोगिंदरसिंग (मका), गंगाप्रसाद राव (ज्वारी), एस.व्ही.एस. शास्त्री (तांदूळ) यांनी जरी प्रत्यक्ष संशोधन केले, तरी या सगळ्यांचा मेळ डॉ. जोशी यांनी घातला. हे काम १९५० ते १९६६ सालापर्यंत झाले. दरम्यान नॉर्मन बोरलाग यांना मेक्सिकोत जाऊन ते भेटून आले व त्यांनी विकसित केलेल्या आणि क्रांतिकारी उत्पादन देणाऱ्या बुटक्या गव्हाचे बियाणे जागोजागी लावले गेले. तायचुंग तांदळाचे बियाणे आणून ते भारतात पेरले. त्यावर भारतभरच्या शेतकऱ्यांनी मेहनत घेतली. परिणामी १९६६ ते १९७४ सालांत पीक उत्पादन वाढून भारत अन्नधान्याच्या बाबतीत स्वयंपूर्ण झाला. यालाच 'हरितक्रांती' म्हटले गेले.




१९७७ साली ते आय.ए.आर.आय.मधून वयाची साठी पूर्ण झाल्यावर निवृत्त झाले आणि पुढील साडेतीन वर्षे म्हणजे १९७७ ते १९८०, ते राहुरीच्या कृषी विद्यापीठाचे कुलगुरू झाले. त्यानंतर ते पुण्याच्या आघारकर संशोधन संस्थेचे उपाध्यक्ष व नंतर अध्यक्ष म्हणून काम पाहत. वयाच्या ८५-९० वर्षांपर्यंत त्यांची भाषणे, दौरे, सल्लामसलत, विविध समित्यांवरील अध्यक्षपदे अथवा सभासदत्व यांद्वारे कृषी क्षेत्रातील कामगिरी चालू होती.

१९७१ साली मराठी विज्ञान परिषदेने मुंबई येथील वार्षिक संमेलनात त्यांचा सन्मान केला. १९७६ साली त्यांना 'नॉर्मन बोरलाग पुरस्कार' मिळाला. त्याच वर्षी त्यांना भारत सरकारने 'पद्मश्री' दिली. आय.ए.आर.आय., गोविंद वल्लभ पंत कृषी विद्यापीठ आणि मराठवाडा कृषी विद्यापीठाने त्यांना सन्मान्य डॉक्टरेट दिल्या. इंडियन नॅशनल सायन्स असोसिएशन, नॅशनल अकॅडमी ऑफ ॲग्रिकल्चरल सायन्सेस, इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस, महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेस, इंडियन बोटॅनिकल सोसायटी, इंडियन सोसायटी ऑफ जेनेटिक्स अँड प्लँट ब्रीडिंग या संस्थांनी त्यांना फेलोशिप्स दिल्या. आजचे आघाडीचे शेतीशास्त्रज्ञ डॉ.एम.एस. स्वामीनाथन आणि डॉ.जोशी यांनी बरीच वर्षे एकत्र काम केले.

आंतरराष्ट्रीय स्तरावर त्यांनी तीन प्रकारचे काम केले. पहिले म्हणजे, जगात वेगवेगळ्या पिकांच्या नवनवीन जाती निर्माण होत आहेत. पण तसे होताना मूळ जातीचे जतन झाले पाहिजे; कारण नवीन जात ही मूळ जातीतून निर्माण होते. जर नवीन जातीत काही दोष निर्माण झाले, तर परत मूळ जातीचे संशोधन करून जे दोष नवीन जातीत निर्माण झाले, ते मूळ जातीतून काढून टाकणे

ज

गरजेचे असते. हे विधान गव्हाची क्रांतिकारक जात शोधून काढणाऱ्या नॉर्मन बोरलाग या शेतीशास्त्रज्ञानेही मान्य केले. यासाठी जगातली सगळी मूळ वाणे जमा करून ती जतन केली पाहिजेत हा डॉ. जोशींचा सल्ला मान्य झाला. यासाठी जागतिक अन्न संघटनेने इंटरनॅशनल बोर्ड फॉर प्लँट जेनेटिक रिसोर्सेस ही संघटना स्थापन केली. डॉ. जोशींना त्याचे सभासद केले आणि त्यांच्यावर संस्थेने जबाबदारी टाकली की जगातली ही सगळी मूळ वाणे कशी जमा करायची आणि कशी जतन करायची याची यंत्रणा तुम्ही घालून द्यावी. ती यंत्रणा डॉ. जोशींनी निर्माण करून दिली. त्या यंत्रणेत समजा, एखाद्या पिकाचे बियाणे आठ वर्षे ठीक राहत असेल (शेल्फ लाइफ), तर आठव्या वर्षी ते पेरून त्याचे नवीन बियाणे मिळवून ते परत पहिल्या जागी ठेवून द्यायचे.

आणखी महत्त्वाचे दुसरे काम त्यांनी केले: जागतिक अन्न संघटनेची तांत्रिक सल्लागार समिती जिनिव्हामध्ये बसून सल्ला देत असे. पण १९८२ साली डॉ. जोशींना त्या समितीवर नेमल्यावर ते म्हणाले की, धान्योत्पादन वाढवायला जिनिव्हात बसून दिलेला सल्ला उपयोगी पडत नाही व नुसते प्रयोगशाळेतील प्रयोग पुरेसे पडत नाहीत, तर शेतकऱ्याच्या शेतावर जाऊन त्याचे प्रश्न सोडवले पाहिजेत. या सल्ल्यानुसार डॉ. जोशींना तशी रचना निर्माण करून देण्याची विनंती करण्यात आली. जी यंत्रणा त्यांनी निर्माण करून दिली, ती आजतागायत गेली २६-२७ वर्षे बदल न करावे लागता, अविरतपणे चालू आहे. त्यामुळे जगात अनेक ठिकाणी धान्योत्पादन वाढले. जोशींच्या दूरदृष्टीचे हे उदाहरण आहे.

तिसरे काम त्यांनी जे केले ते म्हणजे, जागतिक अन्न संघटनेला डॉ. जोशींनी 'इसनार' नावाची संस्था स्थापन करायला उद्युक्त केले. 'इसनार' म्हणजे 'इंटरनॅशनल सर्व्हिस फॉर नॅशनल ॲग्रिकल्चरल रिसर्च.' प्रत्येक विकसनशील देशात कृषी संशोधन व्हावे आणि त्यांना मार्गदर्शन करावे, असा 'इसनार'चा उद्देश आहे. जिनिव्हामध्ये बसून प्रश्न सोडवण्याऐवजी विकसनशील देशातील शास्त्रज्ञांना त्यांच्या देशात भेटून प्रथम संशोधन म्हणजे काय हे त्यांना समजावून सांगावे, मग त्यांचे प्रश्न समजावून घ्यावेत आणि त्यानंतर त्यांना सल्ला द्यावा. 'इसनार'साठी या विकसनशील देशांनी आपल्या देशाच्या कृषी क्षेत्रातील समस्या सोडवण्यासाठी सातत्याने संशोधन करावे आणि त्यासाठी 'इसनार' मदत करील, अशी 'इसनार'ची भूमिका आहे. त्यासाठी 'इसनार'ची रचना करून देण्याचे काम डॉ. जोशींवर सोपवून त्याची रचना अशी करा, की पुढील १०० वर्षांत त्यात फेरफार करावे लागू नयेत, अशी इच्छा जागतिक अन्न संघटनेने व्यक्त केली. ती रचना डॉ. जोशींनी करून दिली. त्यानुसार अनेक अविकसित देशांनी केलेल्या शेतीतून ते देश धान्योत्पादनात स्वयंपूर्ण तर झालेच, पण एखाद्या वर्षी दुष्काळ पडला तर आदल्या वर्षीचा शिलकी साठा त्यांना उपयोगी पडतो.

१९६९ साली डॉ. जोशींना इंडोनेशियातील कृषी उत्पादन वाढवून देण्यासाठी सल्लागार म्हणून नेमले गेले. १९७१-१९७२ साली जागतिक अन्न संघटनेने शेती उत्पादन वाढवून देण्यासाठी त्यांची इजिप्त सरकारचे सल्लागार म्हणून नेमणूक केली. दक्षिण अमेरिकेतील पेरू देशातील लिमा येथे आंतरराष्ट्रीय बटाटा संशोधन संस्थेच्या सल्लागार मंडळाचे ते सभासद होते. १९७३ ते १९७७ या काळात ते अमेरिकेच्या आंतरराष्ट्रीय कृषी संशोधन संस्थेचे सल्लागार होते. १९७४ ते १९८६ या काळात जागतिक अन्न संशोधन संस्थेच्या प्लँट जेनेटिक रिसोर्स बोर्डाचे ते सल्लागार होते. १९८१-१९८२ साली नेदरलँड, बांगला देश, टांझानिया येथे ते सल्लागार होते. १९८४ साली हैदराबादच्या कोरडवाहू शेती संशोधन संस्थेचे (इक्रिसॅट) ते सल्लागार होते. अशा पद्धतीने केवळ भारतच नव्हे, तर जगातल्या अनेक ठिकाणचे शेती उत्पादन वाढवून देण्यास त्यांचा हातभार लागल्याने जगातल्या माणसाला त्यांनी पुरेसे अन्न मिळवून दिले. याशिवाय १९६५-१९६६ साली ते शिक्षणविषयक सुधारणा करण्यासाठी नेमलेल्या कोठारी आयोगाचे सभासद होते.

त्यांचे स्वत:चे व सहकारी अथवा विद्यार्थ्यांबरोबर

लिहिलेले असे ३०० शोधनिबंध आहेत आणि ते देशी परदेशी नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांनी लिहिलेली शेतीतील दोन पुस्तके आज ४० वर्षानंतरही त्या-त्या विषयातील अद्ययावत अशीच पुस्तके आहेत.

डॉ. जोशी मराठी, हिंदी, इंग्रजी, पंजाबी, बंगाली या भाषा अस्खलितपणे बोलू शकतात. शास्त्रीय संगीताची त्यांना विलक्षण आवड असून ते स्वत: उत्तम बासरीवादक आहेत.

आय.ए.आर.आय. व आय.सी.ए.आर.च्या ४० वर्षांच्या कारकिर्दीत एक उत्तम शिक्षक, प्रशासक, शिक्षणतज्ज्ञ, संशोधक, समन्वयक आणि एवढे असूनही सर्वांशी मिळून-मिसळून हसतखेळत राहणारा उत्तम माणूस म्हणून त्यांची ख्याती होती. या सर्वच बाबतीत ते एक रोल मॉडेल म्हणून गणले गेले.

- अ. पां. देशपांडे

***संदर्भ :***

१. *सहावे अखिल भारतीय मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, मुंबई १९७१.*
२. *डॉ. आ.भै. जोशी गौरव स्मरणिका, नोव्हेंबर २००७.*

## जोशी, ज्येष्ठराज भालचंद्र
**रसायनशास्त्रज्ञ**
**२८ मे १९४९**



डॉ.ज्येष्ठराज भालचंद्र जोशी यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील मसूर येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण जीवन शिक्षा मंदिर, मसूर येथे झाले (१९५५-६१). त्यानंतर यशवंतराव चव्हाण विज्ञान महाविद्यालयामधून त्यांनी १९६७ साली पदवी संपादन केली व त्यानंतर मुंबईतील युनिव्हर्सिटी डिपार्टमेन्ट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी (यु.डी.सी.टी.) मधून रसायन अभियांत्रिकी (केमिकल इंजिनिअरिंग)मधील बी.ई. पदवी संपादन केली. त्याच शिक्षणसंस्थेत त्यांनी त्या विषयातील एम.ई. ही पदवी १९७२ साली मिळवली. १९७२ ते १९७७ दरम्यान तेथे त्यांनी या विषयातील संशोधन करून पीएच.डी. ही पदवी मिळवली. तेव्हापासून त्याच संस्थेमध्ये त्यांनी आपले संशोधन व अध्यापनकार्य चालू ठेवले. उपव्याख्याता, व्याख्याता, प्रपाठक, प्राध्यापक अशा एक-एक पायरीने वर चढत २००४-२००९ या काळात ते संस्थेचे संचालक होते.

रसायन अभियांत्रिकी या शास्त्रातील गेल्या ३५ वर्षांतील त्यांच्या संशोधनातून त्यांनी नानाविध प्रक्रियांची कारणमीमांसा शोधून काढली. उपलब्ध संयंत्रात सुधारणा करणे, त्यातील वीज व इंधन बचत करून प्रक्रिया सोपी व स्वस्त करणे, उत्पादनास लागणाऱ्या निरनिराळ्या टप्प्यांचे एकत्रीकरण व सुसूत्रीकरण करून उत्पादनक्रियेचा वेळ व खर्च कमी करणे ही त्यांच्या संशोधनामागील प्रमुख भूमिका आहे.

या प्रकारचे संशोधन करताना, या प्रक्रियांच्या सखोल अभ्यासातून त्यांतील मूळ शोधून ते गणिती स्वरूपात मांडणे यात त्यांचा हातखंडा आहे व त्यांनी केलेल्या अशा संशोधनासाठी त्यांना आंतरराष्ट्रीय मान्यता व ख्याती मिळाली. रासायनिक प्रक्रिया होत असताना निरनिराळे घटक एकमेकांत कसे मिसळतात व त्यांची ही मिसळण्याची प्रक्रिया कशा प्रकारे सुधारून त्या जास्तीत जास्त परिणामकारक होतील, हे त्यांनी गणिती पद्धतीने दाखवून दिले व प्रायोगिक रितीने सिद्ध केले. द्रव, घन व वायू या तिन्ही रूपांतील रसायनांवरील प्रक्रियेत घडून येणाऱ्या प्रवाहाबद्दल संशोधन करून अशा प्रक्रियेत येणाऱ्या अडचणींवर त्यांनी उत्तरे शोधून काढली. या कामाकरिता त्यांनी गणिताचा, तसेच संगणकशास्त्राचा उपयोग नवीन संयंत्र रचना करण्यासाठी केला.

प्रा.जोशी यांनी दोनपेक्षा जास्त पदार्थांच्या रासायनिक प्रक्रियेमध्ये त्या पदार्थांची मिसळण्याची प्रक्रिया जलद व सुलभ होण्याकरिता नवीन संयंत्र रचना शोधून काढल्या व त्या प्रक्रियांतील मिसळण्याचा वेग मोजण्याकरिता लेझर प्रणाली वापरली असता, प्रा.जोशींच्या सिद्धान्ताप्रमाणेच




असल्याचे सिद्ध झाले. रासायनिक प्रक्रियांमध्ये दाब, तापमान, मिसळण्याचा वेग इत्यादींमधील बदल अचूकपणे मोजण्याचे तंत्र त्यांनी विकसित केले.

ऊर्जानिर्मिती व ऊर्जाबचत या विषयांतील संशोधनाविषयी त्यांना विशेष आस्था आहे. त्यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांच्या संस्थेत सध्या सुधारित चुली, अन्न शिजविण्याच्या प्रक्रियेतील उष्णतेची बचत, सूर्यशक्तीवर चालणारे शितीकरण संयत्र, पवनशक्तीचा वापर इत्यादी विषयांवर संशोधन चालू आहे.

संस्थेच्या स्थापनेपासून ही संस्था मुंबई विद्यापीठास संलग्न होती. गेल्या चार वर्षांत प्रा. जोशी यांच्या अथक प्रयत्नांस यश आले असून, आता या संस्थेस स्वायत्तता मिळाली असून तिचे नामकरण 'इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी' (आय.सी.टी.) असे झाले आहे. डॉ. जोशी यांच्या संशोधन कार्यातील विविधतेसाठी त्यांना देशातील व परदेशातील पुरस्कार मिळाले. त्यांतील काही उल्लेखनीय खालीलप्रमाणे आहेत : डॉ. जोशी यांच्या संस्थेने उत्कृष्ट शिक्षक पारितोषिक देण्याची प्रथा सुरू केली व पहिल्या वर्षीचे पारितोषिक त्यांना मिळाले. भटनागर पुरस्कार १९९१ साली मिळाला. 'विविधलक्ष्यी औद्योगिक संशोधन केंद्र' (वास्विक) तर्फे उत्कृष्ट औद्योगिक संशोधनाकरिता देण्यात येणारा पुरस्कार त्यांना १९९२ साली मिळाले. त्यांच्या संस्थेतील 'हिरा' म्हणून त्यांचा गौरव १९९४ साली संस्थेच्या हीरक महोत्सवात करण्यात आला. इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचे 'फेलो' म्हणून त्यांची निवड सन १९९५ साली झाली. महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट शिक्षक पुरस्कार त्यांना २००४ साली देण्यात आला. २००५ साली 'इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल इंजिनिअर्स' या संस्थेतर्फे डॉ. रेडी पुरस्कार देण्यात आला. २००७ साली 'अमेरिकन केमिकल सोसायटी'तर्फे गेल्या ४० वर्षातील पहिल्या १०० संशोधकांची यादी जाहीर करण्यात आली, त्यातही डॉ. जोशी यांचे नाव होते.

संशोधनकार्य व संस्थेची प्रगती साधत असताना त्यांनी ५७ विद्यार्थ्यांना पीएच.डी. व ५६ विद्यार्थ्यांना एम.एस्सी. पदव्यांकरिता मार्गदर्शन केले. जगामध्ये संशोधन करणाऱ्या शास्त्रज्ञांकरिता एक मानक आंतरराष्ट्रीय संस्थेने निश्चित केलेला आहे व एखाद्या व्यक्तीचे प्रकाशित संशोधन इतर संशोधकांना किती वेळा उपयोगी पडले यावरून हा मानक (सायटेशन इंडेक्स) ठरवला जातो. डॉ.जोशींच्या संशोधनाचा मानाक हा ४००० पेक्षाही जास्त आहे.

तरुण विद्यार्थ्यांनी शास्त्रीय संशोधन हे आपले कार्यक्षेत्र निवडावे म्हणून भारतात काही प्रमुख शास्त्रज्ञ प्रयत्नशील आहेत व त्यांतील डॉ. जोशी यांचा वाटाही खूप मोठा आहे. ते स्वत: तर हे प्रचारकार्य करतातच; पण त्यांच्या संस्थेतील शेकडो विद्यार्थ्यांना त्यांनी या कामात प्रोत्साहन दिले आहे.

- डॉ. श्रीराम मनोहर

**संदर्भ :**

१. *भटनागर लॉरेट्स १९५८-१९९१; भारतीय राष्ट्रीय विज्ञान अकादमी.*

## जोशी, श्रीधर सर्वोत्तम

**भौतिकशास्त्रज्ञ**

**१६ ऑक्टोबर १८९८ - २४ जुलै १९८४**



१९४३ साली 'जोशी इफेक्ट'मुळे जगप्रसिद्ध झालेले संशोधक श्रीधर सर्वोत्तम जोशी, बनारस हिंदू विद्यापीठामधील विज्ञान महाविद्यालयाचे प्राचार्य होते. तेथेच ते (इ.स.१९३७-१९५९) रसायन विभागात अध्यापन आणि संशोधन करीत.

डॉ. श्रीधर सर्वोत्तम जोशी यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांच्या वडिलांचे अकाली निधन झाल्यामुळे त्यांचे अकोला येथील मामा वासुदेव लक्ष्मण चिपळोणकर यांनी त्यांना शिक्षणासाठी प्रोत्साहन देऊन आवश्यक ती मदत केली. महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये दाखल झाले. तेथून त्यांनी बी.एस्सी. पदवी मिळवली. त्याआधीपासूनच त्यांनी मुंबईच्या ‘रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स’शी पत्रव्यवहार करून वैज्ञानिक संशोधनाची सुरुवात केली होती. नंतर प्रा. शांतिस्वरूप भटनागर यांच्या सल्ल्यानुसार ते बनारस हिंदू विद्यापीठात एम.एस्सी. पदवी मिळवण्यासाठी रुजू झाले. प्रा. भटनागर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी कलिली द्रावण ‘कोलाईड’ या विषयावर एक प्रबंध लिहिला. या प्रकल्पामधून त्यांनी एक शोधनिबंध, ‘फॅरेडे सोसायटी’ (लंडन) आणि दोन शोधनिबंध, ‘कोलाईड झाइटशिफ्ट’ (जर्मनी) या अव्वल दर्जाच्या नियतकालिकांमध्ये प्रसिद्ध केले. त्या संशोधनाचे निष्कर्ष ‘अॅन्युअल प्रोग्रेस रिपोर्ट ऑफ केमिकल सोसायटी’ (लंडन-१९२४) मध्ये छापून आले. परिणामी त्यांना त्या विषयातील पुढील सखोल संशोधनासाठी निधी उपलब्ध झाला. संशोधन करण्यासाठी ते प्रा. डोनॉन (संचालक, केमिकल लॅबोरेटरी, लंडन विद्यापीठ) यांच्याकडे गेले. त्यांना तेथे प्रा. विल्यम रॅम्झी यांचे मार्गदर्शन लाभले. सर प्रा. रॅम्झी हे निष्क्रिय वायूंचा सखोल अभ्यास आणि संशोधन केलेले १९०४ सालचे नोबेल विजेते शास्त्रज्ञ होते. त्यांच्या अनुभवाचा प्रा. जोशी यांना खूप लाभ झाला.

सुरुवातीला डॉ. जोशी यांनी कोलाईड्सविषयक संशोधन करायचे ठरवले होते. तथापि त्यांना वायूंमधील विद्युत्-विसर्जन (गॅस डिसचार्ज) आणि त्या स्थितीमध्ये वेगाने होणाऱ्या रासायनिक क्रियांसंबंधी तीव्र कुतूहल निर्माण झाले. त्यांनी ‘कलिली द्रावण’ विषय सोडून दिला. त्यामुळे त्यांची शिष्यवृत्ती स्थगित झाली. त्यांनी अंगीकारलेल्या आवडत्या विषयात त्यांना विलक्षण निष्कर्ष मिळत गेले. साहजिकच त्यांची शिष्यवृत्ती पुन्हा सुरू झाली आणि आर्थिक विवंचना दूर झाली. १९२८ साली त्यांना लंडन विद्यापीठाची डी.एस्सी. पदवी मिळाली. नंतर त्यांनी बर्लिनमध्ये प्रा. नर्स्ट आणि पॅरिसमध्ये प्रा. पेरिन यांच्याकडे काही काळ संशोधन केले. या काळात त्यांना नागपूर येथे वरिष्ठ प्राध्यापकपद मिळत होते. अशा परिस्थितीत नेमके काय करावे, याचा विचार डॉ. जोशी करीत होते. विचारपूर्वक डॉ. जोशी यांनी बनारस हिंदू विद्यापीठाच्या रसायनशास्त्र विभागात एक अध्यापक म्हणून कामाला सुरुवात केली. अलाहाबाद विद्यापीठातही त्यांना जास्त पगाराची नोकरी मिळत होती. डॉ. जोशी यांनी कालांतराने विद्यापीठाच्या विज्ञान महाविद्यालयामध्ये प्राचार्यपदाची सूत्रे हाती घेतली. या ठिकाणी त्यांनी २२ वर्षे (इ.स.१९३७-१९५९) संशोधन आणि अध्यापन केले. अणुरचना, उष्मागतिकी (थर्मोडायनॅमिक्स), प्रकाश रसायनशास्त्र (फोटोकेमिस्ट्री) या विषयांचे अध्यापन आणि संशोधन त्यांनी सातत्याने, आवडीने केले.

प्रा. जोशींनी कोलॉईडल केमिस्ट्रीमध्ये ‘झोनल इफेक्ट’ याविषयी संशोधन करून मोलाची भर घातली. त्याचबरोबर, विद्युत रसायन शास्त्र (‘इलेक्ट्रोकेमिस्ट्री’) मध्ये वितळलेल्या क्षारांमधील विद्युत्-विसर्जन, या विषयीचे महत्त्वपूर्ण संशोधन केले. सिंथेटिक केमिस्ट्रीमध्ये त्यांनी क्रियाशील नत्र अणूची (अॅक्टिव्ह नायट्रोजन) निर्मिती कशी होते ते सिद्ध केले. अमोनियाचे संशोधन करणाऱ्या महत्त्वपूर्ण रासायनिक प्रक्रियांचे संशोधन करणाऱ्या संशोधकांना त्याचा उपयोग झाला. ‘प्रकाश रसायनशास्त्र’ (फोटो केमिस्ट्री) संबंधीही त्यांनी दर्जेदार संशोधन केले. वि.ग. भिडे, हरी जीवन अर्णीकर, पी.जी. देव, जी.एस. देशमुख, एम.आर. भिडे व पुरुषोत्तम या सहकाऱ्यांबरोबर त्यांनी संशोधन करून सुमारे ३०० शोधनिबंध प्रसिद्ध केले. त्यांचे ‘नेचर’ या अग्रगण्य वैज्ञानिक नियतकालिकामधील दोन शोधनिबंध (खंड १४७, १९४१ आणि खंड १५१, १९४३) हे विशेष महत्त्वाचे गणले जातात.

विद्युत्भट्टी (फर्नेस)मध्ये सर्वत्र एकसारखे तापमान

ज

असणे गरजेचे असते. विशेषत: उच्च तापमानातील पदार्थविज्ञानाचे संशोधन करताना त्याचा उपयोग होतो. प्रा. जोशी यांनी त्याची उपयुक्तता लक्षात घेऊन 'विद्युतभट्टी'साठी एक खास डिझाइन बनवले. गॅलेनकॅप या कंपनीने त्याचे एक एकस्वही घेतले.

सोडियम परक्लोरेटसारखे अत्यंत स्फोटक, पण औद्योगिक क्षेत्रात उपयुक्त ठरणारे एक रसायन त्यांनी प्रयोगशाळेत तयार केले होते. त्यांचे स्फोटक पदार्थांवरील संशोधन लक्षात घेऊन तत्कालीन सरकारने त्यांची एका उच्चस्तरीय समितीवर नेमणूक केलेली होती. ती समिती सरकारी दारूगोळा उत्पादन करणाऱ्या कारखान्याशी संबंधित बाबींचा अभ्यास करणारी होती.

ज

प्रा. जोशींचे नाव 'जोशी परिणाम' (जोशी इफेक्ट)शी संबंधित आहे. धातूमधून जसा विद्युतप्रवाह सहजपणे वाहू शकतो, तसा तो वायूमधून वाहत नाही. तथापि विद्युतदाब वाढवला आणि वायू विरळ असला, तर मात्र त्यातून विद्युतप्रवाह वाहू लागतो. वास्तविक ही विद्युतधारा स्थिरपणे वाहत राहावयास हवी; पण प्रा. जोशी यांना १९३९ साली प्रयोग करीत असताना काही वेगळे निष्कर्ष मिळाले. उपकरणावर पडणाऱ्या प्रकाशाच्या तीव्रतेनुसार विद्युतधारा कमी अथवा जास्त प्रमाणावर वाहू लागते. इ.स. १९३९-१९४२ सालांच्या दरम्यान त्यांनी याबद्दल सूक्ष्म निरीक्षण केले. ते निष्कर्ष त्यांनी १९४३ साली प्रसिद्ध केले, त्याला 'जोशी परिणाम' म्हणतात. यावर देशी, परदेशी संशोधन चालू असून या विषयावर ३०० च्यावर शोधनिबंध प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांनी स्थानिक ठिकाणी मिळणाऱ्या कच्च्या मालातून बहुमोल रसायने तयार केली. त्यांनी पोटॅशियम परमँगनेटसारखे संयुग, ॲसेटाइल क्लोराइड, ॲसेटिक अनहायड्राइड, अशा प्रकारची अनेक रसायने बनविली. त्यांचे उपयोजित संशोधन लक्षात घेऊन दिल्ली येथील वैज्ञानिक आणि औद्योगिक अनुसंधान परिषदेने (सी.एस.आय.आर.) त्यांना पी.सी. रॉय पदक प्रदान करून त्यांचा सन्मान केला. या परिषदेच्या नियामक मंडळावर पंडित नेहरूंनी त्यांची नेमणूक केली.

प्रयोगशाळेमध्ये उपकरणनिर्मितीसाठी यंत्रज्ञ आणि तंत्रज्ञ म्हणून ते स्वत: काम करीत असत. तंत्रज्ञानामध्ये पारंगत अशा विद्यार्थ्यांचा एक खास गट त्यांनी तयार केला होता. हे सर्व करीत असताना त्यांची तळमळ, विद्यार्थी आणि सहकाऱ्यांविषयीचे प्रेम आणि दुर्दम्य उत्साह सतत जाणवत असे. त्यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी. मिळवलेल्या विद्यार्थ्यांची संख्या ६० आहे.

बनारस येथे शिक्षण घेत असताना काचेची उपकरणे ते स्वत:च घडवीत असत. त्यासाठी त्यांनी जाणीवपूर्वक 'ग्लास ब्लोइंग'चे प्रशिक्षण घेतलेले होते. त्यांनी एका मायक्रोमीटरची जडणघडणही केलेली होती. एकदा तेथील प्रयोगशाळेमध्ये प्रयोग करीत असताना अचानक एक दुर्दैवी स्फोट झाला. त्यामुळे त्यांच्या डोळ्याला गंभीर इजा झाली. त्याचा विपरीत परिणाम उतारवयात होऊ लागला. त्यांची दृष्टी अधू झाली. त्याही परिस्थितीमध्ये पुण्यामधील विविध संस्थांमध्ये प्रा.जोशी भेट देत होते. तसेच त्यांच्या ज्ञान-अनुभवाचा फायदा ते गरजूंना करून देत असत. १९६१ साली पुण्याला पानशेत धरण फुटून डेक्कन जिमखाना भागात पाणी साचले होते. तेथे जोशी यांचे निवासस्थान असल्यामुळे त्यांचे अतोनात नुकसान झाले. अनेक वह्या-पुस्तके आणि संशोधनामधील छायाचित्रे, आलेख खराब होऊन गेले. प्रा. जोशी या संकटाला धीरोदात्तपणे सामोरे गेले.

पुण्याच्या डेक्कन जिमखान्यावरील त्यांच्या वास्तूचे नाव 'हेरॅकल्स होम' असे होते. हेरॅकल हा ग्रीक 'हीरो' बहुआयामी व्यक्तिमत्त्वासाठी प्रसिद्ध असल्यामुळे प्रा.जोशींना त्याचे आकर्षण असणे स्वाभाविक होते. त्यांना विविध भाषांमधील कला, साहित्य आणि संगीताची आवड होती. त्यासंबंधीचा स्वाध्याय आणि सखोल चिंतन त्यांनी केले होते. त्यांचे वृद्धापकाळामुळे पुणे येथे निधन झाले.

– डॉ.अनिल लचके

**संदर्भ :**

१. *दुसरे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, पुणे; १९६७*

* * *






## टाटा, जमशेदजी नुसरवानजी

**उद्योजक**

**३ मार्च १८३९ - १९ मे १९०४**

☞ **मुख्य नोंद - उद्योग खंड**



आधुनिक भारताचा औद्योगिक पाया रचणाऱ्या उद्योगपतींमध्ये जमशेदजींचे नाव प्रथम घेतले जाते. गुजरात येथील नवसारी येथे एका पारशी धर्माच्या पुरोहित घराण्यात जमशेदजी यांचा जन्म झाला. शालेय शिक्षण आणि बालपण नवसारीत गेले. वयाच्या चौदाव्या वर्षी ते शिक्षणासाठी मुंबईत आले. मॅट्रिक झाल्यावर एल्फिन्स्टन महाविद्यालयात शिकत असताना त्यांना साहित्याची, वाचनाची, अभ्यासाची आणि व्यासंगाची गोडी लागली. कुशाग्र बुद्धिमत्तेची उत्तम मशागत होऊन नवनिर्माणाचा ध्यास या काळात त्यांच्यामध्ये रुजला आणि जन्मभर त्यांची साथ करत राहिला. 'ग्रीन स्कॉलर' म्हणजे त्या काळातील पदवी मिळवताना त्यांनी डिकन्स, थॅकरे, मार्क ट्वेन आदी लेखक झपाटून वाचले. ग्रंथातून ज्ञान मिळवावे, समजून घ्यावे आणि त्याचा उन्नतीसाठी, प्रगतीसाठी उपयोग करावा, हा संस्कार त्यांना मिळाला.

वडिलांची मुंबईत पेढी होती. जमशेदजींनी छोटी-छोटी कंत्राटे घेऊन व्यवसायाला सुरुवात केली. युरोप व अतिपूर्वेकडील देशांना माल पुरवून त्यांनी भरपूर पैसा व अनुभव मिळवला. मँचेस्टरला भेट दिल्यावर त्यांना कापडनिर्मितीच्या उद्योगात रस उत्पन्न झाला. त्यासाठी अधिक पैसा हवा होता. ॲबिसिनियाच्या युद्धात जनरल नेपियरला सामग्री पुरवायचे कंत्राट घेऊन त्यांनी पैसे उभे केले. मुंबईतील एक जुनी तेल गिरणी स्वस्तात विकत घेऊन ती आपल्या कौशल्याने त्यांनी कापड गिरणीत परिवर्तित केली आणि दोन वर्षांनी फायद्यात विकून टाकली. नुकत्याच सुरू झालेल्या रेल्वे सेवेचा फायदा घेऊन त्यांनी नागपूरला स्वस्तात पाणथळ जागा घेऊन 'सेंट्रल इंडिया स्पिनिंग मिल' काढली तेव्हा त्यांच्यावर अनेकांनी टीका केली; पण त्यांनी हे साहस यशस्वी केले. १८७७ साली व्हिक्टोरिया राणीला भारताची 'एम्प्रेस' असा किताब दिला गेला, तेव्हा या गिरणीचे नाव बदलून 'एम्प्रेस मिल' ठेवण्यात आले.

१८८५ साली मुंबईला राष्ट्रीय काँग्रेसची स्थापना झाली, तेव्हा जमशेदजी टाटा उपस्थित होते. त्यांनी तेव्हा आणि पुढेही काँग्रेसला भरीव आर्थिक मदत केली. राष्ट्र-भक्तीबरोबर त्यांचे मानवांवरील प्रेम पुढे अनेक प्रसंगांत दिसून आले. त्यांचे देशप्रेम हृदयापेक्षा बुद्धिनिष्ठ होते. तरुण वयात त्यांनी चीन, जपान, मध्यपूर्वेतील देश, युरोप येथे भेटी दिल्या आणि उत्तरायुष्यात अमेरिकाही पाहिली, तिथले उद्योग अभ्यासले. दूरदृष्टी परिपक्व होत गेली आणि कोणत्याही देशाची संपन्नता तीन घटकांवर अवलंबून असते हे त्यांनी अभ्यासाने जाणले.

स्टील अथवा पोलाद म्हणजे प्रक्रिया केलेले लोखंड. ही यंत्रयुगाची पहिली गरज आहे. ही यंत्रे चालवण्यासाठी स्वस्त वीज, पाण्याच्या प्रवाहावर जनित्रे वापरून उत्पादन करायला हवी ही दुसरी गरज आहे आणि या दोहोंचा वापर करून उद्योग उभे करून संपन्नता आणायला तांत्रिक शिक्षण व त्यातील संशोधन ही तिसरी गरज आहे. त्या वेळच्या शेतीप्रधान संस्कृतीच्या पार्श्वभूमीवर जमशेदजींची दृष्टी अजोड म्हणावी लागेल. त्यांनी स्वप्ने



टाटांचा पोलाद कारखाना

फक्त पाहिलीच नाहीत, तर ती प्रत्यक्षात आणण्यासाठी कृतियोजना आखून त्या अमलातही आणल्या. या तिन्ही क्षेत्रांत देशाला स्वयंपूर्ण करण्यासाठी त्यांनी पहिली पावले टाकली. त्यांच्या परदेश प्रवासाचा प्रमुख हेतू हाच असे. नायगारा धबधबा पाहताना तेथील वीजनिर्मिती कशी होते याची त्यांनी सविस्तर माहिती घेतली. फ्रान्स आणि जपानच्या भेटीत रेशीम किड्यांच्या पैदाशीचे निरीक्षण केले. म्हैसूरला पूर्वी रेशमाचे उत्पादन उत्तम दर्जाचे होत असे हे त्यांच्या वाचनात आले होते. त्याचे पुनरुज्जीवन करण्यात जमशेदजींनी पुढाकार घेतला. सिंध प्रांतात लांब धाग्याचा कापूस लावायची त्यांची कल्पना अशीच यशस्वी झाली. कोणत्याही उद्योगाची पूर्वतयारी वाचनाने, अभ्यासाने, प्रत्यक्ष पाहून करायची त्यांची पद्धत होती. त्यामुळे जिथे अनुकूल परिस्थिती असेल, तिथेच तो उद्योग उभा राही आणि यशस्वी होई.

इंग्लंडहून जुनी आणि स्वस्त यंत्रे आणून, तंत्रज्ञांची मदत घेऊन ती दुरुस्त करायची आणि वापरायची, असे त्यांनी काही प्रयोग केले. त्यामुळे उत्पादन दर्जा घसरला आणि ते फसले. पहिल्यांदा हे स्वस्तात पडले, तरी कालांतराने दुरुस्ती-देखभालीचा खर्च वाढतो आणि उद्योग महागात पडतो, हा धडा ते अनुभवातून शिकले. नंतर कोणत्याही उद्योगासाठी अत्याधुनिक यंत्रे वापरायला हवीत असा पायंडा त्यांनी पाडला आणि आजही टाटा उद्योगसमूहात तो पाळला जातो. अशा एका साहसात त्यांना अपयश आले आणि समभागांचे भाव गडगडले. तेव्हा त्यांनी आपली सर्व वैयक्तिक संपत्ती पणाला लावून कर्जे उभी केली आणि आठ वर्षांत उत्पादन निर्यात करण्याइतपत व्यवसाय यशस्वी करून दाखवला. त्यांचा उत्कृष्टतेचा ध्यास सर्व उद्योगांत दिसून येई.

रोज दोन तासांच्या ग्रंथवाचनात खंड पडलेला त्यांना सहन होत नसे. रोज संध्याकाळी घोड्याच्या बग्गीतून आणि नंतर पुढे मोटारीतून मुंबईच्या रस्त्यावरून आपल्या वरिष्ठ सहकाऱ्यांना घेऊन ते फिरायला जात. तेव्हा नव्या उद्योगाच्या योजनांवर सतत चर्चा चाले. इतरांचे म्हणणे ते लक्षपूर्वक ऐकून घेत आणि मगच स्वत: निर्णय घेत. व्यवस्थापन शास्त्रात आज ज्याला ‘ब्रेनस्टॉर्मिंग’ म्हणून महत्त्व आले आहे, ते वैचारिक चमूकार्य आचरत असत. जमशेदजी काळाच्या पुढे असल्याचे हे निदर्शक आहे.

जमशेदजींना अनेक विषयांत रस होता. वनस्पतिशास्त्राचे त्यांचे ज्ञान पाहून कलकत्त्याच्या सुप्रसिद्ध बोटॅनिकल उद्यानाच्या अधिकाऱ्याने चकित झाल्याची नोंद केलेली आहे. आपल्या जन्मगावी, नवसारी येथे त्यांनी प्राणिसंग्रहालय उभे केले. युरोपहून ग्रेहाउण्ड कुत्रे अन् पांढरे मोर आणून त्यांची पैदास करण्याचा बेत त्यांनी आखला होता. अनेकानेक दुर्मीळ झाडे आणून जगवायची हा त्यांचा छंद होता.

भारतात मुलटी येथे फक्त कच्चे लोखंड तयार होई. इथे उत्तम प्रतीचे पोलाद व्हावे म्हणून त्यांनी पंधरा-वीस वर्षे विविध मार्गांनी प्रयोग चालवले होते. हलक्या खनिज संपत्तीचा अभ्यास करण्यासाठी परदेशी तज्ज्ञही मागवले होते. देशाच्या भूगोलाचा व्यवस्थित आढावा घेऊन सुवर्णरेखा नदीकाठची साकची येथील जागा निश्चित करून टाटा स्टीलचे उत्पादन करायची अतिभव्य योजना त्यांनी १९०२ साली लिहून ठेवली होती. तिथे वसवायच्या शहराचे रस्ते, बागा, मैदाने, घरे यांचे तपशील परिपूर्ण होते. त्यानुसार त्या जागी शहर वसवले गेले तेच जमशेदपूर. आजही ते नियोजनबद्ध शहर म्हणून नावाजले जाते. टाटांच्या फुटबॉल चमूचा वेश कोणत्या रंगाचा असावा इथवर तपशील त्यांनी नमूद करून ठेवले होते.

१८९३ सालच्या जुलैमध्ये जमशेदजी आणि स्वामी विवेकानंद यांनी जपानपासून शिकागोपर्यंत बोटीतून एकत्र प्रवास केला. जपानच्या औद्योगिक प्रगतीमुळे विवेकानंद प्रभावित झाले होते. भारताच्या या दोन थोर सुपुत्रांनी देशाच्या उन्नतीची चर्चा त्या भेटीत केली. त्यातून भारतात मूलभूत विज्ञानात संशोधन व्हायला हवे या कल्पनेचे बीज जमशेदजींच्या मनात रुजले. पुढे विवेकानंदांना लिहिलेल्या पत्रात त्यांनी तसा उल्लेख केलेला आहे. आपल्या संपत्तीतील तीस लाख रुपये जमशेदजींनी त्यासाठी बाजूला काढून ठेवले. त्यात मैसूरच्या राजाने भर घातली आणि बंगलोरजवळ जागाही दिली. बंगलोरची इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स उभी राहिलेली पाहायला जमशेटजी राहिले नाहीत; पण आपले पुत्र दोराब टाटा यांना त्यांनी कल्पना दिलेली होती. टाटा स्टील आणि ही संस्था अशी ही पित्याची दोन्ही स्वप्ने सर दोराबजी टाटा यांनी पुढे पूर्ण केली.

परदेशी गोऱ्या लोकांना राखून ठेवलेल्या हॉटेलात एतद्देशीयांना, काळ्यांना प्रवेश दिला जात नाही हे शल्य त्यांना इतके डाचले, की त्यांनी जागतिक दर्जाचे हॉटेल मुंबईत उभे करायचा मनसुबा रचला आणि ताजमहाल हॉटेलची संकल्पना पुढे प्रत्यक्षात आली. त्या काळी मुंबई अनेक बेटांत विभागलेली होती आणि दलदलीचा खूप मोठा भाग होता. या शहराचे उत्तम बंदर हे वैशिष्ट्य भरभराटीसाठी योग्य आहे हे हेरून त्यांनी अनेक निरुपयोगी जागा विकत घेऊन त्यावर इमारती उठवल्या. उत्कृष्ट बांधणीच्या अनेक इमारती आजही दिमाखात मुंबईचे वारसा वैभव (हेरिटेज) दर्शवीत उभ्या आहेत.

कोणतेही कायदे अस्तित्वात नसताना, जमशेदजींनी आपल्या कामगारांसाठी अनेक कल्याणकारी योजना आखून त्या कार्यवाहीत आणल्या. कामाचे तास कमी करणे, कापड गिरण्यांमध्ये आर्द्रताशोषक यंत्रे बसवणे, उत्तम वेतनमान देणे, पिण्यासाठी पाणी पुरवताना गाळणी यंत्रे बसवणे, अपघात भरपाई, घरे बांधणे आदी अनेक बाबतींत त्यांचा मानवतावादी दृष्टिकोन दिसून येई. टाटा कामगारांच्या दोन-तीन पिढ्या त्यांच्यासाठीच काम करत असल्याचे आज दिसते, त्याचे मूळ हेच आहे.

आपल्या बहुविध उद्योगाचे जाळे व्यवस्थित चालावे म्हणून १८८७ सालच्या सुमारास त्यांनी ‘टाटा सन्स’ ही शिखर संचालक संस्था आणि इतर तिच्या अखत्यारित येणाऱ्या पण स्वतंत्रपणे काम करणाऱ्या घटक संस्था असे सुनियोजित व्यवस्थापकीय रूप दिले. त्यामुळे उद्योगाचा नवनव्या क्षेत्रात पाय रोवायचा मार्ग सुकर झाला. उद्योगाची विविधता आणि उत्पादनाची गुणवत्ता, त्याचबरोबर उद्योगातील नैतिकता पाहणे शक्य झाले. १८९५ सालच्या सुमारास त्यांनी कंपन्यांच्या फायद्याचा काही भाग बाजूला काढून टाटाच्या पहिल्या धर्मादाय न्यासाची (चॅरिटेबल ट्रस्ट)ची स्थापना केली. भारतातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या देऊन परदेशी शिक्षण घ्यायची सोय या न्यासामुळे शक्य झाली. ही त्या उद्योग समूहाची पुढे संस्कृती बनली. त्यात दोराब टाटा आणि नंतर टाटा समूहाचे अध्यक्ष जे.आर.डी. टाटा यांनी अनेक पटींनी भर घातली. आज टाटा स्मारक कर्करोग रुग्णालयासह प्रचंड मोठ्या प्रमाणावर टाटांतर्फे धर्मादाय न्यासाच्या साहाय्याने सामाजिक कार्य केले जाते. कंपन्यांच्या फायद्याचा भाग समाजाला परत केला जातो.

कठोर प्रशासक, न्यायप्रिय, दयाळू, वास्तवात येतील अशी स्वप्ने पाहणारा द्रष्टा आणि औद्योगिक संस्कृतीचा भक्कम पाया रचणारा देशभक्त, अशी त्यांची ओळख इतिहासात कायम राहील.

– प्रा. माधुरी शानभाग

**संदर्भ :**

१. *लाला, आर. एम.; ‘जमशेदजी टाटा यांचे भारतप्रेम’; उत्कर्ष प्रकाशन, पुणे; २००७.*

## टिळक, बाळ दत्तात्रय

**रसायनशास्त्रज्ञ**

**२६ सप्टेंबर १९१८ - २५ मे १९९९**

रसायनशास्त्राचे नामवंत शिक्षक आणि संशोधक पुण्याच्या राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेचे (एन.सी.एल.) १९६६ ते १९७८ या कालखंडातील



संचालक. बाळ दत्तात्रय टिळक यांचा जन्म यवतमाळ जिल्ह्यातील कारंजा या गावी झाला. त्यांचे वडील दत्तात्रय टिळक हे जळगावमधील खानदेश मिल्समध्ये एक अभियंता म्हणून नोकरी करीत होते. वस्त्रोद्योग क्षेत्रातील एक जाणकार तंत्रज्ञ म्हणून ते परिचित होते. त्यांच्या प्रोत्साहनामुळे १९३३ साली शालान्त परीक्षेत उत्तीर्ण झाल्यानंतर टिळकांनी पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयात प्रवेश घेतला. तेथून १९३७ साली रसायनशास्त्र हा विषय घेऊन त्यांनी बी.एस्सी. पदवी प्रथम श्रेणीमध्ये, प्रथम क्रमांक मिळवून प्राप्त केली.

त्या काळामध्ये वस्त्रोद्योगासाठी आवश्यक असणारे विविध रंग आणि अन्य औद्योगिक क्षेत्रांमध्ये नित्य लागणारी रसायने आपल्या देशात तयार होऊ लागलेली होती. तथापि दर्जेदार प्रशिक्षित तंत्रज्ञ मिळत नसत. हे लक्षात घेऊन टिळक यांनी मुंबई येथील 'रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' या संस्थेमध्ये प्रवेश घेतला. १९३९ साली बी.एस्सी. (तंत्रज्ञान) ही पदवी मिळवल्यावर त्यांनी मुंबई विद्यापीठ-डिपार्टमेंट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी (बी.यू.डी.सी.टी.) मध्ये पीएच.डी.साठी संशोधन करायचे ठरवले. तेथे प्रा. के. व्यंकटरामन हे अत्यंत नावाजलेले प्रोफेसर औद्योगिक रसायनशास्त्रातील दर्जेदार संशोधन करीत असत. त्यांचे मार्गदर्शन टिळकांना मिळाले. १९४३ साली त्यांनी मुंबई विद्यापीठाची पीएच.डी. पदवी मिळवली. सेंद्रिय रसायनशास्त्रामध्येच अजूनही सखोल संशोधन करण्याची टिळकांची इच्छा होती. यासाठी त्यांनी इंग्लंडच्या ऑक्स्फर्ड विद्यापीठात सर रॉबर्ट रॉबिन्सन यांच्या प्रयोगशाळेत संशोधन सुरू केले. प्रयोगशाळेत विविध संरचना असलेल्या सेंद्रिय रसायनांची जडणघडण करण्यात प्रा. रॉबिन्सन यांनी बरेच प्रावीण्य मिळवले होते. त्यांना आधुनिक सेंद्रिय रसायनशास्त्रातील 'पितामह' म्हणून ओळखले जायचे. त्यांच्या प्रयोगशाळेमध्ये १९४४ ते १९४६ या कालावधीत संशोधन केल्यानंतर डॉ.टिळक यांचा अनुभव अधिक समृद्ध झाला. तर ऑक्सफर्ड विद्यापीठाने १९४६ साली टिळकांना डी.फिल. ही पदवी प्रदान करून त्यांना सन्मानित केले.

इंग्लंडमध्ये संशोधन केल्यावर डॉ. टिळक मुंबईच्या 'बी.यू.डी.सी.टी.'मध्ये अध्यापन आणि संशोधन करू लागले. स्टिरॉइडवर्गीय रंगाच्या रसायनशास्त्रामध्ये त्यांनी मोलाची भर टाकली. हेटेरोसायक्लिक (विषमचक्रीय) संयुगांचे महत्त्व औद्योगिक रसायनशास्त्रात वाढत आहे, हे लक्षात घेऊन त्यांनी तशा प्रकारच्या संयुगांची जडणघडण प्रयोगशाळांमध्ये करून पाहिली. त्यांचे मूलभूत गुणधर्म तपासले आणि सखोल संशोधनही केले. या संशोधनावर आधारित 'न्यू ट्रेन्ड्स इन हेटेरोसायक्लिक केमिस्ट्री' या शीर्षकाचे एक महत्त्वपूर्ण पुस्तक त्यांनी, त्यांचे सहकारी संशोधक डॉ.आर.बी. मित्रा यांच्याबरोबर लिहिले. गंधकाशी संबंधित असलेल्या एका रासायनिक प्रक्रियेला 'टिळक प्रक्रिया' (टिळक रिॲक्शन) असे नाव आहे. कृषी उद्योगामध्ये कीटकनाशकांचे महत्त्व उत्पादकता वाढवण्याच्या दृष्टीने गरजेचे असते. हे लक्षात घेऊन डॉ. टिळकांनी कीटकनाशकांसंबंधी संशोधन सुरू केले.

१९६० साली ऑक्सफर्ड विद्यापीठाने त्यांना डी.एस्सी. ही सन्माननीय पदवी प्रदान केली. त्यानंतर अमेरिकेतील हार्वर्ड विद्यापीठात त्यांना प्रा. रॉबर्ट बर्न्स वुडवर्ड यांच्याबरोबर सेंद्रिय रसायनशास्त्रातील क्लिष्ट संरचना असलेल्या संयुगांचे संशोधन करण्याची संधी मिळाली. १९६०-१९६१ साली त्यांनी प्रा.वुडवर्ड यांच्या प्रयोगशाळेत हेटेरोसायक्लिक कार्बन संयुगांवर संशोधन केले होते. इंग्लंडच्या ऑक्सफर्ड विद्यापीठाचे प्रा. रॉबर्ट रॉबिन्सन आणि हार्वर्ड विद्यापीठाचे प्रा. रॉबर्ट वुडवर्ड हे दोघेही रसायनशास्त्रातील नोबेल मानकरी होते. प्रा. रॉबिन्सन यांनी जीवशास्त्रामध्ये विशेष क्रियाशील असणाऱ्या अल्कोलॉइडवर्गीय रसायनांचे संशोधन केले

होते, म्हणून त्यांना १९४७ साली नोबेल पुरस्कार मिळाला होता. प्रा. वुडवर्ड यांनी प्रयोगशाळेत अनेक सेंद्रिय रसायने घडवलेली होती. त्याबद्दल त्यांना १९६५ साली नोबेल पुरस्कार मिळाला होता. डॉ. टिळकांना या दोन्ही निष्णात संशोधकांबरोबर त्यांच्या प्रयोगशाळेत प्रत्यक्ष संशोधन करण्याची संधी मिळाली. त्यामुळे त्यांचा अनुभव समृद्ध होत गेला. साहजिकच त्यांच्या विद्यार्थ्यांना त्याचा लाभ तर झालाच, पण औद्योगिक क्षेत्रातील तंत्रज्ञांना रसायननिर्मिती करताना डॉ. टिळकांच्या मार्गदर्शनाची मदत झाली. रसायन उद्योगक्षेत्रातील अनेक उद्योजक, तंत्रज्ञ त्यांच्याकडे सल्लामसलतीसाठी येऊ लागले. देशातील आणि परदेशातील अनेक संस्थांमध्ये जाऊन त्यांनी रसायननिर्मितीशी संबंधित अनेक व्याख्याने दिली. वैज्ञानिक संशोधन आणि विकास या संदर्भात अनेक आंतरदेशीय करार होत असतात. त्यासाठी परदेशात जाणाऱ्या पथकांचे त्यांनी अनेकदा नेतृत्व केले होते.

मुंबईच्या बी.यू.डी.सी.टी.मध्ये 'प्रोफेसर ऑफ डायस्टफ टेक्नॉलॉजी' या पदावर १९५० ते १९६५ सालापर्यंत डॉ. टिळकांनी अध्यापन आणि संशोधन केले. १९६५ साली त्यांनी पुण्याच्या राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेमध्ये संचालकपदाचा स्वीकार केला. त्या काळात रसायननिर्मितीसाठी बहुतांशी परदेशी तंत्रज्ञानावर अवलंबून राहावे लागत असे. 'वैज्ञानिक आणि औद्योगिक संशोधन परिषदे'च्या (कौन्सिल ऑफ सायंटिफिक अँड इंडस्ट्रियल रिसर्च) आत्मनिर्भरतेच्या धोरणानुसार डॉ. टिळकांनी प्रयोगशाळेच्या वाटचालीचा आराखडा बनवला. भारताकडे आवश्यक ती कच्ची रसायने आहेत व आणि आपल्या संशोधक आणि तंत्रज्ञांकडे पुरेशी गुणवत्ता आहे, हे त्यांच्या लक्षात आले. रंगोद्योग, जंतुनाशके, कीडनाशके, कृषिक्षेत्रात नित्य लागणारी रसायने यांसंबंधीचे संशोधन प्रकल्प सुरू करण्यासाठी त्यांनी विशेष प्रयत्न केले. नेमून दिलेल्या कामाचा आढावा घेण्यासाठी आणि प्रासंगिक अडचणी दूर करण्यासाठी ते संशोधकांसह नियमितपणे बैठका घेत



**राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा, पुणे**

असत. छोट्या आणि मोठ्या उद्योगधंद्यांच्या उभारणीसाठी आणि रसायननिर्मिती करतानादेखील त्यांची दूरदृष्टी, अनुभव, बुद्धिमत्ता, तसेच कौशल्यदेखील उपयुक्त ठरले. उपयोजित संशोधन करीत असताना, रसायनशास्त्रातील मूलभूत संशोधनाकडे डॉ. टिळकांनी विशेष लक्ष दिले होते.

दर्जेदार वैज्ञानिक नियतकालिकांमध्ये त्यांनी सुमारे २०० शोधनिबंध प्रसिद्ध केले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली ६० विद्यार्थ्यांनी पीएच.डी. पदवी मिळवली आणि ३५ जणांनी एम.टेक. किंवा एम.फिल.साठीचे प्रबंध लिहिले. त्यांचे अनेक विद्यार्थी रसायनशास्त्रामध्ये लक्षणीय संशोधन करू शकले. विशेषत: औद्योगिक रसायनशास्त्रामधील अनेक विद्यार्थी स्वत:चा उद्योग उभारू शकले.

डॉ. टिळक यांचा अनुभव आणि व्यासंग लक्षात घेऊन त्यांची 'हिंदुस्थान ऑरगॅनिक केमिकल्स' या रसायननिर्मितीशी संबंधित असलेल्या कंपनीच्या अध्यक्षपदी १९६९-१९७६ सालाच्या दरम्यान नेमणूक झाली. तसेच 'हिंदुस्थान अँटिबायोटिक्स', 'इंजिनिअर्स इंडिया लिमिटेड', 'इंडियन पेट्रोकेमिकल्स लिमिटेड' अशा कंपन्यांचे एक संचालक म्हणूनही त्यांनी उत्तम कामगिरी केली.

महाराष्ट्र सरकारने डॉ. टिळक यांना 'विज्ञान-तंत्रज्ञान विभागा'चे मानद सल्लागार म्हणून १९८१ साली आमंत्रित केले. भारत सरकारच्या 'नॅशनल टॅलन्ट अँड

टेक्नॉलॉजी'च्या संचालकपदी डॉ. टिळकांनी काही काळ कार्य केलेले होते. भारताने रसायननिर्मितीच्या क्षेत्रामध्ये आत्मनिर्भर व्हावे म्हणून डॉ. टिळकांनी विशेष परिश्रम केले. पुण्याच्या राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेचे संचालकपद त्यांनी १९६६ साली स्वीकारले, तेव्हा प्रयोगशाळेच्या संशोधनावर आधारित असलेल्या रसायनांचे औद्योगिक उत्पन्न सुमारे पंधरा लाख रुपये होते. १९७८ साली डॉ. टिळक सेवानिवृत्त झाले, त्या वर्षी तो आकडा ८१ कोटी रुपये एवढा वाढला होता. प्रयोगशाळेतील संशोधन केवळ प्रयोगशाळेतच राहता कामा नये, त्याचा औद्योगिक उत्पादन वाढवण्यासाठी उपयोग व्हावा, असे त्यांना वाटत असे. नित्य आयात केल्या जाणाऱ्या रसायनांचे भारतामध्येच उत्पादन व्हावे, म्हणून त्यांनी आयात-पर्यायी रसायनांचे संशोधन हाती घेतले होते. त्या काळामध्ये भारतात परकीय चलनाची खूप कमतरता होती. त्याची बचत होण्याकडे त्याचा उपयोग झाला.

ट

सेवानिवृत्तीनंतरही डॉ. टिळक सतत कार्यमग्न राहिले. त्यांनी ग्रामोद्धाराचे कार्य हाती घेतले. भारतीय पारंपरिक ज्ञान, अनुभव यांचा उपयोग कसा करता येईल, यासंबंधी विचार केला.

जैवविविधतेचे संरक्षण, महिलांचे सबलीकरण, पशुपालन, आहार, आरोग्य, स्वच्छता, ग्रामोद्योग आदी विषयांशी संबंधित अनेक योजना किंवा प्रकल्प त्यांनी सुरू केले. खेड्यांमधील भारतीय नागरिकांची आर्थिक उन्नती त्यामुळे होऊ शकेल हे डॉ. टिळकांनी ओळखले. ऊती संवर्धन तंत्र वापरून दुर्मीळ वृक्षांची लागवड आणि वनौषधींचे आधुनिक पद्धतीने लागवड करण्याचे प्रयत्न केले. त्यांनी कर्करोगरोधक वनस्पतींचाही अभ्यास केला. ग्रामोद्धार करण्यासाठी त्यांनी 'सेंटर फॉर ॲप्लिकेशन सायन्स अँड टेक्नॉलॉजी फॉर रिसर्च अँड डेव्हलपमेंट' (सी.ए.एस.टी.एफ.ओ.आर.डी.-कॅस्टफोर्ड) ही संस्था स्थापन केली. त्यामुळे अनेक छोटेमोठे प्रकल्प त्यांना पार पाडता आले. 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन' या संस्थेतर्फे 'फोरम ऑफ सायन्स अँड टेक्नॉलॉजी फॉर रूरल एज्युकेशन अँड डेव्हलपमेंट' (एफ.ओ.एस.टी.इ.आर.ई.डी.-फॉस्टेरॅड) हा कक्ष त्यांनी सुरू केला. कृषी मालाची उत्पादकता वाढवण्याच्या दृष्टीने काही यशस्वी प्रयत्न त्यांना त्यामुळे करता आले. विशिष्ट रसायनांचा सूक्ष्म तवंग जर एखाद्या छोट्यामोठ्या जलाशयाच्या पृष्ठभागावर पसरवता आला, तर पाण्याचे बाष्पीभवन काही प्रमाणात थोपवता येते. बरेचसे पाणी जमिनीत जिरते. हे लक्षात घेऊन, याचे संशोधनही डॉ. टिळकांनी दीर्घकाळ केले.

डॉ. टिळकांच्या कार्याला राजमान्यता आणि जनमान्यताही वेळोवेळी मिळत गेली. भारतातील वैज्ञानिकांना मिळणारा सर्वोच्च पुरस्कार म्हणजे 'शांतिस्वरूप भटनागर पुरस्कार' हा वैज्ञानिक आणि औद्योगिक अनुसंधान परिषदेतर्फे देण्यात येणारा सन्मान डॉ. टिळकांना १९६३ साली मिळाला. भारत सरकारने त्यांना १९७२ साली 'पद्मभूषण' हा पुरस्कार प्रदान करून सन्मानित केले. 'इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचे, आणि महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेस'चे ते मानद सदस्य झाले. के.जी. नाईक सुवर्णपदक (१९५९), बॅनर्जी सुवर्णपदक (१९६०) या सन्मानाचेदेखील ते मानकरी झाले. डॉ. टिळक औद्योगिक रसायनशास्त्राचे मान्यवर संशोधक होते. प्रयोगशाळेतील ज्ञान-विज्ञान आणि अनुभव यांद्वारे ग्रामीण विकास साधण्यासाठी ते अखेरपर्यंत प्रयत्नशील राहिले. हृदयविकारामुळे त्यांचे निधन झाले.

– डॉ. अनिल लचके

**संदर्भ :**

*१. तेरावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; १९७८.*

✲ ✲ ✲




## ठोसर, बाजीराव विनायक
**भौतिकशास्त्रज्ञ**
**एप्रिल १९१३ - ४ जुलै १९९८**



बाजीराव विनायक ठोसर यांचा जन्म विदर्भाच्या अकोला जिल्ह्यातील खामगाव येथे झाला. तेथे त्यांचे शालेय शिक्षण झाले. १९२९ साली वयाच्या सोळाव्या वर्षी मध्यप्रांत आणि वऱ्हाड-विदर्भ या संपूर्ण प्रदेशांसाठी घेतल्या गेलेल्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेतील सर्व विद्यार्थ्यांमध्ये त्यांचा तिसरा क्रमांक आला होता, तर वऱ्हाडमधून ते पहिल्या क्रमांकावर होते. ठोसर यांची तरल बुद्धिमत्ता त्या वेळेपासून सिद्ध झाली होती. पुढच्या महाविद्यालयीन शिक्षणासाठी त्यांनी नागपूर हे शहर निवडले आणि तिथल्या विज्ञान महाविद्यालयात प्रवेश घेतला.

हा योगायोग चांगलाच म्हटला पाहिजे. एक तर १९२९ सालापासूनच नागपूरचे विज्ञान महाविद्यालय स्वत:च्या अत्याधुनिक सुसज्ज प्रयोगशाळेसह, नव्याने बांधलेल्या इमारतीमध्ये सुरू होत होते. जगभरातील प्रगत देशांत विज्ञानाच्या नवनव्या क्षेत्रांत होत असलेल्या घडामोडी पाहता, भविष्यकाळ विज्ञानाच्या दृष्टीने खूप महत्त्वाचा असल्याची खात्री पटत चालली होती.

त्यातून आणखी एक योगायोग म्हणजे, त्याच वेळी सर सी.व्ही. रमण यांची नोकरीनिमित्त नागपूरला नियुक्ती झाली होती आणि ते त्यांच्या प्रयोगासाठीची उपकरणे याच विज्ञान महाविद्यालयातून मिळवीत होते. म्हणून डॉ. ठोसरांना सर सी.व्ही. रमण यांच्या संपर्कात येण्याची संधी प्राप्त झाली होती.

महाविद्यालयाचे प्राचार्य ओवन स्वत: भौतिक विज्ञान आणि त्यातूनही प्रायोगिक भौतिकीत पारंगत असल्याने त्यांचा भर प्रामुख्याने प्रायोगिक विज्ञान संशोधनावर होता. त्यामुळे डॉ. ठोसर यांना १९२९ ते १९३५ सालांपर्यंतच्या महाविद्यालयीन शिक्षणाच्या वैज्ञानिक पायाभरणीच्या काळात खूपच फायदा झाला. त्यांनी भौतिकी विज्ञानात एम.एस्सी. पदवी १९३५ साली संपादन केली. योगायोग म्हणजे, विज्ञान जगतात सुप्रसिद्ध असलेल्या बोस - आइन्स्टाइन सांख्यिकी सिद्धान्ताचे एक जनक प्रा.एस.एन. बोस हे ठोसरांच्या एम.एस्सी. प्रायोगिक परीक्षेत त्यांचे परीक्षक होते! ‘‘प्रा.बोस यांनी या परीक्षेदरम्यान तब्बल दोन तास माझ्याशी बोलून, ‘झीमन परिणाम’ प्रयोगाच्या अनुषंगाने वैज्ञानिक विचारधारेबाबतचा मला जणू वस्तुपाठच दिला,’’ अशी ठोसरांनीच नोंद करून ठेवली आहे. ठोसरांच्या महाविद्यालयीन शिक्षणाच्या काळातच खास करून स्वामी रामदास विवेकानंद, अरविंद घोष, वगैरेंच्या भारतीय तत्त्वचिंतनाबाबत त्यांना रुची निर्माण झाली होती. शिवाय त्यांनी संस्कृत भाषा, भारतीय शास्त्रीय संगीत, नाट्यसंगीत, वक्तृत्व, सखोल अभ्यासपूर्ण चर्चा, अशा अनेक अंगांनी समृद्ध व्यासंग केला होता.

एम.एस्सी. झाल्यानंतर लगेचच ठोसर यांना बंगळुरूच्या ‘इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स’ या सुप्रसिद्ध संस्थेत संशोधन करण्यासाठी शिष्यवृत्ती मिळाली. त्यातच सर सी.व्ही. रमण त्या वेळी तेथेच भौतिकशास्त्राचे प्राध्यापक म्हणून कार्यरत होते. त्यांच्या संशोधनाचा विषयही ठोसरांच्या आवडीचा असल्याने, त्यांच्या दृष्टीने ही मोठी पर्वणीच होती. पुढील दोन वर्षे

ठ

ठोसरांच्या संशोधन प्रज्ञेचा मजबूत पाया घातला गेला. ठोसरांनी तेथे माणिक (रूबी) या रत्नाच्या स्फटिकावर केलेल्या संशोधनावर आधारित दोन शोधनिबंध आंतरराष्ट्रीय वैज्ञानिक नियतकालिकांत प्रसिद्ध केले. यानंतर अनेक वर्षांनी जगात लेझरचा शोध लागला आणि तोही माणिक स्फटिकावर आधारलेला होता, ही बाब लक्षणीयच समजली पाहिजे.

१९३७ साली ठोसरांना नागपूरच्या त्यांच्याच महाविद्यालयात प्राचार्य ओवन यांनी व्याख्याता म्हणून नेमणूक दिली. १९४६ सालापर्यंत नागपूरला भौतिकशास्त्राच्या तरुण विद्यार्थ्यांना शिकविण्याचे महत्त्वाचे कार्य त्यांनी केले. तथापि तेवढ्यावरच संतुष्ट न राहता, परदेशी जाऊन पुढील संशोधन करण्याचा विचार करून ठोसरांनी त्यासाठी किंग एडवर्ड स्मृती शिष्यवृत्ती मिळविली. १९३८ साली एक वर्षासाठी इंग्लंडमधील मार्कोनी कंपनीत, बिनतारी संदेशवहन तंत्रज्ञानाचा अभ्यास करून ते १९३९ साली भारतात परतले.

दुसरे महायुद्ध संपल्यानंतर पुन्हा एकदा प्रा. ठोसरांनी भारत सरकारकडून उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मिळविली. १९४६ साली इंग्लंडमधील बर्मिंगहॅम विद्यापीठात त्यांनी अणुविज्ञानशाखेत डॉ. ऑलिफंट यांच्या मार्गदर्शनाखाली तीन वर्षांच्या आतच पीएच.डी. मिळविली. या कामात त्यांनी 'इलेक्ट्रोस्टॅटिक बीटा रे स्पेक्ट्रोमीटर' हे अणुकेंद्र संशोधनासाठी उपयोगी ठरणारे महत्त्वाचे संयंत्र स्वत: बनविले व त्यावर काही मोजमापेही घेतली. त्या काळातच डॉ. भाभा काही निमित्ताने तेथे आले असताना डॉ. भाभांशी त्यांची पहिली भेट झाली. डॉ.भाभा भारताच्या अणुसंशोधन प्रकल्पाची जुळवाजुळव करण्यात गुंतले होते. त्यांच्या गुणग्राहक नजरेने डॉ. ठोसरांमधील वैज्ञानिक प्रतिभा हेरली होती. त्यांनी डॉ. ठोसरांना मुंबईच्या टाटा मूलभूत संशोधन संस्थेत वैज्ञानिक संशोधन करण्यासाठी बोलावून घेतले. डॉ. ठोसरही अशा संधीच्या शोधात होतेच. १९४९ साली त्यांनी टाटा मूलभूत संशोधन संस्थेत आपले काम सुरू केले.

डॉ. ठोसरांच्या विज्ञान संशोधन प्रज्ञेला फुलविणारा कालखंड म्हणजे टाटा मूलभूत संशोधन संस्थेतील त्यांची उणीपुरी तीस-पस्तीस वर्षांची दीर्घ कारकीर्द. डॉ. भाभा त्यांच्या पद्धतीला अनुसरून प्रथम योग्य व्यक्तीची निवड करून मग त्या वैज्ञानिकाला कामाबाबत शक्य तितकी जास्त मोकळीक देत असत. डॉ. ठोसरांनादेखील त्यांनी अशीच मोकळीक दिली. 'अणुकेंद्र विज्ञान' हा विषय त्या काळात जगभर अभ्यासला जात होता. एकीकडे इलेक्ट्रॉनिक्स या तंत्रशाखेची घोडदौड चालू होती. त्यातच संगणक तंत्रही विकसित होत होते. वैश्विक किरणांच्या (कॉस्मिक रेज) उच्च ऊर्जा असलेल्या प्रक्रिया अभ्यासल्या जात होत्या. तथापि डॉ. ठोसरांनी आपले लक्ष अणुकेंद्राशी संलग्न प्रक्रिया, उदा. रेडिओ ॲक्टिव्हिटी, इलेक्ट्रॉन-बीटा किरणांच्या प्रारणाबाबत सखोल अभ्यास करण्याकडे वळविले. त्यांनी निवडक ताज्या दमाच्या हुशार अशा निवडक संशोधक वैज्ञानिकांना हाताशी धरून अणुकेंद्र वर्णपटाविषयी (न्यूक्लियर स्पेक्ट्रोस्कोपी) सर्वंकष स्वरूपाचे संशोधनकार्य सुरू केले. ते आजतागायत भारतभर पथदर्शी म्हणून वाखाणले जात आहे. याच काळात अशाच प्रकारचे संशोधन भाभा अणू संशोधन केंद्रातही चालू असायचे. टाटा मूलभूत संशोधन संस्था आणि भाभा अणू संशोधन केंद्र या दोन्ही संस्था एकमेकांच्या हातात हात घालून एक प्रकारची परस्परपूरक आणि मैत्रीपूर्ण चढाओढ करूलागल्या. त्यांचेही श्रेय डॉ. ठोसरांचेच आहे.

आपले वैज्ञानिक कार्यातील अनुभव डॉ. ठोसरांनी त्यांच्या 'लाइफ विथ सायन्स इन इंडिया' या पुस्तकात नोंदून ठेवले आहेत. डॉ. ठोसर १९७८ साली टाटा मूलभूत संशोधन संस्थेतून भौतिक विभागाचे अधिष्ठाता या पदावर असताना निवृत्त झाले. त्यानंतरही अनेक वर्षे त्यांचा टाटा मूलभूत संस्थेतील संशोधन कार्याशी मानद प्राध्यापक या नात्याने संपर्क होता. वयाच्या शहाऐंशीव्या वर्षी डॉ. ठोसरांची जीवनयात्रा संपली.

– डॉ. गो. के. भिडे

✻✻✻

ठ

# ड



## डहाणूकर, शरदिनी अरुण

**वैद्यकशास्त्रज्ञ**

**१७ ऑक्टोबर १९४५ - ४ ऑगस्ट, २००२**



गोव्यात जन्मलेल्या शरदिनी पै-धुंगट यांचे शालेय शिक्षण मुंबई येथील सेंट कोलंबा विद्यालयात झाले. १९६२ साली माध्यमिक शालान्त परीक्षेत त्या जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्तीच्या मानकरी होत्या. एल्फिन्स्टन महाविद्यालयात इंटर सायन्सपर्यंतचे शिक्षण घेतल्यानंतर शरदिनी डहाणूकरांनी सेठ जी.एस. वैद्यकीय महाविद्यालय आणि के.ई.एम. रुग्णालयातून एम.डी. व पीएच.डी. (औषधविज्ञानशास्त्र) या अत्युच्च पदव्या प्राप्त केल्या. त्यानंतर त्याच संस्थेत औषधविज्ञानशास्त्र विभागात तीस वर्षे अध्यापन व संशोधन केले. १९९५ साली त्यांनी विभागप्रमुख म्हणून सूत्रे हाती घेतली. विभागामध्ये मूलगामी बदल घडवून आणून राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर या विभागाला महत्त्व प्राप्त करून दिले. २००१ साली टोपीवाला राष्ट्रीय वैद्यकीय महाविद्यालय व बाई यमुनाबाई एल. नायर रुग्णालयाच्या अधिष्ठात्री म्हणून त्यांची निवड झाली. त्याच पदावर कार्यरत असताना त्यांचे अकाली निधन झाले.

आधुनिक वैद्यकशास्त्राच्या पदवीधर असलेल्या डॉ.डहाणूकरांची आयुर्वेदाशी तोंडओळख झाली, ती वैद्य वेणीमाधवशास्त्री जोशी यांच्यामुळे. पुढे स्वत:च्या कुटुंबीयांवर उपचार करताना त्यांना आधुनिक वैद्यकाच्या त्रुटी प्रकर्षाने जाणवल्या, तसेच आयुर्वेद उपचारपद्धतीचे उत्तम अनुभव आले. त्यामुळे त्या आधुनिक चिकित्सक वृत्तीने आयुर्वेदशास्त्राचा वेध घेऊ लागल्या. त्यासाठी त्यांनी वैद्य वेणीमाधवशास्त्री यांच्याकडे आयुर्वेदाचा सखोल अभ्यास केला. त्यांच्याबरोबर झालेल्या विचारमंथनातून त्यांना आयुर्वेदाच्या बलस्थानांची जाणीव होऊ लागली. ही बलस्थाने प्राय: आयुर्वेदाची मूलतत्त्वे व संकल्पना आहेत हे लक्षात येताच त्यांनी ती आधुनिक विज्ञानाची परिभाषा वापरून सर्वमान्य शास्त्रीय कसोट्यांवर त्यांची चिकित्सा करून दाखवण्याचे प्रयत्न सुरू केले. आयुर्वेदाला पुरावाधिष्ठित शास्त्र म्हणून स्वदेशी व परदेशी मान्यता मिळवून देणे हेच त्यांनी आपले जीवितकार्य मानले.

ड

त्यांच्या संशोधनाचे वेगळेपण म्हणजे आपल्या पूर्वसुरींप्रमाणे आयुर्वेदातील औषधी वनस्पतींच्या अर्काचे पृथक्करण करत एकाच घटकावर लक्ष केंद्रित न करता, त्यांनी आयुर्वेदीय संस्कार झालेली औषधे, आयुर्वेदिक तत्त्वे वापरून प्रयोगात वापरली. अशा अनेक सम्यक औषधींचे गुणधर्म त्यांनी आयुर्वेदात मांडलेल्या गुणधर्मांशी पडताळून पाहिले. उदाहरणार्थ, दम्यासाठी पिंपळी किंवा यकृतविकारासाठी कात. हे प्रयोग करताना त्यांनी आयुर्वेदातील ‘रसायन’ संकल्पनेवर अधिक भर देऊन रसायन द्रव्यौषधी या प्रामुख्याने रोगप्रतिकारक शक्तींचे संवर्धन करून मेंदू-प्रतिकारशक्ती-अवयवकार्य त्या साखळीद्वारे वेगवेगळ्या अवयवांना व शरीरसंस्थांना बळ प्राप्त करून देतात असा सिद्धान्त प्रथमच मांडला. त्यासाठी गुळवेल, आवळा, हिरडा, पिंपळी, अश्वगंधा, शतावरी अशा सहा रसायनांना निवडून त्यांचे पेशी व विविध प्राण्यांवर होणारे परिणाम शोधले. या प्रयोगाच्या निष्कर्षांनुसार गुळवेल या औषधीची त्यांनी निवड केली.




त्यापुढची पायरी म्हणजे रुग्णांवर गुळवेलीची चाचणी करणे. जठरांत्र शल्यचिकित्सक डॉ. रवी बापट यांच्या सहकार्याने त्यांनी अवरोधक काविळीचे रुग्ण, उरोऔषधतज्ज्ञ डॉ. महाशूर यांच्यासोबत क्षयरोगी व कर्करोगतज्ज्ञ डॉ. राजन बडवे यांच्या सहकार्याने कर्कविरोधी औषधे घेणारे रुग्ण यांच्यावर गुळवेलीच्या चाचण्या घेतल्या. या सर्व संशोधनाचा परिपाक म्हणजे गुळवेल ही एक उत्कृष्ट प्रतिकारशक्तिसंवर्धक (इम्युनोस्टिम्युलेटर) आहे हे सिद्ध झाले.

अत्यंत प्रतिष्ठित अशा आंतरराष्ट्रीय नियतकालिकांमध्ये आयुर्वेद व त्यातील वनस्पतींच्या गुणधर्मांबद्दल झालेल्या संशोधनास प्रसिद्धी मिळाली. या संशोधनास अगुस्तीनी त्रापानी हा इटलीचा आंतरराष्ट्रीय पुरस्कार, पुण्याच्या भारतीय चिकित्सा संस्थानचे सुवर्णपदक, भारतीय चिकित्सा राष्ट्रीय अकादमीची फेलोशिप व इतर अगणित पुरस्कार मिळून त्यांची यथोचित दखल घेतली गेली. मुख्य म्हणजे या संशोधनानंतर आधुनिक वैद्यकातील औषधांचे उत्पादन करणाऱ्या कंपनीने प्रथमच गुळवेल हे आयुर्वेदिक औषध जनसामान्यांसाठी उपलब्ध करून दिले.

डॉ. डहाणूकरांचे आयुर्वेदविषयक कार्य हे केवळ वनस्पतींच्या गुणधर्मांच्या शोधाबद्दल मर्यादित राहिले नाही. आयुर्वेदातील अनेक संकल्पनांचा उदा. प्रकृती, आम, भस्मनिर्मिती, पंचकर्म, स्वस्थवृत्त इत्यादींचा त्यांनी शास्त्रीय संशोधनाची जोड देऊन पाठपुरावा केला. त्यावर त्यांनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय नियतकालिकांमध्ये सत्तरहून अधिक लेख लिहिले. प्रोफेसर वॅगनर या वनौषधितज्ज्ञाने प्रसिद्ध केलेल्या पुस्तकात त्यांनी 'आयुर्वेदीय रोगप्रतिकारसंवर्धक' असा लेख लिहून आयुर्वेदातील प्रतिकारशक्तीबद्दलच्या संकल्पना व भारतातील अनेक संशोधकांनी त्यासंबंधी केलेले संशोधन याला जगप्रसिद्धी मिळवून दिली. अनेक आधुनिक विज्ञानांच्या संशोधकांना आयुर्वेदासंबंधी संशोधन करण्यास प्रेरित केले. अनेक विद्यार्थ्यांना आपल्या भाषणांतून व लिखाणांतून आयुर्वेदाची तोंडओळख करून दिली. आयुर्वेद रिव्हिझिटेड व आयुर्वेद अनरॅव्हल्ड ही शास्त्रीय परिभाषेतील, तर जनसामान्यांवर स्वत:चे आरोग्यरक्षण स्वत: आयुर्वेदिक तत्त्वे समजावून घेऊन करावे म्हणून लिहिलेली सोप्या, सुगम भाषेतील वर्तमानपत्रीय सदरे व स्वास्थ्यवृत्त, तसेच 'ए ड्रग इज बॉर्न' ही पुस्तके त्याला साक्ष आहेत.

संशोधनात पुढील पिढीचे सातत्य कायम टिकावे म्हणून त्यांनी भारतातील पहिले आयुर्वेद संशोधन केंद्र, सेठ जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयासारख्या संस्थेत, १९८९ साली सुरू केले व नायर रुग्णालयात अधिष्ठात्रीचा पदभार स्वीकारताना आपल्या शिष्येकडे (डॉ. निर्मला रेगे) सुपूर्द केले. तसेच नायर या महापालिकेच्या रुग्णालयात आणखी एक आयुर्वेद संशोधन केंद्र सुरू केले, ज्याचे काम त्यांची शिष्या डॉ. ऊर्मिला थत्ते बघत आहेत.

आयुर्वेदाला अशास्त्रीय ठरवल्याबद्दल लंडनमध्ये लॉर्ड वॉल्टन यांच्या सिलेक्ट कमिटीपुढे आपले संशोधन मांडून कमिटीला आपला निर्णय बदलायला लावून डॉ.डहाणूकरांनी सर्व भारतीयांवर न फेडता येणारे उपकार करून ठेवले आहेत.

त्यांच्यातील संशोधकवृत्तीचा शोध घेतला, तर त्याचा उगम त्यांच्याकडे वारसाहक्काने आलेल्या निसर्गप्रेमात, त्या प्रेमाची जोपासना करणाऱ्या त्यांच्या आई-वडिलांत व घरच्या सुजाण, संपन्न व अनुकुल वातावरणात दिसून येतो. निसर्ग, फुले, वृक्ष, पशुपक्षी,

ड

माणसे, खाद्यपदार्थ, देशविदेशांतील स्थळे यांना बघण्याची नजर, समजून घेण्याची संवेदना आणि शब्दरूप देण्याची शब्दकळा त्यांना अवगत होती. त्यांच्या लालित्यपूर्ण लिखाणाचा प्रत्यय 'हिरवाई', 'फुलवा', 'वृक्षगान', 'मनस्मरणीचे मणी', 'पांचाळीची थाळी', 'सगेसोबती', 'नक्षत्रवृक्ष', अशा अनेक पुस्तकांतून येतो. ही पुस्तके आजही शालेय मुलांपासून थोर समीक्षकांपर्यंत सर्वांनाच भावतात. त्यांपैकी काही पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचे उत्कृष्ट साहित्याचे पुरस्कारही मिळाले आहेत.

उत्कृष्ट शिक्षक, दूरदृष्टी असणारी व्यवस्थापक, आदरणीय औषधविज्ञानशास्त्रज्ञ, चिकित्सक संशोधक, सर्वमान्य साहित्यिक, आतिथ्यशील गृहिणी आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे चराचरांमध्ये विलक्षण रस असलेली विलक्षण बुद्धीची व्यक्ती म्हणून त्यांची पुढील पिढ्यांना ओळख राहील.

– डॉ. रवी बापट

**संदर्भ :**

१ *'इंडियन जर्नल ऑफ फार्माकोलॉजी', खंड-३४; २००२.*

✻ ✻ ✻

ड




## तळपदे, चंद्रकांत रामराव

**रसायनशास्त्रज्ञ, विज्ञान प्रसारक**

**३ ऑक्टोबर १९१४ - १५ जुलै २००४**



चंद्रकांत रामचंद्र तळपदे यांनी आपल्या ८९ वर्षांच्या प्रदीर्घ आयुष्यात शिक्षण मिळविण्यासाठी वेचलेली सुरुवातीची पंचवीस वर्षे वगळता उर्वरित आयुष्य वेगवेगळ्या माध्यमातून ज्ञानप्रसार करण्यात व्यतीत केले. डॉ. तळपदे यांचा जन्म मुंबईमध्ये झाला. त्यांचे शालेय शिक्षण पुण्यामध्ये, तर महाविद्यालयीन शिक्षण मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयात झाले. ‘रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स’ या संस्थेतून डॉ. माताप्रसाद यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी एम.एस्सी., पी.एच.डी.पर्यंतचे शिक्षण, उच्च श्रेणी मिळवून पूर्ण केले. १९३८ ते १९४१ सालांदरम्यान एल्फिन्स्टन महाविद्यालयात अध्यापन केल्यावर दादाजी धाकजी कंपनीत सल्लागार म्हणून, सौराष्ट्रमधील खारगोडा, राजस्थानमधील सांबारलेक या ठिकाणी काम केले. १९४५ साली अफगाणिस्तानमध्ये सल्लागार म्हणून काम करण्याची संधी त्यांना शासनातर्फे मिळाली. वर्षभराने अफगाणिस्तानहून परत आल्यावर फर्गसन महाविद्यालयात रसायनशास्त्राचे प्राध्यापक म्हणून त्यांची कारकीर्द सुरू झाली. वसतिगृहाचे रेक्टर, केमिस्ट्री असोसिएशन, आर्ट सोसायटी या संस्थांचे अध्यक्ष म्हणून त्यांनी काम पाहिले. विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासाकडे ते जातीने लक्ष पुरवीत असत. महाविद्यालयातील खेळांच्या सामन्यांच्यावेळी, विद्यार्थ्यांचे कौतुक करण्यासाठी ते जातीने मैदानात हजर राहत असत.




डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या मुंबईतील कीर्ती महाविद्यालयाच्या उभारणीत डॉ. तळपदे यांचा फार मोठा वाटा आहे. १९५४ ते १९७५ या कालावधीत ते कीर्ती महाविद्यालयाचे उपप्राचार्य व रसायनशास्त्र विभागाचे प्रमुख म्हणून कार्यरत होते. पंचवीस विद्यार्थ्यांनी त्यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन करून एम.एस्सी. पदवी प्राप्त केली, तर एका विद्यार्थ्याने पीएच.डी. मिळवली. त्यांचे पंचवीस संशोधनात्मक निबंध प्रसिद्ध झालेले आहेत.

विद्यार्थ्यांच्या सहवासात, अध्यापन करीत असताना, रसायनशास्त्राविषयी त्यांचे सतत मनन, चिंतन चालू राहिले. त्यामधूनच प्रेरणा मिळून त्यांनी विज्ञान साहित्याची मराठीत निर्मिती करून अणुशक्ती, मूलतत्त्वे असे विषय सर्वसामान्यांपर्यंत पोहोचविले.

‘अणुशक्ती’, ‘नोबेल पारितोषिकाचे मानकरी’ (रसायनशास्त्र भाग १ ते ५), ‘रसायनशास्त्राचे कारागीर’ (भाग १ ते ८) यांसारख्या त्यांच्या पुस्तकांनी मराठी विज्ञान साहित्यात मोलाची भर घातली आहे. त्यांना दोन वेळा महाराष्ट्र राज्य साहित्य पुरस्कार मिळाला होता. डेक्कन व्हर्न्याक्यूलर ट्रान्सलेशन सोसायटीने पारितोषिक देऊन त्यांना गौरविले होते.

विज्ञानकथा हाही प्रकार त्यांनी हाताळला. त्यांच्या विज्ञानकथा ‘नवल’, ‘हंस’ या मासिकांतून प्रसिद्ध

झाल्या. मराठी विज्ञान परिषदेच्या 'विज्ञान पत्रिके'तून ते सातत्याने लिहीत असत.

'सौराष्ट्रातील पर्जन्यसूक्त' हा त्यांचा शेवटचा लेख परिषदेने जून १९९८ च्या अंकात छापला होता. मराठी विज्ञान परिषदेच्या मंचावरून त्यांनी अनेक ठिकाणी भाषणे दिली. १९७५ साली हैद्राबाद येथे भरलेल्या मराठी विज्ञान संमेलनात त्यांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला होता.

– गार्गी लागू

**संदर्भ :**

१. *दहावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; १९७५.*

## तळपदे, शिवकर बापूजी
**अभियंता**

**१८३५ - १९०७**



आधुनिक भारतातील विमानोड्डाणाचा पहिला प्रयत्न करणारे तंत्रविशारद. प्राचीन विमानविद्या ही वेदकाळापासून प्रचलित होती. भारतीय विमान कला केवळ पठणविद्या नव्हती. प्रत्यक्ष प्रयोगविद्या आणि यंत्रविद्या होती. परंतु ही पुरातनकालीन विद्या, मधल्या हिंसक व विध्वंसक आघाताच्या युगात जवळजवळ नाहीशी झाली. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात कृष्णाजी विनायक वझे व भुसावळ विद्यालयाचे मुख्याध्यापक परशुराम थत्ते या दोघा समकालीन संशोधकांनी विमानशास्त्रावर बरेच लिखाण केले; परंतु त्यासंबंधी प्रयोग मात्र केले नाहीत. विमानशास्त्राचे पठण करून व त्यानुसार यंत्र निर्माण करून पहिले विमान हवेत उडविण्याचा यशस्वी प्रयोग करण्याचे श्रेय मात्र त्यांच्या समकालीन पं. शिवकर बापूजी तळपदे ह्यांना जाते.

तळपदे एक संशोधक व विज्ञानशाखेतील तंत्रविशारद होते. मुंबईच्या प्रसिद्ध ज.जी. कला महाविद्यालयामध्ये ते 'आर्ट आणि क्राफ्ट' या विषयाचे अध्यापक होते. त्यांना व त्यांच्या पत्नीला संस्कृत भाषेचे ज्ञान अवगत असून, त्यायोगे त्यांनी विमानविद्येचा अभ्यास करून आपल्या घरातीलच प्रयोगशाळेत एक ६ मीटर × १.२ मीटर असा पक्ष्याच्या आकाराचा सांगाडा बनविला. वर्गात शिकविताना चालत्या गाड्या व फिरती चक्रे तयार करण्यासाठी ते पाठ देत असत. हवेत उडणाऱ्या पक्ष्यांचे चित्र काढताना पंखांची उघडझाप यंत्राच्या साहाय्याने करता आली, तर असे पक्ष्याच्या आकाराचे विमान हवेत निश्चितच झेप घेईल, अशी त्यांची धारणा होती.

त्यांच्या या प्रयोगात त्यांनी पाऱ्याचा ऊर्जेसाठी वापर केला व १८९५ साली डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यात मुंबईच्या चौपाटीवर सार्वजनिक बांधकाम विभागाच्या श्री. पिटकर यांच्या साहाय्याने व पोलिसांच्या परवानगीने आपले 'मरुत्सखा' हे विमान अवकाशात उडविले. त्या वेळी नामदार गोखले, जगन्नाथ शंकरशेट आणि इतर मान्यवर मंडळी तेथे उपस्थित होती. अर्वाचीन विमानशास्त्राच्या इतिहासात तळपदे एक यशस्वी संशोधक म्हणून नावारूपाला आले. सूर्यकिरण व पारा यांच्या संयोगाने पाऱ्याचे विभाजन होते व हायड्रोजन वायू तयार होतो. हायड्रोजन वजनाने हलका असल्यामुळे वर जातो. शिवकरजींच्या विमानाला त्यानेच गती मिळाली. पक्ष्याच्या आकाराच्या सांगाड्याला क्रँकशाफ्ट व चक्र लावल्यामुळे त्यांचे विमान पुढे सरकत गेले. त्यांचे विमान काही सेकंदांतच खाली आले. पुढील तत्सम प्रयोगांसाठी अर्थसाहाय्य न मिळाल्यामुळे हा प्रयोग तेथेच संपुष्टात आला. त्यांच्या या प्रयोगाला त्यांच्या एका तत्कालीन प्रसिद्ध विद्यार्थ्याने - पं.श्री.दा. सातवळेकर - यांनी पुष्टी दिली आहे. त्याचप्रमाणे बऱ्याच वर्तमानपत्रांतून व नियतकालिकांमधून त्यासंबंधी लेख लिहिले गेले.

प्रा. केळकर यांनी त्यांच्या 'आधुनिक भारतीय वैज्ञानिक' या ग्रंथात शिवकरजींच्या चरित्रलेखात खालीलप्रमाणे लिहिले आहे: 'पारतंत्र्यात असताना स्वतंत्र बुद्धीने केलेली शास्त्रीय प्रगती दुबळ्या

त

पक्ष्यासारखी, पंख कापलेल्या पक्ष्यासारखी कीर्तीची झेप घेऊ शकत नाही.'

– डॉ. सदानंद कुलकर्णी

**संदर्भ:**


१. *दै. केसरी; १० व १७ मे १९५३.*

२. *वेलकर, प्रताप; 'पाठारे प्रभूंचा इतिहास'; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १९९५.*


## ताकवले, मुरलीधर गोविंद

**भौतिकशास्त्रज्ञ**

**१५ ऑगस्ट १९४२**



डॉ. मुरलीधर गोविंद ताकवले यांचे बालपण अतिशय लहान अशा हरगूड गावामध्ये व्यतीत झाले. त्यांचे वडील प्राथमिक शिक्षक होते आणि त्या गावाला शिक्षणाची एक परंपरा होती. त्यामुळे बालवयातच त्यांच्यावर शिक्षणविषयक चांगले संस्कार झाले. त्यानंतरचे त्यांचे शिक्षण पुण्यामध्ये फर्गसन महाविद्यालय, पुणे विद्यापीठ आणि राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा येथे झाले. त्यांनी भौतिकशास्त्रात 'एक्स-रे क्रिस्टलोग्राफी' या विषयात पीएच.डी. मिळविली. त्यानंतर त्यांनी पुणे विद्यापीठाच्या भौतिकशास्त्र विभागात व्याख्याता, प्रपाठक आणि प्राध्यापक या पदांवर काम केले. सतत कार्यरत राहण्याच्या त्यांच्या स्वभावामुळे त्यांनी शिक्षण आणि संशोधन क्षेत्रात मोलाचे योगदान दिले आहे.

इ.स. १९७० ते २००० अशी ३० वर्षे त्यांनी विद्यापीठात पदव्युत्तर स्तरावर सॉलिड स्टेट फिजिक्स, मटेरियल सायन्स, सरफेस सायन्स, ऊर्जा अभ्यास, संगणक प्रणाली, पर्यावरण विज्ञान असे विषय शिकवले. त्यांनी संशोधन व विकासाचे पंचवीस प्रकल्प पूर्ण केले. मटेरियल सायन्स, प्रकाश संवेदक पदार्थ (फोटोव्होल्टाईक मटेरियल), सूर्यउष्णता पद्धती, बायोगॅस, बायोमास गॅसिफीकेशन, पवनऊर्जा हे त्यांच्या संशोधनाचे विषय होते.

त्यांच्या मार्गदर्शनाखाली चोवीस विद्यार्थ्यांनी पीएच.डी. आणि तीस विद्यार्थ्यांनी एम.फिल. ही पदवी मिळविली. एक्स-रे क्रिस्टलोग्राफी या विषयात केलेल्या संशोधनानंतर त्यांनी ऊर्जाविषयक संशोधनाला सुरुवात केली. डॉ. वि.ग. भिडे यांच्यासोबत त्यांनी अनेक वर्षे काम केले. पुणे विद्यापीठाच्या ऊर्जा प्रणालीचा विकास घडविण्यात त्यांचा खूप मोठा वाटा आहे. विशेषत: या विषयातील औष्णिक गुणधर्मावर आधारित सोलर कुकर, ड्रायर, त्याचप्रमाणे विद्युतनिर्मिती या विषयात त्यांनी प्रावीण्य प्राप्त केले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली महाराष्ट्रात अनेक ठिकाणी सौरऊर्जेचा वापर करणारी उपकरणे बसविण्यात आली. या विषयाच्या संशोधनामध्ये त्यांनी नवीन प्रकारची सौरऊर्जेवर चालणारी उपकरणे विकसित केली. त्यामध्ये पॅराबोलिक रिफ्लेक्टरचा विकास हे एक महत्त्वाचे योगदान आहे.

डॉ. मुरलीधर ताकवले यांनी अनेक महत्त्वाच्या पदांवर काम केले. त्यांमध्ये कुलसचिव, अधिष्ठाता-विज्ञान विद्याशाखा- पुणे विद्यापीठ, कुलगुरू-शिवाजी विद्यापीठ, आणि कुलगुरू-प्रवरा इन्स्टिट्यूट ऑफ मेडिकल सायन्सेस यांचा उल्लेख करता येईल.

ग्रामीण भागातून आल्यामुळे डॉ. मुरलीधर ताकवले यांचा ग्रामीण विद्यार्थ्यांकडे नैसर्गिक ओढा होता. त्यांच्या मार्गदर्शनाखाली अनेक ग्रामीण भागांतील विद्यार्थ्यांनी संशोधन करून एम.फिल. आणि पीएच.डी. पदवी मिळविली.

डॉ. मुरलीधर ताकवले यांचा स्वभाव शांत, राहणी साधी आणि विचारांत स्पष्टपणा असल्यामुळे त्यांच्याविषयी अनेकांना जिव्हाळा वाटतो. समाजवादी विचारांचा प्रभाव त्यांच्यावर असल्यामुळे समाजाच्या विकासाची कामे करण्याकडे आणि त्याला पूरक असे संशोधन करण्याकडे त्यांचा सतत ओढा राहिला आहे. त्यांनी केलेल्या योगदानाची दखल अनेक संस्थांनी घेतली असून त्यांना 'गुरुवर्य बाबुराव जगताप पुरस्कार'

त

त्याचप्रमाणे 'सूर्या पुरस्कार' यांसारखे पुरस्कार मिळाले आहेत. शिक्षण, संशोधन आणि ज्ञानविस्तार या तिन्ही क्षेत्रांमध्ये तेवढ्याच हिरिरीने काम केलेल्या डॉ. मुरलीधर ताकवले यांनी आपल्या कार्याचा ठसा विज्ञान क्षेत्रामध्ये निश्चितपणे उमटविलेला आहे.

– डॉ. पंडित विद्यासागर

**संदर्भ :**

१. *देशपांडे, अ.पां., संपादक; 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन; २००५.*

## ताकवले, राम गोविंद

**भौतिकशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**११ एप्रिल, १९३३**



राम गोविंद ताकवले यांचा जन्म हुरगुडे, जि. पुणे येथे झाला. त्यांचे वडील प्राथमिक शिक्षक असल्यामुळे त्यांचे काही शालेय शिक्षण पुणे जिल्ह्यातील खेडेगावात झाले. त्यांच्या वडिलांची पुण्याला पदोन्नतीवर बदली झाल्यामुळे पुणे येथे शालेय शिक्षण पूर्ण करून ते फर्गसन महाविद्यालयात दाखल झाले. तेथून बी.एस्सी. १९५६ साली आणि पुणे विद्यापीठातून एम.एस्सी. १९५७ साली प्राप्त करताना त्यांनी भौतिकशास्त्र आणि सैद्धान्तिक भौतिकशास्त्राचा अभ्यास केला. त्यांनी फर्गसन महाविद्यालयात आणि पुणे विद्यापीठात भौतिकशास्त्राचे अध्यापन केले. मॉस्को विद्यापीठातून त्यांनी पीएच.डी. संपादन केली.

पुणे विद्यापीठातील अध्यापनानंतर ते इ.स. १९७८-१९८४ आणि इ.स. १९८८-१९८९ या वर्षी पुणे विद्यापीठात कुलगुरूपदी होते. इ.स. १९८५ ते १९८७ या वर्षांत त्यांनी राज्य शासनाच्या शिक्षण विभागातर्फे महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाचे समन्वयक म्हणून काम पाहिले. इ.स. १९८९-१९९५ या कालावधीत त्यांनी यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाच्या कुलगुरूपदाची जबाबदारी सांभाळली, तसेच इ.स.१९९५-१९९८ या कालावधीत ते इंदिरा गांधी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठाचे कुलगुरू होते. डॉ. ताकवले यांनी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठातील कारकिर्दीनंतर माहिती तंत्रज्ञानाचा उपयोग करून दूरशिक्षणाची पद्धत विकसित करण्याचे काम सुरू केले. इ.स.२००१ ते २००४ या कालावधीत त्यांनी महाराष्ट्र ज्ञान मंडळाचे संचालक म्हणून काम केले. महाविद्यालयांचे मूल्यमापन करून श्रेणी देणाऱ्या नॅशनल असेसमेन्ट आणि ॲक्रेडिटेशन काऊन्सिलचे (नॅक) अध्यक्षपद त्यांनी इ.स.२००३ ते २००६ असे तीन वर्षे भूषवले आहे.

ते एक आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संशोधक आहेतच; पण त्याचबरोबर शिक्षणाच्या विविधांगांचा अभ्यास करून त्याबाबतचे विचार निरनिराळ्या स्तरांवर ठामपणे मांडणारे आणि आपले विचार प्रत्यक्ष कृतीत उतरविणारे मान्यवर शिक्षणशास्त्री आहेत. महाराष्ट्रात मुक्त विद्यापीठ स्थापन करण्याची योजना पुढे येताच या योजनेचे प्रारूप (आराखडा) तयार करून ते पार पाडण्यापर्यंतची सर्व जबाबदारी डॉ. ताकवले यांच्यावर सोपवण्यात आली. त्यांनीही ती यशस्विरीत्या पार पाडली आणि त्यामुळेच शिक्षणापासून वंचित राहिलेल्यांना आपले शिक्षण पूर्ण करण्याची संधी प्राप्त झाली आहे.

डॉ. राम ताकवले यांनी महाराष्ट्राच्या संदर्भात आणखी एक महत्त्वाची कामगिरी पार पाडली आहे. राज्यातल्या विज्ञान प्रसाराच्या चळवळीला प्रोत्साहन देण्यासाठी विविध क्षेत्रांतल्या वैज्ञानिकांना काही ठोस वैज्ञानिक काम करता यावे म्हणून त्यांनी 'महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेस' या संस्थेची स्थापना करण्यात पुढाकार घेतला. ते राष्ट्रीय पातळीवरच्या 'इंडियन सायन्स कॉंग्रेस'चे सदस्य आहेत. त्यामुळे मान्यवर संशोधकाच्या वैज्ञानिक विचारांची देवाणघेवाण होऊन मूलभूत आणि समाजाच्या उपयोगी पडणारे संशोधन करण्याचे व संघटना कौशल्य वापरण्याचे उद्दिष्ट साध्य

होते. डॉ. ताकवले हे उत्तम प्रशासकही आहेत. आपण कठीण परिस्थितीतून मार्ग कसा काढू शकू याचा ते सतत कृतीतून विचार करत असतात. सतत नावीन्याचा ध्यास असणाऱ्या डॉ. ताकवले यांनी माहिती तंत्रज्ञानाचा वापर करून सर्वांना शिक्षण कसे देता येईल, याचा अभ्यास केला. त्यासाठी संगणक साक्षरता कार्यक्रम, महाराष्ट्र ज्ञान मंडळ, डिजिटल स्कूल नेट, ट्रान्सफॉर्मेशन नेट अशा विविध संस्था व कार्यक्रम आखले. त्यायोगे प्रत्येकाच्या जवळच्या उत्तम स्रोताची देवाणघेवाण होऊन शिक्षण प्रसार होईल यावर त्यांचा ठाम विश्वास आहे. वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षीही शिक्षण क्षेत्रात नवनवीन प्रयोग करून शिक्षण हे आपल्या जीवनाशी जोडले व त्याला कृतीची जोड देऊन ही अखंड चालणारी प्रक्रिया आहे हे दाखवून दिले.

त

डॉ. ताकवले यांनी राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय स्तरांवर शिक्षण क्षेत्रात अनेक पदे भूषविली आहेत. अमेरिका, चीन, कॅनडा, फिलिपाइन्स, आफ्रिका अशा वीसच्यावर देशांतर्फे शिक्षण क्षेत्राशी संलग्न विविध कार्यक्रमांत त्यांना सन्मानपूर्वक बोलविण्यात आले आहे. उत्तम वक्ते, उत्कृष्ट प्राध्यापक आणि संशोधक असलेले डॉ. ताकवले शिक्षणाच्या विविध अंगांचा सूक्ष्म अभ्यास करून विविध स्वरूपाचे अहवाल तयार करण्यात कुशल आहेत. सेमिस्टर पद्धती, शिकवण्याच्या पद्धतींमध्ये बदल, व्यवस्थापन पद्धतीत आणि शैक्षणिक निकाल पद्धतीत नव्या तंत्रज्ञानाचा वापर, परीक्षांचे निर्णय लावण्यासाठी कालमर्यादा ही त्यांची शिक्षण क्षेत्रातील ठळक कामगिरी आहे. शिक्षणगती संदर्भात त्यांनी अनेक पर्याय सुचवले. व्होकेशनल, टेक्निकल पद्धतीच्या प्रयोगात्मक अभ्यासक्रमाची आखणी करून 'कमवा आणि शिका' यानुसार प्रत्यक्ष काम करीत असताना दूरस्थ शिक्षण पद्धतीद्वारे अभ्यासक्रम आणि प्रशिक्षण कार्यक्रम आखले. शेतकरी, कामगार, माळी, सोनार अशा विविध क्षेत्रांतल्या समाजातील व्यक्तींसाठी मुक्त विद्यापीठातर्फे अभ्यासक्रमाचे आयोजन करून समाजातील सर्व स्तरांतील व्यक्तींना शिक्षण कसे मिळेल, याचा ध्यास त्यांनी घेतला. शेतीची लागवड पद्धती, फळबाग उभारणी, उत्पादन आणि निर्यात पद्धती असे छोटे-छोटे, शेतकऱ्यांना समजतील अशा भाषेत आणि कमी वेळात करता येतील, असे अभ्यासक्रम त्यांनी आखले व त्याची कार्यवाही केली. व्यक्तिमत्त्व विकास, खेळ, व्यवसायाभिमुख तांत्रिक पद्धती या सर्वांचा अभ्यास करून अभ्यासक्रम चालू केले.



सर्वांत लहान वयात कुलगुरुपद भूषविणारे डॉ. ताकवले यांनी पुणे विद्यापीठाला पहिल्या पाच क्रमांकांत नेऊन बसवले, ते शैक्षणिक व सामाजिक जागृती आणि सुधारणेमुळेच. मराठी, इंग्रजी, हिंदी, रशियन या विविध भाषा जाणणाऱ्या डॉ. ताकवले यांचे अनेक निबंध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर नावाजले गेले आहेत.

शिक्षण क्षेत्रात शिक्षकापासून कुलगुरूपर्यंतच्या सर्व पदांवर विराजमान झालेल्या या शिक्षणतज्ज्ञाला ब्रिटनमध्ये डॉक्टरेट प्रदान करताना एक गमतीदार प्रश्न विचारला गेला, ''तुम्ही विज्ञान संशोधक असताना या शिक्षण क्षेत्राच्या मार्गालाच का गेलात?'' तेव्हा ''ज्ञान आणि समाज यांची सांगड घालण्यासाठी शिक्षणासारखा दुवा नाही,'' हे आपले ध्येय त्यांनी स्पष्ट केले आणि प्रत्यक्ष कृतीतून 'इंदिरा गांधी मुक्त विद्यापीठा'ला कोणतीही मदत नसताना, शिपायापासून कुलगुरूपर्यंत सर्वांना एका ध्येयाने प्रेरित करून, सर्व कामे आपलीच मानून जगात एक उत्तम (मॉडेल) प्रमाण म्हणून प्रसिद्धी मिळवून दिली. मुक्त विद्यापीठाला नैपुण्य पुरस्कार (अवॉर्ड ऑफ एक्सलन्स)ही मिळवून दिले.

निवृत्तीनंतरच्या काळातही ते शिक्षणक्षेत्रातील संशोधन करण्यात उत्साहाने मग्न असतात. त्यांची शिक्षणाविषयी आणि जीवनाविषयी काही तत्त्वे आहेत. ''शिक्षण हे समाजाशी संलग्न असले पाहिजे. चाकोरीबद्ध शिक्षण समाजाशी फारकत घेते. म्हणूनच

शिक्षण हे ज्ञानाने, तंत्रज्ञानाने आणि व्यवहाराने समृद्ध करून ज्ञान आणि समाज यांतील दुवा बनले पाहिजे. फक्त पैसा हीच काही संपत्ती नव्हे. आपला समाज, आपली संस्कृती, आपले पर्यावरण हीच खरी आपली संपत्ती आहे. म्हणूनच शिक्षणाने या सर्वांचे संवर्धन, संरक्षण आणि समृद्धीकरण झाले पाहिजे. समाज म्हणजे कोण? तर मी! मी चांगला तर समाज चांगला.'' अशी त्यांची भूमिका आहे. त्यासाठी डॉ. ताकवले समाजाशी 'शेअरिंग, केअरिंग आणि सॅक्रिफायसिंग' या त्रिसूत्रीचा वापर करतात. कार्यप्रणाली यशस्वी करण्याचे त्यांचे तंत्र म्हणजे, 'एखादी चांगली कल्पना सुचली तर ती अमलात आणा, ती जर यशस्वी झाली नाही, तर ती अमलात आणण्याचे मार्ग बदला; पण कल्पना सोडू नका.'

'ओपन एज्युकेशनल रिसोर्स फॉर स्कूल्स' या कार्यक्रमाचे सूत्र असे आहे की, ''या कार्यक्रमाद्वारे माझ्या अगदी दूरच्या खेड्यातील मुलांना जगात जे-जे सर्वोत्तम आहे, ते-ते मी अगदी लवकरच पोहोचविले आहे, असे तुम्ही पाहाल.''

– मृणालिनी साठे / दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**

१. *http://www.mkcl.org/profile_Ram_T.html*

## तुळपुळे, पुरुषोत्तम गोपाळ

**पोषणशास्त्रज्ञ, वैद्यकतज्ज्ञ**

**४ जून १९२३**



डॉ. पुरुषोत्तम गोपाळ तुळपुळे यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांचे शालेय शिक्षण श्री गोपाळ हायस्कूल, पुणे येथे झाले, तर त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण नवरोज वाडिया महाविद्यालय, पुणे येथे घेतले. १९४७ साली ते मुंबई विद्यापीठातून एम.एस्सी. झाले. त्याच वर्षी त्यांना संशोधन शिष्यवृत्ती मिळून ते पोषण संशोधन प्रयोगशाळा, कुन्नूर (आता राष्ट्रीय पोषण संस्था, हैदराबाद) येथे रुजू झाले. त्या वेळचे संस्थेचे संचालक डॉ. वि. ना. पटवर्धन यांच्या मार्गदर्शनाखाली 'जीवनसत्त्व ब६ आणि आवश्यक मेदाम्ले यांचे परस्पर संबंध' या विषयावर संशोधन करून त्यांनी जीवरसायनशास्त्रात १९५१ साली पीएच.डी.ची पदवी मिळवली. या संशोधनात त्यांनी 'फ्रेनोडर्मा किंवा बेडकाची कातडी हा त्वचेचा विकार आवश्यक मेदाम्लांच्या कमतरतेमुळे होतो', हे सिद्ध केले. पीएच.डी.पश्चात संशोधनासाठी त्यांना अमेरिकेतील विस्कॉन्सिन विद्यापीठाने फुलब्राइट शिष्यवृत्ती दिली. त्यानंतर त्यांनी भारतात परत येऊन राष्ट्रीय पोषण संस्थेत अन्न-विष विज्ञानातील संशोधनाला वाहून घेतले.

डॉ. तुळपुळे यांचे मूलभूत शास्त्रीय ज्ञानात आणि कृषीविषयक, तसेच मानवाच्या प्रकृतीच्या दृष्टीने महत्त्वाचे काम कवकविष (अफ्लॉटॉक्सीन) या बुरशीच्या विषाबद्दलचे आहे. कृषिउत्पन्न, मुख्यत्वे मका आणि भुईमूग यांचा साठा करताना बाष्प जास्त प्रमाणात राहिले, तर 'अॅस्पर्शिलस फ्लॅवस' या विषारी कवकाची त्यावर वाढ होते व अफ्लॉटॉक्सीन निर्माण होते. त्याच्या प्रतिबंधाकरिता काय उपाय योजावेत हे डॉ. तुळपुळेंच्या संशोधनाने दाखवून दिले. या विषामुळे यकृताचा कर्करोग होतो हे त्यांनी माकडांवर प्रदीर्घ प्रयोग करून दाखवून दिले. राजस्थानात टोळीने राहणाऱ्या जमातीत दिसून येणारे यकृताचे विकार (सिऱ्हॉसिस) अफ्लॉटॉक्सीनमुळे होतात हे त्यांच्या संशोधनाने सिद्ध झाले.

ते १९७१ साली सहायक निर्देशक आणि अन्न, तसेच औषध विषशास्त्राचे प्रमुख झाले. १९८० साली ते राष्ट्रीय पोषण संस्थेचे (जी इंडियन कौन्सिल फॉर मेडिकल रिसर्चच्या (आय.सी.एम.आर.) अखत्यारीत आहे) संचालक झाले आणि १९८३ साली निवृत्त झाले. त्यांच्या ३०-३५ वर्षांच्या प्रदीर्घ संशोधनकार्यात डॉ. तुळपुळे यांनी आहार व पोषणशास्त्राच्या विविध क्षेत्रांत मूलभूत संशोधन केले असून त्यांचे ऐंशीहून अधिक लेख

त

राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय उच्च दर्जाच्या वैज्ञानिक नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत.

त्यांचे खास संशोधन क्षेत्र अन्नविषविज्ञान होते आणि कवकविषासंबंधीचे संशोधन त्यांनी देशात सुरू केले. त्यांनी 'कवकविषाचे हिंदुस्थानातील आरोग्याला धोके' ही पुस्तिका प्रसिद्ध केली. त्यांनी बऱ्याच विद्यार्थ्यांना पीएच.डी.च्या संशोधनाकरिता मार्गदर्शन केले. जागतिक आरोग्य संघटना, अन्नविषयक संघटना, आहार परिमाणित मध्यवर्ती समिती अशा विविध जागतिक संस्थांमधून डॉ. तुळपुळे यांनी महत्त्वाचे कार्य केले. डॉ. तुळपुळे यांनी भारतीय पोषण मंडळात सचिव, खजिनदार आणि नंतर उपाध्यक्ष ही वेगवेगळी पदे सांभाळली. ते १९८१ साली भरलेल्या मराठी विज्ञान परिषदेच्या वार्षिक संमेलनाचे अध्यक्ष होते. डॉ. तुळपुळे यांनी त्यांच्या कारकिर्दीत राष्ट्रीय पोषण संस्थेच्या कार्याला नवीन दिशा दिली. त्यांच्या मार्गदर्शनाखाली बऱ्याच संस्थांबरोबर सहकार्याच्या योजना सुरू झाल्या. त्यांच्या अखत्यारीत त्यांनी सरकारला, तसेच काही आंतरराष्ट्रीय कार्यालयांना सल्ला दिला.

– डॉ. तरला नांदेडकर

**संदर्भ :**

१. *देशपांडे, अ.पां., संपादक; 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन, २००५.*

✻ ✻ ✻

त




## थत्ते, रघुनाथ परशुराम

***राजाभाऊ थत्ते***

**भौतिकशास्त्रज्ञ, गणितज्ञ**

**१४ नोव्हेंबर १९१० - ९ डिसेंबर १९९३**



वैज्ञानिक प्रयोगांतून निष्पन्न होणाऱ्या आधुनिक निष्कर्षांच्या आधारे प्राचीन वेदविद्येचे विश्लेषण यथार्थपणे करणाऱ्या मोजक्या विद्वानांपैकी रघुनाथ परशुराम ऊर्फ राजाभाऊ थत्ते हे होत. त्यांचा जन्म वर्धा जिल्ह्यातील आर्वी येथे झाला. तेथील नगरपालिका शाळेतून शालांत परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर, महाविद्यालयीन शिक्षणासाठी राजाभाऊ पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयात दाखल झाले. तिथे भौतिकी व गणित विषयांचा अभ्यास करून, मुंबई विद्यापीठाची बी.एस्सी. पदवी मिळविल्यानंतर, स्कूल ऑफ रेडिओ फिजिक्सच्या विद्यार्थ्यांना रेडिओचे तांत्रिक शिक्षण देण्यासाठी त्यांची नियुक्ती झाली.

१९४२ साली पुण्यात 'सिमला हाउस' नावाने ओळखल्या जाणाऱ्या भारतीय हवामान खात्याच्या (आय.एम.डी.च्या) वेधशाळेत संशोधक म्हणून ते रुजू झाले. हवामानाचा अंदाज बांधण्यासाठी पृथ्वीपासून बऱ्याच उंचीवरील तापमान, दाब व आर्द्रता या वातावरणाच्या तीन घटकांचे, दिवसातून निदान दोनदा तरी, मापन करावे लागते. त्यासाठी त्या घटकातील फेरबदलांना प्रतिसाद देणारे एक छोटेसे यंत्र लहानशा टोपलीत बसवून, हायड्रोजन वायू भरलेल्या रबरी फुग्यांमधून उंच वातावरणात पाठवीत असत. जमिनीपासून आकाशात जसजसे वर जावे, तसतसा उंचीनुसार वातावरणाचा दाब कमीकमी होत जातो. त्यामुळे हायड्रोजन वायूने भरलेले रबरी फुगे वातावरणात वरवर जाताना हळूहळू प्रसरण पावू लागतात व रबरी आवरणाचा ताण मर्यादेबाहेर गेल्याने फुगे फुटले, की त्यांना बांधलेली उपकरणांची टोपली पॅराशूटच्या साहाय्याने पृथ्वीवर अलगद येऊन पडे. पण त्यासाठी ४-६ दिवस लागत. कधीकधी तर वाऱ्याने पॅराशूट भरकटल्याने, टोपल्या अरबी समुद्रात पडत. ही त्रुटी दूर करण्यासाठी फुग्यांना बांधलेली यंत्रांची पेटी वातावरणात वरवर जात असतानाच, वेगवेगळ्या उंचीवरील दाब, तापमान व आर्द्रता मोजणाऱ्या त्यातील संवेदकांच्या प्रतिसादाचे रेडिओलहरींच्या साहाय्याने तत्काळ प्रक्षेपण करायचे व वातावरणासंबंधीची माहिती पुरवणाऱ्या त्या रेडिओ लहरींचे वेधशाळेत ग्रहण करून, त्या माहितीच्या आधारे वातावरणात होणाऱ्या संभाव्य बदलांचे खात्रीलायक भाकीत करता येईल असे, 'रेडिओ साउंड' नावाचे नवे तंत्रज्ञान सिद्ध करण्याचे काम डॉ. थत्त्यांनी पुणे वेधशाळेत सुरूकेले. त्यावरच आधारलेल्या त्यांच्या संशोधन प्रबंधाला मुंबई विद्यापीठाची पीएच.डी. पदवी मिळाली.

त्याच सुमारास बंगळुरूच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये डॉ. होमी भाभा विश्वकिरणांसंबंधी (कॉस्मिक रेज) संशोधन करीत होते. त्यासाठी सिल्व्हर ब्रोमाइडयुक्त फोटोग्राफिक इमल्शनचे जाड थर दिलेल्या काचांची चळत हायड्रोजन भरलेल्या फुग्यांना बांधून, वातावरणाच्या वेगवेगळ्या उंचीवर पाठवण्याचे तंत्र डॉ. भाभा वापरीत. फोटो इमल्शनऐवजी गायगर म्युलर

थ

काउंटरवर आधारित संवेदक यंत्रे उंच वातावरणात पाठवून रेडिओ साउंड तंत्रज्ञानाने विश्वकिरणांचा अभ्यास जारी ठेवायला, थत्त्यांना मुंबईत नव्याने स्थापन झालेल्या टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फण्डामेन्टल रिसर्च (टी.आय.एफ.आर.) मध्ये काम करण्यासाठी पाचारण करण्यात आले. तेथे पाच वर्षे संशोधन केल्यानंतर त्यांना परदेशी संशोधनासाठीची आय.सी.आय. फेलोशिप मिळाली. त्यानंतरची चार वर्षे विलायतेत एडिन्बरा विद्यापीठात, प्रा. फेदर, एफ.आर.एस. व डॉ. डायमंड यांच्या मार्गदर्शनाखाली केलेल्या तत्सम पुढील संशोधन कार्याबद्दल त्यांना एफ.आर.मेट.एस. हा सन्मान मिळाला. १९५४ साली एडिन्बराहून ते इंग्लंडमधील चेम्सफर्ड इथल्या जगप्रसिद्ध मार्कोनी कंपनीच्या रडार व सेमिकंडक्टर विभागात शास्त्रज्ञ म्हणून नोकरी करू लागले. नोकरीच्या उत्तरार्धात व्हेरी लार्ज स्केल इंटिग्रेशन - व्हि.एल.एस.आय.च्या विकासासंबंधीच्या कार्यातही त्यांचा सहभाग होता.

थ

दुसऱ्या महायुद्धाअखेरीस वापरलेल्या अणुबॉम्बमुळे व त्यानंतर बिकिनी बेटावर करण्यात आलेल्या हायड्रोजन बॉम्बच्या चाचणी स्फोटामुळे, खूप मोठ्या लोकवस्त्यांवर आकस्मिकरीत्या होऊ शकणाऱ्या, आण्विक विकिरणांच्या (न्यूक्लिअर रेडिओ ॲक्टिव्हिटी) संभाव्य दुष्परिणामांपासून कराव्या लागणाऱ्या बचावासाठी, संघटित लोकजागृतीची आवश्यकता, विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात जगभर भासू लागली होती. त्यातूनच ठिकठिकाणी नागरी संरक्षण चळवळी (सिव्हिल डिफेन्स मूव्हमेन्ट) सुरू झाल्या. मार्कोनी कंपनीत नोकरीत असताना, इंग्लंडमधील त्यासंबंधीच्या चळवळीतही थत्ते उत्स्फूर्तपणे सहभागी झाले होते.

१९७२ साली निवृत्त झाल्यावर, पवई आय.आय.टी.मध्ये अभ्यागत संशोधक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. तेथे त्यांनी रडारविषयीचे एक नवे केंद्र उभारण्याचे काम केले. त्या वेळी योगनिद्रा, ध्यानस्थ अथवा समाधी अवस्थेत व्यक्तीच्या मेंदूतील संवेदनांच्या क्रियांमधील बदल, आधुनिक इलेक्ट्रॉनिक तंत्राने तपासता येतील का, याचा शोध घेण्यासाठी त्यांनी काही प्रयोग सुरू केले. वेदांतील ऋचांचा सम्यक संदर्भ देऊन लिहिलेल्या 'वैदिक वाङ्मयातील भौतिक शास्त्रे' या प्रबंधाला, महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभेचे 'दक्षिणा' पारितोषिक मिळाले. ऑल इंडिया ओरिएन्टल कॉन्फरन्सच्या जयपूर अधिवेशनात, राजस्थान संस्कृत अकॅडमीने त्यांना 'महापंडित' हा सन्मान दिला. त्यांचा 'शोध वेदांच्या मूलस्वरूपाचा' हा ग्रंथही वाखाणला गेला. वयाच्या त्र्याऐंशीव्या वर्षी थत्ते यांचे निधन झाले.

— डॉ. अच्युत थत्ते

## थत्ते, विनायक नारायण

**भौतिकशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**२० मार्च १८९६ - २६ मार्च १९८५**



डॉ .विनायक नारायण थत्ते यांचा जन्म अमरावती, येथे व महाविद्यालयीन शिक्षण नागपूर येथील विज्ञान महाविद्यालयात झाले. १९१९ साली त्यांना अलाहाबाद विद्यापीठाची भौतिकशास्त्रातील एम.एस्सी. पदवी मिळाली. (त्या काळी नागपूरची सर्व महाविद्यालये अलाहाबाद विद्यापीठाशी संलग्न होती; नागपूर विद्यापीठाची स्थापना नंतर झाली.) इ.स. १९२७-१९२९ या काळात त्यांनी लंडन विद्यापीठात भौतिकशास्त्रात, प्रा. पोर्टर आणि प्रा. आंद्रेड यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन केले व त्याबद्दल त्यांना नागपूर विद्यापीठाने १९३५ साली डी.एस्सी. ही शास्त्र शाखेतील सर्वोच्च पदवी दिली.

इ. स. १९१९ ते १९५४ या ३६ वर्षांच्या दीर्घ काळातील, डॉ. थत्ते व त्यांचे सहकारी यांचे संशोधनात्मक निबंध, फिलॉसॉफिकल मॅगझिन (हे जगातले बहुधा सर्वांत जुने, विज्ञानविषयक संशोधन निबंध प्रसिद्ध करणारे मासिक आहे. या मासिकात फॅरॅडे,

ज्यूल, मॅक्सवेल, जे.जे. थॉम्प्सन, रेले, रूदरफोर्ड वगैरे दिग्गजांचे शोधनिबंध प्रसिद्ध झालेले आहेत) आणि झेट एफेल फिजिक (टाइम फॉर द रीडर्स ऑफ फिजिक्स) या मासिकांत प्रसिद्ध झालेले आहेत. असेंद्रीय संयुगे आणि रमण परिणाम, निरनिराळ्या स्फटिकांतून होणारे प्रकाशाचे वक्रीभवन आणि त्यांची संरचना, वगैरे विषयांवर मुख्यत: प्रकाशिकी क्षेत्रात त्यांनी मूलभूत संशोधन केले आहे.

१९४७-१९५४ या स्वातंत्र्योत्तर काळात त्या वेळच्या मध्यप्रदेश शासनाने विद्यापीठासाठी आणि उच्च माध्यमिक शाळांसाठी, विज्ञानाची, मराठी व हिंदी भाषांत पाठ्यपुस्तके लिहिण्याचा प्रकल्प राबविला. नागपूर माध्यमिक शिक्षण मंडळाची १९५० सालाची मॅट्रिकची परीक्षा, मराठी आणि हिंदी माध्यमातून झाली. मातृभाषेच्या माध्यमाला पर्यायच ठेवला नव्हता. स्वतंत्र भारतात मातृभाषेच्या माध्यमातून विद्यापीठाच्या स्तरापर्यंत सर्व विषयांत शिक्षण देणे आवश्यक आहे, हा नागपूर विद्यापीठाने तातडीने घेतलेला निर्णय म्हणजे शिक्षण क्षेत्रातील फार मोठे संक्रमण होय. डॉ.थत्ते या समितीचे प्रमुख आधारस्तंभ होते. या योजनेत त्यांनी स्वत: भौतिकशास्त्रावर, इंटर सायन्स आणि बी.एस्सी. स्तरावर दोन्ही भाषांत अनेक पुस्तके लिहिली आणि इतर शास्त्र शाखांसाठी तज्ज्ञांकडून लिहून घेतली. मराठी आणि हिंदी माध्यमांसाठी विज्ञानाची पुस्तके उपलब्ध करून देण्यात डॉ. थत्ते यांचे प्रयत्नच कारणीभूत आहेत. मातृभाषेतून शिक्षणाचा भारतातील हा पहिलाच प्रयत्न होता. त्यांनी इंग्रजी-मराठी शास्त्रीय परिभाषेच्या अनेक पुस्तिकाही लिहिल्या. ३१ जानेवारी १९८२ रोजी त्यांच्या निवृत्तीचा सत्कार समारंभ नागपूर विद्यापीठाच्या कुलगुरूंच्या अध्यक्षतेखाली झाला. त्या वेळी 'डॉ.वि.ना. थत्ते सायन्स फाउंडेशन' ही संस्था डॉ.थत्ते यांचे विद्यार्थी व चहाते यांनी स्थापन केली. या न्यासाच्या वतीने दरवर्षी नागपूर येथे नामवंत वैज्ञानिकांची दोन भाषणे होतात. मराठी विज्ञान परिषदेचा नागपूर विभाग १५ सप्टेंबर १९६८ रोजी स्थापन झाला. तेव्हापासून डॉ.थत्ते यांनी त्या विभागाचे एक तपाहून अधिक काळ अध्यक्षपद भूषविले. मराठी विज्ञान परिषदेने १९७० साली नागपूर येथे संपन्न झालेल्या पाचव्या अखिल भारतीय मराठी विज्ञान संमेलनात ज्येष्ठ वैज्ञानिक म्हणून त्यांचा जाहीर सन्मान केला.

थ

— गजानन वामनाचार्य

**संदर्भ :**

*१. पाचवे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; १९७०.*

✻ ✻ ✻

द





## दाणी, श्रीकृष्ण गोपाळ

**गणितज्ञ**

**३ जून १९४७**



गणित अध्ययनाची मुळीच पार्श्वभूमी नसलेल्या कुटुंबात श्रीकृष्ण गोपाळ दाणी यांच्यासारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या गणितज्ञाचा बेळगाव येथे जन्म झाला. इंटर सायन्सपर्यंत बेळगावात शिक्षण घेतलेल्या दाणींनी १९६५ साली मुंबईच्या विज्ञान संस्थेत प्रवेश घेतला व पुढे मुंबई विद्यापीठाच्या बी.एस्सी. (१९६७) व एम.एस्सी. (१९६९) परीक्षेत प्रावीण्य संपादन केले, तर एम.एस्सी.नंतर त्यांनी मुंबईच्या टाटा मूलभूत संशोधन संस्थेतील (टी.आय.एफ.आर.) नामवंत गणिती प्रा.एम.एस. रघुनाथन यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन करून पीएच.डी. प्राप्त केली (१९७५). यानंतरचे संशोधन (पोस्ट डॉक्टरेट रिसर्च) करण्यासाठी अमेरिकेतील न्यू जर्सी प्रांतातील प्रिन्स्टन येथील इन्स्टिट्यूट ऑफ ॲडव्हान्स स्टडीजमध्ये (१९७६-७७) डॉ. दाणी यांना संधी मिळाली. तद्नंतर दाणी मुंबईच्या टी.आय.एफ.आर.मध्ये अध्यापन व संशोधनकार्य करत असून आता वरिष्ठ प्राध्यापकपदी कार्यरत आहेत.

गणिताच्या भिन्न-भिन्न शाखांमध्ये दाणी यांनी उच्च दर्जाचे संशोधन केले आहे. एरगॉडिक सिद्धान्त, गतिशास्त्र, ली-गट, डायोफेटीय आसन्नीकरण आणि गटांवरील संभाव्यतामान यांत डॉ. दाणींची विशेषता आहे. थोड्या अधिक तपशिलात सांगायचे तर, ली-गटाच्या एकविध अवकाशावर होणाऱ्या एकशक्तिमान ओघाचा अभ्यास व ली-गटावरील संभाव्यतामान, तसेच एकविध अवकाशावरील कक्षांच्या वर्तणुकींच्या संदर्भात संवृत्ती, वितरण, पुनरावर्तन, परिबद्धता व अपसरण यासंबंधात दाणींच्या एकसमान पुनरावर्तनातील निष्कर्षांची, राटनर यांच्या रघुनाथन तार्किकेच्या सिद्धतेच्या संदर्भात महत्त्वाची मदत झालेली आहे. तसेच राटनर यांच्या एक समान वितरण प्रमेयात व ओपनहेम तार्किकेचे संख्यात्मक रूपांतर सिद्ध करण्यात, गणितात नोबेल पारितोषिकाच्या तोडीचे असलेले 'फील्ड्स मेडल' मिळवणारे जी. ए. मार्गूलीस यांच्याबरोबर डॉ. दाणी यांनी लक्षणीय सुधारणा सुचवलेली आहे. १९८० सालापासून त्यांनी अभिजात संभाव्यतेच्या सापेक्ष प्रमाणात वाढ करून ती अधिक व्यापकपणे स्थानीयत: संहत गटावरील खास करून ली-गटांवरील संभाव्यतामान काढण्यात रस घेतला. या क्षेत्रात दाणी यांनी आपल्या सहकाऱ्यांबरोबर काम करून सतत एक प्राचलीय वळणाऱ्या अर्धगटात अनंतत: विभाज्य संभाव्यतामानाची अंत:स्थापना करण्यासंबंधीच्या प्रश्नांवर नमुनेदार निष्कर्ष मिळविले आणि या विषयांच्या स्पष्टीकरणार्थ अथवा परीक्षणार्थ बरेच लेख लिहिले आहेत.

डॉ. दाणी यांनी आतापर्यंत केलेल्या संशोधनाचे महत्त्व ओळखून त्यांना अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय सन्मान प्राप्त झालेले आहेत. इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमी, इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस आणि नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेस या भारतातील तीनही अकॅडमींचे ते फेलो आहेत. तसेच त्यांना इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचा तरुण शास्त्रज्ञासाठीचा पुरस्कार प्राप्त

झालेला आहे (१९७६). याव्यतिरिक्त मानाचा शांतिस्वरूप भटनागर पुरस्कार त्यांना १९९० साली मिळाला आहे. झूरिच येथे भरलेल्या आंतरराष्ट्रीय गणितज्ञांच्या परिषदेत ते निमंत्रित व्याख्याते होते (१९९४). विकसनशील देशांसाठी असलेल्या -ट्वॉस- थर्ल्ड वर्ल्ड अकॅडमी ऑफ सायन्सेसतर्फे नोव्हेंबर २००७ साली जाहीर झालेला गणितासाठीचा पुरस्कार त्यांना प्रदान करण्यात आला. 'मेझर्स अँड डायनॅमिक्स ऑन ग्रूप्स अँड होमोजीनियस स्पेसेस' या विषयावर १७ ते २२ डिसेंबर २००७ च्या दरम्यान टी.आय.एफ.आर.मध्ये भरलेली परिषद, त्या वर्षाच्या जूनमध्ये झालेल्या डॉ. दाणींच्या षष्ट्यब्दीपूर्तीच्या सन्मानार्थ आयोजित केलेली होती.

युरोप व अमेरिकेतील बऱ्याच विद्यापीठांतून, तसेच संशोधन संस्थांमधून डॉ. दाणी यांना अभ्यागत व्याख्याते व इतर शैक्षणिक कारणांमुळे वेळोवेळी पाचारण करण्यात आलेले आहे. अशा संशोधन संस्थांत केंब्रिजची सर आयझॅक न्यूटन इन्स्टिट्यूट, इन्स्टिट्यूट ऑफ ॲडव्हान्स स्टडीज, प्रिन्स्टन इत्यादी, तर विद्यापीठांत शिकागो, मँचेस्टर, गॉटिंगेन, न्यू कॅसल (ऑस्ट्रेलिया) इत्यादींचा समावेश आहे. याशिवाय इंग्लंड, अमेरिका, ऑस्ट्रेलिया, रशिया, कॅनडा, जर्मनी, फ्रान्स, हंगेरी, पोलंड, इस्रायल, इटली, ब्राझील इत्यादी देशांत झालेल्या चर्चासत्रांत किंवा आंतरराष्ट्रीय परिषदांतून निबंधवाचन अथवा वक्ते म्हणून दाणी सहभागी झालेले आहेत.

१९९६ सालापासून डॉ. दाणी राष्ट्रीय उच्च गणित मंडळाचे (नॅशनल बोर्ड ऑफ हायर मॅथेमॅटिक्स) सभासद असून २००६ सालापासून ते त्या मंडळाचे कार्याध्यक्ष म्हणून जबाबदारी पेलत आहेत. अशाच प्रकारे गणिताशी संबंधित देशी-विदेशी संस्थांनी त्यांच्यावर वेळोवेळी सोपविलेल्या विविध जबाबदाऱ्यादेखील ते कुशलतेने सांभाळत असतात. आंतरराष्ट्रीय गणित संघाच्या विकास व आदानप्रदान करणाऱ्या आयोगाचे दाणी हे २००२ सालापासून सभासद असून आता इ.स. २००६




**श्रीकृष्ण दाणी यांची बीजगणितावरील पुस्तके**

ते २०१० या कालावधीसाठी त्या आयोगाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झालेली आहे.

गणिताच्या विविध अंगांवर डॉ. दाणी यांचे नव्वदच्यावर शोधनिबंध प्रसिद्ध झालेले आहेत. विविध देशी-विदेशी गणिती संशोधन नियतकालिकांच्या संपादक मंडळांत त्यांचा समावेश असून त्याद्वारेदेखील डॉ. दाणींनी गणिती प्रकाशनकार्यात योगदान दिलेले आहे. आयोजनात त्यांचा सहभाग असलेल्या गणितविषयक आंतरराष्ट्रीय कृतिसत्रे/परिषदांशी निगडित ग्रंथांच्या संपादनाचे कार्यही दाणींनी केलेले आहे.

– प्रा. स. पां. देशपांडे

**संदर्भ:**

*१. भटनागर लॉरेट्स १९५८-१९९१; भारतीय राष्ट्रीय विज्ञान अकादमी.*

## दाते, केशव कृष्ण

**वैद्यकतज्ज्ञ**

**१९१२ - १९८३**

हृद्रोग शाखा म्हटली की प्रामुख्याने नाव पुढे येते ते डॉ.के.के. (म्हणजे केशवराव कृष्णराव) दाते यांचे. डॉ. दाते मृदुभाषी, पण कणखर वृत्तीचे होते. त्यांचा जन्म जबलपूरच्या सधन कुटुंबात झाला. त्यांचे शालेय शिक्षण जबलपूरमध्ये झाले. अलाहाबाद विद्यापीठातून १९३२ साली इंग्रजी वाङ्मयात त्यांनी पदवी घेतली. नंतर त्यांचा कल वैद्यकीय शिक्षणाकडे झुकला व १९३६ साली



मुंबईच्या के.ई.एम. रुग्णालय व जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयामधून ते एम.बी.बी.एस. झाले. त्यानंतर सहा वर्षे त्यांनी मध्यप्रदेश तुरुंग अधीक्षक म्हणून काम केले. दुसरे महायुद्ध संपल्यानंतर त्यांनी ब्रिटनला जाऊन डी.टी.एम. ॲण्ड एच. (लंडन) व डी.सी.एच. (इंग्लंड) या पदव्या १९४२ साली घेतल्या. तसेच एम.आर.सी.पी. (लंडन) व एम.आर.सी.पी. (एडिंबरो) या पदव्या घेतल्या. परदेशी असताना डॉ. पॉल वुड (युके) व डॉ. पॉल व्हाइट (अमेरिका) यांच्या संपर्कात आल्यामुळे त्यांना हृद्‌रोगशाखेचा खूप अनुभव व ज्ञान मिळाले.

मायदेशी परतल्यावर त्यांनी मुंबईच्या के.ई.एम. रुग्णालयामध्ये हृदय सुशिरीकरण सुरू केले व सातत्याने चालू ठेवले. के.ई.एम. रुग्णालयामध्ये डॉ.दाते हृद्‌रोगतज्ज्ञ म्हणून काम करू लागले. १९६३ साली त्यांना एफ.आर.सी.पी. (एडिंबरो) व १९६७ साली एफ.आर.सी.पी. (लंडन) या पदव्या प्रदान करण्यात आल्या. वैद्यकीय क्षेत्रात विशेषत: हृद्‌रोगशास्त्रातील त्यांची भरीव कामगिरी जगप्रसिद्ध झाली. डॉ. दाते मुंबईतील बॉम्बे रुग्णालयामधील हृद्‌रोग विभागाचे संचालकही झाले होते. तसेच मुंबईतील सेंट जॉर्ज रुग्णालय व के.ई.एम. रुग्णालयामध्ये डॉ. दाते सन्माननीय प्राध्यापक व संचालक होते. त्याचप्रमाणे हरकिसनदास व नानावटी रुग्णालयामध्ये अभ्यागत हृद्‌रोगचिकित्सक म्हणून काम बघायचे. भारतीय सैन्याच्या व मध्य रेल्वेच्या मुंबईतील रुग्णालयाचे ते हृद्‌रोग सल्लागार होते.

डॉ.दातेंनी हृद्‌रोगशास्त्राच्या विविध विभागांत महत्त्वाचे संशोधन केले व अत्याधुनिक पद्धती वापरल्या. त्यांचे विशेष संशोधन म्हणजे शवासनात रक्तदाबावर होणारा परिणाम. त्यामुळे ॲलोपथी व योग जवळ आले. उच्च रक्तदाबाच्या औषधोपचारासाठी के.ई.एम. रुग्णालयात येणाऱ्या ४७ रुग्णांना (३७ पुरुष व १० स्त्रिया) शवासनाचा उपयोग सुचविण्यात आला. त्यांचे सरासरी वय ४६ वर्षे होते (२२ ते ६४). सरासरी रक्तदाब सुरुवातीस १८६/११५ होता. प्रकुंचनी (सिस्टॉलिक) रक्तदाब कमीतकमी १६० मि.मि. व हृदयप्रसारणी (डायास्टोलिक) रक्तदाब ९०/१४५ मि.मि. होता. एक महिना अगोदर रक्तदाबाच्या गोळ्या बंद केल्या गेल्या. नंतर त्यांना शवासन शिकवले गेले व रोज करायला लावले. त्यानंतर त्यांचा रक्तदाब हळूहळू कमी झाला. रक्तदाबाची अपेक्षित स्थिर पातळी गाठल्यावर रक्तदाबाच्या गोळ्या कमी मात्रेत, शवासनाबरोबर चालू केल्या.

डॉ. दाते व हृद्‌रोगशास्त्र यांचे अतूट नाते होते. भारतातील पहिले ‘हृदय पुनर्वसन केंद्र’ के.ई.एम. रुग्णालयामध्ये डॉ. दातेंनीच चालू केले. हृदयविकाराचा झटका आल्यावर रुग्णाला त्या काळी खूप दिवस बिछान्यात विश्रांती घ्यावी लागत असे. अशा रुग्णांच्या प्रकृतीतील गुंतागुंत, विकृतीचे व मृत्यूचे प्रमाण कमी करण्यासाठी लवकर पुनर्वसन करणे किती आवश्यक आहे हे त्यांनी दाखवून दिले. हृदयशुळासाठी वापरण्यात येणाऱ्या औषधांच्या मापनासाठी त्यांनी आदर्श पद्धती आखून दिली. ‘वॉर्नर हार्ट व्याख्याना’साठी (ओरेशन) १९७४ साली त्यांनी हाच विषय घेतला होता.

संशोधन व निदान पद्धतीतील त्यांचे विशेष कर्तृत्व व बुद्धिमत्ता बघून अमेरिकन सरकारच्या आरोग्य, शिक्षण व कल्याण खात्याने त्यांना हृदयरोग्यांच्या पुनर्वसनाच्या नवीन पद्धती व उपचार यांवर संशोधन करायला खास अनुदान दिले. शवासन व रक्तदाबावरील औषधे यांचा योग्य मेळ घालून रक्तदाब नियंत्रित ठेवण्यावर त्यांनी शोधनिबंध लिहिले. औषधे, योग्य आहार, व्यायाम व स्वनियंत्रित जीवनपद्धतीने हृदयशुळाच्या रुग्णांना बायपासची शस्त्रक्रिया टाळता येण्याची शक्यता त्यांनी दाखवली. हृद्‌रोगाचा झटका आल्यावर तत्परतेने तातडीचे उपाय योजणे किती महत्त्वाचे आहे हे दाखवून

भारतातील पहिला ‘अतिदक्षता हृदय विभाग’ त्यांनी के.ई.एम. रुग्णालयामध्ये चालू केला. या उत्कृष्ट कामगिरीबद्दल त्यांना निरनिराळ्या देशातील वैद्यकीय संस्थांकडून ‘फेलोशिप’ मिळाल्या. त्यांतील खास उल्लेखनीय म्हणजे ‘अमेरिकन कॉलेज ऑफ फिजिशियन्स’, ‘ब्रिटिश कार्डियाक सोसायटी’चे मानद सभासदत्व, याशिवाय ‘ऑनररी फेलोशिप ऑफ इंडियन अकॅडमी ऑफ मेडिकल सायन्सेस’, ‘कार्डियोलॉजिकल सोसायटी ऑफ इंडिया’चे अध्यक्षपद, ‘असोसिएशन ऑफ फिजिशियन्स ऑफ इंडिया’चे अध्यक्षपद, ‘इंडियन असोसिएशन ऑफ चेस्ट फिजिशियन्स’चे अध्यक्षपद, ‘ऑल इंडिया हार्ट फाउंडेशन’चे संचालक हे सन्मान त्यांना मिळाले. डॉ. दाते ‘इंटरनॅशनल कॉलेज ऑफ ॲन्जियॉलॉजी’चे उपाध्यक्ष होते.

डॉ.दाते यांनी अगणित उत्तम भाषणे दिली. त्यांतील महत्त्वाची व मानाची समजली जाणारी ‘डॉ.बी.सी. रॉय मेमोरियल ओरेशन’ (१९६६), ‘नेताजी ओरेशन’ (१९७३), ‘एण्डोमेण्ट लेक्चर ए.पी.आय’. बंगलोर (१९७३), ‘वॉर्नर हार्ट ओरेशन’ (१९७४), ‘वर्ल्ड कॉन्फरन्स ऑफ कार्डियॉलॉजी सोव्हेनियर ओरेशन’ (१९७४), ‘साराभाई ओरेशन’ (१९७७) ही व्याख्याने त्यांनी दिली. ‘बी.सी. रॉय नॅशनल अवॉर्ड’ (१९७१ व १९७९ - १९८०) हा बहुमान फक्त त्यांनाच दोनदा मिळाला आहे.

डॉ. दाते यांची शिकवण्याची शैली अप्रतिम होती. त्यामुळे त्यांच्या व्याख्यानाला खूपच विद्यार्थी जमत असत. त्यांच्यातील नेतृत्वगुणामुळे त्यांनी तीन निरनिराळ्या जागतिक संस्थांच्या परिषदेचे अध्यक्षपद भूषविले. (पाचवे वर्ल्ड काँग्रेस ऑफ कार्डियॉलॉजी - १९६६, नववे इंटरनॅशनल काँग्रेस ऑफ इन्टर्नल मेडिसीन - १९७०, साउथ ईस्ट एशिया ॲण्ड पॅसिफिक एशिया काँग्रेस-१९७८, १९६३ सालापासून जागतिक आरोग्य संघटनेच्या हृदयविकाराच्या तज्ज्ञांच्या समितीवर त्यांची नेमणूक झाली होती. ‘ब्रिटिश कार्डिॲक सोसायटी’चे व ‘बेल्जियम कार्डिॲक सोसायटी’चे मानद सदस्यत्व मिळालेले डॉ.दाते हे एकटेच भारतीय आहेत.

वैद्यकीय क्षेत्रातील त्यांच्या असामान्य कामाबद्दल त्यांचा ‘पद्मभूषण’ (१९६९) देऊन गौरव करण्यात आला. भारतीय सैन्याच्या सेवेबद्दल त्यांना १९७५ साली मानद ‘ब्रिगेडियर’ केले गेले. मानाचे ‘धन्वंतरी पारितोषिक’ही त्यांना १९७७ साली मिळाले होते.

त्यांचे २८०पेक्षा जास्त शास्त्रीय लेख जगातील निरनिराळ्या मान्यवर मासिकांतून छापून आले. त्यांनी सामान्य माणसांसाठी सोप्या भाषेतून अगणित लेख लिहिले. ‘टेक्स्ट बुक ऑफ मेडिसीन’चे डॉ. दाते मुख्य संपादक होते.

एक ‘असामान्य वैद्यकशास्त्रज्ञ’ म्हणून त्यांची जगभर ख्याती होती व त्यांनी वैद्यकीय क्षेत्रात भारताचा झेंडा मानाने फडकावला. मे १९८३ साली ‘लिम्फोमा’ या कर्करोगाच्या एका प्रकारच्या विकारामुळे त्यांची जीवनज्योत मालवली. डॉ. दाते उत्तम टेनिसपटू होते व महाविद्यालयाच्या चमूचे कर्णधार होते.

– डॉ. शशिकांत प्रधान

**संदर्भ :**

१. *बायोग्राफिकल मेमॉयर्स ऑफ फेलोज ऑफ इन्सा; १९८५*

## दाते, शंकर रामचंद्र

***मामाराव दाते***

**मुद्रणतज्ज्ञ**

**२८ सप्टेंबर १८९८ - १८ जानेवारी १९९२**

मराठी भाषेतील मजकुराचे आधुनिक पद्धतीने मुद्रण करण्यासाठी यांत्रिक प्रणाली विकसित करणारे मुद्रणतज्ज्ञ. शंकर रामचंद्र दाते यांचे बालपण व प्राथमिक शिक्षण संगमनेर तालुक्यातील अश्वी या गावी झाले. त्यानंतरचे शिक्षण पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूल आणि स.प. महाविद्यालयात झाले. लोकसंग्रह दैनिकात संपादकीय आणि व्यवस्थापकीय अनुभव घेतल्यावर १९२९ सालापर्यंत त्यांनी स्वत:च्या मालकीचा, लोकसंग्रह छापखाना चालविला व पुढे तो पुण्याच्या अनाथ विद्यार्थी गृहाला (पुणे विद्यार्थी गृह) विकला.



देवनागरी लिपी यांत्रिक पद्धतीने जुळविण्याच्या दृष्टीने महाराष्ट्रात अनेकांनी प्रयत्न केले होते. देवनागरी लिपीतील मुळाक्षरांना त्यांच्या डोक्यावर मात्रा किंवा वेलांटी, तसेच अक्षराच्याखाली उकार किंवा ऋकार असे प्रत्यय लावले जातात. मुद्रणाच्या दृष्टिकोनातून ही जुळणी तीन मजली ठरते. रोमन लिपीतली जुळणी ही केवळ एकाच मजल्याची असते. त्यामुळे त्या लिपीसाठी तयार केलेल्या यांत्रिक प्रणालीमध्ये देवनागरी जुळणी होण्यात ही तीन मजली रचनाबंधाची मुख्य अडचण होती. शिवाय, रोमन अक्षरांची संख्या २६. त्यांची जुळणी एकापुढे एक अक्षर टाकून करता येते.

द

मराठीत स्वर १२ व व्यंजने ३६. त्याव्यतिरिक्त, डोक्यावरच्या वेलांटीमध्ये किंवा पायाकडच्या उकारातही ऱ्हस्व, दीर्घ असे पर्यायही आहेतच. दाते यांनी या अडचणी ध्यानात घेऊन आपली प्रणाली विकसित करण्याचे ठरवले.

परदेशात तयार झालेल्या यंत्रावरच आपली लिपी कशी बसवता येईल. याचाच विचार तोवर प्रामुख्याने केला जात असे. लायनो यंत्रावर देवनागरी लिपी बसवण्यासाठी लो.टिळकांचे १९०४ सालापासूनच प्रयत्न चालू होते. लायनो यंत्रावर ९० प्रकारच्या मातृका बसविल्या होत्या. पण देवनागरी लिपीतील अक्षरांची संख्या पुष्कळ होती. टिळकांच्या योजनेत ११३ म्हणजे २३ जास्तच होत्या. त्यानंतर मोनोटाइप यंत्रे सुरू झाली. या यंत्रावर २२५ अक्षरे बसू शकत होती.

दात्यांनी टिळकांची योजना अभ्यासली. जर्मनीत टायपोग्राफ यंत्रावर एका मातृकेवर दोन-दोन अक्षरे बसविण्यात आली होती, असे त्यांना समजले. त्यामुळे १८० अक्षरांत देवनागरी लिपीची जुळणी चांगल्या रीतीने करणे शक्य आहे, असे दात्यांना वाटले. पण त्या कंपनीने त्यांच्याशी सहकार्य केले नाही. त्यामुळे इचलकरंजीकरांच्या शिष्यवृत्तीच्या साहाय्याने ते इंग्लंडला मोनोटाइप यंत्रे करणाऱ्या कंपनीस आपली योजना समजावून सांगण्यास गेले. त्या कंपनीने आधी त्यांनी केलेल्या अयशस्वी प्रयोगांची माहिती दिली व यापेक्षा काही निराळी योजना असली, तरच सहकार्याचे आश्वासन दिले. दात्यांनी रेडहिल या गावातील त्यांच्या प्रयोगशाळेत काही प्रयोग स्वत: करून ‘कर्ण’ (कर्निंग) पद्धत सुचविली. त्यांनी ज्या सुविधा रोमन लिपीच्या बाबतीत रूढ आहेत, त्यांचाच देवनागरीसाठी मोठ्या प्रमाणावर वापर केला तर देवनागरी लिपी मोनोटाइप यंत्रावर बसू शकेल, हे निरनिराळ्या चित्रांच्या साहाय्याने प्रतिपादित केले. ते तज्ज्ञांना तांत्रिकरीत्या पटले. म्हणून प्रथम दहा अक्षरे व स्वरचिन्हे यांच्या रेखाकृती, पंच तयार केले, नंतर त्यांच्या ओळीच्या मातृका तयार केल्या. मजकूर व्यवस्थित छापला गेला. प्रयोग यशस्वी झाला.

प्रश्न होता या मातृका कशा बसवावयाच्या हा. त्यांनी वारंवार येणाऱ्या अक्षरांची संख्या किती, स्वरचिन्हांची संख्या किती, याचा तौलनिक अभ्यास केला व २२ मातृका तयार करवून त्या कळफलकावर कुठे व कशा बसवावयाच्या, याची योजना आखून कळफलक तयार केला.

याच तंत्रज्ञानाचा वापर त्यांनी स्वतःच्या ‘काळ’ या दैनिकाच्या छपाईसाठी मजकुराची जुळणी करण्यासाठी सुरू केला. ‘काळ’चे संपादनही तेच करीत. त्यांच्या या उपक्रमामुळे मराठी भाषेच्या मुद्रणव्यवस्थेत क्रांतीच झाली. मुद्रण शिक्षण विद्यालय, पुणे मुद्रक संघ व महाराष्ट्र मुद्रण परिषद या संस्थांचेही ते खंदे कार्यकर्ते होते. सतत नवनवीन प्रणाली विकसनाचेच कार्य त्यांनी शेवटपर्यंत केले. दात्यांच्या आयुष्याला चौऱ्याण्णवाव्या वर्षी पूर्णविराम चिन्ह दिले गेले.

– का. अ. खासगीवाले

**संदर्भ :**

*१. दुसरे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, पुणे–१९६७.*

## दाभोळकर, दत्तप्रसाद अच्युत
**रसायनशास्त्रज्ञ**
**१५ मे १९३८**



दत्तप्रसाद अच्युत दाभोळकर यांचा जन्म सातारा येथे झाला. त्यांचे सर्व शालेय शिक्षण तेथील न्यू इंग्लिश स्कूलमध्ये झाले. त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण मुंबईत कीर्ती महाविद्यालय आणि रुपारेल महाविद्यालय येथे पार पडले. १९६२ साली सेंद्रिय रसायन (ऑरगॅनिक केमिस्ट्री) या विषयात त्यांनी एम.एस्सी. पदवी मिळवली. या विषयात ते मुंबई विद्यापीठात प्रथम वर्गात पहिले आले. एम.एस्सी. झाल्याबरोबर ताबडतोब ते 'सीबा रिसर्च सेंटर' येथे 'साहाय्यक संशोधक' म्हणून काम करू लागले. १९७० सालापर्यंत ते तेथे कार्यरत होते. त्याच दरम्यान त्यांनी डॉ. नरगुंद यांच्या मार्गदर्शनाखाली मुंबई विद्यापीठाची पीएच.डी. १९६७ साली मिळवली. पीएच.डी.साठी त्यांनी 'सिंथेसिस ऑफ न्यू पोटेन्शियली ॲक्टिव्ह ॲन्टी हिस्टेमिनिक कम्पाउण्ड्स' या विषयावर संशोधन प्रबंध सादर केला.

१९७० साली त्यांनी मुंबई सोडली आणि ते जे.के. सिंथेटिक्स, कोटा (राजस्थान) संचालित 'सर पदमपत रिसर्च सेंटर' येथे 'पॉलिमर केमिस्ट्री ॲण्ड मटेरियल सायन्सेस' या विभागाचे प्रमुख म्हणून रुजू झाले. १९७९ सालापर्यंत ते या केंद्रात कार्यरत होते. दाभोळकरांच्या संशोधन कारकिर्दीतला तो पहिला टप्पा आहे. या कंपनीतर्फे पालिएस्टर, नायलॉन, नायलॉन टायर कॉर्ड, ॲक्रिलिक या सर्व मानवनिर्मित (कृत्रिम) धाग्यांचे उत्पादन केले जायचे. या उत्पादन प्रक्रियेत वापरले जाणारे अनेक साहाय्यक पदार्थ आयात केलेले असत. ज्या पदार्थाची जागतिक एकस्वाची मुदत संपली असेल त्याचे पृथक्करण करून आणि त्याचा सखोल अभ्यास करून, त्या पदार्थांची रासायनिक रचना समजून घेवून त्या पदार्थांचे भारतात उत्पादन करण्यास सुरुवात या कंपनीमध्ये करण्यात आली. अशांपैकी महत्त्वाचा पदार्थ म्हणजे 'ॲनॉक्स गॅमा.'

डॉ. दाभोळकर कोटा येथे कार्यरत असताना, त्यांनी केलेले महत्त्वाचे संशोधन म्हणजे पॉलिएस्टर आणि नायलॉन यांच्या वाया जाणाऱ्या भागातून ते पदार्थ ज्यांच्यापासून तयार केले ते पदार्थ म्हणजे 'मोनामर' किंवा त्याचे मूळ घटक पदार्थ, पुन्हा शुद्ध स्वरूपात मिळवणे. त्याचा उपयोग पुन्हा पॉलिएस्टर, नायलॉन यांचे पुन्हा उत्पादन करण्यासाठी होऊ शकतो. अशा पद्धतीची दर दिवशी प्रत्येकी तीन टन पॉलिएस्टर आणि नायलॉन फुकट जाणाऱ्या पदार्थापासून मिळणारे प्लांट्स भारतात प्रथमच कोटा येथे जे.के. सिंथेटिक्स या कंपनीत कार्यरत झाले. पॉलिएस्टर आणि नायलॉन उत्पादन करणाऱ्या अनेक कंपन्यांनी नंतर त्यांचे अनुकरण केले. हे सर्व संशोधन राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय एकस्वे घेऊन सुरक्षित करण्यात आले. 'पॉलिएस्टर वेस्ट रिकव्हरी' याविषयी जगभरात अनेकांनी एकस्वे घेतली; पण त्यांचे उत्पादन सत्तर टक्के ते नव्वद टक्क्यांपर्यंत होते. दाभोळकरांनी मिळवलेल्या एकस्वाच्या पद्धतीनुसार हे उत्पादन नव्याण्णव टक्के मिळत होते. ही कामगिरी अजोड अशीच आहे. पॉलिइथिलिन टेरेपॅथलेट वेस्टपासून सुधारित पद्धतीने डायमिथाइल टेरेपॅथलेट मिळवण्याची पद्धत, सिंथेटिक फिल्मच्या टाकाऊ भागाचे उपयुक्त पदार्थात रूपांतर करण्याची पद्धत आणि पॉलिइथिलिन टेरेपॅथलेटच्या टाकाऊ पदार्थाचे उपयुक्त अशा मिथाइल हायड्रॉक्सी इथाइल टेटेपॅथलेटमध्ये रूपांतर करण्याची पद्धत, अशी तीन महत्त्वपूर्ण एकस्वे दाभोळकरांच्या नावावर आहेत.

१९७९ साली दाभोळकरांनी कोटा येथील नोकरी सोडली आणि दिल्ली येथील 'श्रीराम इन्स्टिट्यूट फॉर इंडस्ट्रियल रिसर्च' येथे रुजू झाले. या संशोधन संस्थेत मे १९७९ ते मार्च १९९० सालापर्यंत संयुक्त संचालक होते. ते एप्रिल १९९० ते मे २००२ सालापर्यंत संचालक म्हणून कार्यरत होते. श्रीराम इन्स्टिट्यूट ही एक वेगळी

द




संशोधन संस्था आहे, येथे कोणाही व्यक्ती किंवा संस्थेकडून अनुदान वा मदत घेता येत नाही. नव्या पदार्थांच्या निर्मितीसाठी तंत्रज्ञान विकसित करणे, जुन्या पदार्थांच्या निर्मितीसाठी सोपी व नवी पद्धत शोधणे, आयात पदार्थांना पर्याय शोधणे (एकस्वाचे उल्लंघन न करता), जनसामान्यांना उपयोगी पडणारे वेगळे पदार्थ बनवण्याचे तंत्रज्ञान विकसित करणे अशी कामे करून व ते तंत्रज्ञान विकून त्यांतून संस्थेचा सर्व खर्च भागवणे, असे कार्य करू शकणारे वैज्ञानिक तयार करणे आणि त्यांचे वेगवेगळे गट करून त्यांच्या माध्यमातून ही संस्था संपूर्णपणे स्वयंपूर्ण बनवणे. या संकल्पनेप्रमाणे येथे कार्य चालते. येथील संचालकाचे हे मुख्य कार्य होते आणि आहे. ते कार्य डॉ. दाभोळकरांनी यशस्विरीत्या पार पाडले आहे. एवढेच नव्हे, तर संस्थेची एक शाखा बंगळुरू येथे उभी करून तीसुद्धा स्वयंपूर्ण करण्यात दाभोळकरांचा महत्त्वाचा वाटा आहे.

द

भारतात ए.बी.एस. प्लॅस्टिक कोणीही बनवले तरी ते श्रीराम इन्स्टिट्यूटने विकसित केलेल्या आणि नॅशनल रिसर्च अ‍ॅण्ड डेव्हलपमेंट कॉर्पोरेशनच्या (एन.आर.डी.सी.) माध्यमातून विकसित केलेल्या तंत्रज्ञानावर आधारितच असे. त्याचे स्वामित्वधन (रॉयल्टी) संस्थेला मिळत असे. याविषयी सर्व एकस्वे श्रीराम इन्स्टिट्यूटच्या नावे आहेत. श्रीराम इन्स्टिट्यूटने एन.आर.डी.सी. आणि न्यूकेम प्लॅस्टिक (गुरगाव) यांच्याबरोबर संयुक्तपणे काम करून पॉलिकार्बोनेट तयार करण्याची नवीन पद्धत विकसित केली. त्याचप्रमाणे हाय इम्पॅक्ट पॉलिस्टायरीन तयार करण्यासाठी नवीन प्रक्रिया संयुक्तपणे विकसित केली आणि त्याची तीस एकस्वे घेतली. याखेरीज, तांदळाच्या टरफलापासून सिलिका बनवणे, निवडुंगाच्या चिकापासून खास प्रकारचे रंग बनवणे इत्यादी आणखी अनेक विषयांवर त्यांनी संशोधन केलेले आहे.

अंटार्क्टिकावरील कायम निवासस्थान लाकडाचे बनलेले होते. एवढ्या उंचीच्या जागी नेहमीचे रंग वापरता येत नव्हते. तेव्हा दाभोळकरांनी स्वत: तिथे चार महिने राहून, तेथील वातावरणात काम करील असा रंग बनवला आणि त्याचा उपयोग केला गेला. त्यांनी अनेक उद्योजकांनाही वेगवेगळी उत्पादने यशस्वीपणे विकसित करून दिली. त्यांनी अनेक पुस्तके लिहिली आहेत. त्यांच्या ‘विज्ञानेश्वरी’ या पुस्तकाचे हिंदी रूपांतर झालेले आहे, तर ‘माते नर्मदे’ या पुस्तकाच्या हिंदी, गुजराती आणि इंग्रजी भाषेतील आवृत्त्या प्रकाशित झालेल्या आहेत.



**श्रीराम औद्योगिक अनुसंधान संस्था, नवी दिल्ली**

दाभोळकरांच्या नावावर शंभराहून अधिक एकस्वे आहेत, तसेच अनेक संशोधनपर लेख त्यांनी लिहिलेले आहेत. त्यांच्या मार्गदर्शनाखाली तीस विद्यार्थ्यांनी पीएच.डी. संपादन केलेली आहे. दाभोळकरांना ‘रॉयल सोसायटी ऑफ केमिस्टी’, ‘इन्स्टिट्यूट ऑफ प्लॅस्टिक्स अ‍ॅण्ड रबर्स’ आणि ‘इन्स्टिट्यूट ऑफ मटेरियल्स’ या तीन आंतरराष्ट्रीय संस्थांची फेलोशिप मिळाली होती. औद्योगिक संशोधनातील उत्कृष्ट कामगिरीसाठी दाभोळकरांना फाय फाऊंडेशनचा पुरस्कार मिळालेला आहे.

– गार्गी लागू / दिलीप हेर्लेकर

## दाभोळकर, श्रीपाद अच्युत
**गणितज्ञ, कृषिशास्त्रज्ञ, अध्यापक**
**११ ऑगस्ट १९२४ - ३० एप्रिल २००१**



'प्रयोग परिवार'चे जनक तसेच द्राक्ष, ऊस, आंबा इत्यादी अनेक पिकांमध्ये हुकमी व विक्रमी पीक मिळवणाऱ्या असंख्य शेतकऱ्यांचे मार्गदर्शक आणि खरे प्रयोगवीर असलेले दाभोळकर गणित विषयात एम.एस्सी. झाले होते. त्यांनी गणिताचे अध्यापन गारगोटीच्या मौनी विद्यापीठात केले. पण तेथे तंटा उद्‌भवल्यावर कर्मचारीवर्गाच्या बाजूने त्यांनी तीन वर्षे प्रखर लढा दिला. यासाठी त्यांनी असा लढा देण्याच्या महात्मा गांधींच्या कार्यपद्धतीचा विशेष अभ्यास केला. एखाद्या क्षेत्रात काम करायचे म्हणजे वैज्ञानिक पद्धतीने त्याच्या मुळापर्यंत जाऊन खास अभ्यास केला पाहिजे, अशी दाभोळकरांची विचारसरणी होती. बऱ्याच सामाजिक प्रश्नांवर त्यांनी अशाच पद्धतीने अभ्यास केला आणि प्रयोग केले.

हे करत असताना, त्यांच्या घराच्या परसात त्यांचे शेतीवरील प्रयोग सुरू झाले होते. १९७९ साली वयाच्या पंचावन्नाव्या वर्षी त्यांनी शिक्षण क्षेत्रातून स्वेच्छानिवृत्ती घेतली. 'प्रयोग परिवार' ही संकल्पना त्यांच्या डोक्यात होती. गणिताचा वापर करून नाना प्रकारच्या व्यवहाराची प्रारूपे (मॉडेल्स) बनवता येतात. अशी अनेक प्रारूपे प्रा.दाभोळकर बनवत गेले. प्रयोग परिवाराचे हे काम गोफ विणण्यासारखे करायची कल्पना त्यांच्या मनात होती. तासगावच्या एका शेतकऱ्याच्या द्राक्षाच्या शेतावर दाभोळकरांनी प्रयोग करून यश मिळवले. दुसरा शेतकरी आला, तर त्याला त्यांनी तासगावच्या त्या शेतकऱ्याकडे पाठवले. त्याने काय प्रयोग केले ते समजून घे, तसे आपल्या शेतावर कर, अडचण आल्यास तासगावच्या शेतकऱ्याला शेतावर बोलव, त्याचे मार्गदर्शन घे, अशी पद्धत वाढीला लावली. सर्वांनी दाभोळकरांचा सल्ला घ्यायची गरज नाही, असे प्रतिपादन केले. त्यामुळे प्रयोग परिवारात द्राक्षाचा गट, उसाचा गट, आंब्याचा गट असे प्रयोगशील शेतकऱ्यांचे पिकानुरूप गट विकसित होत गेले. विज्ञान याचा अर्थ विशेष ज्ञान. प्रयोग याचा अर्थ पुढे जाण्याची युक्ती, जिज्ञासा हा गुरू, प्रयोग हीच पाठशाळा आणि प्रचिती हीच परीक्षा, ही त्यांच्या विचारांची दिशा होती. आपल्याकडे असणाऱ्या साधनांबद्दल आपण साक्षर असायला हवे, अशी त्यांची धारणा होती. ही साधनसाक्षरता येण्यासाठी निसर्गनियमांची चांगली ओळख असायला हवी, असे अनेक मूलगामी विचार त्यांनी मांडले.

एका चौरस मीटरवर पडणाऱ्या सूर्यप्रकाशापैकी एक ते दीड टक्के सूर्यप्रकाशच आजची वनस्पती उचलू शकते, असे विज्ञानाने दाखवले आहे. तरीही एक दशांश चौरस मीटर जागेत कलिंगडाचा वेल शंभर दिवसांत तीन किलो कलिंगडे देतो. तेवढ्याच काळात द्राक्षाचा वेल ४०० ते ६०० ग्रॅम वजनाचा घड बनवू शकतो. केळी तेवढ्याच जागेत वर्षभरात पाऊण ते एक किलो वजनाची फळे देऊ शकतात, तर उसाचे वर्षभरातील वजन अडीच ते तीन किलो होते. भुईमूग शंभर दिवसांत ६० ग्रॅम, भात किंवा ज्वारी अर्ध्या ते एक चौरस मीटरच्या जागेत १२० दिवसांत एक ते दीड किलो उत्पादन देते, अशी उत्पादनाची ठोस आकडेवारी दाभोळकरांनीच प्रथम मांडली. त्याला त्यांच्या गणिताच्या अभ्यासाची आणि त्यांनी प्रयोगांनी सिद्ध केलेल्या पद्धतीची जोड होती. म्हणून हिरव्या पानांची प्रकाश-संश्लेषण-क्षमता एका टक्क्यापासून विज्ञानाच्या साहाय्याने सहजी ५ ते १० टक्क्यांपर्यंत वाढवू शकतो, अशी उमेद त्यांना होती. एवढेच नव्हे, तर घराच्या परसात त्यांनी सर्व प्रकारचा जैविक कचरा वापरून टोमॅटोच्या एका रोपापासून ६ किलो उत्पादन घेऊन दाखविले. त्याच धर्तीवर आंब्याच्या दर १०० पानांमागे एक फळ मिळालेच पाहिजे, ज्वारीचा अभ्यास करून एका ताटाला १००

द

दाणे, तसेच एका हेक्टरामागे १०० क्विंटल, असे हुकमी पीक येऊ शकते, हे ते अनुभवाने सांगत. अशी उत्पादनक्षमता इस्रायलने विकसित केली आहे, तर आपल्याला का नाही साध्य करता येणार? एका किलोत बरोबर सहा-सहा आंबे मिळवण्याची किमया इस्रायलमध्ये घडली, तो काही चमत्कार नाही; तेच तर विज्ञान आहे, अशी दाभोळकरांची विचारसरणी होती.

एका फांदीला चार-पाच पेरू लागले आणि त्याचा पर्णसंभार लहान असेल, तर लहान असतानाच त्यांतील तीन पेरू खुडून टाका म्हणजे पाच लहान पेरूंऐवजी मोठे दोन पेरू तुम्हांला मिळतील, हे विचारही त्यांनी प्रयोगांती मांडले. कृषिविज्ञानात द्राक्षाचे विज्ञान अधिक क्लिष्ट, गुंतागुंतीचे मानले जायचे, त्यामध्येही दाभोलकरांनी प्रयोग करून चांगली यशस्विता मिळवली. हे प्रयोगाचे निष्कर्ष त्यांनी १९७४ साली मेक्सिकोला आणि १९७८ साली जर्मनीला कासेल विद्यापीठात मांडले. महाराष्ट्राबरोबर भारतभरही त्यांनी मार्गदर्शन केले. दाभोळकरांनी सभागृह भाड्याने घेऊन, सात-सात दिवसांची शिबिरे घेऊन ४०० ते १००० शेतकऱ्यांना मार्गदर्शन केले. त्याला प्रत्येकी एकेक हजार रुपये शुल्क ठेवले. तरी शेतकरी मोठ्या संख्येने उपस्थित असत, हीच त्यांच्या ज्ञानाच्या उपयुक्ततेची पावती होती. त्यांचा दहा गुंठ्याचा प्रयोग खूप गाजला. पाऊस आपल्याला देयक (बिल) पाठवत नाही म्हणून आपण पाण्याचा बेसुमार वापर करतो, पाणी झाडाला घालायचे की बाष्पीभवनाला याचा विचार करा, सूर्यप्रकाश त्याच दिवशी गोळा करायला हवा-म्हणजे झाडापासून अन्न तयार करायला वापरायला हवा, हे त्यांचे मूलभूत विचार लक्षात ठेवण्यासारखे आहेत.

कृषिक्षेत्रातील खर्च कमी करून उत्पादकता वाढवायला दाभोळकरांनी दाखवलेला प्रयोग परिवाराचा मार्ग नक्कीच उपयुक्त आहे. ‘केल्याने होत आहे रे’, ‘विपुलाच सृष्टी’, ‘आपला हात जगन्नाथ’ इत्यादी त्यांच्या पुस्तकांच्या मार्गाने हे ज्ञान आजही उपलब्ध आहे.

त्यांच्या या कामगिरीकरिता मराठी विज्ञान परिषदेने त्यांना दिलेले सन्मानपत्र, परिषदेच्या १९९२ सालच्या संमेलनाचे अध्यक्षपद, १९८८ सालचा वसंतराव नाईक कृषी प्रतिष्ठानचा पुरस्कार आणि ग्रामीण विकासासाठी विज्ञानाचा वापर केल्यामुळे १९९० साली त्यांना मिळालेला जमनालाल बजाज पुरस्कार, हे उल्लेखनीय आहेत.

— दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**

१. *दै. सकाळ;* ७ मे २००१.
२. *दै. लोकसत्ता;* १३ मे २००१.

द

## दीक्षित, भालचंद्र बाबाजी

**वैद्यकतज्ज्ञ**

**७ सप्टेंबर, १९०२**



भालचंद्र बाबाजी दीक्षित यांचा जन्म अमरावती येथे झाला. ते पुढे फिजिओलॉजिस्ट, फार्माकॉलॉजिस्ट, उत्तम शिक्षक आणि शिस्तप्रिय अनुशासक म्हणून नावाजले गेले. घरची वकिली करण्याची परंपरा सोडून वैद्यकीय क्षेत्रात त्यांनी प्रवेश केल्यामुळेच स्वतंत्र भारतात वैद्यकीय शिक्षणाचा मजबूत पाया उभारला गेला. डॉ.दीक्षित यांनी १९२५ साली मुंबईस्थित ग्रँट वैद्यकीय महाविद्यालयामधून एम.बी.बी.एस. पदवी मिळविली. त्यानंतरच्या चाळीस वर्षांत त्यांच्या आयुष्याचे ठळक दोन टप्पे दिसून येतात. पहिली वीस वर्षे एक उत्तम शास्त्रज्ञ, तर नंतरची वीस वर्षे एक उत्तम मानवतावादी, प्रेमळ, विद्यार्थिप्रिय शिक्षक आणि अनुशासक म्हणून ते नावाजले गेले.

डॉ. दीक्षितांच्या संशोधनाची सुरुवात १९२६ साली कोलकाता येथील ‘स्कूल ऑफ ट्रॉपिकल मेडिसीन’ येथे झाली. तेथे त्यांनी प्रा. चोप्रा यांच्याबरोबर संशोधनात भाग घेऊन मलेरियाविरोधी ‘सुडोएफेडिन’ या औषधाचे

हृदय आणि रक्ताभिसरण संस्थेवरील परिणामाचे मूलभूत तत्त्व शोधून काढले. ही औषधी भारतात मिळणाऱ्या एफेडा या वनस्पतीपासून मिळविली होती, हे या संशोधनाचे वैशिष्ट्य होय. तसेच, मॉर्फिनऐवजी नारकोटीन हेही तेवढेच उपयुक्त आणि निर्धोक आहे हे त्यांनी सप्रयोग सिद्ध केले. आपल्या कुशाग्र बुद्धिमत्तेच्या जोरावर वरील सर्व संशोधन त्यांनी अवघ्या तीन वर्षांत पूर्ण तर केलेच, शिवाय १९२७ साली 'डिप्लोमा इन पब्लिक हेल्थ' हा अभ्यासक्रम पूर्ण केला.

१९३० साली त्यांची नेमणूक विशाखापट्टणम येथील वैद्यकीय महाविद्यालयात 'फार्माकॉलॉजी'चे प्राध्यापक म्हणून झाली. तेथे त्यांनी चौलमुग्रा तेलातील कुष्ठरोगविरोधी घटक सर्वांत प्रथम शोधून काढले. तसेच, संशोधन करून 'पर्टेन' नावाचे औषध मज्जारज्जूंमध्ये भूल देण्यासाठी निर्धोक व परिणामकारक आहे हे सप्रयोग दाखवून दिले. परंतु १९३१ साली चेन्नई विभागाचे मूळ रहिवासी नसल्याच्या क्षुल्लक कारणामुळे त्यांना नोकरीस मुकावे लागले. १९३१ साली 'रॉयल कॉलेज ऑफ सर्जन्स' या संस्थेचे सभासदत्व मिळवण्यासाठी ते एडिंबरोला गेले. तेथे ते प्रा. क्लार्क यांच्याकडे फार्माकॉलॉजी विभागात रुजू झाले. बुद्धिमत्ता आणि कर्तृत्व यांच्या बळावर त्यांची नेमणूक शरीरविज्ञानशास्त्र विभागात सहाय्यक पदावर झाली. सततच्या अभ्यासू वृत्तीमुळे डॉ. दीक्षितांनी १९३३ साली 'एम.आर.सी.पी.' व नंतर 'पीएच.डी.' संपादन केली.

एडिंबरोला डॉ.दीक्षितांनी 'असेटायिल कोलीन' या मज्जातंतूवरील संदेशवाहकावर जे संशोधन केले, त्याचे महत्त्व आजतागायत अबाधित आहे. त्यामुळे ते एक 'अभिजात संशोधन' गणले जाते. आपले संशोधन सतत चालू ठेवून त्यांनी हृदयाची अनियमितता व हायपोथॅलॅमस ग्रंथीचा परस्पर संबंध अभ्यासला. कॅफीनचे आणि बारबिटोनचे हृदयाच्या अनियमिततेवरील परिणाम सिद्ध केले.

डॉ. दीक्षित १९३४ साली भारतात परतले. येथे आल्यावर त्यांची नेमणूक मुंबई येथील 'हाफकिन इन्स्टिट्यूट'मध्ये झाली. तेथे त्यांनी आपले ॲसेटायिल कोलीनवरचे संशोधन चालू ठेवले, तसेच मलेरिया व प्लेग या रोगांवरील औषधांचे संशोधन केले. हाफकिन इन्स्टिट्यूटमध्ये त्यांनी सर्पविषाचा अभ्यास करण्यासाठी एका सर्पालयाची स्थापना केली.




१९४६ साली तरुणवयात त्यांची नेमणूक पुण्यातील बी.जे. वैद्यकीय महाविद्यालयाचे अधिष्ठाता आणि शरीररसायनशास्त्राच्या प्राध्यापकपदी झाली. तेथे त्यांच्यापुढे वैद्यकीय पदवीसाठी अभ्यासक्रम, आराखडा तयार करण्याचे आव्हान होते. १९५१ साली त्यांच्यावर राज्यातील वैद्यकीय शिक्षण व आरोग्यसेवेची जबाबदारी टाकण्यात आली. त्यांची मुंबई राज्याचे 'सर्जन जनरल' म्हणून नेमणूक झाली.

१९५६ साली भारत सरकारने अत्युत्तम वैद्यकीय सेवा, उत्तम वैद्यकीय शिक्षक आणि संशोधक देशात निर्माण करण्यासाठी दिल्ली येथे एक संस्था स्थापन करण्याचे ठरविले. त्या संस्थेच्या पहिल्याच संचालकपदासाठी डॉ. दीक्षितांना आमंत्रित करण्यात आले, ती संस्था म्हणजे 'ऑल इंडिया इन्स्टिटयूट ऑफ मेडिकल सायन्सेस' (ए.आय.आय.एम.एस.) होय.

डॉ. दीक्षितांपुढे देशाची गरज ओळखून अत्याधुनिक वैद्यकीय शिक्षण व सेवा देण्याचे उद्दिष्ट होते. त्यासाठी त्यांना पूर्ण स्वातंत्र्य देण्यात आले. त्याचा डॉ. दीक्षितांनी योग्य उपयोग करून 'ए.आय.आय.एम.एस.'ला अत्युच्च दर्जा प्राप्त करून दिला. डॉ. दीक्षितांच्या अथक प्रयत्नांनी आणि यशस्वी पुढाकारामुळे जगाच्या विविध भागांत कार्यरत असणारे वैद्यकीय संशोधक या नावीन्यपूर्ण संस्थेसाठी एकत्र आले आणि ए.आय.आय.एम.एस. (एम्स) ही संस्था अत्युत्तम बनविण्याच्या कामी रुजू झाले.

द

डॉ. दीक्षितांनी प्रशासक म्हणून एक उत्तम व स्वच्छ प्रतिमा निर्माण केली. त्यांनी कोणत्याही अतिरिक्त बेकायदेशीर व्यवहाराला मज्जाव केला. कोणत्याही समस्येच्या मुळाशी जाऊन योग्य आणि समाधानकारक मार्ग काढताना ते कोणाचाही मुलाहिजा बाळगत नसत. त्यांचे वैशिष्ट्य म्हणजे आपल्या कार्यपद्धतीत ते अत्यंत परखडपणे आणि थोडक्यात शेरे अथवा सूचना फाइलीवर देत असत. ते एखाद्या केसच्या, घटनेच्या संदर्भात जे काय सत्य असेल, ते त्याच्या तोंडावर सांगत आणि तोच शेरा फाईलवर लिहीत. एखाद्याने चूक केल्यास ते रागावून ओरडत; पण क्षणार्धात त्यांचा राग निवळत असे. प्रत्येक घटना, प्रत्येक फाईल ते स्वत:च्या पद्धतीने नव्याने, निरपेक्षपणे बघत. त्यावर मागील घटनांचा परिणाम होऊ देत नसत. त्यामुळे ते न्यायी प्रशासक म्हणून गणले जात. त्यांचे निर्णय व्यक्तिनिष्ठ नसून तत्त्वनिष्ठ असत; त्याचमुळे एखाद्याचे मागणे त्यांनी अमान्य केले, तरी त्याच्या मताचा आदर आणि मान ते ठेवत असत.

द

विषयाचे सखोल ज्ञान, प्रायोगिक कौशल्य, शिकवण्याची असामान्य हातोटी, खेळाविषयी आत्यंतिक प्रेम त्यामुळे ते युवाविद्यार्थ्यांसह सर्वत्र लोकप्रिय होते. ते विद्यापीठीय स्तरावरचे हॉकी, टेनिस आणि बॅडमिंटन खेळाडू होते. त्यांना परदेशातून निरनिराळी आमंत्रणे येऊनही ती नाकारून, ते आपल्या देशाला कार्यभूमी मानून, शेवटपर्यंत देशसेवा करत राहिले.

– मृणालिनी साठे

**संदर्भ :**

१. *http://www.aiims.edu*

## दीक्षित, शंकर बाळकृष्ण
**खगोलशास्त्रज्ञ**

**२० जुलै १८५३ - २७ एप्रिल १८९८**

शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचा जन्म मुरुड येथे झाला. मुरूड येथील प्राथमिक शाळेतच ते त्यांच्या हुशारीमुळे



प्रसिद्धीस पावले. संस्कृतमध्ये ते विशेष प्रवीण होते. प्राथमिक शिक्षण झाल्यावर त्यांनी दापोली न्यायालयात अर्ज लिहून देणे वगैरे कामे केली. तिथेच ते इंग्रजी शिकले. १८७० साली त्यांनी पुण्यास प्रशिक्षण महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. तिथे तीन वर्षे शिक्षण घेतले आणि त्याच काळात त्यांनी मॅट्रिक्युलेशनचा अभ्यास केला. १८७४ साली ते प्रथम श्रेणीत मॅट्रिक झाले. मग ते शिक्षणखात्यात भरती झाले. रेवदंडा, ठाणे, बार्शी येथे शाळेत हेडमास्तर म्हणून काम केल्यावर धुळे येथील ‘प्रशिक्षण विद्यालया’मध्ये दीक्षित मास्तर म्हणून रुजू झाले. १८९४ साली त्यांची पुणे प्रशिक्षण विद्यालयामध्ये नेमणूक झाली. तिथेच ते अखेरपर्यंत कार्यरत होते. या नोकरीत फुरसतीच्या काळात त्यांनी भारतीय ज्योतिषशास्त्राचा कसून अभ्यास केला. आज ज्याला ‘खगोलविज्ञान’ या नावाने ओळखले जाते, त्यालाच त्या काळात ‘ज्योतिषशास्त्र’ असे म्हणत असत.

विविध ठिकाणी नोकरीनिमित्त हिंडत असताना, त्यांनी त्यांचा खगोलशास्त्राचा छंद जोपासला. संस्कृतवरील प्रभुत्व आणि गणितातील गती यांमुळे त्यांनी या विषयात लक्ष घातले. वृत्तपत्रामध्ये ‘स्फुटवक्ता अभियोगी’ या नावाने ग्वाल्हेरचे विसाजीपंत लेले सायनवादावर पत्र लिहीत. ती वाचून दीक्षितांचे या विषयाकडे लक्ष गेले. त्या वेळी ते रेवदंड्यास होते. ठाण्याला आल्यावर त्यांनी ज्योतिषाच्या अभ्यासात लक्ष घातले.

मराठीतील आद्य विज्ञानप्रसारक जनार्दन बाळाजी मोडक हे त्या वेळी ठाण्यास होते. त्यांचा आणि दीक्षितांचा या अभ्यासानिमित्ताने स्नेह जडला. या दोघांचा आणि लेले यांचा सुरुवातीस तात्त्विक वाद झाला. पुढे या तिघांनी मिळून सायन मानाचे पंचांग सुरू केले. दीक्षितांनी पदराला खार लावून अखेरपर्यंत ते




चालविले. यातून त्यांचा लोकमान्य टिळकांशी परिचय झाला. टिळकांनी त्यांच्या 'ओरायन आणि आर्क्टिक होम इन वेदाज' या ग्रंथलेखनाचे वेळी अनेक वेळा शं.बा. दीक्षितांशी सल्लामसलत केली. दीक्षितांनी अनेक शालोपयोगी आणि शिक्षकांना मार्गदर्शनपर पुस्तके लिहिली. पण त्यांचे 'ज्योतिर्विलास' अथवा 'रात्रीची दोन घटका मौज' हे मराठीतील आकाशनिरीक्षणाचे स्वतंत्र पुस्तक, हे अशा प्रकारचे पहिले मराठी पुस्तक असावे.

दीक्षितांचे 'धर्ममीमांसा' हे पुस्तक वेगवेगळ्या धार्मिक समजुती कशा निर्माण झाल्या असाव्यात, याची तर्कसंगत म्हणजेच वैज्ञानिक दृष्टिकोनातून चर्चा करणारे आहे. दीक्षितांचे सर्वात महत्त्वाचे पुस्तक म्हणजे 'भारतीय ज्योति:शास्त्र' अथवा 'भारतीय ज्योतिषाचा प्राचीन आणि अर्वाचीन इतिहास'. हा १८९१ साली प्रसिद्ध झालेला त्यांचा ग्रंथ खूपच गाजला. मराठीतील अशा स्वरूपाचा हा एकमेव ग्रंथ आहे. त्यात प्राचीन काळापासून भारतात होऊन गेलेल्या ज्योतिषाचार्यापासून आधुनिक काळातील (म्हणजे एकोणिसाव्या शतकापर्यंतच्या) ज्योतिषाचार्यांची आणि गणितींची माहिती आहे. यात वेगवेगळ्या पंचांगांमधील फरक दिग्दर्शित केलेले असून पंचांग तयार करण्याच्या पद्धतीही येथे नमूद केलेल्या आढळतात. तोपर्यंत भारतात होऊन गेलेल्या ज्योतिषशास्त्रविषयक ग्रंथांचीही माहिती या ग्रंथात वाचायला मिळते.

'भारतवर्षीय भूवर्णन' हा शं.बा. दीक्षित यांचा असाच एक महत्त्वाचा ग्रंथ. या अभ्यासपूर्ण ग्रंथात भारतवर्षाच्या ऐतिहासिक भूगोलाची जशी माहिती मिळते, तशी माहिती देणारा दुसरा ग्रंथ मराठीत खरे तर आजही नाही. ऐतिहासिक काळातील नगरे, राज्ये आणि नद्या आज कुठे आहेत, आणि त्यांची वर्तमानकालीन नावे कोणती, हे या ग्रंथात दीक्षित यांनी नोंदविले आहे. त्यांचे इतर ग्रंथ हे बरेच शिक्षकांसाठी होते. दीक्षितांचा मृत्यू विषमज्वराने झाला.

— निरंजन घाटे

## देव, माधव गजानन

**वैद्यकतज्ज्ञ कर्करोगतज्ज्ञ**

**६ एप्रिल १९३२**



डॉ. माधव गजानन देव हे भारतातील वैद्यकीय क्षेत्रातील एक अग्रगण्य संशोधक आहेत. सामाजिक बांधीलकीने प्रेरित होऊन समाजाचे स्वास्थ्य टिकविण्याबरोबरच वैद्यकीय क्षेत्रात शिक्षण व संशोधनविषयक सुधारणा घडवून आणण्यात डॉ. देव यांनी मोलाचे कार्य केले आहे.

मध्यप्रदेशातील ग्वाल्हेर येथे त्यांचा जन्म व शालेय शिक्षण झाले. तेथीलच गाजरा राजा वैद्यकीय महाविद्यालयामधून १९५५ साली त्यांनी वैद्यकीय पदवी प्राप्त केली. पुढे दिल्लीतील ऑल इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ मेडिकल सायन्सेस या संस्थेतून डॉ. रामलिंगस्वामी यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी विकृतिशास्त्र (पॅथॉलॉजी) या शाखेतील एम.डी., तसेच पीएच.डी. या पदव्या प्राप्त केल्या.

त्याच संस्थेच्या विकृतिशास्त्र विभागात १९७४ ते ७८ सालांदरम्यान प्राध्यापक म्हणून कार्यरत असताना, त्यांनी डॉ. रामलिंगस्वामी यांच्यासह भारतीय उपखंडात आढळून येणाऱ्या अनेक विकारांवर मूलभूत संशोधनासह प्रथिनऊर्जा कुपोषणविषयक विकारांवरही विशेष संशोधन केले. हे संशोधन गॉयटरसारख्या रोगावर नियंत्रण मिळविण्यासाठी अन्नपदार्थात वापरल्या जाणाऱ्या मिठातील आयोडीनची मात्रा निश्चित

द

करण्यासाठी राष्ट्रीय स्तरावर मानदंड मानले जाते. पेशी विभाजन तसेच रासायनिक कर्कजन्य पदार्थांवरही त्यांनी संशोधन केले.

भारतीय आयुर्विज्ञान संस्थेतील डॉ. देव यांच्या मौलिक संशोधनास राष्ट्रीय स्तरावरील 'यंग सायंटिस्ट', तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावरील अनेक पुरस्कारांनी गौरविण्यात आले. भारतातील विज्ञान, तसेच वैद्यकीय क्षेत्रातील सर्व प्रतिष्ठित संस्थांनी त्यांना मानद फेलोशिप प्रदान करून डॉ. देव यांचा गौरव केला आहे. भारतातील इंडियन सायन्स अकॅडमीचे १९७८ साली सर्वात तरुण मानद सचिव होण्याचा विरळा बहुमानही डॉ. देव यांच्या नावावर आहे. आंतरराष्ट्रीय स्तरावर रॉकफेलर फाउंडेशन फेलो, अमेरिकेतील बेथेस्डा येथील 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ हेल्थ' द्वारे १९९७ साली फॉगॅर्टी स्कॉलर यांसारख्या प्रतिष्ठित बहुमानासह १९९० साली पॅरिस विद्यापीठात मानद प्राध्यापक, असे सन्मान डॉ. देव यांना प्राप्त झाले आहेत.

द

१९७८ साली ते मुंबईतील कर्करोग संशोधन केंद्राचे संचालक झाले. तेथे त्यांनी तंबाखूजन्य मुखाच्या कर्करोगग्रस्त पेशींची वाढ होण्यास आवश्यक असणारा एक नवीन पॉलिपेप्टाइड घटक शोधून काढला. पारजनुक प्राण्यांची, विशेषत: कर्करोग संशोधनासाठी उपयुक्त असणाऱ्या पारजनुक उंदरांची, निर्मिती करण्यासाठी या नव्या घटकाचा उपयोग होतो. कर्करोगावरील या बहुमोल संशोधनाच्या सन्मानार्थ १९९९ साली 'अमेरिकन सोसायटी ऑफ कॅन्सर रिसर्च' या प्रतिष्ठित संस्थेच्या संशोधन जर्नलवर त्यांचे छायाचित्र छापून त्यांना गौरविण्यात आले.

ऐंशीच्या दशकात त्यांनी भारतात सर्वप्रथम संपूर्णपणे देशी तंत्रज्ञानाचा वापर करून कुष्ठरोगावरील प्रभावी लस विकसित केली. कुष्ठरोग हा मानवजातीसाठी एक महाभयंकर शाप आहे. जगातील एकूण लोकसंख्येपैकी सुमारे पाच ते दहा टक्के लोकांत कुष्ठरोग होण्याची शक्यता असते. कुष्ठरोगाच्या महाभयंकर व्याधीने ग्रस्त असणाऱ्या जगातील बारा दशलक्ष पीडितांपैकी सुमारे एक तृतीयांश रुग्ण भारतात आढळून येत असत.




या रोगास कारणीभूत असणाऱ्या मायक्रोबॅक्टेरियम लेपरी या जीवाणूचा शोध जरी १०० वर्षांपूर्वी लागला असला, तरी त्याची प्रयोगशाळेत वाढ करणे अशक्यप्राय आहे. पण पन्नासच्या दशकात डॉ.व.रा. खानोलकर यांनी आपल्या सहकाऱ्यांसमवेत कुष्ठरोगग्रस्त रुग्णाच्या शरीरातून प्रयोगशाळेत संवर्धन करता येणारा एक सूक्ष्मजीव शोधून काढला होता. त्याला 'आय.सी.आर.सी. बॅसिलस' असे नाव दिले गेले होते. या जीवाणूवर आधारित लस निर्माण करण्याच्या संशोधनास देव यांनी सुरुवात केली. या लसीद्वारे सुदृढ निरोगी व्यक्तीत कुष्ठरोगाची लागण रोखली जात असल्याचा, तसेच कुष्ठरोगपीडित रोग्यात रोगाची तीव्रता कमी करण्यात मदत करीत असल्याचा दावा करण्यात आला आहे.

कुष्ठरोगावरील या लसीच्या चाचणीद्वारे कुष्ठरोगाने पीडित रोग्यांत प्रतिकारशक्ती निर्माण होऊन निरोगी व्यक्तींत कुष्ठरोगाविषयी प्रतिकारशक्ती विकसित झाल्याचे सिद्ध करण्यात आले. कुष्ठरोगाची लागण झाल्यापासून त्याची लक्षणे दिसू लागण्यात काही व्यक्तींत दशकाहून अधिक काळ लागू शकतो. कुष्ठरोगाचे जंतू रोग्याच्या शरीरात दहा वर्षांपेक्षा अधिक काळ वास्तव्य करून राहू शकत असल्यामुळे देव यांनी कुष्ठरोगावरील लसीच्या चाचणीनंतर लसीकरण झालेल्या रुग्णांची, तसेच निरोगी व्यक्तींची एक दशकाहून अधिक काळ तपासणी करून ही लस अत्यंत प्रभावी व सुरक्षित असल्याचे दाखवून दिले.

डॉ. देव यांच्या कुष्ठरोग, कर्करोग, तसेच गॉयटर कुपोषणावरील संशोधनास आंतरराष्ट्रीय स्तरावर मान्यता मिळाली आहे. राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावर डॉ.

देव यांचे १२०हून अधिक शोधनिबंध प्रकाशित झालेले आहेत.

दिल्लीतील भारतीय आयुर्विज्ञान संस्थेमध्ये प्राध्यापक, मुंबईच्या कर्करोग संशोधन केंद्राचे संचालक (१९७८ ते १९९५) अशा जबाबदारीच्या पदांबरोबर डॉ.देव यांनी मुंबईच्या जसलोक रुग्णालयातील संशोधन प्रयोगशाळांचे संचालक (१९९७ ते १९९८), मॉरिशस येथील एस.एस.आर. सेंटर फॉर मेडिकल स्टडीज अॅण्ड रिसर्च, मॉरिशस विद्यापीठ (१९९८ ते २०००) ही पदे भूषवित या संस्थांना नावलौकिक प्राप्त करून दिला. पुणे येथील आरोग्य विज्ञान प्रशालेत मानद व्याख्याते, तसेच राष्ट्रीय एड्स संशोधन केंद्राच्या वैज्ञानिक सल्लागार समितीचे अध्यक्ष म्हणूनही डॉ. देव यांनी काम पाहिले आहे. देशातील नामवंत शास्त्रज्ञांच्या सहकार्याने डॉ. देव यांनी 'इंडियन असोसिएशन ऑफ कॅन्सर रिसर्च' या संस्थेची मूहूर्तमेढ रोवली. देशातील, तसेच जगभरातील अनेक संस्थांचे सल्लागार म्हणूनही डॉ. देव कार्यरत आहेत.

अलीकडील काळात २००१ सालापासून डॉ.देव 'मुव्हिंग अकॅडमी ऑफ मेडिसीन व बायोमेडिसीन' या संस्थेशी उपाध्यक्ष, तसेच सचिव या नात्याने निगडित आहेत. मुव्हिंग अकॅडमीची स्थापना करण्यात डॉ. देव यांचा क्रियाशील सहभाग आहे. या अकॅडमीची संकल्पना क्रांतिकारी आहे. वैद्यकीय शाखेतील मूलभूत, तसेच आधुनिक ज्ञान विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचविण्यासाठी या संस्थेद्वारे फिरती शिबिरे घेण्यात येतात. या उपक्रमाद्वारे आधुनिक ज्ञान विद्यार्थ्यांच्या दाराशी नेऊन त्याद्वारे आधुनिक ज्ञानाच्या संक्रमणातील दरी दूर करण्याचा प्रयत्न केला जातो. ही संकल्पना राबविताना डॉ. देव यांची वैद्यकीय शिक्षणाविषयी असलेली आस्था व विद्यार्थ्यांविषयी असलेली तळमळ दिसून येते.

वैद्यकीय शिक्षण, संशोधन, तसेच उपचारक्षेत्रात आयुष्यभर कार्यरत असणाऱ्या डॉ. देव यांचा अनेक मानसन्मान देऊन गौरव करण्यात आला आहे. डॉ. देव यांचा भारत सरकारतर्फे १९९० साली 'पद्मश्री' पुरस्कार देऊन गौरव करण्यात आलेला आहे. त्यांना मिळालेल्या इतर अनेक सन्मानांत १९६६ साली 'डॉ.व.रा. खानोलकर पुरस्कार', १९७२ साली 'अमृत मोदी रिसर्च फाउण्डेशन अवॉर्ड', १९८६ साली 'शकुंतला अमीरचंद' पुरस्कार, १९८८ साली 'ओमप्रकाश भसीन' पुरस्कार, १९८९ साली रौप्यमहोत्सवी 'आय.सी.एम.आर.' संशोधन पुरस्कार, १९९२ साली 'आर.डी. बिर्ला' राष्ट्रीय पुरस्कार, व 'हरी ओम अलेम्बिक संशोधन कोष' पुरस्कार, इन्सातर्फे १९९३ साली 'जवाहरलाल नेहरू बर्थ सेंटेनरी व्हिजिटिंग फेलोशिप', नॅशनल अकॅडमी ऑफ मेडिकल सायन्सेसद्वारे २००२ साली 'एमिरिटस प्रोफेसर लाइफटाइम' अशा अनेक प्रतिष्ठित पुरस्कारांचा समावेश आहे. अमेरिकेतील ए.पी.आय.एन.ए. या संस्थेतर्फे अलीकडेच २००८ साली डॉ. देव यांचा जीवनगौरव पुरस्कार देऊन सन्मान करण्यात आला आहे.

डॉ. देव यांनी राष्ट्रीय, तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावर १९७८ साली बी.सी. गुहा इन्सा व्याख्यान, १९८० साली आय.सी.एम.आर. बसंती देवी अमीर चंद व्याख्यान १९८७ साली ऑल इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ मेडिकल सायन्सेस रौप्यमहोत्सव, १९८८ साली इंडियन सायन्स काँग्रेस अमृत महोत्सव, साराभाई व्याख्यान, या व अशा प्रतिष्ठित व्यासपीठांवर अनेक व्याख्याने दिलेली आहेत.

– डॉ. सिद्धीविनायक बर्वे

द

## देवधर, प्रभाकर शंकर

**अभियंता**

**२५ सप्टेंबर १९३४**

प्रभाकर शंकर देवधर यांचा जन्म पुण्यात झाला असून शालेय शिक्षण नूतन मराठी विद्यालय ह्या प्रख्यात शाळेत झाले. त्यांनी बी.ई. (टेलिकॉम) ही अभियांत्रिकीमधील पदवी १९५६ साली, पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयात शिकून विशेष प्रावीण्यासह मिळवली आहे. इ.स.१९५६ ते १९६२ अशी सहा वर्षे ते संशोधन क्षेत्रात काम करत होते. या दरम्यान, त्यांनी टाटा मूलभूत



संशोधन संस्थेत आणि इंडियन कौन्सिल ऑफ मेडिकल रिसर्चच्या (आय.सी.एम.आर.) आधिपत्याखालील प्रयोगशाळेत मेडिकल इलेक्ट्रॉनिक्स विभागात काम केले.

त्यांनी १९६२ साली संशोधन आणि विकास क्षेत्रातील खासगी प्रयोगशाळा स्थापन केली. १९६४ साली तेथील संशोधनावर आधारित ऊर्जाविषयक यंत्राचे उत्पादन आणि विक्री सुरू केली. तसेच तपासणी आणि मोजमापन करणारी विजेवर चालणारी यंत्रे विकसित केली. बँकांकरिता ए.टी.एम. आणि किरकोळ व्यापार क्षेत्रातील आधुनिकीकरणासाठीची यंत्रे, अद्ययावत स्वयंचलित पेट्रोलपंप आणि केबलमधील दोष हुडकून काढणारी यंत्रे 'ॲप्लॅब' या त्यांनी स्थापन केलेल्या कंपनीने विकसित केलेली आहेत. देशातच नव्हे, तर परदेशांतही या सर्व यंत्रांना चांगली मागणी आहे, ती त्या यंत्रांच्या उत्कृष्ट दर्जामुळेच. 'ॲप्लॅब' कंपनीचे कारखाने मुंबई, नवी मुंबई, ठाणे, पुणे यांसह देशभरात असून त्यांची वार्षिक उलाढाल जवळपास रु.१५० कोटींच्या वर आहे. ही सगळी कामगिरी देवधरांच्या नेतृत्वामुळेच साध्य झाली आहे. त्यामुळेच त्यांना भारतातील आय.ई.टी.ई. या संस्थेची विशेष फेलोशिप, तसेच आय.ई.ई.ई. या अमेरिकास्थित संस्थेची तहहयात फेलोशिपसुद्धा मिळालेली आहे. याखेरीज ते इन्स्टिट्यूशन ऑफ इंजिनिअर्स, इंडिया आणि इंडियन अकॅडमी ऑफ इंजिनिअर्सचे फेलो आहेत. ब्रॉडकास्टिंग इंजिनिअर्स सोसायटीनेही त्यांना मानद फेलोशिप दिलेली आहे.

औद्योगिक क्षेत्रातील या उल्लेखनीय कामगिरीबरोबरच त्यांनी भारत सरकारच्या इलेक्ट्रॉनिक्स आयोगाचे अध्यक्षपद, १९८६ ते १९८८ या काळात भूषविले आहे. १९८८ ते १९९० सालांदरम्यान ते



**देवधर यांनी तयार केलेले ए.टी.एम. यंत्रे**

पंतप्रधान राजीव गांधी यांचे इलेक्ट्रॉनिक्स विषयाचे सल्लागार होते. १९९२-९३ दरम्यान ते भारत सरकारच्या ब्रॉडकास्ट काउन्सिलचे अध्यक्ष होते. त्याचप्रमाणे, ई.टी. ॲण्ड टी. या सार्वजनिक क्षेत्रातील शासकीय उद्योगाचे ते १९८४ ते १९८९ या कालावधीत अध्यक्ष होते. महाराष्ट्र सरकारच्या मेल्ट्रॉन कॉर्पोरेशनचे अध्यक्षपद त्यांनी १९८२ ते १९८४ या काळात, तर महानगर गॅस लिमिटेड या पाइपद्वारे गॅस पुरविणाऱ्या संयुक्त क्षेत्रातील कंपनीचे त्यांनी १९९६ ते १९९९ या कालावधीत अध्यक्षपद भूषवले आहे. याखेरीज १९८२ ते १९९१ दरम्यान ते राजीव गांधींचे (खासदार ते पंतप्रधान) वैयक्तिक सल्लागार होते. त्यांनी माहिती तंत्रज्ञान आणि इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रात भारतातील जलद गतीने झालेल्या प्रगतीला नावीन्यपूर्ण कल्पना वापरून हातभार लावला आहे.

१९८३ साली त्यांनी माहिती तंत्रज्ञान आणि इलेक्ट्रॉनिक्स क्षेत्रातील 'लायसन्स राज' संपवायला सुरुवात करून दिली. त्यामुळे इलेक्ट्रॉनिक्स उद्योगाची उलाढाल १९८३-८४ सालांमधील १२०० कोटींवरून १९८९-९० सालांत ९४०० कोटींपर्यंत पोहोचली. कारागिरांना प्रशिक्षण देण्याकरिता त्यांनी माहिती

तंत्रज्ञान आणि दूरचित्रवाणी या माध्यमांचा वापर करायला सुरुवात केली. त्याकरिता लागणाऱ्या ध्वनिचित्रफितीची (व्हिडिओ कॅसेट) निर्मिती त्यांनी ई.टी. अ‍ॅण्ड टी.चे अध्यक्ष असताना केली. वैयक्तिक पातळीवर संगणकाचा वापर वाढावा यासाठी, त्याच्या किमती कमी करण्याकरिता त्यांनी पुढाकार घेतला. महाराष्ट्र शासनाचा मेल्ट्रॉन उद्योग १९८२ साली ३.२ कोटी रुपये तोट्यात होता, तो आपल्या कौशल्याने १९८४ साली त्यांनी २२ कोटी रुपयांच्या फायद्यात आणला. अशी त्यांची कामगिरी असल्यामुळे त्यांना अमेरिकेच्या आय.ई.ई.ई.ने 'इंजिनिअरिंग मॅनेजर ऑफ द इयर १९९०' या पुरस्काराने गौरवले. आजतागायत हा पुरस्कार मिळवणारे ते अमेरिकेबाहेरील एकमेव नागरिक आहेत. तसेच त्यांच्या औद्योगिक क्षेत्रातील कामगिरीबद्दल ठाणे मॅन्युफॅक्चरर्स असोसिएशनने 'जीवन गौरव पुरस्कार' देऊन त्यांचा गौरव केला आहे.

१९९६ साली जेरुसलेम (इस्रायल) येथे भरलेल्या जागतिक मराठी परिषदेच्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. तसेच जागतिक मराठी अकादमीचे ते १९९७ ते १९९९ या काळात अध्यक्ष होते. त्याच कालावधीत ते महाराष्ट्र इकनॉमिक डेव्हलपमेंट कौन्सिलचेही अध्यक्ष होते. १९९६ ते २००० या काळात ते नवी दिल्ली येथील ऑल इंडिया कौन्सिल फॉर एज्युकेशन टेक्नॉलॉजीचे अध्यक्ष होते. नागपूर येथे भरलेल्या मराठी विज्ञान परिषदेच्या चौतिसाव्या विज्ञान अधिवेशनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषवले आहे आणि २००० सालापासून ते मराठी विज्ञान परिषदेचे अध्यक्ष म्हणून काम पाहत आहेत. २००५ सालापासून ते भारत-चीन इकॉनॉमिक आणि कल्चरल कौन्सिलच्या अध्यक्षपदी आहेत.

वेळोवेळी असंख्य भाषणे आणि शेकडो लेखांद्वारे प्रबोधन करणाऱ्या देवधर यांनी इलेक्ट्रॉनिक्स विषयावर १९७९ साली एक पुस्तक लिहिले आहेच; पण त्याशिवाय दिल्लीतील अनुभवावर आधारित 'कॅपिटल पनिशमेंट', दूरचित्रवाणीचा शैक्षणिक उपयोग करण्यासाठीचे 'थर्ड पेरेंट', आणि 'इज एनिवन आउट देअर', अशी तीन पुस्तके लिहिली आहेत. त्यांतील 'थर्ड पेरेंट'चा मराठी अनुवादही पुस्तकरूपाने प्रकाशित झाला आहे.

— दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**


१. *चौतिसावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन; १९९९.*

२. *www.psdeodhar.net*


## देवबागकर, दिलीप

**जीवशास्त्रज्ञ**

**२५ ऑगस्ट १९४९**



डॉ. दिलीप देवबागकर यांच्या व्यक्तिमत्त्वात अंगभूत हुशारी, तडफदारपणा व मेहनती वृत्ती यांचा सुरेख मिलाफ दिसतो. त्यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांच्या वडिलांनी ज. जी. कला महाविद्यालय येथे फाइन आर्ट्‌सचा अभ्यास केला होता. त्यांची आई संगीतकला संपन्न गोव्यातील घराण्यातली. साहजिकच देवबागकर संगीतप्रेमी, कलासक्त आहेत.

त्यांचे शालेय व विद्यालयीन शिक्षण कोल्हापुरात झाले. शिवाजी विद्यापीठातून एम.एस्सी. ही पदवी घेऊन पुढील शिक्षणासाठी ते बंगळुरू येथील इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स (आय.आय.एस्सी.) येथे गेले. 'रेण्वीय जीवशास्त्र' या विषयात १९७६ साली त्यांना पीएच.डी. ही पदवी मिळाली. पुढील शिक्षणासाठी फोगार्टी इंटरनॅशनल फेलोशिप मिळवून ते अमेरिकेस गेले. तेथे त्यांनी 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ हेल्थ' या जगप्रसिद्ध संस्थेत उंदरामध्ये रक्ताच्या कर्करोगास कारणीभूत असणाऱ्या एबलसन विषाणूवर संशोधन केले. त्यानंतर अमेरिकेतील येल विद्यापीठात त्यांना घुंगुरटे या छोट्या प्राण्यांमधील जनुकांच्या प्रकटीकरणाचा अभ्यास करण्याची संधी मिळाली.

द

परदेशातील अनुभव घेऊन ते स्वतंत्र संशोधक म्हणून इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स, बंगलोर बंगळुरू येथे रुजू झाले; परंतु नवीन काम करण्याची संधी मिळताच ते १९८२ साली राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा, पुणे या संस्थेत गेले. तेथे त्यांनी रेण्वीय संशोधनाचा पाया घातला. दोन वेगळ्या प्रजातींच्या जंतूंच्या मिलनामुळे त्यांच्यातील गुणधर्म एकत्र करता येतात व अशा तऱ्हेच्या प्रयोगांचा उपयोग जैवतंत्रज्ञान उद्योगात करता येतो, हे त्यांच्या कामातून दिसून आले. संशोधन व अध्यापन, दोन्हींत रुची असल्यामुळे १९८५ साली त्यांनी पुणे विद्यापीठात प्राणिशास्त्र विभागात रेण्वीय जीवशास्त्राचे प्राध्यापक म्हणून झालेली निवड स्वीकारली. तेथे त्यांचे व्यक्तिमत्त्व बहरले. प्राणिशास्त्राचे प्रमुख या पदाव्यतिरिक्त त्यांनी वेळोवेळी सूक्ष्म जीवशास्त्र, जैव तंत्रज्ञान या विभागाचे प्रमुखपद सांभाळले, तसेच विद्यापीठाच्या बायोइन्फरमॅटिक्स केंद्राचे संचालक म्हणूनदेखील काम केले. त्यांच्या अथक परिश्रमांमुळे पुणे विद्यापीठात बारावीनंतर ५ वर्षांचा एम.एस्सी.चा अभ्यासक्रम देणारी 'इन्स्टिट्यूट फॉर बायोइन्फरमॅटिक्स व बायोटेक्नॉलॉजी' ही संस्था उभी राहिली. या केंद्राच्या निर्मितीपासून ते तिचे संचालक होते.

प्राणिशास्त्र विभागात त्यांच्या मार्गदर्शनाखाली कित्येक विद्यार्थ्यांनी एम.एस्सी. व पीएच.डी.साठी संशोधन केले. या संशोधनातून अनेक शोधनिबंध प्रख्यात जर्नल्समध्ये प्रसिद्ध झाले. एडिस इजिप्ती या मलेरियाच्या जंतुवाहक डासांवरील त्यांनी केलेले संशोधन महत्त्वाचे मानले जाते. या संशोधनामुळे जंतुवाहक डास व मलेरियाचे जंतू यांमधील परस्पर संबंधांबद्दल महत्त्वाची माहिती मिळाली. प्राणिशास्त्र विभागात जैवतंत्रज्ञान विभागाच्या साहाय्याने त्यांनी एम.एस्सी. झालेल्या विद्यार्थ्यांसाठी आधुनिक पदविका कार्यक्रम सुरू करून औद्योगिक संस्थांना कुशल व प्रशिक्षित तंत्रज्ञ मिळवून देण्याचे कार्य केले.

शिक्षणक्षेत्रातील गाढा अनुभव आणि उत्तम संशोधनाची कारकीर्द असल्याने, २००५ साली डॉ. देवबागकरांची नियुक्ती गोवा विद्यापीठाच्या कुलगुरुपदी झाली. अवघ्या दोन वर्षांत गोवा विद्यापीठाच्या प्रतिष्ठेची दखल घेतली जाऊन तिथे केंद्रीय विद्यापीठासाठी संमती मिळण्याची घटना हा डॉ. देवबागकरांच्या नेतृत्वगुणाचा दाखलाच आहे.

— डॉ. रजनी भिसे

## देवरस, पुरुषोत्तम जयकृष्ण

**जीवशास्त्रज्ञ**

**२० जुलै १९०९ - ३० ऑगस्ट १९९१**



जागतिक कीर्तीचे सर्पतज्ज्ञ म्हणून ओळखल्या जाणाऱ्या डॉ.पुरुषोत्तम जयकृष्ण देवरस यांचा जन्म मध्यप्रदेशातील बिलासपूर शहरात झाला. मध्यप्रदेशातच शालेय शिक्षण झाल्यानंतर त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण नागपूरला झाले आणि तेथील विज्ञान महाविद्यालयामधून त्यांनी प्राणिशास्त्रात एम.एस्सी.ची पदवी प्राप्त केली. त्यानंतर दोन वर्षे खेड्यापाड्यांत राहून भातावरील 'गाद' नावाच्या कीटकामुळे उद्भवणाऱ्या रोगांवर त्यांनी मौलिक संशोधन केले.

पुढे १९३८ साली ते हिंदू एज्युकेशन फंडाची शिष्यवृत्ती मिळवून इंग्लंडला गेले. तेथे प्रथम एडिन्बरा व नंतर डरहॅम विद्यापीठाच्या किंग्ज महाविद्यालयामध्ये त्यांनी 'आफ्रिकेतील काही उंदरांवरील कीटक' आणि 'प्लासी नदीच्या खोऱ्यात ॲलर्जी उत्पन्न करणारे केडीस फ्लाइज' या दोन विषयांवर संशोधन करून पीएच.डी. पदवी संपादन केली. भारतात परतल्यावर अखिल भारतीय कृषी संशोधन संस्था, दिल्ली येथे माशी व डास यांच्यावर त्यांनी संशोधन केले. पुढे १९४२ साली त्यांनी टोळधाड नियंत्रण मंडळातर्फे राजस्थान, गुजरात व सिंध प्रांतांची पाहणी करून या कार्यासाठी विमानाचा प्रथमच उपयोग करून दाखविला.

द

पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये प्राणिशास्त्र विभागाचे प्रमुख म्हणून ते १९४३ साली रुजू झाले. १९४७ साली डॉ.आघारकर यांच्याबरोबर त्यांनी व इतरांनी 'महाराष्ट्र असोसिएशन फॉर द कल्टिव्हेशन ऑफ सायन्स' या स्वायत्त संशोधन संस्थेची स्थापना पुण्यातील विधी महाविद्यालयाच्या तळघरात केली.

१९५१ साली पुण्याहून मुंबईला आल्यावर त्यांची परळ येथील हाफकिन संशोधन संस्थेत कीटकशास्त्र विभागाचे प्रमुख व उपसंचालक म्हणून नेमणूक झाली. १९६९ साली सेवानिवृत्त होईपर्यंत तेथेच त्यांनी कीटकशास्त्र विभागाचे प्रमुखपद भूषविले. हाफकिनमध्ये कार्यरत असताना दूषित पाणी, आरेचे दूध, मुंबईतील आरोग्यनाशक किटकांची जंत्री, पिसवा, माश्या, डास इत्यादींवर त्यांनी संशोधन करून बारा विद्यार्थ्यांना एम.एस्सी., पीएच.डी.करिता मार्गदर्शन केले. या काळात त्यांनी प्लेग रोगावर मूलगामी संशोधन केले. प्लेगचा फैलाव करणारे शहरातील उंदीर प्लेगच्या जंतूंना जुमानत नाहीत. त्यातून असे दिसून आले की, महाराष्ट्रातल्या बऱ्याच शहरांतील उंदरांच्या विशिष्ट जातींची आकडेवारी बदलली आहे, तर शेतमळ्यातील उंदीर आता घरात शिरले आहेत. या उंदरांवरील पिसवांचे तीन प्रकार आहेत. त्यांची रक्तशोषणाची क्रिया वेगवेगळी आहे. या क्रियेवरच प्लेगची लागण अवलंबून असते, आदी निष्कर्ष त्यांच्या संशोधनातून निघाले.

तसेच डी.डी.टी.चा परिणाम भारतातील कीटकांवर होत नाही, हे पाहून त्यांनी देशातील कीटक नियंत्रण औषधांचे संशोधन व्हावे म्हणून चालना दिली. तसेच महाबळेश्वर, जम्मू, नीलगिरी, आसाम येथे पेरलेली पाथरेश्रम नावाची वनस्पती यावर उपयोगी पडू शकते, हे त्यांनी सिद्ध केले. त्यांचे मौलिक संशोधन लक्षात घेऊन जागतिक आरोग्य संघटनेने त्यांना प्लेगविषयक तज्ज्ञ समितीवर नेमले. यामुळे उंदीर व प्लेगवर एक अग्रगण्य वैज्ञानिक म्हणून त्यांची देशात व परदेशात गणना झाली.

भारतात प्रतिवर्षी दोन लाख लोकांना सर्पदंश होतो व त्यात सुमारे वीस हजार लोक दगावतात, असा अंदाज त्या वेळी वर्तवण्यात आला होता. पण एवढी गंभीर समस्या असूनही या विषयावर कोठेच संशोधन होत नव्हते. देवरसांनी जंगल, डोंगर व माळरानांत प्रवास करून सर्पजीवनाचे अवलोकन केले, प्रयोग केले. त्यांनी असे शोधून काढले, की महाराष्ट्रात सापांच्या २७८ जाती असून त्यांतील नाग- फुरसे- मण्यार व घोणस एवढ्या चारच जाती विषारी आहेत. यासंबंधी सर्वसामान्य जनतेलाही माहिती व्हावी या उद्देशाने त्यांनी १९५४ साली हाफकिन संस्थेत सर्पालय स्थापन केले. भारतातील हे पहिले सर्पालय होय. याची सर्वत्र वाहवा झाली. पुढे यालाच जोडून विषारी प्राण्यांच्या संशोधनाकरिता एक प्रयोगशाळा स्थापन झाली.

१९७२ साली स्टॉकहोमला भरलेल्या जागतिक प्रदूषण परिषदेला ते भारताचे प्रतिनिधी म्हणून उपस्थित राहिले, तर सर्पावरील मौलिक संशोधनामुळे १९७६ साली दक्षिण अमेरिकेतल्या व्हेनेझुएला देशाच्या कॅराकस या राजधानीच्या ठिकाणी भरलेल्या पहिल्या जागतिक सर्प परिषदेचे अध्यक्षस्थान त्यांनी भूषविले. तसेच, १९८० साली भरलेल्या पहिल्या अखिल भारतीय प्राणी विज्ञान संस्थेच्या अधिवेशनात त्यांना सुवर्णपदक बहाल करण्यात आले. रॉकफेलर फेलोशिप व डॉ.भन्साळी लेक्चर अवॉर्डचे ते मानकरी होते. संयुक्त राष्ट्रसंघाची मानव पर्यावरण परिषद, जागतिक स्वास्थ्य संस्थेची प्लेग - कीटक परिषद आदी कैक परिषदांना हजर राहून त्यांनी जगभर प्रवास केला.

डॉ.देवरस 'फ्रेंड्स ऑफ टीज', 'सोक्लीन', मराठी विज्ञान परिषद, महाराष्ट्र प्रदूषण मंडळ आदी अनेक संस्थांचे सदस्य वा पदाधिकारी होते. मराठी विज्ञान परिषदेच्या १९७६ साली भरलेल्या अकराव्या संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

साप चावल्यानंतर सर्प किती विष देतो, सर्वच सर्प विषारी असतात काय आणि सर्पदंश इ. शीर्षकांखाली त्यांनी प्रबंध सादर केले. त्यांनी लिहिलेल्या निबंधांची संख्या शंभरवर भरते. त्यांनी पाच पुस्तके आणि मराठी,

हिंदी व इंग्रजीतून अनेक लेख लिहिले. 'भारतीय सर्प' हा त्यांचा ग्रंथ अद्वितीय गणला गेला. सर्व भारतीय भाषांत त्याचा अनुवाद करण्यात आला. त्यांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. या ग्रंथातील तीन प्रकरणे इंग्लंड व अमेरिकेतील ग्रंथांत अंतर्भूत करण्यात आली. आकाशवाणी व दूरदर्शनवर त्यांची सातत्याने भाषणे व अन्य विद्वानांशी चर्चा झाल्या.

– ज. बा. कुलकर्णी

**संदर्भ :**


*१. देशपांडे, अ.पां., संपादक; 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन; २००५.*


## देशपांडे, अनंत पांडुरंग

**विज्ञानलेखक**

**१५ डिसेंबर १९४२**



अनंत पांडुरंग देशपांडे यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण नूतन मराठी विद्यालयात, तर अभियांत्रिकीचे शिक्षण वाडिया महाविद्यालयात झाले. त्यांनी १९६२ साली इलेक्ट्रिकल इंजिनिअरिंगमधील, तर १९६३ साली मेकॅनिकल इंजिनिअरिंगमधील पदविका प्राप्त केल्या. पुणे आणि मुंबई येथील चार कारखान्यांत त्यांनी ३५ वर्षे काम केले. त्यांपैकी ३० वर्षांची कारकीर्द 'नोसिल' या पेट्रोरसायन कारखान्यात पार पडली. तिथूनच त्यांनी ज्येष्ठ व्यवस्थापक (इंजिनिअरिंग) या पदावर असताना स्वेच्छानिवृत्ती घेतली. दरम्यान त्यांनी गुणवत्ता चाचणीचा एक अभ्यासक्रम केला. तसेच अनेक वेळा सुरक्षितता आणि गुणवत्तेच्या अनेक तपासण्या पार पाडल्या आहेत.

१९७३ साली त्यांनी मराठी विज्ञान परिषदेचा ईशान्य मुंबई विभाग स्थापन केला आणि त्याचे कार्यवाहपद १९९१ सालापर्यंत सांभाळले. त्यातूनच त्यांचा मराठी विज्ञान परिषदेच्या (मध्यवर्ती) कार्याशी संपर्क आला. १९७२ सालच्या सातव्या वार्षिक विज्ञान संमेलनापासून देशपांडे यांचा मध्यवर्तीच्या कार्यक्रमात सक्रिय सहभाग राहिला आहे. १९७५ सालापासून गेली चौतीस वर्षे ते परिषदेचे कार्यवाहपद कुशलपणे सांभाळत आहेत. दरवर्षीच्या विज्ञान संमेलनाच्या नियोजनात त्यांचा मोठा वाटा असतो. विज्ञान भवनाचे बांधकाम पूर्ण करताना त्याचा प्रत्यय आला आहे. विज्ञान लेखकांच्या दहा परिषदा त्यांनी महाराष्ट्रात ठिकठिकाणी भरवल्या, तसेच वेळोवेळी अनेक परिसंवाद सर्वदूर आयोजित केले आहेत.

१९९७ साली जानेवारीत स्थापन झालेले 'नॅशनल सेंटर फॉर सायन्स कम्युनिकेटर्स' हे केंद्र सर्वभाषिक विज्ञान लेखकांचे कार्यक्रम आयोजित करित आहे. या केंद्रानेसुद्धा त्यांच्या नेतृत्वाखाली पाच राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांचे आयोजन केले आहे. तसेच 'इंटरनॅशनल युनियन फॉर सायन्स कम्युनिकेटर्स' ही संस्था स्थापन करून विज्ञान प्रसाराचे कार्य आंतरराष्ट्रीय पातळीवर न्यायला सुरुवात केली आहे. राष्ट्रीय पातळीवरील केंद्राचे ते अध्यक्ष असून आंतरराष्ट्रीय स्तरावरील संस्थेचे ते सरचिटणीस आहेत. या सर्व संमेलनांचे, परिषदांचे आयोजन करताना, त्यांची आखणी आणि अंमलबजावणी करताना त्यांच्यातील अभियंता दिसून येतो.

विज्ञान प्रसाराच्या या संस्थेची धुरा सांभाळताना त्यांनी समाजात ६८० च्यावर भाषणे दिली आहेत. त्यांमध्ये अनेक विषयांचा ऊहापोह त्यांनी केला. याचबरोबर २२० च्यावर भाषणे आकाशवाणीवरून दिली, तर सुमारे ५० कार्यक्रम दूरचित्रवाणीवर सादर केलेले आहेत. सुमारे ८७५ लेख त्यांनी वेळोवेळी वर्तमानपत्रांत आणि मासिकांत लिहिले आहेत. त्यांमध्ये व्यक्तीविषयक लेख आहेतच, पण विविध विषयांचा परामर्श त्यांनी त्यात घेतला आहे. त्यांची भाषांतरित व संपादित अशी एकूण ३६ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत.

वेगवेगळ्या व्यासपीठावर त्यांनी घेतलेल्या अनेक

शास्त्रज्ञांच्या मुलाखती गाजल्या आहेत. त्यांनी आकाशवाणी, मुंबई केंद्राच्या विज्ञान विभागाच्या कार्यक्रम सल्लागार समितीचे सभासद म्हणून चार वर्षे काम केले आहे, तर आठ वर्षे महाराष्ट्र शासनाच्या विज्ञान पुस्तकांच्या निवड समितीवर परीक्षक म्हणून काम केले आहे. मराठी विज्ञान परिषदेच्या ‘पत्रिके’च्या संपादक मंडळाचे ते आठ वर्षे सभासद होते. कार्यवाह म्हणून पत्रिकेच्या संपादनात आजही त्यांचा सहभाग आहेच. १९६७ सालापासूनचे ४१ वर्षांचे मविप पत्रिकेचे अंक सी.डी. स्वरूपात ‘प्रथम’ संस्थेच्या सहकार्याने उपलब्ध झाले आहेत. आधुनिक तंत्रज्ञानाचा असा फायदा परिषदेला मिळवून देण्यात देशपांडे यांचा सहभाग आहे.

प्रा. जयंत नारळीकर आयुकाच्या संचालक पदावरून निवृत्त होताना दूरचित्रवाणीच्या पुणे केंद्राने त्यांच्यावर लघुपट काढायचा ठरवला, ती कामगिरी देशपांडे यांनी पार पाडली. तसेच आकाशवाणीच्या मुंबई केंद्राच्या संग्रहासाठी डॉ. वसंत गोवारीकरांची प्रत्येकी चार तासांची प्रदीर्घ मुलाखत त्यांनी मराठी आणि इंग्रजीत घेतली आहे. संस्था व्यवस्थापनाचे अनेक धडे मराठी विज्ञान परिषदेने समाजाला घालून दिलेले आहेत, त्यांमध्ये देशपांडे यांचा वाटा फार मोठा आहे. अनेक लोकांना बरोबर घेऊन काम करण्याची तारेवरची कसरत करीत संस्था वाढवत नेण्याचे कौशल्य त्यांच्यापाशी आहे, म्हणूनच परिषदेचा विस्तार - कार्यक्रमांच्या विविधतेच्या अंगाने, आर्थिक उलाढालीच्या रूपाने, परिषदेच्या विभाग संख्येच्या मार्गाने - सर्वच बाजूंनी मोठ्या प्रमाणात झाला आहे. अनेक कार्यक्रमांकरिता निधी उभारणीकरिता व्यक्ती, संस्था, सार्वजनिक न्यास आणि केंद्र व राज्य सरकारचे विभाग, यांना त्यांनी परिषदेशी जोडून घेतले. मराठी विज्ञान परिषदेला जनमानसात प्राप्त झालेले स्थान ही अनेकांची एकत्रित कामगिरी असली, तरी त्यामध्ये देशपांडे यांचा वाटा लक्षणीय आहे. वर्तमानपत्रातील मराठी विज्ञान परिषदेकडे असणारी सदरे, आकाशवाणीवरील परिसर मालिका, अशा कितीतरी कामांचे परिषदेतील संयोजन देशपांडे यांनी केले आहे आणि करीत आहेत. मराठी विज्ञान परिषदेकडे शासकीय/निमशासकीय संस्थांकडून येणारी कामे वाढतच आहेत. त्यांमध्ये व्यवस्थापनाचे आणि संपादनाचे बहुतेक सर्व काम देशपांडेच सांभाळत आहेत. १९६६ ते २००३ सालापर्यंतच्या परिषदेच्या वार्षिक विज्ञान संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांचा खंड ‘विज्ञान आणि वैज्ञानिक’ २००५ साली मनोविकास प्रकाशनाने प्रसिद्ध केला. या ग्रंथाच्या संपादनाचे अवघड काम देशपांडे यांनी केले आहे. महाराष्ट्र साहित्य आणि संस्कृती मंडळाबरोबर संयुक्त विद्यमाने प्रकाशित ‘विज्ञान आणि तंत्रज्ञान कोश’ आणि विवेक साप्ताहिकाबरोबर संयुक्त विद्यमाने सुरू असलेल्या ‘शिल्पकार चरित्रकोशा’मधील ‘विज्ञान व तंत्रज्ञान’ खंड यांच्या संपादनकार्यात त्यांचा मोलाचा वाटा आहे.

त्यांच्या बहुआयामी कार्यामुळे १९९५ साली त्यांना इचलकरंजीच्या फाय फाउण्डेशनने सन्मानित केले आहे. समाजात विज्ञान लोकप्रिय करण्यासाठीच्या राष्ट्रीय पुरस्काराचा मान त्यांना २००० साली मिळाला. शिवाय, महाराष्ट्र साहित्य परिषदेचा २००६ सालचा विज्ञान ग्रंथकार पुरस्कार त्यांना मिळाला आहे. मराठी विज्ञान परिषदेचा संस्था म्हणून गौरव १९९२ साली राष्ट्रीय स्तरावरील पुरस्कार देऊन केला गेला. त्यामध्ये परिषदेच्या कामात देशपांडे यांचाही सहभाग मोठा आहे. वर्षानुवर्षे सतत आपला वेळ देऊन स्वयंसेवीवृत्तीने हे काम करणे ही अवघड बाब आपल्या सहयोगाने देशपांडे यांनी सोपी करून दाखवली आहे.

त्यांचा संगीताचाही व्यासंग चांगला आहे. सवाई गंधर्व संगीत महोत्सवासंबंधी ‘स्वरयज्ञ’ हे पुस्तक त्याची साक्ष आहे.

— दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**

*१. मराठी विज्ञान परिषद–पत्रिका; मार्च १९९६ आणि मार्च २०००*

द

## देशपांडे, बाळकृष्ण गंगाधर

**भूशास्त्रज्ञ**

**१९ नोव्हेंबर १९११ - २५ जानेवारी २००१**



डॉ. बाळकृष्ण गंगाधर देशपांडे हे जगभर 'बी.जी.' देशपांडे म्हणून प्रसिद्ध होते. अखेरच्या दिवसापर्यंत कार्यमग्न असलेल्या डॉ.देशपांडे यांना विश्रांतीची गरज कशी भासत नाही, याचे त्यांच्या सहकाऱ्यांना आश्चर्य वाटत असे. त्यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांचे एम.एस्सी.पर्यंतचे शिक्षण पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात झाले. प्राध्यापक क.वा. केळकर हे त्यांचे गुरू. त्यांच्याच मार्गदर्शनाखाली बी.जीं.नी एन.सी.सी.तली शिस्त अंगी बाणवली, त्याचप्रमाणे पुढे 'गुजरातेतील भूजलाची समस्या' या विषयावर डॉक्टरेटही मिळवली. ते १९३४ साली एम.एस्सी. झाले, तर १९५२ साली त्यांना पीएच.डी. मिळाली.

द

एम.एस्सी. झाल्यानंतर ते 'जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया' या संस्थेमध्ये संग्रहालय साहाय्यक म्हणून रुजू झाले. पुढे याच संस्थेत ते भूशास्त्रज्ञ म्हणून काम करू लागले. भूशास्त्रीय सर्वेक्षणाद्वारे भूजलाचे साठे शोधण्यात त्यांनी प्रावीण्य मिळवले. त्यांचे या संस्थेतले कार्य पथदर्शक मानले जाते. त्यांनी सिंध, बलुचिस्तान आणि आताच्या पाकिस्तानातील फार मोठ्या भूभागात भूजल संशोधनाचे कार्य केले. याशिवाय भिलाईच्या पोलाद कारखान्यासाठी लागणारी लोह खनिजे शोधण्याच्या मोहिमेचे ते नेते होते. पुणे, नाशिक आणि अहमदनगर जिल्ह्यांमध्ये भूजलाची समस्या सोडविण्याच्या कार्यातही त्यांनी महत्त्वाचा वाटा उचलला होता.

भारतीय भूसर्वेक्षण विभागातून ते भारतीय खाण विभागात (इंडियन ब्यूरो ऑफ माइन्स) गेले. या संस्थेत काम करताना खनिज कोळसा-ज्याला आपण दगडी कोळसा म्हणतो-त्या कोळशाच्या अभ्यासानिमित्त ते ऑस्ट्रेलियात गेले. १९५५ साली जेव्हा 'तेल व नैसर्गिक वायू आयोगाची' (ऑइल अ‍ॅण्ड नॅचरल गॅस कमिशन ऊर्फ ओ.एन.जी.सी.) स्थापना झाली, तेव्हा बी.जी. ओ.एन.जी.सी.त गेले. त्या वेळी या संस्थेत फारच थोडे भारतीय शास्त्रज्ञ होते, त्यांतील बी.जी. हे एक.

ओ.एन.जी.सी.मध्ये बी.जी. त्यांच्या धडाडीमुळे आणि कार्यक्षमतेमुळे नावाजले गेले. खंबायत, आसाम आणि मुंबईजवळ अरबी सागरामधील खनिज तेलक्षेत्रे शोधून त्यांचा विकास करण्याचे श्रेय बी.जीं.ना दिले जाते. त्यांच्या आग्रहामुळे बडोद्याजवळ तेल शुद्धीकरण कारखाना निर्माण केला गेला. इथे जवळपास तेल सापडणारच हा त्यांचा विश्वास आणि त्यासाठी तेल शुद्धीकरण कारखान्याची आवश्यकता भासेल ही दूरदृष्टी, यांमुळे या भागात तेल सापडताच, त्याच्यावर लगेचच प्रक्रिया सुरू करणे भारताला शक्य झाले. या तेल शुद्धीकरण कारखान्याभोवतीच्या औद्योगिक वसाहतीमुळे गुजरात राज्याच्या औद्योगिकीकरणास चालना मिळाली. ओ.एन.जी.सी.च्या शास्त्रीय सेवाप्रमुख पदावरून बी.जी. इ.स. १९७० साली निवृत्त झाले.

निवृत्तीनंतर त्यांनी पुणे विद्यापीठात भूशास्त्र विभागाचे प्रमुखपद भूषविले. या विभागाच्या विकासाची जबाबदारी उचलल्यावर विभागातील संशोधनास गती मिळाली. भूजल संशोधन, हवाई छायाचित्रांच्या साहाय्याने भूगर्भशास्त्रीय सर्वेक्षण, तसेच उपग्रहांनी घेतलेल्या प्रतिमांद्वारे भूशास्त्रीय अभ्यास आदी ज्ञानशाखांची सुरुवात त्यांच्या मार्गदर्शनाखाली सुरू झाली. त्यांनी स्वत: भूजल संशोधनात महत्त्वाची कामगिरी बजावली. त्यांच्या मार्गदर्शनाखाली बरेच विद्यार्थी पीएच.डी. झाले.

निवृत्त होण्याच्या काही काळ आधी बी.जीं.नी कोयनेच्या भूकंपासंबंधी भूकंपपीडित भागात जाऊन एक अहवाल तयार केला. निवृत्तीनंतर ते ज्या तडफेने क्षेत्रपरीक्षण करीत, त्याच तडफेने त्याआधीही ते अत्यंत अवघड जागी कोयनेच्या खोऱ्यात फिरत गेले, तेव्हा

बी.जी. निवृत्तीनंतर काय करणार हा प्रश्न ज्यांच्या मनात आला, त्यांना त्यानंतरच्या काळात त्यांनी क्षेत्रपरीक्षणाच्या निमित्ताने केलेल्या भ्रमंतीने उत्तर मिळाले. 'भूशास्त्रज्ञ हा खुर्चीत दिसता कामा नये, तो कायम फिरता हवा,' असे ते म्हणत. १९९३-९४ सालांत ते लातूर भागात भूकंपापासून बचाव कसा करावा हे सांगायला स्वखर्चाने हिंडत होते, त्या वेळी ते कृतीनेच उक्ती सिद्ध करतात, हे दिसून आले.

इ.स. १९७१ साली बी.जी. इंडियन सायन्स काँग्रेसच्या भूशास्त्र आणि भूगोलविषयींच्या सत्राचे अध्यक्ष म्हणून निवडले गेले, त्या वेळी त्यांनी 'खनिज तेल आणि भारत' या विषयावर अध्यक्षीय भाषण केले होते. वेगवेगळ्या निमित्ताने त्यांनी अनेक देशांचा प्रवास केला होता. पुणे विद्यापीठातून निवृत्त झाल्यानंतर ते टांझानियात गेले. दार-एस-सलाम विद्यापीठात त्यांनी भूशास्त्र आणि भूजलशास्त्र विभागांचा विकास केला होता.

इ.स. १९८३ साली बी.जी. पुण्यात परत आले. यानंतर त्यांनी महाराष्ट्र विज्ञानवर्धिनीत भूकंपाचे भाकीत करण्याविषयी संशोधन सुरू केले. 'प्राण्यांच्या वर्तणुकीचा आणि भूकंपाच्या परस्पर संबंधाचा अभ्यास' हा त्यांच्या संशोधनाचा विषय होता. १९८७ साली 'अकॅडेमिया लिनिका' या चिनी संस्थेमधील शास्त्रज्ञांशी चर्चा करण्यासाठी ते चीनला गेले. या अभ्यासामधून 'अर्थक्वेक्स', 'ॲनिमल ॲण्ड मॅन' हे महत्त्वपूर्ण लेखन त्यांच्या लेखणीतून साकारले. यानंतर ते भूकंपाचे स्वरूप समजावून सांगणारी व्याख्याने देत महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यांतून हिंडले.

'महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेस'चे ते संस्थापक सदस्य होते. इंडियन सायन्स अकॅडमीचे फेलो असलेल्या बी.जीं.चे नॅशनल जिओफिजिकल रिसर्च इन्स्टिट्यूट, सर्व्हे ऑफ इंडिया, बिरबल साहनी इन्स्टिट्यूट ऑफ पॅलिओबॉटनी, वाडिया इन्स्टिट्यूट ऑफ हिमालयन जिऑलॉजी आदी अनेक संस्थांशी जवळचे संबंध होते. केंद्र सरकारच्या विज्ञान तंत्रज्ञान खात्याच्या अखत्यारीतील आघारकर संशोधन संस्था या पुण्यातील संस्थेचे ते आजीव सदस्य होते आणि तिथेच 'प्रोफेसर एमेरिटस' म्हणून कार्य करीत होते.

वयाच्या सत्तरीत आल्यावर ते संगणक वापरायला शिकले. हिंदी, इंग्रजी आणि मराठीवर त्यांचे प्रभुत्व होते. संगणकयुगात वावरायचे, तर संगणकाचा उपयोग आणि भाषांवरचे प्रभुत्व यांचा उपयोग करून विज्ञान प्रसार करायला हवा, असे ते सांगत असत.

भूज येथे २६ जानेवारी, २००१ रोजी झालेल्या भीषण भूकंपाच्या आदल्या दिवशी या महान भूशास्त्रज्ञाचे निधन झाले.

– प्रा.निरंजन घाटे

**संदर्भ :**

१. *मराठी विज्ञान परिषद–पत्रिका; जुलै १९७१.*

## देशपांडे, रमेश गणेश

**रसायनशास्त्रज्ञ**

**१२ नोव्हेंबर १९३४ - १७ मार्च १९९४**



१९५५ साली पुणे विद्यापीठाची वास्तव रसायनशास्त्राची एम.एस्सी. पदवी मिळवली. लगेचच त्यांची १९५६ साली तुर्भे येथील अणुऊर्जा प्रकल्पात (आताचे भाभा अणू संशोधन केंद्र) शास्त्रज्ञ आणि प्रकल्पाधिकारी या पदांवर नेमणूक झाली, तिथे १९७६-१९८७ दरम्यान समस्थानिक विभागाचे प्रमुख, १९८७-१९८९ या वर्षांत प्रभागाचे संचालक अशा बढत्या मिळाल्या. १९८९ साली निर्माण झालेल्या 'बोर्ड ऑफ रेडिएशन अँड आयसोटोप टेक्नॉलॉजी' (ब्रिट) या संस्थेचे मुख्य कार्यकारी अधिकारी म्हणून नियुक्ती झाली. आपल्या निधनापर्यंत देशपांडे या पदावर सक्रिय होते. ४ ऑगस्ट १९५६ रोजी भारताची पहिली अणुभट्टी 'अप्सरा' कार्यान्वित झाली. दक्षिणपूर्व आशियातील ती

द



आयसोमेड विभाग

एकमेव अणुभट्टी होती. अप्सरा अणुभट्टीद्वारे किरणोत्सारी समस्थानिकांचे उत्पादन आणि अणुऊर्जा निर्मिती संबंधी संशोधन हे दोन प्रमुख उद्देश होते. प्रभादेवी येथील बॉम्बे डाइंगच्या रिकाम्या गोदामात अणुशक्ती खात्याचे बरेच विभाग होते. त्यांपैकी रसायनशास्त्र विभागात, दोन फ्यूमहूड आणि चार शास्त्रज्ञ यांचा 'समस्थानिक विभाग' १९५७ साली सुरू झाला. त्यांपैकी रमेश देशपांडे एक होते. १९५० च्या दशकातील हा मोठा टप्पा मानता येईल. आता समस्थानिक प्रभाग आणि ब्रिट यांचा विस्तार भारताच्या प्रमुख शहरांतच नव्हे, तर काही विदेशांतही झाला आहे. यासाठी देशपांडे यांचे अथक प्रयत्न, दूरदृष्टी आणि व्यवस्थापन कौशल्यच कारणीभूत आहे.

'शांततेसाठी अणुशक्ती' म्हणजे किरणोत्सारी समस्थानिकांचा बहुविध क्षेत्रांत, विशेषत: उद्योग, वैद्यक आणि कृषी या क्षेत्रांत वापर, असे समीकरण होते. त्यासाठी भारतातच किरणोत्सारी समस्थानिकांचे मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणे आवश्यक होते. तीच डॉ. भाभांची अपेक्षा होती. अप्सरा, सायरस आणि ध्रुव या अणुभट्ट्यांनी ती साकार केली. अणुवीज केंद्रातील अणुभट्ट्यांतही कोबाल्ट-६० आणि ट्रिशियम यांचे फार मोठ्या प्रमाणावर उत्पादन करता येते. १ जानेवारी १९७४ रोजी कार्यान्वित झालेल्या इर‍ॅडिएशन स्टरिलायझेशन ऑफ मेडिकल प्रॉडक्ट्स (आयसोमेड) या वैद्यकीय साधने, वेष्टनात बंद केल्यानंतर, गामा किरणांद्वारे निर्जंतुक करण्याच्या प्रकल्पाचे कार्यकारी निदेशक या नात्याने त्यांचा यात महत्त्वाचा सहभाग होता. हा प्रकल्प युनायटेड नेशन्स डेव्हलपमेंट प्रोग्रॅम (यु.एन.डी.पी.) आणि इंटरनॅशनल ॲटॉमिक एनर्जी एजन्सी (आय.ए.ई.ए.) यांच्या सहकार्याने राबविण्यात आला.

या संयंत्रामध्ये, वैद्यकीय उपचारात वापरण्यात येणारे पदार्थ आणि वस्तू, पुठ्ठ्यांच्या खोक्यांत घालून फिरत्या पट्ट्यावर ठेवतात. खोका जेव्हा संयंत्राबाहेर येतो, त्या वेळी त्या खोक्याच्या सहाही पृष्ठभागांवर प्रखर गामा किरणांचा मारा होऊन आतील पदार्थ निर्जंतुक झालेले असतात. माल आधीच वेष्टनात बंद केला असल्यामुळे, तो तसाच वैद्यकीय संस्थांत किंवा दुकानात पाठविता येतो.

या तंत्रामुळे वैद्यकीय साहित्य आणि उपकरणे यांचा, दुर्गम प्रदेशातील सैनिकांसाठी वापर शक्य झाला. प्लॅस्टिकचा वापर केलेले वैद्यकीय साहित्य निर्जंतुक अवस्थेत एकदाच वापरून फेकून देणेदेखील शक्य झाले. ही दैनंदिन जीवनातील मोठी क्रांतीच म्हणावी लागेल. भारतातील हा एकमेव प्रकल्प आहे. त्यासाठी गामा किरणोत्सार आणि कोबाल्ट धातूचे वजन यांचे गुणोत्तर खूप जास्त असण्याची आवश्यकता असते, आणि किरणोत्साराची मात्राही मोठ्या प्रमाणावर लागते. कोबाल्ट-६० या समस्थानिकाचे अर्धायू केवळ पाच वर्षेच असल्यामुळे, जुने कोबाल्ट-६० चे उद्भव काढून ताजे उद्भव वर्षा-दोन वर्षांनी भरावे लागतात. हे सर्व व्याप समस्थानिक प्रभागात यशस्वीपणे करता आले.

किरणोत्सारी पदार्थांच्या उत्पादनाविषयी संशोधन, प्रत्यक्ष उत्पादन आणि विक्री हा व्याप समस्थानिक विभागात सांभाळणे अवघड होऊ लागल्यामुळे, किरणोत्सारी उत्पादने मोठ्या प्रमाणावर निर्माण करणे

आणि त्यांची विक्री करणे यांसाठी, १९८९ साली 'बोर्ड ऑफ रेडिएशन अँड आयसोटोप टेक्नॉलॉजी' ('ब्रिट') ही स्वतंत्र संस्था, अणुशक्ती खात्याच्या अखत्यारीत स्थापन करण्यात आली. या संस्थेचे पहिले मुख्य कार्यकारी अधिकारी म्हणून देशपांडे यांची नियुक्ती करण्यात आली. १९९४ साली निधन होईपर्यंत याच पदावर देशपांडे कार्यरत होते. या पाच वर्षांच्या काळात, 'ब्रिट'चा कार्यविस्तार खूपच झपाट्याने झाला. समस्थानिक विभागाने संशोधन करून नवी आणि अतिशय उपयुक्त अशी किरणोत्सारी उपयोजित उत्पादने निर्माण करायची आणि ती 'ब्रिट'ने देशविदेशांतील संस्थांपर्यंत पोहोचवायची, असे सहकार्य होत गेले. किरणोत्सारी औषधे, कार्बन-१४ आणि ट्रिशियमने सूचित (लेबल्ड) केलेली संयुगे, इम्युनो अॅसे संच, सील्ड रेडिएशन उद्भव, रेडियोग्राफी उद्भव आणि संबंधित उपकरणे वगैरेंच्या मागण्या, 'ब्रिट'द्वारे वेळच्यावेळी पुरविल्या गेल्यामुळे अणुशक्ती खात्याच्या मिळकतीत लक्षणीय वाढ झाली. बांगलादेश, सीरिया, कॅनडा, व्हिएतनाम वगैरे देशांतही 'ब्रिट'चा सहभाग आहे.

अमेरिकेत निर्यात केलेले हापूस आंबे जास्त काळ टिकावेत यासाठी ते लासलगाव येथे, गामा किरणांच्या साहाय्याने निर्जंतुक करण्यात आले. देशपांडे यांनी एशिया-पॅसिफिक प्रदेशातील अनेक देशांना, तसेच आय.ए.ई.ए.मार्फतही अनेक देशांच्या अणुप्रकल्पांना, समस्थानिक आणि विकिरणांच्या वापरासंबंधी सल्ला आणि सहकार्य दिले आहे. देशपांडे यांनी अणुशक्ती खात्याच्या समस्थानिक आणि औद्योगिक कमिटीचे, हैद्राबादच्या रेण्वीय जीवशास्त्र संस्थेच्या नियामक परिषदेचे आणि किडवाई स्मारक ऑन्कॉलॉजी संस्था, बंगळुरू यांच्या समस्थानिक वापरासंबंधीच्या सल्लागार समित्यांचे सभासदपद भूषविले आहे. किरणोत्सारी समस्थानिकांचे उत्पादन, त्यांचे शुद्धीकरण, त्याच्या विशिष्ट वापरासाठी, त्याचे विशिष्ट रासायनिक किंवा कायिक स्वरूपात परिवर्तन करणे, किरणोत्सारी समस्थानिकांच्या वापरासंबंधी सल्ला देणे, वगैरे बाबतीत देशपांडे यांचे योगदान स्पृहणीय आहे. हृदयविकाराने १९९४ साली त्यांचे अकाली निधन झाले आणि, समस्थानिक आणि विकिरण तंत्रज्ञान क्षेत्रातील एक कार्यक्षम व्यक्तिमत्त्व नाहीसे झाले. देशपांडे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ, नॅशनल असोसिएशन फॉर अॅप्लिकेशन्स ऑफ रेडिएशन्स अँड रेडियो आयसोटोप्स (नारी) संस्थेतर्फे १९९४ सालापासून प्रतिवर्षी समस्थानिक आणि विकिरण यांच्या वापरासंबंधी भरीव योगदान देणाऱ्या व्यक्तीस पुरस्कार देण्यात येतो.

– गजानन वामनाचार्य

**संदर्भ :**

१. *इंडियन असोसिएशन ऑफ न्युक्लिअर केमिस्टस अॅण्ड अलाईड सायंटिस्टस बुलेटीन;* १९९४.

## देशमुख, स्नेहलता शामराव

**वैद्यकतज्ज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**३० डिसेंबर १९३८**



डॉ. स्नेहलता शामराव देशमुख यांचा जन्म अहमदनगर येथे झाला. लहानपणापासून त्यांच्या स्वभावात जिद्द आणि मेहनती वृत्ती हे गुण आहेत. हे दोन्ही गुण त्यांना त्यांच्या आईकडून मिळाले. गाण्याची आवडही आईकडून त्यांच्याकडे आली आणि जीवनाकडे बघण्याचा सारा दृष्टिकोन आणि जीवनातील सारी ध्येये व स्वप्ने त्यांना वडिलांकडून प्राप्त झाली, असे म्हटले पाहिजे. स्नेहलताबाईंचे वडील म्हणजे डॉ. श्रीकृष्ण वासुदेव जोगळेकर. शस्त्रक्रियेची (सर्जरीची) पदवी प्राप्त केलेले उत्तम डॉक्टर. मुंबईतील शीव येथील लोकमान्य टिळक रुग्णालय व के.ई.एम. रुग्णालय येथे अधिष्ठाता म्हणून यशस्वी कारकीर्द घडवणारा एक कुशल वैद्यकीय प्रशासक. वडिलांच्या पावलावर पाऊल टाकून

द

स्नेहलताबाईंनी यशाची आणखी उत्तुंग शिखरे पादाक्रांत केली. बाईंचे शालेय शिक्षण व इंटरपर्यंतचे महाविद्यालयीन शिक्षण दादर येथील इंडियन एज्युकेश सोसायटीची मुलींची शाळा व रुइया महाविद्यालयातून झाले. त्यानंतर त्यांनी जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश घेतला. एम.बी.बी.एस.ला त्या सर्व विद्यार्थ्यांमध्ये सर्वप्रथम आल्या व पुढच्या शस्त्रक्रियेच्या शिक्षणासाठी हक्काने टाटा रुग्णालयामध्ये गेल्या. पण त्यांना प्रवेश नाकारण्यात आला; कारण त्या वेळी कर्करोगावरच्या शस्त्रक्रियेसाठी मुलींना प्रवेश देण्यात येत नसे. स्नेहलताबाईंनी बराच संघर्ष केला; पण त्यांना यश आले नाही. अखेरीस त्यांनी जी.एस.मध्ये अर्भकांवरच्या शस्त्रक्रियेमध्ये पुढचे शिक्षण घेतले. (आता मात्र टाटा रुग्णालयामध्ये मुलींना प्रवेश नाकारला जात नाही.)

शिक्षण पूर्ण झाल्यावर एक विख्यात शल्यविशारद म्हणून त्यांनी ख्याती मिळवली. त्यांना वैद्यकीय क्षेत्रातले अनेक मानसन्मानही प्राप्त झाले. त्यांतील 'डॉ. बी.सी. रॉय पुरस्कार', १९९८ व 'धन्वंतरी पुरस्कार', २००५ हे उल्लेखनीय आहेत. वयाच्या पन्नाशीच्या आसपास त्यांनी वैद्यकीय प्रशासकाच्या क्षेत्रात पाऊल टाकायचे ठरवले. त्यासाठी त्यांनी खास दिल्लीला जाऊन वैद्यकीय प्रशासनाचा (हॉस्पिटल ॲडमिनिस्ट्रेशन) अभ्यासक्रम पूर्ण केला. १९९० साली त्या शीव येथील लोकमान्य टिळक रुग्णालय, म्हणजे ज्या रुग्णालयाच्या सुरुवातीच्या काळात त्यांच्या वडिलांनी 'वैद्यकीय अधिक्षक' म्हणून प्रशासकीय घडी बसवली होती, तिथेच त्या अधिष्ठाता म्हणून रुजू झाल्या.

आपल्या पाच वर्षांच्या कारकिर्दीत त्यांनी रुग्णांना व डॉक्टरांना आवश्यक सुविधा निर्माण करण्याकडे विशेष लक्ष दिले. त्यांच्या कार्यकाळात तिथल्या 'रिसर्च सोसायटी'च्या कामाला खास प्राधान्य होते. 'स्तन्य दुधा'ची दुग्धपेढी निर्माण करण्यात त्यांचा पुढाकार होता. ज्या मातांना वैद्यकीय कारणांमुळे आपल्या नवजात अर्भकाला दूध पाजता येत नाही, त्यांना ही 'दुग्धपेढी' हे एक वरदान आहे.

नवजात अर्भकांच्या पाठीवर आवाळू (एक प्रकारची गाठ) असण्याचे प्रमाण धारावीच्या झोपडपट्टीत खूप होते. स्नेहलताबाईंच्या कार्यकाळात लो. टिळक रुग्णालयामधील डॉक्टरांनी या प्रश्नावर काम केले व मातांच्या शरीरातील 'फॉलिक ॲसिड'च्या कमतरतेमुळे हे घडते, असे सिद्ध केले. त्यानंतर धारावीत गर्भवती महिलांना 'फॉलिक ॲसिड'साठीच्या गोळ्या वाटण्यात येऊ लागल्या. त्यामुळे या समस्येचे मोठ्या प्रमाणात निराकरण झाले.

१९९५ साली मुंबई विद्यापीठाच्या कुलगुरू म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली. आपल्या पाच वर्षांच्या कार्यकाळात त्यांनी अनेक धडाडीचे आणि महत्त्वाचे निर्णय घेतले. त्यांतील एक महत्त्वाचा निर्णय म्हणजे विद्यापीठाच्या पदवी प्रमाणपत्रावर त्या विद्यार्थ्याच्या किंवा विद्यार्थिनीच्या आईचे नावही लिहिणे. अनेक नवे अभ्यासक्रम सुरू झाले. त्यांतील वैद्यकीय प्रशासनासाठीचा सुरू केलेला पदविकेचा अभ्यासक्रम खास उल्लेखनीय. यानंतर स्नेहलताबाई अर्भकांना जन्मतःच येणाऱ्या व्यंगांवर संशोधन करित आहेत. कोणत्या गुणसूत्रांच्या अपकारक जोडणीमुळे अशी व्यंगे येतात, त्यांवर कोणते उपाय करायचे, यावर संशोधन सुरू आहे व असे व्यंग अर्भकामध्ये येऊ नये म्हणून गर्भवती महिलांनी कोणती काळजी घ्यावी, याबद्दलचे ज्ञान समाजात प्रसृत करण्याचे त्यांनी जणू व्रत घेतले आहे. त्याचबरोबर, 'ग्रहणांचा अर्भकावर कोणताही विपरीत परिणाम होत नाही', हे त्या सप्रमाण सांगतात व अशा अंधश्रद्धांविरुद्ध समाजात जागृती करीत आहेत.

— प्रा. सुधीर पानसे

## दोशी, बाळकृष्ण विठ्ठलदास

**वास्तुरचनाकार**

**२६ ऑगस्ट १९२७**

भारताच्या स्वातंत्र्योत्तर काळात आधुनिक वास्तुकला प्रस्थापित करण्यात बाळकृष्ण विठ्ठलदास दोशी यांनी फार महत्त्वाची भूमिका बजावली आहे. त्यांचा जन्म

द



पुण्यात झाला. तेथेच त्यांचे बालपण गेले व शालेय शिक्षणही झाले. त्या वेळच्या अतिशय नावाजलेल्या नूतन मराठी विद्यालयाचे ते विद्यार्थी होते.

पुढील उच्चशिक्षणासाठी त्यांनी मुंबईच्या सर ज.जी. कला महाविद्यालयामधील वास्तुकलेच्या विभागात प्रवेश घेतला. स्केचिंगमध्ये प्रावीण्य असलेला एक तडफदार विद्यार्थी म्हणून ते ओळखले जाऊ लागले. येथील शिक्षणानंतर इंग्लंडमध्ये जाऊन त्यांनी रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ ब्रिटिश आर्किटेक्ट्स या सर्वमान्य संस्थेची असोशिएटशिप प्राप्त केली. त्यानंतर त्यांनी पॅरिसचे जगप्रसिद्ध फ्रेंच आर्किटेक्ट ल कॉर्बुझिए यांच्याकडे जाऊन अनुभव घ्यावयाचे ठरविले. त्या वेळी त्या कार्यालयामध्ये ते पहिलेच भारतीय होते.

१९५५ साली ते भारतात परतले. ल कॉर्बुझिए यांचे अहमदाबादमध्ये मिल ओनर्स असोसिएशन व शोधन यांचा बंगला हे दोन प्रकल्प व चंदिगड या शहराची रचना व उभारणीचे काम चालू होते. या कामांवर त्यांचे प्रतिनिधी म्हणून ते काम पाहू लागले. अहमदाबादमध्ये स्थायिक झाल्यावर दोशी यांनी ‘वास्तुशिल्प’ नावाच्या संस्थेची स्थापना करून वास्तुकलेच्या व्यवसायाला सुरुवात केली. सुरुवातीच्या कामावर ल कॉर्बुझिए विचारसरणीची छाप दिसून येत होती. पण पुढे गुजरातच्या मातीत परंपरागत उभारलेले पोळ व त्यांतील लाकडाचे अतिशय प्रमाणबद्ध नक्षीकाम असलेल्या हवेल्यांचा अभ्यास सुरू झाला व त्यांच्या कामामध्ये जाणीवपूर्वक बदल दिसू लागला. काळाच्या ओघात होणारे बदल या संदर्भात ते आधुनिकतेबरोबर पुनरुज्जीवनाची सांगड घालत गेले.

‘इन्स्टिट्यूट ऑफ इंडॉलॉजी’ १९६२ साली बांधण्यात आली. या त्यांच्या पहिल्या प्रकल्पात वेगळ्या विचारसरणीची कल्पना दिसून आली. अहमदाबादच्या लाकडी हवेलीमधील नक्षीकाम, बाहेर डोकावणारे सज्जे व कौलारू छपरे या पारंपरिक वास्तुचिन्हांचा आधुनिकतेबरोबर त्यांनी उत्तम मेळ जुळवून आणला. त्याचप्रमाणे काँक्रीट व विटांचे नैसर्गिक रंग व पोत यांची अनुपम जुळणी त्यांनी घडवून आणली. पुढे होणाऱ्या वास्तुकलेच्या विकासावर त्यांच्या कामाचा व विचारांचा प्रभाव दिसू लागला.

त्यानंतर त्यांना वास्तुसंकल्पनेची महत्त्वाची कामे मिळू लागली. त्याच सुमारास अमेरिकेत वास्तुविशारद लुई कान्ट यांचे फार प्रसिद्ध असे इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट, अहमदाबादचे काम चालू झाले. त्यातसुद्धा दोशी यांचा सहभाग होता.




**भारतीय व्यवस्थापन संस्था**
**(आय.आय.एम.) अहमदाबाद**

बाळकृष्ण दोशी यांनी अनेक वास्तूंची रचना केली आहे. महाराष्ट्र इन्स्टिट्यूट ऑफ डेव्हलपमेंट ॲडमिनिस्ट्रेशन (पुणे), गांधी लेबर इन्स्टिट्यूट (अहमदाबाद), इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट (बंगळूर), नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ फॅशन टेक्नॉलॉजी (नवी दिल्ली), पुण्याचे सवाई गंधर्व स्मारक, त्याशिवाय अनेक वसाहतींचे व शहर उभारण्याचे प्रकल्प त्यांनी केले आहेत. असंख्य लो कॉस्ट हाउसिंग (इंदूर) व विद्याधर नगर (जयपूर) नगरीचा विस्तारित भाग हे त्यांतील काही महत्त्वाचे प्रकल्प आहेत. दोशी यशस्वी वास्तुविशारद तर आहेतच; पण त्याबरोबर नावाजलेले शहर रचनाकार,

द

एक उत्तम शिक्षक व नामांकित संस्थांच्या वास्तूंची रचना करणारे म्हणून ओळखले जातात. त्यांनी स्कूल ऑफ आर्किटेक्चर, स्कूल ऑफ प्लॅनिंग, सेंटर फॉर एन्व्हायर्नमेंट ॲन्ड टेक्नोलॉजी, अहमदाबाद यांसारख्या प्रसिद्ध संस्था प्रस्थापित केल्या आणि त्यांची वास्तुरचनाही केली.

भारतातील समकालीन वास्तुकलेला विश्वप्रतिष्ठा मिळवून देणाऱ्या बोटावर मोजता येणाऱ्या वास्तुविशारदांमध्ये बाळकृष्ण दोशी यांचा समावेश होतो. त्यांच्या कार्याबद्दल त्यांना अनेक पुरस्कार मिळाले. त्यांत १९७६ साली भारत सरकारने त्यांना बहाल केलेला 'पद्मश्री' पुरस्कार, अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ आर्किटेक्चरची फेलोशिप, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ आर्किटेक्ट्सचे सुवर्णपदक, असे देशातील व परदेशांतील असंख्य सन्मान आहेत. त्यांनी वास्तुकला व शहररचना या विषयांवर सहा महत्त्वाचे ग्रंथ व देशातील व परदेशांतील नियतकालिकांतून लेख प्रसिद्ध केले आहेत.

द

हे अष्टपैलू संकल्पनाकार सतत प्रयोगशील राहिले व उतारवयातही कार्यरत राहिल्यामुळे, ते मनाने व वृत्तीने तरुणच राहिले आहेत.

– चिंतामण गोखले

## दोशी, वालचंद हिराचंद

**उद्योगपती**

**२३ नोव्हेंबर १८८२ - ८ एप्रिल १९५३**

☞ **मुख्य नोंद - उद्योग खंड**

विसाव्या शतकाच्या प्रारंभात भारताच्या औद्योगिक प्रगतीचा पाया ज्या भारतीय उद्योगपतींनी घातला, त्यांतील एक महत्त्वाचे नाव आहे वालचंद हिराचंद दोशी.

एकोणिसाव्या शतकात, गुजरातमधील सौराष्ट्र भागातून प्रतिकूल परिस्थितीमुळे दोशी कुटुंब उद्योगासाठी महाराष्ट्रात आले आणि इथेच व्यापारी उद्योग सुरू केले. या दिगंबर जैन, धार्मिक वृत्तीच्या कुटुंबात हिराचंद आणि



राजुबाई या दांपत्याच्या पोटी सोलापूर येथे वालचंद यांचा जन्म झाला. त्यांच्या जन्मानंतर पंधरा दिवसांत मातेचे निधन झाले आणि काकू उमाबाई यांनी त्यांचा पुत्रवत संभाळ केला. बालपणीच त्यांची बुद्धिमान आणि सर्जनशील वृत्ती लक्षात आली आणि वडिलांनी त्यांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरविले. एकत्र धार्मिक कुटुंबामुळे त्यांच्यावर बालवयात सामाजिक बांधीलकीचे पक्के संस्कार झाले. सोलापूर, पुणे, औरंगाबाद येथे त्यांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण झाले. १८९९ साली ते शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाले पण महाविद्यालयात जाऊनही पदवी प्राप्त करता आली नाही. इतिहास आणि अर्थशास्त्र हे विषय घेऊन त्यांनी बी.ए. ला प्रवेश घेतला. पण शिक्षण पूर्ण होण्याआधी एका कौटुंबिक आघातामुळे त्यांना घरी परतावे लागले. घरच्या व्यापारात आणि सावकारीत लक्ष घालावे, भाडे घ्यावे, पण हा उद्योग त्यांना करता येत नाही; या टीकेने व्यथित होऊन त्यांनी उत्पादनक्षेत्रात जायचा धाडसी निर्णय घेतला.

रेल्वेतील एक कारकून लक्ष्मण बळवंत फाटक यांच्या भागीदारीत त्यांनी रेल्वेची लहानमोठी कंत्राटे घेतली आणि भरपूर धन मिळवले. बांधकाम कंत्राटाच्या सर्व व्यावहारिक बाबतीत पारंगत झाल्यावर अधिक मोठी कंत्राटे घेण्यासाठी त्यांनी १९२० साली आपली कंपनी 'टाटा कन्स्ट्रक्शन्स'मध्ये विलीन केली. या कंपनीने पुणे-मुंबई रेल्वेमार्गावर बोरघाटात बांधलेले मोठमोठे बोगदे, तानसा ते मुंबईपर्यंत पाणीपुरवठ्यासाठी घातलेल्या अजस्त्र पाइपलाइन्स, अशी बांधकामे आजही वाखाणली जावीत इतकी परिपूर्ण आहेत.

उत्कृष्टतेचा ध्यास त्यांच्या सर्व कामांत दिसून येत असे. ब्रिटिश अधिकारीही त्यांच्या कामाच्या दर्जाबाबत समाधानी होते. उत्तर भारतात सिंधू नदीवरील कलबाग पूल, ब्रह्मदेशातील इरावती नदीवरील पूल अशी

महत्त्वाची कंत्राटे त्यांना मिळाली. १९२९ साली ते कंपनीचे कार्यकारी संचालक झाले. १९३५ साली टाटांनी आपला भाग विकला, कंपनीचे नाव ‘हिंदुस्थान कन्स्ट्रक्शन कंपनी’ असे ठेवले आणि या कंपनीने बांधकाम व्यवसायावर आपल्या नावाची मोहर उठवली. त्यामागे वालचंद हिराचंद यांचे कष्ट होते.

जल वाहतूक हा व्यवसाय विसाव्या शतकाच्या पहिल्या दोन दशकांत चांगला फोफावला होता. व्यवसायाचा विस्तार विविध उद्योगांत व्हावा म्हणून वालचंद हिराचंद यांनी पहिल्या महायुद्धानंतर १९१९ साली एस.एस. लॉयल्टी ही बोट ग्वाल्हेरचे राज्यकर्ते शिंदे यांच्याकडून विकत घेतली आणि मालवाहतुकीचा प्रारंभ केला. युद्धकाळात लष्करी सामग्रीची ने-आण करण्यात अनेक कंपन्यांनी प्रचंड पैसा मिळवला होता म्हणून अनेक भारतीय या उद्योगात उतरले; पण ब्रिटिश कंपन्यांनी त्यांना व्यवसाय करू दिला नाही. परदेशी कंपन्यांशी भाड्याच्या दराबाबत टक्कर देत वालचंद हिराचंद यांनी आपल्या व्यावसायिक कौशल्याचा हुशारीने वापर करून हे समुद्रातील साहस यशस्वी केले. ‘सिंदिया स्टीम नेव्हिगेशन’ या कंपनीद्वारे उत्तम व्यवहार करून नावलौकिक मिळवला.

१९२९ सालापासून १९५० सालापर्यंत ते या कंपनीच्या प्रमुखपदी होते. महात्मा गांधींनी ‘यंग इंडिया’, ‘हरिजन’ या वृत्तपत्रांतून या कंपनीची ‘पहिली स्वदेशी कंपनी’ असा गौरव केला. प्रकृती अस्वास्थ्यामुळे त्यांनी १९५० साली हे पद सोडले, तेव्हा एकूण किनारी मालवाहतुकीतील २१ टक्के भाग या कंपनीने पटकावला होता. ५ एप्रिल १९१९ रोजी एम.एस. लॉयल्टीने पहिला मुंबई ते लंडन हा प्रवास केला याचा सन्मान म्हणून ५ एप्रिल हा ‘नौदल दिवस’ म्हणून साजरा होतो.

१९३९ साली वालचंद हिराचंद यांची भेट अमेरिकेतील विमान उत्पादकाशी झाली. भारतीय लोकांमध्ये देशाला सर्व उद्योगांत स्वयंपूर्ण करायची ताकद आहे असा विश्वास असणाऱ्या वालचंद यांनी त्या




वेळच्या मैसूर संस्थानचे दिवाण मिर्झा इस्माईल यांच्याशी बोलणी करून पाठिंबा मिळवला. बंगलोरजवळ ‘हिंदुस्थान एअरक्राफ्ट’ या कारखान्यात विमानाचे उत्पादन सुरू झाले. १९४० साली भारत सरकारची त्यामध्ये एक तृतीयांश मालकी होती. १९४२ साली दुसऱ्या महायुद्धाला सुरुवात झाली तेव्हा लष्करी विमानासाठी सुरक्षितता आणि वेगाने विस्तार करायला प्रचंड भांडवलाची गरज निर्माण झाली. हा उद्योग त्या वेळी पूर्ण सरकारी मालकीचा झाला अन् त्याचे नाव ‘हिंदुस्थान एअरोनॉटिक्स लिमिटेड’ असे बदलण्यात आले. आज तिथे जागतिक दर्जाची विमाने बनतात.

जल वाहतूक व्यवसायात पाय रोवल्यावर वालचंद यांनी बोटीच्या बांधणीचा महत्त्वाकांक्षी प्रकल्प हाती घेतला. १९४० साली विशाखापट्टण येथे त्यांनी ‘हिंदुस्थान शिपयार्ड’ची मुहूर्तमेढ रोवली. स्वातंत्र्यानंतर १९४८ साली ‘जलसा’ ही पहिली स्वदेशी बोट बांधण्यात आली. हा व्यवसायही लष्कराशी संबंधित असल्याने, तसेच देशाच्या आर्थिक भरभराटीशी संलग्न असल्याने टप्प्याटप्प्याने १९६१ साली सरकारकडे पूर्णपणे हस्तांतरित झाला.

१९३९-४० सालांच्या सुमारास वाहन उद्योगाचे उज्ज्वल भवितव्य वालचंद यांनी जाणले. १९४० साली ख्रायस्लर कंपनीशी करार करून ते या उद्योगात उतरले. १९४८ साली मुंबईजवळ ‘प्रीमियर ऑटोमोबाइल’ या उद्योगाची सुरुवात झाली. सुटे भाग आयात करून इथे एकत्रित बांधणी केली जाई. पुढे १९५५ साली इटालियन फियाट कंपनीशी करार करून १९५६ साली मोठ्या प्रमाणावर वाहननिर्मिती सुरू झाली.

काही व्यवसायांत त्यांनी पाय रोवायचा प्रयत्न केला; पण अपयश आले, तसे ते उद्योग त्यांनी बंद केले. विमान व्यवसाय त्यांना जमला नाही. तसेच त्यांनी हॉलीवुडला भेट दिली, तेव्हा त्यांना भारतात सिनेस्टुडिओ उभा करायचा होता. व्ही. शांताराम यांच्याशी त्यांची बोलणी झाली; पण प्रत्यक्षात हा प्रकल्प झाला नाही. काही प्रकल्प त्यांनी सुरू केले आणि पुढे वालचंद उद्योग समूहाने ते यशस्वी केले. रावळगाव येथील चॉकलेट निर्मिती, सातारा येथील कूपर इंजिनिअरिंग, कळंब येथील साखर कारखाना, ॲक्मे मॅन्युफॅक्चरिंग हे ते उद्योग होत. पुण्याजवळ वालचंदनगर येथे त्यांनी उद्योगासाठी लागणाऱ्या यंत्रांची निर्मिती सुरू करायची मुहूर्तमेढ रोवली.

साखर कारखान्यासाठी लागणारी यंत्रे तिथे निर्माण होऊ लागली. या सुमारास त्यांची प्रकृती बिघडू लागली. १९४९ साली अर्धांगवायूचा झटका आला अन् १९५० साली ते स्वेच्छेने निवृत्त झाले. त्यांना मुलगा नव्हता. पत्नी कस्तुरीबाई व मुलगी कुसुम असे त्यांचे कुटुंबिय होते. मुलीचे एका धनाढ्य कुटुंबात लग्न झाले. पुढे बंधू लालचंद, गुलाबचंद अन रतनचंद यांनी वालचंद हिराचंद उद्योगसमूहाची भरभराट केली.

वालचंद यांची भारतीय उद्योगाच्या भविष्याबद्दल दृष्टी अजोड होती. काहींनी त्यांना स्वप्ने पाहणारा, चालायला यायच्याआधी धावणारा अशी संभावना केली; पण ते डगमगले नाहीत. त्यांना कुटुंबाकडून आर्थिक पाठबळ नव्हते, तेव्हा त्यांनी जनतेकडून पैसे गोळा करून उद्योग उभे केले. ते माणसे अगदी पारखून निवडत असत आणि त्यांच्यावर पूर्ण विश्वास टाकून काम करून घेत. एखाद्या व्यवसायातील तांत्रिक माहितीची कमतरता असली तरी त्यांची ऊर्जा, धाडस, योजना आखायचे कौशल्य आणि दूरदृष्टी अजोड होती. सचोटी, दर्जा, प्रामाणिकपणा यांमध्ये तडजोड कधीही न केल्याने, त्यांना प्रसारमाध्यमांचा आणि जनतेचा नेहमीच पाठिंबा मिळाला. अगदी थोडा भाग असला तरी विश्वासाने व्यवसायाच्या नेतेपदी त्यांना निवडण्यात येई. ब्रिटिश अधिकाऱ्यांशी त्यांचे मैत्रीपूर्ण संबंध होते. भारत देशावरील त्यांचे प्रेम, निष्ठा वादातीत होती. स्वातंत्र्य चळवळीला त्यांचा सक्रिय पाठिंबा होता. त्यांच्या प्रकल्पांची उद्घाटने स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या नेत्यांकडून होत असत. ब्रिटिश राज्यकर्ते व भारतीय जनता यांच्याशी मैत्रीचा तोल त्यांनी सतत सावरला. ‘मार्शल लॉ’ या सोलापूर येथील गाजलेल्या खटल्यातील आरोपी मल्ल्याप्पा धनदोही, श्रीकिशन सारडा, जगन्नाथ शिंदे, अब्दुल हुसेन यांना सोडवण्यासाठी त्यांनी भगीरथ प्रयत्न केले. गोलमेज परिषदेपर्यंत हा प्रश्न नेला; पण यश आले नाही.

वक्तशीरपणा आणि कामाचा प्रचंड उरक हे त्यांचे गुण सरकार आणि जनतेला विश्वासार्ह वाटत म्हणून त्यांच्या यशस्वी आणि अयशस्वी प्रयत्नांना जनतेने नेहमीच सहकार्य केले. संपूर्ण शाकाहारी असलेले वालचंद यांची राहणी, वेषभूषा अतिशय साधी होती. सेवकांवर अवलंबून राहणे ही त्यांना गुलामगिरी वाटत असे. अनेक गमतीदार किस्से त्यांच्या संग्रही असल्याने आणि ते खुलवून सांगायची हातोटी असल्याने, त्यांच्याभोवतीचे वातावरण नेहमी हास्यपूर्ण, उत्साही असे.

देशाची आर्थिक गुलामगिरी संपावी अन् प्रगती व्हावी ही आकांक्षा त्यांच्या प्रत्येक कृतीतून प्रतिबिंबित होत असे. त्यांनी सामाजिक कार्यांना उदारहस्ते मदत आणि दानधर्म केला. निवृत्तीनंतर त्यांनी पत्नीसह धार्मिक स्थळांना भेटी दिल्या. गुजरातमधील सिद्धपूर क्षेत्री ८ एप्रिल, १९५३ रोजी त्यांची जीवनयात्रा समाप्त झाली.

२३ नोव्हेंबर, २००४ रोजी त्यांची एकशे बाविसावी जयंती होती. त्यानिमित्त भारत सरकारने त्यांच्या सन्मानार्थ टपाल तिकीट काढले. वडिलोपार्जित पैसा नसतानाही जनतेकडून पैसे मिळवून उद्योग उभे करणारा पहिला यशस्वी उद्योगपती, अशी वालचंद हिराचंद यांची नोंद देशाच्या औद्योगिक इतिहासात कायमची राहील.

– प्रा. माधुरी शानभाग

✲ ✲ ✲

ध



## धायगुडे, रामचंद्र गोविंद

**वैद्यकतज्ज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**मार्च १९०३ - ८ ऑक्टोबर १९५४**



डॉ. रामचंद्र गोविंद धायगुडे यांचा जन्म शिरवळजवळच्या 'मोर्वे' गावी, जिल्हा सातारा येथे झाला. प्राथमिक शालेय शिक्षण पुणे येथे झाल्यावर फर्गसन महाविद्यालयामध्ये त्यांनी शिक्षण घेतले व १९२१ साली मुंबईच्या ग्रॅण्ट वैद्यकीय महाविद्यालयामध्ये एम.बी.बी.एस.साठी प्रवेश घेतला. एम.बी.बी.एस. झाल्यावर त्यांनी मुंबईच्या के.ई.एम. रुग्णालयात 'आर.एम.ओ.' म्हणून काम केले.

१९२७ साली ते के.ई.एम. रुग्णालयामधून एम.डी. विकृतीशास्र (पॅथॉलॉजी) च्या परीक्षेत पहिल्या क्रमांकाने उत्तीर्ण झाले. त्यासाठी त्यांना 'प्रिन्स ऑफ वेल्स' सुवर्णपदक आणि 'हंसराज प्रागजी ठाकरसी' शिष्यवृत्ती देऊन सन्मानित करण्यात आले. विशेष म्हणजे, प्रसिद्ध विकृतिशास्त्रतज्ज्ञ डॉ.व्ही.आर. खानोलकर यांचे ते पहिले पट्टशिष्य होत.

त्यानंतर जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयामध्येच विकृतिशास्त्र आणि जंतुशास्त्र विषयाच्या सहाय्यक प्राध्यापक या पदावर त्यांची नेमणूक झाली. जंतुशास्त्र व परजिवीशास्त्र या विषयांत त्यांनी विशेष संशोधन केले. आपल्या ज्ञानाने व शिकवण्याच्या शैलीने त्यांनी सर्वांना मंत्रमुग्ध केले.

त्या काळी ठरावीक वेळेत त्यांना खाजगी प्रॅक्टिस करण्याची मुभा असे; पण त्यांनी आपल्या कामात कधीच कुचराई केली नाही. १९४२ साली डॉ.खानोलकर निवृत्त झाल्यावर ते जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयात विकृतिशास्त्राचे प्राध्यापक झाले. उत्तम प्राध्यापक म्हणून ते विद्यार्थ्यांत अतिशय लोकप्रिय होते. मुंबईत ऑपेरा हाऊस येथे खाजगी प्रॅक्टिस करणारे एक प्रख्यात व नामवंत विकृतिशास्त्र (पॅथॉलॉजिस्ट) म्हणून त्यांची ख्याती होती.

त्यांनी अनेक मान्यवरांच्या वैद्यकीय चाचण्या केल्या होत्या. मुंबई/पुणे येथे असताना राष्ट्रपिता महात्मा गांधींच्या वैद्यकीय चाचण्या ते करीत असत. १९४५ साली अधिष्ठाता म्हणून के.ई.एम. रुग्णालयात त्यांना पाचारण करण्यात आले. त्यानंतर त्यांनी खाजगी प्रॅक्टिस सोडली व जी.एस. वैद्यकीय महाविद्यालय व के.ई.एम. रुग्णालयाच्या कार्यास अक्षरश: वाहून घेतले. अधिष्ठाता म्हणून सर्व विद्यार्थ्यांत त्यांच्याबद्दल आदर असे, तर उत्तम प्रशासक म्हणून त्यांचा दरारापण होता. नेमून दिलेले काम सर्वांनी काटेकोरपणे करावे याकडे त्यांचा कटाक्ष होता व त्यात त्यांना कोणीच रोखले नाही. प्रसिद्ध शल्यचिकित्सक डॉ.ए.व्ही. बालिगा व डॉ.आर.एन. कूपर यांनासुद्धा त्यांनी विद्यार्थ्यांचा अभ्यासक्रम वेळच्यावेळी घेण्याबद्दल समज देण्यास मागेपुढे पाहिले नाही. महापालिकेतील नगरसेवक जर नीट वागले नाहीत, तर त्यांना आपल्या कार्यालयामध्ये ते येऊ देत नसत.

सामाजिक बांधीलकीच्या नात्याने देशस्थ ऋग्वेदी संस्थेचे ते आधारस्तंभ होते. गरजू विद्यार्थ्यांना शैक्षणिक मदत देण्यात ते नेहमीच आघाडीवर असत. १९४९ साली अमेरिकेस भेट देऊन तेथील रुग्णालयाप्रमाणे आपले के.ई.एम. रुग्णालय कसे सुधारेल याकडे त्यांचे

ध

रात्रंदिवस लक्ष असे व त्या दृष्टीने त्यांनी अक्षरशः झपाटल्याप्रमाणे काम केले. डॉ.धायगुडे यांच्याच काळात के.ई.एम.मध्ये 'मज्जाशास्त्र' (न्यूरोलॉजी), 'भौतिकोपचार' (फिजिओथेरपी), अद्ययावत नवीन रक्तपेढी, 'मज्जाशल्यकर्म' (न्यूरोसर्जरी) व 'व्यवसायोपचार' (ऑक्युपेशन थेरपी) हे नवीन विभाग चालू झाले व उत्तम तऱ्हेने कार्यरत झाले.

याच काळात डॉ.धायगुडे यांनी बरेच संशोधन प्रकल्पपण चालू केले व हत्तीरोग (फिलारिॲसिस) या विषयावर प्रबंध लिहिला. १९५१ साली डॉ.धायगुडे यांच्या अध्यक्षतेखाली के.ई.एम. रुग्णालयाची रजत जयंती झाली. त्यानिमित्ताने लहानमोठ्या देणग्यांतून दहा लाख रुपये जमा झाले. त्यांतल्या चार लाख रुपयांच्या गुंतवणुकीतून त्यांनी गरजू व हुशार विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या जाहीर केल्या, तर उरलेल्या सहा लाखांच्या गुंतवणुकीतून पदव्युत्तर संशोधन व शिष्यवृत्त्या यांसाठी योगदान दिले.

जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयाचे एक 'विविध विभागीय नियतकालिक' (मल्टिडिसिप्लिनरी जर्नल) असावे, अशी त्यांची फार इच्छा होती. त्यासाठी त्यांनी खूप प्रयत्न केले. ते नियतकालिक त्यांच्या पश्चात, म्हणजे १९५५ सालापासून चालू झाले व डॉ.एन.एम. पुरंदरे, डॉ.यू.के शेठ, डॉ.सातोस्कर इत्यादी दिग्गजांनी ते पुढे चालू ठेवले.

जी.एस. वैद्यकीय महाविद्यालय व के.ई.एम. रुग्णालय त्यांच्या वेळेपासूनच एक अग्रगण्य संस्था म्हणून नामवंत झाली. डॉ.धायगुडे, हे त्यांचे लोभस व्यक्तिमत्त्व, अविचल ध्येयनिष्ठा, सक्षम नेतृत्व, अविश्रांत प्रयासपूर्ण सेवाकार्य व अतिशय कडक शिस्त यांमुळे इतरांच्याहून अगदी वेगळेच दिसायचे.

अधिष्ठाता म्हणून कार्यरत असतानाच मुंबईतच हृदयविकाराने त्यांचा अकाली मृत्यू झाला.

– डॉ. हेरंब चिंतामण धायगुडे

**संदर्भ :**

*१. सेठ जी.एस. मेडिकल कॉलेज मॅगेझीन; १९४६*

धारप

## धारप, नारायण गोपाळ

**विज्ञान लेखक**

**२७ ऑगस्ट १९२५ - १८ ऑगस्ट २००८**

☞ **मुख्य नोंद - साहित्य खंड**



नारायण गोपाळ धारप यांचा जन्म पुण्यात झाला. रसायनशास्त्रात त्यांनी मुंबई विद्यापीठाची बी.एस्सी. पदवी मिळवली. यानंतर त्यांनी रसायन तंत्रज्ञानात बी.एस्सी. (टेक) केले. मग त्यांनी भारतात आणि आफ्रिकेत नोकऱ्या केल्या. आफ्रिकेतून परत आल्यावर त्यांनी नागपूर येथे व्यवसाय सुरू केला; पण त्यात त्यांना अपेक्षित असे यश मिळाले नाही. मग नागपूरचा गाशा गुंडाळून ते पुण्याला आले. पुण्यात शिकायला येणाऱ्या विद्यार्थ्यांना आणि बदली होऊन आलेल्या नोकरदारांना त्यांनी तात्पुरत्या निवासासाठी लागणाऱ्या पलंग, टेबल, खुर्च्या, कपाटे यांसारख्या गोष्टी भाड्याने देण्याच्या सामानाचे दुकान सुरू केले आणि हा व्यवसाय त्यांनी अखेरपर्यंत केला.

व्यवसाय म्हणून नोकरी करणे किंवा दुकान चालवणे या गोष्टी धारपांनी पोटासाठी केल्या; पण त्यांची खरी आवड होती लिखाणाची. नागपूरला असतानाच त्यांनी विज्ञानकथा लिहायला सुरुवात केली. ही गोष्ट १९५० सालाच्या दरम्यानची. त्या वेळी विज्ञानकथा म्हणजे काय हे लोकांना माहीत नव्हते; कारण मुळात विज्ञानावरच फारसे लिखाण त्या वेळी प्रसिद्ध होत नसे. विज्ञान फारसे अवगत नसल्याने त्यावर आधारित कथांना वाचक मिळणे दुरापास्त होते. धारपांनी आयुष्यात एकूण १५ विज्ञान कादंबऱ्या, तीन विज्ञानकथा संग्रह आणि पाच सामाजिक कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या. विज्ञान साहित्याला आणि सामाजिक कादंबऱ्यांना वाचकांचा फारसा प्रतिसाद मिळत नाही हे पाहून धारप भयकथा आणि गूढकथांकडे वळले आणि हा बाज धारपांच्या

स्वभावाला जुळला आणि वाचकांनाही आवडला. यामुळे लेखक आणि वाचक अशी एक तार जुळून आली.

गूढ कादंबऱ्या आणि कथासंग्रह मिळून धारपांनी पुस्तकांची शंभरी गाठली. चंद्रविलास, नवे दैवत, मृत्युद्वार, पारंब्यांचे जग, साठे फायकस, फायकसची अखेर, ऐसी रत्ने मेळवीन, कपटी कलंदर अशी त्यांच्या लोकप्रिय कादंबऱ्यांची नावे आहेत. जयदेव, कृष्णचंद्र, चक्रवर्ती चेतन, अशोक समर्थ अशी त्यांच्या या रहस्यकथांतील नायकांची नावे आहेत. धारपांनी दरमहा एक, अशा रहस्यकथा लिहायचा प्रयत्न केला; पण तो त्यांना मानवला नाही आणि तो प्रयोग त्यांनी थांबवला. धारपांच्या बहुतेक विज्ञानकथा या परदेशी विज्ञानकथांवर आधारित अशा बेतलेल्या असत. परग्रहावरील आयुष्य हा त्यांचा एक आवडता विषय होता. धारपांनी वनस्पती विचार करू शकतात, त्या बुद्धिमान असतात, या विषयावर तीन कादंबऱ्या लिहिल्या आहेत.

धारप १९५० सालापासून लिहीत होते. त्या वेळी मराठीत विज्ञानकथा लिहिणारे कोणी नव्हते. धारप खऱ्या अर्थाने गूढ आणि भयकथांत स्थिरावले. त्यामुळे धारप लिहीत असलेल्या भय आणि गूढकथा म्हणजेच विज्ञानकथा, असा वाचकांचा समज फार वर्षे होता, तो १९७०च्या दशकात अस्सल विज्ञानकथा छापून येईपर्यंत.

धारप यांचे निधन पुण्यात वयाच्या त्र्याऐंशीव्या वर्षी झाले.

– प्रा. निरंजन घाटे / अ.पां. देशपांडे

✻ ✻ ✻

ध



# नारळीकर, अनंत विष्णू
**भौतिकशास्त्रज्ञ**
**३१ मार्च १९४०**



अतिवाहकतेच्या क्षेत्रात मौलिक कार्य केलेले भौतिकशास्त्रज्ञ अनंत विष्णू नारळीकर यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. भौतिकशास्त्रज्ञ नारळीकरांचे शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षण हे उत्तर प्रदेशातील बनारस येथे झाले. बनारस विद्यापीठातून १९६० साली भौतिकशास्त्रातील पदव्युत्तर पदवी प्राप्त केल्यावर अनंत नारळीकरांनी इंग्लंडला जाऊन केंब्रिज विद्यापीठात 'अतिवाहकता' या विषयात संशोधन केले आणि १९६५ साली पीएच.डी. ही पदवी मिळवली. प्रा. नारळीकरांच्या पीएच.डी.चा प्रबंध हा नायोबियम या मूलद्रव्याच्या आणि त्यापासून तयार केल्या गेलेल्या मिश्रधातूंच्या अतिवाहकतेशी संबंधित होता.

पीएच.डी. मिळवल्यानंतर इंग्लंडमधील लँकेस्टर विद्यापीठात आणि स्वित्झर्लंडमधील जिनिव्हा विद्यापीठात काही काळ संशोधन करून ते भारतात परतले. भारतात आल्यावर १९६९ सालापासून सुमारे तीन वर्षांसाठी त्यांनी कोल्हापुरातील शिवाजी विद्यापीठाच्या भौतिकशास्त्र विभागाच्या प्रमुखपदाची जबाबदारी सांभाळली. १९७२ साली ते टाटा मूलभूत संशोधन संस्थेत अधिव्याख्याता या पदावर रुजू झाले. यानंतर १९७३ साली नवी दिल्ली येथील राष्ट्रीय भौतिकशास्त्र प्रयोगशाळेतील (एन.पी.एल.) अतिवाहकता विभागाचे प्रमुखपद स्वीकारून त्यांनी आपल्या पुढील संशोधनाला सुरुवात केली.

प्रा. नारळीकरांचे संशोधन हे मुख्यत्वेकरून, पदार्थांच्या रासायनिक रचनेतील सूक्ष्म दोषांचा पदार्थाच्या भौतिक गुणधर्मांवर जो परिणाम होतो, त्यावर आधारित आहे. यांत प्रा. नारळीकरांनी पदार्थांच्या रासायनिक रचनेतील आण्वीय पातळीवरील दोषांचा अतिवाहकतेवर होणारा परिणाम सखोलपणे अभ्यासला आहे. गेली काही वर्षे त्यांनी अत्याधुनिक सूक्ष्मदर्शकांतर्फे, अतिवाहकता, चुंबकत्व, इत्यादी गुणधर्म लाभलेल्या विविध पदार्थांच्या पृष्ठभागांचा विशेष अभ्यास केला आहे. अतिवाहकतेवरील संशोधनात विशेष योगदान देणारे प्रा.नारळीकर हे २००० साली राष्ट्रीय भौतिकशास्त्र प्रयोगशाळेतून निवृत्त झाले.

२००० सालापासून प्रा.नारळीकर हे टुर्कू विद्यापीठ (फिनलंड), रेकाह भौतिकशास्त्र संस्था (इस्राएल), पेकिंग विद्यापीठ (चीन), केंब्रिज विद्यापीठ (इंग्लंड), साव कार्लोस विद्यापीठ (ब्राझील) अशा अनेक परदेशी शैक्षणिक संस्थांना पाहुणे प्राध्यापक म्हणून नियमित भेटी देत आले आहेत. प्रा. नारळीकर यांची भारतीय राष्ट्रीय विज्ञान अकॅडमी (इन्सा) या संस्थेत ज्येष्ठ शास्त्रज्ञ आणि फेलो म्हणून नियुक्ती झाली असून, विद्यापीठ अनुदान आयोग आणि अणुशक्ती विभागाच्या संयुक्त विद्यमाने विज्ञान संशोधनासाठी स्थापलेल्या इंदूर येथील केंद्रात पाहुणे प्राध्यापक म्हणूनही त्यांची नेमणूक झाली आहे. प्रा. अनंत नारळीकर यांचे आजवर तीनशेहून अधिक शोधनिबंध आंतरराष्ट्रीय नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. प्रा.नारळीकरांनी अनेक पुस्तकांचे संपादनही केलेले आहे. यांत अतिवाहकतेवरील 'स्टडीज




ऑफ हाय टेंपरेचर सेमिकंडक्टर्स' या प्रदीर्घ मालिकेतील पुस्तकांच्या संपादनाचाही समावेश आहे.

पीएच.डी.साठी संशोधन चालू असतानाच टेट स्मृती पुरस्कार मिळवणारे प्रा.नारळीकर हे १९९३ साली केंब्रिज विद्यापीठातील डी.एस्‌सी. (डॉक्टर ऑफ सायन्स) या पदवीचेही मानकरी ठरले. प्रा. नारळीकर यांना इंडियन क्रायोजेनिक्स कौन्सिलचे चटर्जी सुवर्णपदक १९७७ साली मिळाले होते. मटेरियल्स रिसर्च सोसायटीतर्फे १९९० सालचे अतिवाहकतेवरील संशोधनाचे पारितोषिक देऊन प्रा.नारळीकरांचा विशेष सन्मान करण्यात आला होता. पदार्थविज्ञानाच्या क्षेत्रात आपला आगळा ठसा उमटवणाऱ्या प्रा.नारळीकर यांना भारतीय राष्ट्रीय विज्ञान अकादमीचे १९९६ सालचे होमी जहांगीर भाभा पदक आणि फाय फाउण्डेशनचा २००० सालचा विज्ञान आणि तंत्रज्ञानविषयक पुरस्कार देऊन गौरवण्यात आले आहे.

— डॉ. राजीव चिटणीस

**संदर्भ :**

*१. महाराष्ट्र टाईम्स; दिवाळी अंक, २००१.*

## नारळीकर, जयंत विष्णू
### खगोल शास्त्रज्ञ, विज्ञान लेखक
### १९ जुलै १९३८

जयंत विष्णू नारळीकर यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. नारळीकरांचे शालेय शिक्षण आणि पदवीपर्यंतचे महाविद्यालयीन शिक्षण हे बनारस येथे झाले. त्यांचे वडील विष्णू वासुदेव नारळीकर हे याच बनारस हिंदू विद्यापीठात गणिताचे प्राध्यापक होते. १९५७ साली विज्ञानातील पदवी मिळवल्यानंतर नारळीकरांनी आपले पुढील शिक्षण हे इंग्लंडमधील केंब्रिज विद्यापीठातून घेतले. १९६३ साली फ्रेड हॉएल यांच्या मार्गदर्शनाखाली



नारळीकरांनी पीएच.डी. ही पदवी प्राप्त केली. या पदवीसाठी त्यांनी केलेले संशोधन हे विश्वाच्या विविध प्रारूपांशी संबंधित आहे.

१९७२ सालापर्यंत नारळीकरांनी केंब्रिज विद्यापीठाच्या 'किंग्ज कॉलेज आणि इन्स्टिट्यूट ऑफ थिअरेटिकल अॅस्ट्रॉनॉमी' या संस्थांत अध्यापन आणि संशोधन केले. त्यानंतर ते भारतात परतले आणि टाटा मूलभूत संशोधन संस्थेत रुजू झाले. या संस्थेत सैद्धान्तिक खगोल भौतिकशास्त्रावर संशोधन करणाऱ्या गटाचे ते प्रमुख होते. १९८९ साली आयुका (इंटर युनिव्हर्सिटी सेंटर फॉर अॅस्ट्रॉनॉमी अँड अॅस्ट्रोफिजिक्स) या त्यांच्याच मार्गदर्शनाखाली स्थापन झालेल्या पुणे येथील संस्थेचे ते पहिले संचालक झाले. २००३ साली तेथून निवृत्त झाल्यानंतर एक वर्षाच्या काळासाठी पॅरिस येथील 'कोलेज द फ्रान्स'मध्ये त्यांची 'आंतरराष्ट्रीय प्राध्यापक' म्हणून नियुक्ती केली गेली होती. तेथून परत आल्यावर त्यांना 'आयुका'मध्येच 'एमेरिटस प्रोफेसर' हे सन्माननीय प्राध्यापकपद देण्यात आले.

नारळीकरांचे सुमारे दोनशे संशोधनात्मक निबंध प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांच्या या संशोधनात विश्वशास्त्र, गुरुत्वाकर्षण, गुरुत्वीय अभिरक्त विस्थापन, कृष्णविवरे, श्वेतविवरे अशा विविध अंगांचा समावेश आहे. त्यांचे विश्वाच्या 'स्थिर-स्थिती' प्रारूपाच्या विकासात महत्त्वाचे योगदान आहे. १९४८ साली हर्मन बाँडी, थॉमस गोल्ड आणि फ्रेड हॉएल यांनी मांडलेल्या या प्रारूपानुसार विश्व हे प्रारंभहीन आणि अंतहीन आहे. तसेच, विश्वाची घनता ही अचल असल्याचे हा सिद्धान्त मानतो. विश्वातील दीर्घिका आणि तारे ज्या गतीने नष्ट होत आहेत, त्याच गतीने त्यांची निर्मितीही होत आहे. मात्र, महास्फोट सिद्धान्तावर आधारित प्रारूपाप्रमाणे या प्रारूपानुसारही हे विश्व प्रसरण पावत आहे. या

न



आयुका - पुणे विद्यापीठ परिसर

परिस्थितीत विश्वाची घनता अचल राखण्यासाठी विश्वात पदार्थांची निर्मिती अखंडपणे होत असायला हवी. ही अखंड पदार्थनिर्मिती आइन्स्टाइनच्या व्यापक सापेक्षतेच्या चौकटीत शक्य असल्याचे हॉएल आणि नारळीकर यांनी दाखवून दिले.

सुरुवातीच्या काळात विश्वाचे हे स्थिर-स्थिती प्रारूप महास्फोट सिद्धान्ताला महत्त्वाचा पर्याय ठरले होते. परंतु, महास्फोट सिद्धान्तानुसार अपेक्षित असलेल्या तापमानाचा स्पष्ट पुरावा मिळाल्यामुळे स्थिर-स्थिती प्रारूपाची स्वीकारार्हता कमी झाली. कालांतराने या स्थिर-स्थिती प्रारूपातील त्रुटींचे निराकरण करणारे विश्वरचनेचे एक वेगळे स्थिर-स्थितिसदृश प्रारूप फ्रेड हॉएल, जेफ्री बर्बिज आणि नारळीकरांनी मांडले. स्थिर-स्थिती प्रारूपाच्या या नव्या आवृत्तीनुसार विश्व जरी प्रसरण पावत असले, तरी त्याबरोबरच त्याचे काही प्रमाणात आवर्ती आकुंचनही होत असले पाहिजे. नारळीकरांनी हॉएल यांच्याबरोबर विद्युत गतिशास्त्रातही संशोधन केले. गुरुत्वाकर्षणीय सिद्धान्ताला नवे स्वरूप देणाऱ्या 'समाकृती गुरुत्वाकर्षणा'च्या सिद्धान्तात या संशोधनाने महत्त्वाची भूमिका बजावली. याबरोबरच, नारळीकरांनी वस्तूंच्या गुरुत्वाकर्षणाच्या प्रभावाखाली होणाऱ्या आकुंचनावरही संशोधन केले आहे.

अनेक अवकाशस्थ वस्तूंच्या वर्णपटातील परिचित रेषांची लहरलांबी ही अपेक्षेपेक्षा वेगळी असल्याचे दिसून येते. वर्णपटातल्या रेषांचे हे विस्थापन वेगवेगळ्या कारणांमुळे असते. या विस्थापनाला अवकाशस्थ वस्तूचा निरीक्षकाच्या सापेक्ष वेग, विश्वाचे प्रसरण, वस्तूचे स्वत:चे गुरुत्वाकर्षण, अशा अनेक बाबी कारणीभूत ठरतात. अशाच प्रकारचे विस्थापन किंताऱ्यांच्या (क्वेसार्सच्या) वर्णपटातूनही दिसून येते. किंतारे हे अंतराळातले अतिदूरवरचे तारकासदृश असे प्रचंड ऊर्जेचे स्रोत आहेत. या किंताऱ्यांबाबतीतले विस्थापन हे अपेक्षेपेक्षा खूपच मोठे असल्याचे आढळले आहे. या असंगत विस्थापनामागील कारणेसुद्धा डॉ.नारळीकरांनी गुरुत्वाकर्षणाशी संबंधित आपल्या संशोधनाद्वारे स्पष्ट केली. श्वेतविवरे ही ऊर्जेचे प्रचंड स्रोत असून विश्वातील काही स्फोटक घटनांशी असलेला त्यांचा संबंधही त्यांनी दाखवून दिला.

टॅकिऑनस या प्रकाशापेक्षा जास्त वेगाने प्रवास करू शकणाऱ्या; पण अजूनतरी फक्त सैद्धान्तिक स्वरूपात अस्तित्वात असलेल्या कणांवर होणाऱ्या तीव्र गुरुत्वाकर्षणाच्या प्रभावावरही नारळीकरांनी सैद्धान्तिक स्वरूपाचे संशोधन केले आहे. आपल्या अतिघनस्वरूपामुळे कृष्णविवरांच्या निकट गुरुत्वाकर्षण हे अत्यंत तीव्र असते. परिणामी, कृष्णविवरांतून प्रकाश बाहेर पडू शकत नाही व कृष्णविवरे ही अदृश्य राहतात. पण टॅकिऑनस हे कण जेव्हा कृष्णविवरांत त्याच्या गुरुत्वाकर्षणाच्या प्रभावाखाली ओढले जातात, तेव्हा त्या कृष्णविवराचे अतिघनस्वरूप नष्ट होण्याची शक्यता नारळीकरांनी आपल्या संशोधनातून व्यक्त केली आहे. असे झाल्यास टॅकिऑनसच्या संपर्कात आलेल्या कृष्णविवराला सर्वसाधारण वस्तूचे स्वरूप प्राप्त होऊन ती वस्तू दृश्य स्वरूपात प्रकट होऊ शकेल. यामुळे कृष्णविवरे ही टॅकिऑनसचे अस्तित्व दर्शवण्यास उपयुक्त ठरू शकतील हा महत्त्वाचा निष्कर्ष या संशोधनातून काढता येतो.

१९९९ सालापासून नारळीकरांनी एका वैशिष्ट्यपूर्ण आंतरराष्ट्रीय संशोधन मोहिमेचे नेतृत्व केले आहे. या मोहिमेच्या दोन दशके अगोदर हॉएल आणि नलिनचंद्र

विक्रमसिंघे यांनी पृथ्वीवर पसरत असलेल्या साथीच्या रोगांपैकी काही रोग हे अंतराळातून धूमकेतूंसारख्या अवकाशस्थ वस्तूंद्वारे येणाऱ्या जीवाणूंमुळे होत असल्याची शक्यता व्यक्त केली होती. या शक्यतेचा प्रत्यय घेण्यासाठी ही संशोधन मोहीम आखली गेली होती. या मोहिमेद्वारे केल्या गेलेल्या निरीक्षणांत सुमारे ४१ किलोमीटर उंचीवरही काही जीवाणूंचे अस्तित्व दिसून आले. ह्या मोहिमेला भारतीय अंतराळ संशोधन संघटनेचा सहभाग लाभला आहे.

विज्ञानप्रसाराचे महत्त्व पूर्णपणे जाणून असणाऱ्या नारळीकरांनी आपल्या विषयाशी निगडित असलेल्या लेखनाबरोबरच, सामान्यांना समजेल अशा भाषेत इंग्रजी, मराठी तसेच हिंदीतून विपुल प्रमाणात वैज्ञानिक लेखन केले आहे. त्यांनी लिहिलेल्या किंवा लेखनात त्यांचा सहभाग अथवा संपादन असलेल्या पुस्तकांची संख्या शंभराहून अधिक आहे. यातली जवळपास पंचवीस पुस्तके ही मराठी भाषेतली आहेत. या मराठी वैज्ञानिक पुस्तकांत ‘खगोलशास्त्राचे विश्व’, ‘आकाशाशी जडले नाते’, ‘पोस्टकार्डातून विज्ञान’ यांसारख्या अनेक उल्लेखनीय पुस्तकांचा समावेश आहे. यांतले ‘पोस्टकार्डातून विज्ञान’ हे पुस्तक नारळीकरांकडे शंकानिरसनासाठी आलेल्या असंख्य पत्रांतून जन्माला आलेले आहे.

मराठी विज्ञानकथेच्या क्षेत्रात नारळीकरांनी आपला खास ठसा उमटवला आहे. या क्षेत्रातील त्यांचे पदार्पण नाट्यपूर्ण ठरले. इ.स. १९७४ साली ‘नारायण विनायक जगताप’ यांनी लिहिलेल्या ‘कृष्णविवर’ या कथेला मराठी विज्ञान परिषदेचे पहिले पारितोषिक मिळाले. या स्पर्धेचा निकाल जाहीर झाल्यानंतरच नारायण विनायक जगताप म्हणजेच जयंत विष्णू नारळीकर हे स्पष्ट झाले. आपल्या नावाचा प्रभाव परीक्षकांच्या निर्णयावर पडू नये म्हणून डॉ. नारळीकरांनी आपल्या आद्याक्षरांचा उलटा क्रम वापरून हे टोपणनाव निर्माण केले व या टोपणनावाने ही कथा लिहिली. यानंतर त्यांनी लिहिलेले ‘यक्षाची देणगी’सारखे विज्ञानकथासंग्रह, तसेच ‘प्रेषित’, ‘वामन परत न आला’ यांसारख्या कादंबऱ्या अतिशय लोकप्रिय ठरल्या आहेत. डॉ. नारळीकरांच्या अनेक कथांची अन्य भारतीय भाषांतही रूपांतरे केली गेली आहेत. यांतील काही कथा नाटिकांच्या स्वरूपातही सादर केल्या गेल्या आहेत.

**डॉ. जयंत नारळीकरांची पुस्तके**

डॉ. नारळीकरांना प्रभावी वक्तृत्वाची देणगी आहे. नारळीकर आपल्या विषयावरील सखोल व्याख्याने ज्या परिणामकारकरीत्या देतात, तितक्याच परिणामकारक पद्धतीने ते सर्वसामान्यांसाठी सोप्या भाषेतही व्याख्याने देतात. आकाशवाणी आणि दूरदर्शनवरील अनेक कार्यक्रमांत नारळीकरांचा सहभाग होता. दूरदर्शनने सादर केलेला ‘आकाशाशी जडले नाते’ हा नारळीकरांचा प्रमुख सहभाग असलेला खगोलशास्त्रावरील चर्चात्मक कार्यक्रम अमाप लोकप्रिय झाला होता. या कार्यक्रमात नारळीकरांनी अनेक किचकट खगोलशास्त्रीय संकल्पना सोप्या शब्दांत श्रोत्यांपर्यंत पोहोचवल्या.

नारळीकरांनी विविध शासकीय समित्यांवरही काम केले आहे. १९८६-८९ या काळात ते पंतप्रधानांच्या वैज्ञानिक सल्लागार समितीचे सदस्य होते. भारत-अमेरिका या देशांदरम्यान स्थापन झालेल्या शैक्षणिक

आणि सांस्कृतिक कार्यक्रमाशी संबंधित आयोगावरही त्यांनी भारतातर्फे १९८५-८९ या काळात प्रतिनिधित्व केले. आंतरराष्ट्रीय खगोलशास्त्र संघटनेच्या विश्वरचनाशास्त्रावरील आयोगाचे ते १९९४ ते १९९७ या काळात अध्यक्ष होते.

अनेक राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय संस्थांचे सन्माननीय सदस्य असणाऱ्या नारळीकरांना अनेक राष्ट्रीय, तसेच आंतरराष्ट्रीय सन्मान लाभले. केंब्रिज विद्यापीठात 'रँग्लर', खगोलशास्त्रातील टायसन पदक, अॅडम्स पुरस्कार आणि डॉक्टर ऑफ सायन्स ही पदवी मिळविलेल्या नारळीकरांना युनेस्कोने विज्ञानप्रसाराबद्दल कलिंग पुरस्कार व फ्रान्सच्या खगोलशास्त्रीय संस्थेचे जान्सेन सुवर्णपदक मिळाले आहे.

शांतिस्वरूप भटनागर पुरस्काराने गौरवले गेलेले नारळीकर हे फाय फाउण्डेशनचा राष्ट्रभूषण सन्मान, कोलकात्याच्या एशियाटिक सोसायटीचे दुर्गाप्रसाद खैतान सुवर्णपदक, इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचा इंदिरा गांधी पुरस्कार यांसारख्या अनेक प्रतिष्ठेच्या सन्मानाचे मानकरी ठरले आहेत. केंद्रशासनातर्फे नारळीकरांना पद्मभूषण (१९६५) आणि पद्मविभूषण (२००४) हे पुरस्कार देण्यात आले. इ.स. १९९१ ते १९९४ या काळात नारळीकरांनी मराठी विज्ञान परिषदेचे अध्यक्षपदही भूषवले होते. त्याअगोदर नारळीकर हे मराठी विज्ञान परिषदेच्या जालना येथील इ.स. १९७३ सालच्या विज्ञान संमेलनाचे अध्यक्ष होते. तेव्हा अवघे पस्तीस वर्षांचे असणारे नारळीकर हे विज्ञान संमेलनांच्या इ.स. १९६६ सालापासून इ.स. २००४ सालापर्यंतच्या जवळजवळ चार दशकांच्या इतिहासातले सर्वांत तरुण संमेलनाध्यक्ष ठरले.

- डॉ. राजीव चिटणीस

**संदर्भ :**

१. *दै. नवशक्ती, २९ डिसेंबर १९९६*
२. *चतुरंग संमेलन पत्रिका*
३. *दै. लोकसत्ता, ९ मार्च २००३*
४. *दै. लोकसत्ता; १९ जुलै २००३.*

न

## नारळीकर, विष्णू वासुदेव
**भौतिकशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**
२६ **सप्टेंबर १९०८ - १ एप्रिल १९९१**



केंब्रिज विद्यापीठात 'बी-स्टार रँग्लर' ही पदवी मिळविणारे गणिती, बनारस हिंदू विद्यापीठात गणिताचे विद्यार्थिप्रिय प्राध्यापक, गणिताचे अध्यापन, संशोधन व लेखन करण्यात आयुष्य व्यतीत करणारे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे गणितज्ञ, अनेक पारितोषिकांचे मानकरी आणि संस्कृत, इंग्रजी साहित्याचे व्यासंगी अभ्यासक अशी विष्णू वासुदेव नारळीकर यांची ओळख आहे.

रँग्लर वि.वा. नारळीकरांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांचे वडील वेदशास्त्रसंपन्न वासुदेवशास्त्री हे संस्कृत पंडित आणि प्रवचनकार होते. नारळीकरांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण कोल्हापूर येथे झाले. त्या परीक्षेत कोल्हापूर केंद्रात ते पहिले आले. पुढील शिक्षणासाठी ते मुंबईत आले. रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स (आता विज्ञान संस्था) या संस्थेतून ते १९२८ साली गणित विषय घेऊन बी.एस्सी. झाले. या परीक्षेत ९५.५ टक्के गुण मिळवून त्यांनी एक उच्चांक प्रस्थापित केला. या यशामुळे त्यांना मंगलदास नथुभाई प्रवासी शिष्यवृत्ती मिळाली. याखेरीज त्यांना टाटा शिष्यवृत्तीही मिळाली. कोल्हापूर दरबाराने त्यांना उच्चशिक्षणासाठी आठ हजार रुपये कर्जाऊ दिले.

पुढील शिक्षणासाठी त्यांनी गणित या विषयाचे अध्ययन करण्याचे ठरविले आणि केंब्रिज विद्यापीठातील फिट्झविल्यम हाउसमध्ये ते दाखल झाले. केंब्रिजमधील वास्तव्यात त्यांनी 'लियापाडनोफल सोल्युशन फॉर रोटेटिंग लिक्विड्स' या विषयात प्रा. बेकर यांच्या मदतीने संशोधन केले. त्यांचा संशोधन निबंध 'रॉयल सोसायटी'च्या प्रसिद्ध मासिकात प्रकाशित झाला. त्या लेखाचे महत्त्व सांगणारी प्रस्तावना त्यांचे मार्गदर्शक प्राध्यापक लार्मर यांनी लिहिली होती. त्यांचे 'हाइएस्ट

ॲटॉमिक नंबर्स १' विषयावरील संशोधन १९३२ साली 'नेचर ' मासिकात प्रसिद्ध झाले. या विषयात पदवी परीक्षेत १९३० साली त्यांनी पहिला क्रमांक पटकाविला आणि बी-स्टार रँग्लरचा बहुमान मिळविला. यामुळे त्यांना 'टायसन' पदक आणि 'आयझॅक न्यूटन' ही बहुमानाची, २५० पौंडांची शिष्यवृत्ती मिळाली. केंब्रिजमध्ये विद्यार्थ्यांना एखाद्या विषयावर निबंध लिहावा लागे. उत्कृष्ट ठरलेल्या निबंधांना पारितोषिके दिली जात. नारळीकरांच्या निबंधाला 'रॅले' पारितोषिक देण्यात आले. हे पारितोषिक मिळविणारे ते पहिले भारतीय होते.

आयझॅक न्यूटन शिष्यवृत्तीतून नारळीकरांनी खगोलशास्त्रावर संशोधन केले. या संशोधनात त्यांना सर जोसेफ लार्मर व सर आर्थर एडिंग्टन या जगविख्यात शास्त्रज्ञांचे मार्गदर्शन लाभले. त्यांच्या उत्कृष्ट संशोधन निबंधासाठी नारळीकरांना 'स्मिथ' पारितोषिक मिळाले.

बनारस हिंदू विद्यापीठाचे संस्थापक पं. मदनमोहन मालवीय गोलमेज परिषदेसाठी इंग्लंडला गेले असताना, त्यांनी केंब्रिज येथे जाऊन नारळीकरांची भेट घेतली व तेथील अभ्यास पूर्ण झाल्यावर बनारस विद्यापीठात गणिताचे प्राध्यापक म्हणून येण्याचे आमंत्रण दिले. नारळीकरांनी ते आमंत्रण स्वीकारले आणि केंब्रिजमधील अभ्यास संपल्यावर १९३२ साली ते बनारस विद्यापीठात प्राध्यापक म्हणून रुजू झाले. बनारस विद्यापीठात १९३२ ते १९६० अशी अठ्ठावीस वर्षे त्यांनी गणित विभाग प्राध्यापकाची जबाबदारी पार पाडली.

सर आर्थर एडिंग्टन हे जगविख्यात गणिती, आइन्स्टाइनचा सापेक्षतावाद व विश्वरचनाशास्त्र या विषयांत संशोधन करीत होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली नारळीकरांनी त्या विषयात संशोधन सुरू केले.

बनारस विद्यापीठात रुजू झाल्यावर त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांच्या साहाय्याने या विषयाच्या अभ्यासासाठी व्यापक सापेक्षतावाद संशोधन केंद्र निर्माण केले. त्यांचा एक विद्यार्थी बी.आर. राव याने आइन्स्टाइनच्या सिद्धान्तात सुधारणा करणारी काही नवीन समीकरणे स्थापित केली होती. त्याबद्दल त्याला डॉक्टरेट पदवी



बनारस हिंदू विद्यापीठ

मिळाली. या संशोधनाचे परीक्षण करणारे प्रा. एन्फेल्ड हे आइन्स्टाइनचे प्रमुख सहकारी होते. पुढे त्यांनीच प्रसिद्ध केलेल्या त्यांच्या या विषयावरील ग्रंथात राव-नारळीकर यांच्या रीतीचा सविस्तर उल्लेख केलेला आहे.

बनारस विद्यापीठात रँग्लर नारळीकरांनी आपल्या विद्यार्थ्यांसह 'सापेक्षतावाद', 'युनिफाइड फील्ड थिअरी' इ. विषयांवर संशोधन चालू ठेवले. त्या विद्यार्थ्यांपैकी डॉ. पी.सी. वैद्य, डॉ. के.आर. करमरकर, डॉ. एस.पी. सिंग, डॉ. रामजी तिवारी, डॉ. द.व. मोने हे उल्लेखनीय संशोधन करून प्रसिद्धीस आले. डॉ. पी.सी. वैद्य यांनी आइन्स्टाइनची सूत्रे सोडविण्याची सोपी पद्धत शोधली. त्यांचा हा निबंध फक्त वैद्यांच्याच नावावर प्रसिद्ध करून नारळीकरांनी त्यांचे सर्व श्रेय वैद्यांनाच दिले होते. हा शोध 'वैद्य पद्धती' या नावाने ओळखला जाऊ लागला. त्यांचे विद्यार्थी केवळ पीएच.डी.साठी अभ्यास न करता, त्यांचा व्यासंग सतत चालू ठेवून आपापल्या विद्यापीठात संशोधन करीत होते. आपल्या संशोधन काळात रँग्लर नारळीकरांनी ७२ हून अधिक शोधनिबंध प्रसिद्ध केले होते.

वि.वा. नारळीकरांना निरनिराळ्या विद्यापीठांमधून व्याख्यानांसाठी आमंत्रणे येत. केंब्रिजहून परतल्यावर त्यांना मुंबई विद्यापीठाने १९३३ साली व १९३८ साली सापेक्षतावादावर व्याख्याने देण्यासाठी आमंत्रित केले. १९३९-१९४० या वर्षात त्यांनी पाटणा विद्यापीठात तरंग यांत्रिकी (वेव्ह मेकॅनिक्स) या विषयावर व्याख्याने दिली. ती पाटणा विद्यापीठाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध केली. १९५३ साली इंडियन सायन्स काँग्रेसच्या लखनऊ अधिवेशनात ते

न

गणित विभागाचे अध्यक्ष होते. भारतातील अनेक नामवंत संस्थांनी त्यांना सभासदत्व देऊन त्यांचा गौरव केला.

नारळीकर जसे गाढे विद्वान होते, आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संशोधक होते, उत्तम प्राध्यापक होते, तसेच उत्तम वक्तेही होते. गणितासारखा अवघड विषय सामान्य श्रोत्यांना सुलभ रितीने समजावून देऊन ते मंत्रमुग्ध करीत असत. १९६९ साली नाशिकला झालेल्या मराठी विज्ञान परिषदेच्या चौथ्या संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते. त्या वेळी त्यांनी 'शोध कसे लागतात?' या विषयावर भाषण केले होते.

सन १९६६ मध्ये नारळीकर पुणे विद्यापीठात टिळक प्रोफेसर म्हणून आले. येथे त्यांनी रायनिअन भूमिती व सापेक्षतावाद या विषयांत विद्यार्थ्यांना डॉक्टरेट पदवीसाठी मार्गदर्शन केले.

२६ सप्टेंबर, १९६८ रोजी नारळीकरांना ६० वर्षे पूर्ण झाली. या निमित्ताने त्यांच्या सन्मानार्थ अहमदाबाद येथे विद्यापीठ अनुदान मंडळ, वास्तवशास्त्र संशोधन संस्था व गुजरात विद्यापीठ यांच्या सहकार्याने सापेक्षतावाद, गुरुत्वाकर्षण व विश्वरचना या विषयांवर एक अखिल भारतीय चर्चासत्र १९,२०,२१ फेब्रुवारी, १९६९ रोजी भरले होते. यासाठी प्रा. फ्रेड हॉयल हे इंग्लंडमधून व प्रा. इव्हॅनेत्को हे मॉस्को येथून व्याख्याने देण्यास आले होते. याशिवाय डॉ. जयंत नारळीकर व इतर भारतीय विद्वानांची भाषणे झाली. या व्याख्यानांचे पुस्तक बनारस हिंदू विद्यापीठाने प्रसिद्ध केले.

नारळीकरांच्या पत्नी सुमतीबाई या संस्कृत विषयात एम.ए. झाल्या होत्या. त्यांचे दोन मुलगे जयंत व अनंत हे नामवंत शास्त्रज्ञ झाले. नारळीकर निवृत्त झाल्यानंतर जयंतरावांकडे राहायचे. वयाच्या ब्याऐंशीव्या वर्षी त्यांचे राहत्या घरीच शांतपणे निधन झाले.

- र. म. भागवत

**संदर्भ :**


१. *देशपांडे, अ. पां., संपादक; 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन, २००५.*

२. *देशपांडे. अ.पां.; 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन; २००५.*


न

## निगवेकर, अरुण शंकर

**भौतिकशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**१४ मार्च १९४२**



डॉ. अरुण शंकर निगवेकर हे शिक्षणक्षेत्रातील एक अग्रगण्य व्यक्तिमत्त्व आहे. त्यांचा जन्म आणि शालेय व महाविद्यालयीन शिक्षण कोल्हापूर येथे झाले. त्यांनी आपल्या व्यावसायिक जीवनाची सुरुवात पुणे विद्यापीठातील भौतिकशास्त्र विभागामध्ये केली. पुणे विद्यापीठात डॉ. मांडे यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी 'क्ष' किरणांचा वापर करून स्थायू पदार्थविषयक संशोधन केले. त्यानंतर त्यांनी राष्ट्रीय भौतिक प्रयोगशाळा, नवी दिल्ली, यार्क विद्यापीठ, त्याचप्रमाणे वेस्टर्न ऑन्टॅरिओ विद्यापीठ, कॅनडा येथे संशोधनाचे कार्य केले. पुणे विद्यापीठामध्ये त्यांनी प्रगत पदार्थविज्ञान केंद्राची स्थापना केली. या विषयात संशोधन करून त्यांनी एकवीस विद्यार्थ्यांना एम.फिल. व पीएच.डी.साठी मार्गदर्शन केले. त्याचप्रमाणे आंतरराष्ट्रीय स्तरावर सत्तर शोधनिबंध प्रसिद्ध केले. पुणे विद्यापीठाच्या भौतिकशास्त्र विभागाचे प्रमुख या पदावर त्यांनी जवळजवळ आठ वर्षे काम केले. त्यांच्या कार्यकाळामध्ये भौतिकशास्त्र विभागाची अनेक अंगांनी प्रगती झाली. विद्यापीठातील अनेक समित्यांवर त्यांनी काम केले. त्याचप्रमाणे अनेक विभागांमध्ये योगदान करून त्यांनी उत्कर्षास हातभार लावला.

शैक्षणिक माध्यम संशोधन केंद्रात डॉ. अरुण निगवेकर यांनी केलेले कार्य उल्लेखनीय आहे. पुणे विद्यापीठात कार्यरत असतानाच त्यांनी विद्यापीठ अनुदान आयोगाच्या, त्याचप्रमाणे युनेस्कोच्या अनेक शैक्षणिक कार्यांमध्ये भरीव योगदान दिले. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या भौतिकशास्त्रातील अभ्यासक्रम निर्मिती प्रकल्पाचे प्रमुख म्हणून काम केले. विद्यापीठ

अनुदान आयोगातर्फे केलेल्या ‘फिजिक्स एज्युकेशन’ या नियतकालिकाच्या संपादकपदाची धुरा त्यांनी अनेक वर्षे सांभाळली. या नियतकालिकाला त्यांच्या कार्यकाळामध्ये स्थैर्य आणि प्रतिष्ठा प्राप्त झाली. युनेस्कोतर्फे राबविले जाणारे ‘फाउण्डेशन कोर्स इन फिजिक्स’ या प्रकल्पाचे प्रमुख म्हणून त्यांनी काम केले. त्यांनी केलेल्या कामावर आधारित पुस्तक युनेस्कोतर्फे प्रसिद्ध करण्यात आले आहे. डॉ. निगवेकर हे नॅशनल असेसमेंट अ‍ॅण्ड अ‍ॅक्रेडिएशन कौन्सिल (‘नॅक’) या विद्यापीठ अनुदान आयोगाने उच्चक्षेत्रात गुणवत्ता वाढीसाठी स्थापन केलेल्या संस्थेचे संशोधन संचालक होते.

डॉ. निगवेकर यांनी भारतातील व्यापक व क्लिष्ट अशा उच्चशिक्षण पद्धतीसाठी गुणवत्ता मापन करण्याची सरळ आणि सोपी पद्धत विकसित केली. ‘इंटरनॅशनल नेटवर्क फॉर क्वालिटी अ‍ॅश्युरिंग एजन्सीज इन हायर एज्युकेशन’ (आय.एन.क्यू.ए.एच.ई.) या आंतरराष्ट्रीय संस्थेने या पद्धतीवर नॅकच्या स्थापनेनंतरच्या दुसऱ्याच वर्षात मान्यता दिली. २००४ साली नॅकचा दशकपूर्ती समारंभ झाला. त्या समारंभात भारताचे भूतपूर्व राष्ट्रपती डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम यांनी डॉ. अरुण निगवेकर यांचा ‘उच्च शिक्षणातील गुणवत्ता चळवळीचे जनक’ (फादर ऑफ क्वालिटी मूव्हमेंट इन इंडिया) अशा उद्‌गारांनी गौरव केला.

एप्रिल १९९८ ते सप्टेंबर २००० या कालावधीत डॉ.निगवेकर यांनी पुणे विद्यापीठाचे कुलगुरूपद भूषविले. या काळात त्यांनी विद्यापीठामध्ये नावीन्यपूर्ण उपक्रम सुरू केले. त्याचप्रमाणे, सत्त्याऐंशीव्या इंडियन सायन्स काँग्रेसचे यशस्विरीत्या आयोजन केले. डॉ. निगवेकर हे नऊ वर्षे विद्यापीठ अनुदान मंडळाचे (यू.जी.सी.) सदस्य होते. यु.जी.सी.च्या सदस्यकाळात त्यांनी यु.जी.सी.च्या विकेंद्रीकरणाचा प्रस्ताव मांडला, विकेंद्रीकरण केले व गोवा आणि महाराष्ट्राकरिता विभागीय कार्यालय पुणे विद्यापीठाच्या आवारात आणले. सप्टेंबर २००० ते जुलै २००२ या काळात त्यांनी विद्यापीठ अनुदान आयोगाचे उपाध्यक्ष या पदावर काम केले. त्या काळात दहाव्या पंचवार्षिक योजनेतील उच्चशिक्षणाबाबतचे धोरण निश्चित केले.

जुलै २००२मध्ये त्यांची विद्यापीठ अनुदान आयोगाचे अध्यक्ष या सर्वोच्च पदावर नेमणूक झाली. हा कार्यभार त्यांनी सप्टेंबर २००५पर्यंत सांभाळला. त्यांच्या कारकिर्दीमध्ये त्यांनी विद्यापीठांना जोडणारे जाळे (नेटवर्क) प्रस्थापित केले. त्याचप्रमाणे, सोळा मिरर साईट्स तयार करण्याची योजना त्यांनी कार्यान्वित केली. एकूण सोळा ठिकाणी संशोधनविषयक साहित्य साठवून ठेवणे शक्य झाल्यामुळे विद्यापीठाच्या संशोधनाला बळकटी आली. डॉ. अरुण निगवेकर यांनी आपल्या कार्याचा ठसा भारतातील उच्चशिक्षणावर निश्चितपणे उमटविला आहे. डॉ. अरुण निगवेकरांच्या कुलगुरुपदाच्या कालावधीत १९९९ साली पुणे विद्यापीठाचा सुवर्णमहोत्सव साजरा झाला. त्या वेळी पुणे विद्यापीठाचा इतिहास तयार करून घेतला. तसेच, ‘जीवन गौरव’ प्रथा सुरू केली.

२००३ साली यू.जी.सी.चा सुवर्णमहोत्सव ते यू.जी.सी.चे अध्यक्ष असताना झाला. यू.जी.सी.ला नवीन बोधचिन्ह व बोधवाक्य याच काळात दिले गेले. देशातील सोळा ई.एम.आर.सी.चे त्यांनी ‘इ-लर्निंग अ‍ॅण्ड मल्टिमीडिया कन्सोर्टियम फॉर एज्युकेशन कम्युनिकेशन’ उभे केले.

त्यांना अनेक सन्मान प्राप्त झालेले आहेत. त्यांमध्ये १९८४ साली विद्यापीठ अनुदान आयोगाचे ‘राष्ट्रीय व्याख्याता’ पारितोषिक, १९९१ साली ‘सर्वोत्कृष्ट शिक्षक’ पारितोषिक, १९९३ साली ‘आस्पेन ऑनर’ पारितोषिक, १९९६ साली ‘एफ.आय.ई. फाउण्डेशन’ पारितोषिक, १९९८ साली भारतीय विद्याभवनचा ‘अ‍ॅड.डी.आर. नगरकर फाउण्डेशन’ पारितोषिक, १९९९ साली ‘स्वामी विवेकानंद’ पारितोषिक, ‘रोटरी व्होकेशनल एक्सलन्स’ पारितोषिक, ‘वायस’ पारितोषिक, आणि २००२ साली ‘दि सेंटेनरियन मॅन ऑफ द इयर’ पारितोषिक, मिळाले, तर तिलका मांझी

न

भागलपूर विद्यापीठ, नागार्जुन विद्यापीठ, गुरू नानक देव विद्यापीठ इत्यादी विद्यापीठांची 'डॉक्टरेट' ही पदवी मिळाली आहे.

निवृत्तीनंतरही ते नवनवीन उपक्रमांत सहभागी होत आहेत. जागतिकीकरणाच्या पार्श्वभूमीवर अनेक नवनवीन संधी उपलब्ध होत आहेत. ह्या संधी मिळविण्यासाठी विद्यार्थ्यांनी नवीन क्षेत्रांचा शोध घेणे आवश्यक आहे. परंतु हे होण्यासाठी पारंपरिक शिक्षणाच्या व्यतिरिक्त शिक्षण देणाऱ्या संस्था निर्माण व्हायला हव्यात, हा त्यांचा विचार ॲनिमेशन, गेमिंग, ब्रॉडकास्ट मीडिया या विषयांवर तरुणांना प्रशिक्षण देण्यासाठी 'सीमलेस एज्युकेशन' ही संस्था स्थापन करून त्यांनी प्रत्यक्षात आणला आहे.

-डॉ. पंडित विद्यासागर

## नेने, यशवंत लक्ष्मण
**कृषिशास्त्रज्ञ**
**२४ नोव्हेंबर १९३६**



यशवंत लक्ष्मण नेने यांचा जन्म मध्यप्रदेशात ग्वाल्हेर येथे झाला. त्यांचे शालेय आणि बी.एस्सी. (ॲग्रिकल्चर) पर्यंतचे शिक्षण तेथेच झाले. १९५७ साली त्यांनी आग्रा विद्यापीठातून एम.एस्सी. पदवी मिळवली. त्यानंतर अमेरिकेतील इलिनॉय विद्यापीठातून त्यांनी १९६० साली पीएच.डी. मिळवली. त्यांचा संशोधनाचा विषय 'वानसविकृतिविज्ञान आणि विषविज्ञान' हा होता. वानसविकृतिविज्ञान म्हणजे पिकांवरील रोगनियंत्रणाचे विज्ञान. पीएच.डी. झाल्यावर त्यांनी चौदा वर्षे उत्तर प्रदेशातील पंतनगर विद्यापीठात अध्यापनाचे काम केले. त्यांपैकी शेवटची पाच वर्षे ते विद्यापीठाच्या वानसविकृतिविज्ञान विभागाचे प्रमुख होते. १९७४ साली आंध्रप्रदेशातील पाटनचेरू येथील आंतरराष्ट्रीय पीक संशोधन संस्थेत (इक्रिसॅट) 'वानसविकृतिविज्ञान' विभागाच्या प्राचार्य पदावर त्यांची निवड झाली. १९८० साली डाळीमध्ये सुधारणा घडविण्याच्या प्रकल्प विभागाची सूत्रेही त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आली. याच संस्थेत त्यांनी १९८६ ते १९८९ या काळात द्विदल धान्यविभागाचे संचालक, तर १९८९ ते १९९६ या काळात उपमहासंचालक म्हणून काम केले.

डाळींमध्ये सुधारणा घडविण्याच्या प्रकल्पाचे ते प्रमुख होते. त्या काळात डॉ. नेने यांनी त्यांच्या सहकारी शास्त्रज्ञांच्या मदतीने 'म्लान' या रोगाला तोंड देणाऱ्या हरभऱ्याच्या जाती विकसित केल्या. याकरिता डाळीचे सुधारित बियाणेही शेतकऱ्यांना उपलब्ध करून दिले. याचा परिणाम म्हणून हेक्टरी ३७५ कि.ग्रॅ. उत्पादनाऐवजी १००० कि.ग्रॅ. उत्पादन मिळवता आले. त्यावर पडणाऱ्या 'म्लान' आणि 'वोझोटी' रोगांवर मात करण्यात यश मिळविले. याकरिता कमी उंचीच्या नवीन जाती विकसित करून दिल्यामुळे कीटकनाशकांचा सहज वापर करता येऊ लागला. पीक तीन-चार महिन्यांत तयार होत असल्यामुळे तुरीच्या शेंगा खुडून ते पीक तसेच ठेवून, एकाच झाडापासून वर्षात दोन ते तीन वेळा शेंगा तोडायची सोय झाली आणि परिणामी, हेक्टरी २००० कि.ग्रॅ.पर्यंत पीक घेता आले, जे पूर्वी हेक्टरी ६०० कि.ग्रॅ. होते. त्यापुढेही प्रगती साधताना संकरित तुरीच्या जाती विकसित केल्या; तद्वतच खूप पाऊस पडल्यावर त्याचा दुष्परिणाम होऊ न देता, त्यावर तोडगा काढला. पीक उंच ओळीवर लावायचे आणि बाजूला खाच ठेवायची अशा पद्धतीने जास्तीचे पाणी जमिनीत मुरायची सोय करून दिली. त्यामुळे पिकांना होणारा जास्त पाण्याचा त्रास टाळला गेला.

त्यांना तांदळावरील खैरा रोगावर केलेल्या संशोधनाबद्दल १९६७ साली फूड अँड ॲग्रिकल्चर ऑर्गनायझेशनचा पुरस्कार मिळाला. तसेच, 'गव्हावरील रोगाचे निदान' या कामाबद्दल १९७१ साली त्यांना 'डॉ. नॉर्मन बोरलॉग' आणि 'डॉ. आर.जी. अँडरसन पारितोषिक' मिळाले. वनस्पतींच्या रोगनिदानातील

त्यांच्या संशोधनासाठी ‘जीरसानिधी पारितोषिक’ मिळाले. या क्षेत्रात हा राष्ट्रीय पातळीवरील सर्वोच्च सन्मान समजला जातो. नंतर त्यांना ओमप्रकाश भसीन पुरस्कार मिळाला.

डॉ. नेने यांनी आंतरराष्ट्रीय पातळीवरील सल्लागार, वक्ते, परिसंवादाचे अध्यक्ष आणि ‘द्विदल शेंगांवरील रोग’ या विषयावरील लेखक, अशा वेगवेगळ्या जबाबदाऱ्या यशस्विरीत्या पार पाडल्या. वानसविकृतिविज्ञान आंतरराष्ट्रीय संस्थेचे ते सभासद असून अनेक आंतरराष्ट्रीय वैज्ञानिक परिषदांमध्ये त्यांनी आपले शोधनिबंध सादर केले आहेत. भारतीय वैज्ञानिक संघटनेमध्येही त्यांचे योगदान लक्षणीय आहे. भारतीय वानसविकृतिविज्ञान संस्थेचे कार्यकारिणी सभासद व संचालक मंडळाचे सदस्य, भारतीय केंद्रीय कीटक संशोधन समितीचे सभासद, ‘बुरशी नियंत्रण’ या विषयावरील शिबिराचे संचालक, अशा प्रकारे त्यांनी निरनिराळ्या जबाबदाऱ्या सांभाळल्या. त्यामुळेच १९८० साली त्यांना भारतीय वानसविकृतिविज्ञान संस्थेचे सन्माननीय सभासदत्व मिळाले, तर १९८५ व १९८६ साली त्यांनी त्या संस्थेचे अध्यक्षपदही भूषविले.

असे विविध संस्थांचे काम सांभाळत असताना, डॉ. नेने यांचे संशोधनकार्यही सुरूच होते. त्यावर त्यांनी विपुल लेखनही केलेले आहे. त्यांचे एक स्वतंत्र पुस्तक असून त्यांनी दोन पुस्तके संपादित केली आहेत. त्यांचे ८४ शोधनिबंध आंतरराष्ट्रीय दर्जाच्या विविध वैज्ञानिक नियतकालिकांत प्रसिद्ध झाले आहेत.




१९९१ साली जुन्नर येथे भरलेल्या चोविसाव्या मराठी विज्ञान संमेलनाचे डॉ. नेने हे अध्यक्ष होते. डॉ. नेने १९९६ साली इक्रिसॅटमधून निवृत्त झाले. त्यांनी एशियन ॲग्रो हिस्टरी फाउण्डेशन ही संस्था सुरू केली असून ते त्याचे अध्यक्ष आहेत. आशियातील शेतीवरच्या इतिहास संकलनाचे काम ही संस्था करते. ‘वृक्षायुर्वेद’ ह्या मूळ संस्कृत ग्रंथाचे भाषांतर या संस्थेने १९९६ साली प्रसिद्ध केले.

— दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**

१. *देशपांडे, अ. पां., संपादक; ‘विज्ञान आणि वैज्ञानिक’; मनोविकास प्रकाशन; २००५.*

✻ ✻ ✻

न




## पंत, आदिती

**जीवशास्त्रज्ञ, समुद्रशास्त्रज्ञ**

**५ जुलै १९४३**



भारताच्या दोन अंटार्क्टिक मोहिमांमध्ये सहभाग असलेल्या आणि आघाडीच्या सागरी विज्ञान संशोधक असलेल्या आदिती पंत यांचा जन्म नागपूरला झाला. साताऱ्याजवळील औंध संस्थानाचे अधिपती श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी हे त्यांचे आजोबा. आदिती पंत यांचे वडील बॅ. आप्पासाहेब पंत मुत्सद्दी होते. भारताचे राजदूत म्हणून अनेक देशांमध्ये त्यांनी कार्य आणि वास्तव्य केले होते. साहजिकच आदिती पंत यांना विविध ठिकाणी जाऊन शिक्षण पूर्ण करावे लागले. सुरुवातीला त्यांचे शालेय शिक्षण गोवन पब्लिक स्कूल, नैरोबी (केनिया) येथे झाले. त्यानंतर दिल्ली पब्लिक स्कूल आणि लोरेटो कॉन्व्हेंट स्कूल (दार्जिलिंग) येथे त्यांनी माध्यमिक शालेय शिक्षण पूर्ण केले. सीनियर केंब्रिज ही शालान्त परीक्षा त्यांनी १९५९ साली आंध्रप्रदेशमधील ऋषी व्हॅली स्कूलमधून दिली. नॉर्थ पॉइंट कॉलेज (कलकत्ता) मधून त्या इंटरसायन्स परीक्षा उत्तीर्ण झाल्या.

बी.एस्सी. पदवीपरीक्षेसाठी त्या पुण्याच्या वाडिया महाविद्यालयामध्ये दाखल झाल्या. १९६३ साली रसायन, वनस्पती, प्राणिशास्त्र हे विषय घेऊन त्या प्रथम श्रेणीमध्ये बी.एस्सी. पदवीपरीक्षा उत्तीर्ण झाल्या. १९६३-१९६५ या वर्षामध्ये नॉर्वेमधील ऑस्लो विद्यापीठात त्यांनी पदव्युत्तर शिक्षण घेतले. त्यासाठी त्यांनी वरवर परस्परविरोधी गणले गेलेले गणित आणि जीवशास्त्र हे विषय निवडले होते. या ठिकाणी त्यांना नॉर्वेजियन भाषा थोडीफार अवगत झाली. त्याच सुमारास त्यांना युनिव्हर्सिटी ऑफ हवाई (यू.एस.ए.) येथे संशोधन करण्यासाठी ईस्ट-वेस्ट सेंटर येथे एक शिष्यवृत्ती मिळाली. तेथील डिपार्टमेंट ऑफ मरीन बायॉलॉजीमध्ये प्रो. मॅक्सवेल दोटी यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी १९६६-१९६९ दरम्यान कानेओहे या सागरी प्रदेशात संशोधन केले. ते अतिसूक्ष्म सागरी वनस्पतींशी संबंधित होते. या ठिकाणी त्यांना एम.एस. ही पदवी मिळाली. सागरी जीवांमधील प्रकाश संश्लेषणाच्या (फोटो सिंथेसिसच्या) प्रक्रियांविषयी त्यांनी सखोल अध्ययन केले.

पीएच.डी.चे संशोधन करण्यासाठी त्यांना १९६९ साली इंग्लंडमध्ये 'एस.ई.आर.सी.' शिष्यवृत्ती मिळाली. युनिव्हर्सिटी ऑफ लंडनमध्ये त्यांना प्रो. जी.ई. फॉग (एफ.आर.एस.) यांनी मार्गदर्शन केले. परदेशातील दोन्ही पदव्यांसाठी केलेले त्यांचे संशोधन सागरी सूक्ष्मजीव आणि सागरी वनस्पती यांच्यामधील प्रकाश संश्लेषणाच्या क्रिया-प्रक्रियांशी संबंधित होते. १९७२ साली पीएच.डी. मिळवल्यावर भारतात राहून संशोधन करण्याची त्यांची इच्छा होती. त्यानुसार, त्यांनी गोवा येथील राष्ट्रीय सागरी विज्ञान संस्थेमध्ये (नॅशलन इन्स्टिट्यूट ऑफ ओशनोग्राफी, एन.आय.ओ.) 'पूल ऑफिसर' म्हणून कामाला सुरुवात केली. पृथ्वीवरील सर्वात प्रचंड प्रमाणावर अव्याहतपणे चालू असलेल्या प्रकाश संश्लेषणाच्या मूलभूत क्रिया-प्रक्रियांबद्दल खूप कुतूहल असल्यामुळे, त्यांनी त्याच विषयावरील संशोधन

चालू ठेवले. भारताच्या तिसऱ्या अंटार्क्टिक संशोधनाच्या मोहिमेत त्या विषयाचे संशोधन करायचे ठरले होते. साहजिकच त्यांची १९८३-१९८४च्या अंटार्क्टिक मोहिमेवर जाणाऱ्या संशोधकांच्या तुकडीमध्ये निवड झाली.

अंटार्क्टिकावर जाऊन संशोधन करण्यासाठी भारतीय संशोधकांमध्ये प्रथमच दोन महिलांचा समावेश करण्यात आला होता. दुसरी महिला संशोधक होती डॉ. सुदीप्ता सेनगुप्ता. डॉ. हर्ष गुप्ता यांच्याकडे मोहिमेचे नेतृत्व होते. त्या वर्षी 'दक्षिण गंगोत्री' हे उन्हाळी सागरी विज्ञान संशोधन केंद्र उभारले गेले होते. त्यामुळे त्यांना भरपूर अनुभव मिळाला. भारताच्या पाचव्या अंटार्क्टिक मोहिमेत त्यांना पुन्हा एकदा (१९८५-१९८६) सहभागी होण्याची संधी मिळाली. गोव्याच्या प्रयोगशाळेत त्यांनी पुढील चार ते पाच वर्षात त्यांचे काही जीवशास्त्रीय प्रकल्प पूर्ण केले.

१९९० साली पुण्याच्या राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेत (एन.सी.एल.) त्यांनी पुढील संशोधन करायचे ठरविले. क्षारयुक्त सागरी पाण्यातील काही सूक्ष्मजीव औद्योगिक दृष्टीने उपयुक्त जैविक पदार्थांची निर्मिती करतात. काही जीवाणूंच्या गुणधर्मांचा उपयोग आपल्याला करून घेता येतो. पंत यांनी हायड्रोकार्बनचे विघटन करू शकणाऱ्या नोकार्डिओपसिस वर्गीय सूक्ष्मजीवांवरील संशोधन केले. सागरी पाण्यात तेलवाहू जहाजांमुळे तेलाचे तवंग साचतात. तेलाचे हे जलप्रदूषण जर हायड्रोकार्बनचे विघटन करणाऱ्या जंतूंमार्फत कमी करता आले, तर सागरी जीवांची हानी कमी होऊ शकते आणि त्यामुळे पर्यावरणाची हानी कमी प्रमाणात होईल. अशा संशोधनामुळे बरीच मूलभूत माहिती मिळाली. एका अस्पर्जिलसवर्गीय बुरशीकडून पेक्टिन नामक कर्बोदकाचे विघटन होते; कारण ती बुरशी पॉलिगॅलॅक्टोयुरोनेस नावाचे विकर (एन्झाइम) जास्त प्रमाणात बनवते. यारोविया लिपोलिटिका नावाचा एक यीस्टचा प्रकार आहे. द्रवपदार्थाच्या पृष्ठभागाचे गुणधर्म बदलू शकणारी रसायने बनवण्याची क्षमता त्या



**दक्षिण गंगोत्री - सागरी विज्ञान संशोधन केंद्र**

यीस्टमध्ये आहे. बरेचसे सूक्ष्मजीव सागरी पाण्यातून विलग करण्यात आले आहेत. पंत यांनी प्रयोगशाळेत अशा उपयुक्त सूक्ष्मजीवांच्या गुणधर्मांचे संशोधन केलेले आहे.

१९९० ते २००३ या काळात राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेत संशोधन करीत असताना, त्यांनी सागरी पर्यावरणाशी संबंधित असलेल्या एका जागतिक प्रकल्पात सक्रिय भाग घेतलेला होता. सागरी सूक्ष्मजीवसृष्टी कार्बन-डाय-ऑक्साइडचा कसा, किती आणि केव्हा उपयोग करून जैवपदार्थांची निर्मिती करतात, यासंबंधीचे संशोधन त्यांनी केले. त्यासाठी त्यांना मुख्यत्वे अरबी सागरात प्रत्यक्ष जहाजावर जाऊन प्रयोग करावे लागले. प्रकाश संश्लेषण ही जीवसृष्टीतील एक खूप व्यापक जैवरासायनिक प्रक्रिया असल्यामुळे, निवडक जीवशास्त्रीय प्रयोग त्यांनी हिंदी महासागरात आणि बंगालच्या उपसागरात दीर्घकाळ (१९९३-१९९८) केले होते. काही सागरी एकपेशीय सूक्ष्मवनस्पती आणि विशिष्ट जीवाणू यांचा जीवनक्रम परस्परावलंबी असतो. पंत यांनी जीवसृष्टीतील अशा काही वनस्पती आणि जीवाणूंचे संशोधन केले होते. त्यांचे एकूण कार्य लक्षात घेऊन सरकारने त्यांना मानाचे 'अंटार्क्टिक पारितोषिक' प्रदान केले आहे.

पंत यांनी अनेक विद्याशाखांतर्गत विद्यार्थ्यांना पीएच.डी. पदवीसाठी मार्गदर्शन केले आहे. त्यांच्या काही वैज्ञानिक निष्कर्षांवर आधारलेली एकस्वे (पेटंटस्) त्यांनी घेतली आहेत. तसेच, आघाडीवरील शास्त्रीय नियतकालिकांमध्ये त्यांनी सुमारे ५० शोधनिबंध प्रसिद्ध

प

केले आहेत. राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेत जीवरसायनशास्त्र विभागातून २००० साली सेवानिवृत्त झाल्यावर, पुणे विद्यापीठातील वनस्पतिशास्त्र विभागात मानद शास्त्रज्ञ म्हणून त्यांनी संशोधन आणि अध्यापनाचे कार्य चालू ठेवले. संगीताचे सूर ऐकता ऐकता नानाविध विषयांवरील पुस्तकांचे सतत वाचन करणे, हा त्यांचा एक छंद आहे. अनेक क्षेत्रांत कार्य करणारे स्नेहांकित गोळा करून त्यांच्याशी संवाद साधणे, योगसाधना करणे त्यांना खूप आवडते. निसर्गाचा यथेच्छ आस्वाद घेण्यासाठी भटकंती करण्याची हौस त्यांनी दीर्घकाळ जोपासलेली आहे.

— डॉ. अनिल लचके

## परांजपे, रघुनाथ पुरुषोत्तम

**गणितज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**१६ फेब्रुवारी १८७६ - ६ मे १९६६**



पुरातन धार्मिक ग्रंथांचे पुन:पुन्हा वाचन करणारे म्हणजे ‘पारायण जप्ये’ म्हणून परांजपे कुलनाम असलेल्या आणि शेती व पिढीजात भिक्षुकीचा व्यवसाय करणाऱ्या घरात परांजपे यांचा जन्म झाला. त्यांना दीर्घायुष्याचा वारसा आईवडिलांकडून, तर शारीरिक व मानसिक क्षमतेचा वारसा आईकडून मिळाला. परांजपे यांच्या घराण्यात वेदाभ्यासाची परंपरा असल्याने चौथ्या इयत्तेनंतर मुलाला वैदिक शिक्षण देण्याचे त्यांच्या वडलांनी ठरविले होते. परंतु अभ्यासात मुलाची प्रगती उत्तम असल्यामुळे त्याला इंग्रजी विद्या शिकू द्या, असा शाळेच्या मास्तरांनी आग्रह धरल्याने परांजप्यांची शाळा चालू राहिली. पुढे त्यांचे आतेभाऊ भारतरत्न महर्षी धोंडो केशव कर्वे यांनी त्यांच्या शिक्षणात रस घेतला म्हणूनच ते दापोली व मुंबईतील शालेय शिक्षणानंतर पुण्यातील फर्गसन महाविद्यालयात उच्चशिक्षण घेऊ शकले. शाळेत तसेच बी.एस्सी.पर्यंतच्या प्रत्येक परीक्षेत ते सतत पहिला वर्ग आणि गणितात पहिला क्रमांक मिळवीत गेले.

मुंबईला माध्यमिक शाळेमध्ये असतानाच त्यांना पाठ्यपुस्तकेतर वाचनाची सवय लागली होती. त्यात इतिहास, मेकॉलेचे निबंध, मिलचे ‘सबजेक्शन ऑफ विमेन’, स्पेन्सरचे ‘एज्युकेशन’ अशी पुस्तके असत, तर फर्गसन महाविद्यालयात आल्यावर ना. गोपाळकृष्ण गोखले, प्रा. भानू, प्रा. वासुदेवराव केळकर इत्यादी व्यासंगी प्राध्यापकांचा त्यांच्यावर जो प्रभाव पडला, त्यामुळे वर्गातल्या विषयांशी संबंधित स्कॉटच्या इतर कादंबऱ्या, ‘लाइफ ऑफ स्कॉट’, ‘हिस्टरी ऑफ रोम’, ‘हिस्टरी ऑफ बॉटनी अँड फिजिऑलॉजी ऑफ प्लांट्स’, डार्विनचे ‘ओरिजिन ऑफ स्पेसीज’, अशी अवांतर पुस्तके वाचण्याची लागलेली ही सवय केंब्रिजच्या विद्यार्थिदशेतदेखील त्यांना उपयोगी पडली.

परांजपे बी.एस्सी. झाले त्या वर्षी लगोलग त्यांना विलायतेला जाण्यासाठी हिंदुस्थान सरकारची शिष्यवृत्ती मिळणार नव्हती. म्हणून त्यांनी इंटर आर्ट्स होण्यात व फर्गसन महाविद्यालयाने दिलेल्या विद्यावृत्तीच्या मोबदल्यात इंटरला गणित शिकवण्यात एक वर्ष व्यतीत केले. नंतर, १८९६ साली जेव्हा त्यांना ही शिष्यवृत्ती मिळाली, तेव्हा आपल्या महाविद्यालयातल्या कोणाही विद्यार्थ्याला यापूर्वी इंग्लंडला जाण्याची अशी संधी मिळाली नव्हती म्हणून महाविद्यालयाच्या सर्व विद्यार्थ्यांनी एकच जल्लोष तर केलाच, आणि ते मुंबईला जाण्यास निघाले तेव्हा वसतिगृहातील १०० विद्यार्थ्यांनी पुण्यापासून खडकीपर्यंत त्यांच्यासोबत रेल्वेने प्रवास करून त्यांना हार्दिक निरोप दिला.

केंब्रिज विद्यापीठाच्या ज्या अभ्यासक्रमाला ‘मॅथेमॅटिकल ट्रायपॉस’ म्हटले जाते, त्यासाठी परांजपे यांनी १८९६ सालच्या ऑक्टोबर महिन्यात सेंट जोन्स महाविद्यालयात प्रवेश घेतला. तेव्हा या अभ्यासक्रमाचे दोन भाग होते. पैकी परांजपे यांच्या काळात, पहिल्या भागात विशेष प्रावीण्यासह (ऑनर्स) उत्तीर्ण होणाऱ्या उमेदवारांची क्रमवारी लावून पहिला क्रमांक

मिळविणाऱ्या उमेदवाराला 'सीनियर रँग्लर' ही उपाधी मिळे. म्हणून निकालाच्या यादीत जास्तीत जास्त वरचा क्रम, विशेषत: पहिला क्रमांक मिळविण्यासाठी विद्यार्थ्यांची आपापसात तीव्र चढाओढ असे, आणि वर्गातील व्याख्यानांव्यतिरिक्त महाविद्यालयात शिकविणाऱ्या प्राध्यापकांकडून सखोल तयारी करवून घेण्यासाठी खाजगीरीत्या खास मार्गदर्शन घेण्याची अत्यंत आवश्यकता असे. तसे मार्गदर्शन परांजपे यांनी वेब नावाच्या प्राध्यापकांकडून घेतले होते. पुढे विद्यापीठाने १९०९ सालापासून क्रमवारी लावण्याची प्रथा बंद केली.

परांजपे यांच्या वेळी ट्रायपॉसच्या पहिल्या भागात प्रावीण्यासह उत्तीर्ण होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रत्येकी तीन तासांच्या १४ प्रश्नपत्रिका द्याव्या लागत. पहिल्या चार दिवसांत शुद्ध व उपयोजित गणिताच्या प्राथमिक भागावर सात प्रश्नपत्रिका तर उरलेल्या सात आणखी चार दिवसांत त्याच विषयांत प्रगल्भ अभ्यासावर द्यावयाच्या, अशी विभागणी असे. मात्र एक आठवड्यानंतर पहिल्या परीक्षेत प्रावीण्य संपादन करतील तेवढेच विद्यार्थी दुसऱ्या परीक्षेत बसण्यास पात्र धरले जात. दोन्ही परीक्षेच्या प्रश्नपत्रिका प्रदीर्घ असत. अशा स्थितीत ज्याची तयारी उत्कृष्ट, तोच मोठया मुश्किलीने त्यातील सगळे सैद्धान्तिक प्रश्न सोडवू शके आणि त्याखालच्या उपप्रमेयांवरील उदाहरणांवर विचारमंथन करून ती सोडवायला जेमतेम वेळ उरत असे. परिणामी, अत्यंत हुशार विद्यार्थ्यांचेसुद्धा प्रश्नपत्रिकेतील काही प्रश्न सोडवून होत नसत. त्याशिवाय, प्रत्येक भागात शेवटची प्रश्नपत्रिका वीस अवघड उदाहरणांची असे आणि ती ज्याला पूर्णपणे सोडविता आली, असा एकही विद्यार्थी ट्रायपॉस परीक्षेच्या इतिहासात तोपर्यंत तरी न आढळल्याचे परांजपे यांनी नमूद केले आहे. खुद्द परांजपे या प्रश्नपत्रिकेतील फक्त सहाच उदाहरणे सोडवू शकले होते.

एवंगुणविशिष्ट ट्रायपॉस परीक्षेचा प्रावीण्यासह पहिल्या भागाचा निकाल १३ जून १८९९ रोजी लागला आणि यशस्वी उमेदवारांच्या क्रमवारीत परांजपे यांच्याबरोबर जॉर्ज बर्टविसल हा 'गोरा' विद्यार्थीदेखील त्यांच्या तोडीचा निघाल्याने, विद्यापीठाने दोघांनाही पहिला क्रमांक देऊन त्या स्थानाचे 'सीनियर रँग्लर' हे अभिधान विभागून दिले. यानंतर ज्यांना गणिताच्या एखाद्या भागात विशेषज्ञता मिळवायची असेल, असे रँग्लर ट्रायपॉसच्या दुसऱ्या भागासाठी प्रवेश घेत असत. १९०० साली दिलेल्या या भागाच्या परीक्षेतही पहिल्या वर्गात येण्याचा आपला रिवाज परांजपे यांनी सोडला नाही.

सीनियर रँग्लर ही उपाधी मिळवून हिंदी लोकदेखील पाश्चात्त्यांच्या तुलनेत बुद्धिमत्तेत यत्किंचितही कमी नाहीत हे दाखवून देणारा परांजपे यांचा हा विक्रम त्रिखंडात गाजला आणि त्याचे तेजोवलय त्यांच्या चेहऱ्याभोवती आजन्म राहिले व त्यामुळे त्यांना उच्चपदांचे विविध मानसन्मान मिळत गेले.

परांजपे यांच्या नेत्रदीपक यशाने लॉर्ड कर्झनसारख्या करड्या व्हाइसरॉयनेदेखील त्यांच्या अभिनंदनाप्रीत्यर्थ फर्गसन महाविद्यालयाच्या प्राचार्यांना तार पाठविली आणि तोपर्यंत ज्या जागा फक्त इंग्रजांसाठी राखीव ठेवल्या जात असत अशांपैकी इंडियन एज्युकेशन सर्व्हिसमधील मोठ्या पगाराची एक जागा हिंदुस्थान सरकारने परांजप्यांना देऊ केली होती. परंतु विलायतेला जाण्यापूर्वी परांजपे आजीव सेवक म्हणून डेक्कन एज्युकेशन सोसायटीशी बांधले गेलेले असल्यामुळे संस्थेने जरी त्यांना या बंधनातून मोकळे करण्याची तयारी दाखविली, तरी परांजपे यांनी फर्गसन महाविद्यालयातच राहण्याचा निश्चय कायम ठेवून आपला शब्द फिरवला नाही. स्वाभाविकपणे त्यांच्या या कृतीने सर्व ज्येष्ठ आजीव सदस्यांनी एकमताने रँ. परांजपे यांची १९०२ साली, वयाच्या अवघ्या सव्विसाव्या वर्षी फर्गसन महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून नियुक्ती केली.

वीस वर्षांहून अधिक काळ फर्गसन महाविद्यालयाचे प्राचार्य, तीन वर्षे पुणे नगरपालिकेचे निर्वाचित सभासद (१९१४-१९१७), दहा वर्षांहून अधिक काळ (१९१३-२३/२६) मुंबई कायदे कौन्सिल्सचे सभासद, पैकी तीन वर्षे (१९२१-१९२३) मंत्री, करविवेचन व इतर सरकारी

प

समित्यांचे सभासद (१९२४-१९२७), लंडन येथे इंडिया कौन्सिलचे सभासद (१९२७-१९३२), लखनऊ विद्यापीठाचे कुलगुरू (१९३२-१९३८ ऑस्ट्रेलियात भारताचे पहिले उच्चायुक्त (१९४४-१९४७), पुणे विद्यापीठाचे कुलगुरू (१९५६-१९५९) अशी अनेक सन्माननीय पदे परांजपे यांनी भूषविली.

तसेच त्यांना पुढील सीनियर रँग्लर झाल्याने सेंट जोन्स महाविद्यालयाने १९०१ साली सहा वर्षांसाठी 'फेलो' म्हणून त्यांची निवड केली, तर १९४५ साली त्याच महाविद्यालयाने मानद फेलो म्हणून त्यांचा बहुमान केला. परांजपे दिवंगत झाले तेव्हा या सेंट जोन्स महाविद्यालयाने आपले निशाण अर्ध्यावर उतरवून त्यांना आदरांजली वाहिली.

फर्गसन महाविद्यालयात गणित शिकवताना निरनिराळ्या दृष्टिकोनातून प्रश्नाकडे कसे पाहावे, त्याचा विचार कसा करावा, तो सोडविण्यासाठी कशी झटापट करावी ते विशद करून ते मुलांच्या विचारांना चालना देत आणि केंब्रिज पद्धतीने शक्यतो मुलांकडूनच उत्तरे काढून घेत असत. अगदी नाइलाज झाला तरच स्वत: उत्तरे सांगत. त्यांच्या या शिकवण्याच्या पद्धतीमुळे उदाहरणांची उकल करणेच नव्हे, तर जीवनात पुढे येणाऱ्या समस्यांशी सामना करून कसा मार्ग काढावा, याचेच शिक्षण विद्यार्थिवर्गाला मिळत असे. शिवाय गणिताचा जो भाग वर्गात शिकवला जाई, त्याचा इतिहास अथवा पार्श्वभूमी सांगून मुलांच्या मनात त्या विषयासंबंधी ते कुतूहल निर्माण करीत असत. थोडक्यात गणिताचे प्राध्यापक आणि फर्गसनचे प्राचार्य या भूमिका निभावताना त्यांनी विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्यांचे खरे शिक्षण केले.

गणितावरील पाठ्यपुस्तके लिहिण्यात स्वतंत्र बुद्धीला व स्वकर्तृत्वास वाव कमी असतो आणि त्यात इतर लेखकांच्या पुस्तकातील मजकुरांची फेरजुळणी अथवा उचलेगिरी केली जाते, म्हणून ते कधी पाठ्यपुस्तके लिहिण्याच्या फंदात पडले नाहीत. त्याऐवजी पाश्चात्त्य नियतकालिकांतून येणाऱ्या गणिताच्या नवनवीन दालनात होणाऱ्या प्रगतीची ते माहिती करून घेत असत. मात्र, हिंदी गणितशास्त्राचा इतिहास लिहिण्याचा त्यांचा संकल्प होता. त्यासाठी ते संस्कृतचा अभ्यासही करत होते. परंतु, कॉलेज व सोसायटीच्या कारभारातील गुंतवणूक आणि वेळोवेळी अंगावर पडलेल्या विद्यापीठीय व शासकीय जबाबदाऱ्या यांमुळे त्यांना लेखनासाठी वेळ काढता आला नाही. त्याचबरोबर, देशात उच्चशिक्षणाचा प्रसार करणे महत्त्वाचे आहे, हा ना. गोखले यांचा उपदेश पटल्यामुळे, गणितात पुढे काही भरघोस कृती करण्याची ईर्षा आणि वकूब असून प्राचार्यपदाची धुरा सांभाळून महाविद्यालयाचाच उत्कर्ष करण्यासाठी त्यांनी आपल्या सर्वशक्ती खर्ची टाकल्या आणि फर्गसन महाविद्यालयाची इतकी प्रगती केली, की पुण्याबाहेरचे विद्यार्थीसुद्धा फर्गसनमध्ये नाव घालण्यास आतुर असत. विशेषत: परांजपे यांच्या गणितातील कीर्तीमुळे खास गणिताच्या अभ्यासासाठी फर्गसनमध्ये दाखल होऊन पुढे रँग्लर झालेल्या ग.स. महाजनी, न.म. शहा, शिवेश्वरकर यांचा या संदर्भात उल्लेख करता येईल.

फर्गसन महाविद्यालयात विद्यार्थी म्हणून प्रवेश घेतल्यापासूनच परांजपे यांच्या तल्लख बुद्धिमत्तेची ना. गोखले यांना जाणीव झाली. त्यामुळेच ते परांजप्यांच्या अभ्यासाकडे लक्ष देऊ लागले. त्यांच्याकडून निबंध लिहून घेऊन त्यांना ते तपासून देऊ लागले, अभ्यासाला पूरक अशी कोणती पुस्तके वाचावीत, ते सांगू लागले. अशी हळूहळू गोखल्यांशी जवळीक निर्माण झाली, म्हणूनच गणिताच्या पुढील अभ्यासासाठी परांजपे यांना विलायतेला जाण्याची संधी मिळावी, म्हणून त्यांच्या हुशारीची न्या. रानडे यांच्याजवळ तारीफ करून त्यांना हिंदुस्थान सरकारची शिष्यवृत्ती रानड्यांच्या शिफारशीने मिळवून देण्यात गोखले यांनी पुढाकार घेतला होता. विद्यार्थिदशेत आणि पुढे फर्गसनचे प्राचार्य झाल्यावर परांजप्यांना गोखल्यांचा जो सहवास घडला, त्यामुळे त्यांच्या मनावर गोखल्यांच्या नेमस्त अथवा उदारमतवादी राजकीय मतप्रणालीचा प्रभाव पडला. परंतु गोखल्यांच्याबद्दल त्यांच्या मनात वेगळाच भाव होता.

प

म्हणूनच १९१६ साली एक स्वयंसेवक म्हणून ते गोखल्यांबरोबर लखनऊ काँग्रेसला गेले.

शिक्षणक्षेत्र सोडून परांजपे जरी पूर्णवेळ राजकारणात उतरले नाहीत, तरी त्यांच्याकडे जी मानाची पदे चालून आली त्यांची शान राखून त्यांनी आपल्या नेमस्त वृत्तीला अनुसरून त्या-त्या प्रसंगी निर्णय घेतलेले आढळतात. उदाहरणार्थ, फर्गसनचे प्राचार्य असताना, इतर विद्यार्थ्यांचा विरोध डावलून एका महार मुलास पूर्ण नादारी देऊन महाविद्यालयातच नव्हे, तर वसतिगृहातसुद्धा प्रवेश दिला, तर मंत्रिपदाच्या काळात ज्या शाळा अस्पृश्य मुलांना त्यांच्या जातीमुळे पक्षपाती वागणूक देतील, त्यांचे सरकारी अनुदान बंद करण्याचा इशारा दिला. १९१३ साली राज्यपाल नियुक्त सदस्य म्हणून मुंबई कायदे कौन्सिलवर जाताना, नेहमीच सरकारी बाजूला राहीनच असे नाही, या अटीवर ते पद स्वीकारले आणि खरोखरच १७ पैकी १६ वेळा विरोधी मत नोंदवून आपला शब्द खरा केला. मात्र परंपरागत वतने नष्ट करण्याच्या प्रश्नी सरकार पक्षास पाठिंबा देऊन त्यांनी आपला समाजवादी दृष्टिकोन दाखवला. तसेच कौन्सिलच्या पुढील काळात त्यांनी प्राथमिक शिक्षकांचे वेतनमान सुधारणे व १९२३ साली सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा कायदा मंजूर करून घेणे, ही कामे केली. सारांश, ही सर्व कृती म्हणजे ना. गोखले यांच्या पठडीत परांजप्यांचा पिंड तयार झाला, त्या प्रागतिक विचारसरणीचे हे द्योतक होय.

– प्रा. स. पां. देशपांडे

**संदर्भ :**

१. *देशपांडे, स.पां.; 'रँग्लरचं ग्लॅमर'; ग्रंथाली प्रकाशन; २०००.*

## परांजपे, कपिल हरी

**गणितज्ञ**

**१९ मार्च १९६०**

कपिल हरी परांजपे यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांची आई माणक परांजपे एल्फिन्स्टन महाविद्यालयात फ्रेंच भाषा शिकवित असे आणि वडील हरी कृष्ण परांजपे



सिडनेहॅम महाविद्यालयात अर्थशास्त्र शिकवित असत. पुढे ते दोघेही दिल्लीत स्थायिक झाल्याने कपिल परांजपे यांचे शालेय शिक्षण दिल्लीच्या शाळांमध्ये झाले.

कपिल परांजपे यांनी आय.आय.टी. प्रवेश परीक्षेत गुणवत्ता यादीत स्थान मिळूनसुद्धा गणित या विषयाच्या आवडीमुळे कानपूर आय.आय.टी.त गणित विषय घेऊन एम.एस्सी. केले.

लहान वयातच परांजपे यांना गणित व भौतिकशास्त्राची गोडी लागली. याचे श्रेय ते आपले गुरुजन, पालक आणि वडिलांच्या संग्रहातील पॉप्युलर सायन्स व रशियन गणिताची पुस्तके यांना देतात. कानपूर येथील प्रज्ञावंत गुरू, विद्यार्थिमित्र, सहकारी यांच्याशी चर्चामंडळात सखोल चर्चा करताना त्यांनी गणिताबरोबरच भौतिकशास्त्र, संगणक, विज्ञान, संगीत, राजकारण, तत्त्वज्ञान व समाजजीवन यांचाही अभ्यास केला. कोणत्याही विषयाच्या गाभ्याकडे जाऊन संशोधन करण्याची सवय परांजपे यांना लागली, त्यामुळेच त्यांचा दृष्टिकोन विकसित होत गेला.

आय.आय.टी. कानपूरनंतर १९८२ साली कपिल परांजपे मुंबईला टाटा मूलभूत संशोधन संस्थेमधील (टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फंडामेंटल रिसर्चमध्ये) गणित विभागात आले. १९८९ ते १९९१ साली ते परदेशी जाऊन आले. १९९४ साली परांजपे बंगळुरु येथील टाटा इन्स्टिट्यूटच्या विभागात गेले. १९९६ सालापासून ऑगस्ट २००९ सालापर्यंत कपिल परांजपे यांनी चेन्नईच्या इन्स्टिट्यूट ऑफ मॅथेमॅटिकल सायन्सेसमध्ये संशोधन केले आणि ऑगस्ट २००९ सालापासून ते चंदीगडच्या मोहाली येथील इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स एज्यूकेशन ॲण्ड रिसर्च (आयझेर) मध्ये प्राध्यापक म्हणून काम करीत आहेत. त्यांच्या पत्नी सुदेष्णा याही आयझेरमध्ये भौतिकशास्त्र शिकवितात.

प

बैजिक भूमिती (अल्जिब्राईक जॉमेट्री), विशेषत: बैजिक चक्रे (अल्जिब्राइक सायकल्स) हा परांजपे यांचा प्रमुख संशोधनाचा विषय असून त्यांनी त्यावर वीस शोधनिबंध लिहिलेले आहेत. हे शोधनिबंध नावाजलेल्या देशी व परदेशी नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. विषयाच्या गाभ्यात जाऊन 'संशोधनाची' सवय असल्याने 'बैजिक चक्रे' व 'हॉज उपपत्ती' यांतील परस्परसंबंधावर त्यांनी सखोल संशोधन केले. परिणामी क्ले मॅथेमॅटिक्स इन्स्टिट्यूटने 'हॉज' उपपत्तीची निवड पारितोषिकपात्र म्हणून जाहीर केली.

सोपे दृष्टान्त देऊन गणिती विषयाची सूक्ष्म छटा उकलून दाखवण्याच्या त्यांच्या हातोटीमुळे परांजपे यांचे हे संशोधन चांगलेच नावाजले गेले. गणिताच्या अनेक शाखांची त्यांनी आपल्या संशोधनाशी सांगड घातली. त्यांपैकी अंकगणितावर लिहिलेला 'अ जॉमेट्रिक कॅरॅक्टरायझेशन ऑफ ॲरिथमॅटिक व्हरायटीज' हा २००२ साली प्रसिद्ध झालेला त्यांचा शोधनिबंध विशेष गाजला. १९९९ साली त्यांना बिर्ला तरुण वैज्ञानिक पुरस्कार मिळाला, तसेच त्यांना २००४-२००५ सालचा शांतिस्वरूप भटनागर पुरस्कारही मिळालेला आहे. त्यांच्या संशोधनामुळे अनेक ठिकाणी गणिती कार्यक्रमांत सहभागी होण्याची संधी त्यांना प्राप्त झाली. त्यात कानपूर, म्हैसूर, पुणे, मुंबईची टाटा मूलभूत संशोधन संस्था या भारतीय स्थानांचा समावेश आहे. पॅरिस, शिकागो, इसेन येथील विद्यापीठे, 'मॅक्स प्लॅन्क इन्स्टिट्यूट ऑफ मॅथेमॅटिक्स', 'कॅलिफोर्निया इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी' या संस्थांतून त्यांनी बराच काळ संशोधन केले. हर्मन वाईल (जर्मन), अलेक्झांडर ग्रॉथेडिक (फ्रान्स), ऑस्कर झरिस्की (अमेरिका), डेव्हिड हिल्बर्ट (जर्मन) यांचे मार्गदर्शन त्यांना मिळाले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली अनेक उमेदवार पीएच.डी. करीत आहेत.

— मृणालिनी साठे

**संदर्भ :**

१. *मराठी विज्ञान परिषद - पत्रिका, दिवाळी अंक; २००५.*

## परांजपे, गोपाळ रामचंद्र
**भौतिकशास्त्रज्ञ**
**१३ जानेवारी १८९१ - ६ मार्च १९८१**



प्रा. गोपाळ रामचंद्र परांजपे हे भौतिकशास्त्राचे नामवंत प्राध्यापक आणि मराठी भाषेतून शास्त्रीय विषयांवर लेखन व प्रसार करणारे वैज्ञानिक होत. ते 'सृष्टिज्ञान' मासिकाचे संस्थापक व अनेक वर्षे संपादक होते. मराठीमध्ये विज्ञान परिभाषानिर्मितीसाठी अखंड झटणारे कृतिशील व्यक्तिमत्त्व ही त्यांची विशेष ओळख होय.

प्रा. परांजपे यांचे शालेय शिक्षण पुणे येथे झाले. १९०७ साली त्यांनी पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयातून बी.एस्सी. पदवी संपादन करण्यासाठी प्रवेश घेतला. १९०८ साली प्रा. के.रा. कानिटकरांनी 'शास्त्रीय उपकरण निर्मिती' वर्ग सुरू केला. त्यामध्ये गो.रा. परांजपे व ना.म. आठवले या दोन विद्यार्थ्यांना 'व्हिमशर्ट स्थिर विद्युत उपकरण' बनविण्याचे काम देण्यात आले. या यंत्राचा प्रत्येक भाग त्यांनी आपल्या हातांनी बनवायचा होता. त्यासाठी धातुकाम, काचेला भोके पाडणे व यंत्राची जुळणी करणे ही सर्व कामे त्यांनी पार पाडली.

हे दोघेही पुढे विज्ञान विषयांचे प्राध्यापक झाले. पण प्रयोग स्वत: हाताने करावयाचा, त्याची उपकरणे स्वत: बनवायची, ती मोडली तर दुरुस्त करावयाची हे महाविद्यालयात पहिल्याच वर्गात मिळालेले शिक्षण त्यांना आयुष्यभर उपयोगी पडले व असे करण्याचे उत्तेजन त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांनाही दिले. अत्यंत साध्या उपकरणातून वैज्ञानिक तत्त्व कसे उपयोगात आणता येते याचे पुढील उदाहरण उद्बोधक आहे.

पुढे प्रा. परांजपे मुंबईच्या विज्ञान संस्थेत प्राध्यापक झाले. त्या काळी कोणतीही विज्ञान-तंत्रविषयक समस्या उत्पन्न झाली तर शासन विज्ञान संस्थेची मदत घेत असे.

प

विजापूरच्या गोलघुमटाला हादरे बसत असत; ते कशामुळे बसतात हे शोधण्याचे काम प्रा. परांजप्यांकडे आले. गोलघुमटाजवळून रेल्वे जात असे. त्यामुळे हादरे बसत असतील, असा कयास होता. त्याची खात्री करण्यासाठी प्रा. परांजपे आपल्या विद्यार्थ्यांसह गोलघुमटाच्या बाल्कनीत रात्रीच्या वेळी बसले. कारण ती आगगाडी रात्री जात असे. पाण्याने काठोकाठ भरलेली बादली बाल्कनीत ठेवून ते गाडीची वाट पाहत बसले. गाडी जवळून जाऊ लागताच बादलीतील पाण्यावर कंदिलाचा उजेड पाडून ते निरीक्षण करूलागले. बादलीतील संथ पाण्यात तरंग उठू लागले. गाडी निघून गेल्यावर १५ मिनिटांनी तरंग थांबून पाणी संथ झाले. ह्या प्रयोगावरून गोलघुमटाला हादरे कशामुळे बसतात, हे निश्‍चित करता आले. (याच वेळी भूकंपमापनाच्या उपकरणाचा शोध लागला असला, तरी ते सर्वत्र उपलब्ध नव्हते.)

१९१२ साली बी.एस्सी. झाल्यानंतर गो.रा. परांजपे पुढील शिक्षणासाठी जर्मनीला गेले. १९१४ साली पहिले महायुद्ध सुरू झाले. तेव्हा भारतातील विद्यार्थ्यांना तेथे अटक झाली; पण इंग्रजांविरुद्ध बंड करण्याच्या अटीवर त्यांना सोडून देण्यात आले. परत आल्यावर गो.रा. परांजपे बंगळुरू येथे टाटा संशोधन संस्थेत (सध्याची इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स) या संस्थेत डॉ. वॉटसन यांच्या हाताखाली रसायनशास्त्रात संशोधन करू लागले. नारळाच्या करवंटीपासून केलेल्या कोळशाचा विषारी धूर शोषून घेण्यासाठी कितपत उपयोग होईल, याविषयी ते प्रयोग करत होते. याच वेळी प्रा. परांजपे यांना इंडियन एज्युकेशन सर्व्हिसमध्ये कमिशन मिळाले.

१९२० साली मुंबईत ‘रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स’ नंतरची ‘इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स’ ऊर्फ विज्ञान संस्था) ही विज्ञानाचे उच्चशिक्षण देणारी संस्था सरकारने सुरू केली. गो. रा. परांजपे यांना या संस्थेत भौतिकशास्त्राचे प्राध्यापकपद मिळाले व ते तेथे अध्यापन करू लागले. पुढे ते तेथे विभागप्रमुख झाले. पूर्वी या संस्थेच्या प्राचार्यपदावर नेहमी गोरा इसम नेमला जात असे. त्या ठिकाणी प्रा. परांजपे हे पहिले भारतीय प्राचार्य झाले. मुलांना ते उत्तम शिकवीतच; पण मुलांनी स्वत: प्रयोग करावेत म्हणून त्यांनी प्रयोगशाळा, उपकरणे दुरुस्त करण्यासाठी कार्यशाळा सुरू केली. त्याखेरीज मुलांनी स्वत: निबंध लिहावेत व चर्चा करावी यांकरिता चर्चामंडळे काढली. जेव्हा नामवंत वैज्ञानिक मुंबईत येत तेव्हा त्यांची व्याख्याने ते आपल्या संस्थेत आयोजित करीत. अशा रीतीने विद्यार्थ्यांची सर्वांगीण प्रगती व्हावी यासाठी ते सतत प्रयत्न करीत असत. त्यांच्या हाताखाली शिकलेले होमी भाभा, एम.जी.के. मेनन, रँग्लर वि.वा. नारळीकर, प्रा. भा.मा. उदगावकर इ. विद्यार्थी पुढे भारताला ललामभूत ठरले.



**गो. रा. परांजपे यांची पुस्तके**

विज्ञान शिक्षण मराठीतून व्हावे, त्यासाठी पारिभाषिक शब्द मराठीत निर्माण व्हावेत, सर्वसामान्य लोकांसाठी मराठीतून विज्ञान विषयावर विपुल लेखन व्हावे, ही त्यांची कळकळीची इच्छा होती. त्यासाठी त्यांनी पुण्यातील नामवंत प्राध्यापक व इतर तज्ज्ञ लोकांची सभा घेतली. या सभेत मराठीत विज्ञानविषयक मासिक सुरू करावे असे ठरले. त्याप्रमाणे, १९२८ साली ‘सृष्टिज्ञान’ हे मराठी शास्त्रीय मासिक सुरू झाले. त्याची सर्व संपादकीय जबाबदारी गो.रा. परांजपे यांनी स्वीकारली.

प

मासिकासाठी स्वत: परांजपे यांनी व प्रा. दि.धों. कर्वे, प्रा. आजरेकर, प्रा. आवटी, डॉ. भाजेकर इत्यादींनी लेखन करावयास सुरुवात केली. सृष्टिज्ञान मासिकाचे कार्य प्रा. परांजप्यांनी सतत ५३ वर्षे केले व या काळात डॉ. मो.वा. चिपळोणकर, डॉ. गो.रा. केळकर, डॉ. श्री.द. लिमये, प्रा. क.वा. केळकर, डॉ. वा.द. वर्तक इत्यादी अनेक तज्ज्ञांना मराठीत लेखन करण्यास उत्तेजन दिले. 'सृष्टिज्ञान'मध्ये येणारे लेख शास्त्रीयदृष्ट्या अचूक असावेत, तसेच त्यांची भाषा सर्वांना सहज समजेल अशी सोपी असावी, यांवर त्यांचा कटाक्ष असे. त्यांनी स्वत:ही अशा प्रकारे शेकडो लेख लिहिले. त्यात भौतिकशास्त्रावर २६० लेख आहेत, तसेच ६१ शास्त्रज्ञांची चरित्रे आहेत.

मराठीतून शास्त्रीय लेखन करण्यासाठी विविध शास्त्रांची मराठी परिभाषाही निर्माण करणे जरुरीचे होते. हाही त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय होता. त्यासाठी सृष्टिज्ञानमध्ये त्यांनी पारिभाषिक शब्दसंग्रह प्रसिद्ध करावयास सुरुवात केली. १९६६ साली 'मराठी विज्ञान परिषद' स्थापन झाली. त्यात त्यांनी हिरिरीने भाग घेतला.

प

पुणे मराठी विज्ञान परिषदेचे ते अध्यक्ष होते. १९६८ साली मराठी विज्ञान परिषदेच्या 'मासिक पत्रिके'च्या पहिल्या अंकाचे प्रकाशन तेव्हाचे शिक्षणमंत्री मधुकरराव चौधरी यांच्या हस्ते झाले. तेव्हा केलेल्या भाषणात प्रा. परांजपे यांनी पारिभाषिक शब्दसंग्रह शासनाने प्रसिद्ध करावेत अशी सूचना केली. तिला अनुसरून शासनातर्फे भाषा संचालनालय स्थापन करण्यात आले. पुढे यथावकाश प्रत्येक शास्त्रीय विषयांवर शासनातर्फे शब्दकोश प्रसिद्ध करण्यात आले.

वयाच्या ८८ वर्षांपर्यंत प्रा.परांजप्यांची प्रकृती उत्तम होती. पुढील तीन वर्षांत ती हळूहळू ढासळत गेली व वयाच्या एक्याण्णवाव्या वर्षी त्यांचे निधन झाले.

— र. म. भागवत

**संदर्भ :**

*१. देशपांडे, अ.पां.; 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन; २००५*

## परांजपे, विजय गोपाळ

**धातुशास्त्रज्ञ**

**५ ऑगस्ट १९२३ - २४ नोव्हेंबर २००६**



जमशेदपूर येथील टाटा लोह व पोलाद कारखान्यांत (टाटा आयर्न अ‍ॅण्ड स्टील कंपनी - टिस्को) संशोधन खात्याचे संचालक हे उच्च पदास भूषविणारे डॉ. विजय गोपाळ परांजपे यांचे नाव हिंदुस्थानातील धातू क्षेत्रात मोठ्या आदराने घेतले जाते. डॉ. विजय गोपाळ परांजपे यांचा जन्म मुंबई येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण एल्फिन्स्टन विद्यालयमध्ये तर इंटरपर्यंतचे शिक्षण एल्फिन्स्टन महाविद्यालयमध्ये झाले. पुढील चार वर्षांचा धातुशास्त्राचा शिक्षणक्रम त्यांनी बनारस हिंदू विद्यापीठात अत्यंत प्रभावी रीतीने १९४५ साली पूर्ण केला. तेथील परीक्षेत त्यांनी संपादिलेले विक्रम अजून अद्वितीय आहेत. या विक्रमाबद्दल त्यांना हॅटफील्ड सुवर्णपदक देण्यात आले.

उच्चशिक्षणासाठी त्यांनी अमेरिकेतील प्रख्यात मॅसॅच्युसेट्स इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी या संस्थेत प्रवेश मिळवून १९४९ साली तेथील डी.एस्सी.ची पदवी मिळवली. या शिक्षणक्रमात त्यांनी लोह-नत्र पद्धतीवर यशस्वी संशोधन केले. डॉ. परांजपे यांची ही कामगिरी बहुमोल असून त्यांनी प्रतिपादिलेल्या रचना सर्वमान्य गणल्या जातात. तेथील प्राध्यापकवर्गावर यांच्या विद्वत्तेची छाप अवघ्या चार-पाच महिन्यांतच पडून त्यांना लगेच शिष्यवृत्ती मिळाली व १९४६ सालापासून पुढील वास्तव्य हे त्यांनी मिळविलेल्या शिष्यवृत्तीवर झाले. डॉक्टरेटची पदवी संपादन केल्यावर त्यांनी सुमारे एक वर्ष शिक्षकवर्गात काम करीत संशोधन चालू ठेवले.

भारतात परत येऊन त्यांनी सुमारे दीड वर्ष राष्ट्रीय धातुशास्त्र प्रयोगशाळेत संशोधन केले. ऑक्टोबर १९५२ मध्ये ते 'टिस्को' कंपनीच्या संशोधन व विकास खात्यात

शिरले. त्यांनी लोह व पोलाद उत्पादनाशी संबंधित असलेल्या नानाविध समस्यांवर अखंड संशोधन केलेले आहे. या अवधीतील त्यांची कामगिरी अत्यंत भरीव आहे. त्यांच्या कामगिरीचा व प्रगाढतेचा वचक सर्वमान्य होता. त्यांनी लिहिलेल्या कित्येक लेखांबद्दल त्यांना सुवर्णपदके मिळालेली आहेत.

पोलाद कारखान्यात त्यांच्या भरीव कामगिरीमुळे उत्तरोत्तर प्रगती होत गेली. १९५२ साली (रिसर्च मेटॅलर्जिस्ट) संशोधक धातुशास्त्रज्ञ, १९५५ साली सहायक अधीक्षक १९६१ साली अधीक्षक, संचालक, १९६३ साली (चीफ मेटॅलर्जिस्ट) मुख्य धातुशास्त्रज्ञ व १९६७ साली अशा बढत्या मिळाल्या. या काळातील त्यांची कामगिरी खाणीतील खनिज उत्पादनापासून पोलादाचे संस्कार व उपयोग, अशा विस्तीर्ण क्षेत्रात चौफेर पसरली. १९७४ साली परांजपे यांनी स्वेच्छानिवृत्ती घेतली. नंतर ते पुण्याला येऊन स्थायिक झाले. १९७५ साली त्यांनी स्वत:ची सल्लागार कंपनी सुरू केली आणि अनेक पोलाद उद्योगांना सल्ला दिला. २००१ सालापासून त्यांनी सल्लागार कंपनी बंद केली.

त्यांच्या या भरीव कामगिरीबद्दल भारत सरकारच्या खाण व पोलाद मंत्रालयाने त्यांना १९६५ साली राष्ट्रीय धातुशास्त्रज्ञ (नॅशनल मेटॅलर्जिस्ट) हा बहुमान दिला.

डॉ. विजय गोपाळ परांजपे यांच्या यशस्वी जीवनाचे आंशिक श्रेय त्यांचे विद्वान पिताजी, प्रा. गो.रा. परांजपे यांना दिले पाहिजे. मुंबईहून बनारसला दर आठवड्याला वर्तमानपत्रांतील निवडक उतारे, कात्रणे, संपादकीये व इतर वाचन सामग्री पाठवून त्यांनी आपल्या मुलाला योग्य वळण देण्याचा प्रयत्न केला. डॉ. परांजपे यांना बागकामाचा छंद होता. आपल्या बहरलेल्या बगिचातून मित्रांना हिंडवताना व त्यातील प्रत्येक झाडाचे नाव व तोंडओळख करून देताना त्यांना वेळेचे भान राहत नसे. बॉटनी व हॉर्टिकल्चरवरील त्यांच्या प्रभुत्वामुळे इतरांना त्यांच्या धातुशास्त्रातील प्रगाढतेची प्रचिती येते. डॉ. परांजपे यांचे पुणे येथे निधन झाले.

– अ. पां. देशपांडे

**संदर्भ :**

*१. मराठी विज्ञान परिषद-पत्रिका; जानेवारी-फेब्रुवारी, १९७२ (जोड अंक).*

## परांजपे, श्रीकांत रामचंद्र
**भौतिकशास्त्रज्ञ**
**१० नोव्हेंबर १९३२**



भारतीय अणुशक्ती विकासाच्या त्रिस्तरीय कार्यक्रमाचा डॉ. होमी भाभा यांनी आखलेला प्रस्ताव भारत सरकारने स्वातंत्र्यप्राप्तीनंतर थोड्याच दिवसांनी स्वीकारला होता. त्या दिशेने अणुसंशोधन कार्यक्रमाच्या पहिल्या दोन दशकांच्या काळात या कार्यक्रमाची सूत्रे भाभांच्या हाती होती. तथापि १९६६ सालच्या सुरुवातीसच डॉ. भाभांचा विमान अपघातात अकाली मृत्यू झाल्यानंतर ही जबाबदारी डॉ. विक्रम साराभाईंच्या खांद्यावर सोपविली गेली. त्यानंतरच्या अणुऊर्जा कार्यक्रमाबाबतची महत्त्वपूर्ण आखणी करणाऱ्या वैज्ञानिकांमध्ये श्रीकांत परांजपे यांचे नाव, एक अभ्यासू, मौलिक तत्त्वचिंतक, कर्तबगार अभियंता/वैज्ञानिक म्हणून प्रामुख्याने घ्यावे लागेल यात तिळमात्रही संशय नाही.

श्रीकांत परांजपे, तसे पाहता रासायनिक अभियांत्रिकी शाखेचे पदवीधर. या विषयाचा अणुविज्ञानाशी संबंध असलाच तर तो दूरान्वयानेच आहे असे म्हणावे लागेल. श्रीकांत परांजपे यांचा जन्म व शालेय शिक्षण मुंबईतच झाले. इंटर सायन्सपर्यंतचे शिक्षण मुंबईतच इस्माइल युसुफ महाविद्यालयात पूर्ण करून, त्यांनी रासायनिक अभियांत्रिकीची पदवी १९५५ साली मुंबईच्या 'इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी' (आय.सी.टी.) मधून उच्च गुणवत्ता श्रेणी मिळवून संपादन केली. नोकरीसाठी परांजपे यांनी तेव्हा बाल्यावस्थेत असलेल्या अणुशक्ती विभागात अर्ज केला

प



अणुभट्टीचे बांधकाम

आणि त्यांना नेमणूक मिळाली ती अणुभट्टी अभियांत्रिकी (रिॲक्टर इंजिनिअरिंग) विभागात. १९५५ ते १९५८ अशी पहिली तीन वर्षे, अणुशक्ती केंद्राच्या तुर्भे येथील प्रयोगशाळेत भारतीय बनावटीच्या पहिल्या 'अप्सरा' या अणुभट्टीच्या सुरुवातीसच आराखडा बनविण्याच्या आणि रचनेच्या कामात परांजपे सहभागी झाले होते. त्यामुळे त्यांचा अणुभट्टी अभियांत्रिकीचा भरभक्कम पाया घातला गेला. परांजपे या कामात निष्णात झाले. तो कालखंड जगभर अणुयुगाच्या उदयाचा असला, तरी पश्चिमी प्रगत राष्ट्रांत चालू असलेल्या अद्ययावत संशोधनाबद्दल कमालीची गुप्तता पाळण्यात येत होती. डॉ.भाभांनी मात्र या क्षेत्रात भारताला स्वयंनिर्भर बनविण्याचा जणू विडाच उचलला होता आणि त्यानुसार ठाम पावले टाकीत वाटचाल सुरू केली होती.

प

अणुविज्ञानाचा उपयोग मनुष्य अनेक प्रकारांनी करू शकतो. अणुऊर्जा आयोगाने अणुभंजन प्रक्रियेत उपलब्ध होणारी प्रचंड ऊर्जा विद्युत ऊर्जा निर्माण करण्यासाठी वापरण्याचे प्रमुख उद्दिष्ट मनाशी ठेवून अणुविद्युत ऊर्जा प्रकल्पांची साखळी बनविण्यासाठीचे मोठे प्रकल्प उभारण्याचे कार्य स्वीकारले होते. यासाठी भंजनक्षम इंधन म्हणून युरेनियमचा वापर करणे गरजेचे होते. जगाच्या युरेनियम खनिज साठ्यांपैकी भारतात उपलब्ध असलेले युरेनियम फारच थोडे आहे. नैसर्गिक युरेनियममध्ये युरेनियमचा २३५ वस्तुमानाचे समस्थानिक भंजनक्षम असते. परंतु, ते एकूण साठ्यात फक्त ०.७ टक्के इतकाच अल्प प्रमाणात असतो. युरेनियम २३५ चे प्रमाण वाढविणे म्हणून महत्त्वाचे ठरते, तथापि हे तंत्र सहजसाध्य नाही याचीही जाणीव सर्वांना होती. भारतात केरळच्या किनारपट्टीजवळ थोरियम या मूलद्रव्याने युक्त रेती मोठ्या प्रमाणावर उपलब्ध आहे. थोरियमच्या समस्थानिकांपैकी थोरियम २३३ हे समस्थानिक भंजनक्षम नसले, तरी त्याचे रूपांतर युरेनियम २३३ या भंजनक्षम समस्थानिकात करता येते. त्यामुळे अणुइंधनाच्या बाबतीत स्वयंनिर्भरता साध्य करण्याचे मोठेच आव्हान भारतीय अणुऊर्जा विकास कार्यक्रमापुढे उभे ठाकले होते.

युरेनियम २३५ समस्थानिकाचे न्यूट्रॉन आदळल्यावर भंजन झाल्याने ऊर्जा निर्माण होण्याच्या प्रक्रियेत प्रचंड ऊर्जेबरोबरच दोन किंवा अधिक न्यूट्रॉन कणदेखील फेकले जातात. त्यांतील काही न्यूट्रॉन कण बाजूच्याच युरेनियम २३८ अणूमध्ये सामावू शकतात. या प्रक्रियेत युरेनियम २३९ हा किरणोत्सारी अणू बनतो. त्यापासून पुढे जाऊन प्लूटोनियम २३९ हा मानवनिर्मित नव्या मूलद्रव्याचा अणू बनतो. प्लूटोनियम २३९ हादेखील एक भंजनक्षम अणू आहे. म्हणजे एकीकडे भंजनक्षम अणू संपून गेला, जळून गेला, तर दुसरीकडे नवा भंजनक्षम इंधनाचा अणू निर्माण झाला. या प्रक्रियेला 'इंधन-जनन' म्हणता येईल. मूळ इंधन स्रोत मर्यादित असल्याने अशा इंधनजनक तंत्राचे महत्त्व अधोरेखित होते. परांजपे यांचे या संदर्भातील योगदान भारताच्या अणुकार्यक्रमाला समर्थ, स्वयंपूर्ण आणि सुयोग्य दिशा देण्याच्या बाबतीत अत्यंत महत्त्वपूर्ण ठरले.

१९६६ साली डॉ. साराभाईंनी जगभर विकसित केल्या गेलेल्या निरनिराळ्या अणुभट्टी प्रक्रियांचा तौलनिक अभ्यास करून भारतीय अणुऊर्जा निर्मितीसाठी सुयोग्य व हितावह ठरतील, अशा पर्यायांची निवड करण्याचे महत्त्वाचे निर्णय घेण्यास अग्रक्रम दिला. भारताचा पहिला अणुविद्युत प्रकल्प तारापूरमध्ये पूर्णतया अमेरिकेच्या मदतीने उभा राहिला होता. तथापि क्रमशः

भारताने स्वयंनिर्भरतेकडे वाटचाल शक्य तितक्या लवकर करावी हा विचार निश्चितच होता. यासाठी डॉ. साराभाई, डॉ. सेठना, यांच्याबरोबर परांजपे व इतर दोन वरिष्ठ वैज्ञानिक यांच्या चमूने परदेशी जाऊन सर्व उपलब्ध पर्यायांचा परामर्श घेतला. परदेशातील अणुविद्युत प्रकल्पातील अनुभव, भारताच्या बाबतीतील बलस्थाने, कच्चे दुवे, इत्यादींचा सखोल अभ्यास करून निर्णय घेण्याचे ठरविले.

या अभ्यासाच्या अनुषंगाने परांजपे यांच्याकडे 'द्रुतप्रजनक न्यूट्रॉन अणुभट्टी' (फास्ट ब्रीडर रिॲक्टर) प्रकल्प उभारण्याची जबाबदारी सोपविण्यात आली. हे अणुभट्टी चेन्नईजवळ कल्पक्कम येथे उभे करण्याचे ठरले. पुढे १९७० साली भारताने या क्षेत्रात प्रगत असलेल्या फ्रान्सबरोबर इंधनजनक शीघ्रगती अणुविज्ञानविषयक सहकार्य करार केला. त्यानुसार भारतीय चमूच्या प्रमुखपदी परांजपे यांची नेमणूक झाली. तथापि, १९७४ साली भारताने पोखरण येथे शांततापूर्ण अणुचाचणीचा यशस्वी प्रयोग केल्याने हा करार अर्धवट असतानाच फ्रान्सने संपुष्टात आणला. अशा बिकट परिस्थितीने डगमगून न जाता, परांजपे यांनी मोठ्या जिद्दीने, मेहनत घेऊन इंधनजनक प्रायोगिक अणुभट्टी प्रकल्प यशस्वी करून दाखविला. अणुभट्टीचा तपशीलवार आराखडा मांडणे, त्यानुसार प्रायोगिक अणुभट्टीची बांधणी करणे, त्यावर सर्व सुरक्षिततेच्या चाचण्या घेणे, अणुभट्टीची इंधनजनक क्षमता अपेक्षेनुसार असल्याची खात्री करणे, आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे हे अणुभट्टी वर्षानुवर्षे यशस्विरीत्या चालविणे, अशा सर्व पायऱ्या सर करण्याचे शिवधनुष्य परांजपे यांनी लीलया पेलले आहे. परांजपे चेन्नईजवळ कल्पक्कमच्या इंदिरा गांधी अणुसंशोधन केंद्राचे संचालक म्हणून १९९२ साली निवृत्त झाले.

परांजपे यांनी त्यांच्या प्रदीर्घ कारकिर्दीत इंधनजनक अणुभट्टी तंत्रामध्ये अनेक नव्या कल्पना मांडल्या. मिश्रधातूंच्या संयुगांचा इंधन म्हणून वापर करण्याची त्यांची कल्पना त्यातलीच एक. सध्या परांजपे यांच्या निवृत्तीनंतर ५०० मेगावॅट विद्युत निर्मितीचा इंधनजनक अणुभट्टी प्रकल्प कल्पक्कम येथे साकार होत आहे. अपेक्षा आहे, की हा प्रकल्प २०११ सालापर्यंत पूर्णत्वाला जाईल.

आपल्या व्यावसायिक यशाचे श्रेय स्वत:पेक्षाही आपल्या बरोबरच्या सहकाऱ्यांनाच देण्याचा मनाचा मोठेपणा परांजपे यांच्या व्यक्तिमत्त्वास उठून दिसतो. अणुशक्ती केंद्राच्या कारकिर्दीत परांजपे यांना अमेरिकेच्या एन्रिको फर्मी केंद्रात काही महिने काम करण्याची संधी मिळाली होती. त्या वेळी परांजपे यांनी त्या केंद्रात काही अवघड प्रश्नांची उकल करून तेथल्या वैज्ञानिकांकडून वाहवा मिळविली होती. त्या वेळी एन्रिको फर्मी केंद्राचे प्रमुख त्यांना म्हणाले ''परांजपे! संशोधनकार्यात अडचणी येतातच. कठीण समस्या उभ्या राहतातच. अशा प्रसंगी समस्यांची उकल करण्याच्या प्रयत्नांत इतरांशी विचारविनिमय जरूर करावा. तथापि, इतरांच्या विचारप्रणालीवर पूर्णतया विश्वास ठेवून विसंबू मात्र नये. इतकेच काय, अगदी आपण स्वत: घेतलेल्या पवित्र्यावरही घाई-गडबडीत निर्णय घेऊ नयेत. काही काळ जाऊ द्यावा. या काळात आपल्यालाच आपल्या विचारांतील कच्चे दुवे लक्षात येऊ शकतात आणि परिणामी, अधिक योग्य मार्ग दिसू शकतो!''

परांजपे यांच्या अनुभवाचा हा गुरुमंत्र म्हणजे त्यांच्या यशाची गुरुकिल्लीच होय. भारत सरकारने २००७ सालचा 'जीवन गौरव' (लाइफ टाइम अचीव्हमेन्ट अवॉर्ड) पुरस्कार ३० ऑक्टोबर, २००८ रोजी दिल्ली येथे, पंतप्रधानांच्या हस्ते श्री.परांजपे यांना प्रदान केला आहे.

– डॉ. गो. के. भिडे

## पाटणकर, प्रभाकर गणेश
**अभियंता**

**१ एप्रिल १९२५**

डॉ. प्रभाकर गणेश पाटणकर यांचा जन्म रायगड जिल्ह्यातील (तेव्हाचा कुलाबा जिल्हा) पेण येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण पुण्याच्या भावे हायस्कूलमध्ये

प



आणि महाविद्यालयीन शिक्षण पुण्याच्याच फर्ग्युसन महाविद्यालयात झाले. त्यानंतर त्यांनी स्थापत्य अभियांत्रिकीचे शिक्षण पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयामध्ये घेऊन ते बी.ई. (सिव्हिल) झाले. त्यानंतर त्यांनी मुंबई विद्यापीठात पीएच.डी. (टेक) केले. त्यांच्या पीएच.डी.च्या प्रबंधाचा विषय, 'डेव्हलपमेंट ऑफ अर्बन मास ट्रान्सपोर्टेशन सिस्टिम इन इंडिया' असा होता. त्यांनी एफ.आय.ई., एम.आय.आर.टी. या पदव्याही मिळवल्या. हे शिक्षण पुरे झाल्यावर ते तेव्हाच्या 'जी.आय.पी.' म्हणजे 'ग्रेट इंडियन पेनिन्श्युलर रेल्वे'मध्ये (आताची सेंट्रल रेल्वे) साहाय्यक अभियंता या पदावर नोकरीला लागले. तेथे तीन-चार वर्षे नोकरी केल्यावर त्यांनी मुंबई नगरपालिकेच्या 'बॉम्बे इलेक्ट्रिक सप्लाय अ‍ॅण्ड ट्रान्सपोर्ट अंडरटेकिंग ' ऊर्फ 'बी.ई.एस.टी.' (बेस्ट) या कंपनीत प्रवेश मिळवला. ज्येष्ठ साहाय्यक अभियंता, कंट्रोलर ऑफ स्टोअर्स, इलेक्ट्रॉनिक डेटा प्रोसेसिंग मॅनेजर, साहाय्यक महाव्यवस्थापक, उप-महाव्यवस्थापक इत्यादी विविध पदांवर त्यांनी तेथे ३० वर्षे काम केले. या काळात त्यांनी वाहतूक व्यवस्थेचे सखोल ज्ञान मिळवले.

इंग्लंड, जर्मनी, वॉशिंग्टन, न्यूयॉर्क, जिनिव्हा, मॉस्को, जपान इत्यादी गजबजलेल्या शहरांत अद्ययावत वाहतूक यंत्रणेचा सूक्ष्म अभ्यास करण्याची संधी त्यांना मिळाली. मुंबई शहरातील वाहतूक समस्या सोडवण्यासाठी जागतिक बँकेकडून साहाय्य मिळवण्यामध्येही त्यांचा सिंहाचा वाटा होता. मुंबई आणि कोलकात्याच्या वाहतूक समस्या सोडवताना जमिनीखालील वाहतूक मेट्रोच्या साहाय्याने करणे अत्यावश्यक असल्याचे ते १९६३ सालापासून सांगत आहेत. मध्यंतरी दोन वर्षे दिल्ली वाहतूक मंडळाचे कार्याध्यक्ष व व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाचे उप-कार्याध्यक्ष व व्यवस्थापक अशी जबाबदारीची कामेही त्यांनी केली. काही वर्षे ते टाटा कन्सल्टन्सीमध्येही सल्लागार होते.

प्रमुख बंदरांची रचना करण्यासाठी भारत सरकारने नेमलेल्या समितीतील एक सदस्य या नात्याने जलवाहतुकीचाही त्यांचा जवळून अभ्यास झाला. अशा तर्‍हेने रेल्वे, जल व रस्ता वाहतूक शाखांचे सखोल ज्ञान आत्मसात केलेले आणि कामगार, वेळा, दरपत्रक इत्यादी रस्ता वाहतुकीच्या क्षेत्रातील विविध अंगांची पूर्ण माहिती असलेले डॉ.प्रभाकर पाटणकर 'सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ रोड टान्स्पोर्ट' (सी.आय.आर.टी.) या पुण्याजवळील भोसरी येथील संस्थेचे संचालक होते. तेथील अधिकाऱ्यांना वाहतुकीसंबंधीच्या विविध विभागांचे प्रशिक्षण दिले जाते. डॉ.प्रभाकर पाटणकर हे आंतरराष्ट्रीय दर्जाचे शहरी वाहतुकीतील विविध पद्धतींच्या वाहनमार्गांतील तज्ज्ञ म्हणून ओळखले जातात. त्यांना या क्षेत्रातील ६० वर्षांचा (१९४६ ते २००५) अनुभव आहे. त्या अनुभवाच्या अनेक परी आहेत. नियोजन, विविध यंत्रणांची आखणी आणि अंमलबजावणी, प्रकल्प व्यवस्थापन आणि उभारणी इत्यादी. मुंबईच्या 'भागुभाई मफतलाल पॉलिटेक्निक' आणि 'सोमय्या पॉलिटेक्निक' या संस्थांच्या कार्यकारी मंडळांचे ते पंधरा-पंधरा वर्षे सदस्य होते, तसेच मुंबईत अनेक ठिकाणी त्यांनी बेस्टतर्फे वीज केंद्रेही उभारली.

आपले सर्वांगीण ज्ञान शास्त्रीय निबंधांच्या स्वरूपात वेळोवेळी प्रसिद्ध केले आहे. विविध संस्थांमधील तज्ज्ञांची प्रशस्तिपत्रेही त्यांना मिळाली आहेत. 'इन्स्टिट्यूट ऑफ इंजिनिअर्स'ची त्यांना दोनदा सुवर्णपदके मिळाली आहेत. त्यांना 'नादिरशहा पुरस्कार', रेल्वे बोर्डाचे पुरस्कार, इत्यादी बहुमान मिळाले. त्यांना 'अर्बन मोबिलिटी इन डेव्हलपिंग कंट्रीज' या पुस्तकाबद्दल १९७७ साली 'बर्नाड व्हॅन हूल' हे आंतरराष्ट्रीय पारितोषिकही मिळाले. याखेरीज, मुंबईमधील 'भुयारी मार्ग' व 'भारताच्या रस्त्यावरील प्रवाशांची वाहतूक' अशी दोन अभ्यासपूर्ण पुस्तकेही

प

त्यांनी लिहिलेली आहेत. वाहतुकीच्या संदर्भात त्यांनी जागोजागी अनेक लेख लिहिले आहेत. अनेक देशी-परदेशी वाहतूक समस्यांच्या परिषदांत त्यांनी भाग घेऊन महत्त्वाचे योगदान केले आहे. १९८५ साली ठाणे येथे भरलेल्या मराठी विज्ञान संमेलनाचे ते अध्यक्ष होते आणि 'शहरी वाहतुकीच्या समस्या' हाच त्यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय होता.

– अ. पां. देशपांडे

**संदर्भ :**

१. *देशपांडे, अ. पां., संपादक; 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन; २००५.*

## पाटील, जयंत शामराव

**कृषिशास्त्रज्ञ**

**२८ मार्च १९२७**



वनवासी सेवेचे अविरत व्रत घेऊन काम करणारे, कृषिसंशोधनामध्ये उपयोजित संशोधन करणारे कृषितज्ज्ञ जयंत शामराव पाटील यांचा जन्म ठाणे जिल्ह्यातल्या बोर्डी या गावी, शेतकरी कुटुंबात झाला. वडील स्वातंत्र्यसैनिक होते. शामरावांनी चार वर्षांहून अधिक काळ तुरुंगवास भोगला होता. त्यामुळे जयंतरावांना लोकसेवेचे बाळकडू सुरुवातीपासून घरातच मिळाले.

बोर्डी गावाचा स्वातंत्र्यलढ्याचा इतिहास स्फूर्तिदायक आहे. या पार्श्वभूमीमुळे जयंतरावांना देशसेवा आणि समाजसेवा खुणावत होती. त्यांचे शालेय शिक्षण गुरुकुल पद्धतीच्या शाळेत झाले. ते पुण्यातल्या कृषी महाविद्यालयात शिकत असताना, महात्मा गांधीजींच्या सायंप्रार्थनेला जात असत. प्रार्थनेनंतर गांधीजींचे प्रवचन होत असे. अशाच एका प्रवचनात गांधीजींनी श्री. ठक्करबाप्पा यांच्या वनवासी सेवेचा गौरव केला व युवकांना वनवासींच्या सेवेला वाहून घेण्याचे आवाहन केले. जयंतरावांनी तिथेच वनवासी सेवेचा संकल्प केला. पुणे येथील कृषी महाविद्यालयातून एम.एस्सी. (कृषी) ही पदवी प्रथमवर्गात प्राप्त करून ते बोर्डीजवळच्या कोसबाड या वनवासी भागातल्या कृषी संस्थेत दाखल झाले. कोसबाड कृषी संस्थेचे संस्थापक व थोर सर्वोदय सेवक आचार्य भिसे यांचे त्यांना मार्गदर्शन लाभले.

कोसबाड येथे काम करत असताना त्यांनी जलसंधारणासाठी पृष्ठभाग विहीर, हिरवळ खते, तीन पिकांचे चक्र, सकस चाऱ्याची पिके, फलोत्पादन, आहार बगिचे आणि कृषी वनीकरण या वनवासींना उपयुक्त तंत्रज्ञानाचा प्रसार केला. यामुळे वनवासींना अन्न कायम मिळत राहण्याची खात्री म्हणजे 'अन्न-सुरक्षा' मिळाली. वनवासींच्या जमिनीवर उत्पादक रोजगार निर्माण झाल्यामुळे त्यांच्यातली गरिबी कमी होण्यास मदत झाली. असे तंत्रज्ञान विकसित करत असताना, पर्यावरणाचा समतोल टिकून राहील याची काळजी घेण्यात आली. त्यामुळे वनवासींचा शाश्वत विकास होऊ शकला. जयंतरावांच्या शिक्षणाचा, ज्ञानाचा, अनुभवाचा बोर्डीतल्या शारदाश्रम, सुनाबाई पेस्तनजी हकीमजी हायस्कूल, आचार्य भिसे शिक्षण संस्था यांना फायदा होत आला आहे. त्यांनी कृषिसंस्थेत ३४ वर्षे काम केले.



भारत सरकारच्या कृषी संशोधन परिषदेने शेतकरी व मच्छीमार यांना कौशल्य शिक्षण देण्याच्या हेतूने कृषी विज्ञान केंद्रे स्थापन करण्याची एक योजना तयार केली. त्या योजनेअंतर्गत कोसबाड येथे सुरू झालेल्या विज्ञान केंद्राचे पहिले संचालक म्हणून जयंतरावांची नियुक्ती झाली. या केंद्रामार्फत वनवासी शेतकऱ्यांना धान्यपिके, भाजीपाला लागवड, फलोत्पादन, जनावरांचे संगोपन, दुग्धव्यवसाय, कुक्कुटपालन व मत्स्यपालन यांविषयी कौशल्य शिक्षण दिले जाते. जयंतरावांच्या संचालकपदाच्या कारकिर्दीत वनवासींनी शेती उत्पादन वाढवले, रोपवाटिका तयार केल्या, फळप्रक्रिया उद्योग सुरू केले आणि आजही ती परंपरा चालू आहे. निवृत्तीनंतरही त्यांना जयंतरावांचे मार्गदर्शन मिळत असते.




१९७१ साली जयंतराव ऑस्ट्रेलियात गेले. तिथे त्यांनी चारा पिकांच्या संशोधनाचा अभ्यास केला. भारतात परत आल्यावर कोसबाड येथे त्या संशोधनाचे प्रयोग केले. त्यांपैकी स्टायलो व सिरॅटो ही पिके त्या हवामानात यशस्वी ठरली. या पिकांचा चारा गुरांना दिल्यामुळे दूध उत्पादनात वाढ झाली. कृषितज्ज्ञ डॉ.स्वामिनाथन यांनी 'या पिकांचा भारतभर प्रसार व्हावा' असे सांगितले. या चाऱ्यांना गांधीजींचे एक सहकारी स्वामी आनंद यांनी श्रवणघास, सीताघास व दशरथघास अशी नावे दिली. जयंतरावांनी अमेरिकेतून १९६६ साली ॲस्परॅगस हे भाजीपाल्याचे मौल्यवान पीक आणले. ते इथल्या हवामानात रुजवले. त्याचा व्यापारी लागवड म्हणून उपयोग होतो. कृषी विज्ञान केंद्रात काम करत असताना त्यांना अमेरिकेतील फुलब्राइट शिष्यवृत्ती मिळाली. त्यानुसार कॅन्सास विद्यापीठातून त्यांनी कृषिविस्तार या विषयात 'एम.एस.' ही पदवी संपादन केली. कोकण कृषी विद्यापीठाने त्यांना 'डॉक्टर ऑफ सायन्स' ही पदवी दिली. त्याच सुमारास त्यांनी कॅनडा, इंग्लंड, हॉलंड, इस्त्रायल व फिलिपाइन्स या देशांमधल्या शेती व ग्रामसुधार योजनांविषयी अभ्यास केला.

१९७९ साली सामाजिक न्यायाच्या तत्त्वावर दुर्बल वनवासी घटकांच्या विकास कार्याबद्दल जयंतरावांना जमनालाल बजाज पुरस्कार राष्ट्रपतींच्या हस्ते देण्यात आला. सुमारे ५० वर्षे कृषी-औद्योगिक समाजरचनेत उल्लेखनीय काम केल्याबद्दल त्यांना यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठानने १९९८ साली यशवंतराव चव्हाण पुरस्कार दिला. त्याचप्रमाणे, मदर तेरेसा पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचा कृषिरत्न पुरस्कार, स्वातंत्र्यवीर दादा उंडाळकर पुरस्कार आणि गांधी राष्ट्रीय समितीचा बापू पुरस्कार, असे विविध पुरस्कार त्यांना मिळालेले आहेत.

१९८१ साली महाराष्ट्र शासनाने फलोत्पादन हा नवीन विभाग सुरू करून जयंतरावांची सल्लागार म्हणून नियुक्ती केली. या पदावर त्यांनी दहा वर्षे काम केले. फलोद्यानाला लागणाऱ्या पायाभूत सोयी निर्माण करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. १९८२ साली आकाशवाणी मुंबई केंद्राने पहिले आकाशवाणी विज्ञान संमेलन आयोजित केले होते. त्या संमेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करताना त्यांनी सेंद्रिय खते, पीक संरक्षण, फलोद्यान, कमी कालावधीत अधिक वेळेला पीक उत्पादन यांचा पाठपुरावा केला.

१९८७ साली त्यांची नियुक्ती महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचे अध्यक्ष म्हणून झाली. कॅबिनेट दर्जाच्या या पदावर त्यांनी चार वर्षे काम केले. त्या काळात रेशीम व अन्नप्रक्रिया उद्योग वाढवण्यात त्यांनी महत्त्वाची भूमिका बजावली. १९९१ साली ते केंद्रीय योजना आयोगाचे सदस्य झाले. त्यांच्याकडे कृषी, ग्रामविकास, जलसिंचन, पंचायती राज, सहकार व ग्रामीण ऊर्जा या विषयांची जबाबदारी होती. तिथे असताना, त्यांनी राष्ट्रीय पातळीवर फलोद्यान योजना व कृषी विकास कामांना बळकटी दिली.

१९७५ साली पालघर तालुक्यात अस्वली धरणाचे भूमिपूजन पार पडले होते; परंतु या-ना-त्या कारणाने काम रखडले होते. जयंतराव नियोजन आयोगाचे सदस्य झाल्यावर अकरा वर्षांच्या कालहरणानंतर त्या कामाला त्यांनी गती देण्याचे ठरविले. विविध मंत्रालयांमध्ये त्यांनी स्वत: जाऊन विनाकारण प्रलंबित झालेली पर्यावरण व वनमंत्रालयाची धरणाच्या बांधकामाची परवानगी १९९४ साली मिळवली. ही परवानगी मिळवणे, वनविभागाला गावकऱ्यांनी पर्यायी जमीन द्यावी म्हणून गावकऱ्यांना राजी करणे, वनीकरणाची वाढीव रक्कम शासनाकडून मंजूर करवून ती वनविभागाला देणे, इत्यादी सर्व कामे जयंतरावांनी गावकऱ्यांच्या पाठिंब्याने केली. प्रशासनाला लागतील त्या अटींची पूर्तता करण्यासाठी अधिकाऱ्यांचे सहकार्य मिळवले.

भूमिपूजन ते प्रत्यक्ष कामाची सुरुवात यात फार मोठा कालावधी गेल्यामुळे प्रकल्पाचा खर्च वाढला होता. ती वाढीव रक्कम शासनाकडून त्यांनी मंजूर करवून घेतली. शेवटी, १९९६ साली धरण पूर्ण झाले. या धरणामुळे मत्स्य उत्पादन, विंधण विहिरींना पाणीपुरवठा, पेयजल, जलसिंचनामुळे दुबार पीक पद्धत, भूजलाच्या पातळीत वाढ हे फायदे मिळू लागले. मुंबई-अहमदाबाद मार्गावर रेल्वे प्रवाशांची संख्या मोठ्या प्रमाणावर वाढल्यामुळे घोलवड ते उंबरगाव रोड या भागातल्या प्रवाशांची अतिशय गैरसोय होत होती. बोर्डी येथे जयंतराव आणि त्यांच्या सहकाऱ्यांच्या प्रयत्नांतून नवे रेल्वे स्थानक तयार झाले आणि त्या स्थानकाचे उद्घाटन १९९४ साली झाले.

जयंतराव पाटील यांनी भारतीय 'स्वातंत्र्यलढ्यात बोर्डीचे योगदान' ही पुस्तिका भारतीय स्वातंत्र्याच्या सुवर्णमहोत्सवाच्या निमित्ताने प्रकाशित केली. त्यांनीच १९९८ साली 'बोर्डीचे स्वातंत्र्यसैनिक' या पुस्तकाचे संपादनही केले आहे. त्यांनी कृषी व ग्रामविकासावर भरपूर लेखन केले असून आतापर्यंत २० पुस्तके लिहिली आहेत. त्यांची 'जग हा त्यांचा बगिचा', 'माझे ग्रामपुनर्रचनेचे प्रयोग', 'कृषिमहर्षी सॅम हिगीनबॉटम', 'आदर्श गाव बोर्डी', 'ॲग्रिकल्चरल अँड रूरल रिकन्स्ट्रक्शन', इत्यादी पुस्तके आहेत. कृषी साहित्याबद्दल त्यांना वसंतराव नाईक पुरस्कारही मिळालेला आहे.

२००६ साली विदर्भात अनेक शेतकऱ्यांनी कर्जबाजारीपणामुळे आत्महत्या केल्या. त्यांच्या समस्येवर कायमस्वरूपी तोडगा काढण्यासाठी डॉ. स्वामिनाथन यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठित केली होती. त्या समितीत सदस्य म्हणून पाटील यांनी काम पाहिले. समितीने अनेक बहुमोल मार्गदर्शक सूचना केल्या.

डॉ.जयंतराव पाटील सध्या वसंतराव नाईक कृषी संशोधन व ग्रामीण विकास प्रतिष्ठानचे कार्याध्यक्ष आहेत. विज्ञान व तंत्रज्ञानाच्या वापरानेच महाराष्ट्रातील शेतीची उत्पादकता वाढवता येईल हा संदेश महाराष्ट्रातल्या शेतकऱ्यांपर्यंत पोहोचवण्यासाठी ते सतत व्याख्याने देत असतात, परिसंवादांतून भाग घेतात, वृत्तपत्र, रेडियो, टेलिव्हिजन या प्रसारमाध्यमांमध्येही त्यांचा सहभाग असतो.

ते एकविसाव्या शतकातल्या आव्हानांचा विचार करून लिहितात. ते म्हणतात, की लोकसंख्या नियंत्रण, अन्नधान्यात स्वयंपूर्णता, जैवविविधता टिकवणे याला अग्रक्रम देणे आवश्यक आहे; पाणलोटक्षेत्राचा विकास करून जमिनीची धूप थांबवावी, भूगर्भातल्या पाण्याची पुनर्भरणी करावी; गावकऱ्यांनी स्वत:च्या जमिनीवर शेत तलावडी करून पावसाचे पाणी जमिनीत मुरवावे, वनसंवर्धन करावे, जलद वाढणारी झाडे सरपणासाठी लागतात ती वाढवावीत; कृषिवनीकरणात शेतकऱ्यांनी सहभाग घ्यावा, फलोद्यान करावे, फळप्रक्रिया उद्योग व फुलांची शेती वाढवावी, सेंद्रिय खते द्यावीत, कीटकनाशके टाळावीत, शीतगृहे व सौरशक्तीचा वापर करावा; वनवासींच्या शिक्षणाला व आरोग्याला अग्रक्रम द्यावा.

— जयंत एरंडे

**संदर्भ :**

१. *पाटील, डॉ. जयंत; 'कृषिवैज्ञानिकाची साधना'; प्रकाशक: दीपक पाटील, बोर्डी.*

प

## पाटील, हरिश्चंद्र गोपाळ
**कृषिशास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**२८ नोव्हेंबर १९०८ - २६ डिसेंबर १९८८**

डॉ. हरिश्चंद्र गोपाळ पाटील यांचा जन्म बोर्डी, जि. ठाणे येथे एका शेतकरी कुटुंबात झाला. शालेय शिक्षण बोर्डीत झाले आणि १९२७ साली ते शालांत परीक्षा उत्तीर्ण झाले.

आचार्य भिसे यांच्या प्रेरणेने पाटील यांनी पुण्यातील शेतकी महाविद्यालयात १९२८ साली प्रवेश घेतला आणि १९३१ साली त्यांनी बी.एजी. ही पदवी मिळवली. ध्येयवादाने प्रेरित डॉ. पाटील यांनी भिसे



यांच्या शाळेत शिक्षकाची नोकरी पत्करली. पुढे त्यांच्या संचालकपदाखाली शेतकी शाळा सुरू झाली. बोर्डी येथे पुरेशी जमीन उपलब्ध नव्हती म्हणून ही शाळा कोसबाड येथे नेण्यात आली. प्रत्यक्ष जमिनीवर मेहनत करण्याचे शिक्षण देणारी ही शाळा पाटील यांनी नावारूपाला आणली.

१९५१ साली पाटील जपानमध्ये तेथील भातशेतीचा अभ्यास करण्यासाठी गेले. जपानमधील शेती भारतासारखीच लहान-लहान क्षेत्रफळाची होती. पण शेतकरी त्याच जमिनीतून दोन-तीन पिके काढत होते. पिकांची लागवड सरळ रेषेत आणि ठरावीक अंतरावर करणे, संशोधन केंद्रावरून प्रगत शेतीतंत्राची माहिती मिळवणे, नवनवीन बियाण्यांचा वापर करणे, शास्त्रज्ञांच्या सल्ल्याप्रमाणे रासायनिक खतांची ठरावीक मात्रा वापरणे या आणि अशा मार्गांनी जपानी शेतकऱ्याने चांगली उत्पादकता मिळवली होती.

प

भारतात परतल्यावर पाटील यांनी कृषिशिक्षण संस्था, कोसबाड आणि कोरा केंद्र, बोरिवली येथे जपानी भातशेतीचे यशस्वी प्रयोग केले. याचा महाराष्ट्रभर प्रसार झाला. जपानी पद्धतीने भातशेती केल्यास भारतातील उत्पादन वाढू शकते, हे कळल्यावर पंतप्रधान नेहरूंनी ही पद्धती देशभर प्रसारित करण्याची योजना आखली. सरकारने 'भारताची भातक्रांती' या नावाने एक पुस्तक प्रसिद्ध केले. डॉ. हरिश्चंद्र पाटील आणि प्राणलाल कापडिया यांनी भारतभर फिरून ह्या पद्धतीचा प्रसार केला. जपानी पद्धतीची भातशेती भारतात रुजवून देशातील अन्नधान्य उत्पादन वाढवण्यात डॉ. पाटील यांनी मोठे योगदान दिले. हे करताना रासायनिक खतांचा वापर वाढवून नत्र (नायट्रोजन), स्फुरद (फॉस्फरस) आणि पालाश (पोटॅश) ह्या मुख्य घटकांचा पुरवठा आवश्यक तेवढा उपलब्ध करून दिला. तशी गरज,



महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी

नवीन-सुधारित बियाण्यांना होती. पण त्याचबरोबर शेणखत, कंपोस्टखत, हिरवळीची खते अशी सेंद्रिय खते वापरून जमिनीचा पोत सुधारण्यास मदत होते. तसेच जमिनीतील ओलावा टिकवून ठेवायला मदत होते. त्यामुळे सेंद्रिय खतेही वापरावीत, असे पाटील यांनी सांगितले.

तायचुंग, आय.आर.-८ अशा सुधारित बियाण्यांच्या जाती वापरायला सांगून हेक्टरी उत्पादन चांगले मिळवले गेले. ह्या जाती बुटक्या असून त्यांचा बुंधा मजबूत असतो. तसेच, सूर्यप्रकाश घेऊन अन्नउत्पादनाची शक्ती ह्या जातीत चांगली असते; त्यामुळे भरपूर दाणे तयार होतात. वाढत्या लोकसंख्येकरिता अन्नधान्याची गरज भागविण्यासाठी अशा जातींची गरज आहे, असे मत डॉ. पाटील यांनी व्यक्त केले. त्याचप्रमाणे कोरडवाहू, ज्वारी, भुईमूग, गहू यांची सुधारित बियाणे वापरून शास्त्रज्ञांच्या मार्गदर्शनाप्रमाणे काम केल्यास पारंपरिक बियाण्यांपेक्षा तीन ते दहापट पीक अधिक आल्याचे दिसून आले आहे.

शेतकऱ्यांच्या मनातील गैरसमज दूर करून, विज्ञानाचा योग्य संदेश त्यांच्यामार्फत पोहोचवण्यासाठी कृषी विद्यापीठांची गरज डॉ. पाटील यांनी ओळखली. कोसबाड येथील केंद्रात कृषिशिक्षण, कृषिसंशोधन, पशुपालन या क्षेत्रांतील कामांचा अनुभव डॉ. पाटील यांना होता. तसेच भारतातर्फे १९५७ साली रशियात आणि १९५८ साली अमेरिका, चीन व जपान येथे गेलेल्या शेतकी मंडळांत त्यांचा समावेश होता.

तत्कालीन केंद्रीय मंत्री डॉ. पंजाबराव देशमुख यांनी १९६४ साली स्थापन केलेल्या 'भारत कृषक समाजा'चे डॉ. पाटील हे संस्थापक सदस्य होते. महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी ह्या महाराष्ट्रातील कृषी विद्यापीठाचे पहिले कुलगुरू होण्याचा मान पाटील यांना मिळणे रास्तच होते. इतर अनेक संस्थांच्या माध्यमातून मार्गदर्शन करत असताना मुंबईतील लोकमान्य दैनिकात त्यांनी शेती या विषयावर लेख लिहिले. ते अत्यंत सोप्या भाषेत असल्यामुळे ते वाचून अनेक शेतकऱ्यांनी नवीन तंत्रांचा स्वीकार केला आणि आपले अन्नधान्याचे उत्पादन वाढवले.

१९६७ साली 'पद्मश्री' हा पुरस्कार देऊन भारत सरकारने त्यांना गौरवले. डॉ. पाटील यांनी सारे जीवन भारतातील शेतीची उत्पादकता वाढवण्यात आणि त्याद्वारे भारत अन्नधान्यात स्वावलंबी करण्यात व्यतीत केले. कृषी विद्यापीठे आणि शेतकरी यांच्यामध्ये दुवा असायला हवा, म्हणजे कृषिशास्त्रज्ञ करीत असलेल्या संशोधनाची माहिती घेऊन शेतकरी उत्पादकता वाढवू शकेल, त्याचप्रमाणे शेतकऱ्यांच्या अडचणी समजून घेऊन त्यावर तोडगा काढण्याचे काम कृषिशास्त्रज्ञ करतील, अशी रास्त भूमिका त्यांनी त्या वेळी मांडली होती, ती आजच्या काळातही लागू आहे.

– जयंत एरंडे / दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**

१. *तिसरे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; ठाणे; १९६८*

## पानसे, विनायक गोविंद

**सांख्यिकीतज्ज्ञ**

**११ जानेवारी १९०६ - २२ जुलै १९६९**

विनायक गोविंद पानसे यांचा जन्म नाशिक येथे झाला. डॉ. पानसे यांचे शालेय शिक्षण नाशिकच्या सरकारी हायस्कूलमध्ये झाले. महाविद्यालयीन शिक्षण मुंबईत विल्सन महाविद्यालयात झाले. मुंबई विद्यापीठातून गणित, रसायन व भौतिकशास्त्रात बी.एस्सी. झाल्यावर १९२७ साली विनायक गोविंद



पानसे यांना, वनस्पतींची निपज करण्यात निष्णात असणाऱ्या डॉ. जे.बी. हचिन्सन यांच्या हाताखाली साहाय्यक म्हणून नोकरी मिळाली. या पहिल्या नोकरीत कृषिशास्त्रातले संख्यात्मक कौशल्य आत्मसात करण्याची त्यांना संधी मिळाली. पुढे जनुकीय प्रतिमाने निर्माण करून याच विषयाच्या विस्तारावर रोनाल्ड फिशर यांच्या मार्गदर्शनाखाली लिहिलेल्या प्रबंधावर त्यांना पीएच.डी. मिळाली. १९४० साली स्वदेशी परतल्यावर इंदूरच्याच संस्थेत त्यांच्यावर सोपवलेल्या संख्याशास्त्रज्ञापासून संचालकपदापर्यंतच्या जबाबदाऱ्या त्यांनी समर्थपणे पार पाडल्या. तोपर्यंत कृषिसंख्याशास्त्र संशोधन क्षेत्रात पानसे यांचा नावलौकिक पसरल्यामुळे १९५१ साली केंद्र सरकारने त्यांना 'भारतीय कृषी संशोधन मंडळ' (आय.सी.ए.आर.) या संस्थेत सांख्यिकी सल्लागार म्हणून निमंत्रित केले. कृषिक्षेत्रातली प्रयोगशीलता व सर्वेक्षण या दोन्ही सबल बाजूंकडे पाहण्याच्या डॉ. पानसे यांच्या दृष्टिकोनास मिळणारे यश आणि दिवसेंदिवस कृषिशास्त्रात वाढत जाणारी संख्याशास्त्राची उपयुक्तता लक्षात घेऊन केंद्र शासनाने या मंडळाचे 'कृषी सांख्यिकी संशोधन संस्थे'मध्ये (इंडियन ॲग्रिकल्चरल स्टॅटिस्टीक्स रिसर्च इन्स्टिट्यूट) रूपांतर केले. या नामांतरामुळे संस्थेला उच्चशिक्षण संस्थेचा दर्जा प्राप्त झाला.

डॉ. पानसे यांच्या कार्यकाळात शेतकी संशोधन आणि त्याच्या विकासाशी संबंधित अशा अनेक विषयांत सांख्यिकी पद्धतिशास्त्राची विस्तृत वाढ होण्यासाठी या संस्थेने मोलाचे उपयोजित संशोधन केलेले आहे. वनस्पती जनन, वनस्पती जनन प्रयोग, शेतावर कृषिशास्त्रीय प्रयोग संकल्पना व विश्लेषण, एकरी आकडेवारी आणि पीक उत्पादन सुधारण्यासाठी नमुना

प

निवड तंत्राचा वापर, उत्पादन खर्चाचा अभ्यास, मासेपकडीचे आकलन, पशुधनसंख्या व उत्पादन यांचे अंदाज, मोठ्या प्रमाणांवर सुधारणा कार्यक्रम, उदाहरणार्थ : जिल्हास्तरावरील शेतकी कार्यक्रम, अन्नपुरवठा, नियोजन, इत्यादी विषय पानसे यांनी हाताळल्याचे आढळते. त्यांच्या या कार्याची महती जाणून संयुक्त राष्ट्रसंघाच्या अन्न व कृषी महामंडळाने (एफ.ए.ओ.) डॉ. पानसे यांच्यावर आशिया व अतिपूर्वेकडील देशांसाठी कृषिविषयक खानेसुमारीच्या प्रादेशिक सल्लागाराची जबाबदारी सोपविली. या देशांना वारंवार भेटी देऊन डॉ. पानसे यांनी त्यांच्या कृषिसंबंधीच्या समस्यांत मोलाचा सल्ला दिला.

या अधिकृत कर्तव्यांबरोबर डॉ. पानसे यांनी भारतीय कृषी सांख्यिकी संस्था (इंडियन सोसायटी ऑफ ॲग्रिकल्चरल स्टॅटिस्टिक्स) स्थापन करून कृषिसंख्याशास्त्राचे अभ्यासक व या विषयात रुची असणाऱ्या मंडळींना वैचारिक आदानप्रदान करण्यासाठी एक व्यासपीठ निर्माण केले. त्याचे पदाधिकारी, नियतकालिकाचे संपादक अशा विविध जबाबदाऱ्या पानसे यांनी हौसेने पार पाडल्या. त्यांच्या कर्तृत्वामुळेच या समाजास आजची प्रतिष्ठा प्राप्त झालेली आहे.

प

शेतकीसंबंधीच्या साऱ्या कार्यक्रमांची कार्यवाही करताना, अधिकारपदावर असताना कोणाचीही भीडमुर्वत न ठेवता, आपले विचार स्पष्टपणे मांडून अंगीकृत कार्य तडीस नेण्याचा पानसे यांचा स्वभाव होता. तसेच त्यांच्या चारित्र्याची प्रबलता व कामाची गुणवत्ता इतक्या उच्च दर्जाची होती, की आलेल्या अडचणींवर ते सहज मात करू शकत असत. म्हणूनच, या संस्थेतून निवृत्त झाल्यावर त्यांना नियोजन आयोगावर पाचारण करण्यात आले होते. महिनाभर काम करून प्रकृती अस्वास्थ्यामुळे त्या जबाबदारीतून ते मोकळे झाले आणि पुढे ते अवघ्या त्रेसष्टाव्या वर्षी दिवंगत झाले.

– प्रा. स. पां. देशपांडे

**संदर्भ :**

१. *रिव्ह्यू ऑफ दि इंटरनॅशनल स्टॅटिस्टिकल इन्स्टिट्यूट; १९६९.*

## पुरंदरे, भालचंद्र नीळकंठ

**वैद्यकतज्ज्ञ**

**२७ ऑक्टोबर १९११ – १० नोव्हेंबर १९९०**



डॉ. भालचंद्र नीळकंठ पुरंदरे यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे वडील डॉ. नीळकंठ अनंत पुरंदरे प्रसिद्ध स्त्री-रोगतज्ज्ञ होते व त्यांचे गिरगाव चौपाटीला स्वत:चे रुग्णालय होते. डॉ. भालचंद्र पुरंदरे यांना वैद्यकीय शिक्षणाचे बाळकडू घरातच मिळाले होते. साहजिकच, त्यांचा कल प्रसूती व स्त्री-रोगविज्ञानाकडे होता. त्यांचे इंटरसायन्सपर्यंतचे शिक्षण मुंबईच्या विल्सन महाविद्यालयामध्ये झाले. इंटरसायन्सला उत्तम गुण मिळवून मुंबईच्या जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयामधून ते एम.बी.बी.एस. झाले. हुशार विद्यार्थ्यांत त्यांची गणना असल्यामुळे त्यांना बऱ्याच शिष्यवृत्त्याही मिळाल्या होत्या. १९३७ साली त्यांना प्रसूतिविज्ञान व स्त्री-रोगविज्ञान या विषयांत एम.डी. पदवी मिळाली. १९३९ साली इंग्लंडमधील एडिंबरा येथील रॉयल कॉलेज ऑफ सर्जन्सची एफ.आर.सी.एस. पदवी मिळाली. मुंबईत परत आल्यावर कॉलेज ऑफ फिजिशियन्स व सर्जन यांची अभिछात्रवृत्ती मिळवून ते एफ.सी.पी.एस. झाले. मुंबईतील के.ई.एम. रुग्णालयात १९४१ ते १९४५ स्त्री-रोगशास्त्र व प्रसूतिशास्त्र या विभागात साहाय्यक सन्माननीय विशेषज्ञ म्हणून त्यांनी काम केले. १९५७ साली त्यांनी त्याच विभागाचे प्रमुख म्हणून काम केले.

त्यांच्याच प्रयत्नामुळे प्रसूतिविद्या व कुटुंबनियोजन या विषयाच्या संशोधनाकरिता खास संशोधन केंद्र के.ई.एम.मध्ये स्थापन झाले. डॉ. पुरंदरे त्याचे संचालक होते. त्या केंद्राला त्यांच्या वडिलांचे, डॉ. नीळकंठ अनंत पुरंदरे यांचे नाव दिले गेले. १९६९ साली निवृत्त होईपर्यंत ते विभागप्रमुख व संशोधन केंद्र संचालक होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली जननमार्गासंबंधी अनुप्रयुक्त

जीवविज्ञानाच्या एम.डी. व पीएच.डी. या पदव्युत्तर परीक्षांच्या अभ्यासाची सोय करण्यात आली. ते वाडिया रुग्णालयाचे प्रमुख अधिकारी होते. याशिवाय बॉम्बे रुग्णालय व पश्चिम रेल्वेचे जगजीवनराम रुग्णालय यांचे सन्माननीय विशेषज्ञही होते.

त्यांचे विशेष संशोधन म्हणजे गर्भाच्या खांद्याच्या (ॲण्टिरियर शोल्डर) हालचालीवरून प्रसूतीच्या प्रगतीचा अंदाज घेणे. गर्भाशयाच्या स्खलनाची शस्त्रक्रिया त्यांनी सुधारली. पोटाच्या पुढच्या भागातील स्नायूच्या आवरणाचा (ॲपोन्युरोसिस) दोरीसारखा उपयोग करून, गर्भाशय या दोरीने वर उचलून पोटाच्या पुढच्या भागाला बांधून ठेवायचे म्हणजे ते खाली घसरणार नाही, असे शस्त्रक्रियेचे स्वरूप असे. या शस्त्रक्रियेनंतर जर स्त्रीला मूल हवे असेल, तर ते होऊ शकेल. प्रसूतीच्या वेळी जर काही कारणास्तव प्रसूती नैसर्गिकरीत्या होत नसेल, तर बाळाच्या डोक्याला इजा न होता प्रसूती होऊ शकेल.

कुटुंबनियोजनाची शस्त्रक्रिया योनिमार्गे करण्याची पद्धत त्यांनी सुरू केली. या पद्धतीत फॅलोपियन बीजवाहिनी योनिमार्गे छोट्या छिद्रातून काढायची व ती दुमडून, तिला टाके मारून पुन: पोटात ठेवायची. या पद्धतीमुळे स्त्रीचे रुग्णालयातील वास्तव्य कमी झाले व नंतर मूल हवे असल्यास ते टाके काढून बीजवाहिनी मोकळ्या करू शकतात. याला 'पुरंदरे तंत्र' म्हणतात.

गर्भाशय काही कारणास्तव काढावे लागले, तर डॉ.पुरंदरेंनी ते योनिमार्गे काढण्याची पद्धती चालू केली. यामध्ये कमीतकमी रक्तस्राव होतो व पोटावर एरवी होणारा व्रणही होत नाही. या शस्त्रक्रियेसाठी लागणारी उपकरणे त्यांनी स्वत:च तयार केली. ती सर्व त्यांच्याच नावाने प्रसिद्ध आहेत.

डॉ. पुरंदरेंनी कुटुंबनियोजनासाठी विशेष कामगिरी बजावली आहे. गर्भपातविषयक कायद्यासंबंधी नेमलेल्या 'शांतिलाल शाह समिती'चे ते सभासद होते. डॉ.पुरंदरेंच्या कार्याबद्दल त्यांना 'पद्मभूषण' पुरस्कार देण्यात आला. डॉ. पुरंदरेंना अनेक मानसन्मान मिळाले. त्यांतील काही मानसन्मान : अधिष्ठाता- वैद्यकीय विद्याशाखा, मुंबई विद्यापीठ, अध्यक्ष- कॉलेज ऑफ फिजिशियन्स ॲण्ड सर्जन्स, मुंबई, सन्मान्य सदस्य- एडिंबरो ऑब्स्टेटिक्स सोसायटी, अध्यक्ष- इंटरनॅशनल फेडरेशन ऑफ गायनॅकोलॉजी ॲण्ड ऑब्स्टेटिक्स, सन्मान्य सदस्य- इंडियन अकॅडमी ऑफ मेडिकल सायन्सेस, अध्यक्ष- इंडियन अकॅडमी ऑफ सायटॉलॉजिस्ट. स्त्री-रोगविज्ञान व प्रसूतिविद्या या विषयांवर त्यांचे बरेच संशोधन असून राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय वैद्यकीय नियतकालिकांतून त्यांचे संशोधनपर लेख प्रसिद्ध झालेले आहेत. ते सहलेखक असलेल्या पुस्तकाच्या दहा आवृत्त्या निघाल्या आहेत. त्यांना संगीतात खूप रस होता व ते उत्तम तबलावादक होते. त्यांचे आत्मचरित्रही प्रकाशित झाले आहे.

– डॉ. अरूण मांडे / डॉ. शशिकांत प्रधान

## पेठे, वसंत अवधूत

**अभियंता**

**१२ फेब्रुवारी १९२६ - ३ नोव्हेंबर १९८७**



वसंत अवधूत पेठे यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील तासगाव येथे झाला. वडील सरकारी अधिकारी होते. त्यांची मुंबईत बदली झाल्याने पेठे यांचे शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षण विलेपार्ल्यात झाले. पेठे यांनी मुंबई विद्यापीठातून भौतिकशास्त्र व गणित या दोन्ही विषयांत एम.एस्सी. ह्या पदव्या प्राप्त केल्या. त्यानंतर काही काळ मुंबईतील रुइया, रुपारेल आणि सिद्धार्थ महाविद्यालयांत अध्यापनाचे कार्य केले.

पंतप्रधान पंडित नेहरूंनी भारताची औद्योगिक प्रगती वेगवान होण्यासाठी केंद्र शासनात अणुऊर्जा हा प्रभाग निर्माण केलेला होता. तसेच त्याच्या अंतर्गत अणुऊर्जा आस्थापन (ॲटॉमिक एनर्जी एस्टॅब्लिशमेंट) हे तुर्भे

प

येथील केंद्र स्थापन केले. त्यामध्ये पेठे यांची वैज्ञानिक अधिकारी म्हणून निवड झाली. त्या सुमारास भारतीय शास्त्रज्ञ 'अप्सरा' ही अणुभट्टी उभारत होते. कोणत्याही अणुभट्टीच्या सान्निध्यात काम करणाऱ्या लोकांना किरणोत्साराच्या तीव्रतेबाबत सतत माहिती असणे सुरक्षिततेच्या दृष्टीने महत्त्वाचे असते. ते अचूक मापन करणे व धोकादायक पातळी निर्माण होण्याआधीच तसा संदेश देणे, अशी मापनयंत्रे विकसित करणे हे त्यांचे सुरुवातीचे कार्य होते. त्या विभागाचे नाव 'हेल्थ फिजिक्स इन्स्ट्रुमेंटेशन' असे होते. त्याच सुमारास 'जनरल इलेक्ट्रिक' या कंपनीतर्फे तारापूर येथे विद्युतनिर्मिती करणारी अणुभट्टी उभारण्यात येत होती. त्यात भारतीय अणुविज्ञान शास्त्रज्ञांचा सहभाग होता. त्यामध्ये वरील प्रकारची विकसित केलेली यंत्रणा पेठे यांच्या मार्गदर्शनाखाली यशस्विरीत्या बसवण्यात आली. १९६० साली अमेरिकेत व नंतर फ्रान्समध्ये अणुविज्ञानातील भौतिकशास्त्र याचा अभ्यास करण्यासाठी त्यांची निवड झाली. एक वर्ष प्रगत देशात अभ्यास करताना, प्रत्यक्ष प्रयोग करण्याची संधी मिळाल्यामुळे अत्याधुनिक किरणोत्सार मापन पद्धती, भारतात परत आल्यावर येथे रुजू करता आली. किरणोत्सारी समस्थानिक कार्बन १४ व हायडोजन ३ (ट्रिशियम) यांचा वापर करून अणुभौतिक प्रयोग येथे सुरू केले. या समस्थानिकामधून निर्माण होणारे बीटा कण अत्यंत कमी ऊर्जा घेऊन बाहेर येतात. ते लिक्विड सिंथिलेशन काउण्टिंग पद्धतीने अचूक मापन करता येते हे त्यांनी येथील प्रयोगशाळेत रूढ केले. त्याचा महत्त्वाचा उपयोग वैद्यकीय क्षेत्रात आजाराचे निदान करण्यासाठी होतो.

मोठ्या प्रमाणात येणाऱ्या रुग्णांच्या वैद्यकीय नमुन्यासाठी त्यांनी जलद चालणारी स्वयंचलित यंत्रणा व मापन पद्धती विकसित केली. आता अशी यंत्रणा रुग्णालयामध्ये वापरात आहे हे मोठेच समाजोपयोगी काम आहे. त्यांनी पल्सशेप डिस्क्रिमिनेशनसारखी नावीन्यपूर्ण मापन पद्धती विकसित केली. कर्करोग निदानासाठी व उपचारासाठी भारतीय बनावटीची किरणोत्सार शोधक/मापक यंत्रे (रेडिएशन स्कॅनर्स) त्यांनी यशस्विरीत्या तयार केली. अशा मापन यंत्रणा औद्योगिक संशोधनात उपयोगी पडतात. गामा व न्यूट्रॉन किरणोत्सार मापन हासुद्धा त्यांच्या कामाचा विषय होता. विकिर्ण (स्कॅटर्ड) न्यूट्रॉन मापन तत्त्वावर भूगर्भातील कच्चे तेल शोधणे हे काम, त्यांनी तेल महामंडळासाठी केले. भारतीय अणुवीज केंद्रे, अप्सरा, ध्रुव, सायरस, पौर्णिमा, फास्ट ब्रीडर, झरलिना अशा कित्येक प्रकल्पांमध्ये त्यांचा सहभाग होता. त्या सर्व प्रकल्पांचा गाभा किरणोत्सार मापन हा होता.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे ते सदस्य होते. 'अणुशक्ती' या विषयाच्या पुस्तकातील लिखाणात त्यांचा सहभाग होता. १९८६ साली ते भाभा अणुऊर्जा संशोधन केंद्रातून 'इलेक्ट्रॉनिक्स विभाग प्रमुख' म्हणून निवृत्त झाले. त्यानंतर थडोमल सहानी व कच्छी पॉलिटेक्निक्स महाविद्यालयात अध्यापन करून त्यांनी विद्यार्थिवर्गाला त्यांच्या समृद्ध अनुभवाचा लाभ दिला. अनेक संस्था, उच्चस्तराच्या परीक्षांच्या प्रश्नपत्रिका काढण्यासाठी त्यांना विनंती करीत असत. तसेच अनेक कंपन्या, नोकरीसाठी आलेल्या उमेदवारांतून निवड करण्यासाठी त्यांचा सल्ला घेत असत. ते नेहमीच शांतपणे दुसऱ्यांचे विचार समजून घेत असत. त्यामुळे सर्वांना त्यांच्याविषयी आत्मीयता व आदर असे. ते 'अणुशास्त्राची ओळख' हे पुस्तक लिहीत होते; परंतु त्यांच्या आकस्मिक निधनामुळे ते लेखन पूर्णत्वास गेले नाही.

— स. वा. काळे

✲ ✲ ✲

प




## फडके, दत्तात्रेय यशवंत

**भौतिकशास्त्रज्ञ**

**६ मार्च १९०९ - डिसेंबर १९७६**



प्रामुख्याने इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानावर आधारित वैज्ञानिक प्रगतीचे सुवर्णयुग विसाव्या शतकाच्या मध्यकाली जगभर अवतरले. स्वतंत्र भारतात इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञान रुजविण्यात डॉ. दत्तात्रेय यशवंत फडके यांचा सिंहाचा वाटा होता. त्यांचा जन्म महाराष्ट्र व कर्नाटक राज्याच्या सीमा भागात, जमखंडी येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण महाराष्ट्रात सोलापूर व नाशिक येथे झाले. महाविद्यालयीन शिक्षण पुणे व मुंबई येथे झाले. जन्मजात धाडसी आणि साहसी प्रवृत्ती असल्याने शारीरिक क्षमतेचा कस लागणारे उपक्रम हाती घेऊन ते यशस्वी रितीने तडीस नेणे, हा तर विद्यार्थिदशेपासूनचा फडके यांचा छंदच होता. त्याचीच सुधारून वाढविलेली आवृत्ती त्यांच्या वैज्ञानिक म्हणून जवळजवळ तीन दशकांच्या कारकिर्दीत दृष्टोत्पत्तीस येते. भौतिकशास्त्रात महाविद्यालयीन शिक्षण घेतल्यानंतर ते जर्मनीतील बॉन विद्यापीठात उच्च शिक्षणासाठी गेले. तेथे १९३४ साली ‘कन्टिन्यूअस स्पेक्ट्रा ऑफ गॅसेस अंडर प्रेशर’ या शाखेत संशोधन करून त्यांनी पीएच.डी. पदवी संपादन केली. भारतात परतल्यानंतर १९३७ सालापासून तब्बल बारा वर्षे त्यांनी मुंबईच्या सेंट झेवियर्स महाविद्यालयात इलेक्ट्रॉनिक अभियांत्रिकीचे प्राध्यापक म्हणून काम केले. त्या काळात प्रगत वैज्ञानिक संशोधनासाठी निरनिराळ्या प्रकारची इलेक्ट्रॉनिक उपकरणे आणि संयंत्रे वापरण्याची निकड वाटायची. परंतु तशी संयंत्रे सहजासहजी मिळत नसत. अशा वेळी ही उपकरणे स्वत: आपल्या हाताने बनवावी लागायची. डॉ. फडके अशा तऱ्हेच्या कामात निष्णात होते.

याच संदर्भात त्यांचा डॉ. होमी भाभांशी परिचय झाला. त्या वेळी डॉ. भाभा मुंबईतच टाटा मूलभूत संशोधन संस्था सुरू करण्याच्या कामात गुंतले होते. त्यांनी डॉ. फडके यांना आपल्या संस्थेत काम करण्यासाठी १९४९ साली पाचारण केले. तेव्हापासून १९७६ साली आपल्या मृत्यूपर्यंत डॉ. फडके टाटा मूलभूत संशोधन संस्थेत आणि भाभा अणू संशोधन केंद्रात कार्यरत होते. त्यांनी अनेक प्रकारच्या प्रगत इलेक्ट्रॉनिक्स, आधारित संयंत्रांच्या उभारणीची पायाभरणी केली. त्याचप्रमाणे भाभा अणू संशोधन केंद्रातील इलेक्ट्रॉनिक्स तांत्रिक भौतिकी शाखेचा विस्तार करण्याचे श्रेयही त्यांच्याकडे जाते.

प्रगत इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाच्या समान धाग्याने विणलेल्या निरनिराळ्या शाखांमध्ये आव्हानात्मक प्रकल्प हाती घेऊन ते तडीस नेण्यासाठी कसोशीने आटोकाट प्रयत्न करीत राहणे, हा डॉ. फडके यांचा मूलमंत्र होता.

कोलकात्याच्या व्हेरिएबल एनर्जी सायक्लोट्रॉनची निर्मिती, विद्युत चुंबकीय सूक्ष्मतरंग विज्ञानाच्या विकासासाठी ‘सर्फर’ या स्वायत्त संस्थेचा प्रकल्प, संरक्षण दलात वापरली जाणारी निरनिराळी इलेक्ट्रॉनिक संयंत्रे आणि उपकरणे बनविण्याचे तंत्र, उच्च निर्वात तंत्रात लागणारे प्रगत पंप बनविण्यासाठीचे तंत्रज्ञान, इत्यादी अनेक तंत्रांचा विकास आणि संशोधनात्मक

फ

सखोल अभ्यास भारतातच करून आपली स्वयंनिर्भरता आणि त्या अनुषंगाने आत्मविश्वास नव्या पिढीत निर्माण करण्याचे अत्यंत मोलाचे कार्य डॉ. फडके यांनी केले.

१९४८ साली ट्रान्झिस्टरचा (घनस्थिती विज्ञान/ इलेक्ट्रॉनिक्सचा मूलाधार) शोध लागला. त्यामुळे जुन्या निर्वात नलिकांवर आधारलेले इलेक्ट्रॉनिक्स तंत्र जवळजवळ पूर्णपणे बदलून टाकणारे 'घनस्थिती इलेक्ट्रॉनिक्स तंत्र' अस्तित्वात आले. इलेक्ट्रॉनिक्स तंत्राची घोडदौड सुरू झाली. तो काळ म्हणजे संगणक युगाच्या उदयाचाही काळ होता. डॉ. फडके यांनी भारतात पहिलावहिला संगणक बांधण्याचे आव्हान स्वीकारले. 'टिफ्रॅक' (टी.आय.एफ.आर.ए.सी.) या नावाचा हा भला मोठा संगणक त्या काळात जनमानसांत प्रचंड कुतूहलाचा विषय झाला होता. अणुविज्ञानाच्या संशोधनासाठी निरनिराळ्या इलेक्ट्रॉनिक्स उपकरणांची गरज भागविणारा प्रकल्पही डॉ. फडके यांनी हाती घेतला होता. 'इलेक्ट्रॉनिक्स उत्पादक एकक' या नावाने सुरू झालेल्या या प्रकल्पाचे कालांतराने हैदराबादमध्ये 'इलेक्ट्रॉनिक्स कॉर्पोरेशन ऑफ इंडिया लिमिटेड' (इ.सी.आय.एल.) मध्ये रूपांतर झाले आहे. दूरचित्रवाणी संचाचे भारतातील पहिले उत्पादन इलेक्ट्रॉनिक्स कॉर्पोरेशन ऑफ इंडियाने केले.

फ

त्यांच्या मार्गदर्शनाखाली आणखी कित्येक प्रगत तंत्रज्ञानांवर विकासाचे कार्य भारतात सुरू केले गेले. त्यांतील वानगीदाखल खास लक्षणीय प्रकल्पांची व्याप्ती पाहिली की डॉ. फडक्यांच्या चौफेर भरारीची कल्पना करता येईल. अवघड प्रकल्प दृष्टिपथात आला की ते उत्साहाने कामाला लागत. ''प्रकल्प पुरा करण्यात यश न मिळू शकेल तर? त्यापेक्षा एखादा साधा, सोपा प्रकल्प हाती घ्यावा, म्हणजे यशाची खात्री शंभर टक्के. अपयश तरी आपल्या पदरी नको यायला,'' असा सोज्ज्वळ सल्ला कोणी देऊ लागला, तर डॉ. फडके अस्वस्थ होत असत. ते म्हणायचे, ''अवघड प्रकल्पांना घाबरून पळपुटेपणा करण्यात कसली आली आहे मर्दुमकी? एखादे वेळी उडी मारताना पडायला होईलही, उडी चुकेलही; पण म्हणून उडी मारायचीच नाही, हे बरोबर नाही. संशोधन आणि विकास कार्यासाठी चुकण्याचा धोका पत्करायलाच पाहिजे.'' या त्यांच्या विचारांना अनुसरून त्यांनी कोलकात्याला व्हेरिएबल एनर्जी सायक्लोट्रॉन बनविण्याचे शिवधनुष्य उचलण्यात पुढाकार घेऊन काम सुरू केले. तेही १९६०-१९७० सालांच्या दरम्यान. अणुविज्ञानाच्या संशोधनासाठी भारताच्या नव्या दमाच्या वैज्ञानिकांना जगात अग्रेसर प्रतीचे संशोधन करण्याची संधी अशा प्रकल्पांच्या पूर्तीमुळे मिळणार होती.



**व्हेरिएबल एनर्जी सायक्लोट्रॉन, कोलकाता**

प्रोट्रॉन, अल्फा कण अशासारख्या मूलभूत महत्त्वाच्या कणांची ऊर्जा लक्षावधी / कोट्यवधी इलेक्ट्रॉन व्होल्ट इतकी वाढवून, त्यांचा मारा इतर विशिष्ट अणूंवर करून घडवून आणता येणाऱ्या प्रक्रियांचा अभ्यास करता यावा, असा यामागचा हेतू होता. त्यासाठी उच्च निर्वात-तंत्र, उच्च चुंबकीय क्षेत्रांची निर्मिती, मोजमाप वगैरेंवर पूर्ण पकड, अणुप्रक्रियांच्या अभ्यासाला लागणाऱ्या तऱ्हेतऱ्हेच्या इलेक्ट्रॉनिक उपकरणांची निर्मिती भारतातच करून हा प्रकल्प यशस्वी करून दाखविण्याचा त्यांनी विडाच उचलला होता. डॉ. फडके यांच्या मृत्यूनंतर सहा महिन्यांनी म्हणजे जून १९७७ मध्ये हा प्रकल्प यशस्विरीत्या पूर्ण झाला.

त्यांच्या मार्गदर्शनाखाली हाती घेतला गेलेला आणखी एक प्रकल्प म्हणजे भारतीय सेनादलातील रणगाड्यांवर लावल्या जाणाऱ्या 'निशादर्शी' (नाइट व्हिजन) उपकरणांचा देशांतर्गत विकास. शत्रूच्या गोटात चालू असणाऱ्या हालचालींवर पाळत ठेवण्यासाठी रात्रीच्या वेळीही स्पष्टपणे दिसावे अशी उपकरणे बनविण्याबाबत स्वयंनिर्भर होणे ही संरक्षण दलाची

महत्त्वाची गरज होती. हा प्रकल्पही डॉ. फडके यांच्या मृत्यूनंतर पूर्णत्वाला गेला. त्यानुसार भारत सरकारच्या एका सार्वजनिक उपक्रमात अशा निशादर्शी उपकरणांचे नियमित उत्पादन करून ती भारतीय सेनेच्या सेवेत कार्यरतही आहेत.

विद्युतचुंबकीय लहरींच्या वर्णपटांत सूक्ष्मलहरी-मायक्रोवेव्ह-अंतर्भूत आहेत. सूक्ष्मलहरी विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा सर्वांगीण सखोल अभ्यास करण्याच्या उद्देशाने डॉ. फडके यांच्या मार्गदर्शनाखाली विकास कार्य सुरू झाले होते. कालांतराने ‘समीर’ (सोसायटी फॉर अप्लाइड मायक्रोवेव्ह इलेक्टॉनिक इंजिनिअरिंग ॲण्ड रिसर्च) या नावाची एक स्वयंपूर्ण संशोधन संस्था मुंबई आय.आय.टी.च्या संकुलात १९८४ सालापासून कार्यरत आहे.

असे सर्वागीण विकासकार्य करूनदेखील डॉ. फडके यांना प्रसिद्धी आणि नावलौकिकाची आशा अपेक्षा नसे. वैज्ञानिकांच्या कार्याचे फलस्वरूप म्हणजे निरनिराळ्या वैज्ञानिक नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले शोधनिबंध, अशी सर्वसाधारण मान्यता आहे. तथापि डॉ. फडके यांच्या नावे फारसे शोधनिबंध प्रसिद्ध झालेले नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. त्यांची प्रसिद्धिपराङ्मुख वृत्तीच याला कारणीभूत आहे.

डॉ. फडके यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणखी एक महत्त्वाचा पैलू म्हणजे अध्यात्मासारख्या विषयातही डोळस, चौकस आणि तर्कशुद्ध, बुद्धिवादी भूमिकेतून त्यांनी केलेला अभ्यास आणि चिंतन. या संदर्भात स्वामी चिन्मयानंदांसारख्या अध्यात्ममार्गातील जाणकारांशी डॉ. फडके वेळोवेळी चर्चा करीत. अशा चर्चासत्रांमध्ये स्वामी चिन्मयानंद डॉ. फडके यांच्याबद्दल गौरवोद्‌गारही काढत असत.

डॉ. फडके यांच्या भरीव कार्याचा भारत सरकारने ‘पद्मभूषण’ पुरस्कार देऊन गौरव केला.

- डॉ. गो. के. भिडे

**संदर्भ :**

*१. स्फूर्तिस्थान : डॉ. द.य. फडके स्मृतीग्रंथ*

## फोंडके, गजानन पुरुषोत्तम

***बाळ फोंडके***

**जीवभौतिकशास्त्रज्ञ, विज्ञान लेखन**

**२२ एप्रिल १९३९**



बहुआयामी वैज्ञानिक व्यक्तिमत्त्वाच्या गजानन पुरुषोत्तम ऊर्फ बाळ फोंडके यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे शालेय शिक्षण सोलापूर येथे झाले. त्यानंतर मुंबईत विल्सन महाविद्यालयामधून बी.एस्सी. करून त्यांनी १९६० साली मुंबई विद्यापीठाची सैद्धान्तिक भौतिकशास्त्रातील एम.एस्सी. ही पदवी मिळवली. लगेचच ते भाभा अणू संशोधन केंद्रात प्रशिक्षणार्थी म्हणून रुजू झाले. या एक वर्षाच्या प्रशिक्षणातून हे केंद्र अव्वल दर्जाचे शास्त्रज्ञ तयार करण्याचे बीज पेरते. काही वर्षे तेथे संशोधन केल्यानंतर फोंडके लंडनला गेले व तेथे १९६७ साली त्यांनी प्रोफेसर जॅक ॲम्ब्रोज यांच्या मार्गदर्शनाखाली जैवभौतिकीशास्त्रातील लंडन विद्यापीठाची पीएच.डी. ही पदवी मिळवली. भाभा अणूसंशोधन केंद्रातील रेडिओबायोलॉजी या विभागात काम करत असताना, फोंडक्यांना नव्याने विकसित होत असलेल्या प्रतिरक्षाशास्त्र (इम्युनोलॉजी) या विषयाने आकर्षित केले. जैवभौतिकी संबंधित संशोधनाबरोबर त्यांनी प्रतिरक्षाशास्त्राचा अभ्यास सुरू केला. रक्तातील पांढऱ्या पेशींच्या बाह्य आवरणातील प्रथिने व त्यांचा पेशी कार्यातील सहभाग, लिंफोसाइट या पेशींची वाढ व त्यांचे विभेदीकरण (डिफरन्सिएशन) इत्यादी महत्त्वाच्या विषयांत त्यांनी संशोधन केले. १९६० ते १९८३ या २३ वर्षांच्या काळात त्यांचे अनेक शोधनिबंध उत्तम दर्जाच्या आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय जर्नल्समध्ये प्रसिद्ध झाले.

भाभा अणू संशोधन केंद्रात असताना, डॉ. फोंडके रेडिओबायोलॉजी या विभागाचे प्रमुख होते. या काळातच त्यांनी मराठीत छोट्या-छोट्या विज्ञानकथा व

फ



**फोंडके यांची ग्रंथसंपदा**

विज्ञान विषयावर वर्तमानपत्रीय लिखाण करण्यास सुरुवात केली. त्यांनी संशोधनावर लक्ष केंद्रित केले होते. त्या काळात कर्करोग संशोधनात अग्रेसर मानल्या जाणाऱ्या चेस्टर बीटी संशोधन संस्था व कॅन्सास विद्यापीठ वैद्यकीय केंद्र येथे त्यांनी अत्याधुनिक तंत्रज्ञान वापरून पेशींच्या आवरणावर होणाऱ्या अनेक जैविक प्रक्रियांविषयी संशोधन केले. परदेशांतील व देशातील परिषदा, परिसंवाद, कार्यशाळा यांत सहभाग घेऊन त्यांनी आपले शोध इतर शास्त्रज्ञांसमोर मांडले. त्यांनी पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले.

फ

संशोधनक्षेत्रात अशी भरीव कामगिरी करूनही त्यांच्या मनातली विज्ञानलेखन, संपादन व विज्ञानप्रसाराची आच सरस ठरली. त्यांच्या आयुष्यात एक मोठे परिवर्तन झाले. १९८३ साली त्यांनी भाभा अणुसंशोधन केंद्रातून स्वेच्छानिवृत्ती घेतली आणि 'सायन्स टुडे' या विज्ञानविषयक मासिकाच्या संपादकत्वाची जबाबदारी स्वीकारली. अल्पकाळात त्यांनी या मासिकाच्या अंतरंगात व बाह्यरंगात आमूलाग्र बदल करून त्या मासिकाला श्रेष्ठ दर्जा प्राप्त करून दिला. या कामगिरीमुळे त्यांना टाइम्स गटाच्या वृत्तपत्रांचे विज्ञानविषयाचे संपादकत्व बहाल करण्यात आले.

परंतु टाइम्स गटात ते फार काळ रेंगाळले नाहीत. 'कौन्सिल ऑफ सायंटिफिक अँड इंडस्ट्रियल रिसर्च' या भारत सरकारच्या प्रचंड आकाराच्या संस्थेच्या प्रकाशन आणि माहिती विभागाचे संचालक म्हणून त्यांनी मोठे आव्हान स्वीकारले आणि आपले बस्तान दिल्लीला हालवले. १९८९ ते २००३ या १४ वर्षांत त्यांनी या संस्थेद्वारे अनेक उपक्रम राबविले. हा विभाग 'विज्ञान प्रगती' व 'सायन्स रिपोर्टर' ही मासिके प्रकाशित करत असे. अल्पकाळात फोंडके यांनी या दोन्ही मासिकांचा चेहरामोहरा बदलला आणि ती भारतभर लोकप्रिय झाली. लवकरच प्रकाशन व माहिती विभागाचे कार्यबाहुल्य व उंचावलेला दर्जा लक्षात घेऊन सी.एस.आय.आर.ने त्याला राष्ट्रीय संस्थेचा दर्जा दिला व 'नॅशनल इन्स्टिट्यूट फॉर सायन्स कम्युनिकेशन' (निस्कॉम) या संस्थेची निर्मिती झाली. 'निस्कॉम' या संस्थेमार्फत त्यांनी विविध वैज्ञानिक विषयांवर भारतातील शास्त्रज्ञांकडून उत्तम पुस्तके लिहून घेतली व ती प्रकाशित केली. या पुस्तकांचे मूल्य माफक असल्याने विद्यार्थिवर्ग ती हमखास विकत घेत असे. निस्कॉमचे संचालक असताना त्यांनी सीडी रॉमद्वारे वैज्ञानिक माहिती एकत्र करण्याचे ठरवले. भारतातील नैसर्गिक संपत्तीची नोंद असलेल्या सीडी रॉममुळे पारंपरिक ज्ञान संग्रहित होण्यास मदत झाली. तसेच त्यांनी विज्ञानविषयक नियतकालिकांच्या (जर्नल्सच्या) संपादकीय मंडळाचे सभासद म्हणून काम केले आहे.

फोंडके यांनी विपुल लेखन केलेले आहे. त्यांच्या सुमारे २०० विज्ञानकथा, २०००हून अधिक विज्ञान लेख आणि मराठी, हिंदी व इंग्रजी मिळून ५०हून अधिक पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यांनी विपुल स्तंभलेखन केले व वैज्ञानिक सदरेही नियमित चालवली आहेत. त्यांच्या 'उद्याचे वैद्यक', 'कॉम्प्यूटरच्या करामती', 'चिरंजीव' व 'जावे विज्ञानाच्या गावा' या पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार मिळाले आहेत. लेखनाच्या माध्यमाद्वारे त्यांनी अगदी सहजपणे व सोप्या शब्दांत वैज्ञानिक व तांत्रिक गोष्टी सामान्य लोकांपर्यंत पोहोचवल्या व त्या वाचण्याची आवड निर्माण केली. या कार्याबद्दल इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचे इंदिरा

गांधी पारितोषिक, एन.सी.एस.टी.सी.चा राष्ट्रीय पुरस्कार, वीर सावरकर पुरस्कार देऊन त्यांना गौरविण्यात आले.

सुरुवातीच्या काळापासून त्यांचा मराठी विज्ञान परिषदेशी संबंध होता. ते मराठी विज्ञान परिषदेच्या पत्रिकेचे संपादन करतात. या पत्रिकेची आजची लोकप्रियता, वाचनीयता व आकर्षक मांडणी यांमध्ये त्यांचा सिंहाचा वाटा आहे. १९९८ सालच्या अखिल भारतीय विज्ञान संमेलनाचे ते अध्यक्ष होते. पाचव्या राज्यस्तरीय बाल विज्ञान संमेलनाचेही ते अध्यक्ष होते. डॉ.फोंडके महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेस, इंडियन कॉलेज ऑफ ॲलर्जी ॲन्ड अप्लाइड इम्युनॉलॉजी, इंडियन सायन्स रायटर्स असोसिएशन, मराठी विज्ञान परिषद, नॅशनल सेंटर फॉर सायन्स कम्युनिकेशन, या संस्थांचे सदस्य आहेत. त्यांच्या कार्याची दखल गुजरात राज्यानेदेखील घेतली आणि त्यांना विज्ञान नगरीचे सल्लागार नेमले. आकाशवाणीसाठी त्यांनी लेखन केले आहे. दूरदर्शनचेही ते सल्लागार आहेत.

उमेदीच्या काळात फोंडकेंनी आमंत्रित प्राध्यापक म्हणून वडोदऱ्याच्या महाराजा सयाजीराव विद्यापीठात व मुंबई विद्यापीठात शिकवले. विज्ञान प्रसारासाठी महाराष्ट्रातील खेडोपाडी जाऊन भाषणांद्वारे ते जनजागृती करत असतात. भारत सरकारच्या सेवेतून मुक्त झाल्यावर पुणे विद्यापीठात ते वृत्तपत्रविद्या या विभागात मानद प्राध्यापक म्हणून त्यांच्या अनुभवातून विद्यार्थ्यांना विज्ञान पत्रकारिता शिकवतात.

– डॉ. रजनी भिसे

**संदर्भ :**

*१. देशपांडे अ.पां.; 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन; २००५.*

✻✻✻

फ



# बर्वे, परशुराम महादेव

**रसायनशास्त्रज्ञ, विज्ञानलेखक**

**७ ऑगस्ट १९०६ - ५ फेब्रुवारी १९९५**



प्रा. परशुराम महादेव बर्वे यांचा जन्म कोकणात व शालेय शिक्षण मालवण (जिल्हा सिंधुदुर्ग) येथे झाले. मुंबईच्या विल्सन महाविद्यालयातून १९२७ साली बी.एस्सी. झाल्यानंतर त्याच महाविद्यालयात त्यांनी डेमॉन्स्ट्रेटर आणि फेलो म्हणून कारकिर्दीस आणि कलील रसायनशास्त्रात (कोलाईडल केमिस्ट्री) संशोधनास सुरुवात केली. १९३० साली आपले संशोधन पूर्ण करून मुंबई विद्यापीठाची रसायनशास्त्राची एम.एस्सी. (ऑनर्स) पदवी मिळविली. लगेचच विल्सन महाविद्यालयात व्याख्याता, १९३२ साली दुय्यम प्राध्यापक, १९४४ साली प्राध्यापक आणि १९४६ सालापासून रसायनशास्त्र विभागाचे प्रमुख असे सन्मान प्राप्त करीत, १९६४ साली ते नोकरीतून निवृत्त झाले. रसायनशास्त्राचा अभ्यास, संशोधन आणि त्यासंबंधीचे इंग्रजी आणि मराठीतून लेखन करण्याचा परिपाठ सुरूच ठेवला. कलील रसायनशास्त्रातील संशोधनावर आधारित त्यांचे २३ शोधनिबंध अनेक परदेशी नियतकालिकांत प्रसिद्ध झाले. १९५७ साली त्यांनी इंडियन केमिकल सोसायटीचे अध्यक्षपद भूषविले आणि १९६१ साली विज्ञान विभागाचे अधिष्ठाता होण्याचा बहुमानही त्यांना मिळाला. १९५२ ते १९६४ सालापर्यंत त्यांची मुंबई विद्यापीठाचे फेलो म्हणून नियुक्ती झाली होती. १९३१ सालापासून त्यांनी सर्वसाधारण वाचकांना सहज समजेल असे विज्ञान विषयावर मराठीतून लेखन सुरू केले. त्यांचे निरनिराळ्या मराठी नियतकालिकांतून सुमारे १२५ लेख प्रसिद्ध झालेले आहेत. आकाशवाणीवरही त्यांची विज्ञानविषयावर मराठीतून अनेक भाषणे प्रक्षेपित झालेली आहेत. मराठी विश्वकोशासाठीही रसायनशास्त्रातील विषयांवर त्यांनी लिखाण केलेले आहे. महाराष्ट्र राज्य भाषा संचालनालयाच्या रसायनशास्त्र उपसमितीचे सदस्य असताना, विज्ञान आणि तंत्रज्ञान क्षेत्रात, इंग्रजी शब्दांसाठी, सार्थ आणि सोपे मराठी प्रतिशब्द रूढ करण्यासाठी त्यांनी महत्त्वाचे योगदान दिलेले आहे.

१९४७ साली भारत स्वतंत्र झाल्याबरोबर, सर्वच क्षेत्रांत झपाट्याने प्रगती होऊ लागली. या संक्रमणकाळात, मातृभाषेतून विद्यापीठीय स्तरापर्यंत शिक्षण दिले गेले पाहिजे ही मूलभूत विचारप्रणाली पक्की रूढ झाली. त्या अनुषंगाने देशभराच्या शिक्षणतज्ज्ञांनी आटोकाट प्रयत्न केले. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष असताना, आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञान, तंत्रज्ञान, अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत, मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे यासाठी लागणाऱ्या सोयीसुविधा निर्माण करण्याचे कसोशीने प्रयत्न केले गेले. मराठी विश्वकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला वगैरे ग्रंथ मराठीतून लिहिण्यासाठी त्या-त्या क्षेत्रातील तज्ज्ञांची निवड केली गेली आणि दर्जेदार विज्ञानसाहित्य लिहवून घेतले गेले. प्रा. बर्वे हे त्यांपैकीच एक आघाडीचे विज्ञानलेखक होते आणि त्यांची पुस्तके याच मंडळाने प्रकाशित केलेली

आहेत. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने प्रसिद्ध केलेल्या प्रत्येक पुस्तकाला शास्त्रीजींनी विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहिली.

जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृती यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात, विचार व्यक्त करतात, तोपर्यंत शिक्षण सकस होत नाही; संशोधनाला परावलंबित्व राहते आणि विचारांना अस्सलपणा येत नाही. एवढेच नव्हे, तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानाला सर्वसामान्य माणसे वंचित राहतात. प्रा. बर्वे यांनी याच दृष्टिकोनाचा पाठपुरावा केला आणि दैनंदिन जीवनात अत्यंत आवश्यक असणाऱ्या वस्तू, पदार्थ आणि साहित्य यांसंबंधी सामान्य जनतेला समजेल उमजेल अशा भाषेत विज्ञान आशयात तडजोड न करता लेखन केले. त्यांनी 'साखर' (मार्च १९७७), 'खनिज तेल व तज्जन्य रसायने' (ऑक्टोबर १९७७), 'निर्मलके साबण व तत्सम रसायने', (मे १९८८) इत्यादी विषयांवर १२ मराठी पुस्तके लिहिली.

साखर या पदार्थाला दैनंदिन जीवनात पर्याय नाही. आपल्या आयुष्यातील आनंददायक प्रसंग, मनाचे समाधान, संतोष वगैरे भावना व्यक्त करण्यासाठी आणि आप्तेष्टांना व सन्मित्रांना त्यांत सहभागी करण्यासाठी आपण पेढे-बर्फी यांसारखी मेवामिठाई वाटतो. स्वातंत्र्यपूर्व काळात साखर आयात केली जात असे. साखरउद्योग जवळजवळ नव्हताच. साखरउद्योगामुळे, उसाची लागवड, त्यावरील संशोधन, त्यावरील व्यापारी आणि आर्थिक उलाढाल, सरकारचे धोरण, साखरेचे निरनिराळे प्रकार आणि त्यांची उत्पादन तंत्रे, साखरेचे आहारातील आणि आरोग्यविषयक महत्त्व वगैरे बाबींचा शास्त्रीय दृष्टिकोनातून विचार असलेली प्रकरणे, त्यांच्या 'साखर' या पुस्तकात समाविष्ट केलेली आहेत. खनिज तेल व तज्जन्य रसायने या सुमारे ३०० पानांच्या पुस्तकात प्रा. बर्वे यांनी भरपूर तांत्रिक माहिती तर दिली आहेच; शिवाय भरपूर आकडेवारीही दिली आहे. त्या काळी भारतात, बोटावर मोजता येतील एवढेच भारतीय




तंत्रज्ञ होते. त्यांच्याशी संपर्क साधून त्यांनी अचूक माहिती मिळविली आणि भारतासंबंधी तांत्रिक आकडेवारीही उपलब्ध केली. पेट्रोरसायनांच्या शोधामुळे आणि उत्पादनांमुळे भारतीयांची जीवनशैली कशी बदलू शकेल याचा आढावा या पुस्तकात घेतला गेला आहे. पुस्तकाच्या शेवटी इंग्रजी संज्ञा आणि स्पष्टीकरणे, पूरक माहिती, इंग्रजी-मराठी आणि मराठी-इंग्रजी पारिभाषिक शब्द, संदर्भ ग्रंथसूची, प्रांतवार कारखान्यांची यादी आणि संबंधित आकडेवारी, विषयसूची, वगैरे माहिती असलेली परिशिष्टे दिली असल्यामुळे प्रा. बर्वे यांची पुस्तके परिपूर्ण वाटतात.

साबण हादेखील आपल्या दैनंदिन जीवनातील अपरिहार्य घटक आहे. पेट्रोरसायनांच्या उत्पादनामुळे, प्लॅस्टिक, कृत्रिम धागे, रंग, निर्मलके वगैरे पदार्थांविषयी कुतूहल जागृत झाले. धातू, काच, सिरॅमिक, बांबू आणि लाकूड वगैरेंच्या वापराला सोयीस्कर पर्याय निर्माण झाले. त्यांच्या वापरातील फायदे-धोके, समज-गैरसमज वगैरेसंबंधी प्रबोधन होणे आवश्यक होते. हे आव्हान प्रा. बर्वे यांच्यासारख्या चतुरस्र विज्ञान लेखकांनी परिणामकारकरीत्या पेलले.

'अवकाशयात्रा', 'सागराचे दिव्यदर्शन', 'रसायनशास्त्राची करामत', 'सागरतळाचा शोध', 'एक ग्रह- त्याचे नाव पृथ्वी', 'विज्ञानाचे युगप्रवर्तक', आणि 'जीवन रसायनाचा ओनामा', या सात विज्ञान विषयक इंग्रजी पुस्तकांचे त्यांनी सुबोध मराठी अनुवादही केले.

ब

रसायनशास्त्राचे सातत्याने केलेले चिंतन, पुस्तकरूपाने प्रसिद्ध केल्याशिवाय पूर्ण होत नाही आणि ते जनतेपर्यंत पोहोचतही नाही. 'विज्ञान विलास' (१९५५), 'विज्ञान शोभा' (१९५८) आणि 'विज्ञान सौंदर्य' (१९५९) या तीन पुस्तकांचे लेखन, प्रा. बर्वे यांच्यातील विज्ञानसाहित्यिकाचे पैलू दाखवितात. म्हणूनच वरील पुस्तकांना राज्यसरकारकडून त्या-त्या वर्षाचा, सर्वोत्तम विज्ञान साहित्य म्हणून पुरस्कार मिळाला. प्रा. बर्वे यांच्या अनेक पुस्तकांना महाराष्ट्र शासन व इतर ग्रंथोत्तेजक संस्थांकडून गौरवार्थ पारितोषिके मिळालेली आहेत.

मराठी विज्ञान परिषदेचे एक संस्थापक, आजीव सभासद, कोषाध्यक्ष, उपाध्यक्ष, आणि विश्वस्त या नात्यांनी त्यांनी परिषदेला मार्गदर्शन केलेले आहे. 'मराठी विज्ञान परिषद पत्रिके'चे पहिल्यापासून एक संपादक म्हणूनही त्यांनी लिखाण केले आहे. जालना येथील आठव्या विज्ञान संमेलनात त्यांचा गौरव झालेला आहे. त्यांचे वयाच्या एकोणनव्वदाव्या वर्षी मुंबईत वृद्धापकाळाने त्यांचे निधन झाले.

— गजानन वामनाचार्य

**संदर्भ :**

*१. मराठी विज्ञान परिषद-पत्रिका; मार्च १९९५.*

ब

## बापट, रवींद्र दिनकर

***रवी बापट***

**वैद्यकतज्ज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**२ जून १९४२**

भारतीय उपखंडात वैद्यकीय क्षेत्रातील ख्यातनाम मंडळींमध्ये जे आपल्या चतुरस्र व्यक्तिमत्त्वामुळे ओळखले जातात, अशा डॉक्टरांच्या मांदियाळीत डॉ.रवी बापटांचे नाव आदराने घेतले जाते. एक निष्णात शल्यचिकित्सक, उत्कृष्ट शिक्षक, कर्तबगार प्रशासक, सर्व थरांतील रुग्णांना आधार वाटणारा डॉक्टर आणि कला, नाट्य, संगीत, यांबरोबरच सामाजिक कार्यात रमणारा संवेदनशील माणूस, अशी ओळख असलेल्या



डॉ. रवी बापटांचा जन्म पुणे येथे एका सुखवस्तू, सुसंस्कृत घरात झाला. त्यांचे आई-वडील, दोघेही डॉक्टर. वडील सरकारी नोकरीत होते. त्यांच्या वेळोवेळी होणाऱ्या बदल्यांमुळे त्यांचे शालेय शिक्षण बालाघाट, पुणे, अमरावती, वाशिम, छिंदवाडा, जगदाळपूर, अशा विविध ठिकाणी झाले.

कुटुंबात आजोबा, आई-वडील व काका वैद्यकीय व्यवसायात असल्यामुळे, घरातील वातावरण वैद्यकीय व्यवसायाला पूरक होते. परंतु त्यांचा कल मात्र सैन्यात जाण्याकडे होता. त्यासाठी त्यांची राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीत (एन.डी.ए.) निवडही झाली; परंतु अंतिम शारीरिक चाचणी परीक्षेत रंगांधळेपणामुळे ते बाद झाले. त्यामुळे नाइलाजाने त्यांना आपला सैन्यात जाण्याचा बेत सोडावा लागला. मुंबईच्या रामनारायण रुइया महाविद्यालयातून इंटरची परीक्षा प्रथम वर्गात उत्तीर्ण करून त्यांनी १९५९ साली जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. तेथे वैद्यकीय शिक्षणाबरोबरच त्यांनी क्रीडाक्षेत्रातही प्रावीण्य मिळविले. त्यांनी सात क्रीडा प्रकारांत महाविद्यालयाचे प्रतिनिधित्व केले. बॅडमिंटन, टेनिस आणि हॉकी हे त्यांचे आवडते खेळ. बॅडमिंटनमध्ये त्यांनी मुंबई विद्यापीठाच्या पुरुषांच्या दुहेरी स्पर्धेत दोन वर्षे विजेता (चॅम्पियन) होण्याचा मान मिळविला.

१९६४ साली त्यांनी वैद्यकशास्त्राचा (मेडिसीन) डॉ. के.डब्ल्यू. दाणी पुरस्कार मिळविला. त्याच वर्षी रोटरी क्लबचा सर्वोत्तम विद्यार्थी हा पुरस्कारही डॉ. रवी बापट यांना मिळाला. एम.बी.बी.एस. झाल्यानंतर एफ.आर.सी.एस.साठी परदेशात जाण्यासंबंधी ते द्विधा मन:स्थितीत होते. या संदर्भात सल्ला विचारण्यासाठी ते प्रख्यात सर्जन डॉ. सी.एस. वोरा यांच्याकडे गेले. योगायोगाने त्यांच्याच हस्ते त्यांना सर्वोत्तम विद्यार्थी हा

पुरस्कारही मिळाला होता. डॉ. सी.एस. वोरांनी पुस्तकी पांडित्यापेक्षा सरावाला जास्त महत्त्व व त्यामुळे शस्त्रक्रिया करण्याचा ज्याला जास्तीत जास्त अनुभव तोच चांगला सर्जन, हा मोलाचा सल्ला दिला आणि डॉ. रवी बापटांना योग्य दिशा मिळाली. आपल्या गुरूंच्या शिकवणीची महती त्यांनी वेळोवेळी अनुभवली.

अत्यंत कर्तव्यनिष्ठ वडील आणि प्रागतिक विचारसरणीची, भारतीय संस्कृतीबद्दल नितांत आदर असणारी तत्त्वनिष्ठ आई, यांच्या संस्कारांमुळे भरपूर पैसा मिळवून देणाऱ्या खाजगी व्यवसायापेक्षा सार्वजनिक रुग्णालयातील नोकरी करण्याचा निर्णय घेताना बापटांना फार विचार करण्याची गरजच भासली नाही.

पदवी आणि पदव्युत्तर हे दोन्हीही अभ्यासक्रम ज्या जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयामधून त्यांनी पार पाडले होते, त्याचीच त्यांनी कर्मभूमी म्हणून निवड केली. तेथे साहाय्यक प्राध्यापक म्हणून नोकरी करताना, शल्यचिकित्सेबरोबरच अध्यापनाचे कामही त्यांनी केले. अध्यापनाच्या कामात त्यांना विशेष रुची होती. शिक्षकी पेशा मनापासून आवडत असेल, तरच त्या पेशात यावे, असे त्यांचे ठाम मत होते. एखादा विषय आपल्याला नीट समजला, तरच त्याची उकल सोप्या शब्दांत करणे शक्य होते व त्यानंतर तो विषय अत्यंत प्रभावीपणे आपण शिकवू शकतो, या सिद्धान्ताचे पालन त्यांनी आयुष्यभर अत्यंत काटेकोरपणे केले. त्यामुळेच ते विद्यार्थ्यांचे अत्यंत लाडके बापटसर होते. अभ्यासाव्यतिरिक्त इतर क्षेत्रांत भाग घेणाऱ्या विद्यार्थ्यांना ते रात्री ९ ते १२ या वेळात, अतिरिक्त तास घेऊन शिकवायचे.

एखादा विकार समजावून सांगताना, त्या विकाराचा रुग्ण समोर ठेवून विकारांची लक्षणे, निदानाची पद्धत, विकारात निर्माण होणारी संभाव्य गुंतागुंत, आणि त्या विकारावरील उपाययोजना, अशा विविध पैलूंवर प्रकाश टाकणारी प्रशिक्षण पद्धती म्हणजेच रुग्णसमीप चिकित्सालय (बेडसाइड क्लिनिक्स). वैद्यकीय शिक्षणाचा हा आत्मा. बापटांकडे किचकट रोगनिदानाचा मार्ग पद्धतशीर विश्लेषण करून सुकर करण्याचे




असामान्य कसब असल्यामुळे, त्यांचे चिकित्सालय विद्यार्थ्यांमध्ये अत्यंत लोकप्रिय होते. आठवडाभर रुग्णकक्षाच्या कामात व्यस्त असलेल्या पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांसाठी ते दर रविवारी चिकित्सालय घेत. त्यांच्या चिकित्सालयाचा लौकिक ऐकून मुंबईतील इतर वैद्यकीय महाविद्यालयांचे विद्यार्थीसुद्धा त्यास आवर्जून उपस्थित राहत असत.

अध्यापनाबरोबरच शल्यचिकित्सेमध्येही त्यांचे कसब वादातीत होते. शस्त्रक्रिया करताना त्यांनी आपल्यातला संशोधक प्रयत्नपूर्वक सतर्क ठेवला होता. त्यामुळेच, पारंपरिक उपचारपद्धतीत वा शस्त्रक्रियेच्या पद्धतीत परिवर्तनाची शक्यता पडताळून पाहण्याचे विचार त्यांच्या मनात सतत घोळत असत. स्वादुपिंडाच्या संदर्भातील प्रचलित शस्त्रक्रियेला सोपी, कमी जोखमीची; परंतु अत्यंत शास्त्रशुद्ध अशी पर्यायी शस्त्रक्रिया त्यांनी प्रचलित केली. तिला आता 'बापट प्रक्रिया' (बापट्स प्रोसिजर) म्हणतात. अंशत: बारीक, निमुळत्या झालेल्या अन्ननलिकेला रुंद करण्याच्या नेहमीच्या पद्धतीमध्ये त्यांनी सुचविलेली नवीन पद्धत 'बापट विस्तृतीकरण' (बापट डायलेटर) या नावाने ओळखली जाते. अनेक किचकट शस्त्रक्रियेमध्ये केलेले यशस्वी प्रयोग त्यांनी आंतरराष्ट्रीय व्यासपीठावर सादर केले.

रुग्णांवर उपचार करताना सर्वांत महत्त्वाचे असते ते रुग्णाचे हित, अशी त्यांची धारणा होती. त्यांच्या या वृत्तीमुळे के.ई.एम. रुग्णालयात येणाऱ्या समाजाच्या सर्व वर्गातील रुग्णांना त्यांचा मोठा आधार वाटत असे. जी.एस. वैद्यकीय महाविद्यालयामध्ये सर्वसाधारण शस्त्रक्रिया विभाग, तसेच जठरांत्र शल्यचिकित्सा सेवा विभागाचे ते प्रमुख होते. के.ई.एम. रुग्णालयामध्ये आयुर्वेद संशोधन केंद्र सुरू करण्यात त्यांचा मोठा वाटा

आहे. गुळवेलीवरील संशोधनाला त्यांनी आंतरराष्ट्रीय व्यासपीठावर सादर करून आयुर्वेदिक संशोधनाबद्दल आधुनिक वैद्यकशास्त्राला गांभीर्याने विचार करण्यासाठी प्रवृत्त केले. देशांतर्गत असलेल्या ज्ञानाच्या भांडाराकडे दुर्लक्ष करून परदेशी संशोधनाचे गोडवे गाण्याच्या वृत्तीचा त्यांना मनस्वी तिटकारा आहे.

बापटांनी महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठाचे कुलगुरू, हाफकिन जीव औषध महामंडळाचे अध्यक्ष, टाटा स्मारक संस्थेच्या नियामक मंडळावर महाराष्ट्र शासनाचे नियुक्त प्रतिनिधी, अशा विविध प्रतिष्ठित पदांवर काम केले. बापटांनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय नियतकालिके व परिषदांमध्ये १२३ शोधनिबंध लिहिले आणि १०२ संशोधनात्मक कार्ये सादर केली. त्यांनी केलेल्या शास्त्रीय लिखाणांमध्ये 'कंपॅनियन टू सर्जिकल पॅथॉलॉजी' आणि 'आर्ट ऑफ सर्जिकल क्लिनिकल प्रेझेन्टेशन्स' हे लेख विशेष उल्लेखनीय आहेत.

त्यांना वैद्यकीय क्षेत्रातील अनेक मानाचे पुरस्कार मिळाले. त्यांनी लिहिलेली 'स्वास्थ्यवेध' आणि 'वॉर्ड नंबर पाच, के.ई.एम.' ही त्यांची पुस्तके खूप गाजली. आपल्या चतुरस्र व्यक्तिमत्त्वामुळे समाजातल्या सर्व थरांत चहात्यांची प्रभावळ लाभलेल्या या कलंदर माणसाला, आयुष्यात मिळालेल्या सर्व मानमरातब आणि सन्मानांपेक्षा 'के.ई.एम.चे डॉ. रवी बापट' ही ओळख सर्वाधिक सुखावून जाते.

ब

– डॉ. राजेंद्र आगरकर

**संदर्भ :**

*१. बापट, डॉ. रवी; 'वॉर्ड नं. ५ के.ई.एम.'; रोहन प्रकाशन; २००५.*

## बाळ, दत्तात्रेय वामन

**जीवशास्त्रज्ञ**

**२५ ऑगस्ट १९०५ - १ एप्रिल १९९९**

डॉ. दत्तात्रेय वामन बाळ यांचा जन्म आणि शालेय शिक्षण मुंबईत झाले. त्यांनी १९३० साली बी.एस्सी. आणि १९३३ साली एम.एस्सी. (प्राणिशास्त्र) मुंबई विद्यापीठातून प्राप्त केली. १९३८ साली सर मंगळदास



नथुभाई तांत्रिक शिष्यवृत्ती घेऊन ते इंग्लंडला गेले आणि १९४० मध्ये लिव्हरपूल विद्यापीठाची मत्स्योद्योग विज्ञानातील पीएच.डी. संपादन केली. १९४४ साली डॉ. बाळ भारतात परतले आणि ते इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स, मुंबई येथे प्राध्यापक म्हणून रूजू झाले. १९४७ सालापर्यंत तिथे काम केल्यावर १९४७ ते १९५१ या कालावधीत ते भारत सरकारच्या अन्न आणि कृषी मंत्रालयात मत्स्य आणि मत्स्योद्योग सर्वेक्षण अधिकारी होते. १९५१ साली परत ते इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये प्राणिशास्त्र विभागाचे प्रमुख म्हणून नियुक्त झाले. १९५६ सालापर्यंत विभागप्रमुख म्हणून काम केल्यानंतर त्यांना त्याच संस्थेचे संचालक म्हणून बढती मिळाली. संचालक म्हणून त्यांनी १९६४ सालापर्यंत काम केले. याचवेळी १९६१-१९६२ साली ते भारत सरकारच्या अन्न आणि कृषी मंत्रालयाच्या मध्यवर्ती मत्स्योद्योग शिक्षण संस्थेचे (मुंबई) संचालक होते.

निवृत्तीनंतर १९६५ ते १९६८ या काळात ते भारत सरकारच्या विज्ञान व तंत्रज्ञान परिभाषेच्या जीवशास्त्र समितीचे सदस्य होते. १९६८ सालापासून १९७३ सालापर्यंत त्यांनी विद्यापीठ अनुदान आयोगाच्या योजनेखाली विज्ञान संशोधन केले. तर १९७४ ते १९७७ सालापर्यंत ते औरंगाबाद येथील विज्ञान संस्थेचे विशेष कार्यकारी अधिकारी होते.

आपल्या संशोधनामुळे त्यांनी देशात परदेशांत अनेक महत्त्वाची पदे भूषविली. युनेस्कोच्या सागरी विज्ञान विषयक आंतरराष्ट्रीय समितीचे सल्लागार, लोकसेवा आयोगाचे सल्लागार, मुंबई विद्यापीठाच्या विद्वतसभेचे सदस्य, राष्ट्रीय महासागर विज्ञान संस्था समितीवर परीक्षक व सल्लागार, १९८६ साली जैतापूर, जि. रत्नागिरी येथील एकविसाव्या अखिल भारतीय मराठी

विज्ञान संमेलनाचे अध्यक्ष अशा महत्त्वाच्या पदांवर कार्यरत असताना त्यांनी आपला ठसा उमटविला. सागर संपत्तीचा अभ्यास करताना त्यांनी भारताच्या किनारपट्टीचा सखोल अभ्यास केला. भारताला तिन्ही बाजूंनी समुद्रकिनारा लाभला आहे, शिवाय पश्चिम किनाऱ्याला भूखंडाचा सागरात विस्तारीत जाणारा जो भाग (कॉन्टीनेन्टल शेल्फ) हे सर्व अभ्यासून भारतात सागरी मत्स्यसंपत्तीच्या विकासाला मोठा वाव आहे, हे त्यांनी दाखवून दिले. विस्तृत सागरी किनारा लाभलेल्या आपल्या देशातील लोकांच्या आहारात मासे असणारच. त्याचे प्रमाण वाढवून ते इतर धान्योत्पादनास पूरक बनवणे, मत्स्योत्पादन वाढविणे, माशाला अपायकारक ठरणारे आणि समुद्रास येऊन मिळणारे सांडपाणी, कारखान्याचे दूषित पाणी, भूगर्भातील तेल, नैसर्गिक वायू, समुद्रातील अनेक जिवाणूंचा, खाऱ्या पाण्याचा, लाकडावर होणारा परिणाम इत्यादी अनेक विषयावर डॉ.बाळ यांनी संशोधन केले. भारताच्या पूर्व -पश्चिम किनाऱ्यांचे वेगळेपण, तिथले मत्स्योत्पादन, त्यामधील पश्चिम किनाऱ्याचा मोठा वाटा, त्याची कारणे, माश्यांच्या विविध जाती, निर्यातक्षम कोलंबी, अशा विषयांचा त्यांनी सखोल अभ्यास केला होता.

मत्स्यसंशोधन त्यांच्या रोमातच भिनले होते. वरील सर्व व्याप सांभाळत असतानाच त्यांनी मासे, मत्स्योद्योग आणि सागरी जीवशास्त्र यावर संशोधन करून शंभराहून अधिक शोधनिबंध प्रसिद्ध केले. एम.एस्सी. आणि पीएच.डी.साठी अनेक विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले.

मत्स्योद्योगाशी संबंधीत कोळी समाजाचाही त्यांनी सखोल अभ्यास केला. त्यात कोळ्यांची लोकसंख्या एक टक्का असून सर्व जाती धर्म, पंथाचे लोक हा व्यवसाय करतात; त्यांचा शैक्षणिक, आर्थिक दर्जा अत्यंत कमी असून त्यांच्याजवळ अत्याधुनिक साधने नाहीत; फक्त लहान बोटी, ट्रॉलर्स यांच्या सहाय्याने १५ लाख टनांचे मत्स्योत्पादन ते करतात. त्यांना सुविधा पुरवल्या. त्यांची स्थिती सुधारली, तर मत्स्योद्योगाचा




विकास होऊन परकीय चलनही मिळेल, हे त्यांनी सुचवले. कोळी स्त्रिया किनाऱ्यावर आणलेल्या माशांची विक्री आणि देखभाल करतात. त्यांच्या ठायी शिक्षणाचा अभाव दिसून येतो. म्हणूनच त्या दलालांच्या सापळ्यात सापडतात. कोळ्यांची घरेही अत्यंत लहान जागेत दाटीवाटीने असतात. हे विदारक सत्य त्यांनी मांडले.

हरितक्रांती, धवलक्रांती यांकडे सरकारने जसे लक्ष घातले तसेच लक्ष घालून मत्स्योद्योगक्रांती घडून यावी, अशी त्यांची फार इच्छा होती आणि म्हणूनच त्यांनी आपले सर्व आयुष्य या विषयाशी बांधून ठेवले. वयाच्या पंचाऐंशीव्या वर्षी त्यांनी 'महाराष्ट्रातील मत्स्योद्योग' हे महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळासाठी मराठीतून पुस्तक लिहिले. त्यांनी श्री. के.व्ही. राव यांच्याबरोबर 'मरीन फिशरीज' हा संदर्भ ग्रंथ इंग्रजीत लिहिला. तो टाटा-मॅकग्रॉ हिल, नवी दिल्ली या प्रकाशन संस्थेने प्रसिद्ध केला.

भारताची लोकसंख्यावाढ आणि सागरी संपत्तीची निर्मिती यांचे प्रमाण व्यस्त असल्याने अधिकाधिक सागरी संपत्ती भारताने मिळविली पाहिजे असे, त्यांचे मत होते. मत्स्यसंपत्ती ही निसर्गाने मानवाला दिलेली देणगी असून त्याचा जास्तीत जास्त उपयोग करून निकृष्ट अपुऱ्या अन्नाऐवजी प्रथिनयुक्त मत्स्य व कोलंबी यांचे उत्पन्न वाढविण्याचा प्रयत्न भारताने करावा, असे त्यांचे प्रतिपादन होते.

– मृणालिनी साठे / दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**

*१. मराठी विज्ञान परिषद पत्रिका, मे १९९९.*

*२. देशपांडे, अ.पां.; 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन, २००५.*

## बी. राजाराम

**अभियंता**

१ फेब्रुवारी १९४५



डॉ. बोज्जी सुब्बणाचार आणि मंजुळाबाई यांच्या पोटी बी. राजाराम यांचा जन्म विशाखापट्टणम जिल्ह्यातील येल्लमांचिली या गावी झाला. डॉ. बोज्जी हे तेथील सरकारी रुग्णालयात डॉक्टर होते. तेथील सरकारी शाळेत राजाराम यांचे शिक्षण झाले. नंतर ते आंध्र लायोला महाविद्यालयातून इंटर सायन्स उत्तीर्ण होऊन वॉल्टेरच्या आंध्र विद्यापीठाच्या अभियांत्रिकी महाविद्यालयामधून स्थापत्य अभियांत्रिकीत बी.ई. झाले. नंतर त्यांनी संरचना अभियांत्रिकीत (स्ट्रक्चरल इंजिनिअरिंग) खरगपूरच्या आय.आय.टी.मधून एम.टेक. केले. नंतर तेथेच दोन वर्षे संशोधन अधिकारी म्हणून त्यांनी काम केले आणि मग १९७० साली भारतीय रेल्वेच्या अभियांत्रिकी सेवेत त्यांनी प्रवेश केला. पहिली १० वर्षे रेल्वेत काम केल्यावर पुढील १० वर्षे ते रेल्वेच्या संशोधन विभागात आणि आय.आय.टी.त काम करीत होते. नंतर काही काळ ते सल्लागार म्हणून परदेशी काम करून आले. पुढे ते १९९० सालापासून म्हणजे कोकण रेल्वेच्या स्थापनेपासून व्यवस्थापकीय संचालकपदावरून २००५ साली निवृत्त होईपर्यंत तेथे होते. तेथे ते प्रथम प्रमुख अभियंता होते, मग प्रकल्प संचालक आणि १९९८ ते २००५ सालापर्यंत व्यवस्थापकीय संचालक या पदांवर होते. १०० बोगदे, २००० पूल आणि ७५० कि.मी. लांबीच्या कोकण रेल्वेमार्गाच्या उभारणीत त्यांचा सहभाग होता. पुणे-मुंबई द्रुतगतिमार्गावरील बोगद्यांचे कामही त्यांच्या देखरेखीखाली कोकण रेल्वेने केले आहे. २६ जानेवारी १९९८ रोजी कोकण रेल्वेचे उद्घाटन झाले, तेव्हा त्यांनी स्वत: आगगाडी चालवली होती. १९९३ ते १९९८ सालांदरम्यान त्यांनी रेल्वे व्यवस्थापन यंत्रणेत विविध प्रकारे संगणकप्रणाली वापरून नियोजन, वाहतूक आणि नियंत्रण यांवर काबू मिळवून त्यासाठी लागणाऱ्या कामगार आणि अधिकारी यांची संख्या कमी केली. यासाठी जागतिक बँकेने त्यांची प्रशंसा केली. आगगाडीची चाके आणि गाड्यांचा परस्पर संबंध यांवर त्यांनी मांडलेला सिद्धान्त जगात नावाजला गेला. कारण त्याने रेल्वे वाहतुकीतील सुरक्षितता वाढली. त्यांच्या नावावर देशी आणि परदेशी अनेक एकस्वे आहेत. उदाहरणार्थ, गाड्यांची समोरासमोर टक्कर होऊ नये यासाठी त्यांनी बनवलेल्या टक्कर प्रतिबंधक यंत्रणेला एकस्व मिळाले आहे.

त्यांच्या व्यवस्थापकीय कारकिर्दीत कोकण रेल्वेची वाहतूक सुरू झाली. त्यामुळे तिच्या वाहतुकीत सुरळीतपणा आणण्याची मोठी जबाबदारी त्यांच्यावर होती. अनेक गोष्टी कागदावर छान वाटतात; पण प्रत्यक्षात त्या उतरतात तेव्हा त्यांत बऱ्याच अडचणी येतात. आगगाडी नव्याने बांधलेल्या रूळावरून जाताना वेग खूप कमी असतो. अंदाज घेत-घेत तो वाढवावा लागतो. वाटेवरच्या स्थानकांतील सोयी-सुविधा, आगगाडीतील स्वच्छता-खानपान सेवा इत्यादींच्या बाबतीत दक्षता बाळगावी लागते. कोकण रेल्वेने या सर्व बाबतींत भारतीय रेल्वेच्या इतरत्रच्या सेवांपेक्षा सरसता सिद्ध केली आहे. मुंबई-मंगलोर मार्गावरचे बोगदे दगडी पहाडातले नसून ते भुसभुशीत डोंगरातून काढलेले आहेत. त्यामुळे पावसाळ्यात ते खचण्याची भीती असते. नव्हे तसे ते अनेक वेळा झाले आणि सेवा बंद पडली. ती परत त्वरेने सुरू करावी लागते. डोंगर ढासळू नयेत म्हणून तेथील मातीला घट्टपणा आणण्यासाठी वाळा आणि व्हेटिवर गवत आणि विशिष्ट वनस्पती लावल्याने डोंगर ढासळायचे थांबले.

बी. राजाराम यांचे कोकण रेल्वेच्या कामकाजात स्थिरता सुरळीतपणा आणण्याबरोबर कोकण रेल्वेतर्फे ‘स्कायबस’ सुरू करावी, असे एक स्वप्न होते. नमुना म्हणून बनवलेली स्कायबस त्यांनी गोव्यातील मडगाव स्थानकासमोर उभी करून ती योजना लोकांपुढे ठेवली.

ब



**स्काय बस**

स्कायबस म्हणजे जमिनीऐवजी सहा मीटर उंचीवर उभ्या केलेल्या रुळावरून विजेवर चालणारी आगगाडी. यासाठी त्यांनी एकस्वही घेतले. जागतिक रेल्वे संशोधन परिषदेच्या १९८९ सालच्या अधिवेशनात बी. राजाराम यांनी स्कायबसवर एक निबंधही वाचला. मडगावला प्रदर्शित केलेल्या स्कायबसच्या सुरक्षिततेचे प्रमाणपत्र बी. राजाराम ३१ जानेवारी २००५ रोजी निवृत्त झाले, तोपर्यंत मिळाले नव्हते. याचे कारण सप्टेंबर २००४ मध्ये या स्कायबसची चाचणी घेत असताना, काही तांत्रिक दोष निर्माण झाल्याने एक अपघात होऊन त्यात एक अभियंता मृत्यू पावला आणि तीन कर्मचारी जखमी झाले होते. त्यामुळे स्कायबसच्या सुरक्षेबद्दल हरकती घेतल्या गेल्या. या अपघातानंतर स्कायबसच्या रचनेत सुरक्षेच्या अंगाने खूप सुधारणा करून ती ९९ टक्क्यांपर्यंत आणल्याचा दावा त्यांनी केला.

स्कायबसला दोन डबे असून ३०० प्रवाशांना एका वेळी नेण्याची अशी तिची क्षमता असू शकते. स्कायबसला अनेक डबे जोडता येणे शक्य असून मग त्या मार्गावरून ताशी अठरा हजार ते एक लाखापर्यंतच्या प्रवाशांची वाहतूक करता येऊ शकते. गोव्यात १.६ कि.मी. अंतराच्या रुळावरून घेतलेली चाचणी ताशी ७० कि.मी. वेगाने घेतलेली होती. वेग ताशी ९० कि.मी.पर्यंत वाढवता येईल, अशी त्या संरचनेमध्ये तरतूद केलेली आहे. मुंबई-पुण्यासारख्या शहरात रस्त्यावर प्रचंड गर्दी असते. त्यामुळे जमिनीखालून मेट्रो रेल्वे अथवा जमिनीवर सहा मीटर उंचीवरून स्कायबस चालवणे, असे दोनच पर्याय शिल्लक राहतात. स्कायबसचा खर्च प्रतिकिलोमीटरमागे ५० ते ६० कोटी एवढा पडतो. जमिनीवरून अथवा जमिनीखालून रेल्वे उभारताना जमिनी ताब्यात घेणे, वाटेतले अडथळे दूर करणे, लोकांचे विरोध या गोष्टींना तोंड द्यावे लागते. ते स्कायबसच्या बाबतीत उद्‌भवत नसल्याने हा प्रकल्प दोन वर्षांत पुरा करता येतो. यामुळे इतर कोणत्याही पर्यायापेक्षा स्कायबस स्वस्तात पडते; कारण भांडवली खर्च, उभारणीचा काळ इत्यादी गोष्टींवरचा खर्च कमी असतो. बी. राजाराम यांचे म्हणणे असे आहे की, स्कायबसच्या रुळावरून मालाची वाहतूकही करता येईल आणि तसे करता आले, तर रस्त्यावरची ट्रकची गर्दी कमी होईल.

बी. राजाराम यांनी रेल्वेमध्ये १९७० ते २००५ एवढा काळ केलेल्या नोकरीत रेल्वेसाठी लागणारी अनेक उपकरणे, रेल्वेची सुरक्षितता वाढवण्यासाठी लागणाऱ्या गोष्टी, वाहतुकीत सुविधा आणणाऱ्या गोष्टी आणि कामगारांची संख्या कमी करण्यासाठीची उपकरणे मोठ्या संख्येने बनवली. त्यामुळे रेल्वे खात्यातर्फे त्यांना अनेक पुरस्कार लाभले.

याशिवाय भारतीय उद्योगांच्या समूहांची शिखर संस्था असलेल्या दिल्लीच्या 'फिक्की' या संस्थेने २००४ साली त्यांना राष्ट्रीय पुरस्कार दिला. २००४ साली त्यांना पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयाने त्यांच्या शोधक वृत्तीबद्दल एस.बी. जोशी पुरस्कार दिला. २००५ साली रेल्वेतून निवृत्त झाल्यावर दोन वर्षांनी म्हणजे २००७ साली त्यांना रेल्वे स्टाफ कॉलेजतर्फे माजी अधिकारी म्हणून पुरस्कार मिळाला. निवृत्तीनंतर नोव्हेंबर २००७ पासून ते एम्पॉवर्ड बोर्डाचे सभासद आहेत. हे मंडळ अणुऊर्जा आयोगाचे असून 'इंडो-फ्रेंच फ्यूजन रिॲक्टर'च्या सुरक्षिततेशी संबंधित आहे.

– अ. पां. देशपांडे

**संदर्भ :**

१. *दै. टाइम्स ऑफ इंडिया; दि. २५ फेब्रुवारी २००३.*

**बोधे, जनार्दन गणपत**
**स्थापत्य अभियंता,**
**१९१० - २१ सप्टेंबर १९९१**



जनार्दन गणपत बोधे यांचा जन्म पाचगणी येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षणही तेथेच झाले. महाविद्यालयीन शिक्षण एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई आणि पुणे अभियांत्रिकी महाविद्यालय येथे झाले. शिक्षण पूर्ण झाल्यावर ते १९३८ साली मे. के. आर. इराणी अॅण्ड कंपनी या मुंबईतील स्थापत्य-अभियांत्रिकी सल्लागार कंपनीत रुजू झाले. त्याच कंपनीत ते कालांतराने, आपल्या कर्तृत्वाने कंपनीचे भागीदार झाले.

बोधे हे कर्तबगार अभियंता व वास्तुरचनाकार होते. फक्त इमारतीच नव्हे, तर सिमेंट कारखाने, सूतगिरण्या, साखर कारखाने, औषधी कारखाने, विविध पूल इ. वेगवेगळ्या प्रकारचे प्रकल्प त्यांच्या मार्गदर्शनाखाली पूर्ण करण्यात आले. त्यांसाठी त्यांनी भारताबाहेरही काम केले, ही त्यांच्या कामाची गुणवत्ता दर्शवणारी बाब आहे. अहमदाबाद येथील नेहरू पुलाचा आराखडा बोधे यांनी केलेला होते. मुंबई ते उरण यादरम्यान समुद्रावर एक झुलता पूल बांधण्याची कल्पना त्यांनी मांडली. इतकेच नव्हे, तर त्याचा अभिकल्प आणि प्रतिकृती शासनाला तयार करून दिली; पण त्या वेळी शासनाने त्याकडे दुर्लक्ष केले. परंतु नंतर तसा पूल बांधण्याचे ठरले ही बोधे यांच्या दूरदृष्टीची साक्ष पटवणारी बाब ठरते.

बोधे अनेक देशी-विदेशी संस्थांचे सदस्य व पदाधिकारी होते. इन्स्टिट्यूट ऑफ स्ट्रक्चरल इंजिनिअर्स- लंडन, अमेरिकन सोसायटी ऑफ सिव्हिल इंजिनिअर्स, फ्रेंच सोसायटी ऑफ सिव्हिल इंजिनिअर्स अशा अनेक आंतरराष्ट्रीय संस्थांचे ते सभासद होते. तत्कालीन बॉम्बे बिल्डिंग रिपेअर बोर्डाचे सदस्य, महाराष्ट्र टेक्निकल एक्झामिनेशन बोर्डाचे अध्यक्ष, मुंबई व पुणे विद्यापीठाचे सिनेट सदस्य, बॉम्बे पोर्ट ट्रस्टचे विश्वस्त, फ्रेंड्स ऑफ ट्रीज आणि छत्रपती शिवाजी वस्तु संग्रहालयाचे पदाधिकारी अशा भिन्न प्रकारच्या समित्यांवर त्यांनी काम करून आपल्या ज्ञानाचा लाभ जनतेला मिळवून दिला. महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स आणि एशियाटिक सोसायटीचे उपाध्यक्षपद त्यांनी भूषवले. तसेच मराठी विज्ञान परिषदेचे उपाध्यक्ष आणि नंतर विश्वस्त म्हणूनही त्यांनी काम केले. शासनाने त्यांना जेस्टिस ऑफ पीस आणि ऑनररी प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट नेमले होते. १९७१-७२ आणि १९७२-७३ अशी दोन वर्षे ते इन्स्टिट्यूट ऑफ इंजिनिअर्सचे अध्यक्ष होते. १९७२-७३ साली शासनाने त्यांना मुंबईचे नगरपाल (शेरिफ) म्हणून नेमले. त्या वेळी त्यांनी खूप कामे केली.

डिसेंबर १९८९ मध्ये भुवनेश्वरला मोक्षगुंडम विश्वेश्वरय्या यांच्या स्मृतीनिमित्त बोधे यांनी दिलेल्या व्याख्यानाला दहा हजार अभियंते उपस्थित होते. त्यांचा जनसंपर्क प्रचंड आणि सर्व क्षेत्रांत पसरलेला होता. त्यांना मराठी, हिंदी, इंग्रजी, संस्कृत, उर्दू, पर्शियन, पंजाबी, गुजराती, रशियन, फ्रेंच अशा अनेक भाषा अवगत होत्या. त्यामुळेच महाराष्ट्राचे तत्कालीन मुख्यमंत्री वसंतदादा पाटील यांनी बोधे हे अभियंत्यांचे पुढारी आहेत, असे केलेले विधान सार्थ ठरते.

बोधे जातीने नामदेव-शिंपी होते. संत नामदेव भजने करत-करत भागवत धर्म प्रसारार्थ पंजाबात गेले आणि त्यांचे अभंग शिखांच्या गुरुग्रंथसाहेबात समाविष्ट झाले. हे अभंग मुळातून वाचावे, अशी बोधेंना इच्छा झाली. त्याकरिता ते गुरुमुखी लिपी शिकले आणि गुरुग्रंथसाहेबातील नामदेवांची भजने त्यांनी जाणून घेतली. त्याबाबत पंजाबातील प्रतिष्ठित नागरिकांशी ते बोलले. ह्याच कारणाने शीख समाजाशी त्यांचा जवळचा संबंध होता.

१९८३-८४ साली महाराष्ट्रात खासगी अभियांत्रिकी महाविद्यालये निघू लागली. ही महाविद्यालये सुरू करण्याच्या समितीवर त्यांनी काम केले. महाराष्ट्रात

ठिकठिकाणी जाऊन त्यांनी पायाभूत सोयी-सुविधा काय आहेत, त्या पाहून त्यांत सुधारणांविषयी सूचना केल्या. त्यांची अंमलबजावणी झाली किंवा नाही, याची खातरजमा करण्यासाठी दोनेक वर्षांत पुन्हा त्या महाविद्यालयांना भेटी दिल्या.

मराठी विज्ञान परिषदेच्या १९७२ साली कोल्हापूर येथे भरलेल्या सातव्या संमेलनाचे ते अध्यक्ष होते. त्यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय 'स्थापत्य आणि संस्कृती' होता. त्यामध्ये त्यांनी इजिप्तचे पिरॅमिड व सूर्यस्तंभ यांचा, तसेच पर्शियन बॅबिलोन यांची छते व कमानी या बांधकामांचा सुरेख आढावा घेतला. ग्रीक स्थापत्यतज्ज्ञांची कामगिरी सांगितली, तसेच त्यांनी भूमितीचा केलेला वापर विशद केला.

त्यांनी रोमन संस्कृतीमधील राजवाडे, नगरचौक, सभागृहे इत्यादी रचनांची माहिती दिली. त्याचबरोबर, भारतातील १००० स्तंभांचे मंडप, यज्ञशाळा, लाकूड-विटा, पाषाण यांच्या साहाय्याने बांधलेली घरे, बुद्धविहार, भुवनेश्वर, मदुराई, खजुराहोची मंदिरे, विजापूरच्या गोलघुमटाची रचना, दीपमाळा, झुलते मनोरे इ. सर्व तपशिलांत वर्णन करून सांगितले. हरप्पा, मोहेंजोदारो, तक्षशिला, पाटलीपुत्रच्या वेळच्या नगररचनांची ओळख त्यांनी करून दिली. प्राचीन बांधकामाचा अभ्यास इथपासून झुलत्या पुलाच्या रचनेपर्यंत बोधे यांचा आवाका होता, हे यावरून निदर्शनास येते.

बोधे हे जसे कर्तबगार अभियंते होते, तसेच एक रसिक व विचारवंत होते. 'मानवी शरीर : एक ईश्वरी साधन' या विषयावर वैद्यकीय शास्त्राच्या दृष्टिकोनातून त्यांनी प्रबंध लिहिला होता.

१९६८ साली जयपूरला त्यांच्या प्रबंधाला जवाहरलाल नेहरू सुवर्णपदक मिळाले होते. तसेच कोलकत्याला १९७० साली त्यांच्या प्रबंधाला के.एफ. आन्टिआ स्मारक पारितोषिक मिळाले होते. संस्कृत आणि भारतीय संगीत या विषयांमध्येही त्यांचा व्यासंग होता. त्यांचे हृदयविकाराने निधन झाले.

— दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**

*१. मराठी विज्ञान परिषद-पत्रिका; डिसेंबर १९९१.*

*२. देशपांडे, अ.पां.; 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन; २००५.*

✻ ✻ ✻

ब

कुलकर्णी, त्र्यंबक अप्पाजी

तीरमारे, शिवराम कृष्णाजी

दीक्षित, केशव जिवाजी
शिक्षक
जन्मदिनांक अनुपलब्ध – १२ मे १९७१

कुलकर्णी, त्र्यंबक अप्पाजी

तीरमारे, शिवराम कृष्णाजी

दीक्षित, केशव जिवाजी
शिक्षक
जन्मदिनांक अनुपलब्ध – १२ मे १९७१

भ



## भटकर, विजय पांडुरंग
**अभियंता**
**११ ऑक्टोबर १९४६**



डॉ. विजय पांडुरंग भटकर यांचा जन्म अकोला जिल्ह्यातील मुरांबा येथे झाला. त्यांना माहिती तंत्रज्ञानातील अग्रगण्य संशोधक, नवनिर्माणक्षम उद्योजक व देदीप्यमान नेतृत्वगुण लाभलेला वैज्ञानिक म्हणून ओळखतात. त्यांनी नागपूर विद्यापीठाची बी.ई. ही पदवी १९६५ साली संपादन केली. बडोद्याच्या एम.एस. विद्यापीठातून १९६९ साली त्यांनी एम.ई. पदवी प्राप्त केली. पुढे १९७० साली आय.आय.टी., दिल्ली येथून ते पीएच.डी. झाले.

त्यानंतर अमेरिकेतील लेहाय विद्यापीठात प्रोफेसर डी.जी.बी. एडलेन यांच्याबरोबर त्यांनी माहिती तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात आंतरराष्ट्रीय दर्जाचे संशोधन केले. नॉनलोकल सिस्टिम, मॉडेलिंग, सिम्युलेशन आणि ऑप्टिमल कंट्रोल अशा विविध क्षेत्रांत त्यांनी संशोधन केले. मायदेशी परतल्यावर भारताच्या इलेक्ट्रॉनिक आयोगाच्या प्रमुख सदस्यांपैकी ते एक होते. त्यांनी भारतीय उद्योगक्षेत्रात प्रक्रिया आणि उत्पादन यंत्रणेत स्वयंचलित पद्धती उभी करण्यासाठी 'अप्रोप्रिएट ऑटोमेशन प्रमोशन प्रयोगशाळा' (ए.ए.पी.एल.) स्थापन केली. त्यामुळे भारतीय उद्योगात पूर्वी असलेल्या न्युमॅट्रिक नियंत्रणपद्धतीची जागा आधुनिक संगणक नियंत्रणपद्धतीने घेतली. ही फार मोठी क्रांती म्हणावी लागेल. त्रिवेंद्रमच्या इलेक्ट्रॉनिक संशोधन व विकास केंद्र आणि केल्ट्रॉनचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. मायक्रोप्रोसेसरचा वापर करून सीटीव्ही, वाहतूक नियंत्रण पद्धती, डिफेन्स सिम्युलेशन, कोलकाता मेट्रोची स्वयंचलित यंत्रणा, अशा कितीतरी गोष्टींची भारतात प्रथमच मुहूर्तमेढ रोवण्याचे श्रेय भटकर यांना जाते.

१९८०च्या दशकात हवामानाच्या अंदाजाची अचूकता वाढवण्यासाठी भारताला महासंगणकाची गरज होती. परंतु त्यासाठी क्रे कंपनीचा महासंगणक आपल्याला विकण्याचे अमेरिकेने नाकारले. त्यावर तोडगा म्हणून भारताने महासंगणकाचे तंत्रज्ञान विकसित करायला हवे, असे मत तत्कालीन पंतप्रधान राजीव गांधी यांनी शास्त्रज्ञांसमोर मांडले. सॅम पित्रोदा यांच्या अध्यक्षतेखालील या प्रकल्पाची कार्यवाही भटकर यांच्यावर सोपवण्यात आली. १९८७ सालच्या डिसेंबर महिन्यात महासंगणक बनविण्याच्या कामाचा आराखडा तयार झाला. लगेचच यासाठी एका संस्थेची स्थापना झाली. 'सेंटर फॉर डेव्हलपमेंट ऑफ ॲडव्हान्स कॉम्प्यूटिंग' (सी-डॅक) या संस्थेची मुहूर्तमेढ रोवली गेली. तो दिवस होता १९८८ सालचा गुढीपाडवा. जुलै १९८८ मध्ये 'सी डॅक'ने 'परम महासंगणका'चे आपले पहिले लक्ष्य निश्चित केले. हे लक्ष्य जुलै १९९१पर्यंत पार करायचे होते. त्यासाठी ३७.५ कोटी रुपयांची तरतूद होती. विशेष म्हणजे, पहिला 'परम महासंगणक' सी-डॅकने ३० कोटी रुपयांपेक्षाही कमी खर्चात तयार केला. १५ ऑगस्ट १९९१ या दिवशी 'परम - ८०००' तयार झाल्याची अधिकृत घोषणा केली गेली. या पहिल्या महासंगणकाची क्षमता दर सेकंदाला १ अब्ज गणिती क्रिया करण्याची होती. सप्टेंबर १९९३ मध्ये 'परम -

भ



**परम महासंगणक**

१०,०००'च्या कामाला सुरुवात झाली.

१९९७ साली 'परम - १०,०००' यशस्विरीत्या कार्यरत झाला. या महासंगणकामुळे भारताला हवामानविषयक अंदाज आता बरेच आधी व अचूक वर्तविता येऊ लागले. उपग्रह प्रक्षेपण, रॉकेट प्रक्षेपण, खनिज तेलाचे संशोधन, वैद्यक क्षेत्र, देशातील सरकारी कामांत सुसूत्रता, शेअर बाजार, संरक्षण, अणुतंत्रज्ञान अशा अनेक क्षेत्रांत 'परम - १०,०००' ने क्रांती केली. 'परम - १०,०००' ची क्षमता दर सेकंदाला १ लाख कोटी (१०००,०००,०००,०००) गणिती क्रिया करण्याची आहे. याला शंभर गीगा फ्लॉप (१०० जी.एफ.) असे शास्त्रीय नाव आहे.

१९८९ साली सी-डॅकने 'जिस्ट' ही संगणकीय आज्ञाप्रणाली (ग्राफिक्स अ‍ॅन्ड इंटेलिजन्स बेस्ड स्क्रिप्ट टेक्नॉलॉजी) तयार केली. या 'जिस्ट'ने भारतीय उपखंडात संगणक क्षेत्रात अभूतपूर्व क्रांती केली. आजवर इंग्रजीची मक्तेदारी असलेल्या संगणकावर जिस्टमुळे कोणत्याही भारतीय भाषेचा उपयोग करणे सहज शक्य झाले.

डॉ. भटकर ही व्यक्ती न राहता अनेक संस्थांचा एक समुच्चय बनली. त्यांनी 'इटीएच' संशोधन प्रयोगशाळा, डिशनेट, इंटरनॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी, महाराष्ट्र नॉलेज कॉर्पोरेशन, मस्टव्हर्सिटी प्रा. लि., नॉलेज आय.टी., डिव्हिनेट अ‍ॅक्सेस टेक्नॉलॉजी, सी-डॅक, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी अँड मॅनेजमेंट (केरळ), टेक्नोपार्क (त्रिवेंद्रम), इलेक्ट्रॉनिक रिसर्च अँड डेव्हलपमेंट सेंटर, केरला स्टेट इलेक्ट्रॉनिक डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन (केल्ट्रॉन), अप्रोप्रिएट ऑटोमेशन प्रमोशन प्रयोगशाळा, अशा विविध संस्था उभ्या केल्या.

'पद्मश्री पुरस्कार', 'डेटाक्वेस्ट जीवनगौरव पुरस्कार', 'विश्वेश्वरय्या स्मृती पुरस्कार' , 'पॉवर ग्रीड कॉर्पोरेशन ऑफ इंडिया अवॉर्ड', 'महाराष्ट्र भूषण' या पुरस्कारांनी त्यांना सन्मानित करण्यात आले आहे. १९९९ साली फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर ऑफ कॉमर्स अँड इंडस्ट्रीजतर्फे दिले जाणारे अभियांत्रिकी व तंत्रज्ञान क्षेत्रातील गुणवत्ता पारितोषिक ('एक्सलन्स अवॉर्ड') त्यांना प्रदान करण्यात आले आहे. उत्कृष्ट संशोधनासाठी १९९८ साली दुबई, इंटरनेट सिटीतर्फे दिला जाणारा 'इ-बिझ इनोव्हेशन कॉन्टेस्ट अवॉर्ड' हा पुरस्कारही त्यांना मिळाला आहे. विज्ञान व तंत्रज्ञानातील 'एच.के. फिरोदिया पुरस्कार'ही हा जीवनगौरव त्यांना प्राप्त झाला आहे. दिल्ली आय.आय.टी.च्या १९९४ सालच्या 'डिस्टिंग्विश्ड अ‍ॅलुमनी अवॉर्ड'ने त्यांना सन्मानित करण्यात आले आहे. इलेक्ट्रॉनिक कॉम्पोनन्ट इंडस्ट्रीज असोसिएशनतर्फे दिला जाणारा १९९२ सालचा 'इलेक्ट्रॉनिक्स मॅन ऑफ द इयर' हा सन्मान त्यांना प्रदान करण्यात आला आहे.

डॉ. भटकरांनी आठ पुस्तके संपादित केली असून ८० शोधनिबंध प्रसिद्ध केले आहेत. 'सुपर कॉम्प्यूटिंग', 'आर्टिफिशियल इंटेलिजन्स', 'डिस्ट्रिब्युटेड कॉम्प्युटर कन्ट्रोल', 'व्हेरिएशनल थियरी' हे त्यांच्या शोधनिबंधांचे विषय आहेत.

कॉम्प्युटर सोसायटी ऑफ इंडिया; भारतीय राष्ट्रीय अभियांत्रिकी अकादमी, दिल्ली; महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्स, पुणे; इन्स्टिट्यूशन ऑफ इलेक्ट्रॉनिक्स अँड टेलिकम्युनिकेशन इंजिनिअर्स, दिल्ली या विविध संस्थांचे ते फेलो आहेत. ते न्यूयॉर्क अकॅडमी ऑफ

भ

सायन्स, न्यूयॉर्कचे सदस्य आहेत. 'आपण ज्ञाननिष्ठ संस्कृतीचेच वारसदार आहोत. परंतु आपल्याला खरीखुरी ज्ञाननिष्ठ संस्कृती पुनश्च प्रस्थापित करायची आहे; माहिती तंत्रज्ञान हा या वाटचालीचा अत्यंत महत्त्वाचा टप्पा आहे', ही डॉ. भटकरांची धारणा आहे.

— डॉ. रंजन गर्गे

**संदर्भ :**

*१. साप्ता. विवेक, ११ एप्रिल १९९८*

## भवाळकर, दिलीप देविदास

**भौतिकशास्त्रज्ञ**

**१६ ऑक्टोबर १९४०**



सन १९८७ मध्ये भारताच्या अणुऊर्जा विभागाने स्थापन केलेल्या इंदूरच्या 'प्रगत तंत्रज्ञान केंद्र' (सेंटर फॉर ॲडव्हान्स्ड टेक्नॉलॉजी-कॅट) या प्रतिष्ठित संस्थेचे पहिले संचालक आणि लेझरतज्ज्ञ म्हणून दिलीप देविदास भवाळकर ओळखले जातात. त्यांचा जन्म पुण्यातील एका प्रतिष्ठित आणि सुसंस्कृत कुटुंबात झाला. ते सहा वर्षाचे असताना त्यांचे वडील कुटुंबासह मध्यप्रदेशातील सागर विद्यापीठात आले. त्यांचे शिक्षण शासकीय विद्यालय आणि सागर विद्यापीठात झाले. १९५९ साली पदवीची, तर १९६१ साली भौतिकशास्त्रातील पदव्युत्तर परीक्षा ते प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले.

१९४८ साली 'ट्रान्झिस्टर'चा शोध लागला आणि इलेक्ट्रॉनिक्सच्या क्षेत्रात क्रांती झाली. काळाचा कल लक्षात घेऊन भवाळकरांनी इंग्लंडमधील साउथहॅम्प्टन विद्यापीठातून १९६२ साली इलेक्ट्रॉनिक्स विषयात दुसऱ्यांदा पदव्युत्तर पदवी विशेष प्रावीण्यासह संपादन केली. एकोणिसाव्या शतकातील प्रकाशावरील संशोधनाने प्रकाशाचे सामर्थ्य लक्षात आले होते. त्याची अनेक रूपेही पुढे आली. त्यातील 'लेझर' (लाइट ॲम्प्लिफिकेशन बाय स्टिम्युलेटेड इमिशन ऑफ रेडिएशन) हे प्रकाशाचे अत्यंत प्रभावी, उपयुक्त व सरळ रेषेत जाणारे रूप १९६० साली अमेरिकन शास्त्रज्ञांनी शोधून काढले. नेमक्या याच दशकात भवाळकरांनी या क्षेत्रात साउथहॅम्प्टन विद्यापीठातील प्रा. डब्ल्यू.ए. गॅम्बलिंग व आर.सी. स्मिथ यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधनाला सुरुवात केली. त्यांनी 'लेझर ॲण्ड नॉनलिनीयर ऑप्टिक्स' या विषयात १९६६ साली पीएच.डी. मिळविली आणि लेझरवर अशी पदवी मिळवणारे ते त्या देशात पहिले ठरले. त्यांच्या प्राध्यापकांच्या आग्रहावरून त्यांनी त्या विद्यापीठात लेझर विषय शिकविण्यासाठी १ जानेवारी १९६६ रोजी व्याख्यातापद स्वीकारले.

साउथहॅम्प्टन विद्यापीठातील कायमची नोकरी आणि अमेरिकेतील प्रयोगशाळांतून येणारी निमंत्रणे बाजूला सारून त्यांनी मायदेशी यायचे ठरविले. मुंबईच्या भाभा अणू संशोधन केंद्रातील भौतिकशास्त्र विभागाचे संचालक डॉ. राजा रामण्णा यांनी डॉ. भवाळकरांची मुलाखत लंडनमध्ये घेतली आणि या केंद्रातील इलेक्ट्रॉनिक्स विभागातील लेझर चमूचे नेतृत्व करण्यास सांगितले. १ डिसेंबर १९६७ रोजी ते 'भाभा अणू संशोधन केंद्रा'त रुजू झाले. या केंद्रात त्यांनी लेझर संशोधनाला मोठी चालना दिली. परिणामी या केंद्रातील प्रयोगशाळा देशात अग्रेसर ठरली. त्यांनी रूबी लेझर, हिलियम, निऑन, ताम्रबाष्प, कार्बन-डाय-ऑक्साइड, याग, डाय इत्यादी लेझर विकसित केले. पुढे लेझर विभाग स्वतंत्र झाला आणि ते त्या विभागाचे प्रमुख झाले.

भारताच्या अणुऊर्जा विभागाने विज्ञान व तंत्रज्ञान क्षेत्रातील बदलाचे महत्त्व ओळखून त्वरणयंत्रे, लेझर्स, क्रायोजेनिक्स इत्यादींसाठी स्वतंत्र संशोधन व विकास केंद्र उभारायचे ठरवले. या प्रकल्पात भवाळकरांचा प्रथमपासूनच मोठा वाटा होता. या केंद्राच्या जागेच्या निवड समितीत ते नसताना, त्यांनी निवडलेली जागा समितीने एकमुखाने पसंत केली. या जागेच्या निवडीत त्यांचे निसर्गप्रेम लपून राहिले नाही. इंदूरच्या सीमेवरचा

भ

सुखसागर तलाव, त्याच्या काठावरचा इंदूरच्या महाराजांच्या मालकीचा असलेला पण नंतर नगरपालिकेच्या अधिकारात गेलेला महाल, आजूबाजूला असलेली गर्द झाडी, असा रम्य परिसर कॅटसाठी निवडला गेला. अद्ययावत प्रयोगशाळा, प्रशस्त कार्यशाळा, कर्मचाऱ्यांसाठी निवासस्थाने, शाळा, दवाखाना, दुकाने, खेळाची मैदाने, सांस्कृतिक मंडळ, वाचनालय, इत्यादी आवश्यक त्या गोष्टी कॅटमध्ये उभ्या करणे भवाळकरांच्या नेतृत्वामुळेच शक्य झाले. मोजक्याच साधनांपासून सुरुवात करून थोड्याच अवधीत त्यांनी कॅटला देशातील एक उत्कृष्ट तंत्रज्ञान विकासाचे केंद्र बनवले.

सामाजिक बांधीलकीचे पुरेपूर भान असलेल्या भवाळकरांनी संस्थेतील संशोधनाची फळे सामान्य लोकांपर्यंत नेण्याचा प्रयत्न केला. डोळ्याच्या व इतर अवयवांच्या शस्त्रक्रियेला आवश्यक असलेले लेझर, कर्करोग उपचारासाठी किरणोत्सारी समस्थानिके असलेल्या नळ्या दुरून सांधणारे लेझर, अणुभट्टीतील शीतनळ्या दुरून कापण्यासाठी त्यांनी नायट्रोजन लेझर प्रतिदीप्तिमापी (फ्ल्यूरोमीटर) विकसित केली. हे साधन त्यांनी अणुऊर्जा विभागाच्या अनेक प्रयोगशाळांना पुरविले. पेसमेकर सांधण्यासाठी आवश्यक असलेले ‘संगणकीय लेझर सांधणी केंद्र’ त्यांनी कॅटमध्ये सुरू केले. त्यांनी लेझरच्या साहाय्याने प्राथमिक अवस्थेतील कर्करोग निदानाची पद्धती विकसित केली.

कॅटमध्ये ‘संकलिक प्रारणा’साठी (सिंक्रोट्रॉन रेडिएशन) इंडस-१ या प्रारणयंत्राच्या उभारणीत भवाळकरांचा मोठा वाटा आहे. या प्रारणयंत्रावर काम करणाऱ्यांना प्रशिक्षित करणे व ते पूर्णपणे भारतीय बनावटीचे करण्याचे आवाहन त्यांनी स्वीकारले. त्यात ते यशस्वी झाले. ‘एप्रिल १९९९ मध्ये कार्यान्वित झालेल्या इंडस-१ ची उभारणी ही स्वत:च एक यशोगाथा आहे,’ असे ते म्हणतात. २००४ साली इंडस-२ कार्यान्वित झाले. विज्ञानाच्या सर्वच शाखांत संकलित प्रारण हे अत्यंत प्रभावी साधन म्हणून उपयुक्त ठरले आहे.

१६ वर्षांच्या संचालक पदाच्या कारकिर्दीत भवाळकरांनी कॅटला त्वरणयंत्रे आणि लेझर्सच्या क्षेत्रात आंतरराष्ट्रीय स्तरावर नेले. युरोपातील सर्न येथील जगातील सर्वात मोठ्या मूलभूत कण संशोधन प्रयोगशाळेतील प्रचंड कोलायडर निर्मितीच्या प्रकल्पात, त्यांच्या मागणीवरून भारतातर्फे सहकार्य करण्याचे काम भवाळकरांनीच केले. कॅटचा दरवाजा इंदूर शहरातील विद्यार्थ्यांसाठी त्यांनीच खुला केला.

डॉ. भवाळकरांच्या मार्गदर्शनाखाली १६ विद्यार्थ्यांनी पीएच.डी. केली असून त्यांचे ८३ शोधनिबंध प्रतिष्ठित अशा आंतरराष्ट्रीय नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांना प्रतिष्ठेचे अनेक पुरस्कार मिळालेले आहेत, त्यात लंडन येथील आय.ई.आर.ई.चा रूदरफोर्ड पुरस्कार (१९६४), तंत्रज्ञानाविषयीचा एस.एस. भटनागर पुरस्कार (१९८४), कुरुक्षेत्र विद्यापीठाचा भौतिकशास्त्रातील गोयल पुरस्कार (१९९७), विज्ञान व तंत्रज्ञानातील महत्त्वपूर्ण कामगिरीबद्दल भारत सरकारचा पद्मश्री पुरस्कार (२०००), इत्यादींचा समावेश होतो. ते अर्धा डझन राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय विज्ञानसंस्थांत ‘फेलो’ म्हणून निवडले गेले आहेत.

धुळे येथे आयोजित केलेल्या एकोणतिसाव्या अखिल भारतीय मराठी विज्ञान संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते. ऑक्टोबर २००३ मध्ये कॅटच्या सेवेतून निवृत्त झालेले डॉ. भवाळकर आज विविध आंतरराष्ट्रीय संघटना आणि प्रकल्पांशी निगडित आहेत.

भ

– डॉ. निवास पाटील

**संदर्भ :**

१. *एकोणतिसावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, धुळे; १९९४.*

## भाभा, होमी जहांगीर

**भौतिकशास्त्रज्ञ**

**३० ऑक्टोबर १९०९ - २४ जानेवरी १९६६**

भारतीय अणू संशोधन कार्यक्रमाचे जनक असलेले भौतिकशास्त्रज्ञ. एका सधन, सुशिक्षित आणि सुसंस्कृत



कुटुंबात जन्माला आलेले होमी जहांगीर भाभा अतिशय कुशाग्र बुद्धिमत्तेचे होते. याची झलक शालेय शिक्षणापासूनच दिसून आली होती. त्यांचे वडील जहांगीर होरमसजी भाभा बॅरिस्टर होते आणि टाटा उद्योग समूहाचे ते कायदा सल्लागार होते. आई मेहेरबाई ही सर दिनशा पेटिट यांची नात होती आणि आत्या मेहेरबाई ही सर दोराब टाटा यांची पत्नी होती. अशा तऱ्हेने टाटा आणि पेटिट या दोन आघाडीच्या पारशी कुटुंबांशी त्यांचे जवळचे नाते होते. या दोन्ही कुटुंबांनी भारताच्या औद्योगिक आणि सांस्कृतिक जडणघडणीत मोलाचा हातभार लावला होता. तोच वारसा भाभा यांनी समर्थपणे पुढील आयुष्यात चालवला. विज्ञान आणि तंत्रज्ञान या क्षेत्रातील आधुनिक भारताचे शिल्पकार हे बिरुद त्यांना सर्वार्थाने लागू होते.

त्यांच्या वैज्ञानिक कारकिर्दीची सुरुवात ते केम्ब्रिजला असतानाच झाली. मुंबई येथे शालेय व प्राथमिक स्वरूपाचे महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केल्यानंतर ते पुढील शिक्षणासाठी केम्ब्रिजला गेले. त्यांनी तेथे यंत्र अभियांत्रिकीचे शिक्षण घेऊन टाटा समूहातील उद्योगधंद्यांमध्ये हातभार लावावा, असा त्यांच्या वडिलांचा विचार होता. पण ज्या काळात ते केम्ब्रिजला होते, तो भौतिकशास्त्राचा सुवर्णकाळ होता. आधुनिक भौतिकशास्त्राची पायाभरणी त्या वेळी केली जात होती. इंग्लंड, तसेच युरोपात दिग्गज वैज्ञानिक विश्वरचनेसंबंधी नवनवे सिद्धान्त मांडत होते. अणूच्या अंतरंगात डोकावून पाहण्यास सुरुवात झाली होती. या सर्वाने प्रभावित होऊन भाभांनी आपला कलही भौतिकशास्त्राकडेच असल्याचे आपल्या वडिलांना आवर्जून सांगितले.

यंत्र अभियांत्रिकीमधील ट्रायपॉस म्हणजेच पदवी पहिल्या वर्गात मिळवून वडिलांची इच्छा पूर्ण केल्यावर त्यांनी भौतिकशास्त्राच्या उच्च शिक्षणास प्रारंभ केला. वूल्फगँग पाऊली आणि एन्रिको फर्मी या भविष्यातील नोबेल पुरस्कारविजेत्यांच्यासमवेत संशोधन करण्याची संधी त्यांना मिळाली. त्याचा पुरेपूर फायदा करून घेऊन त्यांनी काही शोधनिबंध प्रकाशित केले. त्यांनी भाभांचे नाव सर्वतोमुखी केले. त्यांना काही नावाजलेल्या शिष्यवृत्त्यांचा लाभ झाला. विश्वकिरणांचा वर्षाव कसा होतो यासंबंधीचा जर्मन शास्त्रज्ञ हाइटलर यांच्या सहकार्याने सादर केलेला त्यांचा सिद्धान्त गाजला. 'भाभा-हाइटलर कास्केड थिअरी' या नावानेच तो आजही ओळखला जातो. या मौलिक संशोधनाने भाभांना जगन्मान्यता मिळाली. भौतिकशास्त्रातल्या संशोधनाची अशी नवनवी शिखरे गाठत असतानाच, भाभा छोट्याशा सुटीसाठी घरी आले होते. पण युरोपात अकस्मात उसळलेल्या दुसऱ्या महायुद्धाच्या आगडोंबाने त्यांची परतीची वाट बंद केली. ही घटना भाभांच्या आयुष्याला कलाटणी देणारी ठरली. बंगळुरू येथील 'इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' येथे आपले संशोधन पुढे सुरू ठेवताना, त्यांना येथेही उच्च दर्जाचे संशोधन करणे शक्य आहे याची जाणीव झाली. काही तरुण प्रतिभाशाली वैज्ञानिकांची साथही त्यांना लाभली. सी.व्ही. रमण यांचा सहवास लाभला. वयाच्या केवळ बत्तिसाव्या वर्षी एफ.आर.एस., फेलो ऑफ रॉयल सोसायटीचा बहुमानही त्यांना मिळाला आणि आपल्या मातृभूमीतच अशा संशोधन केंद्रांची मुहूर्तमेढ रोवण्याचे स्वप्न ते पाहू लागले.

त्यांच्या राष्ट्रप्रेमाची आणि द्रष्टेपणाची प्रचिती त्यांनी १९४४ साली टाटा न्यासाला लिहिलेल्या पत्रातून दिसून येते. अणू हा अविभाज्य नसून त्याचेही विघटन होऊ शकते आणि तसे ते झाल्यावर अणुकेंद्रकात बंदिस्त रुपात असलेली मोठ्या प्रमाणातली ऊर्जा मुक्त होते हे हान आणि मिटनर या जर्मन शास्त्रज्ञांनी दाखवून दिल्याला त्या वेळी केवळ सहा-सात वर्षेच झाली होती. तेच सूत्र पुढे चालवीत या अणुविभाजनाची साखळी प्रक्रिया घडवून आणली जाऊ शकते, असे भाकीत फर्मी यांनी त्यानंतरच्या दोन वर्षांत केले होते. ते केवळ सैद्धान्तिक

भ

रूपात न ठेवता, त्या शक्यतेवर आधारित पहिली प्रायोगिक अणुभट्टी फर्मी यांनीच इतर ख्यातनाम वैज्ञानिकांच्या मदतीने शिकागो विद्यापीठातल्या स्क्वाश कोर्टाच्या जागेत बांधल्यालाही उणीपुरी दोनच वर्षे झाली होती. त्याची बातमीही तशी गुप्तच ठेवण्यात आली होती. अशा परिस्थितीत अणुऊर्जेचे महत्त्व जाणून त्यासंबंधीच्या एक सर्वांगीण कार्यक्रमाचा आराखडा बनवण्याचा विचार भाभांनी त्या पत्रातून मांडला होता. त्यात त्यांनी म्हटले होते, ‘भौतिकशास्त्रामधील आघाडीवरच्या क्षेत्रात उच्चदर्जाचे संशोधन करणारी संस्था मुंबईत स्थापन करावी अशी कल्पना माझ्या मनात बरेच दिवस घोळत आहे. या योजनेसंबंधीचा आराखडा विश्वस्तांपुढे मांडण्यासाठी सोबत पाठवीत आहे. ही योजना मी अगदी पूर्ण विचारान्ती बनवलेली आहे. येत्या दशकात अणुशक्ती हा एक फार महत्त्वाचा घटक ठरणार आहे. या शक्तीचा वापर ऊर्जानिर्मितीसाठी होणे जरुरीचे आहे. अशा वेळी या क्षेत्रामधील तज्ज्ञ मंडळी आपल्याकडेच तयार होणे निकडीचे आहे.’

हे पत्र लिहिताना भाभांचे वय होते अवघे पस्तीस वर्षांचे. तरीही ही केवळ सळसळत्या तारुण्यातली कल्पनेची भरारी नव्हती. तो देशाच्या भविष्यातल्या जडणघडणीचा पाया होता. अणुउर्जानिर्मितीसाठी ज्याचा इंधन म्हणून वापर केला जातो, त्या युरेनियमची भारतात चणचण आहे याचीही जाणीव त्यांना होती. उलटपक्षी, देशात थोरियमचा प्रचंड साठा आहे हेही त्यांनी ओळखले होते. थोरियम हे विघटनशील नसल्याने, त्याचा अणुऊर्जानिर्मितीसाठी इंधन म्हणून थेट वापर करता येत नाही. हे उमजून त्यांनी या थोरियमचे इंधनात रूपांतर करून त्याच्या मदतीने फार मोठ्या प्रमाणात वीजनिर्मिती करण्याचा तीन टप्प्यांचा महत्त्वाकांक्षी कार्यक्रमही त्याच वेळी आखला होता. इतकी दूरदृष्टी क्वचितच एखाद्या नेत्यांमध्ये आढळून येते.

त्यांच्या या पत्राला प्रतिसाद मिळाला तो त्यांच्याच प्रवृत्तीच्या दुसऱ्या एका तरुणाकडून, जेआरडी टाटांकडून. त्यांनी भाभांच्या प्रस्तावाला टाटा न्यासाच्या



अप्सरा अणुभट्टीची पूर्वतयारी

विश्वस्तांकडून संमती मिळवली आणि त्यानंतर वर्षभरातच, १९४५ साली टाटा मूलभूत संशोधन संस्थेची स्थापना झाली. त्यानंतर दोन वर्षांमध्येच भारताला स्वातंत्र्य मिळाले आणि आपल्या मनीचा कार्यक्रम प्रत्यक्षात आणण्याची संधी भाभांना मिळाली. जवाहरलाल नेहरूंनी भाभांच्या कार्यक्रमाचे राष्ट्रहिताच्या संबंधीचे महत्त्व ओळखून अणुशक्ती आयोगाची स्थापना केली आणि त्याची सूत्रे भाभांच्या हातात सोपवली.

त्यानंतर भाभांनी त्या आयोगाच्या अखत्यारीखाली अनेक संस्थांची स्थापना केली. अणुशक्ती संशोधन केंद्र म्हणजेच आताचे भाभा अणू संशोधन केंद्र, इंडियन रेअर अर्थ्स, इलेक्ट्रॉनिक्स कॉर्पोरेशन लिमिटेड, न्यूक्लिअर पॉवर कॉर्पोरेशन लिमिटेड या त्यांतल्या काही प्रमुख संस्था. यांतल्या काही तर आता स्वायत्त बनून औद्योगिक स्तरावर काम करत आहेत.

या प्रवासातले पहिले पाऊल म्हणून भाभांनी १९५६ साली ‘अप्सरा’ ही संपूर्ण भारतीय बनावटीची आणि भारतीय तंत्रज्ञांनी बांधलेली अणुभट्टी कार्यान्वित केली. आणि तिच्या यशाने मिळालेल्या आत्मविश्वासाच्या जोरावर अणुवीजनिर्मितीच्या महत्त्वाकांक्षी कार्यक्रमाला चालना दिली. तारापूरचे पहिले केंद्र अमेरिकेकडून तयार रूपात मिळालेले असले तरी त्यानंतरच्या अणुवीज केंद्रांची निर्मिती करताना, तेथील अणुभट्ट्या संपूर्ण

भ

भारतीय तंत्रज्ञानावर आधारित असतील, याचीही खातरजमा करून घेतली. आज कार्यरत असलेल्या अणुवीज केंद्रांपैकी नव्वद टक्के केंद्रे भारतीय तंत्रज्ञानावर आधारित आहेत. तसेच त्यांचे घटकही फार मोठ्या प्रमाणात स्वदेशी बनवलेले आहेत.

अणुभट्ट्यांची बांधणी, आण्विक इंधनाची निर्मिती, आण्विक कचऱ्याची विल्हेवाट, जळित इंधनापासून तयार झालेले प्लुटोनियम शुद्ध स्वरूपात अलग करणारे कारखाने, समस्थानिकांचे उत्पादन, त्यांचा वापर शेती, उद्योगधंदे आणि आरोग्यसेवा यांच्यासाठी करणारी केंद्रे, जड पाण्याचे उत्पादन करणारे कारखाने, त्यांनी त्यानंतर एका पाठोपाठ एक वेगाने स्थापन केले. ते चालवण्यासाठी त्यांनी परदेशी तज्ज्ञांना साकडे घातले नाही, तर त्यासाठीचे मनुष्यबळही स्वदेशी असेल, याचीही काळजी घेतली. जगभरातून त्यांनी प्रतिभाशाली तरुणांना शोधून काढून त्यांच्या हाती या कार्यक्रमांची धुरा सोपवली. त्यासाठीचे आवश्यक ते प्रशिक्षण घेण्यासाठी या तरुणांना देशविदेशांच्या उत्तमोत्तम संस्थांमध्ये पाठवले. तिथून या उमलत्या विज्ञानशाखेतील उच्च शिक्षण आत्मसात करून आलेल्या तरुणांना त्यांनी आधुनिक राष्ट्रनिर्मितीच्या कार्याला वाहून घेण्याची प्रेरणाही दिली. यांपैकी बहुसंख्य शिष्यांनी आपल्या गुरूच्या आकांक्षा सफल तर केल्याच; पण त्याहून महत्त्वाची बाब म्हणजे आपली सारी कारकीर्द त्यांनी देशातच व्यतीत केली. विदेशातल्या प्रलोभनांना बळी न पडता, त्यांनी नेटाने भाभांच्या स्वप्नांना साकार करण्याचे प्रयत्न केले.

भौतिकशास्त्रातला त्यांचा मूळचा आवडीचा प्रांत होता विश्वकिरणांचा. साहजिकच, अवकाश संशोधनही त्यांच्या मनाला साद घालत होते. त्याचीही त्यांनी पायाभरणी केली. भारतीय अवकाश संशोधन केंद्राची स्थापनाही केली. त्यात त्यांना डॉ. विक्रम साराभाई यांचीही मोलाची साथ मिळाली. तेव्हा अंतराळ संशोधन कार्यक्रमाची धुरा त्यांच्या खांद्यावर सोपवून भाभांनी परत अणू संशोधनाकडे लक्ष वळविले. या दोन्ही क्षेत्रांतील संशोधनाला इलेक्ट्रॉनिक यंत्रणांची साथ मिळणे अत्यावश्यक आहे हे समजून त्यांनी त्याही क्षेत्रातील संशोधनासाठी इलेक्ट्रॉनिक आयोगाची स्थापना केली. त्याचाही विस्तार आज अनेक शाखांमध्ये झाला आहे. रेण्वीय जीवशास्त्र, नाभिकीय वैद्यक, अशा आधुनिक विज्ञानाच्या अनेक शाखांमधील मूलभूत संशोधनाला त्यांनीच चालना दिली. त्या क्षेत्रांमध्ये कार्यरत असणाऱ्या अनेक संस्थांची स्थापनाही केली.

या संस्थास्थापनांसंबंधीच्या त्यांच्या कल्पनाही चाकोरीबाहेरच्या होत्या. त्यांनी आधुनिक विज्ञानातील कोणतीही शाखा वर्ज्य न मानता, त्या विषयात अत्युच्च दर्जाचे संशोधन करण्याची क्षमता असणाऱ्या वैज्ञानिकांचा प्रथम शोध घेतला आणि त्यांना केंद्रस्थानी ठेवून संस्थांची निर्मिती केली. प्रथम इमारत बांधा आणि मग त्यांच्यामध्ये वास करू शकणाऱ्या वैज्ञानिकांना आवाहन करा, ही नेहमीची प्रथा त्यांनी मोडीत काढली.

अणुशक्ती संशोधनासंबंधीच्या त्यांच्या सर्वांगीण योगदानाची दखल आंतरराष्ट्रीय स्तरावरही घेतली गेली. १९५५ साली व्हिएन्ना येथे भरलेल्या पहिल्या आंतरराष्ट्रीय अणुशक्ती परिषदेचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली आणि त्यांनी ती सार्थही ठरवली.

वैज्ञानिक, तसेच अनेक संशोधनसंस्थांची स्थापना करणारे धुरीण म्हणून आज जगाला त्यांची माहिती असली, तरी त्यांचे व्यक्तिमत्त्व अष्टपैलू होते. अणुशक्तीच्या अर्थशास्त्राचाही त्यांचा दांडगा अभ्यास होता. अणुशक्तीद्वारे निर्माण केलेली वीज किफायतशीर आहे हे त्यांनी दाखवून दिले होते. त्यांना अभिजात पाश्चात्त्य संगीताची विलक्षण आवड होती. ते उत्तम चित्रकार होते. त्यांनी स्वत: काढलेली आधुनिक शैलीतली अनेक चित्रे टाटा मूलभूत संशोधन संस्थेत इतर ख्यातनाम भारतीय चित्रकारांच्या कलाकृतींसमवेत विराजमान झालेली आहेत. त्यांनी स्थापन केलेल्या बहुतांश संशोधन संस्थांमध्ये त्यांनी सुंदर आणि कलात्मक उद्यानेही उभी केली आहेत. त्यांची रचना त्यांनी जातीने आखली होती आणि त्या उद्यानांतील

भ

झाडांची निवडही त्यांनीच केली होती. या संस्थांच्या इमारतींसाठीची जागा निवडतानाही त्यांनी त्या परिसराच्या निसर्गसौंदर्यालाही महत्त्व दिलेले आढळून येते. तसेच इमारतींचे बांधकाम करताना, त्या सौंदर्याला बाधा येणार नाही याचीही काळजी घेतलेली दिसून येईल.

अशा या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाच्या होमी भाभांचे स्वित्झर्लंडमधील माँ ब्लां या पर्वतशिखरावर आदळून झालेल्या विमान अपघातात अकाली निधन झाले.

— डॉ. बाळ फोंडके

**संदर्भ :**

*१. देशमुख, प्रा. चिंतामणी; 'होमी भाभा'; ग्रंथाली; जानेवारी १९९४.*

## भालेराव, शरच्चंद्र मनोहर
**अभियंता**
**२ मार्च १९२६ - ९ फेब्रुवारी २००६**



शरच्चंद्र मनोहर भालेराव यांचा जन्म खानदेशात झाला. त्यांचे प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण प्रथम वर्गात आणि प्रथम क्रमांकाने धुळ्याच्या शाळांमधून झाले. नंतर महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात गेले. तेथून त्यांनी १९४५ साली इंटर सायन्स केले. त्या वेळी विद्यापीठात भौतिकशास्त्रात पहिल्या येणाऱ्या मुलाला मिळणारे 'गिब्ज पारितोषिक' त्यांना मिळाले. ते पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयामधून विशेष प्रावीण्यासह नागरी अभियांत्रिकी बी.ई. परीक्षा उत्तीर्ण झाले. विशेष प्रावीण्य मिळवून ही परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी तेव्हाच्या मुंबई राज्याच्या सार्वजनिक बांधकाम खात्यात काही जागा राखीव ठेवलेल्या असत. त्याप्रमाणे भालेरावांना ती नोकरी मिळाली. या नोकरीत मृत्तिका बलविज्ञान शास्त्रानुसार चालणाऱ्या औरंगाबाद जिल्ह्यातील गोदावरी नदीवर बांधल्या जाणाऱ्या गंगापूर येथील मातीच्या धरणावर त्यांनी १९५० ते १९५४, अशी पाच वर्षे काम केले. १९५४ ते १९५७ अशी तीन वर्षे पुणे जिल्ह्याच्या घोड प्रकल्पावर त्यांनी काम केले. ज्या रचनेनुसार या धरणाचे बांधकाम व्हायचे होते, त्यामुळे वेळ आणि पैसा वाढणार होता. वरिष्ठांच्या परवानगीने त्यांनी ती रचना बदलून कमी वेळ आणि कमी खर्चात ते धरण बांधून दिले. यानंतर त्यांनी पुण्याजवळील पानशेत या मातीच्या धरणावर काम केले. काही त्रुटींमुळे हे धरण पडून पुणे शहरावर १२ जुलै, १९६१ रोजी मोठीच आपत्ती कोसळली. नंतर ते पुण्याजवळील खडकवासला धरणावर काम करून मंत्रालयात उपसचिव पदावर रुजू झाले.

१९६७ साली कोयना धरणाच्या परिसरात भूकंप झाल्यावर त्याच्या मजबुतीच्या कामावर त्यांना नेमले. ते काम त्यांनी नावीन्यपूर्णतेने केले. त्यानंतर ते मुख्य अभियंता झाले आणि नागपूरला त्यांनी १९७४ ते १९८०, अशी सहा वर्षे त्या पदावरून काम केले. त्या अवधीत नागपूर भागातील पाटबंधारे प्रकल्पाची विशेष प्रगती झाली. १९८१ साली वयाच्या पंचावन्नाव्या वर्षी ते सरकारी नोकरीतून निवृत्त झाले. (त्या वेळी निवृत्तीचे वय ५५ होते.) शासकीय नोकरीच्या काळात आणि नंतरही आलेल्या आमंत्रणानुसार त्यांनी राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय परिषदांत भाग घेऊन तेथे निबंध वाचन केले. स्वित्झर्लंडमधील झूरिक (१९५३), बांगला देशातील ढाका (१९७९), अमेरिकेतील ह्यूस्टन आणि सिंगापूर (१९८४) या परिषदांत त्यांनी भाग घेतला होता.

निवृत्तीनंतर प्रथम त्यांनी 'प्रीमिअर कन्सल्टंट्स' या सिंचन क्षेत्रात प्रसिद्ध पावलेल्या कंपनीत सल्लागार म्हणून काम केले. नंतर १९८५ साली त्यांनी 'मनोजा कन्सल्टंट्स' म्हणून स्वत:ची, सिंचन क्षेत्रातील एका सल्लागार कंपनीची स्थापना केली. महाराष्ट्रातील अप्पर वर्धा, धोम, टेंभू (कृष्णा नदीवरील उपसा प्रकल्प) व गुजरातमधील सरदार सरोवर या प्रकल्पासाठी त्यांनी

भ




कामे केली. तसेच ‘यूएस एड’ या प्रकल्पांसाठीही त्यांनी कामे केली. त्याच काळात महाराष्ट्रातील पाणीपुरवठा योजनांची इतरही कामे त्यांनी केली. कन्सल्टन्सीच्या कामा निमित्ताने त्यांनी गुजरात, आसाम, तामीळनाडू, सौराष्ट्र, उत्तर प्रदेश, अशा अनेक राज्यांतून प्रवास करून प्रकल्पांना भेटी दिल्या.

२० जानेवारी, १९६३ रोजी ‘मुंबई मराठी साहित्य संघा’च्या शास्त्रीय समितीच्यावतीने त्यांनी दिलेल्या भाषणावर, ‘मातीची धरणे’ हे पुस्तक प्रसिद्ध झाले. ते पुस्तक मुंबई मराठी साहित्य संघाने १९६५ साली प्रसिद्ध केले. मराठीतून शास्त्रीय विषय यथार्थपणे शिकविता यावा यासाठी, ‘थिअरॉटिकल सॉइल मेकॅनिक्स’ या मुळात कार्ल टेरझागी यांनी लिहिलेल्या पुस्तकाचे त्यांनी ‘सैद्धान्तिक मृत्तिका बलविज्ञान’ या नावाने मराठीत भाषांतर केले. ते १९७४ साली ‘महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळा’ने छापले. ‘प्रसाद’ मासिकात त्यांनी नद्यांविषयी ऐतिहासिक माहिती देणारा लेख प्रसिद्ध केला. भालेराव यांनी मातीच्या धरणांवर काम करून त्यात विशेष प्रावीण्य मिळवले होते.



इसवी सन १९०० मध्ये जगात ३० मीटरपेक्षा जास्त उंचीची फक्त ३६ धरणे होती. त्या वेळी ५६ मीटर उंचीचे फ्रांसमधील धरण हा उच्चांक होता. १९०० ते १९५० या काळात ३६ धरणांचा आकडा २५००च्यावर गेला. पहिल्या आणि दुसऱ्या महायुद्धानंतर कित्येक राष्ट्रांत विकासाच्या अनेक योजना हाती घेण्यात आल्या. त्यांत धरणाचे स्थान महत्त्वाचे आहे. त्यामुळे धरणांच्या संख्येत भर पडली. ही भर १९५० सालानंतरही चालूच राहिली आणि त्यात मातीच्या धरणांची संख्या लक्षणीयरीत्या वाढत गेली. १९५४ सालापर्यंत मातीच्या धरणाच्या बाबतीतला उच्चांक अमेरिकेतील ‘अँडरसन रँच’ या १४२ मीटर उंचीच्या धरणाचा होता. नंतर १६४ मीटर उंचीचे धरण ट्रिनिटीला झाले. १९६१ साली ब्रिटिश कोलंबियात पीस नदीवर झालेले धरण १८३ मीटर उंचीचे होते. नंतर अमेरिकेत ओरोव्हिल येथे २२४ मीटर उंचीचे धरण झाले. तत्पूर्वी अमेरिकेत झालेल्या ‘हूवर’ धरणाची उंची २२२ मीटर होती. नंतर रशियानेही ३०० मीटर उंचीचे धरण बांधले. २० मीटरपेक्षा जास्त उंचीची मातीची धरणे बांधू नयेत, असा पूर्वी दंडक होता; पण नंतर उंच धरणे बांधून ती टिकतात, असा भरवसा स्थापत्यविशारदांना आला आहे.

मातीच्या गुणधर्माचे, तसेच वर्तनाचे यथार्थ ज्ञान झाल्यामुळे धरणाची रचना कशी करायची याबद्दल स्थापत्यशास्त्रज्ञांना आत्मविश्वास आला आहे. मृत्तिकावाहक यंत्रांत (माती खोदणारी यंत्रे, खोदलेली माती वाहून नेणारी यंत्रे, भरावावर माती पसरणारी यंत्रे, पाणी शिंपडणारी यंत्रे आणि मातीचे दृढीकरण करणारी यंत्रे) आश्चर्यजनक प्रगती झाली आहे. मातीच्या धरणात पाण्याचा भार सहन करण्याची शक्ती, काही खास प्रकारची मातीच बांधकामासाठी वापरावी लागते का, ती प्रत्येक ठिकाणी मिळते, की कोठून आयात करावी लागते, वगैरे माहिती अलीकडच्या काळात मृत्तिकाबलविज्ञान शास्त्रामुळे (मृत्तिकास्थापत्यशास्त्र असेही म्हणता येईल) गेल्या ८०-९० वर्षात झाली आहे. कार्ल टेरझागी या अमेरिकन गृहस्थांनी लिहिलेल्या ‘थिअरॉटिकल सॉइल मेकॅनिक्स’ या विषयावर लिहिलेल्या पुस्तकामुळे या शास्त्रात बरीच प्रगती झाली. मातीचा रंग, कणांचा आकार, मातीतील बाष्पाचे प्रमाण अथवा ओलसरपणा (त्यामुळे बांधकामाला तडे जाणार का हे ठरवता येते), त्यावरून मातीची नम्यता (आकार घेण्याची क्षमता) ठरवता येते.

काळी माती सोडल्यास इतर सर्व प्रकारची माती धरणाच्या बांधकामास उपयोगी पडते. मृत्तिकेचे सामर्थ्य, कणांचा एकमेकांना चिकटून राहण्याचा गुणधर्म (आसंगता) आणि कणांच्या पृष्ठभागाच्या

खडबडीतपणामुळे निर्माण होणारे अंतर्गत घर्षण यांवर अवलंबून असते. मातीला आकार देताना किंवा एखादे ढेकूळ फोडताना जो जोर वापरावा लागतो, तो या दोन गोष्टींमुळे. मृत्कणांच्या हालचालीस होणाऱ्या विरोधावर मात करण्यासाठी हा विरोध जेवढा जास्त, तितके मृत्तिकेचे सामर्थ्य अधिक. दर घनमीटरमध्ये मृत्कणांचे प्रमाण जितके अधिक, तितका वरील दोन गोष्टींमुळे होणारा विरोधही अधिक. म्हणजेच घनता वाढली की मृत्तिकेचे सामर्थ्यही वाढते. मृत्तिकेच्या दृढीकरणामुळे पोकळी कमी होते आणि नम्य मृत्तिकांमध्ये सामर्थ्य तर वाढतेच, पण जलाभेद्यताही येते.

एखाद्या धरणाच्या जागी उपलब्ध असलेल्या मृत्तिकाप्रकारांचे कण पृथक्करण, अवस्थांक, दृढीकरणगुण, क्षरणक्षमता, स्खलनविरोधी सामर्थ्य यांबद्दलची पुरेशी माहिती धरणाची रूपरेषा ठरविण्यापूर्वी गोळा करावी लागते. मातीच्या धरणाची उंची म्हणजे मातीचा भराव. हा भराव नदीच्या पात्रात दोन्ही काठांवर एका विशिष्ट उंचीपर्यंत बांधला जातो. धरण पूर्ण मातीचे बांधायचे, की त्यावर वरचा उताराचा थर दगडाचा घ्यायचा, की आधारभूमीसाठी काँक्रीटचा थर द्यायचा, की धरणाच्या मातीच्या भिंतीतील पोकळ्या काढून टाकण्यासाठी सिमेंटचे इंजेक्शन द्यायचे, हे सर्व तेथील मातीच्या गुणवत्तेवर ठरते. काही वेळा धरणाच्या मातीतून पाणी झिरपते. ते काढून टाकण्यासाठी भिंतीमध्ये नळ्या टाकल्या जातात. धरणाच्या भिंतीची उंची एका दमात कधीही बांधत नाहीत. २०-२० सें.मी. एवढी उंची बांधून त्याच्या निम्म्यापर्यंत पाणी साठवून, काही काळ ठेवून भिंतीचे दृढीकरण (पल्व्हरायझेशन) केले जाते. मग पुढच्या २० सें.मी. उंचीचे बांधकाम केले जाते.

मातीची धरणे काँक्रीटच्या धरणापेक्षा स्वस्त पडतात; कारण जवळची माती, मुरुम, वाळू, दगड वापरून ती बांधता येतात, शिवाय ती कोणत्याही प्रकारच्या आधारभूत पायावर बांधता येतात. पाया खडकावर ठेवण्याची गरज नसते. मृत्तिकावाहक यंत्रांमुळे मातीची धरणे कमी वेळात बांधता येतात.

आपल्या चारही वेदांतून धरणांचा उल्लेख आढळून येतो. ख्रिस्तपूर्व आणि नंतरच्या कालखंडातही सर्व देशांत लहानमोठी धरणे बांधली गेली आहेत. त्यांपैकी आजही काही अस्तित्वात आहेत, तर काहींचे अवशेष पाहायला मिळतात. भोपाळपासून दक्षिणेला, ३२ किलोमीटर अंतरावर, भोजपूर नावाचा तलाव अकराव्या शतकात अस्तित्वात होता. या तलावाने ६५० चौरस किलोमीटरचे क्षेत्र व्यापले होते. यासाठी २७ मीटर उंचीचे मातीचे धरण बांधले होते. ती रचना आधुनिक काळात बांधत असलेल्या रचनेपेक्षा फारशी वेगळी नव्हती. महाराष्ट्रात नाशिकजवळील गंगापूर (३८ मीटर), अष्टी-एकरुख-वाघाड-घोडा (प्रत्येकी ३० मीटर), गिरणा (३७ मीटर), पानशेत (६० मीटर), अशी बरीच मातीची धरणे दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत हाती घेण्यात आली. त्यानंतर पैठण (३८ मीटर) आणि बियास (१०८ मीटर), अशी तिसऱ्या पंचवार्षिक योजनेतील धरणे आहेत.

– अ. पां. देशपांडे

**संदर्भ :**

*१. भारतीय सरिता कोश (खंड १); डायमंड पब्लिकेशन्स, पुणे*

## भिडे, विष्णू गणेश

**भौतिकशास्त्रज्ञ, विज्ञान प्रसारक**

**८ ऑगस्ट १९२५ - २५ जून २००६**



घनस्थिती भौतिकी आणि सौरऊर्जा या क्षेत्रांतील तज्ज्ञ म्हणून मान्यता पावलेले डॉ. विष्णू गणेश भिडे यांचा जन्म दर्यापूर येथे झाला. नागपूर विद्यापीठाची भौतिक-शास्त्रातील एम.एस्सी. पदवी त्यांनी प्रथम क्रमांकाने, अनेक बक्षिसे आणि शिष्यवृत्त्यांसह पटकावली आणि लगेच तेथेच ते व्याख्याते म्हणून रुजू झाले. त्यांच्या ‘इलेक्ट्रिकल डिस्चार्जेस’ या विषयावरील प्रबंधास

भ



बाल विज्ञान परिषद

नागपूर विद्यापीठाने १९५३ साली डॉक्टरेट दिली. ‘ऑप्टिकल अ‍ॅण्ड इंटर फेरोमेटिक स्टडीज ऑफ सम आस्पेक्ट्स ऑफ क्रिस्टल ग्रोथ’ या विषयावरील त्यांच्या प्रबंधावर लंडन विद्यापीठाची डॉक्टरेट त्यांनी १९५६ साली मिळवली. पुढे मुंबईच्या इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये प्राध्यापक व नंतर विभागप्रमुख या नात्याने ते काम पाहू लागले.

इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचे फेलो, इंडियन फिजिक्स असोसिएशनचे उपाध्यक्ष, १९७१ साली बंगळुरू येथील इंडियन सायन्स काँग्रेसच्या भौतिकशास्त्र विभागाचे अध्यक्ष अशी अनेक मानाची पदे त्यांनी भूषवली आहेत.

१९६६ साली ते दिल्लीच्या नॅशनल फिजिकल लॅबोरेटरीत उपसंचालक या नात्याने काम पाहू लागले. मध्ये काही वर्षे केंद्रीय मंत्रिमंडळाच्या शास्त्रीय सल्लागार समितीचे सचिव म्हणून त्यांनी जबाबदारी स्वीकारली होती. घनस्थिती भौतिकीच्या क्रिस्टल ग्रोथ, फेरो इलेक्ट्रिसिटी, फेरोमॅग्नेटिझम, लिक्विड क्रिस्टल, मॉसबॉअर आणि एक्स-रे स्पेक्ट्रोस्कोपी वगैरे बऱ्याच शाखांत त्यांनी संशोधन केलेले आहे.

शंभरहून अधिक संशोधनपर निबंध आणि अर्धे शतक पीएच.डी. विद्यार्थी त्यांच्या कर्तृत्वाची ग्वाही देत आहेत. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिका, झेकोस्लोव्हाकिया, रशिया, इस्रायल, जपान इत्यादी प्रगत देशांनीही त्यांना वेळोवेळी सन्मानाने बोलावून त्यांच्या ज्ञानाचा लाभ घेतलेला आहे. कित्येक राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय पातळीवरील वैज्ञानिक संस्थांचे ते पदाधिकारी होते. १९७४ साली ते सौरऊर्जेसंबंधी एका राष्ट्रीय समितीचे कार्याध्यक्ष होते. त्या अधिकारात त्यांनी युनोला भेट दिली. ‘यू.एन. इंडस्ट्रियल डेव्हलपमेन्ट ऑर्गनायझेशन’ या संस्थेचेही ते उपाध्यक्ष होते. सौरऊर्जेवर एक उत्तम गट त्यांनी तयार केला आहे. या सौरऊर्जेचा खेड्यांच्या विकासासाठी कसा उपयोग करता येईल, यासंबंधीचे संशोधन त्यांनी चालू केले. पुणे विद्यापीठामध्ये ऊर्जा विभाग स्थापन करण्याची जबाबदारी त्यांनी स्वीकारली. या विभागाच्या भरभराटीत त्यांचे योगदान अतिशय महत्त्वाचे आहे. पुणे विद्यापीठात आल्यानंतर त्यांच्या कारकिर्दीत चांगले निर्णय घेतले गेले.

प्रा. वि.ग. भिडे यांनी आपल्या प्रावीण्याचा ठसा सर्वत्र उमटविला. पुणे विद्यापीठातील अनेक तरुण संशोधकांना त्यांनी प्रोत्साहन दिले. त्यानंतर प्रा. वि.ग. भिडे यांना पुणे विद्यापीठाच्या कुलगुरुपदी आरूढ होण्याची संधी मिळाली. या संधीचा त्यांनी पुरेपूर फायदा करून घेतला. पुणे विद्यापीठाचा विकास घडवून आणण्यासाठी त्यांनी अनेक नवीन योजना अमलात आणल्या. संशोधनाला चालना मिळावी, यासाठी त्यांनी ‘आयुका’ (इंटर युनिव्हर्सिटी सेंटर फॉर अ‍ॅस्टॉनॉमी अ‍ॅण्ड अ‍ॅस्टॉफिजिक्स ), तसेच एन.सी.आर.ए. (नॅशनल सेंटर फॉर रेडिओ अ‍ॅस्ट्रॉनॉमी) यांसारख्या संस्था पुणे विद्यापीठाच्या आवारात आणण्यासाठी पुढाकार घेतला. पुणे विद्यापीठाचे कुलगुरू म्हणून त्यांनी तीन वर्षे काम केले. त्यांच्या कुलगुरुपदाच्या कारकिर्दीमध्ये अभियांत्रिकी महाविद्यालयाचे प्रश्न खूप मोठ्या प्रमाणात चर्चिले गेले. सरकारी महाविद्यालये व नवीन सरकारमान्य खाजगी महाविद्यालये यांच्यामध्ये असणारा दुरावा प्रा. वि.ग. भिडे यांनी आपल्या व्यक्तिमत्त्वाचा वापर करून खूप मोठ्या प्रमाणात कमी केला.

कुलगुरू पदावरून निवृत्त झाल्यानंतर प्रा. वि.ग. भिडे यांनी २००० साली इंडियन सायन्स काँग्रेसचे अधिवेशन,

पुणे विद्यापीठात भरले. त्या अधिवेशनात मुलांच्या कार्यक्रमाची संपूर्ण जबाबदारी प्रा. सी.एन. राव यांनी प्रा. वि.ग. भिडे यांच्यावर टाकली होती. त्यांनी आपल्या कार्याची दिशा ही विज्ञान प्रसार व विद्यार्थ्यांमध्ये विज्ञानाची आवड निर्माण करण्याकडे वळविली. या कार्यात त्यांनी स्वत:ला पूर्णपणे झोकून दिले. विज्ञान शोधिका स्थापन करण्याची त्यांची कल्पना ही अभिनव अशीच होती. शालेय व महाविद्यालय स्तरावर विद्यार्थ्यांना विज्ञान हे अत्यंत अयोग्य पद्धतीने शिकवले जाते, याची त्यांना खंत होती. प्रयोगाच्या माध्यमातून विद्यार्थ्यांना विज्ञान शिकता यावे, यासाठी प्रयोगशाळा स्थापन करण्याचा त्यांनी संकल्प केला. 'भारतीय विज्ञान भवन' या संस्थेच्या सहकार्याने त्यांनी हा उपक्रम प्राथमिक स्तरावर सुरू केला. प्रा. वि.ग. भिडे यांना मानणारे शिक्षक, प्राध्यापक, तसेच विज्ञानाची आवड असणाऱ्या व्यक्ती यामध्ये सामील झाल्या. अगदी कमी आर्थिक मदतीत उपक्रम कसे राबवावेत, याची प्रा. वि.ग. भिडे यांना चांगलीच कल्पना होती. किंबहुना त्यांचे याबाबतचे वर्तन हे आदर्श होते.

प्रा. वि.ग. भिडे यांच्यासाठी काम करताना कोणीही कधीही पैशाची मागणी करीत नसे. प्रा. वि.ग. भिडे यांचा शब्द खाली पडू द्यायचा नाही, हेच धोरण त्यांच्याबरोबर काम करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीमध्ये होते. विज्ञान शोधिका त्यांनी अशा प्रकारे चालवून तिचा विकास केला. या प्रयोगासाठी त्यांनी महाराष्ट्र सरकारकडून विनामूल्य जागा मिळविली. याच जागेवर आज विज्ञान शोधिकेची भव्य वास्तू उभी आहे.

कार्यमग्न राहणे हे प्रा. वि.ग. भिडे यांचे वैशिष्ट्य होते. निवृत्तीनंतर त्यांच्या कामाचा झपाटा अधिकच वाढला, असे म्हटले तर ते वावगे ठरू नये. या काळात त्यांनी महाराष्ट्रात व नागपूरमध्ये ठिकठिकाणी अनेक व्याख्याने दिली. यांतून त्यांनी 'बाल विज्ञान चळवळी'ची कल्पना पुढे मांडली. महाराष्ट्रात विज्ञान प्रसार करणाऱ्या अनेक संस्था आहेत. परंतु या संस्था स्थानिक पातळीवर त्यांच्या गुणवत्तेप्रमाणे कार्य करतात. या सर्व संस्थांना एकत्रित करून चळवळ निर्माण करावी, असे प्रा. वि.ग. भिडे यांना वाटले. त्यांनी या सर्व संस्थांना एकत्र आणले आणि 'बाल विज्ञान चळवळी'ची स्थापना केली. या चळवळीच्या माध्यमातून त्यांनी अनेक कार्यक्रमांची आखणी केली व ते त्यांनी यशस्वीपणे राबविले. डॉ. अब्दुल कलाम यांनी या कार्यात सहभाग घेतला.

प्रा. वि.ग. भिडे यांच्या या महत्त्वपूर्ण कार्यात प्रा. यशपाल, डॉ. बालसुब्रमण्यम, डॉ. जयंत नारळीकर, डॉ. विजय भटकर, डॉ. अशोक कोळस्कर, डॉ. पंडित विद्यासागर या आणि अशा अनेक गणमान्य व्यक्तींनी सहभाग घेतला. विद्यार्थ्यांसाठी विज्ञानावरील उत्कृष्ट पुस्तके आणावीत, असा त्यांचा मानस होता. त्यातून विज्ञान शोधिका अंतर्गत पुस्तकांची निर्मिती केली गेली. या प्रयोगात अनेक दर्जेदार पुस्तकांची निर्मिती झाली. काही कारणांमुळे ही योजना पुढे चालू राहिली नाही, तरी दर्जेदार पुस्तकांच्या निर्मितीचा वस्तुपाठ यामधून घातला गेला.

– डॉ. पंडित विद्यासागर

**संदर्भ :**

१. *दै. लोकसत्ता; २७ जून २००६.*

२. *मराठी विज्ञान परिषद - पत्रिका; जुलै २००६.*

३. *डिरेक्टरी ऑफ फेलोज्, खंड १; इंडियन अकॅडमी ऑफ सायन्स, बंगळुरू; २००१.*

भ

## भिसे, अविनाश नारायण

**वैद्यकतज्ज्ञ, कर्करोगतज्ज्ञ, कर्करोग संशोधक**

**५ जानेवारी १९३८**

कर्करोगग्रस्त पेशीच्या आणि तिच्या घटकांच्या रचनेतील, तसेच त्यांच्या कार्यपद्धतीतील बदलांचा वेध अविनाश नारायण भिसे यांनी अत्याधुनिक साधने व प्रक्रियांद्वारे घेतला आहे. त्यासाठी जीवशास्त्राच्या चौकटीत न राहता, भौतिकविज्ञान, तसेच रसायनविज्ञान यांच्यामधील संकल्पनांचा व शोधप्रणालींचा वापरही त्यांनी केला आहे. मुंबईत जन्मलेल्या भिसे यांचे शालेय



शिक्षण मुंबईतच झाले. पुढे रुइया महाविद्यालयातून त्यांनी प्राणिशास्त्र या विषयात बी.एस्सी. व मुंबई विद्यापीठातून एम.एस्सी. या पदव्या मिळविल्या. त्यांनी डेमॉन्स्ट्रेटर म्हणून आपल्या कारकिर्दीची सुरुवात केली. परंतु त्यानंतर लगेच इंडियन कॅन्सर रिसर्च सेंटर (आय.सी.आर.सी.) येथे संशोधक म्हणून ते रुजू झाले.

१९६२ साली चेस्टर बेटी रिसर्च इन्स्टिट्यूट, लंडन येथे सहा महिने प्रा. ॲम्ब्रोज यांच्या हाताखाली सजीव पेशींचे कल्चर या संदर्भातील नवीन तंत्रज्ञान त्यांनी आत्मसात केले. त्यावर आधारित (टाइम लॅप्स सिनेमॅटोग्राफी आणि इंटरफिअरन्स मायक्रोस्कोपी या तंत्रज्ञानाचा उपयोग करून) कर्करोगग्रस्त पेशींची पेशी-पेशींमधील आंतरक्रिया कशी होते, यावर त्यांनी संशोधन केले.

कर्करोगग्रस्त पेशींची बदललेली वर्तणूक, इतर पेशींबरोबरचा त्यांचा बिघडलेला संबंध, या विविध पैलूंचे चित्रीकरण करून त्यावर त्यांनी संशोधन केले, शोधनिबंध लिहिला आणि तो ब्रिटिश टिश्यू कल्चर असोसिएशनच्या लंडन येथील अधिवेशनात १९६३ साली सादर केला.

भारतात आय.सी.आर.सी.मध्ये सिनेमॅटोग्राफी तंत्रज्ञानाची सोय प्रथमच त्यांनी उपलब्ध करून दिली, आणि याच तंत्रज्ञानावर आधारित कॅनिबॅलिघमचे प्रात्यक्षिक करून दाखवले. इतरांना मार्गदर्शन करीत असतानाच, त्यांनी ट्यूमर पेशींची वाढ होत असताना जनुकीय अस्थिरता का येते, यावर संशोधन केले. १९६६ साली त्यांना मुंबई विद्यापीठाची पीएच.डी. प्रदान करण्यात आली. ट्यूमर पेशींवरील त्यांच्या संशोधनामुळे १९६६ साली टोकियो येथे भरलेल्या नवव्या आंतरराष्ट्रीय कर्करोग परिषदेला त्यांना बोलावण्यात आले.

टोकियो येथील शास्त्रज्ञ प्रा. हाजीम कॅटसुटा यांच्याबरोबर यकृतपेशींवरही त्यांनी संशोधन केले. तसेच, १९६८ ते १९७० या कालावधीत अमेरिकेतील फिलाडेल्फिया येथे डॉ. जेरोम जे. फ्रीड यांच्यासमवेत पेशी रचनेतील केशवाहिन्या (मायक्रोट्यूबुल्स) पेशीरचनेचा अभ्यास करण्यासाठी सिनेमॅटोग्राफी या तंत्राबरोबरच त्यांनी इलेक्ट्रॉन सूक्ष्मदर्शकाचाही वापर केला आणि त्याआधारे कल्चर पेशींच्या हालचाली आणि त्याचा केशवाहिन्यांशी असलेला संबंध, यांचे चित्रण केले. त्यांचे हे संशोधन पेशीरचनेच्या संदर्भात मैलाचा दगड ठरला. या संशोधनाचीच पुढची पायरी म्हणजे मायक्रोट्यूबुल्स आणि ॲक्टिन फिलामेंट यांचे पेशी आकार आणि पेशीचे चलनवलन योग्य राखण्यासाठी काय योगदान आहे, तसेच पेशीद्रव्याची हालचाल या केशवाहिन्यांमार्फतच होते हे स्पष्ट झाले.

डॉ. भिसे यांनी भारतातील विविध प्रकारच्या कर्करोगचे संशोधन हाती घेतले. कॅन्सर रिसर्च इन्स्टिट्यूटमध्ये आपल्या शिष्यांच्या मदतीने ल्युकेमिया (एक प्रकारचा रक्त कर्करोग) वर अभ्यास करायला सुरुवात केली. यावरील संशोधनासाठी त्यांनी 'मॉलेक्युलर सायटोजेनेटिक टेक्निक्स' या तंत्राचा वापर केला. त्यांच्या या संशोधनाला जगन्मान्यता मिळाली. ल्युकेमियाग्रस्त पेशींची कार्यप्रणाली, त्या पेशींचे बदललेले वर्तन, त्यांचा ॲक्टिन फिलामेन्टशी असलेला संबंध यांचाही त्यांनी अभ्यास केला. भारतात मोठ्या प्रमाणात आढळणाऱ्या तोंडाच्या कर्करोगावर त्यांनी लक्ष केंद्रित केले. कर्करोग्यांच्या पूर्वावस्थेतील कर्कपेशी आणि कर्कग्रस्त पेशींचे निदान करण्यासाठी सायटोकेरोटीन फिलामेन्टचा उपयोग मार्कर म्हणून कसा करता येईल, याबाबतही त्यांनी संशोधन केले.

१९६२ साली आपल्याबरोबर सहविद्यार्थिनी म्हणून संशोधन करणाऱ्या रजनी आठवले यांच्याशी डॉ. भिसे विवाहबद्ध झाले. १९८५ साली पेशी जीवशास्त्र विभागाचे प्रमुख म्हणून नियुक्ती झाल्यानंतर त्यांच्यावर कर्करोगावरील संशोधनासाठी प्रयोगशाळा निर्माण करून

भ




ए.सी.टी.आर.ई.सी.

प्रयोगशाळेत प्रयोगासाठी लागणारे प्राणी उपलब्ध करून देणे ही जबाबदारी सोपविण्यात आली. नवी मुंबई, खारघर येथे अॅडव्हान्स सेंटर फॉर ट्रिटमेन्ट, एज्युकेशन अॅण्ड रिसर्च इन कॅन्सर (अॅक्टेक) याचे प्रकल्प संचालक म्हणून डॉ. भिसे यांची नियुक्ती झाली. टाटा मेमोरियल सेंटर या आंतरराष्ट्रीय कर्करोग संशोधन संस्थेच्या मूलभूत संशोधन आणि औषधोपचार या कार्यात मदत व संशोधन करण्यासाठी अॅक्टेक या संस्थेची निर्मिती केली गेली. अॅक्टेकमधील प्रयोगात्मक संशोधनाद्वारे कर्करोग्यांना नवीन संशोधनात्मक उपचार मिळण्याची सोय झाली. त्यासाठी निरनिराळ्या प्रयोगांद्वारे चाचण्या घेऊन उपचार करण्यात आले. संशोधनाबरोबरच समाजातील वेगवेगळ्या स्तरांतील लोकांसाठी कर्करोगाविषयी जागृती आणि शिक्षण यांसाठी कार्यक्रम आखण्यात आले. या संस्थेद्वारे कर्करोगाविषयी पदव्युत्तर आणि डॉक्टरेटपर्यंतचे शिक्षण घेण्याची सोयही करण्यात आली. महाविद्यालयांमधील शिक्षकांसाठी विविध कार्यशाळा, व्याख्याने यांद्वारे समाजात कर्करोगाविषयी जागृती करण्याचा प्रयत्न करण्यात आला.

अॅक्टेक ही कर्करोगाला कारणीभूत ठरणाऱ्या विविध घटकांवर संशोधन करणारी, प्राण्यांमध्ये आवश्यक ती प्रतिकारक्षमता निर्माण करण्याविषयी प्रयोगात्मक संशोधन करणारी संस्था आहे. येथील क्लिनिकल रिसर्च सेंटर (सी.आर.सी.) मध्ये प्रारणांद्वारे कर्करोग उपचारपद्धतीमध्ये अत्यंत आधुनिक पद्धतीने संशोधन केले जाते. आधुनिक युगाची नवी आव्हाने स्वीकारण्यास ही प्रयोगशाळा समर्थपणे कार्य करीत आहे. या प्रयोगशाळेत ट्यूमर व्हायरॉलॉजी आणि जीव थेरपीवर संशोधन केले जाते.

त्यांचे आजवर राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवरून ऐंशीच्यावर शोधनिबंध व 'क्युरेबल कॅन्सर' हे अत्यंत गाजलेले पुस्तक प्रसिद्ध झाले आहे. निवृत्तीनंतरही त्यांचा गाढा अनुभव लक्षात घेता, विविध सल्लागार समित्यांवर त्यांची नेमणूक झाली आहे.

— मृणालिनी साठे

## भिसे, शंकर आबाजी

**मुद्रणतज्ज्ञ**

**२९ एप्रिल १८६७ - ७ एप्रिल १९३५**



पारतंत्र्याच्या काळात विज्ञानक्षेत्रात भारताची कीर्ती दिगंती पसरविण्याची महनीय कामगिरी बजावणाऱ्या थोर शास्त्रज्ञांत शंकर आबाजी भिसे यांची गणना होते. पाश्चात्त्यांचा एक समज झाला होता, की भारतीय शास्त्रज्ञ एखाद्या शोधाची नक्कल करू शकतील; परंतु मूलभूत संशोधन करू शकणार नाहीत. कारण संशोधनवृत्ती हा त्यांचा गुणधर्म नाही. हा गैरसमज दूर करण्यासाठी डॉ.भिसे यांनी पाश्चात्त्य संशोधकांबरोबर स्पर्धा करून प्रामुख्याने यंत्रशास्त्र क्षेत्रात शोध लावून नेत्रदीपक यश मिळविले. त्यांच्या या यशाने प्रभावित होऊन दादाभाई नौरोजी यांनीही गौरवपूर्ण शब्दांमध्ये त्यांचे कौतुक केले होते.

भिसे यांचा जन्म मुंबई येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. संशोधनवृत्ती त्यांच्यात उपजत होती. वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षी त्यांनी दगडी कोळशापासून गॅस शुद्ध करण्याचे एक यंत्र शोधून काढले. पुढे सुमारे दहा वर्षे त्यांनी सरकारी नोकरी

भ



भिसे यांनी बनविलेले मुद्रण यंत्र

केली. या काळात १८९८ हे वर्ष त्यांच्या आयुष्याला कलाटणी देणारे ठरले. लंडनमधील सुप्रसिद्ध ‘सोसायटी ऑफ सायन्स’ या संस्थेतर्फे ‘इन्व्हेंटर रिव्ह्यू ॲन्ड सायंटिफिक रेकॉर्ड’ या मासिकातून साखर, मीठ इ. जिन्नस मोठ्या राशीतून पाहिजे तितके, एकदाच वजन करून आपोआप काढून देणारे यंत्र शोधून काढणाऱ्यांना बक्षीस जाहीर केले होते. भिसे यांनी या स्पर्धेत भाग घेतला आणि त्यांना बक्षीस मिळाले. या यशाची बातमी सर्वत्र पसरली. ‘सायंटिफिक अमेरिकन’ या अमेरिकेतील मासिकानेही ही बातमी छापली.

ही बातमी काँग्रेस पक्षाच्या कार्यकारिणीचे एक सदस्य पां.ल. नागपूरकर यांच्या कानावर गेली. त्यांनी भिसेंची भेट घेतली आणि मातृभूमीची प्रतिष्ठा वाढविण्यासाठी संशोधन क्षेत्रात पुढे येण्यासाठी इंग्लंड, अमेरिकेला जाण्याची विनंती केली. अशीच विनंती नामदार गोकूळदास तेजपाल, वाच्छा, गोखले व न्यायमूर्ती रानडे यांनी केली. तेव्हा सरकारी नोकरी सोडून एक शास्त्रज्ञ व संशोधक म्हणून त्यांनी मे १८९९ मध्ये इंग्लंडला प्रयाण केले.

तेथे त्यांनी अनेक प्रकारचे शोध लावले, तरी प्रामुख्याने मुद्रण साहित्यविषयक शोध क्रांतिकारक ठरले. त्या काळी उपलब्ध असलेले ‘लायनोटाइप’ यंत्र महागडे, अवजड आणि ग्रंथजुळणीस कटकटीचे असा अनुभव होता. भिसे यांनी एका मिनिटात आपोआप कास्टिंग आणि जुळविणारे १२०० एकेरी टाइप पडतील असे यंत्र अल्पकाळात शोधून काढले. या शोधाची माहिती इंग्लंड, अमेरिका व जर्मनीमधील मासिकांत प्रामुख्याने झळकली. यानंतर ‘भिसे टाइप’ नावाचे टाइप स्वतंत्र प्रज्ञेने शोधून काढून त्यांनी त्याचे एकस्व घेतले.

१९०७ साली त्यांनी ऑटोमॅटिक इबेल यंत्राचा किचकट प्रश्न सोडविला. पुढे सिंगल टाइप कास्टर वुइथ ॲन युनिव्हर्सल मोल्ड या यंत्रावर ‘रोटरी मल्टिपल टाइप कास्टर’ या यंत्राचा त्यांनी शोध लावला. दरम्यान लंडनमधील ‘अर्लस कोर्ट’ येथे भरलेल्या मुद्रणविषयक प्रदर्शनात त्यांनी तयार केलेल्या एका यंत्राला सुवर्णपदक मिळाले.

पुढे १९०८ साली चेन्नई (मद्रास) येथे भरलेल्या ‘इंडियन टेड काँग्रेस’च्या अधिवेशनाला उपस्थित राहण्याची त्यांना विनंती करण्यात आली. या वेळी काँग्रेसचे अध्यक्ष रा.ब. मुधोळकर यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात भिसेंच्या कार्याचा गौरव केला. दोन वर्षांनी म्हणजे १९१० साली भिसेंनी ‘टाटा भिसे’ सिंडिकेटची स्थापना केली.

पहिल्या महायुद्धाच्या ऐन रणधुमाळीत भिसे अमेरिकेला गेले आणि तेथेच स्थायिक झाले. अमेरिकेत भिसेंनी ‘युनिव्हर्सल टाइप कास्टर कॉर्पोरेशनच्या’ विनंतीवरून एक अद्ययावत यंत्र शोधून काढले. मागोमाग दुसरे यंत्र अतिशय नवीन पद्धतीवर शोधून काढले. या

भ

यंत्राचे वैशिष्ट्य म्हणजे त्याला २५० सुटे भाग होते. यानंतर १९२० साली त्यांनी अमेरिकेत 'भिसे आयडियल टाइप कास्टर कॉर्पोरेशन' स्थापन केले.

त्यांनी अमेरिकेत अनेक शोध लावले. 'रोला' नावाचा धुण्यासाठीचा एक विशिष्ट सोडा त्यांनी शोधून काढला. त्यांनी त्याचे जागतिक हक्क एका इंग्लिश कंपनीला दिले. 'आटोमिडीन' या नावाच्या त्यांनी शोधलेल्या औषधाचा उपयोग पहिल्या महायुद्धात जखमी सैनिकांसाठी करण्यात आला. वातावरणातील विविध वायू विजेच्या साहाय्याने वेगळे करण्याचे यंत्र त्यांनी शोधून काढले. यानंतर त्यांनी विजेच्या साहाय्याने दूरवर छायाचित्र पाठविण्याच्या यंत्रणेचा शोध लावला. त्याचे त्यांनी एकस्वही घेतले.

त्यांच्या साठाव्या वाढदिवसानिमित्त न्यूयॉर्कमध्ये त्यांचा निरनिराळ्या संस्थांतर्फे सत्कार करण्यात आला. या समारंभास अनेक थोर अमेरिकन उपस्थित होते. या वेळी समारंभाचे एक प्रमुख वक्ते, 'न्यूयॉर्क अमेरिकन' नियतकालिकाच्या शास्त्र विभागाचे संपादक मि. फ्रान्सिस टिटझोर्ट म्हणाले की, ''डॉ. भिसे हे प्रथम श्रेणी संशोधक आहेत. भारताचे एडिसन म्हणून जगाला त्यांनी पुष्कळ शोध दिले आहेत. ते मानवतावादी असून तत्त्वज्ञानी आहेत. त्यांचा ॲटॉमिक आयोडीनचा शोध ही रसायनशास्त्रातील एक अजब करामत आहे. वैद्यकशास्त्राला ते एक प्रभावी साधन प्राप्त झाले आहे. यास्तव जग भिसेंच्या अद्वितीय अशा शास्त्रीय आणि मानवतावादी कार्याबद्दल ऋणी असून त्यांचे नाव इतिहासात चिरस्थायी राहील.''

डॉ. भिसे यांच्या शोधाला जागतिक मान्यता मिळाली. त्याचे टाइप कास्टिंगचे शोध अमेरिकेच्या क्रमिक पुस्तकात अंतर्भूत करण्यात आले. त्यांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. त्यांना अनेक संस्थांचे मान्यवर सभासद करण्यात आले. डी.एस्सी. व पीएच.डी. ह्या सन्माननीय पदव्या त्यांना बहाल करण्यात आल्या.

अमेरिकेत केलेल्या कार्याचा बहुमान म्हणून त्यांचे नाव 'हूज हू'मध्ये प्रसिद्ध करण्यात आले. या पुस्तकात नाव अंतर्भूत होणारे ते पहिले भारतीय होत. यामध्ये त्यांचा आवर्जून उल्लेख करण्यात आला.

— ज. बा. कुलकर्णी

**संदर्भ :**


१. *शर्मा, कोलेगाला - फोंडके, डॉ. बाळ; संपादक, 'अचिव्हमेंटस् इन एनॉनिमिटी'; निस्कॉम, १९९७.*


## भोजे, शिवराम बाबूराव

**अभियंता**

**३ नोव्हेंबर १९४२**



शिवराम बाबूराव भोजे यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील कागल तालुक्यातील कसबा सांगाव या गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण विद्यामंदिर सांगाव व माध्यमिक शिक्षण श्री शाहू हायस्कूल, कागल येथे झाले. त्यानंतर त्यांनी कोल्हापूर येथील राजाराम महाविद्यालय येथे दोन वर्षे शिकून पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयातून १९६५ साली बी.ई. मेकॅनिकल ही पदवी मिळवली. त्याच वर्षी त्यांची निवड भाभा अणू संशोधन संस्थेच्या एक वर्षाच्या प्रशिक्षणासाठी झाली व तो अभ्यासक्रम यशस्वीपणे पूर्ण करून ते वैज्ञानिक म्हणून भाभा अणू संशोधन केंद्रामध्ये नोकरीस रुजू झाले.

सुरुवातीला एक वर्ष भाभा अणू संशोधन केंद्रातील अणुभट्ट्यांमध्ये प्रशिक्षण घेऊन १९६७ साली ते अणुभट्टी संयंत्र रचना या विभागात कार्य करू लागले. १९६९ ते १९७० सालांत त्यांना कॅडरॅश या फ्रान्समधील द्रुतप्रजनक अणुसंयंत्राच्या रचना अभ्यासासाठी पाठविण्यात आले व १९७१ साली त्यांची बदली कल्पक्कम येथील अणू संशोधन केंद्रात करण्यात आली. नंतर याच केंद्राचे नामकरण 'इंदिरा गांधी अणू संशोधन केंद्र' (आय.जी.सी.ए.आर.) म्हणून करण्यात आले व

भ



**कल्पक्कम येथील इंदिरा गांधी अणू संशोधन केंद्र**

या केंद्रात मुख्यत्वेकरून द्रुतप्रजनक अणुभट्टीच्या (फास्ट ब्रीडर रिॲक्टर) बांधणीवर संशोधनकार्य चालू आहे.

सुरुवातीच्या काळापासून त्यांनी या अणुभट्टीची रचना व उभारणी या दोन्ही कार्यात निरनिराळ्या जबाबदाऱ्या पार पाडल्या व ४० मेगावॅट प्रायोगिक अणुभट्टी उभारून ती १९८५ साली कार्यरत झाली. जगात अशा प्रकारच्या अणुभट्ट्या फारच थोड्या ठिकाणी कार्यरत होत्या आणि त्यांची कार्यक्षमताही अपेक्षा पूर्ण करणारी नव्हती. पण संपूर्णपणे स्वबळावर उभ्या केलेल्या कल्पक्कम येथील या प्रकारच्या अणुभट्टीत नवीन प्रकारचे इंधन वापरण्याचा प्रयोग करण्यात आला. केवळ मूलद्रव्य रूपातील धातू इंधन म्हणून वापरण्याऐवजी त्यांच्या ऑक्साइड किंवा कार्बाइड स्वरुपातील संयुगांचे मिश्रण वापरल्यास कार्यक्षमतेत लक्षणीय वाढ होते, हे या प्रयोगांमधून दिसून आले. त्या प्रयोगसिद्धीत भोजे यांचा महत्त्वाचा सहभाग होता.

या अणुभट्टीच्या उभारणीतील त्यांचे कार्य पाहून याच धर्तीची ५०० मेगावॅट इतकी ऊर्जा निर्माण करणाऱ्या अणुभट्टीची प्राथमिक रचना व तिची कार्यक्षमता ठरविण्याचे काम त्यांच्यावर सोपविण्यात आले. ते त्यांनी १९८३ सालापर्यंत केले. आंतरराष्ट्रीय द्रुतप्रजनक अणुभट्टी समितीमध्ये त्यांची नेमणूक भारताचा प्रतिनिधी म्हणून १९८७ साली झाली व ते १९९८ सालापर्यंत त्या समितीचे सदस्य होते. १९८९ साली अणुभट्टी विभागाचे ते प्रमुख झाले व २००० साली ते इंदिरा गांधी अणू संशोधन केंद्राचे संचालक झाले व त्यांच्या २००४ सालच्या निवृत्तीपर्यंत ही जबाबदारी त्यांनी पार पाडली.

विजेच्या निर्मितीकरिता कल्पक्कम येथे प्रथमच ५०० मेगावॅट क्षमतेची द्रुतप्रजनक अणुभट्टी बांधण्याचा निर्णय घेऊन त्याकरिता अणू ऊर्जा महामंडळामध्ये स्वतंत्र विभाग स्थापून त्याकरिता लागणारी सर्व प्राथमिक कामे भोजे यांच्याच मार्गदर्शनाखाली करण्यात आली. या अणुभट्टीच्या उभारणीचे काम कल्पक्कम येथे चालू आहे. भोजे हे द्रुतप्रजनक अणुभट्टीच्या रचना, उभारणी व कार्य या विषयांत जगातील एक नामवंत तज्ज्ञ म्हणून ओळखले जातात व त्यांच्या अनुभवाचा फायदा आंतरराष्ट्रीय अणुऊर्जा खात्यामार्फत इतर देशांतही झाला.

वरील सर्व कार्य करत असताना साहजिकच त्यांना निरनिराळे बहुमान मिळत गेले. त्यांतील काही महत्त्वाचे असे आहेत : ‘इंडियन नॅशनल अकादमी ऑफ इंजिनिअर्स’चे फेलो १९९५, ‘पद्मश्री पुरस्कार’ २००३, ‘वास्विक पुरस्कार’, ‘फिरोदिया पुरस्कार’ २००६.

भोजे आपल्या सरकारी नोकरीतून २००४ साली निवृत्त झाले. पण विज्ञान व तंत्रज्ञानाचा फायदा आपल्या तरुण पिढीस व्हावा या उद्देशाने ते सध्या कोल्हापूरच्या शिवाजी विद्यापीठात कार्यरत आहेत. २००७ साली तेथे झालेल्या मराठी विज्ञान परिषदेच्या वार्षिक अधिवेशनात त्यांचा सहभाग होता.

– डॉ. श्रीराम मनोहर

**संदर्भ :**

१. *दै. दि हिंदू; १३ फेब्रुवारी २००३.*

✲ ✲ ✲

भ




**महाजनी, गणेश सखाराम**
**गणिततज्ज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**
**२७ नोव्हेंबर १८९८ - २६ जुलै १९८४**



ज्यांच्या पूर्वजांनी सातारा येथील छत्रपतींच्या कारभारी मंडळात महत्त्वाची पदे भूषविली, अशा ऐतिहासिक कुटुंबात गणेश सखाराम महाजनी यांचा जन्म झाला. मॅट्रिकच्या परीक्षेत तिसऱ्या क्रमांकाने उत्तीर्ण झालेले महाजनी पुढे इंटर आर्ट्स व बी.ए.च्या परीक्षेत पहिले आले. इतकेच नव्हे, तर इंटरमध्ये संस्कृतची दुसरी शिष्यवृत्ती आणि बी.ए.ला गणितात सर्वाधिक गुण मिळवणाऱ्या उमेदवाराला दिली जाणारी 'ड्यूक ऑफ एडिंबरो' शिष्यवृत्ती देऊन मुंबई विद्यापीठाने त्यांचा गौरव केला. त्यानंतर गणिताचे उच्चशिक्षण घेण्यासाठी त्यांना हिंदुस्थान सरकारची शिष्यवृत्ती मिळाली, म्हणून त्यांना केंब्रिज विद्यापीठाच्या सेंट जोन्स महाविद्यालयामध्ये ट्रायपॉसच्या अभ्यासक्रमास प्रवेश घेता आला.

१९२२ सालच्या ट्रायपॉस परीक्षेच्या भाग एकमध्ये महाजनींनी पहिला क्रमांक मिळवला म्हणून सेंट जोन्स महाविद्यालयाने त्यांना फाउण्डेशन शिष्यवृत्ती दिली. अशाच प्रकारे, ट्रायपॉस भाग दोनच्या ए प्रभागात पहिला वर्ग आणि बी प्रभागात ऑनर्स मिळवून १९२४ साली महाजनी बी-स्टार रँग्लर झाले. त्यांचे हे नेत्रदीपक यश पाहून भारतातील आपल्या यशाची उज्ज्वल परंपरा महाजनींनी केंब्रिजमध्ये चालू ठेवल्याचे लक्षात येते.

ट्रायपॉस भाग दोनच्या प्रभागात काही प्रमाणात संशोधनपूर्व अभ्यासाची तयारी झाल्यामुळे महाजनी संशोधनाच्या बिकट वाटेकडे वळले. नेहमीचा परिपाठ सोडून वेगळ्या असणाऱ्या संशोधनाच्या या क्षेत्रात, संशोधनात मुरलेल्या ई. कनिंगहॅम, हॅरॉल्ड जेफ्रीज, जी.सी. डार्विन, आर.एच. फाउलर, ई. रूदरफोर्ड व आर.डब्ल्यू. फाउलर यांच्यासारख्या तज्ज्ञ व अधिकारी मंडळींचे त्यांना मार्गदर्शन लाभले. पैकी जी.सी. डार्विन यांनी महाजनींना संशोधनासाठी 'लोहचुंबकीय संयुगांच्या स्फटिकांची उत्पत्ती' (थिअरी ऑफ फेरोमॅग्नेटिक क्रिस्टल्स) हा विषय सुचविला. केंब्रिज विद्यापीठाने हॅरॉल्ड जेफ्रीज व ई. कनिंगहॅम यांची महाजनींचे परिनिरीक्षक म्हणून नेमणूक केली.

त्यानंतर प्रत्यक्ष संशोधन चालू झाले व त्यात काही प्रमाणात प्रगती झाल्याचा अंदाज आल्यावर महाजनींनी झालेल्या भागावर आधारलेला एक निबंध लिहिला व तो विद्यापीठाच्या स्मिथ पारितोषिकासाठी सादर केला. त्याचे चिकित्सकपणे परीक्षण करून तज्ज्ञ समितीने स्मिथ पारितोषिकासाठी त्याची शिफारस केली. मग १९२६ सालच्या मार्च महिन्यात केंब्रिज विद्यापीठाने त्यांना हे पारितोषिक दिले. तोपर्यंत अवघ्या तीनच भारतीयांना हा मान मिळाला होता. त्यामुळे महाजनींचे हे यश तेव्हा डोळ्यांत भरण्यासारखे होते. त्यानंतर थोड्याच अवधीत त्यांनी पीएच.डी.चा प्रबंध पूर्ण करून विद्यापीठास सादर केला व १९२६ सालच्या डिसेंबर महिन्यात ते मायदेशी येण्यास निघाले. बी.ए.ची पदवी घेतल्यावर तीन वर्षांनी, म्हणजे दहा सत्रांनंतर केवळ परीक्षा शुल्क भरून उमेदवारास एम.ए. (कँटब) पदवी देण्याची केंब्रिज विद्यापीठात तरतूद आहे. या नियमान्वये महाजनी १९२७ साली एम.ए. (कँटब) झाले. तसेच १९२९ साली त्यांचा

म



जाधवपूर विद्यापीठ

प्रबंध मंजूर होऊन विद्यापीठाने त्यांना पीएच.डी. पदवी प्रदान केली.

केंब्रिजला जाण्यापूर्वीच डेक्कन एज्युकेशन सोसायटीने महाजनींना आजीव सेवक करून घेतल्यामुळे स्वदेशी परतल्यावर ते फर्गसन महाविद्यालयात गणिताचे अध्यापन करू लागले. नंतर पंधरा वर्षे ते या महाविद्यालयाचे प्राचार्य होते. गणिताचे प्राध्यापक व महाविद्यालयाचे प्रमुख या दोन्ही नात्यांनी त्यांनी आपली जबाबदारी चोखपणे पार पाडली. प्राचार्यपदाच्या कारकिर्दीत त्यांच्यावर एक बाका प्रसंग गुदरला होता. तो म्हणजे, मुंबई राज्याचे तत्कालीन गव्हर्नर हॉटसन यांच्या महाविद्यालय भेटीच्या वेळी गोगटे नावाच्या एका विद्यार्थ्याने गव्हर्नरवर गोळ्या झाडल्या. परंतु गव्हर्नरचा चांगुलपणा हा, की त्याने महाजनींना दोष दिला नाही आणि नंतर फाशीऐवजी शिक्षा भोगून तुरुंगातून सुटलेल्या गोगटेच्या पुढील शिक्षणाची इंग्लंडहून महाजनींकडे चौकशी केली. इतकेच नव्हे, तर त्याच्या शिक्षणासाठी तेथून पैसे पाठविले. महाविद्यालयातील नेहमीच्या जबाबदाऱ्या सांभाळून महाजनींनी छात्रसेनेत प्रवेश करून तेथे त्यांनी केलेल्या कामाचे चीज होऊन ते 'मेजर'च्या हुद्यापर्यंत चढले. पुढे त्यांनी आपले गुरू रँग्लर परांजपे यांच्याप्रमाणेच उदारमतवादी पक्षाच्या कार्यक्रमात भाग घेण्यास सुरुवात केली. त्याचा झालेला लाभ म्हणजे त्यांना १९३७ ते १९५१ या मुदतीत मुंबई राज्य कायदे काउन्सिलवर निवडून जाण्याची संधी मिळाली.

म

कायदे काउन्सिलचे सभासद असताना महाजनींनी शैक्षणिक हिताचे अनेक ठराव मांडून शिक्षणाला योग्य वळण लावण्याचे प्रयत्न केले. विशेषत: वैद्यकीय पदवी मिळाल्यावर डॉक्टरांना खेड्यात पाठवून तेथे वैद्यकीय सुविधा उपलब्ध करून द्याव्यात, असा त्यांपैकी एक ठराव होता. तसेच वेळोवेळी त्यांनी ग्रामीण भागातील शिक्षण, उद्योगधंदे, राहणीमान यांकडे सभेचे लक्ष वेधले. प्रौढ मंडळींचे प्रबोधन करण्यासाठी मुंबई विद्यापीठातर्फे बहि:शाल व्याख्यानमाला सुरू करण्याचा तेव्हा त्यांनी एक अभिनव मार्ग सुचविला होता.

प्राचार्यपदावरून निवृत्त झाल्यावर महाजनींनी गणिताचे अध्यापन जवळजवळ थांबविले. तरी रँग्लर परांजपे यांच्याप्रमाणेच निवृत्तीनंतर त्यांच्याकडे जी बरीच मानाची पदे चालून आली, त्या पदांवरून त्यांचे शैक्षणिक कार्य मात्र चालू राहिले.

निरनिराळ्या विद्यापीठांची कुलगुरुपदे भूषविण्याच्या त्यांना ज्या संधी मिळाल्या, त्यांपैकी राजस्थानात जयपूर येथे स्थापन होणाऱ्या विद्यापीठाची १९४७ सालापासून उभारणी करून महाजनींनी त्याची सर्वांगीण जोपासना केली. सहा वर्षांच्या (१९४७-१९५३) आपल्या कार्यकाळात त्यांनी तेथे जी भरीव कामगिरी केली, त्यामुळे पुढे भूमी अनुदान पद्धतीने उदयपूर येथे जेव्हा कृषिविद्यापीठ काढण्याचे ठरले, तेव्हा परत महाजनींनाच पाचारण करण्यात आले. शेतकी विषयांत तज्ज्ञ नसतानाही कारभाराविषयक पूर्वानुभवाच्या जोरावर महाजनींनी उदयपूरच्या विद्यापीठाची धुरा नऊ वर्षे (१९६३-१९७२) समर्थपणे सांभाळली. दरम्यान, १९५३ ते १९५७ या अवधीत ते दिल्ली विद्यापीठाचे कुलगुरू, तर १९५७ ते १९६३ या अवधीत ते केंद्रीय लोकसेवा आयोगाचे सभासद होते आणि उदयपूरहून मोकळे झाल्यावर शेवटी १९७२ ते १९७५ अशी तीन वर्षे त्यांनी पुणे विद्यापीठाचे कुलगुरुपद भूषविले. अशा प्रकारे प्राचार्यपदावरून पायउतार झाल्यावर महाजनींनी उणीपुरी २८ वर्षे शैक्षणिक कार्य केले. जागोजागी मन

लावून तर त्यांनी काम केलेच, पण तरुणांची शैक्षणिक पातळी उंचावण्यासाठी नवनव्या योजना अमलात आणण्यात ते सतत प्रयत्नशील राहिले. त्याशिवाय विद्यापीठ अनुदान मंडळ व भारत सरकारच्या शिक्षणखात्याचे सल्लागार, संरक्षण प्रबोधिनीची अभ्यासक्रम समिती व एन.सी.सी.ची पात्रता कसोटी समिती यांचे अध्यक्ष, भारतीय संरक्षण दलाचे मानद सदस्य, दुसऱ्या महायुद्धाच्या काळात संरक्षण अधिकाऱ्यांच्या निवड समितीवर मुलकी सदस्य म्हणून काम करण्याची त्यांना संधी मिळाली. तरुणांना इमर्जन्सी कमिशन घेऊन सैन्यात भरती होण्याचा ते वारंवार उपदेश करीत असत. दिल्ली विद्यापीठाच्या कार्यकाळात पंतप्रधान पं. नेहरू, डॉ. राजेंद्र प्रसाद, डॉ. राधाकृष्णन यांच्यासारख्या उच्चपदस्थ राजकारणी पुरुषांशी त्यांचे कामानिमित्त संबंध आले, तर परिणामांची क्षिती न बाळगता, आय.सी.एस. अथवा आय.ए.एस. श्रेणीतील सनदी अधिकाऱ्यांना कायद्याच्या कलमावर बोट ठेवून त्यांनी निर्भीडपणे निर्णय ऐकवण्याचे धैर्य दाखविले होते.

– प्रा. स. पां. देशपांडे

**संदर्भ :**

१. *देशपांडे स. पां.; 'रँग्लरचं ग्लॅमर'; ग्रंथाली; २०००.*

## महाबळे, त्र्यंबक शंकर

**वनस्पती शास्त्रज्ञ**

**१९०९ - ३ जुलै १९८३**

प्रा. त्र्यंबक शंकर महाबळे यांचे शिक्षण अहमदनगर, नाशिक, हैदराबाद आणि पुणे या ठिकाणी झाले. १९३९ साली त्यांना मुंबई विद्यापीठाची वनस्पति- शास्त्रातली डॉक्टरेट मिळाली. ती पदवी मिळविणारे ते पहिले विद्यार्थी होते.

त्यानंतर त्यांनी पुण्यात बी.जे. वैद्यकीय महाविद्यालय व फर्गसन महाविद्यालय आणि त्यानंतर त्या वेळच्या मुंबई इलाख्यातील अहमदाबाद व मुंबई येथील शासकीय महाविद्यालयांमध्ये अध्यापन केले. त्या सुमारास पुणे विद्यापीठाची स्थापना होत होती. महाबळे यांनी तेथे



जाणे पसंत केले. नव्यानेच सुरू झालेल्या पुणे विद्यापीठात प्राध्यापक आणि विभागप्रमुख या पदांवरची त्यांची कारकीर्द वाखाणली जाते. महाबळे यांनी बांधून घेतलेली वनस्पतिशास्त्र विभागाची इमारत ही विद्यापीठातील एक उत्कृष्ट इमारत समजली जाते. अध्यापन आणि संशोधन कार्यात शिस्त, अचूकता, नियमितपणा, सूक्ष्मदृष्टी आणि अचाट स्मरणशक्ती ही त्यांची वैशिष्ट्ये होती. अत्याधुनिक उपकरणे विभागांत आणून विद्यार्थ्यांना ती वापरण्यास उत्तेजन देणे, यामुळे पुणे विद्यापीठ नव्यानेच सुरू झालेले असूनही त्याच्या वनस्पतिशास्त्र विभागाला लवकरच राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय मान्यता मिळाली. इंग्लंड, अमेरिका, रशिया, इजिप्त इत्यादी देशांतून भाषणे देण्यासाठी त्यांना आमंत्रणे येत. त्याचप्रमाणे विविध देशांतील वनस्पती शास्त्रज्ञांचा त्यांच्या विभागांत वावर असे.

पुणे विद्यापीठातील वनस्पतिशास्त्र विभागाचे उद्यान हे भारतातील विद्यापीठांच्या वनस्पती उद्यानाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. तेथील वनस्पतिजाती संग्रह, जिम्नोस्पर्म व पाम प्रकारच्या झाडांचा संग्रह हे समृद्ध तर आहेतच; पण संशोधनासाठी लागणारी दोन काचगृहे ही प्रा. महाबळे यांची योजकता-दृष्टी दर्शवतात.

महाबळे यांना फर्गसन महाविद्यालयाचे प्रा. दीक्षित, बंगळुरूचे प्रा. संपतकुमार, लखनौचे प्रा. बिरबल सहानी अशांचे मार्गदर्शन मिळाल्याने त्यांच्या संशोधन विषयांमध्ये विविधता आली. अवघड विषयसुद्धा सोप्या भाषेत समजावून देण्यात त्यांचा हातखंडा होता. 'टर्शरी काळातील वनस्पतिसंपदा' हा त्यांच्या विशेष आवडीचा विषय होता. १९६९ सालच्या चंदीगड येथील इंडियन सायन्स काँग्रेसच्या वनस्पतिशास्त्र विभागाच्या अध्यक्षपदावरून महाबळे यांनी दिलेले 'दख्खनची

म

वनस्पतिसृष्टी' या विषयावरचे त्यांचे भाषण आजही संदर्भासाठी उपयुक्त समजले जाते. नारळाच्या जातीच्या झाडांचे प्रकार आणि अश्मीभूत अवशेष यांच्यावर संशोधन करून नारळाच्या उत्पत्ती आणि उत्क्रांती यांवर त्यांनी चर्चा केली.

वनस्पतिशास्त्रातील विविध शाखांमधील त्यांचे संशोधन सुमारे १४० लेखांमधून प्रसिद्ध झाले आहे. ३०-३५ एम.एस्सी./पीएच.डी. विद्यार्थ्यांना त्यांनी मार्गदर्शन केले. इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमी या संस्थेचे ते फेलो (एफ.एन.ए.) होते. पुणे विद्यापीठातून निवृत्त झाल्यावर ते पुण्याच्याच 'विज्ञानवर्धिनी' या संस्थेत संशोधन- मार्गदर्शन करीत असत.

प्रा. महाबळे 'वेल्थ ऑफ इंडिया' या ग्रंथाचे उपसंपादक होते. इंडियन बोटॅनिकल सोसायटी, पॅलिओ बोटॅनिकल सोसायटी ऑफ इंडिया या मान्यवर संस्थांची अध्यक्षपदे त्यांनी भूषवली होती. १९७१ सालच्या मराठी विज्ञान परिषदेच्या सहाव्या वार्षिक संमेलनाचे ते अध्यक्ष होते. १९७४ सालच्या आंतरराष्ट्रीय बोटॅनिकल काँग्रेसच्या फ्रान्समध्ये भरलेल्या अधिवेशनात एका परिसंवादाचे अध्यक्ष म्हणून त्यांची नेमणूक झाली होती.

महाराष्ट्रातील मोजक्या आणि भारतातील अग्रगण्य वनस्पती शास्त्रज्ञांत गणले जाणारे प्रा. महाबळे भाषणे देणे, परीक्षा घेणे या कार्यात व्यस्त असत. सकाळच्या डेक्कन क्वीनने मुंबईच्या विज्ञान संस्थेत परीक्षेसाठी आल्यावर त्यांना त्यांचे जुने विद्यार्थी, जे मुंबईतील महाविद्यालयात विभाग प्रमुख होते, ते मार्गदर्शन घेण्यासाठी येत. परीक्षेचे काम संपवून ते संध्याकाळच्या डेक्कन क्वीनने परत जाताना क्रॉफर्ड मार्केटमधून हापूस आंबे न्यायला विसरत नसत. परीक्षेची कामे वेळेवर उरकण्यात त्यांचा हातखंडा असे. गुडघ्यापासून खाली घट्ट तुमान, लांब कोट आणि डोक्यावर काळी टोपी असा वेष असणारे हे ठेंगणे गृहस्थ मुंबई-पुण्यातच नव्हे, तर भारतातील आणि भारताबाहेरील विज्ञानप्रेमींच्या परिचयाचे होते. प्रा. महाबळे यांचा संशोधनाचाच काय, पण विचारांचाही आवाका काळाच्या बराच पुढे होता. उद्योगधंद्यांनी संशोधन कक्ष सुरू करणे, कोकणपट्टीतील खार जमिनींच्या समस्या, देशात येऊ घातलेले पाण्याचे दुर्भिक्ष, जंगलतोड, सह्याद्री पर्वतरानातील औषधी वनस्पतींची जोपासना, इत्यादी विषयांवर त्यांनी अभ्यासपूर्ण मते मांडली होती. इतकेच नव्हे, तर आज परवलीचा शब्द झालेल्या एकोटूरिझमची संकल्पना (आजचे शब्द न वापरता) त्यांनी १९७१ साली मांडली होती. आयुष्याच्या अखेरपर्यंत ते संशोधन - लेखनकार्यात मग्न होते. कार्यमग्न अवस्थेत संशोधन निबंध तपासत असतानाच त्यांना मृत्यू आला.

— प्रा. शरद चाफेकर

**संदर्भ :**

१. *देशपांडे, अ. पां., संपादक; 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन, २००५.*

## मांडके, नित्यनाथ वसंत

***नितू मांडके***

**हृदयशल्यविशारद, वैद्यक शास्त्रज्ञ**

***३१ जानेवारी १९४८ - २२ मे २००३***



नित्यनाथ वसंत मांडके यांचे प्राथमिक शिक्षण व माध्यमिक शिक्षण पुण्याच्या भावे विद्यालयामध्ये झाले. कुशाग्र बुद्धीमुळे व अभ्यासू वृत्तीमुळे यांचा पहिल्या पाचांत नंबर असायचा. वैद्यकीय शिक्षण पुण्याच्या बी.जे. वैद्यकीय महाविद्यालयामध्ये झाले. एम.बी.बी.एस. झाल्यावर ते मुंबईच्या के.ई.एम. रुग्णालयामध्ये दाखल झाले. तेथे डॉ. पी.के. सेनसारखे निष्णात हृदयरोग शल्यविशारद त्यांना गुरू म्हणून मिळाले. एम.एस. व एम.सी.एच. या हृदयशास्त्रातील उच्च पदव्या डॉ. मांडकेंनी मिळवल्या व अत्युच्च श्रेणीचे शल्यकौशल्य प्राप्त केले.

पुढे हृदयशस्त्रक्रियेतील अत्याधुनिक ज्ञान प्राप्त करण्यासाठी ते अमेरिकेला गेले. त्यांनी अमेरिकेत

म

हृदयशास्त्राच्या नवनवीन शाखेत अनुभव व ज्ञान संपादन केले व शस्त्रक्रियेत अधिक कौशल्य मिळवले. १९८४ साली ते भारतात परत आले. परदेशी त्यांना मागदी याकूब व अल्बर्ट पॅसिफिको या शल्यविशारदांचे मार्गदर्शन लाभले. मागदी याकूब यांचे ब्रिटनमध्ये व अल्बर्ट पॅसिफिको यांचे अमेरिकेत मार्गदर्शन मिळाले. चिकित्सक दृष्टी, तीव्र निरीक्षण शक्ती व परिश्रम करण्याची तयारी, जोडीला शीघ्र ग्रहणशक्ती या गुणांमुळे ते हृदयशस्त्रक्रियेत पारंगत झाले.

अभ्यास, खेळ, वक्तृत्व, चित्रकला, हस्तकला, सुंदर अक्षर, असे त्यांचे निरनिराळे गुण शाळेत शिकत असताना दिसून आले. वयाच्या पाचव्या वर्षापासून ते राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे स्वयंसेवक झाले होते. संघामुळे त्यांच्यात शिस्त, राष्ट्रीयत्व जागृत राहिले. ते परदेश शिक्षणानंतर भारतात परत आले. विश्व हिंदू परिषदेच्या पश्चिम विभागाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. त्यांनी पार्ल्यामध्ये सुश्रुत फोरमची स्थापना केली. आचार्य धुंडिराजशास्त्री विनोद यांचे डॉ. मांडके हे शिष्य होते. अध्यात्मात त्यांचा विशेष रस होता. आध्यात्मिक व्यक्तींबद्दल त्यांच्या मनात आदरभाव राहिला.

वैद्यकीय शिक्षण घेत असतानाच अलका पडळकर या सहाध्यायीबरोबर त्यांचे प्रेम जमले व शिक्षण पुरे झाल्यावर त्यांचा विवाह झाला. तिने भूलशास्त्रात एम.डी. केले होते. डॉ. मांडके यांचे खेळातील प्रावीण्य वाखाणण्यासारखे होते. फुटबॉल, ॲथलेटिक्स, खो-खो, हॉकी, बॉक्सिंग, व्हॉलीबॉल, पोहणे व बास्केटबॉल यांतही त्यांनी स्वत:चे प्रभुत्व दाखवले.

हृदयशल्यशास्त्रातील नवनवीन शोध व शस्त्रक्रियापद्धती डॉ. मांडके ताबडतोब आत्मसात करीत व त्यांचा फायदा रुग्णांना देत. संत, आध्यात्मिक व्यक्ती, शिक्षक यांच्यावर ते विनामूल्य शस्त्रक्रिया करीत.

हृदय चालू असताना ‘ऑक्टोपस’ नावाचे उपकरण लावून ‘कॉरोनरी बायपास’ करण्याची शस्त्रक्रिया त्यांनी आत्मसात केली. या पद्धतीमध्ये रुग्णाला रक्त अगदी कमी द्यावे लागते. १८-१९ वर्षांच्या कारकिर्दीत डॉ.मांडके यांनी बारा हजार शस्त्रक्रिया केल्या. त्यांतील चार हजार विनामूल्य केल्या. सयामी जुळ्यांवरील हृदयशस्त्रक्रिया खूप कठीण होती. डॉ. मांडके यांनी मुंबई, पुणे, कोईमतूर, त्रिवेंद्रम, हैदराबाद, दमास्कस, सीरिया येथे हृदयशल्यचिकित्साविषयक कार्यशाळा आयोजित केल्या. त्यांनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय मासिकांतून शंभरहून अधिक प्रबंध प्रसिद्ध केले व दोनशे पासष्टहून अधिक प्रबंध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिसंवादांतून वाचले. १९९१ साली त्यांनी सामान्य माणसांसाठी सोप्या भाषेत ‘हार्ट बीट’ हे पुस्तक लिहिले.

डॉ. मांडकेंना १९९२ चे ‘राजीव गांधी सुवर्णपदक’ मिळाले. त्यांना बोर्ड ऑफ अमेरिकन बायोग्राफिकल रिसर्च इन्स्टिट्यूट (यू.एस.ए.)तर्फे ‘विसाव्या शतकातील असाधारण व्यक्तिमत्त्व’ पुरस्कार, ‘महाराष्ट्र गौरव पुरस्कार’ (२००३), युवा संघर्ष वाहिनीचा ‘डॉ. कोटणीस स्मृती गौरव पुरस्कार’, ‘प्रियदर्शिनी पुरस्कार’ (१९९८) असे अनेक पुरस्कार मिळाले.

नवनवीन सुधारणा हृदयशल्यशास्त्रात आल्या की डॉ. मांडकेंनी त्या ताबडतोब आत्मसात केल्याच. त्यांचे खूप मोठे स्वप्न होते- सर्व स्तरांतील हृद्रोग्यांना परवडेल असे अद्ययावत, सर्व सोयीसुविधांनी युक्त रुग्णालय बांधायचे. दोनशे साठ कोटींचा हा प्रकल्प उभा करत असतानाच काळाने झडप घालून हा शल्यशास्त्रविशारद हृद्रोगामुळेच जगातून अचानकपणे नेला.

– डॉ. शशिकांत प्रधान

**संदर्भ :**

*१. मांडके, डॉ. अलका; ‘हृदयस्थ’; ग्रंथाली; २००४.*



## मांडे, चिंतामणी अनंत
**भौतिकशास्त्रज्ञ**

**२८ ऑक्टोबर १९२५**

नागपूर विद्यापीठातील भौतिकशास्त्र संशोधन कार्याची संख्यात्मक आणि गुणात्मक वाढ होण्याचे मोठे श्रेय डॉ. चिंतामण अनंत मांडे यांना आहे. देश-विदेशातून उच्च शिक्षण घेऊन आपल्या जन्मभूमीची ओळख



'क्ष-किरण वर्णपट अभ्यासाचे महत्त्वाचे केंद्र' अशी करून देण्याचे महत्त्वाचे कार्य डॉ. चिंतामणी मांडे यांनी केले आहे.

डॉ. मांडे यांचा जन्म नागपूर येथे झाला; मात्र त्यांचे शालेय तसेच महाविद्यालयीन शिक्षण उत्तर प्रदेशात झाले. बनारस हिंदू विद्यापीठाची भौतिकशास्त्रातील विज्ञान पारंगत (एम.एस्सी.) ही पदवी १९४७ साली प्राप्त करून डॉ. मांडे यांनी संशोधन क्षेत्रात पदार्पण केले. त्यासाठी त्यांनी अलाहाबाद विद्यापीठाची निवड करून १९५२ साली विद्यापीठाची डॉक्टरेट (डी.फिल.) ही उपाधी मिळविली. 'क्ष-किरण वर्णपट' या विषयाची पहिली डॉक्टरेट पदवी (डी.फिल.) मिळविण्याचा मान पटकविणारे पहिले भारतीय डॉ. मांडे आहेत. प्रसिद्ध वैज्ञानिक डॉ. जी.बी. देवधर यांचे त्यांना या कार्यात मार्गदर्शन लाभले.

१९५३ साली ते पुढील संशोधनासाठी पॅरिसला रवाना झाले. पॅरिस येथील पाच वर्षांच्या वास्तव्यात त्यांनी 'क्ष-किरण वर्णपट विज्ञान' (एक्स-रे स्पेक्ट्रोस्कोपी) या क्षेत्रात अत्यंत मोलाचे संशोधन केल्याने १९५८ साली त्यांना पॅरिस विद्यापीठाच्या डी.एस्सी. पदवीने सन्मानित करण्यात आले. पदार्थाच्या 'घन अवस्थेतील स्पेक्ट्रोस्कोपी' या विषयात डी.एस्सी. पदवी फ्रान्समध्ये मिळवण्याचा पहिला सन्मान, पहिले भारतीय डॉ. मांडे यांना मिळाला. या पदवीपत्रावर 'अतिशय आदरणीय' (व्हेरी ऑनरेबल) असा खास उल्लेख करण्यात आला आहे. या संशोधनकार्यात त्यांना आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या प्रसिद्ध वैज्ञानिक मादमोझेल वाय. कोशवा यांचे मार्गदर्शन लाभले होते.

पॅरिसमधील संशोधनकार्य यशस्वीपणे पार पाडून मातृभूमीवरील प्रेमामुळे डॉ. मांडे लगेच भारतात परतले. भाभा अणू संशोधन केंद्रात ते वर्णपट विज्ञान विभागात संशोधन अधिकारी म्हणून रुजू झाले. तिथे दोन-अडीच वर्षे काम करून १९६१ साली डॉ. मांडे पुणे विद्यापीठात भौतिकशास्त्राचे प्रपाठक या पदावर नियुक्त झाल्याने, तेव्हापासून संशोधनाच्याच जोडीने अध्यापनाच्या क्षेत्रात त्यांनी पदार्पण केले. या दुहेरी क्षेत्रांत त्यांनी प्रगतीचे अनेक टप्पे, कर्तृत्व आणि मेहनतीने गाठल्याने, डॉ. मांडे हे एक 'उत्तम शिक्षक आणि संशोधक', असे सर्वत्र ओळखले जातात.

डॉ. मांडे नागपूर विद्यापीठात भौतिकशास्त्राचे प्राध्यापक म्हणून १९६७ साली नियुक्त झाले. १८ वर्षे त्या पदावर काम करून १९८५ साली ते सेवानिवृत्त झाले. परंतु त्यांचे संशोधन आणि अध्यापनकार्य कसलाही खंड न पडता, अखंडपणे अजूनपर्यंत सुरू आहे. सेवानिवृत्तीनंतर त्यांना गोवा विद्यापीठाने प्राध्यापक आणि विभागप्रमुख म्हणून आमंत्रित केल्याने, १९९१ सालापर्यंत ते गोव्यात कार्यरत होते. गोवा विद्यापीठाचा भौतिकशास्त्र पदव्युत्तर विभाग स्थापन करण्याचे श्रेय डॉ. मांडे यांना आहे. विज्ञान आचार्य पदवीसाठी डॉ. मांडे यांनी आतापर्यंत ४० विद्यार्थ्यांना यशस्वी मार्गदर्शन केलेले आहे. त्यांचे अनेक विद्यार्थी आज देश-विदेशांतील उच्चतम स्थाने विभूषित करीत आहेत. डॉ. मांडे यांचे २००हून जास्त शोधनिबंध अनेक ख्यातनाम आंतरराष्ट्रीय दर्जाच्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांची दोन पुस्तकेदेखील प्रकाशित झालेली आहेत. 'ॲडव्हान्सेस इन एक्स-रे स्पेक्ट्रोस्कोपी' या शीर्षकांचा त्यांचा ग्रंथ परगॅमॉन प्रेसने प्रकाशित केला असून, त्याला प्रसिद्ध वैज्ञानिक प्रोफेसर एन.एफ. मॉन्ट यांची प्रस्तावना लाभली आहे.

डॉ. मांडे आणि त्यांच्या अनेक विद्यार्थ्यांनी क्ष-किरण वर्णपटातील 'रासायनिक स्थानांतरा'चा (केमिकल शिफ्ट) विविध अंगांनी सखोल अभ्यास करून पदार्थांचे गुणधर्म जाणून घेण्याच्या कामी क्ष-किरण वर्णपट विज्ञानाची उपयुक्तता पटवून दिली आहे. अणूंच्या अंतर्गत रचनेची विस्तृत माहिती देण्याव्यतिरिक्त भौतिक, तसेच रासायनिक प्रक्रियेत अणूंमधील घडून येणाऱ्या महत्त्वाच्या बदलांची माहिती क्ष-किरण वर्णपटाच्या

म

अभ्यासाने उत्तम प्रकारे मिळू शकते, हे डॉ. मांडे यांनी सर्वप्रथम दाखवून दिले आहे.

डॉ. मांडे यांचे शिक्षण क्षेत्रातील योगदान फार मोठे आहे. स्नातकपूर्व अभ्यासक्रमातील भौतिकशास्त्र विषयाच्या अध्यापनात सुधारणा घडवून आणण्याचे महत्त्वाचे कार्य त्यांनी अनेक माध्यमांतून केलेले आहे. विद्यापीठ अनुदान मंडळाच्या 'युनिव्हर्सिटी लीडरशिप प्रॉजेक्ट'चे ते अनेक वर्षे संचालक होते. हार्वर्ड फिजिक्स प्रॉजेक्टच्या अंतर्गत त्यांच्या अध्यक्षतेखाली अनेक उन्हाळी कार्यशाळा घेण्यात आल्या. महाविद्यालयाच्या प्रयोगशाळांची सुधारणा करण्यात डॉ. मांडे यांचा मोठा वाटा आहे.

विज्ञान समाजोपयोगी व्हावे, तसेच विज्ञानाची रुची जनमानसात निर्माण व्हावी, यासाठी डॉ. मांडे यांनी अनेक प्रयत्न केलेले आहेत. १९७४ साली नागपूरला भरलेल्या सायन्स काँग्रेस प्रसंगी उभारण्यात आलेल्या 'विज्ञान प्रदर्शन मंडपा'चे मोठे श्रेय डॉ. मांडे यांना जाते. त्या प्रदर्शनाचीच फलश्रुती म्हणजे नागपुरातील 'रामन विज्ञान केंद्रा'ची स्थापना ही एक विशेष उल्लेखनीय बाब होय. वर्धा येथील ग्रामोपयोगी विज्ञान केंद्र (सेंटर ऑफ सायन्स फॉर व्हिलेजेस) निर्माण करण्यासाठी डॉ. मांडे यांनी बरेच श्रम घेतले. त्या केंद्राचे अनेक वर्षे उपाध्यक्ष आणि पुढे अध्यक्ष म्हणून त्यांनी कार्य केलेले आहे. विद्यापीठ अनुदान मंडळाने इंदूर येथे स्थापन केलेल्या 'आंतर विद्यापीठ संकुला'च्या राष्ट्रीय सल्लागार मंडळाचे डॉ. मांडे हे बरीच वर्षे एक सन्माननीय सदस्य होते.

डॉ. मांडे इंडियन सायन्स काँग्रेसचे आजीव सदस्य आहेत. फेब्रुवारी १९८०च्या कोलकाता येथील या संस्थेच्या सदुसष्टाव्या सत्राचे भौतिकशास्त्र विभागाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड करण्यात आली होती. इंडियन फिजिक्स असोसिएशन या संस्थेचे डॉ. मांडे एक आजीव संस्थापक सदस्य आहेत. बंगलोरच्या इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेससारख्या ख्यातनाम संस्थेचे ते सन्माननीय सदस्य निवडले गेले आहेत. या संस्थांच्याच धर्तीवर महाराष्ट्रासाठी 'महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेस' या संस्थेची स्थापना करण्यात डॉ. मांडे यांचा सिंहाचा वाटा आहे. काही काळ त्यांनी या संस्थेच्या अध्यक्षपदाची धुरा सांभाळली आहे.

विद्यापीठ अनुदान आयोगाने १९८० साली डॉ. मांडे यांची भौतिकशास्त्राचे 'राष्ट्रीय व्याख्याता' या पदावर नियुक्ती केली. ऑगस्ट १९८२ साली अमेरिकेतील ऑरेगॉन विद्यापीठात आयोजित केलेल्या क्ष-किरण भौतिकीच्या आंतरराष्ट्रीय संमेलनासाठी डॉ. मांडे यांना आमंत्रित करण्यात येऊन त्यांना त्यातील एका सत्राचे अध्यक्षपद बहाल करण्यात आले. १९८३ साली महाराष्ट्र शासनाने डॉ. मांडे यांचा 'उत्तम शिक्षक' म्हणून गौरव केला. मराठी विज्ञान परिषदेतर्फे 'असामान्य वैज्ञानिक' म्हणून, भारतीय उपकरण संस्थेचा राष्ट्रीय पुरस्कार इत्यादी अनेक पुरस्कारांनी डॉ. मांडे यांना गौरविण्यात आले आहे.

संशोधन आणि शिक्षण क्षेत्रातील अनेक महत्त्वाच्या कामांसाठी डॉ. मांडे यांनी अनेक देशांचे दौरे केले आहेत. डॉक्टरेट पदवी संपादन केल्यानंतर १९५३ ते १९५८ या काळातील फ्रान्समधील वास्तव्याव्यतिरिक्त, १९६५ साली त्यांनी जर्मनी, इंग्लंड आणि फ्रान्सला भेट दिली. अमेरिकेच्या नॅशनल सायन्स फाउण्डेशनच्या आमंत्रणानुसार त्यांनी १९६९ साली अमेरिकेला पहिली भेट दिली. त्यानंतर १९८२, १९८६ आणि १९८९ साली ते पुन्हा अमेरिकेचा शैक्षणिक दौरा करून आले. मध्यंतरी त्यांनी नेपाळला भेट दिली. फ्रान्सच्या सी.एन.आर.एस. या संस्थेच्या खास आमंत्रणावरून डॉ. मांडे १९७७ साली पुन्हा एकदा पॅरिसला जाऊन आले. त्याच वर्षी उन्हाळ्याच्या सुट्टीत विद्यापीठ अनुदान आयोगाचे प्रतिनिधी या नात्याने डॉ. मांडे मलेशियाच्या पेनँग विद्यापीठात आयोजित केलेल्या भौतिकशास्त्र शिक्षणासंबंधीच्या दक्षिण-पूर्व आशियाच्या विभागीय संमेलनात सहभागी झाले.

मराठी, हिंदी, इंग्रजी आणि फ्रेंच या चार भाषांवर त्यांचे प्रभुत्व आहे. भौतिकशास्त्र हा विषय ते अतिशय

सोप्या आणि अभिनव पद्धतीने शिकवितात. विद्यार्थ्यांशी प्रत्यक्ष चर्चा करून मुद्देसूद प्रबंध लेखन कसे करावे, याचा आदर्श डॉ. मांडे यांनी घालून दिला आहे.

– अविनाश सेनाड

**संदर्भ :**


*१. पंधरावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन, स्मरणिका : १९९१.*


## मांडे, शेखर चिंतामणी

**जीवभौतिक शास्त्रज्ञ**

**५ एप्रिल १९६२**



डॉ. शेखर चिंतामणी मांडे यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांचे एम.एस्सी. पर्यंतचे शिक्षणही नागपूर येथे झाले. शांत, प्रसन्न, हसतमुख स्वभावाच्या डॉ. मांडे यांनी अभियांत्रिकी शाखेत प्रवेश मिळूनही संशोधनात विशेष रस असल्यामुळे विज्ञान शाखेला अग्रक्रम दिला. त्यांनी नागपूर विद्यापीठातून १९८२ साली बी.एस्सी. तर १९८४ साली एम.एस्सी. भौतिकशास्त्र या विषयात विशेष प्रावीण्यासह प्राप्त केली.

आपले पीएच.डी. संशोधनाचे ध्येय साध्य करण्यास ते बंगळुरू येथे इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सच्या मॉलिक्युलर बायोफिजिक्स विभागात रुजू झाले. तेथे त्यांनी प्रा. एम. विजयन यांच्याबरोबर 'पिनट लेक्टिन' या संयुगाच्या स्फटिकी संरचनेचा अभ्यास केला. त्यानंतर त्यांनी नेदरलॅन्ड राइक्स युनिव्हर्सिटी ग्रोनिन्गन येथे प्रा. व्हीम होल यांच्याबरोबर अनेक ट्रायफॉस्फेट समस्थानिकांच्या गुंतागुंतीच्या संरचनेचे अभ्यासपूर्वक संशोधन केले. या संशोधनाद्वारे त्यांनी असे सिद्ध केले की, या प्रथिनांची स्थिरता आणि त्यांची त्रिमितीय रचना यांमध्ये आश्चर्यकारक सहसंबंध आढळून येतो.

त्यानंतर अमेरिकेतील सिएटल येथील युनिव्हर्सिटी ऑफ वॉशिंग्टन येथे प्रा. होल यांच्याबरोबर त्यांनी मायक्रोबॅक्टेरियम लेप्री या कुष्ठरोगकारक जीवाणूमधील 'कॅपरोनिन-१०' या रसायनाच्या स्फटिकी रचनेचे संशोधन केले. १९९१ ते १९९५ अशी चार वर्षे संशोधन केल्यानंतर त्यांनी १९९५ ते २००१ सालापर्यंत इन्स्टिट्यूट ऑफ मायक्रोबियल टेक्नॉलॉजी, चंदिगड येथे संशोधक म्हणून कार्य केले. चंदिगड येथे त्यांनी व त्यांच्या चमूने जे क्षयरोग जीवाणू प्रथिन निर्माण करतात, त्यांवर संशोधन केले. क्षयरोग जीवाणूंविषयी संशोधन करताना क्ष-किरण स्फटिक शास्त्राच्या साहाय्याने असे सिद्ध केले की, क्षयरोग होऊन गेलेल्या माणसाच्या शरीरात हे जीवाणू सुप्तावस्थेत असतात. शरीराची प्रतिकारशक्ती कमी होताच ते जागृत होतात. दरम्यानच्या काळात ते रोग्यांच्या शरीरातून शक्ती साठवून ठेवतात व संधी मिळताच डोके वर काढतात. त्यासाठी शरीर सुदृढ आणि प्रतिकारक्षम राखणे जरूर आहे.

क्षयरोगी माणसांच्या शरीरातील प्रथिने आणि सुदृढ माणसाच्या शरीरातील प्रथिने यांचा तुलनात्मक अभ्यास करून प्रभावी औषध तयार करण्याचे संशोधन सुरूआहे. २००१ सालापासून डॉ. मांडे हैदराबाद येथील 'सेंटर फॉर डीएनए फिंगर प्रिंटिंग अॅन्ड डायग्नोस्टिक्स' येथे संशोधक म्हणून कार्यरत आहेत.

डॉ. मांडे यांचे अनेक शोधनिबंध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. तसेच त्यांनी विविध संस्थांमध्ये उच्चपदेही भूषविली आहेत. त्यांना अनेक पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले आहे.

नुकताच २००० साली भारत सरकारतर्फे संशोधन क्षेत्रात उल्लेखनीय काम करण्यासाठी देण्यात येणारा सर्वोच्च 'शांतिस्वरूप भटनागर पुरस्कार' त्यांना प्रदान करण्यात आला. त्याखेरीज 'बी.एम. बिर्ला युवा शास्त्रज्ञ पुरस्कार' (१९९९), 'फेलो ऑफ इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस', बंगळुरू (२००३), 'फेलो ऑफ नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेस', अलाहाबाद (२००३) आणि 'सीनियर रिसर्च फेलो'- वेलकम ट्रस्ट

म

इंटरनॅशनल, अशा अनेक सन्मानांनी त्यांना अलंकृत करण्यात आले आहे.

– मृणालिनी साठे

**संदर्भ :**


१. *मराठी विज्ञान परिषद – पत्रिका; दिवाळी अंक, २००५.*

२. *एकेचाळिसावे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; २००६.*


## माशेलकर, रघुनाथ अनंत

**रसायनशास्त्रज्ञ**

**१ जानेवारी १९४३**



वैज्ञानिक आणि औद्योगिक अनुसंधान परिषदेचे महासंचालक म्हणून नवी दिल्ली येथे १९९५ ते २००६ या काळामध्ये ठसा उमटवणारे अग्रगण्य संशोधक म्हणून रघुनाथ अनंत माशेलकर यांचा परिचय आहे. तत्पूर्वी ते पुण्याच्या राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेचे १९८९ ते १९९५ या कालखंडातील संचालक होते. निवृत्तीनंतर ‘ग्लोबल रिसर्च अलायन्स’ या जागतिक संस्थेचे २००६ सालापासून ते अध्यक्ष म्हणून कार्यरत आहेत.

माशेलकरांचा जन्म एका सामान्य कुटुंबामध्ये गोव्यामधील माशेल गावी झाला. त्यांचे बालपण आणि शिक्षण मात्र मुंबईला झाले. ते लहान असताना त्यांचे वडील निवर्तले. त्यांच्या मातोश्री अंजनी यांनी त्यांना शिक्षणासाठी सतत प्रोत्साहन दिले आणि त्यांचे कष्टपूर्वक संगोपन केले. मुंबई महानगरपालिकेच्या मराठी शाळेत अनवाणी जाऊन शिकणाऱ्या माशेलकरांचे नाव शालान्त परीक्षेत उच्च गुणवत्ताप्राप्त विद्यार्थ्यांच्या सूचीमध्ये झळकले. विपरीत आर्थिक परिस्थितीमुळे शिक्षण सोडून नोकरी करावी, असे माशेलकरांना वाटले. आईने धीर दिल्यामुळे आणि प्रतिवर्षी शिष्यवृत्ती मिळाल्यामुळे त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण उत्तम पार पडले. १९६६ साली मुंबई विद्यापीठाची बॅचलर ऑफ केमिकल इंजिनिअरिंग ही पदवी त्यांनी प्रथम श्रेणीत, प्रथम येऊन मिळवली. पीएच.डी. पदवी मिळवण्यासाठी त्यांनी मुंबईच्या इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजीमध्ये (आय.सी.टी.) येथे संशोधन सुरू केले. प्रा. एम.एम. शर्मा यांनी त्यांना मार्गदर्शन केले. १९६९ साली त्यांनी डॉक्टरेट पदवी मिळवली. त्यानंतर त्यांनी इंग्लंडमधील युनिव्हर्सिटी ऑफ सालफोर्ड येथे सात वर्षे अध्यापन आणि संशोधन केले.

परदेशात जे भारतीय संशोधक काम करीत होते, त्यांना तत्कालीन ‘सी.एस.आय.आर.’चे महासंचालक प्रा. नायुडम्मा यांनी भारतात आवश्यक त्या सोयी उपलब्ध करून देण्यात येतील, असे जाहीर केले होते. त्यांनीच १९७६ साली डॉ. माशेलकरांना राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेत (एन.सी.एल.) आमंत्रित केले. देशात राहून देशासाठी काही उत्तम काम करण्याची त्यांची तीव्र इच्छा होती. एन.सी.एल.मध्ये रुजू होऊन ‘रासायनिक अभियांत्रिकी’ विभागात साहाय्यक संचालक म्हणून त्यांनी आपल्या कारकिर्दीस सुरुवात केली. या विभागाचे ते प्रमुख झाले आणि बहुलक अभियांत्रिकी हा संपूर्ण नवीन विभाग त्यांनी स्थापन केला. मोठ्या उत्साहाने आणि तडफेने औद्योगिक क्षेत्राशी संबंधित असलेले प्रकल्प त्यांनी हाती घेतले.

त्यांनी बहुलक अभियांत्रिकी या त्यांच्या आवडीच्या विषयामध्ये दर्जेदार संशोधन करून उच्च दर्जाच्या वैज्ञानिक नियतकालिकांमध्ये ते शोधनिबंधाच्या स्वरूपात प्रसिद्ध केले. पॉलिमरवर्गीय रसायनांची जडणघडण होताना अनेक प्रक्रिया घडतात. त्या वेळी घडणारे उष्मागतिकी बदल, पाणी शोषून घेणाऱ्या पॉलिमरचे संशोधन आणि उत्पादन, जलाकर्षक पॉलिमरचे जेव्हा जलरोधक पॉलिमरमध्ये रूपांतर होते, तेव्हा होणारे रेण्वीय पातळीवरील बदल, पॉलिमरचे आकुंचन किंवा प्रसरण होताना घडणाऱ्या प्रक्रिया, काही पॉलिमरवर्गीय रसायने जीवरसायनशास्त्रातील विकरांप्रमाणे (एन्झाइम) गुणधर्म दाखवतात, त्यांचे संशोधन माशेलकरांनी प्रदीर्घ काळ केले.




काही पॉलिमरच्या द्रावणांचा वेगवेगळ्या परिस्थितीमध्ये प्रवाहीपणा बदलतो. अशा द्रावणावर दाब आल्यास त्यांचा प्रवाहीपणा किंवा वाहकता वाढते. दाब पूर्ववत झाल्यावर त्याच द्रावणाची वाहकतादेखील पूर्ववत होते. त्यांना 'नॉन न्यूटोनियन सोल्यूशन' म्हणतात. या प्रकारच्या संशोधनाला 'ऱ्हिऑलॉजी' असे नाव आहे. औद्योगिक क्षेत्रातील उत्पादनामध्ये त्या विषयाचे बरेच महत्त्व आहे, हे लक्षात घेऊन माशेलकरांनी पॉलिमर रसायनांचे द्रावण करून त्यांच्या प्रवाहीपणाचा सखोल अभ्यास केला आहे. 'पॉलिएथिलिन टेरेथॅलेट' हे रसायन मोठ्या प्रमाणात वापरात आहे. त्याचे व्यापारी उत्पादन करण्यासाठी संपूर्ण प्रक्रियेची अभियांत्रिकी प्रतिकृती (मॉडेलिंग) करण्याचे अवघड संशोधन त्यांनी केलेले आहे.

१९८९ साली ते एन.सी.एल.चे संचालक झाले. त्या वेळी 'जागतिकीकरण' आणि 'खुलेपणा'चे वारे जगभर वाहत होते. काळाचे आव्हान ध्यानात घेऊन सैद्धान्तिक किंवा मूलभूत रसायनशास्त्राची सांगड घालणारे उपयोजित संशोधन करण्याची सूचना त्यांनी तरुण संशोधक आणि त्यांच्या मार्गदर्शकांना केली. त्यांना त्यांच्या 'बौद्धिक संपदे'चे संरक्षण करण्यासाठी उद्युक्त केले. परिणामी दर्जेदार वैज्ञानिक शोधनिबंध आणि त्यावर आधारलेल्या एकस्वांची संख्या वाढत गेली. यश दुहेरी होत गेले. त्यांच्या प्रयोगशाळेला आंतरराष्ट्रीय स्वरूप येऊ लागले. संशोधकांना युरोप- अमेरिका येथून प्रकल्प मिळू लागले. सल्लामसलतीसाठी चीननेदेखील संपर्क साधला. संशोधनासाठी आवश्यक असणारा निधी योग्य त्या संस्थेकडून किंवा उद्योजकांकडून मिळवण्यासाठी संशोधक प्रयत्न करू लागले. त्यात त्यांना यश मिळू लागले. त्यांचा आत्मविश्वास वाढला. माशेलकरांनी संशोधक आणि त्यांना साथ देणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी अनौपचारिक चर्चा करण्यासाठी शनिवार-रविवार राखून ठेवला. त्यामुळे दैनंदिन कामातील छोट्यामोठ्या समस्यांवर उपाय सुचू लागले.

माशेलकरांच्या प्रयत्नांमुळे बऱ्याच परदेशी कंपन्यांना आपली संशोधन आणि विकास साधणारी प्रयोगशाळा भारतात काढावी, असे वाटू लागले. भारतात सुमारे शंभर प्रयोगशाळा सुरू झाल्या. औद्योगिक जगतामध्ये ज्याप्रमाणे संशोधन आणि विकास प्रकल्पांची आखणी आणि कार्यवाही होते, त्याप्रमाणे धोरण आखण्यामुळे कालानुरूप फायदेशीर बदल होऊ लागले. १९९५ साली वैज्ञानिक आणि औद्योगिक अनुसंधान परिषदेचे महासंचालक झाल्यावर देशातील ठिकठिकाणी स्थापन झालेल्या ३८ प्रयोगशाळा आणि त्यांमधील २०,००० कर्मचाऱ्यांचे नेतृत्व त्यांना करावे लागले. तत्कालीन जागतिक परिस्थिती लक्षात घेऊन त्यांनी 'सीएसआयआर-२००१: व्हिजन अँड स्ट्रॅटेजी' ही श्वेतपत्रिका तयार केली. बौद्धिक मालमत्तेचे आणि पारंपरिक भारतीयांचे ज्ञान कसे अबाधित राहील, यासंबंधी विचार करून त्यांनी कृती योजना ठरविली. मूलभूत विज्ञान आणि एकस्व घेता येण्यासारखे उपयोजित विज्ञान यांचा समन्वय साधणारे प्रकल्प व पीएच.डी.साठी त्या विषयावरील संशोधन अनेक प्रयोगशाळांमध्ये सुरू झाले. २००२ साली भारतातून जेवढी यू.एस. एकस्वे मंजूर करण्यात आलेली होती, त्यांतील ४० टक्के एकस्वे सी.एस.आय.आर.च्या प्रयोगशाळेमधील होती. विज्ञान- तंत्रज्ञानातील अशी एक 'राष्ट्रीय चळवळ' सुरू करण्याचे अनन्यसाधारण श्रेय माशेलकरांकडे जाते.

हळदीच्या भुकटीतील जंतुनाशक गुणांमुळे जखम लवकर भरून निघते, हे आपल्या भारतीयांचे पारंपरिक ज्ञान देशात सर्रास वापरले जाते. हळदीच्या या वैशिष्ट्यपूर्ण गुणधर्मावर आधारलेले एक एकस्व अमेरिकेत मंजूर झालेले होते. (यू.एस. एकस्व ५,४०१,५०४१,१९९६) आपल्या आजीबाईच्या

म

बटव्यातील वनौषधीची ‘चोरी’ लक्षात घेऊन त्यांनी ‘सी.एस.आय.आर.’च्या वतीने हळदीचे एकस्व नावीन्यतेच्या अभावी रद्द व्हावे म्हणून कायदेशीर लढाई केली. हळदीचे गुण मराठी, संस्कृत, हिंदी आणि इंग्रजी नियतकालिकांमध्ये किंवा काही ग्रंथांमध्ये नमूद असल्याचे त्यांनी यू.एस. एकस्व मान्य करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणले. हळदीचे ते एकस्व रद्द झाले. नंतर जगप्रसिद्ध भारतीय तांदूळ ‘बासमती’च्यासंबंधीचे एक यू.एस. एकस्व (क्र. ५,६६३,४८४) एका परदेशी कंपनीने मंजूर करून घेतले. ‘बासमती’च्या नावाचे आणि तसेच भौगोलिक स्थानाचे महत्त्व व्यापारी दृष्टीने अनन्यसाधारण आहे. त्या कंपनीचे काही अवास्तव दावे (हक्क) रद्द करण्यातही ‘सी.एस.आय.आर.’ला यश मिळाले.

विकसनशील देशातील पारंपरिक ज्ञान किंवा बौद्धिक मालमत्ता अबाधित राखण्यासाठी पारंपरिक ज्ञानाची पद्धतशीर नोंद असलेल्या ‘साठा चकत्या’ (सीडीज्) तयार करण्याचा प्रकल्प ‘सी.एस.आय.आर.’ने आखला. ‘टी.के.डी.एल.’ (ट्रॅडिशनल नॉलेज डिजिटल लायब्ररी) हा चकत्यांचा प्रकल्प यशस्वी पार पडल्यामुळे त्यासंबंधीच्या एकस्वाची लढाई खेळण्यात वेळ आणि पैसा वाया जाणार नाहीत. माशेलकर १९९५ साली जेव्हा ‘सी.एस.आय.आर.’चे महासंचालक झाले होते, तेव्हा त्या संस्थेच्या यू.एस. एकस्वांची संख्या फक्त ३० होती. २००६ साली ते निवृत्त झाले, तेव्हा ती संख्या ७५० पेक्षा जास्त झाली होती. हे यश त्यांच्या उपयोजित संशोधनाला प्रोत्साहन देण्यामुळे मिळाले.

जागतिकीकरणाच्या पार्श्वभूमीवर आणि बदलत्या सामाजिक परिस्थितीत १९९१ सालानंतर भारताचे विज्ञान-तंत्रज्ञान धोरण बदलणे स्वाभाविक होते. भारताचे कृषिसंशोधन, स्वयंचलित वाहनांचे इंधनविषयक धोरण, उच्चशिक्षण धोरण, भारतीय औषध नियंत्रण कायदा (विशेषत: बनावट आणि भेसळयुक्त औषधांसंबंधीचे धोरण), विभागीय अभियांत्रिकी महाविद्यालये आणि नॅशनल इन्स्टिट्यूटमध्ये रूपांतर- अशा अनेक मुद्यांशी संबंधित असलेल्या मंडळात त्यांनी महत्त्वपूर्ण भूमिका बजावलेली होती. पंतप्रधानांना तसेच मंत्रिमंडळाला विज्ञान-तंत्रज्ञानविषयक सल्ला देणाऱ्या समितीत (सायंटिफिक ॲडव्हायजरी कौन्सिल) त्यांनी दीर्घकाळ कार्य केले होते.

त्यांच्या कार्याचा गौरव अनेक संस्थांनी केलेला आहे. त्यांना पद्मश्री (१९९१), पद्मभूषण (२०००), महाराष्ट्र गौरव (२००६), पुण्यभूषण (२००८) पुरस्काराचा मान मिळालेला आहे. त्यांना मिळालेली मानचिन्हे पन्नासपेक्षा जास्त आहेत. त्यांना मिळालेले काही मानसन्मान आणि पुरस्कार पुढीलप्रमाणे आहेत : शांतिस्वरूप भटनागर पुरस्कार (१९८२), पंडित जवाहरलाल नेहरू तंत्रज्ञान पुरस्कार (१९९१), जी.डी. बिर्ला शास्त्रीय संशोधन पुरस्कार (१९९३), मटेरियल सायंटिफिक ऑफ इयर अवॉर्ड (२०००), आयएमसी युरान क्वालिटी मेडल (२००२), लाल बहादूर शास्त्री नॅशनल अवॉर्ड फॉर एक्सलन्स इन पब्लिक ॲडमिनिस्ट्रेशन अँड मॅनेजमेंट सायन्सेस (२००२), वर्ल्ड फेडरेशन ऑफ इंजिनिअरिंग ऑर्गनायझेशन्स मेडल ऑफ इंजिनिअरिंग एक्सलन्स, पॅरिस (२००३) इंडियन सायन्स काँग्रेसचा जीवनगौरव पुरस्कार (२००४), इंडियन सायन्स काँग्रेसचा आशुतोष मुखर्जी स्मृती पुरस्कार (२००४).

२६ विद्यापीठांनी त्यांना सन्माननीय डॉक्टरेट पदवी प्रदान केलेली आहे. ते लंडनच्या रॉयल सोसायटीचे एफ.आर.एस. आहेत. तसेच रॉयल अकॅडमी ऑफ इंजिनिअरिंग (यु.के.), ऑस्ट्रेलियन अकॅडमी ऑफ टेक्नॉलॉजिकल सायन्सेस अँड इंजिनिअरिंग, युनायटेड स्टेट्स नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेस, वर्ल्ड अकॅडमी ऑफ आर्ट अँड सायन्स (यू.एस.ए.), इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमी, नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेस, रॉयल सोसायटी ऑफ केमिस्ट्री (यु.के.), थर्ड वर्ल्ड अकॅडमी ऑफ सायन्सेस या संस्थांचे सन्मानही त्यांना लाभले आहेत. ते अनेक कंपन्यांच्या आणि संस्थांच्या

म

संचालक मंडळावर आहेत. ‘ग्लोबल रिसर्च अलायन्स’ या आंतरराष्ट्रीय स्तरावरील संस्थेचे ते अध्यक्ष आहेत.

— डॉ. अनिल लचके

**संदर्भ :**

*१. बत्तिसावे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; मुंबई; १९७१.*

## मोडक, नारायण विनायक

***नानासाहेब मोडक***

**अभियंता**

**१३ डिसेंबर १८८९ - २६ ऑक्टोबर १९७१**



नारायण विनायक मोडक यांचा जन्म पुण्यात झाला. मोडक कुटुंबामध्ये नारायण मोडक सर्वांत मोठे होते. मोडकांची कौटुंबिक परिस्थिती अत्यंत गरिबीची होती. त्यामुळे मोडकांवर अर्थार्जनाची सर्व जबाबदारी पडली. स्वत:च्या व आपल्या भावा-बहिणींच्या शिक्षणासाठी मोडकांना कर्जेही घ्यावी लागली.

१९११ साली मोडकांनी स्थापत्य अभियांत्रिकीची पदवी पुणे येथून मिळवली. त्यानंतर त्यांना त्या वेळच्या मुंबई प्रांतिक सरकारमध्ये मलनिस्सारण विभागात अभियंता या हुद्यावर नोकरी मिळाली. या नोकरीत असताना त्यांना माथेरान व देवळाली शहरांसाठी पाणीपुरवठ्याचे प्रकल्प करण्यास मिळाले. नंतर त्यांना डॉ. टर्नरसारख्या प्रसिद्ध स्थापत्य अभियंत्याबरोबर काम करण्याची संधी मिळाली व सरकारी शिष्यवृत्तीच्या मदतीने भारतातल्या वेगवेगळ्या पाणीपुरवठा व मलनिस्सारणाच्या योजना पाहण्यास मिळाल्या. नंतर १९१९-१९२० साली मोडकांची इंग्लंडमध्ये प्रशिक्षण घेण्यासाठी निवड झाली व त्या दोन वर्षांत इंग्लंडमधील पाणीपुरवठ्याच्या, रस्ते व पुलांच्या वेगवेगळ्या प्रकल्पांमध्ये काम करण्यास मिळाले.

इंग्लंडमधून परतल्यावर मोडकांची नेमणूक कार्यकारी




**मोडक सागर सरोवराची कोनशिला**

अभियंता या पदावर जी.आय.पी. रेल्वेने केली. या हुद्यावर नेमणूक मिळणारे मोडक हे पहिले भारतीय होते. मोडकांनी जी.आय.पी. रेल्वेमध्ये आठ वर्षे नोकरी केली.

१९३० साली मुंबई महानगरपालिकेची पुनर्रचना झाली. या पुनर्रचनेनंतर मोडकांची उपनगर अभियंता या पदावर निवड केली गेली. त्यानंतर मोडकांनी केलेली कार्ये व परिश्रम बघून त्यांना नगर अभियंता हा हुद्दा दिला गेला. १९३२ ते १९४७ अशी पंधरा वर्षे मोडक मुंबई महानगरपालिकेचे नगर अभियंता म्हणून काम पाहत होते. त्यांनी केलेली कामे पाहून इंग्रज सरकारने ‘कम्पॅनियन ऑफ ब्रिटिश एम्पायर’ (सी.बी.ई.) ही पदवी प्रदान केली. जेव्हा १९४७ साली भारताला स्वातंत्र्य मिळाले तेव्हा मोडकांची नेमणूक महानगरपालिका आयुक्त म्हणून केली होती. परंतु नियमानुसार या हुद्यासाठी केवळ आय.सी.एस. अधिकारी नियुक्त होऊ शकत होता. म्हणून मोडकांसाठी विशेष अभियंता असा खास हुद्दा तयार केला गेला. या हुद्यावर मोडक १९४७ ते १९५५ सालापर्यंत होते. त्यानंतर मुंबई महानगरपालिकेने त्यांना १९५७ सालापर्यंत सल्लागार म्हणून नेमले. या सर्व कारकिर्दीमध्ये मोडक खालील प्रकल्पांसाठी प्रसिद्ध

म

आहेत : १) दादरची मलनिस्सारण योजना, २) वैतरणा-तानसा पाणीपुरवठा योजना, ३) मुंबईचा विकास आराखडा, ४) राष्ट्रीय पर्यावरण अभियांत्रिकी अनुसंधान संस्था (निरी) स्थापना.

या सर्व प्रकल्पांमध्ये मोडकांचे योगदान 'वैतरणा-तानसा' या योजनेसाठी अजूनही सर्वमान्य व संस्मरणीय आहे. या योजनेमध्ये मोडकांनी वैतरणा धरणाची निर्मिती केली व ७५ किलोमीटर लांबीच्या लोखंडी जलवाहिन्या बांधून वैतरणेचे पाणी मुंबईकरांसाठी आणले. हा प्रकल्प मोडकांनी अथक परिश्रम करून १९४७ ते १९५५ या कालावधीत पूर्ण केला. त्यांनी केलेली ही सेवा बघून मुंबई महानगरपालिकेने धरणाच्या जलाशयाला 'मोडक सागर' असे सयुक्तिक नाव १९७६ साली दिले. मुंबईला होणाऱ्या पाणीपुरवठ्याच्या तलावांमध्ये 'मोडक सागर'चा भरीव वाटा आहे.

अनेक संस्थांनी मोडकांचे सत्कार व मानसन्मान केला. मोडक इन्स्टिट्यूशन ऑफ इंजिनिअर्सचे १९४२-४३ साली अध्यक्ष होते. सरकारच्या उच्चस्तरीय समितींवर (उदाहरणार्थ, गंगेच्या प्रदूषणाबाबतच्या समित्या) मोडक सदस्य होते. १९५७ सालानंतर मोडकांनी आपले अनुभव व ज्ञान पुस्तकांच्या स्वरूपात लोकांसमोर आणले. नंतरच्या काळात त्यांनी दोन पुस्तके लिहिली : 'स्युएझ ट्रीटमेन्ट', 'मास्टर प्लॅन ऑफ बॉम्बे.' वयाच्या ऐंशीव्या वर्षानंतरही मोडक कामात व्यस्त असत. इंडियन वॉटर वर्क्स असोसिएशन दरवर्षी एन.व्ही. मोडक स्मृती व्याख्यान आयोजित करते व एका प्रथितयश अभियंत्याला भाषणासाठी निमंत्रित करते.

— प्रसाद मोडक

## मोदी, अमृत विठ्ठलदास
**औषध शास्त्रज्ञ**
**२२ मे १९१४ - २९ जानेवारी १९९९**

अमृत विठ्ठलदास मोदी यांचा जन्म गुजरातेतील नडियाद येथे झाला. त्यांना ८५ वर्षांचे दीर्घायुष्य लाभले. आयुष्याच्या अखेरपर्यंत, जवळजवळ शेवटच्या



दिवसापर्यंत ते त्यांच्या कार्यालयात जात असत व त्यांचा बराचसा वेळ नवनवीन पुस्तके वाचण्यात जात असे. 'युनिकेम' या औषध उद्योगातल्या ख्यातनाम कंपनीचे ते संस्थापक आणि अध्यक्ष होते. त्यांचे वडील प्राथमिक शाळेत शिक्षक होते. मुंबईतल्या विल्सन महाविद्यालयातून बी.एस्सी.ची पदवी प्रथम वर्गात मिळवल्यावर मोदी आय.सी.एस. होण्यासाठी लंडनला गेले. परंतु त्या परीक्षेत त्यांना यश मिळाले नाही. तरीही त्या अपयशाने खचून न जाता तेथूनच एम.एस्सी.ची गणितातली पदवी प्राप्त करून ते भारतात परत आले.

मोदी यांनी मुंबईत महालक्ष्मी मंदिराच्या पायथ्याशी एका गॅरेजमध्ये १९४४ साली शंभर टक्के भारतीय मालकीच्या आणि व्यवस्थापनाच्या औषधनिर्माण उद्योगाची सुरुवात केली. हाताच्या बोटावर मोजता येतील इतक्या भारतीय मालकीच्या कंपन्या औषध उद्योगात होत्या. त्या वेळी आधुनिक तंत्राने ॲलोपथिक औषधांची निर्मिती करून त्यांनी परदेशी कंपन्यांशी टक्कर दिली.

त्याच प्रयत्नांमधून १९५४ साली त्यांनी मधुमेहाचे औषध 'इन्शुलीन'चा उत्पादन खर्च लक्षणीयरीत्या कमी केला. साहजिकच त्याच्या विक्रीची किंमतही चांगलीच उतरली. आपल्या देशातील रुग्णांना परवडणाऱ्या किंमतीत हे औषध उपलब्ध व्हावे अशी त्यांची धडपड होती. त्यांच्या स्वदेशी भावनेचा तो आविष्कार होता. याच प्रकारे खुली स्पर्धा निर्माण झाल्यावर मूलभूत रसायन उद्योगातल्या किमती सरकारने (बी.आय.सी.पी.ने) बांधून दिलेल्या दराच्या खाली घसरल्या त्या स्पर्धेमुळे, सरकारी औषधनियंत्रणामुळे नव्हे! आपल्या देशातला औषधनियंत्रण कायदा १९४० सालचा आहे. जगभरची केमोथेरपीची प्रगतीही १९४० सालानंतरची आहे. १९४४ साली 'फार्मास्युटिकल्स' हा

म

तसा जगभरच नवीन धंदा होता. ज्या वेळी औषधे ही भारतात फक्त आयात करण्याचा जमाना होता, तेव्हा त्यांनी कुठल्याही 'सवलतीं'ची वाट न पाहता, औषधे तयार करून थायलंडसारख्या खऱ्याखुऱ्या खुल्या बाजारात १९५४ सालापासून निर्यात केली. १९५९ साली दूरदृष्टीने मूलभूत रसायननिर्मितीच्या कारखान्याची मुहूर्तमेढ परदेशी सहकार्याच्या (यु-सी-बी, बेल्जियम) मदतीने केली.

स्वदेशी म्हणजे नवीन तंत्रज्ञानाकडे पाठ फिरवणे किंवा जागतिक बाजारपेठेकडे दुर्लक्ष करणे नव्हे, हे त्यांनी कृतीने दाखवले. ही नवीन तंत्रज्ञानाची आयात फक्त रसायननिर्मितीबद्दल ठेवून यंत्रसामग्री मात्र भारतीय अभियांत्रिकी उद्योगावर पूर्ण विश्वास ठेवून भारतीय बनावटीची ठेवली. औषध उद्योगासंबंधी लागणारी यंत्रे बनवणाऱ्या आजच्या अनेक कारखान्यांची सुरुवात मोदींच्या कारखान्यासाठीची यंत्रे पुरवून झालेली आहे.

ते यशस्वी तंत्रज्ञ-उद्योजक तर होतेच, पण त्याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे ते अनेक व्यवस्थापकांचे गुरू होते. त्यांच्या हाताखालून गेलेले अनेक उद्योजक, व्यवस्थापक त्यांच्या-त्यांच्या व्यवसायांत नाव मिळवून आहेत. प्रयोग करून पाहण्याची त्यांनी त्या लोकांना दिलेली संधी मोलाची होती.

त्यांचा कारखाना हे एक प्रकारचे विद्यालयच होते. त्या वेळी मुंबईमध्येच काय, पण महाराष्ट्रातही औषधनिर्मितीचे शिक्षण घेण्याची सोय नव्हती. तेव्हा देशातील तरुणांनी हे शिक्षण घेऊन औषधनिर्मिती उद्योगात मोलाची भर घालावी या उद्देशाने त्यांनी श्री. रेप्टाकोस यांच्याबरोबर 'बॉम्बे कॉलेज ऑफ फार्मसी' या शिक्षणसंस्थेची स्थापना केली.

त्यांच्या उद्योगाच्या सुरुवातीच्या काळापासून एक गोष्ट जर त्यांनी सतत चालू ठेवली असेल, तर ती म्हणजे वाचन. त्यांच्याकडे काम करणाऱ्या अधिकाऱ्यांना पुस्तके वाचायला देणे हे तर त्यांचे तंत्र होते. पुस्तक वाचले का, त्याच्या नोंदी केल्या का, त्या दुसऱ्या अधिकाऱ्याला दिल्या का, हे प्रश्न त्यांना ते सतत करत असत. इतके नवनवीन वाचनाचे महत्त्व त्यांनी मानलेले होते.

या साध्या गोष्टीचे मोल समजायला हवे असेल, तर ली आयोकोका या क्रिस्लर कॉर्पोरेशनच्या सरव्यवस्थापकाने केलेल्या त्याच्या आत्मचरित्रात केलेल्या उल्लेखावरून ध्यानात येईल. त्याच्या प्रख्यात पुस्तकात तो म्हणतो की, त्या वेळी डबघाईस आलेल्या त्या कंपनीत त्याने महत्त्वाची पहिली गोष्ट जर कोणती केली असेल, तर त्याच्या हाताखालच्या सर्व अधिकाऱ्यांना त्याने ५०० डॉलर्सची पुस्तके १९७८ साली फुकट वाटली. मोदी हे काम १९४४ सालापासून करत होते. पुस्तकातल्या नवनवीन कल्पना स्वत:च्या उद्योगात वापरण्यात त्यांचे वैशिष्ट्य होते.

'मॅनेजमेंट बाय ऑब्जेक्टिव्हज', व्हॅल्यू इंजिनिअरिंगचा औषध उद्योगातला पहिला वापर त्यांच्या कंपनीत झाला. साधारणत: धनादेशावर सह्या करण्याचे अधिकार स्वत:कडे, स्वत:च्या कुटुंबीयांकडे ठेवण्याची पद्धत आजही मोठमोठ्या भारतीय कंपन्यांत असते. पण त्यांच्या कंपनीत मात्र बऱ्याच कनिष्ठ अधिकाऱ्यांकडे दुहेरी सहीने धनादेश लिहिण्याची पद्धत त्यांनी पाडली आणि माणसे कायमची जोडून ठेवली. त्याचा पश्चात्ताप त्यांना कधी करावा लागला नाही. त्यांनी स्वत: फार थोड्या धनादेशांवर सुरुवातीच्या काळात सह्या केल्या असतील तेवढ्याच. पुढे हा सर्व व्यवहार पूर्णपणे अधिकाऱ्यांच्या अखत्यारीत होता. व्यवस्थापनाच्या व्यावसायीकरणाच्या मार्गातली ही फार महत्त्वाची पायरी आहे.

आवकजावक बारनिशीच्या नोंदी त्यांच्या कंपनीत १९५६ सालापासूनच रद्द केलेल्या होत्या हे आजही अनेकांना आश्चर्याचे वाटते. वरवर पाहता या साध्या गोष्टी वाटतील; पण त्या पूर्ण विचार करून आणि अनावश्यक खर्च टाळण्याच्या सततच्या दक्षतेतून त्यांनी केल्या. त्यामागचा काम करणाऱ्यांवरचा हा विश्वास, व्यवस्थापनाचा काम करणाऱ्यांकडे पाहण्याच्या दृष्टिकोनाच्या अंगाने महत्त्वाचा विचार आहे.

म


UNICHEM LABORATORIES LTD.

जागतिक पातळीवर स्पर्धा करायची असेल, तर भारतीय कंपन्यांचे व्यवस्थापन व्यावसायिक व तोडीस तोड असे असायला हवे. केवळ गोळ्या, इंजेक्शने आणि सिरप बनवून टिकाव धरता येणार नाही. मूलभूत रसायनेही भारतात बनवायला हवीत. मागासलेल्या देशात फक्त भारतीय वंशाच्या लोकांकडे निर्यात करून पुरणार नाही. खुल्या बाजारात टिकून राहायला हवे तर उत्पादने आंतरराष्ट्रीय दर्जाची हवीत, म्हणजे तिथे खपवता आली पाहिजेत, हे त्यांनी ओळखले होते. त्यांच्या विचारातला हा युयुत्सू स्वदेशीचा गाभा मोलाचा होता.

पन्नासच्या दशकात भारतात राष्ट्रीय उत्पादकता परिषदेची स्थापना झाली. भारतातल्या औषधउद्योगात कामगारांसाठी 'इन्सेन्टिव्ह बोनस'ची सुरुवात सर्वप्रथम झाली ती मोदींच्या जोगेश्वरीच्या कारखान्यात, १९६१ साली. देशातल्या राष्ट्रीय प्रयोगशाळांचा उपयोग भारतीय खाजगी कारखानदारांनी सहकार्याने करावा, हा विचार राबवणारी सर्वप्रथम औषध कंपनी त्यांची होती. लखनऊ, जम्मू आणि हैदराबादच्या औषधविज्ञानासंबंधीच्या प्रयोगशाळांमध्ये त्यांचे प्रयोग कार्यक्रम सतत चालू असायचे. उद्योजकाने सतत बदलणाऱ्या जगात बदलत राहायला हवे हे भान त्यांनी त्यांच्या कामात ठेवले. सतत तीन वेळा 'डेव्हलपमेंट कौन्सिल फॉर ड्रग्ज ॲन्ड फार्मास्यूटिकल्स'चे ते अध्यक्ष होते. त्याच काळात १९६९ सालच्या एकस्व कायद्यातले महत्त्वाचे बदल झाले. ते स्वत:, सिप्लाचे डॉ. युसूफ हमीद, रणबक्षीचे भाई मोहनसिंग, औषध नियंत्रक बोरकर व गोठोस्कर आणि पंतप्रधानांचे सचिव पी.एन. हक्सर या मंडळींच्या प्रयत्नांमुळे एकस्व कायद्यात, अन्न आणि औषध उद्योगात, उत्पादन एकस्व (प्रॉडक्ट पेटंट) न येता फक्त प्रक्रिया एकस्व (प्रोसेस पेटंट) आले. सक्तीच्या परवान्याची तरतूद झाली. परिणामी परदेशी कंपन्यांचा रस कमी झाला आणि भारतीय कंपन्यांना वाव मिळाला.

१९७० सालापर्यंत औषध उद्योगात परदेशी कंपन्यांचा विक्रीतला वाटा सिंहाचा होता. तो सारा तोरा पुढच्या २५ वर्षात पार बदलून गेला. आज भारतीय कंपन्या विक्रीमध्ये परदेशी कंपन्यांच्यापुढे आहेत. त्याच्या मुळाशी अमृत विठ्ठलदास मोदी यांच्यासारख्या दूरदृष्टीच्या, स्वदेशी प्रेरणेने भारलेल्या लोकांचे श्रम कारणीभूत आहेत.

प्रत्येक देशाचे आपापले स्वार्थ असतात. स्वदेशी लोकांना संरक्षण मिळावे आणि परदेशी स्पर्धेपासून त्यांचे संरक्षण करावे, ही प्रत्येक कंपनीची रास्त अपेक्षा असते. जागतिकीकरणाच्या गोष्टी प्रत्येक देश कितीही करत असला, तरी त्या-त्या देशाचे राज्यकर्ते, त्यांच्या-त्यांच्या कंपन्यांचा धंदा किंवा कामगारांच्या नोकऱ्या टिकवण्यासाठी स्वराष्ट्रहिताला अनुकूल अशीच धोरणे राबवत असतात. मोदींनी ही बाब ओळखून त्या काळात, देशाचा एकस्व कायदा स्वहितरक्षणावर भर देणारा असावा, यासाठी अपार परिश्रम घेतले.

'आचार्य प्रफुल्लचंद्र रे पुरस्कार', 'पद्मभूषण' हा भारत सरकारचा मानाचा पुरस्कार त्यांना १९७२ साली मिळाला. त्यांनी अनेक सरकारी समित्यांवर वेगवेगळ्या पदे भूषविली.

अमृत मोदींचे गुरुत्व विविध क्षेत्रातल्या अग्रक्रमाबद्दल आहे. विषय स्वदेशी उद्योग स्थापन करण्याचा असो, बॉम्बे कॉलेज ऑफ फार्मसी सुरू करण्याचा असो, एकस्व कायद्यात स्वदेशहिताचा बदल करून घेण्याचा असो, व्यवस्थापनकलेतल्या नवनव्या कल्पना वापरण्याचा असो, अमृत मोदींनी त्यात भाग घेतलेला आहे. त्यांचे वयाच्या पंचाऐंशीव्या वर्षी मुंबईत निधन झाले.

– डॉ. ल. ना. गोडबोले

संदर्भ :

१. *अकरावे अ.भा.मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, मुंबई, १९७७.*

## मोक्षगुंडम, एम. विश्वेश्वरय्या
**अभियंता**
**१५ सप्टेंबर १८६१ - १४ एप्रिल १९६२**



कर्नाटक राज्यातील चिक्कबल्लापूर जिल्ह्यातील मुद्देनहळ्ळी या गावी मोक्षगुंडम विश्वेश्वरय्या यांचा जन्म झाला. वडील श्रीनिवासशास्त्री संस्कृत पंडित होते. त्यांचे हिंदू ग्रंथांचे उत्तम पठण होते, शिवाय ते इतरांना आयुर्वेदातील सल्लाही देत. आईचे नाव वेंकचम्मा. सध्याच्या आंध्र प्रदेशातील प्रकाशम जिल्ह्यातील गुडलूरजवळील मोक्षगुंडम गावचे ते मूळ रहिवासी. पण ३०० वर्षांपूर्वी त्यांनी मैसूर संस्थानात स्थलांतर केले. मूळ गावावरून त्यांचे कौटुंबिक नाव मोक्षगुंडम पडले. विश्वेश्वरय्या हे १५ वर्षांचे असताना त्यांचे पितृछत्र हरपले. विश्वेश्वरय्यांचे प्राथमिक शिक्षण चिक्कबल्लापूरला झाले आणि माध्यमिक शिक्षण बंगळुरुला झाले. १८८१ साली ते मद्रास विद्यापीठातून बी.ए. झाले. नंतर पुण्याच्या विज्ञान महाविद्यालयामधून (आताचे अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे) ते स्थापत्य अभियांत्रिकी शाखेत बी.ई. झाले. बी.ई. झाल्यावर विश्वेश्वरय्यांनी मुंबई राज्याच्या सार्वजनिक बांधकाम खात्यात नोकरी सुरू केली. त्यांचे ऐन तरुण वयातील काम पाहून केवळ ब्रिटिशांना उपलब्ध असलेले इंडियन इरिगेशन कमिशन त्यांना मिळाले. याच काळात त्यांनी दक्षिणेत गुंतागुंतीची वाटणारी पाणीवाटपाची योजना यशस्वीपणे अमलात आणली.

म

१९०३ साली पुण्याजवळील खडकवासला धरणावर पावसाळ्यात पुराचे पाणी धरणात साठल्यावर धरणाला धोका पोहोचू नये म्हणून आपोआप उघडणाऱ्या ‘स्लुइस गेट व्हाल्व्ह’ची योजना केली. पावसाळ्यातील पुराच्या पाण्याची उंची वाढून ते पुलाच्या डोक्यावरून वाहू लागले, तर धरण पडण्याचा धोका असतो. त्यासाठी अशी योजना महत्त्वाची ठरते. ही योजना यशस्वी झालेली पाहिल्यानंतर विश्वेश्वरय्यांनी या योजनेचे एकस्व घेतले. खडकवासल्याच्या अनुभवावरून ग्वाल्हेरमधील तिग्रा धरण आणि मैसूरमधील कृष्णराजसागर धरणावरही विश्वेश्वरय्यांनी ‘स्लुइस गेट व्हाल्व्ह’ची योजना राबवली. हैदराबाद शहराच्या दोन समस्या होत्या. एक तर तेथे वर्षभर पाण्याचा तुटवडा भासे आणि दुसरे म्हणजे पावसाळ्यात पुराच्या पाण्याने शहराचे नुकसान होई. म्हणजे पावसाचे पाणी वाहून जाण्याची शहरात योग्य अशी सोय नव्हती. हैदराबादच्या निजामाने यासाठी विश्वेश्वरय्यांची मदत मागितली. हैदराबाद शहरात उस्मानसागर आणि हुसेनसागर अशा दोन प्रचंड तलावांची योजना करून, त्यात पावसाचे पाणी साठवून त्यांनी शहराचा पाण्याचा प्रश्न सोडवला. यामुळे पुराचे पाणी साठून राहण्याचा प्रश्न सुटला, त्यासाठी त्यांनी उताराचे रस्ते, सांडपाणी वाहून जाण्याची सोय इत्यादी गोष्टी करून पुरामुळे साठून राहणाऱ्या पाण्याचा प्रश्नही पुरतेपणाने सोडवला. शिवाय हेच पाणी साठल्याने पिण्याचा पाण्याचा प्रश्नही आपोआपच सुटला. यामुळे विश्वेश्वरय्यांबद्दल एक सार्वत्रिक आदराची भावना निर्माण झाली. विशाखापट्टणम बंदर पावसाळ्यात वाहून जाई, बंदराची बरीचशी धूप होई. त्याचा बंदोबस्तही विश्वेश्वरय्या यांनी केला.

वयाच्या सत्तेचाळिसाव्या वर्षी विश्वेश्वरय्यांनी सरकारी नोकरीतून स्वेच्छानिवृत्ती घेतली. यानंतर काही वर्षांनी त्यांना मैसूर संस्थानचे राजे कृष्णराज वोडियार, चौथे यांनी मैसूर संस्थानचे दिवाण (मुख्य कार्यकारी अधिकारी) म्हणून विश्वेश्वरय्यांना नेमले. विश्वेश्वरय्यांनी हे पद सहा वर्षे सांभाळले. या काळात कावेरी नदीवर त्यांनी कृष्णराजसागर धरण बांधण्याची योजना नियोजनापासून उद्घाटनापर्यंत सांभाळली. या धरणाच्या पाण्यामुळे ४८,००० हेक्टर जमीन ओलिताखाली आली. एवढी मोठी जमीन ओलिताखाली आल्याने हे धरण तेव्हा आशिया खंडातील सर्वांत मोठे धरण ठरले.

१८९४ साली मैसूरजवळील शिवनासमुद्रम येथे त्यांनी आशिया खंडातील सर्वांत मोठे विद्युतनिर्मिती केंद्र उभारले. मैसूर सोप फॅक्टरी, मैसूर सँडलवुड फॅक्टरी, पॅरासिटॉइट लॅबोरेटरी, भद्रावती आयर्न अँड स्टील वर्क्स, एसजे पॉलिटेक्नीक इन्स्टिट्यूट, बंगळुरू कृषी विद्यापीठ, स्टेट बँक ऑफ मैसूर, मंडया शुगर मिल आणि इतर कित्येक उद्योग त्यांनी सरकारी आणि खासगी क्षेत्रात, या काळात सुरू करून दिले. तिरुमाला ते तिरुपती रस्ताही याच काळातला. या काळातील त्यांचे एक वाक्य एखाद्या वचनाएवढे प्रसिद्धीस पावले. ते म्हणजे, ''उद्योग काढा नाहीतर अध:पात करून घ्या - इंडस्ट्रियलाइज ऑर पेरिश.''

१९१७ साली त्यांनी बंगळुरूला 'गव्हर्नमेंट कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग' स्थापन केले. भारतातल्या सुरुवातीच्या काळातले हे एक महाविद्यालय आहे. त्यानंतर या महाविद्यालयाचे नाव बदलून आता ते 'युनिव्हर्सिटी विश्वेश्वरय्या कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग' असे झाले आहे. आजही कर्नाटकातील ही एक नामवंत संस्था म्हणून ओळखली जाते. मैसूर आणि बंगळुरूमध्ये त्यांनी सार्वजनिक ग्रंथालये सुरू केली. मुलींनी शाळेत जावे म्हणून त्यांनी विविध प्रोत्साहनात्मक योजना सुरू केल्या. त्यांनी 'मैसूर चेंबर ऑफ कॉमर्स' स्थापन केली, तसेच त्यांनी 'कन्नड साहित्य परिषद'ही स्थापन केली. मैसूर संस्थानात विश्वेश्वरय्या यांनी एवढ्या विविध प्रकारच्या संस्था काढल्या, की ते लवकरच मैसूर संस्थानचे 'पिताश्री' म्हणून ओळखले जाऊ लागले. प्रामाणिकपणा, वेळेत काम करणे आणि एखादे काम स्वीकारल्यावर ते तन्मयतेने करणे ही त्यांची आयुष्यभराची ओळख होती.

वालचंद हिराचंद या उद्योगपतींना त्यांनी प्रोत्साहन देऊन बंगळुरूला हिंदुस्थान एअरक्राफ्ट्स कंपनी आणि मुंबईला प्रीमिअर ऑटोमोबाइल्स ही मोटरकार बनवणारी कंपनी काढायला उद्युक्त केले. पुढे वालचंद हिराचंद यांची हिंदुस्थान एअरक्राफ्ट कंपनी भारत सरकारने विकत घेतली. टाटा आयर्न अँड स्टील कॉर्पोरेशन (टिस्को),



**म्हैसुर येथील श्री कृष्णराज सागर धरण आणि वृंदावन उद्यान**

इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स (बंगळुरू) भद्रावती आयर्न अँड स्टील वर्क्स, इत्यादी संस्थांत कोठे अध्यक्ष, तर कोठे सभासद अशा विविध पदांवरून त्यांनी काम केले. १९४७ सालापूर्वी मुंबई राज्यात आजच्या पाकिस्तानातील सिंध, कराची, संपूर्ण गुजरात, संपूर्ण कर्नाटक, मध्य पूर्वेतील येमेनमधील एडन, एवढे भाग होते, तर आजच्या महाराष्ट्रातला मराठवाडा तेव्हा निजामशाहीत होता आणि विदर्भ मध्यप्रदेशात होता (त्याला तेव्हा सेंट्रल प्रॉव्हिन्स ॲण्ड बेरार-मध्य प्रांत आणि वऱ्हाड म्हणत). अशा या मुंबई राज्याच्या सर्व भागांत विश्वेश्वरय्यांचा सगळा काळ व्यतीत झालेला आहे.

विश्वेश्वरय्या इंग्लंडच्या 'बॅक बे इन्क्वायरी कमिटी'चे सभासद होते. भारतातील विविध संस्थानांचे भविष्यात काय करायचे हे ठरवण्यासाठी ब्रिटिश सरकारने १९१७ साली नेमलेल्या समितीचे ते सभासद होते. विश्वेश्वरय्या यांनी आयुष्यभर अनेक लोकोपयोगी कामे केली. ते मैसूर संस्थानचे दिवाण असताना त्यांनी संस्थानची जी सर्वांगीण प्रगती केली, त्यासाठी त्यांना ब्रिटिश सरकारने के.सी.आय.ई. (नाइटहूड) हा सर्वोच्च नागरी पुरस्कार दिला. त्यामुळे लोक त्यांना सर विश्वेश्वरय्या म्हणू लागले. भारत सरकारने १९५४ साली 'पद्मश्री', 'पद्मभूषण', 'पद्मविभूषण' आणि 'भारतरत्न' हे नागरी पुरस्कार सुरू केले आणि दुसऱ्याच वर्षी

म

विश्वेश्वरय्यांना 'भारतरत्न' हा सर्वोच्च नागरी पुरस्कार प्रदान केला. लंडनच्या 'इन्स्टिट्यूट ऑफ सिव्हिल इंजिनिअर्स' या संस्थेने त्यांना सन्माननीय सभासदत्व दिले. बंगलोरच्या 'इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स'ने त्यांना फेलोशिप दिली. अलाहाबाद, आंध्र, मुंबई, कलकत्ता, जाधवपूर, मैसूर, पटणा, वाराणसी येथील विद्यापीठांनी डी.एस्सी., एलएल.डी., डि.लिट. इत्यादी डॉक्टरेट्सच्या पदव्यांनी त्यांना सन्मानित केले. १९२३ सालच्या 'इंडियन सायन्स काँग्रेस'चे ते अध्यक्ष होते.

मुद्देनहळ्ळीला नंदी हिलच्या पार्श्वभूमीवर विश्वेश्वरय्यांचे स्मारक आहे. बंगळुरू येथे त्यांच्या स्मरणार्थ 'सर एम. विश्वेश्वरय्या कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग' स्थापन झाले. १९६० साली त्यांच्या हयातीतच नागपूरला त्यांच्या नावाने 'विश्वेश्वरय्या विभागीय अभियांत्रिकी महाविद्यालय' स्थापन झाले. आता त्याचे नामांतर 'विश्वेश्वरय्या राष्ट्रीय तंत्रशास्त्र संस्था' असे झाले आहे. बेळगावला 'विश्वेश्वरय्या तंत्रशास्त्र विद्यापीठ' स्थापन झाले असून कर्नाटकातील सर्व अभियांत्रिकी महाविद्यालये या विद्यापीठाशी संलग्न आहेत. विश्वेश्वरय्यांच्या हयातीत १९६१ साली साजऱ्या झालेल्या त्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त बंगलोरला 'विश्वेश्वरय्या इंडस्ट्रियल अँड टेक्नॉलॉजिकल म्यूझियम' स्थापन झाले. 'भद्रावती आयर्न अँड स्टील वर्क्स' या कंपनीचे नाव बदलून ते आता 'विश्वेश्वरय्या आयर्न अँड स्टील वर्क्स' असे करण्यात आले आहे. विश्वेश्वरय्या ज्या पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयामध्ये शिकले, त्या संस्थेच्या दारात त्यांचा पुतळा उभा केला आहे. विश्वेश्वरय्या हे फार नामवंत अभियंता होते. त्यामुळे 'इन्स्टिट्यूट ऑफ इंजिनिअर्स'ने १५ सप्टेंबर या त्यांच्या जन्मदिनी भारतभर विशेष कार्यक्रम करून 'अभियंता दिन' साजरा करायला सुरुवात केली. कर्नाटक राज्यात तर १५ सप्टेंबरला सार्वजनिक सुट्टी दिली जाते.

विश्वेश्वरय्या यांनी स्वत: सात पुस्तके लिहिली. 'प्लॅन्ड इकॉनॉमी फॉर इंडिया', 'रिकन्स्ट्रक्टिंग इंडिया', 'सेइंग वाइज अँड विटी', 'मेमरीज ऑफ माय वर्किंग लाइफ' वगैरे त्यांची शीर्षके आहेत. ते ज्या-ज्या समित्यांवर होते, त्यांचे बारा वृत्तान्त प्रसिद्ध झालेले आहेत, तर विविध विषयांवर मार्गदर्शन करणारी ३१ पत्रके त्यांनी प्रसिद्ध केली आहेत. विश्वेश्वरय्यांवर इंग्रजीतून १२ आणि कन्नड भाषेतून १५ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत.

अशा या विश्वकर्म्याचा मृत्यू त्यांच्या वयाच्या एकशे एकाव्या वर्षी झाला.

— अ. पां. देशपांडे

**संदर्भ :**

१. *धर्मभास्कर; एप्रिल १९७६.*

## म्हात्रे, गजानन बाबुराव
**वास्तुरचनाकार**
**२९ नोव्हेंबर १९०२ - ४ ऑक्टोबर १९७३**



गजानन बाबुराव म्हणजेच जी.बी. म्हात्रे यांचा जन्म मुंबईतील गावदेवी येथे झाला. त्यांचे वास्तुकलेचे शिक्षण मुंबईच्या सर ज.जी. कला महाविद्यालयामध्ये झाले. त्या वेळी ब्रिटिशांच्या आधिपत्याखालील शैक्षणिक अभ्यासक्रम पाश्चिमात्य पद्धतीवर आधारित असे. जी.बी. यांना गुजरातमधील मुस्लीम वास्तुकलेच्या अभ्यासाची विशेष आवड होती. १९२७ साली पदविका घेतल्यानंतर ते इंग्लंडला पुढील अभ्यासक्रम पूर्ण करण्यासाठी गेले. तेथील शिक्षणाचा त्यांच्यावर बराच प्रभाव पडला. विदेशातील शिक्षणाकरिता त्यांना 'वरळी गोपचार व भोये संस्थान' या पाठारे क्षत्रिय ज्ञाती संस्थेकडून आर्थिक मदत मिळाली. परत आल्यावर त्यांनी त्या कर्जाची व्याजासकट परतफेड केली. संस्थेच्या अहवालात विद्यार्थ्यांनी परतफेड केल्याचे ते एकमेव उदाहरण असल्याचे गौरवपूर्ण नमूद केलेले आहे.

म

इंग्लंडमध्ये शिक्षण घेत असताना, उदरनिर्वाहाकरिता त्यांना इतरही कामे करावी लागली. 'दी रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ ब्रिटिश आर्किटेक्चर'ची उच्च पदवी प्राप्त झाल्यावर ते १९३९ साली मुंबईत परत आले. त्या सुमारास, पुतेगर आणि बिलिमोरिया या पारशी अभियंत्यांचा प्रतिष्ठित व सधन समाजाशी संपर्क असल्याने त्यांना बरीच कामे मिळत. त्यांनी जी.बी.सारख्या तरुण प्रतिभावंताला हेरले. त्या सुमारास मरीन ड्राइव्ह, ओव्हल समोरील रेक्लमेशन, दादर-माटुंगा भागात इंप्रूव्हमेंट ट्रस्ट यांची उभारणी चालू असल्याने, त्या विभागातील अनेक इमारतींच्या संकल्पना जी.बी. यांच्या प्रतिभेतूनच तयार झाल्या होत्या, जरी पुतेगर व बिलिमोरिया या कंपनीच्या नावावर त्यांची नोंद होत असे. सर ज.जी.महाविद्यालयाच्या वास्तुरचना विभागाचे प्राध्यापक क्लॉड बॅटले जी.बीं.चे शिक्षक होते; ते जी.बीं.ना पडद्यामागील सूत्रधार म्हणत.

पुढे त्यांनी स्वत:चा स्वतंत्र व्यवसाय चालू केला व त्यांचे नाव व कौशल्य यांना यथोचित मान प्राप्त झाला. युरोपियन देशांत प्रचलित असलेल्या आर्ट डेको पद्धतीच्या वास्तुकलेचा व फ्रॅन्क लॉइट राइट यांच्या कामाचा त्यांच्यावर बराच प्रभाव पडलेला होता.

१९३०-१९५० या दोन दशकांत बांधकामाला वेगळे स्वरूप व वेग आला. नवीन गृहनिर्माण संकल्पनेत शहराची वाढ व शहराची प्रतिमा यांवर विशेष भर देण्यात आला होता. आता एका प्लॉटवर एक बंगला ही संकल्पना जाऊन, एकापेक्षा जास्त कुटुंबांच्या राहण्याच्या कल्पनेला वेग आला होता. पूर्वीच्या दशकातील इमारतींपेक्षा जी.बी. यांच्या वास्तू डोळ्यांत भरण्याइतक्या वेगळ्या असल्याचे जाणवू लागले. मुंबईतील ओव्हल मैदानासमोरील अपार्टमेन्टमध्ये त्यांनी आर्ट डेको पद्धतीचा वापर फार कौशल्यपूर्ण केलेला आहे. तेथील इमारतींपैकी एक तृतीयांश इमारतींच्या संकल्पना त्यांच्या आहेत. त्यांतील उल्लेखनीय इमारती एम्प्रेस कोर्ट, मूनलाइट, सनलाइट, पामकोर्ट व क्वीन्स कोर्ट आहेत. त्यांची मांडणी, दर्शनी भागांवर केलेली कलाकुसर मुंबईत पहिल्यांदा आढळून आली. त्यांचे वेगळेपण लोकांचे लक्ष वेधू लागले. दर्शनी भागातील बाल्कनी, त्यांचे कठडे, त्यांतील लोखंडाच्या जाळीकामातील विविध प्रकार, खिडक्यांचे आकार, त्याचप्रमाणे संगमरवराचा प्रवेशद्वारात व जिन्यात केलेला कल्पक उपयोग हे सर्व जी.बी. अतिशय लक्षपूर्वक मांडू लागले. या त्यांच्या आर्ट डेको संकल्पनेचा स्वीकार होत राहिला याचे कारण, त्या संस्कृतीचा प्रभाव व ओळख; त्यामुळे त्यांना ते स्वागतार्हच वाटले व त्यांना प्रोत्साहनात्मक प्रतिक्रिया मिळाल्या. त्यांची भूमिका आग्रही नव्हती; पण समकालीन वास्तववादी होती. आजही या इमारती विलोभनीय दिसतात व कालबाह्य वाटत नाहीत.

मुंबईत त्यांच्या इमारती इतरही भागांत प्रामुख्याने नजरेस पडतात. पेडर रोडवरील 'मार्बल आर्च' ही इमारत त्यांच्या कामाचे उत्कृष्ट उदाहरण म्हणता येईल. कारमाइकल रोडवरील नॉरमंडी, शांग्रिला, वॉर्डन रोडवरील कुंकुम, फोर्टमधील पी.एम. रोडवरील जीवनप्रकाश, दादर-माटुंगा भागातील बडोदा हाउस व इतर इमारती, पश्चिम उपनगरात बाबुराव पटेल यांचा गिरनार बंगला, जुहूला डॉ. गज्जर व बी.के. शहांचा बंगला, प्रभादेवीला भोये संस्थेकरिता श्रीदत्त मंदिर, बंगळुरूमधील सिनेमागृहे, त्याचप्रमाणे बिकानेरमध्ये संस्थानिकांचा राजवाडा, अशा अनेक प्रकल्पांच्या संकल्पनेची मोठी यादी व्हावी, असे काम त्यांच्याकडून झाले.

१९५५ साली, 'दी इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ आर्किटेक्ट' या संस्थेच्या अध्यक्षपदाचा बहुमान त्यांना मिळाला. आपल्या कारकिर्दीत त्यांनी शहरातील कामाची वाढ व्हावी याकरिता अनेक उपाययोजना नगरपालिकेला सुचविल्या व विकास या विषयावर सुधारणा करण्यात पुढाकार घेतला. व्यवसायात ते अतिशय व्यग्र असतानासुद्धा ज्ञानदानाचे कार्य ते अनेक वर्षे करत राहिले. हातात ए.डब्ल्यू. फेबरची फोर बी पेन्सिल घेऊन जेव्हा ते विद्यार्थ्यांच्या रेखाटनांवर

सुधारणा सुचवीत, तेव्हा नवीन काही पाहण्यास विद्यार्थी उत्सुक असत.

साहेबासारखी ऐटीत घातलेली हंगेरियन फेल्ट हॅट, विलायती पद्धतीने शिवलेला उत्तम सूट, सहा फुटांपर्यंत पोहोचलेली उंच शरीरयष्टी असे त्यांचे प्रभावित करणारे व्यक्तिमत्त्व होते.

त्यांच्या कामाचा वेग अचंबित करणारा होता. ते रेखाटन फलकावर काम करू लागले की त्यांचे रेखाटन अगदी पाहण्यासारखे, सुलभ व नावीन्यपूर्ण असे. मुंबई शहरातील होत असलेल्या विकासाने त्यांना वेधून टाकले होते. पूर्वीच्या दशकातील इमारतींपेक्षा त्यांच्या वास्तू डोळ्यांत भरण्याइतक्या वेगळ्या असल्याचे जाणवू लागले. जाणकार त्याची दखलही घेऊ लागले. पारंपरिकतेच्या आधारावर आधुनिकतेची वाटचाल करीत त्यांनी आपली स्वत:ची शैलीच निर्माण केली.

त्यांनी मुंबई शहरातील वास्तुशिल्पकलेच्या क्षेत्रात लक्षणीय कामगिरी केलेली आहे; पण त्याची फार अशी दखल घेण्यात आली नाही. या अपरिचित राहिलेल्या प्रतिभावंत वास्तुविशारदाविषयी समाजाला माहिती व्हावी व त्यांच्या कामाचे मूल्यमापन करणारे, शहराच्या वास्तुकलेवर त्यांचा प्रभाव नमूद करणारे असे एकमेव पुस्तक प्रकाशित झालेले आहे. मुंबईचा आसमंत आधुनिक वास्तुरेषांनी प्रभावित करणारा हा वास्तुशिल्पी होता.

– चिंतामण गोखले

✻ ✻ ✻

म




## रणदिवे, कमल जयसिंग

**कर्करोगशास्त्रज्ञ**

**८ नोव्हेंबर १९१७ - ११ एप्रिल २००१**



कर्करोगावर संशोधन करणाऱ्या संशोधकांच्या पिढीतील अग्रणी डॉ. कमल रणदिवे यांचा जन्म पुणे येथील प्रगतिशील समर्थ कुटुंबात झाला. त्यांचे वडील फर्गसन महाविद्यालयामध्ये प्राध्यापक होते. त्यांनी त्यांच्या मुलांप्रमाणे सर्व मुलींनाही उच्चशिक्षणाची संधी दिली. कमल समर्थ वनस्पतिशास्त्र या विषयात १९३८ साली बी.एस्सी. (ऑनर्स) झाल्या. त्यानंतर त्यांनी पुण्यातील कृषी महाविद्यालयामध्ये 'ॲनोनेसिए' फॅमिलीतील वनस्पतीवर संशोधन करून १९४१ साली मुंबई विद्यापीठाची मास्टर ऑफ सायन्स (एम.एस्सी.) ही पदवी मिळवली. या सुमारास त्यांचा विवाह जयसिंग रणदिवे या कुशाग्र बुद्धिमत्तेच्या उदारमतवादी तरुणाशी झाला व त्या मुंबईत स्थायिक झाल्या.

त्यांचे वास्तव्य कर्करोग्यांसाठी नव्यानेच सुरू झालेल्या टाटा स्मारक रुग्णालयाच्या जवळ होते. साहजिकच, त्यांनी कर्करोग संशोधनात पुढील अभ्यास करण्याचे ठरविले. त्यांचा संपर्क द्रष्टे संशोधक व विकृतिशास्त्रज्ञ (पॅथॉलॉजिस्ट) डॉ. वसंत रामजी खानोलकर यांच्याशी आला. डॉ. खानोलकरांच्या मार्गदर्शनाखाली १९५० साली उंदरांमधील स्तनांच्या कर्करोगावर केलेल्या संशोधनासाठी रणदिवेंना मुंबई विद्यापीठाने पीएच.डी. ही पदवी दिली. पुढील वर्षी त्यांना रॉकफेलर फाउण्डेशनची प्रतिष्ठेची शिष्यवृत्ती मिळाली. त्या काळी ऊती संवर्धन (टिश्यू कल्चर) हे तंत्रज्ञान नव्यानेच विकसित केले जात होते. या तंत्रज्ञानाच्या कर्करोग संशोधनात होणाऱ्या भविष्यातील उपयोगाची खात्री पटल्यामुळे रणदिवे यांनी, अमेरिकेतील जॉन्स हॉपकिन्स विद्यापीठाच्या जगप्रसिद्ध प्रयोगशाळेत काम करण्याची संधी मिळवली. भारतात परतल्यावर रणदिवेंनी स्वत:ला ऊती संवर्धन प्रयोगशाळा बांधणीच्या कामाला वाहून घेतले. लवकरच भारतीय कर्करोग संस्थेत स्थापन केलेल्या प्रयोगशाळेची ख्याती देशभर पसरली व अनेक हुशार विद्यार्थी स्नातकोत्तर पदवी मिळवण्यासाठी या प्रयोगशाळेत दाखल झाले. रणदिवेंनी त्यांच्याबरोबर काम करणारे शास्त्रज्ञ व विद्यार्थी यांच्या मदतीने निरनिराळ्या पेशींच्या स्वतंत्र वाढणाऱ्या मालिका प्रस्थापित केल्या. त्यांच्या गुणसूत्रांचा अभ्यास करून या तंत्रज्ञानाचा उपयोग कर्करोग संशोधनासाठी भारतात सर्वप्रथम केला.

रणदिवेंची चौकस दृष्टी चौफेर फिरत असे. त्यामुळे त्यांनी मुखाचा कर्करोग, स्तनाचा व रक्ताचा कर्करोग व या रोगाशी असणारा विषाणू, तंबाखू-सुपारीचे व्यसन यांचा संभाव्य संबंध या विषयांवरील मूलभूत संशोधनाची मुहूर्तमेढ रोवली. डॉ. खानोलकरांच्या प्रेरणेने त्यांनी कुष्ठरोगावरदेखील काम केले. ऊती संवर्धन तंत्र वापरून त्यांनी मज्जापेशींकडे कुष्ठरोगाचे जंतू आकर्षित होतात व तिथे त्यांची वाढ होते, हे सर्वप्रथम दाखवले. या जंतूचे प्रमाण अधिक संशोधनाद्वारे सिद्ध झाले. हे जंतू मायक्रोबॅक्टिरियम लेप्रे, आय.सी.आर.सी., (त्या वेळची कर्करोग संस्था) या नावाने जगभर मान्यता पावले. रणदिवेंना त्यांचे सहकारी,

र

तसेच विद्यार्थीवर्गाची विज्ञानातील आवड हेरण्याची विलक्षण जाण होती. त्यानुसार त्या प्रत्येकास विषय निवडून देत व मार्गदर्शन करीत असत. त्यांच्या स्वभावाचा आणखी एक विशेष पैलू होता. त्यांच्या सर्व सहकारी संशोधकांनी नवी दिशा आखून स्वत:च्या आवडीनुसार स्वतंत्रपणे काम करावे असे त्यांना वाटे व त्यानुसार त्यांचे प्रयत्न असत. या सर्वव्यापी व दूरदर्शी विचारांमुळे पेशी, जीवशास्त्र कारसिनोजिनेसिस ट्यूमर इम्युनोलॉजी या स्वतंत्र शाखा कर्करोग संशोधन केंद्रात निर्माण झाल्या. तसेच, त्यांच्या सेवानिवृत्तीनंतर बऱ्याच वर्षांनी प्रस्थापित झालेल्या विषाणूशास्त्र (व्हायरोलॉजी), रेण्वीय जनुकशास्त्र (मॉलेक्युलर जेनेटिक्स) या शाखांचे बीजही त्यांनीच केलेल्या स्तनांच्या कर्करोगावरील संशोधनात आढळते.

रणदिवेंना वासंती देवी अमीरचंद पुरस्कार, वाटुमल फाउण्डेशनचा पुरस्कार, सॅडो अवॉर्ड, टाटा मेमोरियल सेंटरचे सुवर्णमहोत्सवी मानचिन्ह व बनारस हिंदू विद्यापीठाचा पुरस्कार असे अनेक मानसन्मान मिळाले. त्यांची इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमी व महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्स या संस्थेत 'फेलो' म्हणून निवड झाली. महाराष्ट्र राज्याच्या विज्ञान व तंत्रज्ञान समितीच्या सदस्या असताना त्यांनी मोलाची कामगिरी बजावली. भारत सरकारने 'पद्मभूषण' ही पदवी बहाल करून राष्ट्रपातळीवर त्यांच्या कार्याचा गौरव केला. विद्यार्थीदशेपासूनच्या वाटचालीत त्यांनी कर्करोग संशोधन केंद्रात ऊती संवर्धन विभागाचे प्रमुखपद, तसेच कर्करोग केंद्राचे हंगामी संचालकपद सांभाळले. १९९१ साली कोल्हापूर जिल्ह्यातील गडहिंग्लज येथे भरलेल्या मराठी विज्ञान संमेलनाच्या त्या अध्यक्षा होत्या.

सेवानिवृत्तीनंतर त्यांनी महाराष्ट्रातील वनवासी भागांत ग्रामीण आरोग्य प्रकल्प अहमदनगर जिल्ह्यात सुरू केला. या कार्यात त्यांनी स्त्रिया व मुले यांचे आरोग्य, समतोल आहार व स्वच्छता या बाबींचे जागृतीकरण यासाठी अथक परिश्रम केले. महत्त्वाची गोष्ट म्हणजे, काही स्त्रियांचे नेतृत्वगुण ओळखून त्यांना या जाणिवांचा प्रसार करण्याकरिता तयार केले. त्यांच्या सामाजिक जाणिवेची दुसरी बाजू म्हणजे १९७७ साली त्यांनी सुरू केलेली 'इंडियन विमेन सायंटिस्ट असोसिएशन' ही संस्था. या संस्थेचे उद्दिष्ट सर्व प्रवाहांतील स्त्री-शास्त्रज्ञांना एकत्र आणून समाजात विज्ञानाचा प्रसार व जागरूकता निर्माण करणे हे होते. या संस्थेची वैज्ञानिक बैठक व सामाजिक दुवा बळकट करण्याकरिता त्यांनी प्रा. भा.मा. उदगावकर, डॉ. एकनाथ चिटणीस, प्रा. यशपाल, डॉ.मंजू शर्मा या धुरीणांचे मार्गदर्शन घेतले. ही संस्था आज त्यांची कार्यपूर्ती जोमाने करीत आहे. डॉ. कमल रणदिवे आयुष्याच्या अखेरपर्यंत कार्यरत होत्या.

– डॉ. रजनी भिसे

**संदर्भ :**

१. *देशपांडे, डॉ. अ. पां., संपादक; 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन; २००५*

## रत्नासामी, पॉल

**रसायनशास्त्रज्ञ**

**११ जून १९४२**



डॉ. पॉल रत्नासामी यांचा जन्म मद्रास येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण सेंट जोसेफ विद्यालय, त्रिची येथे झाले (१९५३-१९५७). १९६२ साली त्यांनी मद्रास येथील लॉयला महाविद्यालयामधून बी.एस्सी. पदवी संपादन केली व तेथूनच १९६४ साली ते एम.एस्सी. झाले. प्रा. येडनमल्ली यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी मद्रास विद्यापीठातून १९६७ साली पीएच.डी. पदवी संपादन केली. त्यानंतर ते न्यूयॉर्क येथील क्लार्कसन तंत्रशास्त्र महाविद्यालयात दोन वर्षे संशोधनाकरिता राहिले. त्यानंतर ते बेल्जियम येथील लिव्हान विद्यापीठात प्रोफेसर फ्रिप्लाट यांच्याबरोबर संशोधन करत होते. त्यांच्या संशोधनाचा (१९६९-१९७२) विषय उत्प्रेरक

र

(कॅटॅलिस्ट) होता. त्यानंतर त्यांनी १९७२ ते १९७९ या काळात शास्त्रज्ञ म्हणून डेहराडून येथील 'इन्स्टिट्यूट ऑफ पेट्रोलियम' या संशोधन संस्थेमध्ये कार्य सुरू केले. पेट्रोलियम शुद्ध करणाऱ्या प्रक्रियेत वापरल्या जाणाऱ्या उत्प्रेरकावर संशोधन करून त्यांनी त्या प्रक्रिया सुलभ व सुरक्षित करून आपली कर्तबगारी सिद्ध केली. मध्यंतरी एका वर्षाकरता सीनियर हमबोल्ट फेलो ही मानाची शिष्यवृत्ती मिळवून ते जर्मनीमध्ये म्युनिच विद्यापीठात प्रो.कनोझिगर यांच्याबरोबर संशोधनकार्यात व्यग्र होते.

त्यानंतर ते पुणे येथील नॅशनल केमिकल लॅबोरेटरी (एन.सी.एल.) येथे नोकरीस आले, त्यांनी या प्रयोगशाळेत उत्प्रेरकावर संशोधन करण्यास प्रारंभ केला. आज या प्रयोगशाळेतील उत्प्रेरक या विषयातील संशोधनकार्यास सर्व जगात मान्यता मिळाली आहे. त्याचे श्रेय मोठ्या प्रमाणात डॉ. पॉल रत्नासामी यांचेच.

झिओलाइट हे निसर्गात सापडणारे खनिज आहे. त्यामध्ये ॲल्युमिनिअम सिलिकेटबरोबर इतर अल्कली मूल्ये असतात व त्यामुळेच त्याच्यामध्ये इतर मूल्ये शोषून घेण्याची क्षमता असते. अशा प्रकारच्या संयुगाचा उपयोग त्याच्या विशिष्ट रासायनिक गुणधर्मामुळे उत्प्रेरक म्हणून होतो.

डॉ. पॉल रत्नासामी यांनी प्रयोगशाळेत अशा प्रकारचे झिओलाइट बनविण्यास प्रारंभ केला. या झिओलाइटमध्ये 'एमजी' अथवा 'सीए'सारखी इतर मूल्ये घालून त्यांच्या रासायनिक गुणधर्मामध्ये बदल घडवून त्यांच्या उपयोगात विविधता आणली. त्यांच्या या संशोधनाचा विस्तार खूप मोठा होता. त्यांनी आंतरराष्ट्रीय मासिकांमध्ये १६० शोधनिबंध प्रकाशित केले आहेत. त्यांनी एकंदर १२५ एकस्वे दाखल केली असून त्यांतील ३५ एकस्वांना (पेटंट) आंतरराष्ट्रीय मान्यता मिळाली आहे. त्यामुळे पेट्रोरसायन उद्योगात आघाडीवर असलेल्या अनेक परराष्ट्रीय कंपन्यांचे त्याकडे लक्ष जाऊन त्यांनी हे तंत्रज्ञान वापरण्यासाठी विकत घेतले आहे. त्यापोटी प्रयोगशाळेच्या गंगाजळीत परकीय चलनाच्या रूपात लक्षणीय भर पडली आहे. त्यांनी हे संशोधन करीत असताना वीस विद्यार्थ्यांना पीएच.डी. करिता मार्गदर्शन केले. डॉ. पॉल रत्नासामी यांना बरेच पुरस्कार मिळालेले आहेत. त्यांमधील प्रमुख असे : १९८२ साली 'वास्विक पुरस्कार', १९८४ साली 'शांतिस्वरूप भटनागर पुरस्कार', १९८९ साली 'के.जी. नाईक सुवर्णपदक', १९८९ साली 'बंगर गौरव पुरस्कार', १९९२ साली 'ओमप्रकाश भसीन पुरस्कार', १९९४ साली इंडियन नॅशनल अकॅडमीचे 'विश्वकर्मा पदक', २००१ साली 'पद्मश्री' इत्यादी. डॉ. माशेलकरांनंतर १९९५ ते २००२ सालापर्यंत ते राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेचे (एन.सी.एल.) संचालक होते. २००२ साली या संस्थेच्या संचालक पदावरून ते निवृत्त झाले तरी आजतागायत ते संशोधनकार्यात मग्न असून सध्या ते 'श्रीनिवास रामानुजन संशोधन प्राध्यापक' या पदावर काम करीत आहेत (२००४ ते २००९). थर्ड वर्ल्ड अकॅडमी ऑफ सायन्स, यासह अनेक मान्यवर संस्थांचे ते सभासद आहेत.

— डॉ. श्रीराम मनोहर

**संदर्भ :**

१. *भटनागर लॉरेट्स् १९५८–१९९१, इंडियन नॅशनल सायन्स ॲकॅडमी*

## राऊत, सखाराम अर्जुन
**वनस्पतिशास्त्रज्ञ, शल्यक्रियातज्ज्ञ व समाजसुधारक**

**१८ मार्च १८३९ - १६ एप्रिल १८८५)**

डॉ. सखाराम अर्जुन राऊत यांचा जन्म मुंबईतील गिरगावात एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. वयाच्या अकराव्या वर्षी ते अनाथ झाले. परंतु चिकाटी व दीर्घ परिश्रम यांच्या बळावर त्यांनी एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये (सांप्रतचे एल्फिन्स्टन महाविद्यालय) प्रवेश मिळविला. तेथेही बक्षिसे व शिष्यवृत्त्या मिळवून त्यांनी वयाच्या अवघ्या एकोणिसाव्या वर्षी ग्रँट वैद्यकीय महाविद्यालयामध्ये प्रवेश मिळवून उच्च शिक्षण घेतले. १८६४ साली वैद्यकीय शिक्षण पूर्ण झाल्यावर शिक्षण

र



मंडळाने त्यांची नियुक्ती ग्रँट वैद्यकीय महाविद्यालयात वैद्यक व प्रसूतिशास्त्र हे विषय मराठी माध्यमातून शिकविण्यासाठी केली. विद्यार्थ्यांना शिकविण्याचे माध्यम मातृभाषा असले पाहिजे, अशी त्यांची विचारधारा होती. त्यासाठी त्यांनी विद्यार्थ्यांच्या सोयीसाठी मराठीतून पाठ्यपुस्तके लिहिली.

शल्यक्रियातज्ज्ञ असूनही त्यांना वनस्पतिशास्त्राचीही तितकीच आवड होती. त्या काळात वनस्पतिशास्त्र हा एक विषय वैद्यकीय महाविद्यालयामध्ये शिकविला जात असे. त्यामुळे डब्ल्यू. ग्रे या वनस्पतिशास्त्राच्या प्राध्यापकाने राजीनामा दिल्यानंतर त्या जागेकरिता त्यांची निवड झाली. पुढे काही काळ अध्यापन केल्यानंतर त्यांची ज.जी. रुग्णालयामध्ये डॉ. हेन्री ग्रे या युरोपियन शस्त्रक्रियातज्ज्ञाचे साहाय्यक म्हणून नेमणूक झाली. हा मान मिळविणारे ते पहिले भारतीय डॉक्टर होत. यानंतर त्यांनी काही काळ अपमृत्यू निर्णेत्याचे (कॉरोनर) शस्त्रक्रियातज्ज्ञ म्हणूनही काम केले. तसेच अनंत चंद्रोबा यांच्याबरोबर व्हाइसरॉयचे साहाय्यक शस्त्रक्रियातज्ज्ञ हा बहुमानही त्यांना मिळाला होता. पुढे अनंत चंद्रोबांच्या निधनानंतर तत्कालीन मुंबई इलाख्यात त्यांची लसटोचणी विभागाच्या अधीक्षकपदी नियुक्ती झाली.

त्यांच्या वनस्पतिशास्त्रातील नैपुण्याची ओळख त्यांच्या शास्त्रीय व्याख्यानातून, प्रात्यक्षिकांतून व स्वतंत्र संशोधनातून दिसून येत असे. या वनस्पतिशास्त्राच्या आवडीतून त्यांनी औषधी वनस्पतींचा आयुर्वेद व ॲलोपॅथी यांतील आंतरसंबंधीचा तौलनिक अभ्यास केला. या अभ्यासातून त्यांनी आयुर्वेदीय औषधांच्या वापरास उत्तेजन मिळावे यासाठी एक ग्रंथही लिहिला. मुंबईच्या बाजारात उपलब्ध असणाऱ्या देशी औषधांची सूची म्हणून हा ग्रंथ उपयोगी पडावा, हा त्यामागील उद्देश होता. याखेरीज त्यांनी 'विवाह विज्ञान' (१८७७), 'बॉम्बे



बॉम्बे नॅचरल हिस्ट्री सोसायटी

ड्रग' (१८७९), व 'देवीच्या रोगाचे स्वरूप आणि त्याच्या शमनाचे व प्रतिबंधाचे उपाय' हे ग्रंथ लिहिले.

मुंबईचे तत्कालीन गव्हर्नर सर जेम्स फर्गसन यांना त्यांच्या कार्याची चांगली जाण होती. यामुळे त्यांनी संशोधन करून निर्माण केलेल्या 'डॉसिना फर्गसोनी' या वनस्पतीचे संकरित रोपटे गव्हर्नरना सादर केले. तसेच, 'ड्रॅगन ट्री' या नवीन जातीच्या वनस्पतीच्या शोधाचेही जनकत्व त्यांच्याकडे जाते. अखेरच्या काळात ते 'बॉम्बे फ्लोरा' या ग्रंथाच्या सुधारित आवृत्तीच्या प्रयत्नात होते. बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटीचे ते एक संस्थापक होते.

समाजसुधारणा क्षेत्रातही ते प्रागतिक विचाराचे मानले जात. १८७० साली आधीचे अपत्य असलेल्या एका विधवेशी त्यांनी विवाह केला. ही त्या काळातील एक क्रांतिकारक घटना होती. वयाच्या अवघ्या सेहेचाळिसाव्या वर्षी त्यांचे आकस्मिक निधन झाले.

– ज.बा. कुलकर्णी

**संदर्भ :**

१. *इंडियन जर्नल ऑफ हिस्टरी ऑफ सायन्स, ३९.३ (२००४).*

## राजगुरू, शरद नरहर

**पुरातत्त्वशास्त्रज्ञ**

**२६ नोव्हेंबर १९३३**

पुरापर्यावरणातील योगदानाबद्दल खेतान स्मृती सुवर्णपदक देऊन गौरविलेले डॉ. शरद नरहर राजगुरू यांचा जन्म पुणे येथे झाला. शालेय शिक्षण न्यू इंग्लिश

र



स्कूल, रमणबाग, पुणे येथे झाले. भूशास्त्र या विषयात पुणे विद्यापीठाची पदव्युत्तर पदवी घेतल्यानंतर जमशेदपूर येथील राष्ट्रीय धातू संशोधन प्रयोगशाळेत तांत्रिक साहाय्यक म्हणून त्यांनी नोकरी पत्करली. परंतु लवकरच पुण्यातील उच्च क्षमता स्फोटक कारखाना काही काळ व नंतर नागपूर येथील खंडेलवाल फेरो ॲलॉइज येथे काही वर्षे त्यांनी काम केले.

मात्र पुढे राजगुरू यांनी सरकारी नोकरशाही संघटनांच्या कार्यपद्धतीमुळे हताश होऊन नोकरी न करण्याचा निर्णय घेतला व विनोबा भाव्यांप्रमाणे देशसेवा करावी या विचाराने प्रेरित होऊन कोणालाही न सांगता, नागपूरचा निरोप घेऊन, त्यांनी विनोबा भावे यांचा वर्ध्याचा आश्रम गाठला. विनोबा भावे यांच्या निकटच्या सहकाऱ्यांनी त्यांची समजूत काढली. तीन दिवस विनोबा भाव्यांचा सहवास त्यांच्या जीवनाला कलाटणी देऊन गेला.

त्यानंतर १९६० साली पुण्यातील डेक्कन महाविद्यालय पदव्युत्तर व संशोधन संस्थेतील पुरातत्त्व विभागात पर्यावरणीय पुरातत्त्वाचे व्याख्याता म्हणून त्यांनी नोकरीला सुरुवात केली. त्यापूर्वी पुरातत्त्व विभागाचे त्या वेळचे प्रमुख व नंतर ज्यांनी पुरातत्त्व विभागाला जागतिक मान्यता मिळवून दिली, त्या प्रा. हंसमुख सांकलिया यांच्याकडे १९५८ साली त्यांनी पीएच.डी.च्या कामाला सुरुवात केली. भीमा खोऱ्यातील मुळा-मुठा नदी प्रणालीच्या उत्तर चतुर्थक कालखंडातील भूपुरातत्त्वीय इतिहासावर त्यांनी संशोधन करून आपला प्रबंध सादर केला.

खडक आणि मातीच्या अभ्यासावरून त्यांनी पुरापर्यावरणीय अनुमान काढले. भारतातील जवळजवळ सर्व प्रांतांमध्ये त्यांनी चतुर्थक कालखंडातील भूपुरातत्त्वीय घडामोडी व पर्यावरणीय पुरातत्त्वावर क्षेत्रीय संशोधन आणि समन्वेषण केले. याशिवाय महाराष्ट्रातील नेवासा, इनामगाव, नायकुंड, वाळकी; राजस्थानातील डिडवाना, बालाथल; सौराष्ट्रातील कुंतासी, पाद्री; मध्यप्रदेशातील समनापूर, कर्नाटकातील हुंसगी येथील उत्खननात त्यांनी भूपुरातत्त्वज्ञ म्हणून भूमिका निभावली. याव्यतिरिक्त, पुरातत्त्व सर्वेक्षण विभाग व एम.एस. विद्यापीठ, वडोदरा यांच्यातर्फे होणाऱ्या उत्खननातही त्यांनी सल्लागार म्हणून काम केले.

१९७३-७४ साली कॅनबरा येथील ऑस्ट्रेलियन नॅशनल विद्यापीठातील जैविक भूगोल आणि भू-आकृती विज्ञान विभागात व्हिजिटिंग फेलो म्हणून काम करीत असताना, मध्य ऑस्ट्रेलियन वाळवंटात ऑस्ट्रेलियातील त्या वेळचा सर्वात जुना मानव ‘मंगोमॅन’चा शोध लावणाऱ्या पथकात ते होते. युरोप, मध्यपूर्वेकडील देश, दक्षिण आशियातील देश, चीन, जपान, कॅनडा, बांगलादेश इत्यादी देशांना भेट देणारे भारतातील ते एकमेव भूपुरातत्त्वज्ञ आहेत. चीनला ते संयुक्त राष्ट्र पर्यावरणीय प्रकल्पांतर्गत फेलो म्हणून गेले होते.

१९९३ साली ते पुण्यातील सर्वात जुनी शैक्षणिक संस्था, डेक्कन महाविद्यालय पदव्युत्तर संशोधन संस्थेचे सहसंचालक म्हणून निवृत्त झाले. त्यांनी हिरोशिमा विद्यापीठाबरोबरचा, प्रवरा नदीचे पुरापर्यावरण आणि ताम्रपाषाण संस्कृती यांविषयीचा प्रकल्प निवृत्तीनंतरही पूर्ण केला. पुण्यातील प्रागैतिहासाचा मागोवा घेणे व उघड होणाऱ्या पुराव्यांचे जतन व्हावे यांसाठी निवृत्तीनंतरही ते कार्यरत आहेत.

राष्ट्रीय विज्ञान अकादमी, अलाहाबाद, भारतीय विज्ञान अकादमी, दिल्ली व विज्ञान अकादमी, बंगलोरचे ते फेलो आहेत. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय शोधपत्रिकांमध्ये त्यांचे सुमारे ४०० शोधनिबंध प्रसिद्ध झाले असून डिडवाना - राजस्थान येथील संशोधन व कुप्पगल - बेल्लारी येथील संशोधनावर त्यांची पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत.

– डॉ. सविता घाटे

र

## राजे, अनंत दामोदर

**वास्तुरचनाकार**

**१७ सप्टेंबर १९२९ - २७ जून २००९**



अनंत दामोदर राजे यांचा जन्म अनंत चतुर्दशीला मुंबईच्या खार उपनगरात झाला. सधन मंडळींचे टुमदार बंगले व वृक्षवल्लींनी डवरलेल्या खारमध्ये त्यांचे बालपण गेले. राजे यांना कलेचे बाळकडू घरातच मिळालेले असावे. एकोणीसशे पन्नासच्या दशकात ते सर ज.जी. महाविद्यालयमध्ये वास्तुरचनाशास्त्राचे विद्यार्थी होते.

त्यांच्या वर्गात दहा-बारा विद्यार्थ्यांचा एक हुशार म्हणून ओळखला जाणारा गट होता. ते सर्वजण वास्तुकलेच्या संकल्पनेचे विविध आविष्कार रेखाटण्यात तरबेज मानले जात. ते धडाडीचे व थोडे आगाऊ असल्याचे म्हटले जाई. यांतील बहुतांश मुंबईत प्रस्थापित झाले व व्यवसायात नावारूपाला आले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तरुणांत प्रगतिशील शिक्षण व विचार म्हणजे पाश्चिमात्य देश अशी विचारधारा होती. विद्यापीठातील प्राध्यापक जरी गोरे (इंग्लिश) राहिले नसले, तरी बहुतांश पाश्चिमात्य-शिक्षित होते. लंडनमधील दी रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ ब्रिटिश आर्किटेक्चरचा बराच दबदबा होता. त्यामुळे येथील शिक्षण पूर्ण होताच विद्यार्थी पाश्चिमात्य देशात जात. अनंत राजे यांनी तोच मार्ग स्वीकारला.

अमेरिकेतील नावाजलेले तत्त्वज्ञ स्थपती लुई कान्ह यांच्या संपर्कात ते १९६४ साली आले. त्यांच्याबरोबर फिलाडेल्फियात त्यांना चार वर्षे काम करण्याची संधी मिळाली. या काळात वास्तुसंकल्पना याबाबत झालेल्या वैचारिक चर्चा व अनुभवांतून त्यांना नवीन दिशा सापडल्या. त्यांच्या विचारसरणीत आमूलाग्र बदल झाला. राजे म्हणत, ''लुई कान्ह यांच्या व्यक्तिमत्त्वाचे दोन भाग होते, एक होता तत्त्वज्ञाचा व दुसरा स्थपतीचा. त्यांच्यातील विभाजनाची रेषा धूसर होती. पण दोन्ही भूमिका एकमेकांस पूरक होत्या.'' अहमदाबादमधील आय.आय.एम.विषयी विचार करताना येथील हवामान, संस्कृती यांच्या सखोल अभ्यासातून, येथील मातीच्या विटांपासून एक अप्रतिम वास्तू निर्माण करण्याचे स्वप्न त्यांनी पाहिले. ते आज सौंदर्यस्थळ होऊन बसले आहे. या सर्व विचारमंथनात राजे यांना सहभागी होऊन कार्यरत होण्याची संधी मिळाली. त्यांची बुद्धिमत्ता व आकलनशक्ती ओळखून लुई कान्ह यांनी आय.आय.एम. प्रकल्पावर त्यांची नियुक्ती केली.

लुई कान्ह यांचे १९७४ साली आकस्मिक निधन झाले. आय.आय.एम.चे काम पूर्ण व्हायचे होते. त्याची जबाबदारी साहजिकच राजे यांच्यावर पडली. त्यानंतर त्यांना कॅम्पसमधील व्यवस्थापन विकास केंद्र, प्रेक्षागार, संगणक केंद्र वगैरे वास्तूंच्या संकल्पनेत समरसतेचा संवेदनशील मुद्दा हाताळावा लागला. त्याचप्रमाणे अनुकरणाचे दडपणही अस्वस्थ करणारे असेच होते. ही आव्हाने त्यांनी समर्थपणे पेलली.

वास्तुविशारदांची कामे लोकशाहीस पूरक व सार्वजनिक उपयुक्ततेसाठी असावीत. दोशी, कोरिया, लॉरी बेकर, कानविंदे यांच्यासारख्या श्रेष्ठ वास्तुविशारदांच्या प्रकल्पांतून याची प्रचिती येते. राजेही याच विचारप्रणालीतले होते. त्यांची सर्व प्रमुख कामे शैक्षणिक किंवा संख्यात्मक कार्यालये होत. राजे मनस्वी, मितभाषी विचारवंत होते. त्यांचा पारंपरिक शैलीचा अभ्यास सखोल होता. साध्या राहणीवर त्यांचा भर होता. आपल्या कामात ते मग्न असल्याचे नेहमीच आढळून येई. प्रकल्पाचे रेखाटन व बांधकामाच्या विविध पैलूंवर त्यांचे विचारपूर्वक परिशीलन चाले. आपले कलाकौशल्य पणास लावून प्रत्येक वास्तू कशी परिपूर्ण होईल, याचा त्यांना ध्यास लागलेला असे. त्यामुळे त्यांच्या प्रत्येक प्रकल्पावर त्यांची स्वत:ची अशी छाप दिसून येते.

'सेप्ट' या वास्तुकलेच्या शिक्षणाकरिता नावारूपाला आलेल्या संस्थेशी त्यांचा सुरुवातीपासून संबंध होता.

र

तेथे तीस वर्षे ते विद्यादानात रमून गेले. पुढे १९८२ ते १९८६ या काळात ते संस्थेचे संचालक झाले. विद्यार्थ्यांत ते एक शिस्तप्रिय व प्रतिभासंपन्न अध्यापक म्हणून ओळखले जात. 'सेप्ट'मध्ये त्यांचा दरारा होता व सद्भावनाही होती.

महाराष्ट्राबाहेर व देशात नावलौकिकास आलेल्या व्यक्तींच्या यादीत, मूळचे मुंबईतील, पण अहमदाबादमध्ये व्यवसायानिमित्त स्थायिक झालेले वास्तुविशारद अनंत राजे यांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल.

– चिंतामण गोखले

## रानडे, विवेक विनायक

**रसायनशास्त्रज्ञ**

**१५ ऑक्टोबर १९६३**



डॉ. विवेक विनायक रानडे यांनी मुंबईच्या इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजी (आय.सी.टी.) या संस्थेतून रसायन अभियांत्रिकीची पदवी संपादन केली आणि तेथूनच पुढे मुंबई विद्यापीठाची रसायन अभियांत्रिकीमधील पीएच.डी. संपादन केली. नंतर ते दीड वर्षे झूरीकच्या स्विस फेडरल टेक्निकल इन्स्टिट्यूटमध्ये रिसर्च असोसिएट म्हणून कार्यरत होते. तिथे डॉ. रानडे यांनी टर्ब्यूलंट रिॲक्टिव्ह मिक्सिंग म्हणजेच रासायनिक द्रवपदार्थांचे घुसळणे चालू असताना त्यांच्यात प्रक्रियात्मक काय बदल होतात, यावर काम केले. पुण्याच्या राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेचे त्या वेळचे संचालक डॉ. रघुनाथ माशेलकर यांच्या सल्ल्यानुसार रानडे १९९० साली राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळेत रुजू झाले. १९९३ साली नेदरलँडच्या डेल्फ तंत्रशास्त्र विद्यापीठात त्यांनी वायू-द्रव संयत्राच्या (गॅस लिक्विड रिॲक्टर) संगणक प्रारूपावर संशोधन केले. त्याच विषयावरील पुढील संशोधन म्हणून १९९७-९८ साली नेदरलँडच्या ट्वेंटे तंत्रशास्त्र विद्यापीठात अभ्यागत संशोधक म्हणून त्यांनी वायू-द्रव संयत्राच्या गतिविज्ञानावर काम केले. आपल्या या संशोधनाचा देशाला फायदा करून देण्यासाठी त्यांनी २००३ साली आय.सी.टी.मध्येच प्राध्यापक म्हणून काम करावयास सुरुवात केली.

संशोधन, नवनवीन प्रयोग, नवीन प्रारूपे तयार करून डॉ. रानडे, त्यांचे सहकारी आणि विद्यार्थी विविध प्रकारच्या रासायनिक संयत्रांवर काम करीत आहेत. रासायनिक संयत्रामध्ये अनेक रासायनिक प्रक्रिया होतात. या रासायनिक संयत्राची कार्यक्षमता आणि उत्पादकता उच्च राखण्यासाठी कोणकोणत्या गोष्टी विचारात घ्याव्या लागतील, यावर त्यांनी संशोधन केले. त्यानुसार या संयत्रामध्ये रासायनिक प्रक्रियांसाठी लागणारा कच्चा माल आणि ऊर्जा योग्य त्या वेळी आणि योग्य त्या प्रमाणात असणे आणि रासायनिक द्रवपदार्थांचा प्रवाह नियंत्रणात ठेवणे, या गोष्टी साध्य केल्यास उत्पादकता आणि कार्यक्षमता उच्च प्रतीची असते, हे त्यांनी शोधले. तसेच त्यांचे गणन करून गणिती प्रारूपे तयार केली.

डॉ. रानडे यांच्या या संशोधनाचा फायदा देश-परदेशांतील अनेक नावाजलेल्या संस्थांनी करून घेतला व आपली उत्पादनक्षमता वाढविली. त्यामध्ये इंडियन ऑइल कॉर्पोरेशन, रिलायन्स इंडस्ट्रीज, इंजिनिअर्स इंडिया लि., हर्डेलिया केमिकल्स लि., भन्साळी पॉलिमर, आर्क्टिक इंडिया, फ्लिटगार्ड फिल्टर्स, टाटा स्टील या देशी, तर ड्यू. पाँ - अमेरिका, इन्व्हिस्टा - अमेरिका, एन.आर.सी. - कॅनडा, टी.ओ.सी.सी. - थायलंड इत्यादी परदेशी कंपन्यांचा समावेश आहे.

डॉ. रानडे यांच्या या कामाची दखल घेऊन त्यांना अनेक फेलोशिप, पुरस्कार प्राप्त झाले आहेत. जसे केमटेक, इंडियन नॅशनल अकॅडमी ऑफ इंजिनिअर्स, हर्डेलिया, ए.व्हि.आर.ए. युवा शास्त्रज्ञ, आय.एन.ई. युवा शास्त्रज्ञ, शांतिस्वरूप भटनागर असे पुरस्कार, तर स्वर्णजयंती फेलोशिप, महाराष्ट्र विज्ञान अकादमीची फेलोशिप, यांचा समावेश आहे. त्यांचे आंतरराष्ट्रीय

र

स्तरावर ६० शोधनिबंध प्रसिद्ध झाले असून त्यांनी त्यांचे संशोधनकार्य पुढे चालूच राहावे यासाठी संयत्र अभियांत्रिकी आणि त्याचे संगणक प्रारूप यांवर शिबिरे घेतली आहेत.

– मृणालिनी साठे / दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**

१. *मराठी विज्ञान परिषद-पत्रिका, दिवाळी अंक, २००५.*

## रायकर, रमेशचंद्र नारायण

**स्थापत्य अभियंता**

**१८ सप्टेंबर १९३९ - ८ मार्च २००८**



निष्णात स्थापत्य अभियंता रमेशचंद्र नारायण रायकर यांचे घराणे मूळचे गोव्यातील मडगावचे. पण त्यांचे बालपण व शिक्षण जेजुरीला झाले. लहानपणापासून शिक्षणाकडे लक्ष, उद्योगी वृत्ती, जिद्द व जिज्ञासा असलेला हा हुशार विद्यार्थी उच्चशिक्षणासाठी अभियांत्रिकी महाविद्यालयामध्ये दाखल झाला. आपण अभियांत्रिकी क्षेत्रात काम करणार आहोत तेव्हा त्यात प्रावीण्य प्राप्त करायचे; नुसते नाव व पैसा कमविण्याची ईर्षा मनात ठेवायची नाही, आपल्या कार्यातून समाजाची उन्नती कशी करता येईल हे ध्येय ठरवून अभियांत्रिकी क्षेत्रात त्यांनी अलौकिक व भरीव कामगिरी केली.

डॉक्टर रुग्णाला पाहताच रोगाचे निदान करू शकतो, त्याचप्रमाणे आर.एन. रायकर यांचे बांधकामातील ज्ञान व समज एवढी प्रगल्भ झाली होती, की इमारतीच्या काँक्रीट कामावरील भेगा व इतर पडझड पाहता, त्यातील दोषांचे निदान ते करू शकत. १९६० साली त्यांनी संरचना अभियांत्रिकी (स्ट्रक्चरल इंजिनिअरिंग) व्यवसायाला सुरुवात केली. थोड्या अवधीत त्यांच्या लक्षात आले, की इमारती आखण्याइतकेच इमारती उभारणे महत्त्वाचे आहे. त्यात हेळसांड झाली, तर इमारतीचे स्वास्थ्य बिघडू शकते. पुढे आपले उद्दिष्ट संरचना अभियांत्रिकी, न्यायवैद्यक अभियांत्रिकी (फॉरेन्सिक इंजिनिअरिंग) व संरक्षण (देखभाल) हे त्यांनी निश्चित केले. १९७३ साली 'टेक्नॉलॉजी ऑफ बिल्डिंग रिपेअर्स' हे पुस्तक लिहून त्यांनी भारतातील या विषयावरील पहिले पुस्तक लिहिण्याचा मान मिळविला. आजही या पुस्तकाची उपयुक्तता टिकून राहिली आहे. आपल्या देशात सिमेंट-काँक्रीटमध्ये इमारतींच्या बांधकामास १९१० साली सुरुवात झाली. त्या काळात बांधलेल्या काही इमारती आजही दिमाखाने उभ्या आहेत. पण पुढे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर उभारलेल्या इमारती काही वर्षांतच नादुरुस्त होऊ लागल्याचे आढळू लागले. म्हणजे झाले तरी काय? हा त्यांच्याकरिता चिंतेचा विषय बनला. या अभ्यासातून ग्रंथलेखनास सुरुवात झाली. पुढील दोन दशकांत त्यांनी खालील तीन ग्रंथ प्रसिद्ध केले. 'लर्निंग फ्रॉम फेल्युअर्स' (१९८४), 'ड्यूरेबल स्ट्रक्चर्स थ्रू प्लॅनिंग प्रिव्हेंटिव्ह मेंटेनन्स' (१९९४), 'डायग्नोसिस ॲन्ड ट्रीटमेंट ऑफ स्ट्रक्चर्स इन डिस्ट्रेस' (१९९४) या विषयांवरील अत्युत्तम अशी ही पुस्तके लिहिणारे रायकर हे पहिले भारतीय अभियंता होत. इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ इंजिनिअर्स यांनी 'लर्निंग फ्रॉम फेल्युअर्स' हे पुस्तक या विषयावरील सर्वोत्कृष्ट म्हणून १९९० साली जाहीर केले.



COLLAPSE OF AKASHDEEP

तांत्रिक अभ्यास व संशोधनात्मक कार्य चालू असताना, त्यांनी इमारतींची तपासणी करण्याच्या वेगवेगळ्या पद्धती समजावून घेतल्या. बांधकामावर कोणते आघात, कशामुळे होतात, याचा त्यांनी अभ्यास केला. काम फार जिकिरीचे व आव्हानात्मक होते. यापूर्वी असे पद्धतशीर काम झाले नसल्यामुळे या विषयाची माहिती उपलब्ध नव्हती. त्यांचे सर्वात

महत्त्वाचे योगदान म्हणजे त्यांनी दुरुस्तीच्या कामांत विकसित केलेले तंत्रज्ञान व त्या कामाला दिलेली नवी दिशा. या सर्व अनुभवांमुळे मोडकळीस आलेल्या इमारतींची संशोधनात्मक पाहणी, यावरचे तज्ज्ञ म्हणून रायकर प्रसिद्धीस आले. धोकादायक शंभरएक इमारतींच्या पाहणीनंतर त्यांनी तयार केलेला अहवाल व सुचवलेल्या उपाययोजना हा एक मानदंडच ठरला आहे. जलरोधनाच्या (वॉटरप्रूफिंग) कामाची तपासणी, बांधकामाच्या आराखड्यांची तांत्रिक तपासणी, पर्यावरणाचा व भूकंपाचा इमारतीवरील परिणाम, पुनर्वसन या सर्व कामांसाठी त्यांचा सल्ला निष्णात मानला जात असे.

नवी दिल्ली येथील प्रसिद्ध सेमिनार सेंटर 'विज्ञान भवन' व मुंबईतील 'षण्मुखानंद सभागृह' यांना लागलेल्या आगीमुळे या इमारतींचे अपरिमित नुकसान झाले होते. भारत सरकारने रायकरांना विज्ञान भवनाच्या कामाकरिता तातडीने पाचारण केले, तर षण्मुखानंद सभागृहाचे काम त्यांच्या देखरेखीखाली करण्यात आले.

या विषयाचे तांत्रिक ज्ञान आपल्याकडील अभियंत्यांना उपलब्ध व्हावे यासाठी ते तज्ज्ञ मंडळींना परदेशांतून येथे बोलावून सेमिनार भरवीत असत. जगभरातील तज्ज्ञ रायकरांच्या सेमिनारला यावयास उत्सुक असत. त्यांच्या कार्याची ओळख व माहिती पुढारलेल्या अनेक देशांत होऊ लागली. यातून जगभरातील अभियंत्यांचे एक जाळेच गुंफले गेले. अमेरिकेतील लास व्हेगास येथे अनेक देशांतील प्रसिद्ध तज्ज्ञांच्या संमेलनात अमेरिकन इन्स्टिट्यूटने त्यांना 'फेलोशिप' हा बहुमान बहाल करून त्यांचा गौरव केला.

कार्यरत असतानाच, त्यांचे निधन झाले. अशा समाजाभिमुख अभियंत्याने प्रसिद्धिपराङ्मुख राहून या वेगळ्याच अभियांत्रिकी कार्याची मुहूर्तमेढ रोवली. दुरुस्तीचे काम बांधकामाइतकेच महत्त्वाचे आहे, याची जाणीव त्यांच्या आयुष्यभराच्या अथक परिश्रमांमुळेच आता झाली आहे.

– चिंतामण गोखले

## राव, शांता श्रीनिवास

**वैद्यकशास्त्रज्ञ**

**२२ जानेवारी १९२३ - ३ डिसेंबर १९७९**



डॉ. शांता श्रीनिवास राव (पूर्वाश्रमीच्या बसरूर) यांचा जन्म बंगळुरूला झाला. त्यांचे शालेय, तसेच पदवीपर्यंतचे शिक्षण तेथेच झाले. विज्ञानातील पदवी मिळवल्यावर उच्च शिक्षणाकरिता त्या टोरँटो विद्यापीठ, कॅनडाला रवाना झाल्या. पदव्युत्तर शिक्षणाकरिता त्यांना राष्ट्रीय वैद्यकीय संशोधन परिषदेची शिष्यवृत्ती मिळाली होती. त्यानंतर त्या भारतात परतल्या आणि त्याच सुमारास त्यांचा श्रीनिवास सवूर राव यांच्याशी विवाह झाला. दोघांनीही हाफकिन इन्स्टिट्यूट, मुंबई येथे संशोधनास सुरुवात केली. त्यांच्या जंतुजीवशास्त्रातील प्रबंधाला १९५३ साली मुंबई विद्यापीठाने डॉक्टरेट पदवी बहाल केली. १९५६ साली त्यांना कर्करोग संशोधन संस्थेत (सी.आर.आय.) जीवरसायन शास्त्रज्ञ म्हणून नेमण्यात आले. एका वर्षातच भारतीय आयुर्विज्ञान अनुसंधान परिषदेने त्यांची प्रजनन इंद्रिय विज्ञान (रिप्रॉडक्टिव्ह फिजियॉलॉजी युनिट, आर.पी.यू.) संचाच्या प्रमुख म्हणून नियुक्ती केली व त्यांच्या संशोधनकार्याचे महत्त्व ओळखले. कर्करोग संशोधन संस्थेचे निर्देशक डॉ. व.रा. खानोलकर यांनीही त्यांच्या संशोधनकार्याला प्रोत्साहन दिले.

आर.पी.यू.च्या मुख्य डॉ. शांता राव आणि कुटुंबनियोजन संचाच्या (कॉन्ट्रासेप्टिव्ह टेस्टिंग युनिट, सी.टी.यू.) डॉ. केतायून वीरकर यांनी एकत्र येऊन, भारतीय आयुर्विज्ञान अनुसंधान परिषदेच्या आधिपत्याखाली १९७० साली प्रजनन संशोधन संस्थेची (इन्स्टिट्यूट फॉर रिसर्च इन रिप्रॉडक्शन, आय.आर.आर.; सध्याचे नाव राष्ट्रीय प्रजनन स्वास्थ्य अनुसंधान संस्थान (नॅशनल इन्स्टिट्यूट फॉर रिसर्च इन

र

रिप्रॉडक्टिव्ह हेल्थ, एन.आय.आर.आर.एच.) स्थापना केली.

डॉ. शांता राव यांनी मुख्यत्वेकरून प्रतिकार-जीवशास्त्रात (इम्युनोलॉजी) सातत्याने संशोधन केले. त्यांनी गोनॅडोटॉपीन्स या (हार्मोन्सना) विकरांना प्रतिबंध करणारी प्रतिपिंडे (ॲन्टिबॉडी) तयार करण्याच्या शरीराच्या क्षमतेचा शोध घेतला. तसेच शुक्रजंतूचे प्रतिपिंड माणसाच्या शरीरात आढळल्यास वंध्यत्व येऊ शकते, हे दाखवून दिले.

डॉ. शांता रावांनी इंडियन सोसायटी फॉर स्टडी ऑफ रिप्रॉडक्शन ॲन्ड एन्डोक्रायनॉलॉजी (आय.एस.एस.आर.ई.) ची स्थापना १९७१ साली केली. त्यामुळे प्रजनन स्वास्थ्य आणि कुटुंबनियोजन या क्षेत्रात कार्य करण्यास तरुण रक्ताला वाव मिळत गेला. त्यांच्या हाताखाली तीसपेक्षा जास्त शिष्यांनी एम.एस्सी./डॉक्टरेट पदवी संपादन केली. त्यांचे शंभरहून अधिक प्रबंध राष्ट्रीय, तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावर प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांना शकुंतला देवी अमीरचंद पारितोषिक, जी.टी. वाटुमल सन्मान, मेटचनिकॉफ पदक, असे अनेक सन्मान मिळाले होते. जागतिक आरोग्य संस्था (डब्ल्यू.एच.ओ.) जिनिव्हा, तेल अविव विद्यापीठीय वैद्यकीय शाळा, इस्रायल; आंतरराष्ट्रीय इम्युनॉलॉजी सोसायटी, बल्गेरिया अशा अनेक आंतरराष्ट्रीय संस्थांवर त्या सल्लागार होत्या.

त्या ‘कॉन्ट्रासेप्शन’ या अमेरिकन नियतकालिकाच्या, तसेच ‘युनायटेड नेशन्सच्या इकनॉमिक आणि सोशल कमिशन फॉर एशिया आणि पॅसिफिक’च्या संपादकीय मंडळात होत्या. १९७७ साली त्या संस्थेच्या संचालक झाल्या. त्याच सुमारास त्यांनी नालासोपाऱ्याजवळ ससुनागर येथे ४० एकर जागा घेतली, तेथे आता माकडांवर संशोधन करण्यासाठी ‘नॅशनल सेंटर फॉर प्राइमेट ब्रीडिंग अँड रिसर्च’ ची स्थापना होत आहे.

– डॉ. तरला नांदेडकर

✻ ✻ ✻

र




## लाड, भाऊ दाजी

**वैद्यकशास्त्रज्ञ, इतिहासतज्ज्ञ**

**६ जून १८२२ - ३१ मे १८७४**



प्राच्यविद्या पंडित, कुशल धन्वंतरी, स्त्री-शिक्षणाचे प्रसारक व मुंबईच्या औद्योगिक विकासात महत्त्वपूर्ण कार्य करणारे, मुंबईकरांतील सर्वात तेजस्वी असा गौरव झालेले व्यक्तिमत्त्व. डॉ.भाऊ दाजी लाड यांचे मूळ नाव रामकृष्ण विठ्ठल लाड. मूळ गाव पार्से म्हणून ते लाड-पार्सेकर हेही नाव लावीत. त्यांचा गोव्यातल्या मांजरे/मांद्रे गावी आजोळी जन्म झाला. वडिलांबरोबर वयाच्या दहाव्या वर्षी ते मुंबईत आले. त्यांना बुद्धिबळाची आवड होती. त्या खेळातल्या प्रावीण्यामुळे ते मुंबईच्या गव्हर्नरांपर्यंत जाऊन पोहोचले. गव्हर्नरला भाऊंच्या हुशारीचे कौतुक वाटले आणि त्याने भाऊंच्या शिक्षणाची सोय केली. त्यांचे प्राथमिक शिक्षण नारायणशास्त्री पुराणिकांच्या मराठी शाळेत, तर पुढील शिक्षण एल्फिन्स्टन विद्यालयात व महाविद्यालयात झाले. ते खासगीरीत्या संस्कृतही शिकले.

ते एल्फिन्स्टन विद्यालयात शिक्षक व ग्रंथपाल म्हणून काम करत असताना, १८४५ साली ग्रँट वैद्यकीय महाविद्यालयाची स्थापना झाली आणि शिक्षकाची नोकरी सोडून भाऊ वैद्यकीय शाखेचे पहिल्या वर्षाचे विद्यार्थी म्हणून महाविद्यालयामध्ये दाखल झाले. त्याअगोदर, विद्यालयात असताना त्यांनी राजस्थान व गुजरात या भागांतल्या मुलींना गर्भावस्थेत मारून टाकण्याच्या प्रथेवर परिस्थिती सांगणारा एक निबंध लिहिला. तो उत्कृष्ट ठरून त्यांना त्या वेळेचे ६०० रुपयांचे प्रथम पारितोषिक मिळाले. वैद्यकीय शिक्षण घेत असतानाच त्यांना परीक्षेत उत्तम गुण मिळाल्याबद्दल फिशर शिष्यवृत्ती मिळाली होती; पण त्यांनी ती नाकारली. कारण त्या वेळेला ते काही काळ नोकरीही करत होते. योग्य व्यक्तीला त्या पैशांचा फायदा व्हावा म्हणून भाऊंनी त्याग केला.

१८५१ साली शिक्षण पूर्ण झाल्यानंतर त्यांनी वैद्यकीय व्यवसाय सुरू केला. पैशाचा हव्यास न बाळगता त्यांनी गरिबांची सेवा केली, मोफत औषधोपचार केला व दानधर्मही केला. ते कुष्ठरोग्यांवर उपचार करीत. ते कोणत्या औषधांचा उपचार करीत ते गुपित त्यांच्याबरोबरच काळाच्या पडद्याआड गेले. त्या उपचारांमध्ये 'खष्ट' या वनस्पतीचा ते वापर करीत असावेत, असा एक अंदाज आहे. खष्ट म्हणजे चौलमुद्रा ही सदापर्णी वनस्पती. वनस्पती गोळा करण्यासाठी ते संपूर्ण देशात फिरत, महाराष्ट्रातल्या रुग्णांवर उपचार करीत.

भाऊ उत्तम शल्यचिकित्सक होते. गर्भवतींची सुखरूप सुटका करवण्यात त्यांची ख्याती होती. देवी टोचण्याची पद्धत त्यांनीच लोकप्रिय केली. सामाजिक आणि आरोग्यसेवेचे काम करणाऱ्या 'बॉम्बे असोसिएशन' या संस्थेचे ते चिटणीस होते. नंतर लंडनच्या 'ईस्ट इंडिया असोसिएशन'च्या मुंबई शाखेचे ते अध्यक्ष झाले. व्यवसाय करत असतानाच त्यांनी आयुर्वेदावर संशोधन केले. अनेक वनस्पती जमा करून त्यांचे गुणधर्म तपासले. भाऊंनी इतिहास संशोधनसुद्धा केले. त्यांनी इसवीसनपूर्व काळापासून इसवीसनाच्या



**भाऊ दाजी लाड वस्तुसंग्रहालय, मुंबई**

बाराव्या शतकापर्यंतचा वृत्तान्त गोळा केला. त्यासाठी महाराष्ट्रातली लेणी, लेण्यांवरील शिलालेख, ताम्रपट, नाणी यांचा अभ्यास केला. लेण्यांच्या डोंगरकड्यांवरील लेखांच्या नकला करवल्या. जुन्या ग्रंथांची हस्तलिखिते गोळा केली. त्यांनी हिंदू धर्माप्रमाणे जैन व बौद्ध धर्माच्याही इतिहासाचा अभ्यास केला. त्यांनी आदिवासींच्या विविध भाषा अभ्यासल्या, त्यांच्यातल्या प्रचलित म्हणी जमविल्या. म्हणींद्वारा समाजाच्या स्वभावावर प्रकाश पडतो, असे त्यांचे मत होते.

भाऊंचा एक निष्कर्ष सर्वमान्य झालेला आहे. त्यांनी संशोधनानंतर असे दाखवून दिले की, नाण्यांवरील किंवा जुन्या शिलालेखांवरील व ताम्रपटांवरील एक विशिष्ट चिन्ह एक संख्या दर्शवते. त्या संख्येवरून निश्चित काळ समजून येतो. जुन्या राजपुरुषांच्या कार्यकाळाची अंतरे समजतात. भाऊंनी वराहमिहिर या गणिती ग्रंथकारांचा अंतकाळ इ.स. ५८७ हा निश्चित केला. त्यांनी मुकुंदराज, हेमाद्री, सायण, हेमचंद्र या व्यक्तींवर आणि कालिदासाचा ‘कालनिर्णय’ यावर शोधनिबंध लिहिले. त्यासंबंधात प्रसिद्ध प्राच्यविद्या संशोधक डॉ.रा.गो. भांडारकर व जर्मन विद्वान मॅक्समुल्लर यांनी गौरवोद्‌गार काढले आहेत. भाऊंनी ‘कुमारसंभव’ व ‘मेरुतुंगाचार्यांचा प्रबंध चिंतामणी’ हे ग्रंथ संपादित केले. लाडांनी वेगवेगळ्या विषयांवर एकून १९ निबंध लिहिले. ते रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या जर्नलमध्ये प्रसिद्ध झाले. भाऊंनी अनेक लेखकांना लेख आणि माहिती देऊन मदत केली. म्हणूनच कवी नर्मदाशंकर, शंकर पांडुरंग पंडित, बाजीराव तात्या, रावजी रणजित यांनी आपले ग्रंथ भाऊंना अर्पण केलेले आहेत.

भायखळा येथील ‘राणीचा बाग’ म्हणजे आत्ताची ‘वीर जिजामाता उद्यान’ स्थापन करण्यात भाऊंचा पुढाकार होता. त्या वेळेला बागेमध्ये ‘व्हिक्टोरिया अँड अल्बर्ट म्यूझियम’ या नावाचे वस्तुसंग्रहालय तयार करण्यासाठी भाऊंनी निधी जमविण्यासाठी भरपूर कष्ट घेतले. कालांतराने म्हणजे भाऊंच्या स्मृतिशताब्दी वर्षात, १९७४ साली त्या संग्रहालयाचे नामकरण ‘डॉ.भाऊ दाजी लाड वस्तुसंग्रहालय’, असे करण्यात आले. भाऊंनी इतके कष्ट घ्यायचे कारण म्हणजे स्वत: भाऊंना पौराणिक वस्तूंचा संग्रह करण्याचा छंद होता. त्यांनी जमविलेल्या चित्रांचा, नाण्यांचा, ताम्रपटांचा, शस्त्रांचा समावेश संग्रहालयात आहे. हस्तलिखितांमध्ये मध्ययुगीन काळातला शहानामा, सिकंदरनामा, हातिमताई, दिवाण मोगल, मोगलकालीन इतिहास यांवरील पर्शियन भाषेतील हस्तलिखिते आहेत. याशिवाय उपनिषद सूत्र, आचाङ्‌सूत्र, निरयावलिम, भगवतीसूत्र या हस्तलिखितांचाही समावेश आहे. संग्रहालयातून इतिहास शिकला जातो असे भाऊ म्हणत. संस्कृतच्या प्रसाराने मराठीचा उत्कर्ष होईल, असे त्यांचे मत होते. मराठी, गुजराती, इंग्रजी या तीनही भाषांमधून ते उत्तम भाषणे करीत. त्यांनी नाट्यकलेला प्रोत्साहन दिले म्हणूनच आद्य नाटककार विष्णुदास भावे यांनी भाऊंना पहिल्या दर्जाचा रसिक म्हणून मान दिला.

एका इंग्रज अधिकाऱ्याकडे एक शिंपी काम करत असे. अधिकारी शिंप्याचे पैसे देईना. उलट पैशांचा तगादा लावला म्हणून त्याने शिंप्याला मारहाण केली. मॅजिस्ट्रेटकडे शिंप्याविरुद्ध खोटी तक्रार केली. मॅजिस्ट्रेटने शिंप्याला २१ दिवसांची शिक्षा सुनावली. बिचारा शिंपी शिक्षा भोगून गावाकडे निघून गेला. भाऊंना ही हकिकत समजली. त्यांना खोट्या तक्रारीचा पुरावाही मिळाला. शिंप्याने भाऊंच्या सहकार्याने हायकोर्टात तक्रार दाखल केली. हायकोर्टाने शिंप्याला नुकसानभरपाई देवविली.

ल

या सर्व खटाटोपात भाऊंचे दहा हजार रुपये खर्च झाले. युरोपियन समाजाचा रागही भाऊंनी सोसला. परंतु आपल्या गरीब देशबांधवावर परकीयांकडून झालेला अन्याय त्यांनी सहन केला नाही. एक प्रकारे हिंदी माणसाचा दर्जा त्यांनी वाढवला.

स्त्रियांना शिक्षण देणाऱ्या 'स्टुडंटस लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी' या संस्थेचे ते पहिले भारतीय अध्यक्ष म्हणून दहा वर्षे पदावर होते. या संस्थेतर्फे मुलींच्या तीन शाळा चालविल्या जात. लोहार चाळीतल्या कन्याशाळेला ते दरमहा आर्थिक साहाय्य देत असत. याच शाळेचे पुढे 'भाऊ दाजी कन्याशाळा' म्हणून नामकरण झाले. स्त्री-शिक्षणाप्रमाणेच विधवाविवाह चळवळ, जातिव्यवस्था निर्मूलन, मादक पदार्थ सेवनाविरुद्ध मोहीम यांसाठी भाऊंनी कार्य केले. मुंबई विद्यापीठ स्थापन करण्यातही भाऊंचा पुढाकार होता. विद्यापीठ स्थापनेच्या काळी, म्हणजे १८५७ साली केलेल्या कायद्यामध्ये आश्रयदाते म्हणून भाऊंचे नाव आहे. त्याअगोदर भाऊ ज्या बॉम्बे असोसिएशनचे सचिव होते, त्या असोसिएशनतर्फे शिक्षण विकासाविषयी एक योजना ब्रिटिश संसदेला सादर केलेली होती.

१८५७ साली मुंबई विद्यापीठाच्या पदवीदान समारंभाप्रसंगी नामदार न्यायमूर्ती व्हाइस चॅन्सलर जेम्स गिब्ज यांनी 'डॉ.भाऊ दाजींचा आदर्श नवीन पदवीधारकांनी ठेवावा,' असे सांगितले. त्यांनी उत्कृष्ट कार्यपद्धती, संशोधनकार्य या बाबतीत भाऊंची वाखाणणी केली. वैद्यकीय व्यावसायिक, वकील, अभियंता अशा सर्वांनीच भाऊंना आपले प्रेरणास्थान मानले पाहिजे, असे गिब्ज म्हणाले. मुंबईत सुताच्या व कापडाच्या गिरणीची कल्पना भाऊंनी सर्वप्रथम मांडली. त्या कल्पनेला कावसजी नानाभाई दावर यांनी मूर्त स्वरूप देऊन मुंबईतील पहिली सूतगिरणी १८५४ साली सुरू केली. भाऊंच्या वैद्यकीय, शैक्षणिक, सामाजिक व लोकोद्धारक कार्याची पावती म्हणून मुंबईचे नगरपाल या पदावर शासनाने त्यांची सलग पाच वर्षे नियुक्ती केली. भाऊ सभासद, उपाध्यक्ष, अध्यक्ष, फेलो, शिक्षक-मार्गदर्शक, अशा वेगवेगळ्या नात्यांनी २३ संस्थांशी संबंधित होते. त्या काळातली राष्ट्रहिताची अशी कोणतीही एखादी चळवळ नसेल, की जिच्या संस्थापनेत किंवा संवर्धनात डॉ.भाऊ दाजींचा हात नव्हता. ब्रिटिश स्वत:हून सत्ता सोडून जातील असा त्यांना विश्वास होता म्हणून त्यांनी ब्रिटिशांशी संघर्षाचा मार्ग न स्वीकारता, सामोपचाराचा व सहकार्याचा मार्ग निवडला. तरीही त्यांनी ब्रिटिश पार्लमेंटला पाठवलेल्या अर्जात कंपनी सरकारच्या चुका दाखवून दिल्या.

१८५९ साली इंग्रज सरकारने व्यापार व व्यवसाय यांच्यावर कर बसवण्याकरिता 'लायसेन्स बिल' पुढे आणले होते. बिलाला विरोध करण्यासाठी मुंबईतल्या सर्व प्रतिष्ठित नागरिकांची सभा भरली होती. 'सरकारविरुद्ध' संघर्षाची भूमिका न घेता आपले म्हणणे मांडावे, असे भाऊंनी सांगितले. त्याला सर्वांनी एकमुखाने पाठिंबा दिला व आपल्या म्हणण्याचा अर्ज तयार करण्याची जबाबदारी भाऊंवर येऊन पडली. भाऊंनी तसा अर्ज पाच हजार सह्यांनिशी सरकारकडे पाठवला. बुद्धिवैभव, विद्वत्ता, भूतदया, औदार्य, त्याग, धैर्य, समता, देशप्रेम, निष्कलंक आचरण वगैरे गुणांत हिंदी लोक कमी पडत नाहीत, हे त्यांनी सिद्ध केले.

भाऊंना उत्तर आयुष्यात आर्थिक फटका बसला, प्रकृती बिघडली. त्यांनी ज्यांना मदत केली, ज्यांच्यासाठी काही उपक्रम सुरू केले, त्यांनी भाऊंकडे दुर्लक्ष केले. या वर्तनाची 'टाइम्स ऑफ इंडिया' या वृत्तपत्रानेसुद्धा दखल घेऊन लिहिले. अनेक नामवंतांनी भाऊंचा द्वेष केला, त्यांत विदेशी व स्वदेशीसुद्धा होते. त्यांनी भाऊंचे पाय मागे खेचले; कारण त्यांच्याकडे भाऊंची महत्ता समजण्याची कुवत नव्हती.

– जयंत एरंडे

ल

संदर्भ :

१. *जोशी, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री, संपादक; मराठी विश्वकोश; महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.*

२. *इंडियन जर्नल ऑफ हिस्टरी ऑफ सायन्स; ३९.३, (२००४).*

## लिमये, दत्तात्रेय बाळकृष्ण

**रसायनशास्त्रज्ञ**

**३१ जुलै १८८७ - २६ फेब्रुवारी १९७१**



दत्तात्रेय बाळकृष्ण लिमये यांचा जन्म मणचे, ता. देवगड, जि. रत्नागिरी येथे झाला. वयाच्या पाचव्या वर्षीच एका मागोमाग आई आणि वडील निधन पावल्यामुळे त्यांचे प्राथमिक शिक्षण हावनूर, जि. धारवाड येथे झाले. नंतरचे शिक्षण नाशिक व मुंबई येथे झाले. १९०५ साली मॅट्रिक झाल्यावर गुणवत्ताधारक विद्यार्थी म्हणूनच त्यांचा एल्फिन्स्टन महाविद्यालयात प्रवेश झाला. पुढच्याच वर्षी त्यांनी फर्गसन महाविद्यालयात प्रवेश मिळवला. १९०९ साली बी.एस्सी. आणि १९११ साली रसायन हा विषय घेऊन एम.ए. (सायन्स) ही पदवी त्यांनी प्रथम क्रमांकाने संपादन केली. अतिशय प्रतिकूल परिस्थितीत, आर्थिकदृष्ट्या ओढग्रस्त असताना लिमये यांनी हे यश मिळवले. त्यांचे सगळे शिक्षण शिष्यवृत्तीवर झाले, इतकी गुणवत्ता त्यांनी आपल्या शिक्षणादरम्यान दाखवली होती. महाविद्यालयातील अनेक प्राध्यापकांचा लोभ त्यांना मिळाला. त्यामध्ये एल्फिन्स्टनचे प्राचार्य शार्प यांचा मुद्दाम उल्लेख करावासा वाटतो. त्यांनी लिमयांना नोकरीही देऊ केली होती, पण ती त्यांनी देशप्रेमामुळे नाकारली.

प्राचार्य कानिटकरांनी स्थापन केलेल्या रानडे इन्स्टिट्यूटमध्ये कानिटकरांचे साहाय्यक म्हणून त्यांनी काम सुरू केले. नंतर तिथे ते स्वकर्तृत्वाने संचालक झाले. औद्योगिक दृष्टीने उपयोगी पडेल असे काम लिमयांनी सुरू केले. त्यामध्ये हिरडा व तरवड यांचे अर्क काढून त्याचा कातडी कमावण्यासाठी उपयोग, लोखंड, मँगनीज, बॉक्साईट इत्यादी खनिजांचे रासायनिक विश्लेषण, काचेवर पारा चढवणे, बिलोरी काचेचे विविधरंगी गोळे बनवणे, पेनची, मुद्रणालयाची, कापडावर छापायची अशी वेगवेगळ्या प्रकारची शाई बनवणे, असे नानाविध प्रकारचे प्रयोग करून ते यशस्वीरीत्या पार पाडले. गोंद, साबण, घासकामाचा कागद इत्यादीचे उत्पादन केले, तर संस्थेच्या नियामक मंडळाच्या सूचनेनुसार सिमेंट टेस्टिंगचे कामही केले. निंबोळी, उंडी, करंजेल या वनस्पतींवर त्यांनी संशोधन केले. त्यांना करंजेलमध्ये रवाळ स्फटिकरूप आणि अल्कोहोलमध्ये विरघळणारा फ्लॅव्होन जातीचा नवीन पदार्थ, तेलाच्या साक्यात मिळाला. त्याला 'करंजिन' असे नाव लिमयांनी दिले. रसोद प्रक्रिया, रंजोर्व प्रक्रिया, निधोन पद्धती अश वेगवेगळ्या पद्धतींना समर्पक नावे दिली. पाश्चात्त्य संशोधकांनीही लिमयांनी दिलेली नावे वापरली. यावरून त्यांच्या संशोधनाचे आणि प्रक्रियांचे महत्त्व अधोरेखित होते. आर्थिक बळाची कमतरता असताना त्यांनी असे महत्त्वाचे संशोधन करता येते, हे स्वत:च्या उदाहरणावरून दाखवून दिले. अडचणींवर मात करून उत्तम दर्जाचे संशोधन त्यांनी केलेच आणि आपल्या विद्यार्थ्यांकडून करूनही घेतले. त्यांच्या संशोधनानेच त्यांना आंतरराष्ट्रीय कीर्ती मिळवून दिली.

त्यांचे एकूण ६२ संशोधनपर निबंध देशी-विदेशी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले. तसेच, त्यांनी सुमारे ५५ विद्यार्थ्यांना पदव्युत्तर संशोधनासाठी मार्गदर्शन केले. पदव्युत्तर पातळीवर त्यांचे अनेक विद्यार्थी यशस्वी झाल्यावर मुंबई विद्यापीठाने त्यांना पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्याची मान्यता दिली. त्यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन करून चार विद्यार्थ्यांनी पीएच.डी. ही पदवी मिळवली.

रसायनशास्त्रातील संशोधनास मदत व्हावी म्हणून त्यांनी 'रसायननिधी'चा शुभारंभ केला. त्यामध्ये प्रथम आपण रु.१,०००/- दिले आणि मग समाजाला आवाहन केले. संशोधनातील कामे सुचतात, पण त्यासाठी निधी नाही, अशी अडचण नवीन पिढीला येऊ नये म्हणून ही व्यवस्था केली. खूप प्रयत्नांनंतर विश्वस्तांनी एक लाख रुपये जमा केले. विश्वस्तांनी १९२५ साली रसायनशास्त्रावरील संशोधनास मान्यता




दिली आणि १९३० साली रसायननिधी स्थापनाविषयक विश्वस्तपत्र लिमयांनी रजिस्टर केले. १९३० ते १९३९ साली रिसोरसिनॉल हा पदार्थ माहीत होता, पण त्यावर जगभर नवीन संशोधन सुरू होते. लिमये यांनी प्रदीर्घ संशोधनानंतर प्रक्रिया करून तीन टप्प्यांत अल्किल रिसोरसिनॉल यशस्विरीत्या मिळवले. या संशोधनाला 'निधोन प्रोसेस' हे नाव दिले. त्यामुळे लिमयांचे नाव जगभर ज्ञात झाले. याबाबत त्यांचा संशोधन निबंध त्यांनीच सुरू केलेल्या 'रसायनम्' या संशोधन नियतकालिकात प्रसिद्ध झाला. नोबेल पुरस्कार विजेते प्रा.डोनाल्ड क्रम यांनी १९९० साली अमेरिकन जर्नलमध्ये लिमयांच्या संशोधन निबंधाचा संदर्भ दिला आहे. यातच लिमयांच्या संशोधनाचे महत्त्व समजते, तसेच संशोधन किती उच्च दर्जाचे होते, त्याची प्रचिती येते.१९६७ साली लिमये यांचा 'डॉक्टर ऑफ सायन्स' ही पदवी देऊन पुणे विद्यापीठाने सत्कार केला.

बाळकृष्ण रसशाळा हा औद्योगिक प्रकल्प स्थापन करून त्यांनी आपल्या पायावर उभे राहण्याची कामगिरी केली. रसायननिधीच्या त्रैवार्षिक सभेस नोबेल पुरस्कार विजेते सर चंद्रशेखर रमण हे आले होते. त्यांनी लिमयेंच्या संशोधनाची माहिती समजून घेतली आणि त्यांच्या कामाविषयी नॅशनल केमिकल सोसायटीच्या समारंभात आणि सायन्स काँग्रेसच्या अधिवेशनात गौरवोद्‍गार काढले, ही पण लिमयेंच्या कामाला मिळालेली पावतीच म्हणावी लागेल. 'रसायनमंदिर' या संस्थेला सरकारी अनुदान न मिळाल्यामुळे १९६४ साली रसायननिधीच्या विश्वस्तांना ते बंद करावे लागले आणि रसायननिधी पुणे विद्यापीठाकडे सुपूर्द करण्यात आला. त्यातून विद्यापीठाने प्रा.द.बा. लिमये पदव्युत्तर रसायननिधी शोधवृत्ती चालू केली. १९८७ साली 'डिफेन्स रिसर्च डेव्हलपमेंट ऑर्गनायझेशन' (डी.आर.डी.ओ.) तर्फे रसायननिधीच्या व्याजातून देण्यात येणाऱ्या शोधवृत्तीमध्ये भर घालण्यात आली. पण ही शोधवृत्ती विशेष कोणालाही ज्ञात नाही.

लिमये यांचे कार्य तीन प्रकारचे आहे. त्यांनी साधनसामग्रीची संपन्नता नसतानाही कल्पकतेने संशोधन करून रसायनशास्त्रातील ज्ञानात मौलिक भर घातली, अनेक विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करून संशोधकांची परंपरा निर्माण केली आणि संशोधनासाठी पैसा उपलब्ध व्हावा म्हणून रसायननिधीची उभारणी करून त्याचे संवर्धन केले. सर्वांना प्रेरणा देणारे असे कार्य त्यांनी केले, त्याचा तपशील 'रसमहर्षी' या समर्पक शीर्षक असलेल्या पुस्तकात वाचायला मिळेल.

— दिलीप हेर्लेकर

**संदर्भ :**

१. *लिमये, श्रीधर; 'रसमहर्षी; ऑक्टोबर १९९३.*

## लेले, रामचंद्र दत्तात्रेय

**वैद्यकशास्त्रज्ञ**

**१६ जानेवारी १९२८**



डॉ.रामचंद्र दत्तात्रय लेले यांचा जन्म निजामाच्या हैदराबादमध्ये झाला. तेथेच त्यांचे सर्व शिक्षण झाले. मातृभाषा मराठी, पण कॉलेजमधील शिक्षणाचे माध्यम इंग्रजी व उर्दू होते. १९४४ साली इंटर सायन्समध्ये ते सर्व परीक्षार्थींमध्ये पहिले आले. १९४९ साली उस्मानिया वैद्यकीय महाविद्यालयामधून त्यांनी आधुनिक वैद्यकाची पदवी घेतली.

त्या वेळी खेडोपाडी डॉक्टर नव्हते म्हणून डॉ.लेले व त्यांचे मित्र यांनी स्वत:च ठरवले की पाच वर्षे वैद्यकीय शासकीय सेवा करायची. १९५५ साली पुढील शिक्षणासाठी ते इंग्लंडला गेले. लंडन येथील 'स्कूल ऑफ ट्रॉपिकल मेडिसीन येथून डी.टी.एम.एच. व

ल



अणुवैद्यक विभाग

एडिंबरा येथून एम.आर.सी.पी. पदव्या संपादन करून १९५७ साली ते भारतात परत आले व महाराष्ट्र राज्याच्या वैद्यकीय सेवेत त्यांनी प्रवेश केला. औरंगाबाद, नागपूर व मुंबई येथील महाविद्यालयातून त्यांनी वैद्यकशास्त्रचे प्राध्यापक व नंतर विभाग प्रमुख म्हणून काम केले. १९७२ साली ग्रॅण्ट वैद्यकीय महाविद्यालय व जे.जे. रुग्णालय, मुंबई येथे अधिष्ठाता म्हणून त्यांची नियुक्ती झाली.

१९७३ साली जसलोक रुग्णालय व संशोधन केंद्राचे प्रमुख चिकित्सक व अणुवैद्यक विभागाचे प्रमुख म्हणून त्यांनी जबाबदारी स्वीकारली. मुंबईतील अनेक रुग्णालयांमध्ये ते वैद्यकशास्त्र या विषयाचे सन्मान्य प्राध्यापक व सल्लागार आहेत. याशिवाय संगणकाचा वैद्यकक्षेत्रात उपयोग करण्यासही त्यांनीच प्रथम सुरुवात केली. अनेक मान्यवर नियतकालिकांच्या संपादकीय मंडळाचे सदस्य, अणुऊर्जेसंबंधी समितीचे सदस्य, भारतीय वैद्यकीय माहिती संकलन संस्थेचे अध्यक्ष, अशी अनेक पदे त्यांनी स्वीकारली.

डॉ.लेले अणुवैद्यक शास्त्राचे भारतातील प्रवर्तक आहेत. १९६६-६७ साली अणुवैद्यक शास्त्राच्या अभ्यासासाठी 'कोलंबो प्लॅन' योजनेखाली ते कॅनडात गेले. ह्या विषयावर त्यांनी 'प्रिन्सिपल्स ॲण्ड प्रॅक्टिस ऑफ न्यूक्लिअर मेडिसीन' व 'कॉम्प्यूटर इन मेडिसीन' ही पुस्तके प्रसिद्ध केली.

भाभा अणुसंशोधन केंद्रातील आरोग्य-भौतिक शास्त्रज्ञांच्या मदतीने त्यांनी भारतीय बनावटीच्या 'शॅडो शील्ड होल बॉडी काउण्टर'ची उपयुक्तता दाखवली. लोह व बी १२ जीवनसत्त्वांचे शरीरातील शोषण, तसेच आतड्यातून होणारा रक्तस्राव व प्रथिन यांचा ऱ्हास याच्यामुळे होतो हे दाखवून दिले. अणुवैद्यकाचा अभ्यास प्रथमच या देशात डॉ. लेलेंनी प्रस्थापित केला. 'टेक्नेशियम ९९' चा शिरेवाटे उपयोग करून विकिरण औषधनिर्मितीचा पाया घातला. 'आण्विक हृदय उपचारपद्धत', तसेच 'आण्विक स्टेथॉस्कोप' त्यांनीच विकसित केले आहेत . 'स्पेक्ट' (सिंगल प्रोटॉन एमिशन कॉम्प्यूटेड टोमोग्राफी) या तंत्राचे जनकत्वही त्यांच्याकडेच जाते. 'असोसिएशन ऑफ फिजिशियन्स इन इंडिया' या संस्थेचा 'प्रतिभासंपन्न शिक्षक' पुरस्कार, 'धन्वंतरी' पुरस्कार, तसेच 'पद्मविभूषण' हे सन्मान त्यांना मिळाले आहेत.

डॉक्टरांनी इंटरनेटचा वापर केला पाहिजे यावर त्यांनी सातत्याने भर दिला. इंटरनेटमुळे वैद्यकीय क्षेत्रातील तज्ज्ञांचा सल्ला केव्हाही मिळू शकतो. रुग्णाला इंटरनेटमुळे डॉक्टरांशी कधीही संपर्क साधता येतो, स्वत:चे सर्व रिपोर्ट्स दाखवता येतात. डॉक्टर रुग्णाच्या हृदयाचे ठोकेपण ऐकू शकतात. त्यामुळे रुग्णाला प्रत्यक्ष डॉक्टरांकडे जावे लागणार नाही. इंटरनेट एक उपयुक्त सुधारणा आहे व सर्व डॉक्टरांनी त्याचा वापर करायला शिकले पाहिजे, असा डॉ. लेलेंचा सल्ला आहे.

आयुर्वेदामध्ये डॉ. लेलेंना विशेष रस होता. त्याचा आणि पाश्चात्त्य वैद्यकपद्धतीचा संयोग करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. त्यांचे 'आयुर्वेद अँड मेडिसीन' हे पुस्तक बरेच गाजले आहे. त्याचा मराठी अनुवादही प्रकाशित झाला आहे. त्यांचे शंभराहून अधिक शोधनिबंध प्रकाशित झालेले आहेत.

डॉ. लेलेंनी मराठीतूनच आरोग्य शिक्षण देण्यावर भर दिला. रुग्णांना समजेल अशा भाषेत डॉक्टरांनी बोलले पाहिजे व औषधचिठ्ठ्या लिहिल्या पाहिजेत, असा त्यांचा आग्रह असतो. सर्वसमावेशक उपचारपद्धती निर्माण करून सामान्यजनांच्या आरोग्यविषयक गरजा भागवाव्यात, असे त्यांना वाटते. पुरावाधिष्ठित वैद्यकाचे नियम सर्व वैद्यकप्रणालींना लागू करण्याची निकडीची गरज आहे, असे त्यांचे मत आहे.

स्त्रियांना शिक्षण देणे व आर्थिक सवलती देणे हा कुटुंबनियोजनाचा प्रभावी मार्ग आहे. केरळमध्ये स्त्री-

ल

शिक्षणामुळे मुदतपूर्व बालजन्माचे प्रमाण हजारी १८ पर्यंत खाली आले. स्त्रीमध्ये कुटुंबाचे प्रकृतिस्वास्थ्य सांभाळण्याचे सामर्थ्य आहे, अशी डॉ. लेलेंची विचारसरणी आहे.

ग्रामीण आरोग्य विकासावर डॉ.लेलेंचा विशेष भर आहे. बालविकास प्रकल्पात ग्रामीण भागातल्या जनतेला सहभाग घ्यायला प्रवृत्त करण्याचे काम सेवानिवृत्त नागरिक व सेवाभावी संस्था करू शकतील, असे त्यांनी 'रूरल कन्स्ट्रक्शन चॅलेंजेस अँड अपॉर्च्युनिटीज' या १९९६ साली प्रकाशित केलेल्या पुस्तकात म्हटले आहे. मागासलेल्या भागात उद्योग जावेत म्हणून शासन फुकट जमीन, पाणी आणि वीजपुरवठा देते, करसूट देते, त्याच धर्तीवर या सोयी डॉक्टरांनाही मिळाव्यात, अशी महत्त्वाची व्यवहार्य सूचनाही डॉ. लेलेंनी केली. ग्रामीण आरोग्य विकासासाठी त्यांनी आरोग्य विम्याहून अधिक व्यापक संकल्पना 'स्वास्थ्य परिरक्षक संघटना' मांडली. यात रोगचिकित्सेपेक्षा रोगप्रतिबंधावर अधिक भर देण्याचा प्रयत्न असतो. वैद्यक व्यावसायिकांनी रुग्णाविषयी करुणा व जिव्हाळा कधी कमी पडू देऊ नये, असा मोलाचा सल्ला त्यांनी वैद्यक व्यावसायिकांना दिला आहे.

– डॉ. शशिकांत प्रधान

**संदर्भ :**

१. *देशपांडे, अ.पां., संपादक; 'विज्ञान आणि वैज्ञानिक'; मनोविकास प्रकाशन; २००५.*

***

ल



## वझे, गोपाळ हरी
**अभियंता**
**७ जून १९१७ - १० एप्रिल २००१**



गोपाळ हरी वझे यांचा जन्म विजापूर येथे झाला आणि तेथील सरकारी विद्यालयात त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाले. नंतर महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते मुंबईत आले. सेंट झेविअर्स महाविद्यालयात शिकून ते टाटा मूलभूत संशोधन संस्थेत 'संशोधन साहाय्यक' म्हणून रुजू झाले.

दुसऱ्या महायुद्धाच्या शेवटी प्रलयंकारी अणुस्फोट हा भौतिक विज्ञानाच्या अभ्यासाचा आविष्कार होता व नियंत्रित अणुविघटनातून मानवासाठी एक नवीन ऊर्जास्रोत विकसित करणे शक्य आहे, अशी आशा निर्माण झाली.

विज्ञानातील मूलतत्त्वांवर, विशेषत: अणुविज्ञानाबाबत संशोधन करणारे केंद्र भारतात असावे अशी जाणीव, भारताच्या अणू कार्यक्रमाचे जनक डॉ.भाभा यांना झाली. उद्योगपती जे.आर.डी. टाटा ह्यांच्या प्रोत्साहनाने व भरीव मदतीने टाटा मूलभूत संशोधन संस्था १९४५ साली निर्माण झाली. त्या सुमारास मुंबई विद्यापीठातून एम.एस्सी. पदवी प्राप्त केलेले गोपाळ हरी वझे यांची संशोधन साहाय्यक म्हणून निवड झाली. सुरुवातीला त्यांचे शोधकार्य 'विश्वकिरणांचे स्वरूप' ह्याबाबत होते. याच विषयातील वझे यांचा शोधनिबंध 'फिजिक्स रिव्ह्यू' या आंतरराष्ट्रीय जर्नलमध्ये १९४८ साली प्रसिद्ध झाला. संस्थेने वझे यांना मावर्न (इंग्लंड) येथे 'इलेक्ट्रॉनिक्स इंस्ट्रुमेंट'संबंधी प्रशिक्षणाची संधी १९५० - १९५१ मध्ये दिली. 'अणुऊर्जा' ह्या विषयाचे अनन्यसाधारण महत्त्व लक्षात घेऊन भारत सरकारने अस्तित्वात असलेल्या अणुऊर्जा विभागांतर्गत अणुऊर्जा आस्थापना, तुर्भे (डिपार्टमेन्ट ऑफ अॅटॉमिक एनर्जी) हे केंद्र कार्यान्वित केले.

स्वदेशी अणुभट्टी तयार करण्यासाठी या केंद्रात वेगवेगळी 'हेल्थ फिजिक्स इंस्ट्रुमेंट' विकसित करण्याचे काम संशोधन अधिकारी त्या वेळी वेगाने करीत होते. तिच्या नियंत्रणाची यंत्र योजना विकसित करून कार्यान्वित करण्यासाठी तज्ज्ञांचा एक चमू स्थापन केला होता. वझे त्यात एक सभासद होते. क्लाउड चेंबरसारखी उपकरणे बनवण्यासाठी त्यांच्याबरोबर गोपाळ शाहीयार, प्रा.श्रीकांतन होते. टाटा संस्थेमध्ये त्यांना डॉ.कोसंबी, डॉ.भाभा, डॉ.मसानी यांच्या ज्ञानाचा लाभ मिळाला होता.

१९६३ साली वझे, इलेक्ट्रॉनिक्स विभागाचे प्रमुख झाले. सायरस, प्लूटोनियम प्लांट, प्लूटोनियम प्रयोगशाळा, रेडिओलॉजिकल प्रयोगशाळा, तारापूर अणुवीज केंद्र, आयसोटोप वापरणारे संरक्षण दल, असे कितीतरी प्रकल्प एकापाठोपाठ एक उभे राहत होते. 'फिल्म रेझिस्टन्स', 'टेंट्रालम कण्डेन्सर', 'सर्वो कंपोनंट्स', 'ट्रान्झिस्टर्स' यांसारख्या इलेक्ट्रॉनिक्स वस्तू, 'गीगर मूलर ट्यूब', विकिरण मापन करणारे उपयुक्त 'रेडिएशन डिटेक्टर' तयार करण्याचे तंत्रज्ञान वझे यांच्या मार्गदर्शनाखाली विकसित केले गेले. 'मेडिकल स्पेक्ट्रोमीटर', 'स्कॅनर', 'रेनोग्राफी', 'न्यूक्लियर इन्स्ट्रुमेंट' विकसित करून त्याचे तंत्रमंत्र उद्योगधंद्यात पोहोचवण्याचे कार्य त्यांनी केले. न्यूट्रॉन, थर्मल न्यूट्रॉन, तसेच गामा किरणांची तीव्रता यांचे अचूक मापन, त्याचे

मानकीकरण ह्या बाबतीत संशोधन प्रणाली इलेक्ट्रॉनिक विभागात विकसित करण्यात आल्या.

असे चौफेर संशोधन करणारे विविध तंत्रज्ञ तयार करून त्यांनी अणुविज्ञानात प्रगती केली. त्यांच्या मार्गदर्शनाखाली अनेक तंत्रज्ञांचे सुमारे १७० शोधनिबंध वेगवेगळ्या नियतकालिकांमध्ये प्रसिद्ध झाले आहेत. वझे यांनी जिनिव्हा (१९५८), व्हिएन्ना (१९६०), बेलग्रेड (१९६१) आणि फ्रान्स (१९७०) या महत्त्वाच्या आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये भाग घेतला होता.

निवृत्त झाल्यावर त्यांनी चेंबूर येथील ‘विवेकानंद अभियांत्रिकी महाविद्यालया’त प्राचार्य म्हणून बरीच वर्षे अध्यापनाचे कार्य केले. अणुकेंद्रातील बहुमोल अनुभवाचा फायदा नवीन पिढीला देण्याची त्यांना संधी मिळाली. मध्य मुंबई मराठी विज्ञान संघाला त्यांनी सहा वर्षे अध्यक्ष म्हणून मार्गदर्शन केले.

तारापूरच्या अणुविद्युत केंद्राचे काम ‘जनरल इलेक्ट्रिक ह्या जगप्रसिद्ध कंपनीला दिलेले होते. त्या प्रसंगी डॉ.भाभा म्हणाले होते की, ही अणुभट्टी बांधत असताना भारतीय तंत्रज्ञांचा सहभाग असेल. त्यामुळे भविष्यकाळात अणुऊर्जा प्रकल्प उभे करताना परदेशी तंत्रज्ञांची मदत अगदी कमी भासेल. हे सर्व तंत्रज्ञ भारतातच उपलब्ध असतील. गोपाळ हरी वझे आणि तितक्याच तोलामोलाच्या तंत्रज्ञांनी खरोखरच अशी ‘भारतीय फौज’ उभी केली, ह्याची साक्ष आता उभे असलेले अणुप्रकल्प देत आहेत.

वझे यांनी संरक्षण दलातील क्षेपणास्त्र यंत्रणेतील अचूकता अजमावण्यासाठी किरणोत्सारी समस्थानिक वापरून तयार केलेली मापनपद्धती विकसित केली. तसेच, रेल्वे रुळाची देखभाल व सुरक्षिततेचे सर्व मुद्दे चालत्या गाडीतून तपासण्याची मापनयंत्रे (जसे रुळाची समांतरता, वळणावरील रुळांची वक्रता व समांतरता, संतुलन, भक्कमपणा इत्यादी) विकसित केली. तसेच, प्रत्यक्ष बुलेट न वापरता, लेझर शलाका वापरून सरावासाठी उपयोगी रायफलसदृश यंत्रे विकसित केली.

— स. वा. काळे

## वर्तक, वामन दत्तात्रेय

**वनस्पतीशास्त्रज्ञ**

**१९ नोव्हेंबर १९२५ - १७ एप्रिल २००१**



डॉ. वामन दत्तात्रेय वर्तक यांचा जन्म पुण्याजवळच्या भोर संस्थानात झाला आणि शिक्षण पुण्यात झाले. फर्गसन महाविद्यालयामध्ये शिकत असताना, प्रा. आपटे आणि प्रा. कोल्हटकर यांच्यामुळे त्यांना वनस्पतिशास्त्राची गोडी लागली. पुणे परिसर, गोव्यापर्यंतची सह्याद्री पर्वतराजी, येथे ते झाडे बघत-अभ्यासत फिरले. फर्गसन महाविद्यालयामध्ये दहा वर्षे शिकवल्यावर त्यांनी डॉ. आघारकर आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी नुकत्याच सुरू केलेल्या विज्ञानवर्धिनीत संशोधक म्हणून प्रवेश केला. डॉ. आघारकर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी सायपेरसी या वनस्पतिसमूहावर पीएच.डी.चा प्रबंध लिहिला. डॉ. आघारकर आणि त्यानंतरचे संचालक डॉ. देवडीकर या दोघांचा वर्तक यांच्या पुढील कारकिर्दीवर फार चांगला परिणाम झाला. काही काळानंतर वर्तक वनस्पतिशास्त्र विभागाचे प्रमुख झाले आणि पुढे त्याच संस्थेचे संचालक म्हणून निवृत्त झाले.

जिथे वनस्पती नैसर्गिकरीत्या उगवतात, त्या स्थळावर जाऊन त्यांचे निरीक्षण करणे, त्यांचे शास्त्रशुद्ध वर्णन करणे आणि नाव ओळखणे, या विषयांमध्ये वर्तक यांचा हातखंडा होता. गोळा केलेल्या वनस्पतींचे कागदावर चिकटवलेले/ शिवलेले सुमारे १५,००० नमुने, सुटे १२,००० नमुने आणि बाटल्यांतून साठवलेले १००० नमुने ही त्यांनी गोळा केलेल्या वनस्पतींची समृद्धी त्यांच्या अथक परिश्रमांची परिणती आहे. या वनस्पती नमुन्यांपैकी बऱ्याच वनस्पतींची शास्त्रीय वर्णने, त्यांचे शंभरावर शोधनिबंध, त्यांनी मार्गदर्शन केलेले सोळा पीएच.डी. प्रबंध आणि एक पुस्तक यांत मिळते. गोव्यातील वनस्पतींवर १९६६ साली लिहिलेले पुस्तक

'गोमांतकातील वनश्री' संदर्भग्रंथ म्हणून महत्त्वाचे ठरले आहे. भेरली माड (कारयोटा युरेन्स-फिशटेल पाल्म) या झाडाबद्दल त्यांना विशेष आत्मीयता होती. संपूर्ण सह्याद्री भ्रमणानंतर हे आज शोभेचे ठरलेले झाड, मूळचे रत्नागिरीच्या डोंगरांतले असावे, असे त्यांचे मत होते.

वर्तकांचे संशोधन पथदर्शी ठरण्याचे कारण हे की, वनस्पती ओळखून नोंद केल्यावर ते त्या वनस्पतींचा औषधी व इतर उपयोग, पारंपरिक उपयुक्तता आणि वनवासींची त्या औषधी वापरण्याची पद्धत या गोष्टींचीही नोंद करत. ज्या ठिकाणी त्या वनस्पती उगवतात, ती ठिकाणे रक्षण्याची निकडही ते सांगत. वनवासी लोकांनी वनौषधी संवर्धनासाठी बाणलेल्या पद्धती यांकडे वर्तक यांच्या अभ्यासामुळे जगाचे लक्ष वेधले आणि देवराई (देवाच्या नावाने राखून ठेवलेली वने) ही वनस्पतींच्या संवर्धनाची नैसर्गिक पद्धत असते, या त्यांच्या विचाराला जगन्मान्यता मिळाली. पुण्याजवळील पानशेत येथील देवरायांपासून सुरुवात करत त्यांनी सह्याद्रीतील अनेक देवरायांचा अभ्यास केला, त्यांतील औषधी आणि एरवीही उपयुक्त वनस्पतींचा अभ्यास केला आणि तेथील वनवासींच्या सवयींचे नाते जोडून एथ्नोबॉटनी या विषयांतील जे महत्त्वाचे योगदान दिले, ते पथदर्शी मानले जाते.

वर्तकांना जे.डब्ल्यू.हर्षबेर्गेर सुवर्णपदकाने गौरविण्यात आले आहे. त्यांच्या सन्मानार्थ दोन वनस्पतींना त्यांचे नाव देण्यात आले आहे. पर्मोटेमा वर्तकी हाले हे लायकेन आणि इझाडिराक्ट्रा इंडिका ए. एस. वर्तकी हा कडुलिंबाचा प्रकार. भारताचा वनस्पती सर्वेक्षण विभाग, राज्याचा वनविभाग यांच्या सल्लागार समित्यांवर त्यांना मानाचे स्थान होते. फर्गसन महाविद्यालयाचे समृद्ध वनस्पती उद्यान ही त्यांच्याच क्रियाशीलतेची साक्ष आहे.

आपल्या संशोधनावर आधारित, पण सर्वसाधारण वाचकास समजेल, असे अनेक लेख त्यांनी मराठीत लिहिले आहेत. त्यांची आकाशवाणीवरील भाषणेही सोप्या भाषेत असल्याने त्यांना चांगला श्रोतृवर्ग लाभे. पुण्याच्या वरिष्ठ नागरिकांना विद्यापीठाच्या वनस्पती उद्यानांतील झाडांची माहिती देत फिरण्याची पद्धत त्यांनी आयुष्याच्या अखेरपर्यंत चालू ठेवली होती.

– डॉ. शरद चाफेकर

**संदर्भ :**

१. *तेहेतिसावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; पुणे, १९९८.*

२. *मराठी विज्ञान परिषद पत्रिका; मे २००१.*

## वाडिया, आर्देशीर करसेटजी

**जहाजअभियंता**

**६ ऑक्टोबर १८०८ - १६ नोव्हेंबर १८७७**

☞ **मुख्य नोंद उद्योग खंड**



लंडन येथील रॉयल सोसायटीचे पहिले भारतीय फेलो म्हणून २७ मे १८४१ रोजी निवडले गेलेले आर्देशीर करसेटजी वाडिया मुंबईतील एक सागरी अभियंता होते. एस. रामानुजन हे गणितज्ञ रॉयल सोसायटीचे फेलो होण्याआधी ७५ वर्षे वाडिया फेलो झाले होते.

वाडियांचे कुटुंब जहाजबांधणी क्षेत्रात अग्रेसर होते आणि त्यांनी या क्षेत्रात ब्रिटिशांची खूप सेवा केली होती. या घराण्याचे संस्थापक कौजी नुसरवानजी (वाडिया) सुरत गोदीत सुतार होते. एक नवीन गोदी तयार करण्यासाठी त्यांना मुंबईला आणण्यात आले. मलबारी सागवान लाकूड आणि स्थानिक कारागिरीच्या बळावर मुंबई जहाजबांधणीचे एक प्रमुख केंद्र बनले. जहाजबांधणी व्यवसायातून वाडिया कुटुंबाला मोठा मानमरातब मिळाला. सरकारने या कुटुंबाला चांदीच्या वस्तू, शाली आणि हुद्यांबरोबरच जहागिरीही इनाम दिल्या.

वाफेवर चालणाऱ्या इंजिनामुळे जहाजबांधणी उद्योगास कलाटणी मिळण्यास सुरुवात झाली. त्याच वेळी एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्याच दशकात

व

वाडियांचा जन्म मुंबईमध्ये झाला. नौवहनात क्रांती घडविणाऱ्या वाफेच्या यंत्रसामग्रीमध्ये वाडियांना जहाजबांधणीपेक्षा जास्त रस होता. म्हणूनच उत्तम नौकांच्या बांधणीचे अधीक्षक म्हणून काम करण्याऐवजी टाकसाळ अभियंता (मिंट इंजिनिअर) म्हणून त्यांनी काम सुरूकेले. या कामातून मिळणाऱ्या फावल्या वेळेत त्यांनी वाफेच्या यंत्रसामग्रीचा अभ्यास करण्यास आणि फाउण्ड्री व्यवसायात लक्ष घालण्यास सुरुवात केली.

लवकरच एक अश्वशक्तीचे इंजीन तयार करून त्यांनी आपली क्षमता सिद्ध करत आपल्या जागेत त्याची उभारणी केली. त्याचा वापर करून विहिरीतल्या पाण्यास बाहेर खेचून छोटे कारंजे सुरू केले. भारतामध्ये बनलेले हे पहिले इंजीन होते आणि ते एका दशकाहून अधिक काळ उत्तम प्रकारे चालले. १८३३ साली वाडियांनी इंग्लंडहून १० अश्वशक्तीचे इंजीन मिळवले आणि 'इंडस' नावाच्या बोटीस बसवले. इंजीन आणि बोट दोन्हींसाठीचे पैसे त्यांच्या वडिलांनी पुरवले. 'ट्युलिंड्स' ह्या पहिल्या स्टीमरनंतर चार वर्षांनी 'इंडस' हे दुसरे स्टीमर मुंबईत बांधण्यात आले. त्यानंतर मुंबई इलाख्याच्या सरकारने ते खरेदी केले. वाडियांना त्यांच्या प्रयत्नांचे फळ मिळाले. ऑक्टोबर १८३३ मध्ये त्यांना माझगाव गोदीत सहायक बांधणीतज्ज्ञाचे (असिस्टंट बिल्डर) पद बहाल करण्यात आले. सागरी अधीक्षकांच्या शिफारशीने खास वाडियांसाठी हे पद निर्माण करण्यात आले होते.

वाडियांनी स्वत:च्या राहत्या घरी अत्यंत फायद्यातील फाउण्ड्री सुरूच ठेवली होती. त्यांनी २२,००० लिटरहून अधिक क्षमतेच्या जहाजांसहित विविध प्रकारच्या जहाजांसाठी घडीव लोखंडाच्या टाक्या बनविल्या.

१८३४ साली त्यांनी गॅसचा उपयोग करून प्रकाश यंत्रणा उभारून स्वत:चा माझगाव येथील बागबगिचा आणि बंगला प्रकाशमान केला. तत्कालीन मुंबई इलाख्याच्या गव्हर्नरांनी त्यांना मानाची वस्त्रे प्रदान करून सन्मानित केले. त्याचबरोबर, ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालक मंडळाच्या नजरेसदेखील ही बाब आणली.

नुकत्याच स्थापन झालेल्या एल्फिन्स्टन संस्थेने करसेटजींच्या अंशकालिक सेवांची मागणी केली. संस्थेकडे गणित, खगोलशास्त्र आणि 'नॅचरल फिलॉसॉफी' (विज्ञान) चे ब्रिटिश प्राध्यापक होते; पण व्यावहारिक प्रायोगिक विज्ञानासाठी कोणीही नव्हते. स्थानिकांना शिकविण्यासाठी वाडियांना यांत्रिकी आणि रसायन विज्ञान विषय देण्यात आले. तीन वर्षांनी रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ इंग्लंडचे अनिवासी सदस्य म्हणून त्यांची निवड झाली.

वाडियांनी इंग्लंडमध्ये जाऊन वाफेवर चालणाऱ्या इंजिनाबाबतचे स्वत:चे ज्ञान वाढविण्याचा निर्णय घेतला. त्यासाठी त्यांना सरकारच्या परवानगीची गरज होती. परंतु, त्यांचे मुंबईहून प्रयाण नियोजित दिवसापेक्षा खूपच लांबले. प्रथम ते चीनला जाऊन आले. त्यानंतर एका शासकीय जहाजावर त्यांची मोफत सोय करण्यात आली, पण त्या वेळी ते आजारी पडले. एका वर्षानंतर १००० रुपये भरून त्यांनी त्याच बोटीतून प्रवास केला.

ते कर्मठ वृत्तीचे असल्यामुळे केवळ पारशांच्याच हातचे अन्न ग्रहण करत, म्हणून त्यांनी नोकरही बरोबर घेतले होते. ते कोणत्याही बिगर पारश्याच्या सोबतीने जेवत नसत. इंग्लंडमध्ये पोहोचल्यावर त्यांनी स्वत:च्या मानास योग्य प्रकारच्या राहणीमान भत्त्याची मागणी संचालक मंडळाकडे केली. त्यांना मुंबईच्या मासिक ७९ रुपयांच्या पगारासह वार्षिक एक पौंडाचा भत्ता मंजूर करण्यात आला. इंग्लंडमधील त्यांच्या वास्तव्यात केवळ वाफेवर चालणाऱ्या इंजिनाचा अभ्यास एवढेच मर्यादित उद्दिष्ट न ठेवता, त्यांनी अनेक गोष्टींमध्ये भाग घेतला. त्यांनी संसदेच्या हाउस ऑफ कॉमन्सच्या अफूविषयक बैठकीत कंपनीच्या धोरणाविरुद्ध मत व्यक्त केले.

त्यांना लंडन फारसे आवडले नाही. तिथली शाही टाकसाळ त्यांना मुंबईच्या तुलनेत हलक्या दर्जाची वाटली. तिथले रस्ते मुंबईच्या तुलनेत हलक्या दर्जाचे वाटले. व्यावसायिकदृष्ट्या विचार करता, वाडियांचा ब्रिटिश दौरा यशस्वी ठरला. ते 'इन्स्टिट्यूशन ऑफ सिव्हिल इंजिनिअर्स'चे सदस्य झाले. त्यांनी 'सोसायटी

ऑफ आर्ट्स ॲण्ड सायन्स'चे सदस्यत्व घेतले. त्याच वेळी 'ब्रिटिश असोसिएशन ऑफ द ॲडव्हान्समेंट ऑफ सायन्सचे'ही ते सभासद झाले. कंपनीच्या मुंबई येथील स्टीम फॅक्टरी आणि फाउण्ड्रीमध्ये मुख्य अभियंता आणि यंत्र निरीक्षक म्हणून दरमहा ६०० रुपये पगारावर त्यांची नियुक्ती झाली. त्याच वेळी ते रॉयल सोसायटीचे फेलो म्हणून निवडले गेले. त्यांचे नाव काही प्रतिष्ठित व्यक्तींनी सुचवले होते.

१९१८ साली जेव्हा रामानुजन फेलो म्हणून निवडले गेले, तेव्हा अनेक प्रतिष्ठित शास्त्रज्ञांचा समावेश असलेल्या रॉयल सोसायटीची वैज्ञानिक संस्था म्हणून प्रतिमा निर्माण झाली होती. मात्र, एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस तशी स्थिती नव्हती. रॉयल सोसायटी 'नैसर्गिक इतिहासात रुची असणाऱ्या' उच्चभ्रू लोकांचा एक क्लब होता. त्यांना गणित आणि अभियांत्रिकीत रुची होती आणि विविध प्रकारच्या प्रयोगशील तत्त्वज्ञानाची आवड होती. सोसायटीच्या तत्कालीन मापदंडांनुसार वाडियांचे वर्गीकरण एक अलौकिक अभियंते आणि विज्ञानाशी संलग्न असलेले आणि त्याचा प्रसार करण्यासाठी उत्सुक असलेले गृहस्थ म्हणून झाले असावे.

दरम्यानच्या काळात ते भारतात परतले आणि १ एप्रिल, १९४१ रोजी त्यांनी नवीन कार्यभार स्वीकारला. युरोपियन लोकांपेक्षा वरच्या हुद्यांवर नियुक्त झालेले ते पहिले स्वदेशीय स्थायिक होते. त्यामुळे युरोपीयांना ही बाब सलू लागली. 'बॉम्बे टाइम्स' या तत्कालीन वसाहतवादी शासकांची बाजू घेणाऱ्या वर्तमानपत्राला हे अजिबात आवडले नाही. त्यांनी तसे मत वृत्तपत्रातून व्यक्त केले देखील. वाडियांनी या कामात आपली चमक दाखवली. त्यांनी अमेरिकेला भेट देऊन मुंबईला पाठविण्यासाठी लाकूड कापण्याच्या यंत्रांची निवड केली.

फेब्रुवारी १८५१ मध्ये त्यांनी लौजी फॅमिली नावाचे एक ८० टनांचे स्टीमर तयार केले. याचे वैशिष्ट्य असे की, त्याच्या प्रत्येक घटकाची निर्मिती स्वदेशी तंत्रज्ञानाद्वारे आर्देशीर वाडियांच्या स्वत:च्या घरी असलेल्या स्वत:च्या मालकीच्या फाउण्ड्रीत करण्यात आली. नंतर त्यांनी मुंबईकरांना शिवणयंत्र, फोटोग्राफी आणि इलेक्ट्रोप्लेटिंगचा परिचय घडवला. १८५५ साली त्यांची 'जस्टीस ऑफ पीस' म्हणून निवड करण्यात आली. त्यांच्या स्मरणार्थ पोस्ट खात्याने 'पायोनियर' व 'इनोव्हेटर' या शीर्षकाची तिकिटे काढली होती. आर्देशीर करसेटजी वाडिया यांचा मृत्यू इंग्लंडमधील रिचमंड येथे झाला.

— शैलेश माळोदे

***संदर्भ :***

*१. शर्मा, कोलेगाला - फोंडके, बाळ, संपादक; 'अचिव्हमेंटस् इन ॲनॉनिमिटी'; निस्कॉम; १९९७.*

## वाडिया, अवाबाई बोमजी

**वैद्यकशास्त्रज्ञ**

**१८ सप्टेंबर १९१३ - ११ जुलै २००५**



डॉ. अवाबाई वाडिया यांचा जन्म श्रीलंकेतील कोलंबोमध्ये, १९१३ साली, एका पारशी कुटुंबात झाला. त्यांचे वडील बोटीच्या एका व्यापारी मंडळात (कंपनीत) होते, त्यामुळे त्यांना समुद्राविषयी प्रथमपासूनच ओढ होती. त्यांची आई कणखर वृत्तीची आणि शिकण्याची दृढ इच्छा असलेली स्त्री होती. त्यांनी थिऑसॉफिकल सोसायटीची कोलंबोतील शाखा सुरू करण्यात महत्त्वाचा वाटा उचलला होता. अवाबाईंमध्ये आईकडून दृढ इच्छा आणि अथक परिश्रम हे गुण आले. वयाच्या एकोणिसाव्या वर्षी श्रीलंकेत वकिलीची परीक्षा उत्तीर्ण करणाऱ्या त्या पहिल्या महिला होत. फारशी वकिली न करता, त्यांनी आईच्या ओळखीने लंडनमध्ये, ब्रिटिश महिला संघटनेत कामाला सुरुवात केली. भारताच्या स्वातंत्र्यपूर्व काळात ब्रिटिश सरकारबरोबर होणाऱ्या

व




**वाडिया रुग्णालय**

लंडनमधील वाटाघाटीत गांधी, जीना आणि नेहरू यांच्यासह त्यांनी पण भाग घेतला होता. १९४१ साली त्या मुंबईत कायमच्या स्थायिक झाल्या. १९४६ साली त्यांचा विवाह डॉ.बोमजी वाडिया यांच्याशी झाला, ते हावर्डमधील पहिले भारतीय पदवीधर होते.

अवाबाईंच्या ‘ऑल इंडिया वुमन्स कॉन्फरन्स’मधील कामामुळे कुटुंबनियोजनाविषयी खटले चालवणाऱ्या वकिलांच्या समूहाशी संबंध आला आणि त्यांच्या प्रजनन आरोग्य आणि हक्क यांविषयांच्या कळकळीमुळे १९४९ साली फॅमिली प्लॅनिंग असोसिएशन ऑफ इंडिया (एफ.पी.ए.आय.) स्थापन करण्यात त्यांचा मुख्य सहभाग होता. भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पंचवार्षिक योजनेत कुटुंबनियोजनाचा समावेश करण्यात डॉ.अवाबाईंचे अथक परिश्रम कारणीभूत होते. ‘एफ.पी.ए.आय.’ या बिगरसरकारी किंवा स्वायत्त संघटनेला ‘यु.एन. पॉप्युलेशन’चा पुरस्कार १९८५ साली तर तिसऱ्या जगातील पुरस्कार १९८७ साली मिळाला.

त्यांच्या नेतृत्वाखाली इंटरनॅशनल प्लॅन्ड पेरेंटहूड फेडरेशनचे (आय.पी.पी.एफ.) कार्य बहरले. त्यांना १९७१ साली पद्मश्री आणि १९८१ साली पद्मभूषण हे किताब सरकारने त्यांच्या कुटुंबनियोजनातील कार्याबद्दल दिले. तसेच, ‘इंटरनॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ पॉप्युलेशन स्टडीज’ने त्यांना ‘डॉक्टरेट’ ही पदवी बहाल केली.

त्या उत्कृष्ट वक्त्या आणि उत्तम लेखिका होत्या. ‘द लाइट इज अवर्स’ हे त्यांनी लिहिलेले आत्मचरित्र म्हणजे दुसऱ्या महायुद्धानंतरची सामाजिक क्रांती सांगणारे पुस्तक आहे. १९९४ साली कैरोत झालेल्या आंतरराष्ट्रीय लोकसंख्या परिषदेत त्यांनी सांगितले की, ‘‘वसुधैव कुटुंबकम्-जग हे एक कुटुंब आहे, मानवजात एक आहे. सर्व माणसांनी जात, धर्म, पंथ, वंश, तसेच लिंग विसरून एकत्र काम करणे जरुरीचे आहे.’’ त्यांनी आपले सर्व जीवन सामाजिक कार्यासाठी वाहिले. त्यांचा मृत्यू ११ जुलै २००५ रोजी जागतिक लोकसंख्या दिनाच्या दिवशीच व्हावा हा योगायोगच.

– डॉ.तरला नांदेडकर

## वाडेगावकर, विश्वनाथ नारायण

**मुद्रक, संपादक**

**२१ जानेवारी, १९०६ - २२ फेब्रुवारी १९९६**



उद्यममहर्षी विश्वनाथ नारायण वाडेगावकर यांचा जन्म जबलपूर येथे झाला. त्यांचे वडील रावबहादूर नारायण दाजिबा वाडेगावकर हे मध्य प्रांतातील ॲडिशनल ज्युडिशियल कमिशनर होते.

त्यांचे शालेय शिक्षण पटवर्धन हायस्कूल, नागपूर येथे झाले. वकिलांचा मुलगा वकील व डॉक्टरांचा मुलगा डॉक्टर होण्याच्या त्या काळात वाडेगावकरांनी कायदा किंवा संस्कृत हे विषय न घेता, इंडस्ट्रियल केमिस्ट्री हा विषय घेऊन बनारस हिंदू विद्यापीठातून बी.एस्सी. पदवी १९२८ साली मिळवली.

महादेव कृष्णा पाध्ये ह्यांनी ‘उद्यम’ मासिक १९१९ साली सुरू केले होते. १९३० साली वाडेगावकरांनी ‘उद्यम’मध्ये काम करण्यास सुरुवात केली. योग्य वेळी पाध्यांनी सर्व कारभार त्यांच्यावर सोपविला.

१९३२ साली ‘उद्यम कमर्शियल प्रेस’ची सुरुवात झाली. १९४६ साली ‘उद्यम’ची हिंदी आवृत्ती निघू लागली. संपादक म्हणून वाडेगावकर फार शिस्तीचे व ध्येयवादी होते. जे तंत्रशुद्ध, शास्त्रसंमत, उपयुक्त आणि मार्गदर्शक असेल, तेच ‘उद्यम’मध्ये छापले जात असे.

व




**‘उद्यम’चे मुखपृष्ठ**

तेथे येणारा प्रत्येक मजकूर शुद्ध केला जाई. लेखकांना शुद्धलेखनाच्या नियमांचे पुस्तक धाडणारा हा संपादक. मासिकांचे विशेषांक काढायची मूळ संकल्पना त्यांचीच. जानेवारी १९३२ चा शास्त्रीय विशेषांक, जुलैचा नागपूर विशेषांक, जानेवारी १९३३ चा दानशूर डी. लक्ष्मीनारायण विशेषांक अशा विशेषांकांनी सुरुवात करून नंतर त्यांनी छायाचित्रण, भाजीपाला, गच्चीवरील बाग, घरगुती काटकसर, पर्यटन, छंद, व्यायाम, सुखी जीवन, घरबांधणी, आजाऱ्यांची शुश्रूषा, सौंदर्यप्रसाधने, असे अनेक विशेषांक काढले. त्याशिवाय दिवाळी अंक दरवर्षी निघत असत ते वेगळे. ‘उद्यम’ची धंदेविषयक, शेतीविषयक प्रकाशने ही आणखी एक विशेष बाब. काही पुस्तके इतकी लोकप्रिय, की त्यांच्या आठ ते दहा आवृत्त्या निघाल्या. अशी प्रकाशने काही शेकड्यांच्या घरात आहेत.

ते जसे चुकांबद्दल कोणाची गय करीत नसत, तसेच चांगल्या कामाबद्दल, चांगल्या लेखनाबद्दल प्रशंसेची पावती दिल्याखेरीज राहत नसत. गुळमुळीतपणा त्यांना रुचायचा नाही. अंमलबजावणीत काटेकोरपणाची अपेक्षा असायची; कारण ते स्वत: जे बोलत तेच करत, व जे करत तेच बोलत. त्यांनी रोटरी क्लब, मराठी विज्ञान परिषद, नागपूर शाखा यांचे अध्यक्षपद भूषविले. तसेच, नवसमाज लि., नागपूर, जे ‘नागपूर टाइम्स’ व ‘नागपूर पत्रिका’ प्रकाशित करीत, त्यांचे ते संचालक होते. मराठी विज्ञान परिषदेच्या, १९६६ साली मुंबई येथे भरलेल्या पहिल्याच संमेलनात, ‘उद्यम’ मासिकाचा त्याच्या उत्तम कामगिरीसाठी सन्मान करण्यात आला होता. याशिवाय त्यांना बागबगिचा, लिखाण, वाचन व फिरणे यांची अतिशय आवड होती.

अशा या उद्यमशील व्यक्तिमत्त्वाचा शेवटही त्यांच्या वयाच्या नव्वदाव्या वर्षी ‘उद्यम’ या त्यांच्या राहत्या घरीच, शांतपणे झाला.

– प्रा. अविनाश सेनाड

**संदर्भ :**

*१. पहिले अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका, मुंबई; १९६६*

## वालचंद हिराचंद

☞ **दोशी, वालचंद हिराचंद**

## विश्वेश्वरैय्या

☞ **मोक्षगुंडम, विश्वेश्वरया**

## वेंकटरामन

☞ **के. वेंकटरामन**

## वेंकटवर्धन, व्ही.एस.

**खगोल शास्त्रज्ञ**

**१ सप्टेंबर १९३८**



खगोलभौतिकी विषयातील संशोधक असलेले डॉ.व्ही.एस. वेंकटवर्धन यांचा जन्म तामीळनाडूच्या सालेम गावी झाला. तेथेच शालेय शिक्षण घेतल्यानंतर मद्रास (आता चेन्नई) विद्यापीठातून भौतिकी विषयात एम.एस्सी. केल्यावर ते मुंबईत त्यांची अणुशक्ती मंडळाच्या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी निवड झाली. १९६१ सालच्या या केंद्राच्या पाचव्या तुकडीतील विद्यार्थी असलेल्या वेंकटवर्धन यांचे एक वर्षाचे प्रशिक्षण संपल्यानंतर १९६२ साली ते टाटा मूलभूत संशोधन संस्थेत (टी.आय.एफ.आर.) संशोधक म्हणून कामाला लागले. त्यांनी १९७० साली प्रा. देवेंद्र लाल यांच्या मार्गदर्शनाखाली मुंबई विद्यापीठातून पीएच.डी. केली.

पीएच.डी.च्या त्यांच्या संशोधनाचा विषय 'आयसोटोपिक चेंजेस इन्ड्यूस्ड बाय कॉस्मिक रेज इन इंटरप्लॅनेटरी मॅटर' असा होता. दोन ग्रहांमधील अवकाशात निव्वळ पोकळी नसून तेथेही अनेक प्रक्रिया सतत होत असतात या त्यांच्या निरीक्षणामुळे खगोलशास्त्रातील त्यांची आवड वाढीसच लागली. १९६२ ते १९७९ या सतरा वर्षांच्या काळात त्यांनी टी.आय.एफ.आर.मध्ये भूभौतिकी, वैश्विक किरण (कॉस्मिक रेज), अशनी, चंद्र आणि वेगवेगळ्या ग्रहांचे भौतिकशास्त्र यांवर संशोधन केले. अपोलो मोहिमेने चंद्रावरून आणलेल्या खडकांवर अमेरिकेच्या 'नासा'मध्ये जे संशोधन चालू होते, त्यावर टी.आय.एफ.आर.तर्फे ते समन्वयक म्हणून काम करीत होते. 'नासा'च्या 'स्कायलॅब' अंतराळ प्रकल्पात त्यांनी सौर आणि दीर्घकीय वैश्विक किरणांवर संशोधन केले.

ग्रहांचे भौतिकशास्त्र, वैश्विक किरण, क्वार्क, बोसॉन आणि पदार्थ हे भौतिकीतील गहन विषय वेंकटवर्धन यांच्याकडून ऐकताना खूप सोपे वाटतात. त्याचे कारण, त्यांचा त्या विषयाचा व्यासंग खूप मोठा आहे. वेंकटवर्धन हे उत्तम विज्ञान प्रसारक आहेत.

१९७९ ते १९९७ अशी १८ वर्षे मुंबईच्या नेहरू तारांगणाचे ते संचालक होते. नेहरू केंद्राच्या 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया'चेही ते एप्रिल १९८३ ते नोव्हेंबर १९८४, अशी अडीच वर्षे प्रभारी संचालक होते. नेहरू तारांगणाच्या त्यांच्या अठरा वर्षांच्या संचालकपदाच्या कारकिर्दीत (१९७९-१९९७) त्यांनी तारांगणाचे एकोणीस कार्यक्रम तयार केले. त्या सर्व कार्यक्रमांची संहिता त्यांनी स्वत: तर लिहिलीच, पण त्याचे दिग्दर्शनही त्यांनी स्वत: केले. त्यात गॅलिलिओपासून गॅलिलिओ, नियतीशी भेट (ट्रिस्ट विथ डेस्टिनी), विश्वातील जीवन (कॉस्मिक लाइफ), विध्वंसक ब्रह्माण्ड (धिस व्हायोलंट युनिव्हर्स), खगोलशास्त्राची उत्क्रांती (इव्हॉल्यूशन ऑफ ॲस्ट्रॉनॉमी), सात पावलांत ब्रह्माण्ड (युनिव्हर्स इन सेव्हन स्टेप्स), धूमकेतूपासून ताऱ्यापर्यंत (कॉमेट्स टू स्टार्स), ए स्टार दॅट विल शाइन फॉर एव्हर, २५० वर्षांचे आकाश (स्काइज ऑफ २५० इयर्स), आकाशातील आतषबाजी (फायरवर्क्स इन स्पेस), जेव्हा दीर्घिकांची टक्कर होते (व्हेन गॅलॅक्सिज कोलाइड), विश्वाचे आत्मचरित्र (ऑटोबायॉग्राफी ऑफ द युनिव्हर्स), स्काय ऑफ २००० एडी, अर्थ इन द युनिव्हर्स, २० तेजस्वी तारे (ट्वेन्टी ब्राइट स्टार्स), स्टार्स इन द लाइम लाइट, अणूपासून ताऱ्यापर्यंत (ॲटम टू स्टार्स) इत्यादी कार्यक्रम आहेत. डॉ.वेंकटवर्धन खगोलशास्त्रावर सामान्य लोकांना समजेल अशा भाषेत, अनेक ठिकाणी जाऊन व्याख्याने देत असत.



नेहरू तारांगण

तारांगणात आकाशदर्शनाच्या कार्यक्रमांशिवाय भौतिकीच्या विद्यार्थ्यांची खगोलशास्त्रातील आवड वाढीला लावण्यासाठी त्यांनी अनेक कार्यक्रम सुरू करून दिले. त्यामुळे तरुण-तरुणींचा एक मोठा ओघ नेहरू तारांगणाकडे सुरू झाला. हा कार्यक्रम इतक्या मजबूत पायावर आधारलेला आहे, की वेंकटवर्धन तारांगणातून निवृत्त होऊन तेरा वर्षे होऊन गेली तरी तो अजून त्याच उत्साहात चालू आहे. एवढेच नव्हे, तर या कार्यक्रमाला येणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांनी विज्ञानात आपली कारकीर्द यशस्वीपणे चालू केली आहे.

१९९७ साली तारांगणातून निवृत्त झाल्यावर परत तामीळनाडूतील सालेम या आपल्या मूळ गावी जाऊन तेथील सोना कॉलेज ऑफ इंजिनिअरिंगमध्ये ते भौतिकी विषयाचे जे अध्यापन करू लागले.

डॉ. वेंकटवर्धन यांनी 'एक्स्प्लोरिंग युनिव्हर्स- द प्लॅनेटोरियम वे' या नावाचा एक चित्रपट बनवला आहे.

व

भारत सरकारच्या फिल्म्स डिव्हिजनतर्फे त्यांनी विज्ञानविषयक अनेक फिल्म्स बनवल्या. आकाशवाणी मुंबई केंद्रावरून त्यांनी सत्तरच्यावर भाषणे दिली, तर दूरदर्शनच्या मुंबई केंद्रावर चाळीस कार्यक्रमांत भाग घेतला.

जगातल्या अनेक आंतरराष्ट्रीय परिषदांत त्यांनी भाग घेऊन आपले निबंध सादर केले आहेत. डॉ.वेंकटवर्धन हे १९८६ ते १९९० या काळात चित्रपटांना प्रमाणपत्र देण्याच्या मध्यवर्ती समितीवर सभासद होते. १९८७ ते १९९० या काळात ते राष्ट्रीय विज्ञान संग्रहालय परिषदेच्या समितीवर होते. 'विद्यार्थ्यांना दर्जेदार शिक्षण कसे मिळेल' या नावाच्या विद्यापीठ अनुदान मंडळाच्या समितीचे ते सभासद होते. बंगळुरू, लखनौ, गोरखपूर इत्यादी ठिकाणच्या तारांगणाच्या समित्यांवर ते होते. १९८९ ते ९१ या काळात 'बॉम्बे असोसिएशन फॉर सायन्स एज्युकेशन' या संस्थेचे ते अध्यक्ष होते आणि त्याच काळात ते 'इंडियन फिजिक्स असोसिएशन'च्या मुंबई शाखेचे अध्यक्ष होते. असा त्यांचा सामाजिक कामाचा व्यापही दांडगा होता.

'इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमी'चा (इन्सा) विज्ञान प्रसारासाठी असलेला इंदिरा गांधी पुरस्कार त्यांना मिळाला आहे.

विज्ञान प्रसार आणि संशोधन, याशिवाय त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची आणखी एक ठळक बाजू म्हणजे त्यांचे कवितेचे अंग. ते एक उत्तम कवी आहेत आणि त्यांनी अनेक कविता केलेल्या आहेत.

– सुहास नाईक-साटम

✻✻✻

व



## शर्मा, मनमोहन
**रसायनशास्त्रज्ञ**
**१ मे १९३७**



डॉ. मनमोहन शर्मा यांचा जन्म जोधपूर येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण त्या काळात जोधपूर येथील महेश्वरी शाळेत, तसेच सरदार विद्यालयामध्येही झाले. जसवंत महाविद्यालय, जोधपूर येथून त्यांचे पदवीपर्यंतचे शिक्षण झाले. मुंबई विद्यापीठातून बी.ई. ही रसायन अभियांत्रिकीतील पदवी त्यांनी १९५८ साली, तसेच एम.टेक. ही पदवी १९६० साली संपादन केली. आपल्या विद्यार्थिदशेत त्यांना फुटबॉल व टेबल टेनिस या खेळांची आवड होती.

मुंबईच्या इन्स्टिट्यूट ऑफ केमिकल टेक्नॉलॉजीमध्ये (आय.सी.टी.) त्यांनी १९५८ साली आपल्या शास्त्रीय संशोधनाची सुरुवात केली. त्यानंतर ते केंब्रिज विद्यापीठात पुढील संशोधनाकरिता गेले व त्यांनी १९६४ साली पीएच.डी. ही पदवी मिळवली. आय.सी.टी. संस्थेमध्ये अध्यापक, प्राध्यापक, विभागप्रमुख इत्यादी पदांवर त्यांनी १९८९ सालापर्यंत काम केले व १९८९ साली ते आय.सी.टी.चे संचालक म्हणून काम पाहू लागले. वयाच्या अवघ्या सत्ताविसाव्या वर्षी ते प्राध्यापक झाले.

रसायन अभियांत्रिकीमधील सर्व शाखांमध्ये त्यांनी संशोधनाचे कार्य केले. रासायनिक प्रक्रिया घडत असताना संयंत्रांमधील सर्व घटकांच्या निरनिराळ्या टप्प्यांत होणाऱ्या हालचालींवरील (मास ट्रान्सफर) त्यांचे संशोधन जागतिक मान्यतेचे ठरले. निरनिराळ्या अवस्थांतील रसायनांच्या प्रक्रियांवरील संशोधन, उत्प्रेरक आणि त्याच्या विविध स्वरूपांचे परिणाम, ‘आयन प्रक्रिया उत्प्रेरक’ (आयन एक्स्चेंज कॅटॅलिस्ट) आणि रासायनिक प्रक्रियांतील विघटन या विषयांत त्यांनी मौलिक संशोधन केले.

गुंतागुंतीच्या दोन किंवा जास्त अवस्थेतील रासायनिक प्रक्रियांवर त्यांनी मूलभूत संशोधन केले व त्यायोगे अनुत्तरित प्रश्नांची उत्तरे मिळवली. त्यांनी मोजमापनाकरिता शोधून काढलेल्या नवीन पद्धतीने अतिशीघ्र रासायनिक क्रियांची गती मोजणे शक्य झाले. पदार्थाच्या रासायनिक संयंत्रात पदार्थांच्या शुद्धीकरणाकरिता पदार्थशोषण व त्याचे विघटन या क्रियांना फार महत्त्व असते व अशा प्रकारच्या प्रक्रियांना वरील मूलभूत संशोधनातून त्यांनी गणितिसूत्रे तयार केली. दोन द्रवपदार्थातील मिश्रण व त्याचा रासायनिक प्रक्रियेकरिता उपयोग या विषयांतही त्यांनी महत्त्वाचे संशोधन केले.

रासायनिक पदार्थांच्या शुद्धीकरणाकरिता उपयोगात येणाऱ्या प्रक्रिया ऊर्ध्वपतन, स्फटिकीकरण इत्यादींमध्ये नावीन्यपूर्ण संशोधन करून त्यांचा उपयोग रसायन अभियांत्रिकीमध्ये मोठ्या प्रमाणात केला.

डॉ. शर्मा हे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे रसायन अभियंता असून जगातील निरनिराळ्या विद्यापीठात त्यांनी अध्यापनाचे काम केले आहे. देशातील आणि देशाबाहेरील रसायन उद्योगाच्या बऱ्याच प्रकल्पांमध्ये त्यांच्या संशोधनाचा उपयोग केला जात आहे. त्यांनी लिहिलेली, त्यांच्या विषयातील पुस्तके जगभरातील




यु.डी.सी.टी.

विद्यापीठात वापरली जातात. त्यांना निरनिराळे पुरस्कार व मानद सभासदत्वे मिळाली.

शास्त्रीय संशोधनातील उत्कृष्ट कामगिरीकरिता भारत सरकारतर्फे 'शांती स्वरूप भटनागर' पुरस्कार ४५ वर्षांखालील संशोधकास दिला जातो. डॉ. शर्मा यांना हा पुरस्कार १९७३ साली त्यांच्या वयाच्या छत्तिसाव्या वर्षी मिळाला, तर ते ४५ वर्षांचे होण्याअगोदर त्यांच्या एका विद्यार्थ्यासही तो मिळाला. इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीतर्फे दिला जाणारा 'मेघनाथ साहा' पुरस्कार त्यांना १९९६ साली मिळाला. इंग्लंडच्या रॉयल सोसायटीतर्फे त्यांना १९८२ मध्ये 'फेलोशिप' देऊन त्यांचा सन्मान करण्यात आला. याच संस्थेतर्फे 'लिव्हरह्यूम पुरस्कार' त्यांना १९९६ साली देण्यात आला. त्यांना 'फेलो' म्हणून मान्यता देण्यात येणाऱ्या संस्था नॅशनल सायन्स अकॅडमी, इंडियन अकॅडमी ऑफ सायन्स, थर्ड वर्ल्ड अकॅडमी ऑफ सायन्स या होत्या. १९८५ साली त्यांना ओमप्रकाश भसीन पुरस्कार देण्यात आला. त्याच साली त्यांना विश्वकर्मा पुरस्कार मिळाला. 'जी.एम. मोदी सायन्स पुरस्कार १९९१ साली त्यांना मिळाला. त्यांनी केलेल्या संशोधन व शिक्षण क्षेत्रातील भरीव कार्याकरिता त्यांना १९८९ साली पद्मभूषण व २००१ साली पद्मविभूषण पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले.

त्यांनी आय.सी.टी.मध्ये संशोधन करत असतानाच एकंदर ७१ विद्यार्थ्यांना पीएच.डी. पदवीसाठी मार्गदर्शन केले. यांमध्ये डॉ. माशेलकर व डॉ. जे.बी. जोशींसारखे नामवंत संशोधकही होते. सध्या त्यांच्या या गुरुकुलातील चौथी पिढी कार्यरत आहे. केंब्रिज व मुंबई विद्यापीठात ते आपल्या कुशाग्र निरीक्षण व स्मरणशक्तीमुळे सर्वांस परिचित आहेत. १९६० सालापासून ४० वर्षे त्यांनी संस्थेच्या प्रगतीचे कार्य इतक्या सक्षमपणे केल्यामुळेच आज सर्व जगभर 'आय.सी.टी.'चे नाव एक अग्रगण्य शिक्षण संस्था, असे प्रसिद्ध झाले आहे. आज भारतातच नव्हे, तर जगभर त्यांचे विद्यार्थी 'आय.सी.टी.'चे, पर्यायाने त्यांनी सुरू केलेले संशोधनकार्य करीत आहेत. 'मेटोजीनिअस रिॲक्शन' या विषयावरील त्यांनी लिहिलेले दोन ग्रंथ आजही जगभर संशोधन व उद्योग क्षेत्रास मार्गदर्शक म्हणून प्रसिद्ध आहेत.

— डॉ. श्रीराम मनोहर

**संदर्भ :**

१. *भटनागर लॉरेटस् १९५८–१९९१; इंडियन नॅशनल सायन्स ॲकॅडमी.*

## शास्त्री, बापूदेव सीताराम

**गणितज्ज्ञ**

**२४ ऑक्टोबर १८१९ - ७ जून १८९०**

सीताराम शास्त्री व त्यांच्या पत्नी सत्यभामाबाई यांच्या पोटी बापूदेव यांचा जन्म कायगाव टोका या अहमदनगर जिल्ह्यातील गावी झाला. वडिलांनी मुलाचे नामकरण 'नृसिंह' असे केले. परंतु प्रेमापोटी सर्वजण त्याला 'बापू' या नावानेच संबोधित असत. लहानपणाच्या या नावानेच ते पुढे जीवनभर ओळखले



गेले. त्या काळच्या पद्धतीप्रमाणे बापूचे शिक्षण सुरू झाले. सुरुवातीस त्याने अष्टाध्यायी, पिंगलसूत्र, रूपावली, अमरकोश इत्यादी ग्रंथांचे अध्ययन केले. मुंजीनंतर वेदपठण केले. परंतु प्रकृती-अस्वास्थ्यामुळे विस्मृती होऊ लागली. तेव्हा सीताराम शास्त्री नागपूरला नोकरी करीत होते, म्हणून बापूला ते नागपूरला घेऊन गेले. तेथे त्याने रघुवंश, लघुकौमुदी इत्यादी ग्रंथांचा अभ्यास केला. पुढे नोकरीच्या बदलीमुळे वडलांबरोबर बापू पुण्यास गेला. तेथे पं.पांडुरंग तात्या दिवेकर यांच्या पाठशाळेत त्याने गणितशास्त्राचे अध्ययन केले. परंतु वडिलांबरोबर ते पुन्हा नागपुरास आले. येथे पं.धुंडिराज मिश्र यांच्याकडून लीलावती, बीजगणित इत्यादी प्रसिद्ध ज्योतिष ग्रंथांचे शिक्षण घेतले.

बापूदेवांचे वडील सीताराम शास्त्री यांचे स्नेही, एक आंग्ल विद्वान लान्सलाट विल्किन्सन हे त्या वेळेस सिहोर येथील ‘पोलिटिकल एजन्ट’ होते. ते पाश्चात्त्य गणिताचे विद्वान होते. त्यांनी बापूच्या हुशारीबद्दल प्रशंसा ऐकल्यावर नागपूरला त्याला भेटावयास बोलावले. त्या भेटीत बीजगणितासंबंधीच्या त्याने दिलेल्या उत्तराने विल्किन्सनसाहेब अतिशय खूश झाले. परंतु सिद्धान्त गणिताबाबत त्याचे ज्ञान तोकडे आहे असे पाहून बापूदेवला ते सिहोरला घेऊन गेले. तेथे पं.सेवाराम यांच्याकडे ‘सिद्धान्त शिरोमणी’ ग्रंथाचे अध्ययन करण्याची त्यांनी व्यवस्था केली. तसेच बीजगणित व रेखागणित स्वत: विल्किन्सन साहेब शिकवीत. अशा तऱ्हेने बापूदेवने गणित विषयात पारंगतता मिळवली.

इतके प्रगाढ पांडित्य प्राप्त झाल्यावर शासकीय संस्कृत महाविद्यालय, काशीच्या ज्योतिष विभागाचे अध्यापकपद मिळावे, अशी बापूंची इच्छा होती. परंतु विल्किन्सनसाहेबांच्या अचानक निधनामुळे त्यांची इच्छा तेव्हा पूर्ण होऊ शकली नाही. लान्सलाटचे भाऊ मेजर टी. विल्किन्सन नंतर नागपूरचे रेसिडंट नेमले गेले. बापूदेवने एका प्राचीन शिलालेखाची नक्कल सुंदर व शुद्ध तयार करून साहेबास दिली, ज्यामुळे अत्यंत प्रसन्न होऊन त्यांनी त्यांस २०० रुपयांचा पुरस्कार दिला व त्यांच्या शिफारशीनुसार बापूदेव शास्त्रींची १५ फेब्रुवारी १८४२ रोजी शासकीय संस्कृत महाविद्यालय, काशी येथे ज्योतिषगणिताच्या अध्यापकपदावर नियुक्ती झाली.

त्या काळी विद्यार्थ्यांना लागणाऱ्या पाठ्यपुस्तकांचा फारच अभाव असे. तेव्हा बापूदेव शास्त्रींनी सिद्धान्त तथा गणितशास्त्र विषयाच्या नवीन ग्रंथांची निर्मिती व संपादन केले. त्यांनी इंग्रजी भाषेचेही अध्ययन केले. बापूदेव शास्त्रींची विद्वत्ता, विनयशीलता व ग्रंथलेखन यांमुळे सर्व विद्यार्थी व प्राचार्य वेलेन्टाइन प्रसन्न व प्रभावित झाले. तेथे त्यांनी आठ वर्षे अध्यापन केले. इ.स. १८५० मध्ये काशीचे जिल्हाधिकारी मॅकलॉइडसाहेबांनी बापूदेव शास्त्रींना गणित विषयावरील ग्रंथांची निर्मिती करण्याचा आग्रह केला. तेव्हा त्यांनी ‘बीजगणित’ ग्रंथ हिंदी भाषेत लिहून १८५० साली मुंबईहून प्रकाशित केला. या विद्वत्तापूर्ण पुस्तकासाठी तेव्हाच्या लेफ्टनंट गव्हर्नररांनी बापूदेव शास्त्रींना दोन हजार रुपये पुरस्कार देऊन सन्मान केला. त्याच सुमारास ‘इंग्लिश जर्नल ऑफ एज्युकेशन’ या नियतकालिकात सिद्धान्त ज्योतिष विषयावर एक लेख प्रसिद्ध झाला. त्यामधे अनेक चुका असल्याचे बापूदेव शास्त्रींनी दर्शवून दिल्याने लेखकास त्या मान्य कराव्या लागल्या.

इ.स. १८६१ साली बापूदेव शास्त्रींनी ‘सूर्यसिद्धान्त: सोपपत्तिका’ नामक ग्रंथाची रचना केली. तिचे इंग्रजी भाषांतर लान मिलेट विल्किन्सन यांनी एशियाटिक सोसायटी ऑफ बंगालच्या ‘बिब्लोथिका इंडिका’ ग्रंथमालेत टिप्पणींसहित प्रसिद्ध केले. या ग्रंथाच्या ‘गोलाध्याय’चासुद्धा इंग्रजी अनुवाद प्रकाशित होऊन ख्यातिप्राप्त झाला. पाश्चात्त्य गणित तत्त्वावर आधारित

त्यांचा संस्कृतमधील 'सरल त्रिकोणमिती' ग्रंथ, शंभर वर्षांहून अधिक काळ लोटला असूनही, आजही त्याचे महत्त्व कमी झालेले नाही.

शास्त्रींनी संस्कृतमध्ये १. सूर्यसिद्धान्त-सोपपत्तिका, २. फलितविचार, ३. सायनवाद, ४. मानमंदिर-वर्णनम्, ५. प्राचीन-ज्योतिषाचार्याशय-वर्णनम्, ६. तत्त्वविवेक-परीक्षा, ७. विचित्र-प्रश्नसंग्रह : सोत्तर, ८. अतुलयंत्रम्, ९. पंचक्रोशियात्रानिर्णय, १०. नूतनपंचांगनिर्माणम्, ११. पंचांगोपपादनम्, १२. सिद्धान्त शिरोमणी ग्रंथे चलगणितम् हे बारा ग्रंथ; हिंदीमध्ये १. बीजगणितम्, २. व्यक्तगणितम्, ३. भूगोलवर्णनम्, ४. खगोलसार हे चार ग्रंथ, तर इंग्लिशमध्ये १. एलिमेंट्स ऑफ अरिथ्मॅटिक, दोन भाग, २. एलिमेंट ऑफ अल्जिब्रा, असे दोन ग्रंथ इ.स. १८५० ते १८७५ या काळात प्रसिद्ध केले.

शास्त्री यांना अनेक मानसन्मान प्राप्त झाले. इ.स. १८६४ मध्ये त्यांना लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटीची मानद सदस्यता प्रदान करण्यात आली. 'बीजगणित'च्या द्वितीय आवृत्तीच्या प्रकाशनावर प्रसन्न होऊन तेव्हाचे लेफ्टनंट गव्हर्नर सर विलियम म्युअर यांनी पं. बापूदेव यांना प्रयाग येथे किमती रेशमी वस्त्र व एक सहस्र मुद्रा देऊन सन्मानित केले. इ.स. १८७० मध्ये भारताच्या व्हाइसरॉयने त्यांना कोलकाता विश्वविद्यालयाचे मानद सदस्यत्व (फेलोशिप) बहाल केले. त्यांनी सूर्य व चंद्रग्रहणाची निर्धारित केलेली वेळ क्षणभरही बदलली नाही. याने प्रसन्न होऊन काश्मीर महाराजांनी इ.स. १८७३ मध्ये त्यांना शाल व एक सहस्र मुद्रा देऊन गौरवान्वित केले. इ.स. १८७५ मध्ये काशीनरेशांच्या विनंतीनुसार त्यांनी नव्या नूतन पंचांगाची सुरुवात केली. त्यासाठी महाराजांनी त्यांना दोनशे रुपयांचे पेन्शन जाहीर केले.

इ.स. १८७७ मध्ये महाराणी व्हिक्टोरिया 'राजराजेश्वरी' झाल्याच्या सन्मानार्थ भारतीय विद्वानांना पदके प्रदान करण्यात आली. त्यांत पं.बापूदेव शास्त्री अग्रगण्य होते. पुन्हा इ.स. १८७८ मध्ये १ जानेवारीला व्हिक्टोरिया राणीच्या निमित्ताने जो विशेष समारंभ झाला, त्यात पं. बापूदेवजींना सी.आय.ई.च्या उपाधीने विभूषित करण्यात आले. संस्कृत पंडितांमध्ये हा मान मिळविणारे हे सर्वप्रथम होते. इ.स. १८८७ मध्ये महाराणी व्हिक्टोरियाच्या सुवर्णजयंती निमित्ताने संस्कृत पंडितांच्या सन्मानार्थ 'महामहोपाध्याय' पदवी देण्याची सुरुवात करण्यात आली. त्याचे सर्वप्रथम मानकरी होते, पं.बापूदेव शास्त्री.

शास्त्रींचे भारतीय पंचांगनिर्मितीतील विशेष योगदान नेहमीच अविस्मरणीय राहील. त्यांच्या दृक-सिद्ध पंचांगाचे वैशिष्ट्य म्हणजे ते आधुनिक यंत्रांद्वारे निर्मित ग्रहवेधांवर आधारित आहे. या पंचांगाची सुरुवात त्यांनी इ.स. १८७६ मध्ये केली. हे पंचांग आजही प्रकाशित होत असते.

काशीच्या शासकीय महाविद्यालयामध्ये ४७ वर्षे अध्यापन करून इ.स. १८८९ मध्ये ते सेवानिवृत्त झाले. तेव्हा त्यांचे वय ७० होते. त्याच्या पुढील वर्षीच, म्हणजे इ.स. १८९० मध्ये, ७ जूनला काशी येथे त्यांचे देहावसान झाले.

— सूर्यकांत कुलकर्णी

**संदर्भ:**

*१. दै. लोकसत्ता; दि. ७ जून २००९.*

## शिरोडकर, विठ्ठल नागेश

**वैद्यकशास्त्रज्ञ**

**२६ एप्रिल १८९९ - ७ मार्च १९७१**

डॉ. विठ्ठल नागेश शिरोडकर यांचा जन्म गोमंतक म्हणजेच गोव्यातील शिरोडा गावातील एका सधन कुटुंबात झाला. डॉ. शिरोडकरांनी सरस्वतीची उपासना उत्तम रीतीने केली. त्या काळी सधन कुटुंबातील फार थोडी मुले शिक्षणाच्या मागे लागत होती. डॉक्टरांचे शालेय शिक्षण हुबळी व पुणे येथे झाले. वैद्यकीय शिक्षण मुंबईच्या प्रसिद्ध ग्रॅण्ट वैद्यकीय महाविद्यालयामध्ये झाले. त्यांचा आवडीचा विषय होता स्त्री-रोगचिकित्सा. त्यामुळे डॉक्टरांनी त्याच विषयात १९२७ साली एम.डी.



केले. तो काळ असा होता, की कोणतीही परदेशी, विशेषत: इंग्लंड येथील पदवी असल्याशिवाय तुमच्या हुशारीला मान मिळत नसे; तुमची विद्वत्ता लोकांच्या लक्षात यायची नाही. वैद्यकीय क्षेत्रात तर हे प्रकर्षाने जाणवायचे. डॉ. शिरोडकर आणखी उच्च शिक्षणासाठी लंडनला गेले. १९३१ साली ते एफ.आर.सी.एस. झाले. वास्तविक त्यांना इंग्लंडमध्येच राहण्यासाठी भरपूर वाव होता; पण त्या काळच्या पदवीधरांप्रमाणे डॉ. शिरोडकरांचाही देशाभिमान जाज्वल्य होता. विषयातील सर्व अनुभव घेऊन डॉक्टर मायदेशी परतले.

परत आल्यावर त्यांनी ग्रँट वैद्यकीय महाविद्यालयामध्ये स्त्री-रोगचिकित्साशास्त्राचे प्राध्यापक व ज.जी. रुग्णालयामधील मोटलीबाई रुग्णालयाचे मानद स्त्री-रोगतज्ज्ञ म्हणून १९३५ ते १९५५ सालापर्यंत काम केले. या २० वर्षांच्या काळात त्यांनी रुग्णालयामध्ये येणाऱ्या स्त्री-रुग्णांची आस्थेने देखभाल केली. त्यामुळे सबंध भारतातच नव्हे, तर इतर देशांतही मोटलीबाई रुग्णालयाचे नाव झाले. त्यांच्या स्वत:च्या नर्सिंग होममध्ये, तसेच ज.जी. रुग्णालयामध्ये येणाऱ्या असंख्य गरीब-श्रीमंत स्त्री-रुग्णांची त्यांनी सेवा केली. १९३५ साली त्यांनी डॉ.जी.एम. फडके यांच्याबरोबर माटुंग्याला ‘कॉलनी नर्सिंग होम’ नावाचे खाजगी रुग्णालय चालू केले. १९३६ साली पत्नी सुधासमवेत त्यांनी ‘डॉ. शिरोडकर मेमोरियल रिसर्च फाउण्डेशन’ चालू केले.

या प्रदीर्घ काळात डॉक्टरांनी खूप संशोधन केले. अनेक गर्भवती स्त्रियांच्या होणाऱ्या गर्भपाताविषयी त्यांनी विचार व संशोधन केले. गर्भपाताचे नक्की कारण कोणालाच कळत नव्हते. डॉक्टरांच्या लक्षात आले की काही स्त्रियांमध्ये गर्भाशयाच्या ग्रीवेजवळचे स्नायू कमकुवत असतात. गर्भाचे वजन जसे वाढू लागते, तसे या स्नायूंना ते पेलता येत नाही व गर्भपात होतो. याला उपाय म्हणून त्यांनी ग्रीवेची शक्ती वाढवण्यासाठी ग्रीवेच्या स्नायूंना टाका घालून सशक्त आधार दिला. यालाच सुप्रसिद्ध ‘शिरोडकर स्टिच’ म्हणतात. यामुळे या स्त्रियांचे गरोदरपण पूर्ण दिवसांचे होऊन प्रसूती पूर्णकाळाची झाली. प्रसूतीच्या वेळी तो टाका कापला जातो. अशा तऱ्हेने या स्त्रियांची अपत्यइच्छा पूर्ण झाली. हा ‘एक टाका सुखाचा’ ठरला.

१९५६ सालची गोष्ट. त्या काळी भारतीय डॉक्टर्सची जगात विशेष प्रसिद्धी नव्हती. किंबहुना भारतीय डॉक्टरांचे खास स्वत:चे संशोधन असू शकेल यावर पाश्चात्त्यांचा विश्वास नव्हता, तशी त्यांची मनोधारणाही नव्हती. अमेरिकेतील बाल्टिमोर येथील जॉन हॉपकिन्स रुग्णालयामध्ये शस्त्रक्रियांचा अभ्यास करणाऱ्या निरनिराळ्या देशांतील डॉक्टरांसाठी एक शैक्षणिक कार्यशाळा ठेवली होती. त्यात वॉशिंग्टन येथील सुप्रसिद्ध स्त्री-रोगतज्ज्ञ डॉ. रॉबर्ट बार्टर व्याख्यान देत होते. त्या वेळी त्यांनी ‘गर्भावस्थेचे विकार’ या विषयाची एक पारदर्शिका दाखवली. ‘‘या अवस्थेमध्ये आपण काहीच साहाय्य करू शकत नाही,’’ असे सांगितले. या विद्यार्थ्यांमध्ये एक भारतीय डॉक्टर, सनत जोशी होता. त्याने उठून सांगितले, ‘‘ही परिस्थिती भारतामध्ये तरी खरी नाही. डॉ. शिरोडकरांनी शोधून काढलेल्या शस्त्रक्रियेने अशा तऱ्हेने होणारे गर्भपात टाळून पूर्ण दिवसांची प्रसूती होते.’’ सर्वांची या विषयाची जिज्ञासा जागृत झाली. या प्रसंगाने या शस्त्रक्रियेच्या प्रसिद्धीला महत्त्वाचे वळण मिळाले.

डॉ. रॉबर्ट यांनी लगेचच या क्रांतिकारी संशोधनाची अधिक माहिती घेण्यासाठी डॉ. शिरोडकरांशी संपर्क साधला. अशा प्रकारे त्यांच्या संशोधनाला जगभर प्रसिद्धी मिळाली. या संशोधनाचे मूळ कारण म्हणजे डॉ. शिरोडकरांचा संवेदनशील स्वभाव. असफल गर्भधारणेमुळे खिन्न व निराश होणाऱ्या स्त्रियांचे चेहरे पाहून डॉक्टरांना अस्वस्थ वाटे. सतत संशोधन व मनन करून अथक प्रयत्नांनी त्यांना ही शस्त्रक्रिया सुचली. या




स्त्रियांची पूर्ण दिवसांनी झालेली प्रसूती बघून डॉक्टरांना मनस्वी समाधान वाटले.

वैद्यकीय जगतामध्ये या अभिनव आणि अतिशय परिणामकारक शस्त्रक्रियेला अतिशय महत्त्व प्राप्त झाले. विशेष बाब म्हणजे, स्त्रीरोगचिकित्सेच्या ग्रंथांमध्ये व क्रमिक पुस्तकात या शस्त्रक्रियेला 'शिरोडकर शस्त्रक्रिया' असेच नाव मिळाले. या शस्त्रक्रियेची प्रात्यक्षिके द्यायला आंतरराष्ट्रीय तज्ज्ञांच्या अधिवेशनाची त्यांना आमंत्रणे येऊ लागली. अमेरिकेतील स्त्री-रोगतज्ज्ञांनी त्यांच्याकडून ही अभिनव शस्त्रक्रिया शिकून घेतली व १९५५ सालापासून ही शस्त्रक्रिया अमेरिकेत चालू झाली.

गर्भाशयाच्या दोषांवर त्यांनी अनेक निबंध लिहिले. ते भारतातील व परदेशातील वैद्यकीय मासिकांत छापून आले. गर्भाशय या विषयात जगातील ख्यातनाम तज्ज्ञांत त्यांची गणना होऊ लागली. गर्भाशयाच्या स्खलनाच्या (प्रोलॅप्स) शस्त्रक्रियेत त्यांनी मांडीच्या स्नायूच्या आवरणाचा उपयोग केला. या शस्त्रक्रियेत आवरण काढून त्याचा गर्भाशय वर उचलण्यासाठी दोरीसारखा उपयोग केला. गर्भाशयाच्या मागच्या भागातून हा ओवून मागच्या त्रिकास्थी (सेक्रम) या पाठीच्या मणक्याच्या अस्थिबंधनात (लिगामेन्ट) दुसरे टोक बांधून गर्भाशय उचलले व बांधून ठेवले. त्यामुळे गर्भाशय खाली येऊन होणारा त्रास बंद झाला. वंध्यत्वाच्या चाचण्यांमध्ये व उपायांमध्ये बीजवाहिन्या बंद असल्यास पोटास छेद देऊन शस्त्रक्रिया करावी लागते. त्या वेळी बीजवाहिनी नक्की कोठे बंद झाली आहे हे बघण्यासाठी बीजवाहिनीत डाय भरून तपासतात. या वेळी गर्भाशयाच्या ग्रीवेतून डाय बाहेर पडू नये म्हणून गर्भाशयास चिमटा लावतात-युटेराइन क्लॅम्प-तो डॉ. शिरोडकरांनी तयार केला. बंद झालेली बीजनलिका कापून पुनः तिचे गर्भाशयात रोपण करावे लागते. त्यासाठी गर्भाशयाला छिद्र पाडण्यासाठी 'रीमर' नावाचे उपकरण त्यांनी तयार केले व ही शस्त्रक्रिया यशस्वी केली. कृत्रिम योनिमार्ग तयार करण्यासाठी त्यांनी बृहदांत्राच्या (कोलन) शेवटच्या भागाचे अवरोपण केले. पण ही शस्त्रक्रिया त्या वेळी यशस्वी झाली नाही.

१९६० साली डॉ.शिरोडकरांनी 'कॉन्ट्रिब्यूशन टू ऑब्स्टेटिक्स ॲण्ड गायनॅकोलॉजी' हे पुस्तक लिहिले. यात त्यांनी गर्भाशयाच्या रोगांविषयी सविस्तर चर्चा केलेली आहे.

१९६२ साली डॉ.शिरोडकरांना एफ.आर.सी.ओ.जी. हा बहुमान मिळाला. हा बहुमान विशेष संशोधन करणाऱ्या स्त्री-रोगतज्ज्ञांनाच देण्यात येतो. हा बहुमान मिळवणारे डॉ.शिरोडकर हे पहिलेच भारतीय सन्मान्य सभासद. ''शिरोडकरांनी हा बहुमान स्वीकारून आमच्या संस्थेवर अनुग्रह केला,'' असे उद्‍गार त्या संस्थेच्या अध्यक्षांनी काढले.

डॉ. शिरोडकरांनी कुटुंबनियोजनासाठी अंडनलिकेवरील (फॅलोपिन ट्यूब) केलेल्या शस्त्रक्रियेची चित्रफीत जगभर दाखवली गेली. डॉ.शिरोडकर कुटुंबनियोजनासाठी स्त्रियांवर शस्त्रक्रिया करू लागले. प्रसूतीनंतर तिसऱ्या दिवशी ही शस्त्रक्रिया करत असत. म्हणजे आपोआप स्त्रीला विश्रांती मिळत असे. पोटावरील त्वचेला छेद देऊन, बीजवाहिनीपर्यंत पोहोचून बीजवाहिन्या मध्येच कापायच्या. त्यांची दोन टोके एकमेकांच्या विरुद्ध दिशेला करून टाके मारून बंद करायची, म्हणजे शुक्राणू व स्त्री-बीज यांचे मिलन होत नाही व गर्भ राहत नाही.

शस्त्रक्रियेच्या वेळी त्यांचे हात इतके सफाईदारपणे व नाजूकपणे चालत, की विद्यार्थी व इतर डॉक्टर्स ती बघण्यात रंगून जायचे. त्यांच्या हातातील या कौशल्याचे मुख्य कारण म्हणजे त्यांचे हात कलाकाराचे होते.

व्हायोलीन वाजवणे असो वा चित्रकला असो, त्यांच्या हातून उत्कृष्ट आविष्कार व्हायचा. ते गोल्फही उत्तम खेळायचे. त्या वेळची त्यांची पद्धत, खेळातील नजाकत बघण्यासारखी असे.

डॉ. शिरोडकर मराठी विज्ञान परिषदेचे आजीव सभासद होते. १९६७ साली पुण्यात भरलेल्या दुसऱ्या मराठी विज्ञान संमेलनाचे ते अध्यक्ष होते. परिवार नियोजनाच्या कार्यात त्यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी केली. हृदयविकाराच्या झटक्याने त्यांचे निधन झाले. भारत सरकारने १९७१ साली त्यांना मरणोत्तर 'पद्मविभूषण' पुरस्कार प्रदान केला.

**– डॉ. शशिकांत प्रधान**

**संदर्भ:**

*१. देशपांडे, अ.पां., संपादक; 'विद्वज्जन'; मनोविकास प्रकाशन; २००५*

## शेंडे, राजेंद्र
**अभियंता**
**१३ जुलै १९४९**



सातारा जिल्ह्यातील कोरेगाव या तालुक्यातील रहिमतपूर येथे राजेंद्र शेंडे यांचा जन्म झाला. त्यांनी शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षण झाल्यावर मुंबईच्या पवई येथील 'आय.आय.टी.'मधून रसायन अभियांत्रिकीतील पदवी १९७२ साली मिळवली. त्यानंतर सुमारे २० वर्षे त्यांनी भारतभरच्या विविध उद्योगसमूहांत काम केले. त्या काळात उच्च अभियांत्रिकी प्लॅस्टिकची निर्मिती, ओझोन थर नष्ट करणाऱ्या पदार्थांना पर्यायी पदार्थ शोधून काढणे, रासायनिक उद्योगात पुनर्निर्मित ऊर्जेचा वापर करणे, अशा क्षेत्रांत त्यांनी भरीव काम केले.

या गोष्टी करत असताना त्यांचे सारे लक्ष पर्यावरण संरक्षणाकडे असे. शीतकपाट, वातानुकूलन यंत्रणा आणि अन्य उपकरणांत वापरली जाणारी क्लोरो फ्लुरो कार्बनसारखी (सी.एफ.सी.) रसायने ओझोन थर विरळ करीत आहेत असे जगाच्या लक्षात आल्यावर १९८५ साली मॉन्ट्रिअल येथे भरलेल्या जागतिक पर्यावरण परिषदेत असे पदार्थ हळूहळू वापरणे कमी करून त्याऐवजी पर्यायी पदार्थ शोधून काढण्याचे ठरले. त्यासाठी पुढील २५ वर्षांचा काळ ठरवून देण्यात आला. राजेंद्र शेंडे यांनी अशा पदार्थांवर भारतातच काम सुरू केले होते. त्यामुळे याबाबतची भारताची भूमिका ठरवण्यासाठी नेमलेल्या कृती गटात भारत सरकारने त्यांची नेमणूक केली. हा करार स्वीकारण्याच्या बदल्यात विकसित देशांनी, विकसनशील देशांना विकासासाठी आर्थिक सहकार्य मिळवण्याचा मुद्दा लावून धरला. विशेष म्हणजे, या आंतरराष्ट्रीय वाटाघाटींना यश आले आणि विकसित देशांनी भारतासारख्या विकसनशील देशांना देण्यासाठी स्वतंत्र, दोन अब्ज अमेरिकन डॉलरचा निधी उभा केला. मॉन्ट्रिअल करारानुसार जगातल्या १४५ देशांनी पृथ्वीवरील ओझोन थराचे संरक्षण करण्यासाठी काही खास उपाययोजना करण्याचा निर्णय घेतला आहे. राजेंद्र शेंडे यांच्या नेतृत्वाखालील 'ओझोन कृती विभाग' या देशांना त्याबाबत सहकार्य करतो. राजेंद्र शेंडे यांच्या कामाची दखल अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष बराक ओबामा यांच्या नेतृत्वाखालील प्रशासनाने घेतली असून त्यांना 'क्लायमेट चेंज अवॉर्ड' या प्रतिष्ठेच्या पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. पण हे करताना, हरितगृह वायूंचे उत्सर्जन टाळण्यासाठी नवनवे प्रयोग राबवून या देशांना मॉन्ट्रिअल कराराचे दुहेरी लाभ मिळवून देण्यापाठीमागे असलेली शेंडे यांची कल्पकता आणि चिकाटी यांमुळेच त्यांची या पुरस्कारासाठी निवड करण्यात आल्याचे पुरस्कार समितीने स्पष्ट केले.

२००५ साली शेंडे यांच्या नेतृत्वाखालील 'ओझोन कृती कार्यक्रम' हा अमेरिकन सरकारच्या पर्यावरण संरक्षण संस्थेचा 'स्टॅटोस्फिअरिक ओझोन संरक्षण' पुरस्कार मिळणारा युनोचा पहिला कार्यक्रम ठरला. २००९ साली तापमानविरोधी कार्याबद्दल दोन अमेरिकन

श

पुरस्कार मिळवणारे शेंडे हे पहिले भारतीय ठरले आहेत. डॉ.शेंडे यांचे वास्तव्य पॅरिसमध्ये असते. त्यानंतर त्यांनी आंतरराष्ट्रीय पातळीवर विविध जबाबदाऱ्या समर्थपणे पेलल्या. १९९९ साली त्यांची पॅरिस येथे स्थापन झालेल्या ओझोन कृती गटाच्या प्रमुखपदी नेमणूक झाली. तेव्हापासून ते याच क्षेत्रात काम करीत आहेत. गेली काही वर्षे ते युनोच्या पर्यावरण कार्यक्रमाच्या अंतर्गत काम करणाऱ्या 'इंटरगव्हर्नमेंटल पॅनेल ऑन क्लायमेट' (आय.पी.सी.सी.) या संस्थेच्या ओझोन कृती विभागाचे प्रमुख आहेत. २००७ साली या संघटनेच्या पर्यावरण स्थितिदर्शक अहवालाचे संपादन करण्याची जबाबदारी त्यांनी पार पाडली. त्या वर्षी या संघटनेला शांततेचा नोबेल पुरस्कार मिळाला. जगभरातले तापमान झपाट्याने वाढत असल्याची ओरड गेली काही वर्षे सातत्याने ऐकायला मिळते. तरी त्यासंबंधी काही ठोस भूमिका घेऊन काम करणाऱ्या अपवादात्मक व्यक्तींत शेंडे यांचे नाव घ्यायला हवे.

ओझोन थर विरळ झाल्याने त्वचेचे कर्करोग उद्भवतात, शिवाय एकूण जीवसृष्टीवर त्यामुळे विपरीत परिणाम होतो. परंतु शेंडे यांच्यासारख्या व्यक्तींनी 'युनो'च्या पातळीवर केलेले काम आणि जगातल्या सर्व देशांनी सी.एफ.सी.सारख्या पदार्थांऐवजी इतर पदार्थ वापरायला केलेली सुरुवात यांमुळे ओझोन थराचा विरळपणा कमी होऊ लागला असून तो पूर्ववत व्हायला अजून ४०-५० वर्षे लागतील. पण 'युनो'सारख्या संस्था पृथ्वीचे झालेले नुकसान परत पूर्ववत करू शकतात हा भरवसा यातून मिळत असल्याने एक मोठा दिलासा प्राप्त होतो आणि यात एखाद्या भारतीयाचा मोठा वाटा असणे ही बाब आपल्याला कितीतरी आनंद मिळवून देणारी आहे.

शेंडे यांनी सौरऊर्जेवर चालणारे शीतकपाट (रेफ्रिजरेटर) बनवले. त्याला 'सौरचिल' असे नाव दिले; कारण या शीतकपाटामध्ये सौरऊर्जा बॅटरीत न साठवता, ती बर्फात साठवली जाते. यात डी.सी. विजेवर चालणारे कॉम्प्रेसर्स वापरतात. आपल्या घरच्या शीतकपाटामध्ये ए.सी. विजेवर चालणारे कॉम्प्रेसर्स वापरले जातात. या शीतकपाटांना 'सोलर पॉवर्ड', 'ओझोन फ्रेंडली', 'व्हॅक्सिन रेफ्रिजरेटर्स' असे म्हणतात. यात पर्यावरणस्नेही 'हायड्रोकार्बन रेफ्रिजरंट' वापरतात. नेहमीसारखे 'क्लोरो फ्लुरो कार्बन' (सी.एफ.सी.) आणि 'हायड्रो फ्लुरो कार्बन' (एच.एफ.सी.) रेफ्रिजरंट वापरत नाहीत. २००५ साली भारताचे तत्कालीन राष्ट्रपती अब्दुल कलाम यांनी पहिली दोन शीतकपाटे शेंडे यांच्याकडून विकत घेतली होती आणि आपल्या राष्ट्रपती भवनातील निवासात वापरले होते.

राजेंद्र शेंडे हे जरी पॅरिसला स्थायिक असले तरी त्यांचे आपल्या मूळ रहिमतपूर गावावर चांगलेच लक्ष असून, तेथे आता पर्यावरण विकासाचे काही प्रकल्प त्यांनी हाती घेतले आहेत.

— अ.पां. देशपांडे

**संदर्भ:**

१. *दै. लोकसत्ता; दि. २२ एप्रिल २००९.*
२. *दै. महाराष्ट्र टाइम्स; दि. १६ मे २००९.*

## शेट्ये, सतीश रामनाथ
**अभियंता**
**२५ ऑक्टोबर, १९५०**



सतीश रामनाथ शेट्ये यांचा जन्म गोव्यात झाला. शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षण गोव्यात झाल्यावर त्यांनी मुंबईच्या आय.आय.टी.मधून १९७३ साली भौतिकशास्त्रात एम.एस्सी. केले. १९८२ साली त्यांनी अमेरिकेच्या वॉशिंग्टन विद्यापीठातून फिजिकल ओशनोग्राफी या विषयात पीएच.डी. केली. त्यानंतर ते लगेच गोव्यात परत आले आणि राष्ट्रीय सागर संशोधन संस्थेत नोकरी पत्करून त्यांनी संशोधनास सुरुवात केली. झुआरी खाडीतील पाण्याचा क्षारांश कसा बदलतो या अभ्यासाने

श

त्यांच्या संशोधनाला सुरुवात झाली. भारतीय किनाऱ्यांवरील समुद्राच्या पातळीत फरक कसा पडतो, त्याचे घटक कोणते, बंगालच्या उपसागराची पातळी अरबी समुद्राच्या पातळीपेक्षा जास्त का आहे, अरबी समुद्राच्या वरच्या पातळीचे तापमान ऋतुमानाप्रमाणे कसे आणि का बदलते, अशा अनेक विषयांवर त्यांनी संशोधन केले.

भारताच्या किनाऱ्यावर असंख्य खाड्या आहेत. त्यांच्यामुळे मत्स्योत्पादन, काठावरच्या तिवरामुळे होणारे प्रदूषण नियंत्रण व नैसर्गिक जीवनचक्राला होणारी मदत, पावसाचे पाणी वाहून नद्या आणि खाड्यांना मिळण्यापूर्वी जमिनीत किती मुरते, त्यातून नत्र क्षारांमुळे जैविक आणि कोणते जैवरासायनिक परिणाम होण्याची शक्यता असते, यांवरही त्यांनी संशोधन केले. भारताचा आर्थिक कणा शेती आहे. ही शेती पावसावर अवलंबून आहे. त्याविषयीचे अंदाज वर्तविणे शेट्ये यांच्या संशोधनामुळे सुलभ झाले.

खंबायतच्या आखातापासून बंगालच्या उपसागरापर्यंत किनाऱ्यानजीक आणि थोडे दूर सागराच्या हालचाली, प्रवाहांची दिशा, यांचाही त्यांनी अभ्यास केला. सर्व्हे ऑफ इंडिया आणि इतर सहकारी संस्था, जलस्थिती शास्त्र संशोधक संस्था यांच्याशी समन्वय साधून त्यांनी संशोधन केले.

त्यांनी जागतिक पातळीवर सामुद्रिक आणि सागरभूतलाच्या हालचाली, त्सुनामीसारख्या अस्मानी संकटाची जाणीव व व्याप्ती, तीव्रता, उगम यांचे संशोधन केले. त्यातून काढलेल्या निष्कर्षांना आंतरराष्ट्रीय पातळीवर मान्यता मिळाली आहे. ईशान्य अरबी समुद्रावर होणाऱ्या पावसाळी ढगांचा युनेस्कोने पुरस्कृत केलेला अभ्यास, हिंदी महासागराच्या किनाऱ्याला लागून असलेल्या राष्ट्रांच्या किनाऱ्यावरील भरती ओहोट्यांची पाहणी, उत्तर हिंदी समुद्राचा मॉन्सूनवर होणाऱ्या परिणामांचा फ्रान्सच्या सहकार्याने अभ्यास, जागतिक समुद्रपातळ्यांच्या अभ्यासगटातील सहभाग,



**राष्ट्रीय सुरक्षा शास्त्र संस्था**

वारे, लाटा आणि प्रवाह यांचा स्वतंत्र आणि संयुक्त संबंध, परिणाम अशा अनेक अभ्यासगटांचे नेतृत्व अथवा त्यांतील त्यांचा सहभाग देश-विदेश पातळीवर महत्त्वाचा ठरला.

या सर्व कामांमुळे त्यांची २१ मार्च २००४ रोजी राष्ट्रीय सागर संशोधन संस्थेच्या संचालकपदी नेमणूक झाली.

१९९२ साली बंगळुरूच्या ‘इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस’ने त्यांना फेलो केले. त्याच वर्षी त्यांना जमीन, वातावरण, सागर आणि पर्यावरण शास्त्रातील त्यांच्या अभ्यासासाठी शांतिस्वरूप भटनागर पुरस्कार मिळाला. १९९७ साली दिल्लीच्या इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीने त्यांना फेलो केले. २००० साली पुण्यात भरलेल्या ‘इंडियन सायन्स काँग्रेस’च्या अधिवेशनात त्यांना ‘न्यू मिलेनियम सायन्स पुरस्कार’ मिळाला. २००१ साली ते अलाहाबादच्या ‘अकॅडमी ऑफ सायन्स’चे फेलो झाले. २००१ सालापासूनच ते ‘इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस’च्या ‘अर्थ आणि प्लॅनेटरी सायन्सेस’च्या कार्यवृत्ताचे संपादक म्हणून नेमले गेले.

– अ. पां. देशपांडे

श

**श्रीधरन**

☞ **इ. श्रीधरन**

✻✻✻




## सखाराम अर्जुन
 राऊत, सखाराम अर्जुन

## सलिम अली
**पक्षिशास्त्रज्ञ**
**१२ नोव्हेंबर १८९६ - २७ जुलै १९८७**



डॉ. सलिम अली म्हणजे आयुष्यभर एकाच गोष्टीचा ध्यास घेऊन त्यासाठी शेवटच्या श्वासापर्यंत धडपडत राहणारे एक अलौकिक व्यक्तिमत्त्व. त्यांनी स्वत:चे स्वतंत्र कार्यक्षेत्र निर्माण केले. समाजमन त्यासाठी अनुकूल बनवले आणि मग त्यामध्ये आपले कार्य आणि संशोधन झिरपू दिले. 'बर्डमॅन ऑफ इंडिया' म्हणजे भारताचे 'पक्षिपुरुष' म्हणून आज संपूर्ण जगाला त्यांची ओळख असली आणि त्यांच्या शास्त्रीय कार्याला जागतिक स्तरावरची मान्यता लाभली असली, तरी त्यापेक्षाही काकणभर सरस असणारे त्यांचे कार्य म्हणजे भारताला त्यांनी दिलेली निसर्ग संरक्षण आणि सुस्थापन चळवळीची देणगी.

त्यांचा जन्म सुलेमानी मुस्ता अली इस्माइली कुटुंबात झाला. नऊ भावंडांमध्ये ते सर्वांत शेवटचे होते. आईवडिलांचे छत्र लवकर हरपल्यामुळे वयाच्या अवघ्या चौथ्या वर्षापासून त्यांचे पालनपोषण त्यांच्या मामांच्या, अमिरुद्दीन तय्यबजी यांच्या, गिरगावातल्या खेतवाडीमधील घरी झाले. मामांकडे निरनिराळ्या प्रकारची अनेक हत्यारे आणि बंदुका होत्या. ते शिकारी होते. लहानपणी सलिमनी गंमत म्हणून आणि खाण्यासाठी म्हणून अनेक चिमण्यांची शिकार केली होती. एकदा त्यांनी गळ्यावर पांढरा ठिपका असलेली चिमणी मारली. परंतु धार्मिक घरामध्ये ती खाण्यायोग्य आहे की नाही, याची खातरजमा करण्यासाठी त्यांच्या मामांनी त्यांना बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटीचे (बी.एन.एच.एस.) अभिरक्षक डब्ल्यू.एस. मिलार्ड यांच्याकडे पाठवले. त्यांनी त्या पक्ष्याची ओळख करून देण्याबरोबर सलिमला सोसायटीतील पेंढा भरलेल्या पक्ष्यांचा संग्रह फिरवून दाखविला. पक्षिसृष्टीचे दार त्यामुळे उघडले जाऊन सलिम अलींना पक्षीविषयक अभ्यास गांभीर्याने स्वीकारणे शक्य झाले. हा त्यांच्या आयुष्याला कलाटणी देणारा प्रसंग होता.

शालेय जीवनात सलिम अलींनी फारशी चमक दाखविली नाही. त्यांना शैक्षणिक अभ्यासक्रमात विशेष रुची नव्हती. परंतु खेळांमध्ये गोडी होती. घरामध्ये निसर्गविषयक माहिती आणि त्या संदर्भातील साधनांची रेलचेल होती म्हणून त्याची परिणती सलिम अलींच्या मनात पक्षिशास्त्रज्ञ होण्याचा विचार रुजण्यात आणि तो फोफावण्यात झाली. १९१३ साली मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी प्राणिशास्त्र विषयात पदवी घेण्याच्या दृष्टीने सेंट झेवियर्स महाविद्यालय, मुंबई येथे प्रवेश घेतला. परंतु लॉगॅरिथम्स आणि तत्सम अवघड गोष्टींमुळे त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण सोडून दिले आणि ब्रह्मदेशातील (आताचा म्यानमार) तेव्हायला प्रयाण केले. तेथे त्यांचे बंधू जाबिर अली खाणधंद्यामध्ये होते. भावाला मदत करण्याबरोबर आजूबाजूला असलेल्या वनप्रदेशात त्यांची भ्रमंती सुरू झाली. त्यातूनच त्यांची निसर्गशास्त्रज्ञ होण्याची कौशल्ये वाढीस

स

लागली. १९१७ साली भारतात परतल्यावर त्यांनी प्राणिशास्त्रविषयक एक वर्षाचा अनौपचारिक शिक्षणाचा अभ्यासक्रम छंद म्हणून पूर्ण केला. फावल्या वेळात ते बी.एन.एच.एस.मध्ये जात. तेथे त्यांना भारतीय पक्षिसृष्टीचा परिचय झाला. तेथे त्यांची प्रेटर यांच्याशी गट्टी जमली. त्यांच्याबरोबर त्यांनी पक्षी जगतात बरीच मुशाफिरी केली. १९१८ साली त्यांनी तेहमिना नावाच्या आपल्या दूरच्या नात्यातील मुलीशी विवाह केला. लगेच ते दोघे तेव्हायला परत गेले. सलिम अलींना खाण धंद्यापेक्षा पक्ष्यांतच रस होता. त्यामुळे आधीच डबघाईला आलेला धंदा पूर्णपणे बसला आणि १९२४ साली अली बंधू भारतात परतले.

पक्षिजीवनाविषयीचे प्रशिक्षण घेण्याकरिता त्यांनी ठिकठिकाणी पत्रव्यवहार सुरू केला. त्यांना बर्लिन विद्यापीठाच्या प्राणिसंग्रहालयाने प्रतिसाद दिला. प्रा. एरविन स्टेसमन यांच्या हाताखाली त्यांनी जर्मनीत प्रशिक्षण घेतले. अर्थात त्यासाठी त्यांना तत्कालीन वरिष्ठ ब्रिटिश अधिकारी असलेल्या पक्षिशास्त्रज्ञांच्या विरोधाला तोंड द्यावे लागले. बर्लिनमधील सात महिन्यांच्या वास्तव्यात त्यांनी पक्ष्यांच्या स्थलांतरणाचा अभ्यास करण्यासाठी त्यांच्या पायांत कडी चढविण्याच्या उपक्रमात प्रत्यक्ष भाग घेऊन कार्यानुभव घेतला.

१९३० साली भारतामध्ये पुन्हा एकदा नोकरीचा शोध सुरू झाला. योग्य नोकरी न मिळाल्यामुळे सलिम अली आणि तेहमिना यांनी अलिबागजवळच्या किहीम या किनारपट्टीवरील गावात मुक्काम हालवला. तेथेच त्यांनी आपला सारा वेळ पक्ष्यांचा मागोवा घेण्यातच घालवला. बाया सुगरण पक्ष्यांचे त्यांनी बारकाईने निरीक्षण केले. अशा प्रकारे बाया सुगरण पक्ष्यांचे दीर्घकाळ निरीक्षण करणारे ते पहिलेच होते. त्यांचा अभ्यास प्रामुख्याने त्यांच्या वर्तणुकीविषयी होता. आजवर कोणी, कुठेच न नोंदवलेले जीवननाट्य त्यांनी प्रत्यक्ष बघितले.

बाया नरपक्षी मादीबरोबर मिलन करण्याच्या हेतूने तिला आकर्षित करण्याकरिता शिंदीच्या झाडांवर घरटी विणतात. एका विशिष्ट टप्प्यावर ते घरट्याचे विणकाम थांबवतात. मादी त्याचे निरीक्षण करते. आंतररचना तपासते. घरटे पसंत न पडल्यास पुन्हा नवे घरटे उभारण्यास नराद्वारे सुरुवात केली जाते. पुन्हा तीच प्रक्रिया पार पडते. घरट्यास पसंती लाभल्यास त्याच घरट्यात लगेच मिलन उरकून पसंतीची खातरजमा होते. मग तो नशीबवान नर घरट्याची उर्वरित बांधणी पूर्ण करतो. त्यामध्ये मादी अंडी घालते, उबवते. घरटी सजीव होतात. नर मात्र एक घरटे बांधून पूर्ण होताच दुसरे घरटे बांधायला घेतो आणि नव्या घरोब्याच्या तयारीला लागतो. याच क्रमाने, एकाच हंगामात किमान तीन-चार माद्यांचा तो दादला होतो. पक्षीविषयक पुस्तकातून आजवर कोणीही न नोंदवलेला हा जीवनपट डॉ.सलिम अलींनी सोसायटीच्या जर्नलमध्ये एक प्रदीर्घ लेख लिहून प्रकाशित केला. सलिम अलींच्या या मूळ अभ्यासावरच या पक्ष्यांच्या संदर्भात पुढील अध्ययन झाले. प्रत्यक्ष अवलोकन करून खातरजमा झाल्यावरच शास्त्रशुद्ध पद्धतीने निष्कर्षाची मांडणी करण्याचे त्यांनी मनाशी ठरवले. भारतीय पक्ष्यांचा मागोवा घेऊन त्याचे सूचीकरण केले. भारतीय पक्षिशास्त्राची उभारणी शास्त्रशुद्ध पायावर केली.

त्यांचे पक्षी-सर्वेक्षणाचे अहवाल वैशिष्ट्यपूर्ण आणि महत्त्वाचे ठरले. आजवर विचारात न घेतलेल्या पर्यावरण, परिसंस्था, भौगोलिक घटकांचा विचारही त्यात होता. भारतासारख्या कृषिप्रधान देशात पक्ष्यांच्या परिसंस्थेचा परिस्थितीच्या दृष्टीने अभ्यास करण्यावर त्यांनी भर दिला. बंगळुरूहून प्रसिद्ध होणाऱ्या ‘करंट सायन्स’ या नियतकालिकात, १९६३ साली ‘इकनॉमिक ऑर्निथॉलॉजी इन इंडिया’ या शोधनिबंधातून त्यांनी पक्षी-अभ्यासाचे शेती आणि जंगलांच्या संदर्भातील महत्त्व पटवून दिले. देशातील अन्नधान्य वाढविण्याच्या मोहिमेत पक्ष्यांच्या अस्तित्वाचा, त्यांच्या खाद्यसवयींचा विचार व्हायला हवा, असा त्यांचा आग्रह होता. त्यांच्या आग्रहामुळे, जाणीवपूर्वक प्रयत्नांमुळे नंतरच्या काळात अनेक भारतीय कृषिविद्यापीठांनी अभ्यासक्रम आखले, उपक्रम सुरू केले. पारिस्थितिकी किंवा इकलॉजीचे आद्य

स

तज्ज्ञ म्हणून डॉ. सलिम अली यांना मान द्यायला हवा.

पक्ष्यांचे वर्तन अभ्यासण्याकरिता त्यांनी पक्ष्यांच्या स्थलांतराचा अभ्यासही फार पूर्वीपासूनच सुरू केला होता. त्या दृष्टीने 'केवलादेव घना' हे त्यांचे आवडते ठिकाण होते. भरतपूरजवळील या पाणथळ प्रदेशात दरवर्षी करकोचे, बगळे, पाणकावळे, हविर्मुख (चमचे), क्रौंच इत्यादी पाणपक्ष्यांच्या विणीचा हंगाम साधून डॉ.सलिम अलींनी आपल्या सहकाऱ्यांच्या आणि नंतरच्या काळात विद्यार्थ्यांच्या मदतीने लाखो पक्ष्यांना कडी चढवली. स्थलांतरित पक्ष्यांमुळे स्थानिक पक्षी जीवनात कोणते बदल घडून येतात, हे स्थलांतरित पक्षी कुठे कुठे विखुरतात, स्थानिक नि स्थलांतरित यांत संघर्ष होतो का, स्पर्धा असते का, मानवी हस्तक्षेपामुळे पक्ष्यांच्या परंपरागत जीवनात कोणता विक्षेप येतो, या आणि अशा दृष्टिकोनातून सालिम अलींनी अनेक अभ्यासप्रकल्पांची उभारणी केली. निरीक्षणातून पक्षिशास्त्र अभ्यासण्याला चालना मिळाल्यावर अनेक तरुण त्याकडे वळले. सलिम अलींच्या प्रयत्नांमुळे भारतभर अनेक ठिकाणी पक्षी-अभयारण्ये घोषित झाली.

पक्षी-स्थलांतरणाचा त्यांचा अभ्यास एवढा गाढा होता, की जागतिक आरोग्य संघटना (डब्ल्यू.एच.ओ.) पक्ष्यांच्या स्थलांतरणाच्या बाबतीत प्रश्नांची उकल करण्याकरिता सलिम अलींना पाचारीत असे. त्यांचे पक्षिप्रेम, प्राणिमात्राविषयीची आस्था ही केवळ भाबड्या भूतदयेपोटी नव्हती. मात्र निरनिराळ्या प्रकल्प उभारणीपायी जंगलतोड मोठ्या प्रमाणात होऊ लागल्याने, परिसंस्था नष्ट होऊ लागल्यामुळे आणि अनेक पक्षिजाती नामशेष होऊ लागल्यामुळे त्यांना अतीव दु:ख होत असे. नुसते कायदे करून भागणार नाही, जनजागृती होणे महत्त्वाचे आहे, असा त्यांचा आग्रह होता. त्यासाठी व्याख्याने, फिल्म्स, स्लाइड्सद्वारा वन्यप्राण्यांचे महत्त्व पटवून देण्याचे त्यांनी सतत प्रयत्न केले.

सायलेंट व्हॅली संरक्षणाच्या आंदोलनात त्यांच्या प्रयत्नांना १९७७-१९७८ सालांत निसर्गप्रेमी जनतेने




खंबीर आणि ठाम पाठिंबा दिला. यावरून लोकमानसात त्यांचा पर्यावरण संरक्षणाचा मुद्दा रुजण्याची पावती मिळते. पशुपक्षी राखायचे म्हणून तिथून माणसाला बाहेर हुसकायचे, अशा विचारांचा पाठपुरावा ते करत नव्हते. माणूस आणि निसर्ग यांत सुसंवाद आणि परस्परपूरकता राखण्याच्या तत्त्वांचा त्यांनी प्रसार केला. अशा विचारांना प्राधान्य देणाऱ्या 'सह्याद्री बचाव', 'मुंबई बचाव' चळवळींना त्यांचा पूर्ण पाठिंबा होता.

भारतीय पक्षिशास्त्राचा अभ्यास खंडित होऊ न देता, तो पुढे चालू ठेवण्याची, त्याची प्रतिष्ठा वाढविण्याची आणि त्याला लोकमान्यता, लोकप्रियता मिळवून देण्याची कामगिरी सलिम अलींनी निष्ठापूर्वक पार पाडली. पक्षिशास्त्रात सतत नवीन भर टाकली. त्यांच्या प्रेरणेमुळे, प्रोत्साहनामुळे भारतात ठिकठिकाणी निसर्ग अभ्यास मंडळे, पक्षी निरीक्षण मंडळे, वृक्षमित्र संघटना उभ्या राहिल्या. सायलेंट व्हॅलीसारख्या घटना पुन्हा-पुन्हा घडू नयेत, त्यावर काही नियंत्रण असावे, लोकमताचा दबाव असावा, शास्त्रीय ज्ञानाचा अंकुश असावा, या दृष्टीने कायमस्वरूपाची एखादी योजना असावी यासाठी त्यांनी केंद्र सरकारकडे, पर्यावरण खाते निर्माण करावे असा आग्रह धरला. इंदिरा गांधींनी त्याला सकारात्मक प्रतिसाद देऊन वन आणि पर्यावरण खात्याची निर्मिती १९८१ साली केली.

१९४७ साली बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटीची संपूर्ण धुरा आपल्या खांद्यावर घेतल्यापासून तर ते सोसायटीचे अविभाज्य अंगच बनले. संस्थेच्या नियतकालिकाचेही ते संपादन करीत. कोणत्याही कामाबद्दल वेतन वा मानधन न घेता, त्यांनी तिचा कारभार सांभाळला. तिचे कार्यक्षेत्र वाढवले.

उत्तरायुष्यात मिळालेल्या नाना पुरस्कारांचे मानधनही त्यांनी सोसायटीच्या उत्कर्षासाठी वेचले. त्यांच्या अविरत प्रयत्नांमधूनच मुंबई विद्यापीठाने १९५७ साली सोसायटीला एम.एस्सी. आणि डॉक्टरेटचा अभ्यासक्रम सुरू करण्याची परवानगी दिली.

शास्त्रज्ञ, संशोधक, कार्यकर्ता या आपल्या ओळखीबरोबरच डॉ. सालिम अली प्रसिद्ध आहेत, आपल्या निसर्गविषयक विशेषत: आपल्या पक्षीविषयक लेखनासाठी, पुस्तकांसाठी. त्यांचे आत्मचरित्र 'द फॉल ऑफ द स्पॅरो' १९८५ साली प्रकाशित झाले आणि गाजले. परंतु त्यापूर्वीही त्यांनी अनेक पुस्तके, तांत्रिक अहवाल लिहिले होते. त्यांच्या पुस्तकांचा वापर संदर्भग्रंथ म्हणून केला जातो. त्यांनी पक्षी-सर्वेक्षणावर आधारित 'बर्ड्स ऑफ कच्छ', 'इंडियन हिल बर्डस', 'द बर्ड्स ऑफ त्रावणकोर'- कोचिन, 'पिक्टोरियल गाईड टू द बर्ड्स ऑफ इंडिया अ‍ॅन्ड सब कॉन्टिनेन्ट' इत्यादी पुस्तके लिहिली. भारतीय पक्षिशास्त्रात सर्वांत मोलाची भर घातली ती त्यांच्या 'हॅण्ड बुक ऑफ द बर्ड्स ऑफ इंडिया अ‍ॅन्ड पाकिस्तान' या दशखंडात्मक ग्रंथराजाने.

डॉ. सलिम अलींच्या निसर्गविषयक ज्ञानाची, अभ्यासाची दखल आंतरराष्ट्रीय पातळीवर घेतली गेली. अनेक राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय निसर्गसंरक्षण, वन्यप्राणी संरक्षण समित्यांचे ते सदस्य होते. १९७६ साली त्यांना 'नोबेल' पारितोषिकाच्या तोडीचे 'जे. पॉल गेट्टी' पारितोषिक लाभले. त्याशिवाय त्यांना १९५८ साली 'पद्मभूषण' आणि १९७६ साली 'पद्मविभूषण' हे भारत सरकारचे पुरस्कार प्रदान करण्यात आले. १९६७ साली 'ब्रिटिश ऑर्निथॉलॉजिस्ट्स युनियन'चे 'सुवर्णपदक' प्रदान करण्यात आले. डच सरकारने 'कमांडर ऑफ द नेदरलॅण्ड्स ऑर्डर ऑफ द गोल्डन आर्क' देऊन गौरवान्वित केले. भारतीय राष्ट्रीय विज्ञान अकादमीचे 'फेलो' म्हणून त्यांची निवड करण्यात आली. १९८२ साली 'नॅशनल रिसर्च प्रोफेसरशिप इन ऑर्निथॉलॉजी'साठी त्यांची भारत सरकारने निवड केली. तीन मानद डॉक्टरेट मिळालेले डॉ. सलिम अली १९८५ साली राज्यसभेवर स्वीकृत सदस्य म्हणून नियुक्त झाले. १९८७ साली त्यांना निसर्ग आणि वन्यप्राणी यांच्याविषयी प्रेम निर्माण केल्याबद्दल 'दादाभाई नवरोजी पारितोषिक' देण्यात आले.

१९८७ साली, ९१ वर्षांचे असताना, प्रोस्टेट ग्रंथीच्या कर्करोगाने मृत्यूने गाठेपर्यंत ते सतत कार्यमग्न राहिले.

– शैलेश माळोदे

**संदर्भ :**

*१. गवाणकर, वीणा; 'सलीम अली'*

## सांकलिया, हंसमुख धीरजमल

**पुरातत्त्वशास्त्रज्ञ**

**१९०८- २८ जानेवारी १९८९**



भारतातील पुरातत्त्व संशोधनाला जागतिक मान्यता मिळवून देणारे डॉ. हंसमुख धीरजमल सांकलिया यांचा जन्म मुंबई येथे झाला. बी.ए., एलएल.बी. केल्यानंतर १९३२ साली मुंबई विद्यापीठातूनच प्राचीन भारतीय इतिहासात त्यांनी एम.ए. ही पदवी मिळवली. त्यानंतर १९३५ साली चान्हुदारो येथे व १९३६ साली मेडन कैसल येथे त्यांनी क्षेत्रीय पुरातत्त्वाचे प्रशिक्षण घेतले. १९३७ साली लंडन विद्यापीठातून पुरातत्त्वात त्यांनी पीएच.डी. मिळवली. त्यासाठी त्यांनी 'गुजरातचा पुरातत्त्वीय अभ्यास' केला.

काश्मीरपासून केरळपर्यंत आणि गुजरातपासून आसामपर्यंत संपूर्ण भारतभर पुरातत्त्वीय ठिकाणांच्या शोधासाठी त्यांनी क्षेत्रीय सर्वेक्षण केले. सांकलियांच्या मार्गदर्शनाखाली गुजरातमध्ये लांघनाज, अखज, वलसाना, द्वारका व सोमनाथ येथे; महाराष्ट्रात कोल्हापूर, जोर्वे, नाशिक, नेवासा, चिर्की-नेवासा व इनामगाव येथे; मध्यप्रदेशातील महेश्वर, नवदातोली,

त्रिपुरी व कायथा येथे; कर्नाटकात संगतकल्लू व टेक्कलाकोटा येथे; राजस्थानातील अहार व आंधप्रदेशातील बेटमचेरिया येथे उत्खनन झाले.

उत्खननाच्या आधारे द्वारकेची प्राचीनता महाभारत काळापर्यंत जात नाही, हे त्यांनी सिद्ध केले होते. तसेच, भूगोल व वाङ्मयाच्या आधारे रावणाची लंका म्हणजे सध्याचा श्रीलंका देश नाही, असे मत त्यांनी मांडले होते. संस्कृतवरही त्यांचे प्रभुत्व होते.

१९३९ ते १९७३ सालापर्यंत डेक्कन कॉलेजमधील पुरातत्त्वविभागाचे प्रमुख, १९५६ ते १९५९ सालापर्यंत डेक्कन कॉलेजचे प्रभारी संचालक, १९६० ते १९६८ सालापर्यंत डेक्कन कॉलेजचे सहसंचालक व १९७० ते १९७३ सालापर्यंत डेक्कन कॉलेजचे संचालक अशी पदे त्यांनी भूषविली. याशिवाय १९७४ ते १९७६ सालापर्यंत विद्यापीठ अनुदान आयोगाचे शिक्षक, १९७३ ते १९८९ सालापर्यंत पुरातत्त्वातील एमेरिटस प्रोफेसर पद व १९७५ ते १९८९ सालापर्यंत टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे येथे मानद संचालक म्हणून त्यांनी काम केले.

त्यांच्या संशोधनकार्यासाठी त्यांना अनेक पुरस्कार मिळाले. यात मुंबई विद्यापीठाचा भगवानलाल इंद्रजी पुरस्कार, रॉयल एशियाटिक सोसायटी, मुंबई यांचे रौप्यपदक, गुजरात साहित्य सभा, अहमदाबाद यांचे सुवर्णपदक, दादाभाई नवरोजी पुरस्कार, एशियाटिक सोसायटी ऑफ बंगाल, कोलकाता यांचे चक्रवर्ती रौप्यपदक, कोलकाता विद्यापीठाच्या मानवशास्त्र विभागातर्फे रॉबर्ट ब्रूस फूट पदक, दक्षिण गुजरात विद्यापीठ, सुरत यांचा ओम हरी पुरस्कार व एशियाटिक सोसायटी, मुंबई यांचे कॅम्पबेल स्मृती सुर्वणपदक यांचा समावेश आहे. त्यांची संशोधनात्मक २४ पुस्तके प्रसिद्ध झाली. १९६३ साली प्रथम प्रकाशित झालेले ‘प्री हिस्टरी ॲण्ड प्रो हिस्टरी इन इंडिया ॲण्ड पाकिस्तान’ हे त्यांचे पुस्तक आजही प्रमाण पुस्तक म्हणून वापरले जाते. इंट्रोडक्शन आर्किऑलॉजीच्या मराठीत प्रकाशित झालेल्या त्यांच्या पुस्तकाला भारत सरकारचा व ‘आर्किऑलॉजी ॲण्ड द रामायण’ या पुस्तकाच्या गुजरातीतील आवृत्तीला गुजरात सरकारचा पुरस्कार लाभला.

ऑल इंडिया संस्कृत अकॅडमी, लखनऊ, द हेरास सोसायटी, सेंट झेवियर्स महाविद्यालय, मुंबई यांचे सन्माननीय फेलो म्हणून त्यांची निवड करण्यात आली होती.

महेश्वर, मध्य भारत स्टेट, १९५४, अहमदनगर महानगरपालिका, १९७३ व पुणे महानगरपालिकेने त्यांना मानपत्र देऊन गौरवले होते. अहमदनगर ऐतिहासिक संग्रहालयातर्फे त्यांना प्रा.एन.जी. नारळकर विद्वत पुरस्कार देऊन गौरविण्यात आले. १९७४ साली भारत सरकारतर्फे पद्मभूषण देऊन त्यांना गौरविण्यात आले.

त्यांचे पुणे येथे निधन झाले.

– डॉ.सविता घाटे

## साठ्ये, जयंत आनंद

**हवामानशास्त्रज्ञ**

**१७ जानेवारी १९४८**



डॉ.जयंत आनंद साठ्ये यांचा जन्म बंगळुरू येथे झाला. त्यांचे वडील सरकारी नोकरीत होते. आजोबा ख्यातकीर्त अभियंते आणि वडीलही अखिल भारतीय अभियांत्रिकी सेवेतले. त्यामुळे डॉ. जयंत साठ्ये यांच्या रक्तात अभियांत्रिकी भिनलेली होती. त्यांचे वडील ज्या गावी बदली होऊन जातील, त्या गावी शिक्षण घेत-घेत जयंत साठ्ये हे त्यांच्या हुशारीच्या जोरावर राष्ट्रीय विज्ञान प्रज्ञा शिष्यवृत्तीचे मानकरी ठरले. १९६९ साली त्यांनी यंत्र अभियांत्रिकी विषयात मुंबई आय.आय.टी.मधून बी.टेक. ही पदवी मिळविली. मग ते अमेरिकेत गेले. तिथे १९७४ साली त्यांनी पर्यावरणीय अभियांत्रिकीत पीएच.डी. मिळविली. १९७४ साली ते जागतिक कीर्तीच्या लॉरेन्स बर्कले राष्ट्रीय प्रयोगशाळेत रुजू झाले.

स

तिथे ते ज्येष्ठ शास्त्रज्ञ म्हणून तेव्हापासून कार्यरत आहेत. १९८८ ते १९९८ या काळात डॉ.साठ्ये आंतरराष्ट्रीय ऊर्जा अभ्यासगटाचे कार्यकारी प्रमुख म्हणून काम करीत होते. पुढे ते या गटाचे नेतृत्व करू लागले. ते अष्टपैलू आहेत. वित्तीय व्यवस्थापन आणि कर्मचारी व्यवस्थापनातील त्यांचे कार्यही वाखाणले गेले आहे.

'इंटर गव्हर्नमेंट पॅनल ऑन क्लायमेट चेंज' म्हणजेच आय.पी.सी.सी.ला २००७ सालचा नोबेल शांतता पुरस्कार प्राप्त झाला. या संस्थेशी दोन भारतीयांचा संबंध होता. अशा संस्थांचे कार्य हे संघभावनेने चालते. त्यामुळे ह्या संस्थेशी संबंधित सर्वच शास्त्रज्ञांचा हा गौरव होता. त्यात संस्थाप्रमुख डॉ. राजेंद्र पचौरी यांच्याबरोबर डॉ. जयंत आनंद साठ्ये हेही होते. आय.पी.सी.सी. आणि अल् गोर यांना २००७ सालचा शांततेचा नोबेल पुरस्कार विभागून मिळाला. मनुष्याने त्याच्या रोजच्या जगण्यासाठी केलेल्या उद्योगातून जागतिक हवामानात जो बदल घडला, तो कसा याचा अभ्यास करून त्या माहितीचा प्रसार संस्थेने जगात केला आणि हा बदल थांबवण्यासाठी काय करावे लागेल याच्या प्रयत्नांचीही मुहूर्तमेढ रचली, यासाठी संस्थेला हा पुरस्कार मिळाला. या प्रयत्नात डॉ. साठ्ये यांचा वाटा महत्त्वाचा आहे.

१९८० सालानंतर प्रथम ओझोन विवर आणि नंतर हवामानातील बदल हे विषय प्रकर्षाने जगापुढे आले. या दोहोंचा परस्परसंबंध असल्याने, पुढे हवामानातील जागतिक बदल वाढत आहेत हे सिद्ध करणे आणि त्यांना थोपविण्यासाठी उपाय सुचविणे, हा एक कळीचा मुद्दा ऐरणीवर आला. त्यातूनच आय.पी.सी.सी.ची स्थापना झाली. त्या बाबतीत त्या वेळी बरेच वाद झाले. पण आय.पी.सी.सी.चे सदस्य त्यांच्या हाती सोपविलेल्या कामाचे महत्त्व जाणत होते. याला कारण, या तज्ज्ञांची त्यांच्या पर्यावरणीय कार्यावर निष्ठा होती.

डॉ. जयंत साठ्ये हेही असेच निष्ठावंत तज्ज्ञ असल्याने, त्यांना आय.पी.सी.सी.त मानाचे स्थान होते. आधी ते या समितीच्या एका विभागाचे प्रमुख म्हणून कार्यरत होते. नंतर त्यांनी समन्वयक (कोऑर्डिनेटर) म्हणून काम बघितले. हे कार्य त्यांनी उत्कृष्टरीत्या सांभाळले. खरे तर समन्वयक ही एक तारेवरची कसरत असते. मूळ ध्येयाशी सुसंगत विचारांमध्ये सुसूत्रता आणणे, हे काम वाटते तितके सोपे नसते. या समितीच्या विविध विभागांचे अहवाल एकत्र करून त्यातून एक प्रमुख अहवाल तयार करण्याचे कामही साठ्ये यांनी पार पाडले. या काळातही त्यांचे आपल्या शैक्षणिक कर्तव्यांकडे दुर्लक्ष झालेले नव्हते. त्यांनी चाळीसहून अधिक विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन केलेले आहे.

त्यांनी विपुल लेखनही केलेले आहे. त्यांनी पर्यावरणविषयक वेगवेगळ्या दहा पुस्तकांचे लेखन-सहलेखन केलेले असून आशिया विकास बँक, जागतिक बँक, तैवान पॉवर कंपनी इत्यादी संस्थांचे ऊर्जाप्रकल्पविषयक सल्लागार म्हणून ते काम पाहतात. 'द जर्नल ऑफ मिटिगेशन अ‍ॅण्ड अ‍ॅडॉप्टेशन स्ट्रॅटेजीज फॉर ग्लोबल चेंज' या नियतकालिकाच्या पर्यावरण आणि ऊर्जाविषयक खास अंकांचे 'अतिथी संपादक' म्हणूनही त्यांनी काम केलेले आहे.

हवामान बदलामुळे विकसनशील देशांना होणारे तोटे, हा त्यांचा चिंतेचा आणि म्हणूनच अभ्यासाचा विषय आहे. या हवामान बदलांचा विकसनशील देशांना होणारा त्रास कमी कसा करता येईल, आणि या बदलाला तोंड देण्यासाठी विकसनशील देशांनी काय करायला हवे, याबाबतचा ऊहापोह करणारे 'क्लायमेट चेंज अ‍ॅण्ड डेव्हलपिंग कंट्रीज' हे त्यांचे पुस्तक प्रकाशित झालेले असून ते त्यांनी एन.एच. रवींद्रनाथ यांच्या सहकार्याने लिहिले आहे. हवामान बदल, वाहतूक, जमिनीच्या वापरातील बदल, कमी होणारी वनसंपदा आणि ऊर्जासमस्येची वाढती तीव्रता, याविषयींचे त्यांचे काम जगभर वाखाणण्यात आले आहे.

अक्षय विकास आणि कार्बनचा वापर यांबाबत त्यांचे विचार जगन्मान्य झाले. वाढता कार्बन-डाय-ऑक्साइड

स

वायू वातावरणातून हटवायला काय करावे, यासंबंधी त्यांनी उद्‌बोधनाचे अथक प्रयत्न केलेले आहेत. त्यासाठी त्यांनी प्रशिक्षण वर्ग, प्रात्यक्षिके, भाषणे आणि कार्यशाळांचा उपयोग केला. जिथे विजेचा तुटवडा आहे, तिथे विजेचा जास्तीत जास्त कार्यक्षम वापर केला; तसा वापर करणारी यंत्रे बनवली; वीज वाया जाणार नाही, याची अधिकाधिक काळजी घेतली तर खूप फायदा होईल, हे त्यांनी दाखवून दिले आहे. त्याची प्रचिती आणून देण्यासाठी कॅलिफोर्नियात डॉ. साठ्ये यांनी हा प्रयोग यशस्वी करून दाखवला आहे.

– प्रा. निरंजन घाटे

**संदर्भ :**

१. *दै. लोकसत्ता; २० एप्रिल, २००८.*

## साने, प्रफुल्लचंद्र विष्णू
**वनस्पतीशास्त्रज्ञ**
**२४ जानेवारी १९३७**



डॉ. प्रफुल्लचंद विष्णू साने यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील चिपळूण या गावी झाला. नागपूरच्या महाविद्यालयामधून कृषि-विज्ञानात बी.एस्सी. आणि एम.एस्सी. या पदव्या मिळवल्यावर ते चार वर्षे दिल्लीच्या ‘इंडियन स्टँडर्ड्स इन्स्टिट्यूट’मध्ये साहाय्यक संचालक होते. त्यांनी कॅनडामधील अल्बर्टा विद्यापीठातून पीएच.डी. केली. त्यानंतर कॅलिफोर्निया विद्यापीठाच्या बर्कले येथील प्रयोगशाळेत तीन वर्षे संशोधन केले. भारतात परतल्यावर, मुंबईत भाभा अणू संशोधन केंद्रामध्ये चौदा वर्षे संशोधन केल्यावर १९८३ साली ते लखनौच्या राष्ट्रीय वनस्पती विज्ञान संशोधन संस्थेचे उपसंचालक म्हणून रुजू झाले. तेथे ते संचालक झाले आणि १९९७ साली निवृत्त होऊन लखनौमध्येच स्थिरावले.

साने यांनी वनस्पती, जीवरसायनशास्त्र या विषयांत महत्त्वाचे संशोधन केले आहे. खास करून प्रकाश संश्लेषणासंबंधीच्या त्यांनी केलेल्या संशोधनास जगन्मान्यता मिळाली आहे. हरित वनस्पती प्रकाश संश्लेषणाद्वारे अन्ननिर्मिती करतात. या क्रियेमध्ये सूर्यप्रकाशातील ऊर्जा शोषून घेण्याचे महत्त्वाचे कार्य हरितद्रव्यामुळे होते. हे हरितद्रव्य (क्लोरोफिल) क्लोरोप्लास्ट कणांमध्ये सामावलेले असते. या क्लोरोप्लास्टची घडण आणि त्याची कार्यप्रणाली यांवर महत्त्वाची माहिती मिळवणे, हा त्यांच्या संशोधनाचा केंद्रबिंदू होय. क्लोरोप्लास्टच्या थायलाकॉइड आवरणातील महत्त्वाच्या एन्झाइमची स्थळे त्यांनी सुचवली. त्याचप्रमाणे, आवरणांतील प्रथिनांत प्रोटॉनच्या प्रवासाचा सहभाग असतो, हेही त्यांनी दाखवून दिले. आवरणांतून जाणाऱ्या प्रकाशलहरींच्या त्यांच्या संशोधनामुळे वनस्पतींतील ऊर्जासाठवणीच्या क्रियेवर प्रकाश पडला.

क्षार, उच्च तापमान, प्रखर उन्हे, जमिनीत अल्कलींचे अधिक प्रमाणात अस्तित्व, अशा तणावांखाली वाढणाऱ्या वनस्पतींत अनुकूलनक्षमता कशी निर्माण होते, यावर त्यांचे बरेच संशोधन आहे. या संशोधनात मिळालेल्या माहितीच्या आधारे उत्तर भारतातील उसर (भारी प्रमाणांत अल्कली असलेल्या) जमिनींवर झाडांची लागवड करणे शक्य होते.

मक्यासारखी काही सी-४ धान्य-वनस्पती, एन्झाइमच्या साहाय्याने हवेतून घेतलेल्या कार्बन-डाय-ऑक्साइडचे नियमन करतात आणि जास्त अन्ननिर्मिती करतात. या तऱ्हेच्या प्रकाश संश्लेषण क्रियेत मॅलिक एन्झाइम, फॉस्फोइनॉल पायरुवेट कार्बोझायलेज, इत्यादी एन्झाइम्सचे नियमन केले जाते, असे साने आणि त्यांचे सहकारी यांनी केलेल्या संशोधनात आढळून आले. या माहितीचा उपयोग कृषी उत्पादन वाढण्यासाठी होऊ शकतो.

संचालक झाल्यावर लखनौच्या राष्ट्रीय वनस्पती संशोधन संस्थेत त्यांनी बरेच नवीन उपक्रम सुरू केले.

संस्थेत अनेक वर्षे चालू असलेल्या पारंपरिक संशोधनाबरोबरच त्यांनी जीवरसायनशास्त्र, फिजिऑलॉजी, पर्यावरणशास्त्र, वृक्षजीवशास्त्र इत्यादी नवीन संशोधन शाखा सुरू केल्या. अद्ययावत तंत्रसामग्री आणून नव्या संशोधनास चालना दिली. जैव तंत्रज्ञान मंत्रालयाकडून मदत मिळवून मॉलिक्यूलर बॉटनी आणि जैव तंत्रज्ञान या शाखांच्या संशोधनासाठी नवीन प्रयोगशाळा उभारल्या. ‘सेंटर फॉर प्लँट मॉलिक्यूलर बायॉलॉजी’ (सी.पी.एम.बी.) सुरू केले. कीटकांपासून स्वसंरक्षण करू शकणाऱ्या वनस्पतींची निर्मिती केली. फुलपाखरांपासून स्वतःचे रक्षण करणाऱ्या तंबाखूच्या ट्रान्सजेनिक जाती तयार केल्या. ज्वारी आणि तांदूळ या महत्त्वाच्या पिकांतील पुंकेसरांच्या नपुंसकतेची कारणमीमांसा केली. आंतरराष्ट्रीय पातळीवर काम करण्यासाठी संस्थेत दक्षिण आशियाई देशांतील कडधान्यांच्या माहितीचे संकलन आणि प्रसारण केंद्र सुरू केले. संस्थेतील शास्त्रज्ञांना आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या प्रयोगशाळांत कामाचा अनुभव देण्यासाठी उत्तेजन दिले, परदेशांतल्या प्रयोगशाळांत प्रवेश आणि भेटी देववल्या, आणि त्यांच्या कार्याच्या कक्षा रुंदावण्यासाठी सक्रिय साहाय्य दिले.

काही प्रकारची कामे शासनाच्या नियमांच्या चौकटीत बसून करणे कठीण असते या जाणिवेने त्यांनी ‘इंटरनॅशनल सोसायटी फॉर एन्व्हायर्नमेंटल बॉटनिक्स’ (आय.एस.ई.बी.) या स्वयंसेवी संस्थेची १९९४ साली स्थापना करून तिला आपल्या राष्ट्रीय प्रयोगशाळेकडून सर्व प्रकारची मदत केली. या संस्थेतर्फे स्थानिक शालेय विद्यार्थी आणि सर्वसामान्य जनतेसाठी पर्यावरण रक्षण, जीववैविध्य जोपासना, वनस्पती संपत्तीचा शाश्वत प्रकारे उपयोग करण्याच्या पद्धती इत्यादींचे अनौपचारिक शिक्षण देण्याची व्यवस्था केली. आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांचे आयोजन केले.

सेवानिवृत्तीबरोबरच या संस्थेच्या अध्यक्षपदाची सूत्रेही त्यांनी संस्थेच्या नव्या अध्यक्षांकडे सुपूर्द केली. मात्र संस्थेने त्यांची सल्लागार म्हणून निवड केली आणि त्यांच्या तज्ज्ञतेचा लाभ घेणे चालू ठेवले. त्यांचे शोधनिबंध आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या अनेक नियतकालिकांत आणि पुस्तकांत प्रसिद्ध झाले आहेत. संशोधनाबद्दल त्यांना मिळालेल्या सन्मानांची यादी मोठी आहे. कॉमनवेल्थ फेलोशिप, अलेक्झांडर फॉन हुम्बोल्ट फेलोशिप आणि १९८१ साली बहुमानाचे एस.एस. भटनागर पुरस्कार त्यांना मिळाले होते. नागपूर विद्यापीठ सुवर्णपदक, बिरबल सहानी सुवर्णपदक आणि भारत ज्योती ‘सायंटिस्ट ऑफ द इयर’ त्यांना बहाल करण्यात आले होते.

याशिवाय ते पुढील संस्थांचे फेलो म्हणून निवडले गेले आहेत: इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमी (दिल्ली), इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस (बंगळुरू), नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेस (अलाहाबाद), नॅशनल अकॅडमी ऑफ अ‍ॅग्रिकल्चरल सायन्सेस (दिल्ली), महाराष्ट्र अकॅडमी ऑफ सायन्सेस, इत्यादी.

विद्यापीठ अनुदान आयोग, दिल्ली या संस्थेचे ते १९८६-८७ साली व्याख्याता होते व दिल्लीतीलच इंडियन नॅशनल सायन्स अकॅडमीचे १९९६ ते १९९८ सालांत ‘तज्ज्ञ परिषद’ सभासद होते.

सेवानिवृत्तीनंतरही त्यांचे संशोधन कार्य चालूच आहे. स्वीडन आणि कॅनडा येथील संस्थांमध्ये ते दरवर्षी तीन ते पाच महिने संशोधन कार्यात मग्न असतात. ‘जैन इरिगेशन सिस्टिम्स’ या महाराष्ट्रातील उद्योगाचे ते सल्लागार आहेत. तेथे जैव तंत्रज्ञान प्रयोगशाळा उभारून त्यांनी संशोधनास दिशा दिली. ऊतीसंवर्धनामार्गे पिकांचा दर्जा उंचावण्यास मदत केली.

संशोधनाने मानसिक समाधान मिळते आणि सल्लागार या नात्याने उत्पन्न वाढवून शेतीव्यवसाय फायद्यात चालवता येतो, या दोन्ही गोष्टी आत्यंतिक समाधानाच्या व आनंदाच्या आहेत, असे डॉ.साने यांचे मत आहे.

– डॉ. शरद चाफेकर

**संदर्भ :**

*१. भटनागर लॉरेट्स् १९५८-१९९१; इंडियन नॅशनल सायन्स ॲकॅडमी.*

स

## साराभाई, विक्रम

**भौतिकशास्त्रज्ञ**

**१२ ऑगस्ट १९१९ - ३१ डिसेंबर १९७१**



प्रसिद्ध वैज्ञानिक आणि भारतीय अंतराळ कार्यक्रमाचे जनक. डॉ. विक्रम साराभाई यांचा जन्म गुजरात मधील अहमदाबाद येथील एका नामवंत उद्योजक घराण्यात झाला. त्यांनी आपले सुरुवातीचे महाविद्यालयीन शिक्षण अहमदाबाद येथील गुजरात महाविद्यालयातून घेतले. त्यानंतर त्यांनी इंग्लंडमधील केंब्रिज येथील सेंट जॉन्स महाविद्यालयात प्रवेश घेतला व तेथून नैसर्गिक विज्ञान (नॅचरल सायन्सेस) या शाखेतील 'ट्रायपॉस' हा मान प्राप्त केला. दुसऱ्या महायुद्धास सुरुवात झाल्याने ते इ.स. १९४० साली भारतात परतले आणि त्यांनी बंगलोर (बंगळुरू) येथील 'भारतीय विज्ञान संस्थे'त नोबेल पारितोषिक विजेते शास्त्रज्ञ डॉ.चंद्रशेखर वेंकट रमण यांच्या मार्गदर्शनाखाली आपल्या संशोधनास सुरुवात केली. महायुद्ध संपल्यावर १९४५ साली साराभाई पुन: केंब्रिज येथे रवाना झाले आणि पीएच.डी. ही पदवी प्राप्त करून १९४७ साली ते भारतात परतले. डॉ. साराभाई यांचा पीएच.डी.चा प्रबंध हा विषुववृत्ताजवळील प्रदेशातून केल्या गेलेल्या वैश्विक किरणांच्या निरीक्षणांवर आधारित आहे.

भारतात परतल्यावर त्याच वर्षी डॉ.साराभाई यांनी अहमदाबाद येथे 'फिजिकल रिसर्च लॅबोरेटरी'ची (पी.आर.एल.) स्थापना केली. या संस्थेच्या मुख्य इमारतीची पायाभरणी १९५२ साली डॉ.रमण यांच्या हस्ते झाली. सुरुवातीस वैश्विक किरण आणि वातावरणाच्या वरच्या थरांच्या गुणधर्मांशी संबंधित संशोधनावर लक्ष केंद्रित करणाऱ्या या प्रयोगशाळेत त्यानंतर सैद्धान्तिक भौतिकशास्त्र, रेडिओभौतिकशास्त्र, तसेच ग्रहविज्ञान, सौरखगोलशास्त्र अशा अनेक शाखांतील संशोधन केले जाऊ लागले. अहमदाबादमधील एका महाविद्यालयातील दोन खोल्यांत १९४७ साली स्थापन झालेली ही प्रयोगशाळा आता भौतिकशास्त्रातील आघाडीवरची प्रयोगशाळा म्हणून नावारूपास आली आहे. साराभाईंनी वैश्विक किरणांचा अभ्यास करण्यासाठी अहमदाबादबरोबरच त्रिवेंद्रम, कोडाईकनाल आणि गुलमर्ग येथेही विशेष वेधशाळा उभारल्या.

वैश्विक किरण हे आंतरग्रहीय पोकळीचा अभ्यास करण्याच्या दृष्टीने अतिशय उपयुक्त असे निर्देशक आहेत. भौतिकशास्त्र संशोधन प्रयोगशाळेत 'विविध दिशांनी पृथ्वीवर आदळणाऱ्या वैश्विक किरणांत आढळणारा अल्पसा दिशानुरूप फरक हा या किरणांनी ज्या प्रदेशातून मार्गक्रमण केले, त्या प्रदेशातील विद्युत्चुंबकीय गुणधर्मांवर अवलंबून असतो, या तर्काला डॉ.साराभाईंनी केलेल्या संशोधनातून पुष्टी मिळाली. साराभाईंनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी केलेल्या संशोधनाद्वारे वैश्विक किरणांच्या तीव्रतेत सौरचक्रानुसार व सूर्याच्या स्वत:भोवती फिरण्यानुसार होणाऱ्या बदलांचाही मागोवा घेतला गेला. सूर्य-पृथ्वी यांच्यातल्या संबंधांशी निगडित असे हे संशोधन होते.

पृथ्वीभोवतालच्या चुंबकीय आवरणाचा अभ्यास करण्याच्या दृष्टीने पृथ्वीवरील चुंबकीय वैषुविकवृत्तावरून केलेली निरीक्षणे महत्त्वाची ठरतात. दक्षिण भारतातून हे चुंबकीय वैषुविकवृत्त जात असल्यामुळे डॉ.साराभाईंनी या प्रदेशातून अग्निबाण सोडून त्याद्वारे ही निरीक्षणे करण्याचे ठरवले. वैश्विक किरणांवरील या संशोधनाबरोबरच दळणवळण, नैसर्गिक साधनसंपत्तीचा शोध, शिक्षणाचा प्रसार यांसाठीही अंतराळशास्त्राचा उपयोग होणार असल्याने, दूरदृष्टीच्या डॉ.साराभाईंनी अग्निबाण प्रक्षेपणाचे तंत्रज्ञान आत्मसात करण्याची गरज ओळखली. १९६२ साली अंतराळसंशोधनासाठी अणुशक्ती विभागाच्या अखत्यारीतली राष्ट्रीय समिती स्थापन झाली आणि भारतातील अंतराळकार्यक्रमाला डॉ.साराभाई यांच्या नेतृत्वाखाली सुरुवात झाली. या

स



**अग्निबाण प्रक्षेपण केंद्र**

कार्यक्रमाद्वारे डॉ.साराभाईंनी थिरुवअनंतपुरमजवळील थुंबा येथे वैषुविक अग्निबाण प्रक्षेपण स्थानक उभारले. या स्थानकावरून दि.२१ नोव्हेंबर, १९६३ साली पहिल्या अग्निबाणाचे प्रक्षेपण केले गेले. १९६९ साली अणुऊर्जा विभागाच्या अंतर्गत 'भारतीय अंतराळ संशोधन संघटने'ची निर्मिती केली गेली. भविष्यात अतिशय यशस्वी ठरलेल्या 'इन्सॅट' या बहुउद्देशीय उपग्रह मालिकेचा प्राथमिक आराखडा डॉ. साराभाईंच्याच पुढाकारातून तयार झाला.

डॉ.साराभाई यांनी राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावरची अनेक महत्त्वाची पदे सांभाळली होती. डॉ. होमी भाभा यांच्या १९६६ साली झालेल्या अपघाती मृत्यूनंतर डॉ.साराभाई यांच्याकडे अणुशक्ती आयोगाचे अध्यक्षपद सोपवण्यात आले. डॉ.साराभाई हे संयुक्त राष्ट्रसंघाच्या वैज्ञानिक सल्लागार समितीचेही सदस्य होते, तसेच १९६८ साली संयुक्त राष्ट्रसंघाने विएन्ना (ऑस्ट्रिया) येथे आयोजित केलेल्या पहिल्या अंतराळविषयक परिषदेचे ते उपाध्यक्ष होते. १९७० सालच्या विएन्ना येथीलच आंतरराष्ट्रीय अणुऊर्जा संस्थेच्या सर्वसाधारण सभेचे अध्यक्षपद आणि १९७१ साली जिनिव्हा येथे संयुक्त राष्ट्रसंघातर्फे आयोजित केल्या गेलेल्या अणुऊर्जेच्या शांततामय उपयोगांसंबंधीच्या चौथ्या परिषदेचे उपाध्यक्षपदही साराभाईंनी भूषवले होते. डॉ. साराभाईंनी केलेल्या वैश्विक किरणांशी संबंधित अशा संशोधनामुळे त्यांना आंतरराष्ट्रीय 'शुद्ध आणि उपयोजित भौतिकशास्त्र संघटने'चे सदस्यपद तर मिळालेच; पण याच संघटनेने स्थापन केलेल्या वैश्विक किरणांच्या स्वरूपांत विविध कारणांनी होणाऱ्या बदलांचा अभ्यास करण्यासाठी स्थापन झालेल्या उपआयोगाच्या सचिवपदीही त्यांची नियुक्ती केली गेली. डॉ. साराभाई हे १९६२ सालच्या भटनागर पारितोषिकाचे मानकरी होते. १९६६ साली त्यांना 'पद्मभूषण' हा सन्मान बहाल करण्यात आला.

सरकारी संस्थांबरोबरच खाजगी संस्था व उद्योगांच्या उभारणीतही डॉ.साराभाईंचा सहभाग होता. यात कापड उद्योगात संशोधन करणाऱ्या 'ॲटिरा' आणि व्यवस्थापनाचे प्रशिक्षण देणाऱ्या 'भारतीय व्यवस्थापन संस्था' (इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेन्ट) या अहमदाबाद येथील संस्थांचा समावेश आहे. रसायनांच्या व औषधांच्या दर्जाचे महत्त्व जाणणारे साराभाई हे या क्षेत्रांतील उद्योगांशीही संबंधित होते. विज्ञानाचा फायदा हा समाजातील सर्व स्तरांना मिळावा यासाठी डॉ. विक्रम साराभाईंचा कटाक्ष होता. मुलांच्यात आणि इतर जनसामान्यांत विज्ञानाची रुची निर्माण होण्याच्या दृष्टीने त्यांनी अहमदाबाद येथे विज्ञान केंद्रही (विक्रम ए. साराभाई कम्युनिटी सायन्स सेंटर ) स्थापन केले.

विज्ञानाबरोबरच इतर अनेक अभिजात कलांत रस घेणाऱ्या डॉ. साराभाई यांनी नृत्यकलेत निपुण असणाऱ्या आपल्या पत्नी मृणालिनी यांच्या सहकार्याने अहमदाबाद येथे 'दर्पण' ही कलाविषयांना वाहिलेली अकादमी स्थापन केली. वैज्ञानिक संशोधन, उद्योग आणि कला अशा वेगवेगळ्या क्षेत्रांत भरीव कामगिरी करणाऱ्या

डॉ.साराभाईंना वयाच्या अवघ्या त्रेपन्नाव्या वर्षी मृत्यू आला. भारतीय अंतराळ कार्यक्रमातील साराभाईंच्या अतुलनीय योगदानाबद्दल इ.स. १९७२ साली त्यांना 'पद्मविभूषण' या सन्मानाने मृत्युपश्चात गौरवण्यात आले. थुंबा येथील अंतराळ संशोधन केंद्रालाही त्यांच्या स्मरणार्थ 'विक्रम साराभाई अंतराळ केंद्र' हे नाव दिले गेले आहे.

– डॉ. राजीव चिटणीस

**संदर्भ:**


१. *रेझोनान्स; डिसेंबर २००१*

२. *गोवारीकर, वसंत; 'कथा इस्रोची'; ज्ञान प्रबोधिनी; २००३*

३. *सुंदरम, सी.व्ही. आणि इतर, 'अ‍ॅटॉमिक एनर्जी इन इंडिया – ५० इयर्स', १९९८*


## सुखात्मे, पांडुरंग वासुदेव
**आहारतज्ज्ञ, कृषिसंख्याशास्त्रज्ञ**
**२७ जुलै १९११ - २८ जानेवारी १९९७**



जागतिक स्तरावर भूक, अपुरा आहार, कुपोषण या क्षेत्रांत संख्याशास्त्रीय निकषांनुसार सर्वेक्षण करून या समस्यांच्या मूळ कारणांविषयीच्या संशोधनाचे अग्रणी असणाऱ्या सुखात्मे पांडुरंग वासुदेव यांचा जन्म एका गरीब कुटुंबात झाला. मुलांच्या शिक्षणासाठी खेड्यातले घर विकण्याची दूरदृष्टी त्यांच्या वडिलांनी दाखवली होती. शाळेत सतत आणि पुण्यात मॅट्रिकला पहिल्या क्रमांकाचे यश मिळवणाऱ्या सुखात्मे यांनी पदवीनंतर आय.सी.एस.च्या सनदी नोकरीचा सरधोपटमार्ग सोडून 'लंडन युनिव्हर्सिटी कॉलेजा'तून संख्याशास्त्राचा अभ्यास करण्याचे ठरविले. परंतु 'आपल्या गरीब देशाला तुमच्या संख्याशास्त्रीय ज्ञानाचा उपयोग कसा होईल,' या पंडित मदनमोहन मालवीय यांनी विचारलेल्या प्रश्नाने ते भारून गेले. त्यामुळे संख्याशास्त्राच्या विशुद्ध अथवा सैद्धान्तिक बाजूंमध्ये प्रावीण्य मिळविण्याऐवजी ज्या ज्ञानाचा उपयोग पशुसंवर्धनाद्वारे दूध उत्पादनात वाढ, कृषी सर्वेक्षणाद्वारे हेक्टरी पिकांचा अंदाज घेणे, पीक कापणी प्रयोग, पोषक आहार, कुपोषण अशा सामान्य माणसाच्या जीवनाशी निगडित प्रश्नांची उकल करता येईल, असे नमुना पाहणी सर्वेक्षण पद्धतिशास्त्राचे कौशल्य त्यांनी आत्मसात केले.

एकूण चार भागांत विखुरलेल्या सुखात्मे यांच्या पीएच.डी.च्या प्रबंधांपैकी तीन भागांवर त्यांचे शोधनिबंध आधी प्रसिद्ध झाले होते. मात्र 'बायपार्टिशनल फंक्शन्स' या चौथ्या भागाबद्दल परीक्षकांशी मतभेद झाल्यामुळे तो वगळून १९३६ साली त्यांना पीएच.डी. पदवी देण्यात आली, तर त्यांचे मार्गदर्शक आर.ए. फिशर यांच्या सल्ल्यानुसार चौथा भाग फिरून विस्ताराने नव्या स्वरूपात मांडून सादर केल्यावर विद्यापीठाने त्यांना १९३९ साली डी.एस्सी. प्रदान केली.

भारतात परतल्यावर डॉ. सुखात्मे एखाद्या विद्यापीठात सहज मानाची जागा मिळवू शकले असते. परंतु त्यांनी स्वीकारलेल्या अ.भा. स्वास्थ्य व सार्वजनिक आरोग्य संस्था, कोलकाता (१९३९-१९४०), भारतीय कृषी संशोधन मंडळ, दिल्ली (१९४०-१९५१) व संयुक्त राष्ट्रसंघाचे अन्न व कृषी आस्थापन (१९५२-१९७०) या नोकऱ्या आणि सेवानिवृत्तीनंतर २० वर्षे जीवमिती (बायोमेटरी) संशोधनाबरोबर खेड्यातील आरोग्य सुधारणा व इंदिरा कम्युनिटी किचनमधून गरिबांसाठी पोषक आहार या उपक्रमाद्वारे त्यांनी केलेले समाजपरिवर्तनाचे प्रयत्न यातून जणू त्यांनी आपल्या वर्तनाने पं. मालवीयजींच्या प्रश्नाचे उत्तरच दिले.

कोलकाताच्या आरोग्यसंस्थेतील डॉक्टर विद्यार्थ्यांकडून रक्तदाब, रक्तपेशी, रक्तातील साखरेचे प्रमाण काढण्याचे प्रकल्प करवून घेतल्यावर त्यांना संख्याशास्त्राची तत्त्वे चांगल्या प्रकारे समजावता येतात या अनुभवातून सुखात्मे यांना पुढील आयुष्यात सैद्धान्तिक तत्त्वांची व्यवहारोपयोगी उदाहरणांशी सांगड घालण्याची

स

सवय लागली. भारतीय कृषी संवर्धन मंडळात दाखल झाल्यावर सुखात्म्यांवर प्रथम जे काम सोपविले गेले, ते म्हणजे इटाह (उत्तर प्रदेश) येथील शेळीच्या दुग्धप्रकल्पाची छाननी करण्याचे. तत्पूर्वी दहा वर्षे ब्रिटिश प्रजनन तज्ज्ञांच्या देखरेखीखाली एक यशस्वी प्रकल्प म्हणून तो गणला जात होता. त्या संदर्भातील आधार सामग्रीचे काळजीपूर्वक संख्याशास्त्रीय विश्लेषण करून डॉ.सुखात्मे यांनी त्यातील त्रुटी दाखविल्या आणि आपल्या नोकरीच्या अल्पावधीतच इंग्रज अधिकाऱ्यांपुढे तो प्रकल्प फसल्याचा धाडसी निर्णय जाहीर केला. दूधप्रकल्पाचा असा बोजवारा झाल्याने आणखी इतर प्रकल्पांची शहानिशा करावयास सुखात्म्यांना सांगितले तर पुरती फजिती होईल, या भीतीने या प्रकल्पांशी संबंधित अधिकारी व कर्मचारी यांना संख्याशास्त्रीय पद्धतीचे प्रशिक्षण देणे आणि त्यासाठी लागणारे पाठ्यपुस्तक लिहिणे अशा कामांत वरिष्ठांनी सुखात्म्यांना गुंतवून ठेवले. 'स्टॅटिस्टिकल मेथड्स फॉर ॲग्रिकल्चरल रिसर्च' हा त्यांचा ग्रंथ आज कृषी विद्यापीठ व त्याअंतर्गत महाविद्यालयांत लोकप्रिय पाठ्यपुस्तक म्हणून वापरला जातो.

पुढे दुसऱ्या महायुद्धाच्या काळात (१९४२) देशातील शिलकी धान्यसाठा व नव्या हंगामात होणाऱ्या पिकांचा केंद्र सरकारला तातडीने हवा असलेला अंदाज देण्यासाठी सुखात्म्यांनी जागोजागी प्रत्यक्ष जाऊन नमुना सर्वेक्षण केले. ते करताना त्यांनी नमुना पाहणी तत्त्वात पद्धतिशास्त्रविषयक बरेच नवे उपक्रम विकसित केले आणि त्यांचा उत्तम प्रकारे व्यावहारिक उपयोग केला. त्याशिवाय समुद्रातील मासळींचा अंदाज ठरविणारी नमुना पाहणीची उपयुक्त पद्धतदेखील विकसित केली आणि प्राण्यांच्या पैदाशीसंबंधीच्या आकडेवारीचे वैज्ञानिक मूल्यमापन सुरू केले.

सुखात्म्यांच्या या कामांची कीर्ती थेट संयुक्त राष्ट्र संघटनेच्या अन्न व कृषी आस्थापनांपर्यंत जाऊन थडकली. परिणामी त्यांनी सुखात्मे यांच्यावर आग्नेय आशियातील सरकारी अधिकाऱ्यांना शेतीची खानेसुमारी




व नमुना कौशल्यावर आधारित कृषी व लोकसंख्या प्रशिक्षण देण्याची जबाबदारी सोपवली. इतकेच नव्हे, तर जागतिक कृषी खानेसुमारीविषयक कार्यक्रम तयार करणाऱ्या तज्ज्ञांच्या सभेला आणि नमुना पाहणीचा भारतात राबविला गेलेला प्रयोग या विषयावर व्याख्यान देण्यास पाचारण केले.

कृषिसंशोधन मंडळात, थोडक्या काळात धडाडीने केलेल्या कामांमुळे सुखात्म्यांना यश मिळत गेले. पण कृषिसर्वेक्षण करताना भूखंडाचा आकार आणि विस्तार, तसेच हे काम संस्थेतल्या कर्मचाऱ्यांनी करावे की नव्याने भरती करून प्रशिक्षित कराव्या लागणाऱ्या तात्पुरत्या कर्मचाऱ्यांनी करावे यासंबंधी केंद्रातील वरिष्ठांशी मतभेद झाल्यावर संशोधनाच्या संदर्भातील कोणतीही उपयोजित क्षेत्रातील बाब एका केंद्रीय यंत्रणेच्या समितीशिवाय पुढे नेऊ नये, असा फतवा काढून कृषिसंशोधन मंडळाच्या अखत्यारीतून सर्वेक्षण, पीक कापणी इत्यादी कामे काढून घेतली गेली.

१९६५ साली केंद्रीय अन्नमंत्र्यांनी अतिशय चांगली उपज करणारा म्हणून मनिलाहून 'तायचुंग-१' जातीचा जो तांदूळ आणला, तो कटक तांदूळ संशोधन संस्थेत संख्याशास्त्रीय विश्लेषणानंतर भरघोस पीक देऊ शकणाऱ्या बुटक्या जातीच्या तांदुळासारखा तंतोतंत निघाला. घाऊक प्रमाणात नियमित उत्पादनासाठी ही जात निवडण्याची डॉ. सुखात्म्यांच्या कारकिर्दीत त्यांनी केलेली शिफारस अव्हेरली गेली नसती, तर देशात दहा वर्षे आधीच हरितक्रांती झाली असती.

भारतीय कृषी संशोधन मंडळाची संख्याशास्त्र शाखा कृषी संशोधकांसाठी प्रशिक्षण अभ्यासक्रम राबवून मौलिक संख्याशास्त्रीय कार्य करीत असल्याने, सर्वार्थाने तिचे काम शैक्षणिक व संशोधन संस्थेच्या धाटणीप्रमाणे चालते म्हणून 'इन्स्टिट्यूट ऑफ ॲग्रिकल्चर रिसर्च

स्टॅटिस्टिक्स’ असे नामांतर करून तिला उच्च दर्जा द्यावा, ही त्यांची मागणी फेटाळली गेली. या त्यांच्या मागणीस अर्थमंत्र्यांचा संपूर्ण पाठिंबा होता; कारण त्यामुळे शासनास जादा आर्थिक भार सोसावा लागणार नव्हता. या सततच्या अडथळ्यांना वैतागून सुखात्मे यांनी जागतिक अन्न व कृषी संस्थेतील आमंत्रणाचा स्वीकार केला व ते रोम येथे गेले.

१९५१ साली कृषिमंडळाच्या सेवेतून मुक्त झाल्यावर डॉ.सुखात्मे यांनी एम्स येथील आयोवा स्टेट विद्यापीठाच्या संख्याशास्त्र प्रयोगशाळेचा उपयोग करून ‘सँपलिंग थिअरी ऑफ सर्व्हेज’ हे पुस्तक पुरे केले. अन्न व कृषी आस्थापनाच्या पंखाखाली असणाऱ्या देशांना भारतात अवलंबविलेल्या नमुना पाहणी तंत्राच्या अनुभवाची माहिती व्हावी व त्यांना हे तंत्र आचरणात आणता यावे, म्हणून डॉ. सुखात्मे यांना या पुस्तकाच्या लेखनास अग्रक्रम द्यावा लागला. अन्न व कृषी आस्थापनाने या पुस्तकाच्या स्पॅनिश व फ्रेंच भाषेतदेखील आवृत्त्या काढल्या. याशिवाय त्यांनी नमुना सर्वेक्षणास भक्कम वैज्ञानिक पाया असल्याची या क्षेत्रातील मंडळींची खात्री पटावी म्हणून नमुना निरपेक्ष दोषांचे मूल्यमापन व ते नियंत्रित करण्याचे उपाय सुचविणारे चार असहसंबंधित घटकांचे बनविलेले रेषीय प्रतिमान तयार केले. त्यानंतर प्रत्यक्ष अन्न कृषी आस्थापनात पदभार स्वीकारल्यावर,

१. नमुना निवड पाहणीची तत्त्वे आणि उपयोग यांचे राष्ट्रीय तज्ज्ञांना प्रशिक्षण देण्यासाठी प्रादेशिक संस्था काढावी,

२. क्षेत्रीय नोकरांच्या प्रशिक्षणासाठी राष्ट्रीय स्तरावर कार्यशाळा घेऊन धान्योत्पादन व आहार यांचे सर्वेक्षण करावे,

३. दशवार्षिक खानेसुमारी व सर्वेक्षण यांच्या प्रगतीवर लक्ष ठेवण्यासाठी प्रादेशिक आयोग व समित्या नेमाव्यात,

असे जे कार्यक्रम, सुखात्म्यांनी सर्व देशांना जो त्रिसूत्री कार्यक्रम नेमून दिला, त्यांतून फलद्रूप झाले. कारण त्या-त्या देशातील वरिष्ठ संख्याशास्त्रज्ञांनी युनोच्या कार्यक्रमाखाली प्रशिक्षण संस्थांचे प्रमुखपद स्वीकारून सल्लागार व तज्ज्ञ म्हणून काम करावे, असे त्यांचे मन वळवण्यात सुखात्म्यांना यश आले.

पुढील आयुष्यात पोषक आहार हा सुखात्म्यांच्या चिंतनाचा आणि व्यवहारात राबवण्याचा विषय बनला, त्याची सुरुवात या आस्थापनात गेल्यापासूनच झाली. कारण, विकसनशील देशातील अपुरा आहार, भूक व प्रथिनांची कमतरता यांचे आकलन करून त्यावर उपाय योजणे, हा त्या आस्थापनाचा प्रसंख्याशास्त्र प्रमुख म्हणून सुखात्म्यांच्या कामाचा भागच होता. या आस्थापनाच्या पहिल्या सरसंचालकांनी, नोबेल पारितोषिक विजेते लॉर्ड बॉइड ओर्र यांनी शरीरपोषणासाठी लागणारे व प्रत्यक्ष मिळणारे उष्मांक यांची तुलना करून जगात दोन तृतीयांश लोक भुकेने बेजार असल्याचा निर्ष्कष काढला होता. उलट तरुण, निरोगी व्यक्तींची अन्नग्रहण आकडेवारी घेऊन समाकलनाच्या रीतीने जगात फक्त २० टक्के लोकच भुकेने गांजलेले आहेत, असा सुखात्म्यांनी निर्ष्कष काढला. तो आस्थापनात कोणासाही मान्य न झाल्याने तोडगा असा निघाला की, ‘रॉयल स्टॅटिस्टिकल आणि न्यूट्रिशनल सोसायटी’ यांच्या संयुक्त सभेपुढे सुखात्म्यांनी ‘जागतिक भूक’ हा आपला निबंध वाचावा आणि तज्ज्ञांना म्हणणे पटवावे. त्यानुसार २७ मे १९६१ रोजी तो वाचला गेला आणि सुखात्मे त्यातून सहीसलामत बाहेर पडले. इतकेच नव्हे, तर पुढे या निबंधास ‘गाय पदक’ प्रदान करून या संस्थांनी सुखात्म्यांचा सन्मान केला.

अन्न व कृषी आस्थापनातून निवृत्त झाल्यावर (१९७०) बर्कले विद्यापीठात, रीजंट प्राध्यापक असताना त्यांनी शेल्डन मार्गन यांच्या सहकार्याने, ‘मर्यादित आहार घेतला असता अन्नाचे पचन होऊन, त्याचे अंतिम रूपांतर ऊर्जेत होणे व त्यासाठी स्वनियंत्रण असणे (यास ‘होमोस्टॅसिस’ म्हणतात), मात्र ते स्वनियंत्रण कक्षेच्या बाहेर गेल्यास कार्यक्षमता घटते’, असे ‘सुखात्मे- मार्गन प्रमेय’ विकसित केले.

स

१९७२ साली पुण्यात स्थायिक झाल्यावर सुखात्म्यांनी शैक्षणिक व क्षेत्रीय स्तरावर काम करण्याचे ठरवले. त्यापैकी शैक्षणिक कार्यासाठी त्यांनी ‘विज्ञानवर्धिनी’ संस्थेत ‘जीवमिती व पोषण’ विभाग चालू केला, पदव्युत्तर अभ्यास व संशोधनाची सोय केली. अनेक विद्यार्थ्यांना स्वत: मार्गदर्शन केले.

व्यवहारोपयोगी कामात खेड्याचे राहणीमान सुधारणे व गरिबांना पोषक आहार मिळवून देणे ही समाजोपयोगी कामे त्यांनी केली. खेड्यातील आरोग्य सुधारण्यासाठी मुलांपासून स्वच्छतेची जाणीव झाली पाहिजे हे लक्षात घेऊन सुखात्म्यांनी पुण्याजवळील एका खेड्यात शाळेजवळ स्वच्छता करणे, मुताऱ्या बांधणे, वस्तीजवळचा कचरा हटवणे, विहिरी स्वच्छ करून त्यांत क्लोरीन टाकणे, गावात संडास बांधून त्यांना बायोगॅस संयंत्र जोडून गॅसची सोय करणे हे उपाय केल्यावर खेड्यातील रोग हटल्यामुळे तेथील आरोग्यमान सुधारले. मुलांची उंची, वजन व शारीरिक वाढीचा दर वाढला. नाहीतर, अमेरिकेतल्या मुलांइतके अन्नग्रहण प्रमाण ठेवले तरी आपल्याकडे मुलांची वाढ तिकडच्याइतकी होत नव्हती. या तफावतीमागे स्वच्छता व आरोग्याचा अभाव होता. तीन वर्षे सात-आठ खेड्यांत हा प्रकल्प राबवून सुखात्म्यांनी खेड्यांचे आरोग्यमान सुधारून दाखविले.

धान्य व डाळींपासून घरात शिजवलेले जे अन्न आपण रोज खातो, त्यापासून मिळणाऱ्या पोषणमूल्यांचा गरिबांना लाभ मिळवून देणे व समाजातील दुर्बळ घटकांना रोजगार मिळवून देऊन गरिबी निवारण करता येईल यासाठी सुखात्मे यांनी ‘इंदिरा कम्युनिटी किचन’ प्रकल्प १२ वर्षे राबविला. त्यात पीठ चाळणे, मळणे, थापटणे, लाटणे, भाजणे इत्यादी कामे कारखान्यातील एकास एक काम या पद्धतीप्रमाणे वाटली गेल्यामुळे कुणा एकावर बोजा न पडता, पदार्थ तयार होऊन विक्री केंद्रावर पाठविले की लगोलग संपून जात. कारण त्यांची गुणवत्ता, चविष्टपणा व मुख्य म्हणजे २० ते २५ टक्के स्वस्त; सर्वात शक्तिमान असा हा प्रकल्प होता.

आपल्या राज्यातील तरुणांना संख्याशास्त्रविषयक नोकऱ्या मिळाव्यात म्हणून मुंबई विद्यापीठात संख्याशास्त्राचा जो पदव्युत्तर विभाग १९४८ साली चालू झाला, तो डॉ.सुखात्मे यांच्या पुढाकाराने.

१०० शोधनिबंध, संख्याशास्त्रावर अव्वल दर्जाचे तीन ग्रंथ व अनेक सन्मानांबरोबर भारत सरकारचा ‘पद्मभूषण’ हा पुरस्कार हे डॉ.सुखात्मे यांच्या नावावर जमा आहेत.

– प्रा. स. पां. देशपांडे

**संदर्भ:**

१. *करंट सायन्स; दि. १० मार्च १९९२.*

## सुखात्मे, सुहास पांडुरंग
**अभियंता**
**५ नोव्हेंबर १९३८**



सुहास पांडुरंग सुखात्मे यांचा जन्म बडोदा येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण दिल्लीच्या सेंट कोलंबिया हायस्कूलमध्ये झाले आणि यंत्र अभियांत्रिकी (मेकॅनिकल इंजिनिअरिंग)चे महाविद्यालयीन शिक्षण बनारस हिंदू विद्यापीठातून झाले. त्यानंतर त्यांनी अमेरिकेच्या मॅसॅच्युसेट्स इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी (एम.आय.टी.) मधून ‘मास्टर ऑफ सायन्सेस’ (एम.एस.) आणि ‘डॉक्टरेट ऑफ सायन्सेस’ (डी.एस्सी.) केले. त्यांनी एक वर्षभर तेथेच अध्यापनाचे काम केले आणि १९६५ साली ते मुंबईला येऊन ‘इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी’ (आय.आय.टी.), पवई येथे सहायक प्राध्यापकाच्या हुद्यावर अध्यापनाचे काम करू लागले. १९७० साली ते प्राध्यापक झाले.

१९७३ ते १९७५ या काळात ते आय.आय.टी. पवईच्या यंत्र अभियांत्रिकी विभागाचे प्रमुख होते. १९६५ ते १९८२ अशी १७ वर्षे आय.आय.टी.मध्ये अध्यापन केल्यावर आपणच आपल्याकडे त्रयस्थपणे पाहावे,

स



**आय.आय.टी., मुंबई**

गुणवत्ता सुधारावी, जगातले काही नवीन पाहावे अशी इच्छा त्यांच्या मनात बळावली. मग १९८२-१९८३ असे एक वर्ष ते अमेरिकेच्या आयोवा स्टेटमध्ये अतिथी प्राध्यापक म्हणून काम करून आले. त्यानंतर डिसेंबर १९८३ ते डिसेंबर १९८५ या काळात ते आय.आय.टी., पवईचे उपसंचालक झाले. जानेवारी १९९५ ते जानेवारी २००० पर्यंतची पाच वर्षे ते आय.आय.टी., पवईचे संचालक होते. या कारकिर्दीनंतर वयाच्या पासष्टीपर्यंतची पाच वर्षे ते अणुऊर्जा नियामक मंडळाचे (ॲटॉमिक एनर्जी रेग्युलेटरी बोर्ड- ए.ई.आर.बी.) अध्यक्ष होते.

उष्णतेचे वहन (हीट ट्रान्स्फर) आणि सौरऊर्जा हे त्यांचे अध्यापनाचे आणि संशोधनाचे विषय आहेत. १) द्रवीभूत धातूचे बाष्पीभवन होत असताना, संघननाद्वारे होणारे उष्णतेचे वहन; २) बाह्य प्रवाहातून अभिसरणामार्फत होणारा उष्णतेतील बदल; ३) उष्णता रोधक आवरणातून (इन्स्यूलेशन) होणारे उष्णतेचे वहन; ४) धातूची टाकी सपाट पत्र्यापासून बनवण्याऐवजी जर त्रिकोणी काप एकमेकांना जोडून ती बनवली, तर भिंतीचे पृष्ठफळ वाढते. अशा टाक्यातून होणाऱ्या उष्णतेचे वहन-(रस्त्यावर विजेची रोहित्रे-टान्सफॉर्मर्स लावलेली असतात. त्यांत तेल भरलेले असते आणि त्यातून विजेच्या तारा जातात. वीजवहनामुळे उष्णता निर्माण होते. ती उष्णता तेल आपल्यात सामावून घेते आणि विजेच्या तारा तुलनेने थंड राहतात. अशी निर्माण झालेली उष्णता वाहून जाण्यासाठी रोहित्रे सपाट भिंतींची न बनवता, त्रिकोणी काप एकमेकांना जोडून अथवा पत्रा तसा वाकवून बनवतात (फिनप्लेट्स). त्यामुळे पृष्ठफळ वाढते आणि आतल्या तेलातील उष्णता बाहेरच्या हवेत निघून जात); ५) विविध द्रवपदार्थ आणि त्यांच्या मिश्रणाचे उष्मागती (थर्मोडायनॅमिक) गुणधर्म आणि वाहतूक करत असताना होणारे उष्णतेतील बदल; ६) शीतक (रेफ्रिजरंट्स) द्रव्यांच्या संघनन (कंडेन्सेशन) क्रियेमुळे होणारे उष्णतेचे वहन आणि त्याच्या काटेरी भिंतीच्या नलिकांवर (फिन ट्यूब्स) होणारे उष्णतेतील परिणाम, या क्षेत्रात डॉ.सुखात्मे यांनी आपले संशोधन केले.

१९६५ साली डॉ.सुखात्म्यांनी 'आय.आय.टी.'मध्ये शिकवायला सुरुवात केली, तेव्हा उष्णतेच्या वहनासंबंधी प्रयोग दाखवायला काही सोयी उपलब्ध नव्हत्या. डॉ.सुखात्म्यांनी यासाठी स्वत: शून्यातून प्रयोगशाळा उभारली. १९६६ साली, चौथ्या वर्षाच्या विद्यार्थ्यांना, परीक्षेच्या वेळी पुस्तके पाहण्याची (ओपन बुक सिस्टिम) सुविधा उपलब्ध करून दिली. प्रा.सुखात्म्यांनी शिस्तबद्ध आणि तर्कशुद्ध पद्धतीने विद्यार्थ्यांना शिकविले त्या वेळी ते वर्गात जाताना जशी तयारी करून जात, तितक्याच गांभीर्याने तशीच तयारी आज वयाच्या सत्तरीनंतर 'प्रोफेसर एमिरिटस' म्हणून शिकवीत असतानाही ते करतात. उष्मागती, सौरऊर्जा उष्णतेचे उपयोग, अभियांत्रिकीतील प्रयोग, इत्यादी विषय त्यांनी शिकविले.

१९८० सालच्या दशकात एक छोटा विभाग स्थापन करून 'आय.आय.टी.', पवईत त्यांनी उर्जायंत्रणेत पदव्युत्तर आणि पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांसाठी विविध विद्याशाखांतर्गत अभ्यासाची सुविधा उपलब्ध करून दिली. या छोट्या विभागाचे रूपांतर आता 'एनर्जी सायन्स अँड इंजिनिअरिंग' या नावाच्या मोठ्या विभागात झाले आहे. डॉ.सुखात्मे 'आय.आय.टी.'चे संचालक असताना, 'शैलेंद्र जे. मेहता स्कूल ऑफ मॅनेजमेंट'

स

आणि 'कन्वल रेखी स्कूल ऑफ इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी' या दोन विद्याशाखांचे स्वतंत्र विभाग सुरू झाले. अध्यापन चालू असताना, डॉ.सुखात्म्यांचा 'विज्ञान विभाग', 'अवकाश संशोधन विभाग', 'विज्ञान आणि प्रौद्योगिक संशोधन संस्था' (सी.एस.आय.आर.) आणि 'अणुऊर्जा आयोग' या संस्थांशी संबंध येत गेला.

त्यांच्या मार्गदर्शनाखाली ५० विद्यार्थ्यांनी एम.टेक. केले आणि १९ विद्यार्थ्यांनी पीएच.डी. केले. डॉ.सुखात्मे यांनी विविध संशोधन पत्रिकांमधून ३५ निबंध लिहिले आणि २८ निबंध विविध सभा-संमेलनांत सादर केले. ते निबंध त्या परिषदांच्या कार्यवृत्तांत प्रसिद्ध झाले. त्यांनी आजवर नऊ संशोधनपर वृत्तान्त लिहिले. तीन पाठ्यपुस्तकांत प्रकरणे लिहिली. 'हीट ट्रान्स्फर', 'सोलर एनर्जी' आणि 'आय.आय.टी.', पवईच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त निघालेल्या पुस्तकाचे लेखन, अशी त्यांची पुस्तकसंपदा आहे.

निवृत्तीनंतर आता डॉ.सुखात्मे बंगळुरूच्या 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स'च्या पदोन्नती आणि मूल्यांकन मंडळाचे सभासद आहेत, तसेच अणुऊर्जा आयोगाच्या 'अणुविज्ञान संशोधन मंडळा'चे सभासद आहेत; 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ ट्रेनिंग इन इंजिनिअरिंग' (निटी) च्या संचालक मंडळाचे नियंत्रक आहेत, आणि 'आय.आय.टी.',पवईच्या सल्लागार मंडळाचे सभासद आहेत.

प्रा. सुखात्मे यांना बनारसला असताना, अभियांत्रिकीच्या शेवटच्या वर्षाला, प्रथम वर्गात पहिले आल्याबद्दल 'प्रिन्स ऑफ वेल्स सुवर्णपदक' मिळाले होते. १९८३ साली त्यांना 'शांतिस्वरूप भटनागर पुरस्कार' मिळाला. १९८६ साली 'इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस'चे, तर १९८७ साली 'इंडियन नॅशनल अकॅडमी ऑफ इंजिनिअरिंग'चे ते फेलो झाले. १९९९ साली 'नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेस'ने त्यांना फेलोशिप दिली. २००१ साली भारत सरकारने त्यांना 'पद्मश्री' किताब दिला. २००१ साली आय.आय.टी., पवईने त्यांना 'जीवन गौरव पुरस्कार' दिला. 'ओमप्रकाश भसीन पुरस्कार' आणि बनारस हिंदू विद्यापीठाची मानद डॉक्टरेट यासुद्धा त्यांना २००१ सालात देण्यात आल्या.

– अ. पां. देशपांडे

**संदर्भ :**

*१. दै. महाराष्ट्र टाइम्स; २ फेब्रुवारी, १९९७.*

## सेठना, होमी नसरवानजी
**अभियंता**
**२४ ऑगस्ट १९२३**



डॉ. होमी सेठनांचा जन्म एका सधन पारशी कुटुंबात, मुंबईमध्ये झाला. त्यांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण मुंबईतील सेंट झेवियर्स या संस्थेत झाले. त्यानंतर अमेरिकेतील मिशिगन युनिव्हर्सिटीत त्यांनी रासायनिक अभियांत्रिकी शाखेची उच्च पदवी (एम.एस्सी.) १९४६ साली मिळवली. त्यानंतर काही काळ ते इंग्लंडमधील 'इंपिरियल केमिकल इंडस्ट्रीत' कार्यरत होते. १९४९ साली, म्हणजे भारताच्या अणू संशोधन खात्याच्या सुरुवातीस ते भारतात परत आले व अणू खात्यात शास्त्रज्ञ म्हणून काम पाहू लागले.

त्यांनी केलेल्या कामाची सुरुवात, मोनोझाइट या खनिजापासून रेअर अर्थस वेगळे करणाऱ्या प्रक्रिया शोधापासून झाली. मोनोझाइट हे खनिज केरळच्या किनाऱ्यावर वाळूच्या स्वरूपात आढळते व त्यात युरेनियम व थोरियमबरोबर मोठ्या प्रमाणात दुर्मीळ मूलद्रव्ये असतात. या सर्वच रासायनिक मूलद्रव्यांचा वापर अणुऊर्जा कार्यक्रमासाठी होतो. त्यामुळे खनिजरूपातील ही मूलद्रव्ये शुद्ध स्वरुपात अलग करणे महत्त्वाचे असते. अशा प्रकारचे तंत्रज्ञान अर्थातच आयात करता येत नाही, की कोठूनही भेट म्हणून मिळत नाही. ते स्वबळावरच विकसित आणि प्रमाणित करावे लागते. भारतात प्रथमच या दुर्मीळ मूलद्रव्यांचे उत्पादन डॉ.सेठना

स



प्लुटोनियमवर चालणारी अणुभट्टी

यांनी चालू केलेल्या आल्वये येथील कारखान्यातून १९५२ साली सुरू झाले.

त्यानंतर डॉ. सेठना यांनी तुर्भे येथील अणुशक्ती केंद्रात (आताचे भाभा अणू संशोधन केंद्र) येऊन मोनोझाइटपासून शुद्ध स्वरूपात थोरियम मिळविण्याकरता लागणारी रासायनिक प्रक्रिया औद्योगिक स्तरावर विकसित करण्याचा प्रकल्प हाती घेतला. त्या प्रक्रियेद्वारे मग त्यांनी थोरियम नायट्रेटचे उत्पादन सुरू केले. या संयुगापासून मग शुद्ध स्वरूपातील थोरियम धातू बनविण्यासाठीची प्रक्रिया १९५९ साली सुरू झाली.

या काळातच डॉ. भाभा यांनी भारताच्या अणुऊर्जा कार्यक्रमाची रूपरेखा पक्की केली होती व त्याकरिता युरेनियम या धातूची गरज होती. या कामाची जबाबदारी डॉ. सेठना यांच्याकडे सोपविण्यात आली. बिहार येथील जादूगोडा या शहरानजीक युरेनियमच्या खनिजांची खाण होती व तेथेच खाणीतून निघालेल्या खनिजापासून शुद्ध स्वरूपात युरेनियम मिळविण्याची प्रक्रिया सिद्ध करण्यात आली. या खनिजातील युरेनियमची टक्केवारी एक टक्क्यापेक्षासुद्धा कमी असते व त्यातून जवळजवळ १०० टक्के शुद्ध युरेनियम मिळवण्याकरिता लागणारी प्रक्रिया ही तिप्पट असते. शिवाय, ही खनिजे किरणोत्सारी असल्यामुळे या सर्व प्रक्रिया अतिशय सुरक्षित स्थितीत करण्यासाठी काही खास काळजी घ्यावी लागते. ती सर्व तयारी करून या महत्त्वाच्या इंधनाचे उत्पादन सेठना यांनी सुरू केले. या खाणीतून व शुद्धीकरण प्रकल्पातून तयार झालेले युरेनियमच भारताच्या अणुभट्ट्यांमध्ये इंधन म्हणून वापरले जाते.

शास्त्रीय संशोधनाकरिता उपयुक्त अशी पहिली अणुभट्टी, 'अप्सरा' १९६५ साली भाभा अणू संशोधन केंद्रात कार्यरत झाली. या अणुभट्टीत वापरण्यात आलेल्या युरेनियम इंधनात अणुशक्तीच्या पुढच्या टप्प्याकरिता उपयोगी पडणारे प्लूटोनियम तयार होत असते. अशा प्रकारे अणुभट्टीतील जळित इंधनावर प्रक्रिया करून त्यामधून प्लूटोनियम वेगळे करण्याचे तंत्रज्ञान जगातील फक्त पाच प्रगत राष्ट्रांत उपलब्ध होते. हे काम इंधनातील हानिकारक किरणोत्साराच्या मात्रेमुळे फार क्लिष्ट असते. डॉ. सेठना यांच्या मार्गदर्शनाखाली संपूर्ण देशी बनावटीचा या प्रकारचा प्रकल्प उभा राहिला व तो १९६४ साली कार्यरत झाला.

डॉ. होमी भाभा हे भारताच्या अणुशक्ती कार्यक्रमाचे प्रमुख म्हणून सुरुवातीपासून काम पाहत होते व भाभा अणू संशोधन केंद्राचे ते संचालकही होते. १९६६ साली त्यांच्या आकस्मिक निधनानंतर भाभा अणू संशोधन केंद्राचे संचालक म्हणून डॉ.सेठना यांची नेमणूक झाली व डॉ. साराभाई हे अणुऊर्जा विभागाचे अध्यक्ष म्हणून काम पाहू लागले. १९६६ ते १९७२ सालापर्यंत डॉ.सेठना या केंद्राचे संचालक म्हणून काम पाहत होते.

भाभा अणू संशोधन केंद्र ही भारतातील प्रमुख संशोधन शाळा असून तेथे जवळजवळ ३५०० शास्त्रज्ञ, तसेच इतर ६५०० कामगार काम करत होते. अणुशक्ती खात्याशी निगडित सर्वच विषयांवर तेथे संशोधनकार्य चालू आहे व डॉ. सेठना यांच्या काळात या संशोधनकार्यास चालना मिळून त्याची भरभराट झाली.

१९७१ साली डॉ. साराभाई यांच्या आकस्मिक निधनानंतर अणुशक्ती खात्याची संपूर्ण जबाबदारी डॉ.सेठना यांच्याकडे आली व त्या पदावर ते १९८३ सालापर्यंत कार्यरत होते. डॉ.भाभा सोडून इतर कोणीही

स

इतक्या दीर्घकाळ ही जबाबदारी पेलली नाही. आज अणुशक्ती खात्यामधून निवृत्त होऊन २५ वर्षांपेक्षा जास्त काळ झाला असूनही डॉ.सेठना यांचे मार्गदर्शन या खात्यास होत असते.

त्यांच्या खातेप्रमुख पदाच्या काळामध्ये भारतामध्ये, भारतात तयार झालेल्या सहा अणुभट्ट्या वीजनिर्मिती करू लागल्या. त्यांच्या या काळातच अणुशक्ती खात्याने भारताचा पहिल्या अणुचाचणीचा प्रयोग १९७४ साली राजस्थान येथील पोखरण येथे यशस्वीरीत्या पार पाडला. अणुशक्ती खाते, तसेच संरक्षण विभाग यातील समन्वयाच्या जबाबदारीचे व गोपनीयतेचे काम डॉ.सेठना यांच्यासारख्या कुशल नेत्यामुळेच शक्य झाले.

डॉ.सेठना त्यांच्या विषयातील तज्ज्ञ म्हणून आजही बऱ्याच संस्थांचे मानद व आजीव सभासद आहेत, तसेच उद्योगक्षेत्रात संचालक पदावर ते कार्यरत आहेत. त्यांच्या बहुमोल कार्याबद्दल त्यांना अनेक पुरस्कार मिळाले. त्यांतील काही महत्त्वाचे : 'रॉयल स्विडिश अकॅडमी ऑफ इंजिनिअर्स', 'इंडियन अकॅडमी ऑफ सायन्स', 'इन्स्टिट्यूशन ऑफ इंजिनिअर्स' (इंडिया) व 'इन्स्टिट्यूशन ऑफ केमिकल इंजिनिअर्स', 'महाराष्ट्र अकॅडमी ऑफ इंजिनिअर्स' इत्यादी संस्थांचे ते मानद सभासद आहेत. त्यांना 'शांतिस्वरुप भटनागर पुरस्कार' १९६० साली मिळाला. त्यांना 'पद्मश्री' किताब १९५९ साली, 'पद्मभूषण' पुरस्कार १९६६ साली, तर 'पद्मविभूषण' पुरस्कार १९७५ साली देण्यात आला. त्यांना मिळालेल्या इतर पुरस्कारांपैकी काही : 'सर बॉल्टर पुसकी' पुरस्कार १९७१, 'सर विलियम जेम्स मेमोरियल' पुरस्कार, १९७४, 'सर देव प्रसाद सरबंदीकर सुवर्णपदक' १९७५, 'दुर्गाप्रसाद खैतान पदक' १९८३, 'विश्व गुर्जरी' पुरस्कार, १९८५, 'दादाभाई नौरोजी स्मृती पुरस्कार', १९८५, 'पंडित जवाहरलाल नेहरू पुरस्कार' १९८९. त्यांना भारतातून एकंदरीत १२ विद्यापीठांतून मानद डी.एस्सी. व डी.लिट इत्यादी पदव्या मिळाल्या आहेत. वयाच्या शहाऐंशीव्या वर्षात सुद्धा कित्येक उद्योग समूहात ते सल्लागार म्हणून काम करत आहेत.

— डॉ.श्रीराम मनोहर

**संदर्भ :**

*१. भटनागर लॉरेटस् १९५८–१९९१; इंडियन नॅशनल सायन्स अ‍ॅकॅडमी*

## सैनिस, कृष्णा बालाजी

**जीवशास्त्रज्ज्ञ, अणुवैद्यक शास्त्रज्ज्ञ,**
**२ ऑक्टोबर १९४९**



कृष्णा सैनिस हे भाभा अणुसंशोधन केंद्र, मुंबई येथे जैव-वैद्यकीय समूहाचे संचालक (निर्देशक) आहेत. भारतातील प्रतिरक्षणशास्त्र (इम्युनोलॉजी) या विषयांत ते एक ज्येष्ठ वैज्ञानिक म्हणून गणले जातात. त्यांनी आपल्या विद्यालयीन आणि विद्यापीठीय कारकिर्दीत सातत्याने गुणानुक्रम मिळविला आहे.

कृष्णा बालाजी सैनिस यांचा जन्म वर्धा जिल्ह्यातील हिंगणघाट येथे झाला. हिंगणघाटच्या मोहता नगरपालिका विद्यालयात त्यांचे शालेय शिक्षण झाले. वरोरा येथील आनंद निकेतन महाविद्यालयात शिकून नागपूर विद्यापीठात बी.एस्सी. अभ्यासक्रमात दुसरा क्रमांक मिळविल्यावर त्यांनी पुणे विद्यापीठातून १९६८ साली जीवरसायनशास्त्रात एम.एस्सी. पदवी पहिल्या क्रमांकाने प्राप्त केली. पुणे विद्यापीठाची पीएच.डी. पदवी त्यांना १९८० साली मिळाली.

पुण्याच्या राष्ट्रीय रसायन प्रयोगशाळेत (एन.सी.एल.) एक वर्ष रिसर्च फेलो म्हणून त्यांनी 'सिटेट लाएझ' या विकराच्या (एन्झायम्स) रचनेवर संशोधन केले. त्यानंतर भाभा अणुसंशोधन केंद्राच्या प्रशिक्षण प्रशालेत प्रथमच सुरू होत असलेल्या विकिरण जीवनशास्त्र (रेडिओ बायोलॉजी) या एकवर्षीय अभ्यासक्रमासाठी त्यांची निवड झाली. तेथे

त्यांनी प्रथम क्रमांक मिळवून डॉ. होमी भाभा पदक व पुरस्कार मिळविला. तेव्हापासून ते प्रतिरक्षणशास्त्र या विषयावर सतत संशोधनात व्यग्र आहेत. त्यांनी पेशीबद्ध प्रतिरक्षण, कर्करोगविरोधी प्रतिरक्षण, आत्म-प्रतिरक्षी व्याधी, प्रतिरक्षण नियमन (इम्युनोमॉड्युलेशन) विकिरणाचा प्रतिरक्षण संस्थेवरील परिणाम, तसेच वैद्यकीय वनस्पतींपासून प्राप्त होणाऱ्या घटकांची प्रतिरक्षण नियामक क्षमता या वेगवेगळ्या विषयांवर संशोधन केले.

उंदरांच्या निरोगी लिम्फपेशी व ल्युकेमियाग्रस्त लिम्फपेशींच्या पृष्ठभागावरील संवेदकांवर केलेले त्यांचे तुलनात्मक संशोधन प्रसिद्ध आहे. 'कॉनकॅनाव्हालिन-ए' या वाल-प्रजातीपासून मिळणाऱ्या प्रथिनांमुळे लिम्फपेशींचे विभाजन होते. डॉ.सैनिसांनी असे दाखवून दिले, की निरोगी पेशींवर या प्रथिनांसाठी दोन प्रकारचे संवेदक गट (टाइप ऑफ रिसेप्शन) असतात. परंतु, ल्युकेमियाग्रस्त पेशींवर केवळ एकच संवेदक गट आढळून येतो. या संवेदकांचे पेशींच्या पृष्ठभागावरील पुनर्वितरणाचे (रिसेप्टर रिडिस्ट्रिब्यूशन) गुणधर्म वेगवेगळे असतात. 'सेल इलेक्ट्रोफोरॅसिस' व 'टू कलर फ्यूरेसन मायक्रोस्कोपी'द्वारा त्यांनी हे दाखवून दिले. तसेच, या गुणधर्माचा पेशींच्या परिपक्वतेशी संबंध असू शकतो हे दाखवून दिले. या संशोधनासाठी त्यांना भारतीय राष्ट्रीय विज्ञान अकॅडमीचे (इन्सा) युवा वैज्ञानिक पदक व पुरस्कार १९८१ साली मिळाले. तद्नंतर डॉ.सैनिसांनी 'सेल इलेक्ट्रोफोरॅसिस'चे तंत्र वापरून पेशीबद्ध प्रतिरक्षणाचा अभ्यास केला.

बॉस्टन (अमेरिकेत) पोस्ट डॉक्टरल संशोधनासाठी त्यांनी उंदरांमधील 'सिस्टेमिक लूपस रिथिमॅटोस' या आत्म प्रतिरक्षी व्याधीच्या नियमनाचा अभ्यास केला. 'एस.डब्ल्यू.आर.' या निरोगी व 'एन.झेड.बी.' या 'ऑटोइम्यून' जातींच्या संकरातून निर्माण होणाऱ्या फ्लाय बर्डमध्ये हा रोग आढळतो. डी.एन.ए.विरुद्ध प्रतितत्त्वे (ॲन्टिबॉडीज) तयार होतात. डॉ.सैनिसांनी प्रथमच असे दाखवले, की या प्रतितत्त्वांना तयार करण्यासाठी निरोगी जातीच्या पालकाचे जीन्स (इम्युनोग्लोब्लीन ॲलोटाइप्स) वापरले जातात. त्याहून महत्त्वाचे म्हणजे नेहमीच्या 'सीडी-फोर प्लस टी' लिम्फपेशींबरोबरच, 'सीडी-फोर-सीडी-एट', अशा वेगळ्या टी लिम्फपेशी या प्रतितत्त्वांच्या निर्मितीत हातभार लावतात. अशा पेशींच्या 'सेल लाइन्स' त्यांनी प्रयोगशाळेत तयार केल्या व त्यांवर आत्म-प्रतिरक्षी संवेदक असतात हे दाखवून दिले.

भारतात परतल्यावर हाफकिन इन्स्टिट्यूटच्या डॉ.कामतांसोबत त्यांनी सहकार्य केले. या संशोधनातून असे निष्पन्न झाले की, रोगजंतू (मायक्रोबॅक्टेरिया) शरीरात ज्या मार्गाने प्रवेश करतात, त्यावर त्यांच्याविरुद्ध प्रतिरक्षण निर्माण होण्याची क्रिया अवलंबून असते. उदरपोकळीत (पेरिटोनल कॅव्हिटी) प्रवेश केल्याने या क्रियेचे दमन (सप्रेशन) होते व त्यासाठी 'सीडी-फोर प्लस' व 'सीडी-एट प्लस टी' लिम्फपेशींमधील वाढीसाठी होणारी स्पर्धा कारणीभूत आहे. या दोन्ही संशोधनकार्यांसाठी १९९४ साली त्यांना सी.एस.आय.आर.ने शांतिस्वरूप भटनागर पुरस्काराने सन्मानित केले.

गेल्या दहा-पंधरा वर्षात डॉ. सैनिसांच्या संशोधनाचा भर विकिरण जीव शास्त्रावर आहे. कमी मात्रेच्या विकिरणाने प्रतिरक्षण संस्थेवर उंदरांच्या एका जातीमध्ये अनुकूल तर दुसऱ्या जातीवर प्रतिकूल परिणाम होतात, हे त्यांनी प्रथमच शोधून काढले. शिवाय प्रतिजनुक, प्रतिरक्षणाचा प्रकार यांवरही हे विकिरण परिणाम अवलंबून असतात हे दाखवून दिले. 'सी ५७ बीएल/६' जातीच्या उंदरामध्ये प्रतिरक्षणाचे उद्दीपन होत असताना, पेशी-विभाजनाची प्रक्रिया नियमित करणाऱ्या 'पी५३', 'बीसीएल-२', 'पीसीएनए' या प्रथिनांची भूमिका स्पष्ट केली. नंतर त्यांच्या संशोधन गटाने प्रथमच लिम्फपेशींमध्ये विकिरण न झालेल्या पेशींवर विकिरित पेशीद्वारा निर्मित घटकांमुळे द्विस्तरीय परिणाम होतात हे दाखवून दिले. गेल्या ४-५ वर्षात त्यांनी ॲन्टिऑक्सिडन्ट्सचा, प्रतिरक्षण प्रणालीवरील

स

परिणामांचा अभ्यास केला आहे. 'क्लोरोफिलीन' या हरितद्रव्यापासून निर्मित पदार्थाचे विकिरण संरक्षक (रेडिओप्रोटेक्टिव्ह) परिणामासोबत प्रतिरक्षण क्षमता वाढविणारे परिणाम त्यांनी दाखवून दिले.

गुळवेलीच्या (टायनोस्पोरा कोरडिफोलिया) प्रतिरक्षण संस्थेवरील परिणामांचे संशोधन विशेष उल्लेखनीय आहे. 'बायोॲक्टिव्हिटी बेस प्युरिफिकेशन'च्या तंत्राचा वापर करून त्यांनी ॲराबिनोगॅलेशन वर्गातील पिष्टमय पदार्थ 'जी१-४ए' हा प्रतिरक्षा नियामक शोधून काढला. 'जी१-४ए'च्या उपस्थितीत, तसेच गुळवेलीच्या खोडाच्या सत्त्वाचे प्राशन केल्याने उंदरांची प्रतिरक्षणक्षमता वृद्धिंगत झाली. इतकेच नव्हे, तर 'जी१-ए'मुळे उंदरांना 'एन्डोटॉक्सिक शॉक'पासून १०० टक्के संरक्षण मिळते हेही दाखवून दिले. त्यामुळे भाजलेल्या व्यक्तींच्या उपचारात 'जी१-४ए' चा उपयोग करणे शक्य व्हावे. या प्रतिरक्षा नियामकाने उद्दीपित बी लिम्फपेशी व मॅक्रोफनिस या पेशीमधील संवेदनप्रणालीवर त्यांनी संशोधन केले आहे. भाभा अणुसंशोधन केंद्रात जैव-वैद्यकीय गटाचे संचालक म्हणून त्यांनी अणुऊर्जेच्या कृषी व वैद्यकीय क्षेत्रातील प्रयोगांना प्रोत्साहन दिले, तसेच या तंत्रज्ञानाच्या उपयोगांनी निर्माण झालेल्या बियाणांच्या जाती, खाद्यान्न परिरक्षण पद्धती, उपचारपद्धतीचा प्रसार करण्यास मदत केली म्हणून त्यांना 'इंडियन न्यूक्लियर सोसायटी'चा २००३ सालचा ज्येष्ठ वैज्ञानिकाचा पुरस्कार मिळाला.

डॉ. सैनिस युनायटेड नेशन्स सायंटिफिक कमिटी ऑन इफेक्ट्स ऑफ ॲटॉमिक रेडिएशन, (यु.एन.एस.सी.इ.ए.आर.) मध्ये १९९९ सालापासून भारताचे प्रतिनिधित्व करतात. 'इंटरनॅशनल ॲटॉमिक एजन्सी'ने आण्विक उपयोजनावरील स्थायी सल्लागार गटात (स्टँडिंग ॲडव्हायझरी ग्रुप ऑन न्युक्लिअर अप्लिकेशन- एस.ए.जी.एन.ए.) त्यांचा समावेश केला आहे.

— डॉ. तरला नांदेडकर

## सोमण, दत्तात्रेय वामन

**वैद्यकशास्त्रज्ञ**

**जन्म-मृत्यू दिनांक अनुपलब्ध**



आघाडीचे रोगविज्ञान तज्ज्ञ. हाफकिन इन्स्टिट्यूट या जगविख्यात संशोधन संस्थेशी ते आपल्या वैज्ञानिक कारकिर्दीतील बहुतांश काळ निगडित होते. त्या संस्थेत डॉ.सोमण यांनी संशोधनकार्य केले. १९५५ ते १९५७ सालांदरम्यान डॉ.सोमण यांनी हाफकिनचे संचालकपद भूषविले. संस्थेत येण्यापूर्वी डॉ.सोमण हे ग्रॅण्ट वैद्यकीय महाविद्यालय येथे विकृतिशास्त्र व जीवाणूशास्त्र या शाखेत कार्यरत होते. (डिपार्टमेन्ट ऑफ पॅथॉलॉजी ॲन्ड बॅक्टेरिऑलॉजी). तेथून ते हाफकिनमध्ये आले. दोन्ही ठिकाणी त्यांनी वैद्यकीय पदवी व पदव्युत्तर प्राध्यापक म्हणून काम सांभाळले. १८९९ सालाआधी हाफकिन संस्था ही ग्रॅण्ट वैद्यकीय महाविद्यालय येथे होती. हा एक योगायोग की, डॉ. हाफकिन व डॉ. सोमण दोघेही आधी ग्रॅण्ट महाविद्यालय व नंतर हाफकिन संस्था, परळ येथे कार्यरत होते.

डॉ. सोमण यांनी विकृतिशास्त्र, जीवाणूशास्त्र व विषाणूशास्त्र या वैद्यकीय विज्ञानाच्या तिन्ही शाखांत काम केले (पॅथॉलॉजी, बॅक्टेरिऑलॉजी आणि व्हायरॉलॉजी). यांतही त्यांचे कार्य प्रामुख्याने विषाणुशास्त्र या शाखेत होते. त्यांनी खालील विषयांवर संशोधन केले :

१) श्वानदंश (रेबीज): श्वानदंशावरील रोगप्रतिबंधक लस पुढारलेल्या पश्चिमी देशांत व भारतातही प्रचलित होती. डॉ.सोमण यांनी भारतीय वातावरणात नायपेरिम्यून लसीची उपयुक्तता दाखवून दिली. त्यांनी श्वानदंशविरोधी प्रचलित लस व नायपेरिम्यून लस या दोन्हींचा एकत्रित वापर संशयित रोग्यावर करून त्यांचा जीव वाचविता येतो हे दाखवून दिले.



हाफकिन संस्था

२) इन्फ्ल्युएन्झा : १९५१ साली जागतिक आरोग्य संघटनेने हाफकिन संस्थेत इन्फ्ल्युएन्झा केंद्र स्थापन केले. त्या वेळी मुंबईत किंवा भारतात कुठेही इन्फ्ल्युएन्झाची साथ नव्हती. त्यामुळे इन्फ्ल्युएन्झाच्या केसेस मिळणे अवघडच होते. मिळेल त्या केसेसच्या साहाय्याने त्यांनी इन्फ्ल्युएन्झा रोगाचा अभ्यास करून काही निष्कर्ष काढले. इन्फ्ल्युएन्झा विषाणू अनेक प्रकारचे आहेत. त्यांतही इन्फ्ल्युएन्झा ए, बी, आणि सी हे जागतिक संशोधनातले प्रमुख. डॉ. सोमण यांनी भारतात प्रथमच इन्फ्ल्युएन्झा बी टाइप हा प्रयोगशाळेत वेगळा करून, वाढ करून त्याचे अस्तित्व सिद्ध केले.

३) क्यू फीवर : दुसऱ्या महायुद्धापूर्वी फक्त ऑस्ट्रेलिया खंडात या रोगाचा प्रादुर्भाव होता व तुरळक केसेस उत्तर अमेरिकेत सापडल्या होत्या. हा रोग गुरे, मेंढ्या, बकरी, कुत्रे यांत आढळतो. डॉ.सोमण यांनी या रोगावर काम करताना मानवी सिरोलॉजिकल चाचण्या केल्या व सिद्ध केले की हा रोग मुंबईत कधीकधी आढळतो. हा रोग मानवाला घातक होऊ शकतो. क्यू फीवर जनावरातील गोचिडांमार्फत 'रिकेट्सिया कॉक्सिला बर्नेट' यामुळे होतो, त्या काळी रिकेट्सिया हे विषाणूंच्या जवळपास आहेत असा प्रचलित समज होता; पण नंतर हे सिद्ध करण्यात आले, की रिकेट्सिया म्हणजे अतिशय सूक्ष्म जीवाणूच आहेत.

४) स्क्रब टायफस : या रोगावरही डॉ. सोमणांचे संशोधन आहे. भारतीय वातावरणात, किंबहुना मुंबईत व उपनगरात या रोगाचे अस्तित्व त्यांनी दाखवले. रिकेट्सिया ओरिएंटालीस हा जनावरांत आढळणारा जीवाणू पोरकिड्यांच्यामार्फत माणसांत येऊ शकतो.

५) लेप्टोस्पायरोसिस : हा रोग माणसांत यकृता व रक्ताला घातक आहे. हा जीवाणू उंदरांमध्ये असतो. मुसळधार पावसात पाणी साचून पूरसदृश परिस्थिती निर्माण झाली, की उंदीर बाहेर येतात. त्यांच्या मूत्राद्वारे हे जीवाणू पाण्यात सोडले जातात. मनुष्य या पाण्यातून चालला की जीवाणू त्याच्या शरीरात प्रवेश करतात. या रोगावरही डॉ.सोमण यांनी महत्त्वाचे संशोधन केले.

६) पटकी (कॉलरा) : १९४५ साली त्यांनी पटकीवर संशोधनकार्य करून या जीवाणूचे वेगवेगळे प्रकार (सबटाइप) यांचे पृथक्करण केले व प्रयोगशाळेत त्यांची वेगवेगळी वाढ केली. या जीवाणूंच्या संदर्भात प्रचलित असलेल्या चाचण्यांतही सुधारणा केल्या. पटकीवर उपचार म्हणून प्रतिजैविके (ॲन्टिबायॉटिक्स) वापरून त्यांची उपयुक्तता दाखवली. १९५२ साली हे संशोधन 'ॲन्टस ऑफ द न्यूयॉर्क अकॅडमी ऑफ सायन्सेस' या नियतकालिकात प्रसिद्ध झाले.

७) विषमज्वर : (टायफॉइड किंवा एन्टेरिक फीवर) : डॉ.सोमण यांनी १९५३ साली विषमज्वराचा दहा वर्षांचा आढावा घेणारा लेख प्रसिद्ध केला. विषमज्वराच्या जीवाणूवर जगणारे विषाणू (व्हायरस) यांचाही त्यांनी अभ्यास केला.

८) आपल्या संशोधनकार्यात डॉ.सोमण यांनी अनेक प्रचलित रोगनिदान चाचण्यांचा वापर केला. त्यांनी त्यांतही संशोधन करून, कधी भर घालून सुधारणा केल्या. एकंदरीत, या चाचण्यांचा दर्जा उंचावला. फार खोलात न जाता, थोडक्यात यांची नामावली खालीलप्रमाणे :

१) रूटिन विडाल टेस्ट व क्लॉट कल्चर टेस्ट : या दोघांचे एकत्रीकरण करून चाचणीचा दर्जा उंचावला. (विषमज्वरासाठी)

२) व्हायरस आयसोलेशन टेस्ट करताना त्यांनी माइस (उंदीर), गिनिपिग ऑफ चिक एम्ब्रायो (कोंबडीचा गर्भ)

स

यांचा वापर केला. घटसर्पाच्या जीवाणूची ‘विष निवारण चाचणी’ ही गिनिपिगमध्ये केली, तसेच विषाणू निवारण चाचणी करतानाही वरील प्राणी वापरले.

३) त्यांच्या इन्फ्ल्युएन्झाच्या संशोधनात डॉ.सोमण यांनी पूरक निर्धारण चाचणी व हिमॅग्लुटिन अवरोध चाचणी या दोन्ही चाचण्यांचा सढळ वापर केला.

४) विषाणूंवर संशोधन करताना त्यांनी उती संवर्धित लस चाचणीचा थोडाफार वापर केला. नुकत्याच झालेल्या एचवन-एनवन विषाणूचे उदाहरण पाहिले, तर विषाणूंचा केव्हाही उद्रेक होऊ शकतो व मानवजातीपुढे ज्वलंत प्रश्न उभे राहू शकतात, हे स्पष्ट होते. त्या दृष्टीने सोमण यांचे हे संशोधन फारच मोलाचे आहे.

– डॉ. म. वि. ना. शिरोडकर

## सोवनी, प्रभाकर विष्णू

**भूशास्त्रज्ञ**

**१९ एप्रिल, १९२६**



प्रा.प्रभाकर विष्णू सोवनी हे विज्ञानप्रेमींना प्रभाकर सोवनी या नावाने परिचित आहेत. ते लहान असतानाच त्यांचे वडील वारले. तेव्हा त्यांच्या मोठ्या भावंडांकडे सोवनींचे बालपण व्यतीत झाले. त्यांचे शालेय शिक्षण त्यामुळे वेगवेगळ्या गावी झाले. पुढे पुण्यात फर्गसन महाविद्यालयातून बी.एस्सी.चे शिक्षण घेत असतानाच, त्यांनी वृत्तपत्रे आणि विविध नियतकालिकांमधून लेखनास सुरुवात केली. मध्यंतरी, काही काळ अर्थार्जनासाठी त्यांनी कापडाच्या गिरणीत नोकरीही केली. तेवढा काळ सोडला, तर ते कायम भूशास्त्राशी संबंधित राहिले. बी.एस्सी. झाल्यानंतर त्यांनी प्रा.क.वा. केळकर यांच्याकडे संशोधन करून भूशास्त्रातील एम.एस्सी. ही पदवीही संपादन केली. या काळात त्यांनी गोव्यातही बरेच क्षेत्रपरीक्षण केले. त्यानंतर त्यांनी




प्रामुख्याने शिलाशास्त्र (पेटॉलॉजी) या विषयाशी संबंधित संशोधन केले. १९५४ साली ते पुण्यातील फर्गसन महाविद्यालयात व्याख्याता बनले.

प्रा. क. वा. केळकर यांच्या निवृत्तीनंतर ते फर्गसन महाविद्यालयाच्या भूशास्त्र विभागाचे प्रमुख बनले. १९६२ ते १९८६ एवढा प्रदीर्घ काळ ते या विभागाचे प्रमुख होते. १९६२ ते १९६५ या काळात ते पुणे विद्यापीठाच्या भूशास्त्र विभागाचे प्रभारी प्रमुख होते. १९७४ ते १९८६ या काळात ते फर्गसन महाविद्यालयाचे उपप्राचार्य होते. दरम्यानच्या काळात त्यांनी ‘कोलोरॅडो स्कूल ऑफ माइन्स’ येथे ‘प्रगत पाषाणशास्त्र’ या विषयाचे अध्ययन तीन वर्षे केले. त्या वर्षीच्या ‘जिऑलॉजिकल सोसायटी ऑफ अमेरिका’ या संस्थेच्या अधिवेशनात त्यांनी शोधनिबंधही सादर केला.

सोवनी हे जसे विद्यार्थिप्रिय शिक्षक होते, तसेच किंवा त्याहीपेक्षा अधिक ते त्यांच्या लेखनामुळे लोकादरास पात्र ठरले. १९४० सालापासून गेली ६८ वर्षे ते सातत्याने विज्ञान लेखन करीत आले आहेत. ‘उद्यम’ या मासिकात त्यांनी वीस वर्षांहून अधिक काळ स्तंभलेखन केले. सोवनींचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे अत्यंत अचूक, सुस्पष्ट आणि सुबोध लेखन. त्यांची व्याख्यानेही त्यांच्या लेखनाप्रमाणेच अतिशय मुद्देसूद आणि सुस्पष्ट असत. मराठी विज्ञान परिषद, पुणे विभागाचे ते बरीच वर्षे कार्याध्यक्ष होते. मराठी विज्ञान महासंघाचे कार्यवाह आणि नंतर कार्याध्यक्ष म्हणूनही त्यांनी काम केले.

सोवनींनी ‘सृष्टिज्ञान’ आणि ‘विज्ञान युग’ या विज्ञानाला वाहिलेल्या दोन नियतकालिकांच्या संपादक मंडळाचे सदस्य म्हणून बरीच वर्षे काम केले. ‘या महिन्याचा शास्त्रज्ञ’, ‘टपाल तिकिटातून विज्ञान’, ‘गणिती कोडी’, ‘पन्नास वर्षांपूर्वी सृष्टिज्ञानात’, ‘वैज्ञानिक कोडी’, ‘विज्ञान प्रश्नावली’ अशी त्यांची सदरे

स

कितीतरी वर्षे सातत्याने ते चालवीत होते. ‘विज्ञान युग’च्या स्थापनेपासून अखेरपर्यंत ते त्या मासिकाच्या संपादक मंडळाचे अध्वर्यू होते.

मराठी विश्वकोशाचे अतिथी संपादक म्हणूनही भूवैज्ञानिक नोंदींचे लेखन आणि समीक्षण करताना त्यांनी विश्वकोशासाठी भरीव योगदान दिले. महाराष्ट्र राज्य ग्रंथनिर्मिती महामंडळासाठी त्यांनी पाषाणशास्त्राचे पाठ्यपुस्तक लिहिले. याशिवाय, ‘ओळख भूशास्त्राची’, ‘पृथ्वीची कथा’, ‘विश्वाचा पसारा’, ‘आकाशातून अवकाशात’, ‘ओळख आकाशाची’, ‘ओळख नक्षत्रांची’, ‘नवलाईचे विज्ञान’, ‘सांगा, असे का?’, ‘व्यावहारिक विज्ञान’, ‘ज्ञान विज्ञान मनोरंजन’, ‘रंजनातून बुद्धिविकास’, ‘विज्ञान दर्शन’, ‘कूळकथा’ अशी त्यांची तीसहून अधिक पुस्तके प्रकाशित झाली असून शास्त्रज्ञांच्या चरित्रावरील पुस्तक प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

त्यांना मराठी विज्ञान परिषदेचे मानपत्र (१९८५), मो.वा. चिपळोणकर विज्ञान प्रसारक पुरस्कार (१९९५), महाराष्ट्र साहित्य परिषदेचे प्रा.गो.रा. परांजपे सन्मानपत्र, आदी पुरस्कार प्राप्त झाले आहेत. वयोमानापरत्वे, त्यांचे लेखन कमी झाले असले तरी अजूनही ते सातत्याने ‘सृष्टिज्ञान’साठी लेखन करतात, हे विशेष.

— प्रा. निरंजन घाटे

**संदर्भ:**

*१. विसावे अ.भा. मराठी विज्ञान अधिवेशन स्मरणिका; ठाणे, १९८५*

## सोवनी, रामचंद्र विठ्ठल

**जीवशास्त्रज्ञ, विज्ञान प्रसारक**

**३० एप्रिल १९२४ - १ मे २००७**

रामचंद्र विठ्ठल सोवनींचा जन्म साताऱ्याचा. वडील सरकारी डॉक्टर होते. त्यांचे वास्तव्य पुण्यातले, त्यामुळे त्यांचे न्यू इंग्लिश स्कूल, रमणबाग या शाळेत आणि फर्गसन व स. प. महाविद्यालयांत शिक्षण झाले. प्राणिशास्त्रात बी.एस्सी. करून ते स. प. महाविद्यालयात प्रयोग साहाय्यक म्हणून काम करू लागले. ही नोकरी



करत असतानाच त्यांनी एम.एस्सी. करायचे ठरवले आणि पूर्णही केले. मॉडर्न एज्युकेशन सोसायटीने पुण्यातील वाडिया महाविद्यालयानंतर मुंबईत रुपारेल महाविद्यालय सुरू केले. तिथे जीवशास्त्राचे व्याख्याता म्हणून सोवनी १९५४ साली रुजू झाले व ते १९७४ सालापर्यंत तिथेच अध्यापन करत होते. अध्यापनात ते रमत असत आणि विषय रसाळ करून सांगण्याची हातोटी त्यांनी आत्मसात केली होती. त्यामुळे कोणीच विद्यार्थी सोवनीसरांचे वर्ग बुडवत नसत.

१९७५ ते १९८४ या कालावधीत ते होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्रात कार्यरत होते. त्यांनी महाराष्ट्र राज्य सरकारच्या पाठ्यपुस्तक मंडळातील पाठ्यपुस्तकांचा दर्जा सुधारण्याच्या समितीवर तीन वर्षे काम केले. त्यांचे अध्यापनाचे कौशल्य विज्ञानप्रसारातही खूप उपयुक्त ठरले. लहान-मोठे कोणीही, विद्यार्थी किंवा प्रौढ त्यांच्याकडे विज्ञानाचा काही प्रश्न घेऊन गेला, तर तो सोवनींकडून उत्तर मिळवून समाधानाने परतायचा. याचे कारण त्यांनी शेवटपर्यंत जोपासलेली चिकित्सक वृत्ती आणि सतत अभ्यास करून नवनवीन गोष्टी जाणून घ्यायची त्यांची ऊर्मी होय. जीवशास्त्राचे प्राध्यापक असले, तरी त्यांना विज्ञानाचा कोणताच विषय वर्ज्य नव्हता, याचेही रहस्य त्यांच्या अभ्यासू आणि चिकित्सक वृत्तीत दडलेले दिसते.

सोवनींचा मराठी विज्ञान लेखनाचा श्रीगणेशा अशाच एका कुलकर्णी नामक विद्यार्थ्यामुळे झाला. कुलकर्णी ‘चित्रा’ मासिकात काम करत होते. त्यांना सोवनींची विषय समजावून घेण्याची पद्धत चांगली माहिती होती. त्यामुळे त्यांनी सोवनींना एक लेख लिहून द्या म्हणून विनंती केली. सोवनींनी ते आव्हान म्हणून स्वीकारले आणि माशावर एक लेख लिहून दिला. तो लेख कुलकर्णींना तर आवडलाच, पण संपादकांनाही

स



**श्री. रा. वि. सोवनी यांची पुस्तके**

आवडला आणि तो त्यांनी छापला. ही घटना १९५३ साली घडली. तेव्हापासून ते विज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांमध्ये सातत्याने, २००७ सालापर्यंत मराठीत लिखाण करत होते. ५० वर्षांपेक्षा जास्त असे विविधांगी लिखाण करणारी व्यक्ती सहजी सापडणार नाही.

त्या वेळी वर्तमानपत्र हे एकच प्रसारमाध्यम उपलब्ध होते. त्यामुळे विज्ञान लेखनाद्वारे नवनवीन शोधांची, तंत्रज्ञानाची माहिती लोकांपर्यंत पोहोचवायला सुरुवात झाली. त्या वेळेपासून सोवनी लिखाण करीत होते, याचा अर्थ असा की, ते पहिल्या पिढीचे विज्ञान लेखक होते. 'अंडरस्टँडिंग सायन्स' या पुस्तकाचे भाषांतर सोवनींनी केले आणि ते 'विज्ञानाशी हितगूज' या नावाने प्रसिद्ध झाले. त्यानंतर त्यांना ठिकठिकाणांहून आमंत्रणे येऊ लागली. दैनिकांत सातत्याने लिखाण येऊ लागले, तसे नवयुग साप्ताहिकात सोवनींचे लिखाण छापून येऊ लागले. आचार्य अत्र्यांनी सोवनींना निरोप पाठवला आणि बोलावून घेतले. दर रविवारी 'विज्ञानाची क्षितिजे' हे सदर लिहिण्यासाठी त्यांना विनंती केली. त्याकरिता लागणारा खर्च करायची तयारी दर्शविली. १९५७ साली अमेरिकेने अवकाशात पाठवलेल्या यानावर एक लेखमाला 'लोकसत्ता'त आली. त्यातून 'चंद्राची स्वारी' हे पुस्तक पुढे तयार झाले. १९७७ साली त्यांनी किर्लोस्कर मासिकात १२ महिने डॉक्टरांवर मालिका लिहिली आणि ती पुढे 'कन्सल्टिंग रूम' या पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली. 'भारतीय पक्षी' आणि 'आपले पर्यावरण' ही दोन नॅशनल बुक ट्रस्टची पुस्तके सोवनींनी भाषांतरित केलेली आहेत.

१९५० ते २००० या कालावधीत मराठीत छापलेल्या विज्ञानविषयक पुस्तकांची सूची राज्य मराठी विकास संस्था आणि मराठी विज्ञान परिषदेने संयुक्तपणे प्रकाशित केली, त्याचे संपादन सोवनींनीच केले होते. दहावीपर्यंत विद्यार्थ्यांना विज्ञानाच्या संकल्पना स्पष्ट करून दाखवणाऱ्या कोशाची कल्पना सोवनींचीच होती. भौतिक, रसायन व जीवशास्त्रावरील संकल्पना विद्यार्थ्यांबरोबरच शिक्षकांनाही स्पष्ट होतील हा उद्देश डोळ्यांसमोर ठेवून राज्य मराठी विकास संस्थेने मराठी विज्ञान परिषदेबरोबर संयुक्त विद्यमाने हा कोश प्रकाशित केला. त्यातील जीवशास्त्र विभागाचे संपादनही सोवनींनी केले. लोकवाङ्मय गृहाने त्यांच्या संपादनाखाली इंग्रजीतील 'चिल्ड्रेन्स बिग बुक ऑफ फॅक्ट'चे मराठी भाषांतर चार शिक्षिकांच्या मदतीने प्रकाशित केले. कॅन्सरविषयक पुस्तिका मालिकेतील पाच पुस्तके सोवनींनी भाषांतरित केलेली प्रकाशित झाली आहेत. वर्तमानपत्रात नेहमी वेगवेगळ्या विषयांवर त्यांचे लिखाण सतत प्रसिद्ध होत असे. मराठी विज्ञान परिषद 'पत्रिके'चे ते अनेक वर्षे संपादक होते, तसेच जवळपास तीस वर्षे हक्काचे लेखक होते. अद्ययावत संशोधनावरचे 'अवतीभवती' हे सदर लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांनाच प्रिय होते, ते सोवनीच लिहीत असत.

त्यांच्या लिखाणामुळे प्रभावित होऊन अनेक ठिकाणांहून वेगवेगळ्या कार्यक्रमांत त्यांना भाषणाकरिता बोलावणे येई. अनेक भाषणे त्यांनी दिलेली आहेत. १९५० सालापासून ते आकाशवाणीशी वक्ते म्हणून जोडले गेले होते. सर्व संपादक बदलले, विषयाला वेगवेगळ्या वाटा फुटल्या, तरी सोवनींचा लेखनप्रवास ५० पेक्षा जास्त वर्षे सुरूच होता. थोडक्यात लिहिणे, लोकांना समजेल असे लिहिणे, विषयाला न्याय देणे, हे सर्व सोवनींनी साध्य केले होते, म्हणूनच ते एवढी वर्षे टिकून राहिले. दूरदर्शनवरील 'प्रतिभा आणि प्रतिमा'

स

कार्यक्रमात १३ रविवारी 'आकाशाशी जडले नाते' ही मालिका गाजली. डॉ. जयंत नारळीकर आणि डॉ. शशिकुमार चित्रे या खगोलशास्त्रज्ञांना प्रश्न विचारून ती माहिती लोकांपर्यंत पोहोचवण्याचे काम सोवनींनीच केले. हा कार्यक्रम अतिशय लोकप्रिय झाला होता.

मराठी विज्ञान परिषदेच्या स्थापनेपासून त्यांचा जवळचा संबंध होता. तसेच, परिषदेच्या अनेक कार्यक्रमांत त्यांनी सहभाग दिला. मराठी विज्ञान परिषदेतर्फे जीवशास्त्राच्या संज्ञा तयार करण्याच्या भाषा संचालनालयाच्या समितीवर त्यांनी काम केले. परिषदेने त्यांच्या विज्ञान प्रसार कार्याचा 'सन्मानकरी' आणि सन्माननीय सभासदत्व देऊन गौरव केला. फाय फाउण्डेशन आणि महाराष्ट्र फाउण्डेशन यांनी पुरस्कार देऊन सोवनींच्या कार्याचा सन्मान केला. ते संगीताचेही भोक्ते होते. विज्ञानाचा चालता-बोलता ज्ञानकोश असणारे सोवनी म्हणजे अखंड विज्ञान प्रसाराचे कार्य व्रतासारखा करणारा एक सच्चा विज्ञान प्रसारक होता.

— दिलीप हेर्लेकर

**संदर्भ:**

१. *मराठी विज्ञान परिषद – पत्रिका; मार्च १९९७.*

२. *महाराष्ट्र फाऊण्डेशन स्मरणिका; २०००.*

३. *दै. सकाळ, ६ मे २०००.*

## सोहोनी, कमला माधव

**पोषणशास्त्रज्ञ**

### १८ जून १९११ - ८ सप्टेंबर १९९७

डॉ. कमला माधव सोहोनी यांचा जन्म बंगळुरूला झाला. योगायोग म्हणजे याच वर्षी त्यांचे वडील नारायण भागवत यांनी बंगळुरूच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समधून रसायनशास्त्र घेऊन एम. एस्सी. केली होती. नुकत्याच सुरू झालेल्या या इन्स्टिट्यूटमधील पहिल्याच तुकडीत नारायणरावांनी प्रवेश मिळवला होता आणि एम. एस्सी. मिळवली. १९१९ साली पत्नीच्या निधनानंतर मुलांसह ते मुंबईत आले. त्यांच्या कन्या दुर्गाबाई भागवत या प्रसिद्ध मराठी



लेखिका म्हणून नावाजल्या, तर कमला सोहोनी यांनी रसायनशास्त्रातील शास्त्रज्ञ म्हणून नाव कमावले. कमला मुंबईच्या सेंट झेवियर्स महाविद्यालयातून रसायनशास्त्र आणि भौतिकी विषय घेऊन बी.एस्सी. झाल्या आणि मुंबई विद्यापीठातून पहिल्या वर्गात, पहिल्या आल्या. त्यांना 'सत्यवती लल्लुभाई सामळदास शिष्यवृत्ती' आणि जुन्या मुंबई प्रांताची टेक्निकल रिसर्च स्कॉलरशिप मिळाली.

त्यानंतर त्यांनी वडिलांसारखेच इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समधून एम. एस्सी. करण्यासाठी अर्ज टाकला, पण त्यांना प्रवेश नाकारला गेला. याविषयी शहानिशा करण्यास वडिलांनी कमलाबरोबर बंगळुरूला जाऊन इन्स्टिट्यूटच्या संचालकांची - नोबल पारितोषिक विजेते डॉ. सी. व्ही. रमण यांची भेट घेतली. त्यांनी ''ती मुलगी आहे म्हणून आम्ही प्रवेश नाकारला,'' असे सांगितले. तेव्हा कमलाने उत्तर दिले की, ''तुम्ही मला प्रवेश नाकारून माझ्यावर आणि माझ्यानंतर येणाऱ्या मुलींवर अन्याय करीत आहात. मी मुंबईला परत जाणार नाही. येथेच तुमच्या दारापुढे बसून सत्याग्रह करीन''. हे ऐकून डॉ. रमण चमकले पण म्हणाले की, ''मी तुला प्रवेश देईन पण एका अटीवर; वर्षभर तात्पुरता प्रवेश देऊन काम ठीक असेल तरच प्रवेश पक्का करीन, नाहीतर तुला काढून टाकीन.'' कमलाने ते मान्य केले आणि वर्षभर श्रीनिवासय्यांच्या हाताखाली उत्तम काम करून डॉ. रमणकडून वाहवा मिळवली. कडधान्ये, दूध यांतील प्रथिने वेगळी करून त्यांचे अमिनो आम्लात पृथक्करण यावर त्यांनी संशोधन केले आणि त्या कामावर १९३६ साली त्यांनी एम. एस्सी. मिळवली.

त्यानंतर वर्षभर त्या हाफकिन इन्स्टिट्यूटमध्ये होत्या. त्या वेळी त्यांना मुंबई विद्यापीठाच्या दोन

स

शिष्यवृत्त्या-'सर मंगळदास नथुभाई' आणि 'स्प्रिंगर रिसर्च स्कॉलरशिप'- मिळाल्या. त्याआधारे केंब्रिज विद्यापीठात दाखल होऊन त्यांनी १९३९ साली पीएच.डी. मिळवली. त्यांनी वनस्पतीतील सायटोक्रोमचे अस्तित्व शोधून मूलभूत संशोधन केले. त्याबद्दल नोबल पुरस्कार विजेते डॉ. सुब्रमण्यम चंद्रशेखर यांनी पण त्यांच्या कामाची वाखाणणी केली.

१९३९ साली दिल्लीच्या लेडी हार्डिंग्ज महाविद्यालयात त्या जीवरसायनशास्त्र शिकवत होत्या. डॉ. सुशिला नायर यांनी डॉ. कमलांच्या हाताखाली 'रक्तातील कोलेस्टेरॉल व निरनिराळ्या दुखण्यांत त्याचा होणारा प्रभाव' यावर संशोधन केले. डॉ. सुशिला नायर यांनी नंतर म. गांधींबरोबर काम केले आणि त्या स्वतंत्र भारताच्या आरोग्यमंत्री झाल्या. १९४२ साली डॉ. कमला कुन्नूर येथील पोषण संशोधन प्रयोगशाळेच्या उपसंचालक झाल्या. येथे त्यांनी जीवनसत्त्वावर संशोधन केले.

सप्टेंबर, १९४५ साली त्यांचा विवाह डॉ. माधव सोहोनी यांच्याशी झाला आणि त्या मुंबईत स्थायिक झाल्या. त्या वेळचे मुंबई नगरपालिकेचे आयुक्त बलसारा होते. त्यांनी डॉ. कमला सोहोनींना मुंबई नगरपालिकेत पब्लिक ॲनॅलिस्टचे काम दिले. येथे दोन वर्षांनी त्यांनी मुंबईच्या रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्ये जीवरसायनशास्त्र विभाग सुरू केला आणि त्याच्या त्या विभागप्रमुख झाल्या. त्यांच्या हाताखाली १० पीएच.डी. चे विद्यार्थी संशोधन करीत होते. तसेच, डॉ. मगर हे व्याख्यातेही डॉ. कमलांना संशोधन आणि प्रयोगशाळा सुसज्ज करण्यास मदत करायचे. या दोघांनी 'नीरा' या भारतीय पेयाची पौष्टिकता आणि कडधान्यातील 'टिप्सिन इनहिबिटर्स' यांवर संशोधन केले.

डॉ. कमलांना हाफकिन संस्थेच्या पुनर्रचना समितीवर नेमेले गेले आणि त्यांनी संशोधन आणि उत्पादन विभाग वेगवेगळे करण्याचा सल्ला १९६० साली दिला आणि त्याप्रमाणे आजही हे दोन विभाग वेगळे आहेत. बडोद्यात महाराज सयाजीराव विद्यापीठात जीवशास्त्राचा विभाग सुरू करण्यास त्यांनी मदत केली. त्या इतर अनेक विद्यापीठांच्या समित्यांवर सल्लागार म्हणून होत्या.



भारतीय विज्ञान संस्था, मुंबई

भारताचे पहिले राष्ट्रपती डॉ.राजेंद्रप्रसाद यांच्या सांगण्यावरून त्यांनी ताड, माड, शिंदी आणि खजूर या चार प्रकारच्या पाम वृक्षांतील नीरेचे संशोधन केले आणि त्यांच्या या संशोधनाचा गौरव १९६० साली डॉ. राजेंद्रप्रसादांच्या हस्ते, सर्वोत्कृष्ट संशोधनाचे पदक देऊन केला गेला.

१९४२-१९४३ साली आरे कॉलनीची स्थापना झाली. पूर्वी आरेचे दूध काचेच्या बाटलीतून सील करून वितरित व्हायचे. दिनकर देसाई शिक्षणमंत्री असताना, आरेच्या सीलबंद बाटलीतील दुधात अळ्या सापडल्या आणि त्याचे पर्यवसान शिक्षणमंत्र्यांच्या राजीनाम्याच्या मागणीत झाले. श्री. देसाईंनी हे कोडे उलगडण्याकरिता डॉ. कमला सोहोनींना पाचारण केले. त्यांनी सर्व निरीक्षणांती निष्कर्ष काढला, की ग्राहकांनी परत केलेल्या रिकाम्या बाटल्या न धुतल्यामुळे त्यांत माशा, किडे अंडी घालतात ते दिसत नाही. अशा बाटल्यांत दूध भरल्यामुळे अंड्यांतून बाहेर आलेल्या अळ्या दुधात सापडल्या. त्यामुळे रिकाम्या बाटल्या स्वच्छ धुवून देणे ही अट ग्राहकाला घातली गेली.

डॉ. कमला सोहोनी १९६५ ते १९६९ या चार वर्षांसाठी भारतीय विज्ञान संस्थेच्या (इन्स्टिट्यूट ऑफ

सायन्स) संचालिका होत्या. या संस्थेच्या त्या पहिल्या महिला संचालिका होत्या. त्यांनी तडफदारपणे काम केले आणि योग्य निर्णय घेतले. १९६९ साली त्या निवृत्त झाल्या.

त्यानंतर कमला सोहोनी जवळजवळ २७ वर्षे ग्राहक चळवळीतर्फे भेसळ प्रतिबंधाचे काम पाहिले. विद्युत उपकरणांवर भारतीय मानकाचा शिक्का असायला हवा, याचा त्यांनी आग्रह धरला. १९७४ साली मराठी विज्ञान परिषदेतर्फे तळेगावला त्यांचा सत्कार करण्यात आला.

– डॉ. तरला नांदेडकर

**संदर्भ:**

१. *धुरू, वसुमति; 'विज्ञान विशारदा–कमला सोहोनी'; ग्रंथाली प्रकाशन; १९९६.*

✻ ✻ ✻

स

# ह



## हुजूरबाजार, वसंत शंकर

**सांख्यिकीशास्त्रज्ञ**

**१५ सप्टेंबर १९१९ - १५ नोव्हेंबर १९९१**



कोल्हापूर संस्थानातील एका सुसंस्कृत कुटुंबात हुजूरबाजारांचा जन्म झाला. शाळेच्या व पदवीपर्यंत कोल्हापुरात दिलेल्या परीक्षांपासून बनारस हिंदू विद्यापीठातील एम.ए.च्या परीक्षेत कुलपती सुवर्णपदक मिळेपर्यंत ते सतत पहिल्या क्रमांकाने उत्तीर्ण होत गेले.

शाळेच्या वयातच, संभाव्यतेबद्दल त्यांना वाटलेले आकर्षण आणि १९४१ साली बनारस हिंदू विद्यापीठात भरलेल्या 'इंडियन सायन्स काँग्रेस'च्या अधिवेशनातील व्याख्यानातून ऐकलेले 'संख्याशास्त्र हे मानवी कल्याणाचे अंकगणित आहे', हे प्रा.प्रशांतचंद्र महालनोबीस यांचे उद्‌गार आणि विनोदाने नटलेले सर सी.व्ही. रमण यांचे संभाव्यतेचे विवेचन, यांच्या जोडीला तेव्हा देशातील बरीच विद्यापीठे संख्याशास्त्राचे अभ्यासक्रम चालू करण्याच्या विचारात होती, आणि मुख्य म्हणजे आगामी काळात या विषयाला महत्त्व येणार हे ओळखून हुजूरबाजारांनी संख्याशास्त्रात संशोधन करायचे ठरविले.

केंब्रिज विद्यापीठातील खगोल व भू-भौतिकशास्त्रज्ञ आणि बेरीज प्रमेय व व्युत्क्रम संभाव्यतेची तरफदारी करणारे, पण संख्याशास्त्रीय वर्तुळात वादग्रस्त ठरलेले सर हॅरॉल्ड जेफ्रीज हे हुजूरबाजारांचे मार्गदर्शक होते. परंतु, तेव्हा संख्याशास्त्रीय जगावर सर रोनॉल्ड फिशर यांचा प्रभाव होता. म्हणून जेफ्रीज यांच्या विचारप्रणालीचा उपहास केला जाई. तरी नेटाने काम करून संख्याशास्त्र क्षेत्रात नाव मिळविणारे हुजूरबाजार हे जेफ्रीज यांचे एकमेव विद्यार्थी ठरले. कारण, त्यांचे बाकीचे विद्यार्थी भू-भौतिकीत काम करणारे होते.

तीन वर्षे परिश्रम करून, अखेर हुजूरबाजारांनी १९४९ साली 'सम प्रॉपर्टीज ऑफ डिस्ट्रिब्यूशन ॲडमिटिंग सफिशंट स्टॅटिस्टिक्स' हा प्रबंध विद्यापीठास सादर केला. त्यात एकूण पाच उपविषय असून त्यांपैकी काही 'अनल्स ऑफ युजेनिक्स', 'प्रोसीडिंग्ज ऑफ केंब्रिज फिलॉसॉफिकल सोसायटी' व 'बायोमेटिका' या नियतकालिकांतून शोधनिबंध स्वरूपात प्रसिद्ध झाले होते. त्यांतील नावीन्यामुळे बऱ्याच लेखकांनी ते आपल्या पाठ्यपुस्तकात, तर प्राध्यापकांनी त्यांच्या अभ्यासक्रमात समाविष्ट केले. खुद्द जेफ्रीज यांनी आपल्या, 'थिअरी ऑफ प्रॉबॅबिलिटी' या पुस्तकात हुजूरबाजारांचे अविकारक घालून, 'हुजूरबाजार अविकारक' असे त्यांचे बारसे केले; शिवाय 'हुजूरबाजारांनी मोठी झेप घेतली', असे एके ठिकाणी म्हटलेले आढळते. कळस म्हणजे, १९४९ साली विद्यापीठाला गणितात सादर झालेल्या प्रबंधात हुजूरबाजारांचा पीएच.डी.चा प्रबंध सर्वोत्कृष्ट ठरल्यामुळे, विद्यापीठाने त्यांना 'ॲडॅम्स' पारितोषिक देऊन गौरविले.

स्वदेशी परतल्यावर काही वर्षांनी हुजूरबाजार पुणे विद्यापीठाच्या गणित व संख्याशास्त्र विभागाचे प्रमुख झाले आणि अल्पावधीतच त्यांनी तो विभाग इतका नावारूपाला आणला, की पुढे त्यांपैकी संख्याशास्त्र विभागास विद्यापीठ अनुदान मंडळाने प्रगत अध्ययन व संशोधन केंद्राचा दर्जा दिला. गुणात्मक विकास झालेल्या

ह

या विभागातून संशोधनास वाहून घेणाऱ्या संशोधकांना जगभरातील संख्याशास्त्रज्ञांची वाहवा मिळत गेली. अशा तरुण संशोधकांची पिढी उभी करण्याचे श्रेय हुजूरबाजारांकडे जाते.

हुजूरबाजारांच्या या कर्तबगारीमुळेच अनेक नामवंत परदेशी व भारतीय संख्याशास्त्रज्ञांनी त्यांच्या विभागास भेटी देऊन विद्यार्थ्यांना आपल्या ज्ञानाचा लाभ दिला. मात्र त्यांचे संशोधन जरी रखडले, तरी निवृत्तीनंतर त्यांनी त्याची भरपाई केली. म्हणून त्यांच्या नावावर २६ शोधनिबंध व 'सफिशंट स्टॅटिस्टिक्स' हे पुस्तक व इतर अनेक सन्मान आहेत. भारत सरकारने 'पद्मभूषण' किताबाने त्यांच्या कार्याचा गौरव केलेला आहे.

– प्रा. स. पां. देशपांडे

**संदर्भ:**

*१. करंट सायन्स; १० मार्च, १९९२.*

✻ ✻ ✻

ह




## क्षीरसागर, गजानन दामोदर

**विज्ञान कथालेखक, संपादक**

**१७ सप्टेंबर १९३३ - १५ फेब्रुवारी २००६**



गजानन दामोदर क्षीरसागर यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांच्या घरची परिस्थिती बेताचीच असल्यामुळे त्यांनी शिक्षण मोठ्या कष्टाने पूर्ण केले. शिक्षणाला मदत व्हावी म्हणून ते वृत्तपत्रे टाकीत आणि इतरही कामे करीत. बी.ए. झाल्यावर त्यांनी रीतसर कारकुनाची नोकरी धरली. एल.आय.सी. या सरकारी संस्थेत निवृत्तीपर्यंत नोकरी केली की क्षीरसागर सुखाने निवृत्त झाले असते. पण त्यांचे मन त्या कारकुनीत रमत नव्हते.

क्षीरसागरांचा पिंड साहित्यिकाचा होता. त्यांचे अक्षरही सुंदर होते. मित्रही साहित्यिक वर्तुळातले होते. त्यांच्या सहवासात क्षीरसागरांना लिहावेसे वाटणे साहजिक होते. सुरुवातीच्या काळात त्यांनी रहस्यकथा आणि विज्ञानकथांचे अनुवाद केले. काही विज्ञान कादंबऱ्याही मराठीत आणल्या. तरीही ते अस्वस्थच असत. अखेरीस काहीतरी वेगळे करायचे या ईर्षेने त्यांनी चांगली नोकरी सोडली आणि विज्ञानप्रसाराचा वसा घेऊन एका नव्या पर्वाला सुरुवात केली. त्यासाठीच त्यांनी 'विज्ञानयुग' हे मासिक सुरू केले आणि त्याबरोबर 'अनिरुद्ध प्रकाशन' ही संस्थाही स्थापन केली. 'विज्ञानयुग' त्यांनी जवळजवळ एकहाती चालवले.

ही संस्था आणि त्यांचा संसार सदाशिव पेठेतील त्यांच्या दोन बाय दोन मीटरच्या दोन खोल्यांत चालत असे. पुढे त्यांचे कार्यालय एका बंगल्याच्या गॅरेजमध्ये गेले. क्षीरसागरांचे शिक्षण विज्ञानशाखेशी संबंधित नव्हते, याची त्यांना जाणीव होती. त्यामुळे त्यांनी प्रा. प्रभाकर सोवनी, डॉ. मो. वा. चिपळोणकर, ग. स. काजरेकर, शं. ल. चोरघडे, ना. वा. कोगेकर, भालबा केळकर यांचे संपादकीय मंडळ स्थापन केले आणि क्षीरसागर या संपादकीय मंडळाचे सचिव म्हणून कार्य करू लागले. अंकावर सरकारी नियमानुसार जरी संपादक म्हणून त्यांचे नाव होते, तरी पहिल्या भेटीतच 'मी तो हमाल, भारवाही', ही भूमिका ते स्पष्ट करीत. असे असले तरी त्यांचे वृत्तपत्रातील बातम्यांवर बारीक लक्ष असे. यामुळे विज्ञानाच्या क्षेत्रात नवीन काही घडले की ते लगेच मंगळवारच्या संपादकीय सभेत तो विषय चर्चेला आणीत.

यामुळेच १९६९ साली माणूस चंद्रावर उतरताच 'विज्ञानयुग'चा 'चंद्रावतरण' अंक बाजारात आणणे त्यांना शक्य झाले. यानंतर क्षीरसागरांनी एक नवी रूढी रुळवली. दरवर्षीचा दिवाळी अंक एकाच विषयावर, एकाच लेखकाकडून लिहून घ्यायचा. असे अनेक प्रयोग त्यांनी केले. काही दिवाळी अंक 'विज्ञानकथा विशेषांक' म्हणून प्रकाशित केले. या आणि इतर अंकांमध्येही प्रस्थापितांबरोबर त्यांनी अनेक नवोदितांना आवर्जून स्थान दिले. त्यांच्या लेखांवर, कथांवर संपादकीय संस्करण करून त्या साहित्याचा दर्जा वाढवला. कित्येक लेखमालांचे त्यांनी पुस्तकरूपानेही प्रकाशन केले. कित्येक विज्ञानसाहित्यिकांना त्यांनी अशा रीतीने घडवले आहे.

एकदा विषय ठरला की क्षीरसागर, तो लेखक आणि 'विज्ञानयुग'चे संपादक यांच्याशी चर्चा करून पुस्तकाचा




आराखडा तयार करीत. त्याची एक प्रत लेखकाला देत, एक स्वत:जवळ ठेवत. प्रत्येक प्रकरण लिहून झाले की लेखक, तज्ज्ञ संपादक यांची चर्चा घडवून आणत. मुद्रण-प्रत तयार झाली, की प्रत्येक प्रकरणामध्ये घालायच्या चित्रांची यादी आणि त्या चित्रांची जागा निश्चित करीत. पुस्तक छपाई सुरू झाली, की स्वत: एकदा आणि लेखकाला एकदा मुद्रितशोधन करायला लावीत. यामुळे अनिरुद्ध प्रकाशनाच्या अनेक पुस्तकांना राज्य पुरस्कारांसह इतरही अनेक पुरस्कार मिळाले. 'महासागर', 'दूरचित्रवाणी', 'वसुंधरा', 'विज्ञानाचे शतक' आणि इतरही अनेक चांगले ग्रंथ क्षीरसागरांमुळे निर्माण झाले. याशिवाय, क्षीरसागरांनी भालबा केळकर, ना. वा. कोगेकर आदी अनेक लेखकांची शंभराहून अधिक पुस्तके प्रसिद्ध केली. त्यांचे हे योगदान विसरून चालणार नाही. मराठी विज्ञान परिषदेने 'विज्ञानयुग' मासिकाला सन्मानपत्र दिले. तो क्षीरसागरांचाच सन्मान होता. मराठीमधून विज्ञान प्रसार करणाऱ्या संस्थांमध्ये क्षीरसागरांच्या अनिरुद्ध प्रकाशनाचे, विज्ञानयुगचे आणि क्षीरसागरांचे स्थान फार वरचे आहे हे निश्चित.

प्रकृती अस्वास्थ्यामुळे त्यांनी 'विज्ञानयुग'चे प्रकाशन बंद केले. पण त्यांचा जीव त्यातच अडकलेला होता. कारण, त्यानंतर थोड्याच काळात, पुण्यातच त्यांचे निधन झाले.

– निरंजन घाटे

✻ ✻ ✻

क्ष

# परिशिष्ट – १



## परिभाषा सूची

विज्ञान खंडाच्या चरित्र नोंदींमध्ये मराठी शब्दांच्या वापराचा आमचा आग्रह असल्यामुळे येथे काही वाचकांना काहीशा दुर्बोध वाटणाऱ्या मराठी शब्दांचा वापर झाला आहे. खरे तर इंग्रजी शब्द अंगवळणी पडल्याने व मराठी शब्दांचा बोलण्यात व लेखनात वापर कमी होत चालल्याने हे मराठी शब्द वाचकांना दुर्बोध वाटतात. पण वाचकांची गैरसोय होऊ नये म्हणून वापरलेला मराठी शब्द, त्याचा इंग्रजी उच्चाराचा देवनागरी लिपीतील प्रतिशब्द व त्याचे इंग्रजी स्पेलिंग येथे खालील सूचीत दिले आहे.

| **मराठी शब्द** | **इंग्रजी उच्चार** | Spelling |
|---|---|---|
| अंडनलिका | (फॅलोपिन ट्यूब) | Fallopian Tube |
| अणुऊर्जा आस्थापन | (अॅटॉमिक एनर्जी एस्टॅब्लिशमेंट) | Atomic Enargy Establishment |
| अणुकेंद्र वर्णपट | (न्यूक्लियर स्पेक्ट्रोस्कोप) | Nuclear Spectroscope |
| अणुगर्भीय परिवलन | (न्यूक्लिअर स्पिन) | Nuclear Spin |
| अणुभट्टी अभियांत्रिकी | (रिअॅक्टर इंजिनिअरिंग) | Reactor Engineering |
| अपमृत्यू निर्णेता | (कॉरोनर) | Coronar |
| अभियांत्रिकी | (इंजिनीअरिंग) | Engineering |
| अवकाश उपयोजन केंद्र | (स्पेस अॅप्लिकेशन सेंटर) | Space Aplication Centre |
| आण्विक अभियांत्रिकी | (न्यूक्लिअर इंजिनिअरिंग) | Nuclear Engineering |
| आण्विक विकिरण | (न्युक्लिअर रेडिओअॅक्टिव्हिटी) | Nuclear Radioactivity |
| आराखडा/प्रारूप आराखडा | (मॉडेल) | Model |
| उत्पादन एकस्व | (प्रॉडक्ट पेटंट) | Product Patent |
| उदरपोकळी | (पेरिटोनल कॅव्हिटी) | Peritoneal Cavity |
| उष्णता रोधक आवरण | (इन्स्यूलेशन) | Insulation |
| उष्णतेचे वहन | (हीट ट्रान्स्फर) | Heat Transfer |

| | | |
|---|---|---|
| उष्मागतिकी | (थर्मोडायनॅमिक्स) | Thermodynamics |
| उष्मागती | (थर्मोडायनॅमिक) | Thermodynamic |
| ऊती संवर्धन | (टिश्यू कल्चर) | Tissue Culture |
| एकस्व | (पेटंट) | Patent |
| ओकारीचा मुळारंभ | (मेकॅनिझम ऑफ व्होमिटिंग) | Mechanism of Vomiting |
| औषध नियंत्रक | (ड्रग कंट्रोलर) | Drug Controller |
| औषधशास्त्र | (फार्माकोलॉजी) | Pharmacology |
| कर्करोग संशोधन संस्था | (कॅन्सर रिसर्च इन्स्टिट्यूट) | Cancer Research Institute |
| कलिल | (कोलाईड) | Colloids |
| कलिली द्रावण | (कोलाईडल सोल्युशन ) | Colloidal sollution |
| कवककविष | (अफ्लॉटॉक्सिन) | Aflatoxin |
| किंतारा | (क्वासार) | Quasar |
| किरणोत्सार मापक यंत्रे | (रेडिएशन स्कॅनर्स) | Radiation Scanners |
| कुटुंबनियोजन संच | (कॉन्ट्रासेप्टिव्ह टेस्टिंग युनिट) | Contraceptive Testing Unit |
| कुलगुरू | (व्हाइस चॅन्सेलर) | Vice Chancellor |
| केशवाहिन्या | (मायक्रोट्यूबुल्स) | Micro tubules |
| क्रियाशील नत्र अणू | (ॲक्टिव्ह नायट्रोजन) | Active Nitrogen |
| खगोलशास्त्राची उत्क्रांती | (इव्हॉल्यूशन ऑफ ॲस्ट्रॉनॉमी) | Evolution of Astronomy |
| खाडी बोगदा | (क्रीक टनेल) | Creek Tunnel |
| गर्भाचा खांदा | (ॲण्टिरियर शोल्डर) | Anterior Shoulder |
| गर्भाशयाचे स्खलन | (प्रोलॅप्स ऑफ युटेरस) | Prolapse of Uterus |
| गतिविज्ञान | (डायनॅमिक्स) | Dynamics |
| गिरणी | (मिल) | Mill |
| गुणवत्ता पारितोषिक/पुरस्कार | (ॲवॉर्ड ऑफ एक्सलन्स) | Award of Excellence |
| ग्रामोपयोगी विज्ञान केंद्र | (सेंटर ऑफ सायन्स फॉर व्हिलेजेस) | Center of Science for Villages |
| घनस्थिती विज्ञान/ इलेक्ट्रॉनिक्सचा मूलाधार | (ट्रान्झिस्टर) | Transistor |

| | | |
|---|---|---|
| चुंबकीय प्रवणता | (मॅग्नेटिक ससेप्टेबिलिटी) | Magnetic Susceptibility |
| चुंबकीय रसायनशास्त्र | (मॅग्नेटो केमिस्ट्री) | Magnetic Chemistry |
| जलगती विज्ञान | (हायड्रॉलिक्स) | Hydraulics |
| जलपुष्प प्राणी / नलिकोदर | (स्पंज सिलेंटराटा) | Sponge Coelenterata |
| जलरोधन | (वॉटरप्रूफिंग) | Waterproofing |
| जलीय | (हायड्रॉलिक) | Hydraulic |
| प्रमाणित प्रतिकृती | (स्केल मॉडेल्स) | Scale Models |
| जीवन गौरव पुरस्कार | (लाइफटाइम अचिव्हमेन्ट अॅवॉर्ड) | Lifetime Achievement Award |
| जीवमिती | (बायोमेटरी) | Biometry |
| जीवाणूशास्त्र | (बॅक्टेरिऑलॉजी) | Bacteriology |
| झडप | (व्हॉल्व्ह) | Valve |
| टाकसाळ अभियंता | (मिंट इंजिनिअर) | Mint Engineer |
| टिळक प्रक्रिया | (टिळक रिॲक्शन) | Tilak Reaction |
| तंत्रशास्त्र संस्था | (टेक्नॉलॉजिकल इन्स्टिट्यूट) | Technological Institute |
| तंत्रशास्त्र विद्यापीठ | (टेक्नॉलॉजी/टेक्नॉलॉजिकल युनिव्हर्सिटी) | Technology / Technological University |
| तांत्रिक सल्लागार समिती | (टेक्निकल ॲडव्हायजरी कमिटी) | Technical Advisory Committee |
| त्रिकास्थी | (सेक्रम) | Sacrum |
| दमन | (सप्रेशन) | Suppression |
| दीर्घिका | (गॅलेक्सी) | Galaxy |
| दृक्पटल | (रेटायना/रेटिना) | Retina |
| द्रव्याचे संघनन | (कंडेन्सेशन) | Condensation |
| द्रुतप्रजनक अणुभट्टी | (फास्ट ब्रीडर रिॲक्टर) | Fast Breeder Reactor |
| धर्मादाय न्यास | (चॅरिटेबल ट्रस्ट) | Charitable Trust |
| धातुशास्त्र | (मेटलर्जी) | Metallurgy |
| धूमकेतूपासून ताऱ्यांपर्यंत | (कॉमेट्स टू स्टार्स) | Comets To Stars |
| ध्वनिचित्रफित | (व्हिडिओ कॅसेट) | Video Cassette |

वर्षांचे चार कालखंड मानले आहेत. या प्रत्येक कालखंडात व्यक्तीने सामाजिक व वैयक्तिक उद्दिष्टे साध्य करण्यासाठी वर्तन करावे अशी अपेक्षा असे.

मानवाने आपणहूनच आपल्या विकासाच्या उद्दिष्टापर्यंत जाण्यासाठी सातत्याने प्रयत्न करण्याची आवश्यकता आहे. त्या दृष्टीने त्याने वाटचाल केल्यास त्याचे चारित्र्य शुद्ध राहते. तो समाधानी राहतो व सदाचारी बनतो या संकल्पनेवर भारतीय जीवनपद्धती आधारित आहे, असे आपणास दिसून येते.

खरे तर, मुळात 'वैदिक' नावाचा काळ नव्हता, ज्या काळी वेदवाङ्मयाची निर्मिती झाली त्या काळाला वैदिक काळ म्हटले जाते. या काळात प्रामुख्याने वेदवाङ्मयाची निर्मिती झाली. वेद या शब्दाचा अर्थ ज्ञान असा आहे. ब्रह्मसूत्राची सुरुवात 'अथा तो ब्रह्मजिज्ञासा', ब्रह्म जाणून घेण्याची जिज्ञासा या शब्दांनी झाली आहे. वेद हे आद्यज्ञान व उत्तम काव्य आहे. वेदामध्ये परमार्थ विषयाबरोबरच मनुष्याच्या ऐहिक उन्नतीस आवश्यक अशा मानवी आशा व आकांक्षा यांचा समावेश असल्याचे दिसून येते.

वेदाबरोबरच वैदिक काळात वाल्मीकीचे रामायण व व्यासांचे महाभारत ही दोन महाकाव्ये निर्माण झाली. पावित्र्य, विचारगांभीर्य व उदात्तता या दृष्टीने या महाकाव्यांना जगाच्या वाङ्मयात उच्च स्थान प्राप्त झाले आहे.

वाल्मीकी रामायण हे भारताचे आदिकाव्य आहे. धार्मिक व नैतिक आदर्शाचे ते भांडार आहे. हजारो शतकांपूर्वी भारतीय समाज कोणत्या प्रकारे जीवनप्रवास करीत होता त्याचे सुस्पष्ट वर्णन रामायणात मिळत असल्याने त्याला समाजशास्त्रीय महत्त्वही आहे.

भारताचे केवळ वाङ्मयात्मक जीवन नव्हे तर व्यावहारिक जीवनही महाभारतावर आधारले गेले आहे. रामायणाने जीवनाचे ध्येयदर्शन घडविले असले तरी महाभारताने मानवी जीवनाची अपूर्णता लक्षात घेऊन विषम परिस्थितीच्या घनांधकारातून ध्येयसिद्धीचा मार्ग दाखवला आहे.

महाभारतातील भगवद्गीता हा हिंदू धर्माचा धर्मग्रंथ मानला जातो. वेदवाङ्मय सर्वांना ज्ञात व्हावे व वेदांचा अभ्यास करण्यास मदत व्हावी म्हणून वेदार्थ जाणणाऱ्या ऋषींनी वेदावर आधारित सहा वेदांगे निर्माण केली व त्यावर ग्रंथरचना केली.

वैदिक काळातील जीवनपद्धती व वाङ्मय यांच्या आधारे त्या काळातील शिक्षणाची उद्दिष्टे अशी होती –

१) चारित्र्यसंपन्न नागरिक निर्माण करणे.

२) सामाजिक कर्तव्याची ओळख करून देणे.

३) व्यक्तिमत्त्वाचा सर्वांगीण विकास घडविणे.

४) मोक्ष संपादन करणे.

५) धार्मिक वृत्ती निर्माण करणे.

६) संस्कृतिरक्षण व संस्कृतिसंवर्धन करणे.

वैदिक शिक्षणपद्धतीत गुरुकुल परंपरेस महत्त्वाचे स्थान होते. विद्यार्थ्यांना गुरुगृही शिक्षण घ्यावे लागत असे. गुरू अरण्यात वसलेल्या आश्रमात राहात असत. उपनयन संस्कारानंतर विद्यार्थ्यांना गुरुगृही पाठवले जाई. गुरुकुलामध्ये ब्रह्मचर्य पाळून विविध विषयांचे शिक्षण घ्यावे लागत असे.

वैदिक काळातील शिक्षणाचे स्वरूप काही शतकांनंतर हळूहळू बदलत गेले. एकंदर जीवनपद्धती व तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमी जरी कायम राहिली तरी त्यातील अभ्यासविषय व शिक्षणाच्या स्वरूपात जो बदल झाला त्यानुसार वैदिक काळातील शिक्षणाचे तीन कालखंड मानण्यात येतात.

१) वैदिक काळ २) उत्तर वैदिक काळ व ३) ब्राह्मण काळ. या तीनही कालखंडांत विषयांची व्याप्ती जरी वाढत गेली असली तरी प्रामुख्याने वेदवाङ्मयाच्या अभ्यासावर अधिक भर होता. त्यामुळे हा सर्वच कालखंड वैदिक शिक्षणाचा काळ म्हणून ओळखला जातो.

वैदिक शिक्षणपद्धतीत पाठांतर, चिंतन व मनन या पद्धतींना महत्त्वाचे स्थान आहे. पाठांतर शुद्ध असावे यावर विशेष भर दिला जाई. मंत्राच्या उच्चाराचे पावित्र्य राखण्याचा कसोशीने प्रयत्न केला जात असे. व्यावहारिक ज्ञान देण्याकरिता व्याकरणाचे शिक्षण दिले जाई.

समाजधारणेस आवश्यक असलेल्या मूल्यांचे व व्यवसायांचे शिक्षण याकरिता किमान वेदविद्येची मर्यादा घालून तीन वर्णांना अनुषंगिक शास्त्रांचा खास अभ्यास करावा लागत असे. ब्राह्मणांना वेद व तदनुषंगिक शास्त्रांचा खास अभ्यास करावा लागे.

क्षत्रियांना शासकीय कारभाराचा अभ्यास करावा लागे. त्यात धनुर्विद्या, युद्धकौशल्य याबरोबरच दंडनीती व राज्यकारभारांच्या विषयांचाही समावेश असे. वैश्यांना व्यापार व कृषी या विषयांच्या बरोबर व्यवसायासाठी उपयुक्त ज्ञान दिले जात असे.

गुरू ज्ञानी ,चारित्र्यसंपन्न, ज्ञानोपासक व विद्यार्थीहितास्तव कार्यरत असावा अशी अपेक्षा केली जात असे. गुरूकुले राजकीय नियंत्रणापासून मुक्त असत. त्यामुळे गुरूच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव विद्यार्थ्यांवर आपोआपच पडत असे.

या शिक्षणपद्धतीतून प्राचीन भारतीय समाज सुसंस्कृत झाला. त्यामुळे ही संस्कृती सतत होणाऱ्या बाह्य आक्रमणापासून टिकून राहू शकली हे या शिक्षणपद्धतीचे महत्त्वाचे योगदान मानले जाते.

बौद्ध कालात शिक्षणाची ध्येये व उद्दिष्टे, बौद्ध धर्माचे तत्त्वज्ञान व शिक्षण यावर आधारित होती. जीवन दु:खमय असून तृष्णा हे सर्व दु:खांचे मूळ आहे. तृष्णेचा क्षय करण्यासाठी आर्य अष्टांगिक मार्गांचा अवलंब करून काया, वाचा व मने संयमित जीवन जगण्याचा प्रयत्न केला पाहिजे. या बुद्धाने सांगितलेल्या चार आर्य सत्यांचा फार मोठा प्रभाव बौद्धकालीन समाजमनावर पडला होता. त्यानुसार या कालावधीत शिक्षणाची उद्दिष्टे खालीलप्रमाणे असलेली दिसून येतात :

१) चारित्र्य व नैतिकतेचा विकास करणे.
२) चिंतन व मनन प्रक्रियांना वेग देणे.
३) बौद्ध धर्मीय सिद्धांतांचा प्रचार करणे.
४) निर्वाण स्थिती प्राप्त करण्यास मदत करणे.

ही उद्दिष्टे साध्य व्हावीत, यासाठी शिक्षणाचे दोन स्तर करण्यात आले होते. प्राथमिक शिक्षण वयाच्या ६ व्या वर्षी सुरू होई. वर्णमाला व त्यानंतर शब्दविद्या, चिकित्साविद्या, हेतुविद्या, आत्मविद्या यांच्याबरोबर हिशोब ठेवणे, भूमिती, जमाखर्च व व्यावहारिक विषय शिकवले जात. प्राथमिक स्तरावर शिक्षणात वाचन, लेखन व जुजबी हिशोब करणे यांचे ज्ञान दिले जात असे.

उच्चशिक्षणाच्या अभ्यासक्रमात हस्तकला, धनुर्विद्या, शल्यचिकित्सा, ज्योतिष, वैद्यक या विषयांबरोबरच कायदा आणि युद्धकला या विषयांना महत्त्वाचे स्थान होते. वेदकालीन अभ्यासक्रमातील वेदांचे अध्ययन, पुराणे, काव्य, ज्योतिष, सांख्ययोग, न्याय, वैद्यक या विषयांचाही अभ्यासक्रमात समावेश होता. बौद्ध कालात नालंदा, तक्षशिला आदी नावाजलेली विद्यापीठे होती. वैदिक काळातील गुरुशिष्य परंपरा या कालावधीतही चालूच राहिलेली दिसून येते. गुरू शिष्यांची दिनचर्या निश्चित करत. त्यांच्या शारीरिक, मानसिक व आध्यात्मिक विकासासाठी झटत.

शिष्याला ज्ञानग्रहणासाठी उद्युक्त करत असत. त्यांच्या शंकांचे समाधान करणे हे गुरूचे प्रमुख कर्तव्य मानले जात होते.

मुहम्मद पैगंबरांचा जन्म इ.स. ५७० मध्ये मक्का येथे झाला. त्यावेळेच्या परिस्थितीचा अभ्यास करून त्यांनी मूर्तिपूजेस विरोध करण्यास सुरुवात केली. त्यांच्या धर्मास इस्लाम व अनुयायांना मुस्लीम अगर मुसलमान म्हणून ओळखले जाते. या धर्माचा प्रसार अल्पकाळात झपाट्याने झाला. इ. ७११ पर्यंत हा धर्म चीनपर्यंत पसरला.

इ.स. ७१२ मध्ये मुहम्मद कासीम याने भारतावर आक्रमण करून सिंध प्रांतावर आपले राज्य प्रस्थापित केले. त्यानंतर ८११ मध्ये मुहम्मद घोरीने भारतावर हल्ला केला. यानंतर भारतावर अनेक आक्रमणे होऊन मुस्लीम राज्यकर्त्यांनी भारताच्या बहुतांश भागावर १८५७ पर्यंत राज्य केले. इस्लाम धर्मात अल्ला हाच परमेश्‍वर मानला जातो. अल्लावाचून दुसरा कोणी पूजनीय नाही व मुहम्मद पैगंबर हे त्याचे दूत आहेत अशी इस्लामधर्मीयांची धारणा आहे. कुराण हा मुसलमानांचा धर्मग्रंथ आहे. कुराणाची भाषा अरबी आहे. ही भाषा मधुर व लालित्यपूर्ण आहे. गद्य असूनही अनुप्रासामुळे ती काव्यमय बनली आहे.

भारतावरील मुस्लीम वर्चस्वाचा प्रभाव राजकीय व सांस्कृतिक जीवनावरसुद्धा झाला आहे. या काळात राज्यकर्त्यांनी सर्वसामान्य जनतेच्या शिक्षणाकडे फारसे लक्ष पुरवले नाही. प्रजेला आपल्या धर्माची दीक्षा देणे यातच बहुतांश राज्यकर्त्यांनी धन्यता मानली. यास्तव धार्मिक शिक्षण देणे हे या काळातील शिक्षणाचे प्रमुख उद्दिष्ट होते. कारण त्यामुळे भारतातील लोकांना इस्लाम धर्मात आणणे शक्य होईल, असे राज्यकर्त्यांना वाटत होते. इस्लामच्या अनुयायांनी शिक्षण घेतले पाहिजे. कारण शिक्षणामुळेच ते अल्लाला मानू लागतील अशी त्यामागची प्रेरणा होती. या शिवाय नैतिकता बाणवणे, सत्ता स्थिर करणे ही उद्दिष्टे ही राज्यकर्त्यांच्या समोर होती.

इस्लामीक कालखंडात ७०० वर्षांपेक्षा अधिक काळ या पद्धतीने शिक्षण दिले जात होते. त्याचबरोबर परंपरेने चालत आलेली शिक्षण पद्धतीही अस्तित्वात होती. या कालखंडात मुस्लीम राज्यकर्त्यांनी मंदिराबरोबरच तक्षशिला व नालंदा आदी विद्यापीठांचाही विध्वंस केला. त्यामुळे बहुसंख्य समाजाला उच्च शिक्षणाची दारे बंद झाली.

उत्तरेकडे परंपरेने चालत आलेल्या तात्या पंतोजींच्या शाळा, गुरुकुले व ग्रामपंचायती या अस्तित्वात होत्या. त्यांच्या द्वारे शिक्षण देण्याचे कार्य चालूच होते. दक्षिणेकडेही याच पद्धतीने हे कार्य थोड्याफार फरकाने चालल्याचे दिसून येते. शिवकालीन शिक्षणपद्धतीही याच पार्श्‍वभूमीवर आधारित होती. शिक्षणात लष्करी शिक्षण, व्यावहारिक व धार्मिक शिक्षण असे तीन विभाग होते. लष्करी शिक्षणाच्या शाळा नव्हत्या व त्यासंबंधी ज्ञान देणारी पुस्तकेही उपलब्ध नव्हती. गावोगाव तालमी होत्या. तेथे जोर, जोडी, मल्लखांब, लेझीम, सूर्यनमस्कार, कुस्ती या व्यायाम प्रकारांचे शिक्षण प्राप्त होत असे.

लष्करी शिक्षणाची गरज त्या खालोखाल होतीच. लढाईतील पराक्रम व प्रावीण्य उपजीविकेसाठी आवश्यक मानले जाई. दांडपट्टा, बंदूक, भालाफेक, धनुष्य बाण, तलवार चालविण्याची कला नियुक्त शिक्षकांचे द्वारा हस्तगत केली जात असे. सरदार लोक १०/१२ वर्षांच्या आपल्या मुलांना रणांगणावर नेत असत. तेथे त्यांना युद्धकलेचे ज्ञान प्राप्त व्हावे हा त्यामागील प्रमुख उद्देश असे. योद्धे तयार करण्याची रणांगण हीच शाळा मानली जात असे.

सरदारांना युद्धकलेबरोबरच लिहिण्यावाचण्याचे शिक्षण आवश्यक मानले जात असे. पांढरपेशी सरदार आपण बहुश्रुत व्हावे यासाठी धर्म व इतर ग्रंथांचा अभ्यास करून बहुश्रुत बनत. त्यांना व श्रीमंत लोकांच्या मुलांना शिकवण्यासाठी गुरुजी घरी येऊन शिक्षण देत. सर्वसामान्यांच्यासाठी तात्या पंतोजींच्या शाळा गावोगावी कार्यरत होत्या. पेशव्यांच्या काळात सर्व पुरुषवर्गास मल्लविद्या व युद्धकलेचे शिक्षण प्राप्त व्हावे यासाठी खास व्यवस्था करण्यात आली होती.

दक्षिणेत राष्ट्रकूटांच्या कालावधीत संस्कृत शिक्षणात, व्याकरण, ज्योतिष, साहित्य, मीमांसा, धर्मशास्त्र, पुराणे, न्याय हे विषय असत. तीन वर्णांनी वेदाभ्यास करावा अशी अपेक्षा असे. हे शिक्षण मंदिराशी संबंधित मठ, गुरुकुले व खाजगीरीत्या चालवलेल्या पाठशाळा याद्वारा प्राप्त होत असे. ही परंपरा राष्ट्रकुटानंतर कल्याणीचे चालुक्य व देवगिरीचे यादव यांच्या काळात सुरू होती. यादवांचे राज्य नष्ट झाले. तरीही बहामनी राज्यात प्रारंभी मराठी व नंतर मराठी व फारशी भाषेतून राज्यकारभार चालू होता. त्यामुळे कर्नाटकात मराठी भाषेचा वापर १४ व्या शतकानंतर बराच काळ चालू असल्याचे दिसून येते.

भारतासारख्या खंडप्राय राष्ट्रावर राज्य करण्यासाठी सर्वसामान्य जनतेचे सहकार्य प्राप्त होणे आवश्यक आहे, अशी धारणा अकबराची होती. यास्तव त्याने शिक्षणात उदारीकरणाचे धोरण स्वीकारले व अन्यधर्मीय शिक्षित लोकांना आपल्या दरबारात व प्रशासनात महत्त्वाची पदे देण्यास प्रारंभ केला. परंतु अकबराचे उदारीकरणाचे धोरण अल्पजीवी ठरले. कारण नंतरच्या राज्यकर्त्यांनी त्याचा पाठपुरावा केला नाही.

इस्लामी शिक्षणात मकतब व मदरसा या दोन संस्थांना महत्त्वाचे स्थान होते.

मकतब – प्राथमिक स्तरावरील शिक्षणासाठी विद्यार्थी मकतबमध्ये प्रवेश घेत. या शाळांतून सामान्यपणे लेखन, वाचन व गणित याबरोबरच कुराणातील आयत शिकवले जात. या शाळांना स्थानिक लोक, सरदार, नबाब व राज्यकर्ते यांच्याकडून साहाय्य प्राप्त होत असे.

मदरसा – या उच्च शिक्षणाच्या शाळा होत. मकतबचे शिक्षण पूर्ण केलेल्या मुलांना मदरसामध्ये प्रवेश दिला जाई. या संस्थांचा कारभार सधन लोकांच्या हातात असे. काही मदरशांना वसतिगृहे जोडलेली असत. मदरशांमध्ये धार्मिक शिक्षणाबरोबरच विद्यार्थ्यांना ऐहिक शिक्षणही दिले जात असे. या शिक्षणात अरबी भाषा, वाङ्मय, व्याकरण, वक्तृत्व, तर्कशास्त्र व विज्ञान इ. विषयांचा समावेश असे. इस्लामी राजवटीत दिल्ली, आग्रा, जौनपूर, बिदर ही शिक्षणाची प्रमुख केंद्रे होती.

मोगल साम्राज्याचा अखेरचा काळ व ब्रिटिश सत्तेचा प्रारंभ या संधिकाळात प्राचीन कालापासून चालत आलेल्या ग्रामपंचायत आणि गुरुकुल या दोन प्रभावी संस्था कार्यरत होत्या. धंद्याचे शिक्षण वंशपरंपरेने प्राप्त होत असे. ब्रिटिशांचा कारभार सुरू होण्यापूर्वीपासून गावोगाव असणाऱ्या स्थानिक शाळा कडक शिस्तीबद्दल प्रसिद्ध होत्या. अभ्यासक्रम रेखीव नव्हता. शिक्षकांच्या मर्जीनुसार अध्यापनपद्धती होती, शिक्षकांच्या सर्व गरजा गाव भागवत असल्याने ते विद्यार्थ्यांना मोफत शिकवत असत. या शाळांतून वैदिक व शारीरिक शिक्षण दिले जात असे.

या शाळांना ब्रिटिश सरकारने पुरेसा पाठिंबा न दिल्याने १९०० पर्यंत या शाळा बंद पडल्या. प्राथमिक शाळेत ५ वर्षे पूर्ण झालेल्या विद्यार्थ्यांस प्रवेश दिला जाई. या शाळांतून कामापुरते गणित, मनुस्मृती, पुराणांचे वाचन, कवितांचे पाठांतर आदी बाबींकडे लक्ष पुरवले जात असे. श्रीमंतांची मुले या शाळांतून शिक्षण घेत नसत. त्यांच्यासाठी घरीच शिक्षणाची व्यवस्था केली जात असे. तात्या पंतोजींच्या शाळाबरोबरच मुस्लीम विद्यार्थ्यांसाठी मकतब या प्राथमिक शिक्षण देणाऱ्या शाळा अस्तित्वात होत्या. तेथेही कुराणाच्या शिक्षणाबरोबरच वरीलप्रमाणे शिक्षण दिले जात असे. या पार्श्वभूमीवर ब्रिटिशांचे भारतात आगमन झाल्यानंतर शिक्षणक्षेत्रात झालेल्या बदलांचा मागोवा घेणे उचित ठरेल.

ब्रिटिशपूर्व काळात अस्तित्वात असलेली शिक्षण पद्धती व शिक्षण व्यवस्था ब्रिटिशांचे राज्य भारतात स्थिरावू लागल्यानंतर हळूहळू मागे पडू लागली. शिक्षणाचे माध्यम इंग्रजी भाषा असावी हा मेकॉलेचा आग्रह मान्य झाल्यानंतर इंग्रजी माध्यमातून मूठभर लोकांना शिक्षण दिले जावे, हा दृष्टिकोन स्वीकारला गेला. वरच्या वर्गातील लोकांना शिक्षण

दिले की, ते खालच्या स्तरातील लोकांना शिक्षित करतील हा पाझर सिद्धान्त (डाऊनवर्ड फिल्ट्रेशन थिअरी) शिक्षण प्रसारासाठी स्वीकारला गेला.

१८५४ साली ईस्ट इंडिया कंपनीने भारतातील शिक्षणाचा विचार करण्यासाठी नेमलेल्या समितीने सादर केलेला अहवाल कंपनीच्या डायरेक्टर बोर्डाने मान्य करून तो वूड्स डिसपॅच (चार्टर) या नावाने प्रसिद्ध केला. या अहवालाने भारतीयांना कोणत्या पद्धतीने शिक्षण द्यावयाचे हे निश्चित करण्यात आले. तसेच भारतातील शिक्षणाची जबाबदारी ब्रिटिश सरकारची आहे हे मान्य करण्यात आले आहे.

ब्रिटिश सरकारचे हितसंबंध इंग्रजी माध्यमातून दिल्या जाणाऱ्या शिक्षणाद्वारे जपले जातील; कारण इंग्रजी शिक्षण घेणारे लोक नोकरीत प्रवेश करून सरकारशी एकनिष्ठ राहण्याची पराकाष्ठा करतील या गृहीतकाचा या खलित्यात पुरस्कार करण्यात आला होता. यामुळे हा खलिता भारतीय शिक्षणाची सनद म्हणून ओळखला जातो.

१८५७ च्या स्वातंत्र्य समरानंतर कंपनी सरकारचे अस्तित्व संपून ब्रिटिशांचे राज्य खऱ्या अर्थाने अस्तित्वात आले. त्यानंतर शिक्षणाचा विचार करीत असताना, ब्रिटनमधील शिक्षण व्यवस्थेप्रमाणे भारतात शिक्षण दिले जावे या धोरणानुसार कार्यवाही सुरू झाली. ब्रिटिश पार्लमेंटने १८८० मध्ये इलेमेंटरी एज्युकेशन ॲक्ट संमत केला. त्यानुसार इंग्लंडमध्ये प्राथमिक शिक्षण सक्तीचे करण्यात आले. भारतातही याचप्रमाणे शिक्षण दिले जावे, यासाठी हंटर आयोगाची स्थापना करण्यात आली. हंटर आयोगाने प्राथमिक शिक्षणाबरोबर माध्यमिक शिक्षणाचा विचार करून आपल्या शिफारशी सरकारला सादर केल्या. त्यातील प्रमुख शिफारशी खालीलप्रमाणे आहेत :

१) हंटर आयोगाने प्राथमिक शिक्षणाचा उद्देश सार्वजनिक शिक्षणाचा प्रसार करणे हा असावा. तसेच हे शिक्षण सर्वसामान्य लोकांना उपयोगी पडेल असे असावे, हे प्रतिपादन प्रामुख्याने केले आहे. प्राथमिक शिक्षण हे दर्जेदार व्हावे यासाठी शिक्षकांच्या प्रशिक्षणावर आयोगाने भर दिलेला आहे.

२) माध्यमिक शिक्षण प्रामुख्याने कार्यक्षमतेने कार्य करणाऱ्या भारतीय यंत्रणेकडे सोपवावे व त्यासाठी अनुदान दिले जावे अशी आयोगाची शिफारस आहे.

३) गरजेनुसार महाविद्यालयांची स्थापना करून त्यांनाही अनुदान देण्यात यावे.

हंटर आयोगानंतर १९०१ साली लॉर्ड कर्झनने सिमला येथे परिषद बोलावून सर्व स्तरावरील शिक्षणाचा विचार केला. शिक्षण परिषदेने शिक्षणाची उद्दिष्टे निश्चित केली. ती खालीलप्रमाणे आहेत :

१) सरकारने शिक्षणक्षेत्रावर संपूर्ण नियंत्रण ठेवावे.

२) सरकारने स्वत: शिक्षण संस्थांची स्थापना करून त्या खाजगी शिक्षण संस्थांना मार्गदर्शक ठरतील अशा पद्धतीने चालवाव्यात या बाबींवरही परिषदेने भर दिला आहे.

३) शिक्षणावर अधिक प्रमाणात पैसा खर्च करावा अशी शिफारसही सदर परिषदेने केलेली आहे.

१९०२ साली कर्झनने सिमला परिषदेने ठरवलेल्या धोरणांचा पाठपुरावा करण्यासाठी विद्यापीठ आयोगाची स्थापना केली. या आयोगाने केवळ प्रचलित असलेल्या पद्धतींचा पुर्नविचार केला. ज्ञानाची कक्षा वाढविण्यासाठी प्रोत्साहन देणे व विद्यार्थ्यांच्या चारित्र्याची जडणघडण करणे यासाठी आवश्यक उपाययोजना करावी, अशी शिफारस केली. परंतु कर्झनच्या राजकीय धोरणामुळे निर्माण झालेला लोकक्षोभ यामुळे कमी झाला नाही.

लोकक्षोभ कमी होत नाही हे ज्ञात झाल्यानंतरही कर्झनने ११ मार्च १९०४ रोजी राज्यासमोर एक शैक्षणिक कायदा मांडला व तो मंजूर करून घेतला. हा १९०४ चा कायदा भारतीय विद्यापीठ कायदा म्हणून ओळखला जातो. या कायद्याने विद्यापीठांना शिक्षकांची नेमणूक करणे, संशोधनास प्रोत्साहन देणे, ग्रंथालय व प्रयोगशाळा सुसज्ज बनवणे आदींबाबत शिफारशी केल्या आहेत.

कर्झनने शिक्षणविषयक सुधारणा करण्याचा प्रयत्न केला. तरीही त्याच्या राजकीय धोरणामुळे निर्माण झालेला लोकक्षोभ कमी न होता वाढू लागला. त्याचा परिणाम विद्यार्थ्यांना राष्ट्रीय विचारांचे शिक्षण दिले गेले पाहिजे हा विचार सर्वत्र प्रसृत होण्यात झाला. त्याची पार्श्वभूमी समजावून घेणे आवश्यक आहे.

लॉर्ड मेकॉलेच्या प्रयत्नाने पहिल्या तीन इयत्तामध्ये इंग्रजी भाषेचे व वरच्या इयत्तामध्ये इंग्रजी माध्यमांतून शिक्षण मिळू लागले. त्यामुळे इंग्रजी भाषेतून शिक्षण घेणारी नवी पिढी तयार होऊ लागली. हा वर्ग पाश्चात्त्य संस्कृतिकडे आकर्षित होऊ लागला. त्यांचे अंधानुकरण करू लागला. सरकारी नोकरी, डॉक्टर, वकील व खाजगी क्षेत्रात उच्चपदे स्वीकारून ऐषारामी जीवन जगू लागला. It created a class of people Indian in blood and colour but British in thought and action.

या लोकांना भारतीय संस्कृती, चालीरीती सर्वसामान्यांची दु:खे, याबद्दल कसलेही सोयरसुतक नव्हते. त्यांचे हे वर्तन इंग्रजी शिक्षणाचे अपत्य आहे, अशी भावना सर्वसामान्य लोकांच्या मनात बळावू लागली. त्यामुळे इंग्रजी शिक्षण व राज्य याबद्दल जनतेच्या मनात असंतोषाची भावना निर्माण झाली.

त्यामुळे इंग्रजी शिक्षण घेतलेल्या काही विचारवंतांच्या मनात या परिस्थितीतून मार्ग काढणे आवश्यक आहे असे विचार दृढमूल झाले व त्यांनी त्या दिशेने पावले टाकण्यास प्रारंभ केला. बंगालमधील राजा राममोहन रॉय यांनी ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या सहकार्याने सर्व स्तरावर शिक्षणाचा प्रसार व्हावा व ते मातृभाषेतून दिले जावे यासाठी चळवळ सुरू केली. १८८२ साली हंटर कमिशनपुढे साक्ष देताना महात्मा फुले व अनेक भारतीय विचारवंतांनी प्रचलित पद्धतीतील दोष दाखवून पाझर सिद्धान्ताचा त्याग करून शिक्षण सर्व स्तरांवर पोहोचवण्याचा प्रयत्न होणे आवश्यक आहे असे प्रतिपादन केले. त्यामुळे सरकारतर्फे दिल्या जाणाऱ्या शिक्षणाची चिकित्सा होऊ लागली. स्थानिक लोकांनी शिक्षण संस्था काढून शिक्षणप्रसारासाठी खाजगी प्रयत्न सुरू केले.

स्थानिक लोकांनी सुरू केलेल्या शाळातून व महाविद्यालयातून दिले जाणारे शिक्षण हे शासन व विद्यापीठ यांनी ठरवलेल्या अभ्यासक्रमाच्या स्वरूपानुसार दिले जात असे. त्याचबरोबर लोकभावनेस योग्य ते वळण देणारे शिक्षणही या शाळातून दिले जाई. या संस्थांचे व्यवस्थापन मंडळ व प्रत्यक्ष शिकवणारे शिक्षक हे सरकारी अनुदानाचा स्वीकार करीत, पण त्याचबरोबर त्यागी भावनेने कार्य करीत असत. राष्ट्रीयवृत्तीला पोषक ठरणारे वातावरण निर्मिण्याचा प्रयत्नही त्यापैकी काही जण करीत असत. राष्ट्रीय शिक्षणाचा प्रसार करताना तो खालील तत्त्वांना अनुसरून केला जावा, असे या चळवळीतील विचारवंतांचे मत होते.

१) संस्थांचे व्यवस्थापन स्थानिक लोकांच्या हातात असावे. त्यामुळे शिक्षण विषयक धोरण ठरविताना स्थानिक गरजा व राष्ट्रीय विचारानुसार शिक्षणाची रचना करणे शक्य होईल.

२) शिक्षणाद्वारे स्वदेशाभिमानाची जोपासना व्हावी यासाठी वाङ्मय, इतिहास, शास्त्र, कला, राजनीती, युद्धकला, व्यापार उदम याबद्दल शिक्षण देऊन आत्मीयतेची भावना निर्माण व्हावी, यासाठी प्रयत्न करणे आवश्यक आहे.

३) शिक्षणाने विवेकबुद्धीचा विकास व्हावा यासाठी नीर-क्षीर विवेकाने पाश्चात्त्यांचे जे चांगले आहे त्याचा स्वीकार करून भारतीयांना हितकारक ठरणारे शिक्षण दिले जावे.

४) मातृभाषा हे शिक्षणाचे माध्यम असावे, कारण मातृभाषेतच नीटपणे विचार करणे व त्याची योग्य पद्धतीने मांडणी करणे सुलभ असते. भाषा हे संस्कृती दर्शनाचे महत्त्वाचे साधन असल्याने शिक्षणाचे माध्यम भारतीय भाषा ठेवल्यास त्यातून संस्कृतीची ओळख करून देणे सहज शक्य होते. यास्तव सर्वसामान्य लोकांचे शिक्षण व्हावे यासाठी मातृभाषेतूनच शिक्षण दिले जावे.

५) पुस्तकी शिक्षणावर भर व इंग्रजांचे साम्राज्यशाही धोरण यामुळे बेरोजगारी वाढू लागली होती. त्यातून व्यवसाय शिक्षण देण्याची गरज निर्माण झाली. शिक्षण हे सर्वांगीण असावे. व्यवसाय शिक्षणाचा अंतर्भाव शिक्षणात केल्यास मुलांना श्रमाची सवय लागेल व ती स्वावलंबी बनतील यासाठी शिक्षणात व्यवसाय शिक्षणाचा समावेश करण्यात आला.

राष्ट्रीय शिक्षणात कोणत्या विषयांचा अंतर्भाव करावयाचा हे निश्चित झाल्यानंतर राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीला जोर चढला. लॉर्ड कर्झनचे धोरण त्याला कारणीभूत ठरले. बंगालच्या फाळणीमुळे लोकक्षोभ वाढत गेला. स्वदेशीच्या चळवळीमुळे परदेशी मालावरील बहिष्काराची चळवळ सर्वत्र फोफावली. विशेषत: पंजाब, महाराष्ट्र व बंगाल या तीन प्रांतांत राजकीय असंतोषाने तीव्र स्वरूप धारण केले. बंगालमध्ये त्या काळात चालू असलेल्या शिक्षणपद्धतीला विरोध वाढू लागला. त्यामुळे रवींद्रनाथ टागोर यांनी १९०१ च्या डिसेंबरमध्ये शांतिनिकेतनची स्थापना केली.

स्वामी दयानंद यांचे शिष्य लाला लजपतराय व लाला मुन्शीराम यांनी नव्या पिढीला संस्कृती व धर्म यांची माहिती प्राप्त व्हावी, तरुण पिढी आरोग्यसंपन्न व राष्ट्रप्रेमी बनावी यासाठी पंजाबमध्ये दयानंद अँग्लोवेदिक कॉलेजची स्थापना १८८६ साली केली, तसेच १९०२ साली कांगडी येथे गुरुकुलाची स्थापना केली.

१९०६ मध्ये कोलकाता येथे दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात बंगालची फाळणी रद्द करावी, याबरोबरच स्वदेशी वस्तूंचा वापर करावा व शिक्षणाची पुनर्रचना करावी, असे मान्य करण्यात आले. तसेच राष्ट्रीय शिक्षणाच्या संदर्भात खालीलप्रमाणे ठराव पास करण्यात आला. ''सर्व देशांत निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे मुलामुलींच्या शिक्षणाचा विचार करणे क्रमप्राप्त बनले आहे. देशात शास्त्रीय वाङ्मयीन तांत्रिक व विकासासाठी योग्य असे राष्ट्रीय विचाराचे स्थानिक व्यवस्थापनाखालील, राष्ट्रीय उद्दिष्टे साध्य करण्यासाठी शिक्षण देणे आवश्यक बनले आहे.''

या ठरावांमुळे बंगाली लोकांनी राष्ट्रीय शिक्षण देणारी नॅशनल एज्युकेशन कौन्सिल नावाची मध्यवर्ती संस्था स्थापून प्राथमिक शिक्षणापासून ते विद्यापीठ शिक्षणापर्यंत राष्ट्रीय शिक्षणाची आखणी केली. कोलकाता कॉलेजची स्थापना व टेक्निकल इन्स्टिट्यूट काढण्यात आली. बंगालमध्ये शिक्षण देणाऱ्या शाळांची एक साखळीच तयार झाली. महाराष्ट्रातही याचप्रमाणे राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या काही संस्था काढण्यात आल्या. १८८६ मध्ये डॉ. ॲनी बेझंट यांनी भारतीयांना दिल्या जाणाऱ्या शिक्षणात सुधारणा घडाव्यात यासाठी प्रयत्न केले. त्यांनी बनारस व अड्यार येथे संस्था स्थापून त्या चालविल्या. या संस्थांत मातृभाषेतून शिक्षण दिले जात असे. स्त्री शिक्षणाचा पुरस्कारही या संस्थांतून केला गेला. धर्म व नीती यांचे शिक्षण दिल्याशिवाय भावी पिढी तेजस्वी होणार नाही असे त्या म्हणत. त्यासाठी त्यांनी कार्यक्रमही राबवले. इंग्रजी शिक्षण पद्धतीतील १) भारतीय संस्कृतीला स्थान नाही, २) आत्म्याच्या विकासाकडे लक्ष नाही, ३) इंग्रजी भाषेचा माध्यम म्हणून वापर केला जातो हे दोष त्यांनी लोकांच्या निदर्शनास आणले. त्याचाही परिणाम जनजागृती होण्यासाठी झाला.

१९२० मध्ये गांधीजींनी असहकार चळवळ सुरू केली. तिलाही विद्यार्थीवर्गाचा पाठिंबा मिळाला. अलिगड येथील मौलाना मुहम्मद अली यांनी जामिया मिलिया इस्लामिया या नावाने विद्यापीठ स्थापन केले. इतर ठिकाणीही याचे अनुकरण होऊन गुजरात विद्यापीठ, बिहार विद्यापीठ, काशी विद्यापीठ, बंगाल राष्ट्रीय विद्यापीठ, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ यांची स्थापना झाली. सर्वत्र राष्ट्रीय महाविद्यालये व शाळा निघू लागल्या.

राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीमुळे सरकारी धोरणातील दोष सरकारच्या लक्षात आले. स्थानिक संस्था चांगले कार्य करू शकतात हे सिद्ध झाले, मातृभाषेतून शिक्षण मिळण्याची सोय झाली. औद्योगिक शिक्षण आवश्यक मानले

जाऊ लागले व राष्ट्रासाठी त्याग करण्याची वृत्ती निर्माण झाली. या चळवळीमधून उदयास आलेली राष्ट्रीय भावना स्वातंत्र्यलढ्यात उपयोगी ठरली.

राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार ज्यांनी केला त्यांच्या या क्षेत्रातील कामगिरीचे अवलोकन करणे हे या चळवळीचा विकास कसा होत गेला यासाठी उपकारक ठरणारे असल्याने त्याची माहिती आवश्यक आहे.

१) स्वातंत्र्यलढ्यातील ज्येष्ठ नेते लाला लजपतराय यांनी The Problem of National Education या आपल्या ग्रंथात राष्ट्रीय शिक्षणाबद्दल विचार मांडले आहेत. ते म्हणतात, ''पुढची पिढी मागील पिढीपेक्षा अधिक प्रगतिशील असली पाहिजे.'' ज्या शिक्षणामुळे विद्यार्थी कृतिशील व विचार करणारे असतील, उक्ती व कृती यांचा समन्वय साधून आपल्या व्यक्तिमत्त्वाचा विकास साधतील व जीवनात यशस्वी ठरतील असे शिक्षण त्यांना देणे आवश्यक आहे. शिक्षण स्वकीयांच्या हाती असावे, स्वतंत्र अस्तित्वाबरोबरच शिक्षणाद्वारे परकीय भाषा व ज्ञान भांडार यांचा परिचय करून घेतला पाहिजे, तसेच व्यावसायिक शिक्षण देण्याची गरजही त्यांनी प्रतिपादित केली आहे.

२) पंडित मदनमोहन मालवीय यांनी बनारस हिंदू विद्यापीठाची स्थापना करण्यात महत्त्वाची भूमिका पार पाडली. त्यासाठी त्यांनी संस्थानिक, धनिक व सर्वसामान्यांकडून देणग्या गोळा करून आर्थिक बाजू सक्षम करण्याची पराकाष्ठा केली. हे विद्यापीठ स्थापन करण्यामागे हिंदू धर्मशास्त्र व वाङ्मय यांची आवड निर्माण व्हावी, त्याचे रक्षण व्हावे हा प्रमुख उद्देश होता. तसेच तंत्रज्ञानाचा प्रसार झाला की देशाची आर्थिक स्थिती आपोआपच सुधारेल हे गृहीतक त्यांनी मांडले होते. त्यामुळे देश संपन्न होईल व राहणीमान सुधारेल, अशी अपेक्षा त्यांनी केली होती.

विद्यापीठात पौर्वात्य भाषा, आयुर्वेद, संगीत, इंडालॉजी व इतर विषयांच्या संशोधनाची सोय करण्यात आली होती. शिक्षणाचे माध्यम मातृभाषाच असावे असे त्यांचे मत होते. आयुर्वेद शिक्षणावर त्यांचा भर होता. आयुर्वेदाबरोबर शस्त्रक्रियांचे शिक्षण दिले गेल्यास चांगले डॉक्टर निर्माण होतील व ते ग्रामीण भागात जाऊन योग्य प्रकारे वैद्यकीय सेवा देऊ शकतील असे त्यांना वाटत होते.

३) लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनीही राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार केला आहे. काही काळ ते शिक्षकही होते. त्यांना सर्वव्यापी शिक्षण अपेक्षित होते. राष्ट्राची शान व वैभव वाढविणारे शिक्षण राष्ट्रीय शिक्षण म्हणून ओळखले जावे, अशी त्यांची धारणा होती. शिक्षणाने देशाच्या अंतरंगाची ओळख व्हावी, राष्ट्रीय भावना जोपासली जाऊन देशहितासाठी तरुणांनी प्रयत्न करावेत यासाठी त्यांना शिक्षण दिले जावे असा त्यांचा आग्रह होता. यासाठी शिक्षकांना आवश्यक ते स्वातंत्र्य दिले जावे असे त्यांचे प्रतिपादन होते. स्वतंत्र वृत्तीने काम करणारे शिक्षकच विद्यार्थ्यांना योग्य प्रकारे शिक्षण देऊ शकतील, असा विश्वास ते प्रकट करीत असत.

विद्यार्थ्यांमध्ये शोधक वृत्तीची जोपासना करण्याचे कार्य शिक्षकांनी केल्यास संशोधन होऊन त्याचा उपयोग देशाच्या विकासासाठी होईल या मताचा पुरस्कार त्यांनी केला.

४) महात्मा गांधींनी शिक्षणाच्या संदर्भात मूलगामी चिंतन केले होते. त्यांच्या मूलोद्योगिक शिक्षण प्रक्रियेत शिक्षणाद्वारे मन, आत्मा व बुद्धी यांची उन्नती त्यांना अभिप्रेत होती. शिक्षणाला भारतीय संस्कृतीचे अधिष्ठान असावे व ते मातृभाषेतून दिले जावे, असे गांधीजींना वाटत असे. शिक्षण स्वायत्त असावे व ते हस्तव्यवसायांच्या माध्यमातून देण्यात यावे यासाठी त्यांनी वर्धा शिक्षण योजनेचा पुरस्कार केला. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण हे हस्तकला व्यवसायांच्या माध्यमातून द्यावे व ते सक्तीचे व मोफत दिले जावे यासाठी ते आग्रही होते.

शिक्षणात ज्ञान व कृती यांचा समन्वय व्हावा, ते राष्ट्राच्या गरजांशी निगडित असावे व त्याद्वारा शारीरिक, मानसिक व बौद्धिक विकास व्हावा, अशी गांधीजींची अपेक्षा होती.

५) स्वामी विवेकानंद यांनी १८९६ मध्ये रामकृष्ण मिशनची स्थापना केली. या आश्रमातील शिक्षणक्रमात राष्ट्राभिमानास अग्रक्रम देण्यात आला होता. आपल्या भाषणातून स्वामीजींनी राष्ट्रीय शिक्षणाच्या विचारास चालना दिलेली आहे.

विद्यार्थ्यांच्या संदर्भात त्यांचे विचार बोलके होते. शिक्षण घेणारे विद्यार्थी स्वदेशाभिमानी, आपल्या संस्कृतीचा अभिमान बाळगणारे व बलसंपन्न असले पाहिजेत, त्याशिवाय राष्ट्राचा उद्धार होणार नाही, शिक्षणाने माणूस घडला पाहिजे अशी त्यांची धारणा होती.

६) गुरूदेव रवींद्रनाथ टागोर यांनी १९०१ मध्ये शांतिनिकेतनची स्थापना करून शिक्षणाला नवी दिशा देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी अभ्यासक्रमात विविध कलांच्या शिक्षणाचा समावेश केला. तसेच औद्योगिक शिक्षण देण्यासाठी श्रीनिकेतनची स्थापना केली. कालांतराने शांतिनिकेतनचे ७ मे १९२२ रोजी विश्वभारती या आंतरराष्ट्रीय विद्यापीठामध्ये रूपांतर करण्यात आले. रवींद्रनाथ टागोरांचे शिक्षणविषयक खास तत्त्वज्ञान होते व ते त्यांना प्रत्यक्षात उतरवावयाचे होते. त्यांना शरीर, मन व आत्मा यांची उन्नती करणारे शिक्षण अभिप्रेत होते व ते त्यांनी आपल्या संस्थेतून देण्याचा प्रयत्न केला. विश्वभारतीच्या रूपाने रवींद्रनाथ टागोरांनी भारतीय संस्कृती व परंपरा जगाच्या कानाकोपऱ्यात पोहोचवून त्यांना मानाचे स्थान मिळवून दिले आहे.

वरील नेत्यांच्या विचारांची छाप राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीवर पडली असून त्यामुळे ही चळवळ पुढे विकसित झालेली आपणास दिसून येते. या कालावधीत राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या काही संस्था उदयास आल्या त्यांची माहिती घेणे हे या संदर्भात उपयुक्त ठरू शकेल.

१) गुरुकुल कांगडी – स्वामी श्रद्धानंद यांनी या गुरुकुलाची स्थापना प्रथम सहरानपूर येथे केली. कालांतराने हे गुरुकुल कांगडी (हरिद्वार) येथे हलविण्यात आले.

या गुरुकुलात विद्यार्थ्यांना वयाच्या ६ ते ८ वर्षांपर्यंत प्रवेश दिला जातो. त्याला १४ वर्षे अध्ययन करावे लागते. त्यानंतर त्याला बी. ए. ही पदवी दिली जाते. इतर अभ्यासक्रमाबरोबरच त्याला आयुर्वेदाचे शिक्षण दिले जाते. अध्यापन आणि अध्ययनाचे माध्यम हिंदी आहे. तेथील आयुर्वेदाच्या पदवीला संपूर्ण भारतभर मान्यता आहे.

२) जामिया मिलिया इस्लामिया या विद्यापीठाची स्थापना राष्ट्रीय आंदोलनातून १९२० मध्ये करण्यात आली आहे. मौलाना महमदअली यांनी विद्यापीठ स्थापनेसाठी अपार कष्ट केले आहेत. हे विद्यापीठ १९२५ मध्ये दिल्ली येथे हलवण्यात आले.

विद्यापीठाने शिक्षणाची खालील उद्दिष्टे निश्चित केलेली होती.

१) संस्कृतीची जोपासना करणे.

२) शील निर्मिती करणे.

३) स्वावलंबन व निर्भयता बाणवणे.

४) त्याग, सहिष्णुता या गुणांचा विकास करणे.

५) जबाबदार नेतृत्व विकसित करणे.

विद्यापीठात विद्यार्थ्यांच्या निवासाची सोय आहे. अरबी मदरशामधून शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांसाठी आधुनिक भाषा व सामाजिक शास्त्रे यांच्या शिक्षणाची सोय येथे केली जाते. विद्यापीठाचे ग्रंथालय सुसज्ज असून अद्ययावत प्रयोगशाळा विद्यार्थ्यांना उपलब्ध आहेत. विद्यापीठ संकुलात माध्यमिक शाळा असून तेथे कला व हस्तव्यवसाय यांचे शिक्षण दिले जाते. येथे प्रकल्प पद्धतीचा अवलंब केला जातो.

विद्यापीठात उर्दू वाङ्मयाच्या विकासाला साहाय्य व्हावे यासाठी उर्दू वाङ्मयाच्या अध्ययन अध्यापनास येथे महत्त्व दिले जाते.

३) टिळक महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना १९२१मध्ये पुणे येथे करण्यात आली. हे विद्यापीठ लोकमान्य टिळकांनी स्वातंत्र्यप्राप्तीसाठी केलेल्या प्रयत्नांचे स्मारक म्हणून ओळखले जाते. या विद्यापीठाची उद्दिष्टे खालीलप्रमाणे आहेत :

१) सरकारी अनुदानाशिवाय कार्य करणे.

२) राष्ट्रीय वृत्तीची जोपासना अभ्यासक्रमाद्वारे करणे.

३) उद्दिष्टपूर्तीसाठी आदर्श संस्था चालवणे व त्या विद्यापीठाशी संलग्न करणे.

४) स्वभाषा हे शिक्षणाचे माध्यम असावे.

५) औद्योगिक व शारीरिक शिक्षणाचा समावेश अभ्यासक्रमात करण्यात यावा.

६) ग्राम सफाईद्वारा ग्रामीण आरोग्य, सूतकाम, संस्कृतभाषा आणि विद्या यांना उत्तेजन देणे. साक्षरता वर्ग, मराठी पाठांतर परीक्षा, संगीत विशारद पदवी देणे यासारखे उपक्रम विद्यापीठाच्या द्वारे चालवले जातात.

४) डॉ. धोंडो केशव कर्वे यांनी स्त्री शिक्षणात सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न केला. त्यांनी मुलींना सामान्य शिक्षणाबरोबरच गृहोपयोगी शिक्षण दिले जावे यासाठी १९०७ साली मुलींसाठी हिंगणे येथे हायस्कूल सुरू केले. ते महिला विद्यालय या नावाने ओळखले जाते. तसेच ३ जून १९१६ रोजी स्त्रियांना उपयुक्त ठरणारे शिक्षण देण्यासाठी एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठाची स्थापना केली. या विद्यापीठात सामान्य शिक्षणाबरोबरच जीवनोपयोगी शिक्षण उपलब्ध व्हावे या दृष्टिकोनातून अभ्यासक्रमाची रचना करण्यात आली आहे.

शिक्षण प्रसाराच्या चळवळीत व्यक्ती व संस्था यांच्या महत्त्वपूर्ण कार्याचा आढावा घेतल्यानंतर सर्वसामान्य जनतेला शिक्षण प्राप्त व्हावे यासाठी झालेल्या प्रयत्नांचा आढावा घेणे उचित ठरेल.

लॉर्ड एल्फिन्स्टन यांनी भारतीय जनतेला प्रादेशिक भाषेतून शिक्षण दिले जावे यासाठी प्रयत्न करूनही शिक्षणाचे माध्यम इंग्रजी भाषाच असावी हे मान्य झाले. तरीही एल्फिन्स्टन यांनी स्थानिक लोकांना शिक्षण संस्था स्थापण्यास प्रोत्साहन दिले. त्यामुळे १८१८च्या दरम्यान बॉम्बे नेटिव्ह एज्यु. सोसायटीची स्थापना झाली. या संस्थेमार्फत अनेक शाळा सुरू करण्यात आल्या. या शाळांतून दिले जाणारे शिक्षण हे मिशनरी शाळातून दिल्या जाणाऱ्या शिक्षणापेक्षा भिन्न स्वरूपाचे होते. एल्फिन्स्टन यांनी स्थानिक शाळांतून धार्मिक शिक्षणाची सक्ती केली जाऊ नये या धोरणाचा पुरस्कार केल्याने लोकांना या शाळांबद्दल व तेथील शिक्षणाबद्दल आस्था वाटू लागली. त्यामुळे मुंबईच्या विकासासाठी प्रयत्न करणारे मुंबईचे शिल्पकार जगन्नाथ शंकरशेठ तथा नाना शंकरशेठ यांचे सक्रिय सहकार्य व मार्गदर्शन या संस्थांना लाभले. त्यामुळे या शाळांचा व शिक्षणाचा विकास झपाट्याने झाला.

१८२० नंतर मुंबईचा व्यापार वाढला. वाहतुकीच्या व्यवस्थेत खूपच सुधारणा झाली. त्यामुळे मुंबईच्या स्वरूपात आणि जीवनात महत्त्वाचे बदल झाले. बँका अस्तित्वात आल्या. व्यापार पूर्णपणे खुला झाला. १८२३ साली मुंबईत सुप्रीम कोर्ट स्थापन झाले. आधुनिक शिक्षण संस्थांची स्थापना याच कालावधीत झाली. प्रथम एल्फिन्स्टन कॉलेज स्थापन झाले. नंतर ग्रँट मेडिकलची स्थापना झाली. शिवाय या काळात अनेक शाळा निघाल्या. मुंबई परिसरात शिक्षण प्रसाराच्या कार्यात बाळशास्त्री जांभेकर यांचा वाटा बराच मोठा आहे. या काळात मुलींच्या शाळाही सुरू झाल्या. हे कार्य मुख्यत: अमेरिकन मिशनऱ्यांनी केले. १८४० साली बोर्ड ऑफ एज्युकेशनची स्थापना झाली. यातूनच पुढे सरकारचे शिक्षण खाते विकास पावले. मुंबईत शिक्षणाचा पुष्कळच प्रसार झाला आणि अनेक शिक्षण संस्था अस्तित्वात

आल्या. मुंबईत त्याकाळात (१९ व्या शतकाच्या पूर्वार्धात) ३० ते ३५ मराठी प्राथमिक शाळा होत्या. तितक्याच गुजराथी शाळादेखील होत्या. मूक बधिर विद्यार्थ्यांसाठी स्वतंत्र शाळा सुरू झाल्या व त्यांना सरकारी अनुदान मिळू लागले. व्ही.जे.टी.आय.मध्ये तांत्रिक शिक्षणाची सोय झाली. एल्फिन्स्टन कॉलेजसाठी नवी इमारत बांधली गेली. चौपाटीला विल्सन कॉलेज निघाले.

मुंबईबरोबरच पुणे शहरातील शिक्षण प्रसाराच्या कार्यास १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात गती प्राप्त झाली. १ जानेवारी १८४८ साली भिडे वाड्यात पहिली मुलींची शाळा महात्मा फुले व सावित्रीबाई फुले यांनी सुरू केली. कालांतराने या शाळेत २५० ते ३०० मुली येऊ लागल्या. या शाळेचा दर्जाही चांगला होता. अनेक युरोपियन अधिकाऱ्यांनी या शाळेच्या कामकाजावर खूश होऊन शाळेस देणग्याही दिल्याचे दप्तरावरून दिसून येते. मुलींबरोबर लहान मुलेही या शाळेत येत असत. शाळेच्या वेळेव्यतिरिक्त महात्मा फुले या मुलांना शिकवत असत. महात्मा फुल्यांनी रास्तापेठेत अस्पृश्यांच्या मुलांसाठी स्वतंत्र शाळा काढली. कालांतराने वेताळ पेठेत या शाळेची शाखा सुरू करण्यात आली. १८८० साली विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी सरकारी नोकरीचा राजीनामा देऊन न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना केली. कालांतराने त्यांना बाळ गंगाधर टिळक, गोपाळराव आगरकर, ना.म. जोशी, वा.शि. आपटे यांचे सहकार्य लाभले. त्यामुळे हे हायस्कूल प्रसिद्ध झाले व भरभराटीला आले.

१८८२ साली डेक्कन एज्युकेशन सोसायटीची स्थापना झाली. १८८५ साली संस्थेने फर्ग्युसन कॉलेज सुरू केले व इतर ठिकाणी काही हायस्कूल्स सुरू केली. १९०६ साली प्रो. विजापूरकर यांनी तळेगाव येथे समर्थ विद्यामंदिराची स्थापना केली. तेथे मातृभाषेतून शिक्षण दिले जात होते. हे विद्यालय सरकारी नियंत्रणापासून मुक्त होते.

१९०६ सालात महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांनी डिस्प्रेस्ड क्लासेस मिशनची स्थापना करून वसतिगृहे व हायस्कूल्स सुरू केली. शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण व्हावे यासाठी चालू असलेल्या प्रयत्नांना गती यावी यासाठी गोपाळ कृष्ण गोखले यांनी १९१० साली लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये प्राथमिक शिक्षण हे मोफत व सक्तीचे असावे असा ठराव मांडला, पण सरकारच्या आश्वासनानंतर तो परत घेण्यात आला. यासंदर्भात सर्व स्तरावर जी जागृती झाली त्यामुळे भारतात व महाराष्ट्रात शिक्षण प्रसारासाठी अनेक व्यक्ती व संस्था पुढे येऊ लागल्या. जिल्हा व तालुका पातळीवर खाजगी शिक्षण संस्थांद्वारा शिक्षण प्रसाराचे कार्य सुरू झाले.

ग्रामीण भागात शिक्षणाचा प्रसार व्हावा यासाठी १९१९ साली कर्मवीर भाऊराव पाटील यांनी रयत शिक्षण संस्थेची स्थापना केली. या संस्थेद्वारा प्रारंभी वसतिगृहे व ज्या ठिकाणी लोकल बोर्डाच्या शाळा नाहीत तेथे व्हालंटरी स्कूल्स सुरू केली. कालांतराने हायस्कूल्स व कॉलेजेस सुरू केली गेली. त्यामुळे ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांना महाविद्यालयीन शिक्षण प्राप्त होऊ लागले. आज रोजी रयत शिक्षण संस्थेच्या वतीने महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात ४३२ विद्यालये, आर्टस्, कॉमर्स व सायन्सचे शिक्षण देणारी ४० महाविद्यालये व १ इंजिनीअरिंग कॉलेज चालविले जाते. तसेच ७ अध्यापक विद्यालये व २ बी. एड्.चे शिक्षण देणारी महाविद्यालये चालवली जातात.

रयत शिक्षण संस्थेच्या वतीने ग्रामीण भागात शिक्षण प्रसारासाठी केल्या जात असलेल्या कार्याचे अनुकरण करून श्री. गो. ज्ञा. तथा बापूजी साळुंखे यांनी विवेकानंद शिक्षण संस्थेची स्थापना करून शिक्षण प्रसाराचे कार्य केले आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी पीपल्स एज्युकेशन सोसायटीची स्थापना करून मुंबई, औरंगाबाद येथे प्रामुख्याने महाविद्यालये सुरू करून उच्च शिक्षणाच्या सुविधा विद्यार्थ्यांना उपलब्ध करून दिलेल्या आहेत.

महाराष्ट्रातील संस्थानिकांनीही शिक्षण प्रसाराच्या कार्यात महत्त्वाची भूमिका पार पाडलेली आहे. कोल्हापूरच्या राजर्षी शाहू महाराजांनी आपल्या संस्थानात प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचे केले होते. तसेच कोल्हापूर येथे विविध जाती – जमातीतील विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण घेणे शक्य व्हावे, यासाठी वसतिगृहांची स्थापना केली व विद्यालयीन व

महाविद्यालयीन शिक्षणाच्या सुविधा उपलब्ध करून दिल्या. बडोद्याच्या सयाजीराव महाराजांनीही आपल्या संस्थानात प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत केले होते. महाविद्यालयीन शिक्षणासाठी गुजरात मधील विद्यार्थ्यांबरोबर महाराष्ट्रातील विद्यार्थ्यांना विविध सवलती उपलब्ध करून दिल्या होत्या. औंधचे पंत प्रतिनिधी, सांगलीचे पटवर्धन, जतचे डफळे यांनीही शिक्षण प्रसारासाठी आपल्या संस्थानात प्रयत्न केले आहेत.

शिक्षणप्रसाराच्या कार्याचे लोण जिल्हा, तालुका व गावपातळीवर पोहोचवण्याचे कार्य या पातळीवर कार्य करणाऱ्या संस्थांनी केल्याचे दिसून येते. महाराष्ट्रात शिक्षणप्रसार व्हावा यासाठी कार्य करणाऱ्या संस्थांची काही नावे खालीलप्रमाणे आहेत.

१) पुणे जिल्हा शिक्षण प्रसारक मंडळ
२) अहमदनगर जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज
३) नाशिक जिल्हा मराठा विद्या प्रसारक समाज
४) खानदेश एज्युकेशन सोसायटी
५) कोकण एज्युकेशन सोसायटी
६) सांगली एज्युकेशन सोसायटी
७) शिक्षण प्रसारक मंडळ, बार्शी
८) जनता शिक्षण संस्था, पुणे
९) शिक्षण प्रसारक मंडळ, पुणे
१०) भारती विद्यापीठ, पुणे

या संस्थांबरोबरच गावपातळीवर कार्य करणाऱ्या संस्थांनी विद्यालये व महाविद्यालये स्थापन करून विद्यार्थ्यांना शिक्षणाच्या सुविधा उपलब्ध करून दिलेल्या आहेत.

नागपुरात मेजर हिस्लॉपने युरोपियन लोकांकरिता १८४० साली शाळा काढली. त्याचप्रमाणे फ्री चर्च मिशनने इतरांकरिता शाळा सुरू केली. १८८१ साली नवीन शिक्षण देण्याकरिता शिक्षण खाते सुरू करण्यात आले. १८६१ साली अकोला शहरात हायस्कूल सुरू झाले. १८६७ साली कन्याशाळेची स्थापना झाली. नागपूर शहरात रे हिस्लॉपच्या पत्नीने १८४९ मध्ये मुलींची शाळा काढली. मुंबईहून नागपूरला गेलेल्या काही मंडळींनी १८६३ साली निल सिटी स्कूलची स्थापना केली. ते विकसित होऊन कालांतराने दर्जेदार शिक्षणाचे केंद्र बनले. १८७९ पर्यंत वऱ्हाड प्रांतात ७१२ शाळा होत्या. त्यापैकी २३३ शाळा लोकांनी चालवलेल्या होत्या.

१८८० मध्ये हिस्लॉप कॉलेजची इमारत बांधण्यात आली. १८८६ मध्ये विद्यापीठाचे केंद्र नागपूर येथे सुरू झाले. १८८७ मध्ये बी. ए.ची प्रथम बॅच परीक्षेस बसली. १८८५ मध्ये मॉरिस कॉलेजची स्थापना करण्यात आली. यानंतर विदर्भात शिक्षणाचा प्रसार झपाट्याने झाला. उच्च शिक्षण घेण्यासाठी गर्भश्रीमंत व उच्चभ्रू पालकांनी आपली मुले परदेशात पाठवण्यास प्रारंभ केला. उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्त्या दिल्या जाव्यात यासाठी चळवळ सुरू झाली. त्यामुळे शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढू लागली.

१९०५ साली वंगभंग आंदोलनाचा परिणाम होऊन राष्ट्रीय विद्यालयांची स्थापना झाली. यात अकोला, अमरावती, चंद्रपूर, नागपूर आणि यवतमाळ येथील विद्यालयांनी उल्लेखनीय काम केले आहे. १९२५ पर्यंत विदर्भातील शिक्षण प्रसाराचे काम हे शहरी भागापुरतेच मर्यादित होते. १९२५ साली बॅ. रामराव देशमुख व डॉ. पंजाबराव देशमुख यांनी मराठा एज्युकेशन सोसायटीची स्थापना केली. त्यानंतर या दोघांनी अमरावती येथे शिवाजी मराठा हायस्कूलची स्थापना केली.

१९२८ साली डिस्ट्रिक्ट कौन्सिलचे अध्यक्ष या नात्याने डॉ. पंजाबराव देशमुख यांनी ग्रामीण भागात अनेक शाळा स्थापन केल्या. त्यामुळे ग्रामीण भागातील मुलांना कमी पैशात शिक्षण उपलब्ध झाले. १९३१ साली त्यांनी शिवाजी एज्युकेशन सोसायटीची स्थापना केली. या संस्थेद्वारे ग्रामीण भागात शाळा व कॉलेजेस काढली. त्यामुळे या भागातील विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय झाली. या शाळांतून कृषी व हस्तोद्योग हे विषय शिकवण्यावर भर देण्यात आला. डॉ. पंजाबराव देशमुखांच्या दूरदृष्टीमुळे ग्रामीण भागातील आर्थिक मागास व पददलित विद्यार्थ्यांना शिक्षण प्राप्त होऊन नवी पिढी सुशिक्षित, सुसंस्कृत व प्रगतिशील विचारांची बनली. १९३७ मध्ये सेवाग्राम आश्रमाशेजारी नईतालीम शिक्षण व्यवस्थेचे केंद्र सुरू केले गेले. बेसिक स्कूल्स सुरू झाली, पण ती यशस्वी झाली नाहीत.

श्री गुरुदेव सेवा मंडळ मोझरी या संस्थेची स्थापना राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांच्या मार्गदर्शनाखाली १९४३ साली झाली. समाजसेवेबरोबरच शिक्षणप्रसार करण्याचे कार्य या संस्थेने अमरावती जिल्ह्यात केले आहे. या संस्थांबरोबरच, जिल्हा, तालुका व गावपातळीवर कार्य करणाऱ्या संस्थांनीही विदर्भाच्या शिक्षणप्रसाराच्या कार्यास हातभार लावलेला आहे.

मराठवाडा हा महाराष्ट्राच्या शासकीय विभागापैकी एक विभाग असून तो आठ जिल्ह्यांचा बनलेला आहे. स्वातंत्र्यापूर्वी मराठवाडा हा हैदराबाद संस्थानाचा भाग होता. हे संस्थान १९४८ साली भारतीय संघराज्यात समाविष्ट करण्यात आले. १ मे १९६० रोजी महाराष्ट्राची निर्मिती झाल्यानंतर मराठवाडा हा आपोआपच महाराष्ट्र राज्याचा भाग बनला.

आंध्र राजे हे मराठवाड्यातील पहिले राजे. येथे तिसऱ्या शतकापासून चालुक्य घराण्यातील राजांनी राज्य केले. त्यांच्या पराभवानंतर १२ ते १४ शतकांच्या प्रारंभापर्यंत देवगिरीच्या यादवांनी मराठवाड्यावर राज्य केले. अल्लाउद्दीन खिलजी याने यादवांचा पराभव केल्यानंतर १४ व्या शतकापासून १६ व्या शतकापर्यंत बहमनी राजांनी राज्य केले. औरंगजेबाने बहमनी सुलतानांचा पराभव करून हा विभाग मोगल साम्राज्यास जोडला. या विभागाच्या कारभारासाठी निजामपद निर्माण केले व त्यावर आपल्या सुभेदाराची नियुक्ती केली. या दक्षिणेच्या सुभेदाराने १७१९ मध्ये स्वत:चे राज्य स्थापन केले. ब्रिटिश सत्ता भारतात स्थिरावल्यानंतर निजामाने ब्रिटिशांचे मांडलिकत्व स्वीकारले. या घराण्यातील निजाम मीर उस्मान अलिखान याने २९ ऑगस्ट १९११ ते १९४८ पर्यंत राजेपद उपभोगले. हे संस्थान भारतीय संघ राज्यात विलीन झाल्यानंतर निजामाची राजवट संपुष्टात आली.

निजाम हा मध्ययुगीन सरंजामशहा होता. त्याचा कारभार एकतंत्री पद्धतीने चालत असे. त्यामुळे जनतेची अवस्था हलाखीची होती. १९३०च्या सुमारास हैदराबाद राज्यातील साक्षरतेचे प्रमाण ५ टक्के होते. त्यामुळे लोक मागासलेले होते. आपल्या सरंजामी व्यवस्थेस पोषक अशी शिक्षण व्यवस्था निजामाने चालू ठेवली होती. राज्य कारभाराची भाषा उर्दू असल्याने शिक्षणाचे माध्यम उर्दूच होते. त्यामुळे सर्वसामान्य जनतेमध्ये शिक्षणाचा प्रसार झालाच नाही.

खाजगी शिक्षण संस्था नसाव्यात या धोरणामुळे खाजगी प्रयत्नांना हैदराबाद राज्यात वावच मिळाला नाही. राज्याबाहेरील स्वातंत्र्य चळवळीचे लोण काही प्रमाणात हैदराबाद राज्यात पसरले, पण निजामाने लोक सहभागाच्या कल्पनेस थंडा प्रतिसाद दिला. त्यामुळे जनतेच्या मागण्यांचा उपयोग फारच थोड्या प्रमाणावर झाला. १९४१ साली साक्षरतेचे प्रमाण ९.३ टक्के होते.

१९४८ पूर्वी मराठवाड्यात बालवाडी वर्ग १ ते ४ थी असे प्राथमिक शिक्षणाचे वर्ग असत. ५ ते ७ पूर्व माध्यमिक आणि ८ ते १० वी माध्यमिक शिक्षण असा शालेय आकृतिबंध होता. त्यानंतर दोन वर्षांचा इंटरमिजिएट व दोन वर्षांचा पदवी अभ्यासक्रम असा आकृतिबंध होता. विलीनीकरणानंतर मराठवाडा मुंबई द्विभाषिक राज्याचा व १९६० मध्ये

महाराष्ट्र राज्याचा भाग बनल्यानंतर १९७५ मध्ये सर्व राज्यांप्रमाणे मराठवाड्यातही १०+२+३ हा आकृतिबंध अस्तित्वात आला.

मराठवाड्यातील शिक्षणाची ऐतिहासिक पार्श्वभूमी पाहिल्यानंतर १९४८ पूर्वी व त्यानंतर मराठवाड्याची जी शैक्षणिक प्रगती झाली आहे. तिचा आढावा घेणे उचित ठरू शकेल.

प्राथमिक शिक्षणाचा विचार करताना आपणास असे दिसून येते की, १९४८ पूर्वी हाताच्या बोटावर मोजता येतील इतक्याच स्वयंसेवी संस्थांच्या शाळा होत्या. बहुतेक सर्व शाळा निजाम सरकारमार्फत चालवल्या जात. या शाळा तालुका व महत्त्वाच्या ठिकाणीच असत. १९३० मध्ये उर्वरित भारताप्रमाणे शिक्षण प्रसार हा चळवळीचा भाग बनला. त्यामुळे खाजगी शाळात इयत्ता ४ थी पर्यंत उर्दू भाषा सक्तीची नव्हती. ५ वी पासून उर्दू भाषाही शिकावी लागत असल्याने १९४८ पर्यंत खाजगी शाळातून मराठी हे माध्यम आलेच नाही. खाजगी शाळातून मराठी माध्यमाला परवानगी असली तरी मराठी माध्यमातून परीक्षा घेतली जात नसल्याने मराठी माध्यमाच्या शाळांना फारशी लोकप्रियता लाभली नाही.

या शाळांप्रमाणे अनौपचारिक शिक्षण देणाऱ्या काही संस्था मराठवाड्यात उपलब्ध होत्या. मकतबमधून उर्दू शिक्षण व पाठ शाळांमधून संस्कृत व मराठीचे शिक्षण दिले जाई. खेड्यातून तात्या पंतोजीच्या शाळा अस्तित्वात होत्या. त्यामुळे लोक प्रथम या शाळांमधून शिक्षण घेत व नंतर उर्दू माध्यमातून पुढील शिक्षण घेत असत. परंतु निजाम सरकारने १९३० मध्ये सरकारमार्फत शिक्षणाची सोय होणार आहे, या सबबीखाली या शाळा हुकूम काढून बंद केल्या.

निजामाच्या राजवटीत ज्या प्राथमिक शाळा सरकारमार्फत चालवल्या जात होत्या त्यांच्या इमारती टिकाऊ स्वरूपाच्या व चांगल्या होत्या. वर्गात २० ते २५ विद्यार्थी बसतील या क्षेत्रफळाचे वर्ग या इमारतीत असत.

१९५०-५१ मध्ये मराठवाड्यात ३३ माध्यमिक शाळांत १५९१९ विद्यार्थी शिक्षण घेत होते. माध्यमिक शिक्षणाचा अभ्यासक्रम ५ ते १० असा ६ वर्षांचा होता. १९५६-५७ मध्ये मराठवाड्यात १३५ माध्यमिक शाळा होत्या. या शाळांमध्ये २३५२ शिक्षक होते. आज मराठवाड्यातील शिक्षणाचा आकृतिबंध १०+२+३ असाच आहे. शिक्षकांच्या सेवाशर्ती समान आहेत. अनुदान सूत्रही एकच आहे. त्यामुळे मराठवाड्यातील विद्यार्थ्यांना उर्वरित महाराष्ट्राप्रमाणे सर्व सवलती प्राप्त होतात असे दिसून येते. या सर्व गोष्टींमुळे मराठवाड्यात माध्यमिक शिक्षणाचा प्रसार इतर भागाप्रमाणेच झपाट्याने झालेला दिसून येतो. शासनाने सरकारी शाळा जिल्हा परिषदांकडे वर्ग केल्याने व जिल्हा परिषदेने स्वत: शाळा काढल्याने काही प्रश्न निर्माण झाले होते. पण सर्व विभागांत अनुदान पद्धती एकच असल्याने तो प्रश्न काही प्रमाणात सुटलेला आहे.

१९४८ पर्यंत मराठवाड्यात उच्च शिक्षण देणारे एकही महाविद्यालय नव्हते. पदवीपर्यंतचे शिक्षण देणारी चार महाविद्यालये हैदराबाद शहरात होती. या महाविद्यालयाचे माध्यम उर्दू असल्याने अन्य भाषिकांना शिक्षणाच्या सुविधा फार कमी प्रमाणात उपलब्ध होत्या.

संस्थानाच्या विलीनीकरणानंतर अवतरलेल्या नवीन युगाचा लाभ स्वामी रामानंदतीर्थ यांनी घेऊन नांदेड व आंबेजोगाई येथे महाविद्यालये सुरू केली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी पीपल्स एज्युकेशन सोसायटीमार्फत १९५० मध्ये शासनाकडून १२ लाखांचे अनुदान व १०० एकर जमीन संपादून मिलिंद महाविद्यालयाची स्थापना केली. या १०० एकराच्या परिसरात आज २ माध्यमिक शाळा, कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालये तसेच विधी व शिक्षणशास्त्र महाविद्यालये या संस्था कार्यरत आहेत. या परिसरातील शिक्षण संस्थांत आज मराठवाड्यातील सर्व भागांतून येणारे विद्यार्थी शिक्षण घेत आहेत, याच पद्धतीने ठिकठिकाणी सामान्य शिक्षण देणारी व कृषी, विधी, इंजिनीअरिंग यांचे शिक्षण देणारी महाविद्यालये जिल्हा, तालुका व गावपातळीवरील संस्थांच्या वतीने चालवली जातात.

औरंगाबादमध्ये १९५८ रोजी मराठवाडा विद्यापीठ अस्तित्वात आले. नांदेड येथे स्वामी रामानंदतीर्थ विद्यापीठाची स्थापना होऊन तेही आज शिक्षण विकासासाठी प्रयत्नशील आहे. मराठवाड्यात आज ॲलोपॅथीचे शिक्षण देणारी २ महाविद्यालये आहेत. आयुर्वेद व होमिओपॅथीचे शिक्षण देणारी महाविद्यालये तसेच पॉलिटेक्निक व अभियांत्रिकीचे शिक्षण देणारी महाविद्यालये पुरेशा प्रमाणात उपलब्ध आहेत.

खाजगी संस्थांचे कार्य, पालकांची जागृती व आपण शिक्षण घेऊन स्वत:ची उन्नती साधली पाहिजे ही जाणीव विद्यार्थ्यांच्या मनात निर्माण झाल्याने, शिक्षणाचा प्रसार होऊ लागला. शिक्षण प्रसाराबरोबरच शिक्षण हे गुणवत्तापूर्ण असावे, ते समाजोपयोगी व्हावे यासाठी शासकीय पातळीवरही प्रयत्न चालू होते, त्यांचाही विचार करणे आवश्यक आहे. या संदर्भात भारत सरकारने १९१३ साली शिक्षणविषयक धोरण निश्चित करण्यासाठी ठराव रूपाने शिफारशी केल्या आहेत. त्या खालीलप्रमाणे आहेत

१) प्राथमिक शिक्षणात चित्रकला, निसर्ग, शारीरिक शिक्षण, स्थानिक भूगोल यांचा समावेश करण्यात यावा.

२) लोकल बोर्डांनी चालवलेल्या शाळांचा विस्तार करावा व खाजगी शिक्षण संस्थांनी चालविलेल्या शाळांचा विकास व्हावा व त्या कार्यक्षम राहाव्यात यासाठी सुपरव्हिजनची सुविधा उपलब्ध करून दिली जावी.

३) ग्रामीण व शहरी शाळांत अभ्यासक्रम एकच असावा.

४) शिक्षकांची भरती समाजाच्या सर्व स्तरांतून केली जावी. शिक्षकांचे प्रशिक्षण योग्य रीतीने व्हावे इकडे लक्ष पुरवावे. शिक्षकांना पेन्शन, प्रा. फंड आदी सुविधा उपलब्ध करून द्याव्यात.

५) विद्यापीठांच्या संख्येत वाढ करण्यात यावी म्हणजे शिक्षणाचा विस्तार आपोआपच होऊ शकेल.

या ठरावाने १९१३ ते १९२१ या कालावधीत शिक्षणाच्या विस्ताराचा पाया घातला गेला. यामुळे उच्च शिक्षणात महत्त्वाचे बदल झाले. प्रांतात अनेक विद्यापीठे निघाली. अनेक नवीन महाविद्यालये अस्तित्वात आली.

उच्च शिक्षणाचा झालेला विस्तार विचारात घेऊन १९१९ साली विद्यापीठ आयोगाची स्थापना माईकेल सॅडलर यांच्या अध्यक्षतेखाली करण्यात आली. आयोगाने विद्यापीठांच्या गरजा विचारात घेऊन त्यांची सुधारणा व्हावी व उच्च शिक्षण गुणवत्तापूर्ण व्हावे यासाठी शिफारशी कराव्यात, असे आयोगास सांगण्यात आले होते.

आयोगाने विविध विद्यापीठांना भेटी देऊन १९१९ च्या मार्च महिन्यात आपला अहवाल १३ भागांत सादर केला. आयोगाच्या महत्त्वाच्या शिफारशी खालीलप्रमाणे आहेत.

१) माध्यमिक शिक्षण व उच्च शिक्षण – हे परस्परांशी संबंधित असल्याने माध्यमिक शाळांची गुणवत्ता वाढावी यासाठी शाळांना साधनसामग्री उपलब्ध करून द्यावी. प्रशिक्षित शिक्षक नियुक्त केले जावेत व शालेय गुणवत्ता वाढावी यासाठी निरीक्षणाची यंत्रणा समाधानकारक असावी असे सुचविले आहे.

२) आयोगाने पदवी अभ्यासक्रम तीन वर्षांचा असावा, अशी शिफारस केली आहे. विद्यापीठावरील नियंत्रण लवचिक स्वरूपाचे असावे. दैनंदिन कामकाज व अभ्यासक्रम ठरविण्याचे स्वातंत्र्य विद्यापीठांना द्यावे, तसेच महाविद्यालये व विद्यापीठ यांच्यात सहकार्य व जवळचे संबंध असावेत या गोष्टींवर आयोगाने भर दिलेला आहे.

सॅडलर आयोगाच्या शिफारशीनुसार केंद्र व राज्य सरकार यांच्याकडे शिक्षणाची जबाबदारी विभागून दिली गेली. राज्यांना शिक्षणाच्या विकासासाठी पुरेसा पैसा उपलब्ध न झाल्याने काही प्रमाणात असंतोष निर्माण झाला. त्यावर उपायोजना सुचविण्यासाठी १९२७ मध्ये एक समिती हरटॉग यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त करण्यात आली होती.

हरटॉग समितीने भारतातील शिक्षण समस्या समजावून घेतल्या. प्राथमिक शिक्षणाची अवस्था चांगली नसल्याने त्याची जबाबदारी, नियंत्रण व तपासणी या बाबी सरकारने आपणाकडे घ्याव्यात, अशी शिफारस आयोगाने केली.

शिक्षणप्रसाराबरोबरच शिक्षणाची गुणवत्ता वाढावी यासाठी प्रयत्न व्हावेत. अभ्यासक्रम हा सामान्य व शास्त्रीय असावा, तसेच दैनंदिन जीवनात शिक्षणाचा उपयोग व्हावा या दृष्टीने प्रयत्न केले जावेत यावर आयोगाने भर दिलेला आहे. माध्यमिक शिक्षणाच्या अभ्यासक्रमाची पुनर्रचना करण्यात यावी व तो ग्रामीण गरजा ध्यानात घेऊन तयार करण्यात यावा, अशी आयोगाची शिफारस आहे. शिक्षकांना पुरेसे संरक्षण व त्यांची आर्थिक स्थिती सुधारण्यात यावी यावर आयोगाने भर दिला आहे. भारत सरकारच्या १९३५ च्या कायद्याने प्रांतांना स्वायत्तता मिळाली. बहुतेक प्रांतातून काँग्रेस मंत्रिमंडळे सत्तेवर आली. त्यांचे समोर सक्तीचे प्राथमिक शिक्षण ही योजना कार्यवाहित आणणे हा प्रमुख उद्देश होता. त्याचबरोबर गांधीजींच्या शिक्षणविषयक धोरणाची कार्यवाही करावयाची होती. त्यासाठी गांधीजींनी २२ व २३ ऑक्टोबर १९३७ च्या राष्ट्रीय शिक्षण परिषदेचे आयोजन केले. या परिषदेस शिक्षणतज्ज्ञ, राष्ट्रीय नेते, समाज सुधारक आणि शिक्षणमंत्री उपस्थित होते. या परिषदेने खालील शिफारशी केल्या आहेत.

१) राष्ट्रीय स्तरावर ७ वर्षांचे मोफत शिक्षण दिले जावे.

२) मातृभाषा हे शिक्षणाचे माध्यम असावे.

३) शिक्षण हे हस्तकलेच्या द्वारा उत्पादनाशी संबंधित असावे.

या समितीच्या शिफारशींची कार्यवाही कशी करावयाची यासाठी डॉ. झाकीर हुसेन यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या समितीच्या अहवालानुसार मूलोद्योगी शिक्षण देण्याचा प्रयत्न झाला, पण त्यात यशप्राप्ती झाली नाही.

दुसऱ्या महायुद्धानंतर शिक्षण कसे असावे याचा मसुदा तयार करण्यासाठी सार्जंट यांच्या अध्यक्षतेखाली समिती नियुक्त केली गेली. या समितीचा अहवाल राष्ट्रीय शिक्षणाच्या दृष्टीने महत्त्वाचा मानला जातो. या समितीने प्रथमच प्राथमिक ते उच्च शिक्षणापर्यंत संबंधित सर्व बाबींचा विस्तारपूर्वक विचार करून आपल्या शिफारशी सादर केल्या आहेत.

१) ३ ते ६ या वयोगटातील मुलांसाठी नर्सरी स्कूल्स सुरू करण्यात यावीत. हे शिक्षण मोफत असावे. या शिक्षणाचा उद्देश लहान मुलांना सामाजिक अनुभव देणे व त्यांना सर्वसामान्य वर्तनाचे नियम शिकविणे हा असावा.

२) प्राथमिक शिक्षण १४ वर्षांपर्यंत मोफत व सक्तीचे असावे.

३) अभ्यासक्रमात कार्यानुभवाचा समावेश करण्यात यावा.

४) परीक्षा शाळांनीच घ्याव्यात व अभ्यासक्रम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र द्यावे.

५) माध्यमिक शिक्षण हे ११ ते १६ वयोगटांसाठी असावे. या शिक्षणासाठी फी आकारली जावी. गरीब विद्यार्थ्यांना (५०टक्के) फी सवलत द्यावी.

६) माध्यमिक शिक्षणाचे माध्यम मातृभाषा हेच असावे.

७) इंग्रजी ही आवश्यक भाषा म्हणून शिकवली जावी.

८) शिक्षणात प्रचलित विषयाबरोबर तांत्रिक विषयांचा समावेश असावा.

विद्यापीठ शिक्षणाचा पदवी अभ्यासक्रम ३ वर्षांचा असावा. दर्जा सुधारण्यासाठी शिक्षकांची भरती गुणवत्तेनुसार करणे व त्यांचे राहणीमान यावर भर देण्यात यावा. विद्यापीठ अनुदान आयोग असावा, ट्युटोरियल पद्धतीवर भर देण्यात यावा. संशोधन कार्याकरिता अधिक सुविधा दिल्या जाव्यात.

याशिवाय आयोगाने प्रौढ शिक्षण, शिक्षक प्रशिक्षण, अपंगांचे शिक्षण, आरोग्यविषयक शिक्षण दिले जावे. तसेच विद्यार्थ्यांसाठी करमणूक व सामाजिक कार्य यांची योजना तयार केली जावी, असे प्रतिपादन केले आहे. त्याचबरोबर शिक्षणाचे प्रशासन व व्यवस्थापन याबाबतही समितीने शिफारशी केल्या आहेत.

सार्जंट कमिशनने शिक्षणाचा व्यापक विचार केलेला आहे. राष्ट्रीय स्तरावर शिक्षणाच्या समस्या काय आहेत हे समजावून घेतले व त्या समस्यांची उकल कशी करावयाची याचेही मार्गदर्शन अहवालात आहे.

स्वातंत्र्यानंतर शिक्षणाची पुनर्रचना व्हावी यासाठी प्रयत्नांना प्रारंभ झाला होता. दर्जा घसरलेला आहे अशी परिस्थिती असल्याने त्यावर उपाययोजना करणे आवश्यक वाटत होते. तसेच विद्यापीठातले शिक्षण हे समाजाच्या भावी गरजा लक्षात घेऊन दिले गेले पाहिजे हा विचार बळावल्याने विद्यापीठ शिक्षण आयोगाची स्थापना करण्यात यावी. अशी शिफारस भारत सरकारला केल्याने, विद्यापीठ शिक्षण आयोगाची स्थापना डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांच्या अध्यक्षतेखाली केली गेली.

राधाकृष्ण आयोगाने विद्यापीठांना भेटी देऊन समस्यांबद्दल चर्चा केली, वास्तव स्थितीचा अभ्यास केला व आपला अहवाल सादर केला. त्यात सार्वभौम लोकशाही गणराज्याची प्रगती व्हावी यासाठी आयोगाने उच्च शिक्षणाची उद्दिष्टे निश्चित केली आहेत ती खालीलप्रमाणे आहेत.

१) देशाच्या विकासासाठी सर्व क्षेत्रांत कार्यक्षम नेतृत्व निर्माण व्हावे यासाठी प्रयत्न करणे.
२) विद्यापीठ शिक्षणाने भारतीय संस्कृतीचे संवर्धन व्हावे व या संवर्धनासाठी जबाबदारी पेलणारे बौद्धिक नेतृत्व पुरवणे.
३) विद्यापीठांनी बौद्धिक क्षेत्रात नवनवे प्रयोग करून त्याद्वारा शिक्षण व समाज यांचा विकास करणे.
४) ज्ञानप्राप्तीबरोबरच लोकशाहीच्या विकासासाठी विवेकबुद्धीने कार्यरत राहणारे नागरिक निर्माण करणे.
५) भूतकाळापासून संस्कृतीच्या रूपाने आपणास जे प्राप्त झाले ते व आधुनिक शिक्षणामध्ये जे चांगले आहे त्याचा स्वीकार करून ते टिकविण्याचा प्रयत्न करणे.
६) विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासाबरोबरच त्यांच्या अंगी समाजाभिमुखता यावी. स्वातंत्र्य, समता, बंधुता व न्याय या चतुःसूत्रींचे पालन करण्याची जीवनात आवश्यकता आहे हे त्यांच्या मनावर बिंबवणे.
७) आध्यात्मिक विकास, सर्वांप्रती आदर व सुप्तगुणांचा शोध घेऊन लोकशाही मूल्यांचे जतन या सद्गुणांचा विकास करणे.

वरील उद्दिष्टांची पूर्ती व्हावी यासाठी आयोगाने सर्वंकष विचार करून शिक्षणाच्या सर्व अंगांवर संबंधित घटनांवर सविस्तर विचार केला आहे, उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात जो विकास झाला त्यामागे विद्यापीठ शिक्षण आयोगाच्या शिफारशींची अंमलबजावणी साहाय्यभूत ठरली आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाची स्थापना, तीन वर्षांचा पदवी अभ्यासक्रम, संशोधन, तंत्रज्ञान यांचा विशेष विचार आयोगाने केला आहे.

स्वातंत्र्यापूर्वी नेमलेल्या आयोगांनी माध्यमिक शिक्षण सुधारण्यासाठी केलेल्या शिफारशींचा विचार फारसा केला गेला नाही. त्यामुळे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर माध्यमिक शिक्षणाची ध्येये, उद्दिष्टे व व्यवस्थापन याबाबत स्पष्टता यावी. यासाठी २३ सप्टेंबर १९५२ मध्ये माध्यमिक शिक्षण आयोगाची स्थापना करण्यात आली. डॉ. ए. लक्ष्मण मुदलियार हे त्याचे अध्यक्ष होते.

स्वातंत्र्यानंतर भारत सार्वभौम प्रजासत्ताक देश बनला. त्या संदर्भात राष्ट्राच्या गरजा आर्थिक, सामाजिक व राजकीय स्थिती ध्यानात घेऊन राष्ट्राची उद्दिष्टे निश्चित केली गेली. त्यांना अनुसरून देशाची उत्पादन क्षमता वाढावी, जबाबदार नागरिक निर्माण व्हावेत यासाठी शिक्षणाची उद्दिष्टे निश्चित केली आहेत ती खालीलप्रमाणे :

१) लोकशाही नागरिकत्वाचा विकास करणे.

२) व्यावसायिक कौशल्ये विकसित करणे.

३) विद्यार्थी व्यक्तिमत्त्वाचा सर्वांगीण विकास करणे.

४) नेतृत्वासाठी शिक्षण देणे.

विद्यापीठीय शिक्षण विकसित होण्यासाठी व माध्यमिक शिक्षणात सुधारणा व्हावी यासाठी आयोगाने पुढीलप्रमाणे शिफारशी केल्या आहेत.

१) माध्यमिक शिक्षणाचा कालावधी ११ वर्षांचा असावा.

२) मल्टिपर्पज हायस्कूलची स्थापना करावी. त्यामुळे अभ्यासात विविधता येईल व विद्यार्थ्यांना आवडीप्रमाणे विषय निवडता येतील.

३) माध्यमिक शिक्षणाचे माध्यम मातृभाषा किंवा प्रांतीय भाषा हे असावे. भाषिक अल्पसंख्याकांसाठी विशेष सुविधा पुरवल्या जाव्यात.

४) पाठ्यपुस्तके दर्जेदार व गुणवत्तायुक्त व्हावीत यासाठी पाठ्यपुस्तक महामंडळ नियुक्त केले जावे.

आयोगाने १) अध्यापन पद्धती २) चारित्र्य संवर्धन ३) विद्यार्थी आरोग्य व शारीरिक शिक्षण ४) परीक्षा पद्धती ५) शिक्षकांचे राहणीमान सुधारणे ६) शिक्षक प्रशिक्षण ७) माध्यमिक शाळांचे प्रशासन व व्यवस्थापन ८) शाळा तपासणीबाबत विचार ९) शालेय सुधारणा १०) आर्थिक व्यवस्था याबाबत शिफारशी केल्या आहेत.

मुदलियार आयोगाने माध्यमिक शिक्षणाच्या पुनर्रचनेसंबंधी विचार केला असल्याने, त्या संबंधी विचार करणारा स्वातंत्र्योत्तर काळातील हा महत्त्वाचा आयोग मानला जातो. माध्यमिक शिक्षणाला योग्य व इष्ट वळण देण्याचे काम या आयोगाने केले आहे.

स्वातंत्र्यानंतर शैक्षणिक प्रगती होऊ लागली. परंतु शिक्षणाच्या सर्व स्तरांवर दर्जा अपेक्षेप्रमाणे उंचावणे शक्य झाले नाही. राष्ट्राचे दरडोई उत्पन्न वाढविण्यासाठी तांत्रिक, यांत्रिक, औद्योगिक व कृषी क्षेत्राचा विकास होणे गरजेचे वाटू लागले. राष्ट्रीय विकास हा शिक्षण विकासावर अवलंबून असतो. यासाठी राष्ट्र विकासासाठी शिक्षणाचा पुन्हा विचार होणे अगत्याचे वाटू लागले. यास्तव शिक्षणाच्या सर्व स्तरांचा विचार करण्यासाठी डॉ. डी. एस. कोठारी यांच्या अध्यक्षतेखाली १७ जुलै ६४ रोजी आयोग नियुक्त केला गेला. २९ जून १९६६ रोजी आयोगाने आपला अहवाल सरकारला सादर केला तो तीन भागांत आहे.

शिक्षणातून राष्ट्रीय उद्दिष्टे साध्य व्हावीत यासाठी आयोगाने शिक्षण हे समाजपरिवर्तनाचे साधन आहे हा प्रमुख विचार मांडला व आपल्या अहवालस्वरूप ग्रंथाला 'शिक्षण व राष्ट्रीय विकास' हे सूचक असे नाव दिले. तसेच, शिक्षणसंस्थांमधील उभे व आडवे परस्पर संबंध (Vertical and horizontial contacts) शैक्षणिक आदान-प्रदानाने अधिकाधिक दृढ व्हावेत व गुणवत्ता वाढत राहावी यासाठी शाळासमूह योजना व शाळासुधार योजना अस्तित्वात आल्या. शिक्षणातून राष्ट्रीय उद्दिष्टे साध्य व्हावीत यासाठी आयोगाने पंचसूत्रीचा पुरस्कार केला आहे.

१) शिक्षण व उत्पादकता संबंध-विज्ञान शिक्षण महत्त्वाचे राहील. अभ्यासक्रमात कार्यानुभवाचा समावेश केल्यास त्या माध्यमातून प्रात्यक्षिकाला महत्त्व द्यावे लागेल. औद्योगिक, कृषी तंत्रज्ञान या क्षेत्रात विज्ञानाचा वापर करावा.

२) सामाजिक व राष्ट्रीय एकात्मता ही शिक्षणातून निर्माण व्हावी यासाठी कोठारी आयोगाने काही कार्यक्रम सुचविलेले आहेत. राष्ट्रीय व सामाजिक सेवा उच्चस्तरावर सक्तीची करणे. सामान्य शाळापद्धती स्वीकारणे यामुळे राष्ट्रीय व सामाजिक एकात्मता निर्माण होईल.

३) सामाजिक व नैतिक मूल्यविकास हा आध्यात्मिक, नैतिक, सामाजिक, सांस्कृतिक क्षेत्रात घडावा यासाठी जीवनातील सर्वच मूल्यांचा विकास शिक्षणातून होण्यासाठी सर्वच स्तरावर उपक्रमातून मूल्य शिक्षणाला प्राधान्य द्यावे.

४) धर्मावलंबी शिक्षण – लोकशाही राष्ट्रामध्ये राहणाऱ्यांना सर्व धर्माची माहिती असणे आवश्यक आहे. त्यांची ओळख शिक्षणाद्वारे करून दिली गेली पाहिजे. यास्तव अभ्यासक्रमात प्रमुख धर्मासंबंधी माहिती समाविष्ट असावी म्हणजे सर्वांना धर्मातील प्रमुख तत्त्वांची ओळख होईल. धर्मांच्या तत्त्वातील साम्य लक्षात आणून देणारे पाठ पाठ्यपुस्तकात समाविष्ट करावेत. त्यामुळे सर्वधर्मसमभाव विकसित होऊ शकेल.

५) शिक्षण व आधुनिकता – शिक्षण पद्धतीत जे आधुनिक आहे त्याचा स्वीकार करून गतिमान विश्वाशी समन्वय साधण्याची क्षमता शिक्षणातून निर्माण झाली पाहिजे. नवीन ज्ञानाचा स्वीकार करून त्याचा उपयोग समाजहितासाठी करणारे नागरिक निर्माण होणे आवश्यक आहे.

कोठारी आयोगाने शिक्षणाचा आकृतिबंध १५ वर्षांचा सुचविला आहे.

१) १ ते १० प्राथमिक व माध्यमिक

२) ११ ते १२ उच्च माध्यमिक

३) पदवी शिक्षण – ३ वर्षे

उच्च माध्यमिक स्तरावर विविध प्रकारचे अभ्यासक्रम सुरू करावेत. प्रवेश घेताना विद्यार्थ्यांचे वय ५ + असावे. ११ वी व १२ वी चे वर्ग माध्यमिक शाळांना जोडावेत. प्रथम पदवी ३ वर्षांनी मिळावी. पदव्युत्तर पदवी दोन वर्षांची असावी.

१) आयोगाने शिक्षक व त्यांचे प्रशिक्षण २) संधीची समानता ३) स्त्री शिक्षण ४) आदिवासी व मागासवर्गीयांचे शिक्षण ५) शालेय स्तरावरील समस्या ६) अभ्यासक्रम ७) भाषा ८) विषयांच्या शिक्षणाबाबतचे विचार ९) प्राथमिक स्तरावर कार्यानुभवाचा विचार करून शिक्षणाच्या विकासासाठी शिफारशी केल्या आहेत.

आयोगाने केलेल्या शिफारशींपैकी खालील शिफारशींची अंमलबजावणी करण्यात आली आहे.

१) शिक्षणाचा आकृतिबंध २) शिक्षणाचे व्यावसायीकरण ३) बुकबँक ४) कार्यानुभव ५) द्विस्तरीय अभ्यासक्रम ६) सुधारित वेतनमान ७) राष्ट्रीय शिक्षण संस्था ८) कृषी विद्यापीठाची स्थापना ९) त्रिभाषा सूत्र १०) दुर्बलांचे शिक्षण ११) संस्थांना स्वायत्तता.

२) सर्व शिष्यवृत्यांत वाढ, प्रौढ शिक्षण, शिक्षकांचा दर्जा, विज्ञान शिक्षण, संशोधन याबाबतच्या शिफारशी थोड्या प्रमाणात अमलात आल्या आहेत. स्वातंत्र्योत्तर काळात भारतीय शिक्षणात प्रगती झाली आहे. त्याचा आधार कोठारी आयोग हा आहे. आयोगाने शिफारशी करताना शिक्षणाच्या सर्व अंगांचा विचार केला असल्याने शिक्षणतज्ज्ञ, शिक्षक व इतरांनी या आयोगाचे स्वागत केले आहे.

१९६८ साली त्रिगुण सेन यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या आयोगाने कोठारी कमिशनचा अहवाल मार्गदर्शक मानून शैक्षणिक धोरणाचा अहवाल सादर केला त्यात १) सक्तीचे मोफत शिक्षण २) शिक्षक वेतन, सेवाशर्ती व प्रशिक्षण ३) त्रिभाषासूत्र धोरणात सुधारणा ४) शैक्षणिक संधीची समानता यासंदर्भात शिफारशी केल्या आहेत.

१९७७ साली अभ्यासक्रम पुनरावलोकन समिती व १९७९ साली राष्ट्रीय शिक्षणाचा मसुदा निश्चित करण्यासाठी समिती नियुक्त केली गेली. या समितीच्या शिफारसींना अनुसरून १९८६ साली राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाचा मसुदा तयार करण्यात आला व तो संसदेने स्वीकारला. भारताचे त्यावेळचे पंतप्रधान राजीव गांधी यांनी १९८५ रोजी राष्ट्राला उद्देशून

केलेल्या भाषणात नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण देण्याचे अभिवचन दिले होते. त्याला अनुसरून शिक्षण मंत्रालयाने शैक्षणिक आव्हान एक धोरणात्मक यथार्थ दर्शन हा अहवाल तयार करून सर्व प्रादेशिक भाषांतून त्याला प्रसिद्धी दिली.

त्यावर सर्व स्तरांतून चर्चा झाली. सर्व राज्यांतून परिसंवाद, कार्यशाळा, चर्चासत्रे यांचे आयोजन करण्यात आले त्यातून निष्पन्न झालेले विचार व सूचना यांचे सार एकत्र करून राष्ट्रीय धोरण १९८६ सादर केले गेले. त्यावर राष्ट्रीय विकास परिषदेत, केंद्रीय शिक्षण सल्लागार मंडळाच्या बैठकीत चर्चा होऊन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण १९८६ चा मसुदा लोकसभेने स्वीकारला. (८ मे १९८६) राज्यसभेने त्यास १३ मे १९८६ रोजी मान्यता दिली. या धोरणातील काही महत्त्वाच्या बाबी खालीलप्रमाणे –

१) शिक्षणाचे महत्त्व – शिक्षण हा विकासाचा पाया व परिवर्तनाचे माध्यम आहे. शिक्षणाने एकात्मता विज्ञाननिष्ठा विचारांचे स्वातंत्र्य या गोष्टी आत्मसात होतील. अर्थव्यवस्थेच्या स्तरावर उपयुक्त मनुष्यबळ वाढेल व राष्ट्र स्वावलंबी होईल.

२) राष्ट्रीय शिक्षण पद्धती – भारतीय घटनेतील तत्त्वांना अनुसरून शिक्षण पद्धती असावी यावर तसेच सर्व अभ्यास शाखात सर्वांना शिक्षणाची समान संधी देण्यात यावी यावरही भर देण्यात आला आहे.

३) अर्थपूर्ण भागीदारी – शिक्षण राज्य व केंद्र सरकार यांच्या अधिकारात राहील असे १९५६च्या घटना दुरुस्तीने मान्य केले आहे. त्यामुळे सर्व स्तरांवरील गुणवत्ता वाढावी यासाठी व शिक्षण संस्कृती, मानवी साधनसामग्री याची राष्ट्रीय बाजू केंद्रासच सांभाळावी लागेल.

४) समानतेसाठी शिक्षण – शिक्षणाची संधी ज्यांना मिळाली नाही अशांना ही संधी उपलब्ध करून दिली जावी यावर या धोरणात भर देण्यात आला आहे. प्राथमिक शिक्षण दर्जेदार व्हावे, निरक्षरता दूर व्हावी व समाजातील सर्व घटकांना न्याय मिळावा यासाठी उपाययोजना सुचविण्यात आल्या आहेत.

या धोरणांमुळे सर्वत्र समान आकृतिबंध व समान अभ्यासक्रम सूचित करण्यात आला आहे. त्यात प्रत्येक राज्याच्या सांस्कृतिक, भौगोलिक, ऐतिहासिक वैशिष्ट्यांनुसार इष्ट ते बदल करण्याची लवचिकता ठेवली आहे. व्यवस्थापनासाठी अखिल भारतीय पातळीवर शिक्षण सेवा निर्माण करण्यात यावी, अशी शिफारस केली आहे. १८५७ ते १५ ऑगस्ट १९४७ या ब्रिटिश राजवटीच्या कालावधीत व स्वातंत्र्यप्राप्तीनंतर शिक्षण क्षेत्रात सुधारणा व्हावी व ते सर्वांना प्राप्त व्हावे यासाठी झालेल्या प्रयत्नामुळे शिक्षणाचा प्रसार होऊन त्याची गुणवत्ता वाढण्यास उत्तेजन प्राप्त झाले आहे हे मान्य करावेच लागेल.

त्यामुळे समाजातील पददलित घटक व आर्थिकदृष्ट्या मागासलेल्या व्यक्तींच्या पाल्यांनी प्राप्त झालेल्या सवलतींचा लाभ घेऊन स्वतःच्या प्रगतीबरोबरच आपल्या कुटुंबाची व पर्यायाने समाजाची प्रगती साधण्यात यश प्राप्त केले आहे. शिक्षणप्रसारामुळे साक्षरता प्रमाण वाढले आहे. ही वस्तुस्थिती मान्य करूनही राष्ट्रीय पातळीवर शिक्षणाची सद्यस्थिती काय आहे हे पाहणे भावी वाटचालीच्या दृष्टीने उपकारक ठरू शकेल.

देशपातळीवर विचार केल्यास असे दिसून येते की, स्वातंत्र्यप्राप्ती नंतर मुले व मुली मिळून सर्व स्तरांवर पटसंख्येत मोठी वाढ झालेली आहे. १९५० – ७१ या कालावधीत सर्व स्तरांवरील पटसंख्या २ कोटी ८० लाख होती. ती वाढून १९८२ – ८३ मध्ये ११ कोटी ४० लाख झाली. वाढीचा दर ४.५ टक्के पडतो. १९८४ ते २००७ या कालावधीत सर्व स्तरावरील पटसंख्या के. जी. टू. पी. जी. २३ कोटी होती. १९५० – ८३ पर्यंत प्राथमिक शाळांची संख्या ५ लाख ४ हजार होती. त्यानंतर वाढ होत होत २००७ – ०८ मध्ये ही संख्या १० लाख ४० हजार इतकी झाली.

१९५० – ५१ मध्ये माध्यमिक ते उच्च माध्यमिक शाळांची संख्या २०४८३ इतकी होती. १९८२–८३ मध्ये ही संख्या ६४५८३ इतकी झाली. २००७ – ०८ मध्ये ही संख्या १ लाख ५० हजार झाली आहे. १९५० ते १९८३ या

कालावधीत सामान्य शिक्षणासाठी निर्माण झालेल्या पदवी महाविद्यालयांची संख्या ५२८६ होती. विद्यापीठांची संख्या १४० होती. २००७ – ०८ पर्यंत ही वाढ २२००० इतकी झाली असून विद्यापीठांची संख्या ५४४ इतकी झाली आहे.

२००७ – २००८ मध्ये शिक्षणावर होणार खर्च विचारात घेतला तर हा खर्च १,३३,२८४ कोटी इतका आहे. राष्ट्रीय उत्पन्नाचा विचार करता हा खर्च २.८२ टक्के इतकाच आहे.

महाराष्ट्र राज्याचा विस्तार करता असे दिसून येते की – भारतात शिक्षण क्षेत्रात जी राज्ये अग्रेसर आहेत त्यात केरळ व तामिळनाडू नंतर महाराष्ट्राचा क्रमांक येतो. शैक्षणिकदृष्ट्या महाराष्ट्र हे प्रगत राज्य म्हणून ओळखले जाते. महाराष्ट्रातील साक्षरतेचे प्रमाण ७६.९ टक्के इतके आहे. महाराष्ट्रातील शिक्षणप्रसाराचे श्रेय शासकीय प्रयत्न अनुदानित व विनाअनुदानित तत्त्वावर कार्य करणारे कार्यकर्ते व शिक्षण क्षेत्रात काम करणाऱ्या संस्था व व्यक्ती यांना आहे. महाराष्ट्रातील शिक्षणाची आकडेवारी २००३ – २००४ या वर्षांपर्यंत खालीलप्रमाणे आहे.

१) प्राथमिक शिक्षण – महाराष्ट्रातील प्राथमिक शिक्षण देणाऱ्या शाळांची संख्या ६७९५३ इतकी होती. या शाळातून १ कोटी १३ लाख ७६५ विद्यार्थी शिक्षण घेत होते. शिक्षकांची संख्या ३१५१२६ इतकी आहे.

२) माध्यमिक शिक्षण देणाऱ्या शाळा १७३५६ व त्यामध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या ९००११३ होती. शिक्षकांची संख्या २५१४५० होती.

३) याच कालावधीत ( २००६ – २००७) महाविद्यालयांची संख्या १६३२ असून विद्यार्थी संख्या ११०९०० इतकी होती. शिक्षकांची संख्या ३०००० होती. उच्च शिक्षण देणाऱ्या इतर संस्थांची संख्या ४५ असून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या ४०००० होती. शिक्षकांची संख्या २००० होती.

४) २००६ – २००७ मध्ये कृषी महाविद्यालयांची संख्या अनुदानित २७ व विनाअनुदानित ६१ इतकी असून प्रवेश क्षमता दोन्ही मिळून ८००६ इतकी आहे. पीएच.डी.च्या अभ्यासक्रमासाठी प्रवेशक्षमता १०४ इतकी होती.

५) महाराष्ट्रात पशुवैद्यकीय व मत्स्यविज्ञान विद्यापीठाची स्थापना २००० साली झाली. या विद्यापीठांतर्गत पशुवैद्यक विद्यालये ६ असून एक दुग्धव्यवसाय तंत्रज्ञान महाविद्यालय व एक मत्स्यविज्ञान महाविद्यालय आहे.

६) वैद्यकीय शिक्षणासाठी महाराष्ट्र शासनाने सर्व आरोग्यविषयक अभ्यासाचे एकत्रीकरण करून १९९८ मध्ये नाशिक येथे महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठाची स्थापना केली. राज्यात ३० ॲलोपॅथी, ५३ आयुर्वेदिक व ४३ होमिओपॅथिक व २३ दंत महाविद्यालये आहेत. आरोग्य विद्यापीठाशिवाय अभिमत विद्यापीठाचा दर्जा असलेली ६ वैद्यकीय व ५ दंत महाविद्यालये आहेत.

७) परिचर्या शिक्षणासाठी महाराष्ट्रात पदवीनंतर ७ आणि परिचर्या पदविकेच्या ११९ संस्था आहेत.

२००६ – २००७ या शैक्षणिक वर्षात १६३ पदवी महाविद्यालये, ३७ वास्तुशास्त्राचे शिक्षण देणारी महाविद्यालये, ११६ व्यवस्थापन शास्त्राची महाविद्यालये होती. १८३ अभियांत्रिकी पदविका, १०० वास्तुशास्त्र पदविका, १८ हॉटेल व्यवस्थापन व खाद्यपेय व्यवस्थापन तंत्रज्ञान पदविका, १८० औषधनिर्माण पदविका, ६१ एम. सी.ए. (मास्टर इन कॉम्प्युटर ॲप्लिकेशन) महाविद्यालये व ५६० औद्योगिक प्रशिक्षण संस्था आहेत.

देशातील व महाराष्ट्र राज्यातील शैक्षणिक विकासाची आकडेवारी पाहिल्यानंतर असे दिसून येते की, आज शिक्षणविषयक संधी विपुल प्रमाणात उपलब्ध आहेत. इच्छुकांना या संधीचा फायदा घेऊन स्वतःची प्रगती साधणे शक्य आहे. परंतु विविध समस्यांमुळे विद्यार्थ्यांना दर्जेदार शिक्षण प्राप्त होते असे म्हणणे धाडसाचे ठरू शकेल.

यासंदर्भात वस्तुस्थिती खालीलप्रमाणे आहे –

१) संधी उपलब्ध असूनही देशातील प्रत्येक मूल शाळेत जातेच असे नाही.

२) शाळेत जाणाऱ्या मुलांपैकी २९ टक्के ५ वी नंतर शाळा सोडतात. हे प्रमाण १० वी नंतर ६० टक्केपर्यंत जाते.

३) चौथीपर्यंत शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांना लिहिता – वाचता येत नाही. ही बाब विविध चाचण्यांतून स्पष्ट झालेली आहे.

४) महाविद्यालयातून शिकवले जाणारे बहुतेक पारंपरिक अभ्यासक्रम काळाशी सुसंगत नसल्याने विद्यार्थ्यांना जीवनात यशस्वी होण्यासाठी पुरेशी कौशल्ये प्राप्त होत नाहीत. त्यामुळे सुशिक्षित बेकारांच्या संख्येत दिवसेंदिवस भर पडत आहे.

वरील बाबींचा शासन, संस्थाचालक, शिक्षक व पालक यांनी गांभीर्याने विचार करणे आवश्यक आहे. विद्यार्थ्यांना दर्जेदार शिक्षण प्राप्त व्हावे यासाठी युद्धपातळीवर प्रयत्नांची पराकाष्ठा करणे क्रमप्राप्त आहे. ही प्रक्रिया पूर्वप्राथमिक ते पदव्युत्तर शिक्षणापर्यंत सातत्याने चालू ठेवली पाहिजे. यादृष्टीने विचार केल्यास विविध स्तरांवर कोणत्या दिशेने वाटचाल करावी लागेल, याचा शोध घेतला पाहिजे.

आज रोजी शिक्षणावर होणारा खर्च हा फक्त २.८२ टक्के इतकाच केला जातो. प्रगत व काही विकसनशील देशात या खर्चाचे प्रमाण ६ टक्के इतके आहे. आपणही या शर्यतीत टिकण्यासाठी ५ वर्षांच्या कालावधीत हे प्रमाण किमान ६ टक्के इतके केले पाहिजे. त्याशिवाय दर्जेदार शिक्षण देणे शक्य होणार नाही.

शिक्षणाचा दर्जा सुधारावा यासाठी खालील उपाययोजनांचा अवलंब करावा लागेल.

१) ग्रामीण व शहरी भागातील शाळांना पुरेशा वर्ग खोल्या क्रीडांगण, अभ्यासक्रमानुसार सुसज्ज प्रयोगशाळा उपलब्ध करून द्याव्या लागतील.

२) विद्यार्थ्यांमध्ये वाचनाची आवड निर्माण व्हावी यासाठी ग्रंथालयास प्रत्येक वर्गासाठी विविध विषयांवरील पुस्तकांचे संच (किमान ५० ग्रंथ) पुरवावे लागतील.

३) ज्या प्राथमिक शाळात ५ वी ते ७ वी चे वर्ग उपलब्ध आहेत त्या वर्गांना विषय शिक्षक पद्धतीने अध्यापनाचे कार्य केले जावे.

४) सद्यस्थितीत गुणवत्ताधारक शिक्षक उपलब्ध असतात. त्यांना प्रेरणा देऊन प्रत्येक वर्गात अभ्यासक्रमानुसार किमान क्षमता विद्यार्थ्यांना प्राप्त होतील हे पाहावे. मागास विद्यार्थ्यांसाठी खास मार्गदर्शन सुविधा उपलब्ध करून देऊन त्यांच्या शिक्षणाचा दर्जा सुधारावा लागेल.

५) शिक्षकांच्या कामाचे मूल्यमापन करण्याची योजना तयार करून तिची कार्यवाही करावी लागेल.

६) शिक्षणासाठी उपलब्ध असलेल्या बजेटमधून ४० टक्के रक्कम प्राथमिक शिक्षणावर खर्च करणे बंधनकारक असावे.

माध्यमिक स्तरावर विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासासाठी नियोजनपूर्वक काम करण्याची गरज आहे. माध्यमिक शिक्षण दर्जेदार प्राप्त झाल्यास महाविद्यालयीन स्तरावर शिक्षणाचा दर्जा आपोआपच सुधारेल यासाठी –

१) माध्यमिक शाळांना इमारत, क्रीडांगण, परिपूर्ण प्रयोगशाळा व सुसज्ज ग्रंथालय आदी सुविधा द्याव्यात.

२) एका तुकडीत ४९ पेक्षा अधिक विद्यार्थी असणार नाहीत याकडे लक्ष पुरविले पाहिजे. विनाअनुदान तुकड्या देण्याची प्रथा बंद करण्यात यावी.

३) प्रयोगशाळा अभ्यासक्रमानुसार सुसज्ज असाव्यात. ग्रंथालयात प्रत्येक वर्गासाठी आवश्यक ते संच असावेत. विद्यार्थ्यांना अवांतर वाचनाची गोडी लागावी यासाठी विविध उपक्रम कार्यवाहीत आणावेत.
४) माध्यमिक शिक्षणाचा दर्जा सुधारण्याची जबाबदारी संस्थाचालक, शिक्षक यांनी संयुक्तपणे पार पाडावी. यास्तरावर विद्यार्थी ५ ते १० वी ६ वर्षे विद्यालयात असतात. त्यांच्या ठिकाणी असणाऱ्या उपजत क्षमतांचा वापर करून त्यांचा विकास घडवून आणणे सहज शक्य आहे. ही जाणीव बाळगून कार्य केल्यास यशप्राप्ती आपोआपच होईल.

उच्च शिक्षणासाठी नियुक्त केलेल्या विविध आयोगांनी केलेल्या शिफारशींची कार्यवाही काही प्रमाणात झाल्याने राष्ट्र व राज्य पातळीवर उच्च शिक्षणाचा प्रसार झालेला आहे. पण या संदर्भात आपणास अद्याप बराच पल्ला गाठावयाचा आहे, कारण १६ ते २५ वयोगटातील फक्त ११% मुले – मुली महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी प्रवेश घेतात. प्रगत देशात हे प्रमाण ५०% आहे. जागतिक स्तरावर २३% इतके आहे. यावरून विद्यापीठीय शिक्षणाचा प्रसार होण्यास अद्याप वाव आहे हे दिसून येते. यासाठी दुर्गम भागात ज्या ठिकाणी महाविद्यालये नाहीत, तेथे अनुदानित तत्त्वावर महाविद्यालये सुरू करण्यास प्रोत्साहन द्यावे व इतर सुविधा प्राप्त करून द्याव्यात.

या शिक्षणाचा दर्जा वाढावा यासाठी ट्युटोरिअल पद्धती, सेमिनार चर्चासत्रे आदी नवनवीन पद्धतींचा व तंत्राचा वापर केल्यास विद्यार्थी स्वयंअध्ययन करू शकतील. ग्रामीण व शहरी भागात नव्याने निघालेल्या महाविद्यालयांना ग्रंथालये, प्रयोगशाळा अद्ययावत करण्यासाठी खास अनुदान दिले जावे. फी सवलतीबरोबरच विद्यार्थ्यांना इतर सवलतीही दिल्या जाव्यात. २०१५ पर्यंत आपण किमान जागतिक सरासरी गाठण्याचे उद्दिष्ट समोर ठेवून अभ्यासक्रमाची पुनर्रचना केली गेली पाहिजे. त्यासाठी काही उपाययोजना त्वरित कराव्या लागतील.

सध्याच्या अभ्यासक्रमात बदल करणे ही काळाची गरज आहे. ज्ञानाच्या कक्षा रुंदावत आहेत. परदेशातील विद्यापीठात शिकवल्या जाणाऱ्या अभ्यासक्रमाच्या समकक्ष अभ्यासक्रम भारतातील विद्यापीठातून शिकवले गेले पाहिजेत हे उद्दिष्ट समोर ठेवून अभ्यासक्रमाची पुनर्रचना केली गेली पाहिजे.

पूर्वीपासून उच्च शिक्षणासाठी परदेशात जाण्याची परंपरा आपणाकडे आहे. हे शिक्षण घेतल्याने आपणास करियर चांगल्या प्रकारे घडवता येईल, ही धारणा त्यामागचे प्रमुख कारण आहे. अलीकडे हे प्रमाण वाढलेले आपणास दिसून येते. विद्यापीठीय शिक्षणाच्या अभ्यासक्रमांची पुनर्रचना करताना ते समकक्ष केले की परदेशात जाण्याचे प्रमाण आपोआप कमी होऊन देशाचे अब्जावधी रुपयांचे परकीय चलन वाचेल.

परदेशात शिक्षणासाठी जाणारे बहुतांश विद्यार्थी परदेशातील शिक्षणानंतर तेथेच स्थायिक होण्याचा प्रयत्न करतात. त्यामुळे स्थानिक जनतेत भारतीय विद्यार्थ्यांबाबत असुयेची भावना निर्माण होताना दिसत आहे. युनायटेड किंगडम, युरोपातील प्रगत देश, अमेरिका यांचे बरोबर ऑस्ट्रेलियासारख्या खंडात वंशवाद बळावत असून भारतीय विद्यार्थी व भारतीय लोक यांना अनेक अडचणींना तोंड द्यावे लागत आहे. समकक्ष अभ्यासक्रम व जागतिकीकरणामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीचा फायदा घेऊन परदेशातील विद्यापीठाबरोबर देवाणघेवाणीचे करार करुन त्यांच्या परीक्षांची तयारी येथेच करून घेण्याचे धोरण कार्यवाहीत आणले तर विद्यार्थी फक्त परीक्षेसाठीच तिकडे जातील किंवा परीक्षाही इकडे घेता येईल.

त्यामुळे वाचणारे अब्जावधी परकीय चलन विकासाच्या कामासाठी उपयोगात आणता येईल. त्यासाठी प्रारंभी केंद्रीय व काही निवडक विद्यापीठात ही योजना क्रमाक्रमाने कार्यवाहीत आणली जावी. त्यासाठी आवश्यक सुविधा शासनाने उपलब्ध करून द्याव्यात.

उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात मेडिकल व इंजिनीयरिंगच्या शिक्षणाबद्दल फार मोठे आकर्षण आहे. आपला मुलगा अगर मुलगी डॉक्टर, इंजिनीयर झाली म्हणजे गंगेत घोडे न्हाले ही कृतार्थतेची भावना पालकांची असते. विनाअनुदान पॅटर्न सुरू होण्यापूर्वी महाराष्ट्रात या क्षेत्रातील जागा मर्यादित असल्याने इतर प्रांत अगर परदेशात या शिक्षणासाठी प्रचंड खर्च करून पालक आपली मुले पाठवत असत. या मुलांना येथेच शिक्षणाची संधी उपलब्ध करून दिली तर बाहेर देणग्या देऊन प्रवेश घेण्याची प्रवृत्ती थांबेल या अपेक्षेने महाराष्ट्र शासनाने विनाअनुदान तत्त्वावर मेडिकल व इंजिनीअरिंग कॉलेजेस काढण्याचे धोरण स्वीकारले.

अनेक व्यक्ती व संस्था यांनी या सुवर्ण संधीचा लाभ घेऊन ही महाविद्यालये सुरू केली, या महाविद्यालयात प्रवेशासाठी पालकांना लाखो रुपयांच्या देणग्या द्याव्या लागतात. नुकतेच लोकसभेत या विषयावर चर्चा करीत असताना एका खासदारानी मेडिकलच्या पदव्युत्तर वर्गाच्या प्रवेशासाठी १ कोटी रुपये देणगी द्यावी लागते असे विधान केले होते यावरून या प्रश्नाचे गांभीर्य स्पष्ट होते. ही महाविद्यालये चालवणाऱ्यांनी आपल्या संस्थांना अभिमत विद्यापीठाचा दर्जाही मिळवलेला आहे.

१९५४ साली दिल्ली येथे भरलेल्या अखिल भारतीय शिक्षण परिषदेचे उद्‌घाटन करताना त्यावेळचे राष्ट्रपती डॉ. बाबू राजेंद्रप्रसाद यांनी या संदर्भात खालील उदाहरण दिले होते. पूर्वी दारात हत्ती असणे हे प्रतिष्ठेचे लक्षण मानले जात असे. परंतु आजकाल शिक्षण संस्था चालवणे हे प्रतिष्ठेचे लक्षण मानले जाते. विनाअनुदान तत्वाचा स्वीकार केल्याने ही प्रतिष्ठाही आजकाल नाहीशी झालेली आहे.

विनाअनुदान शिक्षण या धोरणामुळे जे गैरप्रकार सुरू आहेत ते थांबावेत यासाठी जनतेने जागृत होऊन उपाय शोधण्याची गरज निर्माण झाली आहे. त्यासाठी या धोरणांचा पुनर्विचार करणे आवश्यक बनले आहे. भारतीय घटनेच्या कलम ४५ अन्वये मुलांना वयाच्या १४ वर्षापर्यंतचे सक्तीचे मोफत शिक्षण देण्याची जबाबदारी केंद्र व राज्य सरकारवर आहे ती त्यांना टाळता येणार नाही. यास्तव –

१) प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षणाची जबाबदारी शासनाने स्वीकारली पाहिजे. उच्च माध्यमिकपर्यंतच्या शाळा ज्या संस्था चालवतात त्यांना नियमानुसार अनुदान देण्याचे बंधन सरकारने स्वीकारले पाहिजे.
२) सर्वसामान्य महाविद्यालये तालुका स्तरापर्यंत असावीत या धोरणानुसार जेथे ती नाहीत तेथे तसेच दुर्गम भागातील प्रमुख ठिकाणीही ती अनुदान तत्त्वावर चालवावीत.
३) विनाअनुदान तत्त्वावर डी. एड., बी. एड. इंग्रजी माध्यमाच्या शाळा, इंजिनीअरिंग व इतर कोर्सेस चालवणाऱ्या ज्या संस्था किमान पात्रता राखू शकत नाहीत, त्यांची मान्यता रद्द करावी.
४) या क्षेत्रात नवीन संस्था सुरू करण्यास कोणत्याही कारणास्तव परवानगी देऊ नये.
५) शासन आज ज्या शाळा व महाविद्यालये चालवीत आहे व ज्यांना अनुदान देत आहे त्या संस्था अधिक कार्यक्षमतेने चालवण्यासाठी प्रयत्न केल्यास शिक्षण क्षेत्राचे पावित्र्य राखले जाईल, अशी अपेक्षा करणे योग्यच ठरेल.

प्रयोगशीलता हा विकासाचा आत्मा होय. आज कृषी, उद्योजकता, विज्ञान, आरोग्यविज्ञान व शिक्षण आदी क्षेत्रांत झालेली प्रगती संबंधितांनी केलेल्या प्रयोगामुळेच झालेली आहे. पूर्वी ‘छडी लागे छम छम विद्या येई घम घम’ या संकल्पनेवर शिक्षण पद्धती व शालेय शिस्त आधारित असे. शिक्षेचे प्रकार भयानक असत. त्यामुळे शाळेत जाणे

नको असे साहजिकच मुलांना वाटत असे. यात बदल होत होत शाळाही आनंददायी व्हावी व असावी यासाठी झालेल्या प्रयत्नातून आज बाल शिक्षणात माँटेसरी मेथड व किंडर गार्टन या पद्धतीचा उगम व प्रसार झाला. मुलांना शिक्षा करण्यात येऊ नये ही संकल्पना दृढ झाली व अशी शिक्षा करण्याचा अधिकार अपवादात्मक परिस्थितीत शाळाप्रमुखांना असेल त्यांनी त्याचा वापर In good faith moderate basis वर करणे उचित ठरेल असा निर्णय सुप्रीम कोर्टाने दिलेला आहे. त्यामुळे शिक्षणही आनंददायक कृती व्हावी हे शिक्षणाचे प्रमुख उदिष्ट मानले जाते.

विद्यार्थ्यांस ज्ञानप्राप्ती व्हावी, त्यांच्या अंगी असणाऱ्या उपजत गुणांचा विकास व्हावा व एक कर्तव्यदक्ष नागरिक म्हणून त्याने सक्षमरीत्या आपली भूमिका पार पाडावी यासाठी शिक्षण दिले जावे या दृष्टिकोनातून शिक्षणाची उद्दिष्टे निश्‍चित करून ती प्रत्यक्षात आणण्यासाठी प्रयत्न केले जात आहेत. शिक्षणाने विद्यार्थ्यांच्या प्रगतीबरोबरच त्यांचा सर्वांगीण विकास व्हावा, तसेच शाळा ही सामाजिक विकासाचे केंद्र बनावे यासाठी ठिकठिकाणी प्रयोग चालू आहेत. त्यापैकी काही प्रयोगांचा व उपक्रमांचा उल्लेख येथे करणे उपकारक ठरेल.

पाश्‍चात्त्य देशात पूर्वप्राथमिक शिक्षणाचे कार्य १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात किंडर गार्टन या पद्धतीद्वारा सुरू झाले. आपल्या देशातही वरील पद्धतीनुसार पूर्वप्राथमिक शिक्षणास प्रारंभ झाला. या क्षेत्रात गिजुभाई बधेका व ताराबाई मोडक यांनी भरीव कामगिरी केली आहे. माँटेसरी पद्धतीने भारावून जाऊन गिजुभाई बधेका यांनी भावनगर येथे दक्षिणमूर्ती बालमंदिराची स्थापना केली. त्यांच्याच कार्याने प्रभावित होऊन श्रीमती ताराबाई मोडक यांनी ठाणे जिल्ह्यातील कोसबाड या डोंगरी विभागात ग्रामबाल शिक्षण केंद्र स्थापन केले. त्यांनी सुरू केलेल्या अंगणवाडीमुळे पूर्वप्राथमिक शिक्षण आदिवासी मुलांच्या दारापर्यंत पोहोचले. अनुताई वाघ यांच्या नेतृत्वाखाली कोसबाड येथे ग्राम बाल शिक्षण केंद्र स्थापन होऊन बाल सेविका प्रशिक्षण केंद्र, अंगणवाडी केंद्र, सहज शिक्षण केंद्र आदी उपक्रम चालू आहेत. आज पूर्वप्राथमिक शिक्षणाचा प्रसार सर्वत्र झालेला दिसत आहे. आज रोजी अंगणवाडीच्या माध्यमातून ग्रामीण भागातही पूर्वप्राथमिक शिक्षणाची सुविधा उपलब्ध आहे.

भारतीय शिक्षण संस्था पुणे यांचे मार्फ त पुणे जिल्ह्यात भौगोलिक वेगळेपण असणाऱ्या ५ विभागांत ९ते १४ या वयोगटातील शाळेबाहेरील मुलांसाठी हा उपक्रम १९७९ पासून राबवला जातो. या अंशकालीन शिक्षण पद्धतीत प्रत्येक वर्गात २० मुलांना प्रवेश दिला जातो. त्यात निरक्षरांना प्राधान्य दिले जाते. वर्षातील ३०० दिवस असे दोन वर्षे कार्यात्मक शिक्षण चालते. १९८८ पासून या धर्तीवर देशभर कार्य चालू आहे.

हा प्रकल्प प्रभाकर लिमये यांच्या संकल्पनेतून साकार झाला आहे. मुख्याध्यापक म्हणून माध्यमिक शाळात काम करीत असताना आपला गाव व परिसरातील विद्यार्थ्यांना किमान शिक्षण प्राप्त व्हावे यासाठी त्यांनी पाली सुधागड जवळील पडसरे या गावी १९८१ ते १९८६ या कालावधीत या प्रकल्पाची कार्यवाही केली आहे. १०० दिवसांच्या कालावधीत मुलांच्या मोकळ्या वेळेनुसार व सोईनुसार नेहमीच्या शाळेतील अभ्यासक्रम पूर्ण करून शाळातील परीक्षांच्या निकषानुसार परीक्षा घेणे हे या प्रयोगाचे वैशिष्ट्य होय. हे कार्य ज्ञानप्रबोधिनी, अभिनव प्राथमिक शाळा, भावे प्राथमिक शाळा, न्यू इंग्लिश स्कूल, टिळक रोड या शाळांचे मुख्याध्यापक व शिक्षक यांच्या सहकार्याने पाच वर्षे यशस्वी रीतीने चालू आहे. त्यामुळे पर्यायी शाळा म्हणून भारत सरकारने या प्रयोगाचा स्वीकार केला आहे. युनिसेफच्या वतीने या प्रयोगाचा केस स्टडी करून त्याचा अहवाल मुख्य कार्यालयास सादर केला आहे.

महाराष्ट्रात साखर कारखान्यांची संख्या भरपूर आहे. साखरेच्या हंगामात ऊसतोडणीसाठी मराठवाडा व नगर जिल्ह्यातील ऊसतोडणी कामगार इतरत्र स्थलांतरित होत असतात. त्यांच्याबरोबर त्यांची मुलेही असतात. त्यामुळे त्यांचे शिक्षण अर्धवट राहते. त्यांनाही शिक्षण मिळावे यासाठी १९९० ते १९९५ या कालावधीत शंभर दिवसांची साखर शाळा हा प्रकल्प ज्ञान प्रबोधिनीचा प्रचीती गट व बल्लाळेश्‍वर प्रतिष्ठान यांच्या वतीने या शाळा चालवल्या

गेल्या. २००० साली या प्रयोगाची उपयुक्तता ध्यानात घेऊन महाराष्ट्र शासनाने या शाळांना मान्यता व अनुदान दिले आहे. या शाळांत मुलांनी प्रवेश घ्यावा यासाठी शासन प्रोत्साहन देते.

सौ. रजनीताई परांजपे या डोअर स्टेप स्कूलच्या संस्थापिका आहेत. प्राथमिक शाळेत जाण्याच्या वयातील लाखो मुले शाळेत जातच नाहीत. गरिबीमुळे पालकही त्यांना पाठवायला तयार नसतात. हे थांबविण्यासाठी मुले जिथे आहेत. तिथे त्यांच्यासाठी शाळा सुरू केली तर त्यात बदल होऊ शकेल काय? या प्रश्नाचे उत्तर शोधण्याच्या प्रयत्नातून डोअर स्टेप स्कूलच झाला. तीन ते चौदा या वयोगटातील मुलांना त्यांच्या वेगवेगळ्या गरजांनुसार विविध माध्यमांतून शिक्षण देण्याचा प्रयत्न केला जातो. झोपडपट्ट्या, वाड्या वस्त्या, मजुरांच्या कामाची ठिकाणे या ठिकाणी राहणाऱ्या मुलांना शाळेबद्दल ओढ निर्माण व्हावी यासाठी डोअर स्टेप स्कूलमार्फत अनेक उपक्रम राबवले जातात.

बालवाडीत मुलांना प्रवेश देऊन अनौपचारिक शिक्षणाद्वारा त्यांची बौद्धिक तयारी करून घेतली जाते. त्यानंतर त्यांना जवळच्या महापालिकेच्या शाळेत दाखल केले जाते. त्यांच्यासाठी शाळेच्या वेळेनंतर अभ्यास वर्ग चालवले जातात.

प्राथमिक शाळेत जाण्याच्या वयोगटापेक्षा मोठ्या मुलांना व्यवहारात उपयोगी पडणाऱ्या गोष्टी शिकवल्या जातात. या चळवळीत २५० पेक्षा जास्त सेवक वर्ग सध्या कार्यरत आहेत.

१) डॉ. राजाराम गंगाधर दांडेकर व रेणुताई दांडेकर या दाम्पत्याने नियोजनपूर्वक शहरी व ऐषारामी जीवनाचा त्याग करून १९८२ पासून लोकमान्य टिळकांचे लहानपणी वास्तव्य असलेल्या कोकणातील चिखलगावात लोकमान्य सार्वजनिक धर्मादाय न्यासामार्फत शिक्षणासाठी प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळा, वसतिगृह, अध्यापक विद्यालय या संस्थांद्वारा परिसरातील ४६ गावांत शिक्षणाच्या प्रसाराबरोबरच शेती, आरोग्य, ग्रामीण विकासाचे कार्य हाती घेऊन हा परिसर विकसित करण्यात यश संपादन केले आहे. हे करत असताना शिक्षणाची गुणवत्ता वृद्धिंगत व्हावी यासाठी परिश्रम घेतले आहेत. शैक्षणिक संस्था केंद्रबिंदू मानून त्या अनुषंगाने शिक्षणसंस्था ही खऱ्या अर्थाने Community centre म्हणून नावारूपाला आणली आहे. तसेच डॉ. कलबाग यांच्या मूलभूत ग्रामीण तंत्रज्ञानाचा प्रसार व्हावा यासाठी प्रयत्न केला आहे.

हेमलकसा परिसरातील गोंड व माडियांना आरोग्य सेवाबरोबरच शिक्षण दिले जावे या उद्देशाने श्री. बाबा आमटे यांनी लोक बिरादरी प्रकल्पात एक आश्रमशाळा सुरू केली. गोंड माडियांच्या मुलांना शिक्षण प्राप्त होऊन ती सुसंस्कारित व स्वावलंबी बनावीत हा त्यामागे प्रमुख उद्देश होता. मातृभाषेतून शिक्षण दिल्यास ते विद्यार्थ्यांच्या विकासासाठी उपकारक ठरते. यासाठी त्यांनी शिक्षकांना माडिया भाषेचे ज्ञान संपादन करण्यास प्रोत्साहन दिले. त्यामुळे आश्रमशाळेतील मुलांना माडिया भाषेतून मराठीचे शिक्षण दिले जाते. त्याचबरोबर धंदे शिक्षण व शेतीची कामेही त्यांना शिकविली जातात.

तसेच व्यवहारात उपयोगी पडणारे अनौपचारिक शिक्षणही मुलांना प्राप्त होईल याची काळजी घेतली जाते. मुलांच्या कलागुणांनाही वाव मिळत असल्याने विद्यार्थी नवे विचार आत्मसात करून आपल्या पालकांना पारंपरिक रूढी पाळणे, दारू पिणे या पासून परावृत्त करताना दिसून येतात. त्यामुळेही शैक्षणिक संस्था ही खऱ्या अर्थाने समाज विकासाचे केंद्र बनली आहे.

पाबळ - डॉ. श्रीनाथ कलबाग यांना अमेरिकेत पीएच. डी. चा अभ्यास करताना अमेरिकन शेतकरी दैनंदिन जीवनात विज्ञान तंत्रज्ञानाचा वापर करतात, हे लक्षात आल्याने त्यांना भारतातही याच प्रमाणे

ग्रामीण भागात विज्ञान तंत्रज्ञानाचा वापर करणे शक्य आहे याची प्रेरणा प्राप्त झाली. भारतात परतल्यानंतर विविध पदांवर काम करून त्यांनी स्वेच्छानिवृत्तीनंतर (म्हणजे १९८२) पुणे जिल्ह्यातील पाबळ येथे विज्ञान आश्रमाची स्थापना केली. विद्यार्थ्यांनी काम करीत शिकावे हीच शिक्षणाची खरी पद्धत आहे. या संकल्पनेतून त्यांनी ग्रामीण जीवनात परिवर्तन घडावे यासाठी ग्रामीण तंत्रज्ञान हा अभ्यासक्रम तयार केला व त्यानुसार विद्यार्थ्यांना शिक्षण देण्यास प्रारंभ केला. कामाच्या माध्यमातून विज्ञान, गणित या विषयांचे ज्ञान विद्यार्थ्यांना प्राप्त झाल्याने ते स्वतःचा व्यवसाय करतात. त्यामुळे ग्रामीण परिसराचाही विकास होण्यास हातभार लागत आहे. स्थानिक गरजांची पूर्ती करण्यासाठी विविध तंत्रज्ञान प्रकल्प हाती घेऊन त्याद्वारे पाबळ, जियोडेटिक डोम ही कमी खर्चातली घरे, भूगर्भातील पाण्याचा शोध घेण्यासाठी यंत्र निर्मिती, छोट्या शेतीसाठी मेकवूल ट्रॅक्टर या प्रकल्पांची फलनिष्पत्ती हेच या प्रकल्पांचे यश होय.

आश्रमात १९८७ पासून ८ वी ते १० वी या वर्गासाठी ग्रामीण तंत्रज्ञान हा अभ्यासक्रम सुरू करण्यात आला आहे. २००३ पर्यंत २३ शाळांतून या अभ्यासक्रमाची कार्यवाही चालू आहे. तसेच ७ वी उत्तीर्ण झालेल्या शाळा बाहेरील विद्यार्थ्यांना ग्रामीण तंत्रज्ञान हे प्रात्यक्षिक अभ्यासक्रम अनौपचारिक पद्धतींनी शिकविले जातात. त्यात भूजल विकास, बांधकाम, वर्कशॉप, ऊर्जा, पर्यावरण, शेती, पशुपालन, ग्रह आरोग्य या विषयांचा समावेश करण्यात आला आहे. शिक्षणाच्या माध्यमातून ग्रामीण विकास या संकल्पनेचा विकास व प्रसार करण्याच्या या कार्याचे अनुकरण व्हावे यासाठी भारतीय वंशाच्या लंडन येथील उद्योगपतीने या कार्यासाठी १ लाख पौंडाची देणगी दिलेली आहे. त्यातून आणखी चार केंद्रांची निवड करून या प्रकल्पाचे विस्तारीकरण होणार आहे.

शिक्षणाद्वारे समाजाचा विकास व्हावा यासाठी समाजातील बुद्धिवान विद्यार्थ्यांना एकत्रित करून त्यांच्या सुप्त गुणांच्या विकासाबरोबरच त्यांना देशापुढील विविध समस्यांचा परिचय व्हावा व त्यांची उकल करण्याचे सामर्थ्य प्राप्त व्हावे या हेतूने डॉ. अप्पासाहेब पेंडसे यांनी १९६४ मध्ये पुणे येथे ज्ञानप्रबोधिनीची स्थापना केली.

ही प्रशाला ५ वी ते १० वी पर्यंतचे शिक्षण प्रदान करीत असून ती दिल्लीच्या केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळाशी (CBSE) संलग्न आहे. येथे चाचणी परीक्षेद्वारा प्रवेश दिला जातो. शालेय अभ्यासक्रमाबरोबरच सर्वांगीण विकासासाठी प्रकल्प पद्धतीत वाचन कौशल्याने,अभिव्यक्ती विकास, परिस्थितीज्ञान, अभ्यास, शारीरिक शिक्षण, क्रीडाशिबिरे, साहस सहली आदी उपक्रम राबवले जातात.

देशापुढील समस्यांचे ज्ञान व्हावे यासाठी विद्यार्थ्यांना विविध ठिकाणी जाऊन कार्य करण्याची संधी उपलब्ध करून दिली जाते. अभ्यासाबरोबर वैज्ञानिक दृष्टिकोनाचा विकास व्हावा यासाठी प्रयत्न केले जातात. इ. नववी पासून संगणकावर काम करण्याची संधी दिली जाते. व्यवस्थापन, समयनियोजन, स्वाध्याय व उपयुक्त कौशल्ये आत्मसात करण्याची संधी विद्यार्थ्यांना येथील शिक्षण पद्धतीद्वारा दिली जाते.

ज्ञानप्रबोधिनीतून तयार झालेले विद्यार्थी विविध क्षेत्रांत आघाडीवर असलेले दिसून येतात. खेड शिवापूर व परिसरातील विद्यार्थ्यांना तंत्रज्ञानाचे शिक्षण देऊन त्यांना स्वावलंबी बनवण्याचा प्रयत्न प्रबोधिनीमार्फत केला जातो. याचा लाभ जवळजवळ १००० तरुणांना झाला आहे. शिवगंगा, गुंजवणी खोऱ्यातील १७० खेड्यांमध्ये कुष्ठरोग, क्षयरोग निवारण व अन्य वैद्यकीय सेवेचे काम प्रबोधिनी करत आहे. शैक्षणिक जगतात 'रूप पालटू देशाचे' ही भावना युवकांमध्ये जागविणारा हा पथदर्शी प्रकल्प मानला जातो.

नांदेड जिल्ह्यात महाराष्ट्र, आंध्र व कर्नाटक यांच्या सीमेवर असलेल्या सगरोळी या गावात बाबासाहेब देशमुख यांच्या नेतृत्वाखाली संस्कृतिसंवर्धन मंडळातर्फे या नगराची स्थापना करण्यात आली आहे. येथे संस्थेने चालवलेल्या छत्रपती शिवाजी हायस्कूलला जोडून असलेल्या वसतिगृहात १४०० विद्यार्थी राहतात. पाळणाघर ते उच्च माध्यमिकपर्यंत शिक्षणाची सोय येथे आहे. सर्व स्तरांवर दर्जेदार शिक्षण प्राप्त व्हावे यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले जातात. इयत्ता ८

वी च्या विद्यार्थ्यांसाठी आत्मचरित्रलेखन प्रकल्प प्रारंभापासून कार्यवाहीत आणला जातो. येथील विज्ञान मंडळाचे प्रकल्प सातत्याने राज्यपातळीवर प्रशंसापात्र ठरतात. १९८८ मध्ये स्वयंचलित जलसिंचन प्रकल्प राज्यात प्रथम क्रमांकाचा ठरला, तसेच राष्ट्रीय पातळीवरही सर्वप्रथम येण्याचा मान त्यास प्राप्त झाला आहे.

यांच्या वतीने उत्तर विभागातील सात्रळ, जि. नगर येथील विद्यालयात १० वीच्या विद्यार्थ्यांसाठी ४५ दिवसांचा गुणवत्ता वाढ प्रकल्प १९७९-८० या कालावधीत आयोजित केला होता.

या वर्गात ज्याला ८ वीच्या वार्षिक परीक्षेत किमान ७० टक्के व ९ वीच्या पहिल्या सत्र परीक्षेत ७० टक्के गुण प्राप्त झाले होते, त्यांना प्रवेश दिला गेला. त्यांना अभ्यासाचे तंत्र समजावून देणे, स्वयंअध्ययनाची सवय लावणे, परीक्षा तंत्राची माहिती देणे व १० वीचा ७५ टक्के अभ्यासक्रम पूर्ण करणे यावर भर देण्यात आला होता. तसेच ४ युनिट टेस्टही घेतल्या होत्या. या विद्यार्थ्यांच्या १० वी परीक्षेच्या निकालानंतर त्यांना ९ वीच्या सत्र परीक्षेत मिळालेले गुण व १० वीच्या परीक्षेत मिळालेले गुण यांचा तुलनात्मक अभ्यास केला असता असे दिसून आले की, उन्हाळी सत्रात ३० दिवस व हिवाळी सत्रात १५ दिवस उपस्थित असणाऱ्या विद्यार्थ्यांच्या गुणामध्ये सरासरीने ८.६ टक्केवाढ झालेली होती. फक्त प्रथम सत्रात उपस्थित असणाऱ्या विद्यार्थ्यांच्या टक्केवारीत ८.२५ टक्केवाढ झालेली होती.

या ४५ विद्यार्थ्यांत ९ वीच्या सत्र परीक्षेत ८० टक्क्यांपेक्षा अधिक गुण मिळवणारे विद्यार्थी फक्त दोन होते. एस. एस. सी. परीक्षेत ३२ विद्यार्थ्यांना ८० टक्क्यांपेक्षा अधिक गुण प्राप्त झाले होते. विद्यार्थ्यांना योग्य मार्गदर्शनाचा फायदा होतो असे दिसून आल्याने याच धर्तीवर १० वी व १२ वीच्या विद्यार्थ्यांनाही उन्हाळी व हिवाळी सुट्टीत मार्गदर्शन करण्याची प्रथा संस्थेच्या सर्व विभागांत आजही चालू आहे.

हा प्रकल्प संस्थेच्या महाराजा सयाजीराव विद्यालयात १९९५ पासून कार्यवाहीत आणला जात आहे. चाचणी परीक्षा घेऊन ४० विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जातो. विद्यार्थ्यांचा शैक्षणिक दर्जा सुधारणे, त्यांना स्वयंअध्ययनाची सवय लावणे, स्वावलंबनाचे महत्त्व बिंबवणे व स्पर्धा परीक्षांची तयारी करून घेणे ही या प्रकल्पाची प्रमुख उद्दिष्टे आहेत.

सकाळी सफाई, प्रार्थना व व्यायाम या नंतर ८.३० ते १०.३० शिक्षकांच्या देखरेखीखाली अभ्यास, १२.३० ते ५.५० विद्यालयीन कामकाज, ६ ते ७ खेळ. भोजनोत्तर ७.४५ ते ९.३० अभ्यास, ९.३० ते १०.३० लिखाण पाठांतर ही विद्यार्थ्यांची दिनचर्या असते. या विद्यार्थ्यांना ८ वीत प्राप्त झालेले गुण व १० वीच्या बोर्डाच्या परीक्षेत प्राप्त झालेले गुण यांचा ५ वर्षांतील तुलनात्मक अभ्यास केला असता असे दिसून येते की, सरासरीने या विद्यार्थ्यांना १० वीच्या परीक्षेत ५ टक्के गुण अधिक प्राप्त झालेले आहेत.

उपेक्षित प्रज्ञावान विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास हे या प्रकल्पाचे प्रमुख उद्दिष्ट आहे. या अनौपचारिक शैक्षणिक प्रकल्पाचा जन्म आंतरराष्ट्रीय बालक वर्षाच्या निमित्ताने १३ मे १९७९ साली झाला. या प्रकल्पासाठी इ. ५ वी मध्ये शिकत असलेल्या महानगरपालिका किंवा खाजगी शाळातील मुलांची बुद्धिमत्ता चाचणी घेऊन निवड केली जाते. सध्या या संस्थेच्या १३ शाखांच्या माध्यमातून ६०० विद्यार्थी प्रकल्पात सहभागी झाले आहेत. सायं. ६ ते ९ या शाळांचे कामकाज चालते. ६ ते ७ या काळात खेळ व व्यायाम करवून घेतला जातो. त्यामुळे विद्यार्थ्यांचा थकवा दूर होऊन ते ज्ञान ग्रहणास तयार होतात. ७ ते ९ कालावधीत इंग्रजी व गणित या दोन विषयासंबंधी मार्गदर्शन केले जाते. स्वयंअध्ययन व अभ्यास पूरक कौशल्ये विद्यार्थ्यांनी आत्मसात करावीत यासाठीही त्यांना मार्गदर्शन केले जाते. संस्थेचे कार्यकर्ते विद्यार्थ्यांशी वैयक्तिक संपर्क ठेवून त्यांच्या अडीअडचणी दूर करतात. त्यांना प्रोत्साहित करतात. या प्रकल्पात सहभागी झालेले विद्यार्थी डॉक्टर, इंजिनीयर, शिक्षक, प्राध्यापक, सी.ए., शासकीय व खाजगी

क्षेत्रात उच्च पदावर कार्यरत आहेत. त्यांच्यापैकी बहुतांश समाज विकासाच्या कार्यात रस घेत आहेत. या शिवाय या संस्थेच्या वतीने पाकोळी बालवाडी, उद्योग शिक्षण वर्ग, साक्षरता वर्ग, स्पर्धा परीक्षा, मार्गदर्शन, फिरती प्रयोगशाळा व ग्राम विकास प्रकल्प आदी उपक्रम राबविले जात आहेत.

विज्ञानाचा कंदील घेऊन खेडोपाडी विज्ञानाचा प्रसार व्हावा यासाठी पुणे येथे कार्यरत असलेल्या संस्थेच्या कार्यास १९९४ रोजी फिरत्या प्रयोगशाळेने प्रारंभ झाला. ग्रामीण विद्यार्थ्यांना स्वत: प्रयोग करण्याची संधी विज्ञान वाहिनीद्वारा उपलब्ध करून दिली जाते. या योजनेत ग्रामीण विभागातील शाळा आनंदाने सहभागी होत आहेत. तसेच विद्यार्थीही स्वेच्छेने या संधीचा लाभ घेताना दिसून येतात. विद्यार्थ्यांना वैज्ञानिक ज्ञान देणे व त्यांचा दृष्टिकोन वैज्ञानिक बनावा यासाठी प्रयोग करणे हे प्रमुख उद्दिष्ट समोर ठेवून या संस्थेचे कार्य चालते. आंध्र, तामीळनाडू आदी राज्यांत या प्रयोगाचे अनुकरण केले जात आहे.

जनकल्याण समिती, ठाणे या संस्थेद्वारा ठाणे जिल्ह्यातील शहापूर व मुरबाड या ग्रामीण तालुक्यातील ५६ शाळांमध्ये फिरती विज्ञानशाळेचा उपक्रम कार्यरत आहे. या उपक्रमाचा प्रारंभ १९९० मध्ये श्रीरंग पिंपळीकर यांनी केला. इ. ५ वी ते ७ वीच्या विद्यार्थ्यांसाठी ४६ केंद्रांवर विद्यार्थ्यांना विज्ञान शिक्षण व प्रयोग करण्याची संधी उपलब्ध करून दिली जाते. वर्षातून ६ वेळा केंद्रांना भेटी देऊन अभ्यासक्रमातील ८०% प्रयोग पूर्ण केले जातात. दरवर्षी ६ हजार विद्यार्थी या योजनेचा लाभ घेतात. या विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास व्हावा यासाठी व्यक्तिमत्त्व विकास शिबिर प्रतिवर्षी आयोजित केले जाते. त्यात ३०० विद्यार्थी सहभागी होतात.

या संस्थेच्या कार्यास १९९८च्या जुलै महिन्यात प्रारंभ झाला. प्रथम जिल्ह्यातील ज्या शाळांनी या कार्यात सहभागी होण्याची इच्छा प्रदर्शित केली, त्या शाळांमधून या कार्यास प्रारंभ केला गेला. संस्थेद्वारा शाळांना ११ ते ५ या कालावधीत भेटी देऊन विद्यार्थ्यांना प्रयोग करण्याची संधी दिली जाते. त्यानंतर सोप्या वैज्ञानिक कृती व त्यावर आधारित चर्चा केली जाते. चर्चेच्या साहाय्याने विद्यार्थ्यांचा दृष्टिकोन वैज्ञानिक व्हावा यासाठी प्रयत्न केले जातात. आज या संस्थेद्वारा ७४० माध्यमिक शाळांना भेटी देऊन ६५००० विद्यार्थ्यांना या योजनेत सहभागी करून घेण्यात आले आहे.

देशपातळीवर तसेच महाराष्ट्रात स्वातंत्र्यपूर्व काळात व स्वातंत्र्यानंतरही सामाजिक व आर्थिक विषमतेमुळे समाजात उच्च-नीच भावना अस्तित्वात होती व आजही काही प्रमाणात आहे. स्पृश्यअस्पृश्य भेद १८ व्या शतकात व १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात टोकाचे होते. ब्रिटिशांच्या राज्यात हे भेद हळूहळू कमी होण्यास प्रारंभ झाला. काही समाज सुधारकांनी त्यांच्या शिक्षणासाठी संस्था सुरू केल्या. १९४८ साली महात्मा फुले यांनी मुलींची व त्यानंतर अस्पृश्यांच्या मुलांसाठी रास्तापेठेत शाळा सुरू केली. १९०६ साली महर्षी शिंदे यांनी डिप्रेस्ड क्लासेस मिशनची स्थापना करून मागासवर्गीयांसाठी वसतिगृहे सुरू केली. सातारा येथे कर्मवीर भाऊराव पाटील यांनी छत्रपती शाहू बोर्डिंगची स्थापना करून सदर वसतिगृहात सर्व जातीधर्मांच्या मुलांना एकत्रित केले व त्यांनी एकत्र राहून सर्व व्यवहार पार पाडणे हा सामाजिक ऐक्याचा प्रयोग केला व तो यशस्वी झाला. या प्रयोगाची दखल महात्मा गांधींनी घेऊन 'भाऊराव मला साबरमती आश्रमात जे शक्य झाले नाही ते तुम्ही प्रत्यक्षात आणले हे तुम्हास भूषणावह आहे'. या शब्दात सामाजिक समता व समरसतेच्या या प्रयोगाची प्रशंसा केली. कालांतराने या प्रयोगाचे अनुकरण सर्वत्र होऊ लागले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सर्व नागरिकांना समान अधिकार प्राप्त झाले. त्यामुळे सार्वजनिक ठिकाणी सर्वांना मुक्त प्रवेश मिळू लागला. मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या वसतिगृहातून १०% जागा स्पृश्य विद्यार्थ्यांसाठी राखीव ठेवण्यात आल्या. स्वातंत्रप्राप्तीनंतर आदिवासी विद्यार्थ्यांसाठी आश्रमशाळा चालवल्या जातात. त्यामुळे समाजातील भेद दूर होऊ लागले आहेत. तरीही मागास व

भटक्या विमुक्तांचे प्रश्न आजही सुटलेले दिसत नाहीत. प्रा. रामनाथ चव्हाणांनी भटक्या विमुक्तांची जात पंचायत या ५ खंडात्मक आपल्या ग्रंथात ४२ जातींची माहिति व परिचय करून दिला आहे. त्यात या समाजाबद्दल माहिती देताना ते म्हणतात, भटक्या विमुक्तांची भारतातील संख्या ६ कोटीपेक्षा जास्त आहे. महाराष्ट्रात ही संख्या ६० लाखांपेक्षा जास्त आहे. परंतु महाराष्ट्रासारख्या पुरोगामी राज्यात दलित, आदिवासी, भटके विमुक्त व अल्पसंख्याक यांची संख्या १/३ पेक्षा जास्त असूनही त्यांच्या कल्याणासाठी अर्थसंकल्पात ५ ते ६ टक्के एकूण तरतूद ठेवली जाते. प्रकाशित ४ खंडात त्यांनी ३३ जातींचा परिचय करून दिलेला आहे. त्या जातीत शिक्षणाचे प्रमाण फक्त ३ ते ४ टक्के आहे. यावरून या लोकांच्या उन्नतीसाठी युद्धपातळीवर प्रयत्न करण्याची आवश्यकता आहे, असे दिसून येते. उपराकार लक्ष्मण माने यांनी आपल्या शिक्षणसंस्थेमार्फत भटक्या विमुक्तांसाठी आश्रमशाळा चालवल्या आहेत. इतरही काही ठिकाणी वसतिगृहे व आश्रमशाळा सुरू आहेत. महाराष्ट्र वनवासी कल्याण समितीतर्फे आश्रम शाळा चालवल्या जातात. त्यापैकी यमगरवाडी येथील प्रकल्प उल्लेखनीय आहे.

भटक्या विमुक्तांचे जीवन स्थिर व सुसह्य व्हावे यासाठी नव्या पिढीस शिक्षण देऊन त्यांची प्रगती साधली पाहिजे. या हेतूने १९९२ साली केशव विद्यालय या निवासी शाळेची स्थापना करण्यात आली. या निवासी शाळेत ज्यांचे आईवडील पोटासाठी भटकंती करतात व वेगवेगळ्या गुन्ह्यांमध्ये तुरुंगात शिक्षा भोगतात अशा मुलांना प्रवेश दिला जातो. कालांतराने या शाळेत मुलींनाही प्रवेश दिला जाऊ लागला. या परिसरातील पारध्यांची मुले येथे अधिक प्रमाणात प्रवेश घेतात. या आश्रमशाळेस शासकीय अनुदान प्राप्त झाल्याने शाळेसाठी व निवासासाठी सर्व सोयींनी युक्त संकुल उभारण्यात आले आहे. त्यामुळे आपल्या सुप्तगुणांचा विकास करवून घेऊन येथील विद्यार्थी विविध क्षेत्रांत नैपुण्य संपादन करू लागले आहेत. आज येथील वसतिगृह व शाळा स्थिरावली असून तिने नावलौकिक संपादन केला आहे.

रयत शिक्षण संस्थेनेही आश्रमशाळांच्या क्षेत्रात प्रवेश केला असून ठाणे, नगर व नर्मदा धरणांमुळे विस्थापितांचे पुनर्वसन झालेल्या क्षेत्रात सर्वसोयींनी युक्त आश्रमशाळा चालविल्या आहेत. या शाळांतूनही समता व समरसता साध्य व्हावी यासाठी प्रयत्न केले जातात. आदिवासी, मागास, भटक्या व विमुक्त जातीच्या शिक्षणासाठी अद्यापही बरेच काही करावे लागणार आहे. यासाठी स्वत:ला झोकून देऊन कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या विकासासाठी वरीलप्रमाणे नवनवीन प्रयोग होणे आवश्यक आहे. या क्षेत्रातील विविध समस्या समाधानकारक रीतीने सुटाव्यात, शिक्षणाचा दर्जा व गुणवत्ता वाढावी यासाठी या क्षेत्रात कार्य करणाऱ्या सर्वांनी प्रायोगिक दृष्टिकोनाचा स्वीकार करून कार्य केले तर ते विद्यार्थ्यांच्या प्रगतीसाठी हितकारक ठरेल व त्यातून समता व सामाजिक समरसता वृद्धिंगत होऊ शकेल.

शिक्षणाचा प्रसार व्हावा, सर्वांना गुणवत्तापूर्व शिक्षण प्राप्त व्हावे. शिक्षण ज्यांना प्राप्त झाले आहे, त्यांनी सामाजिक जबाबदारीची जाणीव ठेवून देश व समाज विकासासाठी प्रयत्नशील राहावे या हेतूने प्रारंभापासून स्वत:ला या कार्यात गुंतवून घेणारे शिक्षक, समाजसेवक, शिक्षणाच्या विकासासाठी अहर्निश झटणारे कार्यकर्ते यांच्या प्रयत्नामुळे आज शिक्षणक्षेत्राची वाटचाल प्रगतीवर चाललेली आहे. ही वाटचाल योग्य दिशेने चालूच राहावी यासाठी स्वत:ला झोकून देऊन कार्यरत असणाऱ्या सर्वांचे कृतज्ञतापूर्वक स्मरण करून महात्मा फुल्यांनी केलेल्या मार्गदर्शनानुसार भावी पिढीने आपली वाटचाल चालूच ठेवावी, अशी अपेक्षा आहे. शिक्षणाने गतिमान विश्वाशी सुसंवाद साधून समाजाची सर्व स्तरावर प्रगती साधली पाहिजे. या आशयाची महात्मा फुले यांची उक्ती आजही मार्गदर्शन करणारी आहे. ते म्हणतात,

विद्येविना मती गेली,
मतीविना नीती गेली,

नीतीविना गती गेली,
गतीविना वित्त गेले,
वित्ताविना शुद्र खचले,
हे सारे अनर्थ एका अविद्येने केले.

शिक्षणाने ज्ञानप्राप्ती व्हावी, अशी अपेक्षा आहे. ज्ञानी आपल्या अनुभव विश्वाशी नवीन अनुभव पडताळून पाहतो व सत्य-असत्याचा स्वीकार विवेकाने करत असतो. विवेकी मनुष्य समाजाच्या हितासाठी आचरण करून स्व कर्तृत्वाबाबत जागरूक असतो. हक्क व कर्तव्ये या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत; याचे भान त्यास असते. समाजातील प्रत्येक जण जर विवेकी बनला तर त्या समाजाची नीतिमत्ता उच्च दर्जाची असते. नीतिमत्ता असलेला समाजच गतिमान राहू शकतो. गतिमान समाज स्वप्रयत्नाने आर्थिक क्षेत्रात आघाडीवर असतो. त्यामुळे त्या समाजाचे राहणीमान हे प्रगत दर्जाचे असते.

आपणासारख्या ३० टक्के लोक दारिद्र्यरेषेखाली असणाऱ्या विकसनशील देशात राहणीमान सुधारण्यासाठी पददलित, आर्थिक मागास व समाजातील सर्वांना दर्जेदार शिक्षण देऊन त्यांना आर्थिक व सांस्कृतिकदृष्ट्या प्रगत स्तरावर नेल्याशिवाय तरणोपाय नाही याची जाणीव शिक्षण क्षेत्रात कार्य करणाऱ्या सर्वांनी बाळगली पाहिजे व स्वतःला झोकून देऊन खऱ्या अर्थाने विद्या देण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

समाजातील सर्व घटकांचा सर्वांगीण विकास घडवून आणण्यासाठी सध्याचे व भावी कार्यकर्ते यांनी ही जाणीव बाळगली तरच हे घडून येईल. सर्वांना खऱ्या अर्थाने विद्या प्राप्त होईल व समाजातील सर्व घटकांचा विकास घडून येईल.

आशा आहे की, सर्वजण समाजनिष्ठ व नीतिमान नागरिक निर्माण करण्याच्या या कार्यात सहभागी होऊन प्रगत राष्ट्र उभारणीत आपण खारीचा वाटा उचललेला आहे, या आत्मिक समाधानाचे मानकरी बनतील हे समाधान सर्वांना प्राप्त व्हावे यास्तव हार्दिक शुभेच्छा!

**– प्रा. वसंत सा. रोकडे**

* * *

# अ ते ओ



## अकोलकर, गणेश विनायक
**प्राचार्य, ग्रंथलेखक**
**१७ सप्टेंबर १९०९ – २३ नोव्हेंबर १९८३**



प्राचार्य गणेश विनायक अकोलकरांचे जन्मगाव नाशिक. त्यांचे शालेय शिक्षण नाशिकमध्ये झाले. पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामधून त्यांनी बी. ए. केले व भांडारकर इन्स्टिट्यूटमधून एम. ए. पदवी संपादन केली. १९३६ मध्ये पुणे विद्यापीठातून ते एलएल. बी. झाले. १९३८ मध्ये कोल्हापूरच्या शिक्षक प्रशिक्षण महाविद्यालयातून त्यांनी बी. टी. (बॅचलर ऑफ टिचिंग) पदवी मिळविली. अकोलकरांनी हे सर्व शिक्षण आपल्या गुणवत्तेवर शिष्यवृत्ती मिळवून घेतले, हे विशेष होय.

१९३४ नंतर नाशिकमधील 'न्यू इंग्लिश स्कूल'मध्ये, अंमळनेरच्या प्रताप विद्यालयामध्ये व पुण्याच्या भावे हायस्कूलमध्ये त्यांनी अध्यापक म्हणून काम केले. त्यांचे हे शैक्षणिक कार्य विद्यार्थिप्रिय शिक्षक, कुशल व्यवस्थापक व शिक्षण विषयावर विपुल लेखन करणारे व्यासंगी लेखक म्हणून फुललेले आहे. अंमळनेर, नारायणगाव ह्यांसारख्या तालुक्यांच्या गावी, चंद्रपूरसारख्या मागास भागात, पुणे, नाशिकसारख्या पुढारलेल्या शहरात मुख्याध्यापक म्हणून अकोलकरांनी काम केले. पण प्रत्येक संस्थेत स्वत:च्या शिक्षणविषयक निष्ठेला अकोलकरांनी तडा जाऊ दिला नाही.

अकोलकरांनी विविध शैक्षणिक प्रयोग केले. विद्यालयांच्या सांस्कृतिक व क्रीडाविषयक कार्याची सूत्रे विद्यार्थ्यांच्या हाती असावीत म्हणून गृहसभा, कुलपद्धती अशा विविध योजना राबविल्या. भारत स्वतंत्र होण्यापूर्वीच्या काळात विद्यार्थ्यांना लोकशाही कार्यपद्धतीची ओळख करून दिली. स्नेहसंमेलनाच्या प्रमुख पाहुण्यांच्या स्वागतापासून त्यांना निरोप देण्यापर्यंतची सर्व कामे विद्यार्थ्यांनी पार पाडावीत अशी योजना आखली व प्रत्यक्षात आणली. त्यावेळी शालेय रंगभूमीवर मोठ्यांसाठी लिहिलेल्या नाटकांतील प्रवेश सादर केले जात. अकोलकरांनी स्वत: मुलामुलींसाठी नाटिका लिहिल्या. विद्यार्थ्यांकडून नाट्यप्रवेश लिहवून घेतले. स्वातंत्र्याच्या प्रारंभकाळात श्रमदान, समाजसेवा शिबिरे, आंतरभारती अशा विविध योजना त्यांनी विद्यालयांतून राबविल्या, अभ्यासक्रमात त्या नंतर आल्या.

एस. टी. सी. (सेकंडरी टीचर्स सर्टिफिकेट) प्रशिक्षण वर्गाचे प्रमुख, चंद्रपूरच्या शिक्षणशास्त्र महाविद्यालयाचे उपप्राचार्य, नाशिकच्या शिक्षणशास्त्र महाविद्यालयाचे पहिले प्राचार्य म्हणून अकोलकरांनी काम केले. शिक्षकांचे शिक्षक म्हणून कार्य करीत असताना जे काम शिक्षकाला विद्यार्थ्यांकडून करून घ्यावे लागणार आहे ते सारे त्याच्या अनुभवातून गेले पाहिजे ही दृष्टी त्यांना होती. समाजसेवा हे फार मोठे शिक्षणकार्य आहे व ते शिक्षकाचेही कार्य आहे ह्या जाणिवेतून नाशिक शहरातील विविध सामाजिक, सांस्कृतिक संस्थांचे नेतृत्व त्यांनी केले. ह्याच दृष्टिकोनातून राज्याच्या सरकारी, निमसरकारी समित्यांवर, पुणे विद्यापीठ, समाज प्रबोधन संस्था अशा संस्थांतून त्यांनी प्रतिनिधित्व केले.

जळगाव जिल्ह्यात अकोलकरांनी व्यावसायिक जीवनास प्रारंभ केला. तेथेच त्यांनी १९६३ मध्ये महाराष्ट्र राज्य मुख्याध्यापक संमेलनाचे अध्यक्षपद भूषविले.

त्यावेळी महाराष्ट्र राज्याचे तत्कालीन शिक्षणमंत्री शांतिलाल शहा ह्यांनी सरकारच्या माध्यमिक शाळांवरील वाढत्या नियंत्रणाचे समर्थन केले व शिक्षकांच्या उणिवांवर बोट ठेवले. तेव्हा अकोलकरांनी छापलेले अध्यक्षीय भाषण बाजूला ठेवून शिक्षणमंत्र्यांच्या मुद्द्यांना चपखल उत्तरे दिलीच, पण त्याचबरोबर शिक्षक संघटनांकडून हक्कांच्या जाणिवेइतकीच कर्तव्याचीही जोपासना व्हायला पाहिजे ह्या मात्रेचा वळसाही शिक्षकांना दिला.

व्यावसायिक क्षेत्रात एस. एस. सी. पाठ्यपुस्तक समिती, माध्यमिक शिक्षण मंडळ संशोधन समिती, कौन्सिल ऑफ बेसिक एज्युकेशन अशा विविध समित्यांचे सदस्य व अध्यक्ष म्हणून अकोलकरांनी मार्गदर्शन केले.

शिक्षणशास्त्राची ओळख महाराष्ट्राला मातृभाषेतूनच करून दिली पाहिजे हे जाणून प्रा. ना. वि. पाटणकरांच्या सहकार्याने ‘मराठीचे अध्यापन’ व ‘शालेय व्यवस्था’ ही पुस्तके त्यांनी लिहिली. यातील ‘मराठीचे अध्यापन’ ह्या पुस्तकाची सातवी आवृत्ती निघाली. १९४१ ते १९७४ या काळात स्वतंत्र असे वीस ग्रंथ त्यांनी लिहिले. त्यातील ‘नव्या महाराष्ट्रातील शिक्षण’ या अकोलकरांच्या ग्रंथाला महाराष्ट्र शासनाने १९६८ च्या ग्रंथगौरवात विशेष पुरस्कार दिला.

‘रशियातील विद्यामंदिर’, ‘लोकशाही आणि शिक्षण’, ‘मागास देशातील शिक्षणाचे स्थान’, ‘शिक्षणाचे आधुनिक तत्त्वज्ञान’ ही अकोलकरांची काही अनुवादित पुस्तके आहेत. ‘ग्रामीण विकास आणि शिक्षण’ सारखी काही संपादित पुस्तके आहेत.

तसेच महत्त्वाची गोष्ट अशी की अकोलकरांनी ‘लेखन विकास भाग’ (१ ते ७), ‘व्याकरण व निबंध’ ही व्याकरणविषयक पुस्तके, ‘साहित्यप्रभा’ (भाग १ ते ३), ‘साहित्यसरिता’ (भाग १ ते ३), कुमारभारती (इ. ९ वी), ही मराठी, लोकवाणी (हिंदी) व सुलभ गीर्वाणमाला प्रवेश (१ व २) ही पाठ्यपुस्तके सहकार्याने संपादित केली आहेत. ‘मुलींच्या मनांचा मागोवा’ सारखी सर्वेक्षणे अकोलकरांच्या ग्रंथलेखनाची विपुल साक्ष देतात.

– प्रा. सुहासिनी पटेल

## अग्रवाल, गंगाप्रसाद बालाराम

**संपादक, लेखक**

**७ जानेवारी १९२३**



गंगाप्रसाद अग्रवाल यांचा जन्म परभणी जिल्ह्यातील वसमत येथे झाला. बालाराम हे त्यांचे वडील व लक्ष्मीबाई ह्या त्यांच्या आई. त्यांचे वडील सूत व रंग विक्रीचा व्यवसाय करीत. चार भाऊ व दोन बहिणी या सहा भावंडांमध्ये गंगाप्रसादजी दुसरे. सातवीपर्यंत वसमतला शिकलेले गंगाप्रसादजी आठवीसाठी जालन्याला गेले. तिथून मॅट्रिकपर्यंतच्या शिक्षणासाठी अंबाजोगाईच्या योगेश्वरी नूतन विद्यालय ह्या राष्ट्रीय शाळेत ते आले. या शाळेने त्यांच्यावर राष्ट्रीयत्व, सामाजिकतेचे संस्कार केले. पुढे वर्धा, नागपूर इथे इंटरपर्यंत शिकण्यात ते कसेबसे रमले. पण पुढे त्यांच्या समाजकार्याने मोठ्या पदव्यांपैकी एवढी मोठी मजल मारली की नांदेडच्या स्वामी रामानंदतीर्थ मराठवाडा विद्यापीठाने इ.स.१९९९ मध्ये त्यांना डी. लिट्‌ दिली. त्यांचा विवाह ते शिकत असतानाच वयाच्या तेराव्या वर्षी झाला. भागीरथीबाई हे त्यांच्या पत्नीचे नाव, चार मुलगे व एक मुलगी अशी अपत्ये त्यांना झाली.

स्वतःच्या कौटुंबिक जबाबदाऱ्यांपेक्षा गंगाप्रसादजींना सामाजिक जबाबदाऱ्या महत्वाच्या वाटत आल्या. म्हणूनच हैदराबाद मुक्तिसंग्रामाकडे त्यांची पावले समर्थपणे वळली. निझामाच्या अराजकाविरुध्द्‌ झगडत असतानाच ते जनसामान्यांच्या निरक्षरतेच्या अराजकाविरुध्द्‌ ते झगडले. त्यासाठी त्यांनी सांस्कृतिक उपक्रमांच्या माध्यमाचा उपयोग केला. ‘हैद्राबादच्या स्वातंत्र्याशिवाय भारताचे स्वातंत्र्य अपूर्ण आहे,’ हा स्वामी रामानंदतीर्थांचा कृतिविचार त्यांच्यासाठी आचार ठरला. अहिंसक असलेले गंगाप्रसादजी हैदराबादच्या मुक्तीसाठी सशस्त्र आंदोलनाकडेही वळले. मुक्त झालेली जनता प्रबोधित होणे आवश्यक असते, हे लक्षात घेऊन त्यांनी हैदराबाद

मुक्तीनंतर जनतेच्या वैचारिक प्रबोधनासाठी ‘समता’ नावाचे हस्तलिखित साप्ताहिक सुरू केले. वैचारिक प्रबोधनाला प्रत्यक्ष कृतीची जोड देणे ही तर त्यांची जीवनशैली आहे. संयुक्त महाराष्ट्राचा लढा, बर्हिजी स्मारक शिक्षण संस्था, राष्ट्र सेवा दल, वसमत नगर परिषदेचे लोकाग्रहास्तव स्वीकारलेले अध्यक्षपद, आणीबाणीत अभिव्यक्ती स्वातंत्र्यासाठी सोसलेला कारावास, ‘सर्व सेवा संघा’चे अध्यक्षपद या त्यांच्या गतिमान कृतिशीलतेच्या खुणा आहेत.

ग्रामस्वराज्याच्या कल्पनेला मूर्त रूप देत ते ग्रामस्वराज्य आंदोलनाचे प्रमुख आधारस्तंभ ठरले. पण आधारस्तंभाच्या आधारावर जनसामान्य निराधार न होता स्वतःच स्वतःचा आधार व्हावेत ही कृतिशील काळजी त्यांनी घेतली. खादी या वस्त्रात गुंफलेल्या विचाराचा आचार झाला तर बेरोजगारांना भाकर मिळते हा कृतिविचार त्यांनी खादी उत्पादन व चळवळीतून सिद्ध केला. खादीला ताणाबाणा नामशेष होऊ नये यासाठी स्वतंत्र भारतात टेरिलिन पॉलिस्टर कपड्यांच्या होळ्या त्यांनी पेटवल्या. बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या विरोधात स्वतंत्र भारतातल्या स्वदेशी ग्रामोद्योगांना स्वाभिमानाने, स्वतंत्रपणे आणि समर्थपणे उभे राहण्याचे सामर्थ्य त्यांनी ग्रामस्वराज्याच्या आंदोलनातून दिले. उत्पादक व उपभोक्ता यांच्यामधला दलाल दूर करत त्यांनी आर्थिक शुचिताही आणली. निर्धूर चूल, जात्याला बॉल बेअरिंग बसविणे, सुलभ संडास, गोबर गॅस, सौर ऊर्जा या सोप्या प्रयोगांना जनजीवनात रुजवून त्यांनी जनसामान्यांचे जगणे सोपे केले.

लातूर परिसरातील भूकंपग्रस्तांचे पुनर्वसन, बाबरी मशिदीच्या पतनानंतर सद्भाव व सामंजस्यासाठी त्यांनी केलेले कार्य उत्स्फूर्त व अथक ठरले. सजीव शेती, स्वावलंबी शेती या नव्या प्रयोगासाठी नॅडेप खत, झटपट खत, शिंग खत, अमृतजल खत, गांडूळ खत, पंचगव्य खत, हिरवळ खत या नव्या खतांच्या विकसनातले त्यांचे योगदान सुपीक ठरले. योगासने, निसर्गोपचार, पाणी परिषद, वनवासींचा शेती हक्क या त्यांच्या कार्यामुळे सर्वसामान्यांना जीवनमानाचा सुधारित स्तर अनुभवता आला. ‘सजीव शेती किंवा स्वावलंबी शेती’, ‘युद्ध जाहले सुरू’ या त्यांच्या पुस्तिकांही आहेत.

सर्वसामान्यांच्या जीवनासाठी सोपे व उपयुक्त मानदंड व मापदंड निर्माण करणाऱ्या गंगाप्रसादांची पावले अविरत, अविश्रांत आहेत. या पावलांनी नव्या वाटा, नव्या यात्रा निर्माण केल्या आहेत. या वाटांबद्दल, यात्रांबद्दल ते दुराग्रही नाहीत. इतरांचे वाटानिर्मितीचे स्वातंत्र्य त्यांना मान्य आहे. म्हणूनच हाती घेतलेल्या कार्याची जबाबदारी सांभाळता सांभाळता इतरांमध्येही ते जबाबदारीची भावना निर्माण करतात. त्यामुळे ते मूलतः शिक्षक वाटतात. स्वतः शिकत शिकत इतरांना शिकवण्याची सहजसुंदर गुंफण ते साधतात. समाज जीवनातला गुंता काढून टाकण्यासाठी अशी गुंफण आवश्यक असते.

स्वतःच्या कार्याच्या आधाराने गुंफलेली त्यांची व्याख्याने तेवढीच खरी वाटतात. खरेपणा हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा स्थायीभाव असल्यामुळे त्यांची मैत्री कुणाशीही चटकन जमते. त्यांची शेरोशायरी मैत्रीत रंगत आणते.

नियोजन, पूर्वतयारी, क्रियान्वयन, मूल्यमापन आणि अनुधाव हे त्यांच्या कार्यशैलीतील पाच टप्पे समाजहितासाठीच असतात.

– प्राचार्य डॉ. संतोष मोतीराम मुळावकर

## अत्रे, प्रल्हाद केशव

☞ **मुख्य नोंद– पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## अळतेकर, गणेश सदाशिव

**संस्था चालक, शिक्षणतज्ज्ञ**

**१७ एप्रिल १८९७ – १५ मे १९८७**

☞ **मुख्य नोंद – राजकारण खंड**

गणेश सदाशिव तथा दादासाहेब अळतेकर हे सातारा जिल्ह्यातील थोर गांधीवादी नेते. १९५२ ते १९५७ यावेळी ते पहिल्या लोकसभेत खासदार होते. पंडित जवाहरलाल नेहरु, डॉ. राजेंद्र प्रसाद, सी. डी. देशमुख, मोरारजी देसाई या सारख्या जेष्ठ व श्रेष्ठ नेत्याबरोबर त्यांचा घनिष्ठ स्नेह



होता. दादासाहेबांचे दुसरे बंधू अनंतराव अळतेकर हे बनारस विद्यापीठात प्राचीन इतिहासाचे ख्यातनाम प्राध्यापक होते. दादासाहेबांचे पिताजी कै.सदाशिव खंडो अळतेकर हे कराड येथील टिळक विद्यालय व शिक्षण मंडळाचे संस्थापक होते. दादासाहेबांना आपल्या वडिलांचा राजकीय, सांस्कृतिक व सामाजिक वारसा लाभला होता. दादासाहेब अळतेकर हे ख्यातनाम विधिज्ञ व संस्कृत पंडित होते. त्यांना संस्कृतबद्दलचे मंडलिक पारितोषिक मिळाले होते.

सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक क्षेत्रात कार्य करणारे एक दिग्गज व्यक्तिमत्व म्हणून ते ख्यातनाम होते. शिक्षण मंडळ, कराड ही १९२० मध्ये स्थापन झालेली शिक्षण संस्था, या संस्थेचे १९३३ ते १९७३ असे ४० वर्षे ते अध्यक्ष होते. तसेच १९७२ ते १९८० या कालखंडात शिक्षण मंडळाच्या अध्यक्षपदाची धुरा त्यांनी सांभाळली होती.

टिळक विद्यालय हे राष्ट्रीय शिक्षण देण्यासाठी स्थापन झालेले विद्यालय. महाराष्ट्रात हे एक अग्रगण्य असे विद्यालय होय. कै. वि. स. पागे, कै. यशवंतराव चव्हाण, उद्योगपती रावसाहेब गोगटे, ऑलिंपिकवीर खाशाबा जाधव हे याच शाळेत शिकले. शाळेमध्ये देशभक्तीला अनुकूल असे वातावरण असे.

टिळक– आगरकर या दोघांच्याही चरित्राचा अभ्यास, निबंध स्पर्धा व वक्तृत्व स्पर्धा यासाठी विद्यार्थ्यांना करावा लागे. हे वातावरण दादासाहेब अळतेकर यांच्या नेतृत्वामुळे सुरू झाले. पन्नासहून अधिक विद्यार्थी एस. एस. सी. बोर्डाच्या गुणवत्ता यादीत चमकले. उत्तम शिक्षक हेरून त्यांना या संस्थेमध्ये शैक्षणिक कार्यात येण्यासाठी त्यांनी प्रवृत्त केले. त्यामध्ये कै. द. पां. पाठक (यशवंतराव चव्हाणांचे शिक्षक), कै. ल. ब. हरोलीकर, कै. पा. न. वळवडे, भा. म. पागनीस, ना. वा. जोशी (सध्या शिक्षण मंडळाच्या सचिव पदाची धुरा सांभाळत असलेले) डॉ. रा. गो. प्रभुणे हे सारे अळतेकरांच्या शोधक बुध्दीमुळे या संस्थेत वा शाळेत आले. दादासाहेब अळतेकर यांचा अखंड व्यासंग चालू होता. त्यांनी रामदर्शन, सीतादर्शन, हनुमानदर्शन, लक्ष्मणदर्शन व इंग्रजीमधून वाल्मिकीदर्शन लिहिले. हा खंड पुण्याच्या भांडारकर इन्स्टिट्यूटने भारताचे माजी राष्ट्रपती व्यंकटरमण यांच्या हस्ते प्रकाशित केला. दादासाहेब अळतेकर यांनी देशासाठी दोन-तीन वेळा कारावास सोसला. आजन्म खादी परिधान करण्याचे व्रत त्यांनी घेतले. दादासाहेबांचे १९८७ मध्ये निधन झाले. त्यांनी आपल्या आयुष्यामध्ये जवळजवळ ६० वर्षे शिक्षण मंडळाला योगदान दिले.

– डॉ. रा. गो. प्रभुणे

## अक्षीकर, गोपाळ नारायण

**संस्थापक, व्यवस्थापक, मुख्याध्यापक**

**२५ सप्टेंबर १८६४ – १६ मार्च १९१७**



गोपाळ नारायण अक्षीकर हे अलिबाग जवळच्या अक्षी गावचे रहिवासी होते. मॅट्रिकपर्यंतचे त्यांचे शिक्षण चिपळूणकर-टिळक-आगरकर या त्रयीने स्थापन केलेल्या पुण्याच्या शाळेत झाले. या त्रयीच्या आचार, विचार व चारित्र्यातून स्फूर्ती घेऊन शिक्षण प्रसाराच्या कार्याला वाहून घेण्याचा अक्षीकरांनी निश्चय केला व तो कार्यवाहीत आणण्यात कोणतीही कसर त्यांनी ठेवली नाही. मुंबईला येऊन त्यांनी शिक्षण क्षेत्राचा प्रत्यक्ष अनुभव घेण्यासाठी ‘मराठा विद्यालय’ मध्ये शिक्षकाची नोकरी केली.

अज्ञान, दारिद्य्र, निरक्षरता यात खितपत पडलेल्या व शिक्षणाविषयी उदासीन असलेल्या बहुजन समाजाला सुशिक्षित करण्यासाठी गवंडी, सुतार, कोळी व गिरणी कामगारांची वस्ती असलेल्या मुंबईतल्या दादर भागात अक्षीकर व त्यांच्या सहकाऱ्यांनी झोपड्या-झोपड्यांमध्ये

जाऊन विद्यार्थी गोळा केले आणि २ जून १८८९ रोजी मराठी शाळा व दादर इंग्लिश शाळेची स्थापना केली.

नंतर कल्याणमध्ये २ जानेवारी १८९० रोजी कल्याण इंग्लिश शाळेची स्थापना केली. स्थापन केलेल्या शाळांचा व्यवस्थित व ध्येयानुरूप उत्कर्ष व्हावा यासाठी २४ एप्रिल १८९२ रोजी 'जनरल एज्युकेशन इन्स्टिट्यूट' ची स्थापना केली. संस्थेची रीतसर घटना तयार झाली. अल्पावधीतच २ नोव्हेंबर १८९२ रोजी ठाणे येथे ठाणे इंग्लिश शाळेची स्थापना करण्यात आली. सरकारचा दृष्टिकोन मिशनरी शाळांना प्राधान्य देण्याचा असल्याने त्या काळात खाजगी शिक्षण संस्था चालविणे हे एक दिव्य होते. स्वावलंबनाचा हेतू असल्याने अक्षीकर, के. बी. ताम्हणे व गणेश रा. लेले आणि इतर सहकाऱ्यांचा त्याग स्पृहणीय होता.

अक्षीकर संस्थेचे व्यवस्थापक होते व दादर इंग्लिश शाळेच्या मुख्याध्यापकाचे कामही तेच करीत. सरकारी शाळांचा दबदबा असण्याचे कारण त्या शाळांत उच्चशिक्षित पुरेसा शिक्षकवर्ग व शालेय साहित्य होते. म्हणून त्या शाळांतून प्रवेश घेण्याची समाजाची साहजिक प्रवृत्ती होती. ज्यांना सरकारी शाळेत प्रवेश मिळत नसे अथवा राष्ट्रीय बाण्याच्या शाळेत शिक्षण घेण्याची ओढ असणारे विद्यार्थी खासगी शाळांकडे येत.

एका अर्थाने अक्षीकरांनी काढलेल्या शाळा या गरिबांच्या शाळा होत्या. मुलांना स्वस्तात शिक्षण देणे हा चालकांचा उद्देश होता. यासाठी सरकारी शाळेपेक्षा खाजगी शाळेत शुल्क २/३ असे. अत्यंत गरीब मुलांना खास भत्ता, शालेय साहित्य दिले जाई. आर्थिक चणचण सहन करून सुमारे १५ टक्के विद्यार्थ्यांना शुल्क सवलत दिली जात असे. उद्देश एकच की गरिबांना शिक्षणापासून वंचित राहण्याची पाळी येऊ नये. १८९७ च्या प्लेगच्या साथीने सुरुवातीला असलेली ३१६ ही विद्यार्थी संख्या २५१ पर्यंत रोडावली. परंतु कार्यकर्ते धैर्याने या परिस्थितीशी टक्कर देत राहिले.

१९०६ मध्ये विद्यार्थी संख्या ५६१ झाली. यात ब्राह्मण, ब्राह्मणेतर, गुजराथी, मारवाडी, मराठा, मागासवर्गीय, मुसलमान, ज्यू, पारशी, ख्रिश्चन अशा सर्व जमातींचे विद्यार्थी होते. अक्षीकरांच्या या साहसी कार्यात निष्ठा, तळमळ व जबाबदारीने काम करणाऱ्या केशव भगवंत ताम्हणे, वासुदेव काशिनाथ ओक, हरी विष्णू कोल्हटकर, नीळकंठ विष्णू कोल्हटकर, रामचंद्र काशिनाथ ओक, राजाराम केशव वैद्य यासारख्या उत्साही सहकाऱ्यांची साथ मिळाली. शिक्षकांना निष्ठा व चांगल्या वागणुकीची हमी द्यावी लागे. शाळेचा तास ६० मिनिटांचा असे. शिक्षकांना आपल्या दैनिक कामाचा अहवाल द्यावा लागे.

'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे' हे संस्थेचे ब्रीदवाक्य होते. कार्यकर्त्यांना संस्थेच्या अडचणीमध्येही निराशा स्पर्श करीत नसे. औदार्य हे अक्षीकरांचे आवर्जून सांगण्यासारखे वैशिष्ट्य होते. सुरूवातीच्या काही वर्षांत शाळेला दरवर्षी तूट येत असे. या तुटीची भरपाई अक्षीकर आपल्या वडिलोपार्जित मालमत्तेच्या हिश्शातून भरत. शाळेत शिकविण्याचे काम करून संस्थेची आर्थिक जबाबदारी अक्षीकरांनीच स्विकारली होती. यापायी त्यांनी नि:स्वार्थपणे जवळजवळ २३ हजार रुपये त्या काळी खर्च केले.

अविश्रांत श्रमाने १९०६ नंतर त्यांची तब्येत खालावली व संस्थेच्या दैनंदिन कार्यात लक्ष घालणे कठीण होऊ लागले. बहुजन समाजात शिक्षणाची आवड निर्माण करणाऱ्या अक्षीकरांना 'बहुजन समाजाच्या शिक्षणाचे जनक' अशी यथार्थ पदवी लाभली.

सन २००३ पर्यंत जनरल एज्युकेशन इन्स्टिट्यूट च्या ३८ शाखा स्थापन झाल्या. दादर, कुर्ला, ठाणे, डोंबिवली, कल्याण, भिवंडी, उरण येथपर्यंतच्या परिसरात शिक्षण प्रसाराचे काम करून समाजाची मोठी सेवा करण्याचे श्रेय मिळविले यात शंका नाही. संस्थेच्या ३ माध्यमिक शाळांचा शतक महोत्सव, एका शाळेचा अमृत महोत्सव, ६ शाळांचा हीरक महोत्सव, ३ कनिष्ठ महाविद्यालयांचा रौप्य महोत्सव तर एका प्राथमिक शाळेचा शतक महोत्सव साजरा झाला आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *जनरल एज्युकेशन इन्स्टिट्यूट, दादर शताब्दी विशेषांक,१८९२-१९९२.*

## आकेरकर, विजयप्रकाश नरहरी
**शिक्षक, प्राचार्य**
**२१ सप्टेंबर १९४८**



विजयप्रकाश नरहरी आकेरकर यांचा जन्म सावंतवाडी इथे झाला. हुमरस हे आकेरकर कुटुंबाचे वास्तव्याचे गाव. त्यांचे बालपण हुमरसलाच गेल्याने १ ली ते ७वी पर्यंतचे शिक्षण तिथल्या पूर्व प्राथमिक शाळेत झाले. आठवी ते दहावी पर्यंतचे माध्यमिक शिक्षण त्यांनी माणगावच्या श्री वासुदेवानंद सरस्वती विद्यालयात घेतले. आकेरकर सरांकडे दोन बी.ए. आणि दोन पदव्युत्तर पदव्या आहेत. अर्थशास्त्र विषय घेऊन १९६९ ला पहिली बी.ए.ची पदवी मालवणच्या स. का. पाटील महाविद्यालयातून घेतली. त्यानंतर १९७१ ला शिवाजी विद्यापीठाची बी.ए. परीक्षा इंग्रजी विषय घेऊन ते उत्तीर्ण झाले. याशिवाय अध्यापनासाठी अनिवार्य असलेल्या बी.एड. आणि एम. एड. या शिवाजी विद्यापीठाच्या पदव्याही त्यांनी मिळविल्या आहेत.

शिक्षण पूर्ण झाल्यावर आकरेकर यांनी श्री वासुदेवानंद सरस्वती विद्यालयाची सर्वांगीण प्रगती हेच आपले कार्य मानले. जिथे विद्यार्थी म्हणून शिक्षण घेतले त्याच शाळेत सहाय्यक शिक्षक, पर्यवेक्षक आणि प्राचार्य या जबाबदाऱ्या त्यांनी मनोभावे स्वीकारल्या. इंग्रजी आणि व्याकरण हे विषय शिकवण्यातले त्यांचे कौशल्य निर्विवाद आहे.

देणगी म्हणून १४ एकर जमीन आणि लाखो रुपये मिळवून शाळेला नावारूपास आणणे हे सरांचे खास नोंद घेण्याजोगे काम आहे. सर्व स्तरावरच्या क्रीडा प्रकारात भाग घेणारी सरस्वती विद्यालय ही जिल्ह्यातली एकमेव शाळा आहे. सुसज्ज व्यायामशाळा, पूर्ण विकसित संगणक कक्ष, बालभवन केंद्र, गुरु दक्षिणा हॉल, गरीब विद्यार्थी फंड, ग्रंथालय ही सरस्वती विद्यालयाच्या विस्ताराची मुख्य अंगे आहेत. शाळेबरोबरच माणगावला उच्च माध्यमिक कला, वाणिज्य, विज्ञान आणि व्यावसायिक महाविद्यालय आणि यक्षिणी माध्यमिक शाळा सुरू करण्यातही आकेरकर यांचा मोठा सहभाग आहे. ते जेव्हा शाळेत नोकरीला लागले तेव्हा ३०० असलेली विद्यार्थी संख्या आज १७०० वर गेली आहे यातच आकेरकर यांच्या योगदानाचे प्रतिबिंब दिसते. आपला १९६९ ते २००६ हा नोकरीचा कालावधी संपवून आकेरकर लौकिकदृष्ट्या निवृत्त झाले असले तरी आजही ते शाळेच्या कामात व्यग्र आहेत.

– सुधाकर कुलकर्णी

## आगरकर, गोपाळ गणेश
☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## आगाशे, मोरेश्वर नारायण
**अध्यापक, यशस्वी चिकित्सक**
**१० सप्टेंबर १८८८ – २७ ऑक्टोबर १९६०**



डॉ. मोरेश्वर नारायण ऊर्फ मोरोपंत आगाशे ह्यांचे महाविद्यालयीन शिक्षण पुण्यात झाले. मुंबईच्या ग्रँट वैद्यकीय महाविद्यालयामधून ते एम.बी.बी. एस. झाले. मोरोपंतांनी साताऱ्यात १९१८ पासून वैद्यकीय व्यवसाय सुरू केला. साताऱ्यात १९१३ मध्ये 'आयुर्वेद वैद्यक शाळा' ह्या संस्थेची स्थापना झालेली होती. ही संस्था सध्या 'शेठ चंदनमल मुथा आर्यांग्ल वैद्यक महाविद्यालय' म्हणून ओळखली जाते. या संस्थेत मोरोपंत ॲलोपॅथिक मेडिसिन शिकवू लागले. थोडे विद्यार्थीच मॅट्रिक झालेले असत. मोरोपंतांनी मराठीतून ॲलोपॅथी शिकवण्यास सुरुवात केली. उत्कृष्ट वक्तृत्व, विषयाची तयारी व पायाभूत विषयांवर आधारित शिकवण्याची पद्धत ह्यामुळे विद्यार्थ्यांना विषय चांगले समजू लागले. मोरोपंत विद्यार्थिप्रिय अध्यापक झाले.

संमिश्र स्वरूपात आयुर्वेद व ॲलोपॅथी शिकविण्यासाठी चांगले प्राध्यापक, योग्य अभ्यासक्रम व ग्रंथ ह्यांची गरज होती. मोरोपंतांनी संस्थेत उत्तीर्ण झालेल्या हुशार विद्यार्थ्यांना अध्यापक म्हणून शिकविण्यासाठी बोलावून घेतले. साताऱ्यात व्यवसायासाठी आलेल्या ॲलोपॅथिक डॉक्टरांना बोलावून घेतले. संस्थेत अनेक अध्यापक समविचाराने काम करू लागले.

अभ्यासू व विद्वान संशोधक तयार व्हावेत म्हणून मोरोपंतांनी १९४४ मध्ये संस्थेच्या आवारात 'डॉ. भडकमकर संशोधन मंदिर' सुरू केले. डॉ. एन. आर. आपटे, वैद्य गो. आ. फडके, वैद्य भा. द. गोडबोले, पंडित गोस्वामी अशा विचारवंतांसह स्वत: भाग घेऊन आयुर्वेद संहिता ग्रंथांचे वाचन, चर्चा, लेखन, विचार, प्रसार असा आयुर्वेद प्रसाराचा प्रयोग सहा वर्षे केला. यातून भारतात, विदेशात आयुर्वेदाचा प्रसार व्हावा म्हणून विदेशातील काही जर्नल्समधून त्यांनी आयुर्वेदाविषयी लेख लिहिले.

विद्यालयातील विद्यार्थ्यांना औषधीकरणाचा अनुभव मिळावा व व्यावसायिकांना ग्रंथोक्त आयुर्वेदीय औषधे मिळावीत म्हणून मोरोपंतांनी १९२६ मध्ये 'अर्कशाळा' सुरू केली. वैद्य सी. ना. रानडे ह्या त्यांच्या विद्यार्थ्याने परिश्रमपूर्वक औषधी निर्माण करण्याचे पाठ बसवले, विद्यार्थ्यांना शिकविले. वनस्पती अर्क तयार करण्याचा पाया घातला. या अर्कशाळेचे दर्जेदार औषधे तयार करणाऱ्या 'आयुर्वेदिय अर्कशाळा लि., सातारा' या कंपनीत रूपांतर झाले. मोरोपंतांचे हे सर्व उपक्रम संस्थेच्या विकासासाठी मानधन न घेता चालत. डॉ. मोरोपंत आगाशे ह्यांनी नामांकित व्यावसायिक म्हणून यश व कीर्ती मिळविली. रुग्णपरीक्षण, योग्य चिकित्सा, आरोग्यरक्षणासाठी मार्गदर्शन, आयुर्वेद औषधांचाही जाणीवपूर्वक वापर ही त्यांची वैशिष्ट्ये होती. अनेक कुटुंबांचे 'फॅमिली डॉक्टर' म्हणून त्यांनी विश्वास व नावलौकिक मिळविला. नवीन पदवीधरांना ते सतत मार्गदर्शन करीत. अनेक यशस्वी चिकित्सक त्यांनी तयार केले.

आर्यांग्ल वैद्यक महाविद्यालयातील त्यांच्या कार्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी १९४९ मध्ये त्यांच्या साठाव्या वाढदिवसानिमित्त झालेल्या सत्काराच्या निमित्ताने मिळालेल्या देणगीतून 'डॉ. मो. ना. आगाशे धर्मार्थ रुग्णालय' ही भव्य वास्तू उभी राहिली. विद्यार्थी प्रशिक्षण, रुग्णपरीक्षण, संशोधन व अत्यल्प दरात चिकित्सा येथे होते.

डॉ. मोरोपंत आगाशे ह्यांचे साताऱ्याच्या शैक्षणिक व आर्थिक क्षेत्रांतही मोठे योगदान आहे. सातारा कन्याशाळा, न्यू इंग्लिश स्कूल व पॉप्युलर स्कूलच्या व्यवस्थापनात त्यांचा सहभाग होता. ते सातारा स्वदेशी बँकेचे अध्यक्ष होते. युनायटेड वेस्टर्न बँकेच्या पहिल्या संचालक मंडळाचे सदस्य म्हणून त्यांनी काम केले. दि वेस्टर्न इंडिया लाइफ इन्श्युरन्स कंपनीचे ते अनेक वर्षे संचालक व नंतर अध्यक्ष होते.साताऱ्याच्या शैक्षणिक, सामाजिक, वैद्यकीय आणि आर्थिक क्षेत्रात डॉ. मोरेश्वर नारायण आगाशे यांनी अतिशय मोलाचे योगदान दिले आहे.

– डॉ. श्रीकृष्ण गोविंद फडके

## आचार्य अत्रे

☞ **मुख्य नोंद– पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## आपटे, अच्युत शंकर

☞ **मुख्य नोंद – विज्ञान खंड**

## आपटे, पांडुरंग श्रीधर

**मुख्याध्यापक, लेखक, शिक्षक**

**६ एप्रिल १८८७ – १९ डिसेंबर १९५६**

पांडुरंग श्रीधर आपटे हे मूळचे अंमळनेरचे. आपटे गुरुजी या नावानेच ते ओळखले जात. आपटे गुरुजींनी बी.ए. झाल्यानंतर एल.एल.बी.ची पदवी संपादन केली होती. विसाव्या शतकाच्या प्रारंभकाळात राष्ट्रीय शिक्षण व स्वदेशीच्या प्रचारासाठी तत्कालीन मुंबई प्रांतात काही राष्ट्रीय शाळा स्थापन झाल्या. नाशिक जिल्ह्यातील येवला तालुका



काँग्रेस समितीच्या विद्यालय समितीने, येवला गावात ६ जून १९२१ रोजी 'टिळक राष्ट्रीय विद्यालय' सुरू केले. येवल्यातील दानशूर व्यापारी सोनीशेठ ह्यांनी दिलेल्या अठरा खोल्या व मोठे सभागृह असलेल्या इमारतीत शाळा सुरू झाली. त्यावेळी स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर शाळेच्या उद्घाटनासाठी आले होते.

हे गाव व्यापाऱ्यांचे व विणकरांचे होते. पहिल्या वर्षी पहिल्याच आठवड्यात त्यांच्या पाल्यांनी प्रवेश घेतला आणि दोनशे मुलांची ही शाळा सुरू झाली. शाळेसाठी गावातील शिक्षणप्रेमींनी अनेक ठिकाणांहून शिक्षक बोलावून घेतले. त्यामध्ये आपटे गुरुजी होते. गुरूजींनी विद्यालयाचे मुख्याध्यापक म्हणून काम सुरू केले. सर्व शिक्षक ध्येयवादाने भारलेले होते. गावातील लोकांनी त्यांच्या संसारखर्चापुरते जमा करून दिलेले पैसे हा त्यांचा पगार होता. मुख्याध्यापक असूनही आपटे गुरुजी शिक्षकांइतकाच पगार घेत असत.

विद्यालयात सातवी म्हणजे मॅट्रिकपर्यंतचे वर्ग होते. हे विद्यालय टिळक महाराष्ट्र विद्यापीठास संलग्न होते. अभ्यासक्रमात मातृभाषेस प्रथम स्थान होते. इतिहास–भूगोलाच्या अध्यापनात प्रेरक गोष्टींवर भर दिला जाई. विज्ञान व गणित हे विषय मराठीतून शिकविले जात. अक्षर, शुद्धलेखन, पाठांतर यांवर भर दिला जाई. इंग्रजी, इतिहास, संस्कृतसारखे विषय शिकविताना नवे नवे शैक्षणिक प्रयोग केले जात. शारीरिक शिक्षणास महत्त्वाचे स्थान दिले जात होते. मुलांमध्ये लेखन, वाचनाची आवड निर्माण व्हावी म्हणून वर्तमानपत्रांतील कात्रणे काढणे, ती विषयवार लावणे हे मुलांना शिकविले जाई. दैनंदिनी लिहिणे, व्याख्यानांचा गोषवारा लिहिणे असे उपक्रमही मुलांकडून करवून घेतले जात.

एकूणच त्या काळातही विद्यार्थ्यांचा सर्वच दृष्टिकोनांतून सर्वंकष विकास व्हावा, राष्ट्रहिताच्या कल्पना त्यांच्या मनात बिंबाव्यात ह्या हेतूने आपटे गुरुजी व त्यांचे सहकारी शिक्षक नियोजन करीत.

सार्वजनिक गणेशोत्सव हा येवल्याच्या सांस्कृतिक जीवनाचा एक महत्त्वाचा भाग होता. तो साजरा करण्यात आपटे गुरुजींचा प्रमुख वाटा असे. या निमित्ताने अनेक नेत्यांच्या व्याख्यानातून ज्ञानप्राप्तीबरोबरच राजकीय, सामाजिक जागरण घडत असे. शिवजयंती, टिळक पुण्यतिथी यासारखे राष्ट्रीय उत्सव शाळेत होत असत. खऱ्या भारताची मुलांना ओळख व्हावी म्हणून आपटे गुरुजी मुलांना खेडोपाडी घेऊन जात. राष्ट्रभाषा प्रचार समितीच्या परीक्षांसाठी मुलांची तयारी करून घेत. अशा संस्कारांमुळे विद्यालयाचे अनेक विद्यार्थी विविध क्षेत्रात चमकले, मोठे झाले. येवल्यात सुंदर असे शैक्षणिक व सांस्कृतिक वातावरण निर्माण करण्याचे श्रेय आपटे गुरुजींना आहे. स्वातंत्र्य चळवळीच्या काळात आपटे गुरुजींनी व त्यांच्या सहकारी शिक्षकांनी मुळशी सत्याग्रहात भाग घेतला. परिणामी सरकारने विद्यालय जप्त केले. आपटे गुरुजी व इतरांना तुरुंगवास भोगावा लागला. तुरुंगातून सुटून आल्यानंतर त्यांनी 'टिळक राष्ट्रीय विद्यालया'च्या जागेवरच 'विनय मंदिर' ही संस्था उभी केली. अनौपचारिक शिक्षणातून, राष्ट्रीय शिक्षणाच्या माध्यमातून जागृती करण्यास सुरुवात केली. राष्ट्रीय शाळेप्रमाणेच या संस्थेतही साप्ताहिक भिक्षेचा परिपाठ चालू होता, कारण तो लोकमताचा पाठिंबा दाखविणारा होता. राष्ट्रीय शाळा व विनय मंदिर विद्यापीठामुळे राष्ट्रप्रेमाची पेढीच तयार झाली होती.

१९४२ च्या चळवळीतही सर्व सहभागी झाले. पाचच वर्षांनी देशास स्वातंत्र्य मिळाले. 'प्रदेश लोकशिक्षण समिती'वर आपटे गुरुजींची नेमणूक झाली. ही समिती, टिळक राष्ट्रीय विद्यापीठ पुण्यात होते. गुरुजींनी सत्तावीस वर्षांनी येवले सोडले. ते पुण्यात त्यांच्या डॉक्टर मुलाकडे गेले. गुरुजी अखेरपर्यंत शिक्षकच राहिले. मुलांना शिकवण्याचे कार्य पुण्यातही चालू होते. लेखनासाठी वेळ मिळू लागला. वाचक म्हणून मुलांना समोर ठेवून लेखन केले. एकूण बत्तीस पुस्तके लिहिली.

गुरूजींनी शिक्षणासाठी पूर्ण आयुष्य दिले व स्वत:चा

मृत्यूही शिक्षणकार्यातच कारणी लावला. १९५१ मध्येच देहदानाची इच्छा व्यक्त करणारे पत्र आयुर्वेद महाविद्यालयास दिले होते. महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदारांनी ते स्वीकारले आणि गुरुजींची इच्छा पूर्ण झाली. आपटे गुरुजी निर्भय, निर्वैर, निष्पक्ष आचार्याचे जीवन जगले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## आपटे, मनोहर दत्तात्रेय

**संस्थापक**

**१० ऑगस्ट १९३० – ६ मे २००२**



मनोहर आपटे यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांनी आपले शालेय शिक्षण नूतन मराठी विद्यालयात पूर्ण केले. बृहन्महाराष्ट्र वाणिज्य महाविद्यालयातून शिक्षण पूर्ण करीत असताना ते बी. कॉम.च्या परीक्षेत गुणवत्ता यादीत दुसरे आले. त्यानंतर 'पॉलिटेक्निक स्कूल ऑफ कॉमर्स', लंडन इथून त्यांनी बी. एस्सी (अर्थशास्त्र) ही पदवी मिळवली. त्यांना 'इन्स्टिट्यूट ऑफ कॉस्ट अकौंटस् ॲण्ड मॅनेजमेंट असोसिएशन', लंडन आणि 'कॉस्ट ॲण्ड वर्क्स अकौंटस् ऑफ इंडिया' या संस्थांचे सभासदत्व मिळाले. १९६० चा काळ तसा बदलाचा होता. या बदलांची, सुधारणांची चाहूल डॉ. आपटेंना फार पूर्वीच लागली होती. परिस्थितीतील बदलांचा अंदाज घेता घेता, स्थानिक गरजांवर उत्तरे शोधता शोधता त्यांचे व्यक्तिमत्व विकसित होत गेले. त्यातून एका सुस्पष्ट परंतु काहीशा वेगळ्या, चाकोरीबाहेरच्या विचारसरणीला जन्म मिळाला.

१९६८ साली 'वेजस्केल ॲनॅलिसिस' या विषयावरील त्यांच्या प्रबंधास पुणे विद्यापीठाने पीएच्.डी. प्रदान केली. देशात आणि परदेशात त्यांनी मोठ्या हुद्द्यावर नोकऱ्या केल्या. पण त्यांचे मन त्यात रमले नाही. कारण त्यांना शैक्षणिक क्षेत्रात विविध बदल घडवून आणण्यासाठी प्रयत्न करायचे होते. शिक्षण हा प्रत्येक व्यक्तीचा जन्मसिद्ध अधिकार आहे. त्यासाठी सरकारकडे आशाळभूतपणे पाहात बसण्यापेक्षा उपलब्ध साधनांचा आणि उपकरणांचा जास्तीत जास्त चांगला उपयोग करून स्वत:च्या पायावर विद्यार्थ्यांना उभे केले पाहिजे असा विचार पक्का झाल्यानंतर १९८० मध्ये त्यांनी 'ज्ञानेश्वर विद्यापीठा'ची स्थापना केली.

नोकऱ्या मागत फिरणाऱ्या विद्यार्थ्यांपेक्षा नोकऱ्या देणाऱ्या उद्योजकांची निर्मिती शिक्षणातून करता येईल काय? यावर त्यांचे चिंतन चालू होते. परीक्षेतील गुण म्हणजे गुणवत्ता ही संकल्पना डॉ. आपटेंना मान्य नव्हती. तंत्र शिक्षणाला प्रवेश देताना गुणांची टक्केवारी हाच निकष होता. एक गुण कमी मिळाला म्हणून विद्यार्थ्यांना अभियांत्रिकी शाखेला प्रवेश नाकारला जात होता. ही गोष्ट डॉ. आपटेंना खटकत होती. बुद्धिमत्ता, कौशल्य आणि हातोटी असताना केवळ परीक्षेत कमी गुण मिळाले म्हणून कुणाचाही तंत्र शिक्षणाचा अधिकार नाकारला जाऊ नये यासाठी मनोहर आपटे यांनी ज्ञानेश्वर विद्यापीठाच्या रूपाने मोठी चळवळ शैक्षणिक क्षेत्रात उभी केली. ज्ञानेश्वर विद्यापीठात प्रवेश घेताना गुणांची अट नाही, देणगी दरडोई फी नाही, गुणवत्ता यादी नाही, प्रथम येणाऱ्यास प्रथम प्रवेश, इच्छा असेल त्या अभियांत्रिकी शाखेला प्रवेश असे जगापेक्षा वेगळे निकष त्यांनी ठेवले.

केवळ पुस्तकी ज्ञानावर आधारित शिक्षण ही संकल्पनाही डॉ. आपटेंना मान्य नव्हती. पुस्तकी ज्ञानाला अनुभवाची जोड मिळाली पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. म्हणून ज्ञानेश्वर विद्यापीठात प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांना सहा महिने पुस्तकी शिक्षण आणि सहा महिने प्रात्यक्षिके प्रत्यक्ष औद्योगिक क्षेत्रात द्यायची असे मनोहर आपटे यांनी ठरविले. त्याप्रमाणे प्रत्यक्ष कृती करून कर्तृत्वसंपन्न अभियंत्यांच्या अनेक पिढ्या घडवून त्यांनी देशाच्या प्रगतीत मोलाचे योगदान दिले. डॉ. आपटेंच्या या संकल्पनेचे भारतभर स्वागत झाले.

केंद्र सरकारच्या आठव्या पंचवार्षिक योजनेत ज्ञानेश्वर विद्यापीठाच्या कार्याचा गौरवाने उल्लेख करण्यात आला. बेरोजगारीला आळा घालण्यासाठी आणि स्वयंरोजगाराला

प्रोत्साहन देण्यासाठी देशभर ही संकल्पना राबविली पाहिजे असा विचार पुढे आला. डॉ. आपटेंनी जाणीवपूर्वक ज्ञानेश्वर विद्यापीठाला सरकारी मान्यता घेतली नाही. नियम व अटींच्या जाळ्यात शिक्षण क्लिष्ट होऊ नये अशी त्यांची भावना होती. सरकारी मदतीवर अवलंबून न राहता शिक्षणसंस्था 'स्वायत्त' आणि आर्थिक दृष्ट्या 'स्वयंपूर्ण' झाल्या पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. गुणांच्या जंजाळातून शिक्षणाला मुक्त करणारे, ज्ञानेश्वरांना आदर्श मानून विद्यापीठाची स्थापना करणारे, मुक्त शिक्षणाचे पुरस्कर्ते डॉ. मनोहर आपटे यांचे पुण्यात निधन झाले.

– प्रा. मिलिंद जोशी

## इंदापूरकर, लक्ष्मण नरहर
**शिक्षक, संस्थापक, प्रशासक**
**१८४९ – २९ एप्रिल १८९६**



लक्ष्मण नरहर इंदापूरकर यांचा जन्म इंदापूर येथे झाला. लक्ष्मणराव चार वर्षांचे असताना त्यांची आई वारली आणि पत्नीवियोगाने वडील विरक्त झाले.अशा परिस्थितीत त्यांच्या मामांनी त्यांचा सांभाळ केला.

लक्ष्मणरावांनी 'तात्या पंतोजी'च्या शाळेत मोडी लेखन, वाचन व हिशेब यात प्राविण्य मिळविले. घरगुती व्यवसाय व प्रपंच चालविण्याइतके शिक्षण झाल्यानंतर मामांनी त्यांना शेतीचे काम पाहण्यास सांगितले व अंगमेहनतीचे कामही त्यांनी चोख रितीने बजाविले. ते पाहून मामांचे त्यांच्यावर आपल्या मुलाप्रमाणे प्रेम बसले.

त्यावेळी इंदापूरमध्ये रे. नारायणराव शेषाद्री स्कॉट मिशनची शाळा चालवत. त्यात ते प्रौढ मुलांना इंग्रजी शिकवित आणि हुशार मुलगा दिसला की त्याला पुढील शिक्षणासाठी पुण्यातील मिशन शाळेमध्ये पाठविण्याचा पालकांकडे आग्रह करीत. मामांनी त्यांच्या सांगण्यावरून लक्ष्मणरावांना पुणे येथे पाठविले. पुढे चार वर्षातच ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर मिशन शाळेत त्यांनी वर्षभर तिसऱ्या इयत्तेला इंग्रजी शिकविण्याचे काम केले.

मिशन शाळेमध्ये विद्यार्थीदशेत असताना तेथील हेडमास्तर रे. गार्डनर यांची त्यांच्यावर, त्यांचा इंग्रजी विषय चांगला असल्यामुळे, मर्जी बसली व त्यामुळे त्यांनी यांना २० रुपयांची शिष्यवृत्ती देऊन मुंबई येथे विल्सन महाविद्यालयामध्ये पाठविले. तेथे एक वर्ष झाले तोच गार्डनरसाहेब स्वदेशी गेले व त्याबरोबरच त्यांची शिष्यवृत्तीही बंद झाली. त्यामुळे लक्ष्मणरावांना परत पुण्यास यावे लागले. पुढे हैद्राबाद संस्थानात एका तालुकादाराच्या मुलास शिकविण्याकरिता गेले. परंतु तेथील हवामान न मानवल्यामुळे ते परत पुण्यास येऊन काशिनाथपंत नातू यांचे शाळेत मुख्याध्यापकांचे काम करू लागले. याच सुमारास वामनराव भावे हे मिशन शाळेत अध्यापक होते. ते तेथून निघाल्यानंतर त्यांनी स्वतंत्र शाळा काढण्याचे ठरविले. याचवेळी मिशन शाळेच्या चालकांचा व तेथील विद्यार्थ्यांचा धार्मिक शिक्षणच्या बाबतीत बेबनाव झाल्यामुळे मिशन शाळेतील सुमारे ३०० हिंदू विद्यार्थ्यांनी नवीन निघणाऱ्या शाळेत येण्याचे वचन दिले होते. तसेच नातूंची शाळाही मोडकळीस आली होती. याचवेळी वामनराव भावे, लक्ष्मणराव इंदापूरकर व आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांच्या गाठी पडून त्यांनी राष्ट्रीय शिक्षण देणारी स्वतंत्र शाळा सुरू करण्याचे ठरविले.

कोणत्याही प्रकारची साधनसामग्री नसता अगर ती तत्काल मिळण्याचा संभव नसतानाही या तिघांनी आपल्या आत्मिक सामर्थ्याच्या जोरावर विद्यामंदिर स्थापन करण्याचे ठरविले. २४ सप्टेंबर १८७४ साली 'पुणे नेटिव्ह इन्स्टिट्यूशनची' स्थापना केली. 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी' व 'नूतन मराठी विद्यालय' या संस्था स्थापन होण्यापूर्वीच ज्या आद्य संस्थेने महाराष्ट्रातील विद्येचे माहेरघर म्हणून नावाजलेल्या पुण्यनगरीत काळाला अनुरूप अशा आंग्ल भाषेच्या ज्ञानाचा प्रसार करण्याच्या कार्यास सुरुवात करून त्याचा फायदा सामान्य जनतेला करून देण्याचे श्रेय या संस्थापकांना द्यावयास पाहिजे.

वामनराव भावे हे शाळेचे मुख्याध्यापक, पण शाळेचे

खरे प्रशासक लक्ष्मणरावच होते. वामनरावांचे मुख्य काम होते सरकारी अधिकाऱ्यांच्या भेटी घेणे, शाळेसाठी सरकारी परवानगी आणणे, देणगीदारांना शाळा दाखविणे व त्यांच्याकडून देणग्या मिळविण्यासाठी प्रयत्न करणे आणि लक्ष्मणरावांचे काम होते शाळेची अंतर्गत व्यवस्था पाहणे, शिक्षकांचे ज्ञानदान व विद्यार्थ्यांचे अध्ययन याकडे लक्ष देणे, शाळेत शिस्त लावणे व शाळेतील सर्व कार्यक्रमांचे सूत्रबद्ध संचालन करणे. कोणत्याही संस्थेचा मूलाधार हा प्रभावी नेता व निःस्वार्थी अनुयायी यांच्या सहकार्यावर अवलंबून असतो. वामनराव व लक्ष्मणराव यांच्या सहकार्यात हा अपूर्व संगम आपणांस आढळून येतो. लक्ष्मणरावांनी शाळेत व्यवस्थापक, मुख्याध्यापक, शिक्षक व संस्थेचे चालक या नात्याने सेवा केली. त्यांची इंग्रजी शिकविण्याचे कामी इतकी कीर्ती होती की ते जरी नुसते मॅट्रिक्युलेशनचीच परीक्षा उत्तीर्ण होते तरी मुंबई विद्यापीठाने त्यांना संस्थेने काढलेल्या 'महाराष्ट्र महाविद्यालय' मध्ये इंग्रजीचे मुख्य अध्यापक या नात्याने काम करण्यास खास परवानगी दिली होती.शाळा हेच सर्वस्व असल्याने त्यांनी आपले जीवनच शाळेला वाहून टाकले होते.

– विवेक कुलकर्णी

## इंदुलकर, राजन रघुनाथ

**संस्थापक, लेखक**

**७ ऑगस्ट १९५८**



'श्रमिक सहयोग' या संस्थेचे संस्थापक असलेल्या राजन रघुनाथ इंदुलकर यांनी वंचितांच्या शिक्षणाचा प्रश्न हाती घेऊन कोकणातील आदिवासी वाड्यांवर तीस वर्षांपूर्वी काम करायला सुरुवात केली. 'प्रयोगभूमी' या वंचित घटकातील मुलांच्या प्रयोगशील शैक्षणिक उपक्रमात ते आजही काम करीत आहेत. कातकरी व धनगर समाजातील मुले – मुली या निवासी शाळेत शिकतात. राजन इंदुलकर यांनी १९७६ ते ७८ या काळात मुंबईतील समाजवादी चळवळीत तसेच मराठवाडा विद्यापीठ नामांतर लढ्यात सहभाग घेतला. त्यांनी राष्ट्र सेवा दलाची रत्नागिरी जिल्ह्यात संघटनात्मक बांधणी केली. त्यांनी 'श्रमिक सहयोग' ही संस्था स्थापन करून जंगलतोड, कोळसाभट्टी विरोधात काम केले. २००१ ते ०४ या काळात विकास सहयोग प्रतिष्ठान, महाराष्ट्र या संस्थेचे त्यांनी अध्यक्षपद भूषवले.

राजस्थान, केरळ, कर्नाटक, मध्य प्रदेश व महाराष्ट्रातील प्रयोगशील शिक्षण, क्षेत्रीय विकास प्रक्रिया यांचा अभ्यास केला. उत्तरांचल, हिमाचल, नागालँड येथील वंचित घटकातील मुलांच्या शिक्षणाच्या पद्धती विषयक टिपणे, शिक्षणातील प्रश्न यावर लेखन केले. अभ्यास टिपणे व पुस्तिका लिहून विविध समाजसेवी संस्थांना सादर केल्या. वनवासी बांधवांच्या वाड्यांवर जाऊन शिक्षण विषयक जागृतीचे काम करताना 'श्रमिक सहयोग'च्या माध्यमातून शिक्षक कार्यकर्तेही तयार केले. अमेरिकेत राहाणाऱ्या भारतीयांतर्फे दिला जाणारा २००७ या वर्षीचा महाराष्ट्र फाउण्डेशन पुरस्कार तसेच भारतीय शिक्षण मंडळ, महाराष्ट्रतर्फे दिला जाणारा २००८ या वर्षीचा कर्मवीर भाऊराव पाटील स्मृती लेखन पुरस्कारही त्यांना मिळाला आहे.

– प्रा. सुहास द. बारटक्के

## एल्फिन्स्टन, माऊंट स्टुअर्ट

**शिक्षणतज्ज्ञ, लेखक, तत्त्ववेत्ता**

**१७७९ – १८५९**

माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन हा महाराष्ट्रातील आधुनिक शिक्षणाचा शिल्पकार होय. अकरावा बॅरन जॉन एल्फिन्स्टन यांचे हे पुत्र होत. स्कॉटलंडमधील केन्सिंगटन व एडिंबरा येथील शाळेत त्यांचे शिक्षण झाले. इ.स. १७९५ मध्ये त्यांची ईस्ट इंडिया कंपनीत कारकून म्हणून नोकरी सुरू झाली. सुरूवातीला ते बनारसमध्ये कार्यरत होते. पण १७९९ मध्ये तेथील युरोपियन अधिकाऱ्यांची मोठ्या प्रमाणावर कत्तल झाल्याने त्यांना तेथून पळून जावे लागले.



नंतर ते दुसऱ्या बाजीरावाच्या दरबारातील इंग्लिश रेसिडंट क्लोज याचा मदतनीस म्हणून पुणे येथे रुजू झाले. जनरल वेलस्लीच्या बरोबर त्यांनी काही लढायांत भाग घेतला. पुढे त्यांची बदली नागपूरला झाली. सन १८०२ मध्ये ब्रिटिश प्रतिनिधी म्हणून ते काबूलला रवाना झाले. पण तेथील अशांत परिस्थितीमुळे त्यांना कामात यश आले नाही. सन १८११ मध्ये त्यांची पुण्यात रेसिडेंट म्हणून नेमणूक झाली.

एल्फिन्स्टनमुळे १८१७ मध्ये इंग्रज – मराठे यांच्यात तिसरे युद्ध झाले. त्यात इंग्रजांना विजय मिळाला व १८१८ मध्ये मराठेशाहीचा अंत झाला. ब्रिटिशांचा एकछत्री राज्यकारभार सुरू झाला. पेशवाईच्या अंतकाळात महाराष्ट्रात अशांतता व असुरक्षितता होती. तेव्हा जनतेला सुरक्षितता पाहिजे होती. एल्फिन्स्टन यांनी विविध आश्वासनांद्वारे पुण्याला सुरक्षितता व दिलासा दिला. एल्फिन्स्टनच्या ह्या कार्याबद्दल त्यांना बढती मिळाली व मुंबईचा गव्हर्नर म्हणून पद मिळाले. १८१९ ते १८२७ हा त्यांचा गव्हर्नर म्हणून कार्यकाळ होय.

एल्फिन्स्टन यांनी पेशव्याचे राज्य बरखास्त केल्यावर पुण्याच्या लोकजीवनावर लक्षणीय परिणाम झाले. आता आपले पुढे काय? असा सर्वांपुढे प्रश्न उपस्थित झाला. विशेषतः शिक्षणकार्यात गुंतलेल्या ब्राह्मणांपुढे या प्रश्नाने गंभीर स्वरूप धारण केले. वेद, न्याय, आयुर्वेद, ज्योतिष, धर्मशास्त्र, अलंकार, व्याकरण, काव्य इत्यादी विषयात पारंगत असणाऱ्या ब्राह्मणांना पेशव्यांकडून दक्षिणा मिळत असे. त्यातील अनेकजण पाठशाळा चालवत असत. पेशवाई बुडाल्याने शिक्षणशास्त्रात कार्यरत असलेल्या या ब्राह्मणांचे उपजीविकेचे साधनच नष्ट झाले. देशातील सर्व भागातून हे ब्राह्मण पुण्यात श्रावण महिन्यात जमा होत असत. त्यावेळी पेशवे अंदाजे पंधरा लाख रूपये दक्षिणेद्वारा खर्च करत. चाळीस हजार ब्राह्मण दक्षिणा घेण्यासाठी जमा होत असत. यावरून प्रश्नाचे गांभीर्य लक्षात येईल.

पुण्यातील ही अस्वस्थता लक्षात घेऊन एल्फिन्स्टन यांनी गावातील प्रतिष्ठित व्यक्तींचा दरबार भरवला व जाहीर केले की, कंपनी सरकार हे यापुढे पेशव्यांच्या सर्व जबाबदाऱ्या पार पाडेल. पुढे एल्फिन्स्टन यांची मुंबईला गव्हर्नर म्हणून बदली झाली. नव्या कमिशनरने हे आश्वासन पाळले नाही. म्हणून पुण्यात परत आंदोलन झाले तेव्हा एल्फिन्स्टन यांनी दक्षिणेसाठी रू. दोन लाख रूपये मंजूर केले. पण प्रत्यक्ष पैसे द्यायची वेळ आली तेव्हा फक्त रू. पन्नास हजारच दिले. ते कसे खर्च करावेत याविषयीही वाद झाला. पन्नास हजारांपैकी फक्त तीस हजार दक्षिणेसाठी देण्यात आले व उरलेले वीस हजार अन्य तऱ्हेने शिक्षणावर खर्च करायचे ब्रिटिशांनी ठरवले.

एल्फिन्स्टनला हिंदू रितीरिवाज, हिंदू संस्कृती येथील भाषा व साहित्य याविषयी आदर होता. हिंदू लोकांच्या परंपरा जपणारे शिक्षण दिले जावे असे त्याला वाटे, परंतु त्याचबरोबर इंग्रजीतून उपलब्ध असणारे आधुनिक शास्त्रांचे ज्ञानही लोकांना मिळाले पाहिजे असे त्याला वाटे. पुण्यातील वातावरण इंग्रजी शिक्षणास पोषक नाही. पण मुंबईतील वातावरण नव्या शिक्षणास योग्य पोषक आहे असे त्याचे मत होते. त्यामुळे मातृभाषा व इंग्रजी भाषा यांच्या आधारे आधुनिक शिक्षण देण्यासाठी त्याने मुंबईची निवड केली व हिंदूंची पारंपरिक शास्त्रे शिकवण्यासाठी पुण्याची निवड केली.

नव्या शास्त्रांचे हिंदुस्थानी लोकांना शिक्षण देऊ नये कारण त्यामुळे इंग्रजांचे येथील राज्यच धोक्यात येऊ शकेल. असे अनेक युरोपियनांचे मत होते. हिंदुस्थानातील लोकांना नव्या शास्त्रांची ओळख व्हावी म्हणून त्याने येथील लोकांच्या मातृभाषेत पुस्तके निर्माण केली पाहिजेत असे त्याचे मत होते व ईस्ट इंडिया कंपनीला आपले मत त्याने सन १८१३ मध्येच कळवले होते. बॉम्बे एज्युकेशन सोसायटीची मदत घेऊन त्याने 'नेटीव एज्युकेशन अँड स्कूल बुक कमिटी' स्थापन केली. तसेच हैंदशाळा शाळापुस्तक मंडळी त्याने स्थापन केली व कोश, व्याकरण, भाषा, गणित, शिल्पकला, ज्योतिष, रसायन, पदार्थविज्ञानशास्त्र,

वैद्यक, राजनीती इत्यादी विषयांवर मराठीत शालोपयोगी पुस्तके तयार केली. त्याने शिक्षणकार्यात केलेली भरीव कामगिरी लक्षात घेऊन त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करून मुंबईच्या नागरिकांनी एल्फिन्स्टन महाविद्यालय स्थापन केले.

पुण्याचे पुना महाविद्यालय तथा संस्कृत महाविद्यालय सन १८२१ मध्ये सुरू झाले. पण पुण्यातील ब्रिटिश अधिकाऱ्यांनी या संस्कृत महाविद्यालयाविरूद्ध आघाडी उभारली. त्या महाविद्यालयात शिकवण्यात येणारे विषय निरूपयोगी आहेत व तेथील विद्यार्थी व शिक्षक हे ब्रिटिश विरोधी कारवाया करतात. त्यांनी मुंबईच्या गव्हर्नरकडे महाविद्यालय बंद करण्यासंबंधात प्रस्तावही पाठवला. (१८२३) त्यावेळी मुंबईचा गवर्नर एल्फिन्स्टन होता. त्याने महाविद्यालय बंद कऱण्याचा प्रस्ताव अमान्य केला. पुण्यातील शिक्षण संस्कृती खंडीत न होता पुढे चालू रहाण्यात एल्फिन्स्टनचे योगदान मोठेच आहे.

त्यांना भारताचे गव्हर्नरपदही देऊ केले होते पण ते त्याने स्वीकारले नाही. १८२७ मध्ये त्याने कंपनीच्या नोकरीतून निवृत्ती घेतली व तो इंग्लंडला परत गेला. उर्वरित आयुष्य त्याने अभ्यास व लेखनात घालवले. पेशव्यांकडून जिंकलेल्या प्रदेशाविषयी अहवाल, 'हिंदुस्थानचा इतिहास', 'पूर्वेकडील ब्रिटीश', साम्राज्याचा उदय ही त्यांची गाजलेली पुस्तके होत. एक ज्येष्ठ तत्ववेत्ता म्हणूनही त्याचा नावलौकीक आहे. वयाच्या ८० व्या वर्षी त्याचे निधन झाले. त्याच्या गौरवानिमित्त सेंट पॉल कॅथड्रूल मध्ये त्याचा पुतळा उभारण्यात आला.

– डॉ. नीळकंठ बापट

## ओगले, माधवी मधुसूदन

**संस्थापक**

**१३ एप्रिल १९५४ – ६ ऑक्टोबर २००७**

माधवी ओगले यांचा जन्म १३ एप्रिल १९५४ रोजी झाला. त्यांचे वडील वसंत मनोहर हे रिझर्व्ह बँकेत अधिकारी आणि आई वसुधा शाळेत शिक्षिका होत्या. डॉ. मधुसूदन ओगले यांच्याशी २६ नोव्हेंबर १९७८ या



दिवशी त्यांचा विवाह झाला. डॉ. ओगले हे स्वत: निष्णात रेडिओलॉजिस्ट होते. सौदी अरेबियाकडून त्यांना तेथे नोकरीचा प्रस्ताव आला आणि त्यांनी तो स्वीकारला. त्या निमित्ताने माधवी ओगले यांचे सौदीला वर्षातून दोन वेळा जाणेयेणे सुरू झाले. माधवी उच्चशिक्षित असूनही संसारिक जबाबदाऱ्या असल्याने त्यांनी विवाहानंतर नोकरी केली नाही. मुले थोडी मोठी झाल्यावर विद्याज्योती शाळेमध्ये त्या हिशेब तपासण्यासाठी जात असत. तिथेच त्यांची ओळख पद्मा‍ताईं गोडबोले यांच्याशी झाली. पद्मा‍ताईंनी अध्ययन अक्षमता या विषयाचा सखोल अभ्यास केला होता. परदेशात त्यांनी विशेष शिक्षणाच्या शाळेत काम केले होते. त्यांना पुण्यात तशी शाळा काढायची होती. पद्मा‍ताई व माधवी या दोघींनी प्रयत्न करून ७ जणांचा ट्रस्ट करून १ जून १९९० मध्ये प्रिझम फाउण्डेशन ही संस्था स्थापन केली. प्रथम या संस्थेची गतीमंद मुलांच्या विशेष शिक्षणासाठी फिनिक्स ही शाळा सुरू केली. पुण्यात अशा प्रकारची ही पहिलीच शाळा ठरली. शाळेची शैक्षणिक बाजू पद्मा‍ताईंनी सांभाळली व संस्थेची खजिनदार या नात्याने आर्थिक व्यवहार माधवी ओगले यांनी बघितले. पहिल्या वर्षातल्या अनुभवानंतर बहुविकलांगत्व असलेल्या मुलांकरिता म्हणून लगेचच दुसऱ्या वर्षी लार्क शाळेची स्थापना झाली. दोन्ही शाळा व्यवस्थित चालू झाल्या. शिक्षक वाढले. विद्यार्थी वाढले. १९९५ मध्ये इंडियन लॉ सोसायटीची एक मोकळी जागा ९९ वर्षाच्या भाडेकरारावर मिळाली. जागेवर तात्पुरत्या ८ खोल्या बांधून सकाळी फिनिक्स व दुपारी लार्क असा प्रवास सुरू झाला. संस्थेचा अंक निघू लागला. समाजसेवा म्हणून अनेक चांगल्या व्यक्ती संस्थेशी जोडल्या गेल्या. शाळांना मदत मिळू लागली. देणग्या जमा होऊ लागल्या. मुले वेगवेगळ्या स्पर्धात भाग घेऊ लागली. पुढची पायरी म्हणून संस्था पालक व शिक्षकांसाठी कार्यशाळा घेऊ लागली.

विशेष शिक्षणाविषयी कोणत्याही प्रकारचे शिक्षण माधवी यांनी घेतले नव्हते म्हणून चेन्नईला एक महिना राहून एक कोर्स पूर्ण केला. फिनिक्स आणि लार्क शाळेतील मुले शिक्षण घेऊन बाहेर पडू लागली. पण काही मुले त्यांच्या मर्यादेमुळे काही करू शकत नसत म्हणून माधवी यांना वाटले की प्रिझमच्या छत्राखाली १८ ते २५ वयोगटाच्या मुलांसाठी तिसरी शाळा काढली पाहिजे जिथे त्यांना व्यावसायिक शिक्षण दिले जाईल. त्यांची ही कल्पना विश्वस्तांना मान्य झाली आणि ७ जुलै १९९८ रोजी 'प्रिझम पूर्वव्यावसायिक शाळा' या नावाची तिसरी शाळा स्थापन झाली. या शाळेत मुख्याध्यापक म्हणून माधवी यांनी ३ वर्षे काम पाहिले. ही व्यावसायिक शिक्षण देणारी शाळा असली तरी या मुलांसाठी शाळेत सर्व कार्यक्रम आणि स्पर्धा व्हायच्या. त्यांची सहल निघायची व स्नेहसंमेलनपण व्हायचे. पालकांसाठी कार्यशाळा व्हायच्या.

वेळोवेळी मुलांचे व पालकांचे समुपदेशन व्हायचे. या शाळेत कॅनिंग, चक्की व बेकरी विभाग चालू केले गेले. त्यासाठी मोठमोठी यंत्रसामग्री आणली गेली. दुसऱ्या विभागात फाईल्स तयार करणे, स्क्रिनप्रिंटींग, पाकिटे बनविणे, शिवणकाम, मेणबत्या बनविणे, फिनेल-लिक्वीड सोप तयार करणे हे उद्योग सुरू झाले. कलाकुसरी वस्तूही तयार होऊ लागल्या. मुलांना त्यांच्या आवडी व कुवतीप्रमाणे शिकविले जाऊ लागले. कच्चा माल आणण्यासाठी आणि तयार मालाच्या विक्रीसाठी मुलांना बाहेर पाठविले जाऊ लागले. मालाची विक्री व्हावी म्हणून ग्राहक पेठ व इतर काही दुकानातही प्रयत्न केले गेले. प्रदर्शनातून छोटी दुकाने घेऊन शाळेचे माहिती पत्रक दिले जायचे. त्यामुळे त्यातून आर्थिक फायदा झाला नाही तरी संस्थेची आणि शाळेची माहिती लोकांना होत असे. विक्रीसाठी आवश्यक असलेले परवाने काढले गेले, स्टॉलवर मुले जावू लागली.

संस्थेची विश्वस्त व खजिनदार या नात्याने त्यांनी स्वत:ची जबाबदारी व्यवस्थित पार पाडली. सुरूवातीची काही वर्षे पद्माताई त्यांच्या कामासाठी लंडन व कॅनडाला जास्त दिवस जात असत. तेव्हाही संस्थेची व तिन्ही शाळांची जबाबदारी माधवी यांच्यावरच पडत असे.

माधवी यांनी स्वत:साठी गाडी न घेता रिक्षा घेतली होती. एक चालक नेमला होता. शाळेसाठी या रिक्षाचा खूप उपयोग व्हायचा. हा चालक शाळेच्या इतर कामातही मदत करायचा. माधवी यांनी संगणक शिकून नवीन पिढीशी बरोबरी केली. त्यांच्याच प्रोत्साहानाने शाळेतील विभाग प्रमुख व प्राचार्यांना शाळेतर्फे संगणकाचे शिक्षण घेण्यासाठी पाठविले गेले. त्याचा सर्वांनाच खूप उपयोग झाला.

नंतर माधवी यांनी अध्यात्मिक उपचार करण्याचे शिक्षण घेतले. पुढे त्यांनी निसर्गोपचारमध्ये पदवी मिळवली. होमिओपॅथी व आयुर्वेदावर त्यांचा विश्वास होता, परंतु त्यांनी जास्त अभ्यास केला तो निसर्गोपचाराचा. या संदर्भातील अॅक्युप्रेशर, मॅग्नेट, वॉटर थेरपी, मसाज वगैरेंचा अभ्यास करून घरात उपचार केंद्रही चालू केले. त्यांनी सुरू केलेल्या प्रिझम पूर्वव्यावसायिक शाळेला १० वर्षे पूर्ण झाली आणि त्यांचे ६ ऑक्टोबर २००७ रोजी हृदयरोगाने निधन झाले. पूर्वीची प्रिझम पूर्वव्यावसायिक शाळा आता माधवी ओगले व्यावसायिक शाळा म्हणजेच 'एम.ओ.व्ही.एस.' नावाने आज ओळखली जाते.

– मंजिरी ओगले – मुळे

* * *



## कडेपूरकर, रामचंद्र पंढरीनाथ

**संस्थापक, राष्ट्रभाषा प्रसारक**

**३१ ऑगस्ट १९१४ – १२ जानेवारी १९९३**



रामचंद्र पंढरीनाथ कडेपूरकर ह्यांचा जन्म बीड जिल्ह्यातील पैठण ह्या गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण पैठणमध्ये झाले व माध्यमिक शिक्षण त्यांनी औरंगाबादच्या विद्यालयामध्ये घेतले. वयाच्या अठराव्या वर्षी पैठण येथे त्यांनी राष्ट्रीय पाठशाळेची स्थापना केली होती. निजामी दडपशाहीला न जुमानता विद्यार्थ्यांमध्ये जागृती निर्माण करून गणेशोत्सव साजरा केला होता. त्याचा त्यांना खूप त्रास सहन करावा लागला. पण तरीही राष्ट्रीय वृत्तीच्या जोपासनेसाठी त्यांनी 'विचार विकास मंडळा'चीही स्थापना केली होती.

काही काळानंतर ते औरंगाबादला आले. तेथील समविचारी मित्रांबरोबर ते स्वातंत्र्य चळवळीत सहभागी झाले. १९३० मध्ये महात्मा गांधींच्या दांडी यात्रेसाठी मित्रांबरोबर पायी मुंबईला गेले. १९३२ मध्ये त्यांनी कायदेभंगाच्या चळवळीत भाग घेतला. त्या वेळी त्यांना तुरुंगवास सहन करावा लागला. हैद्राबादच्या मुक्तिसंग्रामात त्यांचा मोठा सहभाग होता. कलकत्त्यातील काँग्रेस अधिवेशनात त्यांना लाठीमारही सहन करावा लागला होता.

स्वातंत्र्य चळवळीतील कार्य चालू असताना कडेपूरकर १९३९ मध्ये नाशिकला आले. १९३५ मध्येच नाशिकला हिंदी राष्ट्रभाषा सभेची स्थापना झाली होती. प्रा. भा. ल. पाटणकर व महाबळ गुरुजी हिंदी परीक्षांचे वर्ग घेत असत. 'दक्षिण भारत हिंदी प्रचार सभा', मद्रासच्या वतीने ह्या परीक्षा घेतल्या जात. नाशिकला आल्याबरोबर कडेपूरकरांनी या वर्गाची जबाबदारी स्वीकारली. महात्मा गांधींनी सुरू केलेले राष्ट्रीय रचनात्मक कार्य करावयाचे ह्या विचाराने मोठ्या प्रमाणावर संघटना बांधली. त्यांचे राष्ट्रभाषा प्रचाराचे कार्य सुरू झाले. ह्याच काळात त्यांनी बनारस हिंदू विद्यापीठाची साहित्यरत्न पदवी प्राप्त केली. पुढे नाशिकच्या भोसला सैनिकी शाळा, शासकीय कन्याशाळा, न्यू हायस्कूल ह्या शाळांमध्ये अनेक वर्षे त्यांनी हिंदीचे अध्यापन केले.

त्यांचे अध्यापन कधी रूक्ष झाले नाही. रंजन आणि बोध ह्या दोन्हींचा उत्कृष्ट मिलाफ त्यांच्या अध्यापनात असायचा. शाळेतील मुलांप्रमाणेच उच्च शिक्षण घेणाऱ्या, विद्यापीठात पीएच. डी. करणाऱ्या विद्यार्थ्यांनाही ते मार्गदर्शन करीत असत. १९४५ मध्ये पुण्यात महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभेची स्थापना झाली. ते ह्या संस्थेचे संस्थापक सदस्य व मोठे आधारस्तंभ होते. त्यांनी अनेक प्रचारक व कार्यकर्ते घडविले. त्या काळात हे काम मोठ्या जिकिरीचे होते, कोणतेही तत्कालीन फळ देणारे नव्हते. बाळ गंगाधर खेरांच्या काळात राष्ट्रभाषा सभेच्या परीक्षांना मान्यता मिळाली. शालेय अभ्यासक्रमात हिंदीचा समावेश झाला. प्रशिक्षित शिक्षक तयार करण्याचे महत्त्वाचे कार्य त्यांच्या प्रयत्नांनी व प्रेरणेने घडले. शिक्षक तयार होत गेले.

नाशिक व पुणे येथे हिंदी माध्यमाच्या शाळा सुरू कराव्यात अशी त्यांची योजना होती. १९५६ मध्ये नाशिकला गांधीनगर येथे 'हिंदी माध्यमिक विद्यालया'ची व पुण्यात कॅम्प परिसरात 'हिंदी विद्यालया'ची स्थापना करण्यात कडेपूरकरांचाच पुढाकार होता. मराठवाड्यात

राष्ट्रभाषेचा प्रसार व्हावा म्हणून सेलू व औरंगाबाद येथेही राष्ट्रभाषा सभेची स्थापना त्यांच्याच प्रयत्नातून झाली. औरंगाबाद येथील सरस्वतीभुवन शिक्षण संस्था, महात्मा गांधी भवन व तेथील समृद्ध ग्रंथालय यांच्या उभारणीत त्यांचा सहभाग मोठा होता.

कडेपूरकरांच्या हिंदी साहित्याच्या व्यासंगाचा प्रत्यय हिंदी साहित्यधारा ह्या पाठ्यपुस्तकांत व 'लोकवाणी' ह्या पाठ्यपुस्तकमालेच्या निर्मितीत येतो. त्यांनी हिंदी-मराठी शब्दकोशाच्या संकलनाचे कामही केले होते.

– प्रा. सुहासिनी पटेल

## कणबरकर, रामचंद्र कृष्णा

**शिक्षणतज्ज्ञ, प्राचार्य**

**१५ जून १९२१**



शिवाजी विद्यापीठाचे माजी कुलगुरू, इंग्रजीचे व्यासंगी प्राध्यापक आणि कुशल प्राचार्य रामचंद्र कृष्णाजी कणबरकर यांचा जन्म बेळगाव येथे एका गरीब शेतकरी कुटुंबात झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण होण्यापूर्वीच प्रथम त्यांची आई आणि नंतर त्यांचे वडीलही मृत्यू पावले. पुढे त्यांचा सांभाळ सावत्र आईने केला.

उदरनिर्वाहासाठी शेतमजुरी आणि भाजीविक्री यासारखी अंगमेहनतीची कामे करीत त्यांचे पुढील शिक्षण चालू झाले. १९४० मध्ये ते प्रथम वर्ग विशेष गुणवत्तेसह मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर ते पुढील उच्च शिक्षणासाठी कोल्हापूरला आले. 'श्री प्रिन्स शिवाजी फ्री मराठा बोर्डिंग हाऊस'मध्ये त्यांची राहण्याजेवण्याची सोय झाली. कोल्हापूर येथील प्रसिद्ध 'राजाराम महाविद्यालया' मधून ते १९४४ मध्ये इंग्रजी विषय घेऊन बी.ए. ची परीक्षा द्वितीय वर्गात उत्तीर्ण झाले. १९४६ मध्ये संपूर्ण इंग्रजी विषयात एम.ए. द्वितीय वर्ग प्राप्त करण्यात ते यशस्वी ठरले. याखेरीज इंग्रजीसारखी परकीय भाषा शिकविण्याचा हैदराबाद येथील अभ्यासक्रम त्यांनी पूर्ण केला. इंग्रजी विषयातील एम. ए. होताच त्यांची बेळगाव येथील लिंगराज महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली.

महाराष्ट्रातील बहुजनांच्या सर्वांगीण शिक्षणाचे उद्गाते कर्मवीर भाऊराव पाटील यांचे लक्ष या अभ्यासू, निर्व्यसनी आणि चारित्र्यसंपन्न तरुणाकडे वेधले गेले. त्यांनी रा. कृ. कणबरकर यांना आपल्या 'रयत शिक्षण संस्थे'च्या कार्यात तत्परतेने सहभागी करून घेऊन त्यांच्याकडे सातारा येथील 'छत्रपती शिवाजी महाविद्यालया'मधील इंग्रजी विभागाचे प्रमुख पद १९४७ मध्ये सोपविले. याच वर्षी किर्लोस्करवाडी येथील मुरकुटे कुटुंबातील कु. शालिनी यांच्याबरोबर त्यांचा विवाह झाला.

कर्मवीर भाऊराव पाटील यांनी महाराष्ट्रातील कराड सारख्या छोट्या शहरात १९५४ मध्ये सद्‌गुरू गाडगे महाराज यांच्या नावाने महाविद्यालय सुरू केले. त्या महाविद्यालयाची प्राचार्यपदाची धुरा तरुण कणबरकरांच्याकडे मोठ्या विश्वासाने त्यांनी सुपूर्द केली. कर्मवीर भाऊराव पाटील यांच्या विश्वासास ते पूर्ण पात्र ठरले. कारण त्यांनी 'सद्‌गुरू गाडगे महाराज महाविद्यालयाला' 'गुणवत्ता महाविद्यालय' म्हणून नावलौकिक अल्पावधीत प्राप्त करून दिला होता. परंतु बॅरिस्टर बाळासाहेब खर्डेकर यांनी कागल येथील 'गोखले महाविद्यालय' कोल्हापूर येथे आणण्याचे ठरवले, म्हणून त्यांनी रा. कृ.कणबरकरांना कोल्हापुरास येण्यास सांगितले. त्यांच्याशी असलेल्या स्नेहामुळे आणि त्याचवेळी प्राचार्य गोकाक यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांचे पीएच.डी. चे काम चालू होते, म्हणून ते रयत शिक्षण संस्था सोडून कोल्हापुरातील गोखले महाविद्यालयमध्ये रुजू झाले.

१९५५ मध्ये सुरू झालेल्या स्वामी विवेकानंद शिक्षणसंस्थेचे प्रमुख संपादक बापूजी हे त्यांचे अतिशय जिव्हाळ्याचे मित्र होते. बापूजींनी त्यांना या संस्थेत आपले सहकारी म्हणून मोठ्या आस्थेने सामावून घेतले. इतकेच नव्हे तर उस्मानाबादसारख्या छोट्या खेड्यात रामकृष्ण परमहंस महाविद्यालयाचे पहिले प्राचार्य म्हणून १९५९

मध्ये त्यांची नेमणूक केली. त्यांच्या कुशल प्रशासन आणि गरीब विद्यार्थी हा केंद्रबिंदू मानून कार्य करण्याच्या पद्धतीमुळे मराठवाडा विद्यापीठात ते महाविद्यालय प्रथम दर्जाचे म्हणून ओळखले जाऊ लागले. त्यानंतर त्यांनी संस्थेच्या कोल्हापुरातील जुन्या बुधवार पेठेतील स्वामी विवेकानंद महाविद्यालयाचे पहिले प्राचार्य म्हणून (१९६४-१९७१) मध्ये कार्यभार स्वीकारला. थोड्याच दिवसात हेही महाविद्यालय शिवाजी विद्यापीठाच्या क्षेत्रात शैक्षणिक, सांस्कृतिक आणि क्रीडा विश्वात 'गुणवत्ता महाविद्यालय' म्हणून मान्यता पावले.

एखाद्या नवीन महाविद्यालयाची धुरा वाहून त्याला थोड्याच दिवसात प्रथम दर्जा प्राप्त करून देणे म्हणजे प्राचार्यपदी रा.कृ.कणबरकर असणे हे जणू समीकरणच महाराष्ट्रात होऊन बसले. त्यामुळे त्यांची मातृसंस्था असणाऱ्या 'श्री प्रिन्स शिवाजी फ्री मराठा बोर्डिंग हाऊस', कोल्हापूर संस्थेने आपण सुरू करीत असलेल्या 'न्यू कॉलेज'चे प्राचार्य म्हणून १९७१ मध्ये त्यांना सन्मानपूर्वक संस्थेत आणले. परिणामी उच्च माध्यमिक शालान्त परीक्षेच्या (बारावी १९७७, पुणे विभाग) विज्ञान शाखेच्या गुणवत्ता यादीत या महाविद्यालयाचे सात विद्यार्थी चमकले.

याखेरीज पुणे, मराठवाडा व शिवाजी विद्यापीठाची विद्वतसभा, विधीसभा, कार्यकारिणी यामध्येही व्यासंगी व क्रियाशील सभासद म्हणून ते अनेक वर्षे कार्यरत होते. त्याचप्रमाणे शिवाजी विद्यापीठाच्या कला शाखेचे अधिष्ठाता म्हणूनही त्यांनी काम पाहिले.

शैक्षणिक समस्यांचा चौफेर अभ्यास, तळमळ, चिकाटी, कडक शिस्त, भ्रष्टाचाराचे समूळ उच्चाटन करणे व चारित्र्यसंपन्नता या त्यांच्या गुणामुळे ते शिवाजी विद्यापीठाचे १९८०-१९८३ या काळात उपकुलगुरू म्हणून प्रभावी ठरले. त्यांच्या या कारकिर्दीमध्ये ललितकला, संख्याशास्त्र, प्रौढ व निरंतर शिक्षण विभाग सुरू झाले. सोलापूर येथील शिवाजी विद्यापीठाच्या उपकेंद्राचा आरंभ झाला. याखेरीज शाहू संशोधन केंद्राचे पुनरुज्जीवन करण्यासाठी डॉ. विलास संगवे यांच्यासारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या समाजशास्त्रज्ञाची त्यांनी त्या केंद्राच्या प्रमुखपदी जाणीवपूर्वक नियुक्ती केली. त्याचप्रमाणे उच्च शिक्षण पत्रोत्तर अभ्यासक्रम व शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी परीक्षेमध्ये निरंतर अंतर्गत मूल्यमापन पद्धती कार्यान्वित केली. या सर्व शैक्षणिक प्रशासकीय व्यापातून त्यांची शैक्षणिक-सामाजिक विषयावरील व्याख्याने आणि ग्रंथलेखनही सुरू होते. 'ए ग्रामर ऑफ इंग्लिश', 'अ कोर्स इन प्रि-डिग्री इंग्लिश', महाराष्ट्र-कर्नाटक सीमा प्रश्न: 'महाराष्ट्राची न्याय बाजू', 'चिंतन', 'भाई माधवराव बागल चरित्र' (प्रा. डॉ. रमेश जाधव यांच्या सहयोगाने) व 'ग्लिम्पसेस ऑफ राजर्षी शाहू महाराज'इत्यादी त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

न्यू दिल्ली येथील एन्.सी.ई.आर.टी. या संस्थेचे १९८०-८३ या काळात ते सभासद होते. सध्या विद्यमान विश्वस्त-राजर्षि शाहू स्मारक ट्रस्ट, विश्वस्त व कार्याध्यक्ष-ताराराणी विद्यापीठ कोल्हापूर, संस्थापक व सभासद-श्री विवेकानंद शिक्षणसंस्था, विश्वस्त व खजिनदार लोकराजा शाहू छत्रपती दूरदर्शन मालिका संशोधन तज्ज्ञ समितीचे सभासद-राजर्षि शाहू छत्रपती कृतज्ञता प्रतिष्ठान व धर्मनिरपेक्षता,सामाजिक समता व राष्ट्रीय एकात्मता यासाठी कार्यबद्ध असणाऱ्या भाई माधवराव बागल विद्यापीठाचे उपाध्यक्ष म्हणून कार्यमग्न आहेत. त्यांच्यामुळेच या विद्यापीठास नैतिक अधिष्ठान लाभले आहे.

१९७४ मध्ये महाराष्ट्र शासनाने त्यांना आदर्श शिक्षक हा पुरस्कार बहाल केला. याखेरीज कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे पुरस्कार- वाई, संत गाडगे महाराज पुरस्कार-कोल्हापूर, दक्षिण भारत जैन सभेचा कर्मवीर भाऊराव पाटील पुरस्कार इत्यादी पुरस्कारही त्यांना लाभले आहेत.

– प्रा. डॉ. रमेश जाधव

## कमळे, शिरेप्पा

***दीनानाथ कमळे गुरुजी***

**शिक्षक, संस्थापक, सामाजिक कार्यकर्ते**

**१० जून १९२२ – ६ जून २००४**

शिरेप्पा उर्फ दीनानाथ कमळे गुरुजींचा जन्म अत्यंत गरीब कुटुंबातील मातापित्यांच्या पोटी झाला. त्यांच्या



वयाच्या तिसऱ्या वर्षीच आईचे निधन झाले. गुरुजींचे जन्मगांव दक्षिण सोलापूर तालुक्यातील भंडारकवठे या ठिकाणी सातवीपर्यंत शिक्षणाची सोय असल्याने पुढे त्यांना शिक्षण घेता आले नाही. या काळात गुरुजींना कै. हणमंत मल्लीकार्जुन कोळी, कै. नरहर बळवंत जोशी यांच्यासारखे देशभक्त व आदर्श शिक्षक लाभल्याने गुरुजींवर शालेय वयातच देशभक्ती व आदर्श नागरिकाचे कसदार संस्कार झाले. गावातील मागासवर्गीय लोक वेशीबाहेर अत्यंत दयनीय जीवन जगत असल्याचे पाहून त्या वयातही ते व्यथित होत असत. सातवी म्हणजे त्यावेळेच्या व्हर्नाक्युलर परीक्षेत प्रथम आलेल्या गुरुजींनी पंढरपूर तालुक्यातील फुलचिंचोळी येथे १९४० मध्ये तात्पुरती शिक्षकाची नोकरी स्वीकारली. १९४२ पासून ते बेलाटी ता. दक्षिण सोलापूर येथे शिक्षक म्हणून काम करू लागले. १९४२ ते १९४९ या काळातच त्यांनी नोकरी केली.

१९४९ मध्ये पूर्ण वेळ देशसेवा व समाजसेवा करण्यासाठी त्यांनी शिक्षकाच्या नोकरीचा राजीनामा दिला. शालेय वयापासूनच त्यांना वाचनाची आवड असल्याने नोकरीच्या काळात महात्मा गांधी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा फुले, विनोबा भावे, साने गुरुजी, जे. कृष्णमूर्ती, संत गाडगेबाबा, कार्ल मार्क्स इ.च्या विचारांचा त्यांच्यावर प्रभाव पडला. साम्यवाद व समाजवादी विचारांचा अंगीकार त्यांनी केला. सोलापूरातील भाई छन्नुसिंग चंदेले, देशभक्त तुळशीदासजी जाधव, डॉ. अंत्रोळीकर या व इतर अनेक स्वातंत्र्यसेनानीच्या बरोबरीने त्यांनी स्वातंत्र्यलढ्यात सहभाग घेतला होता. सुखी व सुसंस्कृत समाजनिर्मितीसाठी शिक्षण हे अतिशय परिणामकारक व प्रभावी माध्यम आहे हा विचार गुरुजींनी स्वीकारला व प्रत्यक्षात साकारला. म्हणूनच गुरुजींचे शिक्षणविषयक प्रयोग हे आगळेवेगळे व त्यांनी अंगिकारलेल्या समाजवादी विचारसरणीशी ते सुसंगत ठरले.

स्वातंत्र्यानंतर देशप्रेमाने भारावून गुरुजींनी स्वतःला सक्रीय समाजकारण व राजकारणात झोकून दिले. त्यांच्या मते, 'स्वराज्य तर मिळाले आता सुराज्यासाठी झटण्याची गरज आहे, त्यासाठी शिक्षण प्रसाराच्या माध्यमातून लोकजागृती करण्याची मोहीम हाती घेणे आवश्यक आहे.' त्या दृष्टीने १९५० मध्ये सोलापुरातील नेहरुनगर येथे मुलामुलींना शिक्षण घेता यावे म्हणून एक व्यापक शिक्षण संकुल निर्माण केले. चंद्राम चव्हाण गुरुजी, गणपती जाधव, खेमू राठोड या मंडळींनी याकामी गुरुजींना खंबीर साथ दिली.

१९५२ मध्ये कमळे गुरुजींची जिल्हा स्कूल बोर्डावर निवड झाली. त्यानंतर त्यांनी सोलापूर जिल्ह्यातील तांड्यातांडयांवर शाळा सुरु केल्या. या तांड्यांवर फक्त चौथ्या इयत्तेपर्यंतच शिक्षणाची सोय होती. या मुलामुलींना पुढील सर्वसाधारण व व्यावसायिक शिक्षण घेता यावे म्हणून गुरुजींनी नेहरुनगर, सोलापूर येथील संकुलात पारंपारिक शिक्षणाबरोबरच शेती, डेअरी, कुक्कुटपालन व इतर जीवनोपयोगी उद्योग-व्यवसायांच्या प्रशिक्षणाची सोय केली. १९५७ मध्ये गुरुजींची जिल्हा विकास मंडळाच्या सचिवपदी नेमणूक झाली. त्या कालखंडात भटक्या विमुक्त जातींच्या लोकांसाठी केंद्र सरकारने विकास योजना मागविल्या होत्या. गुरुजींनी नेहरुनगरची योजन सादर केली. या योजनेस शासनाची मंजुरीही मिळवून दिली. त्यातून साने गुरुजी वसतिगृह, वाल्मिकी वसतिगृह, शिवाजी डी.एड. महाविद्यालय, इंदिरा बालविकास मंदिर, मुलींसाठी विजयालक्ष्मी वसतिगृह, गांधी आश्रम शाळा इ. अनेक शैक्षणिक प्रकल्प उभे राहिले. या प्रकल्पाच्या विकासापासून कै. मोतीलाल नेहरु विद्यापीठ स्थापन करावे अशी मनोमन इच्छा गुरुजींची होती. परंतु काही तांत्रिक अडचणींमुळे त्यांची ही इच्छा अपूर्ण राहिली.

दक्षिण सोलापूर तालुक्यातील भंडारकवडे हे गुरुजींचे जन्मगांव हा भाग शैक्षणिक दृष्ट्या मागासलेला होता. दि. ३ जून १९५६ रोजी गुरुजींनी 'सोलापूर जिल्हा समाजसेवा मंडळ' ही संस्था स्थापन केली.या मंडळाच्या माध्यमातून भंडारकवडे, विंचूर, कंदलगांव, औराद, बरुर व मंडुप येथे ग्रामस्थांच्या मदतीने माध्यमिक विद्यालये भंडारकवडे,

मंडुप, बरुर व कंदलगांव येथे उच्च माध्यमिक शिक्षणाची सोय केली.

ग्रामीण भागातील गोरगरीब मुलांना घरच्या परिस्थितीमुळे शिक्षण घेता येत नाही हे जाणून त्यांचे शिक्षण व राहण्या-जेवणाची सोय व्हावी म्हणून भंडारकवडे व मंडुप येथे मागासवर्गीय मुलांसाठी वसतिगृहाची सोय केली. माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षणाची सोय झाल्यानंतर उच्च शिक्षणाची गरज ओळखून गुरुजींनी भीमरावजी पाटील वडकबाळकर व सुशीलकुमार शिंदे यांच्या सहकार्याने २००१ मध्ये मंडुप येथे संतोष भीमराव पाटील महाविद्यालय स्थापन केले. सध्या हे महाविद्यालय सोलापूर विद्यापीठातील गुणवत्तापूर्ण व उपक्रमशील महाविद्यालय म्हणून ओळखले जाते.

या सर्व शैक्षणिक संस्थांमध्ये काम करणारे अध्यापक व सेवक यांची निवड करीत असताना गुरुजींनी अत्यंत पारदर्शकपणे गुणवत्ता हा निकष विचारात घेऊनच निवड केली. एवढेच नव्हे तर तळमळ, गरिबीची व देशप्रेमाची चाड असणाऱ्या सेवकांत प्राधान्य दिले. संस्थेतील शिक्षक हा समाजाचाही शिक्षक असला पाहिजे त्यासाठी अध्यापनकार्याबरोबरच सामाजिक बांधिलकी मानून शिक्षकाने समाजामध्ये कृषी विकास, आरोग्य संवर्धन व साक्षरताप्रसार यासाठी प्रबोधन केले पाहिजे व त्यासाठी शिक्षकांचे प्रबोधन होणे गरजेचे आहे हे ओळखून गुरुजींनी शैक्षणिक व प्रबोधन शिबिर ही योजना साकारली. प्रतिवर्षी संस्थेतील शिक्षक व सेवकांसाठी तीन दिवसांचे निवासी शिबिर घेतले जाते. १९८७ पासून ही योजना सुरू आहे. या शिबिरात मार्गदर्शन करण्यासाठी महाराष्ट्रातील नामवंत वक्ते व अभ्यासकांना निमंत्रित केले जाते. ग्रामस्थही यामध्ये सहभागी होतात. उत्कृष्ट कार्य करणाऱ्या शिक्षकांचा गौरव व संकटात सापडलेल्या शिक्षकाला संरक्षण आणि मदत करण्याचे गुरुजींचे धोरण होते.

शैक्षणिक क्षेत्रातील कार्याबरोबरच कमळे गुरुजींनी राजकीय व सामाजिक क्षेत्रात ही महत्त्वाची भूमिका पार पाडली आहे. जिल्हा काँग्रेस समितीचे अध्यक्ष म्हणून पक्षाची बांधणी करण्यात त्यांचे मोलाचे योगदान होते. त्यांचा लोकसंग्रह अफाट होता. राजकारणात राहूनही स्पष्टवक्तेपणा, परखड विचार मांडण्याचा स्वभाव असल्याने ते अडचणीतही येत असत. परंतु त्याची त्यांनी कधी पर्वा केली नाही. आमदार म्हणून कार्यरत असताना शासनाच्या अनेक महत्त्वाच्या समितीवर त्यांनी अगदी प्रामाणिकपणे व निस्पृह वृत्तीने कार्य केले. मंत्रिपदाच्या कारकिर्दीत शेतमजूर संघटना, निर्मलाताई देशपांडे यांचा रचनात्मक समाज, डॉ. बाबा आढाव यांच्या 'श्रमाची भाकर' 'हमाल पंचायत' यासारख्या अनेकांच्या संस्थांना कमळे गुरुजी भेटी देत असत व विचारपूस करीत असत.

कमळे गुरुजींनी सोलापूर जिल्ह्यात जे सामाजिक काम केले ते महात्मा गांधींच्या विचारसरणीला अनुसरून अशाच प्रकारे होते. त्यांचा 'बेलाटी प्रयोग' हा त्या काळी महाराष्ट्रात स्तुत्य ठरला. महात्मा गांधी यांची 'ग्रामस्वराज्य योजना' ही कमळे गुरुजींनी बेलाशी व दक्षिण सोलापूर तालुक्यातील अनेक गावामध्ये साकारण्याचा प्रयत्न केला. गावातील रस्ते बांधणी व दुरुस्ती श्रमदानाने घडवून आणणे, गावातील मंदिरे व पिण्याच्या पाण्याच्या विहिरी सर्वांना खुल्या करणे, गावातील तंटेबखेडे हे गावातील न्यायदान मंडळापुढे सोडविणे, स्वच्छग्राम योजना, गावात व्यसनमुक्ती, अस्पृश्योद्धार, स्त्रीशिक्षण, प्रौढशिक्षण, सामुदायिक विवाह, अंधश्रद्धा निर्मूलन, गांधीजींची मूलोद्योग योजना इ. अनेक योजना व प्रयोग गुरुजींनी ग्रामीण भागात अत्यंत परिश्रम घेऊन राबविले. विशेष म्हणजे गुरुजींनी वृक्षारोपण कार्यात फार मोठा पुढाकार घेतला होता. ग्रामीण भागात वृक्षारोपणाचे महत्त्व पटवून दिले. झाडांना स्वातंत्र्यसैनिकांची नांवे देण्याची अभिनव कल्पना त्यांनी राबविली. राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांनी या प्रयोगाला भेट देऊन दोन दिवस वास्तव्य केले. १९४८ मध्ये या प्रयोगाला महाराष्ट्र सरकारचे आदर्श ग्रामसेवेचे बक्षिस मिळाले.

गुरुजींच्या एकूण वाटचालीत त्यांच्या पत्नी निर्मलाताई यांचे योगदान फार मोठे होते. समाजातील तळागाळातील लोकांसाठी गुरुजी अहोरात्र परिश्रम करीत असत. म्हणूनच शिक्षिका असलेल्या निर्मलाताईंनी मोठ्या अभिमानाने त्यांचे नाव 'दीनानाथ' असे ठेवले होते. सोलापूर

जिल्ह्यातील सामान्य, उपेक्षितांच्या कल्याणासाठी गुरुजींनी विविध प्रकल्पांच्या माध्यमातून जे काम उभे केले त्याचा गौरव केंद्र सरकारनेही केला. गुरुजींच्या या कार्याची केंद्र सरकारने दखल घेऊन परदेशातील सामाजिक संस्थांच्या कार्याचा अभ्यास करण्य़ासाठी गुरुजींना अनेक देशांना जाण्याची संधी दिली. त्यांनी मलाया, सिंगापूर, सिलोन, रशिया, इंडोनेशिया इ. देशातील सामाजिक व सांस्कृतिक विकासाचा अभ्यास केला. कमळे गुरुजी आयुष्यभर समाजसेवेचे व्रतस्थ जीवन जगले.

– प्रा. उत्तम हुंडेकर

## करंबेळकर, प्रभाकर लक्ष्मण

***शंकरराव करंबेळकर***

**शिक्षणतज्ज्ञ, संस्थापक**

**१४ एप्रिल १९७८**



प्रभाकर लक्ष्मण करंबेळकर हे कऱ्हाडवासियांना शंकरराव म्हणून परिचित आहेत. त्यांचा जन्म कराड तालुक्यातील इंदोली ह्या खेड्यात झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण इंदोली गावात झाले. मॅट्रिकनंतर १९३६ मध्ये पुण्यातील सर परशुरामभाऊ महाविद्यालयामधून ते बी. ए. झाले. १९३७ मध्ये तासगाव येथील शाळेत त्यांची शिक्षक म्हणून व्यवसायास सुरुवात झाली. १९३८ व १९३९ ही दोन वर्षे त्यांना नोकरी नव्हती. पण याच दोन वर्षांत 'मायाबाजार' ह्या चित्रपटातील गीतांची रचना त्यांनी केली. १९४० मध्ये बेळगावच्या महाविद्यालयामधून त्यांनी बी.टी. पदवी मिळविली.

१९४० मध्ये कऱ्हाड येथील महाराष्ट्र विद्यालयामध्ये शिक्षक म्हणून शंकरराव दाखल झाले. या विद्यालयात पाच वर्षे त्यांनी अध्यापनाचे कार्य उत्तम प्रकारे केले. पण नंतर संस्थाचालकांशी मतभेद झाले व अकरा समविचारी सहकाऱ्यांसह त्यांनी संस्थेला रामराम ठोकला. यशवंतराव चव्हाण, पु. पा. गोखले आणि कऱ्हाडमधील शिक्षणप्रेमी मान्यवरांच्या सहकार्याने शंकररावांनी १९४५ मध्ये शिवाजी शिक्षण संस्थेची मुहूर्तमेढ केली. शंकरराव संस्थेचे सरचिटणीस म्हणून काम पाहू लागले.

त्यांच्या नेतृत्वाखाली संस्था मोठी होत गेली. संस्थेचे विज्ञान महाविद्यालय उभे राहिले. कला,वाणिज्य महाविद्यालय साकारले. या सर्व महाविद्यालयांचा व्याप एवढा वाढला की नंतर त्यांची स्वतंत्र महाविद्यालये झाली आहेत. कऱ्हाडजवळील गावांतून त्यांनी शाळा काढल्या व गरजवंतांना शिक्षणाची सोय उपलब्ध करून दिली. नंतरच्या काळात शंकररावांनी शिशू शिक्षण संस्थेची स्थापना केली. त्याचबरोबर लहानपणापासून शिक्षणापासून वंचित राहिलेल्या लोकांसाठी रात्रशाळा सुरू केले. शिक्षकाने मुलांना फक्त बौद्धिक दृष्ट्या साक्षर करणे त्यांना कधीच रुचले नाही. शाळेत घडवला जाणारा प्रत्येक विद्यार्थी भावसाक्षरही झाला पाहिजे असा त्यांचा आग्रह असे. याचाच अर्थ असा की त्या काळातही बुद्ध्यांकाइतकेच (आय. क्यू.) भावनांकाला (इ.क्यू.) महत्त्व आहे हे त्यांनी जाणले होते.

ज्या शिक्षणक्षेत्रात त्यांनी आपले उभे आयुष्य वेचले तेथे कार्य करीत असताना त्यांनी आपले विचार सतत परखडपणे मांडले. अहमदनगर येथील १९६२ सालची मुंबई माध्यमिक परिषद, १९६५ सालचे नाशिकमधील मुख्याध्यापक अधिवेशन त्यांनी अभ्यासपूर्ण भाषणांनी गाजविले. शिक्षण क्षेत्रात कार्य करीत असणारे शंकरराव पुढे कऱ्हाडचे नगराध्यक्षही झाले म्हणूनच शिक्षण, साहित्य व समाजकार्याच्या क्षेत्रात सतत कार्य करीत राहणारे शंकराव करंबेळकर, कऱ्हाडचे 'सार्वजनिक काका' ह्यांना दक्षिण महाराष्ट्रातील एक व्यवहारी शिक्षणतज्ज्ञ म्हणून लौकिक लाभला.

– डॉ. अ. श्री. भागवत

**संदर्भ :**

*१) शंकरराव करंबेळकर यांच्या षष्ठ्यब्दीनिमित्ताने प्रकाशित 'बिल्वदल' पुस्तिका.*

*३) शिवाजी शिक्षण संस्थेची रौप्यमहोत्सवी स्मरणिका.*

## कर्मवीर भाऊराव पाटील

***पाटील, भाऊराव पायगोंडा***

**संस्थापक, शिक्षणतज्ज्ञ, विचारवंत**

**२२ सप्टेंबर १८८७ - ९ मे १९५९**



कर्मवीर भाऊराव पाटील यांनी शैक्षणिक व सामाजिक उत्थानासाठी केलेल्या कार्याबद्दल सातारा जिल्हा विद्यार्थी काँग्रेसच्या वतीने १९४८ साली त्यांना एक लाख रूपयांचा निधी संत गाडगेबाबा यांच्या हस्ते अर्पण केला. या कार्यक्रमास राष्ट्रपिता महात्मा गांधींनी पाठविलेल्या संदेशात ते लिहितात, ''श्री भाऊराव की सेवा ही उनका सच्चा कीर्तिस्तंभ है।''

गांधींनी प्रकट केलेल्या इच्छेनुसार कर्मवीरांनी शेवटपर्यंत शिक्षणप्रसार व त्या अनुषंगाने सामाजिक उन्नती व्हावी यास्तव सेवा केलेली आहे.

कर्मवीरांचा जन्म कुंभोज या गावी आजोळी झाला. त्यांचे वडील पायगोंडा पाटील हे महसूल खात्यात कारकून म्हणून नोकरीस होते. त्यांच्या बदल्या होत असत. त्यामुळे भाऊरावांचे शिक्षण दहिवडी व विटा या गावी झाले. विटा येथे त्यांनी मराठी ५ वी व इंग्रजी पहिल्या इयत्तेपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. त्यानंतर त्यांना शिक्षणासाठी कोल्हापूर येथे पाठवण्यात आले. तेथे छत्रपती शाहू महाराजांच्या राजवाड्यात राहण्याचे भाग्य त्यांना लाभले. त्यांच्या सहवासात कर्मवीरांना महाराजांच्या पुरोगामी विचारांची दीक्षा आपोआपच प्राप्त झाली. कोल्हापूर येथील राजाराम विद्यालयामधून त्यांनी इंग्रजी ६ वी पर्यंत शिक्षण घेतले.

त्यानंतर कर्मवीरांनी आत्मारामपंत ओगले यांच्याबरोबर प्रभाकर काच कारखाना, ओगलेवाडी येथे प्रचारक म्हणून काम केले. नंतर ते लक्ष्मणराव किर्लोस्कर यांच्याबरोबर किर्लोस्करवाडी येथे काम करीत होते. त्यानंतर सातारा रोड येथे धनजीशहा कूपर यांच्याबरोबर भागीदारीत काम करू लागले. कूपर यांनी करारानुसार नफ्याचा काही भाग शिक्षणावर खर्च करण्यास नकार दिल्याने त्यांनी राजीनामा दिला व त्यानंतर स्वत:ला शिक्षण कार्यात झोकून दिले. या कालावधीत कर्मवीर सत्यशोधक समाजाच्या कार्यातही सहभागी होत असत.

कर्मवीरांनी शिक्षण क्षेत्रातील कार्यास प्रारंभ शिक्षक म्हणून केला. सातारा येथे खाजगी शिकवण्या घेण्यास सुरुवात केली. ते सर्व विषय शिकवत असत. त्यांना संस्कृत शिकवण्याबद्दल विचारणा केली असता त्यांनी होकार दिला. पहाटे ५ वाजता उठून ते गजेन्द्रगडकर शास्त्री यांच्याकडे जाऊन स्वत: संस्कृत शिकत व नंतर विद्यार्थ्यांना शिकवत असत. त्यामुळे ते पाटील मास्तर म्हणून ओळखले जाऊ लागले. १९०९ मध्ये सातारा जिल्ह्यातील दुधगाव येथे त्यांनी शिक्षण प्रसारक संस्थेची स्थापना व 'दुधगाव विद्यार्थी आश्रम' नावाचे वसतिगृह सुरू केले.

समाजातील सर्व मुलांना शिक्षण प्राप्त व्हावे यासाठी त्यांचे प्रयत्न चालूच होते. त्याचा प्रारंभ त्यांनी ४ ऑक्टोबर १९१९ रोजी काले येथे रयत शिक्षण संस्थेची स्थापना करून वसतिगृह सुरू केले. १९२१ रोजी नेर्ले या गावी दुसरी प्राथमिक शाळा व रात्रशाळाही सुरू केली. १९२४ मध्ये सातारा येथे वसतिगृह सुरू झाले. १९२७ मध्ये या वसतिगृहाचे नामाभिधान 'श्री छत्रपती शाहू बोर्डिंग हाऊस' असे करण्यात आले. नामाभिधानाचा कार्यक्रम महात्मा गांधी यांच्या हस्ते झाला. त्या वेळी सर्व जाती-धर्मांची मुले एकत्र राहतात, स्वत: जेवण तयार करतात व एकत्र बसून खातात हे ऐकून गांधींनी सामाजिक ऐक्याच्या या प्रयोगाची मुक्तकंठाने स्तुती केली. ''साबरमती येथील आश्रमात हा प्रयोग यशस्वी करणे मला शक्य झाले नाही, पण येथे तुम्ही यश संपादन केले आहे ही गौरवाची बाब आहे. असेच प्रयोग चालू राहू द्यात,'' या शब्दांत गांधींनी कर्मवीरांना प्रोत्साहन दिले.

कर्मवीरांनी पुणे येथे १९३२ मध्ये उच्च शिक्षणासाठी जाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या निवासाची व भोजनाची सोय व्हावी यासाठी संयुक्त मतदारसंघास मान्यता देणाऱ्या गांधी-आंबेडकर कराराच्या स्मृतिप्रित्यर्थ 'युनियन बोर्डिंग'ची

स्थापना केली. विद्यार्थ्यांनी सर्वच बाबतीत स्वावलंबी बनले पाहिजे ही शिकवण व सामाजिक ऐक्याची भावना वसतिगृहाद्वारे जोपासली जावी हा दृष्टिकोन विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबवण्याचे कार्य कर्मवीरांनी केले आहे. याच तत्त्वानुसार संस्थेद्वारा आज ७६ वसतिगृहे चालवली जात आहेत.

प्रशिक्षित शिक्षकच आपले कर्तव्य योग्य पद्धतीने व कल्पकतेने अधिक प्रभावीपणे करू शकतील अशी कर्मवीरांची धारणा होती. त्यासाठी त्यांनी १९३५ मध्ये 'अध्यापक विद्यालया'ची स्थापना केली.

दुर्गम भागातील खेड्यात राहणाऱ्या मुलांना किमान प्राथमिक शिक्षण उपलब्ध व्हावे यासाठी कर्मवीरांनी व्हालंटरी शाळा सुरू करण्याचा निर्णय घेऊन १९३८ पासून जिल्ह्याच्या डोंगराळ व दुष्काळी भागात 'व्हालंटरी स्कूल्स' सुरू केली. हे कार्य ग्रामस्थांच्या व ध्येयवादाने प्रेरित होऊन अल्पवेतनावर काम करणाऱ्या शिक्षकांच्या सहकार्याने सुरू करून ते शासनाकडून पर्यायी व्यवस्था होईपर्यंत चालू ठेवले. ५७८ खेड्यात या शाळांमुळे प्राथमिक शिक्षणाचा प्रसार झाला.

स्वातंत्र्यानंतर प्राथमिक शिक्षणाची जबाबदारी शासनाने स्वीकारल्याने या शाळा शिक्षकांसह लोकल बोर्डाकडे वर्ग करण्यात आल्या. सध्या संस्थेतर्फे २४ प्राथमिक शाळा चालविल्या जातात.

मुलींच्यासाठी १९४२ मध्ये 'जिजामाता अध्यापिका विद्यालयाची' मुहूर्तमेढ रोवण्यात आली. सध्या ८ अध्यापक विद्यालये व २ शिक्षणशास्त्र महाविद्यालये यांच्याद्वारा शिक्षक प्रशिक्षणाचे कार्य करीत आहे.

वसतिगृहात राहणाऱ्या विद्यार्थ्यांची इ. ७ वी नंतर माध्यमिक शिक्षणाची सोय व्हावी यासाठी कर्मवीरांनी १९४० मध्ये 'महाराजा सयाजीराव मोफत आणि निवासी विद्यालया'ची स्थापना केली. विद्यार्थ्यांनी वसतिगृहात राहून शिक्षण घ्यावे ही त्यामागची भूमिका होती. या विद्यालयात प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यास स्वत:ची कामे करण्याबरोबरच दररोज १ तास शारीरिक कष्टाची कामे करावी लागत असत. या विद्यालयात स्वावलंबन व श्रमप्रतिष्ठा या मूल्यांची जोपासना करावी लागत असे. आज संस्थेच्यावतीने महाराष्ट्रातील १४ व कर्नाटकातील बेळगाव जिल्ह्यात एकूण ४३२ विद्यालये चालवली जातात.

विद्यार्थ्यांना महाविद्यालयीन शिक्षणासाठी पुणे, मुंबई, कोल्हापूर, बडोदा इत्यादी ठिकाणी जावे लागत असे. विद्यार्थ्यांना महाविद्यालयीन शिक्षण गावाच्या जवळपास मिळाले पाहिजे असे कर्मवीरांना वाटत असे. त्यासाठी त्यांनी १९४७ साली सातारा येथे 'छत्रपती शिवाजी महाविद्यालया'ची स्थापना केली. हे महाविद्यालयही मोफत आणि निवासी होते. वसतिगृहात राहणाऱ्या विद्यार्थ्यांनाच प्रवेश दिला जात असल्याने प्रारंभी विद्यार्थी संख्या मर्यादितच होती. त्यामुळे खर्चाची तोंडमिळवणी करणे कठीण जाऊ लागले. कालांतराने महाविद्यालय सर्वांसाठी खुले करण्यात आले. शिवाजी महाविद्यालयाचे कालांतराने शाखानिहाय विभाजन केले गेले. आज तीनही महाविद्यालयात हजारो विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. तसेच आज कला,वाणिज्य आणि विज्ञान या सर्व शाखांचे शिक्षण देणारी ४० महाविद्यालये संस्थेमार्फत चालवली जातात. अभियांत्रिकीचे शिक्षण देणारे एक महाविद्यालय ही संस्था चालवते.

१९४९ मध्ये अहमदनगर जिल्ह्यात कर्मवीरांचे शैक्षणिक कार्य सुरू झाले. १९५३ मध्ये माण तालुक्यात टाटा न्यासाच्या सहकार्याने ग्रामविकासाचे कार्य सुरू झाले. त्याचवर्षी पुण्यात नाना वाड्यात 'कर्मवीर भाऊराव विद्यालय' सुरू झाले. त्याचवर्षी तालुक्यातील सैदापूर येथे महाविद्यालय सुरू करून ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांच्या उच्च शिक्षणाची सोय केली. याचवर्षी कराड येथे सद्‌गुरू गाडगे महाराज महाविद्यालय सुरू झाले. कर्मवीरांनी कार्य करताना आपणासमोर जी उद्दिष्ट्ये ठेवली होती त्यातील बहुतांश प्रत्यक्षात आणणे त्यांना शक्य झाले. अनेक अडचणी व आपत्तींना तोंड देत ते वाटचाल करीत राहिल्याने त्यांना यशप्राप्ती झाली. त्यांच्या कार्याचे वैशिष्ट्य समजावून घेत असताना त्यांनी स्वीकारलेली व जपलेली मूल्ये याचा विचार करणे आवश्यक आहे. कर्मवीरांनी जातीभेदातीत दृष्टिकोनाचा स्वीकार करून सर्व स्तरांवरील विद्यार्थ्यांना

शिक्षणाची संधी उपलब्ध करून दिली. संस्थेचे कार्य संस्थेत शिक्षण घेऊन तयार झालेल्या कार्यकर्त्यांनीच पुढे चालवावे असे कर्मवीरांना वाटत असे. ग्रामीण स्तरातून आलेले व शिक्षण घेऊन तयार झालेले शिक्षकच ग्रामीण परिसरात समरस होऊन कार्य करतील अशी कर्मवीरांची धारणा होती.

स्वावलंबनाची प्रेरणा हा कर्मवीरांच्या कार्याचा तिसरा विशेष होय. विद्यार्थ्यांनी स्वकष्टातून शिक्षण घ्यावे यासाठी 'कमवा व शिका' योजनेचा अनेक विद्यार्थ्यांनी लाभ घेऊन आपले शिक्षण पूर्ण केले आहे. आज अनेक विद्यापीठांतून व महाविद्यालयांतून या योजनेच्या उपलब्धतेमुळे आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांना शिक्षण घेण्याची प्रेरणा प्राप्त झाली आहे.

कर्मवीरांनी विसाव्या शतकाच्या प्रारंभीच महाराष्ट्राच्या ग्रामीण भागातील, पददलित, आर्थिक दृष्ट्या मागासलेला व जातिभेदाने पोखरलेला समाज स्वाभिमानी बनून उन्नतीच्या मार्गावर वाटचाल करीत राहावा या हेतूने शिक्षणाचा प्रसार केला. समाजोन्नतीच्या मूलभूत कार्यामुळे जनतेने त्यांना कर्मवीर ही उपाधी प्रदान केली आहे. भारत सरकारने त्यांना पद्मभूषण देऊन गौरविले आहे. पुणे विद्यापीठाने १९५९ मध्ये डी. लिट. या पदवीद्वारे त्यांचा गौरव केला आहे.

– प्रा. वसंत रोकडे

## कलबाग, श्रीनाथ शेषगिरी

**संस्थापक, शिक्षणतज्ज्ञ**

**२३ ऑक्टोबर १९२८ – ३० जुलै २००३**

डॉ. श्रीनाथ शेषगिरी कलबाग ह्यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे शिक्षण रॉबर्ट मनी विद्यालयामध्ये झाले. 'रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' या संस्थेतून त्यांनी बी.एस्सी. पदवी मिळविली. युडीलीटी मधून ते एम.एस्सी. (टेक.) झाले. १९५३ मध्ये खाद्य तंत्रज्ञानातील (फूड टेक्नोलॉजी) पीएच.डी. पदवी मिळविण्यासाठी त्यांनी अमेरिकेतील शिकागो येथील इलिनॉय विद्यापीठात प्रवेश घेतला.



पुढील दोन वर्षांच्या तेथील वास्तव्यात ग्रामीण भागातील शेतकऱ्यांच्या जीवनाचे निरीक्षण करताना शेतकरी शेतीबरोबरच रोजच्या जीवनातही विज्ञान व तंत्रज्ञानाचा वापर करतात हे त्यांच्या लक्षात आले. त्यातूनच त्यांच्या भविष्यातील कार्याची दिशा निश्चित झाली. प्रा. कुमाराओ ह्यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी पीएच. डी. मिळविली.

अमेरिकेतील नामवंत कंपनीतील नोकरी न स्वीकारता १९५५ मध्ये ते भारतात परतले. म्हैसूर येथील सेंट्रल फूड टेक्नोलॉजिकल रिसर्च इन्स्टिटच्यूट (सी.एफ.टी. आर.आय.) मध्ये डॉ. कलबाग सहाय्यक वैज्ञानिक संशोधन अधिकारी म्हणून रुजू झाले. तेथे १९६३ पर्यंत त्यांनी काम केले. त्यानंतर हिंदुस्थान लीवर लिमिटेड कंपनीच्या संशोधन विभागात अभियांत्रिकी शास्त्र विभागाचे प्रमुख म्हणून त्यांनी काम केले. १९८२ मध्ये ग्रामीण भागात शैक्षणिक कार्य करण्यासाठी त्यांनी स्वेच्छानिवृत्ती घेतली.

शालेय शिक्षण न घेताही व्यवसायासाठी आवश्यक कौशल्ये आत्मसात करून यशस्वी आयुष्य जगणाऱ्या मुलांचा मुंबईत जाऊन त्यांनी अभ्यास केला. 'काम करत करत शिकणे' हीच शिक्षणाची खरी पद्धत असली पाहिजे असा निष्कर्ष ह्या अभ्यासातून त्यांना मिळाला. महात्मा गांधींनी 'नई तालीम' मध्ये या पद्धतीचा पुरस्कार केला होता. पण 'नई तालीम' म्हणजे तंत्रज्ञान, विज्ञान व आधुनिकीकरणास विरोध असा सर्वांचा गैरसमज झाला होता. डॉ. कलबागांनी 'नई तालीम' मधील कल्पनांना विज्ञान व तंत्रज्ञानाची जोड दिली.

पुण्यातील थोर शिक्षणतज्ज्ञ जे. पी. नाईक, डॉ. चित्रा नाईक ह्यांच्या सहकार्याने 'भारतीय शिक्षण संस्थेचा' एक स्वतंत्र स्वायत्त विभाग म्हणून डॉ. कलबागांनी 'विज्ञान आश्रमाचे' काम सुरू केले. त्यासाठी खेड्यांना भेडसावणारे

सर्व प्रश्न उपस्थित असणाऱ्या पाबळ गावाची (पुणे जिल्हा) कलबागांनी निवड केली. तेथील ऑईल मिलमध्ये विज्ञान आश्रमाच्या कामाला सुरुवात झाली. त्यानंतर शासनाने व गावाने गावाजवळील पाच एकर जागा दिली. या जागेवरच आश्रम उभा राहिला.

सुरुवातीला डॉ. कलबाग गावकऱ्यांबरोबर राहिले. त्यांच्या गरजांचा, विकासाच्या कल्पनांचा त्यांनी अभ्यास केला. त्यातून 'ग्रामीण तंत्रज्ञान अभ्यासक्रम' तयार झाला. 'शिक्षणातून गावाचा विकास व विकासकामांमधून शिक्षण' हे ह्या अभ्यासक्रमाचे सूत्र होते. हा अभ्यास पूर्ण केलेले शेकडो विद्यार्थी आज स्वतःचे व्यवसाय करीत आहेत. पाबळमधील समस्यांचे उत्तर म्हणून विविध तंत्रज्ञानविषयक प्रकल्प आश्रमात विद्यार्थ्यांनी तयार केले. १९८७ पासून पाबळ व आसपासच्या शाळांमध्ये इयत्ता आठवी ते दहावी 'ग्रामीण तंत्रज्ञान' हा प्रकल्प राबविला गेला. ह्या प्रयोगाच्या मूल्यमापनानंतर 'महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळा'च्या अभ्यास समितीने ह्या विषयाला शासनमान्य विषय म्हणून मान्यता दिली व 'मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख' (इंट्रोडक्शन टू बेसिक टेक्नॉलॉजी - आय.बी.टी.) असे नाव देऊन अभ्यासक्रमातील पहिला पूर्वव्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून 'व्ही-१' हा सांकेतिक क्रमांक दिला.

डॉ. कलबागांनी बारकाईने अभ्यास करून आय.बी.टी.ची आखणी केली. त्यासाठी पुस्तके, व्हीडीओ सीडी तयार केल्या. तेवीस शाळांमध्ये तो राबविला जात आहे. पाबळ जियोडेसिक डोम ही कमी खर्चातील घरे, भूगर्भातील पाणी शोधण्याचे यंत्र, छोट्या शेतीसाठी कमी अश्वशक्तीचा 'मेक बूल' ट्रॅक्टर अशी अनेक तंत्रज्ञाने डॉक्टरांच्या मार्गदर्शनाखाली तयार झाली. लातूरचा भूकंप, गुजरातमधील भूकंप, आंध्रचे चक्रीवादळ या संकटांत पुनर्वसनासाठी पाबळ डोम वापरले गेले. पाणी शोधण्याच्या यंत्राचा वापर करून हजारो विंधन विहिरी खोदण्यात आल्या.

१९९८ मध्ये मल्टिमिडिया तंत्रज्ञानाचा वापर करून शिक्षकांना मराठीतून संस्थापक धडे तयार करता यावेत म्हणून डॉ. कलबागांनी रिचर्ड पाईप ह्यांच्या सहकार्याने 'रियालिटी लर्निंग इंजिन' ह्या संगणक आज्ञाप्रणाली सॉफ्टवेअरची निर्मिती केली. आंतरजालावरून तज्ज्ञांकडून समस्यांची उत्तरे मिळावीत म्हणून कलबागांनी आय.आय. टी. चेन्नईच्या सहकार्याने पाबळ व जवळपासच्या गावांना बिनतारी तंत्रज्ञानाने आंतरजाल सेवा उपलब्ध करून दिली.

डॉ. कलबाग यांनी विविध शिक्षण समित्यांवर काम केले. भारत सरकारने 'कम्युनिटी पॉलिटेक्निक' साठी नेमलेल्या 'कलबाग समिती'चे ते अध्यक्ष होते. त्यावेळी 'कम्युनिटी पॉलिटेक्निक' च्या माध्यमातून शिक्षण व विकास ही संकल्पना राबविण्याच्या संदर्भात त्यांनी केलेल्या सर्व शिफारशी भारताच्या संसदेत स्वीकारल्या गेल्या होत्या. ग्रामीण तंत्रज्ञान म्हणजे कमी खर्चाचे, कमी दर्जाचे तंत्रज्ञान असे नसून कमी खर्चात ते उपलब्ध करताना तंत्रज्ञानाची निवड सर्वोत्तमच असली पाहिजे असा डॉक्टरांचा आग्रह होता.

अमेरिकेतील मॅसेच्युसेट्स इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी (एम.आय.टी.) च्या सहकार्याने विकसित झालेल्या 'फॅब लॅब' संकल्पनेत डॉ. कलबाग यांचा महत्त्वाचा सहभाग होता. लोकांना त्यांच्या दैनंदिन समस्यांवर उत्तरे शोधता यावीत यासाठी तंत्रज्ञान विकासाच्या द्वारा विद्यार्थी, शेतकरी, युवावर्ग यांसारख्या कोणत्याही कल्पक व्यक्तीला मनातील कल्पना प्रत्यक्षात आणता यावी यासाठी अत्याधुनिक यंत्रे असलेली अमेरिकेबाहेरील पहिली 'फॅब लॅब' पाबळ गावात सुरू झाली. आज अनेक देशांत ती स्वीकारली गेली आहे.

'नातू फाउण्डेशन पुरस्कार', 'जमनालाल बजाज पुरस्कार' असे अनेक पुरस्कार डॉ. कलबाग यांना मिळाले. 'शिक्षणाच्या माध्यमातून ग्रामीण विकास' ही संकल्पना व विज्ञान आश्रमाचा प्रकल्प देशभरातील अनेक शैक्षणिक संस्थांतून राबविला जाणे हा डॉ. श्रीनाथ शेषगिरी कलबागांना प्रदान करण्यात आलेला सर्वश्रेष्ठ पुरस्कार ठरेल, यात शंका नाही.

– योगेश कुलकर्णी

## कर्वे, धोंडो केशव

**संस्थापक, समाजसुधारक, विचारवंत**

**१८ एप्रिल १८५८ – ९ नोव्हेंबर १९६२**



धोंडो केशव कर्वे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील शेरवली गावी त्यांच्या आजोळी झाला. स्वाभिमान आणि परिश्रम यांची दीक्षा आईकडूनच त्यांना मिळाली होती. खणखणीत शुद्ध वाणी, उत्तम उच्चार, गोड गळा यांची देणगी असलेले धोंडोपंत कर्वे मुरुडच्या सरकारी शाळेत शिकले. तेथे सोमण गुरुजींनी स्वावलंबनाचे धडे दिले. सातारा येथे सहाव्या इयत्तेची परीक्षा देण्यासाठी आपल्या सहाध्यायांबरोबर धोंडोपंत पायी चालत गेले. नंतर पुढील शिक्षणासाठी ते मुंबईत आले.

१८८४ मध्ये गणित विषय घेऊन कर्वे बी. ए. झाले. कर्वे यांचा विवाह राधाबाईंशी झाला होता. पुत्र रघुनाथ आणि राधाबाई यांच्यासह कर्वे मुंबईला आले. तिथे राधाबाईही शिकू लागल्या. १८९१ मध्ये पत्नी राधाबाई यांचा मृत्यू झाला. याचवेळी गोपाळ कृष्ण गोखले यांच्या निमंत्रणावरून कर्वे १५ नोव्हेंबर १८९१ रोजी डेक्कन एज्युकेशन सोसायटीत दाखल झाले आणि पुण्याला फर्गसन महाविद्यालयात गणिताचे प्राध्यापक झाले. याच काळात त्यांच्या भावी कार्याची मुहूर्तमेढ रोवली गेली. त्यांचे मित्र नरहरपंत जोशी यांची विधवा भगिनी गोदूताई यांच्याशी अण्णांनी पुनर्विवाह केला. ११ मार्च १८९७ रोजी गोदूताई आनंदीबाई कर्वे झाल्या.

या क्रांतिकारी निर्णयामुळे कर्वे यांना घरीदारी बरीच उपेक्षा सहन करावी लागली. बहिष्कार व वाळीत टाकले जाणे यांचाही सामना करावा लागला. या काळात अण्णांनी नागपूरच्या वामनराव कोल्हटकरांना पुनर्विवाहोत्तेजक मंडळ स्थापन करण्यासाठी खूप सहकार्य केले.

१४ जून १८९६ रोजी पुण्याला पेरूगेटजवळील गोरे वाड्यात अनाथ बालिकाश्रम या संस्थेची अण्णांनी स्थापना केली. खर्चासाठी आपली विम्याची पॉलिसी गहाण ठेवली. प्लेगच्या साथीमुळे १८९९ मध्ये आश्रम हिंगण्याला हलवला. १९०० मध्ये या जागेत ५०० रु. खर्च करून एक पर्णकुटी बांधण्यात आली. तिथे आठ विधवा राहत होत्या. आश्रमाच्या वर्गणीसाठी पुणे ते हिंगणे अशी ६ कि. मी. ची पायपीट अण्णांनी अनेक वेळा केली.

१९०५ पासून संस्थेला चांगले दिवस आले. धनिकांनी व समाजकार्याची आस्था असणाऱ्यांनी संस्थेला मदत केली.

१९०७ या रंगपंचमीला सहा विद्यार्थिनींचे महिला विद्यालय सुरू झाले. त्यासाठी मुष्टिफंडाची मदत झाली. १९११ मध्ये महिला विद्यालयाची नवी इमारत झाली. विधवाश्रम आकारास आला. महिला विद्यालयाचा वृक्ष बहरला. आपल्या सामाजिक कार्याला आध्यात्मिक अधिष्ठान मिळाले पाहिजे. म्हणून अण्णांनी निष्काम कर्म मठ या संस्थेची स्थापना केली. आणि त्या द्वारा निःस्पृह, निःस्वार्थी कार्यकर्ते समाजाला दिले. साधेपणा, निरपेक्ष वृत्ती, भिक्षान्नावर गुजराण, अहर्निश सेवावृत्ती ही निष्काम मठ कार्यकर्त्यांची व्रते होती. अण्णासाहेबही तसेच निष्काम राहिले. निष्काम कर्म मठाच्या रूपाने संस्थेला चांगले कार्यकर्ते मिळाले. पार्वतीबाई आठवले, ह. रा. दिवेकर, ना.म.आठवले, वा.गो. मायदेव, गो.म.चिपळूणकर, वारुताई शेवडे, प्रा. वा. म. जोशी, डॉ. कमलाबाई देशपांडे, सीताबाई अण्णेगिरी, मालतीबाई बेडेकर अशा अनेक कार्यकर्त्यांची व आजन्म सेवकांची फळी तयार झाली.

स्त्रियांच्या उच्च शिक्षणासंबंधी कर्वे यांच्या मनात जे स्वप्न होते त्याची पूर्तता ना. दा. ठाकरसी विद्यापीठाच्या रूपाने झाली. ३ जून १९१६ रोजी भारतातील पहिले महिला विद्यापीठ स्थापन झाले आणि ६ जुलै १९१६ रोजी पहिले महाविद्यालय सुरू झाले. सर विठ्ठलदास ठाकरसी यांच्या भरघोस देणगीतून हे विद्यापीठ साकार झाले. विद्यापीठाचा वेलविस्तार वाढला आणि डॉ. रा. गो. भांडारकर, सर महादेव चौबळ, रँ. र. पु. परांजपे, चुन्नीलाल मेहता, लल्लुभाई शहा यांच्यासारख्या नामांकित व्यक्तींनी त्याचे वैभव वाढविले.

स्त्रियांची मानसिकता, त्यांच्या कौटुंबिक जबाबदाऱ्या

यांचा विचार करून विद्यापीठाचे अभ्यासक्रम निश्चित करण्यात आले. अनाथ बालिकाश्रम व महिला विद्यापीठ यांच्या प्रसारासाठी युरोप व अमेरिका, जपान इ. ठिकाणी अण्णांनी प्रवास केला आणि विद्यापीठाला जगन्मान्यता मिळवली.

१९५८ मध्ये पं. नेहरू यांच्या हस्ते अण्णासाहेब कर्वे यांना 'भारतरत्न' ही सर्वोच्च पदवी देण्यात आली. पुण्याला डेक्कन जिमखाना ते कर्वेनगर या रस्त्याला कर्वे पथ असे नाव देण्यात आले. शंभरी गाठलेले अण्णासाहेब कौटुंबिक जीवनात सुखी होते. शंकरराव, दिनकरराव व भास्करराव या तीन पुत्रांनी आपापल्या क्षेत्रात उत्तम कार्य केले. भास्कररावांनी तर पुढे संस्थाकार्यालाच वाहून घेतले होते. स्नुषा इरावती कर्वे या ख्यातनाम संशोधक लेखिका होत्या. पत्नी आनंदीबाई तथा बाया कर्वे यांनी अण्णांना त्यांच्या स्त्रीशिक्षणकार्यात मोलाची साथ दिली. अण्णांची नात गौरी (देशपांडे) ही ख्यातनाम लेखिका होती.

आपल्या आत्मवृत्तात महर्षी कर्वे यांनी जे स्त्रीशिक्षणविषयक विचार मांडले आहेत त्यांचा सारांश असा –

- स्त्रिया म्हणजे मानवजातीचे स्वत्वविशिष्ट घटक आहेत हे ओळखून शिक्षण द्यावे.
- सुपत्नी व सुमाता होण्यासाठी आवश्यक ते शिक्षण स्त्रियांना द्यावे.
- प्रापंचिक जीवनाचा राष्ट्राच्या उन्नती – अवनतीशी संबंध असतो हे लक्षात आणून देणारे शिक्षण स्त्रियांना द्यावे.
- गृहिणी गृहमुच्यते या विधानातील गर्भितार्थानुसार स्त्रियांना शिक्षण द्यावे.
- कोणत्याही स्त्रीला सर्व प्रकारच्या शिक्षणाच्या वाटा खुल्या असाव्यात.
- स्वसामर्थ्याविषयी आत्मविश्वास निर्माण करणारे आणि राष्ट्रकल्याणाची तळमळ जागविणारे शिक्षण स्त्रियांना द्यावे.

अण्णासाहेब कर्वे यांच्या व्यक्तिमत्त्वाची वैशिष्ट्ये 'ज्ञानसाधक, कृतिशील समाजसुधारक, निष्ठावंत शिक्षक, प्रेमळ कुटुंबवत्सल, प्रयोगशील प्रागतिक, श्रमप्रतिष्ठेचा उपासक आणि स्थितप्रज्ञ शतायुषी जीवनव्रती' अशा शब्दांत मांडता येतील. शतायुषी अण्णांचे पुणे येथे निधन झाले आणि एका जीवनव्रतीच्या असाधारण यज्ञाची समाप्ती झाली.

– डॉ. न. म. जोशी

**संदर्भ :**

१. *जोशी डॉ. न. म.; 'महर्षी धोंडो केशव कर्वे' ; महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई; डिसेंबर २००३.*
२. *धों. के. कर्वे , ना. म. पटवर्धन, धोंडो केशव कर्वे : आत्मवृत्त व चरित्र : हिंगणे स्त्रीशिक्षण संस्था, १९५८.*
३. *चंदावरकर ग. ल.; 'आधुनिक भारताचे शिल्पकार – 'धोंडो केशव कर्वे'; प्रकाशन विभाग : भारत सरकार; १९७४.*
४. *शिखरे दा. न.; 'तपोमूर्ती कर्वे' ; केदार प्रकाशन; पुणे १९६९.*
५. *karve D. K.; 'Looking back', Hingne Streeshikshan Sanstha, Pune; 1958.*

## कस्तुरे, यज्ञेश्वरशास्त्री माधवशास्त्री

**संस्थापक, वेदविद्या प्रसारक**

**३० डिसेंबर १९०८ – २४ ऑगस्ट २००६**



मराठवाड्यातील कळमनुरी गावात मार्गशीर्ष शु. सप्तमीसह अष्टमी शके १८३० म्हणजेच ३० डिसेंबर १९०८ रोजी यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे यांचा जन्म झाला. पिता माधवशास्त्री व माता मंदाकिनी दोघेही विठ्ठलभक्त तसेच वंशाला वेदसेवेची परंपरा. लहानपणापासूनच लौकिक शिक्षणापेक्षा संस्कृत भाषा, वेद, शास्त्रे, संत वाङ्मय यामधेच त्यांना विशेष रुची होती. प्राथमिक वेदाध्ययनाचे धडे त्यांनी आपल्या वडिलांकडूनच घेतले. पुढे नाशिक येथे डॉ. कुर्तकोटी शंकराचार्यांच्या मठात पंचमहाकाव्यांचा अभ्यास झाला. वेदशास्त्रसंपन्न लक्ष्मणशास्त्री निरगुडकर यांचेकडे सिद्धान्तकौमुदी, व्याकरण आणि मीमांसाशास्त्राचे शिक्षण

घेतले. याच काळात शास्त्रींनी लिहिलेल्या 'आधुनिक काळात हिंदू जाती व संस्कृतीचे रक्षण कसे करावे' या विषयावरील निबंधास बालाजी महोत्सवात प्रथम क्रमांकाचे स्थान मिळाले. त्या काळात संस्कृतीरक्षणातच आपले आयुष्य व्यतित करावे असे त्यांनी ठरविले. इ. स. १९२४-३२ या काळात पुण्यात पं. विष्णुशास्त्री बापट यांच्या आचार्यकुलात आठ वर्षे ज्ञानसाधना केली. तसेच पं. नारायणशास्त्री वाडीकर यांच्याकडे तर्कशास्त्राचे अध्ययन झाले. पं. श्रीपादशास्त्री हसूरकर,इंदूर यांच्याकडे वेदान्तशास्त्राचे उच्चशिक्षण झाले.

याप्रमाणे त्यांनी आपले पुढील आयुष्य वेदसेवा, संस्कृत अध्यापन यासाठी वेचण्याचे ठरवून नांदेड येथे इ.स. १९३७ मध्ये संस्कृत पाठशाळेची स्थापना केली. अगाध ज्ञाननिष्ठा, ईश्वरनिष्ठा हे पाठशाळेचे मुख्य आधारस्तंभ होते. यामुळेच सर्वधर्मियांना प्राच्यविद्येच्या अभ्यासाची, मार्गदर्शनाची सोय उपलब्ध झाली. पाठशाळेवर त्यांनी अपत्यवत प्रेम केले व संगोपनही केले.पुढे रझाकारांच्या उपद्रवामुळे पाठशाळेला पुसद, बासर, जिंतूर, धुळे येथेही स्थलांतरित व्हावे लागले. या अलौकिक पाठशाळेचे वैशिष्ट्य म्हणजे केवळ लोकाश्रयाचा आधार आणि ज्ञाननिष्ठेने प्रेरित विद्यार्थी व गुरुजन, पाठशाळेत विद्यार्थ्यांना राहण्याची व जेवणाची सोय निःशुल्क उपलब्ध होती. स्वतःच्या कुटुंबाअगोदर गुरुजींनी पाठशाळेचा व विद्यार्थ्यांचा विचार केला. कुठलाही अवघड विषय सोपा करून सांगणे यामुळेच विद्यार्थांमध्ये ज्ञानजिज्ञासा जागवण्यात ते यशस्वी झाले. कुणी विद्यार्थ्याने शिस्तभंग केला तर ते स्वतः उपवास करीत. शास्त्रीजींनी काही काळ आयुर्वेदिक महाविद्यालय, पीपल्स महाविद्यालय येथेही संस्कृत प्राध्यापक म्हणून सेवा केली.

शास्त्रीजींना लाभलेली पत्नीची सार्थ साथ त्यात मोलाची आहे. विद्यार्थ्यांची व्यवस्था, कौटुंबिक जबाबदारी रमाबाईंनी समर्थपणे पेलली. केवळ स्वतःच्या कुटुंबाचा विचार न करता सर्व विद्यार्थ्यांवर अपत्यवत् प्रेम व सुसंस्कार केले. शास्त्रीजींच्या पाठशाळेत अनेक विद्वान, वैदिक यांच्या चर्चा, वैचारिक देवाणघेवाण होत असे. अनेक विचारस्रोत एकाच व्यासपीठावर असत. त्यात प्रा. राम शेवाळकर, प्रा. नरहर कुरूंदकर असत. पाठशाळेतून शिक्षण घेतलेले आदरणीय शंकर महाराज कंधारकर, अनंत महाराज टाकळीकर, एकनाथ महाराज खडकीकर यांनी पुढे अलौकिक कार्य सुरु केले.

नांदेड येथे आपल्या मुलीच्या दिवाळसणानिमित्त जमलेल्या सर्व आप्तेष्टांचे पाश दूर करून त्यांनी वानप्रस्थ स्वीकारण्याचे ठरविले. रमाबाईही नेसत्या वस्त्रानिशी सोबत निघाल्या. सावरगाव संगमेश्वर या जालना जिल्ह्यातील लहानशा गावानजीक १९६६ मध्ये चतुर्वेदेश्वरची स्थापना केली. चारही वेदांचे शिक्षण देणारी ही भारतातील पहिली संस्था ठरली. निर्मनुष्य ठिकाण, सभोवताली जंगली श्वापदांची भीती, वीज आणि पक्के घर यांचाही अभाव अशा अज्ञात ठिकाणी वसिष्ठ ऋषी व अरुंधती माता यांच्याप्रमाणेच हे उभयता राहू लागले. वेदेश्वराने कोल्हापूर येथील वैद्य वामनाचार्यांना चतुर्वेद स्थापनेची आज्ञा दिली. अशा गोंदवलेकर महाराज यांच्या संप्रदायातील नामयोगी सद्‌गुरू प्रल्हाद महाराज रामदासी (साखरखेर्डा, जि. बुलढाणा) यांच्या हस्ते चतुर्वेदेश्वराची स्थापना झाली.

कुठलेही सरकारी मानधन, मदत नसताना केवळ लोकाश्रयावरच आश्रमाची संपूर्ण व्यवस्था अवलंबून होती. कुणी अगदी एक रुपयाही दिला तरी तो श्रद्धेने स्वीकारून शास्त्रींनी त्याची रीतसर पावती देऊ केली. तन - मन - धन सर्वस्व अर्पण करून चतुर्वेदेश्वराची सेवा व अखंड ज्ञानदान चालू ठेवले. ज्ञानदानाचे कार्य चालू असतानाच त्यांनी संस्कृत भाषा, शास्त्रे, तर्कशास्त्र या विषयांवर लिखाण केले. यात शंकराचार्यांचा मायावाद, वाचस्पती मिश्रांच्या 'भामती' ग्रंथावरील भाष्याचे दोन भाग अशा दुर्मीळ पण आशयघन ग्रंथांची निर्मिती झाली. 'प्रसिद्धीपराङ्‌मुखता' हे त्यांच्या स्वभावाचे वैशिष्ट्य. पुरीच्या शंकराचार्यांकडून यांना'महामहोपाध्याय' तर करवीरपीठाच्या शंकराचार्यांकडून 'विद्यानिधी' पदवी गौरवपूर्वक देण्यात आली. गुरुजींच्या ज्ञानयज्ञाचेच फलित म्हणजे आज चतुर्वेदेश्वर ग्राम, आश्रमात चाळीस विद्यार्थी, अध्यापक वृंद व गोशाळा आहे. नानासाहेब पेशवे पुरस्कार, महर्षी वेदव्यास

प्रतिष्ठानचा पुरस्कार आदी मिळाले; तरीही विनम्रता, वात्सल्य, त्यागी वृत्ती यांचे दर्शन सदोदित त्यांच्या आचरणातून घडत असे. ईश्वरनिष्ठा, ज्ञाननिष्ठा, तपस्या, धर्मनिष्ठा यासारख्या गुणांनी संपन्न अशा महात्म्याचे भाद्रपद शु. प्रतिपदा (२४ ऑगस्ट २००६) रोजी सावरगाव आश्रमात निधन झाले. रामचरणी महानिर्वाण झाले, परंतु कार्यरूपाने त्यांचे व्यक्तित्व सर्वांना चिरंतन प्रेरणा देत आहे.

– अभिजीत कोळपे

## काळे, कृष्णाजी धोंडिबा

***दादासाहेब काळे***

**सामाजिक कार्यकर्ते, शिक्षण प्रसारक**

**१९ एप्रिल १८७१ – २५ जानेवारी १९४७**



कृष्णाजी धोंडिबा उर्फ दादासाहेब काळे यांचा जन्म रोजी सारोळा कासार ता. जि. अहमदनगर येथे सामान्य शेतकरी परिवारात झाला. मराठी चौथ्या इयत्तेपर्यंतचे शिक्षण गावीच पार पडले. इंग्रजी पहिलीसाठी नगरला काही दिवस मराठी साहित्यिक वि. द. घाटे यांचे आजोबा मुखत्यार वकील कोंडो राणोजी घाटे यांचे घरी रहावे लागले. काही काळ बडोदे संस्थानकडून दरमहा रु.पाचची शिष्यवृत्ती मिळाली. इ. स. १८९५ मध्ये युनिव्हर्सिटी स्कूल फायनलची परीक्षा कृष्णाजी धोंडो सारोळकर या नावाने उत्तीर्ण. पुढील ७ वर्षे म्हणजे १९०२ पर्यंत विविध ठिकाणी तात्पुरत्या स्वरूपाच्या नोकरीवर राहिले व शेवटी नोंदणी खात्यात स्थिरावले.

इ. स. १९१६ मध्ये अहमदनगर येथे अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषदेत झालेल्या विचारमंथनातून शिक्षणाचे लोण जनसामान्य आणि बहुजन समाजापर्यंत पोहोचविण्याचे ठरले. त्यानुसार अहमदनगर जिल्ह्यातील बहुजन समाजातील शिक्षणप्रेमी कृ. धों. काळे, रावबहादूर नवले, सरदार थोरात, वामनराव तोडमल, रामचंद्र अकोलकर, सहदेवराव काळे, अमृते फौजदार, विठ्ठलराव डोंगरे, पंढरीनाथ पंदरकर, माधवराव लवांडे ही मंडळी एकत्र आली. राजर्षी शाहू महाराजांची कल्पना मूर्त स्वरूपात साकारण्यासाठी व बहुजन समाजातील विद्यार्थ्यांसाठी सन १९१८ मध्ये अहमदनगर येथे हुतात्मा ‘करवीर छत्रपती चौथे शिवाजी महाराज यांच्या स्मरणार्थ करवीर छत्रपती चौथे शिवाजी महाराज मराठा भोजन वसतिगृह’ या नावाची संस्था स्थापन केली.

प्रारंभी वसतिगृह नालेगाव भागातील देशपांडे यांच्या खाजगी इमारतीमध्ये होते. पुढे कानवडे पाटील, बापूसाहेब भापकर यांच्या पुढाकाराने हुतात्मा करवीर चौथे शिवाजी महाराज यांच्या दफनभूमीची जागा संपादित करून व त्याच जागेसमोरील अंदाजे १२ एकर जागा खरेदी करून मातीच्या भेंड्याच्या आणि पत्र्याच्या इमारतीमध्ये विद्यार्थ्यांच्या राहण्याची व भोजनाची सोय केली गेली. सदर वसतिगृह आणि संस्थेचे खजिनदार म्हणून दादासाहेबांनी इ. स. १९२० ते १९२५ अखेर काम पाहिले. दादासाहेब नोंदणी खात्यामध्ये सहायक निबंधक म्हणून नाशिक, इगतपुरी, मालेगाव, धुळे, वडगाव मावळ, चिंचवड आणि शेवटी अहमदनगर येथे सेवेत होते. इ. १९२६ मध्ये वयाच्या ५५ व्या वर्षी सेवेतून निवृत्त झाले.

गरीब विद्यार्थ्यांना आर्थिक मदत व्हावी म्हणून राजर्षी शाहू महाराजांनी या वसतिगृहाला दरसाल रु.एक हजाराचे अनुदान व महाराजांच्या छत्रीच्या देखभालीसाठी दरसाल रु.दोनशेची तरतूद केली. शहरातील मराठा समाजाची मान्यवर मंडळी वसतिगृहासाठी दरमहा चार आणे देणगी नियमितपणे देत तर काही मंडळी मोफत भाजीपाला पुरवीत. जे विद्यार्थी वसतिगृहमधील भोजनाचे नाममात्र शुल्कही भरू शकत नसत अशा मुलांना शहरातील बहुजन समाजातील मान्यवर आपल्या घरी वार लावून जेवू घालीत. मराठा समाजातील मुलांनी शिक्षण घेऊन स्वबळावर पुढे यावे व बहुजन समाजाचा विकास साधावा अशी त्यांची धारणा होती.

दादासाहेबांच्या पायात सरकारी नोकरीची रुपेरी बेडी होती तरी स्वत:च्या नोकरीतील निष्ठेबरोबरच शैक्षणिक व

सामाजिक प्रबोधनाचे कार्य सतत चालू असे. मराठा समाजाचे कार्यकर्ते दादासाहेबांच्या घरी समाजकारणाविषयी चर्चा करून पुढील कार्याची दिशा ठरवित असत. शेतकऱ्यांच्या व शेतमजूरांच्या मुलांस शिक्षण मिळावे म्हणून व त्यांच्या शेतमालास रास्त भाव मिळावा म्हणून एकीकडे वसतिगृह/शाळा तर दुसरीकडे तालुका व जिल्हा खरेदी विक्री संघाच्या स्थापनेमध्ये दादासाहेबांचा विशेष पुढाकार होता.

'करवीर छत्रपती चौथे शिवाजी महाराज मराठा भोजन वसतिगृहात'च्या नवीन इमारतीचे उद्घाटन मुंबई राज्याचे तत्कालीन गव्हर्नर सर रॉजर लुमले यांच्या हस्ते ११ ऑक्टो. १९३८ रोजी पार पडले. आयुक्त जे डब्ल्यू.स्मिथ, अहमदनगरचे जिल्हाधिकारी डब्ल्यू.जी.हुलंड आय.सी.एस. व जे. बी. आयर्विन आय.सी.एस. आदी मान्यवरांची उपस्थिती होती. सदर कार्यक्रमाच्या यशस्वितेसाठी दादासाहेबांनी विशेष परिश्रम घेतले. वसतिगृहामधील विद्यार्थी शहरातल्या विविध माध्यमिक विद्यालयांमध्ये शिक्षण घेत असत. संस्थेचे स्वत:चे स्वतंत्र विद्यालय असावे म्हणून इ. स. १९४१ मध्ये 'टागोर इंग्लिश शाळे' ची स्थापना करण्यात येऊन दोन वर्षांने इ. स. १९४३ मध्ये त्याचे रूपांतर 'निवासी विद्यालय अहमदनगर' असे करण्यात आले.

दादासाहेबांनी त्यांच्या सारोळा कासार, या गावाची शैक्षणिक, सामाजिक, सांस्कृतिक, अर्थशास्त्रीय, भौगोलिक व शेती व्यवसाय विषयक माहिती गोळा करून अभ्यासपूर्ण सर्वेक्षण केले व त्याचा अहवाल म्हणून 'सारोला कासार स्टडी ऑफ डेक्कन व्हिलेज इन फेमिन झोन' नावाचा इंग्रजीमध्ये सुमारे ३५० पृष्ठांचा ग्रंथ इ. १९३८ मध्ये प्रसिद्ध केला. सदर ग्रंथास अहमदनगरचे तत्कालीन जिल्हाधिकारी मॅकमिलन यांची उत्कृष्ट प्रस्तावना असून हा ग्रंथ मुंबई इलाख्याचे तत्कालीन गव्हर्नर सर रॉजर लुमले यांना समर्पित केला आहे.

स्वातंत्र्यपूर्व काळामध्ये बहुजन समाजातील अभ्यासकाचा अशा प्रकारचा ग्रंथ म्हणजे कुतूहलाचाच भाग मानला गेला. सदर ग्रंथाच्या प्रती आजही देश - विदेशातील विविध विद्यापीठांच्या ग्रंथालयात मानाचे स्थान राखून आहेत. सदर ग्रंथास आधारभूत मानून स्वातंत्र्योत्तर काळात कित्येक संशोधक विद्यार्थ्यांनी आपले संशोधन कार्य पूर्ण केले आहे.

अत्यंत शिस्तप्रिय, स्वाभिमानी व करारी स्वभावाच्या दादासाहेबांनी आपले सारे आयुष्य सकल जनांच्या ज्ञानप्रकाशासाठी खर्ची घातले. यात पुढील १० गोष्टींचा समावेश होता : १. विद्यासंपत्ती, २. शरीरसंपत्ती, ३. सत्संग, ४. उद्यमशीलता, ५. सत्यवचन, ६. व्यसनमुक्ती, ७. सद्वर्तन, ८. धर्माचरण, ९. शिलकी व्यवहार आणि १०. काटकसर.

लोकांच्या जीवनातील महत्त्वपूर्ण व्यवहारांच्या कायदेशीर नोंदी करून ठेवणाऱ्या सहायक निबंधक दादासाहेबांनी वैयक्तिक माहितीच्या नोंदींबरोबरच पुढील पिढ्यांना आणि समाजाला आदर्शवत् असे स्वत:चे मृत्युपत्र तयार करून इ . स. १९४५ मध्ये त्याची कायदेशीर नोंदणी (रजिस्ट्रेशन) करून घेतली. अशा प्रकारे कृतकृत्य होऊन आपले जन्मगाव सारोळा कासार येथे आपली इहलोकीची यात्रा संपविली.

– विश्वास काळे

**संदर्भ :**

*१. 'झेप', अमृत महोत्सवी स्मरणिका; अहमदनगर जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, अहमदनगर.*

*२. कृ. धों. उर्फ दादासाहेब काळे यांची खाजगी माहितीची चोपडी (अप्रकाशित).*

*३. काळे, कृ. धों ; 'सारोला कासार स्टडी ऑफ डेक्कन व्हिलेज इन फेमिन झोन'.*

## काळे, प्रल्हाद लक्ष्मण

**संस्थापक, व्यायामशिक्षक**

**२० ऑक्टोबर १८९८ – १७ जुलै १९७३**

प्रल्हाद लक्ष्मण काळे हे काळे गुरुजी म्हणून ओळखले जात. नंदुरबार हे गुरुजींचे जन्मगाव. नंदुरबारला त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. लहानपणापासूनच त्यांना व्यायामाची आवड होती. रोज अर्धा मैल दौड व नंतर



तालमीत दंड, बैठका, कुस्ती असा त्यांचा कार्यक्रम असे. गावच्या पंचक्रोशीत 'विजयी मल्ल' म्हणून त्यांची प्रसिद्धी होती. व्यायामाच्या पुढील शिक्षणासाठी १९१८ मध्ये ते बडोद्याला माणिकराव राजरत्न ह्यांच्याकडे गेले. तेथे त्यांनी कुस्ती, लाठी, विजोड फरीदगा ह्याबरोबरच मसाज व अस्थिसंधान कलेचे शिक्षण घेतले.

नंतर मुंबईतील अंधेरीच्या साधकाश्रमाने व्यायामाचे शिक्षक म्हणून गुरुजींना बोलावून घेतले. तेव्हापासून मुंबईतील राष्ट्रीय शाळा, प्रशाला, महाविद्यालये ह्यातील विद्यार्थी गुरुजींकडे मार्गदर्शनासाठी येत. बडोद्याप्रमाणे मुंबईत भारतीय पद्धतीचा व्यायाम शिकविणारी स्वतंत्र व्यायामशाळा असली पाहिजे असा गुरुजींचा विचार होता आणि तो प्रत्यक्षातही आला.

दादर येथील घरधनी पोपटलाल शहा यांनी त्यांच्या मालकीची एक मोकळी जागा सांघिक व्यायामासाठी व एक खोली साधने ठेवण्यासाठी विनामूल्य दिली. काळे गुरुजींनी प्रयत्न करून पैसे जमविले, त्यातून दोन मोठे आरसे, आवश्यक साधने व एक तंबू खरेदी केला. २३ ऑगस्ट १९२५ या दिवशी, गणेश चतुर्थीच्या मुहूर्तावर विनायक महाराज मसुरकर ह्यांच्या हस्ते व्यायाम शाळेचे 'श्री समर्थ व्यायाम मंदिर' असे नामकरण झाले. मनाने, शरीराने आणि बुद्धीने बलवंत अशा पिढ्या घडविण्याचे काम सुरू झाले.

लोकांमध्ये व्यायामाची आवड निर्माण करून त्यांना दीर्घायुषी, बलवान, धाडसी बनवावे आणि चिकाटी, काटकपणा व शिस्तीच्या सवयी निर्माण कराव्यात ह्या ध्येयाने संस्थेचे कार्य चालू झाले; पण संस्थेचे कार्यक्षेत्र केवळ व्यायामापुरते मर्यादित नव्हते तर त्यांना समाजसेवा करून जनजागृती घडवावयाची होती.

१९२५ च्या दसऱ्याला गुरुजींच्या मार्गदर्शनाखाली विद्यार्थ्यांनी कवायती केल्या, सांघिक व वैयक्तिक व्यायामाची प्रात्यक्षिके सादर केली. लाठीही स्वसंरक्षणासाठी असते हे गुरुजींनी त्या दिवशी सप्रयोग दाखविले.

त्याच वर्षी शिवजयंतीच्या उत्सवात किल्ले रायगडावर जाऊन विद्यार्थ्यांच्या पथकाकडून व्यायाम व क्रीडा ह्यांची प्रात्यक्षिके करवून घेतली. नि:शस्त्र माणूस हा सशस्त्र माणसावर मात करू शकतो, हे गुरुजींनी स्वत: फरिदग्याच्या कार्यक्रमातून दाखवून दिले. गुरुजींचे संघटनाकौशल्य अप्रतिम होते.

१९३८ मध्ये मुंबईतील सर्व शाळांतील अडीच हजार विद्यार्थी-विद्यार्थिनींच्या सैनिकी शिस्तीतील सांघिक कवायतीच्या प्रात्यक्षिकाचे संपूर्ण संयोजन गुरुजींनी केले होते. गुरुजींच्या अशा कार्यक्रमांना सर्व वृत्तपत्रांतून मोठी प्रसिद्धी मिळायची. महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषद, मुंबई व्यायाम परिषद ह्यांची नियमावली तयार करण्यात गुरुजींचा फार मोठा सहभाग होता.

मुंबईत शेठ मंगलदास वर्मा ह्यांच्यावर त्यांनी उपचार केले होते. कृतज्ञता म्हणून वर्मांनी शिवाजी पार्क येथील जागेवर, अठ्ठावीस हजार रुपये खर्चून व्यायामशाळेसाठी वास्तू उभारून दिली. २५ एप्रिल १९४९ ह्या दिवशी मुंबईचे मुख्यमंत्री ना. बाळासाहेब खेर ह्यांच्या हस्ते ह्या इमारतीचे उद्‌घाटन झाले.

या संस्थेत नंतर सी.पी. एड., एस. टी. सी. प्रशिक्षणाचे वर्ग सुरू केले. या संस्थेतून प्रशिक्षण घेतलेले गुरुजींचे शेकडो विद्यार्थी महाराष्ट्रातील विविध शाळांमधून व्यायाम शिक्षक म्हणून काम करीत आहेत. गुरुजींचे व्रत पुढे चालवीत आहेत.

मुंबईतील दादर येथील गोखले रोडवर अनेक उदार दात्यांनी दिलेल्या देणग्यांमधून १९६३ मध्ये सुरू झालेली 'गुरुवर्य प्र. ल. काळे व्यायामशाळा' सुद्धा हेच कार्य करीत आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *जेरे बाळ; समर्थ सेवक पुस्तिका; प्र. ल. काळे व्यायामशाळा; मुंबई; १९७३, १९८०, १९९९.*

## किंजवडेकर, वामनशास्त्री रामचंद्र

**संस्कृत अभ्यासक, शिक्षक, लेखक**

**१८९० – १६ ऑक्टोबर १९३९**

वामनशास्त्री रामचंद्र किंजवडेकर यांचा जन्म पणजी येथे झाला. बालपणीच मातापित्यांचे छत्र हरपल्याने बालपण हालात गेले. कष्टांवर मात करून जेथे मिळेल तेथून शिक्षण घेतले. तेवीसाव्या वर्षांपर्यंत व्याकरण, न्याय, वेदान्त या संस्कृत अभ्यासशाखांमध्ये प्राविण्य मिळवले.बंगळुर संस्कृत महाविद्यालयाचे थोर मीमांसक पंडित वैद्यनाथशास्त्री यांच्याजवळ पूर्वमीमांसा या यज्ञयागाचे विश्लेषण करणाऱ्या शास्त्राचे सखोल व सांगोपांग अध्ययन केले व यातील ‘मीमांसकशिरोमणी’ आणि ‘सरस्वतीभूषण’ या उच्च पदव्या मिळवल्या.

पूर्वमीमांसेच्या सखोल अध्ययनाने त्यात आवड निर्माण झाल्याने मीमांसाशास्त्राचे अध्ययनदृष्टच्या व प्रत्यक्ष पुनरूज्जीवन करुन यज्ञयागांना पुन्हा एकदा स्थान प्राप्त करून देणे हे ध्येय त्यांनी समोर ठेवले. यज्ञयागातील प्रत्यक्ष ज्ञान मिळवण्यासाठी त्यांनी नागपूर येथे १९१५ साली सोमयाग व १९३४ मध्ये कुरूंदवाड येथे आप्तोर्यामयाग असे दोन याग करविले.त्यांचे पूर्ण निरीक्षण करून मीमांसाशास्त्रावर अनेक ग्रंथ लिहिले व संपादित केले. आधानपद्धती, पशवालंभनमीमांसा, आप्तोर्यामयाग, संस्कारमीमांसा ही त्यातील काही महत्त्वपूर्ण पुस्तके आहेत.

पूर्वमीमांसाशास्त्राचा प्रसार म्हणजे यज्ञयागात रूची निर्माण करुन ते इतरांना शिकवणे होय. पुण्याच्या शिक्षण प्रसारक मंडळीच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयात (तेव्हाचे न्यू पूना कॉलेज) पं. वामनशास्त्री संस्कृत शिकवीत.

महाविद्यालयात म.म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर फर्गसन कॉलेजात संस्कृत शिकवायला होते. पूर्वमीमांसेचा प्रसार व प्रचार व्हावा यासाठी शिक्षण प्रसारक मंडळीने पं. वामनशास्त्रींच्या मार्गदर्शनाखाली मीमांसा विद्यालयाची स्थापना केली.

पं. वामनशास्त्रींनी महाराष्ट्रभर हिंडून विद्यालयाची इमारत, ग्रंथशाळा यासाठी निधी जमा केला. तेथे अग्निहोत्र सतत चालू राहावे यासाठी एक ठेवही ठेवली. विद्यालयात पूर्वमीमांसेच्या अध्यापनाबरोबर हिंदू धर्मशास्त्रातील प्रश्नांची उकल व्हावी यासाठी एका विद्वत्परिषदेची स्थापना केली. या विद्वत्परिषदेचे अध्यक्ष म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर होते. अग्निहोत्र चालवण्यासाठी व मीमांसाशास्त्राच्या अध्ययनासाठी उपयुक्त पुस्तके त्यांनी लिहिली. पुण्याच्या आनंदाश्रम संस्थेने ती प्रसिद्ध केली. या पुस्तकांचा परिचय व्हावा यासाठी पं. वामनशास्त्रींनी केसरीमधून लेखही लिहिले.

त्यावेळी महाराष्ट्रात मुंबई विद्यापीठ हे एकच विद्यापीठ होते. संस्कृत एम. ए. साठी मीमांसाशास्त्र हा एक अभ्यासविषय असावा यासाठी त्यांनी विशेष प्रयत्न केले. त्यांना यश येऊन मुंबई विद्यापीठाने मीमांसाशास्त्र हा विषय एम. ए. साठी नव्याने सुरू केला. अभ्यासासाठी नेमलेला कुमारिलभट्टांचा तंत्रवार्तिक हा आधारग्रंथ दुर्मीळ होता. ग्रंथाचे संपादन त्यांनी पं. सुब्बावधानीशास्त्री यांच्या मदतीने केले, कारण पं. वामनशास्त्रींना मीमांसा विद्यालयासाठी निधी जमा करण्यासाठी फिरावे लागे. त्यांना ग्रंथाच्या संपादनासाठी वेळ देता येत नव्हता. तंत्रवार्तिकाचे हे ग्रंथ आनंदाश्रम संस्थेने प्रकाशित केले.

मीमांसा विद्यालयाला १९३४ पासून अध्ययन–अध्यापन केंद्र म्हणून मान्यता मिळाली. त्यामुळे विद्यार्थिसंख्याही वाढत गेली. दूरदूरच्या गावांहून विद्यार्थी येत. यात परदेशी विद्यार्थी देखील होते. फ्रँकलीन एजर्टन यांनी पं. वामनशास्त्रींकडे शिकून मीमांसान्यायप्रकाश हा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्याच्या प्रस्तावनेतून पं. वामनशास्त्री किती विद्वान होते हे लक्षात येते. ते संस्कृतमधूनच विद्यार्थ्यांना शिकवीत असत.

त्यांनी मीमांसा विद्यालयाच्या स्थापनेनंतर सुरुवातीच्या काळात ‘मीमांसाप्रकाश’ नावाची पत्रिका काढण्याचा प्रयत्न केला. तसेच मीमांसाविषयक पुस्तके, प्रकाशित करण्यासाठी स्वत:ची प्रकाशनसंस्था काढली. पण हे दोन्ही प्रयत्न असफल ठरले.

अखिल भारतीय संस्कृत विद्यापीठ असावे अशी त्यांची इच्छा होती. यासाठी लाहोर येथील पं. भंडारी यांच्या

साहाय्याने समाजाचा पाठिंबा मिळण्यासाठी प्रयत्न केले. अशा सततच्या प्रवासात त्यांना थंडीची बाधा झाली. उपचारांकरिता त्यांना मिरज येथील दवाखान्यात ठेवले.पण तिथेच त्यांचा मृत्यू झाला.

मीमांसाशास्त्राचे पुनरूज्जीवन हे ध्येय पं. वामनशास्त्रींनी ठेवले. मीमांसा विद्यालयाची स्थापना व उत्कर्ष, मुंबई विद्यापीठामध्ये मीमांसाशास्त्र हा संस्कृत एम. ए. साठी एक अभ्यासविषय अशा मार्गांनी त्यांची ध्येयपूर्ती झाली.

– डॉ. मंदाकिनी अशोक किंजवडेकर

## कीर, भागोजी बाळाजी

**संस्थापक, सामाजिक कार्यकर्ते**

**१८६९ – २४ फेब्रुवारी १९४४**



भागोजी बाळाजी कीर हे भंडारी समाजाचे.लक्ष्मीबाई आणि बाळाजी कीर हे त्यांचे आईवडील. भागोजींना तीन भाऊ आणि दोन बहिणी होत्या. घरच्या अठरा विसे दारिद्र्याने या मुलांना नियमित शालेय शिक्षण देणे बाळाजींना केवळ अशक्य होते. त्यामुळे मुलांचे बालपण पेठ किल्ला परिसरात खेळण्या-बागडण्यातच गेले.

गरिबीत संसार सांभाळताना वडिलांना घ्यावे लागलेले कष्ट भागोजींना बालपणीही अस्वस्थ करीत. ते लहान वयातही चाफ्याची फुले आणि फळे विकून त्या काळच्या चलनातल्या दोन-चार आण्यांची मदत घराला करीत. आर्थिक दुरावस्थेमुळे बाळाजी कर्जबाजारी झाले होते. परिणामी एके दिवशी सावकाराने कर्जवसुलीसाठी घरातले सामान बाहेर काढले. या घटनेचा भागोजींच्या मनावर खोल परिणाम झाला. याच सुमारास कोकणातल्या चाकरमान्यांचे कमाईसाठी मुंबईला जाणे सुरू झाले होते. भागोजींनी हाच निर्णय घेतला आणि दहा-बारा वयाचा हा मुलगा गलबतावरच्या एका तांडेलाच्या मदतीने मोफत प्रवास करून मुंबईत दाखल झाला.

पोटपाण्यासाठी मुंबईत आलेल्या निर्धन, निरक्षर भागोजींनी रोजगार शोधायला सुरुवात केली. अपार कष्टांच्या तयारीला नशिबाची साथ मिळाली. एका सुताराने त्यांना रंधा मारण्याच्या कामावर दोन आणे रोजाने ठेवून घेतले. जोडीला सुतारकामाचा भुसा विक्री आणि चर्नीरोड स्टेशनवर हमालीही भागोजींनी केली. दोन आण्याची कमाई चार-सहा आणे होऊ लागली.

भागोजी मुंबईतल्या पालनजी शापूरजी या प्रतिष्ठित बांधकाम व्यावसायिकाच्या संपर्कात आले आणि कीर कुटुंबाच्या उत्कर्षाचा मार्ग खुला झाला. पालनजींनी त्यांना सुतारकाम दिले. भागोजींची चिकाटी, प्रामाणिकपणा, कामावरची निष्ठा आणि निरीक्षणातून व्यवसायकौशल्य आत्मसात करण्याची इच्छाशक्ती पाहून पालनजींनी त्यांना व्यवसायात भागीदारी दिली. या संधीचा प्रामाणिक लाभ घेत भागोजींनी मुंबईत अनेक दर्जेदार वास्तू उभारल्या. व्यवसाय विस्तारला आणि त्यांना भागोजीशेठ कीर ही एक प्रतिभावंत बांधकाम कंत्राटदार अशी ओळख मिळाली आणि त्याबरोबरच लक्ष्मीचा वरदहस्तही लाभला.

स्वतः शिक्षणापासून वंचित राहिल्याने गरीब मुलांना शिक्षणाची संधी मिळावी ही आंतरिक ओढही त्यांना होती. त्यामुळेच व्यावसायिक यशानंतर भागोजींनी गरीबांना शिक्षणाची सुविधा रत्नागिरीतच मिळावी यासाठी पुढाकार घेतला. भंडारी समाजासाठी हे कार्य व्हावे ही मूळ इच्छा असली तरी प्रत्यक्षात सर्वांनाच कसा लाभ होईल याचाही त्यांनी विचार केला. भंडारी शिक्षण परिषदेचे १९२० नंतरचे रत्नागिरी अधिवेशन त्यांनी स्वखर्चाने प्रायोजित केले होते.

रत्नागिरीच्या पेठ किल्ला परिसरात आधी एक शाळा सुरू होती. त्यानंतर १९२२ ला रत्नागिरी किल्ल्यात पेठ किल्ला शाळेची एक शाखा स्थापन झाली. भागोजींच्या प्रयत्नाने १९२५ ला किल्ला शाळा स्वतंत्र झाली. दोन वर्षांत विद्यार्थिसंख्या ७० झाल्याने जागा अपुरी पडू लागली. भागोजींनी १९२९ पर्यंत २५० विद्यार्थी क्षमतेची दोन मजली इमारत बांधून दिली. परिसरातल्या खेड्यांतून शिक्षणासाठी रत्नागिरीत येणाऱ्या भंडारी समाजाच्या

मुलांकरिता त्यांनी मोफत वसतिगृह बांधले. नंतर ते सर्व घटकांना खुले झाले. दरवर्षी या शाळेतल्या एका मुलाला उच्च पदवीसाठी परदेशी जाण्याच्या खर्चाची तरतूदही त्यांनी केली. भागोजींनी १९३६ ला पेठ किल्ला शाळेलाही दुमजली इमारत बांधून दिली. आज या शाळा भागेश्वर विद्यामंदिर म्हणजेच रत्नागिरी नगरपरिषद शाळा क्रमांक ८ आणि ९ म्हणून ओळखल्या जातात.

शाळा व्यवस्थापनाला लागणाऱ्या बाक, फळे, नकाशे, प्रयोगशाळेची उपकरणे, यासारख्या सर्व आवश्यक साहित्याचा खर्च भागोजी करीत. निवासी विद्यार्थ्यांसाठी मोफत वसतिगृह व जेवणा-खाण्याच्या खर्चाबरोबर किल्ला शाळेत प्रत्येक वर्षी वैशाखात विशेष पारितोषिकासह गुणवंत विद्यार्थ्यांच्या सत्काराचा पायंडाही घालून दिला. त्यादिवशी मुलांना खास पक्वान्नाचे जेवण देण्यात येई. मुलांमध्ये खेळ आणि व्यायामाची आवड जोपासण्यासाठी आवश्यक ते सर्व साहित्यही पुरवले.

या दोन संस्थांबरोबर भागोजींनी १९३६ मध्ये भंडारी समाजातील लहान मुलांसाठी भागेश्वर बालकाश्रम स्थापन केला. इथेही राहणे-खाणे मोफत असे. शाळा एकल विद्यालय स्वरूपाची, म्हणजेच एक शिक्षक असलेली होती. बालकाश्रमातल्या मुलांवर लवकर उठून व्यायाम, स्वच्छता, शिस्तपालन, आचरण व टापटीप याचे संस्कार केले जात. काही काळानंतर भंडारी समाजाबरोबरच इतर घटकांच्या मुलांनाही या संस्थांत प्रवेश मिळू लागला.

'रत्नागिरी एज्युकेशन सोसायटी'च्या महिला विद्यालयासाठी इमारत बांधून देण्याच्या कामाचा शुभारंभ १९३९ मध्ये झाला. भागोजींच्या हयातीत ते पूर्ण झाले नसले तरी १९४४ ला इमारत तयार झाली. आज भागेश्वर ज्ञानमंदिर या नावाने हे महिला विद्यालय ओळखले जाते. शिक्षणक्षेत्राशी निगडित अशा आणखी एका कार्याची भागोजींच्या नावावर नोंद आहे. व्यावसायिक शिक्षण विकासाला आवश्यक आहे हे भागोजींना माहीत होते. भंडारी समाजाला ते मिळावे याची त्यांना तळमळ होती. त्यापोटीच त्यांनी भागेश्वर बालकाश्रमात सुतारकामाचे प्राथमिक धडे देण्याची सोय केली होती. त्यांनी स्थापन केलेल्या भागेश्वर मंदिर चॅरिटेबल ट्रस्टच्या नोंदणीपत्रात भंडारी समाजासाठी व्यावसायिक शिक्षणशाळेचे ध्येय स्पष्ट नमूद केले आहे.

आपला उत्कर्ष भगवान शंकराच्या आशीर्वादाने झाला ही भागोजींची अतूट श्रद्धा होती. परिणामी त्यांनी रत्नागिरी किल्ल्यातल्या भागेश्वर मंदिराचा जीर्णोद्धार करून तो परिसर देखणा केला. रत्नागिरीतल्या शाळा, मुंबईतली भागेश्वर नावाची बांधकामे, दादरची हिंदू स्मशानभूमी आणि धर्मशाळा, आळंदीची धर्मशाळा, वाईतली भागेश्वर गोशाळा ही त्यांची काही बांधकामे.

धार्मिक अधिष्ठानाबरोबरच हिंदू समाजातला कडवा जातिभेद समूळ उखडण्याच्या कार्याला भागोजींनी सक्रिय पाठिंबा दिला. या संदर्भात संत गाडगेबाबा आणि स्वातंत्र्यवीर सावरकरही त्यांची श्रद्धास्थाने होती.दलित समाजाबरोबर सहभोजन, दलितांना मंदिरात मुक्त प्रवेश यासाठी त्यांनी या दोन्ही महापुरूषांना पूर्ण पाठबळ दिले. सावरकरांच्या कार्याबद्दल भागोजी कीर यांना अत्यंत आदर होता. त्यामुळे त्यांच्या कल्पनेतील पतितपावन मंदिर भागोजींनी प्रत्यक्षात उभे केले.

समाजाच्या सर्व घटकांना मुक्त प्रवेश देणारे रत्नागिरीचे मंदिर अशा स्वरूपाचे हे भारतातील पहिले पूजास्थान ठरले. पालनजी शापूरजी यांच्याबद्दल कृतज्ञता म्हणून त्यांचा संगमरवरी अर्धपुतळा भागेश्वर मंदिरात बसवला. पालनजींच्या पत्नी भिकाबाई यांचाही तसाच अर्धपुतळा माटुंग्याच्या ज्ञानमंदिर हॉल इमारतीत बसवला होता. भागोजींचे हृदयविकाराच्या झटक्याने निधन झाले.

– सुधाकर कुलकर्णी

## कुंटे, रामचंद्र गोपाळ

**प्रतिभावान गणिती, लेखक, अध्यापक**

**२१ नोव्हेंबर १९२७ – ११ फेब्रुवारी २००७**

रामचंद्र गोपाळ कुंटे हे नाशिकमध्ये रामभाऊ कुंटे म्हणून ओळखले जात. त्यांचे प्राथमिक शिक्षण ग्वाल्हेरमध्ये व माध्यमिक शिक्षण नाशिक येथील 'न्यू इंग्लिश स्कूल'मध्ये झाले. नाशिकच्या एच.पी.टी. महाविद्यालयामधून गणित



व इंग्रजी विषय घेऊन त्यांनी बी. ए. पदवी संपादन केली.

त्यांनी १९५४ पासून नाशिक शिक्षण प्रसारक मंडळाच्या नाशिक रोड येथील पुरुषोत्तम इंग्लिश शाळेमध्ये शिक्षक म्हणून कारकिर्दीला सुरुवात केली. ते गणित व इंग्रजी विषयाचे उत्तम शिक्षक होते. १९५७ मध्ये ते बी. टी. झाले. ते अतिशय बुद्धिमान होते, प्रतिभावान गणिती होते. एम. एड. ला प्रायोगिक मानसशास्त्र व संख्याशास्त्र हे विषय घेऊन पुणे विद्यापीठात प्रथम येण्याचा मान त्यांनी मिळविला. एक निष्णात गणित अध्यापक म्हणून केवळ नाशिक जिल्ह्यातच नव्हे, तर संपूर्ण महाराष्ट्रात त्यांची ख्याती होती.

नाशिक शिक्षण प्रसारक मंडळाच्या विविध माध्यमिक शाळांमध्ये त्यांनी शिक्षक, उपमुख्याध्यापक, मुख्याध्यापक म्हणून उत्तम काम केले. १९८० पासून नांदगाव येथील व्ही. जे. विद्यालय, नाशिकचे रूंग्टा विद्यालय व रात्र विद्यालय अशा तीन शाळांत मुख्याध्यापक म्हणून जबाबदारी सांभाळली. व्ही. जे. विद्यालय ही लहान गावातील शाळा, रूंग्टा विद्यालय ही मोठ्या शहरातली शाळा, रात्र विद्यालय ही व्यवसाय करणाऱ्या विद्यार्थ्यांची शाळा असे, या तिन्ही शाळांमधील वातावरण भिन्न होते. पण ह्या तिन्ही शाळांत त्यांची कारकीर्द अत्यंत यशस्वी ठरली.

अध्यापक आणि मुख्याध्यापक म्हणून त्यांची महाराष्ट्रभर पसरली होती. म्हणूनच त्यांच्या नांदगावच्या कार्यकाळात जवळ असलेल्या वाखारी गावच्या ग्रामस्थांनी संस्थेने शाळा चालवावी असा प्रस्ताव त्यांच्यावरील विश्वासामुळेच संस्थेस दिला. हा विश्वास त्यांनी सार्थ ठरविला.

संस्थेने शाळा चालवायला घेतली व मुख्याध्यापकपदी त्यांची नेमणूक झाली. मुख्याध्यापक म्हणून शाळेच्या सर्वच अंगांकडे त्यांचे बारीक लक्ष असे. रूंग्टा विद्यालयाचे वाचनालय त्यांनी योजना आखून, परिश्रमपूर्वक समृद्ध केले. प्रयोगशाळा, रंगभूमी व क्रीडांगण ह्या महत्त्वाच्या गोष्टींकडे लक्ष पुरविले. कै. रं. कृ. यार्दी व्याख्यानमालेच्या निमित्ताने ज्ञानाची पाणपोई उभी करून यार्दी यांची स्मृती कायम ठेवली. कै. वा. श्री. पुरोहित एकांकिका स्पर्धेच्या माध्यमातून विद्यार्थ्यांच्या कलागुणांच्या शोधाला व विकासाला संधी दिली. ते उत्तम क्रिकेटपटू होते.ते स्वत: दोन्ही हातांनी गोलंदाजी करीत. ते मुलांबरोबर उत्साहाने खेळत व त्यांना मार्गदर्शन करीत असत. नंतरच्या काळात त्यांनी ह्या शाळेस पन्नास हजार रूपयांची देणगी दिली.

‘नाशिक शिक्षण प्रसारक मंडळ’ ह्या संस्थेचे मानद चिटणीस म्हणून त्यांनी अजोड काम केले. अत्यंत अडचणीच्या काळात त्यांनी संस्थेचे समर्थपणे नेतृत्व केले. त्यामुळे संस्थेच्या विकासास लक्षणीय गती मिळाली.

गणित विषयाचे अध्यापन, लेखन व संशोधन ह्यातही त्यांचे योगदान फार मोठे आहे. नवीन अभ्यासक्रमासाठी शिक्षक मार्गदर्शन वर्गास तज्ज्ञ मार्गदर्शक म्हणून त्यांचे मोलाचे मार्गदर्शन लाभले. ‘गणित शिक्षण’ मासिकात अनेक वर्षे त्यांनी ‘मेंदूला खुराक’ हे सदर चालविले. ते नाशिक जिल्हा गणित अध्यापक संघाचे अनेक वर्षे अध्यक्ष होते. महाराष्ट्र गणित अध्यापक महामंडळाचे ते सदस्य होते. ‘वैदिक गणित’ ह्या ग्रंथाचे त्यांनी मराठीत भाषांतर केले. ‘भारतीय शिक्षण’ मासिकाचे त्यांनी अनेक वर्षे संपादन केले.

त्यांनी यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठात ग्रंथलेखनाचे काम केले. भारतीय इतिहास संकलन समिती, ग. वि. अकोलकर मानसिक क्षमता संशोधन संस्था, नाशिक जिल्हा क्रिकेट असोसिएशन अशा विविध संस्थांसाठी त्यांनी मोलाचे कार्य व मार्गदर्शन केले. अतिशय कठीण काळात नाशिक जिल्हा माध्यमिक शिक्षक संघाच्या पायाभरणीच्या कामात त्यांचा सहभाग होता. निवृत्तीच्या काळातही संगणक विज्ञान नव्याने शिकून ते मार्गदर्शन करीत होते.

– प्रा. सुहासिनी पटेल

## कुंदनानी, खुशीराम एम.

**विचारवंत, शिक्षणतज्ज्ञ**

**२४ ऑगस्ट १९०४ – ७ नोव्हेंबर १९९२**



मुंबईतील फोर्ट भागातील दिनशा वाच्छा रोडवरील किशनचंद्र चेलाराम महाविद्यालय (के.सी. कॉलेज) चे प्राचार्य खुशीराम एम. कुंदनानी ह्यांचा जन्म सिंध प्रांतात हैद्राबाद येथे झाला. ते (दयाराम जेथामल सिंध महाविद्यालय) कराची व रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स, मुंबईचे विद्यार्थी होते. खेळ, गिर्यारोहण व व्यायाम हे त्यांचे आवडीचे विषय होते. १९३० मध्ये हैद्राबाद (सिंध) येथील डी. जे. राष्ट्रीय महाविद्यालयामध्ये प्राध्यापक व भौतिकशास्त्र विभागाचे प्रमुख म्हणून त्यांनी व्यवसायास सुरुवात केली. महाविद्यालयाच्या जिमखान्याचे प्रमुख म्हणूनही त्यांनी काम पाहिले.

भारताच्या फाळणीनंतर कुंदनानी मुंबईत आले. त्यावेळी ते महाविद्यालयाच्या प्रयोगशाळेतील उपकरणे, ग्रंथालयातील ग्रंथ बरोबर घेऊन आले. भारत सरकारने दिलेले उच्च पदाचे अनेक प्रस्ताव त्यांनी नाकारले. कारण विभाजनामुळे उद्ध्वस्त जीवन जगणाऱ्या जातीबांधवांच्या उन्नतीचे काम त्यांना करावयाचे होते. ही उन्नती केवळ शिक्षणानेच होईल, असा त्यांचा विश्वास होता.

मुंबईत वांद्र्यासारख्या त्यावेळच्या ओसाड जागेत एक भूखंड त्यांनी खरेदी केला. पण मुंबई विद्यापीठाने त्यांना महाविद्यालयासाठी परवानगी दिली नाही. तेव्हा हैद्राबाद (सिंध) नॅशनल कॉलेजिएट बोर्डाच्या मदतीने त्यांनी अनेक महत्त्वाचे भूखंड खरेदी केले.

आतापर्यंत जमविलेला सर्व पैसा त्यांनी संस्थांच्या उभारणीत ओतला. १९४९ मध्ये वांद्रे महाविद्यालय सुरू झाले. त्या पाठोपाठ कला, विज्ञान, वाणिज्य, विधि, अभियांत्रिकी, संगणक तंत्रज्ञान, औषधनिर्माण विज्ञान, तंत्रनिकेतन, तांत्रिक संस्था, शिक्षक प्रशिक्षण महाविद्यालय, पत्रकारिता, व्यवस्थापन अशा विविध ज्ञानशाखांचे शिक्षण देणाऱ्या महाविद्यालयांची मालिका त्यांनी उभी केली.

प्रा. कुंदनानी स्वत: महाविद्यालयाची रूपरेखा तयार करीत. त्यांनी १९५४ ते १९६६ व १९६७ ते १९९२ या कालावधीत किशनचंद्र चेलाराम महाविद्यालय, चर्चगेट येथे प्राचार्यपद भूषविले. १९५९ ते १९६५ अशी सहा वर्षे ते मुंबई विद्यापीठाच्या सिंडिकेटवर मुंबईतील महाविद्यालयांच्या प्राचार्यांचे प्रतिनिधित्व करत होते. विद्यापीठाच्या एथलिट स्पोर्ट रौप्यमहोत्सवाचे ते अध्यक्ष होते.

प्राचार्यपदाच्या निवृत्तीची मर्यादा पासष्ट वर्षांची असते. पण प्रा. कुंदनांनी ह्यांच्या बहुमोल सेवेचा मान राखून अपवाद म्हणून हैद्राबाद (सिंध) नॅशनल कॉलेजिएट बोर्डाने ही मर्यादा त्यांची इच्छा असेपर्यंत वाढविली. त्यांच्या मृत्यूपर्यंत तेच प्राचार्यपदी होते. प्रारंभी सिंधी बांधवांच्या व पुढे पर्यायाने सर्व भारतीयांच्या शिक्षणासाठी जीवाचे रान करणारे प्रा. खुशीराम कुंदनानी हे थोर, क्रियाशील विचारवंत व शिक्षणतज्ज्ञ होते.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *किशनचंद चेलाराम महाविद्यालय सुवर्णमहोत्सवी स्मरणिका, १९५४–२००४.*

## कुलकर्णी, त्र्यंबक अप्पाजी

**संस्थापक**

**५ सप्टेंबर १८८२ – २६ जून १९६७**

त्र्यंबक अप्पाजी कुलकर्णी यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यातील पाली गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण गुहागर व राजापूर ह्या ठिकाणी झाले. १८९३ मध्ये पुण्यात आल्यावर ते नूतन मराठी विद्यालयात शिकले. तेथून मॅट्रिक झाल्यानंतर ते मुंबईस गेले व तेथील विल्सन महाविद्यालयामधून त्यांनी बी. ए. ची पदवी मिळविली. प्रशिक्षण महाविद्यालयातून ते बी. टी. (बॅचलर ऑफ टीचिंग) झाले आणि शिक्षक म्हणून व्यवसायास सुरुवात केली.



प्रारंभी ते एल्फिन्स्टन महाविद्यालयामध्ये शिक्षक म्हणून काम करू लागले. मुलांची मने फुलवीत शिकविणारे कुलकर्णी विद्यार्थिप्रिय झाले. काही काळ ठाण्याच्या विल्सन महाविद्यालयामध्येही त्यांनी नोकरी केली. पण १९१२ मध्ये बदल्या, नोकरी, बंधने सोडून त्यांनी स्वत:च्या ध्येयाच्या पूर्तीसाठी नाशिक येथे स्वत:च्या घरात 'न्यू इंग्लिश स्कूल' नावाच्या शाळेची स्थापना केली. सुरुवातीला चौथी ते सातवी पर्यंतचे वर्ग होते.

१९१४ मध्ये शाळेसाठी स्वतंत्र जागा मिळाली. विद्यालय बांधून पूर्ण झाले. पुढच्याच वर्षी मोठ्या प्रयत्नांनी शाळेला मान्यता मिळाली. अवघ्या दोन वर्षांत मुंबईतील नावाजलेले हॅरिस शिल्ड शाळेने मिळविले व शाळेचे नाव सर्वत्र झाले. त्या काळात त्यांनी व्यवसाय शिक्षणाचे महत्त्व ओळखून शाळेत व्यवसाय शिक्षणाचे वर्ग सुरू केले. क्रिकेट, वक्तृत्वातील प्रावीण्य, विद्यार्थ्यांची समाजहित तत्परता यांतून शाळेला स्थैर्य मिळाले, लौकिक वाढत गेला. १९१८ मध्ये नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांचे चिरस्मारक व्हावे या हेतूने त्यांनी 'गोखले एज्युकेशन सोसायटी'ची स्थापना केली. न्यू इंग्लिश स्कूल ही ह्या संस्थेची पहिली शाळा झाली. १९२२ पासून शाळेला सरकारी मदत मिळू लागली. संस्थेच्या सर्व सदस्यांना आजीव सदस्य करून घेतल्याने कामात सुसूत्रता आली.

कुलकर्णी यांनी १९२० मध्ये बोर्डी येथे सोसायटीची नवी शाळा काढली. आचार्य भिसे ह्या शाळेचे काम पाहू लागले. शाळेत व्यवसाय शिक्षणाची सोय केली. आदिवासींच्या शिक्षणाबरोबर वृक्षसंवर्धन, फळबाग लागवड व श्रमसंस्काराचे उपक्रम कुलर्णी यांनी सुरू केले. परंपरा व प्रगतीचा सांधा जुळविला. शाळेला वसतिगृहाची सोय झाली. दुर्गम वनवासी भागातील मुले शाळेत येऊ लागली. वनवासी माणूस शैक्षणिक माध्यमातून घडू शकतो हे सिद्ध झाले. १९२४ मध्ये त्यांनी नाशिकला गावापासून दूर माळरानासारख्या भागात महाविद्यालयाची स्थापना केली. नाशिकमधील लोकांसाठी उच्च शिक्षणाची सोय झाली. मोठ्या प्रयत्नांनी हंसराज प्रागजी ठाकरसी यांच्याकडून देणगी मिळाली व हंसराज प्रागजी ठाकरसी महाविद्यालय सुरू झाले. १९२४ ते १९४७ अशी तेवीस वर्षे कुलकर्णींनी प्राचार्यपदाची धुरा सांभाळली. कृषिविज्ञान, समाजसेवा, औद्योगिक प्रशिक्षण ह्यांवर भार देऊन संस्थेच्या विकासासाठी नवी दालने निर्माण केली. १९२६ मध्ये मुंबई विद्यापीठात सिनेटचे सदस्य झाले व सतत वीस वर्षे काम केले. सतत अठ्ठेचाळीस वर्षे त्यांनी सोसायटीचे अध्यक्षपद भूषविले. प्राचार्य म्हणून १९४७ मध्ये ते निवृत्त झाले. १९६३ मध्ये सोसायटीला रु. ७०,००० ची देणगी दिली आणि संस्था सहकाऱ्यांना सोपवून ते मुंबईस गेले.

१९११ पासून सोशल सर्व्हिस लीगचे सचिव म्हणून ते काम पाहत होते. त्यांनी मुंबईस गेल्यावर ह्या कामास नव्या जोमाने सुरुवात केली आणि आयुष्याच्या शेवटापर्यंत त्यांचे सामाजिक कार्य सातत्याने सुरू राहिले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## कुलकर्णी, दत्तात्रेय रामराव

**शिक्षक, प्राचार्य**

**२२ जानेवारी १९३३**

दत्तात्रेय रामराव कुलकर्णी यांनी उस्मानिया विद्यापीठातून एम. ए. (राज्यशास्त्र) केले.

त्यांनी कारकिर्दीची सुरुवात औरंगाबाद येथील शासकीय ज्ञानविज्ञान महाविद्यालयात अंशकालीन प्राध्यापक म्हणून केली. जालना येथील जे. ई. एस. महाविद्यालयात राज्यशास्त्र व लोक प्रशासन विभाग प्रमुख, नंतर उपप्राचार्य, प्राचार्य म्हणून सेवा केली. १९९८ पासून नूतन महाविद्यालय, सेलू येथे ते प्राचार्य आहेत. याच काळात विविध शैक्षणिक कार्यात महत्त्वपूर्ण सहभाग घेतला. मराठवाडा सेवा निवृत्त संघटनेचे अध्यक्ष, सेलू

येथे संपन्न झालेल्या दहाव्या अ. भा. मराठी बालकुमार साहित्य संमेलनाचे चिटणीस, सन १९९९ पासून नूतन विद्यालय शिक्षण संस्थेचे चिटणीस अशी विविध पदे त्यांनी भूषविली. शैक्षणिक दर्जा उंचावण्याबरोबरच विद्यार्थ्यांच्या चौफेर विकासासाठी विशेष प्रयत्न केले.त्याबरोबरच ते विविध शैक्षणिक संस्थाचे पदाधिकारी सदस्य होते. त्यात प्रामुख्याने इंडियन पॉलिटिकल सायन्स असोसिएशन, मराठवाडा राज्यशास्त्र परिषद, महाराष्ट्र प्राचार्य महासंघ, मराठवाडा विद्यापीठ प्राचार्य संघ, मराठवाडा विद्यापीठाच्या क्रीडा व शारिरिक शिक्षण मंडळाचे सदस्य, मराठवाडा विद्यापीठाच्या पहिल्या विकास परिषदेचे सदस्य, शैक्षणिक नियोजन आणि प्रशासन परिषदेच्या, राष्ट्रीय परिषदेचे सदस्य मराठवाडा विद्यापीठाच्या राष्ट्रीय सेवा योजनेच्या पहिल्या सल्लागार मंडळाचे सदस्य, मराठवाडा विद्यापीठाचे अधिसभा सदस्य, विद्या परिषद सदस्य, कला विद्याशाखा सदस्य, राज्य अभ्यासमंडळ या व अशा अनेक संस्थाच्या माध्यमातून त्यांनी सेवा केली आहे.

शैक्षणिक कार्याबरोबरच सामाजिक कार्यात त्यांचा महत्त्वपूर्ण सहभाग होता. १९७१ ते ७३ या काळात मराठवाड्यात पडलेल्या भीषण दुष्काळाच्या प्रसंगी त्यांनी पन्नास विद्यार्थ्यांस दत्तक घेतले. दुष्काळ निवारण निधी जमा केला. बेघरासाठी गृहनिर्माण योजनेत सहभाग घेतला.

राष्ट्रीय एकात्मता समितीच्या विद्यमाने आंध्र, मध्यप्रदेश यांना भेटी दिल्या. प. महाराष्ट्र दर्शन कार्यक्रमाचे आयोजन केले. गणेशोत्सव व्याख्यानमालेच्या आयोजनात सक्रिय सहभाग घेतला. श्रीरामजी मांगडिया व्याख्यानमालेचे संयोजन केले. गरीब विद्यार्थ्यांसाठी श्रीरामजी मांगडिया वसतिगृह निर्माण केले. वंदेमातरम सभागृहाची सेलू येथे निर्मिती केली. नूतन इंग्लिश स्कूलचा प्रारंभ केला. नूतन विद्यालयाच्या हीरक महोत्सवाचे भव्य प्रमाणात आयोजनही त्यांनी केले.

औरंगाबाद परभणी आकाशवाणी केंद्रावरून त्यांची भाषणे, मुलाखती प्रसारित झाल्या. सन १९८६-८७ मध्ये राज्यशासनाचा आदर्श शिक्षक पुरस्कार त्यांना मिळाला. त्यांच्या अथक प्रयत्नांमुळे, चौफेर कार्यामुळे नूतन शिक्षण संस्थेलाही आदर्श पुरस्कार मिळाला. राष्ट्रीय सेवा योजनेचा उत्कृष्ट पथकाचा पुरस्कार मिळाला. स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाने विविध पुरस्कारांनी महाविद्यालयास गौरविले. महाविद्यालयाला योगासनामध्ये विद्यापीठ स्तरावर सात वर्ष अजिंक्य पद मिळविले. राष्ट्रीय स्तरावर या संस्थेचा गौरव झाला.

– प्रा. भगवान काळे

## कुलकर्णी, मनोहर बाळकृष्ण
**प्राध्यापक, लेखक, संशोधक**
**१० सप्टेंबर १९३०**



प्रा. डॉ. मनोहर बाळकृष्ण कुलकर्णी ह्यांचा जन्म नाशिक जिल्ह्याच्या येवले तालुक्यातील नगरसूल गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण नाशिक नगरपालिकेच्या शाळेत व माध्यमिक शिक्षण ज्यु. स. रूंग्टा विद्यालयात झाले. नाशिकच्या एच. पी. टी. महाविद्यालयामधून संस्कृत व मराठी विषय घेऊन ते एम. ए. झाले. १९५९ मध्ये मुंबईच्या महाविद्यालयामधून त्यांनी बी. एड. पदवी मिळविली. १९७४ मध्ये ते पीएच. डी. झाले. ‘ब्राह्मणिक मायथॉलॉजी : अ स्टडी बेस्ड ऑन सिक्स इम्पॉर्टंट ब्राह्मणस्’ हा त्यांच्या प्रबंधाचा विषय होता.

१९५३ मध्ये नाशिक रोडच्या पुरुषोत्तम इंग्लिश शाळेमध्ये शिक्षक म्हणून त्यांनी आपल्या कारकिर्दीची सुरुवात केली. त्यानंतरची दहा वर्षे रत्नागिरीच्या र. प. गोगटे महाविद्यालयात ते व्याख्याता, सहायक प्राध्यापक म्हणून अध्यापनाचे काम करीत होते. नंतर ते नाशिकला परत आले व गोखले एज्युकेशन सोसायटीच्या नाशिक व नाशिक रोड येथील महाविद्यालयात एकवीस वर्षे वरिष्ठ व्याख्याता म्हणून कार्यरत होते. संस्कृत व मराठी हे त्यांचे अध्यापनाचे विषय होते. इंग्रजी, संस्कृत व मराठी साहित्याचा गाढा व्यासंग, प्रगल्भ बुद्धिमत्ता, प्रभावी वक्तृत्व

ह्यामुळे उत्तम प्राध्यापक म्हणून त्यांचे नाव झाले. संस्कृतच्या अभ्यासामुळे मराठी व्याकरण, साहित्यशास्त्र, भाषाविज्ञान, प्राचीन मराठी वाङ्मय ते उत्कृष्ट रीतीने शिकवीत. सलग सदतीस वर्षांच्या प्रदीर्घ काळात ते विद्यार्थ्यांना, शिक्षकांना मार्गदर्शन करीत होते. नंतर त्यांनी यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठात पीएच. डी. च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्यास सुरूवात केली.

महाविद्यालयीन जीवनातच त्यांनी लेखनास सुरुवात केली. १९४९ मध्ये 'हिंद' मासिकात त्यांची पहिली कथा प्रसिद्ध झाली व त्यानंतर प्रसाद, विवेक, बलवंत, किर्लोस्कर, अमृत, बहुश्रुत अशा मासिकांतून त्यांच्या कथा प्रसिद्ध होत राहिल्या. 'नव्याने रामकथा गाऊं', 'उपनिषदांतील कथा', 'भारतातील धार्मिक विविधता', 'मनू आणि स्त्री', 'भाषाविज्ञानाचे स्वरूप आणि व्याप्ती' ही त्यांची काही पुस्तके त्यांच्या विविधांगी प्रतिभेचे व प्रगाढ व्यासंगाचे दर्शन घडवितात. 'महाभारतातील व्यक्तिरेखा', 'भासाची जळालेली नाटके' ह्यासारख्या त्यांच्या लेखमाला संस्कृतमधील साहित्यकृतींचा वेगळ्या दृष्टिकोनातून वेध घेतात. सर्वांसाठी विशेषत: किशोरवयीन मुलांसाठी 'सुभाषित विचार'ही मूल्ये रुजविणारी माला होती. विविध नियतकालिके, वृत्तपत्रे ह्यातून त्यांचे विपुल लेखन प्रसिद्ध झाले आहे. अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदांतून त्यांनी शोधनिबंध सादर केले आहेत. यादवपूर (कोलकाता) अधिवेशनात 'उषस् इन ब्राह्मणाज्', उज्जैन अधिवेशनात 'दि कन्सेप्ट ऑफ इम्मॉर्टेलिटी इन द ब्राह्मणाज्' हे त्यांचे निबंध गाजले. २००१ मध्ये नाशिक जिल्हा साहित्यिक मेळाव्याचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले.

हे सर्व करीत असताना अनेक शैक्षणिक, सामाजिक संस्थांना अध्यक्ष, सदस्य म्हणून त्यांचे मार्गदर्शन लाभले. शिक्षण मंडळ, भगूर ह्या संस्थेचे कार्याध्यक्षपद त्यांनी वीस वर्षे सांभाळले. या काळात संस्थेच्या विकासाला दिशा व गती त्यांनी दिली आणि भगूर देवळाली परिसरातील एक नावाजलेली शिक्षणसंस्था नावारूपास आली. नाशिक शिक्षण प्रसारक मंडळाचे ते बारा वर्षे सदस्य व तीन वर्षे उपकार्याध्यक्ष होते. आकाशवाणीवरही त्यांचे विविध कार्यक्रम प्रसारित झाले व होत असतात. प्रा. डॉ. म. बा. कुलकर्णी ह्यांच्या ह्या शैक्षणिक, सामाजिक व सांस्कृतिक क्षेत्रांतील कार्याचा गौरव नाशिक प्राच्य विद्यापीठाने 'संस्कृत विभूषण' उपाधी प्रदान करून व नाशिकच्या शिक्षक गौरव समितीने 'आदर्श शिक्षक पुरस्कार' देऊन केला. त्यांनी 'मराठी अन्याय निवारण समिती' स्थापन केली आहे. एका चळवळीचे स्वरूप ह्या समितीच्या कार्यास प्राप्त झाले आहे.

– प्रा. सुहासिनी पटेल

## कुलकर्णी, रामचंद्र श्रीधर

**व्यायाम शिक्षक**

**१४ जून १९०८ – २५ डिसेंबर १९९६**



रामचंद्र श्रीधर कुलकर्णी हे नाशिकमध्ये 'राम मास्तर' म्हणून ओळखले जात. नाशिक नगरपालिकेच्या शाळेत त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. न्यू इंग्लिश स्कूल म्हणजे जु.स. रूंग्टा विद्यालयामधून ते मॅट्रिक झाले. नाशिक येथील यशवंत व्यायामशाळेत व बडोद्याच्या जुम्मादादा व्यायामशाळेत राम मास्तरांनी व्यायामाचे शिक्षण पूर्ण केले. कांदिवली येथील सरकारी शारीरिक शिक्षणाचा अभ्यासक्रमही त्यांनी पूर्ण केला होता. बेळगाव मराठा लाइट इन्फन्ट्री मध्ये त्यांचे लष्करी शिक्षण झाले होते.

१९२७ मध्ये न्यू इंग्लिश स्कूल, नाशिक ह्या शाळेत व्यायाम शिक्षक म्हणून ते रुजू झाले. रूंग्टा विद्यालयाची व्यायामशाळा हे त्यांचे कार्यक्षेत्र झाले. निष्ठापूर्वक शिकविणे हा राम मास्तरांचा छंद होता. मुलांना जोर, बैठका, कुस्ती, मल्लखांब, डबलबार अशा विविध व्यायाम प्रकारांचे उत्तम शिक्षण मास्तर देत. अर्धी खाकी पँट, पांढरा शर्ट खोचलेला, गुडघ्यापर्यंत खाकी पायमोजे, चकचकीत पॉलिश्ड लेदर शूज ह्या पोशाखात ते वावरत. वयाच्या पंचावन्नाव्या वर्षीही नाशिकमधली होळी ते रूंग्टा विद्यालय

हे लांबचे वाटावे असे अंतर, हमरस्ते तुडवीत ते रोज शाळेत येत. मास्तर मुलांना शरीर कमावण्याचे बाळकडू पाजत. पण बरोबरीने मनाची शक्तीही वाढावी याकडे ते कटाक्षाने लक्ष देत.

रोज पहाटे पाच वाजता शाळेच्या व्यायामशाळेत येताना वाटेवरच्या मुलांना हाकारे देत सोबत घेऊन येत. पहाटे व्यायामशाळा मुलांनी फुललेली असायची. तो काळ देशी खेळांचा होता, मैदानी खेळांचा होता. हुतूतू (कबड्डी), खोखो, लंगडी अशा खेळांच्या सामन्यात राम मास्तरांच्या तालमींमुळे रूंग्टा विद्यालयाचे संघ सतत प्रथम क्रमांकावर असत. राम मास्तर स्वत: मुलांबरोबर खेळत. शाळेत हजारएक मुले होती. बहुतेक मुलांची नावे राममास्तरांना तोंडपाठ असत. व्यायाम करताना काही चूक झाली, कार्यक्रमाच्या वेळी कोणी गडबड केली की त्याची मास्तर गय करीत नसत. ते मुलांना रागावत, शिक्षा करीत; पण त्यापेक्षा जास्त त्यांच्यावर प्रेम करीत.

नाशिकमध्ये झालेल्या पहिल्या शारीरिक शिक्षण परिषदेत रूंग्टा विद्यालयाने मिळविलेल्या यशामुळे ‘आऊट डोअर गेम्स अँड ॲथलेटिकस् असोसिएशन’चे प्रमुखपद पाच वर्षे राम मास्तरांकडे होते. शिस्त, परिश्रम, कार्याची तळमळ, संघटन-कौशल्य, ध्येयवाद यातून त्यांनी ही जबाबदारी समर्थपणे पेलली. शारीरिक क्षमता परीक्षा, नेतृत्ववर्ग, सांघिक कवायत, संचलन, क्रीडा शिक्षक मार्गदर्शन अशा विकासाच्या विविध योजना मास्तरांनी प्रत्यक्षात आणल्या. शाळेत एन. सी. सी. पथकाची स्थापना केली व १९५५ पर्यंत ते सांभाळले.

व्यावसायिक कारकिर्दीत नाशिक शिक्षण प्रसारक मंडळाचे आजीव सदस्य, सह चिटणीस, नाशिक रोडच्या नवीन मराठी शाळेचे अधीक्षक अशा विविध पदांवर राम मास्तरांनी काम केले. १९७१ मध्ये मास्तर सेवानिवृत्त झाले. पण व्यायामाचे शिक्षण ते देत राहिले.

नाशिकची यशवंत व्यायामशाळा पूर्वी गोदावरीच्या तीरावर भरायची. शाळेच्या स्थापनेपासून राममास्तर महाबळ गुरुजींचे पट्टशिष्य होते. त्यांच्यासाठी मास्तरांनी स्वयंसेवकापासून ते विश्वस्तापर्यंतची सर्व कामे मोठ्या निष्ठेने केली. यशवंत पटांगणावर भरणाऱ्या यशवंत देव मामलेदारांच्या यात्रा संयोजनात मास्तरांचा मोठा सहभाग असे. गोदावरीच्या पुरात दोन तीन वेळा व्यायामशाळा व यशवंतराव महाराज समाधी मंदिर उद्ध्वस्त झाले. या दोन्ही संस्था पूर्वीपेक्षाही अधिक मजबूतपणे पुन:स्थापित करण्यात राम मास्तर पुढे होते. नंतरच्या काळात म. गांधी मार्गावरील व्यायामशाळेच्या इमारतीस महाराष्ट्राचे तत्कालीन मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण ह्यांनी भेट दिली. त्यावेळी महाबळ गुरुजींनी व राम मास्तरांनी ‘लाठी छूट’ चे प्रात्यक्षिक दाखविले होते. तेव्हा महाबळ गुरुजींचे वय होते ऐंशी वर्षे व राम मास्तरांचे सत्तर वर्षे. स्वत:च्या पेशावरील अनन्यसाधारण निष्ठेमुळेच हे शक्य झाले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## कुलकर्णी, विनायक गोपाळ

☞ **मुख्य नोंद – विज्ञान खंड**

## कुलकर्णी, सखाराम धोंडिबा

***सदुभाऊ कुलकर्णी***

**शिक्षक, सामाजिक कार्यकर्ते**

**२३ मार्च १९५१**



सखाराम धोंडिबा कुलकर्णी ऊर्फ सदुभाऊ कुलकर्णी यांचा जन्म पंढरपूर येथे झाला. डी.एड. पर्यंतचे शिक्षण पंढरपूर येथेच झाले. कोरे गुरूजी, भागवताचार्य वा. ना. उत्पात व प्रा. बाळासाहेब बडवे यांचा त्यांच्यावर विशेष प्रभाव होता. शाळेत असताना नाटक, नकला, वक्तृत्व, पाठांतर या सर्व स्पर्धांमध्ये सखाराम यांना दरवर्षी बक्षिसे मिळत. सखाराम उर्फ सदुभाऊ यांना वाचनाची अत्यंत आवड होती. सावरकर साहित्य, ऐतिहासिक कादंबऱ्या या सर्वांबरोबरच पंढरपूर येथे होणारी सर्व विषयांची व्याख्याने, प्रवचने, किर्तने तसेच नाटके त्यांनी भरपूर पाहिली, ऐकली.

त्यांना सामाजिक कामाची आवड होती. सावरकर प्रेमी मंडळ व चौफळा तरूण येथून त्यांच्या सामाजिक कामाला सुरूवात झाली. वक्तृत्वाला अभ्यासाची व अनुभवाची जोड मिळाली. नंतर शिक्षण प्रसारक मंडळी, पुणे यांच्या श्रीपूर येथील श्री चंद्रशेखर विद्यालयाच्या प्राथमिक शाळेत १९७२ मध्ये शिक्षक म्हणून ते रुजू झाले. मुलांना शिकविण्याबरोबरच नृत्य, नाट्य, वक्तृत्व, खेळ, कथा या सर्व प्रकारच्या कलांचा त्यांनी आधार घेतला. नाट्यप्रेमाच्या आवडीतून १९८८ मध्ये बालरंगभूमीची स्थापना केली. त्यांचाच बाल वाद्यवृंदही तयार केला. या सर्व कामाची दखल घेतली जाऊन १९९४ चा 'ल. ग. देशपांडे' पुरस्कार सदुभाऊंना मिळाला.

शिक्षण प्रसारक मंडळी, पुणे यांच्या प्रशासकीय मंडळावर व नियामक मंडळावरही शिक्षक प्रतिनिधी म्हणून त्यांनी काम केले. २५ वर्षे शिक्षकाची नोकरी केल्यावर स्वेच्छा निवृत्ती पत्करून वनवासी कल्याण आश्रमाच्या कार्याकडे ते वळले. वनवासी बांधवांच्या सर्वांगीण विकासासाठी 'एकल विद्यालय' चालवली जातात. एकल विद्यालय म्हणजे एक शिक्षकी शाळा. शिक्षणाच्या माध्यमातून सुरूवात करून टप्प्याटप्याने आरोग्य सेवा, रोजगार निर्मिती प्रशिक्षण, सामाजिक संस्कार हे विषय त्याला जोडले जातात. मे १९९८ पासून सदुभाऊ एकल विद्यालयाचे काम करण्यासाठी नाशिक जिल्ह्यात हरसूल येथे राहिले. सुरूवातीच्या काळात आवारे गुरूजींचे मार्गदर्शन त्यांना लाभले. दिवसभर या भागातील पाड्यावरची वनवासी मुले आपल्या कामात असतात. संध्याकाळच्या वेळेत या मुलांना शिकवायला जावे लागते. सर्व वयोगटातील मुलांना गोळा करून त्यांचे खेळ ते घेतात. गाणी, गोष्टी सांगतात. नंतर मुलांना लिहायला, वाचायला शिकवितात. गोष्टींच्या माध्यमातून इतिहास, भूगोल, शास्त्र शिकविले जाते. परीक्षा नसते. कोणी विशेष शिकेल असे वाटले तर त्याला जवळच्या वनवासी विद्यार्थी वसतीगृहात पाठविले जाते. बाकीच्या मुलांना निदान लिहायला, वाचायला येते. सही करता येते. सावकार किंवा बँकेचे व्यवहार करता येतात. सुरूवातीला सदुभाऊंच्या कार्याला गावातील काही लोकांनी त्रास दिला. पण त्या विरोधाला न जुमानता सदुभाऊ व त्यांच्या बरोबरीचे कार्यक्रम नेटाने काम करीत राहिले. एकल विद्यालयातर्फे सर्व पालकांची अशी ग्रामसमिती तयार केली. त्या द्वारे मुलांच्या अभ्यासावर लक्ष ठेवण्याबरोबरच, गावातील सर्व सण उत्सव 'गावाचे' म्हणून साजरे केले जातात. गावात उत्सव असला की लोक दारू पित नाहीत. नाहीतर दारू व वनवासी बांधवांचे जन्मजात नाते ! पण धार्मिक संस्कारामुळे, दारू बंद होते. गावात आरोग्य योजनाही राबविली. त्यांनी वनवासी बंधू आवारे गुरूजींकडून औषधांची माहिती करून घेतली. रुग्णाला जुजबी, तातडीचे उपचार करून नंतर तालुक्याच्या दवाखान्यात भरती करता येऊ शकते.

याच बरोबर वनवासी बांधवांना, मुलांना जंगलात मिळणाऱ्या आवळा, मध, हिरडा, बेहडा तसेच अनेक फळे व कंद हे गोळा करुन त्याला बाजारपेठ उपलब्ध करून दिली. नाशिक जिल्ह्यातील, पेठ, सुरगाणा व त्र्यंबक तसेच पुणे जिल्ह्यातील आंबेगाव तालुका येथे एकल विद्यालयांची संकुले कार्यरत आहेत. ही संकुले सुरू करण्यातही सदुभाऊ कुलकर्णी यांचा मोलाचा वाटा आहे.

– शरद कुंटे

## केतकर, विष्णू गंगाधर

***दादासाहेब केतकर***

**शिक्षक, सामाजिक कार्यकर्ते**

**९ एप्रिल १८८७ – १६ ऑक्टोबर १९५०**

राष्ट्रीय शिक्षणाचे पुरस्कर्ते विष्णू गंगाधर ऊर्फ दादासाहेब केतकर यांचा जन्म मुंबईमधील फणसवाडी चाळीत झाला. दादा दोन वर्षांचे असताना त्यांचे वडील वारले. दादांचे थोरले बंधू माधुकरी मागत. त्यावर त्यांचा उदरनिर्वाह चाले. प्राथमिक शिक्षणानंतर मुंबईतील प्रभू सेमिनरी शाळा, रॉबर्टमनी विद्यालय व विल्सन हायस्कूल येथे त्यांचे इंग्रजी पाचवीपर्यंतचे शिक्षण झाले. वडील बंधूंना पुण्यात नोकरी मिळाली. दादा त्यांच्याबरोबर पुण्यात आले. पुण्यातील न्यू इंग्लिश स्कूलमध्ये त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाले.



राष्ट्रीय बाण्यामुळे त्यांनी इंग्रज सरकारची नोकरी न करता स्वतंत्रपणे सामाजिक कार्य करता त्यागपूर्वक जीवन देशकारणी लावायचे असा निर्धार केला. त्यानंतर दादांना १९०६ मध्ये लोकमान्य टिळकांचे शिष्य म्हणजेच दादासाहेब खापर्डे यांच्याकडून मार्गदर्शन मिळाले. विदर्भातील वास्तव्यात दादांच्या आयुष्याला नवी दिशा लाभली. त्या काळात सरकार विरुद्ध प्रजा असा संघर्ष सुरू होता. वंगभंगाच्या चळवळीतून राष्ट्रीय शिक्षण देणारी विद्यालये व मोठमोठ्या पाठशाळा निर्माण झाल्या. या स्वदेशीच्या वातावरणाने समाज ढवळून निघत होता. इंग्लंडहून येणाऱ्या मालाप्रमाणेच इंग्रज राज्यकर्त्यांच्या मदतीने चाललेल्या शिक्षणसंस्थांवरही बहिष्कार घातला जात होता. यातूनच महाराष्ट्रात तळेगाव व त्या वेळच्या वऱ्हाडमधील अमरावती व यवतमाळ येथे राष्ट्रीय शाळा स्थापन झाल्या. यवतमाळ येथील 'विद्यागृह' शाळेत दादा प्राथमिक शिक्षक म्हणून काम करू लागले. दर रविवारी विद्यार्थी व दादा शाळेसाठी मदत (भंडारा) जमा करीत.

राष्ट्रीय विचारांचा पुरस्कार करणाऱ्या 'हरिकिशोर' वृत्तपत्राचे मालक पृथ्वीगीर दस्तगीर ह्यांना व नंतरचे संपादक नरहर विष्णू भावे ह्यांना देशद्रोहाच्या आरोपावरून शिक्षा झाली. तेव्हा दादांनी संपादकपदाची जबाबदारी स्वीकारली. पण विद्यागृह ह्या संस्थेवर व हरिकिशोर वृत्तपत्रावर सरकार बंदी आणणार असे दिसल्यावर ती संस्था बंद करून चालक पुण्या-मुंबईला गेले.

दादा पुण्याला आले. तेथे काही दिवस त्यांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या शाळेत शिक्षक म्हणून काम केले. पण पुढे सहाच महिन्यांपूर्वी स्थापन झालेल्या पुणे अनाथ विद्यार्थीगृहात दाखल झाले. तेव्हा विद्यार्थ्यांचा राहण्याचा, दिवाबत्तीचा व भोजनाचा खर्च देणग्यांतून भागेनासा झाला असता दादा आणि त्यांचे सहकारी रा.ज. पटवर्धन माधुकरी मागत व विद्यार्थ्यांना जेवू घालीत.

संस्थेने १९१४ मध्ये ' अनाथ विद्यार्थी गृह पाठशाला' हा उपक्रम सुरू केला. संस्थेचा विस्तार चिंचवड येथे झाला. दादा पुण्याच्या संस्थेत काम पाहू लागले. १९२० च्या दरम्यान संस्थेचे माजी विद्यार्थी डॉ. ग. श्री. खैर व ना. वि. उर्फ मामा पेंडसे आजीव सदस्य झाले. डॉ. खैर व डॉ.नानासाहेब परुळेकर ह्यांनी दादांच्या समवेत महाराष्ट्र विद्यालय सुरू केले. त्याला औद्योगिक शिक्षणाची जोड दिली. संस्थेचा विस्तार व्हावा म्हणून चाललेल्या दादांच्या प्रयत्नांतून देणग्या मिळत गेल्या. संस्थेची आर्थिक स्थिती सुधारण्यासाठी संस्थेचा छापखाना असावा अशी दादांची इच्छा होती. याच सुमारास म्हणजे १९२९ मध्ये शं. रा. तथा मामा दाते त्यांच्या लोकसंग्रह छापखान्यासह संस्थेत आले. शालोपयोगी व इतर पुस्तकांचे प्रकाशन सुरू झाले. संस्थेला फायदा होऊ लागला. अनेक सुबक वळणाचे टाईप तयार होऊ लागले. महात्मा गांधी यांच्या हत्येनंतर उसळलेल्या दंग्यात हा छापखाना आगीच्या भक्ष्यस्थानी पडला. दादांनी मोठ्या हिमतीने तो परत उभा केला.

१९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीचा फायदा घेऊन संस्थेने विद्यार्थ्यांच्या मनावर राष्ट्रीय जागृतीचे संस्कार केले. दादांनीही पुनःपुन्हा अनेक उपक्रमांच्या माध्यमातून राष्ट्रीय शिक्षणाचा संस्कार अधिकाधिक दृढ केला. संस्थेच्या वाटचालीत चढ-उतार येत गेले. पण दादांनी अतिशय दूरदर्शीपणाने तिचा विकास घडवून आणला. दादा म्हणजे अनाथ विद्यार्थी गृह व अनाथ विद्यार्थी गृह म्हणजे दादा असे समीकरण तयार व्हावे इतके दादा संस्थेशी एकरूप झाले. पुढे १९७७ मध्ये मुंबईत घाटकोपर येथे संस्थेने आपली शाखा सुरू केली. १९७८ मध्ये मुद्रणशिक्षण, मुक्तांगण इंग्लिश शाळा, बालरंजन केंद्र, वृद्धाश्रम - शतायुभवन, तळेगाव येथे चौथी शाखा, क्रीडा संकुल, नव्या मुंबईत संकुल, उच्च शिक्षणासाठी सहा महाविद्यालये असा विस्तार झाला.

– मल्हार अरणकल्ले

**संदर्भ :**

१. *गांगल बा. दा. ; कुलगुरू कै. दादा केतकर चरित्र, पुणे विद्यार्थी गृह प्रकाशन.*

## केवलानंद सरस्वती

☞ **मुख्य नोंद – धर्मकारण खंड**

## केळुस्कर, कृष्णराव अर्जुन

☞ **मुख्य नोंद– पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## कोपरकर, गंगाधर नारायण

**कीर्तनकार, लेखक**

**२१ ऑक्टोबर १९२० – २३ एप्रिल २००१**



गंगाधर नारायण कोपरकर यांचा जन्म भिवंडी येथे झाला. नारायण आणि सरस्वती यांचा हा जेष्ठ पुत्र. वडील भिवंडी येथील दत्तमंदिराचे पुजारी. आत्यंतिक गरिबी. पण पुढे शिकण्याची जबरदस्त इच्छा होती. ७ वी झाल्यानंतर ते पुण्यात आले. ते एक नामवंत गायक होण्यासाठी. पुण्याच्या पत्र्यामारूतीच्या मंदिरात राहून १० घरी माधुकरी मागून त्यांनी गांधर्व महाविद्यालयात प्रवेश मिळविला. पण फी चे पैसे त्यांच्याकडे देण्यास नव्हते म्हणून शेण आणून महाविद्यालयातील जमीन दर आठ दिवसाला सारवून फी चे ३ रु. महिना त्यांनी भरून दिले. संगीत विशारदपर्यंत संगीताचे शिक्षण घेऊन ख्याल गायकीपर्यंत संगीतविद्या आत्मसात केली. नंतर प्रसिद्ध कीर्तनकार भिलवडीकर शास्त्री यांच्या घरी राहून कीर्तन, संस्कृत व वेदांत तत्त्वज्ञान यांचा अभ्यास केला. तसेच हरि कीर्तनोत्तेजक पाठशाळा येथेही कीर्तनाचे शिक्षण घेऊन कीर्तनाचा सखोल अभ्यास करून ‘कीर्तनशलाका’ ही पदवी प्राप्त करून ते प्रसिद्ध कीर्तनकार बनले. आजपर्यंतच्या क्षणापर्यंत ‘कीर्तनशलाका’ ही पदवी मिळविणारे ते एकमेक कीर्तनकार आहेत.

याच कालावधीत त्यांनी एक वर्षात ३ इंग्रजी इयत्ता करुन मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण करुन बी.ए. ऑनर्सपर्यंत महाविद्यालयाचे शिक्षण त्यांनी पूर्ण केले. प्रपंच चालविण्यासाठी गुजराथी हायस्कूलमध्ये संस्कृत शिक्षक म्हणून नोकरी केली. त्यासाठी त्यांनी संस्कृतची ‘काव्यतीर्थ’ ही परीक्षा दिली. या गुजराथी हायस्कूलमध्ये नोकरी करतानाच गुजराथी भाषा आत्मसात केली. नोकरी सोडताना त्यांनी मराठी, इंग्रजी, हिंदी, संस्कृत व गुजराथी भाषा बोलता येत होत्या.

त्यानंतर त्यांनी कीर्तनक्षेत्रात पदार्पण केले. हिंदू धर्माचे जनजागरण करण्यासाठी प.पू. करपात्रीजी महाराजांनी स्थापन केलेल्या रामराज्य परिषदेमध्ये सक्रीय झाले. महाराष्ट्र प्रांतिकचे प्रमुख पद स्वीकारुन महाराष्ट्रात त्यांनी धडाक्याने प्रचार कार्य केले. त्यांनी सुद्धा मुंबईमधून निवडणूक लढविली. याचकाळात जगद्गुरू शंकराचार्यांचे प्रतिनिधी म्हणून पुढे येऊन भारताच्या १३२ कलमी घटनेवर योग्य तेथे आक्षेप घेऊन काही कलमात बदल घडवून आणला. या कामी त्यांची अभ्यासू वृत्ती कामास आली.

कीर्तनकार हे समाजाचे प्रबोधन करणारे शिक्षक आहेत. त्या दृष्टिने त्यांनी प्रत्येक विषयाचा सखोल अभ्यास करुन आज आपण श्रोत्यांना काय देणार आहोत? कोणते विचार त्यांच्या गळी उतरविणार आहोत? याची तयारी आपल्याजवळ पक्की हवी, असा त्यांचा आग्रह होता. पूर्वरंग बांधलेला व पक्का हवा, त्यामध्ये विषयांतर नसावे अशी त्यांची कीर्तनाविषयी आग्रही भूमिका होती. असे कीर्तनकार तयार करण्यासाठी सर्वप्रथम दै. सकाळचे संस्थापक संपादक कै. नानासाहेब परुळेकर यांनी ‘हरि कीर्तनोत्तेजक सभा पुणे’ या संस्थेच्या माध्यमातून मे महिन्यात वासंतिक वर्ग सुरु केले. तेव्हा पाठ्यपुस्तकाशिवाय शिकविणे योग्य नाही. म्हणून भक्तितत्त्वनिरुपण हे ग. ना. कोपरकरांनी पूर्वरंगाचे व काही टाचणासहीत पुस्तक लिहिले. ते हरिकीर्तनोत्तेजक सभेने प्रकाशित केले आहे. त्यामध्ये कीर्तनाचा आत्मा असणारा भक्ति हा विषय परिपूर्ण दिलेला आहे.

कीर्तनाद्वारा प्रचारकार्य चालू असतानाच त्यांनी कीर्तनकारांची संघटना करण्याचा प्रयत्न केला आणि त्यासाठी पहिले कीर्तनसंमेलन गोवा राज्यात १९७६ मध्ये झाले. तिथेच कीर्तन महाविद्यालयाची घोषणा झाली व

१९७७ पुण्यात कीर्तन महाविद्यालय सुरु झाले. त्यानंतर हिवरे (बुलढाणा), नाशिक, जळगाव, मुंबई, डोंबिवली येथे संमेलने झाली. याच काळात दरवर्षी महाराष्ट्र शासनातर्फेही कीर्तन संमेलन भरविण्याचा प्रघात त्यांनी सुरु केला. कीर्तन महाविद्यालयाच्या अभ्यासक्रमाची रुपरेषा ठरल्यानंतर बी.ए. च्या डिग्रीनंतर ३ वर्षाच्या अभ्यासक्रमासाठी धर्मतत्त्व निरुपण, नामतत्त्व, खिशातील कीर्तनशिक्षक, कीर्तन अध्यापन, कीर्तनाची प्रयोग प्रक्रिया अशी उपयुक्त पुस्तके लिहून ती अभ्यासक्रमात लावली. या महाविद्यालयात ३/३ वर्षाच्या २ बॅचेस शिकून, बाहेर पडल्या. त्या परिपूर्णतेने त्यांना उत्तीर्ण झाल्यानंतर ‘कीर्तनाचार्य’ ही पदवी मिळाली. आज महाराष्ट्रात जे प्रथितयश कीर्तनकार नाव मिळवून आहेत त्यामध्ये त्यांच्याकडे शिकलेले व महाविद्यालयात शिकलेल्या कीर्तनकारांची नावे अग्रक्रमाने घेता येतील ती अशी– सु. ग. शेवडे, न. चिं. अपामार्जने, उद्धवबुवा जावडेकर, आप्पा कुलकर्णी, भरतबुवा रामदासी, मनोहरबुवा दीक्षित, सुधाताई धामणकर.

याच उपक्रमाबरोबर परदेशात कीर्तनकार पाठविण्याची योजना आखून १२ कीर्तनकार परदेशी पाठवून अमेरिका, इंग्लंड, आफ्रिका देशात कीर्तनाद्वारा धर्मपताका फडकाविली. हा एक नवीन विक्रम करताना कीर्तनकारांना हिंदी, इंग्रजी, गुजराथीमधून कीर्तने तयार करुन कीर्तने त्यांनी बसवून घेतली. कीर्तनकार कसा असावा याविषयी त्यांची काही मते होती. कीर्तनकार पदवीधर असावा, त्याला कमीत कमी संस्कृत, हिंदी, इंग्रजी भाषा यायलाच पाहिजेत व या भाषेतील वचनांचा त्यांनी मराठी बरोबर उपयोग करावा. पाश्चात्यांचे दाखले दिल्याने, आपले बोलणे वजनदार होते. आपल्या धर्मतत्त्वज्ञानाचा सिद्धांत मांडताना तो आजच्या विज्ञानाशी घासूनपुसून मांडला पाहिजे हे सांगताना ते स्वतः त्यांच्या कीर्तनात असे सिद्धांत मांडत असत. कीर्तनात आपली भाषा शुद्ध व स्पष्ट हवी. पूर्वरंग वजनदार हवा व तो मांडताना धर्मतत्त्वज्ञानाची कास सोडता कामा नये तर उत्तररंग रसपरिपूर्ण हवा. तो श्रोत्यांच्या हृदयाला जाऊन भिडला पाहिजे. कीर्तनकाराला कोणताही विषय वर्ज्य नाही. त्यामुळे कीर्तनात समाजकारण, राजकारण, धर्मकारण असावे. त्या विषयांवर सखोल अभ्यास करणे गरजेचे आहे. त्यासाठी अखंड वाचन व्यासंग जोपासला पाहिजे. कीर्तन हे एकपात्री प्रयोग आहे. कीर्तनात संगीत, ताला सुराचे ज्ञान, निवेदनशैली, प्रसंगोपात्र विनोद असावेत. पण ते उच्चप्रतिचे व दर्जेदार असावेत. ही सर्व तयारी त्यांनी विद्यार्थ्यांची करून घेतली होती. कारण या सर्व विषयामध्ये ते पारंगत होते. समाज प्रबोधनाचे कार्य करीत असताना त्यांनी नवनवीन प्रयोगही केले.

१००० चटई कीर्तनाचा संकल्प सोडून तो पुरा केला. प्रत्येक घरात जाऊन आपलीच चटई पसरून १० मिनिटे कीर्तन लोकांना ऐकवून ज्ञान देण्याचा प्रयत्न केला. कीर्तन महोत्सव साजरे करुन कीर्तनकारांना व्यासपीठ उपलब्ध करुन दिले. आजही ती परंपरा चालू आहे.

कीर्तनकलेला दर्जा प्राप्त करुन देण्यासाठी सरकार दरबारी मानसन्मान मिळावा यासाठी त्यांनी प्रयत्न केले. राज्यशासनाचा पुरस्कार पहिला पुरस्कार धर्मभास्कर कोपरकरांनाच मिळाला. कीर्तनकारांना स्थैर्य प्राप्त व्हावे म्हणून कीर्तनकला व तिचे महत्त्व शासनाला पटवून देऊन आज वृद्ध कीर्तनकारांना कलाकार पेन्शन मिळू लागले आहे. त्या उपक्रमासाठी ९९ पुस्तके लिहिली व काही वर्षे ‘भारतीय वाङ्‌मयमाला’ ही मासिक वार्तापत्रिका चालविली व त्याद्वारा घरी बसून हजारो घरात जनजागरण व ज्ञानदानाने समाज प्रबोधन केले. याच वार्तापत्रिकेतून वनौषधी, गोवंश महत्त्व, तुलसीमहत्त्व, ऋषीतत्त्व राजकारण विषय हाताळले व ते लोकांपर्यंत पोचविले.

वेदवाङ्मय स्मृति मनुस्मृति याज्ञवल्क्य मराठीत आणून एक अभिनव प्रयोग केला. अत्यंत अल्प किंमतीत हा संच विक्रीस उपलब्ध करुन दिला. त्यांच्या अगदी शेवटच्या काळात १९८९ मध्ये ‘तपोधाम’ हे धर्मप्रचार केंद्र त्यांनी सुरु केले. या केंद्रातर्फे कीर्तनोपयोगी, धर्मवाङ्मय छापणे तसेच ‘सदाचार आणि संस्कृती’ हे मासिक चालविले जाते. कीर्तनकार व प्रवचनकार शिबिरे भरविले जातात. तसेच ८ ते १२ वयोगटाच्या मुलामुलींसाठी १५ दिवसांची निवासी शिबीरे ही घेतली जातात. कीर्तन महोत्सव हेही

तपोधामचे एक वैशिष्ट्य आहे. ज्येष्ठ नागरिकांसाठी साधकाश्रम ही चालविला जातो. कोपरकरांचे वास्तव्य अखेरपर्यंत येथेच होते.

– सुधा धामणकर

## कोलते, विष्णू भिकाजी

☞ **मुख्य नोंद– पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## कोसंबी, धर्मानंद दामोदर

☞ **मुख्य नोंद– पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## कौंडिण्य, मधुसूदन विष्णू

**शिक्षणतज्ज्ञ, लेखक**

**१७ मार्च १९३३**



प्रा. मधुसूदन कौंडिण्य ह्यांचा जन्म एका वेदशास्त्रपारंगत घराण्यात झाला. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीशी सामना करीत त्यांनी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. पुणे विद्यापीठामधून त्यांनी अर्थशास्त्र विषयात एम. ए. केले. राष्ट्रभाषा कोविद परीक्षाही ते उत्तीर्ण झाले. शिक्षण घेत असतानाच गोखले इन्स्टिट्यूटमध्ये ते नोकरी करीत होते. धनंजयराव गाडगीळ, प्रा. वि.म. दांडेकर ह्यांच्या सहवासात त्यांची वैचारिक जडणघडण होत गेली. कौंडिण्य यांनी ही नोकरी सोडली. त्यानंतर ते वनवासींच्या सहवासात पन्नास दिवस राहिले. ह्या काळात मिळालेल्या अनुभवातून त्यांना स्वत:च्या भावी जीवनाची दिशा मिळाली.

नंतरच्या काळात अहमदनगर महाविद्यालयाचे अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून नोकरी करू लागले व विद्यार्थिप्रिय प्राध्यापक म्हणून त्यांचे नाव झाले. १९६१ मध्ये संगमनेरच्या कला आणि वाणिज्य महाविद्यालयाच्या प्राचार्यपदाची जबाबदारी त्यांनी स्वीकारली. अनेक शैक्षणिक प्रकल्प प्रत्यक्षात आणून त्यांनी संगमनेर महाविद्यालय नावारूपास आणले. त्यांची आणि गोदूताई परुळेकर ह्यांची भेट झाली. गोदूताई परूळेकरांच्या कार्याने भारावून जाऊन त्यांनी महाविद्यालयामध्ये ‘ग्रामीण विकास केंद्रा’ची स्थापना केली. शिक्षण व ग्रामीण भाग ह्यांच्यात सुसंवाद निर्माण करण्यासाठी नवीन अभ्यासक्रम तयार केला. फाऊंडेशन कोर्सेस, कन्व्हेशनल कोर्सेस, अॅप्लाइड वर्क व प्रोजेक्ट वर्क अशा अभ्यासक्रमांचे शिक्षण सुरू केले. शिक्षण क्षेत्रास साचेबंद चौकटीतून काढून प्रवाही करण्याची प्रक्रिया यांतून त्यांनी सुरू केली. वास्तवाची जाणीव निर्माण करणारे नव्या शिक्षण प्रयोगांचे केंद्र म्हणून संगमनेर महाविद्यालय ओळखले जाऊ लागले.

केंद्र सरकारने डॉ. यशपाल ह्यांच्या अध्यक्षतेखाली आठव्या पंचवार्षिक योजनेसाठी महत्त्वपूर्ण सूचना मागविण्यासाठी समिती नेमली होती. ह्या समितीत उच्च व प्रौढ शिक्षणाच्या संदर्भात कौंडिण्य यांचा समावेश करण्यात आला. दिल्लीत ज्येष्ठ विचारवंत नानाजी देशमुखांशी त्यांची भेट झाली. चित्रकूट येथे नानाजी देशमुखांनी वनवासी क्षेत्रात चालू केलेले कार्य त्यांनी पाहिले. संस्थेच्या वतीने ‘मुक्तांगण स्वायत्त ग्रामीण विद्यापीठा’ची त्यांनी स्थापना केली. मराठीतील ज्येष्ठ साहित्यिक पु. ल. देशपांडे ह्यांनी संस्थेस बारा लाख रुपयांची देणगी दिली.

‘मुक्तांगण’च्या स्थापनेमुळे ‘गाव हीच प्रयोगशाळा’ (व्हिलेज लॅबोरेटरी) ही संकल्पना प्रत्यक्षात आली. परिसरातील खेड्यांना स्वावलंबी करणारी ही संस्था म्हणजे महात्मा गांधी, साने गुरुजी, कर्मवीर भाऊराव पाटील यांच्या विचारांचे मूर्त रूप होते. त्यासाठी विद्यार्थ्यांसाठी छपाईकाम, धातु जोडकाम, छायाचित्रण, संगणक, शेती, वनीकरण, योगविद्या, ग्रंथालय अशा विद्याशाखांतील शिक्षणाची सोय केली.

येथील विद्यार्थी ‘कमवा व शिका’ या तत्त्वानुसार संस्थेच्या शेतांमध्ये काम करून पैसा मिळवितात. शिक्षण पूर्ण झाल्यावर शहरात न जाता खेड्यात जातात व स्वतंत्र व्यवसाय सुरू करतात. या योजनेत त्यांनी रामोशी, पारधी समाजातील मुलांनाही सहभागी करून घेतले. या

उपक्रमातून विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास साधला जातो. प्राध्यापकांच्या मनात सामाजिक बांधिलकीची बीजे रुजतात. या प्रयोगामुळे समाजात एक अर्थपूर्ण संदेश पोहोचला.

विधवा व परित्यक्तांसाठी महाविद्यालयाच्या आवारात 'चैतन्य मुद्रणालय' काढले. संगमनेर तालुक्यात प्रौढ शिक्षणाची चाळीस केंद्रे या योजनेच्या माध्यमातून चालवली जात आहेत. 'गाव तेथे ग्रंथालय' प्रत्यक्षात येत आहे. विद्यार्थ्यांसाठी ग्राहक संस्था आहेत. ह्या सर्व प्रकल्पांच्या यशस्वितेचे श्रेय कौंडिण्य यांचे आहे. ह्या सर्व अनुभवांचे शब्दांकन त्यांनी 'संघर्षाकडून सामंजस्याकडे' ह्या आत्मचरित्रात केले आहे. महाविद्यालय दर्शन, व्यक्तिदर्शन, तालुकादर्शन, व्यवसायदर्शन ह्या उपक्रमांतून 'दर्शन' ह्या ग्रंथाची निर्मिती झाली. प्लेटो, स्वामी विवेकानंद, रवींद्रनाथ टागोर, महात्मा गांधी ह्या विचारवंतांच्या शिक्षणविषयक विचारांचा अभ्यास करून त्यांनी शिक्षणविषयक विपुल लेखन केले आहे.

पुणे विद्यापीठ एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे सदस्य, शालान्त परीक्षा मंडळ सदस्य, पुणे विद्यापीठाच्या समाजशास्त्र विद्याशाखेचे अधिष्ठाता, कुसुमाग्रज प्रतिष्ठान व भास्करराव दुर्वे प्रतिष्ठान यांचे विश्वस्त, धनंजयराव गाडगीळ प्रतिष्ठानचे प्रवर्तक म्हणून त्यांचे बहुमोल काम आहे.

शैक्षणिक, सामाजिक क्षेत्रातील महत्त्वपूर्ण योगदानाबद्दल जी. डी. पारीख पुरस्कार, एस. व्ही. कोगेकर पारितोषिक, इंडियन मर्चंट चेंबर्स पारितोषिक, चतुरंग प्रतिष्ठान जीवन गौरव पुरस्कार अशा प्रतिष्ठेच्या मानल्या जाणाऱ्या पुरस्कारांनी मधुसूदन कौंडिण्य यांचा गौरव झाला आहे.

सेवानिवृत्तीनंतर ते पुण्यात स्थायिक झाले आहेत. पुण्यात त्यांनी 'अथश्री ग्रामीण विकास केंद्रा'ची स्थापना केली आहे. ह्या केंद्राच्या वतीने विविध विधायक प्रकल्प सुरू आहेत. असे एक कृतिशील शिक्षणतज्ज्ञ म्हणून कौंडिण्य यांचे रचनात्मक कार्य चालू आहे.

– ह. शं. भदे

## कँडी, थॉमस

**प्राचार्य, लेखक, व्यवस्थापक**

**१८०६ – १८७७**

थॉमस कँडी हा ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्यात काम करत होता. सन १८२२ मध्ये कंपनीच्या लष्करात तो भरती झाला व मुंबईस आला त्याने महाराष्ट्रातील विविध शैक्षणिक कार्यात सहभागी झाला. विशेषतः शब्दकोश, मराठी क्रमिक पुस्तकांचे लेखन, इंग्रजी पुस्तकांचे व इंग्रजी कायद्यांचे मराठीत भाषांतर, शिक्षण संस्थांचे व्यवस्थापन, शिक्षणासंबंधी नवीन उपक्रम या क्षेत्रातील कँडीचे योगदान मोठे आहे. मराठी इन टू इंग्लिश व इंग्लिश इन टू मराठी या दोन शब्दकोशांच्या निर्मितीत त्याने मोल्सवर्थ यास मदत केली. कॅप्टन कँडी हा मुळात लष्करी अधिकारी असल्याने तो फार शिस्तप्रिय होता व ही शिस्त संस्थांचे व्यवस्थापन व लेखन यामध्ये तो कसोशीने पाळे.

सन १८२१ मध्ये पुण्यातील विश्रामबागवाडा येथे महाराष्ट्रातील पहिले महाविद्यालय सुरू झाले. संस्कृत महाविद्यालय किंवा हिंदू महाविद्यालय वा पुना महाविद्यालय या नावाने त्याचा उल्लेख केला जातो. ह्या महाविद्यालयाचे सुरुवातीचे प्राचार्य राघवाचार्य ह्यांनी १८२१ – ३८ या काळात महाविद्यालयाचे प्रमुखपद भूषविले. त्यांच्या रजेच्या काळात अनंताचार्य, नारायणाचार्य, नरसिंहाचार्य इत्यादींनी कार्यभार सांभाळला. महाविद्यालयव्यवस्थेवर देखरेख ठेवण्यासाठी एक समिती होती. जिल्हाधिकारी, आयुक्त इत्यादी ब्रिटीश अधिकारी समितीचे सभासद असत. त्यांच्या इतर कामामुळे ते महाविद्यालयांच्या दैनंदिन कारभारात फारसे लक्ष घालत नसत. पण काही काळानंतर महाविद्यालयाच्या व्यवस्थापनात लक्ष घालावे असे ब्रिटीश शासनास वाटू लागले. परंतु त्यात फारसे यश मिळाले नाही. महाविद्यालयाच्या दैनंदिन कारभारात इंग्रज अधिकाऱ्यांनी लक्ष घालू नये असे महाविद्यालयातील प्राध्यापकांना वाटे. प्राध्यापक ब्रिटीश अधिकाऱ्यास वर्गात येताना त्यांनी आपली पादत्राणे बाहेर काढावीत अशा अनेक अटी घालत असत. ब्रिटीश अधिकारी वर्गाशेजारी आला वा वर्गात आला तर प्राध्यापक शिकवणे बंद करी. आपल्या धर्मग्रंथांचे

शब्द परक्यांच्या कानावर पडू नयेत याची ते काळजी घेत. काही ब्रिटीश अधिकाऱ्यांना हे फारच खटकले. आपण राज्यकर्ते असूनही महाविद्यालयातील प्राध्यापक आपल्याला मान देत नाहीत, शासनाविरोधी मत व्यक्त करतात व तसा विरोधी प्रचार करतात हे ब्रिटीश राज्यकर्त्यांच्या संतापाचे कारण होते, ब्रिटीश विरोधी वातावरण मोडून काढण्याच्या उद्देशाने ब्रिटीशांनी महाविद्यालय व्यवस्थापनात बदल केला.

संस्कृत जाणणारा कोणी ब्रिटीश नागरिक उपलब्ध नव्हता त्यामुळे महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून कोणा ब्रिटीश माणसाची नेमणूक करता येईना. तेव्हा ब्रिटीश शासनाने अधीक्षक  हे पद निर्माण केले व कॅप्टन थॉमस कँडी या लष्करी अधिकाऱ्याची त्या पदावर नेमणूक केली. (१८३८) कँडी हा शिस्तप्रिय अधिकारी होता. त्याने त्याच्याविरूद्ध कार्य करणारे प्राचार्य नारायणाचार्य व दोन प्राध्यापक यांना काढून टाकले. निमित्त झाले होते एक टेबल. शिकविताना गुरू जमिनीवरील आसनावर बसत असत व समोर विद्यार्थी बसत. कँडीला ही पद्धत गैरसोयीची वाटे म्हणून त्याने एके दिवशी टेबल खुर्ची वर्गात पाठवली. परंतु टेबल खुर्ची ही भारतीय संस्कृतीला छेद देणारी आहे म्हणून वर्गातील गुरूने टेबलखुर्ची स्वीकारण्यास नकार दिला व ती परत पाठविली. कँडीला मराठी येत होते पण संस्कृत येत नव्हते. त्याला संस्कृत शिकायची फार इच्छा होती. पण संस्कृत प्राध्यापकांचे त्यास सहकार्य मिळत नसे. कँडी वर्गात आल्यावर प्राध्यापक संस्कृत शिकवणे बंद करत. यामुळेच त्याने प्राचार्य व दोन प्राध्यापकांना निलंबित केले. त्यातील दोन प्राध्यापकांनी दिलगिरी व्यक्त केल्यावर त्यांना परत घेतले पण प्राचार्यांना परत कामावर घेतले नाहीच; शिवाय त्यांचा पगारही त्यांना दिला नाही.

कँडीने परीक्षा पद्धतीतही बदल केला. परीक्षेला सार्वजनिक स्वरूप दिले. परीक्षेच्या वेळेला विद्यार्थ्यांचे गुरू, गावातील विद्वान व युरोपियन अधिकारी हजर असत. परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्यांच्या तीन श्रेणी ठरवल्या. विद्यार्थ्यांना विद्यावेतन मिळे. पण ते काहींनाच मिळे. कँडीच्या लिखाणात अनेक विद्यार्थी भीक मागून उपजिविका करत असा उल्लेख आहे. माधुकरी मागून विद्यार्थ्याने शिक्षण पुरे करायचे अशी ब्राह्मणसमाजात पूर्वापार चालत आलेली पद्धत होती. त्याची माहिती कँडीला नसल्याने तो विद्यार्थी भिकारी असल्याचा उल्लेख कँडीच्या लिखाणात आढळतो. सर्व विद्यार्थ्यांना सुरवातीस विद्यावेतन मिळे. विद्यावेतन बंद करावे असे त्यास वाटे, पण हे पैसे दक्षिणा फंडातून दिले जात असल्याने ते बंद करता आले नाहीत. सर्वांना समान वेतन न देता ते त्रिस्तरीय पद्धतीने द्यावेत अशी त्याने योजना केली. उत्तम, माध्यम व कनिष्ट अशा तीन श्रेण्यांची योजना सुचवली. ज्यांना कनिष्टपेक्षा कमी श्रेणी मिळेल. त्यांना महाविद्यालयातून काढून टाकावे असे त्याने सुचवले.

महाविद्यालयात सुरुवातीला फक्त संस्कृत शिकवले जाई. चार वेद व इतर सहा शास्त्रे ह्यांचे शिक्षण दिले जाई. कँडीला वेदशिक्षण देणे पसंत नव्हते. वेदशिक्षक हे ब्रिटीशविरोधी आहेत असा कँडीचा समज होता. वेद शिक्षण घेतलेले ब्रिटीशांच्या नोकरीत येत नसत. त्याचप्रमाणे त्या शिक्षणाचा शासकीय कामात उपयोग नाही असे त्याचे म्हणणे होते. महाविद्यालयाचे शिक्षण पूर्ण केले तरी त्या विद्यार्थ्यांना मराठीत साधे पत्रही लिहीता येत नाही हे योग्य नाही. तरी महाविद्यालयात वेदशिक्षणाचे महत्त्व कमी करावे व त्याऐवजी मराठी विषयाचे शिक्षण द्यावे असे त्याने सुचवले. पण मराठी भाषेत पुस्तके नव्हती. तेव्हा ती पुस्तके निर्माण करण्यासाठी लेखकांना प्रोत्साहन देण्यासाठी दक्षिणा प्राईज देण्यास सुरूवात झाली. मेजर कँडी हा या दक्षिणा प्राईज समितीचा बराच काळ सभासद होता. परीक्षक म्हणून तो पुस्तके स्वतः अभ्यासत असे व त्यात सुधारणा सुचवे. अशुद्ध लिखाण त्यास पसंत नसे व पुस्तक व्याकरणदृष्ट्या शुद्ध असावे यावर त्याचा कटाक्ष होता. त्याने स्वतः मराठी व्याकरणावर पुस्तक लिहिले आहे. मराठीतील विरामचिन्हांचा जनक कँडी आहे.कँडी पूर्वकाळात स्वल्पविराम, अर्धविराम, पूर्णविराम, उद्‌गारचिन्ह, प्रश्नचिन्ह, अवतरणचिन्ह यांचा मराठी लेखनात उपयोग होत नसे. कँडीने त्याचा प्रसार केला.

कँडीने मराठी पुस्तके छापण्यासाठी महाविद्यालयात छापखाना सुरू केला. व त्यासाठी यंत्रसामग्री व कौशल्यप्राप्त

कारागीर मिळविले. वेद शिकवणे बंद झाल्यामुळे वैदिक शिक्षणावर होणारा खर्च वाचला याचा विनियोग छापखाना उभारण्यासाठी व चालवण्यासाठी करण्यात आला.

महाविद्यालयात प्राचार्य आणि अधीक्षक असे दोन अधिकारी महाविद्यालय व्यवस्थापन पहात. दोन अधिकाऱ्यांचे एकमेकाशी पटत नव्हते. विष्णुशास्त्री बापट हे प्राचार्य होते. कँडी व बापट हे दोघेही तापट व मानी होते. शास्त्रीमंडळी कँडीशी फटकून वागत व अध्यापन कार्यात त्यास सहभागी करून घेत नसत. त्यामुळे मेजर कँडीने बापटांना पदावरून हटवले व स्वतःच प्राचार्य झाला.

१८५३ ते १८५७ ह्या काळात तो प्राचार्य म्हणून कार्यरत होता. कॉलेजचा प्राचार्य व अधीक्षक ह्याच्या पगारातही फरक असे. कँडीला जास्त पगार होता (रू. १२०) तर देशी प्राचार्य (रू. १००) कमी पगार होता. कँडी हा परदेशी होता. पण त्याचा पगारही दक्षिणा फंडातून देण्यात येई. याला समाजातून विरोध होता.

पेशवाईच्या काळात विश्रामबागवाड्यात व्यासपुजा, होळी, गणेशचतुर्थी, संक्रांत व दिवाळी हे सण साजरे होत. पेशवाईचा अंत झाल्यावर विश्रामबागवाड्यात संस्कृत महाविद्यालय सुरू झाले. त्यामुळे वाड्यात चालू असलेले हिंदू सण पुढेही चालू राहिले. सुरूवातीच्या काळात लोकक्षोभ होऊ नये म्हणून ते जरूरीचेही होते. पुना कॉलेजात म्हणजेच, सरकारी संस्थेत, हिंदू सण साजरे व्हावेत हे ब्रिटीश मंडळींना खटकत होते.

कँडी सन १८५७ मध्ये पुना कॉलेजचा प्राचार्य म्हणून निवृत्त झाला व तो इंग्लंडला जाऊन स्थायिक झाला. मराठी भाषेवर प्रेम करणारा, मराठी-इंग्रजी कोशकार, मराठी पुस्तकांना उत्तेजन देणारा, कायद्याची पुस्तके मराठीत भाषांतर करणारा, मराठी व्याकरणावर पुस्तक लिहिणारा, मराठीत विरामचिन्हांचा प्रसार करणारा, एक शिस्तप्रिय शिक्षण व्यवस्थापक म्हणून मराठी माणसाला त्याची नेहमीच आठवण राहील.

– डॉ. नीळकंठ बापट

* * *

# ख

## खरे, वामन केशव
**शिक्षक**
**१ जून १९०५ - १३ सप्टेंबर १९५२**



वामन केशव खरे ह्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण नाशिकला झाले. नाशिक विद्यालयामधून ते मॅट्रिक झाले. त्यावेळी त्यांनी संस्कृतची जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती मिळविली. पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयातून त्यांनी संस्कृत विषय घेऊन बी. ए. पदवी पहिल्या वर्गात मिळविली. आय. सी. एस. परीक्षेची त्यांची तयारी सुरू होती. पण त्यांच्या वडिलांचे निधन झाले आणि कुटुंबाची व वडिलांच्या आर्यवैभव छापखान्याची जबाबदारी त्यांच्यावर आली. त्यांनी शिक्षकाचा पेशा स्वीकारला. बी. टी. ची परीक्षाही ते पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. प्रारंभीची दोन-तीन वर्षे पुणे येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्ये त्यांनी शिक्षक म्हणून काम केले. त्यानंतर ते नाशिकला आले व १९३० ते १९४२ अशी बारा वर्षे ते नाशिकच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये म्हणजे आजच्या ज्यु. स. रूंग्टा विद्यालयात अध्यापक म्हणून नोकरीत होते. १९४२ पासून नाशिक एज्युकेशन सोसायटीच्या पेठे विद्यालय, शारदा मंदिर म्हणजे आजचे मा. रा. सारडा कन्या विद्यामंदिर व लासलगाव इंग्लिश शाळेमध्ये त्यांनी शिक्षक म्हणून काम केले. ते अत्यंत तल्लख बुद्धिमत्तेचे शिक्षक होते. इंग्रजी व संस्कृत ह्या विषयांचा त्यांचा गाढा व्यासंग होता. दोन्ही विषयांचे अत्यंत रसवत्तापूर्ण अध्यापन ते करीत. म्हणूनच ख्यातनाम शिक्षक म्हणून त्यांची कीर्ती महाराष्ट्रभर पसरलेली होती. ते प्रभावी वक्तेही होते.

नाशिक एज्युकेशन सोसायटीचे कर्तबगार आजीव सदस्य म्हणून संस्थेला प्रगतिपथावर नेण्यासाठी त्यांनी अथक प्रयत्न केले. पेठे विद्यालयाच्या इमारतीच्या उभारणीत त्यांचा मोठा पुढाकार होता. त्यासाठी देणग्या मिळवणे, कर्ज उभे करणे यासारखी मोठी कामे त्यांनी केली. आर्यवैभव छापखान्यामध्ये पुस्तकांची कामे होत नव्हती. पण आपल्या धाकट्या भावाचे सन्मित्र म्हणून कुसुमाग्रजांचा 'जीवनलहरी' हा पहिला छोटा काव्यसंग्रह त्यांनी हौसेने छापला. सामाजिक व सांस्कृतिक कार्यात त्यांना मोठा रस होता. महाराष्ट्र नाट्य मंडळ- नाशिक, महाराष्ट्र साहित्य परिषद नाशिक शाखा, लोकहितवादी मंडळ नाशिक ह्या संस्थांच्या कार्यात त्यांचा सक्रिय सहभाग होता.

१९४२ मध्ये आचार्य अत्रे ह्यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेले सत्ताविसावे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन यशस्वी करण्यात त्यांचे सहकार्य मोलाचे होते. पेठे विद्यालयाचे मुख्याध्यापकपद त्यांनी स्वीकारावे असा सहकाऱ्यांचा आग्रह त्यांनी अनेक वर्षे दूर सारला होता. पण शेवटी सर्वांच्या आग्रहास्तव मुख्याध्यापकपद स्वीकारले. मात्र दीड वर्षातच त्यांचे निधन झाले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## खर्डेकर, बाळासाहेब हनुमंत
**प्राचार्य, संस्थापक**
**१ ऑगस्ट १९०३ - २६ डिसेंबर १९६३**

बॅरिस्टर बाळासाहेब खर्डेकर यांचा जन्म कोल्हापुरातील प्रसिद्ध सरलष्कर कुटुंबात झाला. त्यांचे शालेय शिक्षण

बंगळुरू येथील पब्लिक स्कूलमध्ये झाले. महाविद्यालयीन शिक्षण पुण्याचे डेक्कन महाविद्यालय व मुंबईचे एलफिन्स्टन महाविद्यालय येथे झाले. दोन्ही ठिकाणी त्यांना रॉलीन्स व पि. ई. ए. वुडहाऊस यांचे मार्गदर्शन मिळाले. १९३२ मध्ये बाळासाहेबांनी केंब्रिज विद्यापीठात प्रवेश घेतला. तेथून बी.ए. पदवी मिळविल्यानंतर 'लिंकन्स इन' मधून ते बॅरिस्टर झाले. त्यावेळी इंग्रजी व कायदा ह्या दोन विषयात त्यांनी ट्रायपॉस मिळविला. या काळात परदेशातील वातावरण, शिक्षणप्रणाली, विचारधारा ह्यांचा मोठा प्रभाव बाळासाहेबांवर पडला.

१९३७ मध्ये भारतात परत आल्यानंतर त्यांचा पिंड शिक्षकाचा असल्याने वकिलीचा व्यवसाय न करता शिक्षणक्षेत्रात कार्य करावयाचे ठरविले. त्यानुसार कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयाच्या प्राचार्यपदाची जबाबदारी त्यांनी स्वीकारली. विद्यार्थ्यांना सर्व प्रकारे साहाय्य करणारे, सहकाऱ्यांबद्दल प्रेम असणारे, शिक्षकांच्या संशोधनवृत्तीला चालना देणारे कर्तव्यतत्पर प्राचार्य म्हणून बाळासाहेबांनी चांगला नावलौकिक मिळविला. १९४२ च्या 'चले जाव' चळवळीच्या काळात त्यांनी सर्व परिस्थिती मोठ्या कौशल्याने हाताळली, तसेच महाविद्यालयामधील व्यवस्था व स्वायत्तता सांभाळली.

बाळासाहेबांचा निम्मा अधिक पगार विद्यार्थ्यांच्या मदतीसाठीच खर्च होत असे. त्यांनी विद्यार्थ्यांसाठी समृद्ध ग्रंथालय, स्वतंत्र अभ्यासिका उपलब्ध करून दिली. आज विद्यापीठांतून, महाविद्यालयांतून राबविली जाणारी 'अभ्यासिका' ही संकल्पना त्यांचीच देणगी आहे. याच काळात कोल्हापूर संस्थानातील प्राथमिक शिक्षकांनी त्यांच्या न्याय हक्कांसाठी सुरू केलेल्या चळवळीचे नेतृत्व बाळासाहेबांनी केले व शिक्षकांना त्यांचे हक्क मिळवून दिले. त्यासाठी राजाराम महाविद्यालयाच्या प्राचार्यपदाचा राजीनामा अगदी सहजतेने दिला.

राजाराम महाविद्यालयाच्या जबाबदारीतून मुक्त झाल्यावर त्यांनी 'शिक्षण प्रसारक मंडळ' ही संस्था काढली. शिक्षण हा गोरगरिबांच्या मुलांचा घटनात्मक हक्क आहे ह्या भावनेतून शिक्षण प्रसारक मंडळाने १९४७ मध्ये कागल येथे माध्यमिक विद्यालय सुरू केले. विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासासाठी विविध शैक्षणिक उपक्रम राबविले. ह्या मंडळामार्फत १९६३ मध्ये दोनशे पन्नास प्राथमिक व तेरा माध्यमिक शाळा आणि दोन महाविद्यालये चालविली जात होती.

१९५० मध्ये कागल येथे महाविद्यालय सुरू करून केंब्रिज विद्यापीठातील शिक्षणासारखे शिक्षण खेड्यांतील मुलांना मिळावे यासाठी त्यांनी प्रयत्न केले. ना. गोपाळ कृष्ण गोखले यांचे नाव महाविद्यालयाला देऊन गोखले ह्यांचे एक चिरंतन स्मारक त्यांनी उभे केले. मात्र नंतरच्या काळात आलेल्या अडचणींमुळे हे महाविद्यालय कोल्हापूरला स्थलांतरित केले. तेथे या महाविद्यालयाचा संख्यात्मक व गुणात्मक विकास होत गेला. कोकण परिसरातील मुलांच्या बौद्धिक विकासास वाव देण्यासाठी त्यांनी अनेक अडचणींवर मात करीत तेथे एक महाविद्यालय काढले. मुलांमध्ये उच्च शिक्षणाविषयी अभिरुची निर्माण व्हावी म्हणून बाळासाहेब स्वत: व्याख्याने देत असत व विद्यार्थ्यांशी सुसंवाद साधीत असत. ह्या दोन्ही महाविद्यालयांना नावरूप प्राप्त झाल्यावर अनासक्त वृत्तीने बाळासाहेबांनी त्यांची सूत्रे प्रा. पेडणेकर यांच्याकडे सुपूर्द केली.

भारताच्या घटना समितीत कोल्हापूर संस्थानचे प्रतिनिधी म्हणून बॅरिस्टर खर्डेकरांनी उल्लेखनीय कार्य केले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांशी त्यांचे घनिष्ठ स्नेहाचे नाते निर्माण झाले. लोकसभेच्या पहिल्या सार्वत्रिक निवडणुकीत पंडित जवाहरलाल नेहरूंनंतर सर्वांत अधिक मते मिळवून लोकसभेवर निवडून जाणारा लोकप्रतिनिधी म्हणून त्यांची नोंद झाली. इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, देशातील प्रश्नांचा परिपूर्ण अभ्यास व अस्खलित वक्तृत्वामुळे बाळासाहेब खर्डेकरांची लोकसभेतील भाषणे गाजली व त्यांची एक प्रतिमा निर्माण झाली.

सामान्य माणसाला सामाजिक प्रश्नांची जाणीव व्हावी ह्यासाठी बाळासाहेबांनी 'दैनिक सुदर्शन' हे वृत्तपत्र काढून अनेक विषयांवर लेखन केले. लोकसभेतील त्यांची भाषणे

व त्यांचे विचार ह्या वृत्तपत्रातून समाजापर्यंत पोहोचले. कोल्हापूर विद्यापीठाची स्थापना व्हावी म्हणून त्यांनी केलेल्या प्रयत्नांना विशेष महत्त्व आहे. अखंडपणे ग्रंथांवर प्रेम करणाऱ्या ह्या ग्रंथमित्राचे, शिवाजी विद्यापीठाने 'बॅरिस्टर बाळासाहेब खर्डेकर ग्रंथालया'ची स्थापना करून चिरंतन स्मारक उभे केले आहे.

– डॉ. शिवलिंग मेनकुदळे

**संदर्भ :**

१. *प्राचार्य खर्डेकर स्मृतिग्रंथ*

## खेडगीकर, भीमराव भवानराव

☞ **मुख्य नोंद – बेथुजी गुरूजी**

## खेडगीकर व्यंकटेश भवानराव

☞ **मुख्य नोंद – स्वामी रामानंद तीर्थ**

## खैर, गजानन श्रीपत

**शिक्षणतज्ज्ञ, लेखक, संपादक**

**१५ जून १८९८ – २९ ऑगस्ट १९८६**



डॉ. गजानन श्रीपत तथा अण्णासाहेब खैर ह्यांचे घराणे सांगली जिल्ह्यातील वांगी गावचे. अण्णांच्या वडिलांना पोस्टात नोकरी होती. अण्णा सहा महिन्यांचे असताना वडिलांचा १८९८ च्या प्लेगच्या साथीत मृत्यू झाला. आईने काबाडकष्ट करून मुलांना वाढविले. त्यांच्या आईला पुढे बनारसला एका सधन कुटुंबात काम मिळाले त्यामुळे सर्व कुटुंब तिकडे गेले. तेथेच अण्णांचे शिक्षण सुरू झाले.

पुढे वर्षभरातच अण्णा पुण्यास आले. माधुकरीवर अण्णांनी पंधरा वर्षे काढली. १९१४ मध्ये ते पुणे अनाथ विद्यार्थी गृहात दाखल झाले. १९१६ मध्ये मॅट्रिक झाल्यावर तेव्हाच्या न्यू पूना कॉलेजमधून (आताचे सर परशुरामभाऊ महाविद्यालय) ते बी.ए. झाले. 'सकाळ'चे संस्थापक-संपादक डॉ. नानासाहेब परुळेकर अण्णांचे सहाध्यायी होते. अण्णा, डॉ. परुळेकर व कुलगुरू वि. गं. केतकर ह्यांनी १९२१ मध्ये स्वतंत्र व ध्येयवादी शिक्षणासाठी 'महाराष्ट्र विद्यालय' सुरू केले. अण्णा संस्थेचे आजीव सदस्य झाले.

१९३१ मध्ये अण्णा उच्च शिक्षणासाठी अमेरिकेत गेले. त्यांनी कोलंबिया विद्यापीठामध्ये एम.ए. केले. १९३२ मध्ये त्यांनी न्यूयॉर्क विद्यापीठाची पीएच.डी. मिळविली. ते भारतात परत आले. शिक्षणतज्ज्ञ म्हणून मोठ्या वेतनाची व मानाची जागा त्यांना सहज मिळाली असती. पण ते पुणे अनाथ विद्यार्थी गृहात दाखल झाले व पुढील पंचवीस वर्षे दरमहा पन्नास रुपये वेतन व दर वर्षी एक रुपया वाढ एवढ्या प्राप्तीवर काम करीत राहिले. निर्धनांच्या शिक्षणाचे असिधाराव्रत ते निष्कांचन स्थितीत निष्ठेने पार पाडीत राहिले.

अमेरिकेहून परततानाच त्यांनी इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स, इटली, स्वित्झर्लंड या देशांना तेथील शिक्षण पद्धतींचा अभ्यास करण्यासाठी भेट दिली होती. १९३७ मध्ये ते जपानमध्ये संपन्न झालेल्या जागतिक शिक्षण परिषदेस उपस्थित राहिले. दर्जेदार शिक्षणासाठी शिक्षकांचा दर्जाही उंचावला पाहिजे या दृष्टिकोनातून अण्णांनी शिक्षकांचे प्रश्न सोडविले. १९३९-४० मध्ये त्यांनी प्राथमिक शिक्षकांची संघटना उभारली. १९४१ मध्ये मुंबई इलाखा प्राथमिक शिक्षक परिषद झाली. अण्णा या परिषदेचे अध्यक्ष होते. शिक्षकांच्या जिल्हानिहाय व राज्यपातळीवर संघटना त्यांनी बांधल्या व त्यांना मोलाचे मार्गदर्शन केले.

१९४० ते १९४५ या काळात मुंबई विद्यापीठाच्या नियामक मंडळात त्यांनी काम केले. पुणे विद्यापीठ अधिसभा, बोर्ड ऑफ सेकंडरी एज्युकेशन, एस.एस.सी. बोर्ड, इंडियन कमिटी फॉर सेकंडरी एज्युकेशन यांचे अण्णा १९४८ ते १९६३ या काळात सदस्य होते. १९४८ मध्ये त्यांनी सरकारी क्रमिक पाठ्यपुस्तक समितीचे अध्यक्ष म्हणून काम केले. 'नवभारत वाचनमाला', 'स्वाध्यायमाला', 'प्रोग्रेस ऑफ एज्युकेशन' या मासिकांचे ते संपादक होते. सुसंस्कार व सदाचार ह्यांची शिकवण

देणाऱ्या ‘समाचार’ मासिकाचा प्रारंभ त्यांनी केला व १९४९ ते १९८५ पर्यंत सलग सदतीस वर्षे संपादनाचे काम केले. त्यातील संपादकीय म्हणजे अण्णांच्या विचारांचा आरसा असे. या संपादकीयांचे पाच भाग ‘सदाचार चिंतनी’ या नावाने प्रसिद्ध झाले आहेत. संस्कारक्षम वाङ्मयात एवढे चांगले लेखन क्वचितच आढळेल.

१९५२ ते १९५८ या सहा वर्षांसाठी अण्णांची शिक्षक मतदारसंघातून विधान परिषदेवर निवड झाली. शैक्षणिक विषयांबरोबरच अनेक सामाजिक विषयांवर अण्णांनी तेथे अभ्यासपूर्ण भाषणे केली. १९५० ते १९७० ह्या काळात अण्णा पुणे (अनाथ) विद्यार्थी गृहाचे कार्याध्यक्ष होते. ह्या काळात त्यांच्या नेतृत्वाखाली संस्थेची सर्वांगीण भराभराट झाली. या सर्व शैक्षणिक, सामाजिक कार्याबद्दल १९६० मध्ये ‘राष्ट्रीय शिक्षक पुरस्कारा’ने अण्णांचा गौरव करण्यात आला. संशोधन व अभ्यास हा अण्णांचा पिंड होता. त्यांनी लोकमान्य टिळकांच्या आणि इतर प्रकांड पंडितांच्या गीता विषयक विचारांचे वाचन आणि चिंतन केले. त्यांनी आयुष्यभर गीता जगण्याचा प्रयत्न केला. महाराष्ट्रात गीताविचारांवर शेकडो व्याख्याने त्यांनी दिली. ‘मराठी गीता आणि विवरण’, ‘गीतेतील मुख्य विचार’, ‘त्रिकाल गीता’अशा ग्रंथांची त्यातून निर्मिती झाली. निसर्गोपचाराचाही अण्णांचा अभ्यास मोठा होता. त्याचे आचरणही ते दैनंदिन जीवनात करीत असत.

अण्णांनी पुणे (अनाथ) विद्यार्थी गृहात पन्नास वर्षे सेवा केली. उल्लेखनीय बाब अशी की, १९६९ मध्ये निवृत्त होताना ग्रंथलेखन, विद्यापीठीय परीक्षा, व्याख्याने, पाठ्यपुस्तकांचे संपादन व विधान परिषदेचे सभासद म्हणून मिळालेले मानधन यातून अण्णांनी धनसंचय केला व संस्थेला पन्नास हजार रुपयांची देणगी दिली.

– मल्हार अरणकल्ले

**संदर्भ** :

१. *जोशी, ना. गो.; ‘शिक्षण महर्षी डॉ. अण्णासाहेब ऊर्फ ग. श्री. खैर चरित्र’; पुणे विद्यार्थी गृह प्रकाशन.*

२. *कोशे, डॉ. ग. श्री.; ‘सदाचार चिंतनी ’ – भाग ३ ; पुणे विद्यार्थी गृह प्रकाशन.*

* * *

ग

ग

## गडेकर, चंद्रकांत गुंडप्पा

**शिक्षक, मुख्याध्यापक**

**९ डिसेंबर १९५२**



चंद्रकांत गुंडप्पा गडेकर यांचा जन्म सोलापूर जिल्ह्यातील मार्डी येथे भटके विमुक्तातील ओतारी समाजामध्ये झाला. महाराष्ट्रामध्ये अतिशय विरळ असणारा हा ओतारी समाज. मार्डीमध्ये ओतारी समाजाची ५ ते ६ घरे आहेत. वडील गुंडप्पा गडेकर हे कपडे शिवत असत. चंद्रकांत गडेकर यांना ४ भाऊ व एक बहीण होती. त्यांचे माध्यमिक शिक्षण मार्डीतच झाले. घरची परिस्थिती हलाखीची होती, तरीही वडिलांनी मोठ्या जिद्दीने मुलांना शिक्षण दिले. पुढे बी. ए., बी. एड. होऊन मार्डीमध्येच महात्मा फुले माध्यमिक विद्यालयामध्ये शिक्षक म्हणून सेवेत रुजू झाले. आज त्याच माध्यमिक विद्यालयामध्ये मुख्याध्यापक म्हणून गडेकर काम पाहत आहेत.

लहानपणी त्यांचा राष्ट्रीय स्वयंसेवक संघाशी संबंध आला. मॅट्रिकला असताना मार्डीहून सोलापूरला १५ कि.मी. पायी प्रवास करून शिक्षण घेतले. सोलापूरचे बापुराव सारोळकर यांनी त्यांना संघ कार्यालयात राहून शिक्षण घेण्यास सुचविले. मग ते संघ कार्यालयात राहून शिक्षण घेऊ लागले. पदवीनंतर त्यांनी मराठवाड्यात धाराशिव, लातूर परिसरात काही काळ प्रचारक म्हणून काम केले. सामाजिक समरसता मंच या संस्थेच्याही जबाबदाऱ्या पार पाडल्या. त्यांचे खरे कार्य सुरू झाले ते भटके-विमुक्त विकास प्रतिष्ठान या संस्थेच्या स्थापनेनंतर भटके-विमुक्त तसेच समाजातील उपेक्षित, वंचित, दुबळ्या घटकांच्या शैक्षणिक व सर्व प्रकारच्या उन्नतीसाठी भटके-विमुक्त विकास प्रतिष्ठानाची स्थापना झाली. सोलापूर, धाराशिव व लातूर परिसरात भटक्यांची दयनीय स्थिती होती.

सोलापूरला १९९२ मध्ये पारधी समाजाचा पहिला मेळावा यशस्वीरित्या संपन्न झाला. पारधी समाजाच्या भयाण व विषण्ण स्थितीचे दर्शन मेळाव्याच्या निमित्ताने झाले. घरदार नाही, समाजमान्यता नाही, शिक्षणाचा तर पत्ताच नाही. शिकार करणे, शेतीची राखण करणे, पोटासाठी छोट्यामोठ्या चोऱ्या करणे हाच धंदा. पोलिसांच्या ससेमिऱ्याला तोंड देत जीवन जगणारा हा समाज. एकेकाळी इंग्रज राजवटीशी लढा देणारा हा समाज. स्वातंत्र्यानंतर चोर, दरोडेखोर म्हणून अतिशय वाईट जीवन नशिबी आलेल्या समाजाकरिता काहीतरी करावे असे कार्यकर्त्यांनी ठरविले. भटके- विमुक्त व पारधी समाजाच्या उन्नतीकरीता, शिक्षणाकरिता रामचंद्र चाटुफळे यांनी दिलेल्या १८ एकर जमिनीवरती यमगरवाडी येथे १९९३ मध्ये वसतिगृह सुरू झाले. पारधी समाजाची २४ मुले वसतिगृहात राहू लागली. शाळा माहिती नसणारी मुले शाळेत जाऊ लागले. मुलांवर चांगले संस्कार होऊ लागले.

आज या वसतिगृहात १३० मुली व २४५ मुले असे ३७५ विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. १० वी, १२ वी उत्तीर्ण होऊन अनेक मुले बाहेर पडली आहेत.

चंद्रकांत गडेकर हे वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती आर्थिक विकास महामंडळ, मुंबई या संस्थेचे संचालक होते. त्यांनी सामाजिक व सांस्कृतिक आंदोलनात सक्रिय सहभाग घेऊन प्रसंगी तुरूंगवाससुद्धा भोगला आहे. तसेच त्यांनी पारधी, मसणजोगी, नाथजोगी, मेंढगी जोशी,

नंदीवाले, टकारी, लमाण, ओतारी, शिकलकरी, गोपाळ, मरीआईवाले, कटाबु, हेळवे, गोंधळी, वासुदेव, बहुरूपी, कोल्हाटी, वडार, कैकाडी, पाथरवट, पांगुळ आदी विविध भटक्या-विमुक्त जातींमध्ये संघटनात्मक व आंदोलनात्मक स्वरूपाचे कार्य केले. मगरसांगवी, संयद वरवड, पारधी प्रथमवसन, मरीआईवाले, गोपाळ, मेंढगी जोशी, अजनूज (वाल्मिकी वसतिगृह), कोल्हाटी समाज (भारतमाता वसतिगृह), नाथजोगी, हिंगोली, शिकलकरी, वडवनी या प्रकल्पांमध्ये त्यांनी सक्रिय भाग घेऊन त्या प्रकल्पांस मार्गदर्शनही केले. सोलापूर येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर मागासवर्गीय वसतिगृहाचे ते ट्रस्टीही होते. गडेकर यांना आदर्श शिक्षक पुरस्काराने सन्मानित करण्यात आले आहे. 'भट्टी ओताऱ्याची' हे आत्मकथनही त्यांनी लिहिले आहे.

– विठ्ठल म्हेत्रे

**संदर्भ:**

१. *गडेकर चंद्रकांत; 'भट्टी ओताऱ्याची', साप्ताहिक विवेक; मुंबई २००४.*

## गाडे, वसंत विठ्ठल
**संघटक, संस्थापक**
**२७ जानेवारी १९२७**



वसंत विठ्ठल गाडे यांचा जन्म चंद्रपूर येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण नागपूरला झाले. शाळेत असताना भारत व्यायामशाळेशी त्यांचा संपर्क आला. राष्ट्रीय संस्कार देणारी ही संस्था तरुण वसंतरावांच्या संघटनकौशल्याने एक आघाडीची संस्था बनली. त्यांनी बी. ए. पदवी नंतर प्राप्त केली.

पोस्टल अकाउंट्स खात्यात सात वर्षे नोकरी केली. पण मन तेथे रमत नव्हते. पगाराची बहुतांश रक्कम समाजकार्यात, विशेषत: गरीब मुलांच्या शिक्षणासाठी खर्च होत असे. अविवाहित राहून समाजकार्याला वाहून घेण्याचा त्यांचा निश्चय पक्का होत होता. त्यांनी 'सेवा समाज' नावाची संस्था स्थापन करून तिच्यामार्फत श्रमदान, अभ्यासवर्ग, ग्रंथालय अशा नाना उपक्रमांच्या माध्यमातून तरुणांना संघटित करणे सुरू होते. 'सेवा समाज' ने अनेकांच्या जीवनाला दिशा दिली.

केवळ स्थानिक कार्यात त्यांचे मन रमले नाही. विनोबाजींच्या नेतृत्वाखाली भूदान आंदोलन त्या काळी देशभर पसरत होते. त्यांच्या क्रांतिकारी सभांनी वसंतरावांना आकर्षित केले. शेवटी १९५६ मध्ये नोकरी सोडून त्यांनी भूदान-यज्ञात उडी घेतली. लोकआधारावर जगण्याचा संकल्प केला आणि नाना संकटांना तोंड देऊन पार पाडला. नागपूर जिल्हा पदयात्रा व अन्य कार्यक्रमांनी ढवळून काढला. नागपूर जिल्हा सर्वोदय मंडळ स्थापन झाल्यावर सात वर्षे (१९५८-६५) त्याच्या अध्यक्षपदाची जबाबदारी सांभाळली. १९६५ मध्ये विनोबांची नागपूरला अभूतपूर्व सभा झाली. वसंतरावांच्या संघटनकौशल्याची ती पावती होती. नागपूर जिल्ह्यात सहा हजार एकराहून जास्त भूदान प्राप्त झाले. यात वसंतरावांचा सिंहाचा वाटा होता. नागपूर जिल्ह्यात अनेक खेड्यांचे ग्रामदान करण्यासाठी व ग्रामदानाचा संकल्प केलेल्या गावांत नवनिर्माणाचे काम सुरू करण्यासाठी त्यांनी अविश्रांत धडपड केली.

भूदान-ग्रामदान आंदोलन १९६९ नंतर कुंठित झाले, तेव्हा वसंतरावांनी क्रियाशील जीवनातून बाजूला होऊन अध्ययन चिंतन केले. पुन्हा लोकांमध्ये जाऊन शुभ प्रेरणा जागवण्यासाठी गीताई-प्रचाराचे माध्यम त्यांनी निवडले. २ ऑक्टोबर १९७२ रोजी नागपूरहून गीताई-प्रचार पदयात्रा त्यांनी सुरू केली. चौदा वर्षे चाललेली ही पदयात्रा २८००० कि.मी. ची झाली. संपूर्ण महाराष्ट्राखेरीज महाराष्ट्राच्या सीमा भागातही गेली. ३००० गावात पडाव व ८००० प्रवचने झाली. विनोबाजींच्या 'गीताई' च्या सुमारे एक लाख व 'गीता प्रवचने'च्या २५००० प्रतींखेरीज दीड लाखांवर रु. चे संतसाहित्य लोकांमध्ये पोचले. पण त्याहून मुख्य गोष्ट म्हणजे नाना अनुभव आले. जागोजागी सज्जनांशी संपर्क आला. जनमानसाचे दर्शन झाले.

१९८६ मध्ये वसंतराव नागपूरला आले तेव्हा 'गाडे गुरुजी' झाले होते. पदयात्रेदरम्यान या लोकशिक्षकाला 'गुरूजी' हे बिरूद चिकटले होते. पदयात्रेतील अनुभवांनी मुलांवर बालवयापासून संस्कार होण्याची गरज तीव्रतेने जाणवत होती. खेडोपाडी पसरलेल्या शिक्षकांमधील सद्भावनावान व उत्साही व्यक्ती परिचयाच्या झाल्या होत्या. त्यांना जोडून गावोगाव संस्कार केंद्रे उभारण्याचा गुरुजींनी संकल्प केला. नागपूर व यवतमाळ जिल्ह्यांतील गावे पिंजून काढली. सुमारे शंभर संस्कार केंद्रे उभी राहिली. त्यांच्या माध्यमातून गावातील सज्जनशक्तीचे संघटन व विविध विधायक उपक्रम सुरू झाले.

विनोबा जन्मशताब्दी वर्षात (१९९४-९५) एकट्या नागपूर जिल्ह्यात ५५,००० 'गीताई' प्रती व गांधीजींच्या एकादश व्रतांवर विनोबांनी लिहिलेल्या 'अभंगव्रते' च्या १५००० प्रती गुरुजी व त्यांच्या सहकार्यांनी पोचवल्या. साने गुरुजींच्या जन्मशताब्दी वर्षात 'श्यामची आई' च्या १०,००० हून जास्त प्रतींखेरीज त्यांचे अन्य साहित्य व छायाचित्र विदर्भातील शाळे-शाळेत पोचवले. शाळे-शाळेत 'गीताई' पोचवण्याचे काम सतत चाललेलेच असते.

शिक्षणाला मूल्य-शिक्षणाची जोड असावी म्हणून शासनाने अभ्यासक्रमात त्याचा समावेश केला. पण ती एक औपचारिकताच राहिली आहे. गुरुजी खऱ्या अर्थाने शिक्षणात मूल्य-शिक्षण आणण्याचा प्रयत्न करीत आहेत.

गुरुजींच्या 'संस्कार परिवार'मार्फत विद्यार्थी-शिक्षक-नागरिकांच्या शिबिरांची एक मालिकाच सुरू असते. यांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांचा सगळा खर्च सहभागी उचलतात. गुरुजी कुठल्याही सरकारी वा गैरसरकारी संस्थेकडून, किंवा उद्योगपतींकडूनही पैसा घेत नाहीत. लोकसंग्रहाचे काम लोकाधारितच असावे, असा त्यांचा आग्रह आहे. त्यांचे स्वत:चे जीवन तर लोकाधारितच राहात आले आहे. त्यांच्याबद्दल श्रद्धा, आस्था असलेले लोक त्यांना वर्षाकाठी ३६५ रु. देतात. त्यातून त्यांचा व्यक्तिगत खर्च चालतो. आज बहुसंख्य सार्वजनिक कामे सरकार किंवा देशी-विदेशी फंडिंग एजन्सीच्या आधाराने चाललेली दिसत असताना गुरुजींचे लोकाधारित काम नजरेत विशेष ठसते.

पुसदला 'गीताई सेवा केंद्र' स्थापन झाले होते, परंतु कार्यकर्त्यांच्या अभावी काम उभे राहत नव्हते. गुरुजींवर आग्रहपूर्वक केंद्राची जबाबदारी सोपवण्यात आली. गुरुजींच्या मार्गदर्शनाखाली आज हे केंद्र झपाट्याने प्रगती करीत आहे.

'जीवन-विचार' ह्या गुरुजींच्या पुस्तकाच्या आजवर पाच आवृत्त्या प्रकाशित झाल्या असून त्याखेरीज 'उपनिषद: एक प्रातिभ दर्शन' हे उपनिषदांचा आशय सोप्या भाषेत सांगणारे पुस्तकही प्रकाशित झाले आहे.

वयाची ८२ वर्षे पूर्ण झाली असली, आणि सततच्या कष्टाच्या जीवनामुळे आरोग्याची स्थिती कमालीची खालावलेली असली, तरी गुरुजी अजूनही सक्रिय आहेत. नि:स्वार्थ व त्यागी जीवनाचा एक प्रेरक आदर्शच त्यांनी उभा केला आहे.

– डॉ. पराग चोळकर

## गाडगेबाबा

☞ **मुख्य नोंद – धर्मकारण खंड**

## गायकवाड, महादेव शाम

**सामाजिक कार्यकर्ते**

**१० ऑक्टोबर १९४९**

महादेवराव शामराव गायकवाड यांचा जन्म मूळ गाव काकंबा, ता. तुळजापूर जि.धाराशिव इथल्या भटके विमुक्त समाजातील कैकाडी या समाजामध्ये झाला. महादेवराव यांचे शिक्षण एम.ए., एम.एड व डिप्लोमा. व्ही.जी. पर्यंत झाले आहे.

भटके-विमुक्त तसेच पारधी समाजाच्या शैक्षणिक विकासाच्या व पुनर्वसनासाठी रचनात्मक कार्यामध्ये त्यांनी भटके-विमुक्त विकास प्रतिष्ठानच्या माध्यमातून यमगरवाडी प्रकल्पाच्या सुरुवातीपासून कार्य केले आहे. यमगरवाडीला पारधी समाजातील विद्यार्थ्यांसाठी वसतिगृह सुरु करण्यामध्ये महादेवरावांचा खूप मोठा



वाटा आहे. एक दोन कार्यकर्त्यांच्या मदतीने महादेवरावांनी वसतिगृहाची सुरुवात केली. वसतिगृहाच्या सुरुवातीपासून महादेवरावांनी पारधी समाजाच्या व भटक्यांच्या पालावरती संपर्क करून तेथील मुलांना यमगरवाडीत शिक्षणासाठी आणले. त्यांच्या कार्यात त्यांची पत्नी निर्मलाताई गायकवाड यांनी त्यांना मोलाची साथ दिली. त्यांनी स्वतःच्या नोकरीचा व्याप सांभाळून वसतिगृहामधील मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष दिले. वसतिगृहातील मुलांना वसतिगृहात राहण्याची अथवा दिवस भर वर्गात बसून शिक्षण घेण्याची सवय नव्हती. त्यामुळे मुले सतत पळून जायची. त्यांना शोधून आणून वसतिगृहात ठेवण्यासाठी सतत प्रयत्न करावा लागे. त्यांचे मार्गदर्शन लाभलेले यमगरवाडीतील अनेक विद्यार्थी महाविद्यालयीन शिक्षण घेत आहेत. भटके-विमुक्त अभ्यास संशोधन समिती, महाराष्ट्र शासन यावर महादेवराव यांनी कायम निमंत्रीत सदस्य म्हणून काम केले आहे.

एन.सी.सी. प्रशिक्षण, स्काउट प्रशिक्षण, वृक्षारोपण, सांस्कृतिक कार्यक्रम, विविध ठिकाणी सहलीचे आयोजन, पालकांशी संपर्क, ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांकरता हिन्दी, शिष्यवृत्ती व नवोदय प्रवेश परीक्षा तयारीचा सराव यामध्ये त्यांनी भरीव कार्य केले आहे.

त्यांनी शिक्षण बाह्य जगामध्ये एस.एस.सी. च्या शून्य टक्के निकालाच्या शाळेमध्ये मार्गदर्शन केले आहे. शिक्षकांच्या गटसंमेलनामध्ये प्रबोधनाचे काम केले आहे. अध्यापनाच्या व नोकरीच्या कामामध्ये महादेवरावांनी गरीब होतकरू विद्यार्थ्यांना शिक्षण घेण्यासाठी मदत केली आहे. त्यांनी घडविलेले अनेक विद्यार्थी महाराष्ट्राच्या विविध भागात उच्च पदावर कार्यरत आहेत. विद्यार्थ्यांचे हिंदी लेखन, मराठ्यांच्या इतिहासावर अन्याय का? या विषयावर तसेच मुंबई क्षेत्रातील मुलींच्या आवडीच्या व्यावसायीक क्षेत्रांचा शोध घेणे, या विषयांवर महादेवरावांनी संशोधनाचे काम केले आहे.

आजपर्यंत महादेवरावांना राष्ट्रीय कामगार युनियन तर्फे स्व. बाळासाहेब साठे पुरस्कार (१९९२), राज्यस्तरीय आदर्श शिक्षक पुरस्कार (मे २००६), जिल्हा स्तरीय शिक्षक पुरस्कार (सप्टेंबर २००७) अशा अनेक पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले आहे.

सध्या महादेवराव सेवा निवृत्त आहेत. सामाजिक कार्य तसेच धाराशिव जिल्हा राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे जिल्हा संघ चालक म्हणून महादेवरावांकडे जबाबदारी आहे.

– विठ्ठल म्हेत्रे

**गायकवाड सयाजी खंडेराव**

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

**गावडे, प्रभाकर लक्ष्मण**

**मुख्याध्यापक, शिक्षणतज्ज्ञ, विचारवंत**

**२० जून १९२४**

प्रा. डॉ. प्रभाकर लक्ष्मण गावडे यांचा जन्म नेवासे येथे झाला. त्यांचे वडील लक्ष्मण रंगनाथ गावडे हे न्यायालयात नोकरीला होते. डॉ. गावडे यांचे माध्यमिक शिक्षण ‘भाऊसाहेब फिरोदिया विद्यालय’ अहमदनगर येथे झाले. महाविद्यालयीन शिक्षण ‘फर्गसन महाविद्यालय’ व ‘सर परशुरामभाऊ महाविद्यालय’ पुणे येथे झाले. १९५० मध्ये ते बी.टी. झाले. पुणे विद्यापीठातून मराठी व संस्कृत हे विषय घेऊन ते १९५२ मध्ये एम.ए.झाले. १९५६ मध्ये एम.एड झाले. १९६८ मध्ये पुणे विद्यापीठाची पी.एच.डी. ही पदवी संपादन केली. त्यांनी ‘सावरकर : एक चिकित्सक अभ्यास’ हा प्रबंध या पदवीसाठी सादर केला. या प्रबंधास उत्कृष्ट प्रबंधाबद्दल पुणे विद्यापीठातर्फे ‘न. चि. केळकर पारितोषिक’ व ‘परांजपे पारितोषिक’ मिळाले. (१९७०)



तसेच, या ग्रंथास महाराष्ट्र राज्याचा पुरस्कारही मिळाला. (१९७१ - ७२).

प्रा. डॉ. प्र. ल. गावडे यांनी १९४६ ते १९८२ या प्रदीर्घ कालखंडात अध्यापक, मुख्याध्यापक म्हणून कार्य केले. 'न्यू इंग्लिश स्कूल रमणबाग', पुणे येथे १९४६ ते ४७ मध्ये ते अध्यापक होते. १९५० ते १९६३ मध्ये 'नूतन मराठी विद्यालय' पुणे येथे ते अध्यापक होते. १९६३ ते १९८२ मध्ये 'सौ. विमलाबाई गरवारे विद्यालयात' प्रथम उपमुख्याध्यापक व नंतर मुख्याध्यापक म्हणून त्यांनी काम पाहिले.

प्रा. डॉ. प्र. ल. गावडे यांनी पदवी व पदव्युत्तर वर्गांसाठी अध्यापन केलले आहे.'महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचे गरवारे कला व शास्त्र महाविद्यालय', पुणे (१९६९ ते ८२) 'महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचे वाणिज्य महाविद्यालय' पुणे (१९६८ ते ७२) 'श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालय', पुणे (१९७१ ते ७३) आणि 'पुणे विद्यापीठातील मराठी विभाग' (१९७६-१९८२) अशा विविध ठिकाणी, विविध स्तरांवर अध्यापन केलेले आहे. त्यांचा अध्यापनाचा विषय 'मराठी-वाङ्मय' आहे.

डॉ. प्र. ल. गावडे यांचे शैक्षणिक प्रशासन सेवेतील कार्यही प्रदीर्घ आणि मौल्यवान आहे. महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी मध्ये उपकार्यवाह, तीन वर्षे कार्यवाह आणि सहा महिने सल्लागार म्हणून कार्य पाहिले. डॉ. प्र. ल. गावडे यांनी विपुल लेखन केलेले आहे. स्वतंत्र ग्रंथलेखन, संत साहित्यावरील लेखन, शैक्षणिक लेखन, विद्यार्थ्यांसाठी मार्गदर्शनपर लेखन, शैक्षणिक पुस्तकांचे संपादन, शासकीय पाठ्यपुस्तक-निर्मितीसाठी संपादन, मान्यवर व्यक्तींच्या परिचय-ग्रंथ व लेखन यांचे लेखन, इत्यादी प्रकारचे लेखन त्यांनी केले आहे. याशिवाय अगणित प्रासंगिक लेखन प्रकाशित झालेले आहे. त्याचा आढावा घेणे मूल्यमापन करणे हे एक स्वतंत्र कार्य - संशोधन कार्य आहे.

'सावरकर : एक चिकित्सक अभ्यास' हा त्यांनी पी.एच.डी. साठी लिहिलेला प्रबंध-ग्रंथ होय. स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या वाङ्मयाचा साक्षेपाने, विस्तृत मूलग्राही अभ्यास करून, संशोधन करून सिद्ध केलेला हा ग्रंथ होय. सचेतन सावरकर विचार म्हणजे प्रस्तुत ग्रंथ होय. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांच्या मार्गदर्शनाखाली, वैचारिक शिस्तीत साकार झालेल्या या संशोधनपर ग्रंथास अनेक पारितोषिके मिळाली आहेत.

'कवी यशवंत - काव्यरसग्रहण' व 'सावरकरांचे साहित्यविचार' ही स्वतंत्र पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. अजिंक्यतारा या ना.ह.आपटे यांच्या कादंबरीचे संपादन त्यांनी केले आहे.संतसाहित्य हा डॉ. प्र. ल. गावडे यांच्या संशोधनाचा चिंतनाचा विषय आहे. 'श्री तुकाराम गाथा', 'ज्ञानेश्वरी', 'श्री ज्ञानेश्वर वाङ्मय सूची' व 'श्रीनामदेवकृत श्री ज्ञानेश्वर समाधी अभंग' या संपादित पुस्तकांचे प्रकाशन 'श्री ज्ञानेश्वरमहाराज संस्थान, आळंदी' यांनी केले आहे. 'संजीवन' हा संपादित ग्रंथ श्री ज्ञानेश्वरमहाराज संजीवनसमाधी सप्तशताब्दीनिमित्ताने प्रकाशित झालेला आहे. 'शारदीयेचे चंद्रकळे' हे पुस्तक आबासाहेब गरवारे महाविद्यालयाचे प्रकाशन आहे. प्राज्ञ पाठशाळा, वाई, 'विश्वकोश' ग्रंथलेखनात अभ्यागत संपादक म्हणून ते सहभागी झालेले आहेत.

शिक्षणक्षेत्रातील त्यांचा प्रदीर्घ अनुभव, सखोल चिंतन, व्यासंग, संशोधन यातून विपुल ग्रंथनिर्मिती झालेली असून ती शिक्षणक्षेत्रातील अध्यापक, मुख्याध्यापक, शिक्षण विषयाचे मार्गदर्शक व शासनाचे अधिकारी या सर्वांनाच मार्गदर्शक ठरणारी आहे. माध्यमिक शिक्षण-विचार, आचार, व्यवहार' हे त्यांचे स्वतंत्र पुस्तक आहे. इ.स.१९८५ ते १९८९ या काळात त्यांनी जे शिक्षण विषयक स्फुट लेखन केले त्यातील निवडक लेखांचा संग्रह आहे. त्यांनी 'विचार प्राथमिक शिक्षणाचा' हा ग्रंथ प्राथमिक शिक्षणासंबंधी चिंतनासाठी वाहिलेला आहे.

प्रा. प्र. ल. गावडे यांनी माध्यमिक शालान्त परीक्षेसाठी (इ.१० वी - एस.एस.सी.) प्रदीर्घ काल अध्यापन केले आहे. त्यांनी या संदर्भात अत्यंत उत्कटतेने, विद्यार्थ्यांवरील

प्रेमाने, डोळसपणाने अनेक उपक्रम केले, प्रयोग केले. केवळ आपल्याच शाळेतल्या नव्हे तर अवघ्या महाराष्ट्रातील शाळांमधील विद्यार्थ्यांचे ते सर्वच विषयांचे अध्यापक झाले. इतकेच नव्हे तर अध्यापकांचेही अध्यापक झाले. या संदर्भातील त्यांचे लेखन, चिंतन, मार्गदर्शन अत्यंत गुणवत्ताप्रेरक आहे. गेली २५ वर्षे त्यांनी दै. केसरी पुणे मधील 'दहावीचा अभ्यास' या सदरात सातत्याने लेखन व त्या सदराचे संपादन केले. 'दहावी अभ्यास-तंत्र आणि मंत्र' या पुस्तकाचे त्यांनी लेखन केले.

शालेय शिक्षण, विद्यार्थी यांच्यासाठी त्यांनी लेखन - संपादन कार्य केलेले आहे. 'साहित्यविहार' (इ. ९ वी, १० वी सहसंपादन) 'कथाकौस्तुभ' (इ.८ वी, ९ वी सहसंपादन) ही पुस्तके त्यांनी संपादित केली.'शालेय मराठी व्याकरण' (८ वी, ९ वी) या पुस्तकाचे लेखन त्यांनी केले. 'माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ'प्रकाशित मराठी भाषेच्या इ. ९ वी, ११ वी च्या पाठ्यपुस्तकांचे सहसंपादन त्यांनी केले. नू. म. वि. विद्यालय, पुणे या संस्थेच्या 'नूमविय' नियतकालिकांचे संपादन त्यांनी केले. 'लो. टिळक विशेषांक' (१९५६) 'स्वातंत्र्यसमर विशेषांक' (१९५७), 'अमृतमहोत्सव विशेषांक' (१९५८) या विशेषांकांचा विशेष उल्लेख करता येईल.

डॉ. प्र. ल. गावडे हे एक विचारवंत व वक्ते म्हणून महाराष्ट्रात प्रसिद्ध आहेतच. त्यांनी काही प्रसिद्ध व्याख्यानमालेतून व्याख्याने दिली अशा व्याख्यानमालांचा उल्लेख करता येईल.१) मराठी ग्रंथसंग्रहालय, दादर, मुंबई २) वसंत व्याख्यानमाला पुणे, वाई, मिरज, नाशिक ३) सावरकर साहित्य व्याख्यानमाला - पंढरपूर, धुळे, पोर्टब्लेअर (अंदमान), कराड, निगडी,मुंबई, नगर. ५) साहित्य संघ, गिरगाव, मुंबई ६) लोकहितवादी व्याख्यानमाला - नाशिक, ७) बृहन् महाराष्ट्र उज्जयनी, इंदूर ८) गीतारहस्य जयंती व्याख्यानमाला - पुणे. विविध संस्थांच्या कार्यात डॉ. प्र. ल. गावडे सहभागी होत आले आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य, कोषाध्यक्ष व महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या संपादन मंडळाचे सदस्य, परिषदेच्या ग्रंथसमीक्षक समितीचे सदस्य म्हणून त्यांनी काम पाहिले आहे.

मराठीतील उत्कृष्ट ग्रंथांना राज्यपुरस्कार देण्यासाठी महाराष्ट्र शासनाने नियुक्त केलेल्या ग्रंथ समीक्षक समितीचे सदस्य म्हणून त्यांनी काम पाहिले आहे. (१९७६) पुणे विद्यापीठातील मराठी विभागात संशोधन मार्गदर्शक रिसर्च गाईड म्हणून काम पाहिले आहे. महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाच्या (पुणे) विविध समित्यांमध्ये त्यांचा सक्रिय सहभाग आहे.

महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभा (कार्यकारिणी सदस्य), मराठी अध्यापक संघ (अध्यक्ष), पूना स्कूल ॲथलेटिक असोसिएशन (अध्यक्ष) गरवारे शालेय भजन दिंडी समिती (अध्यक्ष) पुणे जिल्हा व शहर मुख्याध्यापक संघ (कार्यकारिणी सदस्य), 'कामायनी' मतिमंद मुलांची संस्था (कार्यकारिणी सदस्य), ज्ञान प्रबोधिनी (उपाध्यक्ष), स्वाध्याय महाविद्यालय (संस्थापक सदस्य), सेवासदन सोसायटी (कार्यकारी मंडळ सदस्य), विद्यार्थी साहाय्यक समिती (सल्लागार मंडळ, समिती) इ. संस्थांशी डॉ. प्र. ल. गावडे यांचा निकटचा संबंध आहे. संस्थांमधील निरपेक्ष, निरालस परिश्रमांमुळे व मार्गदर्शनामुळे सार्वजनिक जीवनातील सहभागाचा एक आगळा आदर्श डॉ. प्र. ल. गावडे सरांनी निर्माण केला आहे. 'श्री ज्ञानेश्वरमहाराज संस्थान आळंदी' या संस्थेचे विश्वस्त व प्रमुख विश्वस्त म्हणून सेवा कार्य करण्याचा बहुमान डॉ. प्र. ल. गावडे यांना लाभला. (१९८६ - ९४)

विविध चर्चासत्रातील अभ्यासपूर्ण सहभागामुळे त्या त्या चर्चासत्रांना एक वैचारिक उंची प्राप्त करून देण्याचे कार्य डॉ. प्र. ल. गावडे यांनी केलेले आहे. 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलना'च्या अधिवेशनातील चर्चासत्रांत सहभाग (पुणे- १९७९ व पुणे १९९०) मुख्याध्यापक प्रशिक्षण वर्गांचे संचालन त्यांनी 'आदर्श बहुव्यापी शिक्षक व संशोधन महाविद्यालय' पुणे या संयोजन संस्थेच्या माध्यमातून केले. 'महाराणी ताराबाई शिक्षण - प्रशिक्षण महाविद्यालय', 'कोल्हापूर विस्तार सेवा' विभागातर्फे चंदगड, बाहुबली, कुडित्रे येथील शिबिरांतील

ग

शैक्षणिक चर्चासत्रांत ते सहभागी झाले. वर उल्लेखलेल्या 'सावरकर : एक चिकित्सक अभ्यास' या ग्रंथास मिळालेल्या पारितोषिकाशिवाय डॉ. प्र. ल. गावडे यांना विविध सन्माननीय पुरस्कार मिळालेले आहेत. 'आदर्श शिक्षक - राज्य पुरस्कार'(१९७६), 'उत्कृष्ट साहित्य समीक्षेबद्दल 'पु. भा. भावे स्मृति समितीचा' पुरस्कार (१९९७), 'सामाजिक व शैक्षणिक कार्याबद्दल ॲड. डी. आर. नगरकर पुरस्कार', 'शैक्षणिक कार्याबद्दल राजा मंत्री पुरस्कार', शिक्षण क्षेत्रातील कार्याबद्दल 'श्रीमंत दगडूशेठ हलवाई गणपती ट्रस्ट तर्फे कृतज्ञता पुरस्कार' (१९९८) आणि 'विचार प्राथमिक शिक्षणाचा' या पुस्तकास म. सा. परिषदेचे 'ना. गो. चाफेकर पारितोषिक' (१९९८) अशा विविध पुरस्कारांनी डॉ. प्र. ल. गावडे यांना सन्मानित करण्यात आलेले आहे. डॉ. प्र. ल. गावडे यांच्या ७५ व्या वाढदिवसानिमित्त त्यांचा गौरव करण्यात आला. त्या वेळी 'अमृतसंचय' हा 'डॉ. प्र. ल. गावडे अमृतमहोत्सव गौरव ग्रंथ' प्रकाशित करण्यात आला आहे.

– श्री. वा. कुलकर्णी

## गुणे, गंगाधरशास्त्री गोपाळ

**वैद्यकशास्त्रज्ञ, संस्थापक**

**४ मे १८८२ – २० फेब्रुवारी १९५१**



गंगाधर गोपाळ गुणे उर्फ शास्त्रीबुवा गुणे हे केवळ अहमदनगर येथील आयुर्वेद महाविद्यालयाचे संस्थापक होते. तसेच देशातील एक निष्णात वैद्य 'आफाली' या औषधनिर्मितीत देशात मोठे नाव झालेल्या कारखान्याचे संस्थापक, नगर अर्बन बँकेचे अध्यक्ष तसेच अहमदनगर एज्युकेशन सोसायटी व सनातन धर्म सभा अशा संस्थांचे पदाधिकारी म्हणून सर्वपरिचित होते. शास्त्रीबुवांचा जन्म आश्वी, ता. संगमनेर, जि. अहमदनगर येथील इतिहास प्रसिद्ध परंतु बेताची, परिस्थिती असणाऱ्या गुणे घराण्यामध्ये झाला. शिक्षण आश्वी, बडोदे, कोल्हापूर व पुणे येथे नातलगांच्या मदतीने झाले. पुण्यात वेदशास्त्रसंपन्न वाकणकर शास्त्री यांच्या घरी राहून त्यांनी संपूर्ण आयुर्वेद ग्रंथ व वैद्यक शास्त्राचे (सन १८९८-१९०५) शिक्षण घेतले. याच काळात ॲलोपॅथी, होमिओपॅथी व बाराक्षार पद्धतींचाही तौलनिक अभ्यास केला. सन १९०६ मध्ये नगरला वैद्यकीय व्यवसाय सुरू केला. सतत ४५ वर्षे भूतदयेने व सेवाभावाने साऱ्या महाराष्ट्रातील रुग्णांची सेवा केली.

जुन्या आयुर्वेदाचे अभिमानी असले तरी नवीन पद्धतीच्या शरीरशास्त्र, शल्यशास्त्र वगैरेची जोड जुन्या वैद्यकीय पद्धतीस देण्याची आवश्यकता त्यांना पटल्यामुळे आर्यांग्ल वैद्यकीय ज्ञान देणे हे त्यांचे ध्येय ठरले होते. याच ध्येयानुसार त्यांनी नगर येथे सन १९१७ मध्ये आयुर्वेद महाविद्यालयाची स्थापना केली व पुढे ३४ वर्षे त्याच्या विकास व विस्तारासाठी ते प्रयत्नशील राहिले. या महाविद्यालयाने देशास हजारो वैद्य पुरविले व लाखो रुग्णांवर उपचार केले. शास्त्रीबुवा हे राष्ट्रीय वृत्तीचे होते. सन १९२१ मध्ये असहकार चळवळीमध्ये त्यांचा सहभाग होता. आयुर्वेद प्रसाराच्या बाबतीतील त्यांचे प्रगमनशील धोरण महात्मा गांधी व काँग्रेस सरकार यांना पटल्यामुळे शास्त्रीबुवांनी स्थापन केलेल्या संस्थांना सरकारी साहाय्य मिळाले व कस्तुरबा स्मारक निधीच्या कौन्सिलवर त्यांची नेमणूक झाली होती. असंख्य वैद्यक परिषदांमध्ये त्यांनी आयुर्वेदाबद्दल विद्वत्तापूर्ण व्याख्याने दिली होती.

त्या काळात त्यांनी 'भिषग्विलास' हे आयुर्वेदशास्त्राला वाहिलेले मासिक संपादित करून महाराष्ट्रात या शास्त्राचा पाया घालण्याचे ऐतिहासिक काम केले. आपल्या निवडक शिष्यांना एकत्र करून सन १९२४ मध्ये 'आयुर्वेद सेवा संघा'(आयुर्वेद शास्त्र सेवा मंडळ) ची स्थापना केली. त्याचबरोबर रुग्णांना खात्रीची व गुणकारी औषधे मिळावीत म्हणून 'आयुर्वेदाश्रम फार्मसी' सुरू केली. ''औषधी गुणधर्मशास्त्र'' नामक ५ खंडांचा ग्रंथ लिहिला. 'आयुर्वेदीय चिकित्सा प्रबोध बोध' नावाचा बृहद्ग्रंथही प्रसिद्ध केला. त्यांचे हे ग्रंथ म्हणजे आयुर्वेद वाङ्मयाचे सारच आहेत.

सदर कार्यासाठी त्यांना शंकराचार्य कुर्तकोटी यांनी ‘वैद्य पंचानन’ ही पदवी दिली. प्रांतिक वैद्य संमेलनाचे अनेक वर्षे व अखिल भारतीय वैद्य मंडळाचे १९३७ मध्ये अध्यक्ष होते. बोर्ड ऑफ इंडियन सिस्टीम ऑफ मेडिसीन या शासकीय समितीचे सभासद होते. तसेच ‘फॅकल्टी ऑफ आयुर्वेद अ‍ॅण्ड तिब्बी सिस्टीम ऑफ मेडिसीन’ या समितीवरही शासनाने त्यांची नेमणूक केली होती.

सन १९५१ च्या फेब्रुवारी महिन्यात पुण्याच्या बी.जे.(वैद्यकीय महाविद्यालया)मध्ये त्यांच्या पाच व्याख्यानांचे आयोजन करण्यात आले होते. ही व्याख्यानमाला संपल्यावर पुणे मुक्कामी त्यांचे निधन झाले. आयुर्वेदाचा उत्कर्ष हेच त्यांचे एकमेव उदात्त जीवन कार्य होते. ते ध्येय त्यांनी अखंड व निरलसपणे पार पाडले.

– विश्वास काळे

## गोवेकर, लक्ष्मण नारायण

***अप्पा गोवेकर***

**शिक्षक, हस्ताक्षरतज्ज्ञ, पत्रकार**

**३० मे १९११ – २३ जानेवारी १९९२**



अप्पांचे वडील नारायणराव गोवेकर आणि आई लक्ष्मीबाई. नारायणराव गोवेकर विल्सन विद्यालयाचे हुषार विद्यार्थी, अध्ययन-अध्यापन कुशल असे हुशार शिक्षक. नारायणरावांना मासिक ४५ रुपये प्राप्ती होती. त्यातील २० रुपये अपंग, अनाथ विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठी खर्च होत. त्यामुळे ठराविक रकमेत संसारगाडा ओढण्याची कसरत अप्पांच्या आईला करावी लागे. भावंडात अप्पा मोठे. साहजिकच नारायणरावांचे अप्पांवर विशेष लक्ष आणि मुलाने शिकून मोठे व्हावे यासाठी ते नेहमी दक्ष असत. सूरकाठी, पोहणं, लंगडी, हुतुतू, शिंपड्याचा खेळ, पतंग उडवणे यातंच अप्पा रमत. पण अशा खेळांमुळे निर्माण झालेला चिवटपणा, चपळाई गोवेकरांना आयुष्यभर पुरली. सायकलस्वारी आणि पोहणे हे लाडके छंद होते.

सावंतवाडी संस्थापनाच्या बापूसाहेब महाराजांनी १९३१ ते ३५ या काळात भरविलेल्या पोहण्याच्या स्पर्धेत अप्पा पहिल्या, दुसऱ्या नंबराने विजयी झाले होते. अशा या हुड मुलाला सरळ करण्यासाठी नारायणरावांसारख्या शिक्षकाने त्याने अडनाड नावाच्या मास्तरांच्या हवाली केले. त्याकाळी छडीची शान शाळेत मोठ्या प्रमाणावर मानण्यात येईल. अडनाड तर त्याचसाठी प्रसिद्ध होते. मास्तरांची वाणी आणि शिकवणी न रुचल्याने अप्पांनी शाळेला रामराम ठोकला.

पुढे १९३० मध्ये केवळ दोन महिन्यांच्या तयारीवर इंग्रजी २ इयत्तांचा अभ्यास पूर्ण करून वयाच्या १२ व्या वर्षी अप्पा व्ह. फा. परीक्षा उत्तीर्ण झाले. मधल्या काळात १९२८ मध्ये अप्पांचे वडील नारायणराव यांचे अपघाती निधन झाले. १९२८-३० हा काळ अतिशय कसोटीचा होता. वडील बंधू असल्याने साऱ्या कुटुंबाची जबाबदारी एकट्या अप्पांवर येऊन पडली. धाकटे दोन बंधू, पाच बहिणी यांच्या शिक्षणाची, लग्नाची जबाबदारी, पोटापाण्याचा प्रश्न अचानक भेडसावू लागला. अप्पांचे लग्न १९३९ मध्ये उषादेवींशी झाले. अप्पांच्या स्वभावातला करारीपणा, समाजाविषयची ओढ, नवनवीन वेड घेण्याचा ध्यास उषादेवींनी जाणला नि प्रपंचातही त्या खऱ्या अर्थाने अप्पांच्या अर्धांगी झाल्या.

अर्थाजनासाठी नोकरी करणे क्रमप्राप्त होते, त्यामुळे वयाच्या १५ व्या वर्षी गोवेकरांनी शिक्षक म्हणून प्रवेश केला. याच दरम्यान नाटकवेडाने अप्पांना पछाडले. एक काळ असा होता की प्रॉम्पटरपासून, लाईट बॉय, अभिनेता, दिग्दर्शक या सर्व भूमिकांमधून गोवेकरांनी प्रवास केला आणि त्या काळात नाटक हेच जीवन क्षेत्र असंही त्यांना वाटत असे.

१९४५ मध्ये सावंतवाडी प्रजापरिषदेची रितसर स्थापना झाल्यावर आंदोलनाचे कार्यवाह म्हणून त्यांनी दीड-दोन वर्ष ७५ रुपये वेतन घेऊनही काम केले. संस्थान विलीनीकरणाच्या आंदोलनात घराची पर्वा न करता गोवेकरांनी स्वतःला झोकून दिले. १९३३ मध्ये शिक्षक

म्हणून अप्पांनी संस्थानच्या नोकरीत प्रवेश केला. ही नोकरी अप्पांनी अतिशय निष्ठेने १० वर्षे केली. कोणत्याही विद्यार्थ्यांवर न ओरडता, मारता प्रथम तो विद्यार्थी मागे का पडतेय, याचा मुळातून छडा लावण्याचा अप्पा प्रयत्न करीत. त्यांना समजावून घेत. याच काात अप्पांनी बांद्यात हरिजन मुलांसाठी रात्रीचे वर्ग चालविले.

१९४० मध्ये कुणा एका इंग्रजी नियतकालिकांतील 'पोस्ट कार्डावर ४२०० शब्दांचे अक्षरांकन' हा मथळा नजरेस आला नि गोवेकर इरेस पडले. प्रयत्नांति गोवेकरांना ६००० शब्द अंकित करण्यास यश मिळाले. 'पोस्टकार्डाचा ब्लॉक' बनविण्याचा खर्च खूप असल्याने गोवेकरांनी ब्लॉक करुन वृत्तपत्रांना पाठविला नाही. नाहीतर हा विक्रम 'गिनिज बुक' मध्ये नोंद होऊ शकेल एवढा मोठा होता. साध्या बातमी स्वरूपात प्रसिद्धी मिळाली.

१९४३ मध्ये शिक्षक या नोकरीचा अप्पांनी राजीनामा दिला व १९४८ मध्ये सहज आवड म्हणून, व्यवसाय म्हणूनही वर्तमानाकडे वळले ते अगदी ७८ सालापर्यंत १७-१८ वृत्तपत्रांचे अधिकृत बातमीदार बनले. सकाळ, लोकसत्ता, लोकमान्य यांचे ते खास बातमीदार होते. सकाळकार परुळेकरांकडून पत्रकारितेतल्या अनेक खुबी शिकून घेतल्या.

१९४८ नंतर शिकवणे, हस्ताक्षर सुधारणा वर्ग हे अप्पांचे छंद, ध्येय झाले नि पत्रकारिता हा व्यवसाय झाला. त्यांचे पुत्र विकास गोवेकर याने वडिलांची हस्ताक्षर सुधार प्रचार मोहिम चालू ठेवली आहे. या सर्व व्यवसाय नि वेडांमध्ये बालपणापासून सुंदर, टपोरं, शुद्ध अक्षर गोवेकरांनी आपलं जीवनधनच मानले.

गोवेकरांचे अक्षर नेहमीच कौतुकाचा विषय ठरलेले आहे. दफ्तरमधील हस्ताक्षर, मुलाखत मागणाऱ्या पत्रातील हस्ताक्षर, पोस्ट कार्डावरील अक्षर, अभिप्राय, शेरे यासाठी लिहिल्या ओळी अनेकदा मशिनवर टंकलिखित केले आहे असे वाटावे इतकी सुबक, नीटनेटके सारखे असे. अनेकांची पत्रे, लग्न पत्रिका, स्मरणिका गोवेकर स्वहस्ते लिहून देत.

हस्ताक्षर सुधार मोहिम ही गोवेकरांच्या अनेक लहान मोठ्या कार्यातील महत्त्वाचे कार्य होय. हस्ताक्षर सुधार मोहिमेचे मोठे क्षेत्र म्हणजे शालेय जगत् हे गोवेकरांनी हेरले. त्यासाठी शाळेच्या मुख्याध्यापकांना याचे महत्त्व पटविणारी पत्रे लिहिणे, मग शाळेत व्याखान ठरविणे नि त्या व्याख्यानासाठी ग्रामीण भागात चार मैल चालून जाणे हे सारे अप्पा हस्ताक्षर सुधारणा आणि त्याबाबत ग्रामीण शाळेतील प्रसार यांसाठी करत. गोवेकरांनी सावंतवाडी परिसरातील खेडी पालथी घातली तसे मुंबई-पुण्याचे दौरेही केले. त्यांनी मुंबईत डी.एड्., बी.एड्. महाविद्यालयात अक्षर सुधारण्याचे महत्त्व व्याख्यानांद्वारे पटवून दिले.

गोवेकर आपल्या हस्ताक्षर सुधार व्याख्यानांमध्ये हस्ताक्षरात सौंदर्य नि गती यांचे महत्त्व प्रात्यक्षिकांच्या आधारे पटवून देत. आपली देवनागरी लिपी, तिची उभी-आडवी मांडणी, तिचे अवयव, लिखाणाचे साहित्य, प्रकार, अक्षरातील समानता, आकार, शीर्षरेषा, टिंब यांचे महत्त्व व लिखाणाच्या पद्धती समजावून देत. स्वच्छ, नीटनेटक्या अक्षराबरोबर त्याच्या शुद्धतेबाबतही गोवेकरांचा कटाक्ष असे.

नामजोशी महाराष्ट्र राज्याचे शिक्षणमंत्री असताना तसेच शिक्षणखात्याचे उप संचालक चिपळूणकर यांच्याकडे गोवेकरांनी अक्षर सुधार मोहिम शासनाकडून राबविली जावी म्हणून आग्रह धरला.

वयाच्या ६० व्या वर्षी खऱ्या अर्थाने सुरुवात केलेल्या या मोहिमेसाठी अप्पा २० वर्ष अविरत झटले. ८०० हून अधिक व्याख्याने त्यांनी दिली. अप्पा गोवेकरांच्या कार्याचा गौरव शासनलेखी झाला नसला तरी प्राचार्य चिंतामणराव सहस्रबुद्धे यांचेकडून त्यांना 'हस्ताक्षर महर्षी' हे बिरुद लाभलं.

कोल्हापूरच्या गोविंदराव कोरगावर न्यासाकडून शाबासकी बरोबरच आर्थिक मदतही मिळाली. पुणे पत्रकार परिषदेपुढे १९८३ मध्ये दिलेल्या व्याख्यानामुळे इंग्रजी, हिंदी दैनिकातून छायाचित्रांसह प्रसिद्धी देखील अप्पांनी अनुभवली.

– प्राची परांजपे

**संदर्भ :**

१. *शि. अ. लुकतुके : 'मनस्वी', विकास गोवेकर, सिंधुदुर्ग*

## गोसावी, मोरेश्वर सदाशिव
**प्राचार्य, शिक्षणतज्ज्ञ, लेखक**
**१५ सप्टेंबर १९३५**



मोरेश्वर सदाशिव गोसावी यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील फलटण गावी एका अत्यंत सुसंस्कृत कुटुंबात झाला. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण फलटणलाच झाले. अनन्यसाधारण बुद्धिमत्ता लाभलेल्या गोसावी यांनी शालेय जीवनापासून ते बी. कॉम., एम.कॉम., एल.एल.बी., साहित्याचार्य या सर्व परीक्षांमध्ये विद्यापीठात प्रथम वर्गात प्रथम क्रमांक मिळविण्याचा विक्रम केला आहे. 'बिझिनेस ॲडमिनिस्ट्रेशन (व्यवसाय व्यवस्थापन)' ह्या विषयात पीएच. डी. करणारे ते पुणे विद्यापीठातील पहिले विद्यार्थी ठरले आहेत.

पुण्याच्या बृहन्महाराष्ट्र वाणिज्य महाविद्यालयामधून ते बी. कॉम. झाले. त्याच वर्षी म्हणजे १९५४ मध्ये ते ट्यूटर म्हणून त्याच महाविद्यालयात काम करू लागले. १९५६ मध्ये एम. कॉम. पदवी मिळवल्यावर ते प्राध्यापक झाले. १९५७ मध्ये सुरू झालेल्या ह्या महाविद्यालयाला सहा वर्षांतच पुणे विद्यापीठाची मान्यता मिळाली ह्याचे संपूर्ण श्रेय गोसावी यांचे आहे. १९५८ मध्ये त्यांची नाशिकच्या बी.वाय. के. वाणिज्य महाविद्यालयाच्या प्राचार्यपदी नियुक्ती झाली. वयाच्या अवघ्या तेविसाव्या वर्षी महाविद्यालयाचे प्राचार्य होणे हाही एक जागतिक विक्रमच आणि १९९५ मध्ये सेवानिवृत्त होईपर्यंत सदतीस वर्षे प्राचार्यपदाची धुरा समर्थपणे पेलणे हाही जागतिक विक्रमच होय.

प्राचार्य झाल्यानंतर महाविद्यालयाची विविधांगी प्रगतीच्या दिशेने वेगात वाटचाल सुरू झाली. कॉलेजमध्ये व्यवसाय व्यवस्थापनाच्या पदव्युत्तर शिक्षणाचा निवासी अभ्यासक्रम सुरू झाला. शिक्षणात माहिती तंत्रज्ञानाचा अंतर्भाव केला गेला. बी.बी.ए., बी.एफ.टी., बी.सी.ए. यासारखे व्यावसायिक अभ्यासक्रम सुरू झाले. शिक्षण हे प्रात्यक्षिक कार्यावर आधारित असावे यासाठी अतिथी व्याख्यानांचे महत्त्व त्यांनी जाणले व उद्योगाशी अनुबंध प्रस्थापित केले. विद्यार्थ्यांना संशोधनाची संधी उपलब्ध करून दिली. शिक्षणाला एक गुणात्मक दर्जा प्राप्त करून दिला. पत्रकारिता क्षेत्रातही व्यापक बदल होणार आहेत हे गोसावी यांनी पंचवीस वर्षांपूर्वीच ओळखले आणि एच.पी.टी. महाविद्यालयामध्ये पत्रकारिता अभ्यासक्रम सुरू केला. उत्तर महाराष्ट्रात पत्रकारितेचे शास्त्रशुद्ध शिक्षण उपलब्ध करून दिले.

शिक्षणातून विद्यार्थ्यांमध्ये ज्ञानलालसा, व्यासंग, सर्जनशीलता, शुद्ध चारित्र्य निर्माण होण्यासाठी उत्कृष्ट व गुणवत्तापूर्ण शिक्षण देण्यासाठी ते सातत्याने आजही प्रयत्नशील आहेत. शिक्षण मूल्याधिष्ठित, क्षमताधिष्ठित, जीवनाभिमुख, व्यवसायाभिमुख, परिणामकारक, संजीवक व्हावे हा ध्यास बाळगून तज्ज्ञांची व्याख्याने, चर्चासत्रे, प्रकल्पकार्य, गटचर्चा, स्वयं अध्ययन, औद्योगिक संस्थांशी संबंध, व्यक्तिमत्त्व विकास-उद्योजकता विकास शिबिरे, संशोधन असे उपक्रम ते राबवत आहेत.

शिक्षणातून महिलांचे सबलीकरण व्हावे म्हणून श्रीमती मंजुळाबाई रावजीला क्षत्रीय (एस.एम.आर. के.) महिला विद्यालयाच्या रूपात स्वतंत्र महिला विद्यालयाची कल्पना त्यांनी प्रत्यक्षात आणली. ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांचा उच्च शिक्षणात सहभाग वाढावा यासाठी त्या भागात उच्च शिक्षणाच्या संधी उपलब्ध करून दिल्या. डॉ. एम. एस. जी. सेंटर ऑफ टेक्नॉलॉजीच्या माध्यमातून माहिती तंत्रज्ञान, उद्योजकता विकास, विदेशी भाषाज्ञान यांसारखे पूरक प्रमाणपत्र अभ्यासक्रम संस्थेत चालू आहेत. प्राचार्य म्हणून झालेल्या कारकिर्दीत व सेवानिवृत्तीनंतरही गोखले एज्युकेशन सोसायटीचे कार्यवाह म्हणून हे सर्व काम ते करीत आहेत. नव्या काळाची गरज लक्षात घेऊन विज्ञान, कला आणि अन्य विद्याशाखांकडेही त्यांचे लक्ष आहे. विद्यापीठाचे एकूण एकशे सव्वीस अभ्यासक्रम संस्थेत सुरू आहेत. शिक्षण प्रक्रिया चैतन्यमय व्हावी म्हणून ते शिक्षक प्रशिक्षणास मोठे महत्त्व देतात. शिक्षकांना शिक्षणाचे

तत्त्वज्ञान, विद्यार्थ्यांचे मानसशास्त्र, शैक्षणिक नियोजन-प्रशासन, व्यवस्थापन, अध्यापन पद्धती व कौशल्ये यांचे अद्ययावत् ज्ञान असलेच पाहिजे यासाठी गोखले एज्युकेशन सोसायटी व डॉ. एम.एस. जी. फाउंडेशन फॉर आंत्रेप्रेनिअरशीप ॲण्ड मॅनेजमेंट ह्यांच्या संयुक्त विद्यमाने प्राचार्य, व्याख्याते, मुख्याध्यापक, प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षक व कार्यालयीन कर्मचारी ह्यांच्यासाठी केवळ तीन वर्षांत एकूण साठ शिबिरे सरांनी आयोजित केली.

या संस्थात्मक कार्याबरोबरच पुणे विद्यापीठाच्या वाणिज्य शाखेचे अधिष्ठाता, विद्यापीठाच्या कार्यकारिणीचे सदस्य म्हणून कर्मचारी, अध्यापक व विद्यापीठाच्या शास्त्रशुद्ध कारभारासाठी त्यांनी बहुमोल कार्य केले आहे. पुणे विद्यापीठ आदर्श व्हावे म्हणून पुढाकार घेऊन त्यांनी अकौंटस् कोड तयार केले होते. त्यानुसारच विद्यापीठाचा कारभार चालू आहे. १९७० ते २००५ ह्या काळात वाणिज्य व व्यवस्थापन या विषयांसाठी पीएच. डी. चे ते मार्गदर्शक होते. वाणिज्य, व्यवस्थापन व तंत्रज्ञानाशी संबंधित ए.आय.सी.टी. ई., आय.सी.ए. आय.ए., एम.डी. अशा संस्थांचे सदस्य, इंडियन कॉमर्स असोसिएशन फॉर मॅनेजमेंट डेव्हलपमेंट, इंटर युनिव्हर्सिटी कौन्सिल ऑफ बिझिनेस एज्युकेशन अँड रिसर्च यांचे ते अध्यक्ष होते. टोकियोमधील ऑल एशिया मॅनेजमेंट कॉन्फरन्समध्ये (मॅन अँड वर्क) हा शोधनिबंध त्यांनी सादर केला. १९९२ मधील आंतरराष्ट्रीय परिषदेत 'उच्च शिक्षण प्रशासन' युनिव्हर्सिटी ऑफ ट्वेंट (नेदरलॅण्डस) या विद्यापीठात जे. डी. सी. बिटको आय.एम.एस. आर. या संस्थेची रचना व विकास हा शोधनिबंध उच्च शिक्षणाचा उद्योगक्षेत्राशी अनुबंध निर्माण करणारा म्हणून आदर्श शोधनिबंध ठरला.

व्यवसाय शिक्षण व गुणवत्तापूर्ण प्रशासन ह्या विषयांवर त्यांनी अनेक पुस्तके लिहिली आहेत. 'मॅनेजमेंट गॅप इन डेव्हलपिंग इकॉनॉमी', 'नाशिक डिस्ट्रिक्ट इकॉनॉमिक सर्व्हे,' 'अचिव्हींग एक्सलन्स', 'एज्युकेशन प्लस' ही त्यांची पुस्तके त्यांच्या प्रगाढ व्यासंगाचा प्रत्यय देतात. शंभराहून अधिक पुस्तकांचे संपादन व प्रकाशन त्यांनी केले आहे. व्यवस्थापनविषयक जर्नल्स व नियतकालिकांतून सातत्याने त्यांचे लेख प्रसिद्ध होत असतात.

गोखले एज्युकेशन सोसायटीचे नाव त्यांच्या गतिशील नेतृत्वामुळे आंतरराष्ट्रीय पातळीवर पोचले आहे. संस्थेची सोळा महाविद्यालये, वीस माध्यमिक विद्यालये, चोवीस पूर्व प्राथमिक व प्राथमिक शाळा, दहा कृषिशिक्षण केंद्रे, आश्रमशाळा व वसतिगृहे ह्यांतून एक लाख विद्यार्थ्यांना शिक्षणाचा लाभ मिळत आहे.

सन २००० मधील महाराष्ट्र राज्य आदिवासी पुरस्कार व आय.एस.ओ. - ९००१-२०० प्रमाणपत्र (२००३) मिळून सन्मान झाला आहे.

या महत्त्वपूर्ण शैक्षणिक योगदानाबद्दल डॉ. गोसावी यांचा राजीव गांधी शांतता पुरस्कार, मास्टर टीचर मिलेनियम पुरस्कार, 'सर' ही पदवी, इंटरनॅशनल बायोग्राफिकल असोसिएशन केंब्रिजची फेलोशिप अशा अनेक पुरस्कारांनी गौरव झालेला आहे.

– प्रा. सुहासिनी पटेल

* * *




घ

**घारपुरे, जगन्नाथ रघुनाथ**
**संस्थापक, कायदेपंडित, शिक्षणतज्ज्ञ**
**२४ जून १८७२ – १८ जून १९६२**



जगन्नाथ रघुनाथ घारपुरे ह्यांचे जन्मगाव नागपूर. तेथेच त्यांचे सर्व शिक्षण पूर्ण झाले. १९०० साली त्यांनी एलएल.बी. पदवी घेतली व मुंबईला जाऊन वकिलीचा व्यवसाय सुरू केला. त्या काळात लंडनला जाऊन प्रिव्ही कौन्सिलमध्ये त्यांनी सरदार बिवलकर ह्यांचा खटला चालविला व जिंकला. उत्तम कायदेतज्ज्ञ म्हणून त्यांनी नाव मिळवले.

शिक्षण व कायदा याबरोबरच जगन्नाथराव संस्कृत वाङ्मयाचेही गाढे अभ्यासक होते. १९०९ मध्ये त्यांनी धर्मशाळा ग्रंथमाला सुरू केली. तसेच १९१४ मध्ये 'दक्षिणी ब्राह्मण सहकारी संस्था', 'दक्षिणी ब्राह्मण विद्याप्रसारक संस्था' काढल्या.

आपल्या देशातील तरुणांना कायदेविषयक शिक्षण घेता यावे म्हणून जगन्नाथरावांनी पुण्यात डॉ. सर नारायणराव चंदावरकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली त्यांच्या बंगल्यात इंडियन लॉ सोसायटीची ४ मार्च १९२३ रोजी स्थापना केली. जगन्नाथराव सोसायटीचे कार्यवाह झाले. मुंबई हायकोर्टात वकिली करणारे एच.सी. कोयाजी, पी. बी.शिंगणे असे तज्ज्ञ या सोसायटीत १होते. या इंडियन लॉ सोसायटीच्या पुढाकाराने २० जून १९२४ रोजी पुण्यात विधी महाविद्यालय सुरू झाले. या महाविद्यालयाचे पहिले प्राचार्य म्हणूनही जगन्नाथरावांनी जबाबदारी स्वीकारली. इंडियन लॉ सोसायटीने निधी जमवून महाविद्यालयासाठी इमारती उभ्या केल्या. जगन्नाथरावांच्या नेतृत्वाखाली सोसायटीचा विविधांगी विकास होत गेला. आज ह्या विधी महाविद्यालयात तीन हजारांहून अधिक विद्यार्थी कायदेविषयक शिक्षणाचा लाभ घेत आहेत. जगन्नाथरावांच्या स्मरणार्थ 'आचार्य घारपुरे अभ्यासिका' नावाचे दालन महाविद्यालयाच्या प्रांगणात उभे आहे.

पश्चिम भारत वकील संघटना, डेक्कन एज्युकेशन सोसायटी, भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था, महाराष्ट्र साहित्य परिषद, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय अशा विविध शैक्षणिक, सामाजिक संस्थांशी त्यांचा जवळचा संबंध होता. 'महाभारता 'ची आवृत्ती प्रकाशित करण्यासाठी त्या काळात त्यांनी एक लाख रुपयांचा निधी जमा केला होता.

हिंदू व रोमन साम्राज्यातील कायद्यांविषयी जगन्नाथरावांची चाळीस पुस्तके आहेत, त्यातील काही संस्कृत भाषेमध्ये तर काही इंग्रजी भाषेमध्ये आहेत. त्यांनी काही संस्कृत साहित्यकृतींची इंग्रजी भाषांतरेही केली आहेत.त्यांची व्यवहार मयूरवः हे शीर्षक असणारी धर्मशास्त्र ग्रंथमाला १९१४ मध्ये प्रकाशित झाली आहे.

'दी स्मृती चंद्रिका' आणि 'सुबोधिनी' ही त्यांनी लिहिलेली इंग्रजी भाषेतील ग्रंथमाला आहे. 'कलेक्शन ऑफ हिंदू लॉ' हाही प्राचार्य घारपुरे यांचा संदर्भग्रंथ म्हणून ओळखला जातो.

महाराष्ट्राच्या शिक्षणक्षेत्रात, विशेषत: कायदेविषयक शिक्षणक्षेत्रात, सामाजिक क्षेत्रात, सांस्कृतिक क्षेत्रात मोठी कामगिरी बजावणाऱ्या प्रा. जगन्नाथराव घारपुरे ह्यांची पुण्यातील 'विधी महाविद्यालय' ही महाराष्ट्राच्याच दृष्टीने नव्हे तर देशाच्या दृष्टीनेही अतिशय महत्त्वाची देणगी आहे.

– डॉ. विश्वास मेहेंदळे

घ

## घोलप, बाबूराव रामचंद्र

**शिक्षणतज्ज्ञ**

**१ फेब्रुवारी १९०४ - २६ मे १९८२**



बाबूराव रामचंद्र घोलप यांचा जन्म वाफगाव, तालुका खेड, जिल्हा पुणे येथे झाला. त्यांचे वडील पोलीस खात्यात कामाला होते तर आजोबा शेतकरी होते.

प्राथमिक शिक्षण घेत असताना बाबूरावांनी शाळेत कायम प्रथम क्रमांक पटकाविला. चौथीत पहिले आल्यावर पुढील शिक्षणालाही त्यांना पुण्याला यावे लागले. पुण्याजवळील औंध भागातील प्राथमिक शाळेत प्रवेश घेऊन त्यांनी सातवीपर्यंत शिक्षण घेतले. आठवीला नूतन मराठी विद्यालयात प्रवेश घेतला. येथेच ते शिष्यवृत्तीची परीक्षा उत्तम गुणांनी उत्तीर्ण झाले. त्यामुळे त्यांना शिष्यवृत्ती मिळाली. मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण होण्याअगोदरच आईवडील निवर्तले. १९२० मध्ये उत्तम गुणांनी उत्तीर्ण होऊन बाबूराव उच्च शिक्षणासाठी फर्गसन महाविद्यालयात आले. १९२४ मध्ये ते बी. ए. झाले. घरच्या परिस्थितीमुळे त्यांनी नोकरी करण्याचा निर्णय घेतला व ते गुरूवर्य बाबूराव जगताप यांनी स्थापन केलेल्या श्री शिवाजी मराठा विद्यालय, पुणे या संस्थेत शिक्षक म्हणून नोकरी करू लागले. शिक्षण सोडायचे नाही हा निश्चय असल्याने त्यांनी विधी महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला.

याच काळात त्यांचा विवाह (१९२६) आंबेगाव तालुक्यातील चांदोली बु. गावातील अनंतराव बळवंतराव थोरात यांची कन्या भागीरथी हिच्याशी झाला. १९२७ मध्ये घोलप वकिलीची परीक्षा उत्तम गुणांनी उत्तीर्ण झाले. १९२७ ते ३३ या काळात त्यांनी शिरूर व तळेगाव ढमढेरे, सासवड, पुणे येथे वकिली केली. वकिली करीत असताना लोकांची भांडणे, सामान्य जनतेवर होणारे अन्याय यांचा त्यांना उबग आल्याने त्यांनी वकिली सोडण्याचा निर्णय घेतला. बडोदा संस्थानांमध्ये नोकरीसाठी महाराज सयाजीराव गायकवाड यांचे निमंत्रण नाकारून पुणे जिल्हा लोकल बोर्डात १९ मे १९३३ रोजी ते ‘मुख्य अधिकारी’ झाले. आपल्या कारकीर्दीत त्यांनी मुंबई राज्यात पुणे जिल्हा लोकल बोर्ड सर्वप्रथम आणले. बोर्डाची आर्थिक स्थिती सुधारून त्यांनी सर्वांगीण विकास घडवून आणला. या पदावर काम करीत असताना गावोगावी ते तपासणीसाठी जात असत. त्यांनी पुणे जिल्हा शिक्षण मंडळाची स्थापना केली. ते शेवटपर्यंत या संस्थेचे मानद सचिव होते. १९१३ ते १९५९ अशी सलग २६ वर्षे त्यांनी मुख्य अधिकारी म्हणून काम पाहिले.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर घोलप राज्यशासनाच्या दुष्काळ निवारण समितीचे सदस्य झाले. पुणे शहरात असणारी जिल्हा परिषदेची इमारत घोलप यांच्या मार्गदर्शनानुसार आकाराला आली.

पुणे जिल्हा शिक्षण मंडळ (पुणे डिस्ट्रिक्ट एज्युकेशन असोसिएशन, पुणे) ही संस्था ५ नोव्हेंबर १९४१ रोजी अस्तित्वात आली. या संस्थेचे अध्यक्ष अण्णासाहेब आपटे, उपाध्यक्ष बापूसाहेब जेधे व मानद सचिव आणि खजिनदार म्हणून बाबूराव घोलप यांची निवड करण्यात आली. पुणे जिल्ह्यात ज्या ठिकाणी प्राथमिक शाळा नाहीत तेथे प्राथमिक शाळा काढण्याचे ठरले. पहिल्या ५ वर्षांतच संस्थेने १०० हून अधिक व्हॉलंटरी शाळा काढल्या. जुन्नर, खेड, आंबेगाव भागातील ५१ शाळा शिक्षकांसह पुणे जिल्हा शिक्षण मंडळाकडे आल्या. १९५६ पर्यंत संस्थेच्या ३७६ शाळा झाल्या. १९५६ पासून इंग्रजी माध्यमातील शाळा सुरू करण्यात आल्या. या काळात घोलप यांनी शिक्षणप्रसाराला अडथळा आणणारे नियम शिक्षणमंत्री नामदार बाळासाहेब खेर यांच्या मदतीने बदलले. यामुळे पुणे, सातारा, नाशिक या जिल्ह्यांत अनेक शाळा सुरू झाल्या. याच काळात संस्थेचे कार्यालय जिल्हा परिषदेच्या आवारातून पौड फाटा सर्व्हे क्र. ४८/१ येथे स्थलांतरित झाले. येथूनच पुढे संस्थेने भव्य स्वप्ने पाहायला सुरुवात केली. यातूनच १९७० मध्ये ओतूर येथे पहिले महाविद्यालय सुरू करण्यात आले. पुढे या महाविद्यालयाचे नामकरण ‘अण्णासाहेब वाघिरे कला, वाणिज्य व विज्ञान

महाविद्यालय, ओतूर' असे करण्यात आले. पुढे हडपसर, सासवड येथे महाविद्यालये सुरू झाली.

या सगळ्या कालखंडात घोलप यांचा संबंध अन्य संस्थांशी सुद्धा आला. त्यात श्री शिवाजी प्रिपरेटरी मिलीटरी स्कूल, पुणे चे खजिनदार, सेक्रेटरी स्टॅर्लिंग समिती अध्यक्ष, डेक्कन मराठा एज्युकेशन असोसिएशनचे स्टॅर्लिंग कमिटी मेंबर, अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषद, पुणे चे हितचिंतक, पुणे विद्यापीठ सिनेट सदस्य, एस.एस.जी.डी. वर्गाचे मानद शिक्षक, पब्लिक सर्व्हिस कमिशनचे सदस्य अशी महत्त्वाची पदे त्यांनी भूषविली. अशाच २२ विविध शैक्षणिक संस्थांशी त्यांचे निकटचे संबंध होते. त्यांनी रयत शिक्षण संस्थेला यशवंतराव होळकर यांचा वाफगाव येथील वाडा मिळवून दिला.

१९७३ मध्ये ७८ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल घोलप यांचा सत्कार करण्यात आला. सत्कारात मिळालेले एक लाख रूपये त्यांनी स्वत:कडून भर घालून संस्थेलाच परत केले.

– प्रा. गणेश द. राऊत

**संदर्भ :**


१. *वसा, वारसा आणि वाटचाल प्रा. गणेश राऊत, डॉ. प्रभाकर ताकवले संपादक मंडळ प्रमुख – प्रकाशन सचिव, पुणे जिल्हा शिक्षण मंडळ.*

२. *प्रा. गणेश राऊत, सौ. ज्योती राऊत – महाराष्ट्रातील परिवर्तनाचा इतिहास , डायमंड प्रकाशन चौथी आवृत्ती २००९.*

३. *गणेश राऊत, वि. ना. होनप – महाराष्ट्र दिनविशेष पुणे – डायमंड प्रकाशन, पुणे प्र. आ. २००८.*


* * *

घ




च

**चव्हाण, चंद्राम रामचंद्र**
**संस्थापक**
**१३ एप्रिल १९२५**



चंद्राम रामचंद्र चव्हाण यांचा जन्म मौजे इंडी, जि.विजापूर (कर्नाटक) येथे एका गरीब कुटुंबात झाला. गुरुजींचे वडील रामचंद्र खुबा चव्हाण हे अध्यात्मिक विचारसरणीचे व विठ्ठलभक्त होते.

सावकाराच्या जाचाला कंटाळून ते कर्नाटकातून महाराष्ट्रात मौजे निंबर्गी ता. दक्षिण सोलापूर येथे १९२७ - २८ च्या दरम्यान आले. तेथून पुढे कोरवली या गांवी स्थायिक झाले. लहानपणी गुरुजी गुरे राखण्याचे काम करीत. त्यांची शिक्षण घेण्याची इच्छा लक्षात घेवून गुरुजींच्या वडिलांनी १९३५ मध्ये त्यांना शाळेत दाखल केले. पुढे त्यांचे शिक्षण कसेबसे इयत्ता ७ वी पर्यंत झाले. आर्थिक परिस्थितीमुळे पुढे त्यांना शिक्षण घेता आले नाही. १९४९ च्या ऑक्टोबर महिन्यात त्या वेळच्या शालेय समितीने त्यांची शिक्षक म्हणून बार्शी तालुक्यातील झरेगांव येथे नियुक्ती केली.

उन्हाळ्याच्या सुट्टीत कोरवली या आपल्या गावी आल्यानंतर गुरुजी स्वस्थ बसत नसत. बंजारा समाजाच्या कल्याणासाठी आपण काम केले पाहिजे असे त्यांना सातत्याने वाटत असे. बंजारा समाजाचे व तांड्याचे प्रमुख गंगाराम गेमलू जाधव यांच्याशी ते या विषयावर चर्चा करीत. पुढे सोलापुरातील त्या वेळचे काँग्रेसचे कार्यकर्ते वि. गु. शिवदारे, राजाराम ढवळे, दिनानाथ कमळे गुरूजी, भाई छन्नुसिंग चंदेले, खेमा नाईक इ. कार्यकर्त्यांबरोबर गुरुजींचा संपर्क आला. बंजारा समाजाच्या विकासाची गुरुजींची तळमळ पाहून, कमळे गुरुजी शालेय समितीचे अध्यक्ष असल्यामुळे त्यांनी चंद्राम चव्हाण गुरुजींची बदली कोरवली या त्यांच्या मूळ गावी केली.

कोरवली येथील शाळेत अध्यापनाचे काम करीत गुरुजींनी समाजकार्य सुरू केले. संपूर्ण सोलापूर जिल्ह्याचा पायी प्रवास करून जिल्ह्यातील लमाण तांड्यांचे सर्वेक्षण केले. निरक्षरता, दारिद्र्य, सतत भटकी वृत्ती, व्यसनाधीनता अशा गर्तेत समाज अडकलेला होता. तेव्हा अशा अवस्थेत या समाजाला संघटित करणे व विकासाच्या प्रवाहात आणणे यासाठी गुरुजींनी प्रयत्न सुरू केले. गुरुजी तांड्यातांड्यावर जाऊन लोकांना एकत्रित करून त्यांचे लमाणी भाषेत प्रबोधन करीत असत. संत नामदेव, संत एकनाथ, संत तुकाराम, कबीर यांच्या अभंगवाणीतून दारूचे दुष्परिणाम व शिक्षणाचे महत्त्व पटवून देत असत. लोकांच्या हाताला काम व त्यांच्या मुलाबाळांना शिक्षण मिळवून देण्यासाठी व हे कार्य अधिक गतिमान करण्यासाठी एक संस्था स्थापन करण्याचे त्यांनी ठरविले. १९५० मध्ये कार्यकर्त्यांच्या मदतीने व खेतपूरचे चितळेमामा यांच्या उपस्थितीत अक्कलकोट येथे एक लमाण परिषद आयोजित केली व या परिषदेत ‘सोलापूर जिल्हा लमाण सेवा मंडळा’ची स्थापना केली. या मंडळाच्या माध्यमातून त्यांनी २०० लमाण तांड्यांना दारू गाळण्यापासून मुक्त केले. लमाण लोकांची उदरनिर्वाहासाठी होणारी भटकंती कमी करून त्यांना स्थैर्य प्राप्त करून देण्याच्या उद्देशाने दिनानाथ कमळे गुरुजींच्या सहकार्याने १९५७ मध्ये सोलापुरातील नेहरूनगर येथे बंजारा समाजाची ९०० घरांची एक आदर्श अशी वसाहत उभी केली. लोकांच्या उपजीविकेसाठी १९ शेती सहकारी

संस्था स्थापन केल्या. शासकीय, निमशासकीय व वनविभागाची ७००० एकर जमीन संस्थेच्या वतीने मिळवून दिली. ९ जून १९५८ मध्ये नेहरूनगर या ठिकाणी जागृती विद्यामंदिराची स्थापना करून त्यांनी आपल्या शैक्षणिक कार्याचा शुभारंभ केला.

लमाण बांधवांच्या विकासाबरोबर गुरुजींनी इतर मागास समाजातील लोकांच्या कल्याणासाठी काम करण्याचे ठरविले. त्यासाठी शिक्षकपदाचा राजीनामा दिला. हरिजन, गिरिजन, भटके, विमुक्त जाती – जमातींच्या सर्वांगीण विकासासाठी सोलापूर जिल्हा लमाण सेवा मंडळाची व्याप्ती वाढवून 'सोलापूर जिल्हा मागास सेवा मंडळ' असे संघटनेचे नामकरण करण्यात आले. ही संस्था २८ सप्टेंबर १९७७ रोजी नोंदणी करण्यात आली. संस्थेचे कार्यक्षेत्र महाराष्ट्र व कर्नाटक राज्य निश्चित करण्यात आले. शिक्षणाशिवाय समाजात खऱ्या अर्थाने परिवर्तन होणार नाही हे जाणवून गुरुजींनी सोलापूर शहर व जिल्ह्यातील दक्षिण सोलापूर तालुका, उत्तर सोलापूर तालुका, मोहोळ, मंगळवेढा या तालुक्यात प्राथमिक, माध्यमिक शाळा सुरू केल्या. सोलापूर शहरातील लष्कर, कामाठीपुरा, लोधीगल्ली, मोटीगल्ली, कुंभारगल्ली, सेटलमेंट भाग (कैकाडी समाज) इ. मागास व गुन्हेगारी जातीजमाती असलेल्या भागातील मुले इतर ठिकाणच्या शाळेत जात नसल्याने त्यांच्या शिक्षणासाठी त्या–त्या ठिकाणी गुरुजींनी शाळा स्थापन केल्या. सोलापूर शहर व जिल्ह्यात मिळून सर्वच प्रकारच्या शिक्षण देणाऱ्या ३७ शाखा स्थापन करण्यात आल्या. सध्या या शाखांतून सुमारे १५,५०० विद्यार्थी शिक्षणाचा लाभ घेत आहेत. गुरुजींच्या शिक्षण संस्थेत ७०० शिक्षक व शिक्षकेतर सेवक आहेत. संस्थेकडे शैक्षणिक कार्यासाठी शेती व बिगर शेती अशी मिळून १०० एकर जमीन आहे. शिक्षण संकुल व वसतिगृहाच्या सुमारे ५ कोटी रुपये किंमतीच्या इमारती आहेत. बालक मंदिर, प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक, शारीरिक शिक्षण महाविद्यालय, सैनिकी स्कूल, आयडियल स्कूल, आश्रमशाळा, संगणक शिक्षण संकुल, अध्यापक महाविद्यालय, वसतिगृहे इ. विविध प्रकारच्या शाखा कार्यरत आहेत. गुरुजींनी या शाखांना साने गुरुजी, महात्मा गांधी, महात्मा फुले, सावित्रीबाई फुले इ. समाजसुधारकांची नावे दिलेली आहेत.

गुरुजी हे अध्यात्मिक संस्कारात वाढल्याने त्यांनी त्यांच्या शिक्षण संस्थांत मूल्य शिक्षण ही बाब जाणीवपूर्वक जोपासलेली आहे. निवासी शाखेतील विद्यार्थी पहाटे उठून प्रार्थना करतात. प्रार्थनेनंतर स्वच्छ चारित्र्य व श्रमाचे महत्त्व सांगितले जाते. गुरुजींवर महात्मा गांधी, पंडित नेहरू, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, प. पू. पांडुरंग शास्त्री आठवले इ. च्या विचारांचा पगडा आहे. त्यामुळे गुरुजींच्या शिक्षण व समाज कार्याला अध्यात्मिक अधिष्ठान लाभलेले आहे. कोणत्याही समारंभाच्या निमित्ताने गुरुजी जेव्हा मार्गदर्शन करतात तेव्हा विविध संतांच्या शिकवणीचा उल्लेख केल्याशिवाय ते पूर्ण होत नाही. मात्र गुरुजींचा अध्यात्मवाद हा कर्मयोगावर आधारलेला आहे. म्हणूनच त्यांनी आपल्या संस्थेचे बोधवाक्य 'आज परिश्रम कल लाभ' असे निश्चित केलेले आहे. गुरुजींनी स्त्री शिक्षणावरही भर दिलेला आहे. स्त्रिया हे समाजाचे अर्धे अंग आहे. त्यांना शिक्षणापासून वंचित ठेवून चालणार नाही. ही त्यांची विचारसरणी. असल्यामुळे त्यांनी सर्वच शाखांमध्ये मुलींना प्राधान्य दिलेले आहे. मुलींसाठी स्वतंत्र आश्रमशाळा व वसतिगृहे सुरू केलेली आहेत.

१९५० मध्ये मागास व दुर्बलांच्या सक्षमीकरणासाठी गुरुजींनी सुरू केलेल्या या विधायक प्रकल्पाला ६० वर्षे पूर्ण होत आहेत. या शैक्षणिक व सामाजिक विकास प्रकल्पात सहभागी झालेल्या १२० जातीधर्माच्या लोकांचे योग्य पध्दतीने पुनर्वसन व सक्षमीकरण झालेले आहे व होत आहे. सुमारे २००० विद्यार्थी शासकीय व निमशासकीय उपक्रमात उच्चपदावर विराजमान आहेत. या मधील २५० विद्यार्थी प्रथम श्रेणीचे अधिकारी म्हणून कर्तव्य बजावत आहेत. हेच गुरुजींच्या शैक्षणिक कार्याचे फलित म्हणावे लागेल. आजवर गुरुजींनी केलेल्या या कार्याची दखल शासन स्तरावर व विविध सामाजिक संस्थांनी घेऊन त्यांना विविध प्रकारचे पुरस्कार देऊन सन्मानित केलेले आहे. दलितमित्र पुरस्कार (महाराष्ट्र

च

शासन), समाजसेवक भूषण पुरस्कार (सोनी चॅरिटेबल ट्रस्ट, सोलापूर), समाजसेवक भूषण पुरस्कार (सामाजिक समरसता मंच, पुणे), समाजसेवक भूषण पुरस्कार (भारती विद्यापीठ, पुणे), शैक्षणिक संस्था चालक सेवक पुरस्कार (महाराष्ट्र राज्य शिक्षक संघटना), कृतिशील बंजारा समाजसेवक पुरस्कार (अखिल भारतीय बंजारा सेवा संघ), गांधीफोरम पुरस्कार (गांधी फोरम यांच्या वतीने) इ. पुरस्कारांनी गुरुजींना गौरविलेले आहे. सध्या गुरुजी अखिल भारतीय बंजारा सेवा संघाचे अध्यक्ष म्हणून काम करत आहेत. आज वयाच्या ८५व्या वर्षीही त्यांचा कामाचा उत्साह वाखाणण्यासारखा आहे. व्यसनमुक्ती, गोरगरीब विद्यार्थ्यांना मदतीचे आवाहन, हुंडाबंदी, आंतरजातीय, धार्मिक व सामुदायिक विवाहाला उत्तेजन, अनेक चांगल्या संकल्पना समाजात रुजविण्यासाठी त्यांचे प्रबोधन चालू असते. म्हणूनच चंद्राम चव्हाण गुरुजी हे कृतिशील समाजसेवक म्हणून महाराष्ट्राला परिचित आहेत. माजी न्यायमूर्ती चंद्रशेखर धर्माधिकारी यांनी गुरुजींचे कार्य पाहून असा अभिप्राय नोंदविलेला आहे की, ''मला पंढरपुरात पुंडलिक भेटला नाही. परंतु तो चंद्राम चव्हाण गुरुजींच्या रूपाने मला नेहरुनगर येथे भेटला.''

– प्रा. उत्तमराव हुंडेकर

## चव्हाण, यशवंत नारायण

***नानासाहेब चव्हाण***

**संस्थापक**

**७ जानेवारी १९२४ – ९ जून २००९**

यशवंतराव नारायणराव ऊर्फ नानासाहेब चव्हाण यांचा जन्म रांजणगाव ता. चाळीसगांव येथे झाला. बी. ए. ची पदवी घेतल्यानंतर चाळीसगावच्या आनंदीबाई बंकट विद्यालयात ते शिक्षकपदी रुजु झाले. १९५१ ते १९५४ या कालावधीत त्यांनी नोकरी केली. ३१ डिसेंबर १९५३ रोजी त्यांनी राष्ट्रीय सहकारी शिक्षण प्रसारक मंडळ मर्यादित चाळीसगाव या संस्थेची स्थापना व नोंदणी केली. शाळेतल्या कित्येक विद्यार्थ्यांची चाळीसगाव शहरात राहण्याची सोय नव्हती. त्यांच्यासाठी नानांनी राष्ट्रीय विद्यार्थी



वसतिगृहाची स्थापना केली. त्यामुळे अनेक गरीब व होतकरू विद्यार्थ्यांची मोफत सोय वसतिगृहात झाली.

वसतिगृह, प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक शाळा, वरिष्ठ महाविद्यालय, तांत्रिक विद्यालय, संगणक केंद्र इ. शाखांचा टप्प्याटप्प्याने विस्तार केला. या शिक्षण संस्थेची आज नऊ बालक मंदिरे, दोन प्राथमिक शाळा,पंचवीस माध्यमिक विद्यालये, पाच कनिष्ठ महाविद्यालये, एक वरिष्ठ महाविद्यालय, एक अंधशाळा, दोन आश्रमशाळा आणि एक संगणक केंद्र अशा ४६ शाखा आहेत. १९६० मध्ये तांत्रिक शिक्षण देणारे खाजगी संस्थेच्या राष्ट्रीय तांत्रिक विद्यालय हे महाराष्ट्रातले पहिले विद्यालय आहे.

पदयात्रा आणि दिंडी यावर नानांचे असीम प्रेम होते. संत विनोबा भावे यांची भूदान पदयात्रा चाळीसगाव तालुक्यातून गेली. त्यावेळी १९५९ साली रांजणगाव ते चाळीसगाव आणि चाळीसगाव ते मेहूणपुरा अशा पदयात्रेत नाना स्वतः विद्यार्थ्यांसोबत सामील झाले. चाळीसगाव ते दौलताबाद अशी दिंडी टाळमृदुंगासह जनार्दन स्वामींच्या कर्मभूमीत नेली, तर दुसऱ्या वर्षी नाथांच्या कर्मभूमीत चाळीसगाव ते पैठण अशी नेली.

अध्यात्मिक शिक्षण, गणित व विज्ञानाचे शिक्षण, तांत्रिक शिक्षण, श्रमसंस्कार शिक्षण, अंधांचे शिक्षण, मोलमजुरी करणाऱ्यांचे शिक्षण आणि शेतकऱ्यांचे शिक्षण अशा रीतीने सर्वव्यापी शिक्षण देऊन अनेक प्रज्ञावंत विद्यार्थी तरुण नानांच्या सहवासातून, कर्तृत्वातून निर्माण झाले.हे कार्य करतांना कोणत्याही राजकीय प्रवाहात ते पडले नाहीत. त्यामुळेच महाराष्ट्राचे एकेकाळचे मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांनी नानांना 'पंढरीचा पांडुरंग' असे संबोधले आहे.

साने गुरुजी हे नानासाहेबांच्या जीवनाचे एक दैवत होते. नानांची अखिल भारतीय साने गुरुजी कथामालेशी

जवळीक निर्माण झाली. रा. ग. मोहाडीकर म्हणतात, ‘‘नानांचा साधासुधा वेष, शुभ्र पांढरी टोपी, धोतर व शर्ट यात कधीही बदल झाला नाही.’’

२३ व्या अखिल भारतीय विज्ञान संमेलनात नानासाहेबांच्या कार्याचा गौरव कऱण्यात आला. नाशिक येथील सारडा प्रतिष्ठानने त्यांना 'नंदिनी पुरस्कार' अखिल भारतीय सानेगुरुजी कथामाला संघाने त्यांच्या संस्थेला 'बालसेवा पुरस्कार' दिला.

– म. ल. नानकर

## चितळे, शारदा गणेश

**संस्थापक**

**१९०६ – १९९२**



शारदाबाई गणेश चितळे यांचा जन्म खानदेशात झाला. महाराष्ट्रातील पहिले विमाशास्त्रज्ञ ग. स. मराठे हे त्यांचे वडील होते. जी. के. चितळे ह्यांच्याशी विवाह झाल्यावर त्या मुंबईत पार्ले येथे आल्या. १९३८ पर्यंत पार्ल्यात एकही मराठी भाषिक बालमंदिर नव्हते. त्या काळात वयाच्या सहाव्या वर्षी मुलाला एकदम प्राथमिक शाळेत घालत असत. प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ ताराबाई मोडक ह्यांच्या दादर येथील ‘शिशुविहार’ मुळे तेथील पालकांना बालमंदिराची कल्पना समजली व पटली.

शारदाबाई चितळे ह्यांच्या ‘विद्या मंदिर’ ह्या घरात दादरमधील शांताबाई कशाळकर ह्यांनी बालकांसाठी एक वर्ग सुरू केला होता. पण काही काळानंतर शांताबाई दादरला राहायला गेल्या. याच सुमारास शारदाबाई चितळे यांनी एस.एन.डी.टी. विद्यापीठाची बी.ए. पदवी मिळविली. शांताबाईंनी चालविलेल्या वर्गाचे त्यांनी बालमंदिरात रूपांतर करायचे ठरविले. त्यासाठी ताराबाई मोडक यांच्या दादरमधील शिशुविहारात त्यांनी प्रशिक्षण घेतले.

शिशुशिक्षण व संगोपन ह्या विषयातील तज्ज्ञ इटालियन पंडिता मादाम माँटेसेरी १९३८ मध्ये हिंदुस्थानात चेन्नई जवळील अडियार गावी आल्या होत्या. शारदाबाई अडियारला जाऊन राहिल्या व माँटेसेरी यांच्या हाताखाली त्यांनी प्रशिक्षण घेतले.

पार्ल्याला परत आल्यावर शारदाबाईंनी चितळे ह्यांच्या मदतीने बालमंदिर सुरू केले. ह्या शिक्षणाच्या प्रचारासाठी माहितीपत्रके काढून ती पालकांना दिली. सकाळी अकरा ते दुपारी अडीच वाजेपर्यंत हे मंदिर चालू लागले. एक रुपया फी ठेवली. मुले शाळेत येऊ लागली.

शिक्षणासाठी लागणारी साधने शारदाबाईंनी घरी तयार केली. त्यांचे वडील मराठे ह्यांनी दिलेल्या देणगीतून काही शैक्षणिक साहित्य खरेदी केले. पालकांसाठी त्यांनी ताराबाई मोडकांचे मार्गदर्शक व्याख्यान ठेवले. शैक्षणिक साहित्याचे प्रदर्शन मांडून त्यात प्रात्यक्षिके दाखविली. पालकांमध्ये जागरूकता निर्माण झाली. बालकांची संख्या वाढत गेली. समाजसेवेची आवड असणाऱ्या परिसरातील भगिनींची मदत मिळाली. बाल मंदिराच्या कार्याला गती प्राप्त झाली.

बालकांच्या सर्वांगीण विकासासाठी आरोग्य केंद्र, क्रीडांगण, वाचनालयाची सोय केली. नृत्य, संगीत असे वर्ग सुरू केले. त्या अनुषंगाने स्त्रियांसाठी प्रथमोपचार, पाककला असेही वर्ग आयोजित केले. संस्थेचे काम वाढले.

शारदाबाईंनी बालविकास केंद्राची स्थापना केली. पार्ल्याचे दानशूर नागरिक विष्णू बाळकृष्ण परांजपे यांनी त्यांच्या पत्नी रमाबाई ह्यांच्या स्मरणार्थ सातशे पन्नास चौरस वाराची जागा केंद्रासाठी दिली. या जागेवर ‘सौ. रमाबाई परांजपे बालमंदिर, बालविकास केंद्रा’ची इमारत बांधली. अल्पावधीत शारदाबाईंनी सुरू करून वाढविलेली ही संस्था ‘आदर्श बालमंदिर’ म्हणून ओळखली जाऊ लागली.

– वि. ग.जोशी

**संदर्भ :**

१. *बर्वे रा.ग. व फळसाळकर; संपादक; पार्ल्याचा इतिहास :*

च

## चितांबर, गणेश जयदेव

*अप्पासाहेब चितांबर*

**संस्थापक, मुख्याध्यापक**

**२२ ऑगस्ट १९१४ – ४ सप्टेंबर २००१**



ज्ञानदानासारखी पवित्र गोष्ट जगात कुठलीही नाही. हे ज्ञान महिलांना मिळावे यासाठी स्त्रीशिक्षणाचे प्रणेते महात्मा फुले, महर्षी अण्णासाहेब कर्वे यांचा आदर्श समोर ठेवून गणेश जयदेव उर्फ अप्पासाहेब चितांबर यांनी समविचारी सहकारी शिक्षकांच्या मदतीने १९४३ मध्ये मकरसंक्रांतीच्या दिवशी ‘नवविद्या प्रसारक मंडळाची’ स्थापना केली. १४ जून १९४३ रोजी अहमदनगर येथे तीन मुलींना घेऊन ‘कन्या विद्या मंदिराचा’ शुभारंभ झाला. संस्थापक सदस्य म्हणून श्री. स.चि. वाळिंबे, द.त्रि. कानगो, नानासाहेब देव, श्रीमती मालतीबाई वाळिंबे, वि. मा. थिगळे, रा.स. अष्टेकर, सौ. निर्मलाताई अष्टेकर, श्रीमती कमलाताई वाळिंबे, शंकरराव सभारंजक आणि अप्पासाहेबांच्या धर्मपत्नी पद्माताई चितांबर यांचे सहकार्य लाभले. सर्व सहकाऱ्यांनी तन, मन, धन अर्पण करून, नि:स्वार्थ बुद्धीने स्वत:ला झोकून दिले.

भारतरत्न महर्षी अण्णासाहेब कर्वे यांनी १९४६ मध्ये संस्थेच्या कार्यालयास भेट देऊन अप्पासाहेबांच्या कार्यास आशीर्वाद दिले. केडगांव देवीच्या रस्त्याचे व डोंगरगण नाल्याच्या पाण्याच्या चराचे, अप्पासाहेबांच्या विद्यार्थिनींनी श्रमदानाद्वारे केलेले काम पाहून तत्कालीन जिल्हाधिकारी म.बा. देसाई यांनी सन १९५६ मध्ये संस्थेसाठी मालकीहक्काची जागा व बांधकामाचे साहित्य उपलब्ध करून दिले.

३१ वर्षे मुख्याध्यापक आणि नंतरची २० वर्षे संस्थेचे सचिव म्हणून कार्यरत असणाऱ्या अप्पासाहेबांनी कन्या विद्या मंदिरापाठोपाठ सुरू केलेल्या शारदा विद्या मंदिर, सरस्वती रात्रशाळा, बालक मंदिर, ज्ञान संस्कार मंदिर या सारख्या विविध शाखांमधून शिक्षण घेणाऱ्या हजारो विद्यार्थिनींमध्ये ज्ञान, बल, शील, सेवा या चतु:सूत्रीचा सातत्याने प्रसार केला. या सूत्रांना प्रत्यक्षात आणण्यासाठी भगिनी भेट, गणवेश योजना, सहकार्य पथक, अभ्यास गट, शिस्तीचे गुण, स्वयंशासन मंडळ, सरस्वती पूजन, नाट्याभिनय, वनिता मंडळ, शिवणकला वर्ग, गीत मंच, क्रीडामंडळ, सांस्कृतिक मंडळ यांसारखे उपक्रम राबविले. प्रार्थनेनंतर बातम्या सांगणे व त्यांची अभ्यासाच्या विषयांशी सांगड घालणे, रोजनिशी लेखनाची सवय लावणे अशा योजनांमुळे मुलींच्या सर्वांगीण विकासाला वाव मिळाला.

शाळा चालविणे म्हणजे केवळ मुलींना साक्षर करणे व शालान्त परीक्षा प्रमाणपत्र मिळवून देणे हा अप्पासाहेबांचा उद्देश नव्हता तर शाळेत येणाऱ्या प्रत्येक विद्यार्थिनीवर चांगले संस्कार झाले पाहिजेत, तिचा व्यक्तिमत्व विकास झाला पाहिजे, तिच्या सुप्त गुणांना वाव मिळावयास हवा, ती उत्तम नागरिक बनावी, सुजाण गृहिणी बनावी, तिला आपल्या स्वतंत्र अस्तित्वाची जाणीव होऊन योग्य निर्णय घेता यावेत, तिने भरपूर वाचन करून अद्ययावत ज्ञान संपादन करावे, स्वच्छता, शिस्त, काटेकोरपणा, कामाचे नियोजन करण्याची क्षमता इ. गुणांचा तिने अंगिकार करावा व आयुष्यात कोणत्याही संकटांना न डगमगता सामोरे जाऊन यशस्वी जीवन जगावे यासाठी विविध उपक्रम केवळ राबविले नाहीत तर अपार कष्ट व अथक परिश्रम करून त्यात उत्तुंग यशही मिळविले.

पांढराशुभ्र कोट, पांढरी पँट, तेजोमय चेहरा, डोळ्यावर आकर्षक चष्मा, कपाळावर सदैव रूळणारे केस आणि चेहऱ्यावर स्मित हास्य असे त्यांचे रुप होते. स्वच्छता आणि शिस्तप्रियतेबरोबरच त्यांच्या खाण्यापिण्याच्या साध्या आवडी– निवडी होत्या. साईबाबांबद्दल त्यांच्या मनात अपार निष्ठा होती. आजन्म सेवाभावाचा वसा. दुसऱ्यासाठी जगावे हाच त्यांचा आदर्श.

माध्यमिक शिक्षक संघाच्या कार्यात हिरिरीने भाग घेऊन संघाचे चिटणीस आणि अध्यक्षपदही त्यांनी भूषविले. संघातर्फे एस.टी.सी. चे वर्ग चालवून शहरातील प्रशिक्षित शिक्षकांची गरज भागविण्यासाठी प्रयत्न केला. जिल्हा

माध्यमिक मुख्याध्यापक संघाची स्थापना करून प्रारंभीचे आठ वर्षे चिटणीस म्हणून कामकाज पाहिले. महाराष्ट्र माध्यमिक मुख्याध्यापक संघाच्या कार्यकारिणीचे सदस्य व सरचिटणीस पदही भूषविले. माध्यमिक शिक्षक, मुख्याध्यापकांची कृतिसत्रे, चर्चासत्रे व परिसंवादाचे नियोजन करून सक्रीय सहभाग दिला. विविध वृत्तपत्रे, साप्ताहिके व मासिकांमधून लेखन करून शिक्षकांना मार्गदर्शन केले.

शिक्षक आणि विद्यार्थिनींमध्ये संस्थेविषयी जिव्हाळा आणि प्रेम निर्माण करण्याची अप्पासाहेबांची हातोटी प्रशंसनीय होती. त्यांचे कर्तृत्व पाहून महाराष्ट्र सरकारने त्यांना १९६९ मध्ये राज्य पुरस्कार देऊन गौरविले. नवविद्या प्रसारक मंडळाच्या व सर्व हितचिंतकांच्या वतीने २० डिसेंबर १९७४ रोजी षष्ट्यब्दिपूर्ती समारंभाचे आयोजन करण्यात आले. जून १९७५ मध्ये अप्पासाहेब दीर्घ सेवेतून निवृत्त झाले.

संस्थेच्या सुवर्ण महोत्सवी वर्षामध्ये१९९५साली शिक्षकदिनी संस्थेमार्फत मानपत्र देऊन त्यांचा ऋणनिर्देश करण्यात आला.

आयुष्यभर दुसऱ्यासाठी जगणाऱ्या व इतरांना तसा संदेश देणाऱ्या अप्पासाहेबांचे वयाच्या ८७ व्या वर्षी निधन झाले. त्यांनी मरणोत्तर देहदान केले. संस्थेच्या हीरक महोत्सवी वर्षामध्ये १९ जानेवारी २००३ रोजी संस्थेच्या कन्या विद्यामंदिराचे ''शिक्षणमहर्षी ग.ज. चितांबर विद्यामंदिर'' असे नामकरण करण्यात आले.

– विश्वास काळे

**संदर्भ :**

१. *ग.ज. चितांबर स्मरणिका*

## चित्रे, कृष्णराव महादेव

**१ ऑक्टोबर १९१८**

**संस्थाचालक, सामाजिक कार्यकर्ते**

ठाणे जिल्ह्यातील आदिवासी भागात हयातभर काम केलेले कृष्णराव महादेव चित्रे गुरुजी ठाणे जिल्ह्यात व आसपासच्या परिसरात सुपरिचित आहेत. १९४१ मध्ये



त्यांनी अक्षय तृतीयेच्या मुहूर्तावर 'आदिवासी सेवा मंडळ' या संस्थेचे एक छात्रालय आदिवासी मुलांसाठी सुरू केले. हा त्यांच्या सामाजिक सेवेचा श्रीगणेशा ठरला. आचार्य भिसे, बाळासाहेब खेर व द. न. वांद्रेकर हे त्यांचे मार्गदर्शक होते. आरंभी त्यांनी वाडा येथे मुलामुलींचे छात्रालय, मोखाडा येथे कन्या छात्रालय व तलासरी येथे वनवासी तक्रार निवारण केंद्र सुरू केले. मुंबई प्रांतातली पहिली आश्रमशाळा जव्हार तालुक्यात तलवाडा येथे सुरू करण्यात चित्रे गुरुजींचा मोठा वाटा होता. बावेरा येथे 'बांधिल गड्यां'ची बाँडेड लेबर परिषद भरवली. त्यांच्या प्रचारासाठी गुरुजी आचार्य भिसे यांचे समवेत १५ दिवस गावोगावी खूप फिरले.

आदिवासी सेवा मंडळाचे पूर्णवेळ काम चार दशकांहून अधिक काळ करीत असतानाच चित्रे गुरुजींनी ठाणे जिल्हा सहकारी बँकेत संचालक या नात्याने चार वर्षे काम केले. ठाणे जिल्हा औद्योगिक सहकारी संघाचे उपाध्यक्ष म्हणून दहा वर्षे काम केले. ठाणे जिल्हा सहकारी बोर्डामध्ये संचालकपदी २५ वर्षे काम केले.सहकार हे आवडते क्षेत्र असल्याने वनवासींमध्ये सहकाराची भावना वाढावी म्हणून अनेक वर्षे ते कार्यरत आहेत. संयमशील व शांत वृत्तीच्या गुरुजींना केवळ निःस्वार्थ सेवा प्रिय आहे. ठाणे जिल्हा जंगल कामगार संघ, डहाणू तालुका खरेदी विक्री संघ – संस्थांमध्ये त्यांनी २५ वर्षे सभापती म्हणून काम केले.

– वि. ग. जोशी

## चिपळूणकर, विद्याधर विष्णू

**माजी शिक्षण संचालक, विचारवंत, शिक्षणतज्ज्ञ, शिक्षक**

**१३ एप्रिल १९२९**

विद्याधर विष्णू चिपळूणकर यांचा जन्म मुंबईतील विलेपार्ले येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण मुंबईमधील



पार्ले टिळक विद्यालयात झाले. संस्कृत विषयात बी.ए. केल्यानंतर त्यांनी एम.ए.एम.एड. या पदव्या घेतल्या. १९४८ मध्ये ते खार येथील विद्यामंदिर शाळेत शिक्षक म्हणून रुजू झाले. पुढे १९५६ मध्ये कोकण एज्युकेशन सोसायटीच्या अलिबाग जवळील पोयनाड येथील शाळेत शिक्षक म्हणून रुजू झाले. १९५९ मध्ये राज्य लोकसेवा आयोगामार्फत त्यांची शिक्षण संचालक या पदावर नेमणूक झाली.

त्यांनी महाराष्ट्रात प्रदीर्घ काल, विविध पदांवर, शिक्षण विभागात कार्य केले.कोल्हापूर-मुंबई येथे बी.एड.महाविद्यालयामध्ये त्यांनी प्राचार्य म्हणून कार्य केले. औरंगाबाद येथे शासकीय विद्यानिकेतनमध्ये प्राचार्य म्हणून (१९६६ ते ७१) त्यांनी काम पाहिले.

बीड येथे शिक्षणाधिकारी म्हणून त्यांनी सेवा केली. राज्य शिक्षणशास्त्र संस्था पुणे येथे संचालकपद त्यांनी भूषविले. त्यानंतर पाठ्यपुस्तकमंडळ - बालभारती, पुणे येथे ते संचालक होते. टोकियो येथील शैक्षणिक संशोधन कार्यशाळेत ते सहभागी झालेले होते. राज्याचे शिक्षणसंचालक असताना अनेक शैक्षणिक उपक्रम हाती घेतले. त्यातील काही उपक्रमांचा केंद्रशासनाच्या स्तरावर चिकित्सक अभ्यास होऊन त्यांना मान्यता मिळाली. संपर्काधिष्ठित शालेय गुणविकासाचा कार्यक्रम या योजनेनुसार सर्व प्राथमिक व माध्यमिक शाळांसाठी शाळांची प्रतवारी, शाळानिहाय योजना, शाळा सुधार कार्यक्रम, शाळासमूह संरचना, कार्यक्रमांचे आयोजन, स्थानिक समाजाचा सहभाग, मूल्यमापन आणि अनुधावन अशी सातकलमी उपाययोजना निश्चित करण्यात आली. या सप्तपदीचा प्रयोग स्वतः शिक्षण संचालकांनी दत्तक घेतलेल्या चऱ्होली बुद्रुक वाघेश्वरी विद्यालयाच्या शालासमूहात करून पाहाण्यात आला. केंद्रशासनाने या प्रयत्नांची दखल घेतली. राष्ट्रीय शैक्षणिक व प्रशासन संस्था, नवी दिल्ली (नीपा)यांनी सर्व राज्यांच्या प्रतिनिधींचा एक अभ्यासगट नेमून महाराष्ट्राच्या या योजनेचा अभ्यास केला. केंद्र शासनाने या प्रयोगाची शिफारस सर्व राज्यांना केली.

स्वयंमूल्यमापनातून स्वयंशिक्षण - विकास साधणे हे शिक्षणाचे प्रमुख उद्दिष्ट होय. प्राथमिक शिक्षक, माध्यमिक शिक्षक, मुख्याध्यापक व शिक्षणविस्तार अधिकारी अशा विविध घटकांनी अंतर्मुख होणे, आपल्यातील उणिवांचा शोध घऊन त्या दूर करण्याचा प्रयत्न करण्यासाठी या योजनेचा उपयोग झाला.

आपल्या कार्यातील आनंददायक क्षण शिक्षकांनी टिपणे व त्यावर लेखन करणे असे 'आनंदाचे डोही आनंदतरंग' या उपक्रमाचे स्वरूप होते. 'आणिले वेचुनि अमृतकण' या उपक्रमांतर्गत शिक्षकांनी दररोज किमान दहा पाने तरी वाचावी व एक पान तरी लिहावे,असे सुचविण्यात आले . माध्यमिक स्तरावर विषयशिक्षकांच्या संघटनांना शासनाकडून अर्थसाहाय्य देण्याची योजना आखण्यात आली. त्यातून अभ्यासक्रमाची अंमलबजावणी, अध्ययन - अध्यापन - कार्यात सुधारणा आणि अभ्यासक्रम निर्मिती पाठ्यपुस्तकरचना इ. कार्यात शिक्षकांचे सहकार्य घेण्याचा प्रयत्न झाला.

प्रत्येक अधिकाऱ्याने आपल्या कार्यक्षेत्रातील चांगल्या कामाची दखल घेऊन संबंधित शिक्षक/मुख्याध्यापक यांना गुणग्रहणपत्रे पाठविण्याची योजना सुरु करण्यात आली.

जीवनशिक्षण या नियतकालिकातून शिक्षण संचालक यांनी अंदाजे १५ महिने शिक्षकांशी हितगुज करणारी पत्रे प्रसिद्ध केली.

औरंगाबाद येथे १९६६ ते ७१ या कालखंडात शासकीय विद्यानिकेतनमध्ये प्राचार्य असताना विद्यार्थ्यांसाठी चिपळूणकर यांनी 'समाजाचा एक घटक' या नात्याने, 'माणूस म्हणून जगण्याची क्षमता विकसित करते ते शिक्षण' हा पायाभूत विचार लक्षात घेऊन विद्यार्थ्यांमध्ये सामाजिक, व्यावसायिक, बौद्धिक, भावनिक, शारीरिक, नैतिक, नेतृत्वविषयक, व्यावहारिक आणि अध्यात्मिक क्षमतांचा विकास व्हावा यासाठी २५

गुणांची एक पडताळासूची विकसित केली होती. इयत्ता पहिलीत प्रवेश केलेल्या विद्यार्थ्यांचे प्राथमिक शाळेत स्वागत करण्यात येऊ लागले. शाळा व शिक्षक यांच्याबद्दल आपुलकी निर्माण करणे हा या उपक्रमाचा उद्देश होता.

मुलींसाठी शिक्षण मोफत केले असले तरी कित्येक मुलींच्या कपडे, वह्या, चपला इ. गरजांची पूर्तता होत नाही. हे लक्षात घेऊन समाजाच्या सहकार्याने एकेका मुलीसाठी दरमहा पंचवीस रुपये देऊन तिचे दत्तकपालकत्व स्वीकारण्याची सावित्रीबाई फुले दत्तक-पालक योजना सुरू करण्यात आली. सावित्रीबाई फुले यांच्या नायगाव या गावातील गरजू मुलींचे दत्तक पालकत्व स्वीकारून चिपळूणकर यांनी या योजनेचा शुभारंभ केला. अल्पावधीत या योजनेचा लाभ राज्यातील दीड लाख मुलींना मिळू लागला. देशाच्या पंतप्रधानांनी या योजनेत विशेष रस घेऊन व केंद्रशासनाच्या शिक्षणसल्लागार मंडळाने या योजनेची शिफारस देशातील सर्व राज्यांना केली.

प्रशासनयंत्रणेतील आपल्या सर्व सहकाऱ्यांना आपण दौऱ्यात काय पाहिले व ऐकले ते कळावे यासाठी व शिक्षणविकासाला पोषक वातावरण निर्माण व्हावे यासाठी वि. वि. चिपळूणकर दर महिन्याला चक्रमुद्रित संपर्क - पत्रिका पाठवीत असत.

'शिक्षणाकडून सामाजिक विकासाकडे' हा प्रकल्प सुरू करण्यात आला. प्रौढ महिलांच्या शिक्षणाला व विकासाला अधिक गती देण्यासाठी 'माहेर' हा प्रकल्प सुरू करण्यात आला होता.

चिपळूणकर यांनी असे विविध उपक्रम अंमलात आणण्याचे प्रयत्न केले. चिपळूणकर हे कल्पक, उपक्रमशील विचारवंत, त्याचप्रमाणे अत्यंत प्रभावी वक्ते आहेत. आपल्या वाणीने व शिक्षणविषयक तळमळीने त्यांनी अवघा महाराष्ट्र भारावून टाकला. मराठी, संस्कृत, इंग्रजी या भाषांवर त्यांचे प्रभुत्व आहे. श्रोत्यांना विश्वासात घेऊन ते त्यांना विचारप्रवृत्त करतात. त्यांना कृतीची प्रेरणा ते देतात. आचार्य विनोबा भावे, महात्मा गांधी, स्वामी विवेकानंद इ. विचारवंतांचे वाङ्मय त्यांच्या चिंतनाचे विषय आहेत. श्रीमद्भगवद्गीता, दासबोध, श्री ज्ञानेश्वरी इ. ग्रंथांचा त्यांचा अभ्यास आहे.

शिक्षण विषयाच्या चिंतनातून भारतीय तत्त्वज्ञानाच्या अभ्यासातून प्रत्यक्ष शैक्षणिक उपक्रम केल्याने त्यांना सहज शिक्षणाच्या व्याख्या सुचत जातात. भारतीय तत्त्वज्ञानाच्या चिंतनातून काही शिक्षणविषयक व्याख्या चिपळूणकरांनी सिद्ध केल्या आहेत. त्यातील एक सोपी, सुटसुटीत व्याख्या सर्वतोमुखी झाली आहे. 'शिक्षा म्हणजे वळण, दळण नव्हे !' हीच ती व्याख्या. 'क्षणाक्षणाला जे शिकविते ते शिक्षण' किंवा 'नीतिमानांच्या सहवासात जे मिळते ते शिक्षण'. अशा काही सोप्या व्याख्या त्यांनी केल्या आहेत.

विद्यार्थी शिक्षकपरायण असावा. शिक्षक विद्यार्थीपरायण असावा. दोघेही ज्ञानपरायण असावेत आणि ज्ञानसेवापरायण असावेत. ही विनोबांची चतुःसूत्री सर्वश्रुत आहे. शिक्षण व समाजजीवन यांच्या परस्परसंबंधीच्या संदर्भात चिपळूणकर सुचवितात :शिक्षणसंस्था समाजाभिमुख असाव्यात, समाज शिक्षणाभिमुख व्हावा, शिक्षण विकासाभिमुख व्हावे, शैक्षणिक व्यवस्थापन शिक्षकाभिमुख व्हावे, शिक्षण छात्राभिमुख व्हावे, छात्र ज्ञान - विज्ञान - तंत्रज्ञानाभिमुख व्हावे आणि ज्ञान - विज्ञान - तंत्रज्ञान विश्वकल्याणाभिमुख व्हावे.

त्यांनी आकाशवाणी, दूरदर्शनवर भाषणे दिली आहेत व मुलाखतीत सहभाग घेतला आहे. त्यांनी शैक्षणिक विषयांवर सुमारे १०० लेख लिहिले आहेत व संपर्क पत्रिकांमधील लेखन केले आहे.

त्यांनी निवृत्तीनंतर औरंगाबाद येथे १०-१२ वर्षे गीता वर्ग घेतले. त्यांनी 'जीवनसंस्कार' हे पुस्तक लिहिले. त्यांनी ज्येष्ठ नागरिक संघाची स्थापना केली. त्यातून 'गीताभवन' साकार झाले. १९९२ ते ९५ या काळात औरंगाबाद येथील प्रौढ शिक्षण योजनेमध्ये त्यांनी संचालक म्हणून काम केले. त्याबद्द्ल महाराष्ट्र शासनाने त्यांना पुरस्कृत केले आहे.

- श्री. वा. कुलकर्णी

**संदर्भ :**

१. प्रा. वसंत कुंभोजकर, प्रा. डॉ. चंद्रकांत धांडे, प्रा. भगवान

च

काळे व प्रा. डॉ. वनमाला पानसे, संपादक; 'विद्याश्री; गुरुवर्य वि. वि. चिपळूणकर' गौरव समिती (औरंगाबाद); सप्टेंबर २००४.
२. मालती देशपांडे, संपादक; 'उत्कृष्टाचा ध्यास'; पुणे विद्यार्थी गृह, पुणे, २ जानेवारी २००७.
३. डॉ. राजेंद्र मलोसे; 'स्वप्नपंख'; देशमुख आणि कंपनी पुणे.

च

## चिपळूणकर, विष्णुशास्त्री कृष्णशास्त्री

☞ **मुख्य नोंद – साहित्य खंड**

## चॅपलीन, विल्यम

**संस्थापक**

**जन्ममृत्यू दिनांक अनुपलब्ध**

इंग्रजी शिक्षणाद्वारे नव्या शास्त्रांची लोकांना ओळख करुन द्यावी अशी इंग्रज अधिकाऱ्यांची इच्छा होती त्यासाठी सन १८२१ मध्ये पुण्यात हिंदू शास्त्रांचे शिक्षण देणारे संस्कृत महाविद्यालय सुरू करण्याचा निर्णय झाला. तत्पूर्वी लोकांना विश्वासात घेण्याच्या उद्देशाने कमिशनर विल्यम चॅपलीन याने दसऱ्याच्या दिवशी पेशव्यांचे निवासस्थान विश्रामबाग वाडा येथे दरबार आयोजित केला व जमलेल्या समुदायास आपली योजना सादर केली.

पेशवे दक्षिणा रुपाने विद्यावेतन वाटत. पण इंग्रज सरकारने फक्त ५०,००० मंजूर केले. त्यातील रु. तीस हजार दक्षिणा रूपाने वाटावयाचे व उरलेले रु. वीस हजार नव्या पध्दतीच्या शिक्षणासाठी खर्च करायचे असे ठरले. चॅपलीनने या वीस हजारांची योजना तयार केली. विद्यार्थ्यांसाठी मराठी पुस्तके तयार करणे, महाविद्यालयामधील शिक्षकास पगार, विद्यार्थ्यांना विद्यावेतन (दक्षिणा फेलोशिप) महाविद्यालयातील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांवरील खर्च, ग्रंथालय इत्यादी बाबींवर दक्षिणा फंडातून खर्च करायचे ठरले.

चॅपलीन योजनेत अनेक महत्वाच्या गोष्टींबाबत निर्णय घेण्यात आले, या योजनेत दहा विषय शिकवण्याची व्यवस्था करण्यात आली. ते असे, व्याकरण, अलंकार, न्याय, धर्मशास्त्र, ज्योतिष, वेदांत, वैद्यक, ऋग्वेद, व यजुर्वेदाच्या दोन शाखा. विषय निवडीबाबत विद्यार्थ्यांना स्वातंत्र्य होते. पण फक्त वेदांचे अध्ययन करता येत नसे. वेदांबरोबर अन्य विषयही अभ्यासणे जरुरीचे होते. कायदा, गणित व वैद्यक या विषयांना प्राधान्य दिले होते. हे विषय शिकणाऱ्यांना प्रोत्साहनपर जास्त विद्यावेतन दिले जाई. धर्मशास्त्र व न्याय विषय शिकणाऱ्यास न्यायालयातील विवाद सोडविण्यास मदत करावी लागे. त्यांना आपले मत द्यावे लागे.

महाविद्यालयामध्ये एकूण १०० विद्यार्थ्यांना प्रवेश मिळे. दहा गुरु नेमले होते व प्रत्येक गुरुकडे दहा विद्यार्थी शिकत, दहापैकी कोणत्याही एका शास्त्रात प्राथमिक शिक्षण झालेल्या विद्यार्थ्याला प्रवेश मिळे. सर्वसाधारणपणे दहाव्या वर्षी विद्यार्थ्यांना महाविद्यालयात प्रवेश मिळे. विद्यार्थ्याला त्याच्या शास्त्राचा अभ्यास पूर्ण करण्यासाठी सात ते बारा वर्षे लागत. दक्षिणा फंडातून होतकरु विद्यार्थ्यांना दरमहा पाच रुपये विद्यावेतन देण्याची योजना करण्यात आली. मासिक पाच रुपयांशिवाय काही विद्यार्थ्यांना वर्षाअखेर त्यांच्या प्राविण्यानुसार बक्षिसही दिले जाई.

पेशवाईचा अंत झाल्यावर सन १८१८ मध्ये पेशव्यांच्या निवासस्थानास कुलूप घालण्यात आले. सन १८२१ मध्ये संस्कृत महाविद्यालय सुरु करण्याचे ठरल्यावर पुण्याचा कमिशनर चॅपलीन याने वाड्याचे कुलूप काढले व तो वाडा संस्कृत महाविद्यालयाला दिला. त्यात गुरु व विद्यार्थी यांची राहण्याची व्यवस्था करण्यात आली. तसेच महाविद्यालयाचे कार्यालय व अध्यापनाचे वर्गही पेशवेवाड्यात (विश्रामबाग वाडा) होते. महाविद्यालय जून मध्ये सुरू होई व परीक्षा एप्रिलमध्ये घेण्यात येत. पेशव्यांचे खाजगी ग्रंथालय होते. तेथील सर्व पुस्तके, पोथ्या महाविद्यालयाला देण्यात आल्या. महाविद्यालयाचे पहिले प्राचार्य म्हणून राघवाचार्य रामानुज यांची नेमणूक झाली. चॅपलीनने गुरु व उपगुरु ही दोन पदे निर्माण केली. त्यांचे काम अध्यापनाचे होते. आचार्यांना दरमहा रु. १०० व पंडितांना रु. ६० हा पगार ठरला गेला. वैदिकांना मात्र रु. ४० मिळत.

दक्षिणारुपाने ब्राह्मणांना विद्यावेतन दिले जाई. अनेकजण पाठशाळा चालवत त्यांना दक्षिणारुपाने मदत केली जाई. पुण्याचा कमिशनर विल्यम चॅपलीन याने त्याबाबत नियम केले. दक्षिणा वाटण्यासाठी पाच शास्त्र्यांची समिती नेमली. दक्षिणा मागण्यास आलेल्या ब्राह्मणांची परिक्षा घेऊन मगच दक्षिणा द्यावी असे चॅपलीनने सुचविले. पहिल्या वर्षी २६७५ ब्राह्मणांची परीक्षा घेऊन त्यांना रु. ५४,४०४ दक्षिणा रूपाने दिले. दरवर्षी ही रक्कम कमी होई व १८२४ मध्ये (चॅपलीन काळात) फक्त तीस हजार रुपये दक्षिणा रूपाने वाटले.

पुण्यात आधुनिक संस्थामय शिक्षणाची सुरुवात विल्यम चॅपलीन या पुण्याच्या कमिशनरच्या पुढाकाराने झाली. त्याने संस्कृत महाविद्यालय ही संस्था सुरू केली. त्यासाठी आवश्यक असणारी पायाभूत संरचना त्याने उभारली. इमारत, ग्रंथालय, शिक्षक, विद्यार्थी, प्रवेशाचे नियम, परीक्षा, शिक्षकांची आवश्यक कौशल्ये, विद्यावेतन ह्या सर्व प्राथमिक बाबींबाबत चॅपलीनने यथार्थ निर्णय घेतले व नियम घालून दिले. महाराष्ट्रातील आधुनिक शिक्षणाचा शिल्पकार म्हणून त्याला गौरवणे योग्यच होईल.

– डॉ. नीळकंठ बापट

## चोळकर, गोविंद गणेश
**संस्थापक**
**१८९५ – २० ऑक्टोबर १९५१**

गोविंद गणेश तथा काकासाहेब चोळकर ह्यांचा जन्म मुंबईत एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांचे शालेय शिक्षण मुंबईतच झाले. त्यानंतर समाजसेवा करावयाची असे ठरवून काकासाहेब नागपूरला आले. तेथे त्यांचे चुलतभाऊ डॉ. मो. रा. उर्फ तात्यासाहेब चोळकर यांच्यामुळे ते राष्ट्रीय स्वयंसेवक संघात दाखल झाले आणि स्वातंत्र्य चळवळीत त्यांनी भाग घेतला. जनसंपर्कामुळे समाजातील अनाथ, निराधार मुलांची दयनीय अवस्था त्यांनी पाहिली. डॉ. भवानी शंकर नियोगी, डॉ. ना. भा. खरे, डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार, डॉ. मो. रा. चोळकर, डॉ. ल. रा. परांजपे, दाजीसाहेब बुटी अशा समविचारी



सहकाऱ्यांच्या सहकार्याने काकासाहेबांनी २६ ऑगस्ट १९२२ रोजी राजे लक्ष्मणराव भोसले ह्यांच्या नागपूरमधील महाल येथील राजवाड्यात ‘अनाथ विद्यार्थी गृहा’ची स्थापना केली. पहिल्या दिवशी पाच मुले होती.

पुढील काळात मुलांची संख्या व संस्थेचा व्याप वाढू लागला. जागेची अडचण भासू लागली. तेव्हा नागपूर म्युनिसिपल कौन्सिलचे अध्यक्ष डॉ. भवानीशंकर नियोगी व उपाध्यक्ष डॉ. मो. रा. चोळकर ह्यांनी १९२६ मध्ये पूर्व नागपूरमधील लकडगंज विभागातील पाच एकर जागा संस्थेला उपलब्ध करून दिली. १९२८ मध्ये त्यांनीच पुन्हा दीड एकर जागा दिली. त्यामुळे वसतिगृह, स्वयंपाकगृह, विनायकराव देशमुख विद्यालय बांधता आले.

प्रारंभी काकासाहेब एका कंपनीत नोकरी करत होते. पण संस्थेचा व्याप वाढल्याने त्यांनी नोकरी सोडली. आता सर्व वेळ त्यांना संस्थेच्या कामासाठी मिळाला. विद्यार्थी गृहातील विद्यार्थ्यांच्या विकासाच्या दृष्टीने त्यांचे प्रयत्न सुरू झाले. त्यांनी विद्यार्थ्यांची दिनचर्या ठरवून दिली. त्यात परिसर स्वच्छता, स्वयंपाक, मुलांना वाढणे, भांडी घासणे, कपडे धुणे, आजारी मुलांची शुश्रूषा, दळण आणणे, रात्रीच्या वेळी रखवाली करणे ह्या गोष्टीही ठरवून दिल्या. व्यायामाला, बलोपासनेलाही त्यांनी महत्त्व दिले. मुलांनी लष्करी शिक्षण घ्यावे असा त्यांचा आग्रह असे.

रात्री झोपण्यापूर्वीची प्रार्थना, रामरक्षा म्हणणे, दासबोधाचे वाचन हे सर्वांसाठी अत्यावश्यक असे. मुलांचे पालक व शिक्षक या दोन्ही भूमिका काकासाहेबांनी उत्तम प्रकारे निभावल्या. नागपूरमधील विविध कार्यक्रमांना ते मुलांना नेत. वाचनाची आवड निर्माण व्हावी म्हणून संस्थेने ‘स्व. बॅरिस्टर गोविंदराव देशमुख स्मृती वाचनालय’ सुरू केले. सर्व जातीधर्माची मुले एकत्र राहत. त्यातून राष्ट्रीय एकात्मतेचे धडे मिळत. काकासाहेबांनी अविवाहित राहून आयुष्याचा प्रत्येक क्षण संस्थेसाठी वेचला. ते संस्थेतच

च

राहत. मुलांसाठी केलेले भोजन घेत. कामासाठी सगळीकडे मोटारसायकलने प्रवास करीत.

संस्थेच्या मुलांना संस्थेच्या परिसरात शिक्षण घेता यावे म्हणून मुंबईचे प्रसिद्ध शल्यतज्ज्ञ डॉ. गोपाळराव देशमुख ह्यांनी दिलेल्या तेरा हजार रुपयांच्या देणगीतून १९२८ मध्ये त्यांनी 'विनायकराव देशमुख विद्यालय'ची स्थापना केली. आज संस्थेच्या परिसरात तीन विद्यालये, तीन कनिष्ठ महाविद्यालये आहेत. त्यातून परिसरातील पाच हजार मुलांच्या शिक्षणाची सोय झाली आहे. संस्थेचे अनेक नामवंत माजी विद्यार्थी विविध क्षेत्रांतून मोठी कामगिरी बजावत आहेत. काकासाहेबांच्या तालमीत तयार झालेले निष्ठावंत कार्यकर्ते संस्थेसाठी कार्य करीत आहेत.

समाजातील सर्व स्तरांतील पाच ते अठरा वयोगटातील अनाथ मुलांना संस्थेत प्रवेश मिळतो. त्यांचे संगोपन, शिक्षण व पुनर्वसन संस्था करते. या कार्यासाठी महाराष्ट्र शासनाने संस्थेला 'दलित मित्र' पुरस्काराने सन्मानित केले आहे. संस्थेत सर्व जातीधर्मांची अनाथ मुले आहेत. संस्थेच्या स्वत:च्या इमारती, वाचनालये, प्रयोगशाळा, विस्तीर्ण क्रीडांगणे ह्यांनी सुसज्ज आहेत. संस्थेतील अनुभवी, तज्ज्ञ शिक्षकांच्या माध्यमातून मुलांना औपचारिक व अनौपचारिक शिक्षण दिले जाते. व्यावसायिक शिक्षणाचीही सोय येथे आहे. दि. ६ मार्च १९९६ रोजी संस्थेतच प्राथमिक स्वास्थ्य केंद्राची निर्मिती झाली. त्यासाठी समाजातील डॉक्टरांचे सहकार्य मिळत आहे.

– प्राचार्य डॉ. सुधीर बोधनकर

## चौधरी, धनाजी रावजी

**संस्थापक**

**१४ मे १८९१ – २९ डिसेंबर १९५२**

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

धनाजी रावजी चौधरी यांना इतिहासात मानाचे स्थान आहे. कारण अखिल भारतीय काँग्रेसचे अधिवेशन फैजपूर येथे घडविण्यात धनाजी नानांचा हात होता. खिरोदा हे धनाजी नानांचे गाव. स्वातंत्र्य आंदोलनाच्या काळात या गावची महती देशपातळीवर जाऊन पोचली. महात्मा गांधीजींकडून प्रेरणा घेऊन धनाजी नानांनी राष्ट्रीय कार्य करणारा एक आश्रम खिरोद्याला सुरु केला. खादी, रंगकाम व चर्मोद्योग यांचे प्रशिक्षणाचे काम सुरु केले. ते वर्ष होते १९३१. 'स्वराज्य आश्रमा'ने अनेक स्वाभिमानी, देशाभिमानी तरुण निर्माण केले.

१९३२ च्या चळवळीत हा आश्रम सरकारने जप्त केला. १९३२ च्या असहकार चळवळीत खिरोदा गावातील ७५ स्त्रीपुरुष कारागृहामध्ये गेले. धनाजी नाना व त्यांच्या सहकाऱ्यांच्या आग्रहाने २७ ते २९ डिसेंबर १९३६ या काळात फैजपूरला काँग्रेसचे अधिवेशन झाले.

१९३६ ला स्वराज्य आश्रमाचे रुपांतर राष्ट्रीय शाळेत झाले. तसेच राष्ट्रभाषा प्रचार समितीची स्थापना त्याच वर्षी झाली. राष्ट्रीय शाळेमध्ये गांधीप्रणित नई तालीम पद्धतीचे शिक्षण दिले जाई. कताई, विणाई, चर्मोद्योग, हातकागद, तेलघाणी, राष्ट्रभाषा प्रचार असे कार्य या शाळेतून चाले.

१९४२ च्या चळवळीने 'भारत छोडो' संपूर्ण देशात जोर पकडला. या शाळेतही कार्यक्रम झाला. धनाजी नानांना अटक झाली. त्याचबरोबर शाळेतील २५ मुलांनाही कारागृहामध्ये डांबले, त्यात धनाजी नानांचे पुत्र मधुकरराव चौधरी ही होते.

धनाजी नानांनी आदिवासी भागासाठी जी सर्वोदय योजना देशभर सुरू झाली होती त्यात सहभाग घेतला. २५ गावांचे सर्वेक्षण केले. सातपुड्याच्या आदिवासींच्या घराघरात जाऊन परिस्थिती समजून घेतली, माहिती गोळा केली व आकडेवारी मिळविली.

१) वन्य पशूंचा उपद्रव रोखणे २) स्त्रियांना कामाच्या प्रचंड ओढ्यातून मुक्त करण्यासाठी पीठ गिरण्या सुरु करणे ३) प्रत्येक गावासाठी पाणी पुरवठा योजना राबविणे हे कार्यक्रम त्यात राबविण्यात आले.

शोषणाविरुद्ध, आर्थिक सामाजिक विषमतेविरुद्ध सतत ते संघर्ष करीत राहिले. त्यामुळे शोषणकर्ते, सावकार, ठेकेदार यांचा स्वार्थ दुखावला गेला. भाडोत्री आदिवासींच्या करवी २९ डिसेंबर १९५२ रोजी रात्री

त्यांच्या राहत्या घरी त्यांची हत्या करण्यात आली. धनाजी नानांनी खिरोद्याला आश्रम सुरू केला. त्यातून राष्ट्रीय चळवळीत भाग घेण्यास प्रेरणा लाभली. खिरोद्यात पुढे जनता शिक्षण मंडळ सुरू झाले. साने गुरुजी विद्या प्रबोधिनीचे बी.एड. महाविद्यालय यांनी महाराष्ट्राला गुणवंत शिक्षक, चित्रकार, शिल्पकार, समाजसुधारक अनेक शिक्षणप्रेमी मंडळी दिली. त्यामुळेच धनाजी नानांची स्मृती म्हणून फैजपूरच्या संस्थेने कला, वाणिज्य, विज्ञान महाविद्यालय हे धनाजी नानांच्या नावे प्रसिद्ध केले.

– म. ल. नानकर

## चौहान, देविसिंह

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

* * *

च




छ

## छापेकर, लक्ष्मण नीळकंठ
**शिक्षक, प्राचार्य**
**१३ सप्टेंबर १९०७ – ६ फेब्रुवारी १९८६**



लक्ष्मण नीळकंठ छापेकर उर्फ आण्णासाहेब यांनी बी. ए. चे शिक्षण पूर्ण करुन १९३३ मध्ये शिक्षकी पेशा स्वीकारला. १९३९ ला बी.टी परीक्षेत मुंबई राज्यात ते सर्वप्रथम आले. त्याच वर्षी ला. ना. सार्वजनिक विद्यालय जळगावचे ते मुख्याध्यापक झाले. १९४२ ते १९५६ चाळीसगाव येथे आ. व्यं. विद्यालयाचे मुख्याध्यापक होते. त्याच वेळी प्राथमिक अध्यापक विद्यालयाचे प्राचार्य म्हणून त्यांनी धुरा सांभाळली. पुन्हा १९५६ ते १९६२ या कालखंडात ला. ना. सार्वजनिक विद्यालय जळगाव येथे मुख्याध्यापक पदी विराजमान झाले.

अध्ययन, अध्यापनाबरोबर लेखन, संपादन हा छंद आण्णासाहेबांना लहानपणापासूनच होता. या छंदामुळे त्यांनी विविध लेखनकार्य केले. सर परशुरामभाऊ महाविद्यालय, पुणे येथे शिकत असतांनाच सकाळ, ज्ञानप्रकाश यात लेखन केले. शिक्षक म्हणून रुजू झाल्यावर प्रागतिक साप्ताहिकात संपादक झाले. तसेच विजय साप्ताहिकाचेही संपादन केले. लेखनाचा सतत व्यासंग जोपासला. ‘उसना मेवा’, ‘मुलांचे स्वराज्य’, ‘असे होतात संस्कार’, ‘सहज शिक्षण जीवन सुगंध’, असे ग्रंथलेखन केले. ‘उद्यापन’ हा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला, क्रमिक पुस्तकांचे संपादन केले. त्यामुळेच पाठ्यपुस्तक मंडळाच्या बालभारती पहिली ते सातवीच्या पाठ्यपुस्तकांच्या संपादनाचे काम त्यांच्याकडे आले. त्यांनी शिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी प्रशिक्षण महाविद्यालय सुरु केले. अभ्यासक्रम बनविला. शाळेला प्रयोग मंदिर समजून हर्बार्ट, फ्रोबेल, पेस्टॅलॉसी, माँटेसरी, ताराबाई मोडक यांच्याप्रमाणेच स्वतःच्या कल्पनांवर आधारित शैक्षणिक प्रयोग केले. पाठ्यपुस्तक मंडळाच्या पाठ्यपुस्तकांच्या उत्तम अध्यापनासाठी पहिली ते चौथीच्या अध्यापन पुस्तिका बनविल्या. शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका, पाठ्यपुस्तकांचे संशोधनात्मक समीक्षण करविले. पूर्व प्राथमिक अध्यापन कार्यपुस्तिका बनवून बालशिक्षणाचे महत्त्व पटविले. या सर्व लेखन प्रवासामुळे अनेक शिक्षणप्रेमींशी परिचय वाढला. अनेक शासकीय व अशासकीय समित्यांवर कार्य करता आले. गांधी शिक्षण भवन मुंबई या संस्थेद्वारा शिक्षणावर वाहिलेले ‘विनयन’ या त्रैमासिकांचे संपादन करता आले.

१९५८ मध्ये माध्यमिक शाळा मुख्याध्यापक संघाच्या पुणे येथे झालेल्या अधिवेशनाचे अध्यक्ष झाले. शिक्षकांच्या, मुख्याध्यापकांच्या प्रश्नांना त्यांनी वाचा फोडली. त्यामुळेच १९५९ मध्ये मुंबई राज्य विधानपरिषदेचे (शिक्षक प्रतिनिधी) म्हणून निवड झाली. शासन दरबारी शिक्षक विषयक अनेक प्रश्न सोडविता आले. १९६२ ला ते सेवानिवृत्त झाले. पुढे अण्णासाहेब पुणे विद्यापीठात सिनेट सदस्य, मराठी भाषा संचलनालय, महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, मराठी साहित्य परिषद, राज्य माध्यमिक शिक्षण मंडळ अशा विविध समित्यांवर पदाधिकारी व सदस्य म्हणून कार्यरत झाले.

अण्णासाहेबांनी शिक्षण, अध्ययन, अध्यापन, अध्यापक, शालेय अनुशासन, माध्यमिक शाळांतील शिक्षक, विद्यार्थी, पालक यांच्या संबंधीची कितीतरी

व्याख्याने ठिकठिकाणी महाराष्ट्रात दिली. शिक्षणक्षेत्राविषयी आंतरिक तळमळ असल्याने अण्णासाहेबांचे काम १९६२ साली सेवानिवृत्त झाल्यावरही चालू राहिले.

प्राचीन ते अर्वाचीन सर्व लेखक, कवी यांच्या लेखन संग्रहातून धडे, कविता निवडाव्या लागत. अण्णासाहेबांच्या व्यासंगाने, दूरदृष्टीने हे काम पूर्ण होऊ शकले. त्यामुळेच महाराष्ट्रातल्या सर्व विद्यार्थ्यांपर्यंत उत्तम दर्जाची पाठ्यपुस्तके जाऊन पोहोचली.

अण्णासाहेबांचा १९७६ मध्ये चाळीसगाव येथे डॉ. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हस्ते गौरव करण्यात आला. तसेच पुण्यास भारतातील थोर शिक्षणतज्ज्ञ डॉ. जे. पी. नाईक यांनी गौरव केला. हा त्यांचा सर्वोच्च गौरव होता.महाराष्ट्रातील शिक्षणमंत्र्यांमध्ये ज्यांचे नाव ‘श्वेतपत्रिकेचे जनक’ म्हणून घेतले जाते, त्या मधुकरराव चौधरींच्या हस्ते अण्णासाहेबांचा गौरवग्रंथ प्रसिद्ध झाला.

अण्णासाहेबांनी आयुष्यभर स्वदेशीचा पुरस्कार केला. विनोबांची आचार्यकुलाची कल्पना महाराष्ट्रात रुजविण्यात त्यांचा वाटा आहे.आजही महाराष्ट्रातील बी. एड्. महाविद्यालयामध्ये वक्तृत्व स्पर्धा, निबंध स्पर्धा आयोजित केल्या जातात व ल. नी. छापेकरांची स्मृती जागवली जाते. छापेकरांचे देहावसान ६ फेब्रु. १९८६ रोजी झाले.

– प्राचार्य म. ल. नानकर

* * *

छ

# ज

## जगताप, बाबूराव गणपत

**संस्थापक, संपादक, लेखक**

**१७ ऑगस्ट १८८८ - १ ऑक्टोबर १९७८**



बाबूराव गणपतराव जगताप यांचा जन्म पुणे येथे झाला. दुर्दैवाने १८९७ च्या प्लेगच्या साथीत त्यांचे आईवडील व बहीणभावंडे सर्वजण दगावले. पोरक्या झालेल्या बाबूला चुलते रावबहादूर रामा पांडू यांनी आधार देऊन पदवीधर केले. नू. म. वि. व फर्गसन महाविद्यालयामध्ये शिकताना त्यांनी चित्रकला व क्रिकेटमध्ये प्रावीण्य मिळविले. बालपणापासून त्यांचे आराध्यदैवत व मार्गदर्शक होते महर्षी विठ्ठल रामजी शिंदे. पुण्याच्या पूर्वभागात राहणाऱ्या कष्टकरी बहुजन समाजाच्या प्रगतीसाठी शिक्षणाशिवाय पर्याय नाही हे ओळखून महर्षींच्या व लक्ष्मणपंत ठोसर यांच्या मार्गदर्शनाखाली बाबूरावांनी विद्यार्थीदशेतच आपले शैक्षणिक कार्य सुरू केले. उदा. गरीब विद्यार्थ्यांना पुस्तके मिळवून देणे, वाचनालय चालविणे, विद्यार्थ्यांना अभ्यासात मदत करणे इत्यादी. त्यातूनच 'मराठा स्टुडंटस् ब्रदरहुड' व 'महाराष्ट्र हितचिंतक भ्रातृमंडळ' या संस्था स्थापन झाल्या. त्यांनी उशिरा १९२८ मध्ये मुंबईतील 'सेकंडरी टीचर्स ट्रेनिंग विद्यालया'मधून बी. टी. पूर्ण केले.

बी. ए. झाल्यानंतर चुलत्याच्या आग्रहामुळे त्यांनी नाशिक येथे पोलिस प्रशिक्षण घेतले. नंतर ते दोन वर्षे बडोद्याचे श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांचे ए. डी. सी. (शरीर रक्षक) होते, पण शिक्षण व समाजसेवेची त्यांना मुळातच आवड असल्यामुळे ते बडोद्यात रमले नाहीत.

चांगली मानाची नोकरी सोडून ते पुण्यात आले आणि बाबूरावांनी सन १९१८ मध्ये शुक्रवार पेठेत अवघ्या तीन मुलांना मिळवून एका खोलीत 'श्री शिवाजी मराठा शाळा' शाळा सुरू केली. शाळेसाठी त्यांनी 'बहुजन समाजाच्या उन्नतिप्रीत्यर्थ' हे ध्येयवाक्य निवडले. सुरुवातीच्या काळात शाळेची स्वच्छता, घंटा देणे या सारख्या गोष्टीसुद्धा अध्यापनाबरोबर केल्या. हळूहळू विद्यार्थी संख्या वाढत गेली. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीतून मार्ग काढून आणि स्वत: आर्थिक हानी सहन करून त्यांनी श्री शिवाजी मराठा शाळेला नावारूपाला आणले. या निरपेक्ष कार्यातील त्यांची तळमळ व कष्ट बघून समाजाने त्यांना सहकार्याचा हात दिला. म्हणूनच ते 'श्री शिवाजी मराठा शाळे' चे संस्थापक ठरतात. लवकरच काही ध्येयवादी तरुण एकत्र येऊन त्यांनी 'श्री शिवाजी मराठा सोसायटी' स्थापन केली. तिची आर्थिक मदत शाळेला झाली. 'श्री शिवाजी मराठा सोसायटी'ची अशी एखादी शाळा असावी असा सोसायटीचा विचार झाल्यामुळे बाबूरावांचे 'श्री शिवाजी शाळा व सोसायटी' या दोन्ही संस्था एक झाल्या. त्यामुळे सर्वांच्या शिक्षणकार्याला गती मिळाली.

विद्यार्थ्यांचा विकास चांगला माणूस म्हणून होण्याच्या दृष्टीने त्यांनी शाळेत अनेक संस्कारक्षम उपक्रम सुरू केले. त्या उपक्रमांतून त्यांनी पुण्याच्या पूर्व भागातील बहुजन समाज घडविला. त्यांच्या शिक्षणकार्याला समाजभूषण अप्पासाहेब जेधे व राजर्षी शाहू छत्रपती यांनी मनापासून साथ तर दिलीच पण आर्थिक मदतही केली. त्यांच्या कार्याची वैचारिक पार्श्वभूमी भक्कम मूल्यसंस्काराच्या पायावर आधारलेली होती. म. गांधीजींबद्दल त्यांच्या मनात कमालीचा आदर होता. ते दररोज दोन तास चरख्यावर सूत कातत, कातलेल्या गुंड्या देऊन कापड

विणून घेत. त्याच कापडातून सदरा, विजार शिवून घेत. जीवनाच्या अखेरपर्यंत त्यांनी चरख्याची सोबत सोडली नाही. दर रविवारी स्पृश्य-अस्पृश्य जातीची अनेक कुटुंबे एकत्र येऊन प्रार्थना समाजाची उपासना व नंतर सहभोजन करीत. षट्यब्दीपूर्ती सत्कार समारंभात त्यांना एकसष्ट हजारांची मिळालेली थैली त्यांनी परत करून 'गांधी ट्रेनिंग कॉलेज'च्या इमारती बांधण्यासाठी ती खर्च करावी अशी इच्छा व्यक्त केली. उच्च दर्जाच्या नैतिक मूल्यांचा अंगीकार हा त्यांच्या जीवनाचा स्थायिभाव होता.

'श्री शिवाजी मराठा शाळा'मध्ये शिक्षक व मुख्याध्यापक या भूमिका काटेकोरपणे सांभाळत असताना शिक्षणाला पूरक असे अनेक उपक्रम त्यांनी चालू केले. शिक्षकांना त्यांच्या अध्यापनकार्यात मार्गदर्शन करणारे 'शिक्षक' हे मासिक १९२० साली सुरू करून ते चव्वेचाळीस वर्षे चालविले. इ. १ ली ते ७ वी पर्यंतच्या विद्यार्थ्यांसाठी 'मन्वंतर वाचनमाला' संपादित केली. याशिवाय 'टॉलस्टॉयच्या गोष्टी', 'भारतीय शिक्षणाचा इतिहास', 'शाळा कशी चालवावी', 'माझी शाळा' इ. त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

'पुणे जिल्हा स्कूलबोर्डा'चे अध्यक्ष, 'प्रार्थना समाजा'चे अध्यक्ष, बालवीर चळवळीत पुणे जिल्ह्याचे 'आयुक्त लोकशिक्षण समिती'चे अध्यक्ष, 'अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषदे'चे अध्यक्ष, कोल्हापूर संस्थानचे प्रमुख शिक्षणाधिकारी, 'गारगोटी शिक्षण संस्थे'चे कार्यकारी अधिकारी, 'श्री शिवाजी प्रिपरेटरी मिलिटरी स्कूल'च्या कारभारी मंडळात सदस्य, 'क्रमिक पुस्तक समितीचे सल्लागार, पुण्याचे महापौर, जातिनिर्मूलन संस्था, प्रार्थना समाज प्रौढ साक्षरता व पालकशिक्षक संघ इ. अनेक संस्थांत त्यांनी निरनिराळ्या कालावधीत मूल्याधिष्ठित कार्य करून आपला ठसा उमटविला. पुण्याच्या महापौरपदी असताना कोणत्याही कार्यक्रमाला ते पायी जात व वेळेपूर्वी तेथे हजर राहत, त्यामुळे म.न.पा. च्या कारभाराला शिस्त लागली. शेवटपर्यंत कार्यमग्न असताना गुरूवर्य बाबुराव जगताप यांचे वयाच्या ९० व्या वर्षी निधन झाले.

– प्रा. राजकुँवर ग. सोनवणे

**संदर्भ :**


१. *गुरुवर्य बाबुराव जगताप यांचे चरित्र – डॉ. अविनाश बा. जगताप*

२. *तनपुरे, डॉ. नीलिमा यांचा पी.एच.डी. प्रबंध २००५*


## जगताप, जयवंत बाबूराव

***दादासाहेब जगताप***

**संस्थापक, मुख्याध्यापक, प्राचार्य**

**१५ जानेवारी १९१५ – २८ डिसेंबर २००५**



स्वातंत्र्योत्तर काळात बहुजन समाजासाठी शिक्षण सुविधा निर्माण व्हाव्यात या उद्देशाने तसेच वडील व गुरुवर्य बाबूराव जगताप यांच्या प्रेरणेने जयवंतराव (दादासाहेब) बाबूराव जगताप यांनी जनता शिक्षण संस्थेच्या रूपाने शिक्षण क्षेत्रातील मुहूर्तमेढ १७ ऑगस्ट १९५२ रोजी रोवली. 'पुण्यश्लोक अहिल्यादेवी विद्यामंदिर'च्या नावाने जेजुरी या ठिकाणी संस्थेची प्रथम शाखा सुरू केली. जनता शिक्षण संस्थेचे ब्रीदवाक्य आहे 'बलविद्यामुपास्व'.

जनता शिक्षण संस्थेने पुणे जिल्ह्यातील ग्रामीण भागात शिक्षणाची गंगा बहुजन समाजापर्यंत पोहोचविण्याचा ध्यास घेतल्याने संस्थेचा विस्तार मुख्यत्वे ग्रामीण भाग व पुणे शहरातील उपनगरे या ठिकाणी झाला. पार्वतीबाई बाबूराव जगताप यांच्या पोटी जयवंतरावांचा जन्म पुणे येथे झाला.

त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण श्री शिवाजी मराठा शाळेतच झाले. पुण्याच्या सर परशुराम भाऊ महाविद्यालयामधून ते बी. ए. (ऑनर्स) झाले. नंतर बी. टी. झाले. त्यांनी 'श्री शिवाजी मराठा सोसायटी' हे कार्यक्षेत्र निवडले. 'शिवाजी मराठा प्रायमरी शिक्षक', महाविद्यालय शिक्षक, मिडल स्कूलमध्ये 'मुख्याध्यापक', गांधी ट्रेनिंग महाविद्यालयामध्ये 'प्राचार्य', रात्र शाळेमध्ये मुख्याध्यापक म्हणून अध्यापनाचे कार्य केले.

१९५२ मध्ये जेजुरीला शाळा सुरू केल्यानंतर १९६७ पर्यंत त्यांनी ग्रामीण भागात अनेक शाळा सुरू केल्या.

उदा. वडगाव निंबाळ येथे 'स्वातंत्र्य मंदिर', चाकण येथील 'श्री शिवाजी विद्यामंदिर', औंधगाव येथे 'श्री शिवाजी विद्यामंदिर', दापोडी येथे 'स्वामी विवेकानंद विद्यामंदिर', आंबळे येथे 'श्री शिवाजी विद्यामंदिर' इ. ठिकाणी शाळा सुरू केल्यानंतर अनेक ठिकाणी बालक मंदिर, मोफत वाचनालये, वसतिगृहे, विद्यार्थी वस्तुभांडार व सहकारी पतपेढ्या सुरू केल्या. तसेच पर्वतीरमणा येथे भाऊसाहेब हिरे यांनी सरकारकडून ६३ एकर जागा मिळवून त्यावर शिक्षणकेंद्र उभारण्याचे काम सुरू केले. त्याच इमारतीत अनेकांच्या मदतीने दादांनी कर्मवीर भाऊसाहेब हिरे विद्यालय सुरू केले आणि १९४९ ते १९६७ या कालावधीत हिरे विद्यालयाचा विकास घडवून आणला. नंतर ते 'अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषदे'चे सहसचिव झाले.

ज

आज 'जनता शिक्षण संस्थे'च्या अठरा शाखांचा विस्तार झालेला आहे. पण ज्या काळात जयवंतरावांनी शाळा स्थापन केल्या, त्या काळात त्यांना अनंत अडचणींना तोंड द्यावे लागले. आपले अध्यापन निष्ठेने सांभाळून सुटीच्या काळात, खेडोपाडी पायी किंवा एस. टी. ने फिरणे, शाळांसाठी जागा शोधणे, स्थानिक लोकांशी चर्चा करून त्यांना शिक्षणाचे महत्त्व पटविणे, शासकीय तरतुदीनुसार साहित्याची जुळवाजुळव करणे, कागदपत्रांचे लेखन स्वत:च करणे, पैसा उभारणे, निष्ठावान शिक्षक व मुख्याध्यापकांची नेमणूक करणे, त्यांच्या पगाराची, राहण्याची व्यवस्था करणे या गोष्टी अजिबात सोप्या नव्हत्या, पण दादासाहेबांनी ही कसरत दीर्घकाळ केली.

स्वत:चे शिक्षकपण व शाळा व्यवस्थापन काटेकोरपणे सांभाळ, त्यांनी अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषदेत सन १९४७ पासून १९६७ पर्यंत सभासद व सचिव पद अत्यंत कल्पकतेने व जबाबदारीने पेलले. ठिकठिकाणी अधिवेशने भरविणे व ती यशस्वीरीत्या पार पाडणे यात त्यांचा सिंहाचा वाटा आहे. परिषदेमार्फत त्यांनी अनेक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या मिळवून दिल्या.

'मान्य खाजगी प्राथमिक संघा'चे ते कायम सभासद व सल्लागार, तसेच १९४९ – ५० मध्ये अध्यक्ष होते. त्यांनी सभासदांची व्यवस्था समिती व परीक्षा समिती नेमली. त्या समित्यांच्या माध्यमातून शिक्षक व विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक स्पर्धा घेतल्या. सहली आयोजित केल्या. शाळाशाळांतून चांगले सिनेमे दाखविले.

'वत्सला साहित्य प्रकाशन संस्था' व 'जगताप पब्लिशिंग हाऊस' स्थापन करून त्यांनी स्त्रियांसाठी 'भगिनी' मासिक व शिक्षकांसाठी 'शिक्षक मासिक' काढले. तसेच फायनलच्या विद्यार्थ्यांसाठी मार्गदर्शनपर पाक्षिके व प्रश्नपत्रिका संच छापून 'ना नफा ना तोटा' या तत्त्वावर वितरित केले.

– प्रा. राजकुँवर ग. सोनवणे

**संदर्भ :**


*१. पुणे जिल्हा जनताशिक्षण संस्था वार्षिक अहवाल २००६ – २००७.*

*२. जयवंतराव बा. जगताप षट्यब्दीपूर्ती गौरव ग्रंथ मंदिर, १९७५.*


## जगदाळे, निवृत्ती गोविंद

***मामासाहेब जगदाळे***

**समाजसुधारक, संस्थापक, शिक्षण प्रसारक**

**४ फेब्रुवारी १९०३ – ३० मे १९८१**



निवृत्ती गोविंदराव जगदाळे यांचा जन्म उस्मानाबाद जिल्ह्यातील वाशी नजीकच्या भिकार सारोळे या गावी झाला. बार्शी तालुक्यातील चारे हे त्यांचे मूळ गाव. कर्मवीर मामासाहेबांच्या घरी विठ्ठलभक्तीची परंपरा होती. पंढरीच्या वारीची परंपरा भक्तिभावाने आणि निष्ठेने त्यांच्या घरी जपली जात होती. गोविंदराव व मुक्ताबाई या विठ्ठलभक्त दांपत्याच्या पोटी मामासाहेबांचा जन्म झाला.

कर्मवीर मामासाहेबांचे शिक्षण मॅट्रिकपर्यंत झाले होते. त्यांचे तिसरीपर्यंतचे शिक्षण बार्शी नगरपालिकेच्या मराठी मुलांची शाळा क्र. १ मध्ये झाले तर १९२२–२३ मध्ये सातवीची व्हर्नाक्युलर फायनलची परीक्षा ते नगरपालिका

इंग्लिश शाळा (सध्याचे सिल्व्हर ज्युबिली हायस्कूल) बार्शी येथून उत्तीर्ण झाले. बार्शी येथे शिकत असताना त्यांच्यावर सामाजिक जाणिवेचे व शिक्षणाच्या महनीयतेचे संस्कार झाले. सोलापुरातील नॉर्थकोट हायस्कूलमध्ये त्यांचे इंग्रजी सातवी म्हणजे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण (१९३०) पूर्ण झाले. मानेगावच्या देशमुखांच्या पार्वती (लक्ष्मी) या मुलीशी त्यांचा विवाह झाला. बार्शी नगरपालिकेत कारकून म्हणून त्यांनी नोकरी केली. समायोजन निरीक्षक (कलेक्शन इन्स्पेक्टर)पदावरही काम केले.

राजर्षी शाहू महाराजांनी वसतिगृहे सुरू करून शैक्षणिक कार्याला जो वेग मिळवून दिला होता तो आदर्श मामासाहेबांसमोर होता. नगरपालिकेच्या मदतीने बहुजन समाजाच्या शिक्षणाचे कार्य करण्याचा त्यांनी प्रयत्न सुरू केला. कर्मवीर मामासाहेबांनी मराठा समाजातील एकवीस मान्यवरांना बरोबर घेऊन श्री शिवाजी मराठा वसतिगृहाची स्थापना केली. वसतिगृहामधील मुलांना स्वतःची मुले मानून त्यांनी त्यांच्या योगक्षेमाची आणि शिक्षणाची चिंता वाहिली. वसतिगृहाच्या व्यवस्थापनाबरोबरच छोटी-मोठी कामे मामासाहेब स्वतः करीत. या वसतिगृहाच्या विद्यार्थ्यांना जे जेवण मिळत असे तेच जेवण ते स्वतःही घेत. स्वावलंबन व नीतिमान जीवनाच्या संस्काराचे धडे त्यांच्या बोर्डिंगमधील मुलांना मिळत असत. छत्रपती शिवाजी महाराज व संत तुकाराम हे जगदाळेमामांचे आदर्श होते. त्यांनी बार्शी शहरात शिवजयंती उत्सव सुरू केला. ज्ञान, रंजन आणि प्रबोधन ही त्रिसूत्री त्यांनी समाजापुढे आणली. देवालयांची त्यांनी ज्ञानालये बनविली. १९४० मध्ये स्थापन झालेल्या ‘साक्षरता प्रसारक मंडळ’ या संस्थेच्या स्थापनेत जगदाळे यांचा सिंहाचा वाटा होता. सुरुवातीच्या अवघ्या पंधरा वर्षात बार्शी तालुक्यातील लहानमोठ्या ५५ खेड्यांमधून प्राथमिक शाळा सुरू करून त्यांनी या संस्थेच्या माध्यमातून शिक्षण प्रसाराचे महान कार्य केले. शिक्षण प्रसाराच्या ध्येयाने भारलेल्या जगदाळे यांनी प्रत्यक्ष स्वातंत्र्यलढ्यात सहभाग घेतला नाही. परंतु वसतिगृहामधील विद्यार्थ्यांना स्वातंत्र्याचे महत्त्व पटवून देऊन स्वातंत्र्यलढ्यासाठी प्रेरित केले.

शिवाजी मराठा वसतिगृहाचे ‘श्री शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ’ असे नामकरण करून या संस्थेच्या माध्यमातून त्यांनी अविरत शिक्षण प्रसाराचे कार्य केले. ग्रामीण आणि दुष्काळी भागातील त्यांच्या या कार्याचे महत्त्व असाधारण असे आहे.

शेतकऱ्यांवर होणाऱ्या अन्यायाविरुद्ध लढण्यासाठी मामांनी ‘तरुण शेतकरी संघा’ची स्थापना केली. अशा सामाजिक जाणिवेच्या विविध पैलूंनी त्यांचे जीवन उजळून निघाले होते. ‘हरिजन सेवक संघ’ या संस्थेचे उपाध्यक्ष म्हणून त्यांनी कार्य केले.

मुलींची वसतिगृहामध्ये राहण्याची व मोफत शिक्षणाची सोय त्यांनी केली. लग्ने साधेपणाने केली जावीत, असे लोकशिक्षण देणारे विचार ते समाजासमोर ठेवीत.

येडशी, श्रीपत पिंपरी, काटेगाव, उपळे (दुमाला), बार्शी, उस्मानाबाद, वाशी (ता. भूम), आगळगाव (ता. बार्शी), ठोंग्याची उपळाई (ता. बार्शी), तेर (ता. उस्मानाबाद), भातंबरे (ता. बार्शी), पानगाव (ता. बार्शी) चारे (ता. बार्शी) इ. ठिकाणी त्यांनी वसतिगृहे व शाळा सुरू केल्या व बार्शी येथे शिवाजी महाविद्यालयाची पायाभरणी करून त्यांनी ग्रामीण विभागातील विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाची संधी उपलब्ध करुन दिली. बी. पी. सुलाखे वाणिज्य महाविद्यालय त्यांनी सुरू केले व वाणिज्य विद्येच्या शिक्षणाची सोय केली. दुष्काळाच्या भीषण पार्श्वभूमीवर १९७२ मध्ये ‘राजर्षी शाहू सायम् विधी महाविद्यालया’ची त्यांनी स्थापना केली. अशा विविध विद्याशाखांच्या शिक्षणाची सोय केली आणि समाजाला पुढे घेऊन धेनू संवर्धन केंद्र, सहकार क्षेत्रास उत्तेजन अशा विविध मार्गाने स्वावलंबी व विकासोन्मुख जीवनाचे दर्शन त्यांनी आपल्या प्रदेशातील लोकांना घडवले. आदर्श शिक्षकांचे, मजुरांचे व वीरपत्नींचे सत्कार करून त्यांनी समाजासमोर नवे आदर्श उभे केले. त्यांनी बार्शी येथे शिवाजी महाराजांचा अश्वारूढ पुतळा उभारला. ग्रामीण भागातील लोकांना आरोग्य सेवा पुरवण्याकरिता त्यांनी १९७५ मध्ये आरोग्य मंदिराची उभारणी केली. पुढे हे आरोग्य मंदिर जगदाळेमामांचे रूग्णालय म्हणून ओळखले

ज

जाऊ लागले. अत्याधुनिक आरोग्य सुविधांनी युक्त असे हे रूग्णालय सर्वसामान्य जनतेसाठी दिलासा देणारे ठरले.

बार्शी येथे १९८० मध्ये झालेल्या अ. भा. म. साहित्य संमेलनाच्या स्वागत मंडळाचे जगदाळे हे अध्यक्ष होते. शिक्षण, आरोग्य आदी क्षेत्रात त्यांनी केलेल्या असाधारण कार्याची नोंद घेत मराठवाडा विद्यापीठाने त्यांना डी. लिट. ही सन्माननीय पदवी प्रदान केली. राहुरीच्या महात्मा फुले कृषी विद्यापीठानेही त्यांना 'डॉक्टर ऑफ सायन्स' या पदवीने सन्मानित केले.

– प्रा. डॉ. सुहास गोविंदराव पुजारी

ज

## जांभेकर, बाळशास्त्री

☞ मुख्य नोंद– पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड

## जांभेकर, सुमती धोंडदेव

**संस्थापक, सामाजिक कार्यकर्त्या**

**५ जुलै १९५०**



सुमती धोंडदेव जांभेकर यांचा जन्म चिपळूण मध्ये झाला. बी.कॉम. पर्यंतचे शिक्षण चिपळूण मधेच झाल्यानंतर गुहागर तालुक्यातील जामसुख या गावी शिक्षिका म्हणून नोकरीस सुरुवात केली. अध्यापनाचे कार्य चालू असतानाच एम. कॉम. व बी.एड. ची पदवी प्राप्त केली. त्यानंतर चिपळूण येथील युनायटेड इंग्लिश स्कूलमध्ये नोकरी करू लागल्या. लहानपणापासूनच सामाजिक कार्याची आवड असल्याने सामाजिक कामासाठी जास्त वेळ देता यावा यासाठी २५ वर्षे नोकरी केल्यानंतर स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली आणि त्याचबरोबर काम करताना लग्नाच्या बंधनात अडकण्यापेक्षा स्वतंत्रपणे सामाजिक कार्य करण्याचे ठरविल्याने लग्न केले नाही.

शिक्षक म्हणून काम करताना मुलांच्या शिक्षणाबद्दल आणि भवितव्याबद्दल विचार करताना त्यांच्या असे लक्षात आले की जवळपास ३० ते ४० टक्के विद्यार्थी दरवर्षी नापास होतात. अशा मुलांचे वर्ष वाया जाते आणि अनेक विद्यार्थी शिक्षण सोडून देतात. अशी मुले खऱ्या शिक्षणापासून वंचित राहतात. तेव्हा अशा मुलांसाठी त्यांनी त्यांच्या आवडीच्या विषयांमधील शिक्षण देण्यासाठी वेगवेगळे प्रयोग केले. त्यात शारीरिक शिक्षणाची आवड असणाऱ्या मुलांना व्यायामासाठी व वेगवेगळ्या क्रीडास्पर्धात भाग घेण्यासाठी प्रोत्साहन दिले, निसर्गाची आवड असणाऱ्यांना कलम लावणे तसेच शेती, पर्यावरणाची माहिती दिली. अशा प्रकारे औपचारिक शिक्षणाबरोबर अनौपचारिक शिक्षण देण्याचा प्रयत्न केला. पण शाळेत हे सगळे करताना मर्यादा होत्या. त्यामुळे १० ऑगस्ट १९८१ रोजी 'कोकण वुमेन युथ अँड स्टुडंटस् डेव्हलपमेंट सेंट्रल सोसायटी (कोवॅस)' या नावाने संस्था स्थापन केली. कोकणातील स्त्रिया, तरुण व विद्यार्थी यांच्या सर्वांगीण विकासासाठी व स्वयंरोजगारासाठी या संस्थेची सुरुवात करण्यात आली. या द्वारे मुलांना व महिलांना त्यांच्या आवडीच्या क्षेत्रातील व्यावसायिक प्रशिक्षण व विक्री कौशल्य शिकविण्यात येऊ लागले. हे करत असतानाच जांभेकर बाईंच्या सहकारी मैत्रीण श्रीमती इंदुमती पोळ यांनी मतिमंद मुलांच्या शिक्षणाबद्दल सुचविले. यातूनच २६ जानेवारी १९८८ रोजी मतिमंद मुलांना विशेष शिक्षण व प्रशिक्षण देण्यासाठी 'जिद्द मतिमंद मुलांची शाळा' स्थापन करण्यात आली. सुरुवातीला जागेची अडचण असल्याने जांभेकर बाईंच्या घरीच ही शाळा चालत असे. मतिमंद मुलांच्या सर्वांगीण विकासासाठी नाट्यस्पर्धा, क्रीडास्पर्धांचे आयोजन करण्यात आले. तसेच राख्या, मेणबत्त्या, भेटकार्ड, खडू, आकाशदिवे तयार करण्याचे कौशल्य शिकविले. त्याचबरोबर १८-१९ वर्षांच्या मुलांसाठी व्यावसायिक उत्पादनाच्या प्रशिक्षण कार्यशाळा भरविल्या जातात. यातून मतिमंद मुले १२ प्रकारचे उत्पादन तयार करतात. त्याचबरोबर मतिमंद मुलांचा तीन तासांचा 'स्वर भरारी' हा संगीतमय कार्यक्रम (ऑर्केस्ट्रा) तयार करण्यात आला आहे. त्याचे आजपर्यंत अनेक ठिकाणी प्रयोग करण्यात आले आहेत. तसेच या शाळेतील मतिमंद मुलांनी विविध

क्रीडा व नाट्य स्पर्धांमध्ये राज्य व राष्ट्रीय स्तरावर बक्षिसे मिळविली आहेत.

हे सगळे करत असताना जांभेकर बाईंना प्रशिक्षित शिक्षकांची उणीव भासायला लागली. त्यामुळे त्यांनी २००८मध्ये रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि रायगड जिल्ह्यांतील पहिले विशेष शिक्षणाचे (स्पेशल एज्युकेशनचे) डी.एड. महाविद्यालय सुरू केले.

याबरोबरच कोवॅस संस्थेतर्फे जांभेकर बाईंनी अनेक उपक्रमांना सुरुवात केली आहे. त्यात 'भरारी अपंग कल्याण केंद्र', 'कौटुंबिक सल्ला व मार्गदर्शन केंद्र', 'कोकण स्त्री जागृती केंद्र' इत्यादी. तसेच त्यांना व्यायामाची आवड असल्याने 'रत्नागिरी जिल्हा योग केंद्र' व 'चिपळूण तालुका जिमनॅस्टिक असोसिएशन'ची स्थापना त्यांनी केली. त्याचबरोबर कोकण विकास मंच, कोकण कन्या नागरी सहकारी पतसंस्था यांसारख्या संस्थांची स्थापना देखील जांभेकर बाईंनी केली. तसेच महाराष्ट्र राज्य कामगार कल्याण केंद्र, रोजगार हमी योजना, महिला सक्षमीकरण योजना आदी सरकारी समित्यांवर देखील त्या काम करीत आहेत. या त्यांच्या सामाजिक कार्याचा गौरव अहिल्याबाई होळकर पुरस्कार व महाराष्ट्र राज्य पत्रकार संघाचा सामाजिक जाणीव व सामाजिक कार्य पुरस्कार देऊन करण्यात आला आहे.

– विवेक वि. कुलकर्णी

## जिचकार, श्रीकांत रामचंद्र
### संस्थापक, कुलगुरू, राजकारणी
### १४ सप्टेंबर १९५४ – ३ जून २००४

श्रीकांत रामचंद्र जिचकारांचा जन्म नागपूर जिल्ह्यातील आजानगाव येथे झाला. सुलोचना व रामचंद्र तुकाराम जिचकार हे त्यांचे आईवडील होत. श्रीकांत यांनी प्रथम एम.बी.बी.एस. ही पदवी घेतली. डॉ. श्रीकांत जिचकार एम.बी.बी.एस.,एम.डी. तर होतेच, शिवाय हे करत असतानाच त्यांनी अनेक पदव्या संपादन केलेल्या होत्या. त्यांच्या नावापुढच्या एम.बी.बी.एस.,एम.डी., एलएल.बी.,एलएल.एम.,डी.बी.एम.,एम.



बी.ए.,बी.जे.,एम. ए. (लोक प्रशासन), एम. ए. (समाजशास्त्र), एम. ए. (अर्थशास्त्र), एम. ए. (संस्कृत), एम. ए. (प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती आणि पुराणवस्तुशास्त्र),एम. ए. (मानसशास्त्र) डी. लिट्. (संस्कृत) या पदव्यांनी तर नवा ज्ञानोपासनेचा व पदवी संपादनाचा इतिहास घडवला होता. हा इतिहास अनेकांसाठी प्रेरणादायी ठरला होता. आपणही 'दुसरा श्रीकांत जिचकार' व्हावे, असे शैक्षणिक स्वप्न अनेक तरुण पाहत होते.

तरुणाईचा आदर्श ठरलेल्या डॉ. श्रीकांत जिचकारांनी इ.स. १९७२ ते १९९० ह्या कालावधीत विद्यापीठ पातळीवरच्या बेचाळीस परीक्षा दिल्या होत्या. शैक्षणिक वर्षातली उन्हाळी असो वा हिवाळी कोणतीही परीक्षा त्यांनी सोडली नव्हती आणि वाया जाऊ दिली नव्हती. त्यातल्या बहुतेक परीक्षांमध्ये तेच सर्वप्रथम आले होते आणि तब्बल अठ्ठावीस सुवर्णपदकांचे मानकरी ठरले होते. एवढ्यावरच त्यांचे समाधान झाले नव्हते. इ.स. १९७८ मध्ये भारतीय पोलीस सेवा परीक्षा आणि इ.स. १९८० मध्ये भारतीय प्रशासकीय सेवा परीक्षासुद्धा ते उत्तीर्ण झाले होते.

शिक्षणात अग्रेसर ठरलेले डॉ. जिचकार राजकारणातही मागे नव्हते. शिक्षणातला विधायकतेचा धागा त्यांना राजकारणातही सापडला होता. शिक्षणात जुळलेला त्यांचा सूर त्यांना राजकारणातही जुळवायचा होता. इ.स. १९७७ मध्ये ते नागपूर विद्यापीठाच्या विद्यार्थी संसदेचे अध्यक्ष म्हणून निवडून आले होते. इ.स. १९८० मध्ये ते महाराष्ट्र विधानसभेवर आमदार म्हणून निवडून गेले. इ.स. १९८५ पर्यंतची त्यांची ही कारकीर्द प्रचंड लोकाभिमुख व लोकप्रिय ठरली होती. एकाच वेळी चौदा खात्यांचा कार्यक्षम मंत्री म्हणून त्यांनी लौकिक मिळविला होता. इ.स. १९८६ ते इ.स. १९९२ ह्या कालखंडात महाराष्ट्र

ज

विधान परिषदेवर आमदार होते. इ.स. १९९२ ते इ.स. १९९८ ह्या कालखंडात ते राज्यसभेत खासदार म्हणून चमकले. राज्य आणि केंद्र शासनाच्या विविध समित्यांचा कार्यभार त्यांनी अत्यंत कुशलतेने सांभाळला. अर्थ, शोध संपदा, विविध स्रोत, कर, पाटबंधारे, दळणवळण ह्या संबंधीच्या शासकीय समित्यांवर स्वत:च्या कर्तृत्वाचा ठसा उमटवला. इ.स. १९९९ व इ.स. २००४ च्या लोकसभा निवडणुकांमध्ये त्यांना पराभव पत्करावा लागला होता. तरीही काँग्रेस पक्षाचा एक मोठा उच्चविद्याविभूषित नेता म्हणून जनमानसात त्यांची प्रतिमा उज्ज्वल होती.



त्यांची ही सिद्धता त्यांच्या अभिरूचीच्या विविध क्षेत्रांमधून व्यक्त होत होती. राजकारणात रमणारे डॉ. जिचकार चित्रकला, छायाचित्रण, वाचन, प्रवास, व्याख्यान ह्यातही तेवढाच रस घेत. अर्थशास्त्र आणि अध्यात्म ह्या विषयांवरच्या त्यांच्या विद्वत्तापूर्ण आणि रसाळ व्याख्यानांना होणारी गर्दी अचंब्यात टाकणारी असे. भारतीय संस्कृती, हिंदू संस्कार, फलज्योतिष ह्या विषयांचे गाढे अभ्यासक असाही डॉ. जिचकारांचा लौकिक होता. ह्या लौकिकाचा प्रारंभही त्यांच्या विद्यार्थी दशेतूनच झालेला होता. प्रारंभीच्या काळात ते स्वामी चिन्मयानंदांच्या कार्याशी जोडले गेले. चिन्मय युवा केंद्राचा अध्यक्ष या नात्याने डॉ. जिचकारांनी भारतभर प्रवास करून ही केंद्रे गावोगावी स्थापन करण्यासाठी अथक प्रयत्न केले. नंतर ते स्वामी दयानंदाच्या कार्याशी जोडले गेले. डॉ. जिचकारांच्या कार्याला विशिष्ट क्षेत्राचे कुंपण नव्हतेच. दुर्गम भागातल्या आदिवासींना सेवा सुविधा उपलब्ध व्हाव्यात म्हणून राष्ट्रीय समन्वयकाची भूमिका डॉ. जिचकारांनी तेवढ्याच जबाबदारीने पार पाडली. यांच्या या कार्यामुळे कांची पीठाचे शंकराचार्यही स्तिमित झाले होते. या शंकराचार्यांनी पीठारोहण सुवर्ण महोत्सवानिमित्त डॉ. जिचकरांचा विशेष गौरव केला होता. श्री श्री रविशंकर यांच्या 'आर्ट ऑफ लिव्हिंग' ह्या उपक्रमात तर डॉ. जिचकारांनी स्वत:ला झोकून दिले होते. १९९२ मध्ये डॉ. जिचकारांची नियुक्ती महाराष्ट्रातल्या कविकुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठ रामटेकच्या कुलगुरू निवड समितीवर सदस्य म्हणून झाली. इ.स. १९९३ मध्ये ते या विद्यापीठाचे प्रथम कुलगुरू झाले. कारण त्यावेळी या पदासाठी डॉ. श्रीकांत जिचकार हा एकमेव पर्याय समितीला मान्य ठरला होता. वेदान्त हा तर डॉ. जिचकारांच्या जिव्हाळ्याचा आणि अभ्यासाचा विषय होता. वेदान्ताच्या अभ्यासकांसाठी डॉ. जिचकारांनी नागपूरजवळ ४०० एकरांच्या परिसरात 'आर्ष विज्ञान गुरुकुलम्' ची उभारणीसुद्धा सुरू केली होती. वेदांच्या सर्व शाखांचे जतन व्हावे, वेद सर्वसामान्यापर्यंत पोहोचावेत ही डॉ. जिचकारांची तळमळ होती.

ते अग्निहोत्रीसुद्धा होते. तीन पवित्र यज्ञांचे त्यांनी केलेले आयोजन हा अनेकांच्या चर्चेचा आणि बातम्यांचा ठळक विषय ठरला होता. युनो, युनेस्कोच्या प्रतिनिधी मंडळांवरही भारताचे प्रतिनिधी म्हणून डॉ. जिचकारांचे कार्य सगळ्या जगाला ज्ञात होते. डॉ. जिचकार नागपूर टाईम्स, नागपूर पत्रिका ह्या वृत्तपत्रांच्या 'नव समाज लिमिटेड' ह्या प्रकाशन संस्थेचे अध्यक्ष होते. त्यांच्या ह्या सगळ्या कार्यांना त्यांच्या ज्ञानव्रताचे भरभक्कम अधिष्ठान लाभलेले होते. त्यांच्या ज्ञानव्रताला त्यांच्या स्वत:च्या ५२००० ग्रंथांच्या समृद्ध ग्रंथालयाची पवित्र जोड होती. नागपूरजवळ कार अपघातात डॉ. जिचकारांचे निधन झालं.

– संतोष मोतीराम मुळावकर

## जीजीभॉय जमशेदजी

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## जीवतोडे, श्रीहरी बळीराम

**संस्थापक, शिक्षण प्रसारक**

**१८ मे १९२७ – २७ मार्च १९९८**

श्रीहरी बळीराम जीवतोडे यांचा जन्म नंदोरी ता. वरोरा जिल्हा चंद्रपूर येथे शेतकरी कुटुंबात झाला. गुरुजींचे प्राथमिक शिक्षण नंदोरीत तर पूर्व माध्यमिक शिक्षण वरोरा येथे झाले. पुढील शिक्षणासाठी त्यांनी ज्युबिली हायस्कूल, चंद्रपूर येथे प्रवेश घेतला. शिष्यवृत्त्या मिळवत त्यांचे शिक्षण झाले. विशेषत: पाचव्या, नवव्या आणि इंटरच्या वर्गात



ज्या शिष्यवृत्ती परीक्षा झाल्या त्या तिन्ही परीक्षात जिल्ह्यात आणि प्रांतात ते प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. १९५० मध्ये त्यांनी नागपूर विद्यापीठाची बी.एस्सी. (कृषी) पदवी संपादन केली आणि १२ जून १९५० रोजी ते सिटी हायस्कूल, चंद्रपूर या शाळेवर माध्यमिक शिक्षक म्हणून रुजू झाले. अल्पावधीतच गणिताचे उत्तम शिक्षक म्हणून त्यांनी नावलौकिक मिळविला. ते सर्वत्र 'जीवतोडे गुरुजी' या नावाने ओळखले जाऊ लागले.

५ मे १९५१ ला ते आनंदरावजी खामनकर यांची कन्या लीलाबाई यांच्याशी विवाहबद्ध झाले. १९५१ मध्ये त्यांची समाजसेवक, राजकारणी यांच्यामध्ये उठबस सुरू झाली. ते हरिजन सेवक संघाचे जिल्हा सचिव म्हणून एकमताने निवडले गेले आणि त्यांच्या प्रगतीला धुमारे फुटू लागले.

तत्कालीन द्विभाषिक मुंबई राज्यात चंद्रपूर हा दक्षिण पूर्वेकडील कोपऱ्यातील, क्षेत्रफळाने मोठा, जंगलांनी वेढलेला, खनिज द्रव्यांनी नटलेला परंतु शैक्षणिक दृष्ट्या अतिशय मागासलेला वनवासी जिल्हा आणि म्हणूनच चंद्रपूर जिल्हा म्हणजे तरुण कार्यकर्त्यांसाठी एक आव्हानच! जिल्ह्याच्या ठिकाणीच तेवढ्या मोजक्या आणि मर्यादित शाळा, खेड्यात माध्यमिक शिक्षणाची सोय नव्हती. सर्वत्र अज्ञानाचा अंधकार पसरला होता.

सिटी हायस्कूलमध्ये शिक्षक असताना ग्रामीण भागातील जनतेशी, त्यांच्या सुखदुःखाशी त्यांची नाळ जुळू लागली होती. हरिजन सेवक संघाच्या प्रचार दौऱ्यानिमित्ताने जिल्हाभर आणि जिल्ह्यालगतच्या तालुक्यांत अस्पृश्यता निवारणासाठी त्यांचे दौरे वारंवार होऊ लागले. त्यांचा जनसंपर्क वाढू लागला. या प्रचार मोहिमेत गोंडवनच्या झोपडद्यातून नांदणारे शतकानुशतकाचे दैन्य आणि अंधार त्यांनी पाहिला. काळ बदलत होता पण ही माणसे बदलत नव्हती. त्यांच्या सुधारणेसाठी खूप कार्य करायला हवे होते. आणि ते करण्याचा निश्चय, अशाच परिस्थितीचे चटके सोसून आलेल्या श्रीहरी जीवतोडे गुरुजींनी केला होता.

मे १९५३ मध्ये त्यांनी नोकरीचा राजीनामा दिला आणि जून १९५३ मध्ये त्यांनी 'जनता माध्यमिक विद्यालया'ची मुहूर्तमेढ रोवली. खेड्यातल्या लोकांचा अपार विश्वास आणि प्रेम त्यांनी संपादन केले होते. त्यामुळेच जीवतोडे गुरुजींनी शाळा काढली ही वार्ता प्रसृत होताच जुलै महिन्यात हजेरी पटावर तीनशे मुले दाखल झाली आणि गुरुजींना त्यांचे जीवनध्येय गवसले.

जून १९५६ मध्ये जिल्ह्याच्या ग्रामीण भागातील पहिली माध्यमिक शाळा कोठारी येथे सुरू झाली. अल्पावधीतच दानरूपात मिळालेल्या पाऊण एकर जागेवर पंचवीस हजार रुपयांची दिमाखदार इमारत उभी झाली. सततच्या ग्रामीण भागातील दौऱ्यांमुळे विविध भागातील शैक्षणिक अडचणींकडे त्यांचे लक्ष वेधले गेले. जनपदद्वारा संचालित प्राथमिक शाळांमध्ये शिकविणारे शिक्षक हे प्रशिक्षित नाहीत. एकुलत्या एक शासकीय शिक्षक प्रशिक्षण केंद्रामधून प्रशिक्षित होणाऱ्या शिक्षकांची संख्या अपुरी आहे. ही समाजाची गरज त्यांनी ओळखली. परिस्थितीचे सूक्ष्म अवलोकन केले. जून १९५७ मध्ये त्यांनी ''जनता प्राथमिक प्रशिक्षण विद्यालया'' ची स्थापना केली. याच दरम्यान बल्लारपूर आणि वणी येथे जनता विद्यालयाच्या शाखा उघडण्याचे धाडसही त्यांनी केले.

प्रशिक्षण विद्यालय आणि शाळा व्यवस्थित सुरू असताना एका निराळ्याच प्रश्नाकडे त्यांचे लक्ष वेधले गेले. चंद्रपूरमध्ये झालेल्या कॉलऱ्यात माणसे पटापट मरताना त्यांनी पाहिली. तेथील क्षयरोगाचे वाढते प्रमाण पाहिले. त्याचे कारण दाटीवाटीने वसलेल्या घाणेरड्या वस्तीमध्ये आहे हे त्यांनी ओळखले. जून १९५७ मध्ये व्यवस्थित योजना आखून त्यांनी चंद्रपूर नगर गृहनिर्माण सहकारी संस्था स्थापन केली आणि परकोटाबाहेर हवेशीर नगराची रचना सुरू झाली.

चंद्रपूर जिल्ह्याच्या पंचक्रोशीत महाविद्यालयीन उच्च शिक्षणाची सोय नव्हती. इच्छा असूनही नागपूर येथे उच्च शिक्षण घेणे सर्वसामान्यांच्या आवाक्याबाहेरचे होते.

त्यामुळे गुणवत्ता आणि बुद्धिमत्ता असूनही हजारो मुलांना उच्च शिक्षणापासून वंचित राहावे लागत होते. म्हणूनच एक अत्यंत धाडसी निर्णय घेत त्यांनी स्वत:चे सोळा एकर शेत विकून १९५८ मध्ये जनता महाविद्यालयाची स्थापना केली. विदर्भ गोंडवनातील क्रांतिकारक घटना, अशीच या घटनेची ऐतिहासिक नोंद घेता येईल. तत्कालीन लोकसभा सदस्य, तथा विदेशातून शिक्षण घेऊन परतलेल्या डॉ. देवराव गोहोकर (माजी कुलगुरू, नागपूर विद्यापीठ) यांना प्राचार्य पदाची धुरा सांभाळायला दिली. गोंडवनात एक नवे पर्व सुरू झाले. याच दरम्यान जंगलांनी वेढलेल्या आदिवासीबहुल भागातील पोंभुर्णा, सिरोंचा, धानोरा, पिपरी येथे जनता विद्यालयाच्या शाखा सुरू झाल्या. १९५९ मध्ये त्यांनी कर्मवीर भाऊराव पाटील यांची भेट घेतली. बनारस हिंदू विद्यापीठाचे विस्तीर्ण विश्व त्यांनी पाहिले आणि ते भारावून गेले. त्या परिसराच्या धर्तीवर ‘जनता नगर’ ची योजना आखून ती कार्यान्वित केली. त्याच वर्षी जनता महाविद्यालयाची वाणिज्य शाखा सुरू करताना त्यांच्या असे लक्षात आले की ठिकठिकाणी सुरू केलेल्या माध्यमिक शाळांना प्रशिक्षित शिक्षक उपलब्ध होत नाहीत. प्रशिक्षण महाविद्यालयाची अडचण लक्षात घेऊन विदर्भातील पहिले जनता शिक्षण महाविद्यालय सुरू झाले.

१९६० मध्ये विज्ञान शाखेसोबतच ताडाळी, साखरवाही, गोंडपिपरी, धाबा, पाटणबोरी, नंदोरी, हिरापूर, बोथली येथे जनता विद्यालयाच्या शाखा उघडण्यात आल्या. १९६१ मध्ये कृषी महाविद्यालय, आयुर्वेदिक महाविद्यालय, सोबतच नागपूर जिल्ह्यातील सोमलवाडा, दुर्गापूर येथे शाळा सुरू करण्यात आल्या. अवघ्या नऊ वर्षांत बालवाडीपासून उच्च महाविद्यालयापर्यंत संस्थेने ३५ शाळा सुरू केल्या.

काही काळ त्यांचा राजकारणातही वावर होता. ते जिल्हापरिषदेचे सदस्य आणि पुढे पंचायत समितीचे सभापती होते. राजूरा विधानसभा क्षेत्रातून आमदार म्हणून बहुमतांनी ते निवडले गेले. प्रश्नाचे आयुध वापरून विधानसभा त्यांनी दणाणून सोडली. विविध प्रश्नांना त्यांनी मार्गी लावले. लोकप्रिय आमदार अशी बिरुदावली त्यांना लाभली.

सहकार क्षेत्राच्या माध्यमातून त्यांनी सहकार चळवळीला गती दिली. परंतु तरीही त्यांचा खरा पिंड मात्र शिक्षण प्रसारकाचाच होता. त्यामुळे ते क्षेत्र सोडून ते पुन्हा एकदा शैक्षणिक क्षेत्राकडे वळले आणि त्यांनी आयुष्याच्या शेवटच्या श्वासापर्यंत शिक्षण प्रसाराच्या कार्यामध्ये स्वत:ला झोकून दिले.

– प्रभाकर पारखी

## जे. पी. नाईक

☞ **मुख्य नोंद – नाईक जयंत पांडुरंग**

## जेधे, बाबूराव मारुती

***अप्पासाहेब जेधे***

**संघटक**

**१८८९ – ९ मार्च १९६७**



सुप्रसिद्ध कान्होजी जेधे यांच्या इतिहासप्रसिद्ध घराण्यात बाबूराव मारूतीराव जेधे यांचा जन्म झाला. पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्याच्या कारी गावाचे ते गावकरी. पुणे येथे ते स्थायिक झाले. जेधे कुटुंबियांचा पितळी भांड्यांचा व समयांचा कारखाना अवघ्या महाराष्ट्रात प्रसिद्ध होता. अप्पासाहेबांनी इ. स. १९१४ पासूनच सार्वजनिक कार्यात भाग घेण्यास सुरुवात केली. सत्यशोधक चळवळीचे ते कार्यकर्ते होते. श्री शिवछत्रपतींचा शिवाजीनगर (भांबुर्डे) पुणे येथे अश्वारुढ पुतळा बसविण्यात त्यांनी हिरिरीने भाग घेतला. ‘अखिल महाराष्ट्र पाटील परिषदे’चे ते संघटक होते.

पुण्यातील ‘श्री शिवाजी मराठा सोसायटी’, ‘अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषद’, ‘श्री शिवाजी प्रिपरेटरी मिलिटरी स्कूल’, ‘ताराबाई बोर्डिंग’, ‘मराठा वसतिगृह’, ‘श्री शाहू मंदिर महाविद्यालय’ या वेळोवेळी निघालेल्या

संस्था भरभराटीस आणण्यात प्रामुख्याने अप्पासाहेबांचे योगदान आहे. या संस्थांवर सचिव, खजिनदार इत्यादी नात्याने अप्पासाहेब अनेक वर्षे कार्यरत होते.

गुरुवर्य बाबूराव जगताप यांच्या शैक्षणिक कार्याला अप्पासाहेबांनी मनापासून साथ दिली. 'शेतकरी कामकरी पक्षा'ची स्थापना व वाढ करण्यात अप्पासाहेबांचा सिंहाचा वाटा होता. आपले धाकटे बंधू केशवराव तथा तात्यासाहेब जेधे यांच्या राजकीय कार्यास त्यांच्या मागे राहून अप्पांनी संपूर्ण व सर्वस्वी साहाय्य केले. भलेमोठे कुटुंब सांभाळले. 'मराठा भांडीवाले धर्मशाळा, पुणे' या संस्थेस सर्वतोपरी मदत केली. सर्व जातींच्या गरीब विद्यार्थ्यांना वेळोवेळी मदत केली. १९६१ मध्ये पूरग्रस्तांना कपडे व राहण्याची व्यवस्था केली. ग्रामीण विद्यार्थी चळवळीस व विद्यार्थी मंडळांना त्यांचे सहकार्य वेळोवेळी मिळे.

थोडक्यात बाबूराव जेधे यांच्याविषयी असे म्हणता येईल, की ते जरी प्रतिष्ठित घराण्यातील असले तरी त्यांना बहुजन समाजाविषयी आंतरिक कळवळा होता.

त्यांनी आयुष्यभर गोरगरिबांच्या व गरजू विद्यार्थ्यांच्या समस्या सोडविण्याचा प्रयत्न केला. त्या काळात जे तरुण (बाबूराव जगताप इ.) बहुजन समाजाला शिक्षण मिळावे म्हणून धडपडत होते. त्यांना समाजाकडून पैसा मिळवून देण्याचे, जमिनी उपलब्ध करून देण्याचे महत्वाचे कार्य त्यांनी केले.

शाहू मंदिरासाठी पार्वतीरमणाची जमीन मिळविण्यात अप्पासाहेबांचा प्रमुख सहभाग व प्रयत्न होते. त्यांचे प्रतिष्ठित घराणे व त्यांची तळमळ पाहून त्यांना धनिकांकडून सहज मदत मिळे, त्या मदतीचा विनियोग शिक्षणकार्यासाठी केला जाई. त्यांच्या 'शिवाजी मराठा सोसायटी' व 'अखिल भारतीय शिक्षण परिषदे'तील निरपेक्ष कार्याची दखल घेऊन शुक्रवार पेठेतील महाविद्यालयाला समाजभूषण अप्पासाहेब जेधे यांचे नाव देण्यात आले आहे.

– प्रा. राजकुँवर ग. सोनवणे

**संदर्भ** :

१. *श्री शिवाजी मराठा सोसायटी – पुणे, सुवर्ण महोत्सव ग्रंथ १९१८ ते १९६८.*

## जोशी, अनंत नरहर

**२५ ऑक्टोबर १९४८**

**अध्यापक, लेखक**



प्रा. डॉ. अनंत नरहर जोशी हे अध्यापन व अध्यापक शिक्षणात कार्यरत असणाऱ्या सर्वांना नवनवे प्रयोग करणारे प्राध्यापक म्हणून परिचित आहेत. बेळगाव जिल्ह्यातील रायबाग तालुक्यातील शिरगुर गाव हे त्यांचे जन्मगाव. गावातील बहुतांशी जनता कानडी बोलणारी होती. गावाजवळच असलेल्या उगार गावच्या मराठी माध्यमाच्या शाळेत जोशी यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण झाले.

१९६८ मध्ये बी.एस्सी. प्राणिशास्त्राची पदवी त्यांनी कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयातून संपादन केली. पुण्याच्या 'टिळक कॉलेज ऑफ एज्युकेशन' मधून त्यांनी बी.एड. पदवी मिळविली. त्यानंतर पुण्यातील नूतन मराठी विद्यालयात अध्यापक म्हणून कार्यास सुरुवात केली. १९७३ मध्ये त्यांनी एम.एड. पूर्ण केले. शिक्षण आणि अध्यापक शिक्षणातील अनेक संशोधन प्रश्न त्यांना खुणावत होते. त्यामुळे त्यांनी पुणे विद्यापीठात डॉ. व. सी. देशपांडे ह्यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी. च्या संशोधन कार्याला सुरुवात केली. सूक्ष्म अध्यापनावर पीएच. डी. करणारे महाराष्ट्रातील ते पहिले विद्यार्थी आहेत. १९८४ मध्ये त्यांना पीएच. डी. मिळाली.

डॉ. जोशी यांचा शिक्षणक्षेत्रातील अनुभव पस्तीस वर्षांहून अधिक असून त्यांनी यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठात विद्याशाखेचे संचालक, शैक्षणिक सेवा विभागाचे संचालक व प्रभारी कुलगुरू म्हणून काम केलेले आहे. त्यांनी पन्नासहून अधिक परिषदांमध्ये तज्ज्ञ म्हणून काम केले असून इंग्रजी व मराठी भाषेत तीसहून अधिक शोधनिबंध सादर केले आहेत. यांची इंग्रजीतून पाच व मराठीतून पन्नासहून अधिक पुस्तके प्रकाशित झाली आहेत. एम. फिल. च्या अठरा व पीएच. डी.च्या दहा

विद्यार्थ्यांनी त्यांच्या मार्गदर्शनाखाली पदवी संपादन केली आहे. नीपा, न्यू दिल्ली, युनेस्को, युजीसीने व विविध विद्यापीठांनी पुरस्कृत केलेले पंधरा मोठे व एकोणीस लहान संशोधन प्रकल्पही यांनी पूर्ण केले आहेत.

दूरशिक्षण परिषद-दिल्ली, नाशिक येथील यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाचे व्यवस्थापन मंडळ, डी.ई. पी.डी.पी. ई.पी. सल्लागार समिती, नवी दिल्ली, अशा विविध उच्च समित्यांचे ते सदस्य होते. मुक्त विद्यापीठात विविध अभ्यासक्रम निर्मितीत त्यांचे महत्त्वपूर्ण योगदान आहे. देवी अहिल्या विद्यापीठ, इंदूर, गोवा, मुंबई, एस. एन.डी.टी., जामिया मिलिया, कर्नाटक विद्यापीठ, कुरुक्षेत्र विद्यापीठ, संत गाडगे महाराज अमरावती विद्यापीठ अशा विद्यापीठांतील शिक्षकांसाठी आयोजित केलेल्या राष्ट्रीय स्तरावरील निबंध स्पर्धेचे ते परीक्षक होते. नाशिकच्या मुक्त विद्यापीठातील 'संवाद', 'मुक्तविद्या', इंदिरा गांधी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठाच्या 'शिक्षण-समीक्षा' च्या संपादक मंडळाचे सदस्य म्हणून ते कार्यरत आहेत. श्रीलंका मुक्त विद्यापीठ व ओपन युनिव्हर्सिटी- यु. के. ह्या मुक्त विद्यापीठांना त्यांनी भेटी दिल्या आहेत. शिक्षण क्षेत्रातील त्यांच्या महत्त्वपूर्ण योगदानामुळे नाशिक येथील शिक्षक गौरव समिती व सार्वजनिक वाचनालय ह्यांचा 'आदर्श शिक्षक पुरस्कार', समाजावर प्रभाव पाडणाऱ्या कार्यासाठी 'श्री रामतीर्थकर पुरस्कार' आणि 'असोसिएशन ऑफ कॉमनवेल्थ युनिव्हर्सिटीज, लंडन'चा 'जीवन गुणवत्ता पुरस्काराने‍ही' जोशी यांचा गौरव झालेला आहे.

कोल्हापूर, तसेच महाराष्ट्र सूक्ष्म कौशल्याची बारा पुस्तके, विशेष अध्यापन पद्धतीची नऊ पुस्तके व अध्यापनाची प्रतिमाने विषयाची आठ स्वतंत्र पुस्तके मराठी भाषेतून देऊन त्यांनी शिक्षणशास्त्र, विद्याशाखा आणि अध्यापक शिक्षणामध्ये मोलाची भर घातलेली आहे. विस्तार कार्याचा भाग म्हणून महाराष्ट्र राज्य माध्यमिक शिक्षक प्रशिक्षक परिषदेचे अध्यक्ष असताना डॉ. जोशी ह्यांनी २००४ पासून 'डॉ. एम.बी. बुच कृतज्ञता पुरस्कार', 'डॉ. आर. एच. दवे प्रेरणा पुरस्कार' व 'डॉ. आनंद वास्कर ग्रंथ पुरस्कार' सुरू केले. ह्या पुरस्कारांमुळे महाराष्ट्रातील सर्व अध्यापकांना, आचार्यांना नवी दृष्टी व प्रेरणा मिळाली आहे. २००८ मध्ये जोशी निवृत्त झाले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## जोशी, कांतिलाल डुंगरजी

**राष्ट्रभाषा प्रचारक**

**११ जून १९१२ – ९ जून १९९७**



कांतिलाल डुंगरजी जोशी ह्यांचे जन्मगाव राजस्थानमधील कुशलगढ. याच गावात त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. १९२६ मध्ये वडिलांनी कांतिलालजींना पुढील शिक्षणासाठी अहमदाबादला पाठविले. १९३० मध्ये महात्मा गांधीजींच्या सत्याग्रहात भाग घेण्यासाठी त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण सोडून दिले. पण पुढच्याच वर्षी गुजरात महाविद्यालयामधून ते बी. ए. झाले. त्यानंतर ते मुंबईला आले. १९३६ मध्ये अर्थशास्त्र, इतिहास, राजनीती हे विषय घेऊन त्यांनी एम.ए. पदवी संपादन केली. १९३७ च्या सुमारास त्यांनी बंबई (मुंबई) प्रांतीय राष्ट्रभाषा प्रचार सभेची स्थापना केली व जीवनभर मोठ्या निष्ठेने राष्ट्रभाषा प्रचाराचे कार्य ते करीत राहिले. त्या काळी त्यांना उत्तम पगाराची नोकरी मिळून सुखात, चैनीत जगता आले असते. पण ध्येयनिष्ठ तरूण कांतिलालजी अशा कोणत्याही प्रलोभनाला बळी पडले नाहीत. कांतिलाल हिंदीचे जातिवंत शिक्षक, कट्टर समर्थक होते. इंग्रजीचे वर्चस्व असलेल्या वातावरणात त्यांनी आपल्या सौम्य स्वभावाने, अखंड सेवाव्रताने पन्नास वर्षांत जवळपास एक हजार प्रचारक तयार केले. दोन हजार राष्ट्रभाषा प्रचार केंद्रे स्थापन केली. त्यातून लाखो किशोर-किशोरी, युवक-युवती हिंदी शिकले. हजारोजण 'राष्ट्रभाषा कोविद,' 'राष्ट्रभाषा रत्न' झाले.

कांतिलाल केवळ शिक्षक वा प्रचारक नव्हते, तर ते उत्तम संघटक होते. छात्रोपयोगी पाठ्यपुस्तकांचे लेखक व संपादक होते. 'हमारी राष्ट्रभाषा पाठावलि', 'राष्ट्रभाषा

प्रबोधिनी', 'सरल हिंदी व्याकरण' ही त्यांची पुस्तके अनेक दशके भाषा, संस्कृतीच्या माध्यमातून मुलांवर चारित्र्यनिर्मितीचे संस्कार करीत राहिली. त्यांच्या रचनात्मक कार्यामुळे त्या वेळचे उत्तर प्रदेशचे राज्यपाल श्री. क. मा. मुन्शी ह्यांनी त्यांना एका महाविद्यालयाचे निबंधकपद देऊ केले होते. पण विराट मुंबई नगरीत राष्ट्रभाषेच्या प्रचार प्रसार कार्याला वाहून घेतलेल्या कांतिलाल यांनी हे निमंत्रण अत्यंत विनयपूर्वक नाकारले.

महात्मा गांधीजींचे कट्टर अनुयायी असूनही, त्यांचा अरबी व देवनागरी अशा दोन लिपींचा आग्रह त्यांनी स्वीकारला नाही. देशाच्या व्यापक हितासाठी देवनागरीच उपयोगी आहे, असा कांतिलालजी यांचा ठाम विश्वास होता. महाराष्ट्र शासनाने त्यांच्या हिंदी भाषेच्या प्रचारार्थ केलेल्या समर्पित सेवेसाठी महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीचे सन्मानपत्र व पद्मश्री अनंत गोपाळ शेवडे हिंदी सेवा पुरस्कार प्रदान करून कांतिभाईंचा सत्कार केला. हिंदी साहित्य संमेलन (प्रयाग) यांनी 'विद्यावाचस्पती' ही पदवी व ताम्रपत्र देऊन त्यांना गौरविले. बंबई प्रांतीय राष्ट्रभाषा प्रचार समितीने कांतिलालजींना अमृत महोत्सव वर्षात 'स्मृतिचिन्ह' देऊन सन्मानित केले.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *श्री. कांतिलाल जोशी अमृत महोत्सव अभिनंदन ग्रंथ*, १९८७.

२. *'हमारी बात'; महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा; जुलाई – अगस्त १९९७.*


## जोशी, जनार्दन वामन

***बाबूराव जोशी***

**संस्थापक**

**२४ सप्टेंबर १८९७ – १६ एप्रिल १९८०**

## जोशी, मालती जनार्दन

**संस्थापक**

**२ जून १९०२ – २७ सप्टेंबर १९८०**

जनार्दन वामन जोशी तथा बाबूराव जोशी यांचा जन्म देवरूख येथे झाला. त्यांचे वडील वामनराव वकील तर



आई यशोदा गृहिणी होत्या. ते ९ महिन्यांचे असतानाच त्यांच्या आईचे निधन झाले. त्यामुळे पुढे वामनरावांची धाकटी बहीण काशी – सौ. यशोदा भिडे यांच्याकडे शिक्षणासाठी बाबूरावांना सोपविण्यात आले. १९१४ मध्ये ते मॅट्रिक झाले. त्यानंतर त्यांनी पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला.

इथेच त्यांची दामोदर छत्र्यांशी भेट झाली. भेटीचे रूपांतर गाढ मैत्रीत झाले. ते १९०५ ते १९२१ या काळात पुण्यात होते. पार्वतीबाई आठवले यांचाही निकट सहवास त्यांना मिळाला. त्यांची निष्काम सेवा, दीर्घोद्योग, ध्येयनिष्ठा बाबूराव सतत पाहात होते. रँग्लर परांजपे, प्रा. विनयराव आपटे अशा शिक्षणक्षेत्रातल्या दिग्गजांच्या त्यागमय जीवनाचे अवलोकन ते करत होता. लो.टिळक यांच्या कार्याबरोबर त्या काळात पुण्यात येणारे लाला लजपतराय, अॅनी बेझंट, श्रीनिवास शास्त्री, दादासाहेब खापर्डे अशा थोर राष्ट्रपुरुषांचे कार्यही त्यांनी जवळून पाहिले. या सर्वांच्या बद्दल त्यांच्या मनात नितांत आदर होता. मार्च १९१८ मध्ये बाबूराव फर्गसन महाविद्यालयामधून बी.ए. झाले.

रत्नागिरीतील साखरप्याच्या केमकरांची मुलगी आनंदी



बाबूरावांच्या जीवनात पत्नी म्हणून आली. बाबूरावांना वडिलांसारखे वकील व्हायचे होते म्हणून ते मुंबईला गेले. बाबूरावांचा एलएल.बी. चा अभ्यास सुरू झाला. टिळकांच्या कार्यात विशेषतः शैक्षणिक कार्याने ते प्रभावित झाले होते. तसेच काही ध्येय त्यांच्या डोळ्यासमोर तरळत होते. त्यांना कोकणासाठी विशेषतः शिक्षण क्षेत्रात काही तरी करायचे होते. कोकण त्यातही रत्नागिरीचा शिक्षणनगरी करण्याचा ध्यास बाबूरावांनी त्या वयापासून घेतला होता.

ज

पहिल्या पत्नीच्या निधनानंतर बाबूरावांनी अण्णा शेवडे यांच्या मुलीशी मालतीबाईंशी विवाह केला. कोल्हापूरमध्ये जन्मलेल्या मालतीबाई गृहविज्ञान घेऊन बी.ए. झाल्या होत्या. १९२३ - २४ मध्ये रत्नागिरीत लोकल बोर्डाची स्थापना झाली. १९२४ साली त्यांनी आपल्या कार्यक्षेत्रासाठी रत्नागिरीची निवड केली. मालतीबाईही त्यात होत्या. मालतीबाई आपला संसार सांभाळत, शेजारी - पाजारी ओळख वाढवत. स्त्री शिक्षणाचे महत्त्व पटवून देत होत्या. बाबूराव व मालतीबाई यांनी आपल्या राहत्या घरातच १ जानेवारी १९२५ ला महिला विद्यालयाची स्थापना केली. त्या काळातल्या रत्नागिरीला मुलींचे शिक्षण आणि मुलींची शाळा हा बदल सोसणारा नव्हता. मालतीबाईंनी मुलींची शाळा सुरू करून एक क्रांतीच केली. सुरुवातीला अवघ्या तीन मुली घेऊन ही शाळा सुरू झाली.

संस्थेचे शिक्षणविषयक विस्ताराचे उद्देश नक्की करून ८ ऑक्टोबर १९३३ या दसऱ्याच्या शुभमुहूर्तावर रत्नागिरी एज्युकेशन सोसायटीची स्थापना करण्यात आली. बाबूराव संस्थेचे सचिव झाले आणि मालतीबाई महिला विद्यालयाच्या मुख्याध्यापिका झाल्या. रत्नागिरीमध्ये महाविद्यालयीन शिक्षणाची उणीव होती. बाबूरावांची वकिली चांगली चालली होती. पण त्यांना शैक्षणिक प्रसारातून सामाजिक कार्य करण्याची ओढ होती. मार्च १९४२ ला महिला विद्यालयाला मॅट्रिकचे केंद्र झाले. त्यानंतर महाविद्यालयीन शिक्षणाची योजना त्यांनी कार्यकारी समितीपुढे मांडली आणि २५ सप्टेंबर १९४४ ला बाबूरावांनी महाविद्यालयाच्या मंजुरीसाठी विद्यापीठाकडे अर्जही केला. विद्यापीठाने घातलेल्या जाचक अटींचे पालन करून रत्नागिरी क्लबची इमारत विकत घेतली. गोगटे यांनी दिलेल्या देणगीतून पुढे या महाविद्यालयाला 'गोगटे महाविद्यालय' असे नाव देण्यात आले.

१९२५ मधल्या महिला महाविद्यालयाच्या स्थापनेनंतरही बाबूराव जोशींनी इतरही काही संस्था सुरू केल्या. त्या पुढीलप्रमाणे आहेत : रत्नागिरी एज्युकेशन सोसायटी (१९३३), गोगटे जोगळेकर महाविद्यालय (१९४५), रा.ना. शिर्के प्रशाला (१९४८), आर.एस.पाध्ये शिवणकला निकेतन (१९५६), अभ्यंकर कुलकर्णी कनिष्ठ महाविद्यालय (१९७५), पॅरामेडिकल कोर्सेस (१९९२), श्रीमान भागोजीशेठ कीर विधी महाविद्यालय (१९९५),

ल. ग.पटवर्धन प्राथमिक विद्यामंदिर (१९९५), श्रीमान गंगाधर गोविंद पटवर्धन इंग्लिश मिडियम स्कूल (१९९६), बारटक्के इन्स्टिट्यूट ऑफ इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी (१९९६), श्री. एस.वाय.गोडबोले माध्यमिक विद्यामंदिर (२०००), मालतीबाई जोशी प्राथमिक विद्यामंदिर (२००२), गुरुकुल प्रकल्प व्दारा, रा.ना.शिर्के प्रशाला (२००५). असे बाबूराव जोशी यांचे कार्य बहुआयामी आहे.

– राजेश अहिरे

## जोशी, नरसिंह महादेव

**शिक्षक, प्राध्यापक, साहित्यिक**

**११ जानेवारी १९३६**



नरसिंह महादेव जोशी हे शिक्षणक्षेत्रात 'नम' या नावाने प्रसिद्ध आहेत. महादेव आणि अन्नपूर्णा जोशी यांच्यापोटी त्यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांचे मूळ गाव पाटण तालुक्यातील गाखडे. त्यांचे प्राथमिक शिक्षण सातारा व गाखडे येथे झाले. आईवडील फारसे शिकलेले नव्हते. नरसिंह यांची शिक्षणासाठी भ्रमंती सुरू झाली. घरच्या गरिबीमुळे त्यांना काकांकडे रहावे लागले. काकांची रेल्वेत नोकरी असल्यामुळे बदल्या होत. त्यामुळे त्यांचे शिक्षण सोलापूर, जळगाव, सांगली या ठिकाणी झाले. मग मात्र त्यांच्या आईने पुण्याला बिऱ्हाड थाटले. तेही पुण्यात आले. न. म. जोशींचे भटके आयुष्य संपून त्यांच्या जीवनाला स्थिरता आली. पुण्याच्या भावे विद्यालयामध्ये त्यांनी मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण केली. नंतर एस.टी.सी. व सी.पी.एड.चा अभ्यासक्रम पूर्ण करून मिरजेला

शिक्षकाची नोकरी मिळवली. एक वर्ष तेथे काढून ते पुन्हा पुण्याला आले. पुण्यातही दरवर्षी वेगवेगळ्या शाळेत नोकरी करू लागले. मात्र नोकरी करता करता ते बी.ए. एम. एड. झाले. मग मात्र पुण्याच्या नू.म. वि. शाळेत स्थिर झाले. तेथे त्यांनी चौदा वर्षे अध्यापन केले. हे अध्यापन करीत असताना स्वतःचे अध्ययन सुरूच ठेवले. दरम्यानच्या काळात त्यांनी पुणे विद्यापीठात जाऊन एम. ए. पूर्ण केले. मुंबईला जाऊन चार महिन्यांचे इंग्रजी भाषेचे प्रशिक्षण घेतले. तसेच सिंधी भाषेचा एक वर्षाचा अभ्यासक्रम पूर्ण केला. अशा प्रकारे मराठी, हिंदी, इंग्रजी व सिंधी भाषांवर प्रभुत्व मिळविले.

पुढे ते टिळक प्रशिक्षण महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून रुजू झाले. तेथेही त्यांनी एकोणीस वर्षे अध्यापन केले. पण शाळेच्या आणि महाविद्यालयाच्या मुलांना शिकविता शिकविता त्यांनी विपुल साहित्य निर्मितीही केली. बालवाङ्मयामध्ये मुलांसाठी रामशास्त्री प्रभुणे, झाशीची राणी, लालबहाद्दूर शास्त्री, डॉ. होमी भाभा, डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन इत्यादी थोरांची चरित्रे लिहिली. बालकथांची सात पुस्तके लिहिली. शालेय रंगभूमीला उचित अशी एकांकिकांची सात पुस्तके लिहिली. वृत्तपत्रांतून स्तंभलेखन केले. त्यात विविध चरित्रकथा, बोधकथा, कौतुककथा यांचा समावेश होता.

कादंबरी हा वाङ्मय प्रकार उत्तमप्रकारे हाताळून महात्मा गांधींवरील ‘प्रेषित’, रामशास्त्री प्रभुणेंच्या जीवनावर ‘निःस्पृह’ तर सामाजिक वास्तवावर प्रकाश टाकणारी ‘निष्प्रभ’ कादंबरी लिहिली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या दोन इंग्रजी पुस्तकांचा ‘हिंदुत्वातून कूट प्रश्न’ आणि ‘काँग्रेस व गांधी यांनी अस्पृश्यांसाठी काय केले?’ हे मराठी अनुवाद केले. वैचारिक वाङ्मयामध्ये ‘पत्रकारांचा शिक्षण विचार’ हा बहुमूल्य वैचारिक ग्रंथ लिहीला. तर त्यांच्या बत्तीस लघुकथा व साठ स्फुटलेख विविध नियतकालिकांत प्रकाशित झाले आहेत. ‘सकाळ’चे ‘केसरी’, ‘लोकमत’, ‘तरुण भारत’ यासारख्या अग्रगण्य वृत्तपत्रांतून त्यांनी सकस लेखन केले आहे.

शाळा, महाविद्यालयातून न. म. जोशी यांनी अध्यापनाद्वारे मुलांचे जीवन फुलवले तर लेखनाच्या माध्यमातून समाजाचे प्रबोधन केले. अंजन आणि रंजन हे त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य आहे. मूल्यविचार आणि मूल्यसंस्कार हा त्यांच्या वाणीचा आणि लेखणीचा जीवनधर्म आहे. समाजाने आणि शासनाने दखल घेऊन त्यांच्या कर्तृत्त्वाचा गौरव केला आहे.

गरिबीतून धडपड करुन नावारूपाला आलेल्या, आदर्श शिक्षक, उत्तम वक्ता, कसदार लेखक, जाणकार शिक्षणतज्ज्ञ म्हणून मान्यता पावलेल्या न. म. जोशी यांना विविध पुरस्कारांनी सन्मानित केले आहे. २००३ मध्ये पुण्यात (निगडी) भरलेल्या अखिल भारतीय मराठी बालकुमार साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान त्यांना मिळाला.

‘डॉ. बाबासाहेब आंबेडकरः चरित्र व कार्य’ या ग्रंथाला तसेच ‘जेव्हा देव अवतरतात’ या नाटिकेला आणि ‘पत्रकारांचा शिक्षण विचार’ या ग्रंथाला महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट वाङ्मय निर्मितीचा पुरस्कार मिळाला आहे. तसेच ‘मुलांच्या मूल्यकथा’ या ग्रंथास कोल्हापूर साहित्य सभेचा रा. गो. शेवडे पुरस्कार मिळाला आहे. ‘पर्यावरण कथा’ या ग्रंथास किर्लोस्कर फाऊंडेशनचा तसेच संगमनेर येथील अनंत फंदी पुरस्कार मिळाला आहे.

साहित्य संस्थेमध्येही त्यांनी सहा वर्षे काम केले आहे. पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेमध्ये चिटणीस म्हणून तर अ.भा.मराठी साहित्य मंडळावर कोषाध्यक्ष म्हणून काम केले आहे. डॉ. न. म. जोशी यांची कर्मभूमी पुणे असली तरी व्याख्यानांच्या निमित्ताने आणि पुणे विद्यापीठ बहिःशाल शिक्षण मंडळाच्या माध्यमातून त्यांनी महाराष्ट्रभर व्याख्याने दिली आहेत. आकाशवाणी आणि दूरदर्शनवर मुलाखती देऊन आपली शिक्षणविषयक मते मांडली आहेत. अनेक विद्यार्थ्यांना शिक्षणशास्त्र शाखेमध्ये पीएच. डी. पदवीसाठी मार्गदर्शन केले आहे. स्वतःही पुणे विद्यापीठाची विद्यावाचस्पती ही पदवी मिळवली आहे. अजूनही वयाच्या पंच्याहत्तरीत ते सकाळमध्ये बोधकथा लिहीत आहेत. विविध विषयांवर व्याख्याने देत आहेत.

पुणे विद्यापीठातील एम.एड. च्या विद्यार्थ्यांना शिकवत आहेत.

– दिलीप गरूड

**संदर्भः**

१. *गरुड दिलीप ; 'डॉ. न. म. जोशीः व्यक्ती आणि वाङ्मय', स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे प्रथमावृत्ती १ मे २००८.*

ज

## जोशी, मालती केशव
**संस्थापक, मुख्याध्यापिका, लेखिका**
**२० जून १९२६**



मालती केशव जोशी उर्फ मालती अनंत खरे यांचा जन्म बडोदा येथे झाला. मालती जोशी यांनी गणित विषयात बी.ए. ची पदवी घेतल्यानंतर १९५५ मध्ये एम.एड. केले. त्यानंतर त्यांनी बी.ए. गणित, एम. एड., डिप्लोमा इन टीचर ऑफ द डेफ एज्युकेशन (मँचेस्टर. यु. के.) केले.

आज महाराष्ट्रभर कर्णबधिरांच्या शिक्षणाचा जो प्रसार झालेला आहे, त्याचे संपूर्ण श्रेय मालती बाईंनाच जाते. बाईंचे वडील अनंतराव खरे हे सेवासदन शाळेचे मुख्याध्यापक होते. परंतु काहीही सोय किंवा नियम नसल्याने स्वतःच्या प्रतिभा नावाच्या कर्णबधिर मुलीला मात्र ते आपल्या शाळेत प्रवेश देऊ शकले नाही. बाईंच्या मनात मात्र आपण या बाबतीत काहीच करू शकणार नाही का? असा प्रश्न सतत घोळत असे.

बाईंच्या लग्नानंतर त्यांना कळले की, इंग्लंडमधे अशी मुले शिकतात, एवढेच नाही तर शिक्षक प्रशिक्षणही दिले जाते. पण तोपर्यंत घरात दोन मुलांचा जन्म झालेला होता. हा यक्षप्रश्न केशव जोशी त्यांचे पती यांनी सहजरीत्या सोडविला. मुलांची जबाबदारी एक वर्षभर घेण्याची तयारी त्यांनी दर्शविली आणि बाई मँचेस्टरला रवाना झाल्या. मँचेस्टर येथे त्यांनी 'डिप्लोमा इन टीचर ऑफ द डेफ' एज्युकेशन हा अभ्यासक्रम पूर्ण केला.

वर्षभरात परत आल्यावर शाळा सुरू करण्याचे प्रयत्न केले.त्या वेळचे जिल्हाधिकारी स. गो. बर्वे यांनी सहमती व पाठिंबा दर्शविला. पुण्यातील शिक्षण प्रसारक मंडळींच्या ना. वि. पाटणकरांना भेटून या शिक्षणाची गरज पटवून दिली व त्यांची परवानगी मिळविली. टिळक बी.एड. महाविद्यालयाच्या बाहेर फरशीवरच ही शाळा सुरू झाली. बहीण प्रतिभासह तिच्या वयाच्या सुनंदा काटे, पेंढारकर अशा पाच मुलींच्या पटसंख्येने ही 'राखोलीची शाळा' (लोकांनी कुचेष्टेने ठेवलेले नाव!) सुरू झाली. शिक्षक नाही, अबोल मुले बोलणार काय? या प्रश्नांच्या सरबत्तीला द्यायला उत्तर सापडत नव्हते. पण शोध व ध्यास मनात होताच.

अशातच काही कारणाने त्या बनारसला गेल्या. येताना आजोळी बडोद्याला छोटा मुक्कामात प्रश्नाचे उत्तर सापडले. मामांनी जामदार नावाच्या शिक्षकांची गाठ घालून दिली. त्यांच्याशी चर्चा करून त्यांना सोबत घेऊनच बाई पुण्यात परतल्या व शाळेला शिक्षक मिळाला. शिक्षकांची संख्या दोन झाली. तसेच मुलांचीही संख्या वाढू लागली. पालक स्वतःच मुलांना आणत व परत नेत. रोज बाईंची भेट होई. रोजच सल्ला व मार्गदर्शन मिळू लागले. मुलांमध्ये सुधारणा नजरेस येऊ लागली. आपणही शाळेत जातो याचा आनंद मुलांच्या चेहऱ्यावरून ओसंडून वाहू लागला.

विद्यार्थीसंख्या ४० वर गेली. नवीन आलेली मुले वयाने मोठी होती. त्यामुळे व्यवसाय शिक्षण हेच महत्त्वाचे शिक्षण ठरू लागले. सुतारकाम, खडी छपाई, खेळणी तयार करणे. याचे शिक्षण मुलांना मिळू लागले.

१९५६ – ५७ मधे श्रीमती दुर्गाबाई देशमुख (शिक्षण संचालक-शिक्षणाधिकारी) यांनी रु. ३०,०००/- चा निधी उपलब्ध करून दिला.

रूईया यांनी नातवाच्या स्मृतिप्रित्यर्थ शाळेला देणगी दिली. १९५६ मध्ये नवीन इमारतीत शाळा भरू लागली. विद्यार्थीसंख्या वाढू लागली पण प्रशिक्षित शिक्षकच उपलब्ध नव्हते. त्यासाठी खटपट करून अभ्यासक्रम तयार केला. त्या वेळी फक्त कोलकत्यातच अशा प्रकारचे प्रशिक्षण देणे सुरू होते. शाळेत येणाऱ्या श्रीमती आगाशेंना

तिथे पाठवून ३ महिन्याचे प्रशिक्षण वर्ग सुरू केले. त्यास मान्यता मिळविली. (हा अभ्यासक्रम त्या वेळी बी.एड. च्या समकक्ष मानून शिक्षकांना मान्यता मिळाली.) १९७० मधे केंद्र सरकारचे अनुदान मिळाल्याने लहान कर्णबधिरांसाठी बाह्यध्वनीविरहित खोलीची सोय शाळेत करता आली.

फारच थोडी मुले योग्य वयात शाळेत येत. लहान वयातच कर्णबधिरत्व लक्षात आल्यास वा आणून दिल्यास मुले योग्य वयात शाळेत येऊ शकतील, हे अनुभवाने कळले व त्यातून १९७८ साली शोध मोहीम संकल्पना उदयास आली. त्यासाठी निश्‍चित व ठोस कार्यक्रम तयार केला गेला व तो राबविण्यासाठी मंगळवार रूग्णालय, कमला नेहरू रूग्णालय, व ससून रूग्णालय यांची परवानगी मिळवून नवजात अर्भकांची शोध मोहीम सुरू करण्यात आली.

पुणे शहरात तर सुरुवात झाली परंतु शहरांपेक्षा खेड्यांमध्ये ही समस्या जास्त गंभीर स्वरूपात आहे, याची कल्पना आली. त्यावर विचारविनिमय करून आजूबाजूच्या खेड्यांमध्ये जाऊन शिबिरे घेणे, कर्णबधिरत्वाची माहिती देणे, कसे ओळखावे ते सांगणे, शिकविण्याच्या पद्धती व शिक्षणाची आवश्यकता पटवून देणे यासाठी शीघ्रकवित्व लाभलेल्या मालतीबाईंनी स्वतः ओव्या रचल्या, पोवाडे रचले. ठिकठिकाणी गायनाचे कार्यक्रम घडवून आणले. पथनाट्ये पण केली. वर्तमानपत्रे व मासिकातून लेख लिहिले.

शिक्षणास सुरुवात झाली पण पुढे काय? या मुलांचे पुनर्वसन होणे, त्यांनी पायावर उभे राहणे हेही तेवढेच महत्त्वाचे होते. त्यासाठी मोठमोठे कारखानदार, समाजकल्याण विभागातील अधिकाऱ्यांना भेटून त्यांच्या नोकरीसाठी खटपट करणेही तेवढेच महत्त्वाचे ठरू लागले. या मुलांचा आत्मविश्‍वास वाढून पालकांची चिंता कमी करणेही गरजेचे होते.मुख्याध्यापिकेचे काम सांभाळून त्या या गोष्टीही करीत. त्या बरोबरच शिक्षकांना, पालकांना व प्रशिक्षणार्थींना आपल्या व्यापातून वेळ काढून त्यांच्याशी चर्चा करणे, वाचादोष सुधारणेसाठीच्या छोट्या पण महत्वाच्या गोष्टी बारकाव्यांसह सांगणे, प्रत्यक्ष करून दाखविणे ही कामेही बाई आवडीने करत.

विद्यार्थ्यांचे गुण ओळखून त्यांना प्रोत्साहन देणे हे त्यांचे आवडते काम. त्यांचा त्यांच्या विद्यार्थ्यांवर प्रचंड विश्‍वास आहे. कर्णबधिर आठवले भगिनींना शाळेत शिक्षिका म्हणून नेमल्यावर अनेकांनी प्रश्‍न उपस्थित केले. पण या दोघींनी बाईंचा विश्‍वास सार्थ ठरवून दाखविला.

१९५३ ते १९५८ या काळात बाईंनी शासकीय जबाबदाऱ्या घेऊन पार पाडल्या. महिला सेवाग्राम, पुणे रिमांड होम, बेगर्स होम चेंबूर, नाशिक व मुंढव्याचे सर्टिफाईड स्कूल इत्यादी. याच काळात सर्वसामान्यांबरोबरच अनेक कर्णबधिरांचे पुनर्वसनही बाईंनी तळमळीने केले.

ज

१९५८ मध्ये त्यांची राजपत्रित अधिकारी (गॅझेटेड ऑफीसर) म्हणून बंगला, गाडी या सोयींसह नियुक्ती झाली. परंतु या ठिकाणी राहून आपण मनाप्रमाणे काम करू शकणार नाही असे त्यांच्या लक्षात आले. त्या क्षणी त्या नोकरीचा त्यांनी राजीनामा दिला. एम. एड.ला त्यांनी ‘एज्युकेशन फॉर डेफ इन इंडिया विथ स्पेशल रेफरन्सेस टू महाराष्ट्र’ या विषयात प्रबंध तयार केला. त्याच वेळेस हेलेन केलर मुंबई भेटीवर आल्या असताना त्यांनाच तो अर्पण केला. प्रौढ विद्यार्थ्यांना नोकरी लावण्याबरोबरच त्यांची लग्ने जमवणे, घरगुती प्रश्‍न सोडविणे, न्यायालयात दुभाषक म्हणून कर्णबधिरांची कैफियत न्यायाधीश व इतरांपर्यंत पोचवणे ही कामे बाईंनी जबाबदारीने केली. बाईंच्या काळात अनेक मान्यवरांनी शाळेला भेटी व देणग्या दिल्या.

या सर्व कार्यात झोकून देऊन काम करताना बाईंनी निश्‍चय केला होता. जो पर्यंत प्रत्येक कर्णबधिराला श्रवणयंत्र मिळणार नाही तो पर्यंत मी कानात कर्णफुले घालणार नाही असा निश्‍चय त्यांनी केला व तो आजतागायत पाळला आहे. पुण्यातील बाजीराव रोड वरच्या टेलिफोन भवनाजवळील चौकाला श्रवणयंत्राचे संशोधक सर. ग्रॅहॅम बेल यांचे नाव देण्यास त्यांनी म.न.पा. व टेलिफोन भवनातील अधिकाऱ्यांना भाग पाडले. समावेशित शिक्षणाची संकल्पना (इंटिग्रेटेड एज्युकेशन) ही बाईंचीच. सर्वसामान्य मुलांबरोबर जर कर्णबधिर मूल शिकले, तर त्याची भाषा वाढ चांगली, योग्य होईल ही त्यांची इच्छा होती. त्यांनी पुण्यात गोपाळ हायस्कूल व श्रीमती नाथीबाई

दामोदर ठाकरसी कन्याशाळेत ही संकल्पना राबविण्यास सुरुवात केली. हा उपक्रम कन्याशाळेत आजही चांगल्या रितीने चालू आहे. हळूहळू मॉडर्न हायस्कूल, आपटे प्रशाला, भावे विद्यालय, साधना विद्यालय यातूनही हा उपक्रम सुरू करण्यात आला. याचा लाभ आजही अनेक विद्यार्थी घेत आहेत. यामुळे मुलांचे सामाजिकरण योग्य रीतीने होऊन आत्मविश्वास वाढतो व स्वावलंबी होण्यास अडचणी कमी येतात. २३ जुलै १९७३ रोजी 'सुहृद मंडळ' ही विशेष शाळा व संस्था आपल्या दोन मैत्रिणींना सोबत घेऊन सुरू केली. १९८१ च्या अपंग वर्षात श्रीमती ताराबाई वर्तक मंत्री असताना शाळा भेट घडवून आणून 'शुल्क' माफ करवून घेण्याचे महत्त्वाचे कामही केले.

शिक्षण संचालनालयतर्फे 'आदर्श विशेष शिक्षिका पुरस्कार', समाजकल्याणतर्फे 'दलित मित्र पुरस्कार', पुणे महानगरपालिकेतर्फे 'आदर्श शिक्षिका पुरस्कार' व पुणे विद्यापीठ, लायन्स कल्ब, रोटरी क्लब व इतर संस्थांचेही पुरस्कार मालती जोशी यांना मिळाले आहेत.

कै. सौ. निर्मला रत्नाळीकर पुरस्कार - कर्णबधिर मित्र मंडळ, पुणे व रत्नाळीकर परिवार, (२००१) व विद्या महामंडळ, पुणे तर्फे 'लोक शिक्षण पुरस्कार' (२००५) या पुरस्कारांनीही त्यांचा गौरव करण्यात आलेला आहे. विद्या महामंडळ संस्थेने बाईंनी रचलेल्या ओव्या व कवितांचे संकलन करून १ डिसेंबर २००५ ला पु. ग. वैद्य यांच्या प्रेरणेने 'कर्ण-बधिरांच्या भावविश्वात' हा संग्रह प्रकाशित केला. 'माझी माणसे' या मूळ इंग्रजी पुस्तकाचा मराठी अनुवाद बाईंनी केला आहे.

- ऋतुजा अ. पितळे

## जोशी, मालती जनार्दन

☞ **मुख्य नोंद - जोशी जनार्दन वामन**

## जोशी, मालती वामन

**१६ सप्टेंबर, १९३२**

मालती वामन जोशी यांचा जन्म कवठे एकंद या गावी झाला. त्यांचे वडील स्वातंत्र्यसैनिक होते. घरी आई



आजारी होती. मालूताईंसह पाच बहिणी आणि एक भाऊ होता. परिस्थिती गरिबीची होती. वडीलबहिणी पुण्याच्या कर्वे स्त्री शिक्षण संस्थेत शिक्षणासाठी गेल्याने मालूताईंनी आईच्या सेवेस स्वतःला वाहून घेतले. त्यांच्या सोबत त्यांची धाकटी बहीण सुधा आणि भाऊ बबन होता. कर्वे शिक्षण संस्थेच्या माध्यमातून मोठ्या बहिणींची लग्ने झाली. आईच्या मृत्यूनंतर मालूताईंनी त्याच संस्थेत जाऊन प्रशिक्षण घेतले. त्यानंतर त्या सांगलीच्या कलंत्रे आक्कांच्या शाळेत शिक्षिका म्हणून काम करू लागल्या. पुढे त्या १९५० च्या दरम्यान डॉ. बापट बाल शिक्षण मंदिरात शिक्षिका म्हणून रुजू झाल्या. वालचंद कॉलेज ऑफ इंजिनिअरिंगमध्ये इन्स्ट्रक्टर म्हणून कार्यरत असलेल्या वामनराव बाळासाहेब जोशी यांच्याबरोबर त्यांचा विवाह झाला.

त्यांच्याकडे ॲल्युमिनीयमचे हँगर बनविणे, विळ्यांची पाती, लाकडी पोळपाट, लाटणी, टेबल, खुर्च्या इ. बनविण्याचे छोटे उद्योग घरगुती स्वरूपात सुरू होते. त्यांनी आपल्या धाकट्या भावाला आय. टी. आय. ला शिक्षणासाठी घातले. 'जोशी बंधू' चा स्वतंत्र छोटा कारखाना सांगलीला एस.टी. स्टँड परिसरात सुरू झाला. त्यांच्या कार्याने तत्कालीन नेते चारूभाई शहा, वसंतदादा पाटील प्रभावित झाले. त्यांनी औद्योगिक वसाहतीतील एक प्लॉट बाळासाहेब जोशींना मोफत दिला आणि तिथे सांगलीच्या एस. टी. स्टँड परिसरातील 'जोशी बंधू' चा कारखाना 'उद्यम केंद्र' नावाने सुरू झाला. नंतर बाळासाहेब जोशी व मालूताई जोशी दोघांनीही नोकऱ्या सोडल्या. ते कारखान्यातच राबू लागले. उद्योग वाढला, कामगार आले. पंचशील नगरच्या त्यांच्या बंगल्याच्या आजूबाजूला साखर कारखान्यातील कामगारांच्या व मजुरांच्या झोपड्या होत्या. जोशी कुटूंबियांनी त्यांच्यासाठी काहीतरी केलंच पाहिजे असे ठरवून, १९७७ पासून

झोपडपट्टीतील मुलांसाठी 'शुभं करोती' संस्कार वर्ग सुरू केला.त्याचेच रूपांतर पुढे १९८२ साली 'श्री चैतन्य माऊली विश्वस्त मंडळात' झाले. झोपडपट्टीतील कर्ती मंडळी कामाला बाहेर पडल्यानंतर त्यांच्या लहान मुलांना सांभाळण्याची जबाबदारी मोठ्या मुलांवर यायची त्यामुळे त्यांचे शिक्षण व्हायचे नाही. त्यामुळे ती मुले अडाणी राहायची. मालूताईंना ते काकी म्हणत. या काकींना झोपडपट्टीतील समस्यांची जाणीव झाल्यानंतर त्यातूनच पाळणाघराची संकल्पना पुढे आली.

झोपडपट्टीतील लहान मुलांना या पाळणाघरात सोडून पालक कामावर जाऊ लागले. मुलांना आंघोळी घालायच्या, खरजेने भरलेले हातपाय धुवून त्यावर औषध लावायचे, डोक्यावरून आंघोळ घालून केस स्वच्छ करायचे ही सर्व कामे बाळासाहेब व मालुताई दोघेही करू लागले. आठवड्यातून एकदा डॉ. केळकर येत. मुलांना तपासत. मालूताई परिसरातील शाळेतील शिक्षकांना भेटल्या मुलांविषयी सांगितले, मुलांना शिकविण्याची जबाबदारी घेतली आणि त्यांना एकदम दुसरीच्या परीक्षेला बसविण्याची परवानगी मिळाली. पुढे संस्कार वर्ग सुरू झाला. पोथीवाचन, कथा सांगणे हा उपक्रम सुरू झाला. अचानक बाळासाहेबांचे निधन झाले. चैतन्य माऊली ट्रस्टची सर्वच जबाबदारी मालूताईंच्यावर येऊन पडली, त्यांचा व्याप वाढला होता.

आज पटावर १५० विद्यार्थी पाळणाघरात आहेत. वय वर्षे १ ते ५ ची मुले सकाळी सात-साडेसात ते सायंकाळी सात-साडेसातपर्यंत पाळणाघरातच असतात. अगदी एखाद्या मुलाची आई त्याला न्यायला आली नाहीतर पाळणा घरातल्या शिक्षिका त्याला त्याच्या घरी पोचवून मगच आपल्या घरी जातात.

संध्याकाळी शाळेत जाणाऱ्या मुलांसाठी अभ्यासिका असते. यात १ ली ते ९ वी पर्यंतच्या मुलांना शिकविण्याची व्यवस्था आहे. १० वी च्या पुढील मुले रात्री मुक्कामाला येथे येतात व अभ्यास करतात. इ. ९ वी, १० वी तील शाळा सुटलेल्या मुलांना 'येरला प्रोजेक्ट' या संस्थेच्या सहकार्याने घरगुती वायरिंग, मोटार रिवायंडिंग, टू व्हीलर दुरुस्ती असे अभ्यासक्रम देऊन त्यासाठीची हत्यारे फुकट देऊन स्वत:च्या पायावर उभे करण्यात 'काकी' यशस्वी झाल्यात.

वृत्तपत्रांनीही या उपक्रमाची व काकींच्या कार्याची दखल घेतली. काकींना तब्बल दहा पुरस्कारांनी गौरविण्यात आले आहे. फाय फाऊंडेशन पुरस्कार (१९९४), मुलुंड महाराष्ट्र सेवा संघाचा सु. ल. गद्रे पुरस्कार (१९९७), दक्षिण महाराष्ट्र केसरी सेवा पुरस्कार (१९९७), राजमती नेमिनाथ पाटील विशेष सेवा पुरस्कार (१९९८), राज्य शासनाचा पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर जिल्हा पुरस्कार (१९९८-९९), डॉ. चंद्राताई शेणोलीकर सामाजिक पुरस्कार (१९९९), सौ. राधाबाई लोकूर सेवाश्री पुरस्कार (१९९९), सांगली मिरज कुपवाडतर्फे विशेष गौरव (२०००), बिझनेस एक्सप्रेस समाजसेवा पुरस्कार (२०००) महेशभूषण पुरस्कार २०००. डॉ. हेडगेवार स्मारक सेवा पुरस्कार (२०००). बापूराव गोरे, स्मृती सेवा पुरस्कार २००१ पुरस्कार त्यांना मिळाले आहेत.

– विजय बक्षी

ज

## जोशी, मोरेश्वर दिनकर

**शिक्षक, संस्थापक, व्यवस्थापक, संपादक**

**२८ फेब्रुवारी १९०० – ३ फेब्रुवारी १९७९**



मोरेश्वर दिनकर जोशी ऊर्फ तात्या जोशी हे कोकणातल्या रत्नागिरीचे. ते दोन वर्षांचे असतानाच त्यांचे वडील वारले. त्यांच्या आजोबांनी त्यांना सांभाळले. तो काळ स्वातंत्र्यलढ्याचा असल्याने रत्नागिरीतही तेच वातावरण होते. प्लेग प्रतिबंधक लसीकरणाला १९१६ ला झालेल्या विरोधात तात्यांनी भाग घेतला. पुढच्याच वर्षी ते मॅट्रिकनंतरच्या शिक्षणासाठी मुंबईच्या विल्सन महाविद्यालयात दाखल झाले. तिथेही त्यांनी अभ्यासक्रमात

बायबल हा विषय अनिवार्य झाल्याच्या निषेधात भाग घेतला आणि गांधीजींच्या असहकार चळवळीतही सामील झाले.

मोरेश्वर जोशी यांचा मूळ पिंड शिक्षकाचा होता. पदवीनंतर १९२२ ला राष्ट्रीय शिक्षण शाळेत त्यांनी शिक्षकाचीच नोकरी केली. त्याच वर्षी सरस्वतीताई तात्यांच्या सहचारिणी झाल्या. नंतरच्या चार वर्षात विधी महाविद्यालयामधून एलएल.बी. पदवी घेऊन तात्यांनी १९२६ ते १९३० या काळात विल्सन विद्यालयामध्ये शिक्षक म्हणून नोकरी केली. इथे मोरोपंतांना जाणवले की, आपला जीव मुंबईत रमणे कठीण असून रत्नागिरी हीच आपली कर्मभूमी आहे. परिणामी त्यांनी १९३१ ला रत्नागिरीत स्थलांतर केले. मुंबईत बी.ए. आणि एलएल.बी पदवी घेऊन तात्यांनी कोकणच्या रत्नागिरी परिसरात १९५० ते १९७८ या काळात एक व्रत म्हणून शिक्षणाचा प्रसार केला.

रत्नागिरी एज्युकेशन सोसायटीचे अध्यक्ष, गोगटे महाविद्यालयाचे संस्थापक - संवर्धक, जोगळेकर व्यापारी महाविद्यालयाचे संस्थापक आणि २२ वर्षे सर्वोदय छात्रालयाचे कुशल व्यवस्थापक आणि दलित-मित्र या भावनेने विद्यार्थ्यांचे सर्वार्थाने मार्गदर्शक ही तात्यांची खरी ओळख ! बाळासाहेब खेर यांचे दातृत्व आणि मोरोपंतांचे आदर्श अप्पासाहेब पटवर्धन यांच्या प्रेरणेने रत्नागिरीत सर्वोदय छात्रालय १९४९ साली स्थापन झाले. सामाजिक व आर्थिक बाबतीत दलित असलेल्या जिल्ह्यातल्या सर्व ग्रामीण विद्यार्थ्यांना शालेय तसेच महाविद्यालयीन शिक्षणासाठी रत्नागिरीत विनामूल्य निवास आणि भोजनाची सोय पुरवणे हे या छात्रालयाचे मुख्य ध्येय होते.

आजपर्यंत १२०० मुलांनी छात्रालयात राहून आपले शिक्षण पूर्ण केले आहे. यापैकी काही मुले निवडक क्षेत्रात नामवंत झाली. ज्येष्ठ साहित्यिक आनंद यादव, माजी राज्यमंत्री लक्ष्मणराव हातणकर, उपायुक्त श्रीकांत धाडवे, माजी आमदार विठ्ठलराव कळंबटे, शामराव नेने हे छात्रालयाचे लाभार्थी!

मोरोपंत जोशी सरांनी छात्रालयातल्या विद्यार्थ्यांना शिक्षण संधी मिळवून देण्याबरोबर त्यांच्यावर सुसंस्कारही केले. सकाळ - संध्याकाळची सामूहिक प्रार्थना, १५ ऑगस्ट - २६ जानेवारीसारखे राष्ट्रीय सण साजरे करणे, संत, राष्ट्रपुरूषांच्या जयंत्या साजऱ्या करणे, स्वावलंबनावर भर, आवारात आणि आचरणात स्वच्छता पाळण्याबाबतची त्यांची कडक शिस्त, प्रत्येकाला दैनंदिनी लिहिण्याची लावलेली सवय, संस्कृत आणि इंग्रजी विषय शिकवणे असे उपक्रम त्यांनी अमलात आणले. तात्यांचे घर विद्यार्थ्यांना आपले वाटत असे. सरस्वतीताई देखील छात्रालयातील मुलांना आपल्या मुलांसारख्याच वागवित. एकूणच छात्रालय हे तात्यांचे एक मोठे कुटुंब झाले होते. तात्यांच्याच भाषेत सांगायचे, तर ‘हे छात्रालय म्हणजे राष्ट्रीय एकात्मतेची एक छोटीशी प्रयोगशाळा आहे.’

त्या काळाला अनुरूप अशा राजकीय - सामाजिक क्षेत्रातही तात्यांचा सहभाग लक्षणीय होता. छोडो भारत चळवळीत तावून - सुलाखून निघालेले स्वातंत्र्यसैनिक, विधानसभेचे आमदार, लोकसभेचे खासदार, निर्भीड संपादक, वृत्तपत्रीय लिखाणातून लोकशिक्षण साधणारे पत्रकार आणि कुठलेही सामाजिक भेदाभेद न मानणारा आतिथ्यशील सामान्य नागरिक हे त्यांचे आणखी वेगळे गुणविशेष !

रत्नागिरीत आल्यावर तात्यांनी चरितार्थासाठी वकिली सुरू केली. याचवेळी रत्नागिरीतल्या ‘बळवंत’ या स्थानिक वृत्तपत्राच्या संपादकपदाची जबाबदारी त्यांच्यावर आली. देशातल्या स्वातंत्र्य चळवळीने उग्र रूप घेतलेहहोते. ‘कोकणचे गांधी’ अशी ओळख मिळालेल्या अप्पा पटवर्धनांनी कोकणात काँग्रेसच्या या चळवळीचे नेतृत्व केले. राजकारण आणि समाजकारण यात लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, अप्पा पटवर्धन, विनोबा भावे ही दिग्गज व्यक्तिमत्त्व तात्यांची स्फूर्तिस्थाने होती. अध्यात्माच्या संदर्भात स्वामी स्वरूपानंद त्यांचे आदर्श होते. स्थानिक वृत्तपत्राचा संपादक या नात्याने त्यांचा स्वातंत्र्य चळवळीतला प्रत्यक्ष सहभाग अनिवार्य होता. म्हणूनच १९४२ च्या भारत छोडो चळवळीतल्या सहभागामुळे त्यांना ३० महिन्यांचा कारावास झाला. राजकारणातल्या त्यांच्या योगदानामुळे १९४६ ला मोरेश्वर जोशी यांची मुंबई

ज

विधानसभेवर रत्नागिरी उत्तर मतदारसंघातून निवड झाली. त्यानंतर १९५२ ला लोकसभेची निवडणूक झाली. राजापूर मतदारसंघातून काँग्रेसचे खासदार म्हणून ते निवडून गेले. खासदारकीच्या काळात पक्षशिस्तीच्या चौकटीत राहून त्यांनी मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचा जोरदार पाठपुरावा केला. कोकणच्या विकासासाठी खाण उद्योगासह इतर औद्योगिक क्षेत्रांबरोबरच कोकण रेल्वेची मागणी सभागृहात ठामपणे मांडणारे ते पहिले लोकप्रतिनिधी होते. लोकसभेची १९५७ ची निवडणूक संयुक्त महाराष्ट्र चळवळीने गाजली. यात पराभव झाल्यानंतर निवडणुकीच्या राजकारणातून तात्यांनी निवृत्ती पत्करली आणि शिक्षणक्षेत्राला पूर्णपणे वाहून घेतले.

मतभेद झाल्याने जवळजवळ सव्वीस वर्षे बळवंतचे संपादक असलेल्या तात्यांनी १९५७ ला हे पद सोडले. त्याचवेळी अप्पासाहेब पटवर्धनांनी ‘नवकोकण’ साप्ताहिकाची कल्पना प्रत्यक्षात आणली आणि त्याच्या संपादनाची जबाबदारी मोरोपंतांवर आली. विनोबा भावे यांच्या भूदान चळवळीचा रत्नागिरी परिसरात प्रचार हे नवकोकणचे मुख्य उद्दिष्ट होते. प्रकृती अस्वास्थ्यामुळे १९७७ ला ‘नवकोकण’ त्यांनी श्री. भिसे यांच्याकडे सोपवले.

आपल्या परिसरात समाजहिताचं काम करणाऱ्या व्यक्ती तात्यांच्या नजरेस नक्की येत. याचे निदर्शक म्हणजे त्यांनीच लिहिलेले मंचरजी खारेघाट या जिल्हा सत्र न्यायाधीशांचं चरित्र ! मूळ पारशी असलेले मंचरजी रत्नागिरीत असताना गरीब, होतकरू शिक्षणार्थींना फी साठी दरमहा १०० रुपयांचं आर्थिक सहाय्य करीत.

अस्पृश्यता निवारण (१९३५-६०), पत्रकारिता (‘बळवंत’ १९३१-५७) आणि ‘नवकोकण’ (१९५७-७७) आणि शिक्षणक्षेत्र (सर्वोदय छात्रालय १९५०-७८) यांत मोरोपंतांनी दिलेले योगदान मोठे आहे. त्यांच्या घरी सर्वांना मुक्त प्रवेश होता. हरिजन व मुस्लिमांबरोबरच्या पुरोगामी आचरणामुळे त्यांना ब्रह्मवृंदांकडून बहिष्कार पत्करावा लागला. पण याच ब्रह्मवृंदांनी नंतर मोरोपंतांची स्थानिक वेदशाळेच्या कार्यकारी अध्यक्षपदी नेमणूक केली.

तात्या जोशी यांचा अनेक स्तरावर गौरव झाला. त्यातले नोंद घेण्याजोगे पुरस्कार आहेत ते स्वातंत्र्यसैनिक हे मानचिन्ह आणि महाराष्ट्र शासनाचा दलितमित्र हा पुरस्कार !

– सुधाकर कुलकर्णी

## जोशी, राम जयराम

**प्राचार्य, कुलगुरू**

**८ जून १९२४ – १४ सप्टेंबर १९९८**



राम जयराम जोशी यांच्या आईचे नाव सुलक्षणा व वडिलांचे नाव जयराम रामकृष्ण जोशी होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण चिंचणी, जिल्हा ठाणे व पुणे अनाथ विद्यार्थी गृहात झाले. चिंचणी येथे १९४२ मध्ये मॅट्रिक झाल्यावर मुंबईच्या रुईया महाविद्यालयात त्यांनी पदवी घेतली. मुंबई विद्यापीठाच्या पदव्युत्तर विभागातून एम. ए. (अर्थशास्त्र व राज्यशास्त्र) होऊन त्यांनी १९४७ पासून ते मुंबईच्या पोद्दार व रुईया महाविद्यालयामध्ये अध्यापन कार्य सुरू केले. १९६० ते ६३ एस.आय.ई.एस. महाविद्यालयाचे उपप्राचार्य व १९६७ ते १९७७ प्राचार्य म्हणून ते कार्यरत होते. मुंबई विद्यापीठात त्यांनी १९५८ ते ८३ पर्यंत पदव्युत्तर अध्यापन केले. १९७७-८३ या काळात त्यांनी मुंबई विद्यापीठाचे कुलगुरुपद भूषविले. अमेरिकेतल्या काही विद्यापीठातही त्यांनी अध्यापन केले.

शैक्षणिक कार्य उच्च शिक्षण क्षेत्रात झाले तरी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण संस्थांशी त्यांचा जवळचा संबंध होता. महाराष्ट्र बालशिक्षण परिषदेचे ते अध्यक्ष होते. देश परदेशातील अनेक शैक्षणिक प्रश्नांसंबंधी सातत्याने त्यांनी एक सुसंगत दृष्टिकोन मांडला. सर्वसामान्यांना सहज समजेल अशी सरळ, सोपी व सुबोध भाषा हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. प्रत्येक स्तरावरील महत्त्वाच्या समस्यांची त्यांनी बारकाईने माहिती घेऊन त्यातून नष्कर्ष काढलेले आहेत. शिक्षण क्षेत्रातील बजबजपुरी, अनागोंदी नाहीशी करण्यासाठी राम

जोशींनी काही उपायही सुचवले आहेत. ते म्हणतात – ‘प्रथम शासनाला आपले अग्रस्थान सोडावे लागेल. ते अशा व्यक्ती आणि संस्थांकडे सोपवावे लागेल, ज्यांच्याकडे कल्पना आहेत, सामाजिक दृष्टी आहे, पोटतिडिक आहे आणि शासनाला खंबीरपणे त्यांच्या पाठीशी उभं राहावं लागेल... काही सामाजिक न्यायाच्या दृष्टीने अगत्याचे कार्यक्रम आस्थेने राबवावे लागतील.’ यातून शासनाने क्रमाक्रमाने माघार घेऊन स्वायत्त आणि सेवाभावी व्यक्ती आणि संस्थांचे शैक्षणिक विकासाचे तऱ्हेतऱ्हेचे प्रयत्न होत आहेत. असे चित्र दिसावे अशी त्यांची अपेक्षा व्यक्त झाली आहे. त्यांच्या लिखाणात केवळ तक्रारीचा स्वर नसून समस्येच्या मुळाशी जाऊन, तौलानिक विवेचन करून, प्रयोगांनी सिद्ध झालेल्या उपक्रमांचा उल्लेख करुन त्यांनी परिस्थिती सुधारक उपाय सरकार व समाजापुढे मांडले आहे.

– वि. ग. जोशी

ज

**संदर्भ** :

*१. जोशी प्रा. राम; ‘शिक्षण-चित्र’; ग्रंथाली’ ; – १९९६.*

## जोशी, सिंधू परशुराम
**संस्थापक, समाज सेविका**
**२ ऑक्टोबर १९१६**



सिंधू परशुराम जोशी यांचा जन्म पुणे येथे झाला. वडील रामचंद्र विष्णू भुपटकर व्यवसायाने डॉक्टर होते. इ. स. १९२४ मध्ये त्यांचे अचानक निधन झाले. त्यावेळी सिंधूताई ८ वर्षाच्या तर भाऊ १३ वर्षांचा होता. आईप्रमाणे त्यांनाही गाण्याची आवड होती. गांधर्व महाविद्यालयाच्या त्या पहिल्या विद्यार्थिनी होत्या. तेथे त्यांना विनायक बुवा पटवर्धनांचे मार्गदर्शन मिळाले. गायनवादनाप्रमाणे त्यांना खेळ, समाजसेवेचीही आवड होती. हुजूरपागेमध्ये शिक्षण चालू असतानाच त्या लक्ष्मी क्रीडा मंदिरात बॅडमिंटन, टेनिस, लाठी, जंबिया खेळल्या होत्या तर इंदिराबाई देवधरांबरोबर प्रौढ साक्षरता प्रसारासाठी झोपडपट्टीतही जात होत्या.

सिंधूताईंचा विवाह १६ जून १९३८ रोजी प्रा. वा. म. जोशी यांचा पुतण्या परशुराम जोशी यांच्याशी झाला. त्या मुंबईत राहायला गेल्या. जोशी खटाव मिलमध्ये कामास जात असत. त्यांना वारंवार परदेशी जावे लागे. असेच परदेश दौऱ्यावर गेले असताना ३१ ऑगस्ट १९५० रोजी विमान अपघातात कैरो येथे त्यांचे निधन झाले. सिंधूताईंचा जीवनप्रवास एका अवघड वळणावर येऊन ठेपला. त्यांना आपल्या दोन कन्या श्रीलेखा व मृणाल यांना शिकवून मोठे करायचे होते. मग त्या पुण्यात आल्या. वयाच्या पस्तिशीनंतर सायकल शिकल्या. जिज्ञासा क्लासमधून मॅट्रिक पूर्ण केले. प्रा. बाळ यांच्या सहकार्याने ठाकरसी विद्यापीठातून संगीतात बी.ए. पूर्ण केले. भावाच्या मार्गदर्शनाने हिंदी विषयामध्ये एम. ए. पदवी घेतली. ७ वर्षांच्या खडतर परिश्रमाने त्यांनी आपली शैक्षणिक पात्रता सिद्ध केली.

त्यांना डॉ. शरच्चंद्र गोखले व गोविंदराव हर्षे यांच्या सारख्या उत्तम शिक्षकांचे मार्गदर्शन मिळाले आणि सेवावृत्तीला दिशा मिळाली. त्यांनी रिमांड होम आणि चाइल्ड गाइडन्स क्लिनिकमध्ये अल्प मानधनावर काम सुरू केले. १९५८ ते १९७४ दरम्यान त्यांनी अडीच हजारांवर मुले पाहिली. ही मुले हुशार होती पण परिस्थितीमुळे वाममार्गाकडे व गुन्हेगारीकडे वळली होती. त्यांना आपुलकी, योग्य मार्गदर्शन आणि पालकांचे सहकार्य मिळाले तर ती सुधारतील हा सिंधूताईंचा दृढविश्वास होता.

या मुलांसाठी प्रथम जंगली महाराज रोडवर ‘कामायनी’ ची इमारत उभारली. पहिल्या चार महिन्यातील अनुभव प्रगतीस पोषक ठरला. १ बाई व ४ मुले चांगली सुधारली. सुधारगृह आणि चाइल्ड गाइडन्समधील मुलांचा त्यांना मोठा अनुभव होताच. मतिमंद मुले शाळेत येऊ लागली. त्यांच्या कर्तृत्वाला विकासाला क्षेत्र अपुरे पडू लागले. त्यांच्या मैत्रिणी लीलाताई भागवत व कुमुद नगरकर त्यांच्या मदतीस होत्या. प्रथम टिळक विद्यापीठ वाड्यात, नंतर

उद्योगपती नवलमल फिरोदिया यांच्या वाड्यात ‘कामायनी’ चे स्थलांतर झाले. हुषार मुलांच्या हाताला आणि डोक्याला काम दिले पाहिजे म्हणजे ती वाममार्गाकडे वळणार नाहीत. हे ओळखून त्यांनी नवीन जागेत उद्योगधंद्याची कार्यशाळा काढली. उदबत्त्या करणे, मेणबत्त्या करणे इ. हस्तव्यवसाय, डस्टर्स, नॅपकिन्स इ. शिवणकाम व हातमाग चालवून, रुमाल चादरी, साड्या असे विणकाम, तसेच छपाई, पुस्तक बांधणी इ. मुद्रण व्यवसायातील कामे त्यांनी सुरू केली. ही कामे मुलांकडून करून घेतली. कामात गुंतल्याने त्यांचे लक्ष केंद्रित झाले, कष्टाची किंमत कळली, आत्मविश्वास वाढला.

याबरोबरच नृत्य, नाट्य, गायन, वादन यातील त्यांच्या कलागुणांची जोपासना करून विकास घडविला. संस्थेच्या कार्यास समाजाकडून मान्यता मिळाली. मदतीचे हजारो हात पुढे आले आहेत. सरकारदरबारी मान्यता मिळाली आहे. आकाशवाणी, दूरदर्शनने त्यांची दखल घेतली. कामायनीच्या कार्यास प्रसिद्धी दिली. ‘चौकट राजा’ या सिनेमात येथील मुले दाखविली होती.

मुलांची प्रगती, शारीरिक हालचाली, बोलणे, कृतीतील कौशल्य पाहून आजमावली जाते. साधनांच्या साहाय्याने कृतीवर भर दिला जातो व प्रत्यक्ष व्यवहार – शिक्षण दिले जाते. अनेक प्रकारच्या स्पर्धांचे आयोजन राज्यस्तरावरही केले जाते. काही स्पर्धांत मतिमंदांबरोबरच साधारण मुलांनाही सहभागी केले जाते. त्यामुळे त्यांना समाजात वावरण्याची संधी मिळून वागण्यात सुधारणा होते व आत्मविश्वास वाढतो.

१९७८ मध्ये निगडी येथे कामायनीची दुसरी शाखा सुरू झाली. तेथे आज १२५ मुले ८ शिक्षिका आहेत. कार्यशाळेत ५० मुले काम करतात. आता कामायनीने प्रशिक्षण महाविद्यालय काढले आहे. समाजसेवेचा हा १ वर्षाचा पदवीधारकांसाठी सरकारमान्य अभ्यासक्रम आहे. पालकांसाठीही तीन महिन्याचा कोर्स सुरू करण्यात आला आहे.

हा सर्व अभ्यासक्रम स्वतः सिंधूताईंनी तयार केला आहे. सुरुवातीस समाजाकडून होणारी अवहेलना, आर्थिक अडचणी, पानशेत पूर यासारख्या संकटांना धैर्याने तोंड देऊन आज ही संस्था मानाने उभी आहे. आज सिंधूताईंची मुलगी मृणाल व जावई डॉ. प्रमोद धारवाडकर कामायनीत कार्यरत आहेत.

सिंधूताई ‘मतिमंद माता’ म्हणून ओळखल्या जातात. ‘‘निसर्गानं ज्यांना बुद्धीची कमतरता दिली आहे, अशा मुलांसाठी तुम्ही काम करता. तुमचं काम आमच्यापेक्षाही अवघड आहे,’’ असे म्हणून थोर समाजसेवक बाबा आमटे यांनीही त्यांचा गौरव केला.

– वि. ग. जोशी

* * *

ज

# झ



## झारापकर, काशिनाथ रामचंद्र
**संस्थापक, शिवणकाम शिक्षक, लेखक**
**१९११-१९ फेब्रुवारी २००९**



काशिनाथ रामचंद्र झारापकर यांनी शिवणकाम या कलेचे मानवी जीवनातील मूलभूत गरज म्हणून असलेले स्थान ओळखून शिवणकलेला सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. या कलेच्या शैक्षणिक स्वरूपाचे ते आद्य जनक आहेत. कुटुंबाचे पालनपोषण करण्यासाठी स्वत:च्या पायावर उभे राहता यावे म्हणून शिवणकामास चरितार्थाचे साधन बनविणारे अनेक स्वावलंबी विद्यार्थी त्यांनी तयार केले.

काशिनाथराव हे मूळचे कोकणातील सावंतवाडीजवळील ‘झारापी’ गावचे रहिवासी. आईवडील व चार भावंडे असे कुटुंब. परिस्थिती बेताचीच होती. काशिनाथरावांना कुशाग्र बुद्धिमत्ता लाभल्यामुळे त्यांना शिक्षकी पेशाबाबत विशेष आपुलकी होती. झारापला शालांत शिक्षण झाल्यावर वयाच्या विसाव्या वर्षी ज्येष्ठ बंधू कान्होबा यांच्यासमवेत ते पुण्याला रवाना झाले. आई इंदिराबाई यांच्या प्रेरणेने तेथे त्यांनी टेलरिंग आणि कटिंगचा तीन वर्षांचा डिप्लोमा केला. नंतर त्यांनी पत्नी व भावजय यांनाही टेलरिंगचे शिक्षण दिले. काशिनाथरावांनी असा विचार केला की, कुटुंबातील स्त्रीने जर हे शिक्षण घेतले तर ती मिळवती होईल व आपल्या संसाराला हातभार लावू शकेल. आपल्या ज्ञानाने इतरांचे भले करण्याच्या सामाजिक बांधिलकीतून त्यांनी १९३३ मध्ये गुढीपाडव्याच्या मुहूर्तावर शिवणवर्गाची सुरुवात केली. काशिनाथ रामचंद्र झारापकर यांनी शिवणकाम या कलेचे मानवी जीवनातील मूलभूत गरज म्हणून असलेले स्थान ओळखून शिवणकलेला सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. या कलेच्या शैक्षणिक स्वरूपाचे ते आद्य जनक आहेत. कुटुंबाचे पालनपोषण करण्यासाठी स्वत:च्या पायावर उभे राहता यावे म्हणून शिवणकामास चरितार्थाचे साधन बनविणारे अनेक स्वावलंबी विद्यार्थी त्यांनी तयार केले.

पुण्यातील कसबा पेठेत त्यांच्या राहत्या घरातच हा वर्ग सुरू झाला. घरातील मंडळी वर्गाच्या वेळेत जिन्यात जाऊन बसत. भांडीकुंडी टेबलाच्या खाली ठेवून त्याच टेबलावर कपडे बेतायची प्रात्यक्षिके केली जात. त्यावेळी वर्षाला चाळीस रुपये फी होती. पाचसहा वर्षात त्यांचा चांगलाच जम बसला. त्यांच्या शिक्षणाचा दर्जा उत्तम असल्यामुळे कोणत्याही जाहिरातीशिवायच उत्तम प्रसिद्धी झाली व घराघरातून सर्व जाती-पोटजातीच्या लेकीसुना शिवणकाम शिकण्यासाठी विश्वासाने झारापकर टेलरींग महाविद्यालयाकडे येऊ लागल्या. आता जागा अपुरी पडू लागली. झारापकरांनी आपली संस्था अप्पा बळवंत चौकात हलवली.

आपण या व्यवसायातील अत्याधुनिक तंत्र व ज्ञान आत्मसात करून ते आपल्या संस्थेतून शिकवावे असे झारापकरांना वाटू लागले. त्यांनी लंडन येथील टेलर अँड कटर ॲकेडमी या जगातील सर्वश्रेष्ठ संस्थेत प्रशिक्षण घेतले. तेथेच प्रशिक्षक म्हणून जबाबदारी सांभाळून कामाचा अनुभव घेतला. तिथेच प्रशिक्षक म्हणून तज्ज्ञाचे काम पार पाडले. संपूर्ण युरोपाचा दौरा करून तेथील शिक्षण संस्थांना भेटी दिल्या व या विषयातील जास्तीत जास्त ज्ञान संपादन केले. झारापकर महाविद्यालयामध्ये नवीन

नवीन अभ्यासक्रम चालू करून त्यांनी या ज्ञानाचा फायदा आपल्या विद्यार्थ्यांना करून दिला. शिवणकलेच्या सोबत व्यवसाय शिक्षण, भरतकाम, विणकाम, हस्तकला इत्यादी कलांचे शिक्षण देणारी 'झारापकर टेक्निकल इन्स्टिट्यूट' सुरू केली. विद्यार्थ्यांना ही कला सुलभपणे यावी यासाठी झारापकरांनी शिवणकलेवर विविध पुस्तके लिहिली. मराठी, हिंदी, इंग्रजी, गुजराथी, कन्नड, तामिळ, तेलगू, मल्याळम इत्यादी भाषांतून प्रकाशित झालेली ही उपयुक्त पुस्तके बाजारात अत्यंत वाजवी दरात उपलब्ध झाली. त्यांनी झारापकर मासिकही सुरू केले. लेखक, संपादक, मुद्रक अशा सर्व जबाबदाऱ्या सुरुवातीला त्यांनी स्वीकारल्या. हे व्यावसायिक मासिक छापायला कोणी तयार होत नव्हते म्हणून त्यांनी खंडाळा येथे झारापकर प्रिंटिंग प्रेस स्थापन केला. या पुस्तकांना लाभलेली लोकप्रियता पाहून नंतर अनेक प्रकाशक पुढे आले. त्या काळी शिक्षणासाठी माणसे मुंबईला जात असत. त्यांचा कल पाहून झारापकरांनी दादर, गोरेगाव, जोगेश्वरी येथे झारापकर टेलरिंग महाविद्यालयाच्या शाखा उघडल्या. झारापकरांनी संस्थापक, संस्थाचालक या नात्याने खुर्चीवर बसण्यापेक्षा वर्गात उभे राहून सतत शिकवण्याचे काम केले. त्यांच्या कार्याचा गौरव म्हणून इचलकरंजी व औंध या संस्थानांनी त्यांना सुवर्णपदक प्रदान केले होते. नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ फॅशन अँड टेक्नॉलॉजी या संस्थेतर्फे केंद्र शासनाने त्यांना जीवन गौरव पुरस्कार अर्पण केला.

शास्त्रशुद्ध शिवणकला शिकवणारी भारतातील ही पहिलीच संस्था होय. या संस्थेने २००२ मध्ये अमृत महोत्सव साजरा केला आहे. या टेलरिंग महाविद्यालयामध्ये श्रीलंका, मलेशिया, सिंगापूर, अमेरिका येथील विद्यार्थीही शिक्षण घेत आहेत. त्यांचे पुत्र अरविंद झारापकर सध्या या संस्थेचा कारभार पाहतात.

– वि. ग. जोशी, विद्या साने

* * *

ट

## टिळक, बाळ गंगाधर

*लोकमान्य टिळक*

**राजकारणी, सुधारक, संस्थापक**

**२३ जुलै १८५६ – १ ऑगस्ट १९२०**

☞ मुख्य नोंद – राजकारण खंड



१८७४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या निबंधमालेचे वाचन एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातले अनेक मराठी सुशिक्षित करीत व भारावून जात. त्यामध्ये लो. टिळक आणि सुधारकाग्रणी आगरकर होते. 'आमचे शिक्षण आम्हीच केले पाहिजे' अशा विचारांच्या देवाणघेवाणीतूनच १ जानेवारी १८८० रोजी न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना झाली. लो. टिळक या कार्यात अग्रभागी होते.पुढचे एक दशक लो. टिळकांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटी, फर्गसन महाविद्यालय विकासासाठी दिले.

डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे संस्थापक, संवर्धक, प्रशासक व अध्यापक आणि मार्गदर्शक अशा पाचही भूमिकांतून लो. टिळक यांनी केलेले कार्य लक्षणीय आहे. डेक्कन एज्युकेशन सोसायटीची स्थापना करण्यामागे 'राष्ट्रीय शिक्षण' हा प्रमुख उद्देश होता. डेक्कन महाविद्यालयामध्ये शिकत असतानाच शिक्षणाद्वारे समाजजागृती हा हेतू मनात ठेवून लो. टिळक चिंतन करीत होते.

''देशबांधवांच्या हीनदीन अवस्थेचे विचार मनात आले की त्याने आमचे मस्तक भणाणून जाई आणि प्रदीर्घ चिंतनानंतर आमचे असे ठाम मत बनले की देशबांधवांच्या उद्धाराचा एकमेव मार्ग म्हणजे शिक्षणप्रसार होय.'' हे टिळकांचे विचार त्यांची भूमिका स्पष्ट करणारे आहेत. 'इंग्रजी विद्येच्या प्रसाराने भारतात ज्ञानप्रसार होऊ लागला होता, तरी त्याद्वारा राष्ट्रीयत्वाची जोपासना न होता उलट राष्ट्रीयत्वास हानी पोचून कारकुनांचा नवा सुशिक्षित वर्ग निर्माण होतो',– ही गोष्ट लो. टिळक यांना राष्ट्रहितास बाधक वाटत होती.

१९०६ मध्ये कलकत्ता येथे झालेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात राष्ट्रीय आंदोलनाचा चतु:सूत्री कार्यक्रम आखला गेला व तो स्वीकारण्यात आला. ती चतु:सूत्री म्हणजे 'स्वदेशी, स्वराज्य, परदेशी मालावर बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण' या चतु:सूत्रीतील राष्ट्रीय शिक्षणाला लो.टिळक यांनी प्राधान्यक्रम दिला आणि डेक्कन एज्युकेशन सोसायटीद्वारा प्रत्यक्ष कृती आणि केसरीतून विचार यांच्या संयोगातून शिक्षणविषयक कार्य केले.

राष्ट्रीय शिक्षण, खाजगी शाळांची जबाबदारी, लष्करी शिक्षणाची शाळा, असे ३१ अग्रलेख प्रत्यक्ष शिक्षणविषयावर त्यांनी केसरीतून लिहिले. याशिवाय अन्य विषयांच्या अनुषंगाने जिथे शिक्षण विचार मांडता आला असे १०० लेख लो. टिळकांनी केसरीत लिहिले.

शाळा व महाविद्यालय इथे ते प्रभावितपणे गणिताचे अध्यापन करीत. उदार शिक्षणाचे पुरस्कर्ते असलेल्या टिळकांनी त्या काळात कृषिशिक्षण व व्यवसायशिक्षण यांचा पुरस्कार केला होता यावरुन त्यांचे द्रष्टेपण दिसून येते.

देशी भाषांचा पुरस्कारही त्यांनी केला. स्वत: शिक्षक असलेल्या लो. टिळकांनी पत्रकाराच्या भूमिकेतही लोकशिक्षण केले.

– डॉ. न. म. जोशी

* * *




## ठकार, लीला वसंत

**शिक्षिका**

**३० जून १९१७ – १९ ऑगस्ट २००४**



लीला वसंत ठकार ह्या पूर्वाश्रमीच्या लीला लोणकर. सोलापूर हे त्यांचे जन्मगाव. तेथे त्यांच्या प्राथमिक शिक्षणाची सुरुवात झाली. पण पितृछत्र हरपल्याने त्यांचे कुटुंब पुण्यात येऊन स्थायिक झाले. पुण्याच्या हुजूरपागा शाळेतून लीलाताई मॅट्रिक झाल्या. या शाळेतील शिक्षक व्यवसायास वाहून घेतलेल्या शिक्षकांचे संस्कार त्यांनी आयुष्यभर जतन केले व प्रत्यक्षात आणले. मद्रासला प्रत्यक्ष मॅडम माँटेसरीच्या हाताखाली शिकण्याची संधी त्यांना मिळाली. विवाहानंतर त्या नाशिकला आल्या.

नाशिक एज्युकेशन सोसायटीच्या पेठे विद्यालयात शिक्षकी पेशास त्यांनी सुरुवात केली. इंग्रजी व भूगोल हे त्यांचे हातखंडा विषय होते. १९५० मध्ये लीलाताईंची संस्थेच्या 'शारदा मंदिर' या शाळेत बदली झाली. त्या काळात नाशिकमधील मुली 'शारदा मंदिरा'त याव्यात म्हणून त्यांनी नाशिक पिंजून काढले. मुलींना आर्थिक मदत, सवलती देऊन शाळेत शिक्षणाच्या प्रवाहात आणले. घरी बसणाऱ्या मुलींना आकर्षण वाटावे म्हणून चैत्रगौर,हळदीकुंकू, रांगोळी प्रदर्शन, छोट्या-मोठ्या सहली, नाटके बसविणे, विविध स्पर्धांमधून सहभाग, गृहसभा, सामने असे उपक्रम सुरू केले. मुलींची संख्या वाढल्यावर राजे बहादूर वाड्याची जागा कमी पडू लागली. १९५६ मध्ये लीलाताई शाळेच्या मुख्याध्यापिका झाल्या. अधिक जागा मिळविण्यासाठी त्यांचे अथक प्रयत्न सुरू झाले आणि हायस्कूल ग्राऊंडवर शाळेसाठी जागा मिळाली. हा लीलाताईंच्या जीवनातील कार्यपूर्तीचा क्षण होता. अल्पावधीत टिळक पथावर शाळेची सुसज्ज इमारत उभी राहिली. नाशिकमधील उद्योजक सारडा बंधूंनी देणगी दिल्यामुळे शाळेचे नाव बदलून 'मा. रा. सारडा कन्या विद्या मंदिर' असे झाले. लीलाताईंच्या नेतृत्वामुळे महाराष्ट्रभर शाळेचे नाव झाले. माध्यमिक शालान्त परीक्षा मंडळाच्या गुणवत्ता यादीत विद्यार्थिनी चमकण्याची सुरुवात लीलाताईंच्याच कारकीर्दीत झाली. समाजसेवेचे संस्कार व्हावेत म्हणून दर रविवारी त्या मुलींना घेऊन पेठ रोड परिसरातील वडारवस्तीत नेत असत. करमणुकीच्या कार्यक्रमांतून विद्यार्थिनी स्वच्छतेचे, साक्षरतेचे संस्कार तेथील स्त्रियांवर, मुलींवर करीत असत.

लीलाताईंच्या प्रयत्नातून नाशिक रोड परिसरात शेठ ध. सा. कोठारी कन्याशाळा सुरू झाली. प्रारंभी एका छोट्या बंगल्यात भरणारी ही शाळा आज भव्य इमारतीत भरते व नामवंत शाळा म्हणून ओळखली जाते. स्वत: लीलाताई स्काऊट आणि गाईड संस्थेच्या कमिशनर होत्या. नाशिक रोडच्या मध्यवर्ती कारागृहाला त्या नेहमी भेट देत असत.

१९६८ मध्ये 'राष्ट्रपती पुरस्कार' प्रदान करून लीलाताईंच्या शैक्षणिक, सामाजिक व सांस्कृतिक क्षेत्रातील कार्यांचा गौरव करण्यात आला. हा पुरस्कार प्राप्त करणाऱ्या नाशिक जिल्ह्यातील त्या पहिल्याच शिक्षिका होत. १९७१ मध्ये पेठे विद्यालयाचा व संस्थेचा सुवर्ण महोत्सव मोठ्या दिमाखात साजरा झाला. नाशिक एज्युकेशन सोसायटीची नवीन घटना अस्तित्वात आली त्यावेळी 'शिक्षक मंडळा'च्या पहिल्या अध्यक्षा होण्याचा

मान लीलाताईंना मिळाला आणि संस्थेला एका खंबीर नेत्याचे मार्गदर्शन मिळाले.

१९७५ मध्ये पेठे विद्यालयाच्या मुख्याध्यापिका म्हणून लीलाताई निवृत्त झाल्या. या निवृत्तीच्या काळातही संस्थेच्या विविध समित्या, नाशिक मधील अनेक सामाजिक, शैक्षणिक संस्थांना सदस्य म्हणून, अध्यक्ष म्हणून त्यांचा मार्गदर्शनाचा लाभ झाला.

– प्रा. सुहासिनी पटेल

## ठाकरसी, विठ्ठलदास दामोदर

**सामाजिक कार्यकर्ते**

**३० नोव्हेंबर १८७३ – १२ ऑगस्ट १९२२**



महाराष्ट्रातील एका सधन कुटुंबात जन्मलेल्या विठ्ठलदास दामोदर ठाकरसींचे शिक्षण मुंबईला झाले. उद्योग - व्यवसायाबरोबरच त्यांनी सामाजिक आणि राजकीय कार्यात मनापासून रस घेतला. मुंबईच्या महापालिकेवर निवडून येऊन ते नंतर महापौर झाले आणि १९०३, १९०५ व १९०७ मध्ये मुंबईच्या कायदेमंडळावर निवडून आले. १९१९ मध्ये ठाकरसी मध्यवर्ती कायदेमंडळावरही निवडून गेले. सिडनेहॅम महाविद्यालय स्थापन करण्यात ज्या महानुभावांचे योगदान होते. त्यात ठाकरसीही होते. अखिल भारतीय होमरूल लीग संस्थापकांमध्ये त्यांचीही भूमिका होती. १९२० मध्ये उद्योगपती ठाकरसी ३१०४ माग व १,२४,१४४ चात्यांचे मालक होते. राजकारणात जहाल–मवाळ अशी फूट झाल्यानंतर सर विठ्ठलदास ठाकरसींनी १९१५ चे काँग्रेसचे मुंबईचे अधिवेशन बोलविले.

ठाकरसी कुटुंब १९१९ मध्ये परदेशी गेले. या प्रवासात टोकियोमधील स्त्रियांचे विद्यापीठ पाहून तसे विद्यापीठ महाराष्ट्रात असावे अशी कल्पना ठाकरसींच्या मनात आली. अण्णासाहेब कर्वे यांनी मुलींसाठी महाविद्यालय काढले होते. मुलींसाठी स्वतंत्र विद्यापीठ असावे अशी त्यांची इच्छा होती. म्हणून त्यांनी अखिल भारतीय महिला विद्यापीठ १९१६ मध्ये स्थापन केले होते. सर विठ्ठलदास यांनी १९२० मध्ये या विद्यापीठाला पंधरा लाख रुपयांची देणगी दिली व त्याचे नामकरण आपल्या मातोश्रींच्या स्मरणार्थ श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठ असे करण्यात आले. ब्रिटिश शासनाने त्यांना ‘सर’ ही उपाधी देऊन त्यांच्या सामाजिक कार्याचा गौरव केला होता.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *ढेरे अरुणा ; ‘प्रकाशाचे गाणे ‘*

२. *महाराष्ट्र स्टेट गॅझेटियर्स, बृहन्मुंबई भाग – १; १९८६.*


## ठाकूर, विनायक हरिश्चंद्र

**संस्थापक**

**जन्म दिनांक अनुपलब्ध– १९३६**



विनायक हरिश्चंद्र ठाकूर हे मुंबईतील गिरगावमधील आर्यन एज्युकेशन सोसायटीचे आद्य संस्थापक. आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठी राष्ट्रीय शिक्षणाचा प्रसार हेच एक प्रभावी साधन आहे या विचारातून बॅ. मुकुंदराव जयकर, रा. श्री. नवलकर, रघुनंदन कोठारे, शां. स. त्रिलोकेकर अशा आपल्या समविचारी, विचारवंत, शिक्षणप्रेमी मित्रांच्या सहकार्याने ठाकूर यांनी ह्या संस्थेची स्थापना केली.

३ जून १८९७ रोजी शाळा सुरू केली तेव्हा इयत्ता चवथी ते सातवी पर्यंतच्या शिक्षणाची सोय करण्याचा विचार होता. संस्थेच्या कार्यकारी सभासदांनी तीन वर्षे अध्यापन करण्याचे ठरविले होते. सर्वजण पदवीधर होते. शाळेचा खर्च वजा जाता उरलेल्या रकमेतून जास्तीत जास्त तीस रुपये वेतन त्यांना मिळणार होते. शाळेला तोटा आल्यास तो भरून काढण्यासाठी प्रत्येकाने दहा रुपये वर्गणी आगाऊ द्यावयाची होती. गरीब व मध्यमवर्गीयांना झेपेल

एवढाच फी दर होता. मातृभाषा, धार्मिक शिक्षणाचा पुरस्कार करावयाचा होता. पण या सर्व सदस्यांचा आत्मविश्वास दांडगा होता. पदवी परीक्षेत ह्या सर्वांनाच श्रेष्ठ दर्जाचे यश मिळालेले होते. वर्तमानपत्रांतही शाळेची जाहिरात दिली होती. २० विद्यार्थ्यांना नादारीचा लाभ, प्रत्येक वर्गातील पहिल्या दोन विद्यार्थ्यांना गुणवत्ता शिष्यवृत्ती, गुरुशिष्यांमध्ये प्रेमाचे नाते राखणे, शिस्तीला प्राधान्य देणारी शाळा अशी जाहिरात होती.

परिणामत: शाळेच्या पहिल्याच दिवशी प्रवेशासाठी रीघ लागली. पटसंख्या दोनशे पन्नासच्या वर गेली. पंधरा दिवसांतच ती पाचशे झाली. त्याच वर्षीच्या ऑक्टोबर महिन्यात पहिली ते तिसरीच्या वर्गांचीही सोय करावी लागली. या प्रगतीचे सर्व श्रेय आपल्या मित्रांना आवाहन करून शाळेसाठी एकत्र आणणाऱ्या ठाकूर यांचे होते. ते गणित व विज्ञानाचे उत्कृष्ट अध्यापक होते. इंग्रजी भाषेवर उत्तम प्रभुत्व होते. पण फक्त शाळेत काम करून मिळणाऱ्या पगारावर त्यांच्या कुटुंबाचा उदरनिर्वाह होणे कठिण होते. म्हणून त्यांना महसूल खात्यातील नोकरी स्वीकारावी लागली. तरीही संस्था व शाळेबद्दलच्या प्रेमाने ते जमेल तितका वेळ देत असत.

नोकरीतील बदलीच्या निमित्ताने ते जेथे जेथे गेले तेथे त्यांचे शिक्षणप्रसाराचे काम सुरू होते. बोरसदला असताना गावातील धनिकांकडून तेथील शाळेसाठी पैसे जमवून ती शिक्षणसंस्था आदर्श करण्याचे प्रयत्न त्यांनी केले.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *आर्यन एज्युकेशन सोसायटी मुंबई, सुवर्ण महोत्सव ग्रंथ – १८९७–१९४७.*

ठ

* * *




ड

## डोंगरे, गजानन शंकर

**प्राचार्य, लेखक**

**६ मार्च १९२९ – १६ मे १९९६**



शिक्षण क्षेत्रातील कर्मयोगी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या गजानन शंकर डोंगरे यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण मनमाडला झाले. पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयातून त्यांनी बी. ए. पदवी मिळविली. १९५० ते १९६२ पर्यंत लासलगावच्या महावीर महाविद्यालयामध्ये शिक्षक, उपमुख्याध्यापक व मुख्याध्यापक अशा विविध पदांवर त्यांनी काम केले. १९५६ मध्ये ते बी टी. झाले. या परीक्षेत त्यांना पहिला वर्ग मिळाला. त्यानंतर त्यांनी एम.ए. व एम.एड. या पदव्या गुणवत्तेसह प्राप्त केल्या.

१९६२ ते १९६४ ही दोन वर्षे त्यांनी रयत शिक्षण संस्थेच्या श्रीरामपूर येथील महाविद्यालयात टी. डी. विभागात जिद्दीने काम केले. दोन्ही वर्षी त्यांच्या विभागाचा निकाल शंभर टक्के लागला म्हणून संस्थेने कर्जतला टी. डी. कोर्स सुरू केला व त्याची जबाबदारी डोंगरे यांच्यावर सोपविली होती.

१९६५ मध्ये नाशिक जिल्हा मराठा विद्या प्रसारक समाज संस्थेने नाशिकला बी.एड. महाविद्यालय-कॉलेज ऑफ एज्युकेशन सुरू केले. डोंगरे यांनी महाविद्यालयाच्या स्थापनेपासून चार वर्षे एक यशस्वी प्राध्यापक म्हणून महाविद्यालयामध्ये नाव मिळविले. शिक्षणतज्ज्ञ प्राचार्य ग. वि. अकोलकर निवृत्त झाल्यावर डोंगरे या महाविद्यालयाचे प्राचार्य झाले आणि पुढील दोन तपे ही जबाबदारी त्यांनी समर्थपणे पेलली. योग्य विचारांनी बांधलेले धोरण, ते कृतीत आणण्यासाठी लागणारा निर्भीडपणा यांच्या बळावर प्रा. डोंगरे यांनी महाविद्यालयात विविध उपक्रम सुरूकेले.बी.एड.व एम.एड. अभ्यासक्रमाच्या प्रशिक्षणार्थींनी केवळ अभ्यासक्रम पूर्ण करण्यापेक्षा त्यांना काही शैक्षणिक अनुभव मिळावेत, विविध प्रकल्पांची ओळख त्यांना व्हावी, शिक्षकी पेशा व अन्य व्यवसाय ह्यात फरक आहे हे त्यांनी जाणून घ्यावे म्हणून ते सतत सजग राहिले. ओझर, देवळाली कॅम्प येथील अमराठी भाषिकांसाठी इंग्रजी माध्यमाची तुकडी त्यांनी सुरू केली आणि टीकाही सहन केली. पण या टीकेला वार्षिक परीक्षेच्या निकालानेच उत्तर दिले. अपवाद वगळता या तुकडीतले विद्यार्थीच प्रथम क्रमांकाचे मानकरी ठरले.

चर्चात्मक पद्धतीचा प्रयोग हा त्यांचा आणखी एक वेगळा उपक्रम होता. विद्यार्थ्यांनी स्वत: विषयाची तयारी करावयाची, वर्गात चर्चा करावयाची व प्राध्यापकांनी मार्गदर्शन करावयाचे असा हा प्रयोग होता. दिल्लीच्या मध्यवर्ती शिक्षण संस्थेने या प्रयोगाची पाहणी करून गौरव केला व त्यासाठी अनुदान दिले. निर्भीडपणा हा डोंगरे यांचा स्थायीभाव होता. विद्यापीठातील सभांमध्ये, सार्वजनिक सभांत किंवा संस्थेच्या सभेत स्वत:च्या बुद्धीला पटणारे विचार ते निर्भीडपणे मांडत.

'शिक्षणाचे तात्त्विक व सामाजिक स्वरूप' व 'शालेय संघटन व प्रशासन' ही त्यांची काही पुस्तके. 'माध्यमिक शिक्षण: काल, आज आणि उद्या' हे पुस्तक त्यांनी शिक्षणमहर्षी जे. पी. नाईक यांच्या आग्रहावरून लिहिले. या पुस्तकाला 'गुरुवर्य प्राचार्य ग.वि. अकोलकर' पुरस्कार लाभला.

– प्रा. सुहासिनी पटेल

## डोळे, नारायण यशवंत

**प्राचार्य**

**१४ जानेवारी १९३१ - ३० ऑक्टोबर २००१**



नारायण यशवंत डोळे यांचे शालेय शिक्षण पुण्यातील न्यू इंग्लिश स्कूल, रमणबागेत झाले तर सर परशुरामभाऊ महाविद्यालयातून त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण घेतले.

१९४८ मध्ये महाविद्यालयात असताना गांधी हत्येनंतर दंगली उसळल्या, त्यावेळी प्रा. सोनोपंत दांडेकर प्राचार्य होते. आग लावायला आलेल्या जमावाला रोखण्यासाठी सोनोपंत, प्राध्यापक वर्ग व हे सर्व विद्यार्थी सरसावले. प्राचार्य व प्राध्यापकांच्या त्यावेळच्या धडाडीच्या वागणुकीचे उत्तम संस्कार डोळे यांच्यासारख्या विद्यार्थ्यांवर झाले. १९५१ साली अर्थशास्त्रात बी.ए. झाले. १९५३ मध्ये एम.ए.ला राज्यशास्त्र विषय घेऊन पहिला क्रमांक पटकावला.

१९५७ मध्ये नोकरी करीत त्यांनी पुणे विद्यापीठाची पीएच.डी. पदवी संपादन केली. त्याच वर्षी ते नांदेडला आले व तेथून १९६२ मध्ये उदगीरच्या महाविद्यालयात प्रविष्ट होऊन तेथेच राहिले. अध्यापन व अध्ययन ही त्यांची खरी आवड.त्याचसोबत उत्तम प्रशासक म्हणून त्यांनी चौफेर नावलौकिक संपादन केला.

उदगीरच्या महाविद्यालयाचे नाव महाराष्ट्र उदयगिरी महाविद्यालय होते. परंतु प्राचार्य डोळे यांच्या काळात ते 'डोळ्यांचे महाविद्यालय' म्हणून ओळखले जाऊ लागले. वयाच्या ३१ व्या वर्षी डोळे प्राचार्य झाले.

१९६३ ते १९९० या आपल्या कारकीर्दीत त्यांनी विविध उपक्रम राबवून आपल्या महाविद्यालयाला नामवंत करण्याची प्रशंसनीय कामगिरी केली. विद्यार्थ्यांचे प्रेम आणि विश्वास हेच खऱ्या शिक्षकाचे भांडवल असते हे त्यांनी सुरवातीपासून ओळखून आपल्या वागणुकीनेच याचे प्रत्यंतर घडविले. विद्यार्थीच नसतील तर आपल्या अस्तित्वालाच काही अर्थ नाही असे त्यांना वाटे. प्राचार्य, प्राध्यापक, ग्रंथालय, इमारत, प्रयोगशाळा वगैरे सर्व कशासाठी? विद्यार्थी असतात म्हणूनच ना? हेच तत्व त्यांनी सतत जोपासले. गरीब, ग्रामीण, मागास व दलित विद्यार्थ्यांच्या विकासासाठी त्यांनी भरीव व प्रशंसनीय कार्य केले.

प्राचार्य डोळे स्वतः वेळेपूर्वी येत. त्यामुळे प्राध्यापक व कार्यालय कर्मचाऱ्यांनाही वेळेवर येण्याचे बंधन पाळावे लागे. डोळे यांनी आपल्या कार्यालयाबाहेर पाटी लावून तसे वर्तनही केले. 'यू आर वेलकम, वॉक इन' युवकांशी कसे वागावे याचे संस्कार डोळे यांनी राष्ट्र सेवादलात आत्मसात केलेले होते. विद्यार्थ्यांची तक्रार ते तत्परतेने व गंभीरतेने घेत असत. ते स्वतः काही काळ राष्ट्रसेवा दलाचे अध्यक्ष होते आणि छात्रभारती या विद्यार्थी संघटनेचे प्रमुख मार्गदर्शकही होते.

विद्यार्थ्यांचे मनोगत, त्यांच्या अडचणी समजून घेऊन त्या दूर करण्यासाठी प्राचार्य डोळे यांनी पालक - प्राध्यापक योजना सुरू केली. प्राध्यापकांच्या बैठकीत विचार करून प्रत्येक प्राध्यापकाकडे २५ विद्यार्थी सोपविले. प्राध्यापकांनी नीटनेटके रहावे, आपली गुणवत्ता वाढवीत रहावे, डॉक्टरेट मिळवावी, वर्गात उभे राहून शिकवावे, विद्यार्थी - प्रवेशाचे वेळी त्यांना कोणत्या शाखेत जावे, कोणते विषय निवडावे, भावी नोकरीची संधी, त्याचा कल व गुणवत्ता पाहून व्यक्तिशः मार्गदर्शन करणे सुरु केले. डोळे स्वतः सकाळी ८ ते १ आणि दुपारी ३ ते ५.३० महाविद्यालयामध्ये असत. विद्यार्थ्यांना रागवायचे असल्यास जाहीर टीका करायची नाही तर आपल्या कार्यालयात एकट्याला बोलावून ते समजावून सांगत असत. प्राध्यापकांनी ग्रंथालयाचा उपयोग करावा, फक्त अभ्यासक्रम पूर्ण करण्यापुरते मर्यादित न राहता सामाजिक ऋण फेडण्याचा प्रयत्न करावा असे ते वारंवार सांगत असत.

मुलींना सायकल चालवता येत नसे म्हणून शिकण्यासाठी त्यांनी १०-१२ सायकली भाड्याने आणून ठेवल्या व सूचना लावली. हौशी प्राध्यापकाची योजना करून कॉलेजच्या मैदानात रिकाम्या तासाला शिकविण्याची व्यवस्था केली. मुलांपैकी गरीब, दलित, ग्रामीण मुले

अनवाणी येत. त्यांना स्वतःच्या खिशातले पैसे देऊन चप्पल विकत घ्याव्या यासाठी त्यांनी मदत केली. महाविद्यालयाचे ग्रंथालय अत्यंत समृद्ध करून मुलांना घरी पुस्तके देण्याची सोय केली. पाठ्यपुस्तके, शिष्यवृत्तीचे पैसे त्यांना मिळावे म्हणून वेळोवेळी त्यांनी मुलांची सोय पाहिली. विद्यार्थी कल्याण मंडळाच्या निवडणुकांमध्ये गैरप्रकार कधी झाले नाहीत. विद्यापीठाच्या परीक्षा घेण्यासाठी केंद्र प्रमुख म्हणून प्राचार्यांचे नाव असे. त्याला मानधन मिळे. प्राचार्यांनी प्राध्यापकांच्या बैठकीत या कामाचे सर्वानुमते वाटप केले व चांगला पायंडा पाडला.

मुलांना स्थानांतर प्रमाणपत्र (ट्रान्स्फर सर्टिफिकेट) मिळण्यास खूप अडचण होत असे. डोळे यांनी विद्यार्थ्यांना बिनदिक्कत महाविद्यालयामध्ये प्रवेश देणे सुरू केले व त्याचे टी.सी. मार्क मेमो महाविद्यालयातर्फे मागवून घेतले. शाळा मुलांची अडवणूक करीत व मुलांना प्रवेशाला फार अडचण होई. डोळे यांच्या या कृतीने मुलांना दिलासा मिळाला. शिष्यवृत्तीधारक मुलांना प्रवेश घेतल्याबरोबर तीन महिन्यांची शिष्यवृत्ती देणे डोळे यांनी सुरू केले. त्यामुळे मुलांच्या राहण्याजेवण्याची व्यवस्था होत असे. गरीब मुलांना कमी खर्चात रहाता यावे म्हणून महाविद्यालयाच्या नावे त्यांनी गावात काही वाडे भाड्याने घेतले व तेथे वसतिगृह चालविले.

महाविद्यालयाच्या वार्षिक स्नेहसंमेलनात सामूहिक भोजनाचा कार्यक्रम ते आग्रहाने ठेवीत. त्यामुळे जातीधर्माच्या, स्पृश्य-अस्पृश्यतेच्या भिंती मोडून एकत्र जेवायला बसता येई व आपसात जवळीक निर्माण होई. पैशाअभावी परीक्षेला बसता येत नाही असा एकही विद्यार्थी महाविद्यालयामध्ये असता कामा नये याची ते कटाक्षाने काळजी घेत. वर्गावर्गात जाऊन चौकशी करीत.

गावी गेलेल्या मुलांना निरोप पाठवून बोलावून घेत. अनुसुचित जातीजमातीच्या मुलांना हक्काचे व्यासपीठ मिळावे म्हणून प्रा. गवळी यांच्या सूचनेवरून डोळे यांनी 'आंबेडकर डिबेटिंग असोसिएशन' ची स्थापना केली व तिच्या वतीने वर्षभर वक्तृत्व स्पर्धा ठेऊन ढाल, पेले, रोख बक्षिसे देणे सुरू केले. बैलपोळा, पंचमी, अशा सणांना उपस्थिती नाममात्र असे. प्राचार्यांनी पंचमीपूर्वी महाविद्यालयाच्या आवारातील चिंचेच्या झाडांना दोरखंड बांधून तीन झोके तयार केले.

मुलेमुली आनंदली. गरीब मुलांना शहरी खेळ परवडत नसत. डोळे यांनी मोकळ्या तासाला विटीदांडूचा खेळ खेळण्यास मुलांना प्रोत्साहन दिले. १९६८ साली त्यांनी प्राध्यापकांची एक गृहनिर्माण संस्था स्थापन केली. १९८० मध्ये उदय सहकारी सोसायटीतील ३०-३६ जणांची सोय झाली.

महाविद्यालयाच्या मुलांच्या सर्वांगीण विकासासाठी डोळे त्यांच्या आरोग्याकडेही लक्ष देत. संस्कार व्हावे, महाविद्यालयाचे वातावरण रम्य व्हावे म्हणून त्यांनी सकाळी ७.३० ते ८ पर्यंत देशभक्तीपर, भावगीते, शास्त्रीयसंगीत, भजने, वाद्यसंगीत अशा स्वरूपाच्या ध्वनिमुद्रिका लावण्याचा उपक्रम केला. मुलामुलींना ही योजना आवडली. सकाळच्या प्रसन्नतेत त्यामुळे भर पडली.

दरवर्षी १४ ऑगस्टला रात्री ९ ते १२ देशभक्तीपर गीतांच्या स्पर्धा सुरू केल्या. सर्व शाळा, महाविद्यालयांना आमंत्रण असे. या उपक्रमाला उत्तम प्रतिसाद मिळाला. महाविद्यालयचे समृद्ध ग्रंथालय पाहून प्रसिद्ध समीक्षक वा.ल. कुलकर्णींनी त्यांचे कौतुक केले. फाटलेल्या पुस्तकांची वेळीच बांधणी व्हावे म्हणून डोळे यांनी ग्रंथालयातच पुस्तक बांधणी विभाग सुरू केला. त्यांच्या महाविद्यालयाला राज्यशास्त्र, मराठी, अर्थशास्त्र या विषयांसाठी पीएच.डी. परीक्षेसाठी संशोधन केंद्र म्हणून मान्यता मिळाली.

सहकाऱ्यांच्या सहकार्याने प्राचार्य डोळे यांनी राष्ट्रीय सेवा योजनेची शिबिरे घेतली. चांगला प्रतिसाद मिळाला. उदगीरपासून ३२ कि.मी. दूर अशा दुर्गम भागात मरसांगवी येथे १९८७-८८ मध्ये पहिले शिबिर घेतले. सर्वजण चालत गेले. राजीव गांधीना पत्र लिहून या दुर्गम भागात पोचण्यासाठी रस्ता व एस.टी. बसची सोय उपलब्ध करून दिली.

१९६९ साली त्यांनी गावात मध्यवर्ती ठिकाणी महात्मा गांधी सार्वजनिक वाचनालय सुरू करून महाविद्यालयामध्ये

यणारी वृत्तपत्रे, साप्ताहिके, मासिके संध्याकाळी साडेपाच ते दुसऱ्या दिवशी सकाळी ८ वाजेपर्यंत ठेवण्याची व्यवस्था केली. ज्या मुलींना ई.बी.सी. प्रमाणपत्र आणता येत नाही त्यांना महाविद्यालयाची फी माफ असा निर्णय घेणारी या महाविद्यालयाची संस्था ही मराठवाड्यात पहिली संस्था होती. व्याख्यानांच्या निमित्ताने प्रा. डोळे महाराष्ट्रभर व बाहेरही फिरले. मराठवाडा विद्यापीठाच्या कलाशाखेचे ते काही काळ अधिष्ठाता होते.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. 'प्राचार्य डॉ. ना. य. डोळे'; साकेत प्रकाशन, औरंगाबाद; १९९५.*

* * *

ड

# त

त

## तर्खडकर, दादोबा पांडुरंग

**शिक्षक, अभ्यासक, लेखक**

**९ मे १८१४ – १७ ऑक्टोबर १८८२**



वसई जवळचे तर्खड हे मूळ वसतिस्थान सोडून आजोबा रोजगारासाठी मुंबईत आले. शेतवळीत (हल्लीच्या खेतवाडीत) दादोबांचा जन्म झाला. त्यांच्या वडिलांचे नाव पांडुरंग व आईचे नाव यशोदाबाई होते. वडिलांनीच त्यांना घरी शिकवण्यास आरंभ केला.

१८२२ मध्ये स्थापन झालेल्या बॉम्बे नेटिव एज्युकेशन सोसायटीच्या शाळेत दादोबा इंग्रजी शिकू लागले. जर्विस साहेबांच्या हाताखालील एक-दोन पंडित व रामचंद्रशास्त्री जानवेकरांनी मिळून प्रश्नोत्तर रूपाने एक लहानसे मराठी व्याकरण रचले होते. त्या व्याकरणाच्या प्रती लिहून त्यावरून मुले व्याकरण शिकत. बापूशास्त्री शुक्ल यांनी शाळेतील मुलांकडून अनेक ग्रंथ वाचून घेतले. ते मोठ्या प्रेमाने शिकवीत. ''मला स्वभाषेविषयी इतकी गोडी लागली यास मुख्य कारण आमच्या तीर्थरूपांची दिनचर्या व दुसरे हे बापूशाशास्त्री असे दादोबांनी नमूद करून ठेवले आहे.''

१८२८ साली जगन्नाथ पांडुरंग यांची एकुलती एक कन्या कृष्णाबाई यांच्याशी दादोबांचा विवाह झाला. दादोबा पांडुरंग यांनी संस्कृत व इंग्रजी भाषांच्या व्याकरणाचे सखोल अध्ययन केले होते. मराठी भाषेच्या रूपविचाराची स्वतंत्र प्रज्ञेने व्यवस्था लावून त्यांनी १८३६ मध्ये त्यांनी मराठी व्याकरण लिहिले.

मराठी व्याकरणकार, ग्रंथकार आणि कळकळीचे समाजसुधारक असा लौकिक त्यांनी मिळवला. 'मराठी भाषेचे पाणिनी' अशी कीर्ती त्यांनी संपादन केली. १८४०-४१ मध्ये नेटिव एज्युकेशन सोसायटीच्या जागी सरकारने बोर्ड ऑफ एज्युकेशन स्थापन केले. त्यात सहा एतद्देशीय व सहा युरोपियन असावेत असा नियम होता. जगन्नाथ शंकरशेट, फ्रामजी कावसजी, जमशेटजी जीजीभाई इत्यादी एतद्देशीय महानुभाव मंडळात होते. एलफिन्स्टन संस्थेमध्ये इंग्रजीचे सहकारी शिक्षक म्हणून काम केल्यावर दादोबा सुरतेत स्थापन झालेल्या इंग्लिश शाळेत कार्यकारी शिक्षक म्हणून दरमहा दीडशे रुपये वेतनावर नियुक्त झाले. ते गुजरातीचे रोमन लिपित आणि गुजरातीचे इंग्रजीत भाषांतराचे कामही करून देत. पुढे मुंबईच्या शाळेत त्यांची नेमणूक जून १८४६ मध्ये झाली आणि त्यांना क्रमाने बढत्या मिळत गेल्या.

दादोबांनी सरकारी नोकरीत शिक्षक, अधीक्षक, उपजिल्हाधिकारी ही पदे भूषविली. सेवानिवृत्तीनंतर अल्पकाळ त्यांनी ओरिएंटल ट्रान्सलेटर या हुद्द्यावर काम केले.

इंग्रजी अमदानीतील जवळजवळ एकमेव आत्मचरित्र म्हणून दादोबांच्या आत्मचरित्राचे महत्त्व आहे. प्रांजळ, साध्या सोप्या भाषेत लिहिलेल्या या ग्रंथात तत्कालीन धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक व राजकीय स्थितीचे प्रतिबिंब पडले आहे. अभ्यासकांच्या दृष्टीने ते मोलाचे आहे, शिवाय वेगवेगळ्या चळवळींशी निगडित दादोबांचे व्यक्तिमत्त्वही वाचकाला त्यात दिसून येते. दादोबांनी विविध प्रकारचे लेखन केले. मराठी भाषेचे व्याकरण (अनेक आवृत्त्या), लघु व्याकरण (१८५०), केकावली – यशोदा पांडुरंगी टीकेसह (१८३५) याची प्रस्तावना

इंग्रजी व मराठी भाषांमध्ये आहे. महाराष्ट्र भाषेच्या व्याकरणाची पूरणिका (१८८१) परमहंसिक ब्रह्मधर्म (१८००), शिशुबोध (१८८४ मध्ये प्रकाशित), धर्मविवेचन, विधवाश्रुमार्जन (१८५७), इंग्रजी व्याकरणाची पूर्वपीठिका (१८६०); स्वीडन बॉर्ग यांच्या ग्रंथावर लिहिलेल्या 'अ हिंदू जंटलमन्स रिफ्लेक्शन्स रिस्पेक्टिंग द वर्क्स ऑफ एमानुएल स्वीडनबॉर्ग' (१८७८) या ग्रंथाची युरोपात प्रशंसा झाली होती. 'मानव धर्म सभा' आणि 'परमहंस सभा' या धर्मसुधारक संस्थांमागे दादोबांची प्रेरणा होती. या खेरीज मराठी ज्ञानप्रसारक सभा, मुंबई विद्यापीठ, पुनर्विवाहोत्तेजक सभा, बॉम्बे असोसिएशन इत्यादी संस्थांच्या कार्यात त्यांचा सक्रीय सहभाग असे. मध्य प्रदेशातील जावरा येथे शिक्षक म्हणून कामगिरीवर असताना दादोबांनी भिल्लांचा बंडखोर पुढारी पटाजी नाईक याचे बंड हिमतीने मोडून काढले. त्यांच्या या मोलाच्या कार्याबद्दल सरकारने दादोबांना रावबहाद्दूर ही पदवी बहाल केली होती. मुंबईमध्ये दादोबांचे निधन झाले.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *जोशी, लक्ष्मणशास्त्री, संपादक; 'मराठी विश्वकोश', खंड ७; महाराष्ट्रराज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई; १९७६.*
२. *खानोलकर, गं. दे., संपादक; मराठी वाङ्मय सेवक द्वितीय खंड ; १९३८.*
३. *प्रियोळकर, अ. का., संपादक; 'दादोबा पांडुरंग', आत्मचरित्र.*

## ताकवले, राम गोविंद

☞ **मुख्य नोंद – विज्ञान खंड**

## ताम्हण, केशव गोपाळ

**प्राचार्य**

**१८६० – १९४०**

केशव गोपाळ ताम्हण ऊर्फ 'बापूजी' यांचे मूळ घराणे हे आंध्र प्रदेश येथील . त्यांचा जन्म १८६० मध्ये वैकुंठ चतुर्दशीच्या दिवशी झाला. त्यांचे शिक्षण नागपूरच्या नील सीटी विद्यालयात मॅट्रिकपर्यंत झाले. त्यांनी अलाहाबाद विद्यापीठातून संस्कृत मध्ये एम. ए. केले.त्यांचा गाढा व्यासंग होता. नागपुरातील व्याकरण विद्वान म.म. भटजी घाटे शास्त्री यांचे बापूजी शिष्य. संस्कृतातील घाटेशास्त्री घराण्याची कुलविद्या – 'व्याकरण शास्त्र' हा बापूजींचा मुख्य विषय होता. तर संस्कृत साहित्य शास्त्र हा आवडीचा विषय होता. काव्याची आवड असल्यामुळे अनेक मार्मिक काव्य रचना त्यांनी केल्या आहेत. १९२२ मध्ये त्यांचा काव्यसंग्रह त्यांचे शिष्य प्रा. लक्ष्मण रा. कुलकर्णी यांनी प्रकाशित केला. या कविता गुणपूजक,तसेच समस्यापूर्तीच्या आहेत. मोरोपंतांच्या रचनेशी काव्यानुरूपता आढळते. निर्दोष आणि सुशोभक रचना हा स्थायीभाव आढळतो.

बापूजी स्वदेश, स्वभाषा व स्वधर्म यांचे पुरस्कर्ते होते. संग्राह्य, गुणपूजक वृत्ती, पराकाष्ठेचे प्रसिद्धीपराङ्मुख, मितभाषी, विनयमधुर वर्तनाचे धनी होते.

नागपुरातील लोकांनी 'नागपूर महाविद्यालय' सुरू केले. त्यासाठी बापूजींनी अथक परिश्रम घेतले होते.ते पहिले 'भारतीय – प्राचार्य' झाले. नागपुरातील महाविद्यालयीन शिक्षणाचे ते आद्य प्रवर्तक होते. पुढे इंग्रजांनी हे महाविद्यालय ताब्यात घेतले आणि त्याचे नाव 'मॉरिस कॉलेज' झाले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पुन्हा त्याचे नामकरण 'नागपूर शासकीय महाविद्यालय' झाले.प्रस्तुत महाविद्यालयातून त्या काळात विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्या शिकल्या. यातील अनेक पदवीधरांचे व संस्कृत अध्यापकांचे पहिले गुरू म्हणजे बापूजी ताम्हण. यातील काही नामवंत बापूजींचे शिष्य होते. उदा.'तिलक यशोऽर्णव' हे अकादमी पुरस्कार प्राप्त पुस्तक लिहिणारे चतुरस्र लोकनायक बापूजी अणे बापूजींचे शिष्य होते. तत्त्वचिंतक व तत्कालीन, माजी आरोग्य मंत्री डॉ. वा. शि. तथा दादासाहेब बारलिंगे संस्कृत पंडित ना. न. भिडे, म. म. बाळशास्त्री हरदास,इत्यादी बापूजींनी सेवानिवृत्तीनंतर संस्कृतसाठी १९३० मध्ये 'भोसला वेदशाळेचे' रूपांतर 'भोसला वेदशाळा महाविद्यालया'त केले. या महाविद्यालयाची स्थापना वाराणसीचे थोर संस्कृत पंडित

त

लक्ष्मणशास्त्री द्रविड यांच्या पुढाकाराने झाली. महाविद्यालयाच्या जडणघडणीत, उभारणीत बापूजींचा सिंहाचा वाटा होता. त्यांनी या महाविद्यालयाचे 'अवेतन प्राचार्यत्व' स्वीकारले होते. बापूजींचे निधन १९४० मध्ये श्रावण शु. द्वितीयेला झाले.

– डॉ. कुमार शास्त्री

**ताम्हनकर, वसंत सीताराम**
*आण्णा ताम्हनकर*
**सामाजिक कार्यकर्ते, संस्थापक**
**२२ एप्रिल १९३३**



ज्ञान प्रबोधिनी या शिक्षण, संशोधन, ग्रामविकासात अग्रेसर असलेल्या संस्थेच्या संस्थापक सदस्यांपैकी एक वसंत सीताराम ताम्हणकर होते. १९६२ ते १९८३ प्रबोधिनीचे संचालक म्हणून आणि १९८९ ते २०१० पर्यंत सोलापूर आणि हराळी (भूकंपक्षेत्र) येथील प्रबोधिनीच्या कार्याचे कर्णधार म्हणून त्यांची कारकीर्द गाजली.

मानसशास्त्रातील सुवर्णपदक मिळविले पुणे विद्यापीठात अध्यापन केले. डॉ. वसंतराव सीताराम तथा आण्णा ताम्हनकर यांचा जन्म पुण्यात सीतारामपंत व उमा यांच्या पोटी झाला.

आण्णांचा तरुणपणातील काळ राष्ट्रीय स्वयंसेवक संघ मंत्रित होता. संभाजीनगरचे (औरंगाबाद) ते जिल्हाप्रचारक होते. डॉ. विनायक विश्वनाथ पेंडसे तथा आप्पा यांच्या ओळख संघातच झाली. त्यांनी आण्णांच्या मनात शिक्षणाची गोडी उत्पन्न केली.

आण्णांनी एम. ए. मानसशास्त्र आणि एम. एड. शिक्षण शास्त्रात करून पुणे विद्यापीठाची दोन सुवर्णपदके मिळवली. विद्यापीठातच प्रा. व. कृ. कोठुरकर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी 'अचिव्हमेंट मोटिव्हेशन' या विषयावर केवळ दोन वर्षांत पीएच. डी. प्राप्त केली. त्यांचे विदेशस्थ परीक्षक डॉ. मॅक्लेलेंड यांनी त्यांच्या प्रबंधाची मोकळ्या मनाने प्रशंसा केली.

त्यानंतर विद्यापीठात काही काळ अध्यापनाचे काम आण्णांनी केले. पण लौकरच ज्ञान प्रबोधिनीचे काम पूर्णवेळ करता यावे म्हणून त्यांनी त्यागपत्र दिले. त्यानंतर आजपर्यंत प्रबोधिनीचे पूर्णसमय कार्यकर्ते म्हणून ते सतत कार्यरत आहेत.

शिवगंगा खोरं : ग्रामीण युवकाचं तंत्रशिक्षण आणि जीवनशिक्षण आज ज्ञान प्रबोधिनीचे शिवगंगा-गुजवणी नद्यांच्या खोऱ्यातील २३६ खेड्यांमध्ये तंत्रशिक्षण, महिलाविकास, उद्योजकता विकास, आरोग्य, पाणलोट क्षेत्र विकास, व्यसनमुक्ती असे विविध प्रकारचे काम आहे.

त्याची पायाभरणी १९६९-७० पासून आण्णांनी केली. किर्लोस्कर-ज्ञान प्रबोधिनी यंत्रशाळेची उभारणी त्यांनी खेड शिवापूर येथे राहून केली. तिथे परिसरातील खेड्यांमधील मुले तंत्रशिक्षण घेण्यासाठी येऊ लागली.

आण्णांनी अशा १४०० हून अधिक ग्रामीण मुलांचे शिक्षण प्रेमाने आणि अनुशासनपूर्वक के ले. युवकांना त्यांनी उत्तमोत्तम राष्ट्रभक्तीपर गीते सुरेल म्हणायला शिकवली. गणेशोत्सवाच्या मिरवणुकीत ढोलताशे वाजवायला नि बर्च्या घेऊन नाचायला शिकवले. उत्तम कार्यक्रमाचे नियोजन आणि कार्यवाही जबाबदारीने कशी करायची याचे शिक्षण दिले. त्यांच्यामुळे अनेक मुस्लीम,नवबौद्ध तरूणांनी प्रबोधिनीच्या कार्याची दीक्षा घेतली. या तरुणांमधून उत्तम ग्रामीण उद्योजक घडले.

शिवगंगा खोऱ्यात हातभट्टी चालविणारे पुष्कळ अड्डे होते. आण्णांनी महिलांची आणि युवकांची हातभट्टी विरूद्ध आघाडी उघडली. हातभट्टीच्या अड्ड्यांवर छापे घालून ते उद्ध्वस्त कसे करायचे हे शिक्षण आण्णांनी त्यांना स्वत: करून दाखवून दिले. परिणाम म्हणून काही वर्षे या परिसरातील भट्ट्या आणि देशी दारूची दुकाने बंद पडली.

या परिसरात साखर नावाचे गाव होते. कावंदी नदीला जेव्हा पूर येई त्यावेळी हे गाव बाकी जगापासून तुटून जाई. इतक्या दुर्गम ठिकाणी पूल बांधकामाचा अनुभव नसतानाही मे १९७७ च्या उन्हाळ्यात त्यांनी प्रा. रामभाऊ डिंबळे

यांच्या मदतीने या पुलाचे बांधकाम अतिशय प्रतिकूल परिस्थितीत पूर्ण केले.

डॉ. अप्पा पेंडसे यांच्या निधनानंतर सहा वर्ष आण्णांनी प्रबोधिनीच्या संचालकपदाचे दायित्व सांभाळले. योग्य निर्णय करीत प्रबोधिनीला कर्जमुक्त केले. युवकांचे कन्याकुमारीला प्रेरणाशिबिर घेतले. अनेक युवक-युवतींना प्रबोधिनीच्या कार्यात जीवन समर्पण करण्याची प्रेरणा दिली. विविध धर्मीयांशी संवाद करीत व्यापक हिंदुत्वाचा विचार मांडला. विदेशातही प्रबोधिनीसाठी अनेक साहाय्यक व शुभचिंतक जोडले.

या काळात सोलापूरच्या बालविकास मंदिर या संस्थेशी विचारविनिमय चालू होता. ही संस्था तिच्या संस्थापकांनी - केळकर पतिपत्नींनी - ज्ञान प्रबोधिनीकडे हस्तांतरित केली. ज्ञान प्रबोधिनी- सोलापूर या न्यासाचे ते कार्याध्यक्ष झाले. ते सोलापूरला निवासाला आले. ज्ञान प्रबोधिनीच्या संचालकपदाची सूत्र डॉ. गिरीश श्रीकृष्ण बापट यांनी स्वीकारली.

आण्णांच्या नेतृत्वाखाली प्रबोधिनीचे सोलापुरात काम सुरू केल्यावर तेथील शैक्षणिक जगतात लक्षणीय बदल झाले. पंधरा-पंधरा शिक्षणसंस्था एकत्र येऊन गणेश विसर्जनाच्या भव्य सुंदर मिरवणूका निघू लागल्या त्यात हजारो विद्यार्थ्यांचा आणि शिक्षक-पालकांचाही सहभाग होता. ‘स्पर्धा केवळ नव्हे तर उत्तमतेसाठी सहकार्य’ हा नवा मंत्र आण्णांनी दिला.

मागासवर्गीय शाळांमध्ये प्रबोधिनीचे शिक्षक - कार्यकर्ते विद्याव्रत संस्कार रुजवू लागले, व्यसनांपासून दूर राहून उत्तम विद्याभ्यास करीन, शरीरसंपदा मिळवीन अशा शपथा विद्यार्थी अग्निसाक्षीने घेऊ लागले. साहसशिबिरे-साहससहली निघू लागल्या. सर्वधर्म प्रार्थना होऊ लागल्या.

प्रतिभाविकास, वाचनविकास इ. बुद्धिकौशल्याचे प्रशिक्षण वर्ग व आध्यात्मिक व्याख्यानमाला योजल्या जाऊ लागल्या. १९९३-९४ मध्ये प्रबोधिनीच्या नेतृत्वाखाली सोलापूरच्या ३० झोपड्यांमध्ये १८०० साक्षरता वर्ग दोन वर्ष चालले. त्यात शिक्षक-विद्यार्थी असा सर्वांचा सहभाग होता.

बाबूभाई कराणी यांनी जपानी राजदूतांची हराळी भेट घडवली. डॉ. आण्णा ताम्हनकर ही व्यक्ती हराळीच्या बरड माळरानावर शिक्षण रुजवण्यासाठी सर्व गैरसोयी-अडचणीत निश्‍चय व निष्ठेने उभी आहे हे पाहून राजदूतांनी साहाय्याचा हात पुढे केला. त्यातून हराळीचे शिक्षणतीर्थ उभे राहिले. एक मंदिरसदृश वास्तू झाली.

२००६ मध्ये मराठवाडा कृषी विद्यापीठाची मान्यता असलेले कृषितंत्र पदविका विद्यालय सुरू झालं. आण्णा या सर्व मुलांशी संवाद करतात, त्यांना गीतं शिकवतात, त्यांच्याबरोबर भजन दिंडीत खेळतात. उत्तम जीवनाची सूत्रे त्यांना शिकवतात. उत्तम माणूस घडवतात.

हराळीच्या ६० एकर भूमीवर काजू-आंबा- पेरू-लिंब-बोरांच्या हिरव्यागार फळबागा डोलत आहेत, सौर-पवन ऊर्जांचा कल्पक उपयोग केलेला आहे. साडेसहा कि.मी. वरून माकणी तलावातून पुरूषार्थ प्रयत्नाने जलप्रवाह आणला आहे.

या कार्यासाठी शासनाने हराळी प्रबोधिनीला ‘वृक्षमित्र’ पुरस्कार दिला आहे. आण्णांचा डोंबिवलीच्या टिळक शिक्षण संस्थेने डॉ. वसंतराव गोवारीकरांच्या हस्ते सत्कार केला आहे.

नवनीत जीवन गौरव पुरस्कार, अंबरनाथचा दधिचि पुरस्कार हे त्यांना मिळालेले पुरस्कार होत.पूजनीय कै. माधवनाथ महाराज हे आण्णांचे आध्यात्मिक दीक्षा गुरू होते.

— स्वर्णलता भिशीकर

## तीरमारे, शिवराम कृष्णाजी

**शिक्षक**

**२२ एप्रिल १८९४ – २९ एप्रिल १९७८**

शिवराम कृष्णाजी उर्फ अण्णासाहेब तीरमारे यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील दुधोंडी या गावी झाला.

या गावात शाळा नव्हती. त्यामुळे शिवरामांना शिक्षण देण्यासाठी त्यांच्या वडिलांनी आबा तायप्पा गुरुजींची नेमणूक केली. पुढे आबा तायप्पा दुधोंडी सोडून गेल्यानंतर शिवरामांना भिलवडी गावातील शाळेत प्रवेश मिळाला.

त



त्यावेळी मातंग समाजातील मुलांना शाळेच्या बाहेर वळचणीखाली बसावे लागे. वर्गात शिकविलेले बाहेरून ऐकून, पाठ करून, फळ्यावर दिसेल ते लिहून तीरमारे यांनी पहिलीचा अभ्यास पूर्ण केला. त्यांच्यामुळे इतर ९/१० मुलेही शाळेत येऊ लागली. त्यांची बुद्धी तल्लख होती. इयत्ता चौथीपासून विद्याखात्याची दरमहा दोन रुपयांची शिष्यवृत्ती त्यांना मिळू लागली.

दुधोंडीच्या शाळेत चार विद्यार्थी होते. १९१४ मध्ये चौघे जण व्हर्नाक्युलर फायनलच्या परीक्षेसाठी साताऱ्यास गेले. चौघेही चांगल्या गुणांनी उत्तीर्ण झाले. शिवराम तीरमारे हे ही परीक्षा उत्तीर्ण झालेले दलित समाजातील पहिले विद्यार्थी होते त्यामुळे सांगलीच्या राजेसाहेबांनी त्यांना कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे ह्यांच्या पुण्यातील अहिल्याश्रमात ठेवले. पण घरच्यांचा विरोध असल्याने गुरुजी एकच वर्ष तेथे राहिले.

१९१५ मध्ये पुण्याच्या प्रशिक्षण महाविद्यालयामध्ये ते दाखल झाले व चांगल्या गुणांनी उत्तीर्ण झाले. पण त्यांच्या भावाचे निधन झाल्याने दुसरे वर्ष पूर्ण करता आले नाही. सांगलीच्या विकासखात्याने त्यांना शाळा क्रमांक चारमध्ये शिक्षकाची नोकरी दिली. तीरमारे गुरुजींचे अध्यापनाचे काम सुरू झाले.

त्या वेळी शाळेत चारच विद्यार्थी होते. शिकवण्याबरोबरच मुलांबरोबर कुस्ती, जोर, बैठका, हुतूतू, लंगडी ते खेळत. मुले शाळेत रमू लागली. विद्यार्थ्यांची संख्या चारवरून पन्नास-साठवर गेली.

शिक्षकांचा मुक्काम रात्री शाळेतच असल्याने तरुण मुले जमू लागली. त्यांनाही गुरुजी शिकवू लागले.

निधी जमवून सबलापूरच्या शाळेतील मुलांना, शिक्षकांना बोलावून दसऱ्याच्या दिवशी खेळांच्या स्पर्धा गुरुजी घेऊ लागले. एका सभेतील गुरुजींनी केलेले भाषण ऐकून छत्रपती शाहू महाराजांनी कोल्हापुरात मामलेदाराची नोकरी त्यांना देऊ केली. पण नम्रपणे गुरुजींनी ती नाकारली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मध्यस्थीचा प्रयत्न केला. पण त्याचाही उपयोग झाला नाही. पुढे डॉ. आंबेडकर सांगलीत आले असता विचारविनिमय झाला. त्यातूनच 'बहिष्कृत प्रसारक मंडळा'ची स्थापना झाली. २५बाय१२ ची कुडामेढीची झोपडी करून विद्यार्थ्यांच्या राहण्याची सोय मंडळाने केली.

१९३८ मध्ये सध्याच्या संस्थेच्या जागेवर वसतिगृह बांधण्याचा निर्णय झाला. १९४२ मध्ये इमारत बांधून पूर्ण झाली व जगद्गुरुंच्या हस्ते इमारतीचे उद्घाटन झाले. महाराष्ट्र सरकारच्या समाज कल्याण विभागाने १९४८ मध्ये मान्यता दिली.

याच वर्षी तीरमारे गुरुजी सेवानिवृत्त झाले. त्यांनी पूर्णवेळ समाजकार्यास वाहून घेतले. वसतिगृहासाठी सरकारी जमीन भुई भाड्याने घेतली, स्वकष्टांनी तिचे रूप बदलले व वसतिगृह स्वावलंबी केले.

या शेतीतून ज्वारी, गहू, तांदूळ, ऊस अशी पिके घेतली. मुलांना अन्न मिळवून देण्याचा गुरुजींचा हेतू सफल झाला. पुढच्या काळात इमारतीचा विस्तारही गुरुजींनी केला.

सांगलीतील नाट्यगृहात होणाऱ्या नाटकांसाठी तिकिटे काढून मागासवर्गीयांना प्रेक्षक म्हणून प्रवेश त्यांनी मिळवून दिला. त्यांना मतदानाचा हक्कही गुरुजींनी मिळवून दिला. या समाजाच्या शैक्षणिक प्रगतीसाठी जसे गुरुजींनी प्रयत्न केले तसेच त्यांना हक्कही मिळवून दिले.

प्लेगच्या साथीत समाजातील लोकांना लस घ्यायला लावली. १९५० मध्ये झालेल्या कायद्यानुसार हरिजनांना घरे मिळावीत म्हणून संस्थेची नोंदणी केली. सतत चौदा वर्षांच्या गुरुजींच्या कष्टांमुळे त्यांच्या समाजातील लोकांना घरे मिळाली, समाजमंदिर बांधून मिळाले.

शिवराम कृष्णाजी तीरमारे गुरुजींनी आयुष्यभर संघर्ष करीत नि:स्वार्थ समाजसेवेचा एक आदर्श सर्वांसमोर ठेवला.

– विजय बक्षी

त

## तेंडुलकर, जानकी मोरेश्वर

**शिक्षिका, संस्थापक**

**१९१२ – १६ जुलै १९८२**

## तेंडुलकर, शांता सावळाराम

**शिक्षिका, संस्थापक**

**१९१५–१८ ऑगस्ट १९८१**



जानकी मोरेश्वर तेंडुलकर आणि त्यांच्या भगिनी शांता सावळाराम तेंडूलकर यांनी रत्नागिरी जिल्ह्यातल्या लांजे या छोट्याशा गावात आपली हयात खर्ची घालून निष्ठेने व श्रद्धेने जे कार्य केले त्यांची 'समर्पित जीवन' ही सत्यकथा मनोहर साखळकर यांनी शब्दबद्ध केल्यामुळे समाजापुढे येऊ शकली आहे.

राजापूर तालुक्यातील पाथर्डे नावाच्या छोट्याशा खेड्यातल्या सिनकर कुलातील या दोन कन्या. त्यांच्या वडिलांचे नाव पर्शराम. ते पोलिस खात्यात होते. त्यांना आठ अपत्ये होती. जानकी आक्का या सगळ्यात मोठ्या. १९१२ मध्ये जानकी आक्कांचा जन्म झाला. चार इयत्तांपर्यंत शिक्षण झाले व वयाच्या १२–१४ व्या वर्षी लग्न झाले. आक्कांचे यजमान मोरेश्वर यांचे अल्पशा आजाराने निधन झाल्याने आक्का एकुलत्या एक मुलाला कडेवर घेऊन माहेरी आल्या. ते मूलही काळाने ओढून नेले. त्यांचे मामा दिनकर साखळकर आणि राजापूर विद्यालयाच्या मुख्याध्यापकांनी उत्तेजन देऊन त्यांना पुढे शिक्षण घेण्यास सांगितले. कन्याशाळेतून त्या सहावी म्हणजे फायनल परीक्षा उत्तीर्ण झाल्या.

एक वर्षात इंग्रजी १ ते ३ इयत्ता इंग्रजी शाळेत करून १९३७ मध्ये आक्का मॅट्रिक झाल्या. त्याच वर्षी आक्कांनी राजापूर येथील मंदिरात सार्वजनिक हळदीकुंकू समारंभ करून सर्वांना चकित केले. या उपक्रमात त्यांची मैत्री कुसुमताई वंजारे व नाना वंजारे यांच्याशी झाली व अखेरपर्यंत ती टिकली. नंतर काही दिवस या मैत्रिणी वर्धा येथे आश्रमात राहून परतल्या त्या खादीचे व्रत घेऊनच. स्वातंत्र्यासाठी आक्कांनी सत्याग्रहात भाग घेतला. त्यांना अटक होऊन तुरुंगवासही घडला. हिंडलग तुरुंगात त्यांनी आयुर्वेदीय औषधोपचाराचा अभ्यास केला. दोन अडीच वर्षांनी त्या तुरुंगातून सुटल्या.

लांजे येथे कुसुमताई वंजारे यांच्या घरी आरोग्यकेंद्र सुरू केले. आप्पासाहेब पटवर्धन हे त्यांचे गुरू. डिसेंबर १९४५ ते मे १९४६ या अवधीत सासवड तालुक्यात पिंपळ येथे प्रेमाताई कंटक यांनी स्त्रियांचा शिक्षणवर्ग सुरू केला. आक्का व कुमुदताई रेगे यांनी तेथे शिक्षण घेतले. ग्रामसेवा केंद्रे सुरू झाली. त्यातूनच ४ जून १९४६ रोजी लांजे येथे कस्तुरबा ग्राम केंद्रातर्फे आक्का व कुमुदताईंनी शिक्षण, आरोग्यसेवा प्रचारासाठी कुंभारवाड्यात व चांभारवाड्यात बालवाड्या सुरू केल्या. मुलांना विहिरीवर आंघोळी घालणे, दात स्वच्छ ठेवणे, कपडे नीटनेटके व स्वच्छ ठेवणे व इतर सवयींचे संस्कार सुरू झाले. कुंभारवाड्यात बालवाडीसाठी इमारत मिळाली. गुराख्यांच्या मुलांसाठी एक ते चार इयत्तांचा वर्ग एका गोठ्यात सुरू केला. प्रौढ स्त्री–पुरुषांसाठी सुरू केलेल्या शिक्षण वर्गात ३५ ते ४० लोक येत. त्यांना स्वच्छतेचे धडे देण्याबरोबर किरकोळ औषधेही दिली जात. घर व अंगण कसे स्वच्छ राखावे याची प्रात्यक्षिके करून दाखविली जात. जानकी अक्कांच्या भगिनी शांताताई यांनी लांजे येथे आपली संस्था स्थलांतरित केल्यावर या दोघी भगिनी एकत्र येऊन कार्य करु लागल्या. जानकी आक्कांची सावली बनून अथक काम करुन शांताताई कर्करोगाने १८ ऑगस्ट १९८१ रोजी दिवंगत झाल्या. जानकी आक्काही कर्करोगाने १६ जुलै १९८२ रोजी दिवंगत झाल्या.



शांता पर्शराम सिनकर या जानकी आक्का यांच्या धाकट्या भगिनी होत्या. त्यांचा सावळाराम तेंडुलकर

त

यांच्याशी विवाह झाला. शांतातार्इंनी फायनलच्या परीक्षेनंतर प्राथमिक शिक्षक प्रशिक्षणाचा अभ्यासक्रम पूर्ण केला होता. शिक्षिकेची नोकरी करून संसाराला हातभार लावला. शांतातार्इंनी आपले पती सावळारामभाऊ यांना मुद्रणालय काढण्यासाठी स्वत:चे स्त्री-धन असलेले दागिने दिले. दुर्दैवाने सावळाराम यांचे १४ ऑक्टोबर १९५२ रोजी निधन झाले. नोकरी चालू असताना शांतातार्इंनी १९५७ अखेर देवरूख येथे अनाथ महिलाश्रमाची स्थापना केली होती. त्या स्वत: आश्रमाच्या संचालिका होत्या. नंतर त्यांनी लांजे येथे आपली बदली करून घेतली व संस्थाही स्थलांतरित केली. आता दोघी बहिणी एकत्र आल्या व त्यांचा ध्येयमार्ग एकच राहिला. १९६२ च्या आसपास संस्थेच्या नावातला अनाथ हा शब्द काढून ‘महिलाश्रम’ असे सुटसुटीत नाव दिले. शांताताई शेवटपर्यंत या आश्रमाच्या संचालिका राहिल्या व आक्का कार्यवाह राहिल्या. जिल्हा परिषदेने शांतातार्इंना ‘आदर्श शिक्षिका’ पुरस्कार देऊन गौरविले. नंतर काही वर्षांनी त्या मुख्याध्यापिका पदावरून निवृत्त झाल्या.

आता लांज्यांत ग्रामसेवा केंद्राचे महिलाश्रमात विलीनीकरण झाले. सध्या महिलाश्रम जेथे आहे ती जागा प्रसिद्ध लेखक प्रभाकर पाध्ये यांनी भूदान मोहिमेत महिलाश्रमास दान दिली. निराधार, होतकरू स्त्रियांना थोडे फार शिक्षण देऊन त्यांना स्वाभिमानाने स्वत:च्या पायावर उभे करावे हा महिलाश्रमाचा हेतू आहे. प्रौढ मुलींना नर्सिंगचे शिक्षण दिले जाई. त्यामुळे त्यांना कोठे ना कोठे नोकरी मिळत असे. आक्कांना अनाथ, परित्यक्ता स्त्रियांबरोबर त्यांच्या मुलांनाही आश्रमात घ्यावे लागे. अशा कितीतरी मुलांना आक्का-तार्इंनी चांगल्या मार्गास लावले. त्यांनी मुले दत्तक देण्याची योजना सुरू केली, महिलाश्रमात फायनलचा वर्ग सुरू करून स्त्रियांना शिक्षण देण्याची व्यवस्था केली. मुलींना प्राथमिक शिक्षक प्रशिक्षणासाठी व शालान्त परीक्षा उत्तीर्ण झालेल्यांना डी.एड. परीक्षेसाठी पाठविण्याची व्यवस्था केली. अशा किमान ३० स्त्रिया प्राथमिक शिक्षिका व २१ स्त्रिया पूर्वप्राथमिक शिक्षिका बनून सुखी जीवन जगू लागल्या.

१९८७ सालापर्यंत महिलाश्रमात ६० पेक्षा जास्त विधवा, ९२ हून अधिक कुमारी माता, ९२ प्रौढ कुमारिका, ८४ परित्यक्ता व १७२ निराधार स्त्रिया दाखल झाल्या. शिवाय सुमारे ३५० लहानमोठ्या मुली त्यांच्या आश्रयाला आल्या. त्या सर्वांना माया व सहानुभूती मिळाली. काही जणींचे विवाह होऊन त्या आपल्या संसारात रमल्या आहेत. आश्रमात येणाऱ्या मुली स्त्रियांना वेगवेगळ्या व्यवसायात गुंतवले जाते. उदा. जेवणाचे डबे करून पोहोचवणे, लोणची, पापड, मसाले, कुळथाचे पीठ तयार करून विकणे, बागकाम, गुरे वासरे यांची कामे. आश्रमात वरचेवर आर्थिक चणचण पडे. त्यासाठी वर्गणी, देणग्या मिळवण्याची खटपट व पायपीट करावी लागे.

ज्येष्ठ पत्रकार माधवराव गडकरी यांनी आश्रमाला भरघोस देणगी मिळवून देण्यात साहाय्य केले. सरकारी योजनेची आश्रमशाळा महिलाश्रमाने सात वर्षे चालविली. परंतु आर्थिक तूट भरून काढणे अशक्य होऊन आश्रमशाळा बंद करावी लागली.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *साखळकर, मनोहर ‘समर्पित जीवन’; प्रकाशन २ ऑगस्ट १९८७*

## तोरो, गुरुनाथ

**शिक्षक, संस्थापक**

**५ फेब्रुवारी १८९५ – १९६४**

गुरुनाथ तोरे यांचा जन्म मिरज संस्थानातील मोडनिंब या गावी माघ शुद्ध एकादशीला झाला. बालवयातच आईवडीलांचे छत्र हिरावले गेल्यानंतर आतेभाऊ हरिपंत अडके यांच्या रूपाने त्यांना आधार मिळाला. अडके त्यावेळी मालगावात शिक्षक होते. तोरोंचे प्राथमिक शिक्षण तेथेच झाले. पुढे ते हरिपुरास आले.

कृष्णामाईच्या पाण्यात पोहणे, आखाड्यात कुस्त्या खेळणे असा त्यांचा कार्यक्रम चालत असे. हरिपुरावरून रोज सांगलीला शाळेला जायचे, त्यावेळी मित्रांसमवेत अनेक गंभीर विषयांवर चर्चा रंगत असे. हरिपुरातील



भय्याशास्त्री वाटवे यांच्याकडे संस्कृतचे शिक्षणही त्यांनी याचवेळी घेतले. गरीब आतेभावाकडे किती दिवस रहावे या हेतूने ते सांगलीला आले व राम मंदिरात राहून माधुकरी मागून शिक्षण घेऊ लागले.

राम मंदिरात गाडगीळ स्वामी रहात असत. त्यांच्यामुळे अध्यात्माची गोडी निर्माण झाली. याच काळात अनेक साधूंचे दर्शन घेतले. त्याचबरोबर रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, स्वामी दयानंद, श्री समर्थ, ज्ञानेश्वर, तुकाराम अशा संतांच्या वाङ्मयाचा अभ्यास केला आणि ब्रह्मचारी राहून कार्य करण्याचे ठरविले. मॅट्रिकची परिक्षा उत्तीर्ण झाल्यावर सरकारी नोकरी न करता देशहिताच्या दृष्टीने कार्य करावे हा विचार पक्का झाला. हा काळ राष्ट्रीय आंदोलनाचा होता. लो. टिळक, बॅ. सावरकर यांच्या आदर्शानुसार काम करण्याचा होता. त्यानुसारच तोरो व त्यांचे मित्र धोंडदेव सखदेव यांनी देशहिताच्या दृष्टीने लो. टिळकांप्रमाणे शाळा काढावी असे ठरविले. ४ डिसेंबर १९१४ रोजी लेले यांच्या वाड्यात 'सिटी हायस्कूलची' स्थापना करून भावी कार्याची मुहूर्तमेढ रोवली. त्या काळात अशी कार्ये लोकाश्रयावरच चालत असत. त्यात विनायकराव जोशींनी इमारतीची जागा व धन मिळविण्यासाठी महत्त्वपूर्ण योगदान दिले व पुढे विद्यालयामध्ये विद्यार्थ्यांसाठी अद्ययावत दवाखानाही सुरू केला. त्याचबरोबर पंडितराव चिकोडीकर हे या संस्थापक मित्रांपैकी पहिले पदवीधर होते. पैसा नसला तरी त्यांच्याकडे मनुष्यबळ होते,ध्येय होते. बाकाच्या फळ्या रांधण्यापासून जमीन सारवण्यापर्यंतची सर्व कामे या मित्रमंडळांनी केली. त्यात लोकांनीही खूप सहकार्य केले आणि अनेक धनिकांनी या तरुणांचा उत्साह पाहून आर्थिक मदत दिली.

सुरुवातीला त्यांनी तीन वर्ग सुरू केले. प्रत्येक वर्गात विद्यार्थी एकच आणि शिक्षक तीन होते. तोरो मराठी, संस्कृत आणि गणित हे विषय उत्कृष्ट शिकवीत असत. आपल्या विद्यार्थ्यांची सर्वांगीण उन्नती व्हावी यासाठी ते प्रयत्न करीत असत. त्यासाठी मुलांच्या स्वाभाविक प्रवृत्ती पारखून त्यानुसार संगीत, तालीम, चित्रकला, हस्तव्यवसाय इत्यादी शिकण्याची संधी मिळावी म्हणून हे सर्व उपक्रम यथाक्रम शाळेत सुरू करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. त्याचबरोबर त्यांच्या त्यागमय जीवनाचा, संन्यस्त वृत्तीचा व प्रेमळ जिव्हाळ्याचा विद्यार्थ्यांवर प्रभाव पडत असे.

सुरुवातीच्या काळातच धोंडोपंत सखदेव वारले. या आघाताने खचून न जाता दुप्पट वेगाने तोरो कामास लागले. आपले कार्य क्षेत्र वाढविण्यासाठी तासगावला गेले. बळवंतराव गोडबोले यांच्या मदतीने तिथे शाळा काढली व ती विकसित केली.

१९१९ मध्ये सांगली येथे 'सांगली एज्युकेशन सोसायटी'ची स्थापना झाली व यानंतर 'सिटी हायस्कूल' हे 'सांगली शिक्षण संस्था सिटी हायस्कूल' या नावाने ओळखले जाऊ लागले.

या शाळेतील माध्यमिक शालांत परिक्षेला बसलेले विद्यार्थी आपले आत्मकथन लिहून काढीत व हे संकलन 'आम्ही' या नावाने तयार करीत. भा. द. सहस्रबुद्धे यांच्या प्रेरणेने सुरूवात झालेल्या या उपक्रमात आजपर्यंत १५ हजारच्या वर विद्यार्थ्यांची आत्मकथने ग्रंथालयात संग्रहित करण्यात आली आहेत. याच संस्थेने पुढे बालक मंदिरही सुरू केले. जे आज 'बापट बाल शिक्षण मंदिर' म्हणून प्रसिद्ध आहे.

तोरो यांनी आपल्या मृत्यूपूर्वी संस्था सोडून साऱ्या भारतातील यात्रा पूर्ण केल्या होत्या. आणि इ.स. १९६४ मध्ये त्यांची जीवनयात्राही पूर्ण होऊन समाधान पावली.

– विवेक कुलकर्णी

* * *

त

# थ

## थोरात, रावसाहेब भाऊसाहेब
**सामाजिक कार्यकर्ते, संस्थापक**
**१९ ऑगस्ट १८९० – १३ मार्च १९५८**



नाशिक तालुक्यात सुकेणे गावी जन्मलेल्या रावसाहेब भाऊसाहेब थोरात यांचे प्राथमिक शिक्षण वणी येथे झाले. माध्यमिक शिक्षण नाशिकच्या 'सेंट जॉर्जेस विद्यालय' मध्ये झाले. तो काळ स्वातंत्र्य चळवळींचा होता. नव्या सामाजिक जाणिवांचे वारे महाराष्ट्रात वाहू लागले होते. शाळेत शिकत असताना बहुजन समाजातील पाच टक्के विद्यार्थी देखील शिक्षण घेत नाहीत हे रावसाहेबांच्या लक्षात आले. तेव्हा इंग्रजी सहावीत असताना रावसाहेबांनी पिंपळगाव बसवंत येथील थोर समाजसेवक गणपतदादा मोरे ह्यांनी चालविलेल्या समाज जागृतीच्या कार्यास स्वत:ला वाहून घेतले. देशातील बहुजन समाजात शिक्षणाचे प्रमाण वाढल्याशिवाय देशातील कोणतीही क्रांती यशस्वी होणार नाही. या विचाराने, श्रीमंत उदाजीराव महाराजांनी दिलेल्या देणगीतून या सर्व कार्यकर्त्यांनी १९१४ मध्ये 'उदाजी मराठा वसतिगृहा'ची स्थापना केली. नाशिक जिल्हा मराठा विद्या प्रसारक मंडळ यापूर्वीच सुरू झाले होते. या मंडळाची ही पहिली संस्था रावसाहेबांनी नावारूपास आणली. या वसतिगृहात धुळे, जळगाव जिल्ह्यातून मुले जायची.

राष्ट्रातील बहुजन समाजाला जडलेल्या अज्ञानरोगातून त्याची सुटका करणे या ध्येयाने रावसाहेबांनी लोकसेवेचे व समाज जागृतीचे काम सुरू केले. त्यासाठी ते 'लोकशिक्षकांच्या' भूमिकेतून नाशिक जिल्ह्यातील खेडोपाडी ग्रामसभा घेत, मुलांना शिक्षणासाठी प्रवृत्त करीत, आर्थिक मदतही करीत. १९३६ मध्ये नाशिकमध्ये त्यांनी मराठा विद्यालयाची स्थापना केली. गोरे गल्लीत ही शाळा भरत असे.

शिक्षणाच्या प्रसारासाठी शासनसंस्थेत बहुजन समाजातील माणसे असणे आवश्यक वाटल्याने रावसाहेबांनी निवडणूक लढविली व नाशिक जिल्हा लोकल बोर्डाचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष होण्याचा मान त्यांनी मिळविला. १९५२ पर्यंत हा कार्यभार सांभाळला. शिक्षणाविषयीचा त्यांचा दृष्टिकोन अत्यंत आधुनिक व उदारमतवादी होता. आत्मशिक्षणाच्या योगाने 'आत्मविकास करणे व त्या द्वारा आपला देश, आपले राष्ट्र यांच्या उन्नतीस हातभार लावणे म्हणजे शिक्षण' ही त्यांची शिक्षणाची व्याख्या होती.

भारतातील महिला ज्ञानसंपन्न झाल्या पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. त्यांनी विद्यार्थ्यांना उद्देशून पत्रे लिहिली ती 'बोधामृत' म्हणून प्रसिद्ध झाली. १९३७ च्या विधिमंडळाच्या निवडणूकीत रावसाहेब नाशिकमधून निवडून आले. नंतरच्या काळात डांग, पेठ, सुरगाणा ह्या आदिवासी विभागाचा त्यांनी कायापालट घडविला. त्यांच्या कार्याने प्रभावित होऊन ब्रिटिश सरकारने १९४१ मध्ये 'रावसाहेब' पदवी दिली. पण सरकारी रावसाहेब म्हणून मिरवण्यापेक्षा 'शेतकऱ्यांचे व गरिबांचे रावसाहेब' राहण्यातच धन्यता मानणाऱ्या रावसाहेबांनी या पदवीचा त्याग केला.

– प्रा. सुहासिनी पटेल

* * *




## दांडेकर, राजाराम गंगाधर
**संस्थापक, सामाजिक कार्यकर्ते**
**१५ एप्रिल १९५५**

## दांडेकर, रेणू राजाराम
**संस्थापक**
**१८ जुलै १९५८**



राजाराम गंगाधर दांडेकर यांचा जन्म दापोली तालुक्यातल्या गिम्हवणे इथे झाला. गंगाधर आणि मंदाकिनी हे त्यांचे आईवडील. वडील प्राथमिक शिक्षक होते पण उपजिविकेचं मुख्य साधन शेती हेच होते.

गिम्हवणे गुडघे परिसरात शाळा नव्हतीच. आर्थिक पाठबळाच्या अभावी राजाभाऊंचे शालेय शिक्षण कुठल्या एका गावी झाले नाही. दापोली परिसरातल्या आणि पुणे येथील २४ कुटुंबांच्या सहाय्याने आणि माधुकरी मागून त्यांनी ११ वी पर्यंतचा पल्ला गाठला. महाविद्यालयीन शिक्षणासाठी १९७४ ला राजाभाऊ पुण्यात आले. शिक्षणासाठी नोकरी आवश्यक असल्याने पुण्यातले प्रसिद्ध आयुर्वेद तज्ज्ञ खडीवाले वैद्य यांच्याकडे आधी आश्रित म्हणून राहिले आणि नंतर त्यांच्याच औषध कारखान्यात नोकरी केली. अर्थार्जनाबरोबर अष्टांग आणि टिळक आयुर्वेदीय महाविद्यालयातून साडेसात वर्षांचा अभ्यासक्रम पूर्ण झाल्यावर १९८२ ला त्यांनी बी.ए.एम.एस. म्हणजेच आयुर्वेदाचार्य, ही पदवी घेतली. रेणू दांडेकर यांचा जन्म १८ जुलै १९५८ ला झाला. वाई हे त्यांच माहेर. वडिल



दत्तात्रेय आणि आई विजया केसकर हे दोघेही पेशाने शिक्षक. रेणूताईंचे ११ वी पर्यंतचे शिक्षण वाईत झाले. मराठी विषय घेऊन कोल्हापूरच्या शिवाजी विद्यापीठाची बी.ए. पदवी त्यांनी १९७८ ला सुवर्ण पदकासह मिळवली. नंतर १९८० ला पुणे विद्यापीठाच्या एम. ए. लाही त्यांनी सुवर्णपदक मिळवले. यानंतर १९८० ते १९८३ या काळात नांदेडच्या पीपल्स महाविद्यालयात आणि पुण्याच्या आपटे प्रशालेत नोकरी केली. पाठोपाठ १९८४ ला शिवाजी विद्यापीठाची बी.एड. पदवी घेतली. त्याच वर्षापासून चिखलगाव प्रकल्पाच्या उभारणीत व्यग्र झाल्याने मुंबई एस.एन.डी.टी.च्या एम.एड. पदवीसाठी त्यांना १९९८ पर्यंत थांबावे लागले.

अत्यंत मागासलेल्या गिम्हवणे-गुडघे-पडघवली परिसरातले खडतर आयुष्य राजाभाऊंच्या वाट्याला आले होते. त्यामुळे या परिसराचा शिक्षणासह सर्वांगीण ग्रामीण विकास हेच आपले कार्यक्षेत्र करण्याचा दृढनिश्चय राजाभाऊंनी पुण्यात शिकत असतानाच केला. दांडेकर दांपत्याने १९८२ ला चिखलगावला स्थलांतर केले आणि या परिसराच्या कायापालटाचा शुभारंभ झाला.

सुरूवातीला दांडेकर पती-पत्नींनी झाडाखाली आपला संसार मांडला. मात्र लवकरच त्यांनी एका गोठ्यात मुक्काम हलवला. आधुनिक जीवनमानापासून पूर्णपणे वंचित राहिल्याने आरोग्य रक्षण म्हणजे काय याचा गंधही या भागातल्या गावकऱ्यांना नव्हता. राजाभाऊंनी आपले वैद्यकीय ज्ञान वापरून आरोग्यसेवा देण्याचा आणि जागृती

द

घडवून आणण्याचा वसा घेतला. प्रपंचासाठी नाममात्र का होईना पण अर्थार्जन करणे ही आवश्यक होतेच. फिरत्या दवाखान्याच्या माध्यमातून या परिसरातल्या २० दुर्गम खेड्यांमध्ये त्यांनी आरोग्यसेवा सुरू केली. यासाठी राजाभाऊंनी प्रथम घोड्याचा आणि नंतर दुचाकीचा वापर केला. अपेक्षेनुसार परंपरा, रूढी, अज्ञान, आणि अंधश्रद्धा यांच्या जोखडाखाली अडकलेल्या गावकऱ्यांचा प्रतिसाद थंडच होता. राजाभाऊंनी चिकाटी सोडली नाही. कालांतराने चित्र बदलले आणि डॉक्टर सर्वांसाठी आरोग्यदूत ठरले. समाज जागृतीमुळे ही आरोग्यसेवा स्वयंचलित झाल्यावर डॉक्टर आणि रेणूताई शिक्षणप्रसारात सहभागी झाले.

दाभोळ ते दापोली या ३० किलोमीटरच्या पट्ट्यात येणाऱ्या ४६ दुर्गम गावांसाठी सर्वांगीण ग्रामीण विकासाचे कार्य सुरू झाले. चिखलगावी आल्यावर दांडेकरांनी १९८२ ला लोकमान्य सार्वजनिक धर्मादाय न्यासाची नोंदणी केली. घरीच बसलेल्या गावातल्या मुलांना घेऊन रेणूताईंनी राहत्या गोठ्यात शाळा सुरू केली. शिकवण्यासाठी लागणाऱ्या फळा, खडू यासारख्या प्राथमिक साहित्याशिवाय वर्ग सुरू झाले.

द

पुढची चार वर्ष कठीण गेलीच पण या दांपत्याची अढळ निष्ठा आणि मेहनत यामुळे शाळेचे रोपटे रूजले. न्यासाच्या अधिपत्याखाली १ ऑगस्ट १९८४ साली लोकमान्य टिळक विद्यामंदिर या नावाने शाळेचीही नोंदणी झाली. शासनाची मान्यता मिळाली पण अनुदान मिळायला आणखी सात वर्ष लागली. काही वर्षातच लोकमान्य टिळक माध्यमिक विद्यामंदिर अस्तित्वात आले. लोकमान्य टिळक विद्यामंदिराचा विस्तार आता खूपच वाढला आहे. वास्तुरूपात शाळा आता एक संपूर्ण संकुल झाले आहे. यात शाळेचे प्राथमिक आणि माध्यमिक असे दोन स्वतंत्र विभाग आहेत. इयत्ता ५ ते ७ वीतल्या मुलांसाठी जीवनोपयोगी शिक्षण देणारा विभागही सुरू असून आठवी ते दहावीच्या मुलांसाठी मूलभूत तंत्रज्ञान परिचय व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रम अंमलात आला आहे. या व्यतिरिक्त मूलभूत ग्रामीण तंत्रज्ञान पदविका अभ्यासक्रम, निवासी विद्यार्थिनींसाठी वसतिगृह म्हणून सावित्री कन्या छात्रालय, ग्रामीण भारतासाठी संगणक केंद्र, शिवणकलेसाठी शासनमान्य निर्मिती शिवणकला पदविका अभ्यासक्रम, रात्र अभ्यासिका आणि शिक्षण पदविकेसाठी (डी. एड.) लोकमान्य टिळक स्मृतिमंदिर, सुसज्ज ग्रंथालय, लोकमान्य अध्यापक विद्यालय, अंगणवाडी आणि बालसंगोपन हे विभागही कार्यरत आहेत.

लोकमान्य सार्वजनिक धर्मादाय न्यासाचे हे शैक्षणिक अभियान आज लोकसाधना प्रकल्प या नावाने ओळखले जाते. शिक्षणोत्तर आयुष्यासाठी आपल्या शाळेतील मुलांमध्ये स्वयंरोजगाराची क्षमता निर्माण करणारे व्यवसाय कौशल्य अभ्यासक्रम राबवणे हे लोकसाधना प्रकल्पाचे खास वेगळेपण आहे. शाळाप्रवेश ते शाळा सोडल्याचा दाखला घेईपर्यंतच्या प्रवासात पाठ्यपुस्तकी अभ्यासक्रमाव्यतिरिक्त ही मुले जे शिकतात त्याची अगदी ढोबळ यादीही त्रयस्थाला थक्क करते. इथले विद्यार्थी दोन वॅट क्षमतेत २५ वॅट प्रकाश देणारे लोकदीप बल्ब तयार करतात. शाळेची संगणकांची गरज विद्यार्थ्यांनीच ३० संगणकांची जुळणी करून भागवली आहे. वयाच्या १४ व्या वर्षीच संगणक जुळणी तंत्रज्ञान आत्मसात करणारे विद्यार्थी जगात इतरत्र असण्याची शक्यता कमीच आहे. सुतार कामाचे प्रशिक्षण देणाऱ्या कार्यशाळेने बाकासारख्या लाकडी वस्तूंची गरजही पूर्ण केली आहे. इथे मुलींना शिवणकाम, आरोग्यसेविका, भरतकाम यासारख्या छोट्या उद्योगाचे प्रशिक्षण दिले जाते.

मुलांनीच चालवलेले शाळेचे स्वतःचे अन्न प्रक्रिया उद्योगकेंद्र आहे. मुलांना रक्त तपासणी बरोबरच इतर जुजबी शारीरिक तपासण्यांचे प्राथमिक ज्ञानही दिले जाते. शाळेत असलेल्या सौर उर्जा आणि पवनचक्की प्रकल्पाचे व्यवस्थापन मुलेच बघतात.

कृषिक्षेत्र हा राज्याच्या ग्रामीण अर्थव्यवस्थेचा कणा आहे. म्हणूनच शेतीसाठी आवश्यक अशा आधुनिक तंत्रज्ञानाचे प्राथमिक प्रशिक्षण देण्याची सुविधा इथे उपलब्ध आहे. या प्रशिक्षणाचा उपयोग करून इथल्या कातावर मुलांनीच २०० हापूस आंबा आणि १०० नारळांच्या

झाडांची बाग फुलवली आहे. या कृषि उत्पादनाची विक्री, त्याचा हिशेब या बाबीही मुलेच हाताळतात. या बरोबरच चिकू, पेरू, जांभूळ आणि आवळा यांची लागवड केली आहे. मुलांनीच चालवलेला शाळेचा गांडूळ खत निर्मिती प्रकल्प आहे. निरनिराळ्या फुलांची बाग फुलवून मुलांनी शाळेत प्रसन्न वातावरण निर्माण केले आहे. गावातल्या लोकांना परसबाग फुलवण्यास उद्युक्त करून या बागाही मुलांनीच वाढवल्या आहेत.

– सुधाकर कुलकर्णी

## दांडेकर, शंकर वामन

*दांडेकर, सोनोपंत*

☞ **मुख्य नोंद – धर्मकारण खंड**

## दाणी, शांताबाई धनाजी

**संस्थापिका, समाजसेविका**

**१ जानेवारी १९१८ – ९ ऑगस्ट २००२**



शांताबाई धनाजी दाणी यांचा जन्म नाशिक येथे झाला. नाशिकमध्ये चौक मंडईच्या ख्रिश्चन शाळेत त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. नगरपालिकेच्या शाळेतून त्या व्हर्नाक्युलर फायनल परीक्षा उत्तीर्ण झाल्या. गुणवत्तेच्या जोरावर पुण्यातील स्त्रियांच्या सरकारी प्रशिक्षण महाविद्यालयामधून त्यांनी प्रशिक्षण घेतले.

नाशिकला आल्यानंतर निफाड तालुक्यातील विंचूर गावच्या प्राथमिक शाळेत शांताबाईंनी शिक्षक म्हणून नोकरी सुरू केली. त्यानंतर नांदगावच्या शाळेतही त्या होत्या. पण पुढील शिक्षणासाठी त्यांनी नोकरी सोडली. त्यांच्या हितचिंतक डॉ. लोंढे ह्यांच्या प्रेरणेने त्या सौराष्ट्रात गेल्या. तेथून त्यांनी मॅट्रिकची परीक्षा दिली. मॅट्रिक झाल्यानंतर त्या नाशिकला परतल्या आणि नाशिकच्या एच. पी. टी. महाविद्यालयामध्ये कला विभागात त्यांनी प्रवेश घेतला. महाविद्यालयामध्ये शिक्षणासाठी प्रवेश घेणाऱ्या शांताबाई या नाशिकमधील पहिल्या दलित विद्यार्थिनी. कर्मवीर दादासाहेब गायकवाड हे शांताबाईंचे मेहुणे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे विचार ऐकून व दादासाहेबांचे कार्य पाहून शांताबाईंचे जीवनध्येय निश्चित झाले – ''आपल्या पीडित, शोषित, अत्याचारित भावंडांसाठी आयुष्याचा क्षण अन् क्षण वेचायचा, कण अन् कण खर्चायचा''. या ध्येयपूर्तीच्या दिशेने त्यांची वाटचाल सुरू झाली.

सन १९४८ मध्ये शांताबाई शेड्यूल कास्ट फेडरेशनच्या महाराष्ट्र राज्याच्या सरचिटणीस झाल्या. या कार्याच्या संदर्भात एका सत्याग्रहात येरवड्याला व नंतर जबलपूरला एक महिन्याचा तुरुंगवास त्यांना सोसावा लागला. १९५७ मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या उपस्थितीत शांताबाईंनी बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. १९५७ ते १९७८ या बारा वर्षांच्या काळात रिपब्लिकन पक्षाच्या महाराष्ट्र प्रदेश अध्यक्षा म्हणून त्या काम करीत होत्या.

संयुक्त महाराष्ट्र समितीच्या सदस्या म्हणूनही त्यांनी काम पाहिले. नागपूरच्या अखिल भारतीय महिला परिषदेच्या अध्यक्षा म्हणून त्यांची निवड झाली होती. आर्थिक मागासलेपणाच्या प्रश्नासंबंधी दलितांच्या मोर्चाचे, भूमिहीन दलित सत्याग्रहाचे नेतृत्व त्यांनी केले.

१९३२ पासून नाशिक जिल्हा दलित शिक्षण प्रसारक मंडळाच्या वतीने चालविल्या जाणाऱ्या नाशिक व मनमाड येथील वसतिगृहांच्या सरचिटणीस म्हणून शांताबाई काम करीत होत्या. १९४७ मध्ये नाशिकला मुलींसाठी रमाबाई आंबेडकर वसतिगृहाचे उद्घाटन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या हस्ते झाले. त्यावेळी वसतिगृहाचे काम किस्मतबागेत चालायचे. वसतिगृहात वीस मुली होत्या. ह्या मुली परत गावी गेल्यावर त्या त्या गावात स्त्री नेतृत्व उभे राहावे, मुली बहुश्रुत व्हाव्यात हे स्वप्न शांताबाई पाहात होत्या. १९६५ पर्यंत मुलींची संख्या शंभरच्यावर गेली, तेव्हा शांताबाईंनी डॉ. बाबासाहेब

द

आंबेडकर ज्ञान विकास मंडळ समितीच्या वतीने १९६५ च्या जून महिन्यात त्र्यंबकरोडवर किस्मत बागेच्या जवळ 'रमाबाई आंबेडकर कन्या विद्यालया'ची स्थापना केली. गेल्या बेचाळीस वर्षांत शाळेची मोठी प्रगती झाली आहे. शांताबाईंनी शाळेसाठी गोल्फ ग्राऊंडवरील दोन एकरांची जागा शासनाकडून मिळविली आणि शाळेसाठी नवी इमारत उभी केली. पूर्वीच्या इमारतीत इंग्रजी व मराठी माध्यमातील 'कुणाल प्राथमिक शाळा' भरते.

१४ एप्रिल १९५९ ला नाशिक रोडला 'तक्षशिला माध्यमिक शाळा' काढली होती. या शाळेसाठी देवळाली गावातील पाच एकर जागा मिळविली. नाशिक रोडला 'गौतम छात्रालय' सुरू केले.

रमाबाई आंबेडकर कन्या विद्यालयात प्रवेश करणाऱ्या प्रत्येकाला बुद्धासारखी अथक परिश्रमांची, प्रयत्नांची, शोध घेणाऱ्या प्रवृत्तींची प्रेरणा मिळावी म्हणून ह्याच शाळेत १९९१ मध्ये एका अत्यंत रेखीव स्तूपाची उभारणी शांताबाईंच्या प्रयत्नातून झाली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची पुण्याई, दादासाहेब गायकवाडांचे आशीर्वाद व शांताबाई दाणींचे कर्तृत्व या त्रिवेणी संगमातून आकाराला आलेली ही संस्था. ह्या संस्थेला शांताबाईंसारखी जबरदस्त कार्यकर्ती मिळाली आणि यशाची निश्चिती झाली.

द

शांताबाईंनी विपुल प्रासंगिक लेखन केले. त्यांच्या 'रात्रंदिन आम्हा' ह्या आत्मचरित्रात्मक ग्रंथाचे शब्दांकन भावना भार्गवे ह्यांनी केले आहे. 'चंदनाची छाया' हे शांताबाईंनी लिहिलेले दुसरे पुस्तक.

शांताबाईंनी राजकीय, सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रात केलेल्या कार्यामुळे त्यांचा अनेक पुरस्कारांनी गौरव झाला. या पुरस्कारात मुंबई महिला गौरव पुरस्कार, महाराष्ट्र राज्य सावित्रीबाई फुले पुरस्कार, राष्ट्रपती पुरस्कार अशा पुरस्कारांचा समावेश आहे. १९६८ मध्ये मलेशियातील 'धम्म परिषदे'त विशेष अतिथी म्हणून त्यांना निमंत्रण होते. १९७० मध्ये जपानला संपन्न झालेल्या 'शांती परिषदे'स शांताबाई उपस्थित होत्या त्या 'शांतिसैनिक' म्हणून. १९७२ मधील श्रीलंकेच्या जागतिक बौद्ध धम्म परिषदेसाठी त्यांना बोलविले होते. यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाने शांताबाईंना सन्मानपूर्वक 'डी. लिट.' ही पदवी प्रदान केली.

– प्रा. सुहासिनी पटेल

## दाते, श्रीकृष्ण दत्तात्रय

***बाबाजी दाते***

**संस्थापक**

**५ सप्टेंबर १९१४ – २९ मार्च २००२**

श्रीकृष्ण दत्तात्रय तथा बाबाजी दाते यांचे यवतमाळ हे जन्मगाव. मॅट्रिकपर्यंतचे त्यांचे शिक्षण यवतमाळ येथे झाले. १९३७ मध्ये त्यांनी एलएल.बी. व १९३९ मध्ये एम.ए. पदवी संपादन केली. १९४० मध्ये वर्धा येथील कला महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून ते नोकरी करू लागले. नंतर नागपूरच्या शासकीय विज्ञान महाविद्यालयात प्राध्यापक झाले. त्याच वर्षी अर्थशास्त्र विषय घेऊन ते एम.ए. झाले. १९४५ ते १९५० ह्या काळात अंमळनेरच्या प्रताप महाविद्यालयामध्ये ते प्राध्यापक होते. १९५० मध्ये यवतमाळ कला महाविद्यालयामध्ये त्यांनी प्राचार्यपदाची जबाबदारी स्वीकारली.



पण १९५२ मध्ये हे महाविद्यालय बंद पडले व बाबाजींनी वकिली सुरू केली.

१९५५ मध्ये त्यांनी विशुद्ध विद्यालय ही संस्था काढली. त्याचबरोबर मुलींसाठी खाजगी महाविद्यालय सुरू केले.

१९५९ मध्ये त्यांच्या वाणिज्य विद्यालयास विद्यापीठाची मान्यता मिळाली. काही काळातच हे महाविद्यालय नावारूपास आले. त्यांच्या संस्थेचा व्याप वाढू लागला. १९५७ मध्ये राणी लक्ष्मीबाई विद्यालय, बालकांसाठी 'ध्रुव बालक मंदिर' व 'ध्रुव प्राथमिक शाळा आणि गुरुकुल' सुरू केले. त्यानंतरच्या काळात मुलांसाठी

'विवेकानंद विद्यालय', 'अध्यापन पदविका विद्यालय', 'शारीरिक प्रशिक्षण महाविद्यालय', 'व्यंकटेश विद्यालय' अशा शाळा व महाविद्यालये सुरू केली.

१९६० मध्ये मुलींसाठी महर्षी कर्वे वसतिगृह, नंतर विशुद्ध मुद्रणालय, अर्बन बँक, बर्फाचा कारखाना, आटा यंत्र, अनाथ मुलांसाठी मायापाखर आणि बालसदन, महिला बँक असे विविध उपक्रम त्यांनी सुरू केले. संस्थेचा व्याप व लौकिक वाढत गेला.

१९७५ मध्ये आणीबाणीच्या काळात बाबाजींना १९ महिने कारावास झाला. त्याच वर्षी ते वाणिज्य महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून निवृत्त झाले.

त्यांची राहणी अतिशय साधी होती. वयाच्या सत्तरीतही ते कामासाठी सायकलने फिरत असत. कोणतेही काम पूर्ण होईपर्यंत पाठपुरावा करीत राहणे हा त्यांचा स्वभाव होता.

१९७७ मध्ये कारागृहातून सुटल्यानंतर विशुद्ध विद्यालयाच्या विकासाच्या दृष्टीने त्यांचे प्रयत्न सुरू झाले. १९८२ मध्ये असे विविध उपक्रम सुरू केले.

विद्यार्थ्यांना स्वावलंबी बनविणारे शेती, बागाईत, किराणा दुकान, सायकल दुकान, पिठाची गिरणी, भाजी विक्री असे सत्तावीस उपक्रम ते राबवीत होते.

१९८२ मध्ये स्थापन केलेल्या 'मायापाखर' आणि 'बालसदन' या संस्थेत आज पंचेचाळीस बालकांचा प्रतिपाळ होतो. १९८६ मध्ये यवतमाळपासून जवळ असणाऱ्या परिसरातील दोन उजाड टेकड्यांवर त्यांनी 'वनराई' चा प्रयोग केला. या त्यांच्या कार्याबद्दल महाराष्ट्र शासनाने सामाजिक वनीकरण योजनेअंतर्गत 'वनश्री पुरस्कार' प्रदान करून बाबाजींचा यथार्थ गौरव केला. यवतमाळ जिल्हा सभेतर्फे निघणाऱ्या 'भारत' या साप्ताहिकाचे १९५१ मध्ये ते संपादक होते. त्यातील बरेचसे लेखन बाबाजीच करीत.

वयाच्या पंच्याऐंशीव्या वर्षीही बाबासाहेब दाते यांच्या मनात समाजहिताच्या नवीन नवीन योजनांचाच विचार होता.

– प्रा. डॉ. सुधीर बोधनकर

## दाभोलकर, गोविंद मधुसूदन

**अध्यापक, मुख्याध्यापक**

**११ जुलै १९३९**



आपल्या गुणवत्ता, परिश्रम, कार्यशैली, व्यासंगाबरोबरच बालकांना केंद्र मानून त्यांच्या सर्वांगीण विकासासाठी व शिक्षकांसोबतच त्यांच्या उत्कर्षासाठी सदैव जागृत असणाऱ्या उमद्या व देखण्या व्यक्तिमत्त्वाचे गोविंद मधुसूदन दाभोलकर आणि दादर, मुंबई येथील बालमोहन विद्यामंदिर हे दीर्घकाळ एक समीकरणच होऊन बसले होते. १९५८ मध्ये या शाळेत सहाय्यक अध्यापक या नात्याने प्रवेश करून ३० वर्षांनंतर दाभोलकर पर्यवेक्षक, उपमुख्याध्यापक अशा क्रमाने मुख्याध्यापकपदी आरूढ झाले. त्यांची शिकवण्याची हातोटी फार उत्तम होती. वर्गातला प्रत्येक विद्यार्थी विषयाशी समरस होईल अशी त्यांची अध्यापन शैली होती.

चेहऱ्यावर नेहमी हास्य व प्रसन्न वृत्ती असलेले दाभोलकर अभिजात गुणग्राही होते, त्यामुळे विद्यार्थीवर्ग, शिक्षकगण, संस्थेचे संचालक आणि शिक्षण खात्यात ते अत्यंत प्रिय व विश्वसनीय होते.

दाभोलकरांचे आजोबा व वडील हेही शिक्षकच होते. दाभोलकरांच्या मातोश्री सावित्री या उत्तम कर्तव्यदक्ष गृहिणी होत्या. शाळेत आपले कर्तव्य चोख बजावत असतानाच दाभोलकरांनी महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळात मूल्यमापन अधिकारी आणि अतिरिक्त समन्वयक (पाठ्यपुस्तके) म्हणून स्मरणीय कार्य केले. आराम वा विश्रांती हे शब्द त्यांच्या कोशात नसल्याने त्यांनी महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाला प्रभारी गुणवत्ता नियंत्रण अधिकारी या नात्याने १९८४ ते १९९५ पर्यंत सतत आपल्या अनुभवाचा प्रचंड फायदा दिला. मंडळाच्या हिंदी भाषा समितीवर इयत्ता पहिली ते आठवीसाठी निमंत्रित सदस्य

द

या रूपाने ते मार्गदर्शन करीत. शिवाय आठवी ते १२ वीच्या हिंदी अभ्यास मंडळाच्या पाठ्यपुस्तक समितीचे संयोजक या नात्याने १९७५ ते १९९० पर्यंत भरीव योगदान दिले. शालेय कार्यक्रम समिती (आकाशवाणी) चेही ते सदस्य होते. शिक्षकांच्या सेवाअंतर्गत प्रशिक्षणात दाभोलकरांनी उल्लेखनीय कामगिरी केली. शिक्षण खात्याच्या या उपक्रमासाठी त्यांनी तज्ज्ञ मार्गदर्शक व प्रशिक्षण केंद्र संचालक या नात्याने अपार मेहनत घेतली. शिक्षण उपसंचालक यांच्या मार्गदर्शनाने निर्मित बृहन्मुंबई मुख्याध्यापक मंचाचे सचिव पदावर काम करणारे सर्वाधिक सक्रिय कार्यकर्ते म्हणून काम करणारे दाभोलकरच होते.

अनेक शैक्षणिक उपक्रम, स्पर्धा, प्रशिक्षण कार्यक्रमांचे नियोजक तज्ज्ञ, मार्गदर्शकांचे मार्गदर्शक, राज्यस्तरावर भरविलेल्या ४० पेक्षा अधिक शिबिरांतून त्यांनी यशस्वीपणे कार्यभार सांभाळला. शिक्षकांची गुणवत्ता सुधारणे हा त्या उपक्रमांचा हेतू होता. शाळेतील सहकाऱ्यांच्या सहाय्याने दाभोलकरांनी टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, संयुक्त राष्ट्रसंघा(युनो) च्या स्पर्धा परीक्षांसोबत चित्रकला, व्यायाम, खेळ वगैरे स्पर्धांसाठी विद्यार्थ्यांना सतत प्रोत्साहित केले.

स्वत: बी.एड. ची परीक्षा देताना दाभोलकरांनी ५ वी ते ७ वी करिता इंग्रजीतून ‘कंपायलेशन ऑफ इंग्लिश नर्सरी ऱ्हाईम्स विथ प्रॉपर इंट्रोडक्शन’ असे प्रकल्प तयार केले. तसेच त्याच इयत्तांसाठी हिंदीतून भाषिक संरचनात्मक स्वाध्यायमाला हे प्रकल्प तयार करून सादर केले. या दोन्ही प्रकल्पांसाठी त्यांना प्रथम पुरस्कार व बी.एड. साठी सर्वंकष गुणवत्ता पारितोषिक मिळाले. मुलांच्या प्रगत अभ्यासासाठी १९८३ पासून त्यांनी आयोजित केलेल्या ‘लेखन अभिव्यक्ति बोध’ व ‘कौशल’ आणि ‘सुलेखन बोध’ व ‘कौशल’ या परीक्षांचा लाखाहून अधिक विद्यार्थ्यांनी लाभ घेतला व आजही घेत आहेत.

१९९९ ते २००१ या अवधीत दैनिक लोकसत्ता, दहावी मार्गदर्शन उपक्रमाचे प्रमुख समन्वयक व हिंदी विषयात लेखकांचे मार्गदर्शक म्हणून त्यांनी तीन वर्षे सातत्याने नियोजनबद्ध काम केले. माध्यमिक हिंदी शिक्षक महामंडळाच्या जडणघडणीत, जिल्हा संघटना उभारण्यात त्यांचा सिंहाचा वाटा आहे. ‘हिंदी अध्यापक मित्र’ या त्रैमासिकाचे कार्यकारी संपादक म्हणून ते आजही काम पाहत आहेत. आकाशवाणी व दूरदर्शनवर तसेच शैक्षणिक पत्रिकांतून शिक्षक आणि विद्यार्थ्यांना त्यांनी मार्गदर्शन केले. दाभोलकर बालमोहन विद्यामंदिरात ३८ वर्षे सेवा करून निवृत्तीनंतर महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, पुणे या संस्थेत ‘प्रचार शिक्षण प्रमुख’ म्हणून कार्यरत आहेत. दाभोलकरांच्या या वाटचालीत व यशस्वी उपक्रमांच्या श्रेयात त्यांच्या पत्नीची मोलाची साथ मिळत राहिली आहे.

दाभोलकरांच्या शैक्षणिक कामगिरीसाठी त्यांना मिळालेले महत्त्वाचे पुरस्कार खालीलप्रमाणे आहेत– १९८६ – महाराष्ट्र शासनाकडून शैक्षणिक व सामाजिक विशेष उल्लेखनीय कामगिरीबद्दल आदर्श शिक्षक पुरस्कार. हिंदी साहित्यिक व प्रचार कार्यासाठी राष्ट्रनेते एस.एम. जोशी यांच्या हस्ते विशेष पुरस्कार.

सर्वोत्कृष्ट हिंदी शैक्षणिक सेवार्थ पं. दीनदयाळ पुरस्कार (१९९९), समर्पित सेवा, निष्ठावान अध्यापक, प्रचारक, कार्यकर्ता म्हणून महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभेच्या हीरक महोत्सव प्रसंगी तत्कालीन उपराष्ट्रपतींच्या हस्ते सन्मानपत्र. (१९९८). म. रा. हिंदी साहित्य अकादमीतर्फे पद्मश्री अनंत गोपाल शेवडे हिंदी सेवा पुरस्कार (२००१)

दाभोलकरांचे लेखन, संपादन व अनुवाद कार्य –

प्रायोगिक हिंदी व्याकरण, रचना (१९६६), व्यावहारिक हिंदी शब्दलेखन, मानक हिंदी वाक्यरचना, हिंदी बालवाणी (पाठ्यपुस्तक) (२००२), उच्च माध्यमिक शिक्षक प्रशिक्षण मार्गदर्शिका, हिंदी स्वयं अध्ययन माला (भाग १ से ७), हिंदी व्याकरण रचना : संदर्भ ग्रथ (सहसंपादक डॉ. अशोक कामत), स्टेप इन कॉन्व्हरसेशन (स्पोकन इंग्लिश) हिंदी – इंग्रजी, मराठी – इंग्रजी (सहसंपादक लिमये), जनसंख्या विस्फोट (अनुवाद)

याशिवाय अनेक विषयांवर वृत्तपत्रीय लेखन व अनुवाद कार्य केले आहे.

– वि. ग. जोशी

द

## दीक्षित, केशव जिवाजी

**शिक्षक**

**– १२ मे १९७१**



अभिजात संस्कृत ललित साहित्याचे प्रेम आणि चोखंदळ रसिकत्व अंगी असणारे केशवराव दीक्षित एक आगळेवेगळे व्यक्तिमत्त्व होते. केवळ संस्कृतच्या प्रेमापोटी ते घरी वर्ग घेत असत. त्या विशेष वर्गातील विद्यार्थ्यांकडून मासिक वा वार्षिक शुल्क तर सोडाच, कोणत्याही स्वरूपातील मानधनही ते स्वीकारत नसत. शास्त्रीय संगीताची चांगली जाण त्यांना होती.

इ. स. १९३५ मध्ये सुरू झालेली के. जी. दीक्षित व सिटी हायस्कूल यांची संस्कृत शिष्यवृत्तीची उज्ज्वल परंपरा १९४६ अखेर चालू राहिली. या काळात १९३७ ते ४१ अशी चार वर्षे पहिली आणि १९३६, ४२, ४४, ४६ अशी चार वर्षे दुसरी जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती दीक्षितांच्या विद्यार्थ्यांनी मिळविली. १९४१ मध्ये तर रामकृष्ण हरि गाडगीळ व गजानन रंगनाथ जोशी या त्यांच्या विद्यार्थ्यांनी पहिली व दुसरी शंकरशेठ साहित्य त्या वर्षीच्या संस्कृतच्या सर्व शिष्यवृत्त्या दोघातच विभागून पटकाविल्या. याखेरीज 'बिडकर', 'यमुनाबाई दळवी' संस्कृत शिष्यवृत्त्या जमेस धरून दीक्षितांनी त्या काळात एकूण २७ मानकरी घडविले. १९७२ मध्ये त्यांचे ज्येष्ठ पुत्र मुकुंद यांनी 'पहिली जगन्नाथ', 'अकबरनवीस' आणि 'आचार्य पारितोषिक' असे संस्कृतचे तीनही सन्मान मिळविले.

त्यांचे सर्व विद्यार्थी विश्वविद्यालयीन परीक्षेत प्रथम श्रेणीत बहुधा प्रथम क्रमांकाने चमकलेले, भावी जीवनात उल्लेखनीय कर्तबगारीच्या बळावर सुप्रतिष्ठित झाले. सखोल ज्ञान आणि ते विद्यार्थ्यांपर्यंत संक्रमित करण्याची विलक्षण हातोटी या दोन्ही गोष्टी ज्यांच्याजवळ आहेत. ते खरे शिक्षकाग्रणी होत, असे कवी कुलगुरू कालिदासांनी म्हटले आहे. दीक्षित या दुर्मिळ कोटीतले होते. व्याकरणासारखा रूक्ष, किचकट विषय ते अत्यंत सोपा करून व मनोरंजक पद्धतीने शिकवित असत. ते स्वतः व्याकरणावर काही सोपे संस्कृत श्लोक रचित. अधूनमधून गमतीदार चुटकेही असायचे. सूत्रांच्या अनुषंगाने सुंदर सुभाषिते ते खुलवून सांगायचे. त्यांनी म्हटलेली सूत्रे व सुभाषिते विद्यार्थ्यांना काही वेळा तिथल्या तिथे पाठ व्हायची. दीक्षितांचे घर जुन्या गुरुकुलाचे आधुनिक रूपच होते.

'शंकरशेठ' मानकऱ्यांचे कुशल शिल्पकार, सांगली शिक्षण संस्थेचे आजीव सदस्य, कार्यवाह, सिटी हायस्कूलचे सुपरिंटेंडेंट, 'सुबोध भारती' या आदर्श संस्कृत पाठ्यपुस्तक मालिकेचे प्रमुख संपादक अशा विविध पदांची जबाबदारी सांभाळत. ते १९६४ मध्ये सेवानिवृत्त झाले. के. जी. दीक्षित, जगन्नाथ शंकरशेठ आणि सिटी हायस्कूल यांचे नाव महाराष्ट्रभर गाजले. मेंदूच्या रक्तस्रावाने त्यांचे अकल्पित निधन झाले.

– विजय बक्षी

## दीक्षित, शंकर बाळकृष्ण

☞ **मुख्य नोंद – विज्ञान खंड**

## देऊळगावकर, विठ्ठल लक्ष्मण

**संस्थापक**

**१३ ऑक्टोबर १८६६ – १३ जानेवारी १९१४**



विठ्ठल लक्ष्मण देऊळगावकरांचा जन्म चंद्रपुर येथे झाला. त्यांचे वडिल बदली होऊन उस्मानाबादला आल्याने विठ्ठलरावांचे सहावी इयत्तेपर्यंतचे शिक्षण उस्मानाबाद येथे झाले. फारसी, मराठी, उर्दू व गणित हे अभ्यासाचे विषय होते. पुढे वडिलांची बदली कर्नाटकातील गुलबर्गा येथे झाली. त्यामुळे पुढील शिक्षण त्यांनी गुलबर्ग्यात पूर्ण केले. ते एलएल. बी. झाले व त्यांनी वकिलीचा व्यवसाय सुरू केला. त्यात त्यांचा उत्तम जमही बसला. त्यांचा विवाह

द

औरंगाबाद येथील साळूबाई खजिनदार यांच्याशी झाला. पुणे हे त्या काळात सुधारणांचे केंद्र होते. तेथे चालू असलेले उपक्रम गुलबर्ग्यातही सुरू करावेत अशा विचाराचे त्यांचे अनेक मित्र एकत्र येत असत. १९०५ मध्ये गुलबर्ग्यात प्लेगने धुमाकूळ घातला. लोक रानावनात राहावयास गेले. विठ्ठलराव व त्यांच्या मित्रांनी सरकारी मदतीची अपेक्षा न करता लष्करी कॅम्पसारखा कॅम्प तयार केला. लोकांना संकटात धीर दिला.

विठ्ठलराव व त्यांच्या मित्रांनी गुलबर्ग्यात गणेशोत्सव, शिवजयंती हे उत्सव १९०७ मध्ये सुरू केले. या सर्वांच्या मनात औरंगाबाद, हैद्राबादप्रमाणे मातृभाषेतून आधुनिक पद्धतीचे शिक्षण देणारी राष्ट्रीय शिक्षणसंस्था काढावी असा विचार होता. त्यांनी लोकमान्य टिळकांशी या संबंधी चर्चा केली. १७ जून १९०७ रोजी 'नूतन विद्यालया'ची स्थापना झाली. घटना तयार केली. निधी गोळा केला. विठ्ठलरावांनी शाळेची सूत्रे हाती घेतली. विद्यालयाची जाहिरात वाचून सरकारी नोकरी सोडून अनेक समविचारी शिक्षक म्हणून शाळेत दाखल झाले. शाळेत नवीन प्रयोग करण्याच्या दृष्टीने मुख्याध्यापक गोगटे ह्यांनी शिक्षकांसह पुणे, मुंबई येथील अनेक शाळांना, महाविद्यालयांना भेटी दिल्या. ना. गोपाळ कृष्ण गोखले यांचे मार्गदर्शन घेतले. अभ्यासक्रम तयार केला. शाळेत शिकण्यासाठी बीड, उस्मानाबाद, उमरगा, उदगीर, लातूर येथून विद्यार्थी येऊ लागले.

विठ्ठलरावांनी वाचनालय सुरू केले. देशात घडणाऱ्या घडामोडींची लोकांना त्यामुळे ओळख होऊ लागली. विविध विषयांवर चर्चा होत. स्पर्धा घेतल्या जात. वकिलीत विठ्ठलरावांना उत्तम पैसा मिळत होता. पण तो सर्व पैसा ऐषारामासाठी खर्च न करता त्यांनी वाचनालयासाठी, शाळेसाठी, सार्वजनिक कामांसाठी खर्च केला. नूतन विद्यालयात शिक्षणासोबतच बहिष्कार, स्वावलंबन, समाजसुधारणा व स्वदेशी ही लोकमान्य टिळकांची चतुःसूत्री रुजवण्याचे ऐतिहासिक कार्य केले. निजामशाही उलथून टाकण्यासाठी अनेक विद्यार्थी, शिक्षक, सर्वसामान्य जनता, वकील, डॉक्टर या स्वातंत्र्यलढ्यात नूतन विद्यालयामुळे सहभागी झाले होते. राष्ट्रप्रेम, देशभक्ती, स्वतः चरखा चालवून काढलेल्या सुताचे – खादीचे कपडे वापरणारे ध्येयवादी विद्यार्थी या विद्यालयांतील शिक्षकांनी घडविले. या विद्यालयाने अनेक क्षेत्रातील नामवंत व्यक्ती घडविल्या. २९ फेब्रुवारी १९२७ ला महात्मा गांधींनी या शाळेस भेट दिली. तेथे महिलांची सभा झाली.

आज विद्यालयाने शंभरी ओलांडली आहे. प्राथमिक विद्यालयाचे महाविद्यालयात रूपांतर झाले आहे. डी.एड, बी.एड, फाइन आर्टस, बी.बी.एम., बी.सी.ए, व्होकेशनल पॉलिटेक्निक, संगीताचे पदव्युत्तर शिक्षण इत्यादी ज्ञानशाखांतून शिक्षण घेऊन कर्तृत्वसंपन्न नागरिक घडत आहेत. 'नूतन विद्यालया'चे संस्थापक विठ्ठलराव देऊळगावकर ह्यांच्या तपश्चर्येचेच हे फलित आहे.

– मालती देऊळगावकर

## देव, नारायण केशव

**अभ्यासक, शिक्षक**

**सन १८७९ – १९५८**

पं. नारायण केशव देव यांचा जन्म नाशिकला झाला. देव घराणे हे पूर्वीपासून वैदिक घराणे म्हणून प्रसिद्ध होते. नगरपालिकेच्या प्राथमिक शाळेत नारायणशास्त्रींचे औपचारिक शिक्षण झाले. गुरू शंकरशास्त्री शौचे, श्रीरामकृष्णशास्त्री चंद्रात्रे व बाळंभट गोडसे ह्यांच्याकडे त्यांनी वेदांचे अध्ययन केले. पुढील शिक्षणासाठी ते बडोद्यास गेले. पूर्वाष्टकसंहिता, पदक्रमक्षरा व घनान्त अध्ययन पूर्ण करून नारायणशास्त्री नाशिकला आले आणि नाशिकमध्ये वेदांच्या अध्यापनास त्यांनी सुरुवात केली.

नाशिकमधील तिवंधा भागात एका मोठ्या हवेलीवजा इमारतीत नारायणशास्त्रींनी वेदपाठशाळेची स्थापना केली. संहिता, पदक्रम, जटा आणि घनांत अनेक उत्तम शिष्य घडण्यास सुरुवात झाली. अध्यापनाच्या बाबतीत शास्त्री अतिशय कडक शिस्तीचे होते. पण त्यांचे मन मात्र आपल्या शिष्यांवरील प्रेमाने भरलेले असे. अनेक प्रकारांनी गुरुजी शिष्यांना मदत करीत असत. अशीच पाच वर्षे गेल्यानंतर पुढील वीस वर्षांचा काळ शास्त्रींनी स्वतःच्या घरात पाठशाळा नेली व सातत्याने अध्यापनाचे कार्य चालू

द

ठेवले. गुजरातमधील लिंबडी संस्थानचे राजे यशवंत सिंह नाशिकला आले असताना त्यांनी पाठशाळेला भेट दिली. गुरुजींच्या विद्याध्यापनाच्या कार्यामुळे त्यांना समाधान वाटले. पुढील चार वर्षे सातत्याने दरमहा दहा रुपयांचे साहाय्य ते करीत होते. याच काळात नाशिकमधील व नंतर भारतीय पातळीवर नाव मिळविणारे श्रीधरशास्त्री वारे, जगन्नाथशास्त्री गर्गे, गोपाळशास्त्री गर्गे नारायणशास्त्रींच्या तालमीतच तयार झाले आणि भारतभरात वैदिक म्हणून ह्या सर्वांचा गौरव झाला.

१९१३ मध्ये गोदातीरावरील गोदावरी मंदिरात नारायणशास्त्रींनी अनेक वैदिकांच्या उपस्थितीत घनाचे कंठस्थ पारायण केले. त्यावेळी गुरुजींचा व्यासंग, अध्यापन कौशल्य, विद्यार्थ्यांविषयीची तळमळ व सौहार्दपूर्ण वागणूक पाहून त्या काळात एक हजार रुपये प्रदान करून नाशिककरांनी त्यांचा सन्मान केला.

संकेश्वर विद्यापीठाचे स्वामी शंकराचार्य नाशिकक्षेत्री आले असता नारायणशास्त्रींनी शिष्यवर्गासह वेदाचे सार विकृतिघना मंत्रजागर केले. त्यावेळी अत्यंत समाधानाने शंकराचार्यांनी त्यांना 'वैदिक रत्न' ही पदवी दिली. पुण्याच्या वेदोत्तेजक संस्थेने त्यांना 'वेदाचार्य' पदवी दिली व सन्मानपत्र देऊन त्यांचा मोठा गौरव केला.

– प्रा. सुहासिनी पटेल

## देव, शंकर श्रीकृष्ण

☞ **मुख्य नोंद– पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## देवधर, सीताराम गणेश

**समाजसुधारक, शिक्षक**

**१२ जून १८६१ – ४ डिसेंबर १९२४**

सीताराम गणेश देवधर ह्यांचा जन्म साताऱ्यात झाला. घरची परिस्थिती अत्यंत हलाखीची असल्याने सीतारामपंतांनी वार लावून, छोटी मोठी कामे करीत, नादारी, शिष्यवृत्ती मिळवून शिक्षण पूर्ण केले. साताऱ्याच्या नगरपालिकेच्या शाळेत त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. सातारा विद्यालयामधून ते मॅट्रिक झाले. पुण्याच्या डेक्कन



महाविद्यालयामधून संस्कृत विषय घेऊन ते बी.ए. झाले.

पुण्यात महाविद्यालयीन शिक्षण घेत असतानाच त्यांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या 'न्यू इंग्लिश स्कूल', रमणबाग येथे काही काळ शिक्षक म्हणून नोकरी केली. त्यानंतर अहमदनगरच्या 'मिशन हायस्कूल'मध्ये शिक्षक म्हणून ते काम करीत होते. संस्कृत हा त्यांचा हातखंडा विषय होता. भाषांतर व व्याकरणावर त्यांचा भर असे.

१८९० मध्ये ही नोकरी सोडून ते पुण्यात आले. पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिक्षक म्हणून ते काम करू लागले. १८९४ मध्ये ते डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीवन सदस्य झाले. १८९९ मध्ये अधीक्षक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. १८९९ मध्ये डेक्कन एज्युकेशन सोसायटीने साताऱ्याच्या दत्तोपंत जोशी ह्यांचे खाजगी विद्यालय ताब्यात घेतले. हे विद्यालय विद्यार्थी विद्यार्थ्यांसाठी चालवत होते. या शाळेत विद्यार्थीच विनावेतन शिक्षक म्हणून काम करत. अशा प्रकारची ही महाराष्ट्रातील पहिली शाळा होती. डेक्कन एज्युकेशन सोसायटीने ह्या शाळेचे प्रमुख म्हणून देवधरांना साताऱ्यास पाठविले. त्यांच्या प्रयत्नांमुळे शाळेची विद्यार्थी संख्या सदतीसवरून एकशे ऐंशीपर्यंत गेली. १९०५ मध्ये ती तीनशे पाचपर्यंत गेली. सरकारी विद्यालयावर ह्याचा परिणाम होऊ नये म्हणून शिक्षणखाते या शाळेस मान्यता देत नव्हते. पण शेवटी खात्यास परवानगी द्यावी लागली.

देवधर स्वत: शाळा सुटल्यावर वरच्या वर्गांचे जादा तास घेत. संस्कृत व इंग्रजी उत्तम शिकवित. शैक्षणिक विषयांवर विचार करण्यासाठी ते रविवारी शिक्षकांचा वर्ग घेत. न्यू इंग्लिश स्कूलचे देवधर चोवीस वर्षे मुख्याध्यापक होते. १ मार्च १९२० रोजी देवधर सेवानिवृत्त होणार होते. पण त्यांच्या उत्कृष्ट सेवेबद्दल सोसायटीने त्यांना दोन वर्षांची मुदतवाढ दिली गेली. १९२१ मध्ये शाळेची विद्यार्थी संख्या

द

७३५ झाली. देवधर उत्तम प्रशासक होते. प्रारंभी दिवाणांच्या पागेत भरणारे न्यू इंग्लिश स्कूल नंतर फरासखान्यात भरू लागले. संस्थेच्या मदतीने देणग्या जमा करून देवधर सरांनी शाळेची नवीन इमारत बांधली. या शाळेला आजही लोक 'देवधरांची शाळा' व 'दगडी शाळा' म्हणूनच ओळखतात. या शाळेचा विस्तार खूप मोठा झाला आहे. पाच एकरांचे मोठे क्रीडांगण शाळेला मिळाले आहे. या शाळेच्या शिक्षकांनी 'गुरुवर्य देवधर शिक्षण मंडळ' स्थापून १९६३ मध्ये मंडळातर्फे 'नवीन मराठी शाळा व बालक मंदिर' सुरू केले आहे. ही शाळा सातारा जिल्ह्यातील प्रथम क्रमांकाची प्राथमिक शाळा आहे.

देवधरांचे विचार अतिशय पुरोगामी होते. बालविवाह, केशवपन, हुंडापद्धत, सतीची चाल ह्यांना त्यांचा विरोध होता. विधवाविवाहाचे ते पुरस्कर्ते होते. त्यांच्या पहिल्या पत्नीच्या निधनानंतर त्यांनी कुमारिकेशी विवाह न करता एका प्रौढ विधवा शिक्षिकेशी विवाह केला होता. स्त्रीशिक्षणाचे पुरस्कर्ते असल्याने त्यांनी त्यांच्या पहिल्या पत्नीला व मुलीला शिक्षणासाठी मुलांच्या शाळेत घातले होते. स्वत:च्या शाळेत अस्पृश्य मुलांना व मुलींना त्यांनी प्रवेश दिला होता. आगरकरांच्या 'सुधारक' पत्राचे काही काळ ते संपादक होते. देवधर उत्तम लेखक होते. 'माझा जीवनवृत्तान्त' हे त्यांचे आत्मचरित्र आहे. 'संगीत सुविचार विजय' हे नाटकही त्यांनी लिहिले होते. नाटकात काम करण्याची त्यांना आवड होती. 'वेणीसंहार', 'शाकुंतल' ह्या संस्कृत नाटकांतून त्यांनी काम केले होते. स्त्रीपात्रांच्या भूमिकाही ते करीत. ते उत्तम वक्ते होते.

एक उत्तम शिक्षक, संघटनकुशल प्रशासक, लेखक व नाटककार, नाट्यकलावंत, कृतिशील समाजसुधारक अशा विविध भूमिकांतून समाजकारण, शिक्षण ह्या क्षेत्रात मोठे योगदान देणारे सीतारामपंत देवधर हे द्रष्टे शिक्षणतज्ज्ञ होते. इंग्लिश स्कूलमध्ये त्यांचा पुतळा उभा करण्यात आला आहे. तसेच डॉ. प्रा. यशवंत पाटणे यांनी 'स्वयंशिल्पी'या नावाचे त्यांचे चरित्र लिहिले आहे.

– आ. ब. कंग्राळकर

द

## देवस्थळी, गोविंद विनायक

**संशोधक**

**३ ऑक्टोबर १९०६ – १४ मार्च १९९४**



गोविंद विनायक देवस्थळींचा जन्म कोल्हापूरमधील गगन बावडा संस्थानात झाला. त्यांचे बालपण रत्नागिरी जिल्ह्यातील धामापूर ह्या गावात गेले. त्यांचे वडिल कीर्तनकार होते. पण वडिलांचे अकाली निधन झाले. घरची परिस्थिती अत्यंत हलाखीची होती. तेव्हा देवस्थळी शिक्षणासाठी त्यांचे आजोबा राजारामशास्त्री हिर्लेकर ह्यांच्याकडे मुंबईला गेले. आजोबांचीही परिस्थिती काही वेगळी नव्हती. त्यांनी इतरांकडे वार लावून शिक्षण घेतले. गिरगावात नगरपालिकेच्या दिव्याखाली बसून ते अभ्यास करायचे. मुंबईच्या आर्यन स्कूलमध्ये त्यांचे माध्यमिक शिक्षण झाले. विल्सन महाविद्यालय व झेवियर्स महाविद्यालयामध्ये त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केले. संस्कृत व इंग्रजी विषय घेऊन ते एम. ए. झाले तेव्हा ते 'झाला वेदान्त प्राईस'चे मानकरी ठरले व त्यांना सुवर्णपदक मिळाले. १९४६ मध्ये 'मीमांसाः दि वाक्यशास्त्र ऑफ एन्शंट इंडिया' ह्या विषयावर देवस्थळींनी प्रबंध सादर केला. ते पीएच. डी. झाले.

शिक्षण चालू असतानाच 'चिकित्सक समूह विद्यालयामध्ये' ते शिक्षक म्हणून रुजू झाले. विल्सन महाविद्यालयामध्ये संस्कृतचे अधिव्याख्याता म्हणून त्यांना नोकरी मिळाली. पण मुंबईचे राहणीमान अधिक खर्चिक म्हणून १९३७ मध्ये प्राध्यापक म्हणून त्यांनी नाशिकच्या एच. पी. टी. महाविद्यालयात प्राध्यापकाची नोकरी स्वीकारली. इंग्रजी, मराठी, संस्कृत ह्या भाषांतील साहित्याचा गाढा व्यासंग असल्यामुळे त्यांचे अध्यापन अधिक रसवत्तापूर्ण होते. काही काळातच संस्कृतचे एक उत्कृष्ट प्राध्यापक म्हणून त्यांचे नाव झाले. या तीन भाषांबरोबरच संस्कृत संशोधनात पूर्वसुरींनी केलेल्या

लेखनाचा मागोवा घेता यावा म्हणून त्यांनी जर्मन व फ्रेंच भाषांचा अभ्यास केला व त्यावरही प्रभुत्व मिळविले.

डॉ. गोविंद विनायक देवस्थळी ह्यांनी नाशिकचे व हंसराज प्रागजी ठाकरसी महाविद्यालयाचे (एच.पी.टी. कॉलेज) नाव प्राच्यविद्या संशोधनात जगाच्या नकाशावर आणण्याचे फार मोठे कार्य केले. नाशिकला आल्यापासून म्हणजे पन्नास वर्षे विविध स्तरावरील विद्यार्थ्यांना त्यांच्या अध्यापनाचा, मार्गदर्शनाचा लाभ होत राहिला. पुणे विद्यापीठाने देवस्थळींना पीएच. डी. साठी मार्गदर्शक म्हणून १९६४ साली मान्यता दिली. पाच विद्यार्थ्यांनी त्यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच. डी. पदवी प्राप्त केली.

१९५० ते १९६० ह्या काळात नाशिक व नाशिक परिसरातील वेदशास्त्रपारंगत घराण्यात असलेल्या तीन हजारांहून अधिक पुराणकालीन लिखित पोथ्या त्यांनी मिळविल्या व पोथ्यांचा आकार, लेखक, विषय, काळ इत्यादी वैशिष्ट्यांची सूची तयार केली. हा संग्रह सध्या नाशिकच्या सार्वजनिक वाचनालयाच्या पोथी विभागात जतन करून ठेवलेला आहे. मुंबई विद्यापीठात संस्कृत बरोबर प्राकृत पोथ्यांचीही सूची देवस्थळींनी केली. या अभ्यासात अनेक संशोधन करण्यास योग्य अप्रकाशित ग्रंथ मिळाले. त्यातील काहींवर देवस्थळींनी अकरा अभ्यासपूर्ण लेख लिहिले. विविध व्याख्यानमालांच्या निमित्ताने 'रिलिजन अँड मायथॉलॉजी ऑफ दि ब्राह्मणाऽ', 'अनुबन्धाऽ ऑफ पाणिनी', 'इंट्रोडक्शन टु दि स्टडी ऑफ बाणभट्ट' यासारखे अकरा ग्रंथ त्यांनी लिहिले.

भारतातील व परदेशातील संशोधनपत्रिकांसाठी त्यांनी लिहिलेल्या शोधनिबंधांची संख्या दोनशेपेक्षा अधिक आहे. डॉ. कुर्तकोटी शंकराचार्यांच्या आग्रहावरून 'ओरिएंटल थॉट' ह्या त्रैमासिकाचे ते अनेक वर्षे संपादक होते. १९४१ पासून संपन्न झालेल्या सर्व प्राच्यविद्या परिषदांतून त्यांचे शोधनिबंध-वाचन झाले. दिल्ली, बनारस येथील संस्कृत विश्वपरिषदांमध्ये 'ऋभू' व 'क्रमपाठाचे महत्त्व' हे शोधनिबंध त्यांनी सादर केले होते. पुणे, म्हैसूर, तिरुपती विद्यापीठांच्या अनेक चर्चासत्रांमध्ये त्यांचा असाच सहभाग होता. अनेक संस्कृत भाषा संस्थांतून ऋग्वेद, प्राचीन भारतातील स्त्रीचे स्थान, कालिदास समर्चा अशा विविध विषयांवर त्यांनी व्याख्यानमाला केल्या.

हिंदू साहित्य-विश्वज्ञानकोश, बार्सेलिना, उपनिषत्काण्ड-कोश वाई यासारख्या मोठ्या प्रकल्पात त्यांचा मोठा सहभाग होता. पुणे, मराठवाडा, इंदूर, बनारस विद्यापीठांच्या संस्कृत अभ्यासक्रम मंडळाचे सदस्य म्हणून त्यांनी काम केले. भुवनेश्वर येथील विसाव्या अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेपासून अखेरपर्यंत ते कार्यकारी मंडळाचे सदस्य होते. या सर्व प्रचंड कार्यासाठी भुवनेश्वरला संपन्न झालेल्या अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या 'क्लासिकल' विभागाचे अध्यक्ष म्हणून त्यांचा विशेष सन्मान झाला. नाशिकच्या श्री बालाजी संस्थान देवस्थानचे प्रमुख विश्वस्त म्हणूनही त्यांनी काम केले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## देशपांडे, उदय विश्वनाथ

**व्यायाम विद्या प्रसारक**

**२० जुलै १९५३**



उदय विश्वनाथ देशपांडे यांचा जन्म मणिनगर, अहमदाबाद येथे झाला. त्यांचे वडील विश्वनाथराव टेक्स्टाईल उद्योगात मोठ्या हुद्द्यावर नोकरीला होते. ते मुंबईच्या कापडगिरणीत उच्च पदावर कार्यरत होते. उदयरावांच्या आईचे नाव शैलजा होते. उदयरावांचे ५ वी पर्यंतचे शिक्षण दादरच्या 'किंग जॉर्ज' मध्ये तर एस. एस. सी. पर्यंतचे माहीमच्या लोकमान्य विद्यामंदिरात झाले. काळाचौकीला राहत असल्याने ते ट्रॅमने माहीमला जा-ये करीत असत. रसायन व वनस्पतीशास्त्र विषय घेऊन ते रुईया महाविद्यालयातून १९७३ मध्ये बी. एस्सी. झाले. १९६९ ते १९७५ या काळात योग, मल्लखांब, जिम्नॅस्टिक, खोखो, बास्केटबॉल, व्हॉलीबॉल, कुस्ती इत्यादी स्पर्धांत जिल्हा, राज्य व राष्ट्रीय स्तरावर स्पर्धक या

नात्याने भाग घेऊन त्यांनी अनेक सन्मान मिळवले होते. कुस्तीला पोषक व व्यायामाच्या प्रकारात उत्कृष्ट गणल्या गेलेल्या मल्लखांबाशी उदय इतके एकजीव झालेले आहेत की, उदय देशपांडे व मल्लखांब हे एकमेकांचे पर्यायच बनले आहेत. त्यांनी देशभर आयोजित केलेल्या मल्लखांब शिबिरात आदिवासी, वनवासी, मूकबधिर, मानसिक विकास न झालेल्यांचा व अपंगांचा समावेश आहे.

१९८२ पासून आजपर्यंत वेगवेगळ्या विद्यापीठांनी संचालित केलेल्या आंतरविद्यापीठीय मल्लखांब चॅम्पियनशिप स्पर्धांमध्ये उदयराव प्रशिक्षक व परीक्षक म्हणून काम करीत आले आहेत.

देशातल्या बहुतेक सर्व राज्यात मल्लखांब विद्येचा प्रसार करून तिला लोकप्रिय करण्यासाठी त्यांनी प्रशिक्षण शिबिरे आयोजित केली. त्यांच्या हाताखाली शिकलेल्या डझनावरी मुलामुलींनी मल्लखांब व व्यायामात श्री छत्रपती पुरस्कार मिळवले आहेत. मल्लखांब, योग व व्यायामामध्ये राष्ट्रीय स्तरावर पुरस्कार मिळवणाऱ्या मुलामुलींची संख्या शतकाच्या जवळ पोचली आहे. याचे श्रेय त्या मुलांच्याबरोबरच त्यांना उमदेपणाने, उत्साहाने व कलात्मक रीतीने सातत्याने व कसोशीने प्रशिक्षण देणाऱ्या उदयरावांनाही आहे.

१९७९ ते १९९० या अवधीत झालेल्या जवळपास सर्व राष्ट्रीय जिम्नॅस्टिक चॅम्पियनशिप्स मध्ये खेळ किंवा स्पर्धा पंच म्हणून उदयरावांनी निर्णायकाची भूमिका अत्यंत निरपेक्षपणे, निरलसपणे व चोख बजावली आहे. विशेष उल्लेखनीय म्हणजे १९७७ पासून नवी दिल्लीत प्रजासत्ताक दिनी होणाऱ्या एन.सी.सी. परेडमध्ये त्यांनी रोप व पोल मल्लखांब यांना स्थान मिळवून दिले व सुरवातीच्या काही वर्षात मल्लखांब दल प्रमुख म्हणून काम केले. त्यांनी १९९८ मध्ये मल्लखांबाला इंडियन ऑलिंपिक असोसिएशनची मान्यता मिळवून दिली.

२००२ साली ब्राझीलमध्ये आयोजित दुसऱ्या विश्वकप मल्लखांब चॅम्पियनशिपचे मानद सचिव म्हणून उदय विश्वनाथ देशपांडे यांची नियुक्ती झाली होती. २००८ पर्यंत त्यांनी अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स, डेन्मार्क, जर्मनी, जपान, कोरिया, ग्रीस, ऑस्ट्रेलिया, इस्रायल, झेकोस्लोवाकिया, स्पेन, मुंबई, मलेशिया इत्यादी देशातल्या नागरिकांना भारतात मल्लखांबाचे व्यक्तिगत प्रशिक्षण दिले.

युटा स्नायडर हे जर्मन गृहस्थ २००२ मध्ये भारतात आले असताना मल्लखांबाकडे आकर्षित झाले. त्यातूनच उदयरावांनी ५० मुलांचे एक आठवड्याचे शिबिर म्युनिक मध्ये घेतले. तेथे मल्लखांबाची रुची वाढीस लागली आहे. आतापर्यंत त्यांच्या जर्मनीला ५ भेटी झाल्या आहेत. २००८ मध्ये त्यांनी श्री समर्थ व्यायाम मंदिराचा दहाजणांचा चमू म्युनिकला नेला होता. परदेशात मल्लखांब व योगासनांचे आकर्षण वाढत आहे. नवव्या आशियाई खेळात व्यायामाचे आंतरराष्ट्रीय पंच या नात्याने त्यांनी काम केले.

उदयरावांचे व्यक्तिमत्व सहज डोळ्यात भरण्याजोगे आकर्षक, प्रभावी आहे. संस्कृती, इतिहास, राष्ट्रीयत्वाचा व भारताच्या उज्ज्वल परंपरांचा त्यांना सार्थ अभिमान आहे. ते निरहंकारी असून सेवाभाव, विद्यार्थ्यांविषयी कळकळ, शिस्त व वक्तशीरपणा बरोबरच हसतखेळत, कलात्मकरीतीने शिकवणे हे त्यांचे वैशिष्ट्य आहे.

केंद्रीय सीमाशुल्क व उत्पादनकर अधीक्षकाच्या कार्यालयातील सेवेचा अवधी सोडून त्यांना मल्लखांब व व्यायामाचे प्रकार एवढेच उदात्त ध्येय सदैव प्रेरित करीत असते. दादर येथील कमला मेहता अंधशाळेतील मुलींना १९९२ पासून दोरी-मल्लखांब विद्येत कुशल बनवून ६ जुलै २००३ रोजी त्यांनी भारताचे तत्कालीन राष्ट्रपती माननीय ए. पी. जे. अब्दुल कलाम यांच्यासमोर त्यांची प्रात्यक्षिके करून वाहवा मिळवली. अंध मुलांनाही त्यांनी स्तंभ मल्लखांब व दोरी-मल्लखांब विद्येचे प्रशिक्षण दिले. मल्लविद्येला अत्यंत आवश्यक अशा मल्लखांबविद्येला उदयरावांनी अतिव्यापक रूप, स्थैर्य, संरक्षण व लोकप्रियता मिळवून देऊन अपूर्व अशी कामगिरी केली व करीत आहेत. महाराष्ट्र शासनाने 'श्री शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार' देऊन त्यांचा गौरव केला आहे. विशेष म्हणजे त्यांचे मित्र उदय केंद्रे यांनी मल्लखांब या अनोख्या

विषयावर डॉक्टरेटसाठी इंग्रजी भाषेत प्रबंध तयार करून तो मे २००८ मध्ये मुंबई विद्यापीठाला सादर केला आहे.

– वि. ग. जोशी

## देशपांडे, कमला गोपाळ

**संस्थापक**

**२२ फेब्रुवारी १८९८ – ८ जुलै १९६५**



डॉ. कमलाबाई गोपाळराव देशपांडे ह्या साहित्यसम्राट नरसिंह चिंतामण तथा तात्यासाहेब केळकर ह्यांच्या कन्या. त्यांचा विवाह साताऱ्याचे गोपाळराव कुशाभाऊ देशपांडे ह्यांच्याशी दि. २८ मे १९१० रोजी झाला. १९१२ च्या डिसेंबर महिन्यात त्यांना पुत्रप्राप्ती झाली. दुर्दैवाने १९१३ मध्ये गोपाळरावांचा आकस्मिक मृत्यू झाला आणि कमलाबाई विधवा झाल्या. त्या काळात विधवांची स्थिती अतिशय वाईट होती. केशवपनाची रूढी होती. पण कमलाबाई ह्या रूढींपुढे नमल्या नाहीत. सकेशा विधवा म्हणून वावरताना त्यांना खूप मनस्ताप सहन करावा लागला. विधवेच्या वाट्याला येणारी अवहेलना त्यांच्याही वाट्याला आली. पण हे सगळे सहन करीत १९१७ मध्ये पुण्याच्या हुजूरपागेतून त्या मॅट्रिक झाल्या. १९२० मध्ये पुण्याच्या कर्वे विद्यापीठातून त्यांनी गृहिता गमा (जी.ए.) पदवी मिळविली.

याच काळात स्त्रीने शिकले पाहिजे, आपल्या पायावर उभे राहिले पाहिजे या विचारातून महर्षी अण्णासाहेब कर्वे ह्यांनी अनाथ महिलाश्रमाचे काम सुरू केले होते.

महाराष्ट्रात प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी कन्याशाळा निघाल्या तर स्त्रीशिक्षणाचा प्रसार होईल ह्या अण्णांच्या आवाहनाला साताऱ्यातील डॉ. पंढरीनाथ घाणेकर, डॉ. मो. ना. आगाशे, कमलाबाईंचे दीर वाग्भट देशपांडे यांनी प्रतिसाद दिला. वाग्भट देशपांडे ह्यांच्या घराच्या ओसरीवर १९२२ च्या आश्विन अमावस्येला साताऱ्याच्या कन्याशाळेचा प्रारंभ झाला. कमलाबाईंवर शाळेच्या प्रमुखाची जबाबदारी सोपविण्यात आली. आपल्या पुढील शिक्षणाचा विचार बाजूला सारून कमलाबाईंनी ही जबाबदारी स्वीकारली.

सुरुवातीच्या काळात इतर शिक्षकांचे पगार त्यांनी दिले. स्वत: विनावेतन काम केले. शाळा सारवणे, भिंती रंगवणे इथपासून घरोघरी जाऊन पैसे जमा करणे, शाळेसाठी मुली जमविणे इथपर्यंतची कामे त्यांनी केली. हे करीत असताना समाजाच्या प्रखर विरोधाला त्यांना तोंड द्यावे लागले. पण त्या आपल्या ध्येयापासून विचलित झाल्या नाहीत. काही वर्षे पुण्याच्या महिला पाठशाळेत संस्कृतच्या प्राध्यापिका म्हणून त्यांनी काम केले. हुजुरपागेच्या मुलींच्या कॉलेजात प्राचार्या म्हणून व नंतर पुणे विद्यापीठात एम. ए. च्या विद्यार्थ्यांच्या मार्गदर्शक म्हणून कमलाबाई काम करीत होत्या.

कमलाबाईंचे व्यक्तिमत्त्व कर्तव्यकठोर होते. त्याचबरोबर सर्वांविषयी आपलेपणा, ध्येयवाद, कार्यनिष्ठा, तेजस्वी बुद्धिमत्ता, शिस्तप्रियता हेही विशेष त्यांच्या व्यक्तिमत्त्वात होते. स्वत:च्या उत्पन्नाचा २० टक्के भाग त्या सामाजिक कार्यासाठी देत.

१६ मार्च १९२९ रोजी त्यांनी परदेशी प्रयाण केले. १९३१ मध्ये त्यांचा 'द चिल्ड्रन ऑफ एन्शन्ट इंडिया' या विषयावरील प्रबंध पूर्ण झाला. त्यांना झेकोस्लोव्हाकियाच्या प्राग विद्यापीठाची पी.एच.डी. पदवी मिळाली. प्रबंधासाठी त्यांनी जर्मन भाषेचा अभ्यास केला. परदेशातील वास्तव्यात त्यांनी आपला पेहराव, आपला आहार, आपली राहणी, आपले विचार, आपली संस्कृती ह्यात कधीही कोणताही बदल केला नाही. भारतात परत आल्यावर त्यांचे कार्य चालू राहिले.

'स्मरणसाखळी' ह्या कमलाबाईंच्या आत्मचरित्रात त्या काळातील विधवा स्त्रियांच्या स्थितीचे प्रातिनिधिक चित्रण आहे. १९४३ मध्ये ते प्रकाशित झाले. कमलाबाईंनी कथा, कविता, शब्दचित्रे असे विविध लेखन केले. स्त्रीगीतांचे संशोधन करून त्यांनी 'अपौरुषेय वाङ्मय अर्थात स्त्रीगीते' हे पुस्तक लिहिले.

सतीबंदी कायद्यापासून ते हिंदू कोड बिलापर्यंत स्त्रियांसाठी असणाऱ्या कायद्यांचा अभ्यास करून ‘स्त्रियांच्या कायद्याची वाटचाल’ हे पुस्तक लिहिले. या पुस्तकाला १९६१ चा न. चिं. केळकर वाङ्मय पुरस्कार मिळाला.

अण्णासाहेब कर्वे, पंडिता रमाबाई, महाराष्ट्रातील संतस्त्रिया याविषयी त्यांनी विपुल लेखन केले, व्याख्याने दिली. पुणे विद्यापीठाच्या बहि:शाल व्याख्यानमालेतही त्यांचा सहभाग असे.

स्त्रीला प्रतिष्ठा लाभावी, तिला समाजात मानाने जगता यावे म्हणून आयुष्यभर कमलाबाई तनमनाने झिजल्या. स्वत: केशवपन न करता सकेशा राहून ‘केशवपनाला स्मृतींमध्ये आधार नाही. ती एक रूढी आहे,’ हे त्यांनी कायद्याने सिद्ध केले. विधवांना मंदिरप्रवेश खुला झाला ही स्त्रीजीवनातील मोठी क्रांतीच होती.

वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षी वैधव्य प्राप्त झालेल्या कमलाबाईंनी ‘भारत सेविका समाजा’ची स्थापना करून विधवांना मदत करण्याचे कार्य हाती घेतले. महर्षी अण्णासाहेब कर्वे ह्यांच्या प्रेरणेतून त्यांचे कार्य उभे राहिले. हिंगणे स्त्रीशिक्षण संस्थेच्या त्या आजीव सदस्या होत्या.

साताऱ्यासारख्या गावात कमलाबाईंच्या अथक प्रयत्नांतून स्त्रीशिक्षणाची पायवाट निर्माण झाली. आज ह्या पायवाटेचे राजरस्त्यात रूपांतर झाले आहे. हे सर्व कमलाबाईंचे अनन्यसाधारण कर्तृत्व आहे.

– डॉ. ज्योत्स्ना कोल्हटकर

## देशपांडे, जनार्दन गोविंद

**शिक्षक, मुख्याध्यापक**

**२० सप्टेंबर १९०२ – २५ नोव्हेंबर १९७७**

देशपांडे गुरूजींचा जन्म पुण्यापासून ४० कि.मी. दूर वडगाव मावळमधील ओवळे गावी एका धार्मिक व सत्वशील घराण्यात झाला. गावातील विठ्ठल मंदिरात बसून राहण्याचा, धार्मिक पुस्तके वाचण्याचा छंद त्यांना लहानपणीच होता. ओवळे गावी शिक्षणाची सोय नव्हती म्हणून पौड येथे लोकलबोर्डात शिक्षकाच्या असलेल्या आपल्या गणेश गोपाळ हेजिब (मामा) यांच्याकडे राहून त्यांनी पहिली ते पाचवीपर्यंत शिक्षण घेतले. व्हर्नाक्युलर फायनलपर्यंत शिक्षण पुणे येथे के. एस. महाजन वकील यांच्या वाड्यात म्युनि.शाळा नं. ८ मध्ये झाले. या शाळेचे हेडमास्तर हेरंब गजानन देव यांनी जनार्दनास आदर्श शिक्षक होण्याबाबत उत्तम मार्गदर्शन केले.

त्यावेळी कराची मुंबई इलाख्यात होती. तेथे त्यांचे दुसरे मामा रेल्वेत नोकरीला होते. जनार्दन नोकरीच्या शोधात कराचीत १९१९ मध्ये गेले. कराची म्युनि. शाळेत नोकरी मिळाली. दिवसा नोकरी करून व रात्रशाळेत जाऊन १९२२ मध्ये ते मॅट्रिक झाले. याच काळात हिंदीच्या चार परीक्षा उत्तीर्ण झाले. तेव्हापासून २९ वर्षे ते कराची येथे रामबाग गाडी खाता, चोपशी उमरशी इमारतीच्या वरच्या मजल्यावर मामांच्या परिवारात राहात. त्या काळात कराचीत रामबाण गाडी खाता व रामस्वामी गाडी खाता भागात ९० हजार एवढी महाराष्ट्रीयांची वस्ती असून १०–१२ मराठी शाळा व पाच सहा मंदिरे ही होती. १९२३ ते २७ या काळात यांनी पुण्याचा ट्रेनिंग कॉलेजचा तीन वर्षांचा अभ्यासक्रम पूर्ण केला.

गुरूजी कराचीत २ मैल अंतरावर सदरबझार येथील शाळेत पायी जात, तेही अनवाणी. थंड पाण्याने स्नान करीत. दूर रामनवमीला ओवळे येथे येत. त्यांनी सर्व तीर्थयात्रा ही केल्या. १९३५ ते ४७ या काळातल्या उन्हाळ्याच्या सुट्ट्यांत त्यांनी काशी येथे वास्तव्य केले. तेथे राजेश्वर शास्त्री द्रविड यांच्या विद्यालयात वेदाध्ययन केले. पाचच घरी माधुकरी मागून ते चरितार्थ चालवीत. शाळेत गलांडे व शंकरराव जोशी हे त्यांचे सहकारी शिक्षक होते. गुरूजींची शिकविण्याची पद्धत, त्यांच्या वर्गाचा वार्षिक परीक्षेचा उत्तम निकाल व शाळेतील कामाबाबतची तळमळ या गुणांमुळे त्यांना एच. व्ही. मराठा विद्यालय (कराची) जे विद्यालय प्रमुख करण्यात आले. त्यांच्याच इमारतीच्या तळमजल्यावर मुसलमान पतिपत्नी आपल्या दोन मुलांसह राहात. ही मुसलमान स्त्री गुरूजींच्या गुणांशी परिचित होती. ती त्यांना पाक (पवित्र) समजत असे व भाऊ मानीत असे. तिची मुले रोज गुरूजींकडे

शिकायला येत. १९३९ – ४७ पर्यंत गुरूजी भाऊबिजेस तिला भाऊबीज घालीत.

भारताची फाळणी होऊन १४ ऑगस्ट रात्री १२ वाजता पाकिस्तान स्वतंत्र राष्ट्र म्हणून निर्माण झाले. आणि कराचीत (खिलाफत चळवळी पासूनच) सुरवात झालेला हिंदूद्वेष आता पराकोटीला गेला. हिंदूंच्या वर जुलूम, देवळांचा विध्वंस, मूर्तींना विद्रूप करणे, हिंदू स्त्रियांवर अत्याचार, खून, लुटालूट अशा प्रकारांना ऊत आला. रस्त्यांवर हिंदूंच्या प्रेतांचा खच पडू लागला. एकदा चोपशी उमरशी इमारतीमध्ये मुसलमान गुंड अत्याचारासाठी घुसले व गुरूजींवर सुरा उगारला एवढ्यात गुरूजींची मानलेली बहीण पुढे सरसावली व म्हणाली हा माझा भाऊ आहे. युसूफचे वडील म्हणाले, ''गुरूजी तुम्ही खोलीच्या बाहेर पडू नका. मी तुम्हाला मुंबईचे तिकिट आणून देतो व मुंबईस जाणाऱ्या बोटीवर सुरक्षित पोचवतो''. देशपांडे गुरूजींची कर्तव्यबुद्धी एवढी जाज्वल्य की ते म्हणाले, ''मी मुख्याध्यापक आहे. माझ्या जागेवर स्थानिक मुख्याध्यापक येत नाहीत तोपर्यंत मला कराची सोडता येणार नाही. मग माझे काहीही होवो.'' पुन्हा एकदा गुंड हल्ला करण्यासाठी इमारतीमध्ये आले पण कोणी दरवाजात बेशुद्ध पडले, कोणी आंधळे झाले. तेव्हापासून चोपशी उमरशी इमारत भुताचा वाडा म्हणून प्रसिद्ध झाली. अनेक मराठी कुटुंबे भारतात पोचली, पण काही कुटुंबे भुताच्या वाड्यात सुरक्षित राहाण्यास आली. रेल्वेमार्ग बंद होता. बोटीसाठी लांबचलांब रांगा लागत. काही लोक एक वस्त्रानिशी मालवाहू बोटीने रवाना झाले.

देशपांडे गुरूजी ज्या शाळा क्रमांक ५ चे मुख्याध्यापक होते त्या शाळेतील सर्व विद्यार्थी आपल्या आईवडिलांसह भारतात गेल्याने नोव्हेंबर १९४७ अखेर ती शाळा बंद पडली. लागू नावाचे प्रशासनिक अधिकारी शिक्षकांस ग्रॅच्युइटी, फंड वगैरे मिळावा म्हणून मार्च १९४८ पर्यंत प्रयत्न करीत थांबले व भारतात परतले. कराचीत निर्वासित कँप उघडण्यात आले व सैन्याचा पहारा ठेवण्यात आला. कराची मधील म्युनि. शिक्षक संघाचे सचिव केशव बाबाजी कांदळगावकर यांनी मुंबई राज्याच्या शिक्षण विभागाशी पत्रव्यवहार करून कराची मधील सर्व प्राथमिक शिक्षकांना रत्नागिरी, नाशिक, सातारा, पुणे, धुळे, अहमदनगर इत्यादी ठिकाणच्या शाळातून सामावून घ्यावे असा प्रयत्न केला. त्यास यश आले. गुरूजींच्या मानलेल्या मुसलमान बहिणीच्या पतीने केमारी बंदरापर्यंत साडेसात मैल पायी बरोबर जाऊन गुरूजींना – कँपमध्ये सुरक्षित पोचवून वारंवार कुर्निसात केला व अत्यंत जड अंतःकरणाने त्यांचा निरोप घेतला.

निर्वासित कँपमध्ये २५ – ३० प्राथमिक शिक्षक व १० – १५ विद्यालयामधील महाराष्ट्रीय शिक्षक होते ते सर्वजण केवळ एका कपड्यानिशी मायभूमीस परतले. कराचीतल्या नोकरीच्या वर्षांचा, ग्रॅच्युइटी, फंड वगैरे लाभ त्यांना मिळाला नाही.

आपली २९ वर्षांची शिक्षकाची कारकीर्द पार पाडून भारतात परत आलेल्या देशपांडे गुरूजींना खेड – शिवापूर सारख्या छोट्याशा खेड्यात प्राथमिक शाळेत सहाय्यक शिक्षकाची नोकरी पत्करावी लागली. निष्ठेने कार्य करून, वेगवेगळे विषय हाताळून गुरूजी प्रत्येक विद्यार्थ्यांचे सूक्ष्म निरीक्षण करीत व त्याचा कल कोणत्या विषयाकडे आहे ते पाहून ठेवीत. अध्यापन पद्धतीत त्यांनी आमूलाग्र बदल घडविला. मुली शाळेत जवळजवळ नसतच. गुरूजी पायपीट करून आसपासच्या पालकांना शिक्षणाचे महत्त्व समजावून देत. २–३ वर्षांत मुलींची संख्या वाढू लागली. ते मुलींना जिजाबाई, अहिल्याबाई होळकर, झाशीची राणी यांचे उदाहरण देत व चांगले संस्कार करीत. पूर्वी जेमतेम १७–१८ विद्यार्थी अंतिम परीक्षेस बसत व निकालही यथातथा लागे. गुरूजींच्या प्रयत्नाने विद्यार्थ्यांची फायनलसाठी संख्या ५० वर गेली व निकाल ९५ टक्के लागला. १९५२ – ५३ साली गणिताच्या शिष्यवृत्ती परीक्षेत गुरूजींचा विद्यार्थी (जाधव) पुणे जिल्ह्यात पहिला आला. गुरूजींनी प्रौढ शिक्षण वर्ग सुरू केला व त्यांना वर्तमानपत्र वाचता येण्याइतपत शिकविले. गुरूजींनी अस्पृश्यता कधीच मानली नाही. ते भौतिक ज्ञानाबरोबर धर्मनिष्ठेचा विकास करण्यासाठी स्वतः धार्मिक कृत्ये करीत व लोकांकडून करवून घेत. जीवनाला ईश्वराचे अधिष्ठान

द

असायला हवे हा भाव त्यांनी विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबण्याचा प्रयत्न केला. खेडला आल्यावर, शाळा सुटल्यावर शाळेतच बसून ते शिवापूर – बांदेवाडी व आसपासच्या विद्यार्थ्यांना विनामूल्य शिकवीत. गुरूजी १९५५ मध्ये खेड शाळेचे मुख्याध्यापक म्हणून निवृत्त झाले. ओवळे येथील मारूती मंदिराच्या जागी त्यांनी राममंदिर बांधले. १९४८ मध्ये बांदेवाडी परिसरात १५ – १६ विहिरी होत्या. गुरूजींनी दाखविलेल्या जागी विहिरी खोदल्या गेल्या. आता विहिरींची संख्या ३५ वर पोचली आहे. पाकिस्तानातून आल्यापासून सात वर्षे त्यांनी शिक्षकाचे काम केले. अध्यात्माची काम धरूनही त्यांनी आपला शिक्षकी पेशा निष्ठेने व सातत्याने सांभाळून एक आदर्श निर्माण केला.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. भट, नम्रता, संपादिका व प्रकाशिका; 'सकल संत चरित्र गाथा, – भांडुप (पूर्व) मुंबई १९९८.

द

## देशपांडे पुष्पा मधुकर
**संस्थापक**
**१६ सप्टेंबर १९३७**

## देशपांडे मधुकर गणपत
**शिक्षण प्रसारक**
**१४ मे १९३६**

पुष्पा मधुकर देशपांडे ह्यांचा जन्म नाशिकचा. त्यांचे शालेय शिक्षण हैद्राबाद (आंध्र) येथे व महाविद्यालयीन शिक्षण हैद्राबाद व पुणे येथे झाले. १९६० साली त्यांनी एम.ए.(गणित) ही पदवी संपादन केली.

मधुकर गणपत देशपांडे यांचा जन्म कर्नाटकातील गुलबर्गा येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण गुलबर्ग्यात व महाविद्यालयीन शिक्षण गुलबर्गा व पुणे येथे झाले. १९५९ मध्ये त्यांनी एम.ए.(गणित) पदवी मिळवली.

१९५९ मध्ये मधुकर व पुष्पा ह्यांचा विवाह झाला व ते पुण्यात राहू लागले. मधुकररावांनी गुलबर्गा इंजिनियरिंग



महाविद्यालय, फर्गसन महाविद्यालय व पुणे विद्यापीठात प्राध्यापक म्हणून नोकरी केली. पुष्पाताई पुण्यातील सेंट मीराज महाविद्यालयमध्ये प्राध्यापिका होत्या. गणितात डॉक्टरेट मिळविण्यासाठी मधुकरराव १९६५ साली अमेरिकेला गेले व १९६९ मध्ये गणितात पीएच.डी. झाले. १९६६ साली पुष्पाताई अमेरिकेला गेल्या. तेथे मिलवॉकी गावात देशपांडे स्थायिक झाले. पुष्पाताईंनी गणितातील एम.एस. पदवी मिळविली.



पण मायभूमीच्या ओढीने १९७१ मध्ये दोघेही भारतात परतले. औरंगाबादच्या सरस्वती भुवन महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून मधुकरराव व गणिताच्या प्राध्यापिका म्हणून पुष्पाताई नोकरी करू लागल्या. पण ह्या नोकरीत व भारतात मन न रमल्याने दोघेही १९७२ मध्ये मिलवॉकीस परत गेले. तेथे १९७८ मध्ये मधुकररावांनी अमेरिकेत इंडिया म्युझिक सोसायटीची स्थापना केली. १९९१ पर्यंत ह्या संस्थेचे काम त्यांनी केले. १९८५ ते १९९५ पर्यंत शिकागोतील इंडिया डेव्हलपमेंट सर्व्हिस ह्या संस्थेचे ते विश्वस्त होते. मिलवॉकीच्या मार्केट युनिव्हर्सिटीत गणिताचे प्राध्यापक म्हणून कार्यरत असताना गणित पत्रिके (मॅथस् जर्नल) मध्ये लेखन केले, नॅशनल कॉन्फरन्समध्ये सहभागी झाले.

१९६७ ते १९७४ ह्या काळात पुष्पाताईंनी मिलवॉकी येथील महाविद्यालयात प्राध्यापिका म्हणून व युनिव्हर्सिटी ऑफ विस्कॉन्सिनमध्ये अध्यापक म्हणून काम केले तर १९७६ ते १९९४ या काळात मिलवॉकी ट्रेड अँड टेक्निकल शाळेमध्ये त्या प्राध्यापिका होत्या. उच्च गणिताचे अभ्यासक्रम राबविणे, आंतरमहाविद्यालयीन स्पर्धांसाठी विद्यार्थी तयार करणे, प्रावीण्यवर्ग घेणे ह्यात त्यांचा

हातखंडा होता. १९९४ पर्यंत देशपांडे पती-पत्नी कौटुंबिक जबाबदाऱ्यांतून उत्तम प्रकारे मुक्त झाले. 'फिरती प्रयोगशाळा' हा वैज्ञानिक प्रकल्प भारतात करावयाचा होता, त्यासाठी त्यांनी निधी जमविला. डॉ. जगन्नाथ वाणी ह्यांच्या मदतीने सीआयडीए व वाईल्ड रोझ फाऊंडेशन या कॅनेडियन संस्थांकडून अनुदान मिळविले व प्रकल्पाची आर्थिक व्यवस्था करून दोघेही पुन्हा भारतात- पुण्यात आले.

पुण्यातील सहकारी मित्रांचे विचार, शाळांशी साधलेला संपर्क ह्यातून प्रकल्पाची योजना निश्चित केली. ग्रामीण भागातील विनाअनुदानित शाळा, पुणे जिल्हा व महाराष्ट्र राज्य हे कार्यक्षेत्र ठरविले. फिरत्या प्रयोगशाळेच्या माध्यमातून ग्रामीण विद्यार्थ्यांना मातृभाषेतून शिक्षण देऊन विज्ञानाभिमुख करणे हा ह्या प्रयोगाचा हेतू होता. त्याप्रमाणे १९९५ मध्ये विज्ञान वाहिनी संस्थेची स्थापना झाली.

टाटा ६०६ या वाहनाच्या चेसिसवर देशपांड्यांनी एक प्रयोगशाळा तयार केली. त्यावेळी आठ जणांचा कृतिगट होता. १४ जुलै १९९५ रोजी शबाना आझमी व जावेद अख्तर ह्यांच्या हस्ते फिरत्या प्रयोगशाळेचे उद्घाटन झाले. नंतरच्या काळात ह्या फिरत्या प्रयोगशाळेने दोन हजार शाळांना भेट दिली आहे. दोन लाख विद्यार्थ्यांना या प्रयोगाचा लाभ झाला आहे. ही शाळाभेट म्हणजे त्या शाळेचा 'विज्ञान दिन' असतो. आठवी ते दहावीच्या विद्यार्थ्यांना प्रयोगांच्या साहाय्याने विज्ञानाचे मार्गदर्शन मिळते.

मधुकररावांनी पुण्याप्रमाणेच उस्मानाबाद जिल्ह्यातील अणदूर गावात स्थानिक लोकांच्या मदतीने ग्रामीण विज्ञानकेंद्र उभारले आहे. कर्नाटकमध्ये गुलबर्गा येथे संस्थेने स्थानिक लोकांना 'विज्ञान प्रसारिणी' ही फिरती प्रयोग शाळा निर्माण करण्यास मोठी मदत केली आहे.

१९९५ साली असलेल्या आठजणांच्या कृतिगटात आज अकरा विश्वस्त व एकूण सव्वीस सहकारी आहेत. जानेवारी २००५ मध्ये संस्थेचा दशवार्षिक वाढदिवस साजरा झाला. या समारंभास महाराष्ट्र, गुजरात, तामिळनाडू, कर्नाटक, आंध्रप्रदेश येथील दहा विज्ञानसंस्थांचे प्रतिनिधी उपस्थित होते. समाजात वैज्ञानिक दृष्टिकोन निर्माण व्हावा म्हणून शिक्षणक्षेत्रात वेगळा प्रयोग करणाऱ्या मधुकर देशपांडे व पुष्पा देशपांडे ह्यांचा अनेक संस्थांनी पुरस्कारांनी गौरव केलेला आहे. पुष्पाताईंना सेवासदन संस्थेचा 'देवधर पुरस्कार', निवेदिता संस्थेचा 'सरस्वती समाजसेवा पुरस्कार' अशा पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले आहे. समाजाच्या ऋणातून मुक्त होण्यासाठी त्यांनी केलेला हा प्रयोग अभिनव आहे.

– जयंत फाळके

## देशपांडे, लक्ष्मण गणेश

**व्यायामशिक्षक**

**८ जुलै १९०८ – १८ ऑक्टोबर १९९०**



लक्ष्मण गणेश देशपांडे यांचा जन्म वेल्हे महाल तालुक्यातील आंबेगाव या भोर संस्थानातील गावी झाला. प्राथमिक शिक्षण जन्मगावी व त्यानंतरचे शिक्षण मातुलग्रामी ठाणे, डहाणू येथे बंधूंकडे व बोर्डीच्या निवासी शाळेमध्ये झाले. बोर्डीच्या शाळेमध्येच कोसबाडच्या भिसे गुरुजींचे मार्गदर्शन लाभले व समाजसेवेचा मूलमंत्र मिळाला.

लक्ष्मण लहानपणापासूनच अत्यंत हुशार व निसर्गप्रेमी होते. बोर्डीच्या शाळेत असताना निरनिराळे पुस्तके मिळवून शास्त्रीय प्रयोग करण्याचा नाद त्यांना लागला. 'ऑर्थर पी'चे' 'बुक ऑफ नॉलेज' त्यावेळी पाचवी-सहावीतला लक्ष्मण वाचत असताना इतरांनी थट्टा केली. परंतु त्याच पुस्तकाने छोट्या लक्ष्मणच्या मनात शास्त्राची आवड निर्माण केली. यातूनच पुढे छायाचित्रण, रेडिओ, ध्वनीक्षेपक तयार करण्याबरोबरच अनेक विद्युतविषयक प्रयोग त्यांनी केले. शास्त्रीय विषयाची ज्ञानोपासना चालू असताना बलोपासनाही चालू होती. व्यायाम, पोहणे, त्याचबरोबर स्काऊटींग मध्ये तरूण लक्ष्मणाने भाग घेतला. स्काऊटींगच्या आवडीतूनच मुले बरोबर घेऊन सांघिक

द

खेळ खेळणे, पोहणे, सहली काढणे, शिकारीला जाणे, त्याचबरोबर बालवीर चळवळ व शिवाजी पथकातही त्यांनी भाग घेतला. मॅट्रिकनंतर पुण्यातील सर परशुरामभाऊ महाविद्यालयामध्ये व्ही.टी.सी. चे शिक्षण घेतले व सेकंडरी टिचर्स कोर्सची परीक्षा उत्तीर्ण झाले.

यानंतर १९२९ मध्ये गोपाळ विद्यालय, पुणे येथे व्यायाम शिक्षक म्हणून नोकरीस लागले. फिलीप्स कंपनीमध्ये चांगल्या पगाराची नोकरी मिळत असतानासुद्धा शिक्षकच व्हायचे असल्याने हा पेशा स्वीकारला. व्यायाम शिक्षणाबरोबरच भूगोल, शास्त्र व इंग्रजी हे आवडीचे विषय देखील ते शिकवत असत. स्काऊटींग, विविध क्रीडा स्पर्धा भरविणे याचबरोबर भूगोल शिकविण्यासाठी अभिनव पद्धतीचा अवलंब केला. विद्यार्थ्यांच्या भारतभर निरीक्षण सहली काढणे. विद्यार्थ्यांकडून भारतातील विविध ठिकाणांचे व किल्ल्यांच्या प्रतिकृतींचे प्रदर्शन भरविणे. हेच किल्ल्यांचे प्रदर्शन गोपाळ विद्यालयाचे वैशिष्ट्य व पुण्याचे आकर्षण बनले होते. तसेच विद्यार्थ्यांकडून जगातील विविध देश आणि देशांतील राज्ये याबद्दल माहिती संकलीत करून वर्गवार प्रबंध स्पर्धा आयोजित केल्या. यातूनच गिरीभ्रमण, छायाचित्रण, पक्षीनिरीक्षण, शिकार, जलतरण आदी छंदाची जोपासना व विद्यार्थ्यांमध्ये आवड निर्माण केली.

गोपाळ विद्यालय ही शाळा भाड्याच्या जागेत जुन्या वाड्यात भरत असे. जागाखरेदीसाठी कर्ज व त्यावरील व्याजाने संस्थेचे कर्ज वाढले. वर्ग बांधणे जमले नाही उलट जप्तीचे फर्मान आले. अशा वेळी ल. ग. देशपांडे सरांनी पुढाकार घेऊन संस्था वाचवली. स्वतः कर्ज काढून तसेच माजी विद्यार्थी, मित्र व हितचिंतकांची मदत घेऊन शाळेसाठी चार मजली वास्तूनिर्मिती केली. 'सुलभ शिक्षण मंडळाची' स्थापना करून श्री गोपाळ प्राथमिक शाळा व श्री गोपाळ माध्यमिक शाळांचे पुनरूज्जीवन केले. हळूहळू शारदाश्रम हे मुलांसाठी वसतीगृह, वाचनालय, प्रयोगशाळा, प्रशस्त हॉल व चार मजली इमारतीच्या खाली पोहण्याचा तलाव अशी वास्तूरचना केली. पोहण्याचा तलाव असणारी ही त्यावेळची पहिलीच शाळा असावी.

विद्यार्थ्यांना केवळ शालेय अभ्यासक्रम शिकवून समाधान मानणे देशपांडे गुरुजींना कधीच मान्य नव्हते. 'जीवन शिक्षण' देऊन त्यांना आदर्श नागरिक करण्याचे दृष्टीने त्यांचे प्रयत्न असत. 'कृतिद्वारा शिक्षण' हे त्यांच्या दृष्टीने तत्त्वज्ञानच नव्हते. ते स्वतः विद्यार्थी बनून शिकतही असत. शाळेत हातमाग, शिवणकाम, टायपिंग, खडू, प्लॅस्टरच्या वस्तू, पुठ्ठाकाम, सूतकताई आदी शिक्षणाची व्यवस्था करून त्यांनी मुलांना हाताने निर्मितीला प्रोत्साहन दिले. उत्साही धडपडणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी त्यांनी क्लब सुरू केला.

देशपांडे गुरुजी अभिनव छंद जोपासणारे छंदोपासक होते. गुरुजींना लहानपणापासूनच छायाचित्रणाचा छंद होता. प्रवास करताना आपण जे पाहिले त्याची स्मृती जवळ असावी व ते इतरांनाही दाखवावे असे त्यांना वाटत असे. त्यातूनच त्यांनी देश-विदेशातील १० हजारांहून जास्त चित्रफिती तयार केल्या व त्याद्वारे भारत व जगात अनेक ठिकाणी व्याख्याने देऊन राष्ट्रीय एकात्मतेस हातभार लावला. बाबा आमटे यांच्या कार्याने गुरुजी अत्यंत भारावून गेले होते. त्यांनी बाबांच्या कार्यासंबंधी चित्रफित तयार करून देश-विदेशात दाखविल्या. त्यांनी निर्माण केलेल्या शिक्षणोपयोगी दृक साहित्याचा समाजाला उपयोग व्हावा म्हणून 'ल. ग. देशपांडे प्रतिष्ठान' ची स्थापना त्यांनी केली. तसेच माशांच्या जीवनाचा अभ्यास करून अनेक प्रकारचे मासे मिळविले व त्याचे १९४२ साली प्रदर्शन भरविले यातूनच महानगरपालिकेच्या संभाजी उद्यानातील मत्स्यालयाचा जन्म झाला. तसेच स्वातंत्र्यलढ्यात भाग घेणाऱ्या भूमिगत कार्यकर्त्यासाठी त्यांनी संदेशवाहक तयार केले व अनेक भूमिगत रेडिओ केंद्र चालवली. त्याचबरोबर कळसूत्री बाहुल्यांचा अभ्यास करून त्यावर पुस्तक लिहिले, त्यांना बरोबर 'दै. सकाळ' चा पुरस्कार मिळाला. त्याचबरोबर श्वान प्रदर्शन, मुष्टियुद्ध, जादूचे प्रयोग, सुटे भाग घेऊन मोटार व मोटारसायकल तयार करणे असे अनेक छंदही त्यांनी जोपासले. प्रत्येक छंद जोपासताना त्या संबंधातील वाचन केले आणि अत्यंत शास्त्रोक्त गोष्टींचा सखोल अभ्यास केला. जे शिकले ते शिकवले तर त्याचा

द

समाजाला उपयोग होईल असा त्यांचा ध्यास असे. ते खऱ्या अर्थाने ‘जीवन-शिक्षणाचे’ शिक्षक होते.

– विवेक कुलकर्णी

## देशपांडे, हरिहर वामन

**क्रीडाशिक्षक**

**५ मार्च १९०५ – २० एप्रिल १९६५**



हरिहर वामन देशपांडे यांचा जन्म अमरावती जिल्ह्यातील चंडिकापूर या गावी झाला. यांचे प्राथमिक शिक्षण चंडिकापूर येथेच झाले. पण माध्यमिक शिक्षणासाठी ते अमरावतीच्या सरकारी हिंदू विद्यालयामध्ये दाखल झाले. लहानपणापासूनच त्यांना व्यायामाची आवड होती. त्या वेळचे देशभक्त वीर वामनराव जोशी, हनुमान व्यायाम प्रसारक मंडळाचे संस्थापक अनंत कृष्ण व अंबादास कृष्ण वैद्य यांच्या आचार विचारांचा त्यांच्यावर खूप परिणाम झाला. त्यावेळच्या पुढाऱ्यांमुळे ते राजकारणाकडे ओढले गेले.

आपल्या मित्रांबरोबर त्यांनीही इंग्रजी शिक्षणावर बहिष्कार टाकला आणि धुळे जिल्ह्यातील अंमळनेर येथे राष्ट्रीय शाळेत प्रवेश घेतला व ते शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाले. पुढे पुणे येथे टिळक महाराष्ट्र विद्यापीठ येथे प्रवेश घेऊन (१९२३ ते १९२५) वाङ्मयविशारद ही पदवी घेतली. अकोट येथील राष्ट्रीय शाळेत अध्यापनाचे कामही केले. या काळात त्यांचे सहाध्यायी होते स्वामी रामानंद तीर्थ व ह. रा. महाजनी. हनुमान व्यायाम प्रसारक मंडळामध्ये काही क्रांतिकारी विचाराची मंडळी होती. शिवराम हरि राजगुरू हे त्यापैकी एक होते. त्यांच्याशी यांची जवळीक होती. या सर्वांना सहेतुक निरनिराळ्या कामावर पाठविले गेले. हरिहर व ज्ञानेश्वर देशपांडे यांना उत्तर प्रदेशात तर राजगुरूंची रवानगी बनारस येथे झाली. कोकर्डेकरांना जर्मनीस पाठविले गेले. उत्तर प्रदेशात कार्य करताना त्यांचा परिचय पंडित मदनमोहन मालवीय, लालबहादूर शास्त्री यांसारख्या राष्ट्रीय पुढाऱ्यांशी झाला. उत्तर प्रदेशातील काम आटोपून ते पुन्हा अमरावतीस आले. १९२९ च्या लाहोर काँग्रेसच्या अधिवेशनासाठी ते अमरावतीचे प्रतिनिधी म्हणून हजर राहिले. १९३० च्या सविनय कायदेभंगात त्यांनी भाग घेतल्याने त्यांना १ वर्ष सश्रम कारावासाची शिक्षा झाली. शिवनी येथील त्याच तुरुंगात सुभाषचंद्र बोस व शरदचंद्र बोस हे स्थानबद्ध होते.

१९३५ च्या काँग्रेसच्या सुवर्ण महोत्सवाच्या प्रसंगी हनुमान व्यायाम प्रसारक मंडळाचा व्यायाम प्रदर्शनाचा कार्यक्रम झाला. त्यावेळी त्यांची डॉ. राजेंद्रप्रसाद व सरोजिनी नायडू यांच्याशी ओळख झाली. त्रिपुरी – मध्य प्रदेश येथे १९३९ मध्ये काँग्रेसचे ५२ वे अधिवेशन भरले होते. त्यावेळी ३,००० स्वयंसेवकांना प्रशिक्षण देऊन, त्यांच्या व इतर निवडक सहकाऱ्यांच्या मदतीने अधिवेशनाची व्यवस्था उत्तम रीतीने पार पाडली. त्याचे सर्वांनी कौतुकही केले. १९४२ च्या असहकार आंदोलनात त्यांनी सक्रीय भाग घेतला. त्याबद्दल त्यांना पुन्हा कारावास भोगावा लागला.

ते उत्तम वक्ता होते. त्यांना मराठी, इंग्रजी, हिंदी, उर्दू, संस्कृत अशा अनेक भाषा येत होत्या. त्यावर त्यांचे प्रभुत्वही होते. आयुर्वेद, इतिहास, राजनीती, शारीरिक शिक्षण, पत्रकारिता हे त्यांचे आवडते विषय. त्यांनी नागपूर टाइम्स, हितवाद, लोकमत, तरुण भारत, स्वतंत्र हिंदुस्थान तसेच भवितव्य इत्यादी वृत्तपत्रांतून लिखाण केले. ‘भवितव्य’ या पत्रातून दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी ‘संजय उवाच’ या सदराखाली केलेले युद्धाचे वर्णन फार लोकप्रिय झाले.

व्यायामाची त्यांना प्रथमपासूनच आवड होती. १९४६ मध्ये हनुमान व्यायाम प्रसारक मंडळाने अखिल भारतीय शारीरिक शिक्षण परिषद भरवली. तिचे भव्य प्रमाणावर आयोजन केले. परिषदेस २५०० प्रतिनिधी आले होते. त्याचे आयोजन आणि यशस्वी संचलन हे हरिहर देशपांडे यांचे होते. १९४९ मध्ये स्वीडनमध्ये जागतिक ऑलिंपियाड महोत्सव झाला. २७ सदस्यांचा अधिकृत प्रवक्ता म्हणून हरिहर देशपांडे यांची निवड झाली होती. या

द

जागतिक सभेपुढे 'भारतीय संस्कृतीमध्ये शारीरिक शिक्षणाचे विविध पैलू' यावर त्यांनी त्यांचे विचार मांडले. त्याचबरोबर स्वित्झर्लंड, डेन्मार्क, जर्मनी, इंग्लंड या देशांचा दौरा केला. भारतीय व्यायामपद्धतीचा प्रचार केला.

सरकारी स्तरावर शारीरिक शिक्षणासंबंधी वेगवेगळ्या योजनांत त्यांचा महत्त्वाचा भाग होता. केंद्रीय शारीरिक शिक्षण सल्लागार समितीचे ते सदस्य होते. १९५० ते ६० शारीरिक शिक्षणाचा आराखडा बनविणे, शारीरिक शिक्षण महाविद्यालयाची उभारणी यात त्यांचे महत्त्वाचे योगदान होते. मध्य प्रदेशात गृहरक्षकची चळवळ त्यांनी लोकप्रिय केली. १९६२ ते १९६४ गांधी स्मारकातर्फे गांधी अध्ययन केंद्र चालविले. पनवेलच्या 'पनवेल आरोग्य मंदिर' मासिकाचे संपादकत्व स्वीकारले होते.

– रोहिणी गाडगीळ

## देशमुख, ईश्वर बगाजी
**क्रीडाशिक्षक, संस्थापक**
**२० मार्च १९२४ – ६ फेब्रुवारी २००६**

द

नागपूर जिल्ह्यातील कुही या खेड्यात ईश्वर बगाजी देशमुख यांचा जन्म एका गरीब कुटुंबामध्ये झाला.



उदरनिर्वाहासाठी त्यांचे वडील बगाजी देशमुख नागपूरला आले. मॉडेल मिल परिसरात कर्नलबाग मध्ये राहून ते हमाली करीत आणि त्यांची आई उमाबाई देखील मोलमजुरी करून घरखर्चात आपला वाटा उचलत असे. कसेबसे पाचव्या वर्गापर्यंत शिक्षण झाल्यानंतर १९३६ मध्ये त्यांना शाळा सोडावी लागली. त्याच वर्षी त्यांचा विवाहसुद्धा झाला. घरात थोडी मदत करता यावी म्हणून त्यांनी पतंग, फुगे, संत्री, वर्तमानपत्रे विकण्याची कामे केली. पानठेला चालविला. नवभारत व मॉडेल मिल मध्येही त्यांनी काही काळ नोकरी केली. त्यांचे चुलतभाऊ डोमाजी पैंकुजी देशमुख (जे पुढे डोमाजी वस्ताद म्हणून प्रसिद्धी पावले) ह्यांनी कर्नलबाग येथे स्थापन केलेल्या बजरंग दलामध्ये ते सामील झाले. युवकांना राष्ट्रीय प्रेरणा देता यावी म्हणून दिल्या जाणाऱ्या कुस्ती, दांडपट्टा, भाला, बरची, लाठी, काठी, जंबिया व तलवारबाजी आदी प्रकारच्या शिक्षणाने अनेक युवक डोमाजींचे अनुयायी झाले. ईश्वरबाबूंना त्यांचा पाठिंबा व आशीर्वाद होताच. नियमित व्यायाम आणि सरावामुळे त्यांचे शरीर सुडौल झाले. कौशल्य वाढीस लागले व हळूहळू त्यांचे अंगी नेतृत्वाचेही गुण विकसित होऊ लागले.

स्वातंत्र्याची चळवळ जोरात होती. ईश्वरबाबू त्यापासून वेगळे राहू शकले नाहीत. तेलंखेडी बॉंब प्रकरणी भाग घेतल्यामुळे १९४२ मध्ये त्यांना दीड वर्षाचा कारावास झाला. कारावासातून मुक्त होताच ईश्वरबाबूंनी अमरावती येथील हनुमान व्यायामशाळेत व्यायाम विशारदासाठी ग्रीष्मकालीन अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतला. त्यांनी तेथे फार मेहनत केली. खुद्द अंबादासपंत वैद्य यांनी त्यांचे कौतुक केले आणि त्यांची व्यायामपटूंमध्ये निवड केली.

१९४५ मध्ये ते स्वातंत्र्य चळवळीसाठी भूमिगत झाले. त्या दरम्यान खानदेश, सातारा, सांगली, कोल्हापूर भागात त्यांची भ्रमंती झाली. क्रांतिवीर नाना पाटील आणि किसनवीर यांच्याशी संपर्क आला. त्यांना दिशा मिळाली होती पण अपुऱ्या शिक्षणाची खंत होती. त्याशिवाय समाजात वावरणे, नेतृत्व करणे शक्य नाही याची जाणीव त्यांना व डोमाजींना होती. त्यावेळी खाजगीरीत्या मॅट्रिकची परीक्षा देता येत असे. म्हणून त्यांनी हिस्लॉप सिटी प्रशालेत प्रवेश घेतला आणि १९४९ मध्ये ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. समाज विकासासाठी महात्मा गांधींच्या विधायक उपक्रमात ईश्वरबाबूंनी भाग घेतला. त्यांची आखाड्यातील तालीम चालूच होती. योगासने, मल्लखांब, कुस्ती, लाठीकाठी, तलवारबाजी यामध्ये त्यांची नेत्रदीपक प्रगती झाली होती. १९४९ साली स्वीडनची राजधानी स्टॉकहोम येथे लिंगयाड महोत्सवासाठी जाणाऱ्या भारतीय संघामध्ये त्यांची निवड झाली. ईश्वरबाबूंच्या जीवनाला मोठी कलाटणी मिळाली. महोत्सवात भारतीय संघाची खूप वाहवा झाली. प्रात्यक्षिकासाठी इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स,

बेल्जियम आणि डेन्मार्क देशाची निमंत्रणे मिळाली. या क्षेत्रात आपण आणखी पुढे जावे असे वाटल्याने त्यांनी ‘ऑलेरूप ॲकेडेमी ऑफ फिजीकल एज्युकेशन डेन्मार्क’ या संस्थेत प्रवेश घेतला. अभ्यासक्रम पूर्ण करून १९५० मध्ये ते मायदेशी परत आले. मुंबईमध्ये त्यांचा भव्य सत्कार करण्यात आला.

१९५४ मध्ये ते बी.ए. झाले. पुढे एलएल.बी. ची परीक्षा मुंबई विद्यापीठातून पूर्ण केली आणि वयाच्या ४७ व्या वर्षी त्यांनी एम.ए. (राज्यशास्त्र) ही पदवी प्राप्त केली.

शिक्षण हाच विकासाचा एकमेव मार्ग आहे हे त्यांनी जाणले व ‘नागरिक शिक्षण मंडळाची’ स्थापना करून १९५५ मध्ये गाडीखाना ह्या कामगार वस्तीत राष्ट्रीय विद्यालय सुरू केले. त्यांना डोमाजी देशमुख आणि त्यांचे कार्यकर्ते यांचे फार मोलाचे साहाय्य झाले. डेन्मार्कमधील संस्थेप्रमाणे शारीरिक शिक्षण देणारी संस्था काढावी हे त्यांचे स्वप्नही १९६० मध्ये पूर्ण झाले. नागपूर विद्यापीठांतर्गत शारीरिक शिक्षणाचे सर्व अभ्यासक्रम या संस्थेत राबविले जातात.

समाजाला प्रशिक्षित समाजसेवक मिळावेत यासाठी १९६८ मध्ये ‘समाजसेवा महाविद्यालय’ काढले आणि ग्रामीण भागातही शिक्षण संस्था काढण्यासाठी देशमुख यांनी कुही, मांढळ आणि रामटेक या ठिकाणांची निवड केली. अंबाळा-रामटेक येथे आदर्श अशा प्रकारचे शिबिर संकुल निर्माण करून फार मोठी मोलाची कामगिरी त्यांनी केली आहे. महात्मा गांधींच्या विधायक कार्यक्रमांत सहभागी असावे म्हणून ‘चरखा संघ’ संस्था काढून कार्याला सुरुवात केली. काँग्रेस पक्षाच्या कामात ते नेहमी अग्रेसर राहिले.

१९५६ साली ते ‘नागपूर शहर जिल्हा काँग्रेस कमिटी’चे अध्यक्ष झाले. १९५८ ते १९६६ ह्या कार्यकालात ते विधान परिषदेवर स्थानिक स्वराज्य संस्थेचे प्रतिनिधी (एम.एल.सी) म्हणून कार्यरत होते. नागपूर महानगरपालिकेत नियुक्त सदस्य म्हणून त्यांनी कार्य केले. ‘नागपूर सुधार प्रन्यास’चे सदस्य म्हणून नागपूर शहराला विकसित करण्यात त्यांचा सिंहाचा वाटा होता. एस. टी. महामंडळाचे संचालक म्हणून ‘रस्ता तेथे एस.टी’ ही योजना त्यांच्या प्रेरणेनी राबविली गेली.

अगदी महाविद्यालयापासून त्यांनी साहित्यसेवा सुद्धा केली. ‘मौजमंडळ’ स्थापन करून युवक नवलेखकांना प्रोत्साहित केले. ‘कुठून कुठे’ ह्या आत्मचरित्रासोबत रामायण व महाभारतावर त्यांनी लिहिलेल्या पुस्तकांची तर प्राचार्य राम शेवाळकर यांनी भरभरून स्तुती केली आहे. क्रीडा क्षेत्रातील त्यांच्या कार्याबद्दल श्री शिव छत्रपती क्रीडा पुरस्कार देऊन महाराष्ट्र शासनाने ईश्वरबाबूंचा २००० साली उचित सन्मान केला.

– प्रा. हरिभाऊ केदार

**संस्थापक, शिक्षण प्रसारक**
**२७ डिसेंबर १८९८ – १० एप्रिल १९६५**
☞ **मुख्य नोंद – राजकारण खंड**



पंजाबराव देशमुखांचा स्वतःच्या शिक्षणाचा आलेख जन्मगाव पापळ ते इंग्लंड असा होता. पापळच्या गावठी शाळेत, नंतर लाडाचे कारंजे व त्यानंतर अमरावतीच्या हिंदू शाळेतून शिक्षण घेऊन १९१५ ला ते मॅट्रिक झाले. पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात त्यांनी १९१८ ला प्रवेश घेतला. १९२० मध्ये लंडनला प्रयाण केले. केंब्रिज विद्यापीठमधून १९२३ मध्ये एम.ए. पदवी मिळवली. पैशाअभावी पुढचे शिक्षण सोडून मार्च १९२४ ला पंजाबराव मायदेशी परत आले. आर्थिक पाठबळ जमा करून सप्टेंबरला पुन्हा इंग्लंड गाठले आणि डी. फिल. पदवी मिळवून १९२६ ला भारतात परतले हा स्वतः पंजाबरावांचा शिक्षणप्रवास!

त्या काळचा शिक्षणप्रसार हा समाजाच्या एका घटकापुरता मर्यादित होता. देशभरच्या बहुजन समाजाप्रमाणे विदर्भातही हा प्रसार नगण्यच होता. पंजाबरावांनी हे ओळखून अमरावती परिसरात शिक्षणाच्या सुविधा उभ्या

द

करण्याचे ध्येय बाळगले. १९११ ला स्थापन झालेल्या सी.पी. अँड बेरार स्टुडन्टस असोसिएशन या अभ्यास, क्रीडा व वक्तृत्व जोपासणाऱ्या मंडळाच्या उभारणीत पंजाबरावांचा सहभाग आढळतो. आप्पासाहेब देशमुख यांनी १९२५ ला स्थापन केलेल्या श्री शिवाजी मराठा शाळेत पंजाबरावांनी गणित व इंग्रजी विषयाचे शिक्षक म्हणून विनावेतन काम केले.

पंजाबरावांनी १९२६ ला 'श्री शिवाजी व्यायाम प्रसारक मंडळ' स्थापन केले. याच सुमारास आर्य समाजाचे कार्यकर्ते स्वामी श्रद्धानंद यांची हत्या झाली.

देशात सामाजिक एकता निर्माण व्हावी या उद्देशाने पंजाबरावांनी स्वामी श्रद्धानंद यांच्या स्मरणार्थ अमरावतीला श्रद्धानंद छात्रालय सुरू केले. समाजातील सर्व घटकांना समान शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून देण्याचे महत्त्वाचे कार्य या आश्रमाने केले. छात्रालयातील सुमारे १०० सहाध्यायींनी १९४२ च्या चलेजाव चळवळीत भाग घेऊन सश्रम कारावासही भोगला.

द

पंजाबराव देशमुख यांनी १९३१ मध्ये श्री शिवाजी शिक्षणसंस्था नोंदणीकृत करून घेतली. बेरार मराठा संस्थेने बंद केलेली शाळा या संस्थेने दत्तक घेतली. पंजाबरावांच्या या शिक्षणसंस्थेला उभी करण्यात अमरावती परिसरातल्या अनेक समाजसेवक व धुरीणांचा सक्रीय सहभाग लाभला. या विद्यामंदिराच्या सर्वांगीण विकासासाठी पंजाबरावांनी अथक परिश्रम घेतले.

अमरावती विभागातल्या शिक्षणप्रसाराचे मूळ डॉ. पंजाबराव देशमुख आणि त्यांच्या समकालीन सहकाऱ्यांनी घेतलेल्या कष्टात आहे.

– सुधाकर कुलकर्णी

**भाषातज्ज्ञ, मुख्याध्यापक**
**१२ मार्च १९२४**

गुजरातमधील नवसारी गावात एका गर्भश्रीमंत कुटुंबात बेजन नोशीर्वान देसाई ह्यांचा जन्म झाला. देसाई अकरा वर्षांचे असताना त्यांच्या वडिलांचे अकाली निधन झाले. पण ह्या आघाताने देसाई डगमगून गेले नाहीत. मोठ्या



कणखरपणे त्यांनी स्वत:च्या पुढील अध्ययनाची आखणी केली. नवसारीमध्ये त्यांनी त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण केले.

पुढील शिक्षणासाठी ते मुंबईत दाखल झाले. मुंबईच्या सेंट झेविअर्स महाविद्यालयामधून त्यांनी पदवी मिळविली व पदव्युत्तर शिक्षणही पुरे केले. दिवंगत सेठ फिरोजशहा मेहता ह्यांच्या पुत्राच्या सांगण्यावरून त्यांनी नाशिकच्या 'बॉईज टाऊन पब्लिक स्कूल'चे मुख्याध्यापकपद स्वीकारले आणि त्यांच्या शिक्षण क्षेत्रातील कारकिर्दीची सुरुवात झाली. १९५८ मध्ये मुंबईच्या सेकंडरी ट्रेनिंग कॉलेजमधून बी. एड. परीक्षेत विशेष गुणवत्तेसह मुंबई विद्यापीठात प्रथम येण्याचा मान त्यांनी मिळविला.

देसाई सर्वप्रथम एक उत्तम शिक्षक आहेत. एका मुख्याध्यापकाच्या भूमिकेतून शाळेच्या, विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासासाठी अभ्यासविषयक व अभ्यासेतर उपक्रमांचे परिपूर्ण असे नियोजन त्यांनी केले. सहकारी शिक्षकांवर मोठा विश्वास टाकून त्यांच्या सहकार्याने ते नियोजन ते प्रत्यक्षात आणत राहिले. अर्थातच शाळा काही काळातच सर्व क्षेत्रात यशस्वी होत गेली. बत्तीस वर्षांच्या त्यांच्या कार्यकाळात भारतातील गुणवत्ता असणारे, विद्यार्थी घडविणारे, महाराष्ट्र राज्यातील एक सर्वोत्कृष्ट पब्लिक स्कूल म्हणून शाळेचे सर्वत्र नाव झाले.

१९६३ मध्ये देसाई अमेरिकेच्या शैक्षणिक दौऱ्यावर गेले. तेथील वास्तव्यात अनेक शिक्षणसंस्थांना त्यांनी भेटी दिल्या, वेगवेगळे प्रयोग अनुभवले आणि एक अनुभवसंपन्न अधिकारी म्हणून परत आले. याच काळात नेवाडा प्रांतातील विद्यार्थ्यांना त्यांच्या अध्यापन कौशल्याचा अनुभव मिळाला. 'फुलब्राईट' शिष्यवृत्ती देऊन त्यांचा सन्मान करण्यात आला. त्यांच्या शिक्षणक्षेत्रातील अनुभवामुळे, विविध शैक्षणिक प्रयोगांनी सिद्ध झालेल्या

कर्तृत्वामुळे १९७५ पासून आजतागायत इन टॅक, दिल्ली, रोटरी व लायन्स इंटरनॅशनल ह्या संस्थांमध्ये पर्यावरण समिती, व्यवसाय मार्गदर्शन व युवा उपक्रम समिती, स्पर्धात्मक परीक्षा मार्गदर्शन समिती अशा विविध समित्यांचे अध्यक्षपद त्यांनी सांभाळले. स्टेट इन्स्टिटय़ूट ऑफ एज्युकेशन, एन. सी. इ. आर. टी (नॅशनल कौन्सिल फॉर एज्युकेशनल रिसर्च अ‍ॅण्ड ट्रेनिंग) मध्ये पाठ्यपुस्तक तज्ज्ञ म्हणून तसेच मिलिटरी स्टडीज, गुजराती, अवेस्ता, अरेबिक भाषांच्या ‘अभ्यासक्रम’ समित्यांचे सदस्य म्हणून सरांचे कार्य मोठे आहे.

केंद्र सरकारच्या सातव्या पंचवार्षिक योजनेच्या परिषदेत महाराष्ट्र सरकारचे खास निमंत्रित म्हणून ते उपस्थित होते. ह्या परिषदेसाठी मध्य प्रदेश, गोवा, गुजरात ह्या राज्यांचे मुख्यमंत्री, शिक्षणमंत्री व शिक्षणतज्ज्ञ आलेले होते. गुजरात साहित्य अकादमीचे सदस्य म्हणून महाराष्ट्र सरकारने त्यांची निवड केली.

माध्यमिक शालान्त परीक्षा व उच्च माध्यमिक शालान्त परीक्षेच्या निकाल सुधार समितीत मार्गदर्शक म्हणून त्यांना विशेष निमंत्रण होते. नॅशनल असोसिएशन फॉर ब्लाइंड ह्या संस्थेचे विश्वस्त म्हणून देसाई काम पाहतात.

इंग्रजी, संस्कृत, गुजराती, हिंदी साहित्याचा त्यांचा मोठा व्यासंग आहे. त्यातूनच लेखनाची, वक्तृत्वाची उत्तम शैली त्यांच्याजवळ आहे. मुंबई, दिल्ली, कलकत्ता, कराची यासारख्या शहरांतून व परदेशातही आध्यात्मिक, धार्मिक, शैक्षणिक विषयांवरील व्याख्याने ते देतात. शिक्षक, प्रशासक म्हणून काम करीत असतानाच १९४१ पासून सुरू केलेले लेखनाचे व्रतही त्यांनी चालू ठेवलेले आहे. शिक्षण, विविध धर्मांचा तौलनिक अभ्यास, अध्यात्म ह्या विषयांच्या संदर्भातील शंभराहून अधिक निबंध त्यांनी परिषदांतून वाचले आहेत.

‘वेदप्रदीप’ या वेदविषयक तत्त्वज्ञानाला वाहिलेल्या मासिकाचे संपादक म्हणून त्यांनी काम केले आहे. जीवनजी मोदी, उद्योगपती जे. एन. मार्शल ह्यांची चरित्रे, ‘नेम्स अँड सरनेम्स – अ फिलॉलॉजिकल स्टडी’, ‘रामय्या कथा सुबोधिनी’ (गुजराती) अशी विविध विषयांवर त्यांची पंधरा पुस्तके प्रकाशित झाली आहेत. शैक्षणिक क्षेत्रात, सामाजिक क्षेत्रात, सांस्कृतिक क्षेत्रात-राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर देसाई यांनी केलेल्या अनन्यसाधारण कार्याबद्दल अनेक पुरस्कारांनी त्यांचा गौरव केलेला आहे.

मुंबई विद्यापीठाचे देवकरण नानजी पारितोषिक, दोराब टाटा पारितोषिक, पोद्दार सुवर्णपदक, रोटरी इंटरनॅशनलचा नाशिकभूषण पुरस्कार, सन २००८ मधील पुणे विद्यापीठाने प्रदान केलेला ‘जीवनसाधना गौरव पुरस्कार’ हे व यासारख्या आणखी काही पुरस्कारांनी त्यांना गौरवण्यात आले.

– प्रा. सुहासिनी पटेल

* * *

द




## धाट, राजाराम गोपाळ

**प्राचार्य**
**१० जानेवारी १९४४**



राजाराम गोपाळराव ऊर्फ राजाभाऊ धाट यांचा जन्म अंबेजोगाईतील केज तालुक्यात चिंचोली माळी येथे झाला. त्यांचे वडील गोपाळराव कर्तव्यनिष्ठ तहसिलदार होते. १९६२ मध्ये राजाभाऊंनी बी. एस्सी. पदवी प्राप्त केली. नंतर नोकरी करीत १९६५ मध्ये औरंगाबादच्या तत्त्कालीन मराठवाडा विद्यापीठातून (नंतरचे डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ) गणित विषयात एम. एस्सी. पदवी प्राप्त केली. त्याच वर्षी अंबेजोगाई येथील योगेश्वरी महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून ते रुजू झाले.

काही काळ राजाभाऊ औरंगाबाद येथे मिलिंद महाविद्यालयात प्राध्यापकपदी कार्यरत होते. ते १९७०-७१ मध्ये अखिल भारतीय विद्यार्थी परिषदेचे महाराष्ट्र प्रदेश अध्यक्ष होते. १९७२ मध्ये अंबेजोगाई येथील भारतीय शिक्षण प्रसारक संस्थेच्या खोलेश्वर महाविद्यालयात त्यांची प्राचार्य म्हणून नियुक्ती झाली. त्यांच्या कार्यकालात खोलेश्वर पूर्ण महाराष्ट्रात सुपरिचित झाले.

त्यांनी राबविलेले अनेक शैक्षणिक उपक्रम पुढे विद्यापीठाने सर्व महाविद्यालयांमध्ये राबविले. त्यातील विद्यार्थी संसदेच्या निवडणुकांमध्ये पक्षीय राजकारण टाळून त्यात सुधारणा करण्यासाठी त्यांनी केलेले प्रयोग उल्लेखनीय आहेत. सतत ११ वर्षे 'खोलेश्वर' मध्ये विद्यार्थी प्रतिनिधींची निवडणूक बिनविरोध होत असे. राजाभाऊ ३३ वर्षे खोलेश्वर महाविद्यालयाचे प्राचार्य होते. प्राचार्यपदी काम करीत असतानाच, १९७७ मध्ये भारतीय शिक्षण प्रसारक संस्थेच्या सचिव पदी त्यांची निवड झाली. राजाभाऊंच्या सचिव पदाच्या कार्यकाळात १५ प्राथमिक व १४ माध्यमिक शाळा, ३ कनिष्ठ व ३ वरीष्ठ महाविद्यालये इतका संस्थेचा विस्तार झाला. शिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी आणि भविष्यातील आदर्श शिक्षक घडविण्यासाठी त्यांनी 'विद्यासभा' ही संकल्पना प्रत्यक्षात आणली.

राजाभाऊ तत्कालीन मराठवाडा विद्यापीठाच्या व्यवस्थापन परिषद, अधिसभा त्याचबरोबर विविध समित्यांचेही सदस्य होते. मराठवाडा विद्यापीठाच्या परीक्षा मंडळाचे प्रमुख म्हणून त्यांनी आपला ठसा उमटवला आहे. कुपोषण अभ्यास समिती, संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान समिती, 'वैद्यनाथन समिती'च्या संदर्भातील प्रशिक्षण समिती यांचे प्रमुख राजाभाऊ राहिले आहेत.

राजाभाऊ १९८४ ते २००३ 'दीनदयाळ शोध संशोधन' या संस्थेचे बीड जिल्ह्याचे प्रमुख होते. राजाभाऊंनी 'अंकुर प्रतिष्ठान व संशोधन केंद्र' स्थापना केली. अंबेजोगाई परिसराचा आर्थिक विकास साधण्यासाठी राजाभाऊंनी १९९७ मध्ये 'दीनदयाळ नागरी सहकारी बँके'ची स्थापना केली. आणीबाणीच्या काळात ते १९ महिने कारावासात होते. ते विविध सामाजिक व शिक्षणक्षेत्राशी संबंधित आहेत. २००४ ते २००६ या काळात ते 'सहकार भारती'चे महाराष्ट्र प्रदेश अध्यक्ष होते. अनेक वर्तमानपत्रातून राजाभाऊंनी शिक्षण, कृषी, सहकार, या विषयांवर अभ्यासपूर्ण लेखन केले आहे.

– श्रीनिवास श्रीकांत जोशी

* * *

# न

## नवरोजी, दादाभाई
☞ मुख्य नोंद – राजकारण खंड

## नाईक, चित्रा जयंत
**शिक्षणतज्ज्ञ, विचारवंत**
**१५ जुलै १९१८**



चित्रा जयंत नाईक यांचे बालपण सुखी मध्यमवर्गीय कुटुंबात गेले. चित्राताईंचे माहेरचे आडनाव योगायोगाने नाईकच. त्यांचे वडील मुंबईमध्ये नामांकित डॉक्टर होते. लाडात वाढलेल्या चित्रा नाईक लहानपणी शाळेत जायला नाखूष असत, पण त्यांच्या आईने त्यांचा शिक्षणाचा आरंभ स्वत: करून दिला. त्यांनी ओळखले की, मुलीला नेमलेला अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तके यात रूची नाही. पण अन्य वाचनाची आवड खूप आहे. म्हणून त्यांनी मुलीच्या वाचनाची भूक भागेल यासाठी भरपूर व्यवस्था केली. त्यातून चित्रा नाईक यांचे मानसिक जग खूप विस्तारले. थोडेसे लेखन होऊ लागले. वक्तृत्व सभांमध्ये भाग घेणे घडू लागले.

१९४० च्या सुमारास त्यांच्यासारखा विद्यार्थी वर्ग देशाच्या स्वातंत्र्यासाठी चिंता करण्यात गढला होता. चित्रा नाईकही सत्याग्रह, मार्क्सवाद, समाजवाद अशा विषयाच्या चर्चेत दंग होत.पत्रकारितेचे सुद्धा त्यांना आकर्षण होते. इंग्रजी ऑनर्स घेऊन त्या बी. ए. झाल्या आणि बी. टी. च्या परीक्षेत विशेष प्राविण्यासह पहिला वर्ग मिळविला. मुंबईच्या सरकारी शिक्षणशास्त्र विद्यालयात त्यांना साहाय्यक व्याख्यात्याची जागा मिळाली. नंतर पीएच. डी. साठी संशोधन सुरू केले. तेथील मार्गदर्शक प्रा. रामभाऊ परूळेकर व त्यांचे स्नेही जे.पी. नाईक यांनी

चित्राताईंना भरपूर वैचारिक खाद्य पुरविले. डॉक्टरेट केल्यावर त्यांना सरकारमध्ये शिक्षण अधिकाऱ्याचे पद मिळाले. त्यावेळी त्या 'ॲडव्हेंचर ऑफ एज्युकेशन' हे त्रैमासिक संपादित करीत असत. १९५० मध्ये त्यांना ब्रिटनमधील मनोदुर्बल मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था अभ्यासण्यासाठी संयुक्त राष्ट्रसंघाची शिष्यवृत्ती मिळाली व त्या इंग्लंडला गेल्या. तेथून परत आल्यावर त्यांची मुंबई सरकारच्या शिक्षण सेवेत 'सहाय्यक शैक्षणिक तपासणी अधिकारी' या जागेवर नेमणूक झाली. ते काम करीत असतानाच १९५३ मध्ये त्यांना फुलब्राइट शिष्यवृत्ती मिळाली आणि त्या न्यूयॉर्कला कोलंबिया विद्यापीठात दाखल झाल्या. तत्पूर्वी त्यांचा नाईकांच्या मौनी विद्यापीठाशी संबंध आला होता.त्यामुळे त्यांनी अभ्यासासाठी 'ग्रामीण शिक्षणाचे नियोजन व व्यवस्थापन' हा विषय निवडला.

शिष्यवृत्तीचा एक वर्षाचा काळ संपल्यावर सातारा जिल्ह्याच्या शिक्षणाधिकारी म्हणून त्यांची नेमणूक झाली. तेथे जाण्यापूर्वी कोल्हापूरला जे.पी.नाईक व त्यांचे सहकारी यांच्याशी त्यांची चार दिवस चर्चा झाली.

तेव्हा त्यांनी गारगोटीच्या ग्रामीण विद्यापीठाची संपूर्ण माहिती घेतली. नंतरही सुटीच्या दिवसात त्या अनेकदा कोल्हापूरला जात. त्यावेळी नाईकांच्या मित्रमंडळींनी त्या दोघांना विवाह करण्याचा आग्रह केला आणि त्याप्रमाणे १९५५ मध्ये त्यांनी विवाह बंधन स्वीकारले. नंतर त्यांना कोल्हापूरच्या महाराणी ताराबाई महाविद्यालयाच्या प्राचार्यपदी नेमणूकही मिळाली आणि कोरगावकरांच्या

वाड्यात चार खोल्यांमध्ये त्यांचा संसार सुरू झाला. तोपर्यंत मौनी विद्यापीठाला अखिल भारतीय मान्यता मिळाली होती. मात्र प्रा. परुळेकर निवृत्त झाल्याने कोरगावकर संशोधन संस्थेच्या संचालकांची जागा रिकामी झाली होती. तिथे चित्रा नाईक यांना प्रतिनियुक्तीवर घेण्याचा प्रस्ताव शासनाने मान्य केला आणि १९५७ मध्ये ३ वर्षांच्या करारावर त्या गारगोटीला गेल्या. मात्र १९५९ मध्ये नाईकांना शिक्षण मंत्रालयाने दिल्लीला प्राथमिक शिक्षण सल्लागार म्हणून निमंत्रित केले व तेथून पुढे त्यांचे राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय कार्य वाढतच गेले.

जून १९६१ मध्ये चित्रा नाईक कोल्हापूरच्या महाविद्यालयात प्राचार्यपदी परत गेल्या. १९६२-६३ च्या दरम्यान त्यांना भारत सरकारच्या मूलोद्योग शिक्षण संस्थेत संचालक पदावर प्रतिनियुक्तीवर नेमणूक मिळाली. परंतु १९६४ मध्ये त्यांना महाराष्ट्र सरकारने परत बोलविले. १९६९-७० मध्ये त्या पुन्हा प्रतिनियुक्तीवर दिल्लीला गेल्या. पण नंतरच्याच वर्षी महाराष्ट्र राज्य माध्यमिक शिक्षण मंडळाच्या अध्यक्षपदी निवड होऊन त्या पुण्यात परत आल्या.

१९७८ ते ८० ताईंना प्रौढ शिक्षण क्षेत्रात कार्य करण्यासाठी व्हिएतनाम, बँकॉक, रशिया वगैरे देशातून प्रवास करावा लागला.

न

जे. पी. नाईकांचे कर्करोगाने ३० ऑगस्ट १९८१ रोजी निधन झाले. त्यानंतर सर्वांसाठी शिक्षण मुक्त व्हावे म्हणून इन्स्टिट्यूटमध्ये अनौपचारिक शिक्षण संशोधन केंद्र १९७८ मध्ये सुरू करण्यात आले व त्याला त्यांनी वाहून घेतले.

या केंद्राच्या मानद संचालिका म्हणून काम करीत असताना त्यांनी नव-साक्षरांसाठी ‘पसाय’ मासिक काढले, ४५ कथा पुस्तिका लिहिल्या, देशोदेशीचे प्रौढ शिक्षणतज्ज्ञ निमंत्रित करून नव्या अभ्यासक्रमाचे आराखडे तयार केले. इतर देशातील प्रौढ शिक्षणाची पाहणी करण्यासाठी अनेक देशांना भेटी दिल्या.

भारत सरकार व अन्य संस्थांनी त्यांना प्रौढ शिक्षण आंदोलनासाठी सल्लागार म्हणून नियुक्त केले. याच सुमारास इंडियन इन्स्टिट्यूटला भारतीय समाजविज्ञान संशोधन परिषदेने मान्यता दिली. जे.पी नाईकांच्या पश्चात इन्स्टिट्यूटची देखभाल चित्रा नाईक यांनीच केली व तिचा सर्व बाजूंनी विस्तार केला. ती संस्था पुण्यात कोथरुडमध्ये आहे.

शाळा सोडलेल्या मुलामुलींसाठी अनौपचारिक शिक्षणाचा कृती संशोधन प्रकल्प चित्रा नाईक यांनीच १९७९ मध्ये सुरू केला. त्यात सुमारे ८००० विद्यार्थ्यांसाठी २२८ खेड्यापाड्यात वर्ग उघडले व प्राथमिक शिक्षण प्रसाराला नवी दिशा दिली. १९८२ मध्ये चित्रा नाईक यांना अफगाणिस्थानातील स्त्रियांचे प्रौढ शिक्षण व प्राथमिक शिक्षण यासाठी सल्लागार म्हणून निमंत्रण आले. १९८४ मध्ये ‘तुलनात्मक शिक्षण’ या विषयावर पॅरिस येथील जागतिक परिषदेत आणि फ्रँकफर्ट विद्यापीठात त्यांची व्याख्याने झाली. शैक्षणिक योजनेवर निबंध वाचण्यासाठी १९८८ मध्ये त्यांना रशियाला जावे लागले. त्याच वर्षी त्यांना महाराष्ट्र शासनाच्या नियोजन मंडळाचे सदस्यत्व मिळाले तर १९९१ मध्ये भारताच्या योजना आयोगाचे. तीन राजकीय पक्षांच्या प्रधानमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली ते कार्य सांभाळून १९९८ मध्ये त्या पुण्यास परतल्या. तत्पूर्वी १९९४ मध्ये ग्रामीण स्त्रियांचे शिक्षण व सबलीकरण होण्याच्या उद्देशाने त्यांनी शिवापूर येथे ‘ग्रामीण महिला विकासिनी’ या केंद्राची स्थापना केली होती. त्या कामाकडे नंतर त्यांनी अधिक लक्ष पुरविले. संस्थेचे ‘शिक्षण आणि समाज’ हे त्रैमासिक त्या १९७८ पासून संपादित करीत आहेत. जागतिकीकरणाच्या वास्तवाला भारतीय शिक्षण क्षेत्र कोणत्या प्रकारे सामोरे जाऊ शकेल याचे संशोधन त्यांच्या नेतृत्वाखाली सुरू झाले.

त्यांच्या अलौकिक कार्याला देखील सार्वत्रिक मान्यता मिळाली. त्यांना युनेस्कोने आंतरराष्ट्रीय जॅन कमेनियस पारितोषिक १९९३ मध्ये प्रदान केले. त्याशिवाय त्यांना जमनालाल बजाज पुरस्कार, टागोर पुरस्कार, प्रणवानंद पुरस्कार आणि कुसुमाग्रज प्रतिष्ठानचा गोदागौरव पुरस्कार प्राप्त झाला आहे. भारत सरकारने पद्मश्री देऊन त्यांचा गौरव केला आहे.

– सविता भावे

## नाईक, जयंत पांडुरंग

***घोटगे विठ्ठल हरिभाऊ, नाईक जे. पी.***

**शिक्षणतज्ज्ञ, विचारवंत**

**५ सप्टेंबर १९०७ – ३० ऑगस्ट १९८१**



जयंत पांडुरंग नाईक यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्याच्या आजरा तालुक्यातील बहिरेवाडी या खेड्यात झाला. तेथे घोटगे आडनावाची काही कुटुंबे होती. हरिभाऊ घोटगे यांचे हे पुत्र. त्यांचे मूळ नाव विठ्ठल. बैलहोंगल येथील कानडी प्राथमिक शाळा व नंतर बेळगाव येथे चुलत्यांच्या पेढीवर काम करीत असताना तेथील शाळेमध्ये शिक्षण पूर्ण करून विठ्ठलने मॅट्रिकला असामान्य यश मिळविले. पुढे कोल्हापूरला बोर्डिंगमध्ये राहून शिकवण्या करीत राजाराम महाविद्यालयामध्ये पदवी प्राप्त करीत असताना त्याने आपल्या तल्लख बुद्धिमत्तेचे अनेक तेजस्वी आविष्कार घडविले. त्यानंतर १९३० साली गांधीजींनी स्वातंत्र्यसंग्रामाचे रणशिंग फुंकल्यावर या तरुणाने त्या हाकेला ‘ओ’ देऊन स्वातंत्र्य लढ्यात उडी घेतली व कुटुंबाला त्रास होऊ नये म्हणून स्वत:चे नाव बदलून ‘जयंत पांडुरंग नाईक’ असे नवे नाव धारण केले आणि पुढे अधिकृतरीत्या तेच कायम झाले.

‘सक्त मजुरीची शिक्षा म्हणजे खडी फोडण्याचे काम’ असा त्या काळी नियम होता. पण नाईकांसारख्या बुद्धिमान तरुण कैद्याने इतरांनी नाकारलेले रूग्ण सेवेचे काम तुरुंगात मागून घेतले. त्यांच्या या कार्याने प्रभावित झालेल्या ब्रिटिश डॉक्टरने देऊ केलेली शिक्षेतील सूट घेण्याऐवजी वैद्यक शास्त्राची पुस्तके त्यांनी मागून घेतली. राजबंदी म्हणून नाईक तुरुंगात गेले; पण डॉक्टर बनून ते बेल्लारीच्या तुरुंगातून बाहेर आले. भूमिगत असताना त्यांनी उप्पीनबेटीगेरी या खेड्यातील आर्थिक– सामाजिक जीवन जवळून पाहिले होते. ते खेडे शिक्षण आणि विकासाच्या सर्वांगीण कामासाठी त्यांनी निवडले.

थोड्याच दिवसात नाईक हे उप्पीनबेटीगेरीचे लोकप्रिय डॉक्टर बनले. तेथे त्यांनी एक शिक्षकी प्राथमिक शाळा स्थापन केली. अर्धी पँट आणि आखूड बाह्यांचा सदरा हा तुरुंगातील पोषाखच त्यांनी चालू ठेवला. साफसफाई, पाणीपुरवठा, साक्षरता अशा कामात ते रमून गेले. लोकांच्या मदतीने वर्षभरात त्यांनी ‘धारवाड प्राथमिक शिक्षण मंडळ’ स्थापन केले. उप्पीनबेटीगेरीपासून बाजाराचे गाव बरेच लांब पडत असे. ते अंतर कमी करण्यासाठी मधली टेकडी फोडून रस्ता काढण्याचा पराक्रम गावकऱ्यांनी नाईकांच्या नेतृत्वाखाली केला. त्याकरिता नाईकांनी अभियांत्रिकीची तांत्रिक माहिती घेतली. या काळात नाईकांनी शिक्षणविषयक बरेच लिखाणही केले. १९३७ साली मुंबई प्रांतात काँग्रेसचे सरकार स्थापन झाले व शैक्षणिक विकासासाठी प्रांतिक प्राथमिक व प्रौढ शिक्षण मंडळे स्थापन झाली. या दोन्हीमध्ये सदस्य होण्याचे निमंत्रण नाईकांना मिळाले. त्या वेळी त्यांनी शिक्षणाच्या अर्थशास्त्राकडे आपले लक्ष वळविले आणि शिक्षण विभागातील ज्येष्ठ अधिकारी व गोखले अर्थशास्त्र संस्थेचे तज्ज्ञ यांच्याशी मैत्री जोडून शिक्षण प्रसाराच्या नव्या योजना सुरू केल्या. १९३६ साली त्यांनी ‘मास एज्युकेशन’ हे पुस्तक लिहिले. शैक्षणिक इतिहासावर ५ व्याख्याने दिली आणि ‘ब्रिटिश इंडियातील शिक्षणाचा इतिहास’ हा अत्यंत गाजलेला ग्रंथ तयार केला.

न

कोल्हापूरमध्ये त्यावेळी रिजन्सी कौन्सिलचा कारभार होता. शिक्षणमंत्री रावबहादूर पाटील यांनी नाईकांना तेथे येण्याचे निमंत्रण दिले. कोल्हापूरचे शिक्षणसचिवपद ही केवळ शिक्षणाचाच नव्हे तर कोल्हापूर संस्थानचा सर्वांगीण विकास करण्याची संधी आहे हे नाईकांनी ओळखले. त्यांनी संस्थानातील शिक्षणाबरोबरच कोल्हापूरच्या नगर रचनेतही लक्ष घातले आणि योजनाबद्ध पुनर्रचनेचे प्रात्यक्षिक तेथे दाखवून दिले. त्यांच्या कामाचा झपाटा विलक्षण होता. शिक्षण, आरोग्य, क्रीडा या सर्व बाबतीत त्यांनी लोकसहभाग मिळविला आणि अल्पावधीत संस्थानचा कायापालट घडवून आणला. आपल्या अभ्यासाच्या आधारावर १९४६ मध्ये त्यांनी संस्थानच्या सर्वंकष

विकासाची पंचवार्षिक योजना सुरू केली. ग्रामीण विभागाच्या विकासासाठी स्वातंत्र्यपूर्व काळातच विकास गटांची योजना त्यांनी सुरू केली. या काळात नाईकांनी विपुल लेखन केले. मुंबई प्रांतातील लोकल फंड सेसचा इतिहास त्यांनी लिहिला. भारतातील शिक्षणाचा आढावा घेणारे एक छोटेसे इंग्रजी पुस्तकही तयार केले. 'उद्याचे कोल्हापूर' असे पुस्तक लिहिल्यानंतर कोल्हापूर नगरपालिकेचा इतिहासही त्यांनी लिहून काढला. देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर संस्थानाचे विलिनीकरण झाले व त्यामुळे नाईकांना तेथील नोकरी चालू ठेवणे शक्य नसल्याने १९४७ अखेर त्यांनी कोल्हापूरचा निरोप घेतला आणि नव्या वर्षाची सुरुवात मुंबईला 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन' या अभिनव शैक्षणिक संस्थेच्या स्थापनेने केली.

कोल्हापुरात असतानाच आपल्या मित्रांसाठी 'गोविंदराव कोरगावकर धर्मादाय ट्रस्ट' नाईक यांनी स्थापन केला होता. ट्रस्टचे सचिव म्हणून काम करीत असताना नाईकांचे मुंबई, पुणे येथील शिक्षक-प्रशिक्षण कार्याशी संबंध येत होते व त्यातून त्यांनी आपल्या भावी कार्याची रूपरेखा आखली होती. त्यांचे स्नेही प्रा. रामभाऊ परुळेकर हे आधीच मुंबईला गेले होते. त्यांच्यामार्फत अनेक नामवंत शिक्षण तज्ज्ञांचे सहकार्य मिळवून १९४७ मध्ये त्यांनी 'इंडियन इन्स्टिट्यूट'ची स्थापना केली. मुंबईत आल्यावर त्यांच्या जीवनात बदल घडविणाऱ्या दोन व्यक्ती- त्यांच्याशी जवळून परिचय झाला. त्या म्हणजे मुंबई राज्याचे शिक्षण सल्लागार डॉ. सय्यिदेन व त्यांच्या कार्यालयातल्या अधिकारी चित्रा नाईक. या सर्वांच्या सहकार्याने नाईक यांनी दोन वर्षे मुंबईत कार्य केले खरे पण त्यांची ओढ ग्रामीण शिक्षणाकडे अधिक होती. १९४९ मध्ये 'राधाकृष्णन आयोगा'चा ग्रामीण विद्यापीठांविषयी अहवाल प्रसिद्ध झाल्यानंतर संस्थेच्या संशोधन कार्यक्रमात तो प्रयोग समाविष्ट करण्याचे त्यांनी ठरविले आणि त्यासाठी कोल्हापूरच्या भुदरगड तालुक्यातले गारगोटी हे गाव त्यांनी निवडले. या योजनेविषयी विचारमंथन करण्यासाठी महाराष्ट्रातील प्रमुख समाजसेवकांचा आणि विद्वानांचा एक मेळावा १९५२ मध्ये घेण्यात आला आणि २० मे १९५२ रोजी गारगोटी येथे शंकररावजी देव यांचे हस्ते मौनी विद्यापीठाचे औपचारिक उद्घाटन झाले. सुरुवातीस मुंबई व गारगोटी या दोन्ही ठिकाणचे काम नाईक जाऊन येऊन करीत असत. परंतु १९५३ मध्ये ते कोल्हापूरला परतले व गारगोटीकडे लक्ष देऊ लागले.

मौनी विद्यापीठामध्ये ग्रामीण भागाच्या पूर्व प्राथमिकपासून उच्च शिक्षणापर्यंतच्या विविध शैक्षणिक गरजा पूर्ण करणे, स्थानिक समाजाला जागृत करून विकास करणे, औद्योगिक व शेतीला उपयुक्त असे शिक्षण देणे आणि अभियांत्रिकी, सहकार, समाजसेवा, कृषिशास्त्र अशा विषयांचा अभ्यासक्रमात समावेश करून शैक्षणिक विकासाची आदर्श योजना करणे असे नाईक यांचे संकल्प होते. ते त्यांनी जिद्दीने आणि झपाट्याने अमलात आणले. १९५२-५३ मध्येच तेथे शिशुभवन, कुमारभवन, अध्यापक भवन, महिला मंडळ, माझे दुकान, आरोग्य केंद्र, दृकश्राव्य केंद्र आदी वीस विभाग होते. छोट्या वस्त्यातून शाळा कशा चालवाव्यात इथपासून ग्रामीण अभियंता तयार करण्यापर्यंतचे उपक्रम तेथे सुरू करण्यात आले. पाणीपुरवठा, आरोग्य, कुटुंब नियोजन, ग्रामीण महिला साक्षरता वगैरे प्रश्नांकडेही विद्यापीठात लक्ष देण्यात आले. १९५९ मध्ये नाईकांनी गारगोटीला समाज शिक्षणासंबंधी राष्ट्रीय परिसंवाद व १६ वी राष्ट्रीय परिषद घेतली. त्यासाठी ५०० च्या वर नामवंत गारगोटीला आले होते. त्याच वर्षी नाईक यांना युनेस्कोने आशिया खंडातील प्राथमिक शिक्षणाची योजना तयार करण्यासाठी निमंत्रित केले होते.

डॉ. चित्रा नाईक १९५३ मध्ये फुलब्राईट शिष्यवृत्ती मिळवून न्यूयॉर्कच्या कोलंबिया विद्यापीठात रवाना झाल्या होत्या. त्यांचा व नाईक यांचा पत्रव्यवहार चालू असे. जून ५४ मध्ये त्या भारतात परतल्या तेव्हा उत्तर सातारा जिल्ह्याच्या शिक्षणाधिकारी पदावर त्यांची नियुक्ती झाली होती. त्यांना नाईकांनी निरोप दिला की, प्रथम कोल्हापूरला येऊन नंतर साताऱ्याला जा. कारण आचार्य भागवत, बाबुराव जोशी व इतर स्नेह्यांना तुमचे स्वागत करायचे आहे.

न

पुढे याच स्नेही मंडळींच्या आग्रहामुळे चित्रा नाईक यांनी जे. पी. नाईकांशी विवाह करण्याचे मान्य केले आणि मार्च १९५५ मध्ये पन्हाळगडावर लग्न समारंभ पार पडला. पण १९५६ मध्ये नाईकांचे दिल्लीतले काम वाढू लागले. त्याच वर्षी सोविएत रशियाला गेलेल्या भारतीय शिक्षण तज्ज्ञांच्या शिष्ट मंडळात त्यांचा समावेश होता. युनेस्कोने ब्रह्मदेश, मलेशिया वगैरे देशातील शैक्षणिक परिस्थितीचे अहवाल तयार करण्यासाठी त्या देशांना भेटी देण्याचे काम त्यांच्यावर सोपविले. त्यांनी केलेल्या प्राथमिक शिक्षणाच्या सर्वेक्षणामुळे दिल्लीचे लक्ष त्यांचेकडे अधिकच वेधले गेले आणि त्यांना केंद्रीय शिक्षण खात्याने ‘प्राथमिक शिक्षण सल्लागार’ हे पद स्वीकारण्याची विनंती केली व त्याप्रमाणे ते दिल्लीमध्ये दाखल झाले.

युनेस्कोच्या परिषदेसाठी नाईक कराची येथे गेले होते. तेथे संपूर्ण आशिया खंडामध्ये प्राथमिक शिक्षणाच्या सार्वत्रिकीकरणाची योजना त्यांच्या मार्गदर्शनाखाली तयार झाली, ती पुढे ‘कराची प्लॅन’ म्हणून विख्यात झाली. त्यानंतर नाईक यांनी ‘एशियन इन्स्टिटयूट ऑफ एज्युकेशनल प्लॅनिंग अँड ॲडमिनिस्ट्रेशन’ ही संस्था स्थापन करून एक नवा अभ्यासक्रम तयार केला. शिक्षण मंत्रालयातले विविध कक्ष एकत्र करून नॅशनल कौन्सिल फॉर एज्युकेशनल रिसर्च अँड ट्रेनिंग (एन.सी.इ.आर.टी.) ही संस्था स्थापन करण्यात पुढाकार घेतला. भारतीय शिक्षणाच्या आमूलाग्र पुनर्रचनेसाठी त्यांनी शिक्षणमंत्री एम. सी. छगला यांना भारतीय शिक्षण आयोग स्थापन करण्याची सूचना केली. नाईक यांचा भर भारतीय जनतेच्या सर्वसमावेशक विकासावर होता. त्यासाठी शिक्षण हे त्यांनी प्रमुख माध्यम मानले होते. शिक्षणाच्या जोडीला जनतेचे आरोग्य, ग्रामीण भागाचा आर्थिक विकास, सामान्य जनतेचा राजकीय सहभाग अशा विविध मार्गांनी समतेकडे योजनाबद्ध वाटचाल करण्याच्या कार्यात त्यांनी स्वत:ला झोकून दिले होते. देशाच्या शिक्षण क्षेत्रात ते चार दशकांपेक्षा अधिक काळ कार्यरत होते व १९६० पासून पुढे २० वर्षे ते त्या क्षेत्राचे केंद्रस्थान बनून गेले होते. त्या काळातील भारतीय शैक्षणिक संशोधन, शिक्षण क्षेत्रातील नवनवे उपक्रम आणि सुधारणा यांना मिळालेले संस्थात्मक स्वरूप, शैक्षणिक नियोजन आणि धोरण या सर्वांचा आरंभ व प्रगती यांवर त्यांचा संपूर्ण प्रभाव पडला होता. १९६४ मध्ये स्थापन झालेल्या या कोठारी आयोगाचे सचिव नाईकच होते. आयोगाचा अहवाल ७०० पानांचा असून त्या कार्याकडे नाईकांनी एक जागतिक स्तरावरचा महत्त्वाचा संशोधन प्रकल्प म्हणून पाहिले. याखेरीज या काळात नाईक यांनी चौथ्या पंचवार्षिक योजनेतील शिक्षण, शैक्षणिक नियोजनातील शिक्षकांची भूमिका, जिल्हावार शैक्षणिक नियोजन वगैरे विपुल ग्रंथ लेखन केले.

१९७८ मध्ये नाईकांनी दिल्लीचा निरोप घेऊन पुण्यात स्थलांतर केले. त्यांची इंडियन इन्स्टिट्यूट ही संस्था १९७६ पासून पुण्यात कार्यरत होती. तिची सूत्रे त्यांनी हाती घेतली. त्यांची दूरदृष्टी आणि डॉ.चित्रा नाईक यांची कार्यकुशलता यामुळे अल्पावधीत इन्स्टिट्यूटमध्ये नवे चैतन्य निर्माण झाले आणि विविध उपक्रम सुरू झाले. १९७९ पासून इन्स्टिट्यूटच्या वतीने सार्वत्रिक प्राथमिक शिक्षणाचा कृती संशोधन प्रकल्प पुणे जिल्ह्यातील निवडक खेड्यांमध्ये सुरू झाला. या दरम्यानच नाईक यांचे ‘दि एज्युकेशन कमिशन अँड आफ्टर’ हे अत्यंत महत्त्वाचे पुस्तक प्रसिद्ध झाले. १९८० मध्ये ‘सर्वांसाठी आरोग्य’ हे पुस्तक त्यांनी इंग्रजीतून लिहिले. १९७८ मध्ये जनता सरकार अधिकारावर असताना नाईकांनी ‘लोकांसाठी शिक्षण’ हा आराखडा तयार केला होता व तो त्यांना ५ वर्षांत साकार करावयाचा होता. दुर्दैवाने त्यांना अन्ननलिकेच्या कर्करोगाने गाठले व वयाच्या ७४ व्या वर्षी त्यांचे निधन झाले.

१९९३-९४ मध्ये युनेस्कोने ‘थिंकर्स ऑन एज्युकेशन’ या शीर्षकाखाली सुमारे ४०० पृष्ठांचे ४ खंड प्रकाशित केले. त्यामध्ये गेल्या अडीच हजार वर्षांतील संपूर्ण विश्वातील प्रतिभावंत शिक्षणतज्ज्ञांची चरित्रे समाविष्ट आहेत. त्यामध्ये ग्रीक तत्त्ववेत्ता ॲरिस्टॉटलपासून अलिकडच्या काळातील पाउलो, फ्रेईरे, ईव्हान, इलीच आदींचा समावेश आहे. या संकलनात भारतामधील तीन विचारवंतांचा अंतर्भाव झाला आहे. ते म्हणजे महात्मा

न

गांधी, रवींद्रनाथ टागोर आणि जे. पी. नाईक. जे. पी. नाईक यांना १९६६ साली कर्नाटक विद्यापीठाने सन्माननीय डॉक्टरेट प्रदान केली होती. तर निधनोत्तर त्यांना भारत सरकारने पद्मभूषण उपाधी दिली.

– सविता भावे

**संदर्भ :**

**संस्थापक**

**☞ मुख्य नोंद – राजकारण खंड**



डॉ. श्रीधर दत्तात्रय नातू हे माखजन ( संगमेश्वर तालुका) येथे जन्मले. मुंबईत राहून त्यांनी वैद्यकीय शिक्षण घेतले. चिपळूण तालुक्यातील मार्गताम्हाणे या खेड्यात वैद्यकीय व्यवसाय सुरू केला. त्या काळात चिपळूण किंवा गुहागर या दोन ठिकाणीच माध्यमिक शिक्षणाची सोय होती त्यामुळे परिसरातील विद्यार्थ्यांना शिक्षणापासून वंचित राहावे लागत होते. डॉ. श्री.द. तथा तात्यासाहेब नातू यांनी माध्यमिक शाळा सुरू करण्याचा निश्चय केला. रामपूर येथे शाळा सुरू केली. १९६३ मध्ये मार्गताम्हाणे एज्युकेशन सोसायटी, रामपूर एज्युकेशन सोसायटी व पाटपन्हाळे एज्युकेशन सोसायटी स्थापन करून मार्गताम्हाणे, भोम, हेदवी, ओमळी, वहाळ, पाटपन्हाळे, गुणदे, तळवली या ठिकाणी माध्यमिक शाळा सुरू केल्या. खेडेगावातून शिक्षणासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांना निवास व भोजनाची व्यवस्था करण्यासाठी मार्गताम्हाने येथे त्यांनी विद्यार्थी वसतिगृह चालू केले. त्यावेळी शिक्षकांचे पगार दरमहा होत नसत. मात्र डॉ. नातूंच्या शाळेतील शिक्षकांना दरमहा पगार दिला जात असे. त्यासाठी डॉक्टरच पैसे देत असत. विद्यार्थी वसतिगृहासाठीचा खर्चही तेच करीत. माध्यमिक शाळेत शिकून पुढे उच्च शिक्षणासाठी जाणाऱ्या विद्यार्थ्यांना ते सर्वतोपरी मदत करीत.मार्गताम्हाणे येथे लोकांची गुरे राखायला आलेल्या विद्यार्थ्यांना वसतिगृहात ठेवून त्यांना उच्चशिक्षित केले. वसतिगृहातील विद्यार्थी पहाटे अभ्यासाला उठावेत यासाठी ते स्वतः कंदील घेऊन वसतिगृहात येत असत. विद्यार्थ्यांना शेतीकामाची आवड राहावी म्हणून भात लावणीच्या दिवसात विद्यार्थ्यांना घेऊन शेतकऱ्यांच्या शेतात लावणीला जात.

चिपळूण येथील परशुराम एज्युकेशन सोसायटीचे ते अनेक वर्षे कार्याध्यक्ष होते. त्यांच्याच काळात अलोरे, पोफळी येथे माध्यमिक शाळा तर संस्थेची प्रेमजीभाई आसर प्राथमिक शाळा सुरू झाली. चाळीस वर्षांपूर्वी उच्च शिक्षणासाठी रत्नागिरीलाच महाविद्यालय होते. चिपळूण येथे सन १९६५ मध्ये महाविद्यालय सुरू करण्यातही त्यांचा मोलाचा वाटा होता.

शालेय शिक्षणाइतकेच व्यवसाय शिक्षणही महत्त्वाचे आहे हा विचार करून कोकणगांधी पूज्य अप्पासाहेब पटवर्धन यांचे श्रीधर नातुंनी शिष्यत्व पत्करले. मेलेल्या गुरांचे कातडे काढून ते कमवायचे याचे प्रशिक्षण अनेकांना दिले त्यावेळी उच्च समाजाने दिलेल्या बहिष्काराच्या धमकीकडे दुर्लक्ष करून त्यांनी हे कार्य चालू ठेवले. शिक्षणाबाबत अत्यंत आस्था असलेल्या डॉ. तात्यासाहेब नातू यांनी निरपेक्षवृत्तीने दुर्गम भागातील विद्यार्थ्यांची शिक्षणाची सोय केली.

– प्रकाश देशपांडे

**शिक्षक, मुख्याध्यापक**

**१५ जुलै १९३९**

महेंद्र नाटेकर यांचा जन्म रोजी वडाचे पाट ता. मालवण या खेडेगावात झाला. जन्मगावी चौथीपर्यंतच शाळा असल्याने पुढील शिक्षणासाठी त्यांच्या आजोळी 'सातेरी मांड' येथे त्यांनी स्थलांतर केले. त्यांचे मामा लोकांना होडीत बसवून ने-आण करण्याचे काम करीत. महेंद्र त्या कामात मामांना मदत करीत असत. १९४४ मध्ये त्यांच्या



वडिलांचे निधन झाले. अभ्यासाप्रमाणे ते खेळातही आघाडीवर असत. वैयक्तिक व सांघिक स्पर्धेत सर्व बक्षिसे पटकावित असत. सुप्रसिद्ध लेखक ह. मो. मराठे हे त्यांचे वर्गमित्र. नाटेकरांच्या सुसंस्कारांचा व सुंदर वळणदार हस्ताक्षराचा महेंद्रावर अतिशय चांगला परिणाम झाल्याचे ते स्वतः नमूद करतात. पुढे वाणिज्य विभागात प्रवेश घेऊन 'कॉलेज ऑफ कॉमर्स तथा गोखले महाविद्यालय, कोल्हापूर' येथे त्यांनी आपल्या करियरला सुरुवात केली. शिक्षण घेत असतानाच त्यांना सॉर्टरची नोकरी मिळाली. गोखले महाविद्यालयामध्ये असताना तेथील मराठी, हिंदी वाङ्मय मंडळे, क्रीडा, वक्तृत्व, निबंध स्पर्धा आणि महाविद्यालयीन निवडणुका यामध्ये त्यांनी सक्रीय भाग घेत यश संपादन केले.

८ जून १९६४ पासून 'प्रागतिक माध्यमिक विद्यालय', मालवण येथे महेंद्र नाटेकरांनी शिक्षकी जीवनाची सुरुवात केली. मराठी, हिंदी, इंग्रजी व संस्कृत या चारही भाषा ते शिकवित. १९६७ मध्ये संस्थेने प्रतिनियुक्तीवर त्यांना बी.एड. महाविद्यालय सांगली येथे पाठविले. बी.एड. परीक्षा झाल्यानंतर ते पुनश्च शाळेत रुजू झाले. विद्यालयाचा अकरावीचा निकाल २० टक्क्या पर्यंत खाली आला होता. हा निकाल वाढविण्यासाठी, शाळा सुरू होण्यापूर्वी सुट्टीच्या दिवसात अधिक तास घेऊन अध्यापन करण्यास सुरुवात केली. विद्यार्थ्यांकडून पाच-सहा वर्षाच्या प्रश्नपत्रिका सोडवून घेतल्या. भरपूर लिखाण करुन घेतले. त्यामुळे शाळेचा एकूण चांगला निकाल लागला. नाटेकर हे अतिशय शिस्तप्रिय व उत्तम अध्यापक म्हणून पंचक्रोशीत प्रसिद्ध झाले. १९७१ मध्ये त्यांनी एम.ए. केले. त्याचबरोबर बॅडमिंटन व टेबल टेनिस या खेळातही प्रावीण्य मिळविले.

यानंतर त्यांची कणकवली महाविद्यालयामध्ये मराठीचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. तेव्हा सकाळचे महाविद्यालय करून स्वखशीने दुपारी महाविद्यालयामध्ये ९ वी, १० वीला ते हिंदी शिकवित. महाविद्यालयात हिंदी प्राध्यापकाची आवश्यकता होती म्हणून त्यांनी हिंदी विषय घेऊन एम. ए. केले.

त्याचवेळी हिंदी विषय घेऊन पण इंग्रजी विषय सोडून एस.एस.सी. झालेल्या १०० प्राथमिक शिक्षकांना इंग्रजी शिकविण्याचा त्यांनी निश्चय केला. या सर्व शिक्षकांना प्रारंभ पासून तयारी घेत एका वर्षात एस.एस. सी. उत्तीर्ण केले. त्यासाठी त्यांनी रात्री सात ते नऊ या वेळात त्यांचा अभ्यास घेतला. म्हणजेच सकाळी महाविद्यालय, दुपारी शाळा व रात्री इंग्रजी शिकवणी असे कार्य चालू होते. हे रात्रीचे वर्ग एकही पैसा न घेता नाटेकरांनी शिकविले.

कणकवली महाविद्यालयाचे प्राचार्यपद सोडल्यानंतर त्यांना न्यू इंग्लिश स्कूल, कळसुली येथे मुख्याध्यापक म्हणून नोकरी मिळाली. हे गाव कणकवलीपासून दहा कि.मी. वर आहे. येथील शाळेची अवस्था चांगली नव्हती. येथील प्रशालेचा कारभार शिस्तबद्ध व्हावा, शैक्षणिक दर्जा सुधारावा, बोर्डाचा निकाल जास्तीत जास्त लागावा, विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास व्हावा, त्याचबरोबर शिक्षकही चांगले चारित्र्यसंपन्न व्हावे व शाळेबरोबरच परिसराचाही विकास व्हावा यासाठी त्यांनी आवश्यक ते कठोर निर्णय घेतले. शिक्षक, लेखनिक, शिपाई यांच्यासाठी आचारसंहिता तयार करुन त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी सुरू केली. कळसुलीचा निकाल जो जेमतेम ४०-५० टक्के लागत असे तो १००टक्के लागला.

यानंतर १९७४ पासून ते जांभवडच्याच्या शाळेत मुख्याध्यापक म्हणून रुजू झाले. या शाळेची अवस्था तर फारच बिकट होती. परंतु त्यांनी आत्मविश्वासाने चित्र बदलायला सुरुवात केली. सद्हेतूने कार्य करताना काही मंडळी पुढे येऊन मदतही करीत असत. स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेतलेले जांभवड्याचेच पां. वि. ऊर्फ अप्पा मडव हे त्यापैकीच एक. त्यांच्या प्रयत्नाने उच्च माध्यमिकतेची परवानगी मिळून ११ वी व १२ वी चे वर्ग सुरू झाले. त्यांनी शैक्षणिक बरोबरच सांस्कृतिक उपक्रमांचेही आयोजन केले. त्यांच्या प्रयत्नांना यश येऊन शाळेची

परिस्थिती सुधारली. जांभवडे पंचक्रोशीपर्यंत थेट अशी बारमाही वाहतूक सुरू व्हावी म्हणून त्यांनी खूप प्रयत्न केले. प्रसंगी कणकवली पंचायतीसमोर उपोषणही केले.

कालांतराने जांभवडे येथील शाळेचा एस. एस.सीचा निकाल जिल्ह्यात सर्वाधिक लागू लागला. उच्च शैक्षणिक दर्जा व उत्तम शिस्त म्हणून कुडाळ, कणकवली तालुक्यातून जांभवडे येथील महाविद्यालयामध्ये प्रवेश घेण्यासाठी पालकांची रीघ लागू लागली आणि शेवटी 'ॲडमिशन संपली' म्हणून बोर्ड लिहावे लागले !

१९९२ मध्ये त्यांना आदर्श शिक्षक पुरस्कार मिळाला. जांभवडे विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालयाचा निकाल उत्तम लागतो, हे आता सर्व जिल्ह्याला माहीत झाले होते. त्यामुळे अनेक शाळांचे मुख्याध्यापक आपल्या सहकाऱ्यांना घेऊन त्यांच्या प्रशालेला भेट देत असत. त्यांची प्रशाला मार्गदर्शन केंद्र बनली होती.

अनेकजण त्यांच्याकडून शाळा निकालाचे तंत्र व मंत्र शिकून घेत. सर्वोत्कृष्ट निकाल हे नेहमी विद्यार्थी, पालक, शिक्षक आणि मुख्याध्यापक यांनी घेतलेल्या नियोजनबद्ध कष्टाचे फलित असते. यासाठी अर्थातच उत्तम शिस्त, उत्कृष्ट व्यवस्थापन याची जोड असावी लागते. त्यांच्या जांभवडे येथील प्रशालेच्या बाबतीत नेमके हेच घडले आणि 'राज्यातील उत्तम व्यवस्थापन असलेली शाळा' असे प्रशस्तीपत्रक व रु.१०,०००/- रोख पारितोषिक देऊन शासनाने प्रशालेचा गौरव केला. त्याचवेळी बस्त्याव परेरा यांनी नाटेकर यांना शाळेसाठी एक एकर जमीन दान केली.

याच सुमारास त्यांचे शैक्षणिक लिखाण दै. रत्नागिरी टाईम्स, दै. सागर, दै. रत्नभूमी, महाराष्ट्र एज्युकेशनल जर्नल या स्थानिक वृत्तपत्रात चालू होते. त्या बरोबरच त्यांचे अध्यात्मिक वाचन चालू होते. जांभवडे, कवणकवली परिसरात 'ज्ञानेश्वरी'वर प्रवचन करण्याचा परिपाठही त्यांनी चालू ठेवला होता.

याच सुमारास त्यांची कोकण विकास महामंडळावर संचालक, निराधार व स्वयंरोजगार समितीवर सदस्य व जिल्हा दक्षता समितीवर सदस्य म्हणून नेमणूक करण्यात आली. तसेच विशेष कार्यकारी दंडाधिकारी म्हणूनही नेमणूक झाली. त्याचवेळी १९९२ मध्ये, त्यांनी जांभवडे जिल्हा परिषद मतदार संघातून निवडणूक लढवून, त्यात ते यशस्वी झाले. त्यांची जिल्हा परिषदेतील 'विरोधी पक्षनेता' म्हणून कारकिर्द गाजली.

१९९२ मध्ये त्यांचे 'ज्वलंत ग्रामीण शिक्षण' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. तसेच विविध मासिक व वृत्तपत्रातून त्यांचे लेख प्रसिद्ध होत होते. त्यातील निवडक लेखांचे 'शिक्षण विचार धारा' पुस्तकही प्रसिद्ध झाले. त्यांनी आपल्या कारकिर्दीत अनेक लक्षणीय उपक्रम सुरू केले. शाळा सुरू होण्यापूर्वी, शिक्षक वर्गात येण्यापूर्वी, एखादा शिक्षक गैरहजर असल्यास त्यावेळी सर्व विद्यार्थ्यांनी पाढे, श्लोक, पाठ्यपुस्तकातील कविता म्हणायच्या.

इंग्रजीच्या तासाला सर्वांनी (शिक्षकांसहीत) इंग्रजीतच बोलायचा प्रयत्न करणे. मालवणीबरोबरच शुद्ध मराठीत बोलण्यावरही त्यांचा कटाक्ष असे. मराठीचे उत्तम संस्कारमय उतारे पाठ करून घेतले जात असत. त्यांच्या स्पर्धा घेतल्या जात. इंग्रजी गद्य परिच्छेदाचे पाठांतर करून घेतले जाई. शाळा सुटल्यावर प्रथम राष्ट्रगीत, त्यानंतर पसायदान व त्यानंतर संस्कारक्षम गीते म्हटली जात. विद्यार्थ्यांबरोबर पालकांचाही या सर्व उपक्रमांना उदंड प्रतिसाद मिळत असे.

'काजू लावा, बांबू लावा, हापूस आंब्याची कलमे लावा. कोकणातून सोन्याचा धूर निघेल,' अशा घोषणा देत विद्यार्थ्यांची पंचक्रोशीत प्रभात फेरी काढून जनजागृतीचे काम त्यांनी केले. प्रत्येक विद्यार्थ्याला किमान पाच काजूची व पाच बांबूची, हापूस आंब्याची रोपे लावण्याची सक्ती केली होती. स्नेह संमेलनात अशा विद्यार्थ्यांचा सत्कार केला जाई.

प्रशालेतर्फे सुमारे पाच लाख रोपांचे रोपण करून संवर्धन केले. पर्यावरण संतुलन व स्वतःच्या पायावर उभे राहण्याचे धडे विद्यार्थ्यांना शालेय जीवनातच दिले आणि आजही घरोघरी विद्यार्थ्यांना - पालकांना या उत्पन्नातून हजारो रुपये मिळत आहेत.

– प्रा. रमेश खटावकर

न

***नाबर गुरुजी, शिक्षक***

**२८ मे १८९७ ६ जानेवारी १९९२**

सावंतवाडी संस्थानचे कुलकर्णी असलेल्या व्यंकाजी व उमा यांच्या तीन पुत्रांपैकी सीताराम हे एक होत. सीतारामचे वय ५-६ वर्षे असतानाच काळाने त्यांचे मातृछत्र हिरावून नेले. प्राथमिकपासून मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण सावंतवाडीलाच झाले. सीतारामपंतास शिक्षणाची मनस्वी आवड होती. परंतु व्यंकाजींची आर्थिक परिस्थिती अत्यंत हलाखीची असल्याने सीतारामपंत मुंबईत दादर येथे शंकरराव राजाध्यक्ष या नातेवाईकांच्या घरी आले. 'कमवा व शिका' असा निर्धार करुन गुरुजी आपली वाटचाल यशस्वीरित्या पार करीत होते. किंग जॉर्ज इंग्लिश विद्यालयात २ वर्षे सहाय्यक शिक्षक म्हणून त्यांनी काम केले. १९२१ मध्ये सेंट झेवियर्स महाविद्यालयामधून ते बी.ए. झाले.

त्या काळी पदवीधराला चांगल्या पगाराची व मानाची नोकरी मिळणे सहज शक्य होते; परंतु गुरुजींच्या मनाला या गोष्टींची भुरळ पडली नाही. गुरुजी किंग जॉर्ज इंग्लिश विद्यालयामध्येच शिक्षक म्हणून प्रविष्ट झाले. १९१७ मध्ये इंग्लिश एज्युकेशन सोसायटीची स्थापना होऊन पुढच्याच वर्षी गर्ल्स हायस्कूलची सुरुवात झाली.

१९२१ मध्ये गुरुजी व त्यांचे सहकारी - मित्र बी.एन.वैद्य हे दोघे सोसायटीचे आजीव सदस्य बनले. हे दोघे रोज सकाळी व सुट्टीच्या दिवशी संस्थेसाठी निधी जमा करण्यासाठी कल्याणपासून विरारपर्यंत भटकत असत. या कार्यात सहकारी शिक्षक, पालक, विद्यार्थी व संस्थेच्या चालक,शिक्षण विभागाचे अधिकारी व दानशूर महानुभावांचा सहभाग होताच. १९२४ ते १९३० या काळात नाबर गुरुजी मुलींच्या शाळेचे मुख्याध्यापक म्हणून नियुक्त झाले. १९३३ मध्ये बी.एन. वैद्य संस्थेचे सचिव झाल्याने प्रशासनाचा मुख्य भार त्यांच्यावर पडला. १९३३ मध्येच नाबर व वैद्य असे दोघे किंग जॉर्ज इंग्लिश शाळेचे संयुक्त मुख्याध्यापक झाले. नाबर गुरुजींवर शाळा चालवण्याची मुख्य जबाबदारी आली. या इंग्लिश शाळेसाठी हिंदू कॉलनीत इमारत बांधली गेली.(१९२७) शाळा लवकरच नावारूपाला आली. शिक्षकांची गुणवत्ता सुधारू लागली. नाबर अत्यंत कल्पक व उपक्रमशील होते. विद्यार्थी हेच त्यांचे दैवत होते. शिक्षण लोकप्रिय होऊन जनतेचा सहभाग वृद्धिंगत व्हावा म्हणून नाबर यांनी शिक्षण - सप्ताह, प्रदर्शने, भूगोल, संस्कृत - दिन आणि प्रात्यक्षिके आयोजित केली. भूगोल, संस्कृत व इंग्रजी हे त्यांचे विशेष आवडीचे विषय होते.विद्यार्थ्यांचे अक्षर सुंदर, सुवाच्य असावे असा त्यांचा कटाक्ष होता. शिक्षकाच्या मनात विद्यार्थ्यांबद्दल प्रेम, नित्य अध्ययनशील असणे, माणुसकी जपणे हे महत्त्वाचे गुण असावेत असे त्यांचे म्हणणे असे.

शिक्षण निरीक्षक वि.द.घाटे यांच्या विनंतीवरून नाबर व वैद्य गुरुजी बॉम्बे जिऑग्राफिकल असोसिएशनचे सचिव झाले. १९३५ मध्ये सुरू झालेल्या या संस्थेचे अध्यक्ष घाटे हेच होते. घाटे व नाबर गुरुजी दोघांनाही भूगोल विषयात फार रस होता. किंग जॉर्ज इंग्लिश शाळेचा अवांतर उपक्रम म्हणून त्यांनी असोसिएशनच्या विद्यमाने व शिक्षकांच्या मदतीने भूगोलाचे प्रदर्शन आयोजित केले. उन्हाळ्याच्या सुटीत गुरूजींनी भूगोल शिक्षकांसाठी १० दिवसांचा विशेष अभ्यासक्रम आयोजित करून प्रो. धोंगडे, डॉ. कलोपेशी, प्रो. परदासानी यासारख्या विद्वान व तज्ज्ञ व्यक्तींची व्याख्याने ठेवली. भूगोलावरील व्याख्याने व विषयाची अध्यापन पद्धत यांचे पुस्तक तयार करून गुरुजींनी त्याचे नाव भूगोल शिक्षकांसाठी उन्हाळी शाळा असे ठेवले. शिक्षण संचालकांनी या उपक्रमाचे कौतुक केलेच व पुस्तक प्रकाशनासाठी अनुदान दिले.

१९५० पर्यंत किंग जॉर्ज इंग्लिश शाळेमध्ये मुख्याध्यापक पदावर काम केल्यानंतर नाबर यांना दादर (पश्चिम) च्या पिंटो व्हिलातील बॉईज हायस्कूलमध्ये मुख्याध्यापक म्हणून नियुक्त करण्यात आले. या शाळेत ते

न

१२ वर्षे कार्यरत होते. त्यांनी मुलांना व्यावहारिक शिक्षण देण्यासाठी काही अभिनव उपक्रम हाती घेतले. मुलांची संसद (पार्लमेंट) हे विशेष उल्लेखनीय. मुलांना जबाबदारी व कर्तव्याची जाण यावी म्हणून त्यांची संसद, राष्ट्रपती, पंतप्रधान आणि मंत्रिमंडळ बनवून त्यांच्याकडून विद्यार्थी – दिनाचे आयोजन केले.याचा उपयोग विद्यार्थ्यांत शिस्त राखण्यासाठी होत असे, त्यांचा शाळेच्या कार्यात वाढता सहभाग राही व आपुलकी निर्माण होई. आजचा सुविचार लिहिण्यास गुरुजींनी त्यांना प्रवृत्त केले.विद्यार्थ्यांची गुणवत्ता वाढीस लागली व त्याचा परिणाम दहावीच्या निकालात दिसू लागला. १९५९ मध्ये शाळेचे तीन विद्यार्थी राज्यात पहिल्या १० क्रमांकात आले. त्यांना शिष्यवृत्ती व पारितोषिके मिळाली.

नाबर यांनी शिक्षकांच्या मदतीने स्थायी निधी उभारून ५ वी पासून प्रत्येक वर्गात प्रत्येक विषयात प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांस रोख बक्षिसे व सुवर्णपदके देण्याची योजना आखून ती कार्यान्वित केली. सर्वोत्तम खेळाडूंचा देखील त्यात समावेश होता. शाळांच्या अभिवृद्धीसाठी त्यांनी दुर्दम्य आशावादाने, कमालीच्या कळकळीने सहकाऱ्यांना सोबत घेऊन, अनंत परिश्रम घेतले. १६ एप्रिल १९६२ रोजी पिंटोव्हिला बॉईज हायस्कूलने त्यांचा सन्मान करून त्यांना कृतज्ञतापूर्वक मानपत्र अर्पण केले. ४२ वर्षांच्या अखंड सेवेनंतर जून १९६२ पासून ते निवृत्त झाले. गुरुवर्य नाबर सत्कार समितीने त्या प्रित्यर्थ निधी जमा केला. नाबर यांच्या संस्मरणीय सेवेविषयी कृतज्ञता म्हणून इंग्लिश एज्युकेशन सोसायटीने ५ सप्टेंबर १९८८ रोजी आयोजित समारंभात बाबा आमटे यांच्या उपस्थितीत बॉईज हायस्कूल (पिंटोव्हिला) चे नामांतर नाबर गुरुजी विद्यालय केले.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*मुरकुटे, जगन्नाथ शंकरशेठ*

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

**प्रशासक, संघटक**

**१८५३ – १३ जानेवारी १८९६**

महादेव बल्लाळ नामजोशी ह्यांचा जन्म कोकणातील महाड गावाजवळील बिरवाडी येथे झाला. त्यांचे बालपण अत्यंत हलाखीच्या परिस्थितीत गेले. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पुण्यात 'बाबा गोखले' यांच्या शाळेत व पुणे कँपमधील 'मिशन हायस्कूल' मध्ये झाले. १८७३ मध्ये ते मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाले. विशेष म्हणजे लॅटिन हा त्यांचा दुसरा भाषा विषय होता. महाविद्यालयीन शिक्षणाच्या फंदात न पडता नामजोशींनी सरळ सामाजिक कार्यच सुरू केले.

१ जानेवारी १८८० रोजी पुण्यात 'न्यू इंग्लिश स्कूल' ची स्थापना झाली व महाराष्ट्राच्या राष्ट्रीय जीवनाच्या नव्या पर्वाला सुरुवात झाली. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे त्याचे प्रवर्तक होते व त्यांच्या साथीला डेक्कन महाविद्यालयामधून शिक्षण घेऊन बाहेर पडलेले बाळ गंगाधर टिळक, गोपाळ गणेश आगरकर आणि पदवीपूर्व अभ्यासक महादेव बल्लाळ नामजोशी होते. 'मोरोबादादा वाड्यात' शाळेचे उद्‌घाटन झाले. दुसऱ्या दिवसापासून शिकविणे सुरू झाले. नामजोशी पदवीधर नव्हते पण व्यवस्थापन व संघटन यात ते तरबेज होते. नगरपालिका, औद्योगिक क्षेत्र, पत्रकारिता यांत त्यांना विशेष रस होता. ह्या सर्वांचा शाळेच्या प्रगतीला फार उपयोग झाला. नामजोशींच्या आग्रहामुळे शालेय अभ्यासक्रमात शास्त्रीय व तांत्रिक विषयांचा समावेश झाला. त्यांच्या प्रयत्नांमुळे १८८६ मध्ये शाळेत व्ही. एम. ओक यांचे विशेष चित्रकला वर्ग सुरू झाले. पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, यंत्रशास्त्र ह्यांचे प्रात्यक्षिक वर्गही सुरू झाले.

नामजोशींचा लोकसंग्रह प्रचंड होता.स्वभावात धडाडी होती. या गुणांच्या जोरावर त्यांनी दक्षिण मराठी संस्थानांकडून पन्नास हजार रुपयांच्या देणग्या मिळविल्या. त्यामुळे १८८५ मध्ये फर्गसन महाविद्यालय सुरू करणे शक्य झाले. त्यावेळचे मुंबई इलाख्याचे गव्हर्नर सर जेम्स फर्गसन ह्यांचा शैक्षणिक उदारमतवाद भावल्यामुळे

न

संकल्पित महाविद्यालयाला फर्ग्युसन यांचे नाव देण्याचा आग्रह नामजोशींचा होता. चतु:शृंगीच्या माळावर शिरोळे यांची जागा महाविद्यालयासाठी मिळविण्यात टिळकांबरोबर नामजोशी होते. पुणे नगरपालिकेच्या कार्यात नामजोशींना विशेष रस होता. १८८५ नंतर पुण्याच्या व्यापारी प्रतिनिधींच्या वतीने त्यांची निवड झाली होती. पुण्यात ‘कॉटन सिल्क मिल’ व ‘पूना मेटल फॅक्टरीच्या’ स्थापनेच्या प्राथमिक चर्चेत त्यांनी महत्त्वाचा भाग घेतला होता. महाराष्ट्राच्या औद्योगिक प्रगतीच्या आद्य शिल्पकारांपैकी आघाडीचे शिलेदार म्हणून महादेव बल्लाळ नामजोशी ओळखले जातात.

भारताच्या औद्योगिक प्रगतीत नामजोशींना विशेष रस होता. त्यासाठी त्यांनी ‘इंडस्ट्रियल रिव्ह्यू’ व ‘शिल्पकला विज्ञान’ ही पत्रे सुरू केली. पुण्यातील ‘रे म्युझियम’, ‘इंडस्ट्रियल कॉन्फरन्स’, १८८८ मध्ये झालेल्या ‘पूना इंडस्ट्रीयल एक्झिबिशन’ यांची कल्पना नामजोशींचीच होती. न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना झाली त्यावेळी नामजोशी ‘किरण’ व ‘डेक्कन स्टार’ स्वत:च्या जबाबदारीवर चालवत होते. नामजोशींचा छापखाना साठे यांच्याकडे गहाण पडला होता. त्यांचे कर्ज हप्त्यांनी फेडून सामान मोरोबादादांच्या वाड्यात आणावयाचे असे ठरले. छापखान्यास पहिले काम निबंधमालेचे मिळाले. निबंधमालेच्या सहासष्टाव्या अंकात केसरीचे उद्देश पत्रक प्रसिद्ध झाले. त्यात केसरीचा कृतसंकल्प प्रसिद्ध झाला. त्यावर विष्णू कृष्ण चिपळूणकर,बाळ गंगाधर टिळक, वामन शिवराम आपटे, गणेश कृष्ण गर्दे, गोपाळ गणेश आगरकर व महादेव बल्लाळ नामजोशी ह्यांच्या सह्या होत्या. त्यामुळे नामजोशी केसरीचेही संस्थापक मानले जातात.

१८८६ मध्ये महाबळेश्वर येथे मुंबई सरकारने डेक्कन महाविद्यालय व फर्ग्युसन महाविद्यालय ह्यांच्या विलिनीकरणाच्या चर्चेच्या वेळी, डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या वतीने लॉर्ड डफरीन यांच्याबरोबर चर्चा करण्यासाठी नामजोशींना कलकत्त्यास पाठवायचे ठरविण्यात आले होते. उत्तम प्रशासक, कुशल संघटक, राजनैतिक कौशल्य असलेला नेता व दूरदृष्टी लाभलेले शिक्षणतज्ज्ञ म्हणून महाराष्ट्राच्या सर्वांगीण विकासाला त्यांनी दिलेले योगदान मोठे आहे.

– डॉ. वि. मा. बाचल

**शिक्षक, मुख्याध्यापक**
**जन्ममृत्यू दिनांक अनुउपलब्ध**



१९४० मध्ये डॉ. माँटेसोरी भारतात येऊन राहिल्या होत्या. त्यांनी चेन्नई जवळील अड्यार येथे घेतलेल्या प्रशिक्षण वर्गात शेष नामले यांनी तीन महिन्यांचे प्रशिक्षण घेतले. त्यापूर्वी विलेपार्ले, मुंबई येथे ते स्वतंत्र बालमंदिर संस्था चालवित होते. तेथेच बालशिक्षणाची साधने निर्माण करण्याचे काम त्यांनी आपल्या काही मित्रांच्या सहाय्याने सुरू केले होते. नामले यानी भावनगरला दक्षिणामूर्ती संस्थेत राहून गिजुभाईंकडून बालशिक्षणाचे तंत्र प्राप्त केले होते. दादर भगिनी समाजाच्या वतीने ताराबाई मोडक यांनी दादरच्या हिंदू कॉलनीत १ जुलै १९३६ रोजी शिशुविहारची स्थापना केली. १ जुलै १९३८ पासून तेथे रीतसर अध्यापन मंदिराची सुरवात झाली. पुढच्याच वर्षी नामले शिशुविहारमध्ये शिक्षक म्हणून रुजू झाले. अध्यापनाचे काही कार्य करून ते लिपीकाचे कामही करीत असत म्हणून त्यांना अधीक्षकाचा हुद्दा मिळाला होता. काही महिन्यानंतर दुसरी चांगल्या पगाराची नोकरी मिळाली म्हणून त्यांनी संस्था सोडली. १९४७ मध्ये ते पुन्हा शिशुविहारमध्ये आले व काही वर्षांनी मुख्याध्यापक झाले. १९६५ मध्ये सेवानिवृत्त झाल्यावर नामले यांनी तेथेच अध्यापन १९७५ पर्यंत अध्यापन केले. त्याचवेळी नूतन बालशिक्षण संघाची मुख्य चिटणीसपदाची जबाबदारी त्यांनी १९५३ ते १९७३ पर्यंत समर्थपणे पार पाडली. संघाचा विस्तार अनेक अंगांनी त्यांनी केला. संघांच्या कार्याची व्याप्ती फार मोठी होती. नामले यांनी ताराबाईंच्या शिक्षणपत्रिकेच्या संपादनाचे

न

कामही सुमारे २० वर्षे केले. या पत्रिकेचा दर्जा प्राप्त करून देण्यात व तिची उपयुक्तता टिकविण्यात त्यांचा मोलाचा वाटा होता. शिक्षण पत्रिकेत नामले यांनी सातत्याने लेखन केले. बालकेंद्री शिक्षण, बालशिक्षणाचा भारतीय इतिहास, बालशाळांतील साधने, बालशिक्षण क्षेत्रातील विचारवंत अशा विषयांवर त्यांचे लेख प्रसिद्ध झाले. राज्य पाठ्य पुस्तक समितीचे ते सदस्य होते. नामले प्रयोगशील व उत्साही शिक्षक होते.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

.

**मुख्याध्यापक**
**२८ ऑक्टोबर १८९२ – १० ऑक्टोबर १९६६**



नारायण गणेश नारळकर यांचे माध्यमिक शिक्षण मुंबईत झाले. जुनागडच्या बहाउद्दिन महाविद्यालयामधून तत्त्वज्ञान विषय घेऊन ते बी.ए. झाले व त्याच महाविद्यालयामध्ये फेलो म्हणून काम करू लागले. तेथील प्रा. महादेव मल्हार जोशी यांचा नारळकरांच्या विचारांवर व जीवनावर मोठा परिणाम झाला आणि शिक्षकच व्हायचे असे त्यांनी ठरविले व खामगावच्या शाळेत ते शिक्षकाची नोकरी करू लागले. याच शाळेतून नारळकरांना ऊर्फ नानांना प्रशिक्षणासाठी जबलपूरला पाठविले. मार्च १९१८ मध्ये त्यांनी अलाहाबाद विद्यापीठाची एल. टी. पदवी मिळविली. त्यांची नेमणूक अकोला हायस्कूलमध्ये झाली. पूर्वीच ते एम. ए. झाले होते. त्यांना सरकारी नोकरी नको होती. प्रा. द. रा. घारपुरे यांनी सुचविले म्हणून नाना पुण्यात ‘शिक्षण प्रसारक मंडळी’त सामील झाले. न्यू पूना कॉलेज (आजचे एस.पी. महाविद्यालय) १९१६ मध्ये सुरू झालेले होते. महाविद्यालयाबरोबरच नानांना नूतन मराठी विद्यालयातही शिकविण्याचे काम दिले. नाना उत्तम शिक्षक होते. मुलांविषयी त्यांना प्रेम होते. अल्पावधीत त्यांची ख्याती पसरली. दुसऱ्या महाविद्यालयाचे विद्यार्थीही त्यांच्या तासाला गर्दी करीत. इंग्रजीप्रमाणेच तर्कशास्त्र हा त्यांचा हातखंडा विषय होता. त्यांच्या मार्गदर्शनातून विद्यार्थ्यांना स्वयम् अध्ययनासाठी दिशा मिळत असे. ग्रंथालय, तत्त्वज्ञान मंडळ, यु. टी. सी. महाविद्यालयाचे नियतकालिक यातही त्यांना विशेष रस होता.

१९३६ मध्ये संस्थेची गरज म्हणून एस.पी. महाविद्यालयामधून मुख्याध्यापक म्हणून नूतन मराठी विद्यालयात त्यांना जावे लागले. तेथे गेल्या गेल्या त्यांचे कार्य वेगाने सुरू झाले. उत्तम सहकारी शिक्षक त्यांनी तयार केले. शिक्षणाबरोबरच सहली, संमेलने, बलोपासना, विद्यार्थी भांडार, विक्रय कला, सामान्यज्ञान असे विविध उपक्रम नानांनी सुरू केले. मुलांसाठी विकासाची नवनवीन दालने त्यांनी खुली केली. शाळेतील स्वदेशी भांडार, टीचर्स ट्रेनिंग इन्स्टिट्यूट, कॉमर्स इन्स्टिट्यूट, शिक्षक संघटना अशा अनेक क्षेत्रांना त्यांनी योगदान दिले. त्यामुळे नूतन मराठी विद्यालयातील मुख्याध्यापक म्हणून त्यांची कारकीर्द यशस्वी ठरली.

१९४१ मध्ये संस्थेने नानांना मुंबईतील ‘पोद्दार कॉलेज ऑफ कॉमर्स’चे प्राचार्यपद दिले. त्यांची तेथील एक वर्षाची कारकीर्दही अविस्मरणीय ठरली. त्यापुढे काम करणे विद्यापीठाच्या नियमांत बसणारे नव्हते. नानांची शिक्षक म्हणून नोकरी येथेच संपली.

विमा व्यवसायाची आवड असल्याने १९४३ मध्ये ‘वेस्टर्न इंडिया विमा कंपनी’च्या मुंबई शाखेचे प्रमुख म्हणून त्यांनी जबाबदारी स्वीकारली. त्यांची विमा कंपनीतील कारकीर्दही यशस्वी ठरली. मुंबई शाखा त्यांच्या कारकिर्दीत पहिल्या क्रमांकावर गेली. आदर्श विमा विक्रीचे पाठ त्यांनी दिले. नवी माणसे तयार केली, जुन्यांना नवी दृष्टी दिली. अनेक नवे उपक्रम राबविले. १९५६ मध्ये आयुर्विमा

व्यवसायाचे राष्ट्रीयीकरण झाले. वयामुळे त्यांनी पुढे निवृत्ती घेतली.

– डॉ. सविता भावे

**संस्थापक**

**१६ जाने. १९३५ – २४ जाने. २००८**



शिक्षणाची आस आणि शिक्षणाबाबत प्रचंड आस्था असणाऱ्या शावजी निकम यांच्या पोटी फुरूस या कोकणातल्या छोट्याशा खेडेगावात गोविंदरावांचा जन्म झाला. वडीलांच्या प्रयत्नाने व पुढाकाराने स्थापन झालेल्या फुरूसच्या पूर्व प्राथमिक शाळेत ते शिकले व पुढे शिक्षक झाले. रत्नागिरी जिल्ह्यात व जिल्ह्याबाहेर तब्बल ३३ माध्यमिक शाळा, ३ उच्च माध्यमिक, तसेच १५ तंत्रशिक्षण व व्यावसायिक शिक्षण देणाऱ्या महाविद्यालयांची साखळी उभारणारे गोविंदराव निकम हे कोकणातले 'शिक्षण महर्षी' म्हणून ओळखले जातात.

शिक्षकाची नोकरी सोडून पूर्ण वेळ शिक्षणसंस्था उभारणीत व्यतीत करायचे ठरवून गोविंदरावांनी 'सह्याद्री शिक्षण संस्था' स्थापन केली. १ जून १९५७ रोजी सह्याद्रीचे पहिले माध्यमिक विद्यालय सावर्डे येथे सुरू झाले. त्यानंतर झपाट्याने त्यानी 'सह्याद्रीची' माध्यमिक विद्यालये कोकणात जागोजागी सुरू करून ग्रामीण भागात शिक्षणाची सोय केली.

त्याचबरोबर नोकरी धंद्यासाठी आवश्यक असणाऱ्या व्यावसायिक शिक्षणाची सोय करून त्यांनी तरुणांना रोजगार मिळवण्याचा मार्ग दाखवला. 'सह्याद्री तंत्रनिकेतन', 'कॉलेज ऑफ फार्मसी', 'सह्याद्री स्कूल ऑफ आर्ट', 'बी.एड, तसेच डी. एड कॉलेज', 'कृषी तंत्र विद्यालय', 'हॉटेल मॅनेजमेंट अँड टुरिझम कॉलेज' अशा विविध महाविद्यालयातून आज हजारो तरुण प्रशिक्षण घेऊन नोकरीधंद्याकडे वळत आहेत. विद्यार्थ्यांसाठी अकरा वसतिगृहेही त्यांनी स्थापन केली.

रत्नागिरी जिल्ह्यातील व जिल्ह्याबाहेरील शेकडो तरुण-तरुणी आज सह्याद्री शिक्षण संस्थेत शिक्षक म्हणून सेवा बजावीत आहेत.

रत्नागिरी जिल्हा परिषदेत शिक्षण व वित्त समितीचे सभापती म्हणून १९७२ ते १९७८ या काळात त्यांनी उल्लेखनीय कामगिरी करताना जिल्ह्यातील हजारो एस्.एस्.सी. पास तरुणांना पत्रद्वारा डी.एड्. चे शिक्षण देऊन शिक्षण सेवेत सेवारत केले.

असामान्य व्यक्तिमत्त्व लाभलेल्या गोविंदरावांनी राजकीय क्षेत्रातही भरीव कामगिरी केली आहे. नवव्या लोकसभेचे संसद सदस्य म्हणून २ वर्षे व दहाव्या लोकसभेचे संसद सदस्य म्हणून ५ वर्षे त्यांनी रत्नागिरी लोकसभा मतदारसंघाचे नेतृत्व केले.

रत्नागिरी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेचे अध्यक्ष व पुढे महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचेही ते अध्यक्ष झाले.

'सह्याद्री शिक्षण संस्थे'च्या सुवर्ण महोत्सवी समारंभाच्या दिवशी अनेक मंत्री व पाहुणे सावर्डे येथे आलेले असताना अकल्पितपणे हृदयविकाराचा तीव्र झटका येऊन त्यांचे निधन झाले. सावर्डे येथे कापशी नदीकाठी त्यांचे स्मारक उभारण्यात आले आहे.

– सुहास द. बारटक्के

☞ **मुख्य नोंद – प्रशासन व न्यायपालिका खंड**

* * *

न




## पंडित, शंकर पांडुरंग

**संस्थापक**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १८ मार्च १८९४**



सन १८८४ मध्ये पुण्यात हुजूरपागा शाळेची स्थापना झाली. त्या आधी एतद्देशीय मुलींसाठी फारशा शाळा नव्हत्या. काही परदेशी आणि परधर्मीय ख्रिश्चन मिशनऱ्यांनी एतद्देशीय मुलींसाठी कलकत्ता, मुंबई या शहरांमधून शाळा सुरू केल्या होत्या. पण या शाळांमधून मुली पाठवण्यास पालक कचरत असत. बरेचदा त्यामध्ये धर्मांतराची भीती असे. त्यामुळे मग मुलींचे शिक्षण चार इयत्तांपर्यंतच कसेबसे पोचत असे. याच काळात काही समाजसुधारकांनी मात्र स्त्री शिक्षणाचा विषय उचलून धरला होता. किंबहुना, त्यांना स्त्री शिक्षणाचे महत्त्व कळले होते असेच म्हणायला हवे. या समाजसुधारकांमध्ये न्या. म. गो. रानडे, वा. आ. मोडक, डॉ. सर रा. गो. भांडारकर, तसेच रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांचा समावेश होता. यांनीच स्त्री शिक्षणासंबंधी प्रयत्न सुरू केले. या प्रयत्नांनाच पुढे गोपाळ गणेश आगरकरांनीही पूर्ण पाठिंबा दिला.

हुजूरपागा शाळेची स्थापना करताना शंकर पांडुरंग पंडितांची भूमिका महत्त्वाची ठरली. स्त्री शिक्षणाची आवश्यकता त्यांनी आपल्या बोलण्यातून, भाषणातून कायमच उत्तमप्रकारे विशद केली. स्त्री-पुरुषांतील बौद्धिक अंतर समाजाच्या, प्रगतीच्या व देशोन्नतीच्या मार्गातील एक संकट आहे. हे टाळण्यास सर्व धर्माच्या व जातींच्या मुलींच्या उच्च शिक्षणासाठी पुणे शहरात विद्यालय स्थापण्याची आवश्यकता त्यांनी व्यक्त केली. स्त्री जातीच्या व पर्यायाने समाजाच्या उन्नतीसाठी बालविधवांची अनुकंपनीय स्थिती सुधारण्यासाठी स्त्री शिक्षणावाचून पर्याय नाही. तेव्हा मुलींना किमान मॅट्रिकपर्यंत शिक्षण देणारे विद्यालय स्थापन करून मुलींच्या शिक्षणाची सोय करणे हे नागरिकांचे कर्तव्य आहे असेही आवाहन त्यांनी केले. त्यानंतर पुण्यात मुलींचे विद्यालय स्थापन करण्याचे ठरले.

त्यानंतर २९ सप्टेंबर १८८४ रोजी विजयादशमीच्या मुहूर्तावर त्या वेळच्या मुंबई इलाख्याचे गर्व्हनर सर जेम्स फर्गसन यांच्या हस्ते 'हायस्कूल फॉर नेटिव्ह गर्ल्स' या संस्थेचा उद्‌घाटन समारंभ हिराबागेतील टाऊन हॉलमध्ये साजरा करण्यात आला. यावेळी नेमलेली समिती हीच शाळेची पहिली व्यवस्थापक समिती होती. या समितीत रा. ब. शंकर पांडुरंग पंडित हे पहिले सचिव आणि कोषाध्यक्ष होते. १ डिसेंबर १८८७ रोजी 'महाराष्ट्र फीमेल एज्युकेशन सोसायटी' या नावाने विद्यालयाचे व्यवस्थापक मंडळाची कायदेशीररीत्या नोंद झाली.

शाळेच्या इमारतीसाठी स्वतंत्र जागा शोधणे आणि ती मिळवणे यातही शंकर पंडित यांचा महत्त्वाचा सहभाग होता. ही जागा पुणे शहराच्या मध्यवस्तीत लक्ष्मी रस्त्यावर होती. ही जागा सांगलीचे राजे धुंडिराज चिंतामण उर्फ तात्यासाहेब पटवर्धन यांच्या मालकीची होती. शनिवार, नारायण, बुधवार आणि सदाशिव या चार मुख्य पेठांमध्ये ही हुजूरपागा होती. या परिसरात राहणाऱ्या बहुतांश मुली या शाळेत शिक्षणासाठी येणार होत्या. प्रवास करावा लागणार नव्हता. त्यामुळे ही जागा सोयीची होती. त्यावेळी सांगलीच्या राजांकडून ही जागा शंकर पंडित यांनी शाळेसाठी ९९ वर्षांच्या करारावर घेतली.

प

शाळेची इमारत उभी करताना, प्रत्यक्ष शाळा सुरू करताना शंकर पंडितांनी अनेक कष्ट घेतले. त्या काळच्या बहुतेक उदार स्त्री-पुरुषांकडून देणग्या मिळवण्याचे बरेचसे श्रेयही शंकर पंडित यांनाच जाते. युरोपियन स्त्री-पुरुष, एतद्देशीय संस्थानिक, धनिक इत्यादींच्या मनामध्ये त्यांनीच शाळेच्या कार्याविषयी सहानुभूती उत्पन्न केली. केवळ सहाच महिन्यात त्यांनी निरनिराळे संस्थानाधिपती आणि इतर धनिक यांच्याकडून त्या काळात एक लाखावर निधी शाळेसाठी जमविला होता.

न्यायाधीश, उपजिल्हाधिकारी, ओरिएंटल ट्रान्सलेटर इ. अधिकारपदांवर त्यांनी कामे केली होती. करारी, बाणेदार, सत्यप्रिय, स्पष्टवक्ता आणि धर्मनिष्ठ म्हणून त्यांची ख्याती होतीच. तसेच ते बहुभाषी, विद्वान अणि ग्रंथकार म्हणूनही प्रसिद्ध होते. ते पहिल्या प्रतीचे कर्ते समाजसुधारक होते. स्त्रिया आणि अस्पृश्यांच्या उद्धाराबाबत त्यांच्या अंत:करणात निस्सीम कळकळ असे. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीतही त्यांनी शाळा समितीच्या सचिवपदी सतत ११ वर्षे काम केले.

पोरबंदर संस्थानच्या अ‍ॅडमिनिस्ट्रेटरचे कामही त्यांनी केले.

– वर्षा जोशी-आठवले

## पंडिता, रमाबाई

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## पंतप्रतिनिधी भवानराव श्रीनिवास

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## पटवर्धन, कृष्णाजी लक्ष्मण

**संस्थापक**

**२५ डिसेंबर १९२० – २९ जुलै २००४**

कृष्णाजी लक्ष्मण तथा किशाभाऊ पटवर्धन यांचा जन्म मुंबईतील सामान्य मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. पुढे शालेय जीवनात राष्ट्रीय स्वयंसेवक संघाशी त्यांचा संपर्क आला आणि त्यांच्यातील संघटकाला प्रेरणा मिळाली. देशाच्या



स्वातंत्र्याच्या चळवळीचा तो काळ होता. संघ संस्थापक डॉ. हेडगेवार यांच्या सहवासात तरुण किशाभाऊंना प्रेरणा मिळाली. १९४२ च्या आंदोलनात सहभागी होण्यासाठी महाविद्यालयीन शिक्षण बाजूला सारून त्यांनी घर सोडले व धुळे-चाळीसगाव क्षेत्रात संघ प्रचारक म्हणून ते काम करू लागले.

१९५१ पर्यंत हे कार्य चालू होते. नंतर ते आपल्या व्यक्तिगत जीवनाकडे वळले. अर्धवट सोडलेले शिक्षण बी. एस्सी. (ऑनर्स), एम.एड. या पदव्या प्राप्त करून त्यांनी पूर्ण केले. पुण्याच्या राजा धनराज गिरजी विद्यालयात किशाभाऊ शिक्षक म्हणून नोकरी करू लागले. विज्ञान-गणिताचे उत्तम शिक्षक म्हणून ते ओळखले जाऊ लागले. रामकृष्ण मठ, विवेकानंद केंद्र, संघ शाखा यांच्या कार्यात सहभागी होऊन स्वत: मधील कार्यकर्ता त्यांनी जागृत ठेवला.

बुद्धिमान मुलांवर विशेष प्रयत्न घेऊन देशाच्या विकासाला आवश्यक असे नेतृत्व उभे करावे ह्या विचारातून अप्पासाहेब पेंडसे ह्यांनी 'ज्ञानप्रबोधिनी' हा शिक्षणातील प्रयोग सुरू केला होता. या शाळेच्या कामात किशाभाऊ सहभागी झाले. पण त्याचवेळी पुण्याच्या पूर्व भागातील आर्थिक, सामाजिक दृष्ट्या दुर्बल घटकांतील बुद्धिमान मुलांच्या भवितव्याच्या प्रश्नाने किशाभाऊ अस्वस्थ होते. अशा मुलांसाठी ज्ञानप्रबोधिनी सारख्या प्रयोगाची गरज आहे असे त्यांना वाटत होते.

किशाभाऊ राजा धनराज गिरजी विद्यालयाच्या मुख्याध्यापक पदावरून निवृत्त झाले आणि दुसऱ्या दिवसापासून पुण्याच्या पूर्व भागातील उपेक्षित गुणवान मुलांसाठी काम करण्यासाठी त्यांचे प्रयत्न सुरू झाले. वेगवेगळ्या शाळांतील बारा बुद्धिमान शिक्षक त्यांना

प

मिळाले आणि १३ मे १९७९ रोजी त्यांनी स्वरूपवर्धिनीची स्थापना केली. पूर्व भागातील मुलांची बुद्धिमत्ता चाचणी घेऊन संस्थेने निवड केली. नेहमीच्या शाळेनंतर संध्याकाळी मुले जमू लागली. नवे सहकारी कार्यकर्ते जोडण्यासाठी, आर्थिक मदत मिळविण्यासाठी किशाभाऊ कामाला लागले. ''या वेगळ्या शैक्षणिक प्रयोगातून आम्हाला स्वच्छ हाताचे, समर्थ खांद्यांचे, तल्लख बुद्धीचे, विशाल मनाचे व सामाजिक बांधिलकी जपणारे तरुण, समर्पित कार्यकर्ते घडवावयाचे आहेत'' असे आवाहन ते करीत.

या आवाहनाला समाजाने उत्तम प्रतिसाद दिला. पण जागेची अडचण उभी राहिली. तेव्हा संस्थेने समाजाकडून आर्थिक साहाय्य मिळविले. पूर्व भागात स्व-रूपवर्धिनीची पाच मजली इमारत उभी केली. रामकृष्ण मठाचे स्मरणानंदजी महाराज व रा.स्व. संघाचे तत्कालीन सर संघचालक कै. बाळासाहेब देवरस यांच्या हस्ते १० मे १९८८ रोजी इमारतीचे उद्घाटन झाले.

संस्थेच्या परिसरातील सेवावस्तीचे सर्वेक्षण करून बालवाडीच्या रूपाने संस्थेचा पहिला प्रकल्प सुरू केला. ह्या प्रकल्पाच्या अनुषंगाने सेवावस्तीतील माताभगिनींशी संवाद साधून त्यांच्यासाठी किशाभाऊंनी उद्योग, शिक्षण, साक्षरता वर्ग, वैद्यकीय मदत केंद्र,कायदेशीर सल्ला केंद्र सुरू केले.

प

नवा प्रकल्प प्रत्यक्षात आणण्यासाठी कार्यकर्त्यांना सर्वतोपरी मदत देण्याचा किशाभाऊंचा स्वभाव होता. त्यातून 'आजोळ' प्रकल्प, स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र, ग्रामीण विद्यार्थ्यांसाठी फिरती प्रयोगशाळा असे अनेक प्रकल्प सुरू झाले. प्रकल्प सुरू करण्यासाठी व तो सुरळीतपणे चालण्यासाठी निधीची गरज लागते ह्याची जाणीव त्यांना होतीच. पण आपले कार्य ईश्वरी कार्य आहे, समाज त्यासाठी निधीची कमतरता भासू देणारच नाही असा त्यांचा विश्वास होता. तो अनाठायी नव्हता. संस्थेला शासकीय मदत नसली तरीही कामाचा विस्तार सातत्याने होत गेला. सुरू झालेल्या प्रत्येक उपक्रमातून सामाजिक जाणिवा विस्तारलेले कार्यकर्ते निर्माण व्हायला हवेत हा त्यांचा आग्रह होता. त्यासाठी विद्यार्थ्यांसमोर ते विविध क्षेत्रांतील मोठे कार्यकर्ते आणायचे, त्यांच्याशी विद्यार्थ्यांच्या गप्पा होत, त्यांची व्याख्याने ते ऐकवित. ह्या उपक्रमातून देशासमोरील वेगवेगळ्या प्रश्नांची जाणीव विद्यार्थ्यांना होत असे. म्हणूनच अडचणींशी सामना करीत शिकलेल्या अनेक तरुण विद्यार्थी-विद्यार्थिनींनी वनवासी कल्याण आश्रमाचे कार्यकर्ते म्हणून पूर्वांचलातल्या दोन-तीन राज्यांमध्ये विविध प्रकल्पावर कार्य केले. ह्या संस्थेच्या रौप्य महोत्सवी वर्षापर्यंत ते अपरिमित कष्ट करीत राहिले. त्यांच्या स्वप्नातील शिक्षणाचा 'पटवर्धनी पॅटर्न' प्रत्यक्षात आला आणि यशस्वी झाला. शहरांतील गरीब वस्त्यांत राहणाऱ्या गुणवंत मुलांबरोबरच ग्रामीण भागातील गुणवंत व गरजू मुलांपर्यंतही पोहोचला. वयाची ऐंशी वर्षे पूर्ण झाली तेव्हा हे काम पुढील कार्यकर्त्यांच्या हाती सहजपणे सोपवून किशाभाऊ औपचारिक जबाबदारीतून मुक्त झाले. पुढील चार वर्षे 'युक्तीच्या चार गोष्टी' सांगत सहभाग देत राहिले. त्यांच्या कर्तृत्वाला समाजाने विविध पुरस्कारांनी सन्मानित केले. त्यात फाय फौंडेशन - इचलकरंजी, आदर्श शिक्षक पुरस्कार - पुणे महानगरपालिका, तेजस पुरस्कार - डोंबिवली, महाराष्ट्र सेवा संघाचा कै. ल.ग. गद्रे पुरस्कार अशा अनेक पुरस्कारांचा समावेश आहे.

– शिरीष पटवर्धन

## पटवर्धन, कुसुम विठ्ठल

**शिक्षिका, संस्थापक**

**४ एप्रिल १९२४ - १ जानेवारी २०००**



कुसुम विठ्ठल पटवर्धन ह्या पूर्वाश्रमीच्या कुसुम गोळे. त्यांचे प्राथमिक शिक्षण नाशिकच्या म्युनिसिपल शाळेत व माध्यमिक शिक्षण नाशिक विद्यालयामध्ये झाले. या शाळेतील संस्कारांचा व वातावरणाचा परिणाम त्यांच्यावर झाला. शाळेत 'ग्रामोद्धार' सारखे उपक्रम होत. त्यातून कुसुमताईंच्या मनात सामाजिक जाणिवा जाग्या होत गेल्या. मॅट्रिक

झाल्यावर पुढील शिक्षणासाठी त्या पुण्याला गेल्या. तो काळ स्वातंत्र्य चळवळीचा होता. पुण्यात कुसुमताईंनी महात्मा गांधींची भाषणे ऐकली. देशसेवेच्या ध्येयाने त्या भारावून गेल्या आणि शिक्षण सोडून नाशिकला परत आल्या. स्वातंत्र्याच्या आंदोलनात सहभागी झाल्या. एस. एम. जोशी, अच्युतराव पटवर्धन, नानासाहेब गोरे यांच्या विचारांचा त्यांच्यावर मोठा परिणाम झाला आणि त्यांचे जीवनच बदलून गेले. नाशिकच्या एच. पी. टी. (हंसराज प्रागजी ठाकरसी) विद्यालयामधून त्या अर्थशास्त्राच्या पदवीधर झाल्या. त्याचवेळी विठ्ठलराव पटवर्धनांशी त्यांचा विवाह झाला. दोघांनीही स्वत:ला समाजकार्यात, देशकार्यात झोकून दिले.

राष्ट्रप्रेमातून कुसुमताईंनी हिंदी भाषेत एम. ए. केले. देशाची आर्थिक संरचना जाणून घेण्याच्या इच्छेने अर्थशास्त्रात एम. ए. पदवी मिळविली. नाशिकच्या कॉलेज ऑफ एज्युकेशन मधून बी.एड. पदवी प्राप्त केली. सन १९६० मध्ये नाशिकच्या शारदा मंदिर म्हणजे आजच्या मा. रा. सारडा कन्या विद्या मंदिरात त्यांनी शिक्षकी व्यवसायास प्रारंभ केला.

कुसुमताई इंग्रजी, मराठी, हिंदी व अर्थशास्त्र ह्या विषयांच्या व्यासंगी शिक्षिका होत्या, उत्तम वक्तृत्वाचा गुण त्यांच्याजवळ होता. त्या स्वत: उत्तम खेळाडू होत्या. नाटक, संगीत यात त्यांना रस होता. विद्यार्थिनींबद्दल मनात प्रेम होते. यातूनच विद्यार्थिनींना त्यांचे मार्गदर्शन मिळाले. अल्पावधीतच विद्यार्थिनीप्रिय शिक्षिका म्हणून त्यांचे नाव झाले.

सन १९६० मध्ये महाराष्ट्र समाज सेवा संघाची जबाबदारी त्यांनी स्वीकारली होती. या संस्थेच्या वतीने, समविचारी सहकाऱ्यांच्या मदतीने नाशिकमधील शरणपूर भागात त्यांनी शाळा काढली. ‘रचना विद्यालय’ सुरू केले. मुले शाळेत यावीत म्हणून कुसुमताई सहकाऱ्यांबरोबर शरणपूर भागात घरोघरी हिंडल्या. परिणामत: पालक मुलांना शाळेत पाठवू लागले. विद्यालयास कुसुमताईंच्या रूपात एक उत्तम शिक्षिका, उत्तम मुख्याध्यापिका मिळाली आणि त्यांच्या नेतृत्वाखाली रचना विद्यालयाची प्रगतीच्या दिशेने वेगात वाटचाल सुरू झाली.

‘समता, साधना व समृद्धी’ हे शाळेचे ब्रीदवाक्य. मुलांना ज्ञानविज्ञान संपन्न करीत असतानाच मूल्यसंस्कार त्यांच्यावर व्हावेत, देशाचे भावी नागरिक उत्तम रीतीने घडावेत या दृष्टीने विद्यालयात त्यांनी विविध उपक्रम सुरू केले. गांधी जयंतीच्या निमित्ताने स्वच्छता सप्ताह, पावसाळ्यातील पायी सहली, दहीहंडी, कोजागिरी, भोगीसारखे कार्यक्रम आणि विविध स्पर्धा अशा उपक्रमांतून मुलांचा विकास होत गेला. संगीत, नाटक, क्रीडा या विषयात कुसुमताईंना रस असल्याने मुलांनाच नव्हे तर शिक्षकांनाही त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ होत असे. परिणामत: शहर, जिल्हा व राज्यपातळीवरील स्पर्धांमधून विद्यार्थी नाव मिळवू लागले, नाशिकमधील अग्रगण्य शाळा म्हणून रचना विद्यालय ओळखले जाऊ लागले.

बालवाडीपासून कनिष्ठ महाविद्यालयाचे रचना विद्यालय, नवरचना विद्यालय, बालवाडी प्रशिक्षण वर्ग, सी.टी.सी. प्रशिक्षण वर्ग, आश्रमशाळा, माई लेले श्रवण विकास विद्यालय असे विविधांगी शैक्षणिक कार्य करणाऱ्या महाराष्ट्र सेवा संघाला एक वैभवशाली रूप प्राप्त झाले. त्यात कुसुमताईंचे योगदान फार मोठे आहे. या त्यांच्या योगदानासाठी १९८१ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या आदर्श शिक्षक पुरस्काराने कुसुमताईंचा गौरव झाला.

१९८२ मध्ये रचना विद्यालयाच्या मुख्याध्यापिका म्हणून कुसुमताई निवृत्त झाल्या. स्वस्थ बसणे हा त्यांचा स्वभावच नव्हता. महिलांच्या समस्या त्यांना नेहमीच अंतर्मुख करीत. अन्याय व अत्याचारांनी पीडित स्त्रियांचे प्रश्न सोडविण्यासाठी त्यांनी ‘महिला हक्क संरक्षण समिती’ची स्थापना केली. अशा स्त्रियांना ताठ मानेने जगायला शिकविण्याचे त्यांचे कार्य असामान्य आहे. संघर्षात्मक कार्याला रचनात्मक कार्याची जोड मिळावी लागते ह्या विचारातून त्यांनी ‘कल्याणी प्रकल्प’ उभा केला. अनेक महिलांना आधार दिला, चरितार्थाची साधने उपलब्ध करून दिली. आदिवासी मुलींसाठी सुमतीबाई गोरे ह्यांच्या स्मरणार्थ उभे राहिलेले वसतिगृह हे

कुसुमताईंच्या चौफेर कार्याचे आणखी एक दालन. त्यामुळे नाशिकमध्ये राहण्याजेवण्याची आदिवासी मुलींची सोय झाली व शिक्षण घेऊन समाजाच्या मुख्य प्रवाहात सहभागी होण्याची संधी त्यांना मिळाली.

या कार्याच्या निमित्ताने कुसुमताईंनी वृत्तपत्रातून, नियतकालिकांतून विपुल लेखन केले. त्यांना इस्रायलला जाण्याची संधी मिळाली. भारतात परत आल्यावर जॉर्डन नदीच्या तीरावरील सामूहिक शेतीवर आधारित आर्थिक परिवर्तनाच्या व समाजबांधणीच्या प्रयोगांवर 'ध्येयधुंद' पुस्तक त्यांनी लिहिले. 'भारतातील शेती' ह्या पुस्तकात गांधीजींचे शेतीविषयक आर्थिक विचार मांडले. गुरुवर्य अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्या जीवनाची वाटचाल 'जडणघडण' ह्या पुस्तकात शब्दांकित केली.

कुसुमताई पटवर्धनांच्या शैक्षणिक, सामाजिक, सांस्कृतिक क्षेत्रातील अजोड कार्याबद्दल महाराष्ट्र सामाजिक परिषद-निफाड, समाजवादी महिला सभा महाराष्ट्र, नाशिक महानगरपालिका लोककल्याण पुरस्कार अशा अनेक पुरस्कारांनी त्यांचा गौरव करण्यात आला.

– प्रा. सुहासिनी पटेल

## परांजपे, रामचंद्र गोविंद

***बाबासाहेब परांजपे***

**शिक्षक, मुख्याध्यापक, संस्थापक**

**१९०७ – २६ एप्रिल १९९१**

प



रामचंद्र गोविंदराव तथा बाबासाहेब परांजपे यांचा जन्म पुणे येथे झाला. रत्नागिरी जिल्ह्यातील आडीवरे हे त्यांचे मूळगाव होते. पण त्यांचे वडील नोकरीनिमित्त सोलापूरला आले होते. बाबासाहेब दहा वर्षांचे असतानाच त्यांच्या आईचे निधन झाले. सोलापूरच्या हरिभाऊ देवकरण प्रशालेत ते मॅट्रिक झाले. पुढे अनेक अडचणींवर मात करत ते बी.एस्सी. झाले.

उस्मानाबाद जिल्ह्यातल्या हिप्परगा ह्या गावी एक राष्ट्रीय शाळा सुरू होती. स्वामी रामानंद तीर्थ हे त्या शाळेचे मुख्याध्यापक होते. १९२९ मध्ये बाबासाहेब परांजपे या शाळेत विज्ञान शिक्षक म्हणून आले. तिथूनच त्यांच्या सार्वजनिक, राष्ट्रीय जीवनाला एकप्रकारे सुरूवात झाली. देखणे व्यक्तिमत्व, प्रचंड वाचन, ओजस्वी वक्तृत्व, देशप्रेम, सेवाभाव, जातीयता निर्मूलनाची कृतिशील तळमळ यामुळे बाबासाहेब सर्व विद्यार्थ्यांना आपलेसे वाटू लागले. सर्वजण त्यांना युवराज म्हणायचे. या संबोधनात आत्यंतिक प्रेम होते, तसाच धाकही.

इ.स. १९३५ मध्ये हिप्परग्याची शाळा सोलापूरला स्थलांतरित झाल्यावर स्वामीजींसमवेत बाबासाहेब अंबेजोगाईला आले. स्वामीजींच्या नेतृत्वाखाली योगेश्वरी विद्यालयाच्या सर्वांगीण विकासासाठी त्यांनी अथक प्रयत्न केले. योगेश्वरी विद्यालयाशी त्यांचा शिक्षक, मुख्याध्यापक, संस्थाचालक अशा विविध नात्यांनी संबंध आला. शालेय शिक्षणाला जीवनाचा अर्थ प्राप्त करून देताना त्यांनी शाळेच्या, शिक्षकांच्या, विद्यार्थ्यांच्या आर्थिक स्थितीचाही विचार केला. आपल्या अत्यल्प मानधनाचा हिस्सासुद्धा ते गरजू शिक्षकांना, गरीब विद्यार्थ्यांना वाटून देत. काटकसर हा त्यांचा जिव्हाळ्याचा विषय होता. सार्वजनिक पैसा सार्वजनिक कामासाठीच उपयोगात आणला पाहिजे, हा त्यांचा कटाक्ष होता.

हैदराबाद मुक्तिसंग्रामाचे नेतृत्व स्वामीजींकडे होते. बाबासाहेब परांजपे संग्रामात खेचले जाणे स्वाभाविक होते. त्यांचा पिंड संघर्षाचा होता. हातबॉम्ब तयार करण्याची विद्या त्यांना अवगत होती. क्रांतिकारकांच्या प्रशिक्षण कॅम्पची व्यवस्था त्यांच्याकडे असायची. देशातली असहकारितेची, स्वदेशीची चळवळ त्यांनी योगेश्वरी विद्यालयाच्या प्रांगणात आणली. परदेशी कपड्यांची होळी, महात्मा गांधींजींच्या उपोषणाला पाठिंबा देणारे शिक्षक विद्यार्थ्यांचे उपोषण अशा देशभक्तीने भारलेल्या बाबी या प्रांगणाने अनुभवल्या. स्वाभाविकच १९४२ मध्ये निजामाने सुरू केलेल्या अटकसत्रात बाबासाहेबांना अटक होणे अपरिहार्य होते.

भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीनंतर व हैदराबादच्या मुक्तीनंतर १९५२ मध्ये लोकसभेची पहिली निवडणूक बाबासाहेबांनी बीडमधून जनता लोकशाही आघाडीतर्फे लढविली आणि जिंकली. खासदार झालेल्या बाबासाहेबांनी ग्रामोद्योगाच्या माध्यमातून ग्रामीण भागात सामाजिक, आर्थिक आणि हरित क्रांतीचा प्रयोग परिश्रमपूर्वक यशस्वी केला. वयाच्या ४६ व्या वर्षी त्यांची ओळख सिंधुताईं सोबत झाली. त्या विधवा होत्या. आपल्या सामाजिक कार्याचा एक भाग म्हणून बाबासाहेबांनी सिंधुताईंसोबत नोंदणी पद्धतीने विवाह केला त्यांना दोन मुली झाल्या. पण बाबासाहेबांनी स्वतःच्या संसारापेक्षा चिंता केली ती ग्रामोद्धार, दलितोद्धार आणि शिक्षणाची. अंबेजोगाई योगेश्वरी महाविद्यालय, लातूरचे दयानंद महाविद्यालय, बसवेश्वर महाविद्यालय, पुरणमल लाहोटी तंत्रनिकेतन यांच्या स्थापनेत, अंबेजोगाईच्या योगेश्वरी शिक्षण संस्थेच्या विस्तारात त्यांनी हिरिरीने पुढाकार घेतला. दलितमित्र पुरस्कार, इ.स.१९५१ च्या परभणीच्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषवले. मराठवाडा वृत्तपत्राचे विश्वस्तपद हे सन्मान प्राप्त झाल्यावर आपली जबाबदारी वाढली, अशी त्यांची धारणा झाली. शेवटच्या आजारपणातही त्यांची ग्रामोद्धाराची तळमळ कमी झाली नाही.

– प्रा. डॉ. कल्पना संतोष मुळावकर

## परांजपे, रघुनाथ पुरूषोत्तम

***रँग्लर परांजपे***

☞ **मुख्य नोंद – विज्ञान खंड**

## परांजपे, रजनी केशव

**शिक्षिका, संस्थापिका**

**१९ सप्टेंबर १९३६**

रजनी केशव परांजपे या मूळच्या रजनी नारायण जोगळेकर. त्यांचा जन्म त्र्यंबकेश्वर येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण व बी.ए. पर्यंतचे महाविद्यालयाचे शिक्षण नाशिक येथे झाले. विवाहानंतर त्या मुंबईला गेल्या. तेथे पंधरा वर्षे प्रापंचिक जबाबदाऱ्या सांभाळल्यानंतर त्यांनी



मुंबई येथे समाजसेवेतील पदवी – (एम. एस.डब्ल्यू.) संपादन केली. त्यानंतर काही काळ रजनीताई मुंबईतील निर्मला निकेतनच्या कॉलेज ऑफ सोशलवर्क येथे व्याख्यात्या म्हणून काम करीत असत. तेथे त्या भारतीय सामाजिक प्रश्न तसेच संशोधन पद्धती हे विषय शिकवीत असत. त्यानंतर त्या जपानी विद्यापीठातून व्याख्यात्या म्हणून निवृत्त झाल्या.

महाविद्यालयामध्ये शिकवत असताना अनेक प्रकल्पांच्या निमित्ताने त्यांचे झोपडपट्ट्या, वाड्या, वस्त्यांवर जाणे होत असे. तेथील शाळेत न जाणाऱ्या मुलांकडे पाहताना, या मुलांपर्यंत शिक्षण पोचले पाहिजे असे त्यांना वाटायचे. त्याचप्रमाणे शिकणे म्हणजे सक्तीचे, निरस व कंटाळवाणे असते हा मुलांच्या आणि पालकांच्या मनातला आकस दूर केला पाहिजे असे त्यांना नेहमी वाटत असे. आपल्या देशात साक्षरता मोहिमेचा प्रसार सरकारी पातळीवर तसेच अनेक स्वयंसेवी संस्थांकडून सुरू आहे. पण भारतात पस्तीस कोटींहून जास्त लोक निरक्षर आहेत. प्राथमिक शाळेत जाण्याच्या वयातील अडीच कोटी मुले शाळेत जात नाहीत. शिवाय जी मुले शाळेत जातात, त्यापैकी पहिल्या इयत्तेत जाणाऱ्या दर पाच मुलांपैकी दोन मुले शिक्षण पूर्ण करीत नाहीत. ही न शिकलेली मुले मोठी होऊन जेव्हा पालक होतात, तेव्हा त्यांना स्वत:लाच शिक्षणाचे महत्त्व फारसे न समजल्याने ते त्यांच्या मुलांना शाळेत पाठविण्याचे महत्त्व जाणत नाहीत. अज्ञानाबरोबरच गरिबी हाही मोठा अडसर असतोच. हे दुष्टचक्र भेदले जावे यासाठी रजनी परांजपे यांनी 'डोअरस्टेप स्कूल' ही संकल्पना मांडली. म्हणजे ही मुले शाळेत येत नसतील तर ही मुले जिथे राहतात, तिथेच त्यांच्यासाठी शाळा सुरू करावयाची. रजनीताई परांजपे यांनी आपली एक विद्यार्थीनी बीना लष्करे हिच्या सहाय्याने १९८८-८९ मध्ये मुंबईत डोअरस्टेप स्कूलची स्थापना केली. ३ ते १४ या वयोगटातील शिक्षणापासून शाळेपासून वंचित असलेल्या

प

गरीब मुलामुलींना त्यांच्या वाडी, वस्तीवर जाऊन शिकविणे सुरू केले. रजनीताईंचे काम मुंबईत जोरात सुरू असताना १९९३ मध्ये त्या पुण्यात वास्तव्यासाठी आल्या आणि त्यांनी पुण्यातही डोअरस्टेप स्कूलचे काम सुरू केले. अनेक वर्षे आपल्या सहकाऱ्यांसमवेत या मुलांसाठी काम केल्यावर रजनीताईंना एक गोष्ट जाणवली की गरीब मुलांच्या शिक्षणासाठी काम करणाऱ्या आपल्या संस्थेसारख्या इतरही काही संस्था आहेत. पण पुण्यामुंबईसारख्या मोठ्या शहरामध्ये अजूनही एक मोठा वर्ग आहे, ज्यांना शाळेपर्यंत पोचताच येत नाही – तो म्हणजे बांधकामावर असणाऱ्या मजुरांच्या मुलांचा! शहरी भागात सर्वात दुर्लक्षिली गेलेली ही मुले आहेत असे त्यांच्या लक्षात आले आणि या मुलांच्या शिक्षणासाठी मोठमोठ्या साईटसवर त्या त्या बांधकाम व्यावसायिकाच्या मदतीने 'डोअरस्टेप' ने शाळा तसेच गरज असेल तेथे पाळणाघरे सुरू केली. सध्या पुण्यातील औंध, बाणेर, हिंजवडी तसेच शिवणे उत्तमनगर, नांदेड, वडगाव, येथील ८० साईटवर ५ हजार मुले शिकत आहेत.

रजनीताईंनी डोअरस्टेप स्कूलची बसही अभिनव पद्धतीने वापरली आहे. ज्या ठिकाणी मुलांना शिकवण्यासाठी जागा नसते तेथील मुले या बसमध्ये बसून शिकतात. अशी ती चाकांवरची शाळा आहे.

प

तसेच डोअरस्टेपच्या शाळेतून शिकून मुले महानगरपालिकेच्या किंवा इतर शाळेत जायला लागली तर त्या मुलांना शाळेत नेण्याआणण्याचा खर्च त्यांच्या पालकांवर पडू नये म्हणून संस्थेतर्फे ही बस व काही रिक्षा यातून ही व्यवस्था करण्यात येते. मुलांवर वाचनसंस्कार व्हावेत यासाठी पुणे आणि पिंपरी चिंचवड येथील सुमारे १०० शाळांमध्ये वाचन प्रकल्प सुरू केला आहे. गेली दहा वर्षे तो अखंड सुरू आहे. संस्थेकडे यासाठी सुमारे २५ हजार पुस्तके आहेत. मुलांना भाषेची ओळख व्हावी यासाठी काना, मात्रा, वेलांटी तसेच जोडाक्षरविरहीत गोष्टींची पुस्तके रजनीताई व सहकाऱ्यांनी तयार केली आहेत. नाममात्र किंमतीत ही पुस्तके उपलब्ध आहेत. आज ७४ व्या वर्षीदेखील रजनीताई आपले काम अतिशय तळमळीने करत असतात. त्यांच्या या कार्यासाठी त्यांना महर्षी कर्वे स्त्री शिक्षण संस्थेचा बाया कर्वे पुरस्कार मिळाला आहे. अज्ञान, निरक्षरता आणि दारिद्र्य यांचे दुष्टचक्र भेदण्यासाठी गेली २०-२१ वर्षे निरलसपणे त्यांचे काम सुरू आहे.

– स्वाती क्षीरसागर

## परुळेकर, रामभाऊ विठ्ठल

***संस्थापक, शिक्षणतज्ज्ञ***

**७ जुलै १८८६ – १४ ऑक्टोबर १९६१**



रामभाऊ विठ्ठल परुळेकर यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील परुळे या गावी झाला. त्यांचे शालेय शिक्षण परुळे, वेंगुर्ले व मालवण येथे झाले. त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण, पदवी व पदव्युत्तर, शिक्षण एल्फिन्स्टन महाविद्यालय मुंबई येथे झाले. महाविद्यालयामध्ये त्यांचे अभ्यासाचे विषय भौतिकशास्त्र व रसायनशास्त्र हे होते. त्यामुळे त्यांना अनेक शिष्यवृत्त्या मिळाल्या व त्यांना आपले शिक्षण पूर्ण करता आले.

परुळेकरांनी आपल्या अध्यापन कार्याची सुरुवात मालवण येथे केली. १९१२ मध्ये मालवणच्या टोपीवाला विद्यालयाने त्यांना सन्मानाने मुख्याध्यापक म्हणून आमंत्रित केले. त्यामुळे शाळाही मोठ्या लौकिकास पात्र ठरली. शाळेच्या या लौकिकामुळे टोपीवाला ह्या दानशूर कुटुंबाकडून मोठी देणगी मिळाली. त्याचा विनियोग शाळेसाठी जमीन व इमारतीसाठी करता आला.

इंग्लंडला जाऊन स्नातकोत्तर शिक्षणशास्त्राच्या पदवीसाठी त्यांना टोपीवाला यांच्याकडून सन १९२२ मध्ये शिष्यवृत्ती मिळाली. 'मुंबई इलाख्यातील शैक्षणिक प्रश्न' ह्या विषयावर त्यांनी प्रबंध लिहिला. इंग्लंडच्या वास्तव्यात जॉन ॲडॅम व टी. पर्सी यासारख्या प्रसिद्ध शिक्षण शास्त्रज्ञांच्या हाताखाली त्यांना शिकण्याची संधी मिळाली. इंग्लंडमधील शिक्षणामुळे त्यांना एक अधिकारी

शिक्षणतज्ज्ञ म्हणून सरकारी व बिनसरकारी वर्तुळात मान्यता मिळाली. सन १९२५ मध्ये मॅट्रिक्युलेशन व शाळा सोडल्याचा दाखला घेण्यासाठी जे परीक्षा मंडळ नेमले जाते, त्यावर त्यांची नेमणूक झाली. त्याचप्रमाणे १९२७ मध्ये त्यांना प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण विषयक समितीवर (हेस्केथ समिती) सदस्य म्हणून आमंत्रित करण्यात आले. शासकीय समितीत आपली मते निर्भीडपणे मांडता येणार नाहीत हे त्यांच्या लक्षात आले, तेव्हा त्यांनी कै. एम. आर. परांजपे यांच्या सहाय्याने प्रोग्रेस ऑफ एज्युकेशन हे नियतकालिक सुरू केले व त्यांतून खाजगी शाळांचे स्वातंत्र्य व स्वायत्तता यावर सतत चर्चा घडवून आणली.

टोपीवाला महाविद्यालयामधून ते निवृत्त झाले. त्याचवर्षी त्यांना मुंबई महानगरपालिकेच्या शाळा समितीच्या सचिवपदी नेमणूक मिळाली. पुढील तेरा वर्ष त्यांनी समर्थपणे हे पद सांभाळले.

शाळा समितीचे सचिव म्हणून त्यांचा बहुजन समाजाच्या शिक्षणाच्या प्रश्नांना पहिल्यांदाच समोरे जावे लागले. सन १९२५ मध्ये मुंबईमध्ये प्राथमिक शिक्षण सक्तीचे झाले होते. त्याची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी त्यांच्यावर पडली. शिक्षकांची निवड करणे, त्यांच्या शिकवण्यावर आणि शाळांच्या कारभारावर देखरेख करणे ही त्यांची महत्त्वाची कामे होती. शाळा समिती ही लोकशाही पद्धतीने चाले. त्यामुळे योजनांची अंमलबजावणी करणे कठीण होते. अपुऱ्या इमारती, अभ्यासक्रमाची व्याप्ती, अध्यापनपद्धती, विद्यार्थ्यांची गळती या विषयी निर्णय घेणे अवघड झाले होते. शिक्षणाचा प्रसार करणे त्यामुळे अशक्य झाले. पैशाची अडचण तर अत्यंत गंभीर होती. जगभर महामंदीची लाट आली होती. त्यामुळे कार्यक्रम राबवण्यासाठी पैसा उपलब्ध नव्हता. विद्यार्थ्यांची संख्या खूप वाढली. परंतु त्यासाठी अधिक पैसा मिळणे कठीण होते. या समस्येचा त्यांनी सामाजिक, ऐतिहासिक व तौलनिक दृष्टिकोनातून अभ्यास केला व निष्कर्ष काढला की शिक्षण विस्तारासाठी उचित तंत्राचा वापर केला पाहिजे. त्यांची पहिली सूचना होती की पाच वर्षाचा प्राथमिक शिक्षणाचा अभ्यासक्रम चार वर्षाचा करावा. दुसरी सूचना अशी होती की सक्तीच्या शिक्षणासाठी वयोमर्यादा ६ ते ११ न ठेवता ती ७ ते ११ करावी. तिसरी सूचना होती की बहुजनसमाजातील विद्यार्थ्यांना सहज समजतील असे विषय अभ्यासासाठी ठेवावेत. चौथी सूचना अशी होती की सध्या तीस विद्यार्थ्यांसाठी एक शिक्षक हे प्रमाण चाळीस विद्यार्थ्यांसाठी एक शिक्षक असे करावे व जेव्हा हे शक्य नाही तेव्हा पाळी पद्धत सुरू करावी.

परुळेकरांनी सुचवलेल्या योजनेला टाइम्स ऑफ इंडिया सारख्या प्रतिष्टित वर्तमानपत्राने पाठिंबा दिला व त्याचबरोबर समाजातील इतर प्रतिष्ठितांनीही नव्या सूचनांना पाठिंबा दिला. त्यावेळच्या मुंबई कायदे मंडळामध्ये तसा ठरावही मांडण्यात आला. पण दुर्दैवाने तो मागे घेण्यात आला. परंतु परुळेकर नाउमेद झाले नाहीत. त्यांनी आपल्या सूचनांचा पाठपुरावा अधिक जोराने सुरू ठेवला. शाळेतील विद्यार्थ्यांची गळती फार मोठ्याप्रमाणावर होत असे. ती थांबवण्यासाठी परुळेकरांनी अनेक मौल्यवान सूचना केल्या. त्यांनी हे दाखवून दिले की प्राथमिक शिक्षण सक्तीचे करायचे असेल तर विद्यार्थ्यांची गळती थांबवली पाहिजे.

सन १९३१ मध्ये लंडन येथे गोलमेज परिषद भरली. त्यात महात्मा गांधींनी महत्त्वाचा मुद्दा मांडला की ब्रिटीश काळात निरक्षरतेचे प्रमाण वाढले आहे. ब्रिटीशपूर्वकाळात घरोघरी शाळा होत्या व शिक्षक काही मुलांना जमवून शिक्षण देत असत. त्यांची संख्या लक्षात घेतल्यास गांधींचा मुद्दा बरोबर होता. या विषयावर परुळेकर आणि त्यांचे सहकारी परांजपे ह्यांनी संशोधन केले आणि महात्माजींच्या म्हणण्याला संशोधनाचा आधार मिळवून दिला. देशभर पसरलेल्या देशी शाळा कोणतेही प्रोत्साहन शासनाने न दिल्यामुळे बंद पडल्या आणि म्हणून साक्षरतेचे प्रमाण घटले.

सन १९४१ मध्ये परुळेकर मुंबई महानगरपालिकेच्या सेवेतून निवृत्त झाले. पण निवृत्तीनंतरही ते पूर्वीइतकेच कार्यरत राहिले. पुणे येथील शिक्षण महाविद्यालय, कोल्हापूर येथील शिक्षण महाविद्यालय, सावंतवाडी

प

संस्थानचे शैक्षणिक सर्वेक्षण येथील महत्त्वाची कामे त्यांच्या हातून पार पडली. सन १९३७ मध्ये मुंबई येथे काँग्रेसचे मंत्रीमंडळ अधिकारावर आले. त्यांनी आपले शैक्षणिक धोरण ठरविण्यासाठी एक समिती नेमली. त्या समितीवर सभासद म्हणून काम करण्याची संधी परुळेकरांना मिळाली. समितीने परुळेकरांच्या अनेक सूचना स्वीकारल्या व त्या शासनाकडे कार्यवाहीसाठी पाठवल्या. त्या तात्काळ जरी अंमलात आल्या नाहीत तरी पुढे १९४६ मध्ये त्या शिफारसी स्वीकारल्या गेल्या.

परुळेकरांना त्यांच्या संशोधन कार्यामुळे जुन्या कागदपत्रांचे महत्त्व समजले होते आणि अशी दुर्मिळ कागदपत्रे प्रकाशित करणे जरुरीचे आहे असे त्यांना नेहमी वाटे. दैनंदिन कार्यातून निवृत्ती घेतल्यानंतर कागदपत्रांच्या प्रकाशनाचे काम त्यांनी हाती घेतले. सन १८२० ते १८३० ह्या काळात मुंबई प्रांतात शिक्षण विषयी जी धोरणे आखण्यात आली आणि त्यानिमित्ताने जो ब्रिटीश अधिकाऱ्यात पत्रव्यवहार झाला आणि त्याचे प्रकाशन त्यांनी दोन खंडात केले.

सन १९४८ मध्ये त्यांनी मुंबई शहरातील प्राथमिक शिक्षणाच्या पुर्नसंघटनेविषयी अभ्यास केला व त्यावर आधारित अहवाल सादर केला. त्यांचा प्रदीर्घ प्रशासकीय अनुभव, प्रशासनाच्या मूलभूत तत्त्वांची जाण, तात्त्विक चिकित्सा, प्रबंध लिहिण्याची पात्रता व योग्य शैक्षणिक दृष्टिकोन यामुळे अहवाल दर्जेदार झाला व त्याला सर्वत्र मान्यता मिळाली. या अहवालाद्वारे परुळेकरांनी तीन सूचना केल्या.

१. शहरातील प्राथमिक शिक्षणाचे प्रशासन आयुक्तांच्या अखत्यारीत द्यावे.
२. शाळांना योग्य अशा इमारती उपलब्ध करून द्याव्यात.
३. प्राथमिक शिक्षणाच्या समस्यांचा अभ्यास करण्यासाठी संशोधन विभाग सुरू करावा. शासनाने या शिफारसी स्वीकारल्या.

माध्यमिक शाळांना देण्यात येणाऱ्या अनुदानाची पद्धती, शाळा शुल्क, शिक्षकांचे वेतन आणि सेवानियम इ. अनेक समस्यांची चिकित्सा करुन शासनास योग्य शिफारसी करण्यासाठी शासनाने माध्यमिक शाळा समिती स्थापन केली. त्याचे सभासद म्हणून परुळेकरांनी अनमोल सूचना केल्या. त्या सूचना शासनानेही थोडे बदल करून स्वीकारल्या. सर्व शाळातील शिक्षकांना विविध भत्त्यांसह समान वेतनश्रेणी सुचवण्यात आली. शिक्षकांना सेवेतील शाश्वती मिळवून दिली. सर्व शाळांसाठी समान अनुदान पद्धती सुचवली. या अहवालाने शिक्षकांची चिरकालीन सेवा बजावली आहे.

भारत सरकारने सर्व राज्यांना सुचवले (१९९१) की त्यांनी आपल्या राज्यातील प्रत्येक जिल्ह्याचे शैक्षणिक सर्वेक्षण करावे. या कल्पनेची उपयुक्तता सिद्ध करून दाखववावी या उद्देशाने परुळेकरांनी रत्नागिरी जिल्ह्याचे नमुना सर्वेक्षण केले. त्याची अंमलबजावणी लगेच झाली नाही हे खरे परंतु दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत सबंध भारताचे असे सर्वेक्षण करण्यासाठी रु. २५ लाखाची तरतूद करण्यात आली व परुळेकरांच्या योजनेला राष्ट्रीय पातळीवर मान्यता मिळाली.

परुळेकरांनी ज्या विविध संस्था उभारल्या त्यातील इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन (१९४८) ही एक महत्वाची संस्था होय. या संस्थेचे ते पहिल्यापासून संचालक होते. अध्यापन, संशोधन, प्रकाशन आणि शैक्षणिक प्रयोग या शिक्षण क्षेत्राच्या विभागाची उल्लेखनीय कार्याचे श्रेय परुळेकरांना देणे उचित होईल. एम.एड. आणि पीएच. डी. पर्यंतचे शिक्षण या संस्थेत उपलब्ध झाल्यामुळे अनेकांची सोय झाली.

संस्थेने काही उपयुक्त पुस्तके व संशोधनाचे फलित सादर करणारे ग्रंथ प्रसिद्ध केले. तसेच संशोधनाला वाहिलेले नियतकालिक सुरु केले. ग्रामीण शिक्षणाला महत्त्व देणारी एक प्रयोगशील संस्था मौनी विद्यापीठ सुरु केली. श्री मौनी विद्यापीठाने चांगला विकास केला. भारत सरकारने मान्यता दिलेल्या निवडक दहा संस्थांपैकी मौनी विद्यापीठ हे एक आहे.

परुळेकर हे एक उत्तम शिक्षण व संशोधक होते. त्यांची व्याख्याने अभ्यासपूर्ण तर असतच. पण ती शिवाय मनोरंजकही असत. ते उत्तम संशोधन मार्गदर्शक होते.



प

त्यांनी अनेक एम.एड. व पीएच. डी. विद्यार्थ्यांना यशस्वीरित्या मार्गदर्शन केले. नारायणराव टोपीवाले स्मारक शैक्षणिक संशोधनमालेचे त्यांनी पुनर्जीवन व विकास केला. ह्या संस्थेमार्फत त्यांनी शिक्षणासंबंधी पाच खंड प्रसिद्ध केले.

परुळेकरांचा शिक्षणशास्त्रज्ञ म्हणून भारतभर लौकिक झाला होता. बडोदा, पुणे, कर्नाटक या विद्यापीठात त्यांनी परीक्षक म्हणून काम केले. प्रांतिक शिक्षण मंडळाचे ते अध्यक्ष होते. अनेक विद्यापीठात ते अभ्यागत प्राध्यापक म्हणून कार्यरत होते. अनेक विद्यापीठांच्या अभ्यास मंडळाचे व विधीसभेचे ते सभासद होते. पुण्याच्या शालांत परीक्षा मंडळाचे ते अनेक वर्षे सभासद होते. मुंबई शहर समाज शिक्षण संस्था, प्रौढ शिक्षण समिती, सोशल सर्विस लीग व अशाच अन्य प्रौढ शिक्षणाशी संबंधीत संस्थांशी परुळेकरांचा घनिष्ट संबंध होता. साक्षरता प्रसार हा त्यांचा ध्यास होता. त्यांचे हे कार्य लक्षात घेऊन सन १९५४ मध्ये पाटणा येथे आयोजित केलेल्या प्रौढ शिक्षण परिषदेचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली.

चेन्नईचे मुख्यमंत्री राजगोपालचारी यांनी प्राथमिक शिक्षणासंबंधी एक नवी योजना तयार केली होती. तिचे परीक्षण करण्यासाठी जी समिती नेमली गेली तिचे अध्यक्षपद परुळेकर यांना देऊन त्यांना सन्मानित करण्यात आले. मुलोद्योग पद्धती आणि पाळी पद्धती ह्यांच्यात समन्वय साधण्याचे अवघड काम परुळेकरांनी त्यांच्या अहवालात केले आहे. प्राथमिक शाळेच्या वर्गातील अध्यापनाचे तास कमी करावेत आणि कमी केलेल्या तासांची भरपाई शाळेबाहेर आवश्यक ते कार्यक्रम करुन करावी.

परुळेकरांना पाठ्यपुस्तकांचे महत्त्व माहीत होते. त्यांनी साने, मोडक, रेगे, आजगावकर, रुबेन यांच्या सहकार्याने भूगोल, अंकगणित, इंग्रजी या विषयांवर दर्जेदार पुस्तके लिहिली व बाजारात त्यांना चांगला प्रतिसाद मिळाला. मुंबईतील मुलांसाठी त्यांनी साक्षरता शिक्षणावर पुस्तके लिहिली.

– डॉ. नीळकंठ बापट

## परुळेकर, सदानंद दत्तात्रेय

**संस्थापक**

**एप्रिल १९०९ – १६ मार्च १९६९**



सदानंद दत्तात्रेय तथा बाबूराव परुळेकर यांचे शिक्षण बोर्डीच्या राष्ट्रीय शाळेत झाले. त्यामुळे त्यांच्यावर लोकसेवाव्रताचे संस्कार झाले होते. मुंबईतील दादर पश्चिम परिसरात शिक्षणाची तेव्हा कोणतीही सोय नव्हती. ८ मे १९४९ रोजी बाबूरावांनी या शारदाश्रम वसाहतीत बालक मंदिर सुरू केले. प्रारंभी फक्त नऊ मुले होती. नंतर मुलांची संख्या वाढत गेली व १९५० मध्ये प्राथमिक व पुढच्याच वर्षी माध्यमिक विभाग सुरू करण्यात आला. शाळेची इमारत होईपर्यंत शाळा शारदाश्रम वसाहतीच्या जागेत भरत होती. १९५३ मध्ये वाढत्या शाळेची व्यवस्था पाहण्यासाठी नेमलेल्या समितीत आचार्य भिसे, एस. एस. तांबे, डॉ. आजगावकर, रावबहादूर के. डी. कोतवाल, डॉ. के. आर. पोतदार होते. संस्थेची घटना बाबूराव परुळेकर व आचार्य भिसे यांच्या मार्गदर्शनाखाली तयार झाली.

शाळेच्या इमारतीसाठी रिझर्व्ह बँकेची व म्हात्रे पेन अँड इंडस्ट्रीजची जागा बाबूरावांनी मोठ्या प्रयत्नांनी मिळविली. अवघ्या चार महिन्यांत शाळेची भव्य इमारत उभी केली. तळमजला मुलांना खेळण्यासाठी ठेवून खांबावर बांधण्यात आलेली शारदाश्रम विद्या मंदिराची इमारत ही मुंबईतील पहिली इमारत. या इमारतीत मराठी व इंग्रजी माध्यम, मुलामुलींसाठी वेगळी शाळा, मुलांसाठी व मुलींसाठी वेगळ्या वसतिगृहांची सोय असून १९६० पासून अनेक नवीन, अभिनव उपक्रम चालू आहेत. व्यवसायाभिमुख शिक्षणासाठी अनेक सोयी उपलब्ध आहेत. वाणिज्य, गृहशास्त्र, फाइन आर्टस्, चित्रकला, संगीत शिकविण्याची व्यवस्था आहे. १९६१ पासून तांत्रिक विभाग सुरू करून सुतारकाम, लोहारकाम, टर्निंग, फिटिंग, मेकॅनिकल व इलेक्ट्रिकल इंजिनिअरिंग असे विषय उपलब्ध केल्याने

शाळेविषयीचे आकर्षण वाढले. अकरावीला वेगवेगळे बावीस विषय शिकविण्याची सोय संस्थेने केली आहे.

मुंबईत दादर पश्चिम विभागात भवानी शंकर रोडच्या परिसरात १९४९ पासून विद्यादानाचे कार्य अखंडितपणे सुरु आहे.

– वि. ग. जोशी

## पवार, अप्पासाहेब गणपत

**प्राचार्य, कुलगुरू, संशोधक**

**५ मे १९०६ – ३० डिसेंबर १९८१**



डॉ. अप्पासाहेब गणपतराव पवार यांचा जन्म बेळगाव जिल्ह्यातील मुचंडी ह्या गावी एका शेतकरी कुटुंबात झाला. मुचंडी गावापासून जवळच असलेल्या वडगाव येथे त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले.

१९२४ मध्ये शहापूर येथील चिंतामणराव विद्यालयामधून ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. मुंबई विद्यापीठातून अर्थशास्त्र विषय घेऊन १९२८ मध्ये त्यांनी बी. ए. पदवी मिळविली. १९२९ मध्ये एलएल. बी. चे पहिले वर्ष पूर्ण करतानाच १९३० मध्ये अप्पासाहेब एम.ए. झाले. १९३१ मध्ये एलएल. बी. पदवी मिळवून उच्च शिक्षणासाठी ते लंडन विद्यापीठात दाखल झाले. १९३४ मध्ये लंडन स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीजमधून रेन् ऑफ शाहू छत्रपतीः १७०८ ते १७४९ हा प्रबंध सादर करून त्यांनी पीएच. डी. पदवी संपादन केली. एलएल.बी. ची पदवी आधीच मिळाल्यामुळे त्यांना १९३५ मध्ये त्यांनी बार अ‍ॅट लॉ पदवी प्राप्त केली.

भारतात परत आल्यानंतर १९३५ मध्ये अप्पासाहेबांनी कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून शैक्षणिक पेशास प्रारंभ केला. इतिहासाचा मोठा व्यासंग व वक्तृत्वगुण, विद्यार्थ्यांबद्दलचे प्रेम यामुळे अल्पावधीतच उत्तम प्राध्यापक म्हणून त्यांचा लौकिक झाला. १९४५ मध्ये ते राजाराम महाविद्यालयाचे प्राचार्य झाले. त्यांच्या प्राचार्यपदाच्या कारकिर्दीत त्यांनी महाविद्यालयाचे ग्रंथालय समृद्ध केले. महाविद्यालयाचा इतिहास संपादित केला. खेळाडूंना प्रोत्साहन दिले. ऑलिंपिकवीर खाशाबा जाधव हे याच कालावधीत राजाराम महाविद्यालयाचे विद्यार्थी होते.

१९४९ मध्ये त्यांची बदली झाली. गुजरातमधील विसनागर येथील महाविद्यालयाचे ते प्राचार्य म्हणून काम पाहू लागले. तीन वर्षात विविध प्रकल्प राबवून त्यांनी कॉलेजला उत्तम दर्जा प्राप्त करून दिला. तेथे ते गुजराथी भाषाही शिकले.

१९५२ ते १९५४ ह्या काळात पुणे येथे ते शिक्षण उपसंचालक पदावर होते. काही काळ त्यांनी माध्यमिक शालान्त परीक्षा मंडळाचे अध्यक्षपद भूषविले. १९५९ ते १९६० महाराष्ट्र राज्याचे शिक्षण सहसंचालक व १९६० ते १९६२ पर्यंत शिक्षण संचालक म्हणून समर्थपणे जबाबदारी पेलली. ग्रामीण भागात महाविद्यालये सुरू करण्यास त्यांनी प्रोत्साहन दिले. माध्यमिक शाळांच्या इमारतींना अनुदान देण्याची प्रथा सुरू केली.

दक्षिण व पश्चिम महाराष्ट्रासाठी स्वतंत्र विद्यापीठाची गरज भासू लागली. महाराष्ट्र शासनाने सातारा, सांगली, कोल्हापूर व सोलापूर या चार जिल्ह्यांसाठी १९६२ मध्ये शिवाजी विद्यापीठाची स्थापना केली. अप्पासाहेब पवार विद्यापीठाचे पहिले कुलगुरू झाले. विद्यापीठाचे उद्‌घाटन तत्कालीन राष्ट्रपती डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन ह्यांच्या हस्ते झाले. विद्यापीठाच्या कार्यास गती आली. विद्यापीठासाठी कोल्हापूर शहराच्या बाहेर १०४७ एकर जमीन मिळाली. बांधकामास सुरूवात झाली. अप्पासाहेबांना १९७५ पर्यंत कुलगुरू पद मिळाल्याने नियोजनपूर्वक सर्व कामे पूर्ण झाली. विद्यापीठास प्रादेशिक, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय दर्जा प्राप्त झाला. विद्यापीठ खऱ्या अर्थाने लोकपीठ व्हावे यासाठी अप्पासाहेबांनी जाणीवपूर्वक प्रयत्न केले. इमारती उभ्या केल्या. गरीब विद्यार्थ्यांसाठी कमवा व शिका योजना सुरू केली. व्याख्यानमाला सुरू झाल्या. संशोधनास चालना दिली. प्रारंभी विद्यापीठ क्षेत्रात तेहतीस महाविद्यालये होती. डॉ. अप्पासाहेब पवारांच्या १२ वर्ष १ महिन्याच्या

कार्यकाळात चौऱ्याऐंशी महाविद्यालये झाली. शिवाजी विद्यापीठाला सक्षम विद्यापीठ बनवून डॉ. अप्पासाहेब पवार २० जानेवारी १९७५ रोजी कुलगुरू पदावरून निवृत्त झाले.

अप्पासाहेब इतिहास संशोधक होते. मराठ्यांच्या इतिहासातील अनेक दुर्मिळ दस्तऐवज, पत्रे, दफ्तरे ह्यांचा अभ्यास व संशोधन करून त्यांनी ती प्रकाशित केली. जिजाबाई व ताराबाई कालीन कागदपत्रांबरोबरच छत्रपती राजर्षी शाहू महाराजांची कागदपत्रेही त्यांनी प्रकाशित केली.

डॉ. अप्पासाहेब पवार हे आदर्श शिक्षक, उत्कृष्ट प्रशासक, व्यासंगी इतिहास संशोधक व चिंतनशील शिक्षणतज्ज्ञ होते. शिवाजी विद्यापीठाचे शिल्पकार म्हणून त्यांचा सार्थ गौरव केला जातो.

– प्रा. महेश गायकवाड

**संदर्भ :**

## पवार, उदेसिंग अण्णा

**सामाजिक कार्यकर्ते**

**१६ नोव्हेंबर १९२७**



वरखेडे या जळगाव जिल्ह्यातील चाळीसगाव तालुक्यातील गावात एका सुखवस्तू व प्रगतशील शेतकरी कुटुंबात उदेसिंग अण्णा पवार यांचा जन्म झाला. पुणे येथील शेतकी महाविद्यालयामध्ये शिक्षण घेऊन ते शेतकी पदवीधर झाले. त्यावेळी त्यांना सरकारी नोकरीची संधी मिळत असताना देखील त्यांनी समाजसेवेत उडी घेतली. आपल्या गावात बंधाऱ्याचे काम हाती घेऊन गावाची जलसिंचन व्यवस्था त्यांनी केली. अण्णांना शेती, शिक्षण, सहकार, राजकारण, समाजकारण व आपत्ती व्यवस्थापन हे सर्व विषय अत्यंत आवडीचे होते . या सर्वात जास्त आवडीचा विषय म्हणजे शिक्षण. त्यांनी वरखेड्यात माध्यमिक शाळा सुरू केली.

चाळीसगाव तालुक्यातील शेतकरी सहकारी संघ, बेलगंगा सहकारी साखर कारखाना, शेतीमाल बाजार समिती या संस्थांमध्ये सतत कार्यरत राहण्याचे काम त्यांनी केले. त्यामुळेच महाराष्ट्र राज्य कृषी उत्पन्न बाजार समिती सहकार संघाचे सहा वर्षे संचालक म्हणून संधी मिळाली. कॉटन मार्केटिंग सहकारी फेडरेशन जळगावला संचालक होते. नगरदेबळ्याच्या सूत गिरणीचे चेअरमन म्हणून काम केले. स्टार्च फॅक्टरीचे संचालक झाले. त्यामुळे संपूर्ण जळगाव जिल्ह्याच्या सहकार क्षेत्रात उल्लेखनीय कामगिरी करीत आहेत. त्यामुळेच अनेक शासकीय समित्यांवर त्यांना सभासदत्व प्राप्त झाले.

शेतकीचे पदवीधर (बी .एस.सी.) असल्यामुळे त्यांचे मार्गदर्शन घेतले जाते. भारत कृषक समाज दिल्लीचे कायदे मंडळाचे सभासद म्हणून त्यांनी कार्य केले.उदेसिंग यांच्या शिक्षणप्रेमाची विशेष बाब म्हणजे चाळीसगाव तालुक्यातील तिन्ही अग्रगण्य शिक्षणसंस्थांशी त्यांचा संबंध आहे. उंबरखेड्याची सर्वोदय संस्था, चाळीसगावची राष्ट्रीय सहकारी शिक्षण प्रसारक मंडळ आणि चाळीसगाव एज्युकेशन सोसायटी या संस्थेत ते सदस्य आहेत. अनेक वर्षे अध्यक्ष म्हणून कार्यरत आहेत. त्यामुळेच सर्व विद्यार्थी, शिक्षक, मुख्याध्यापक, प्राचार्य यांना ते जवळचे वाटतात.

महाविद्यालयातील वादविवाद, वक्तृत्व स्पर्धा, विज्ञान प्रश्नमंजुषाविविध चर्चासत्र यांत पवार आवर्जून उपस्थित राहतात. विद्यार्थी व प्राध्यापकांना मार्गदर्शन करतात. शिक्षण विचारांपैकी उदेसिंहांचा एक विचार आदर्श म्हणून घेतला जावा असे वाटते. ज्या शिक्षण संस्थेत एखादी व्यक्ती, शिक्षक म्हणून काम करते त्या व्यक्तीने त्याच शिक्षणसंस्थेत आपली मुले शिक्षणासाठी ठेवावीत. हे सांगणारे शिक्षण संस्थेचे पहिलेच अध्यक्ष असावेत. शिष्यवृत्ती मिळविणाऱ्या मुलांचा गौरव आदर्श शिक्षकांचा गौरव, खेळाडूंना प्राधान्य महाविद्यालयातील स्पर्धा

प

जिंकणाऱ्यांचे कौतुक, शिक्षकांचे प्रशिक्षण, प्राचार्य, मुख्याध्यापकांना मार्गदर्शन या शैक्षणिक बाबींना त्यांनी महत्त्व दिले.

– म. ल. नानकर

## पळशीकर, वसंत विष्णु

**विचारवंत, संस्थापक, अभ्यासक**

**१८ फेब्रुवारी १९३६**

हैद्राबादला आर्किटेक्ट म्हणून नोकरी करणाऱ्या विष्णुपंत पळशीकर यांचे हे चिरंजीव. विष्णुपंतांना तीन अपत्ये–दोन मुली व एक मुलगा. गांधीजींच्या विचाराला जोडलेले हे कुटुंब. या कुटुंबात हैद्राबाद येथे वसंतराव यांचा जन्म झाला. वसंतराव यांना दोन बहिणी. त्यामधील मोठी बहीण उत्तर प्रदेशात डॉक्टर असून ग्रामीण विकासाचे काम करते. तर धाकटी बहीण हैद्राबाद येथे शिक्षिका होती. आईची हैद्राबाद येथे बालवाडी होती.

सर्व जाती धर्माची मुले या बालवाडीत शिक्षणासाठी येत. हीच त्या बालवाडीची खासियत होती. सामाजिक व शैक्षणिक कार्याचा वारसा वसंतरावांना त्यांच्या आईकडूनच मिळाला. वसंतरावांच्या शिक्षणाचा प्रारंभ या बालवाडीतून झाला.

प्राथमिक शिक्षण हैद्राबाद येथे 'विवेक वर्धिनी' या महाराष्ट्रीयन शाळेत आले. ५ वी ला ते अहमदनगरला झाले. ५ वी ते ८ वी नगरला सोसायटी विद्यालय (आत्ताचे फिरोदिया) मधे, तर ९ वी चे एक वर्ष मॉडर्न महाविद्यालय पुणे येथे व पुन्हा १०, ११ वी नगरला सोसायटी विद्यालयामध्ये झाले. वडिलांच्या नोकरी निमित्ताने महाविद्यालयीन शिक्षण पुन्हा हैद्राबाद येथे झाले. इंटर सायन्स झाल्यानंतर ते शिकत होते पण त्यांच्या मनात वेगळेच होते.

सहा महिने शेतकी महाविद्यालयात काढले. त्यांचे मन शिक्षणात नव्हतेच. औपचारिक शिक्षणाला रामराम ठोकून ते विनोबांच्या 'भूदान' चळवळीत सामील झाले. गावोगावी फिरणे यामधून त्यांना भारताचे वास्तव रूप समजले. 'भूदान' चळवळीतही ते फार काळ टिकले नाहीत. 'स्थिरता' हा त्यांचा स्वभाव नव्हता. आजही नाही, पण इथपासून त्यांच्या खऱ्या अनौपचारिक शिक्षणाला प्रारंभ झाला. सर्वोदय चळवळ, भूदान व साधना साप्ताहिक या ठिकाणी विविध अनुभवांची कामे करायला मिळाली. यातूनच त्यांच्या मनाची खरी जडण–घडण झाली. अभियांत्रिकी, वैद्यकीय या अभ्यासाऐवजी ते समाज अभ्यासक झाले. माणसं वाचायला शिकले. याच वेळी त्यांनी पुण्यामध्ये समाज प्रबोधन संस्थेचे काम सुरू केले. हे कार्य करत असताना वसंतरावांचा संबंध शंकरराव देव, देवदत्त दाभोळकर, ग. प्र. प्रधान, भालचंद्र भणगे, अ.भि. शहा, अच्युतराव पटवर्धन, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, रावसाहेब पटवर्धन, साने गुरुजी, यदुनाथ थत्ते या व्यक्तींशी आला. तो पुढे दृढ झाला व तत् संबंधीच्या कार्यात ते गढून गेले. त्या काळी 'भूदान' हे रावसाहेब पटवर्धनांचे मासिक अत्यंत प्रसिद्ध व गाजलेले होते. त्या अंकात रावसाहेब पटवर्धनांचे मुख्य लेखनिक म्हणून वसंतराव पळशीकर होते. आजही त्यांच्या स्वभावात या व्यक्तींच्या विचारांचा ठसा आहे.

समाज प्रबोधन पत्रिकेचे काम करता करता त्यांचा संबंध 'नवभारत' या मासिकाशी आला व या ठिकाणी म्हणजे वाईला ते मे. पु. रेगें यांच्याबरोबर काम करू लागले. सुमारे एक तप म्हणजे १२ वर्षे ते नवभारतचे काम करत होते. हे काम करत असताना त्यांचे वाचन अखंड सुरू होते. विशेषत: वृत्तपत्रातील अग्रलेखांचे वाचन हा त्यांचा आवडता छंद. परिसर संस्था, पर्यावरणाविषयी सम्यक दृष्टी व शिक्षणाच्या कामात त्यांना अधिक रस होता. इंग्रजांनी सुरू केलेल्या शिक्षण व्यवस्थेला ते कामगार निर्माण करणाऱ्या शाळा म्हणत. आपली संस्कृती, आपले शिक्षण, आपले विचार हे सगळे इंग्रजांच्या काळात पुसले गेले असे त्यांचे स्पष्ट विचार होते. आपल्याला याचा नव्याने विचार करावा लागेल या भावनेने वसंतराव यांनी माजी शिक्षण संचालक वि. वि. चिपळूणकर व विद्या पटवर्धन यांच्या सहकार्याने कै. नाना नारळकर न्यासाच्या माध्यमातून शिक्षकांसाठी शिबिरे घेण्याचे काम सुरू केले. दोन–तीन शिबिरांनंतर समविचारी व्यक्तींचा गट एकत्रित आला व त्यामधून 'अक्षरनंदन' या शाळेचा जन्म झाला.

या शाळेच्या व्यवस्थापनाशी वसंतराव आजही निगडीत आहेत. या शाळेचा 'थिंक टँक' म्हणून यांच्याकडे पाहिले जाते.

इंग्रजी वाचन व चित्रपट पाहणे हे त्यांचे आवडते छंद. मार्क्सवाद, गांधीवाद, समाजवाद किंवा हिंदुत्ववादी या कोणत्याही विचारात वसंतरावांचा स्वभाव बसत नाही 'स्वयंसेवी संस्थांचे अधिष्ठान' पक्के करणे हे त्यांचे मुख्य कार्यक्षेत्र. त्यासाठी सातत्याने विचारांचे खंडण-मंडण करणे, क्षेत्र भेटी व त्यामधून क्षेत्र अभ्यास करणे, वैचारिक प्रबोधन करणे हे त्यांच्या कामाचे प्रमुख सूत्र आहे, दिशा आहे, वाटचाल आहे असे म्हणतात.

'सत्याग्रही सॉक्रेटिसचे वीरमरण' हे त्यांचे गाजलेले पुस्तक. 'विकासाची व्याख्या आणि विकासाचा मार्ग' , तसेच 'विकास आणि तारतम्य' हे त्यांचे गाजलेले लेख. त्यांच्या कार्याचा गौरव म्हणून त्यांना महाराष्ट्र फौंडेशनचा पुरस्कार दिला गेला व विचारवेध संमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली होती. कोणतीही व्यक्ती परिपूर्ण कधीच नसते त्यामुळे व्यक्तीला पुरस्कार, सन्मान, पारितोषिके देणे या विचारसरणीच्या ते विरोधी आहेत त्यामुळे त्यांनी अनेक पुरस्कार-सन्मान नाकारलेले आहेत. अमृत महोत्सवी वर्षाकडे त्यांचा प्रवास सुरू आहे. आजही शिक्षणाविषयी त्यांचे चिंतन सुरू आहे. आंध्र प्रदेश, कर्नाटक, तामिळनाडू, पाँडेचरी, गोवा, केरळ आणि महाराष्ट्र या दक्षिणेकडील राज्यांमधल्या ५० कृतिशील शैक्षणिक कार्यकर्त्यांचा गट म्हणजे 'नेटवर्क' आहे. वसंतराव हे याचे प्रमुख आधारस्तंभ व मार्गदर्शक आहेत.

– डॉ. अ. ल. देशमुख

## पाटणकर, बाळकृष्ण गोविंद

**व्यायाम शिक्षक**

**१९०७ – १९८६**

बाळकृष्ण यांचे वडील गोविंदराव भोरच्या राजाकडे मामलेदार हुद्द्यावर कार्यरत होते. बाळकृष्ण यांचे इयत्ता आठवीपर्यंतचे शिक्षण भोर येथे झाले. त्यांना व्यायामाची अतिशय आवड होती. त्यांची शरीरयष्टी अत्यंत दणकट



व मजबूत होती. त्यांना लष्करात नोकरी मिळाली होती, परंतु चांगली कामगिरी करूनही केवळ 'हिंदुस्थानी' म्हणून इंग्रजांनी त्यांना बढती नाकारली. स्वाभिमानी व कर्तृत्वसंपन्न पाटणकरांनी ती नोकरी सोडली.

नंतर पुणे येथे लिमये महाराजांकडे मसाज करण्याचे शिक्षण घेऊन ते विलेपार्ले, मुंबई येथे स्थायिक झाले. तेथेच पार्ले टिळक विद्यालयात व्यायाम शिक्षक म्हणून त्यांनी २८ वर्षे सेवा- केली. कांदिवली, मुंबई येथे शारीरिक प्रशिक्षणाची (पी.टी) चे नियमित शिक्षण घेतले. शाळेला विस्तृत मैदान लाभले होते व शाळेची व्यायाम शाळाही होती. रोज सकाळी पाटणकर व्यायाम शाळेत मुलांना शिक्षण देत. त्यांनी मुलांमध्ये व्यायाम व खेळाची आवड उत्पन्न करून त्यांना सूर्य नमस्कार, बैठका, धावकी, मल्लखांब, हुतुतू, खोखो, लंगडी, बास्केटबॉल यांचे विशेष शिक्षण देऊन या सर्व प्रकारांचे संघ तयार केले. हुतुतू व खोखोच्या संघांनी शाळेला अनेक ढाली व बक्षिसे मिळवून दिली. बास्केट बॉलसाठी प्रशिक्षक आणवून, स्वत: शिक्षण घेऊन त्यांनी मुलांची व मुलींची शास्त्रशुद्ध तयारी करवून घेतली. पाटणकांच्या बास्केटबॉल संघाने शाळेचे नाव महाराष्ट्रातच नव्हे, तर दिल्लीतही राष्ट्रीय पातळीवर गाजवले.

मंगला जनार्दन भिडे (आता वैशाली विजय दामले) ही बास्केटबॉलच्या राष्ट्रीय पातळीवर खेळलेली खेळाडू होय. १९५५ च्या पार्ले चॅलेंजर संघात हुतुतू साठी पार्ले टिळक विद्यालयाच्या खेळाडूंची राष्ट्रीय पातळीवर निवड झाली. त्यापैकी नलिनी फडणीस, वेणू कुंटे (आता मराठे, प्रभावती नवाथे, नलिनी सहस्रबुद्धे ही काही नावे.) पाटणकर सर सकाळी लवकर उठून खेळाडूंना त्यांच्या घरी जाऊन उठवत व शाळेच्या मैदानावर त्यांना आणून त्यांची कसोशीने तयारी करून घेत. त्यांनी अनेक प्रसंगी स्वत:च्या पैशांनी मुलामुलींना खायला-प्यायला दिले.

प

प्रशिक्षणासाठी त्यांना कोणतेही भत्ते वा वेतन मिळत नसे. पाटणकरांचे एकच व्यसन ते म्हणजे व्यायाम व खेळ.

शाळेचे मैदान हीच त्यांची कर्मभूमी. शाळेला नाव मिळवून देण्यासाठी त्यांनी आपल्या जिवाचे रान केले. त्यांच्या कारकिर्दीत शाळेला अनेकदा हिंद पारितोषिक मिळाले. त्यांच्या पत्नी सुशीला या देखील शिक्षिका होत्या. शिक्षणाची मनस्वी आवड असणाऱ्या पाटणकरांनी लग्नानंतर आपल्या पत्नीला बी. ए बी. एड. केले. सुशीलाबाईंची आपल्या पतीला मोलाची साथ मिळाली. पाटणकर यांचा आवाज धारदार व खडा होता. २६ एप्रिल १९६८ रोजी ते निवृत्त झाले, त्यानंतरही त्यांनी बास्केटबॉल, खोखो, हुतुतू चे प्रशिक्षक या नात्याने अनेक संघ तयार केले. हे करत असताना त्यांनी होमिओपॅथीचे व आयुर्वेदिक औषधांचे शिक्षण घेतले. ते नावाजलेले मसाजिस्ट व बोन सेटर होते. सरकारी दरबारी 'व्यायाम पाटणकर' अशीच त्यांची ख्याती होती.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

प

## पाटणकर, भालचंद्र लक्ष्मण

**शिक्षक, प्राचार्य**

**१५ एप्रिल १८९४ – १४ सप्टेंबर १९७३**



भालचंद्र लक्ष्मण तथा मामा पाटणकरांचा जन्म अहमदनगर येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षणही तेथेच झाले. मुंबईमध्ये त्यांनी एम.ए. पदवी मिळविली व गोखले एज्युकेशन सोसायटीत ते प्राध्यापक म्हणून दाखल झाले. गोखले एज्युकेशन सोसायटीच्या हंसराज प्रागजी ठाकरसी म्हणजे एच.पी. टी महाविद्यालयाची स्थापना प्राचार्य टी.ए. कुलकर्णी यांनी १९२४ मध्ये नाशिक येथे केली होती. प्रा. भा. ल. पाटणकर हे त्यांचे प्रारंभापासूनचे विश्वासू सहकारी व उपप्राचार्य होते. इंग्रजी हा पाटणकरांचा अध्यापनाचा विषय. ते इंग्रजी साहित्य शिकवीत. शेक्सपीयरची नाटके तर ते साभिनय शिकवीत. मुंबई विद्यापीठाच्या विविध समित्यांवर त्यांनी काम केले. पुणे विद्यापीठाच्या संस्थापनेचे ते साक्षीदार होते.

पाटणकर प्रारंभापासून ते महाविद्यालयाचे प्राचार्यपद स्वीकारीपर्यंत नाशिकच्या पगडबंद लेनमध्ये राहत होते. १९ जानेवारी १९३० रोजी नाशिकच्या 'वाङ्मय विहार मंडळाने' 'माधवी' हा नाशिकमधील कवींच्या स्फुट कवितांचा संग्रह प्रसिद्ध केला. पाटणकर त्यावेळी या मंडळाचे चिटणीस होते व संपादनात त्यांचा महत्त्वाचा सहभाग होता. या संग्रहात रा. श्री. जोग, ह.भ.प. ल. रा. पांगारकर, लक्ष्मीबाई टिळक, कुसुमाग्रज या पुढे विख्यात झालेल्या कवींच्या कविता होत्या.

१० जानेवारी १९४० रोजी नाशिकच्या सार्वजनिक वाचनालयाचा शताब्दी महोत्सव स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकरांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. त्यावेळी पाटणकर वाचनालयाचे अध्यक्ष होते.

१९४२ मध्ये आचार्य अत्रे यांच्या अध्यक्षतेखाली झालेले अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन यशस्वी करण्यात पाटणकरांचा वाटा होता. लोकहितवादी मंडळाची १९५० मध्ये स्थापना होण्यापूर्वी पाटणकरांनी नाशिकमध्ये महाराष्ट्र साहित्य परिषदेची शाखा काही वर्षे चालविली होती.

महाविद्यालयाचे प्राचार्यपद स्वीकारताच त्यांनी महाविद्यालयाची विज्ञान शाखा सुरू केली व नाशिकच्या शिक्षण संस्कृतीला नवा आयाम दिला. पाटणकर महाविद्यालयाचे प्राचार्य असताना शुल्क भरायला पैसे नाहीत म्हणून एकाही विद्यार्थ्याचे शिक्षण अपुरे राहिले नाही. ज्या विद्यार्थ्यांजवळ पैसे नसत त्यांचे शुल्क ते स्वत: भरत. निवृत्त झाल्यावर त्यांनी नाशिक शहरात महिलांसाठी महाविद्यालयीन शिक्षणाचे वर्ग 'जिज्ञासा महाविद्यालय' या नावाने गावात सुरू केले. हे वर्ग संध्याकाळी भरत. नोकरी करणाऱ्या, घरकाम करणाऱ्या

व संसार करणाऱ्या स्त्रियांना शिक्षण मिळावे ही त्यांची तळमळ होती. शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्या आपल्या सहकाऱ्यांना व विद्यार्थ्यांना पाटणकरांनी महाविद्यालयात विनावेतन काम करावयास लावले व त्यांच्यावरील प्रेमाने सर्वांनी त्यांना सहकार्य केले.

शिक्षणाचे महत्त्व जाणून याच महाविद्यालयात महिलांना संगीत, चित्रकला, नृत्यकला अशा विषयांचे मार्गदर्शन तर मिळावेच, पण शिवणकाम, भरतकाम, लघुउद्योग या संसार सांभाळून उपजीविकेसाठी करता येणाऱ्या कार्याचे शिक्षण मिळावे ही त्यांची तळमळ होती. मात्र त्यांच्या पत्नी विनोदाचार्य श्री. कृ. कोल्हटकर ह्यांच्या कन्या कमलाबाई व स्वत: पाटणकर यांच्या आजारामुळे नाशिक सोडून त्यांना मुंबईस त्यांचे चिरंजीव प्रख्यात समीक्षक डॉ. रा. भा. पाटणकर यांच्याकडे जावे लागले. विविध कार्यानुभवाच्या शिक्षणाची सुविधा महाविद्यालयात उपलब्ध करून देण्याचे त्यांचे स्वप्न अपुरे राहिले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## पाटणे, जगन्नाथ शिवराम

**संस्थापक**

**२६ मे १९११ – १६ मे १९९९**



जगन्नाथ शिवराम पाटणे ऊर्फ भाऊसाहेब यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील खेड येथे झाला.लहानपणापासून आईच्या संस्कारामुळे आणि शिक्षणामुळे माणसाकडे माणूस म्हणून पाहण्याची दृष्टी त्यांना मिळाली होती. त्या काळात खेडमध्ये एकही शिक्षणसंस्था नव्हती. एकच शिक्षक चौथीपर्यंत मुलांना शिकवायचा, त्यानंतर मुलांना खेड सोडून बाहेर शिक्षणासाठी जावे लागत होते. त्यामुळे खेड तालुक्यात चांगल्या शिक्षणसंस्था उभ्या राहिल्या पाहिजेत असा ध्यास भाऊसाहेबांनी घेतला होता. भाऊसाहेबांनी खेडमध्ये सर्वप्रथम माध्यमिक शाळा सुरू केली. त्यासाठी त्यांनी १९४२ मध्ये खेड व्यापारी धर्मादाय एज्युकेशन सोसायटीची स्थापनाही केली. १९५२ ते १९५९ पर्यंत सोसायटीच्या संचालक पदाची धुरा त्यांनी सांभाळली. दातार महाविद्यालयाच्या नियामक मंडळावर तसेच चिपळूणच्या ‘दी कोकण एज्युकेशन सोसायटीच्या’ व्यवस्थापन समितीचे ते सदस्य होते. पुणे विद्यापीठाच्या सिनेटवरही सदस्य म्हणून त्यांनी काही काळ काम पाहिले.

खेड्या-पाड्यातील जनतेमध्ये वाचनाची आवड निर्माण व्हावी यासाठी त्यांनी १९४५ मध्ये खेड नगर वाचनालयाची स्थापना केली. त्यानंतर ते आयुष्यभर या संस्थेचे सल्लागार म्हणून काम पाहात होते. संयुक्त महाराष्ट्र समितीतर्फे १९५७ मध्ये ते खेडचे आमदार झाले त्यापूर्वी त्यांनी खेड नगराध्यक्ष पदही भूषविले होते. खेड अर्बन बँकेचे प्रथम सचिव नंतर संचालक म्हणून त्यांनी १९४१ पासून काम पाहिले. त्यानंतर १९७६ पासून दहा वर्षे ते अर्बन बँकेचे संचालक होते. त्यांच्या पत्नी सरला पाटणे या सुद्धा खेड अर्बन बँकेच्या संचालक होत्या. भाऊसाहेबांनी दलितांसाठी केलेल्या कार्याची दखल राज्यशासनाने घेऊन १९८२ – ८३ मध्ये त्यांना ‘दलितमित्र’पुरस्कार ही प्रदान करण्यात आला. त्यांच्या या कार्याचा गौरव करण्यासाठी आणि भाऊसाहेबांच्या स्मृतिप्रीत्यर्थ खेडमध्ये जगन्नाथ कॉम्प्लेक्स ही उभारण्यात आले. खेड तालुक्याचा कायापालट करण्यात त्यांचा मोठा वाटा होता.

– समीर कोडीलकर

## पाटील, नारायण ज्ञानदेव

***एन. डी. पाटील***

**संस्थापक**

**१५ जुलै १९२९**

☞ **मुख्य नोंद – राजकारण खंड**

नारायण ज्ञानदेव पाटील उर्फ एन.डीं. चा जन्म ढवळी (नागाव), जि. सांगली या खेडेगावात शेतकरी कुटुंबात झाला. घरी शिक्षणाचे वातावरण नव्हते, तरीही प्रतिकूल परिस्थितीत एम.ए. (अर्थशास्त्र) व एलएल.बी. (पुणे

प



विद्यापीठ) या पदव्या त्यांनी संपादन केल्या. त्यानंतर त्यांनी स्वत:ला शैक्षणिक, राजकीय व सामाजिक कार्यात झोकून देऊन कार्य केले आहे व आजही करीत आहेत. एन.डी. पाटील यांनी आपल्या शैक्षणिक कार्याची सुरुवात छत्रपती शिवाजी महाविद्यालय, सातारा येथे केली. अर्थशास्त्र विषयाच्या अध्यापनाबरोबरच त्यांना कमवा व शिका या योजनेचे कामकाज पाहावे लागत असे.

याशिवाय वसतिगृहाचे अधिकारी म्हणूनही ते काम करीत होते. वसतिगृहात राहणाऱ्या ग्रामीण भागातून आलेल्या विद्यार्थ्यांना सातत्याने आर्थिक विवंचनेला तोंड द्यावे लागत असे. त्यामुळे त्यांना भोजनशुल्क वेळेवर भरणे शक्य होत नसे. ठराविक कालावधीनंतर भोजन शुल्क न भरणाऱ्या विद्यार्थ्यांचे भोजन बंद होत असे. त्यावेळी अधिकारी या नात्याने एन.डी. हे स्वत:ही जेवण घेत नसत. त्यामुळे ते विद्यार्थीप्रिय प्राध्यापक म्हणूनही ओळखले जाऊ लागले.

इस्लामपूर हे वाळवे तालुक्यातील सर्वात मोठे गाव. सदर गावात ग्रामीण भागातून व परिसरातून येणाऱ्या विद्यार्थ्यांना माध्यमिक शिक्षण सुलभतेने प्राप्त व्हावे यासाठी एन.डीं.नी. पुरोगामी विचारसरणीच्या कार्यकर्त्यांना प्रोत्साहन देऊन 'महात्मा फुले शिक्षण संस्थे'ची स्थापना केली व माध्यमिक विद्यालय सुरू केले.

कालांतराने महाविद्यालयाची आवश्यकता भासू लागली. या कालावधीत एन.डी. कर्मवीर अण्णांना भेटण्यास गेले असता चर्चेच्या ओघात अण्णांनी एन. डीं. ना. सूचित केले की, इस्लामपूरसारख्या नगरपालिका असणाऱ्या व तालुक्यातील सर्वात मोठ्या गावात महाविद्यालय शिक्षणाची सोय व्हावी यासाठी तू प्रयत्न करावेस. अण्णांची ही इच्छा पूर्ण करण्यासाठी एन.डीं. नी राजकीय विरोधाला न जुमानता महात्मा फुले शिक्षण संस्थेद्वारा पुणे विद्यापीठाकडून परवानगी घेऊन महाविद्यालय सुरू केले. सदर महाविद्यालयास कर्मवीर भाऊराव पाटील हे नाव देऊन प्रारंभीच्या काळात सदर महाविद्यालयाचे प्राचार्य पद भूषविले. याच संस्थेद्वारा कालांतराने होमिओपॅथीचे शिक्षण देणारे महाविद्यालय सुरू करून परिसरातील विद्यार्थ्यांची सोय केली.

महाराष्ट्र शासनाने विनाअनुदान तत्त्वाचा स्वीकार केल्याने ठिकठिकाणी आयुर्वेद, ॲलोपॅथी व होमिओपॅथीचे शिक्षण देणारी महाविद्यालये सुरू झाली. प्रवेशासाठी लाखो रुपयांच्या देणग्या घेण्याची प्रथा सुरू झाली. आपण या स्पर्धेत न उतरणेच चांगले हे त्यांनी सहकाऱ्यांना पटवून दिले व होमिओपॅथीक महाविद्यालय बंद केले.

शिवाजी विद्यापीठाची स्थापना कोल्हापूर येथे झाल्यावर एन.डीं.ची निवड या विद्यापीठाच्या सल्लागार समितीचे सदस्य म्हणून करण्यात आली (१९६२). त्यानंतर त्यांनी सदस्य म्हणून काही काळ काम केले (१९६५). कार्यकारिणी सदस्य म्हणून १९६२ ते ७८ या कालावधीत काम केले तसेच सामाजिक शास्त्र विभागाचे अधिष्ठाता म्हणून (१९७६ ते ७८) एन. डी. पाटील कार्यरत होते. शिवाजी विद्यापीठाच्या स्थापनेपासून या विद्यापीठाचा विकास व्हावा यासाठी प्रयत्न करणाऱ्यात एन.डीं. चे स्थान महत्त्वाचे मानले जाते.

कर्मवीर अण्णा १९५९ मध्ये ससून रुग्णालयामध्ये राहून उपचार घेत होते. त्यावेळी त्यांनी एन.डीं.ना पुणे येथे बोलावून घेतले व संस्थेच्या विकासासाठी काम करणे कसे आवश्यक आहे या संदर्भात चर्चा केली. चर्चेनंतर कर्मवीरांनी एन.डीं. ना कार्यकारी मंडळाचे सदस्यत्व स्वीकारून संस्थेचे कार्य गतिमान राहावे यासाठी कार्यरत राहण्यास सांगितले.

कर्मवीर अण्णांच्या सूचनेनुसार कार्यकारी मंडळाचे सदस्यत्व स्वीकारून आजतागायत एन.डी. संस्थेच्या कार्यात लक्ष घालत आहेत. १९६९ पासून ते संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य म्हणूनही काम करीत आहेत. एक अभ्यासू व कृतिशील सदस्य म्हणून ते ओळखले जातात. १९९० ते २००८ या कालावधीत कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष या नात्याने त्यांनी संस्थेस आर्थिक स्थैर्य

प्राप्त व्हावे यासाठी दुर्बल शाखा निधीची स्थापना, काटकसरीच्या धोरणांचा स्वीकार, कृतज्ञता निधीस प्रारंभ आदी उपाययोजनांचा अवलंब केला आहे. माध्यमिक शाळांचा विकास व्हावा, विद्यार्थ्यांची गुणवत्ता वाढावी यासाठी रात्र व दिवस अभ्यासिकांची सोय, शिक्षक प्रशिक्षण, आश्रमशाळा अद्ययावत करणे आदी उपक्रम कार्यवाहीत आणले आहेत.

अभियांत्रिकी महाविद्यालयामध्ये व्यवस्थापन कोट्यामधून भरल्या जाणाऱ्या सर्व जागा फीशिवाय एकही पैसा जादा न घेता गुणवत्तेच्या आधारेच भरण्याचा धोरणात्मक निर्णय कार्यवाहीत आणला आहे.

५ वी ते ७ वी या माध्यमिक शाळांना जोडून असणाऱ्या वर्गांसाठी डी.एड. शिक्षकच असावेत असा निर्णय सर्वोच्च न्यायालयाने दिल्यानंतर त्या जागा भरताना १२ वी व डी.एड. च्या परीक्षेत प्राप्त झालेल्या गुणांची सरासरी काढून त्या उमेदवारांना मुलाखत न घेता गुणवत्तेच्या आधारेच संस्थेत नियुक्त करण्याचे धोरण त्यांनी कार्यवाहीत आणले आहे.

महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षण आयोगाचे सदस्य या नात्याने १ ते १४ वयोगटातील विद्यार्थ्यांना मोफत शिक्षण दिले जावे यासाठी ते सातत्याने प्रयत्न करीत आहेत. १९६५-६६ मध्ये महाराष्ट्र शासनाने शिक्षणाची पुनर्रचना व्हावी यासाठी धोरण आखण्याचे ठरवून त्या संदर्भात श्वेतपत्रिका प्रसिद्ध केली होती.

या धोरणात प्रगत व अप्रगत असे अभ्यासक्रमाचे दोन स्तर निश्चित करण्यात आले होते. या धोरणामुळे अप्रगत स्तरातील अभ्यासक्रम पूर्ण करून दहावी परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्यांना महाविद्यालयीन प्रवेशाची कवाडे खुली राहणार नव्हती. त्यामुळे ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांवर फार मोठ्या प्रमाणावर अन्याय होण्याची शक्यता होती.

हे ओळखून 'शासकीय धोरण हे सर्वसामान्य विद्यार्थ्यांच्या हितास बाधक ठरणारे आहे. त्यामुळे त्याची कार्यवाही होता कामा नये' ही भूमिका एन. डी. पाटील यांनी ठामपणे जनतेसमोर मांडण्याचे ठरवले. सर्वांना समान अभ्यासक्रम असावा हे उद्दिष्ट समोर ठेवून एन.डीं.नी महाराष्ट्रभर जनजागृती मोहीम हाती घेतली व संपूर्ण महाराष्ट्र पिंजून काढला.

महाराष्ट्र विधानसभा व विधानपरिषदेतील लोक प्रतिनिधींना संबोधून एन. डी. पाटील यांनी शासनाच्या धोरणातील फोलपणा समजावून दिला व सर्वांना समान अभ्यासक्रम असावा म्हणजे सर्वजण आपापल्या कुवतीनुसार आपली प्रगती करू शकतील, हे तत्त्व त्यांच्या गळी उतरवले.

जनमताच्या या रेट्यामुळे शासनास श्वेतपत्रिका मागे घेणे भाग पडले व विद्यार्थ्यांमध्ये संभाव्य भेदभाव आपोआपच नाहीसा झाला.

दक्षिण महाराष्ट्र शिक्षण संस्था बेळगाव या सभेचे अध्यक्ष या नात्याने त्यांनी शिक्षणाची गुणवत्ता वाढावी यासाठी मार्गदर्शन करून त्या संस्थेस सीमा भागातील शिक्षण प्रसारासाठी प्रयत्नशील ठेवले आहे.

शैक्षणिक क्षेत्रातील कार्याबरोबरच राजकीय व सामाजिक क्षेत्रातही त्यांनी महत्त्वाची भूमिका पार पाडली आहे. ते १८ वर्षे विधान परिषदेचे सदस्य होते. शेतकरी कामगार पक्षाचे सरचिटणीस म्हणून ते आजही काम पाहतात. सहकार मंत्री म्हणून १९७८-८० या दोन वर्षांत सहकार क्षेत्रात त्यांनी महत्त्वाची कामगिरी बजावलेली आहे.

१९८५-१९९० या पाच वर्षांत ते विधानसभा सदस्य होते. लोकशाही आघाडीचे निमंत्रक- १९९९ ते २००२, महाराष्ट्र राज्य सीमाप्रश्न समिती सदस्य, सीमाप्रश्न चळवळीचे नेते, अध्यक्ष- अंधश्रद्धा निर्मूलन समिती महाराष्ट्र, उपाध्यक्ष- समाजवादी प्रबोधिनी, इचलकरंजी, जागतिकीकरण विरोधी कृती समिती (मुख्य निमंत्रक) या भूमिकाही त्यांनी यशस्वीपणे साकारल्या आहेत.

त्यांच्या शिक्षण व इतर क्षेत्रातील कामामुळे त्यांना भाई माधवराव बागुल पुरस्कार मिळाला. तसेच नांदेडच्या स्वामी रामानंदतीर्थ विद्यापीठाने, डॉ. बाबासाहेब आंबेडकर विद्यापीठाने आणि शिवाजी विद्यापीठाने एन. डी. पाटील यांना डी. लिट ही पदवीही त्यांना प्रदान केली.

– प्रा. वसंत रोकडे

प

## पाटील, पांडुरंग गणपत

**शिक्षक, प्राचार्य, कुलगुरु**

**३ जुलै १९२१ – १ जुलै २००३**



प्राचार्य पांडुरंग गणपत पाटील यांचा जन्म कवलापूर जि. सांगली येथे झाला. त्यांची मातृछत्र लहानपणीच नाहीसे झाले. वडील प्राथमिक शिक्षक होते. त्यांनाही १९४० मध्ये देवाज्ञा झाली. त्यामुळे त्यांचा सांभाळ आजीनेच केला.

१९३४ मध्ये कर्मवीर भाऊराव पाटील यांनी कवलापुरास राजरत्न माने-पाटील यांना भेट दिली असता प्राथमिक शाळेच्या हस्तलिखितात सुंदर हस्ताक्षरातील लेख पाहिला. हा लेख पांडुरंग पाटील या विद्यार्थ्याने लिहिलेला आहे असे समजताच त्यांनी सदर विद्यार्थ्यास आजीच्या संमतीने सातारा येथील वसतिगृहात आणले. (१९३४-४०) शिक्षणासाठी त्यांना नगरपालिका शाळा नं. ३ येथे घातले. याच शाळेतून त्यांनी १९३५ मध्ये व्हर्नाक्युलर फायनल परीक्षा मध्य विभागातील दहा जिल्ह्यात प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण केली. न्यू इंग्लिश स्कूल, सातारा मधून १९४० मध्ये मॅट्रिकची परीक्षा विशेष प्राविण्यासह ते उत्तीर्ण झाले.

इंटर आर्टसची परीक्षा (१९४२) ते प्रथम वर्गात उत्तीर्ण झाले. इंग्रजी विषयात त्यांनी हचलिंग्ज पारितोषिक संपादन केले. फर्गसन महाविद्यालय, पुणे येथून १९४५ मध्ये बी.ए. ची परीक्षा इंग्रजी ऑनर्ससह उत्तीर्ण झाले. इंग्रजी विषयात प्रथम आल्याबद्दल मुंबई विद्यापीठाची एलिस शिष्यवृत्ती मिळाली. उच्च शिक्षणासाठी १९४६ – ५१ इंग्लंडमध्ये वास्तव्य केले. १९४९ किंग्ज कॉलेज, लंडन येथून इंग्लिश विषयातून त्यांनी बी.ए. पदवी घेतली. २३ जुलै, १९५२ बार ॲट लॉ ही पदवी प्राप्त झाली.

भारतात परत आल्यानंतर आर्थिक लाभाच्या उच्च पदावर काम करण्याच्या संधी उपलब्ध असतानाही महात्मा गांधी व कर्मवीर अण्णा यांना दिलेल्या वचनाचे पालन करण्यासाठी छत्रपती शिवाजी महाविद्यालय, सातारा येथे त्यांनी शिक्षक म्हणून १२० रूपये पगारावर काम करण्यास प्रारंभ (१९५२) केला.

१९५४ मध्ये त्यांनी एम. ए. इंग्रजी ही परीक्षा दिली. ही परीक्षा ते पुणे विद्यापीठात प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. इंग्रजी विषयाचे प्राध्यापक म्हणून त्यांनी लौकिक संपादन केला. शिवाजी महाविद्यालय, सातारा मधून त्यांची बदली कराड येथे झाल्यानंतर एम.ए. (इंग्रजी) चे वर्ग कराड येथे सुरू करण्यास शिवाजी विद्यापीठाने खास बाब म्हणून परवानगी दिली. पी.जी. व त्यांच्या पत्नी सुमतीबाई पाटील यांनी एम.ए. (इंग्रजी) च्या अध्यापनातून शिवाजी व पुणे विद्यापीठ क्षेत्रातील महाविद्यालयांना इंग्रजी विषयाचे प्राध्यापक उपलब्ध करून दिले.

१९५७-६४ या कालावधीत ते छत्रपती शिवाजी महाविद्यालयाचे प्राचार्य होते. सद्‌गुरू गाडगे महाराज महाविद्यालय, कराड येथे ३ वर्षे व शाहू महाविद्यालय, कोल्हापूर येथे २ वर्षे त्यांनी प्राचार्य म्हणून काम केले. या कालावधीत त्यांनी विद्यार्थ्यांची गुणवत्ता वाढावी यासाठी विविध उपक्रम राबविले. प्रशासन हे विद्यार्थ्याभिमुख असावे हा दृष्टिकोन कार्यवाहीत आणला. कमवा व शिका या योजनेतील विद्यार्थी बहुश्रुत व्हावेत यासाठी खास प्रयत्न केले. विद्यार्थ्यांनी शिस्तबद्ध रीतीने आपले जीवन घडवावे यासाठी आपल्या व्याख्यानाद्वारे विद्यार्थ्यांमध्ये जाणीव जागृती केली.

बॅरिस्टर पी.जी. पाटील हे उत्तम शिक्षक होते. कुशाग्र बुद्धिमत्ता, इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, गाढा व्यासंग, प्रभावी अध्यापन शैली यामुळे त्यांचे अध्यापन विद्यार्थ्यांना प्रेरणा देत असे. व्याख्यानात ते अनेक लेखकांचे आणि कवींचे संदर्भ देत असत. क्रमिक पुस्तकांच्या चाकोरीतच स्वत:ला बंदिस्त न ठेवता विद्यार्थ्यांना काहीतरी नवीन अपूर्व असे सांगण्याचा त्यांचा प्रयत्न असे. त्यांच्या या पद्धतीमुळे त्यांच्या अनेक विद्यार्थ्यांनी स्वत:चा व्यासंग वृद्धिंगत केला व आदर्श, शिक्षक व प्राध्यापक असा लौकिक संपादन केला आहे. पी.जी. सरांचे वक्तृत्व हे सर्वसामान्य श्रोत्याला समजणारे होते. अवघड विषय सोपा करून सांगण्याची

त्यांची हातोटी सर्वांना आपल्याबरोबर घेऊन जात असे. भाषणात अनेक अवतरणे, उदाहरणे यांचा समावेश आपोआपच होत असे. त्यांनी आपल्या ज्ञानाचा उपयोग समाजप्रबोधनासाठी केला. लोकशिक्षण व प्रबोधन व्हावे हाच उद्देश समोर ठेवून महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात जाऊन त्यांनी व्याख्याने दिली.

१३ जानेवारी १९७५ रोजी शिवाजी विद्यापीठाचे कुलगुरू म्हणून त्यांची नेमणूक राज्यपालांनी केली. त्यावेळी सर्व सामान्य जनतेने त्यांचे प्रचंड स्वागत केले. आपल्या कुलगुरू पदाच्या कालावधीत त्यांनी विद्यापीठ हे विद्यार्थ्यांचे हितसंबंध जपणारी संस्था आहे याचा विसर पडू दिला नाही. प्रशासनात सहनशीलता, आत्मीयता व कार्यक्षमता या त्रिसूत्रीचा अवलंब केला. सर्वांना बरोबर घेऊन कारभार करण्याचा प्रयत्न केला.

पदवीदान समारंभासाठी उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचे अतिथी बोलावून त्यांच्या भाषणातून विद्यार्थ्यांना मार्गदर्शन मिळावे यासाठी प्रयत्न केले. २१ नोव्हेंबर १९७९ रोजी त्यांची नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे सदस्य म्हणून करण्यात आली.

आपल्या कार्यशैलीने त्यांनी येथेही स्वत:चे स्थान निर्माण केले. पदाचे पावित्र्य त्यांनी अखेरपर्यंत राखले. तसेच जनतेला व विद्यार्थ्यांना लोकसेवा आयोगाची कार्यपद्धती माहीत व्हावी यासाठी त्यांनी आपल्या सहकाऱ्यांसमवेत ठिकठिकाणी व्याख्याने दिली व प्रबोधन केले.

'जोडोनिया धन उत्तम व्यवहारे उदास विचारे वेच करी' या उक्तीनुसार पी.जी. पाटील व सुमतीबाई पाटील यांनी जीवनभर संचित केलेले धन विद्यापीठ, रयत शिक्षण संस्था, विद्यार्थिनी वसतिगृहे, कवलापूर येथील विद्यालय, त्यांच्या सहवासात आलेले विद्यार्थी व त्यांच्या घरी काम करणाऱ्यांना आपल्या इच्छापत्राद्वारे दिलेले आहे. आपले कर्मवीर छाया हे निवासस्थान त्यांनी शिवाजी विद्यापीठास विद्यार्थी विकासासाठी त्याचा उपयोग व्हावा या उद्देशाने अर्पण केले आहे.

– प्रा. वसंत रोकडे

## पाटील बोरकर, बालाजी देवराव

**संस्थापक, सामाजिक कार्यकर्ते**

**१ मार्च १९०१ – ३० ऑगस्ट १९८०**



बालाजी देवरावजी पाटील यांचा जन्म चंद्रपूर जिल्ह्यातील ब्रह्मपुरी तालुक्यातील नवरगाव या छोट्याशा गावात झाला. देवरावजी व जानुकाबाई हे त्यांचे माता – पिता होते. तलाव बांधणे व शेती हा जरी वडिलांचा व्यवसाय असला तरी एकूण घरची गरिबी होती. छोटी – मोठी कामे करतच ते मोठे झाले. गंगाबाई व भागिरथी अशा त्यांना दोन पत्नी होत्या. पण केवळ स्वतःच्या संसारात रमणारे ते नव्हते. त्यांचा पिंडच राष्ट्रभक्तीचा, समाजसेवेचा होता. तरुणपणीच डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार, स्वा. सावरकर, डॉ. आंबेडकर, राजर्षी शाहू महाराज, म. गांधी इत्यादींच्या विचारांचा त्यांच्यावर बराच प्रभाव पडला. त्यातूनच ते समाजोपयोगी कामे करणाऱ्या रा. स्व. संघाचे सक्रीय कार्यकर्ते झाले. नवरगावच्या विकासाचा त्यांनी ध्यासच घेतला होता.

देश स्वतंत्र करून सुराज्य करायचे असेल तर सर्व तऱ्हेनी समाज प्रबोधन करून देशभक्ती जागृत करण्याचे, समाजात समरसता आणण्याचे महत्त्वाचे काम करणे आवश्यक होते. त्याची पहिली पायरी म्हणजे अति दुर्गम भागातील – नवरगाव सारख्या–दुर्लक्षित खेड्यातील–लोकांवर संस्कार करण्याचे, त्यांच्यातील तऱ्हेतऱ्हेचे भेद नाहीसे करून त्यांना संघटित करण्याचे, सुशिक्षित करण्याचे काम करणे आवश्यक होते. त्यासाठी त्यांच्या अडीअडचणी आस्थेने समजून घेऊन त्यांना मदतीचा हात देणे गरजेचे होते.

उत्तम शिक्षणाची पहिली पायरी म्हणजे उत्तम संस्कार करणे. आपल्या अंगच्या गुणांमुळे त्यांनी कीर्तन, प्रवचन, नाटक, भजन या माध्यमातूनही लोक शिक्षणाचे काम केले.

त्यांच्या व संघाच्या निष्ठावंत कार्यकर्त्यांच्या विचार विनिमयातून नवरगावला 'भारतीय शिक्षणसंस्था' १९५० मध्ये स्थापन झाली. नवरगाव हे मुख्य रस्त्यापासून आत

प

होते. बस, वीज इ. सोयी नव्हत्या. 'आपली मुले शिकली पाहिजेत' असे वाटत असले तरी बाहेरगावी शिक्षणासाठी मुलांना पाठवणे शक्य नव्हते म्हणून संघाच्या प्रेरणेतून व गावकऱ्यांच्या मदतीने त्यांनी 'भारतीय शिक्षण संस्था' द्वारा भारत विद्यालय सुरू केले. भारत प्राथमिक विद्यालय सुरू झाले. भारत माध्यमिक विद्यालय सुरू झाले. शाळेसाठी अनुदान मिळणे, मंजुरी मिळणे इ. गोष्टीत सतत अडचणी येत. पण बालाजी पाटलांनी कधी हार मानली नाही. संघविचारांचा प्रभाव असणारे रामभाऊ बोंडाळे, यशवंतराव बाजारे, त्यांचे मानसपुत्र गुरुदासजी अलमस्त असे अनेक शिक्षक त्यांना मिळाले. अलमस्त यांच्या गावी पळसगाव जाट येथे माध्यमिक विद्यालय सुरू झाले. लहान गावात कोणतीही सोय नसताना महाविद्यालयही सुरू केले. आज तेथे भारत वसतिगृह, विज्ञान, कला आणि वाणिज्य या तीनही शाखांचे शिक्षण देणारे 'श्री ज्ञानेश महाविद्यालय' उत्तम तऱ्हेने चालू आहे. प्रथमच १९५९ मध्ये संघाच्या विचारांनी भारलेले ध्येय वेडे, धडाडीचे ट्रेन्ड मुख्याध्यापक (एमएबीटी) म्हणून संघाने म. दा. देशपांडे यांना पाठविले. त्यांनी नवरगाव ही आपली कर्मभूमी मानून भारतीय शिक्षण संस्थेच्या विकासाला सर्वतोपरी हातभार लावला.

१५ मार्च १९७५ रोजी श्रीमती ताराबाई कवासे यांनी संस्थेस दान केलेल्या जागेत माजी पंतप्रधान अटलबिहारी वाजपेयी यांच्या हस्ते अमृतवर्षानिमित्त त्यांचा गौरवनिधी देऊन सत्कार करण्यात आला. तो त्यांनी संस्थेस अर्पण केला.

– निर्मला करमरकर

## पाटील, भाऊराव पायगोंडा

☞ **मुख्य नोंद – कर्मवीर भाऊराव पाटील**

## पाटील, भानुदास पंढरीनाथ

**संस्थापक, शिक्षक, मुख्याध्यापक**

**१ जून १९१७ – ३० मे १९६२**

सोलापूर जिल्ह्यातील उत्तर सोलापूर तालुक्यातील मार्डी गाव हे भानुदास पंढरीनाथ पाटील यांचे मूळ गाव. एका सामान्य शेतकरी कुटुंबात भानुदास पाटील त्यांचा जन्म झाला. त्यांनी सोलापूरमध्ये बी.ए. व बी.टी. ह्या पदव्या मिळविल्या. व्यवसायाच्या निमित्ताने पाटील कुटुंब नाशिक जिल्ह्यातील निफाड तालुक्यातील पिंपळगाव बसवंत या गावात आले. त्या काळात गावात एकही विद्यालय नव्हते. गावातील गावकऱ्यांच्या, शेतकऱ्यांच्या मुलांसाठी शिक्षणाची सोय नव्हती. या मुलांना इंग्रजी शिक्षण द्यावे या विचाराने पाटील यांनी पिंपळगाव बसवंत येथे १० जून १९४२ रोजी पिंपळगाव माध्यमिक विद्यालयाची स्थापना केली. त्यांच्या शिक्षकी पेशास सुरुवात झाली.

प्रारंभी चौथी पास झालेल्या मुलांसाठी इंग्रजी पहिली व सातवी पास झालेल्या मुलांसाठी स्वतंत्र वर्ग अशा दोन वर्गांनी शाळा सुरू झाली. सुरूवातीची पाच वर्षे हे दोन वर्ग गावाबाहेरच्या धर्मशाळेत भरत असत. पिंपळगाव परिसरातील अनेक खेड्यांत हिंडून शेतकऱ्यांनी आपल्या मुलांना इंग्रजी शिक्षण द्यावे म्हणून पाटील व त्यांच्या सहकाऱ्यांनी प्रबोधन केले. ते स्वतः शेतकरी कुटुंबातून आलेले असल्याने लोकांचा त्यांना उत्तम प्रतिसाद मिळू लागला. पण शिक्षक खेड्यातील शाळेत नोकरी करण्यास तयार नसत. तेव्हा गावातील उच्चशिक्षित, वकील यांनी त्यांच्यावरील लोभामुळे मानधन न घेता शाळेतील विषय शिकविले.

पाटील मुख्याध्यापक असल्याने गावात त्यांना मोठा मान होता. लोक त्यांना आदराने बाबासाहेब म्हणत. त्यांच्या शब्दाखातर गावकऱ्यांनी आर्थिक मदत केली. मुलांना शाळेत फीमध्ये सवलत मिळू लागली. घरचे पीक आल्यावर शुल्क भरण्याची सवलतही होती. मुलांची शैक्षणिक गुणवत्ता वाढावी म्हणून निष्ठेने प्रयत्न करणारे सहकारी शिक्षक शाळेला मिळाले. या सर्व गोष्टींमुळे मुलांची संख्या वाढत गेली. शाळेसाठी इमारतीची गरज भासू लागली. त्यांच्या सततच्या प्रयत्नांना शासनाने संस्थेला अकरा एकर जागा दिली. खेडोपाडी हिंडून त्यांनी इमारतीसाठी निधी जमविला. त्यातूनच शाळेची अठरा खोल्यांची भव्य इमारत इभी राहिली. निफाड, चांदवड, दिंडोरी तालुक्यांतील हे एकच विद्यालय असल्याने

विद्यार्थ्यांसाठी वसतिगृहाची गरज निर्माण झाली. तीही पूर्ण झाली. उत्तम व्यवस्थापन असलेले १४ खोल्यांचे वसतिगृह बांधले. या सर्व काळात पाटील त्यांनी कधीही पूर्ण पगार घेतला नाही.

सन १९६१ पासून शिक्षकांना राष्ट्रपती पुरस्कार देऊन त्यांच्या कार्याचा गौरव करण्याची प्रथा सुरू झाली. पहिल्याच वर्षी या पुरस्कारासाठी पाटील यांची निवड झाली. ग्रामीण भागातून राष्ट्रपती पुरस्काराने सन्मानित झालेले पाटील या पुरस्काराचे पहिले मानकरी ठरले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## पाटील, मनोहर देवराव

**संस्थापक**

**१४ ऑक्टोबर १९१८ – १३ फेब्रुवारी २००९**



मनोहर देवराव पाटील यांचा जन्म शेतकरी कुटुंबात वरोरा येथे झाला. त्यांच्या आईचे नाव गोपिकाबाई पाटील होते. लहानपणापासून 'भाऊ' या टोपणनावाने ते परिचित होते. घरी एकूण पाच भावंडे होती. घरात शैक्षणिक वातावरण होते. त्यामुळे मनोहरराव पाटील यांनी बी.एस्सी. कृषी पदवी प्रथम श्रेणीत उत्तीर्ण केली. नागपूर येथे विद्यालयीन शिक्षण घेत असताना त्यांचा डॉ. केशव बळीराम हेडगेवार यांच्याशी व पर्यायाने राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या कार्याशी संबंध आला. बालपणापासून राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे ते स्वयंसेवक होते. कृषी पदवी प्राप्त केल्यानंतर ते वरोरा या जन्मगावी परत आले. या जन्मभूमीलाच त्यांनी स्वतःची कर्मभूमी मानले. कृषी – पदवीधर असल्यामुळे त्यांनी नव्या तंत्रज्ञानासह शेतीला प्रारंभ केला. घरी शेती भरपूर असल्यामुळे त्यांच्या कौशल्याला विशेष वाव मिळाला.

भाऊ कृषी पदवीधर होते. १९४० – ४१ च्या सुमारास म्हणजे शिक्षण संपून वरोरा येथे आल्यानंतर शैक्षणिक क्षेत्रासाठी काय करता येईल या संबंधी त्यांचे चिंतन सुरू होते. सहकाऱ्यांशी चर्चा होत होती. आराखडे तयार होत होते. संपूर्ण देश स्वातंत्र्याच्या चळवळीत उत्साहाने सहभागी झाला होता. लोकमान्य टिळकांची राष्ट्रीय शिक्षणाची संकल्पना, महात्मा गांधींची बुनियादी शिक्षण पद्धती, या बरोबरच स्वदेशी चळवळ यांनी सर्वत्र भारावलेले वातावरण होते. याच प्रेरणेतून राष्ट्रीय शिक्षण देणारी शिक्षण संस्था वरोरा गावात असावी असे त्यांना वाटले. या शिक्षणसंस्थेने अशा शाळा चालवाव्यात ज्यातून शिक्षणाइतकेच संस्कारही कोवळ्या विद्यार्थी मनावर रुजले पाहिजेत असे त्यांना वाटले आणि त्यांनी आपल्या जीवनाचे ध्येय निश्चित केले. १९५१ मध्ये मनोहरभाऊंनी लोक शिक्षण संस्थेची स्थापना केली. लोक शिक्षण संस्था पंजीकृत झाली. लोकमान्य विद्यालय, वरोरा या नावाने वर्ग ५ ते वर्ग १० पर्यंतचे शिक्षण देण्याचे कार्य सुरू झाले. लोकमान्य विद्यालयाचे काम मनोहरभाऊ पाटील यांच्या मालकीच्या इमारतीत सुरू झाले. लोकमान्य विद्यालयाला पहिली दहा वर्षे शासनाकडून कोणत्याही प्रकारचे अनुदान नव्हते. शिक्षक – कर्मचाऱ्यांचे वेतन, इतर प्रशासकीय खर्च स्वतः संस्थापकांनी सोसला. शाळेतील शिक्षक रजेवर गेल्यास विनावेतन अध्यापन केले. सेवा, सचोटी आणि स्नेहभाव या गुणांसोबतच कडक शिस्त, करारीपणा, कल्पकता या वैशिष्ट्यांची जोड त्यांच्या कार्यात दिसून येते. १९५१ मध्ये ते संस्थेचे उपाध्यक्ष होते. १९६४ मध्ये संस्थेचे कार्यवाह म्हणून त्यांनी जबाबदारी स्वीकारली आणि पाहतापाहता संस्थेचा शैक्षणिक विस्तार भाऊंच्या मार्गदर्शनाखाली होऊ लागला. १९५१ मध्ये लोकमान्य विद्यालय, १९५९ मध्ये लोकमान्य कन्या विद्यालय, १९६४ मध्ये लोकमान्य प्राथमिक विद्यालय त्यांनी चालविले. १९६५ पासून शालान्त परीक्षेत सातत्याने बोर्डाच्या गुणवत्ता यादीत विद्यार्थ्यांची नावे झळकू लागली. संस्थेची स्वतंत्र इमारत, सेवाव्रती निष्ठेने काम करणारा शिक्षकवर्ग त्यांनी सोबत घेतला. शिक्षण, कला, सांस्कृतिक, संगीत यांचा समन्वय साधून त्यांनी विविध उपक्रम विद्यालयात राबविले. संस्थेचा स्वतंत्र रंगमंच त्यांनी उभारला. वरोऱ्यातील सर्व सांस्कृतिक संस्थांना विनामूल्य

प

रंगमंच उपलब्ध करून दिला. व्यावसायिक नाटके देखील याच रंगमंचावरून सादर होत होती.

स्थानिक कलावंतांना प्रोत्साहन देण्याची त्यांची वृत्ती होती. या कलेच्या प्रोत्साहनासाठी त्यांनी स्वतः नाटकात अभिनय केला. १९६५ च्या गोवामुक्ती संग्रामात ते सहभागी झाले. त्यात त्यांनी कारावास भोगला. १९७५ च्या आणीबाणीतही ते अठरा महिने मिसा कायद्याअंतर्गत तुरुंगात होते. भाऊसाहेबांची योजकता आणि नियोजन हे त्यांचे वैशिष्ट्यपूर्ण गुण होते. मनोहरभाऊ पाटील यांचे केवळ संस्थेपुरतेच नव्हे तर वरोरा गावातील कला, संगीत व शिक्षण या क्षेत्राला मोलाचे मार्गदर्शन लाभले.

– प्रा. श्रीकांत पाटील

## पांढरीपांडे, श्रीकृष्ण लक्ष्मण

***भैयाजी पांढरीपांडे***

**शिक्षक, प्राचार्य, संस्थापक**

**१४ जुलै १८९९ – ८ एप्रिल १९९७**



श्रीकृष्ण लक्ष्मण तथा भैय्याजी पांढरीपांडे यांचा जन्म नागपूर येथे झाला. मुळात त्यांचे घराणे नागपूर जिल्ह्यातील सावनेर तहसिलातील धापेवाडा या गावचे होते. त्यांच्या प्राथमिक शिक्षणाची सुरुवात नागपुरातील मुन्शीच्या देवळाजवळील एका खाजगी शाळेत झाली आणि नंतर इतवारी दरवाजा येथील प्राथमिक शाळेत दुसऱ्या वर्गात त्यांनी प्रवेश घेतला. १९१० मध्ये नागपूरमधील तत्कालीन निलसिटी हायस्कूलमध्ये (हल्लीचे दादासाहेब धनवटे नगर विद्यालय) पुढील शिक्षण झाले. १९१७ मध्ये अलाहाबाद विद्यापीठाची मॅट्रिकची परीक्षा त्यांनी द्वितीय श्रेणीत उत्तीर्ण केली त्या वेळच्या पद्धतीनुसार इ.स.१९१९ मध्ये त्यांचा विवाहही झाला. १९२० मध्ये असहकारितेच्या चळवळीत त्यांनी भाग घेतला व त्यामुळे त्यांना महाविद्यालयीन शिक्षण सोडावे लागले; परंतु १९२२ मध्ये टिळक विद्यापीठ पुणे यांची बी.ए. ची पदवी त्यांनी प्राप्त केली. भंडारा येथे १९२१ ते १९२३ या काळात ‘लोकमान्य राष्ट्रीय विद्यालया’ची स्थापना होऊन तेथे त्यांनी एक वर्ष शिक्षक व एक वर्ष प्राचार्य म्हणून काम केले. १९२३ मध्ये नागपुरच्या हिस्लॉप महाविद्यालयात प्रवेश घेऊन १९२४ साली नागपूर विद्यापीठाची बी.ए.ची पदवी त्यांनी प्राप्त केली. त्यानंतर इ.स. १९२४ ते १९३१ या काळात नागपुरच्या सेंट ऊर्सुला मुलींच्या शाळेत शिक्षक म्हणून नोकरी केली. १९२६ मध्ये एलएल.बी.ची पदवी घेतली. आणि १९२७ मध्ये संस्कृत या विषयात एम.ए. ची पदवी घेतली तसेच १९३० मध्ये मराठी या विषयात एम.ए. ची पदवी त्यांनी प्राप्त केली.

या नंतरचा काळ म्हणजे भैयाजींच्या उच्च शिक्षण क्षेत्रातील कार्याच्या सुरुवातीचा काळ म्हणावा लागेल. ज.मा.कायंदे आणि त्यांच्या मित्रमंडळींनी कल्चरल एज्युकेशन सोसायटी द्वारा टिळक पुतळ्याजवळच्या पंडितजींच्या वाड्यात दि. १७ जुलै १९३० मध्ये नागपूर महाविद्यालयाची स्थापना केली आणि त्याचे पहिले प्राचार्य म्हणून पांढरीपांडे यांची नेमणूक झाली. त्या काळातही गांधीजींच्या प्रभावामुळे राष्ट्रीय चळवळीत त्यांचा भाग होता. त्यातच ते मध्य प्रदेशच्या ‘वॉर कौन्सिल’चे अध्यक्ष होते आणि त्यांनी सत्याग्रहाच्या चळवळीतही भाग घेतला म्हणून सरकारने त्यांना राजद्रोहाच्या आरोपाखाली एक वर्षाची सश्रम कारावासाची शिक्षा ठोठावली. परंतु मार्च १९३१ मध्ये इतर अनेकांबरोबर त्यांचीही सुटका झाली. १५ जुलै १९३२ रोजी नागपूर महाविद्यालयाला ‘सिटी कॉलेज’ या नावाने सरकारी मान्यता प्राप्त झाली. तेव्हा अर्थातच त्याचे प्राचार्य भैयाजी पांढरीपांडेच झाले.

संशोधन कार्याकडेही त्यांचे लक्ष होते. १४ जानेवारी १९३४ रोजी ‘मध्य प्रांत वाङ्मयेतिहास संशोधन मंडळ’ स्थापन झाले. तेव्हापासून १९५२ पर्यंत ते सुरुवातीला या संस्थेचे कार्यवाह आणि नंतर १९३९ पासून या संस्थेचे अध्यक्षही होते. त्यांच्याच पुढाकाराने या संस्थेतर्फे ‘द. सी. पी. अ‍ॅण्ड बेरार’ नावाचे त्रैमासिक सुरू करण्यात आले आणि इ.स. १९३६ ते १९४२ या काळात ते त्याचे

संपादक होते. महात्मा गांधींच्या विचारपरंपरेतील भैयाजींना मागासवर्गीय आणि दलितांविषयी आपुलकी आणि जिव्हाळा होता. त्याच प्रेरणेतून १९३४ मध्ये त्यांनी दलितवर्गीय मुलींसाठी डीप्रेस्ड क्लास गर्ल्स होस्टेल या संस्थेची स्थापना करून ते तिथे अध्यक्ष झाले. ६ डिसेंबर १९३६ रोजी 'सहभोजन समिती' चे उपाध्यक्ष या नात्याने अस्पृश्य सहभोजनात पुढाकार आणि सहभाग घेतला म्हणून काही वर्षे त्यांना बहिष्कृत करण्यात आले. या त्यांच्या कार्यामुळेच शासनाने त्यांना दलित - मित्र म्हणून गौरविले.

तत्कालीन शिक्षण व्यवस्थेला नवीन वळण देण्यासाठी संघटनात्मक स्तराला जे प्रयत्न करण्यात आले त्यात पांढरीपांडे यांचा सक्रीय सहभाग होता. डिसेंबर १९३६ मध्ये 'अखिल भारतीय शिक्षण परिषदे'चे अधिवेशन झाले. त्याचे ते कार्यवाह होते. तसेच १९३७ मध्ये अखिल भारतीय शिक्षण समिती संघाच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य होते. १९४० मध्ये अखिल भारतीय शिक्षण परिषद उदयपूर येथे झाली. तिच्या 'नैतिक व धार्मिक' विभागाचे ते अध्यक्ष होते. यांना तत्त्वज्ञानाचाही व्यासंग होता. १९४१ मध्ये अखिल भारतीय तत्त्वज्ञान परिषद नागपूर चे ते सहकार्यवाह होते. आणि १९५५ मध्ये पुन्हा याच संस्थेचे कोषाध्यक्ष झालेत. १९५४ मध्ये पाटणा येथे झालेल्या अखिल भारतीय शिक्षण परिषदेच्या 'विद्यापीठ शिक्षण' विभागाचे ते अध्यक्ष होते.

सिटी कॉलेजला १९४५ मध्ये आईन्दानजी बिंझाणी यांनी देणगी दिल्यामुळे त्याचे नामकरण बिंझाणी सिटी कॉलेज असे झाले. त्यात विज्ञान शाखा सुरू करावी म्हणून भैयाजींनी प्रयत्न केले. त्यांच्या प्रयत्नांना यश येवून मथुरादासजी मोहता यांनी देणगी दिली आणि १८ जुलै १९४९ रोजी 'मथुरादास मोहता विज्ञान महाविद्यालय' सुरु झाले. मात्र सुरुवातीला ती एस.बी.सिटी महाविद्यालयाची शाखा होती आणि भैयाजीच तिथे प्राचार्य होते. सप्टेंबर १९६० मध्ये ते प्राचार्य पदावरून निवृत्त झाले. जुलै १९६० ला श्रीमती बिंझाणी महिला महाविद्यालय सुरू झाले. त्याचेही पहिले प्राचार्य पांढरीपांडे होते. १० नोव्हेंबर १९६१ ला ते सेवानिवृत्त झाले. नागपूर विद्यापीठाच्या विद्यापीठ कोर्ट (आताचे सिनेट) व ॲकॅडमिक कौन्सिल यांचे ते पदसिद्ध सदस्य होते. विद्यापीठाच्या कार्यकारी मंडळाचे सहा वर्षे ते सदस्य होते. मराठी विषयाच्या अभ्यासमंडळाचे सदस्य व विषय तपासणी समितीचे सदस्य अध्यक्ष होते. त्यांच्या संपूर्ण कार्यकाळात नागपूर विद्यापीठाच्या ४६ समित्यांचे सदस्य/अध्यक्ष होते. राष्ट्रीय स्तराच्या ८ शैक्षणिक समित्यांवर सदस्य होते. महाराष्ट्र राज्याने नेमलेल्या मिडियम इन्स्ट्रक्शन कमिटीचे सदस्य म्हणून काम करताना त्यांनी एकट्यानेच प्रादेशिक भाषेच्या माध्यमाची बाजू प्रभावीपणे मांडली. जुन्या मध्यप्रदेशात फेडरेशन ऑफ रेक्ग्नाईझड् एज्युकेशनल इन्स्टिटयूशन्स एम. पी. ही संस्था त्यांच्या पुढाकाराने १९३४ मध्ये स्थापन झाली. आणि १९३९ पर्यंत ते तिचे कार्यवाह व अध्यक्ष होते. नागपूर, उस्मानिया व चेन्नई विद्यापीठांचे ते मराठी विषयाचे परीक्षक होते व नागपूर विद्यापीठाकडे पीएच.डी. साठी येणाऱ्या प्रबंधांचेही परीक्षक होते.

त्या काळी मध्य प्रांत - वऱ्हाडात नागपूर, अमरावती व जबलपूर येथेच काय ती महाविद्यालये होती आणि तीही सरकारी होती. नागपूरला ख्रिस्ती मिशनने चालविलेले हिस्लॉप महाविद्यालय होते. या महाविद्यालयांचे प्राध्यापक आणि प्राचार्य इंग्रजी धर्तीचा पोषाख करून सिव्हिल लाईन्स भागात बंगल्यात राहणारे होते.

नागपूर महाविद्यालयाचे पहिले प्राचार्य म्हणून भैयाजी पांढरीपांडे यांनी कार्यभार सांभाळला. तेव्हा खादीचे धोतर, सदरा, टोपी, उपरणे घालणारा आणि साध्या चपला घालून वावरणारा पहिला गांधीवादी प्राचार्य केवळ नागपुरातच नव्हे, तर संपूर्ण मध्य प्रांत वऱ्हाडाच्या लोकांना दिसला. साधी राहणी आणि उच्च विचारसरणी याचे ते प्रतीकच होते. उच्च शिक्षणासाठी प्रवेशाला होणाऱ्या गर्दीवर लोक टीका करीत पण भैयाजी त्यास स्वागतार्ह मानीत असत.

सुमारे ४० वर्षांच्या अध्यापनाच्या काळात पांढरीपांडे यांच्या दृष्टिने विद्यार्थी हा शिक्षण व्यवस्थेचा मध्यबिंदू होता. त्याच्या हिताच्या-अहिताच्या, सोयी - गैरसोयीच्या, प्रगती व उत्कर्षाच्या विचाराला सर्व शैक्षणिक विचारात

प

प्रमुख स्थान द्यावयास हवे असे ते म्हणत. गांधीजींच्या अनेक तत्त्वांना त्यांनी प्रत्यक्षात आणण्याचा प्रयत्न केला. त्यांनी आणि न्यायमूर्ती मंगळमूर्ती ह्यांनी श्रमदान करून 'मालवीय कुटी' बांधली. तसेच हस्तव्यवसायातून कागद निर्माण करण्यासाठी त्यांनी सेवानिवृत्तीच्या काळापर्यंत पेपरविभागाचे काम पाहिले आणि त्यानंतरही त्या कार्यात लक्ष घातले. मुलांसाठी 'हॉबी सेंटर' निर्माण करून व्यवसाय – शिक्षणाचीही सुरुवात केली. साधन – शुचिता कटाक्षाने सांभाळणारे भैयाजी स्वतः मात्र सामान्य परिस्थितीत जीवन जगले. या त्यांच्या जीवन प्रणालीत आणि कार्यात त्यांच्या पत्नी रमाबाई यांचीही त्यांना सतत उत्तम साथ लाभली. विविध क्षेत्रातील भैयाजींच्या या उपक्रमासोबतच जनसामान्यांना आरोग्य सेवा पुरविण्यासाठी त्यांनी होमिओपॅथीचे वैद्यकीय शिक्षण घेऊन दाखला मिळविला. हा औषधोपचार ते विनामूल्य करीत व त्यासाठी स्वतः खर्च करीत. त्यासाठी भाऊजी दफ्तरी यांनी स्थापना केलेल्या सच्चिकित्सा महाविद्यालयाच्या व्यवस्थापक मंडळाचे उपाध्यक्ष व प्रमुख सल्लागार म्हणून त्यांनी कार्य केले. सेवानिवृत्तीनंतर नागपूर जवळील वाठोडा या लहानशा गावी त्यांच्या कुटुंबाची शेती करण्यासाठी ते गेले आणि शेती बरोबरच त्यांनी स्वतःचे खेडेगाव एक वर्षाच्या आत एक आदर्श खेडे बनवले. 'खेड्यात चला' हे गांधींचे तत्त्व त्यांना मान्य होते. परंतु खेडी कायम ठेवून सोव्हिएट रशियासारखी समाज रचना खेड्यात व्हायला हवी. श्रीमंती नसली तरी सर्वांना पुरेसे मिळाले पाहिजे असे ते म्हणत.

त्यांनी अनेक शोधनिबंध आणि ग्रंथ लिहिले आणि ते प्रकाशितही झाले. ललित वाङ्मय, समीक्षात्मक लिखाण, तत्त्वज्ञान, ज्ञानेश्वरी व यथार्थ दीपिका, भगवद्‌गीता, श्री समर्थ रामदासांचे वाङ्मय, मराठी भाषा आणि देवनागरी लिपी इत्यादी विविध विषयांवर त्यांनी लिखाण केले. कर्मयोगावरील त्यांच्या ग्रंथाचे प्रकाशन त्यांच्या पहिल्या स्मृतिदिनी करण्यात आले.

भैयाजींचे विद्यार्थी ईश्वर देशमुख यांनी त्यांच्यापासून प्रेरणा घेऊन १९५५ मध्ये 'नागरिक शिक्षण मंडळ' ही संस्था स्थापन केली आणि पांढरीपांडे ह्यांना त्याचे अध्यक्ष केले. या संस्थेतर्फे दोन विद्यालये, एक शारीरिक शिक्षण महाविद्यालय आणि एक पंचायत राज्य प्रशिक्षण केंद्र सुरू केले. नंतर भैयाजी पांढरीपांडे यांचे नाव देऊन समाजकार्य महाविद्यालयही सुरू केले, संस्थेच्या परिसरात भैयाजींचा अर्धपुतळा उभारला.

– डॉ. एस. जी. देवगावकर

## पावटे, दादण्णा चिंतामणी

***डी. सी. पावटे***

**कुलगुरु, शिक्षण संचालक**

**१० जानेवारी १९०१ – १७ जानेवारी १९७८**



बेळगाव जिल्ह्यातल्या ममदापूर खेड्यातल्या कर्जबाजारी शेतकऱ्याचा मुलगा म्हणजे दादण्णा चिंतामणी पावटे. आठव्या वर्षापर्यंत त्यांना शालेय शिक्षण मिळाले नाही. तरीही पुढे कोल्हापुरात वसतिगृहामध्ये वाढण्याचे काम करत त्यांनी शिक्षण घेतले. पुढे केंब्रिजला जाऊन रँग्लर झाले. कर्नाटक विद्यापीठाचे ते १३ वर्षे कुलगुरूही होते. पंजाबचे राज्यपालपदही त्यांनी भूषविले.

'मी एक शिक्षण संचालक' या त्यांच्या ग्रंथात एका संवेदनशील अधिकाऱ्याचे प्रांजल अनुभव कथन आहे, इतकेच नव्हे तर तत्कालीन शैक्षणिक परिस्थितीचे यथातथ्य चित्रण आहे. वयाच्या १९ व्या वर्षी दादण्णा त्यावेळची सहावीची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्याच वर्षी गिरिजा नाईक नावाच्या ८ वर्षाच्या मुलीबरोबर त्यांचे लग्न झाले. कोल्हापूरच्या राजाराम विद्यालयामध्ये त्यांना मराठी भाषा शिकावी लागली. मॅट्रिक परीक्षेत धारवाड केंद्रात ते पहिले आले आणि तेथे कर्नाटक महाविद्यालयात पुढचे शिक्षण घेऊ लागले. शिष्यवृत्त्यांच्या आधारे दादण्णाचे शिक्षण होऊन १९२३ च्या बी. ए. परीक्षेत ते प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले व ऑगस्ट १९२४ मध्ये इंग्लंडच्या केंब्रिज

विद्यापीठात दाखल झाले. ऑक्टोबरपर्यंत फ्रेंच शिकले. तिसऱ्या वर्षी दादण्णांनी 'थिअरी ऑफ फंक्शन्स ऑफ रिअल व्हेरिएबल्स आणि इलेक्ट्रॉन थिअरी' हा विषय घेऊन रँग्लर पदवी मिळवली. रँग्लर होऊन, जर्मनीत जाऊन जर्मन भाषा शिकून भारतात परतल्यावर पावटे यांना १५ जुलै १९२८ पासून बनारस हिंदू विद्यापीठात गणिताचे प्राध्यापक म्हणून नियुक्ती मिळाली. तेथे काही महिन्यातच त्यांनी विद्यार्थ्यांसाठी कॅलक्युलसचे पुस्तक तयार केले. तिथल्या पदवीदान समारंभात 'तक्षशीला व नालंदा या प्राचीन विद्यापीठांची आठवण व्हावी असे वातावरण असे.' बनारस विद्यापीठाप्रमाणे मुंबई शिक्षण खात्यात पहिल्या वर्गातील अधिकारी या पदावर त्यांची नेमणूक झाली.शिक्षणाधिकारी  हा शिक्षण प्रमुख असे. त्या वेळच्या मुंबई प्रांताची पाच भागात विभागणी होती. पावटे मध्य विभागाचे (पुणे) शिक्षणाधिकारी  या पदावर १६ जून १९३० रोजी रुजू झाले. माध्यमिक शाळांबरोबर मुंबईतील अंध, मूकबधिरांच्या  शाळा, सुधार शाळा, बालगृहे अशा विविध शाळांचीही त्यांना तपासणी करावी लागे. 'अपंग मुलांच्या शाळांत मी खूप लक्ष घातले' असे त्यांनी लिहून ठेवले आहे. त्यांनी शिक्षण क्षेत्रातील वाङ्मयाचे खूप वाचन करून प्राथमिक विभागाचा कारभार व त्यावरील सरकारी नियंत्रण यांचा बारकाईने अभ्यास केला. मोडी वाचनाची सवय केली. १९३०-३७ हा काळ त्यांच्या आयुष्यात कसोटीचा व फलदायी होता. अंदाजपत्रक तयार करून वर्षभर त्यानुसार खर्चावर नियंत्रण ठेवणे हे काम त्यांच्या जबाबदारीत अंतर्भूत होते. वर्षानुवर्षे वार्षिक अंदाजपत्रक  ठराविक रकमेचेच असे.

समाजातील मूठभर लोकांच्या हितापेक्षा संपूर्ण समाजाचे कल्याण हे उद्दिष्ट ठेवून धोरणाची पुनर्रचना, अभ्यासक्रमात सुधारणा, शिक्षकांची गुणवत्ता वाढविणे, व्यावहारिक दृष्टिकोन ठेवून तांत्रिक, शेती व्यापार, उद्योग यांच्या शिक्षणाची व्यवस्था, शिक्षकांचे प्रशिक्षण, शिक्षकांच्या व निरीक्षकांच्या नेमणुका, बदल्या इत्यादी विविध प्रश्न हाताळून त्यात सुसंगती व व्यवस्था निर्माण करण्याची कामगिरी पावटे यांनी विशेष परिश्रम घेऊन निःस्पृहपणे केली. जून १९३९ मध्ये पाठ्यपुस्तकांच्या प्रश्नावर विचार करून निर्णय घेण्यासाठी पावटे यांच्या अध्यक्षतेखाली सरकारी व बिनसरकारी सदस्यांची समिती नेमली गेली.

'विद्यार्थ्यांची कृतज्ञता व प्रेम हेच शिक्षकाच्या व्यवसायातले फार मोठे पारितोषक होय' अशी  पावटे यांची धारणा होती. त्यासोबत 'चांगले शिक्षक म्हणजे शैक्षणिक पात्रता, शिकविण्यातील वाकबगारी व नैतिक दर्जा एवढेच नव्हे तर ते सुखी, समाधानी व सामाजिक कर्तव्याची जाणीव असणारे हवेत' असा त्यांचा आग्रह होता. शाळा तपासनिसांच्या जागांवर सहायक उप शैक्षणिक निरीक्षक दर्जाच्या नव्या १०० जागा मंजूर करून घेऊन त्यावर ३० ते ३५ वयोमर्यादेतील उमेदवारांची नेमणूक करण्यास संमती मिळवली. खात्याची सर्व प्रकाशने, नियमावल्या अद्ययावत करून घेतल्या, आर्थिक वर्ष संपल्यावर ६ महिन्यातच खात्याचे अहवाल प्रसिद्ध झाले पाहिजेत असा दंडक घातला.

२२ जून १९५४ ला शिक्षण संचालक पदावरून मुक्त होऊन  पावटे कर्नाटक विद्यापीठाचे कुलगुरू म्हणून रुजू झाले. कुलगुरू या पदावर सतत चार वेळा त्यांची निवड झाली. या पदावर कार्यरत असताना त्यांनी शिक्षणाचा दर्जा सुधारून संशोधनास उत्तेजन देणे, विद्यापीठ सरकार संबंध सुधारणे, जातीयवाद व गट यावर आधारलेली विद्यापीठातील गटबाजी मोडून काढणे, वाचनालय, प्रयोगशाळा, वर्ग, वसतिगृहे, शिक्षकांची निवासस्थाने आदि बांधण्याचा कार्यक्रम हाती घेणे, अशी विविध कामे केली. १९५६ मध्ये जिनिव्हा येथे आंतरराष्ट्रीय शैक्षणिक परिषदेला गेलेल्या भारतीय शिष्टमंडळाचे त्यांनी नेतृत्व केले. त्याच्या पुढच्याच वर्षी रॉकफेलर फौंडेशनच्या निमंत्रणावरून त्यांनी युरोप, अमेरिका व जपानमधील विद्यापीठांना भेटी दिल्या. १९६१ पासून पावटे विद्यापीठीय अनुदान मंडळाचे सदस्य होते.सामाजिक सेवेचा एक भाग म्हणजे शिक्षण अशी त्यांची धारणा असून 'शिक्षक जर स्वार्थत्यागी, निष्ठावंत व देशभक्त असतील तर विद्यार्थीही होतील. तरुण मनावर शिक्षकाइतका कोणीही प्रभाव पाडू

प

शकत नाही' असे त्यांचे ठाम मत होते. पंजाबचे राज्यपालपदही पावटे यांनी भूषविले.

– वि. ग. जोशी

## पानसे, रमेश गजानन
**शिक्षणतज्ज्ञ, विचारवंत**
**१९ जून १९४१**



अर्थशास्त्राचे प्राध्यापक, भूकंप पुनर्वसनाचे महाराष्ट्र राज्याचे सल्लागार, बालशिक्षण संशोधन व विकास केंद्राचे संचालक, ग्राममंगल या आदिवासी भागात काम करणाऱ्या शिक्षण संस्थेचे संचालक आणि विश्वस्त, 'ऋचा' या कवितांच्या मासिकाचे संपादक, गांधी फिल्म फाऊंडेशनचे विश्वस्थ, एस.एन.डी.टी. विद्यापीठातील अर्थशास्त्र विभागाचे विभागप्रमुख अशी विविध कामे सहजी अंगावर घेणारे आणि तितक्याच समर्थपणे पेलणारे बहुआयामी व्यक्तिमत्त्व म्हणजेच प्रा. रमेश पानसे.

शिरवळ येथे रमेश गजानन पानसे यांचा जन्म झाला. आई श्रीमती सुशीला पानसे व वडील गजानन पानसे हे होत. सासवड जवळील 'सोनोरी' हे त्यांचे गाव आहे. ठाणे येथील दगडी शाळा (म्युनिसीपालटी शाळा नं. २), मो. ह. विद्यालय येथे शालेय शिक्षण पूर्ण करुन रुईया महाविद्यालय, मुंबई येथे त्यांनी पदवी संपादन केली. त्यानंतर पुणे विद्यापीठातून पदव्युत्तर शिक्षण आणि सिद्धार्थ महाविद्यालय, मुंबईमधून वकिलीचे शिक्षण पूर्ण केले. शालेय शिक्षणाबरोबरच ठाणे येथील हनुमान व्यायामशाळेने केलेले खिलाडू वृत्तीचे संस्कार त्यांच्या पुढील आयुष्यावर परिणाम करणारे ठरले.

सततचे फिरणे, भाषण देणे, लेखन करणे, नवनवीन आव्हाने अंगावर घेणे त्या सगळ्यात 'दमणे' कधी नाहीच, याचे सारे श्रेय ते व्यायाम शाळेला देतात. 'एक व्यक्ती म्हणून माझा विकास, आरोग्य, आचार, विचारासह व्यायामशाळेमुळेच झाला' हे त्यांचे सततचे वाक्य असते. पदव्युत्तर शिक्षण घेतल्यावर पानसे यांनी एस. एन. डी.टी. महाविद्यालयात अध्यापनाला सुरुवात केली. एस.एन.डी.टी. मध्ये सरांनी १९६८ ते १९९१ पर्यंत पदव्युत्तर स्तरावर अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून काम केले. याच काळात इतरही अनेक कामे सुरू होती. 'मराठी अर्थशास्त्र परिषदेची' स्थापना केली. त्यामध्ये त्यांच्याबरोबर डॉ. नि. वि. सोवनी, डॉ. पारिख, डॉ. सबनीस हे सर्व मान्यवर होते. 'महाराष्ट्र ग्रामीण विकास परिषद' या संस्थेच्या स्थापनेमध्ये मधुकरराव चौधरी, शरद कुलकर्णी यांचा सहभाग होता. 'ग्राममंगल' ही आदिवासी भागातील संस्था अनुताई वाघ यांच्याबरोबर काम करताना स्थापना केली. 'ऋचा' नावाच्या कवितांचा समग्र अभ्यास करणाऱ्या नियतकालिकाचे संपादन केले. १९९१ नंतर म्हणजे नोकरी सोडल्यानंतर 'महाराष्ट्र बालशिक्षण परिषदे'ची स्थापना केली. ग्रामबाल शिक्षण केंद्र – कोसबाड येथे संचालक, अर्थबोध पत्रिका आणि शिक्षण पत्रिका या मासिकांचे संपादन, महाराष्ट्र राज्य भूकंप पुनर्वसनाचे सल्लागार, अशी शिक्षण, अर्थशास्त्र, ग्रामीण विकास या क्षेत्रातील अनेक कामे केली.

पानसे यांनी 'शिक्षण-आनंद क्षण' या प्रकल्पासाठी युनिसेफच्या सहकार्याने महाराष्ट्रातील १२ प्रयोगशील शाळांचा अभ्यास करून त्यावरील ग्रंथाचे लेखन केले. 'नयी तालीम' या महात्मा गांधी यांनी केलेल्या शिक्षणविषयक प्रयोगाचा इतिहास सांगणाऱ्या ग्रंथाचे लेखन केले, तर आधुनिक तंत्रज्ञानाच्या मुळे नव्याने विकसित झालेल्या शास्त्रांचा मागोवा घेणारे 'कर्ता करविता' हे मेंदू संशोधनाचा, शिक्षणाच्या अंगाने वेध घेणाऱ्या पुस्तकाचे लेखन केले.

याशिवाय 'विचार फुले', 'बालशिक्षण स्वरूप व दिशा', 'आजचे शिक्षण-उद्याचे जीवन' अशी नव शिक्षणाचे सार सांगणारी पालकांचे प्रबोधन करणारी अनेक पुस्तके त्यांनी लिहिली. त्यांच्या पुस्तकांना अनेक सन्मानही मिळाले. वर्तमानपत्रातून लेख, आंतरराष्ट्रीय परिषदांमधून पेपरवाचन, संशोधनात्मक लेख असे सुमारे पाचशे लेख

प

त्यांचे प्रसिद्ध झालेले आहेत. त्याचबरोबर त्यांना व त्यांच्या पुस्तकांना अनेक सन्मानही मिळाले आहेत.

या सर्व कामाबरोबर सरांचे सर्वात महत्त्वाचे व मोठे काम म्हणजे ग्राममंगल आणि महाराष्ट्र बालशिक्षण परिषद. या दोन संस्थांकरवी ते अत्यंत दुर्लक्षित अशा बालशिक्षण विषयक जन जागृतीचे काम करत आहेत. संस्थाचालक, चालक व शिक्षक या समाजातील तीनही गटांसाठी प्रबोधनात्मक कार्य करणे आणि अत्यंत महत्त्वाचे असलेल्या या वर्गाचा गांभिर्याने विचार करायला लावणे हे शिवधनुष्य त्यांनी सध्या उचलले आहे. त्यासाठी अभ्यास करणाऱ्या मंडळींचा गट उभा करणे, प्रत्यक्ष प्रयोग करणे आणि ते प्रयोग सार्वत्रिक करणे अशा तीन पातळींवर सध्या काम चालू आहे. बहुविध बुद्धिमत्त्वांवर आधारित, मेंदू संशोधनाचा आधार घेणारे, अनौपचारिक शिक्षण प्रत्येक मुलापर्यंत पोहचविणे हा ध्यास त्यांनी घेतलेला आहे.

आदिवासी मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न असो अथवा इंग्रजी शाळांचे स्तोम असे. प्रत्येकावर उत्तर आहे ते आपण शोधू व समाजापुढे ठेवू हा सकारात्मक दृष्टीकोन फार महत्त्वाचा आहे. प्रचलित पद्धतीला नावे ठेवून चालणार नाही. तर त्यावरील उपाय समाजापुढे ठेवणे गरजेचे आहे. प्रश्न सामोरे येत गेले, त्यावर आत्ताच्या काळाला सुसंगत आणि शास्त्रीय उत्तरे ते शोधत गेले. या विचारातूनच ‘लर्निंग होम’ ही संकल्पना जन्माला आली. शालेय शिक्षणातील स्पर्धा, पाठांतरातून मिळालेले मार्क यातून विद्यार्थी खरेच ज्ञान मिळवत आहेत का? या विचाराने त्रस्त झालेल्या पालकांच्या सहभागातून लर्निंग होम सुरु झाले. घरातील वातावरणात मुलाचे शिक्षण होते ही त्यातील महत्त्वाची भूमिका आणि त्याला शास्त्राची जोड. अशीच बहुविध बुद्धिमत्तांना वाव देणारी ‘हॉबी होम’ ही संकल्पना. मराठी शाळा गळतीचा प्रश्न फक्त इंग्रजी बोलता येत नाही म्हणून असेल तर तो प्रश्न ‘द्विभाषा’ प्रकल्पाच्या माध्यमातून सोडवणे.

विविध विषयाचा अभ्यास एकाच वर्गात बसून करण्यापेक्षा प्रत्येक विषयाचे एक दालन उभारुन त्यामध्ये तो विषय परिपूर्णपणे मुलाला शिकता यावा म्हणून ‘शास्त्रालय’ ही संकल्पना. अशा विविध आयामांनी शिक्षणाचा विचार करणारा एक विचारवंत म्हणून शिक्षणतज्ज्ञ रमेश पानसे कार्यरत आहेत.

– आदिती नातू

## पिंपळीकर, श्रीरंग रामचंद्र

**शिक्षक**

**६ सप्टेंबर १९६०**



ठाणे जिल्ह्यातील रा.स्व. संघ जनकल्याण समितीद्वारा राबविण्यात येणाऱ्या ‘फिरत्या प्रयोगशाळे’चे श्रीरंग रामचंद्र पिंपळीकर यांची आई मंगला पिंपळीकर व वडील रामचंद्र यशवंत पिंपळीकर. वडील रेल्वेच्या सेवेत होते. परंतु वयाच्या ६ व्या वर्षीच त्यांचे पितृछत्र हरवले. त्यांचे प्राथमिक शालेय शिक्षण नागपूरला व पुढे चाळीसगावला झाले. तेथूनच (चाळीसगाव) त्यांनी बी.एस्सी. ची पदवी घेतली.

त्यांचा रा. स्व. संघाशी बालपणापासून संबंध होता व चाळीसगाव येथील वास्तव्यात तो अधिक दृढ झाला. बी.एस्सी. झाल्यावर त्यांनी आधी धुळे व नंतर नाशिकला (८६ पासून) सुप्रीम इंजिनियर्स या कंपनीत सुमारे ३-३ ।। वर्षे नोकरी केली. परंतु त्या आधी ८४-८५ मध्ये ते रा. स्व. संघाचे विस्तारक म्हणून अंमळनेरला कार्यरत होते.

याच सुमारास १९८९ मध्ये संघ संस्थापक डॉ. के. ब. हेडगेवार यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने ठाणे जिल्ह्यातील ग्रामीण व वनवासी विभागातील शालेय विद्यार्थ्यांसाठी ‘फिरती प्रयोगशाळा’ या प्रकल्पाची संकल्पना पुढे आली. या भागातील शाळांतील विद्यार्थी अभ्यासक्रमातील वैज्ञानिक प्रयोगशाळेच्या पूर्ण अभावामुळे-वैज्ञानिक शिक्षणापासून वंचित राहतो. या अभावाची अंशत: पूर्ती करावी म्हणून शहापूर व मुरबाड या तालुक्यातील दहा-दहा गावे निवडून तेथील शाळांमध्ये

प

'फिरती प्रयोगशाळा' जाऊन अभ्यासक्रमातील प्रयोग इयत्ता ४ थी ते ७ वी च्या विद्यार्थ्यांना प्रयोग करून दाखवेल अशी योजना होती. यासाठी अशा भागात जाऊन, तेथील विद्यार्थ्यांशी व शिक्षक वर्गाशी समन्वय साधून हे काम पार पडू शकेल अशा शिक्षक-कार्यकर्त्याची आवश्यकता होती. या कामासाठी श्रीरंग पिंपळीकरांची निवड केली गेली. ते दि. ८ डिसेंबर १९९० ला या कामी रुजू झाले.

प्रयोगशाळेबरोबर रोजचा प्रवास हा आधीच निश्चित केलेल्या वेळापत्रकानुसार होत असे. प्रयोगासाठी लागणारे साहित्य व उपकरणे घेऊन जनकल्याण समितीचे वाहन ठरलेल्या गावच्या शाळेत दाखल होई. यासाठी लागणाऱ्या सर्व व्यवस्था झाल्या असल्या तरी या प्रकल्पाचे प्रत्यक्ष यश हे त्या शिक्षकाच्या शिकवण्याच्या हातोटीवरच अवलंबून होते. शाळेबरोबरच त्या गावातील विद्यार्थ्यांचे पालक व इतर ग्रामस्थ यांच्याशी स्नेहाचे संबंध प्रस्थापित करणे आवश्यक होते.

श्रीरंग पिंपळीकर यांनी अल्पावधीतच हे सर्व साध्य केले. प्रत्यक्ष विद्यार्थ्याबद्दलचे प्रेम व संघाचा ध्येयवाद या प्रेरणेतून त्यांनी लवकरच स्वत:ची एक शैली विकसित केली. त्यात संघ शाखेवरील खेळ, गोष्टी यातून संस्कार ही कार्यपद्धती त्यांनी आपल्या कामातही वापरली व त्यामुळे निव्वळ शिक्षक- विद्यार्थी अशा कृत्रिम नात्यापेक्षा एक जिव्हाळ्याचे नाते त्यांच्यात व फिरती प्रयोगशाळा जाईल त्या गावात निर्माण झाले. त्यामुळे 'फिरती प्रयोगशाळा' हा 'फिरता संस्कारवर्ग' ही झाला.

श्रीरंग पिंपळीकरांच्या शिकवण्याच्या व वागण्याच्या पद्धतीमुळे 'फिरती प्रयोगशाळा' सुरुवातीच्या काही वर्षांतच या तालुक्यांच्या शैक्षणिक व सामाजिक जीवनाचा भाग बनली. नंतर-नंतर श्रीरंग पिंपळीकरांच्या असे लक्षात आले की विद्यार्थ्यांना वर्षभराच्या प्रयोगशाळेच्या ६ भेटीत 'जे द्यायचे ते' पूर्ण होत नाही व यातूनच पुढे वार्षिक शिबिराची कल्पना पुढे आली.

उन्हाळी शिबीर भरवताना प्रथम शिबिराच्या वेळी या तालुक्यातला विद्यार्थी शिबिराचे रु. २०/- हे शुल्क सुद्धा भरू शकेल की नाही असा प्रश्न होता. पण पहिल्याच शिबिराला विद्यार्थी व विशेषत: विद्यार्थिनी मोठ्या प्रमाणावर आल्या व पुढची अनेक वर्षे आजपर्यंत नियमाने येत आहेत.

अशा शिबिरात विविध बैठे व मैदानी खेळ, वक्त्यांकडून प्रबोधन, भारतमाता पूजन व आनंदासाठी इतर उपक्रम या सगळ्याची आखणी करण्यात श्रीरंग पिंपळीकरांचा प्रमुख वाटा होता.

प्रयोगशाळेचा पुढचा प्रवास हा नियमित व समाधानकारक होता. ४-५ वर्षांनंतर श्रीरंगच्या साथीला तळेले हे सहाय्यक शिक्षक म्हणून आले. एव्हाना 'फिरती प्रयोगशाळा' या प्रकल्पाची प्रसिद्धी दूरवर पसरली होती. ठाणे जिल्ह्यातील वीस गावातून आजपर्यंत सुमारे १५-१६ हजार विद्यार्थ्यांना गेल्या १९ वर्षांत याचा लाभ मिळाला. नंतर असे प्रकल्प इतर जिल्ह्यातून सुरू झाले व त्यासाठी श्रीरंगांनी या कामात पूर्णपणे लक्ष घालावे व अशा प्रयोगांना प्रकल्प म्हणून पूर्ण मार्गदर्शन करावे म्हणून रा. स्व.संघ जनकल्याण समितीने त्यांची प्रांतावर नियुक्ती केली. तसेच १९९६ मध्ये तत्कालीन पंतप्रधान नरसिंहराव यांचे वैज्ञानिक सल्लागार असलेले डॉ. वसंत गोवारीकर यांनीही पिंपळीकरांना बोलावून या प्रकल्पाची माहिती घेतली. अनेक वैज्ञानिक-शास्त्रज्ञ यांनी या प्रकल्पाला भेट देऊन व माहिती घेऊन या वेगळ्या कार्याची प्रशंसा केली आहे.

डॉ. जयंत नारळीकर, मराठी विज्ञान परिषद, आकाशवाणी, डॉ. होमी भाभा विज्ञान संस्था व इतर अनेक संस्थांनी या कार्याची दखल घेतली आहे.

श्रीरंग पिंपळीकर यांनी या कार्यातील इतर अनेक पैलू ओळखून त्याचा फायदा परत प्रयोगशाळेस मिळेल अशा व्यवस्था केल्या. उदा. फिरत्या प्रयोग शाळेच्या शिक्षणाचा लाभ मिळालेले अनेक विद्यार्थी पुढे महाविद्यायलयीन शिक्षण व नोकरीनंतरही या प्रयोगशाळेशी निगडीत राहतात व प्रत्यक्ष फिरत्या प्रयोगशाळेच्या कामात उत्स्फूर्त भाग घेतात.

या फिरत्या प्रयोगशाळेच्या कार्यामुळे श्रीरंग पिंपळीकर यांना दि. वि. गोखले पुरस्कार, मराठी विज्ञान परिषदेचा

प

पुरस्कार, रोटरी क्लब कल्याण, सी-डॅक राष्ट्रीय पुरस्कार, कै. अप्पा सोहनी पुरस्कार व गावागावातून त्यांचे उत्स्फूर्त सत्कार झाले. त्यांच्या मार्गदर्शनातून महाराष्ट्र व इतर प्रांतातही फिरत्या प्रयोगशाळा सुरू झाल्या आहेत.

– जयंत कुळकर्णी

## पुरंदरे, निर्मला बळवंत

**संस्थापक, समाजसेविका**

**५ जानेवारी १९३३**



निर्मला पुरंदरे यांचा जन्म बडोदा येथे झाला. त्यांचे वडील बांधकाम व्यावसायिक होते. निर्मलाताईंच्या बालपणीच त्यांचे कुटुंब साताऱ्यात स्थायिक झाले. निर्मलाताई सोळा वर्षांच्या होत्या आणि दहावी इयत्तेत शिक्षणही घेत होत्या तेव्हा, बळवंत उर्फ बाबासाहेब पुरंदरे यांच्याशी त्यांचे लग्न झाले आणि त्यानंतर १९५१ मध्ये निर्मलाताई दहावी उत्तीर्ण झाल्या.

तरुण वयातच थोर नेत्यांची आणि संतांचीही चरित्रे त्यांच्या वाचनात आली. त्यामुळे त्यांच्यावर गाडगे महाराज, समर्थ रामदास, महर्षी कर्वे, ज्योतिबा फुले यांच्या विचारांचा प्रभाव पडला. नंतर १९५२ पासून निर्मलाताईंनी त्यांच्या घराच्या परिसरात राहणाऱ्या मुलांना शिकवायला सुरूवात केली. त्यांच्यासाठी त्या वेगवेगळ्या स्पर्धा घेत. हे काम सुरु असतानाच त्यांचे बंधू श्रीकांत माजगांवकर यांच्या माणूस साप्ताहिकात त्यांनी सहाय्यक संपादक या पदावर काम करायला सुरूवात केली. त्याचवेळी श्रीकांत आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी सुरु केलेली ग्रामायन चळवळ आणि त्यांच्या इतरही चळवळी बघून निर्मलाताईंना त्यातून समाजासाठी काम करायची प्रेरणा मिळाली.

याच काळात ताईंची विद्यार्थी सहाय्यक समितीच्या कामाशी ओळख झाली. ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांसाठी काम करणारी ही संस्था होती. त्यांची विद्यार्थी सहाय्यक समितीवर विश्वस्त म्हणून नेमणूक झाली. मग त्यांचा ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांशी संपर्क येऊ लागला. विद्यार्थ्यांची वागणूक, त्यांच्या अडचणी बघून मग ताई त्यांच्या विकासासाठी प्रयत्न करु लागल्या. 'इनव्हेस्टमेंट इन मॅन' या स्वयंसेवी संस्थेसाठी काम करताना त्या ग्रामीण भागातील मुलींच्या संपर्कात आल्या. त्यावेळी त्यांच्या असे लक्षात आले की ग्रामीण भागातील मुलींचे चांगले व्यक्तिमत्व तयार होण्यासाठी त्यांच्यात आधी आत्मविश्वास निर्माण करणे गरजेचे आहे. मग त्यांना ग्रामीण भागातील रोजच्या आयुष्यातले प्रश्न आणि गरजा समजून घेता आल्या. या आधी त्या फ्रेंडस् ऑफ इंडिया सोसायटीकडून फ्रान्सला जाऊन आल्या होत्या. तिथे त्यांना पथनाट्य, व्यक्तिमत्व शिबिराचे प्रशिक्षणही घेता आले. त्याचाच उपयोग त्यांना या शिबिरांसाठी करता आला. ग्रामीण भागातल्या काही समस्यांचा त्यांनी अभ्यास केला. या अभ्यासातून त्यांच्या लक्षात आले की गावांमध्ये लहान मुलांचे शिक्षण म्हणजे बालशिक्षण ही बाब पूर्णपणे दुर्लक्षित झालेली आहे. तसेच शाळा अर्धवट सोडणाऱ्या मुलांचे प्रमाणही लक्षणीय असल्याचे त्यांना जाणवले.

पालकांशी बोलून त्यांनी बालवाडीची गरज त्यांना सांगितली. बालशिक्षणाचे महत्व गटचर्चा घेऊन पटवून दिले. १९७७ मध्ये लोणीकंद गावात पहिली बालवाडी निर्मलाताईंनी सुरु केली. मग १९७८ मध्ये जवळपास १० गावांमधून बालवाडी सुरु करण्याविषयी मागणी झाली. मग मात्र त्यांनी बालवाडी शिक्षकांसाठी प्रशिक्षण वर्ग सुरु करायचे ठरविले. सहा महिन्यांचा पहिला वर्ग शिरुर तालुक्यात सुरू करण्यात आला. शिरुर, ठाणे, हवेली, खंडाळा, पारनेर, रत्नागिरी आणि सिंधुदुर्ग या तालुक्यांमध्ये एकूण ३६ बालवाडी प्रशिक्षण वर्ग घेण्यात आले.

१९८१ मध्ये निर्मला पुरंदरे यांनी वनस्थळी ग्रामीण विकास केंद्र स्थापन केले. महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात बालशिक्षणाचा प्रसार करायचा हे वनस्थळीचे ध्येय होते. वनस्थळीच्या स्थापनेनंतर १९८१ पासून जवळपास १० हजार ग्रामीण महिलांनी सहा महिन्यांचे बालवाडी वर्गाचे प्रशिक्षण घेतले.

निर्मला पुरंदरे यांच्या कामाची पावती म्हणून त्यांना विविध पुरस्कारांनी गौरविण्यात आले. कोल्हापुरच्या पॉवर

प

ट्रस्टचा सन्मान, इंटरनॅशनल मॉंटेसरी मंडळ, सेवासदनचा देवधर स्मृती ट्रस्ट पुरस्कार असे काही पुरस्कारही त्यांना मिळालेले आहेत.

– वर्षा जोशी–आठवले

**संदर्भ :**

## पुराणिक, श्रीनिवास गोविंद

**अर्थतज्ज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**जून १९०४ – डिसेंबर १९६१**



श्रीनिवास गोविंद पुराणिक यांचा जन्म जमखिंडी संस्थानात झाला. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण जमखिंडीलाच झाले. कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयामधून त्यांनी अर्थशास्त्रात एम.ए. केले. नंतरच्या काळात पुण्याच्या गोखले अर्थशास्त्र संस्थेतील डॉ. धनंजयराव गाडगीळांचे मार्गदर्शन त्यांना लाभले.

प

१९३२ च्या जून महिन्यात पुराणिक नाशिकच्या एच.पी.टी. महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून रुजू झाले. अर्थशास्त्र व व्यवस्थापन हे त्यांचे अध्यापनाचे विषय. विषयाचा गाढा व्यासंग, इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व व उत्तम वक्तृत्व ह्यामुळे एक उत्तम प्राध्यापक म्हणून ते ओळखले जाऊ लागले. विद्यार्थ्यांचे वाचन केवळ नेमलेल्या पुस्तकांपुरते मर्यादित राहू नये यावर त्यांचा कटाक्ष होता.

ब्रिटिश अमदानीत एस. आर. पी. म्हणजे आजचे गृहरक्षक दल (होम गार्ड संस्था) सारखीच संस्था – शहरात होती. सरकारने प्रा. पुराणिकांची या दलाचे प्रमुख म्हणून नियुक्ती केली होती. या दलाच्या अत्यंत शिस्तबद्ध कार्याचे संचालन ते करीत असत. १९५० च्या दशकात व्यापारी वर्ग व सहकारी कार्यक्षेत्रातील कार्यकर्त्यांना सहकार शक्तीची जाणीव झाली होती. मार्केटयार्ड असणाऱ्या प्रत्येक गावात सहकारी बँक ही काळाची गरज होती. यातूनच १९५५ मध्ये ‘नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँके’ची स्थापना झाली व तिचे धुरीणत्व सहकार महर्षी कै. कर्मवीर भाऊसाहेब हिरे व प्रा. पुराणिक यांचेकडे आले. पुराणिकांनी अत्यंत परिश्रमपूर्वक या बँकेचा ‘मूळ आराखडा’ तयार केला. ते बँकेचे संस्थापक अध्यक्ष झाले व एका अर्थतज्ज्ञाचे मार्गदर्शन बँकेला लाभले. आज ही बँक नाशिकच्या शहरी व ग्रामीण जीवनातील प्रगतीचे एक अत्यंत भक्कम माध्यम म्हणून कार्य करीत आहे.

१९५६ मध्ये पुराणिक एच.पी.टी. महाविद्यालयाचे प्राचार्य झाले. ते उत्तम प्रशासक होते, अत्यंत कडक शिस्तीचे भोक्ते होते. कला विभागात भूगोल या विषयांची तर विज्ञानशाखेत रसायन, पदार्थविज्ञान ह्या विषयांच्या पदवी शिक्षणाची सोय केली. महाविद्यालयाचे ग्रंथालय पुराणिक यांच्या कारकिर्दीतच समृद्ध झाले. मुलांसाठी व मुलींसाठी वसतिगृहे बांधली. परिसरातील रस्ते सुधारून गावातील विद्यार्थ्यांसाठी महाविद्यालयापर्यंत वाहतुकीची व्यवस्था त्यांनी करविली. विविध योजनांसाठी त्यांनी सरकारी अर्थसाहाय्य मिळविले. संस्थेचा व्याप वाढत गेला.

संस्था आर्थिक दृष्ट्या मजबूत व्हावी असे पुराणिकांचे प्रयत्न असत. सिन्नरचे देणगीदार जगन्नाथशेट क्षत्रिय यांच्याशी संपर्क साधून त्यांनी मोठी देणगी मिळविली व बी. वाय. के महाविद्यालय उभे राहिले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## पुरोहित, वामन श्रीधर

**शिक्षक, मुख्याध्यापक**

**२२ डिसेंबर १९०१ – १९ सप्टेंबर १९७५**

वामन श्रीधर पुरोहित यांचा जन्म चाळीसगाव येथे झाला. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण नाशिक विद्यालयामध्ये झाले. नाशिकच्या एच. पी. टी. महाविद्यालयामधून मराठी व इंग्रजी विषय घेऊन ते एम. ए. झाले. त्यापूर्वीच त्यांनी एस. टी. सी. केले होते.



१९६० मध्ये महाराष्ट्रातील पहिले शालेय नाट्यशिबीर घेणाऱ्या वामनरावांनी सातत्याने मुलांमधील नाट्यगुणांचा शोध घेऊन त्यांचा विकास करण्याचे प्रयत्न केले. १९६२ पर्यंत म्हणजे बेचाळीस वर्षे त्यांनी संस्थेच्या विविध शाळांत शिक्षक, मुख्याध्यापक म्हणून अध्यापन व नेतृत्व केले.

नाशिक रोड येथील पुरुषोत्तम स्कूलला आपल्याच प्राथमिक शाळेत शिकलेली मुले मिळावीत म्हणून नाशिक रोड येथे वामनरावांनी 'नवीन मराठी शाळा' ही प्राथमिक शाळा मोठ्या दूरदृष्टीने सुरू केली. त्यांच्या कारकिर्दीत पुरुषोत्तम इंग्लिश विद्यालयाची विद्यार्थी संख्या वाढत गेली. जागा अपुरी पडू लागली. नंतर सुसज्ज, मोठी इमारत उभी केली गेली. शाळेचा शैक्षणिक दर्जाही उंचावत गेला.

मराठी भाषेच्या अध्यापनासाठी शिक्षकांना लेखन करता यावे, त्यांचा व्यासंग वाढावा, रसग्रहणक्षमता निर्माण व्हावी म्हणून मराठी अध्यापन कार्यशाळा ते घेत असत. १९३९ मध्ये नाशिक शिक्षण प्रसारक मंडळाच्या जु. स. रुंग्टा विद्यालयामध्ये त्यांनी शिक्षक म्हणून व्यवसायास सुरुवात केली. इंग्रजी व मराठी या भाषांवर त्यांचे मोठे प्रभुत्व होते.

१९४२ मध्ये नाशिक येथे संपन्न झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते. नाशिक जिल्हा मुख्याध्यापक संघाच्या अध्यक्षपदाची जबाबदारीही त्यांनी सांभाळली होती. गोवर्धन मठाचे जगद्गुरू श्री शंकराचार्य यांनी श्री योगेश्वरानंदतीर्थ स्वामी यांच्या वतीने 'साहित्य वाचस्पती' ही पदवी प्रदान केली होती. काळाराम मंदिरामध्ये उत्तम प्रवचनकार म्हणून १९५५ मध्ये त्यांना ही पदवी मिळाली.

त्यांनी शिक्षणविषयक प्रश्नांवर नाशिकरोड पोलिस ठाण्यामध्ये गणेशोत्सवात 'अभिनव न्यायसभा' आयोजित केली होती, तर ग्रामीण भागातील दहा शाळांमध्ये एकाच दिवशी लोकमान्य टिळक पुण्यतिथी साजरी व्हावी म्हणून विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले होते. नगरपालिकेच्या मदतीने शाळेसाठी खुले नाट्यगृह उभे केले. तालीम बांधली व कुस्तीसाठी हौद, मल्लखांब इत्यादींची सुविधा मुलांसाठी निर्माण केली.

मुलांना मराठीतील साहित्यिक, कवी, विविध क्षेत्रांतील दिग्गजांना पाहण्याची, त्यांचे विचार ऐकण्याची संधी मिळावी म्हणून त्यांनी शाळेच्या स्नेहसंमेलनाचे प्रमुख पाहुणे म्हणून या सर्वांना निमंत्रित केले होते. नांदगावच्या व्ही. जे. विद्यालयामध्ये मुख्याध्यापक असताना वामनरावांनी व्याख्यानमाला सप्ताहाचे आयोजन केले होते व विद्यार्थ्यांबरोबरच नांदगावकरांना महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदारांसारख्या व्याख्यात्यांचे विचार ऐकावयास मिळाले होते. एक अगदी वेगळा प्रयोग त्यांनी केला होता. शाळेची अनपेक्षित शैक्षणिक तपासणी करण्यासाठी पुरोहित अन्य शाळांतील शिक्षकांना, मुख्याध्यापकांना निमंत्रित करीत. त्यातून शाळेतील शिक्षकांना मार्गदर्शन मिळत असे.

नाशिकमधील व परगावातील अनेक सांस्कृतिक संस्थांमध्ये अध्यक्ष, सदस्य म्हणून त्यांनी काम केले. नाशिक शिक्षण प्रसारक मंडळाचे ते कार्यवाह होतेच. लोकहितवादी मंडळाचेही ते संस्थापक सदस्य होते. सार्वजनिक वाचनालय, महाराष्ट्र नाट्यमंडळ, वसंत व्याख्यानमाला इत्यादी संस्थांचे अध्यक्ष, कार्यवाह म्हणून त्यांनी काम केले. पाच नोव्हेंबरला 'मराठी रंगभूमी दिन' संपन्न व्हावा ह्या विचाराचे ते उद्गाते, प्रचारक होते. मराठी रंगभूमी शतसांवत्सरिक, महोत्सवात नाशिक व मुंबई येथे सदस्य, कार्यवाह म्हणून त्यांनी काम पाहिले.

त्यांनी नाट्यविषयक व शिक्षणविषयक विपुल लेखन केले. मनोरथ, खुणेचे पान ह्या कादंबऱ्या, सांस्कृतिक सुविचार लेखन (शालेय फलक लेखनविषयक), मराठी नाटके : माझा छंद ही पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. मराठी नाटक मंडळींचा इतिहास ही लेखनमाला 'आलमगीर' साप्ताहिकातून क्रमशः प्रसिद्ध झाली. 'मराठी

प

व्याकरण सोपान' हे व्याकरणावरील स्वतंत्र पुस्तक त्यांनी लिहिले.

– प्रा. सुहासिनी पटेल

## पेंडसे, विनायक विश्वनाथ

**संस्थापक**

**१७ ऑगस्ट १९१६ – १९ ऑगस्ट १९८३**



''आमच्या देशात बुद्धिमत्तेची कमतरता नाही तथापि बुद्धीचा सदुपयोग करणं आम्ही विसरतो आहोत.... आपण हे काम अतीव कौशल्याने करता आहात यासाठी आपल्याला मी धन्यवाद देतो.''

भारताचे पंतप्रधान हे आप्पांच्या शैक्षणिक कार्यासंबंधी सांगत होते. प्रसंग होता मोरारजी देसाई यांनी २१ सप्टेंबर १९७१ रोजी संस्थेला दिलेल्या भेटीचा ! विनायक पेंडसे तथा अप्पा यांचा जन्म पुणे येथे झाला. शाळेत श्री. म. माटे, पु. ग. सहस्रबुद्धे असे नामवंत शिक्षक आप्पांची घडण करत होते, तर घरी प्रखर राष्ट्रवादाची बीजे अंकुरण्यास पोषक अशी पुस्तके त्यांना वाचायला मिळत होती.

प

अब्दुल रशीदने स्वामी श्रद्धानंदांचा गोळ्या घालून खून केल्याचे वृत्त आले नि आप्पांना मोठा धक्का बसला. काँग्रेसचे अध्यक्षपद भूषवलेले, खिलाफत चळवळीतही सहभागी झालेले हे दयानंद शिष्य हिंदूकरणाचे महत्त्व जाणून त्या कामात हिरिरीने पडले होते. अशा या नेत्याचा, त्याच्या आजारपणात जो अमानुष खून करण्यात आला त्याचा बालमनावर खोल आघात होऊन त्यांनी 'मी श्रद्धानंदांची जागा घेईन! त्यांचं अपुरं काम मी पूर्ण करीन!' ही प्रतिज्ञा उत्स्फूर्तपणे घेतली.

लाला लजपतराय यांनी स्थापलेली 'बालचर सेना' ही पुण्यात पोचली होती. भाऊसाहेब देशमुखांनी यावेळी टिळक पथक सुरु केले. त्यात शिस्तीचे धडे गिरवणारे आप्पा शिवचरित्राची पारायणे करुन झपाटले होते. त्याच प्रेरणेतून बारा वर्षांचे आप्पा गोव्यात शिबिर घेण्यासाठी बालरचनेता म्हणून गेले ! आपल्यापेक्षा वयाने मोठे असणाऱ्या मंडळींचे हे प्रशिक्षण शिबीर यशस्वीपणे पार पाडून आप्पा नवा आत्मविश्वास घेऊन पुण्यात परतले.

१९३६ मध्ये फैजपूर काँग्रेसला आप्पा भगिनी (तारुताई) सह गेले होते. परत येताना गाडीत डॉ. हेडगेवार यांची गाठ पडली. आप्पांनी १९३३ पासूनच संघ शाखेवर जाणे सुरु केले होते.

देशाच्या स्वातंत्र्यासाठी संघशाखांवर शिस्तबद्ध युवक तयार होत होते. इतकेच नव्हे तर त्यात क्रांतिकार्याचा, शस्त्रसंग्रहाचा विचार करणारे अनेक गट होते. आप्पांचा गट तर १० मे १९४० ला खास क्रांतिदिनी स्थापन झाला होता. काही शस्त्रे मिळविण्यासाठी आप्पांनी थेट खैबर खिंडीपर्यंत प्रवास केला. रणजितसिंगांचा महाप्रतापी सरदार हरिसिंह नलुआची माहिती गोळा करण्याचे कामही झाले व पुढे ते चरित्रही आप्पांनी लिहून प्रसिद्ध केले.

हा समाज आसेतु हिमाचल संघटित करण्याचे महत्त्वही इतिहास अध्ययनातून आप्पांच्या हृदयात ठसले होते म्हणून संघाच्या आदेशाप्रमाणे आप्पा थेट आंध्रात मच्छलीपट्टण येथे प्रचारक म्हणून गेले. दरम्यान देशाची फाळणी होऊन स्वातंत्र्य आले. म. गांधी हत्या, संघ बंदी व त्यानंतरचा कारावास भोगून आप्पा पुण्यास परतले.

स्वातंत्र्य प्राप्तीसाठी बाजूस टाकलेले शिक्षण आप्पांनी पुनश्च सुरू केले. ते बी. एस्सी. व एम.एड. झाले होते. त्यांचे शास्त्रगणिताचे अध्ययन झाले होते व अनेक स्वयंसेवकांना हे विषय ते सोपे करून शिकवत होतेच. तरीही शिक्षणशास्त्रातील उच्च पदवी मिळवून त्यांनी विद्यावाचस्पती पदवीसाठी त्यांच्या आवडीचा नेतृत्व हा विषय घेतला. हुकुमशाही, लोकशाही व सहविचारात्मक नेतृत्वपद्धतींमधील नेत्यांची कार्यशैली याचे प्रयोगाधिष्ठित अध्ययन करून आप्पांनी मानस विद्यावाचस्पती ही उच्च पदवी प्राप्त केली. बरोबर पुणे विद्यापीठात मानसशास्त्राचे अध्यापनही त्यांनी केले. सेवादल संस्थापक डॉ. हर्डीकरांच्या जन्मशताब्दी निमित्त योजलेल्या अखिल

भारतीय निबंध स्पर्धेत सहभागी होऊन आप्पांनी भारतातील युवक संघटनांचा अभ्यास करून जो निबंध लिहिला त्याला प्रथम पारितोषिक मिळाले होते.

स्वातंत्र्यात युवक संघटनांची नव्याने मांडणी व्हावी हे आप्पांना आवश्यक वाटत होते. त्यासाठी त्यांनी संघाच्या सरसंघचालकांना एक शारीरिक शिक्षणाची नवीन रूपरेषाही सादर केली.

युवक संघटनांचा अभ्यास, नेतृत्वशैलींचे शास्त्रीय अध्ययन, बुद्धिमत्तेचे स्वरूप कसे असते त्याचे शास्त्रीय संशोधन; संघातील युवककार्याचा निदान २५ वर्षांचा अनुभव; या साधन सामुग्रीसह आप्पांना देश घडविण्यासाठी जे व्हावे असे उत्कटत्वाने भावत होते, ते आपणच का करू नये असे वाटू लागले अन् ज्ञान प्रबोधिनीची स्थापना झाली.

८ ऑगस्ट १९६२ या दिवशी ज्ञानप्रबोधिनीचे कार्य सुरू झाले. आरंभी १४० बुद्ध्यांकाचे विद्यार्थी निवडून घेण्याचे, सायंकाळी तासभर खेळ आणि नंतर दोन तासिका शालेय विषयांचे अध्यापन करण्याचे तंत्र या प्रबोध शाळेसाठी योजले होते. आठवीत घेतलेले विद्यार्थी शालांत परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यात महाराष्ट्रात प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झालेला अशोक निरफराके यासारखा पुण्याच्या पूर्वभागातील विद्यार्थी चमकला !

अशा प्रज्ञावंत विद्यार्थ्यांनी जीवन देशकार्यार्थ झोकून द्यावे या अपेक्षेने अप्पांनी या सुमारास समर्पणाचा आदर्श असे ‘विवेकानंद कन्या निवेदिता’ हे पुस्तक लिहिले. १९६८ मध्ये केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ या संघटनेच्या मान्यतेने ज्ञा. प्रशालेचा प्रारंभ झाला. आप्पांचे आणि त्यांच्या विद्यार्थिनी डॉ. उषा खिरे, डॉ. स्वर्णलता भिशीकर, डॉ. अशोक निरफराके इ. नी १४० बुद्ध्यांकाचा निकश कालबाह्य ठरवून १२० पैलूंच्या आधारावर प्रबोधिनीचे प्रवेशाचे तंत्र सुरू केले. त्यासाठी डॉ. गिलफर्डने मांडून ठेवलेल्या या पैलूंचे प्रत्यक्ष मोजमाप करणाऱ्या शास्त्रीय चाचण्या प्रज्ञा मानस संशोधिकेद्वारा विकसित केल्या व डॉ. गिलफर्ड यांच्याकडून त्यासाठी प्रशंसा प्राप्त केली. प्रबोधिनी अशा प्रकारे शिक्षणाच्या आणि मानसशास्त्र संशोधनाच्या जागतिक नकाशावर दिसू लागली. युरोपचा प्रवास करून आप्पांनी इंग्लंड, फ्रान्स इ. देशातील शिक्षण पद्धती पाहिली व आपल्या कल्पनांचे वेगळेपण त्यांना अधिकच भावले !

प्रबोधिनीने पूज्य विनोबांच्या प्रेरणेने देवनागरीतून इंग्रजी शिकवण्याचा, दोन इयत्तांचे इंग्रजीचे अध्यापन एका वर्षात करण्याचा, वाचन वेगाचा असे अनेक प्रयोग यशस्वी केले. स्वतंत्र इतिहास पाठ्यपुस्तके शिक्षकांनीच लिहून तयार केली. मातृभाषेच्या अध्यापनावर भर दिला. देशप्रश्नाच्या सोडवणुकीसाठी विविध विषयांचे अध्यापन व्हायला हवे असे उद्दिष्ट ठरवले, तास आवश्यक केले. प्रकल्पांची कल्पना अगदी प्रारंभापासून राबवली.

देशप्रश्नांचा केवळ पुस्तकी अभ्यास कामाचा नाही, म्हणून तमिळनाडूतील हिंदी विरोधी आंदोलन, नागा बंडखोरी, बिहारचा भूकंप, राजस्थानमधील सती प्रकरण, कोयना भूकंप, गुजरातमधील जलप्रलय, पंजाबमधील भिंद्रनवाले यांनी उभे कलेले शिखिस्तानचे संकट अशा प्रसंगी विद्यार्थी त्या त्या राज्यात गेले व त्यांनी केवळ अभ्यासच केला नाही तर त्यावर आपापल्या कुवतीप्रमाणे तोडगा काढण्याचाही प्रयत्न केला. पुढे दोन वर्षे दोन युवती पंजाबात ठाण मांडून राहिल्या, पंजाबी विद्यार्थी महाराष्ट्रात घेऊन आल्या. प्रखर देशभक्ती त्यांच्यात निर्माण व्हावी असा प्रयत्न चालू ठेवला. बुद्धिमान वा प्रगत मुलांसाठी शिक्षण व्यवस्था करून न थांबता उपेक्षितांसाठी साखरशाळा, हरयानात जाऊन भट्टी शाळा, वनवाशांसाठी १०० दिवसांची शाळा अशा प्रकारे अभिजनांपासून सामान्यांपर्यंत सर्वत्र शिक्षणाची व्यवस्था उभी करण्यात प्रबोधिनीस यश आले. प्रकल्प पद्धतीचा आग्रह अगदी प्रबोध शाळेपासून सुरू झाला. तो आता सार्वत्रिक झाला आहे. अशा प्रकारे प्रबोधिनीच्या कल्पनांना समाजमान्यतेबरोबर शासनानेही स्वीकृती दिल्याचे दिसते.

विद्याव्रताचा प्रबोधिनीचा संस्कार हा व्यक्तिमत्त्व विकसनाचा संस्कार ! व्यक्तिमत्त्व विकसनाचा हा विषय शाळांमध्ये सरकारने समाविष्ट केला आहे. शिक्षण, संशोधन, उद्योग यांचे परस्कर पूरकत्व ध्यानी घेऊन

प

आप्पांनी प्रज्ञा मानस संशोधिका, संस्कृत-संस्कृति-संशोधिका, आयुर्वेद संशोधिका व 'शैक्षणिक उपक्रम संशोधिका' अशा संशोधिका उभारल्या.

उद्‌वाहक, खांडसरी धारक, यंत्रशाळा असे छोटे उद्योगही उभारले व अर्थस्वावलंबनासह माणसांची अनुभव समृद्धीही साधण्याचा प्रयास केला. जीवनाच्या सर्व क्षेत्रात चांगले नेतृत्व लाभले तर देशाचा हवा तसा विकास होऊ शकतो. म्हणूनच प्रबोधिनीमध्ये नेतृत्व म्हणजे राजकीय नेतृत्व असा मर्यादित अर्थ घेतलेला नाही. प्रत्यक्ष प्रशासनात प्रभावी कार्य करून दाखविल्यानंतर तसे प्रशासक घडविण्याचे काम आणखी एक प्रबोधक आज करतो आहे.

मानस विद्या वाचस्पती आप्पा पेंडसे यांनी शिक्षण क्षेत्रात केलेल्या कामाचे नित्यवर्धमान असलेले स्वरूप म्हणजे लवकरच सुवर्णमहोत्सवी वर्षात पदार्पण करणारे ज्ञान प्रबोधिनीचे वर्तमान कार्य ! काश्मिरातील संगणक शिक्षण वर्ग, पूर्वाचलातील शिक्षक प्रशिक्षण वर्ग आजही चालू आहेत.

सुप्रसिद्ध लेखक डॉ. वि. रा. करंदीकर, संस्कृत व मराठीचे आधुनिक वैयाकरण प्रा. कृ.श्री. अर्जुनवाडकर, आप्पा सोहोनी अशा अनेकांना आप्पांनी शिकण्यास प्रवृत्त करून त्यांना जीवनात प्रतिष्ठित केले.

प

– यशवंतराव लेले

**संदर्भ :**

१.भिशीकर स्वर्णलता; 'ज्ञानप्रबोधिनीचे संस्थापक वि. वि. पेंडसे'

## पेंढारकर, मारुती सीताराम

**मुख्याध्यापक**

**२३ मे १९०५ – १० फेब्रुवारी १९८२**

मारुती सीताराम तथा दादासाहेब पेंढारकर एम.ए.एम.एड होते. मराठी, संस्कृत व इंग्रजी या भाषांचे ते उत्तम अध्यापक होते. मुंबईच्या पार्ले टिळक विद्यालयात शिक्षक म्हणून त्यांनी नोकरीस सुरुवात केली आणि विद्यालयाचे मुख्याध्यापक म्हणून १९६२ पर्यंत



उत्तम काम केले. विद्यार्थ्यांमध्ये अभ्यासू वृत्ती वाढावी यासाठी त्यांनी विविध उपक्रम सुरू केले. 'मुलांची संसद' होती, तिचे त्यांनी 'छात्र समिती' मध्ये रूपांतर करून कामास चालना दिली. खंडित झालेले खेळांचे उपक्रम त्यांनी सुरू केले. विविध क्रीडास्पर्धांसाठी शाळेचे संघ पाठवून खेळाडू तयार केले, शाळेचे नाव क्रीडाक्षेत्रातही मोठे केले.

१९४५ ते १९४७ पर्यंत पेंढारकर कराचीच्या 'मराठा विद्यालया'चे मुख्याध्यापक होते. त्यांचे विद्यार्थी ग. ना.सप्रे, प्र.शं. जोशी व व. दि.कुलकर्णी हेही या शाळेत होते. मिशनरी वृत्तीने कराचीतील या विद्यालयातील मुलांमध्ये त्यांनी बदल घडवून आणला, त्यांचा आत्मविश्वास जागा केला. शिक्षणाचे महत्त्व त्यांना पटत गेले. टिळक महाराष्ट्र विद्यापीठ व महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या प्रवेश, प्राज्ञ परीक्षांचे वर्ग तेथे सुरू झाले.

ऑगस्ट १९४७ मध्ये भारताची फाळणी झाली. पेंढारकर आपला मौल्यवान ग्रंथसंग्रह घेऊन सप्टेंबर महिन्यात भारतात परतले व पार्ले टिळक विद्यालयात मुख्याध्यापक म्हणून रुजू झाले. त्यांनी श्रीमती सुलभा पाणंदीकर यांच्या मार्गदर्शनाखाली एम.एड. पदवी मिळविली होती. वेगवेगळ्या अध्यापन पद्धतींचा सखोल अभ्यास करून त्यांचे शास्त्र त्यांनी तयार केले होते. त्यांचा उपयोग शिक्षकांना मार्गदर्शन करताना ते करीत. त्यांच्याबरोबर आलेले ग. न. सप्रे पुढे १९६३ ते ६५ या काळात लोकमान्य सेवा संघाचे कार्यवाह झाले. व. दि. कुलकर्णींनी पुढे पार्ले महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून काम केले. तेथील मराठी विभागाचेही ते प्रमुख होते. लोकमान्य सेवा संघाचे ते १९६७ ते ७१ या काळात उपाध्यक्षही होते. १९६२ मध्ये मुख्याध्यापक म्हणून निवृत्त होताच फेडरेशन ऑफ सोशल इन्स्टिट्यूशन्स ऑफ

विलेपार्ले या संस्थेने आपला शैक्षणिक विभाग त्यांच्यावर सोपविला. त्यांनी प्राथमिक विभागाची आखणी केली. तसेच शाळांमधील स्वच्छतेविषयी सुद्धा त्यांनी बहुमोल सूचना केल्या. त्याची फेडरेशनने महापालिकेच्या मदतीने प्रत्यक्ष कार्यवाही केली. स्थानीय 'लोकमान्य सेवा संघाचे ते आजीव' सदस्य होते.

पार्ल्यातील काही नागरिकांनी एकत्र येऊन लोकमान्य टिळकांचे स्मारक म्हणून १९२३ मध्ये लोकमान्य सेवा संघाची स्थापना केली. समाजामध्ये सामाजिक, राजकीय व धार्मिक जागृत करण्यासाठी या संस्थेची स्थापना झाली. १९८२ मध्ये त्यांच्या स्मरणार्थ लोकमान्य सेवा संघाने कै. मा.सी.पेंढारकर वाचनालय व अभ्यासिका सुरू केली. पेंढारकरांचा मोठा ग्रंथसंग्रह संस्थेस मिळाला.

– वि. ग. जोशी

**संदर्भ –**

## प्रभुणे, रामकृष्ण गोविंद

**शिक्षक, मुख्याध्यापक**

**१ ऑगस्ट १९३३**



डॉ. रामकृष्ण गोविंद प्रभुणे ह्यांनी शिक्षण मंडळ, कराड या संस्थेच्या शाळांमधून उपशिक्षक, त्यानंतर पर्यवेक्षक म्हणून काम केले. कराडच्या टिळक विद्यालयाचे मुख्याध्यापक म्हणून नऊ वर्षे ते कार्यरत होते. या सर्व काळात विद्यार्थ्यांच्या विकासासाठी प्रभुणे यांनी अनेक शैक्षणिक प्रयोग केले. सध्या ते शिक्षण मंडळ संस्थेचे कार्यवाह म्हणून कार्यरत आहेत.

डॉ. प्रभुणे यांनी शाळेत विद्यार्थ्यांसाठी जे अभिनव प्रयोग राबविले त्यातील एक म्हणजे 'दानकलश योजना'. आपल्या गरजू विद्यार्थ्यांना आपणच मदत करूया. या भावनेतून प्रत्येक विद्यार्थ्याने किमान १ रु. व शिक्षकाने १० रु. कलशात जमा केले. गरजू विद्यार्थ्यांना गणवेष व शैक्षणिक साहित्य समारंभपूर्वक देण्यात आले. पालकांच्यावरही याचा परिणाम होऊन तेही या धर्मकलशात सामील झाले. गेली दहा वर्षे हा प्रयोग कार्यान्वित आहे व शेकडो गरजू विद्यार्थ्यांना लक्षावधी रुपयांचे साहाय्य देण्यात आले.

असाच दुसरा उपक्रम म्हणजे 'जडणघडण'. थोर पुरुषांचे जीवन अभ्यासण्याची संधी मुलाखतीच्या माध्यमातून विद्यार्थ्यांना दिली. यशवंतराव चव्हाण, वि. स. पागे, उद्योगपती रावसाहेब गोगटे या सारख्या टिळक विद्यालयाच्या माजी विद्यार्थ्यांना भेटून मुलांनी त्यांच्याकडूनच ते कसे घडले जे जाणून घेतले. विद्यार्थ्यांनी तयार केलेला हा 'जडण–घडण' प्रकल्प ग्रंथरूपाने प्रकाशित केला. याशिवाय अर्धनिवासी गुरुकुलातील शिबिरात विविध क्षेत्रातल्या कर्तबगार व्यक्तींच्या मुलाखती यातून आपले व्यक्तिमत्त्व कसे विकसित करावे याचे शिक्षण दिले.

स्थल भेटीतून गाव कसे समजावून घ्यावे हे शिकण्याची संधी मुलांना दिली. प्रभुणे शिक्षण क्षेत्रातील संशोधक आहेत. शिवाजी विद्यापीठातून 'प. पू. साने गुरुजी यांच्या वाङ्मयाचा शैक्षणिक दृष्टिकोनातून चिकित्सक अभ्यास' हा प्रबंध सादर करून त्यांनी पीएच. डी. पदवी प्राप्त केली. या संशोधन प्रकल्पास शिवाजी विद्यापीठाचा उत्कृष्ट संशोधन प्रकल्पाचा पुरस्कार मिळाला आहे. या ग्रंथाचा अभ्यासक्रमात समावेश करण्यात आला आहे. संदर्भ ग्रंथ म्हणूनही तो अत्यंत महत्त्वाचा आहे. 'अभिनयातून आत्माविष्कार' व 'मातृभाषेच्या अध्यापकाची भूमिका' या त्यांच्या दोन शोधनिबंधांना पुरस्कार मिळाले आहेत.

निवृत्तीनंतरही ते शिक्षकाचा धर्म निभावत आहेत. संस्थेच्या गुरूकुलामध्ये ते अध्यापन करीत आहेत. शिक्षण पद्धतीच्या संदर्भात २००३ मध्ये कराड येथे शैक्षणिक चिंतन परिषदेचे आयोजन केले होते. शिक्षणाच्या दृष्टीने त्यांनी केलेले लेखन मौलिक स्वरूपाचे आहे. १९८१ मध्ये शिव पार्वती प्रतिष्ठानच्या वतीने त्यांचा 'श्यामची

प

आई: संस्कारांचा अमृत कुंभ' हा ग्रंथ प्रकाशित झाला आहे. १९८६ मध्ये 'पेशवाईतील न्यायदेवता' या त्यांच्या कादंबरीला मराठी साहित्य परिषदेचा 'मृत्युंजयकार शिवाजी सावंत पुरस्कार' मिळाला. 'जडण घडण', 'लोकमानसातील यशवंतराव', 'अध्यापनाच्या नव्या वाटा' हे त्यांचे शैक्षणिक प्रकल्पही प्रकाशित झाले आहेत.

प्रभुणे यांचे सामाजिक संस्थांमधील योगदानही महत्त्वपूर्ण आहे. ते कराडच्या ज्येष्ठ नागरिक संघाचे संस्थापक सदस्य, कार्यवाह आहेत. माहुलीच्या रामशास्त्री प्रभुणे प्रतिष्ठानचे कार्यवाह, पी. डी. पाटील गौरव प्रतिष्ठान, अर्धनिवासी गुरुकुल, कराड या संस्थेचे संस्थापक म्हणून आजही ते काम पाहात आहेत. शिक्षण मंडळाचे कनिष्ठ महाविद्यालय व महिला महाविद्यालय काढण्यात व वाढविण्यात त्यांचा मोठा सहभाग आहे.

यशवंत व्यासपीठ व कै. दादासाहेब अळतेकर व्याख्यानमाला चालू करण्यात त्यांचे महत्त्वपूर्ण योगदान आहे. १९९९ मध्ये साने गुरुजी जन्मशताब्दीनिमित्त 'श्यामची आई : संस्कारांचा अमृतकुंभ' या पुस्तकावर तीनशे व्याख्याने दिली. महामानव विनोबा या विषयी पंचाहत्तर व्याख्यानांचा प्रकल्प पार पाडला.

डॉ. रा. गो. प्रभुणे यांच्या ह्या शैक्षणिक व सामाजिक कार्याबद्दल कराड व परिसरातील शैक्षणिक संस्थांच्या वतीने गुरुदेव कार्यकर्ता, पुणे जिल्हा मुख्याध्यापक संघाचा मधुसंचय, पुण्याच्या महाराष्ट्र शैक्षणिक प्रशासन व व्यवस्थापन परिषदेचा 'ना. गोपाळ कृष्ण गोखले महाराष्ट्र गौरव', सांगलीच्या प्रतिष्ठा प्रतिष्ठानच्या वतीने 'साने गुरुजी सेवा प्रतिष्ठा' अशा अनेक पुरस्कारांनी त्यांचा गौरव करण्यात आला.

शिक्षण क्षेत्रातील सर्वोच्च बहुमानाच्या 'आदर्श शिक्षक' राष्ट्रपती पुरस्काराचे ते मानकरी आहेत.

– डॉ. व्ही. व्ही. घारपुरे, प्रा. सुहासकुमार बोबडे

* * *

प




**फडके, गोविंद आप्पाजी**
☞ **मुख्य नोंद – आरोग्य खंड**

**फाटक, अरुण धोंडोपंत**
**शिक्षक**
**२१ ऑक्टोबर १९५४**

**फाटक, अर्चना अरुण**
**शिक्षक**
**१९ मार्च १९५६**



अरुण धोंडोपंत फाटक यांचा जन्म कर्नाटक राज्यातील धारवाड येथे झाला. अलिबागला शालेय शिक्षण झाल्यानंतर अहमदनगरला बी. ए. पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. वडील पाटबंधारे विभागात कारकून होते. घरच्या आर्थिक परिस्थितीची जाणीव असल्याने हरहुन्नरी अरुण लहानपणापासूनच अर्थ प्राप्ती करीत होता. बालपणी अलिबागच्या समुद्रकिनाऱ्यावरील शंखशिंपले गोळा करून त्याच्या आकर्षक कलात्मक वस्तू,शुभेच्छापत्रे, बाहुल्या आदी तयार करून विक्री करायचा, पूजा सांगण्यासाठीही जात असे. पुढे तो अहमदनगरला गेल्यावर देखील पतंग, कोंबड्यांच्या पंखांचे वॉलपीस, रुखवत असे सहज करण्यासारखे कमी भांडवली उद्योग करायला लागला.

बी. ए. ची पदवी प्राप्त केल्यानंतर त्यांचे कुटुंब रत्नागिरीस राहण्यास आले. घरच्यांची इच्छा होती की कुठेतरी कारकून म्हणून अरुणने काम करावे. परंतु अरुणचे कलाकार मन कारकुनी करायला तयार होईना. म्हणून मग घर सोडून कलासाधना करीत अनेक ठिकाणी भ्रमंती केली आणि मूर्तिकला, चित्रकला, शिल्पकला यासारख्या कला अवगत केल्या.



पेणला एके ठिकाणी काम करीत असताना या गुणी कलाकाराला पुण्याच्या गोखले बाईंनी हेरले आणि पुण्यातील सुहृद मंडळ या मूकबधिर मुलांच्या शाळेत मुलांना शिकविण्याची विनंती केली. मूकबधिर मुलांना कलात्मक वस्तूंचे शिक्षण देताना कला शिक्षकाला आवश्यक असणारे प्रमाणपत्र नसल्याने सुरुवातीला शिपाई म्हणून काम केले होते.

अर्चना या मूळच्या रत्नागिरीच्या. एम.ए. बी.एड. पर्यंत शिक्षण घेतल्यानंतर मालतीबाई जोशी यांच्या एका व्याख्यानातील मूकबधिर मुलांच्या शिक्षणासाठी काम करण्याच्या आवाहनाला प्रतिसाद देत जीवनाची दिशा ठरवली आणि पुण्याच्या सुहृद मंडळ मध्ये डेफ एज्युकेशनचा डिप्लोमा करण्यासाठी गेल्या. त्याच दरम्यान रत्नागिरीच्या 'दि न्यु एज्युकेशन सोसायटी' ने मूकबधिर मुलांसाठी शाळा काढण्याचे ठरविले होते.

२ जुलै १९८१ रोजी जागतिक अपंग दिनाच्या निमित्ताने रत्नागिरी जिल्ह्यातील पहिली मूकबधिर मुलांची शाळा सुरू करण्यात आली. तोपर्यंत रत्नागिरीकरांना मूकबधिर मुले शिकू शकतात हे माहीतच नव्हते. या शाळेच्या स्थापनेपासूनच अर्चना व अरुण फाटकांनी या शाळेत शिक्षक म्हणून कामास सुरुवात केली. आवश्यक प्रमाणपत्र

मिळवून कला शिक्षक म्हणून कामास सुरुवात करत असतानाच फाटकांना अर्चना यांनी त्यांना डेफ एज्युकेशनचा डिप्लोमा करण्याचे सुचविले आणि भाषा शिक्षक होण्यासाठी प्रोत्साहन दिले. पुढे १ जून १९८२ साली या दोघांचा विवाह झाला.

अर्चनाबाईंकडे सुरुवातीला अनेक वर्षे शाळेची व्यवस्थापकीय जबाबदारी होती. फाटक आज शाळेचे मुख्याध्यापक म्हणून काम पाहातात. एका छोट्याशा खोलीत परिसरातल्या १२ मूकबधिर मुलांना घेऊन ही शाळा सुरू करण्यात आली. शाळेमध्ये या मुलांना पुस्तकी शिक्षणाच्या जोडीने व्यवसाय शिक्षणाची गरज असते, कारण त्यांच्या या दुर्दैवी न्यूनतेला सामान्य माणसांच्या उद्योग आणि व्यवसायाची दारें उघडी नसतात.

हे वास्तव लक्षात घेऊनच अर्चना व अरुण फाटकांनी मूकबधिर मुलांना शाळेत व्यावसायिक कौशल्य प्राप्त होईल असे शिक्षण देण्याचे ठरविले. त्या दृष्टीने राख्या, भेटकार्ड, कागदी फुले, नाग, मूर्ती, शोभेच्या वस्तू व इतर कलात्मक वस्तूबरोबरच शिवणकाम, भरतकाम, सुतारकाम, स्क्रीन प्रिंटिंग असे व्यावसायिक शिक्षण दिले. मूकबधिर मुले टाकाऊ, दुर्लक्षित किंवा दुबळी न ठरता ती समाजातील उपयुक्त, उत्पादक आणि स्वावलंबी बनवीत यासाठी प्रयत्न केले. त्यासाठी शिक्षणानंतर त्यांना नोकरी मिळवून देण्यासाठी प्रयत्न केले. त्याचबरोबर स्वतंत्र उद्योग सुरू करण्यासाठी मदत व प्रोत्साहन दिले. एवढेच नाहीतर त्यांचे वैवाहिक पुनर्वसन व्हावे यासाठी फाटक दांपत्याने वेळोवेळी पुढाकार घेतला.

मूकबधिर मुलांच्या शिक्षणाबद्दल समाजात जागृती करण्यासाठी फाटक दांपत्य सहकाऱ्यांबरोबर अनेक शाळा, वाड्या, वस्त्यांबरोबरच अनेक गावात जाऊन त्यासंबंधी माहिती देऊन, सर्वेक्षण करून त्या मुलांच्या पालकांची समजूत काढून मूकबधिर मुलांना शाळेत आणण्याचे काम करतात.

हे करत असताना अनेक अडचणी, अज्ञान, अंधश्रद्धा यामुळे निर्माण होतात. मूकबधिर मुलांच्या मनातील न्यूनगंड दूर व्हावा तसेच त्यांच्या सुप्त गुणांना वाव मिळावा, त्यांच्यात आत्मविश्वास निर्माण व्हावा, समाजात मिसळण्याची सवय व्हावी यासाठीही ते विविध सांस्कृतिक कार्यक्रम, पालक सभा इत्यादी उपक्रम राबवित असतात. त्याचबरोबर मूकबधिर मुलांच्या कलागुणांना प्रोत्साहन मिळावे व समाजात अपंगांविषयी जागृती व्हावी या हेतूने दीपावलीपूर्वी हस्तकला प्रदर्शन भरविण्यात येते.

फाटक हरहुन्नरी कलाकार आहेत. चित्रकला, मूर्तिकला, काचेची चित्रे, रांगोळ्या, शंख-शिंपल्यांच्या कलात्मक वस्तू तयार करणे याबरोबरच अभिनय, नृत्य, नाट्यलेखन, दिग्दर्शन या आपल्या कलागुणांचा वापर करून ते मूकबधिर मुलांचा सर्वांगीण विकास साधतात. त्यांनी अभ्यासक्रमातील 'गोष्ट तुमची आमची' या अपंगांसाठीच्या नाट्यीकरणात गीतलेखन, नेपथ्य, वेशभूषा व अभिनय केला आहे इयत्ता ३ री व ४ थीच्या भूगोलावर आधारित 'महाराष्ट्र आमुचा' या नाट्यासाठी गीतलेखन केलेआहे. त्याचे ५० प्रयोग आजपर्यंत झाले आहेत.

त्याचबरोबर विविध संस्थांना विविध कलाविषयक मार्गदर्शन, विविध अभ्यासविषय शिकविण्यासाठी मूकबधिरांना उच्चार शिक्षण देण्यासाठी विशेष प्रकारच्या साहित्याची निर्मिती केली आहे. त्यामुळेच आज शाळेने सांस्कृतिक क्षेत्रात उत्कृष्ट कार्य केले असून मूकबधिर विद्यार्थ्यांनी सादर केलेल्या नाट्यप्रयोगास राज्यस्तरीय स्पर्धेत प्रथम क्रमांक मिळविला आहे. या बरोबरची श्री. व सौ.फाटक आकाशवाणी, वृत्तपत्रे अशा विविध माध्यमातून अपंगांच्या समस्या, शिक्षणाचे महत्त्व आणि त्यांची उपयुक्तता याबद्दल समाजात जागृती करण्याचे काम करीत असतात. शाळेच्या सुरुवातीला वसतिगृह नसल्याने स्वतःच्या घरी मूकबधिर मुलांना राहण्याची सोय करून दिली. आजही अनेक गरजू, गरीब, हुशार विद्यार्थ्यांना विशेष मार्गदर्शन व मदत हे दोघेही करीत असतात.या कामासाठी फाटकां चा 'शारदा पुरस्कार' व 'सु. ल. गद्रे पुरस्कार' देऊन गौरव करण्यात आला व सौ. फाटक यांचा महाराष्ट्र शासना तर्फे 'पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर पुरस्कार' देऊन सन्मान करण्यात आला आहे.

– विवेक वि. कुलकर्णी

फ

## फाटक, दत्तात्रेय शंकर

**प्राचार्य**

**२७ जानेवारी १९०९ – १८ ऑगस्ट १९९२**



दत्तात्रेय शंकर फाटक यांचा जन्म अलिबाग तालुक्यातील धोकवडे या गावी झाला. दत्तात्रेय चार वर्षांचे होताच त्यांच्या आई सरस्वतीचे प्लेगने निधन झाले. त्यामुळे त्यांचे बालपण आजी व आजोबा यांच्या सहवासात गेले. धोकवडे येथे एक शिक्षकी शाळेत तिसरी इयत्तापर्यंत नंतर अलिबागच्या नगरपालिकेच्या शाळेत चौथी व पाचवी करून तिथल्या मिशन स्कूल मधून १९२७ मध्ये ते मॅट्रिक झाले. संपूर्ण विद्यापीठात ते सहाव्या क्रमांकाने उत्तीर्ण झाले. त्याकाळी मॅट्रिकची परीक्षा मुंबई विद्यापीठ घेत असे व त्या विद्यापीठाची हद्द कराचीपासून धारवाडपर्यंत होती. शिष्यवृत्ती मिळाल्याने फाटक मुंबईच्या विल्सन महाविद्यालयात दाखल झाले. तेथे वसतिगृहात राहून त्यांनी चिकाटीने, मन लावून अभ्यास केला. इंटरला द्वितीय श्रेणी मिळाली.

नंतर संस्कृत विषय घेऊन १९३१ मध्ये बी.ए. झाले. त्या विषयांत संपूर्ण विद्यापीठात ते पहिले आले व त्यांनी ‘भाऊ दाजी पारितोषिक’ पटकाविले. त्याच महाविद्यायात ‘दक्षिणा फेलो’ म्हणून त्यांची नेमणूक झाली. १९३३ मध्ये संस्कृत व मराठी विषय घेऊन ते द्वितीय श्रेणीत उत्तीर्ण झाले.

विल्सन महाविद्यालयात प्रा. हरिभाऊ वेलणकर हे संस्कृतचे व प्रा. आर. डी. चोकसी हे इंग्रजीचे अध्यापक होते. या दोघांच्या व्यक्तिमत्वाचा व अध्यापन कौशल्याचा अप्रत्यक्षरित्या फाटक यांच्यावर परिणाम झाला. महाविद्यालयाच्या शिक्षणात त्यांचे वडीलबंधू लक्ष्मण शंकर फाटक यांनी कळकळीने आर्थिक मदत केली. अध्यापनाची आवड असल्याने त्यांनी गिरगावात युनियन विद्यालयामध्ये दोन वर्षे शिकवण्याचे काम केले (१९३३–३५). त्याच काळात मुंबईत महिला महाविद्यालयात तृतीय वर्ष बी.ए. (पूर्वीचे ज्युनिअर बी.ए.) वर्ग सुरू झाले. तेथील प्राध्यापक विनायक हरी कामत यांनी फाटकांना या अभ्यासक्रमात तिसऱ्या वर्षाचे संस्कृत शिकवायला दिले; म्हणजे योगायोगाने फाटक प्राध्यापक झाले.

अण्णासाहेब कर्वे यांनी आरंभिलेले स्त्रीशिक्षणाचे कार्य म्हणजे आपले जीवनव्रत आहे असे मानून प्रा. फाटक यांना सरुवातीला दहा वर्षे दादर भागात घरोघर हिंडून महिला महाविद्यायाचे महत्त्व पालकांना पटवून द्यावे लागले. महिलांसाठी उपयुक्त व महत्वाचे शिक्षण प्रादेशिक भाषेतून देण्याची सोय इत्यादी माहिती लोकांपर्यंत पोचवण्यासाठी दरवर्षी पाच हजार पुस्तके छापून फाटकांनी स्वतः ती वितरित केली व दहा वर्षे विद्यापीठ प्रवेश वर्ग विनामूल्य चालविला. पण १९४९ पासून हा वर्ग बंद केला कारण मॅट्रिकऐवजी एस.एस.सी. या नावाने या परीक्षेचे सरकारीकरण झाले व या विद्यापीठाकडे ती परीक्षा घेण्याचा अधिकार राहिला नाही.

जुलै १९३३ पासून ते १९७४ पर्यंत त्यांनी श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालयाची अखंड सेवा केली. १९५६ पूर्वी काही काळ त्यांनी प्रभारी प्राचार्य म्हणून काम सांभाळले व १ मे १९५६ ते १९७४ या काळात फाटक प्राचार्यपदी राहिले. कामाची वाटणी आणि खर्चाचे अंदाजपत्रक चार पाच महिने आधीच ते तयार ठेवीत. विभागाचे कामकाज, महत्वाच्या घडामोडी, परिपत्रकांचे तपशील अशा अनेक गोष्टींची नोंद ते करून ठेवीत. त्यामुळे महिला विद्यापीठाचा चालताबोलता ज्ञानकोश असे स्थान त्यांना प्राप्त झाले.

जवळजवळ ४० वर्षे फाटक यांनी बी.ए. व एम.ए. च्या वर्गांना संस्कृत शिकवले. मुंबई विद्यापीठाने १९३७ मध्ये आयोजित केलेल्या ‘हिस्टॉरिकल इंटरप्रिटेशन ऑफ विष्णुपुराण’ या विषयावरील निबंधस्पर्धेत फाटकांना ‘व्ही.एन. मंडलिक पारितोषिक’ मिळाले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली प्रा. कमला अभ्यंकर यांनी ‘राजशेखराची काव्यमीमांसा’ आणि प्रा. सुमती फडके यांनी ‘क्षेमेंद्राची उपहासकाव्ये’ या विषयांवर पीएच.डी. मिळवली. मराठी

फ

व गुजराती अशी सत्र आणि सकाळचे व दुपारचे अशी दोन अधिवेशने असा व्याप असल्याने फाटक सकाळी सात ते सायंकाळी साडेपाचपर्यंत महाविद्यायातच असत.

१९७२ मध्ये 'आदर्श शिक्षक' म्हणून महाराष्ट्र शासनाने त्यांचा गौरव केला. १९६९-१९७२ या काळात ते विद्यापीठाच्या कलाशाखेचे अधिष्ठाता नेमले गेले.अविरत कार्यरत असणाऱ्या प्रा. फाटकांनी आरंभी आपल्या कला् महाविद्यालयामध्येच इतर ज्ञानशाखांचे विभाग सुरू केले. गृहविज्ञान, गृह परिचर्या, प्रशिक्षण, ग्रंथपालन इत्यादी विभागांची जोपासना केली. त्यासाठी जाणत्या आणि ध्येयवादी अध्यापिका मिळविल्या. त्यांना भरपूर मदत केली, मार्गदर्शन केले.

त्या विभागांची योग्य वेळी स्वतंत्र महाविद्यालये थाटून दिली. त्यांचे अभ्यासक्रम, जमाखर्च, वेळापत्रक, परीक्षापद्धती या गोष्टींची नीट व्यवस्था लावून दिली. महिला विद्यापीठाच्या आजच्या विकासाचे श्रेय मुख्यतः प्राचार्य फाटकांच्या नियोजनाला आहे.

श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला महाविद्यालयाच्या शिक्षक वर्गाने १२ मार्च १९७४ रोजी मानपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

१९७६ पासून चार वर्षे ते एम.ए.ला संस्कृत परीक्षेकरता परीक्षक म्हणून नियुक्त झाले होते. आकाशवाणीवर संस्कृत वाङ्मयातील बालकल्याण विचार, विश्वगुणादर्श चंपूचा परिचय, कालिदासाची बालसृष्टी, लोकमान्यांचे वैदिक संशोधन, संस्कृत सुभाषितातील स्त्रीदर्शन, छांदोग्य, तौत्तरिय, ऐतरेय, कठ, ईश या उपनिषदांचा परिचय प्रा. फाटकांनी करून दिला. त्यांनी आपला व्यासंगही सतत जोपासला.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

फ

## फाटक, हरिभाऊ

**संस्थापक**

**१० नोव्हेंबर १८७४ – २७ मे १९६७**



तो हा काळ महाराष्ट्राच्या वैचारिक क्रांतीचा होता. या राष्ट्रीय जागृतीच्या काळात हरिभाऊंचे शालेय शिक्षण टिळक - आगरकरांच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये आणि महाविद्यालयीन शिक्षण ना. गोखले यांच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये झाले.हरिभाऊंच्या वडिलांचा मृत्यू १८९७ मध्ये झाला. मोठ्या कुटुंबपोषणाची जबाबदारी त्यांच्यावर पडली. त्यांना सरकारी नोकरीकडे वळावे लागले. १८९७ मध्ये त्यांना अकोट (जि. अकोला) येथे शाळा खात्यात नोकरी मिळाली. १८९७ ते १९०४ हा त्यांचा काळ अकोटच्या विद्यालयामध्ये गेला. हरिभाऊंच्या मनात देशभक्ती असली तरी त्यावेळी त्यांच्यावरची भावंडांची जबाबदारी मोठी होती. त्यामुळे नोकरी ही महत्त्वाची होतीच.

महाविद्यालयीन शिक्षण घेत असताना गोखले हेच हरिभाऊंचे आराध्य दैवत होते. नंतर १९०४ मध्ये फाटक यवतमाळला शिक्षक होते. तेव्हा भिडे गुरुजींच्या द्वारे हरिभाऊंनी देशसेवेची शपथ घेतली. त्यावेळीही कुटुंब पोषणाच्या चिंतेने त्यांना ग्रासलेले होतेच. देशासाठी काही केले पाहिजे. आपण विद्यादान करतोच, ते एकनिष्ठेने करावे. विद्यार्थ्यांना देशभक्तीचे पाठ द्यावेत, शिवाजी महाराजांचे माहात्म्य शिकवावे. १९०५ मध्ये स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षणाची लाट उसळली. तेव्हा हरिभाऊंची बदली वणीला करण्यात आली. तेव्हा तपस्वी बाबासाहेब परांजपे यांच्या आग्रहामुळे हरिभाऊ विद्यागृहाची (राष्ट्रीय शाळा) जबाबदारी घ्यायला तयार झाले. हरिभाऊंना देशकार्याची दिशा मिळाल्यावर देशसेवेचे व्रत सोडले नाही आणि त्यांनी आयुष्यभर तरुणांना देशकार्याकडे ओढण्याचेच कार्य केले. ही शाळा दोन वर्षांतच (१९०९) सरकारी दडपशाहीला

बळी पडली. पण इथेच हरिभाऊ फाटक आणि दत्तोपंत आपटे या देशभक्तांची मैत्री जुळली. यवतमाळचे हे विद्यागृह बंद झाल्यावर ते दोघे पुण्याला परतले. त्यावेळी मुंबईत टिळक खटला सुरू होता. त्याच सुमारास दैनिक राष्ट्रमत या पत्राला नव्या संपादक – प्रकाशकाची गरज होती. मग ही जबाबदारी हरिभाऊ आणि आपटे यांनी स्वीकारली. त्याचबरोबर राष्ट्रमतात त्यागपूर्वक काम करणाऱ्या देशभक्तांसाठी चालणाऱ्या पाकशाळेचे काम त्यांनी मनापासून स्वीकारले. राष्ट्रमताचे काम सुरू झाले. पण राष्ट्रमताकडून ब्रिटिश सरकारने दोन हजारांची जामिनकी मागितल्यामुळे १९१० मध्ये राष्ट्रमत बंद केले गेले.

१९१० मध्येच गोव्यात लोकसत्ताक राज्याची घोषणा झाली. लोकसत्ताक राज्यात क्रांतिकार्यास पोषक कार्य करणे सोपे जाईल या अपेक्षेने अमरावती – यवतमाळकडून कार्यकर्त्यांचा चमू गोव्याकडे सरकला. गोव्यात मराठी शिक्षण सुरू करण्यास मोकळीक मिळाल्याने बाबा परांजपे यांनी ती जबाबदारी स्वीकारली. फाटक–आपटे, देशपांडे, नारळे आदी यवतमाळचे शिक्षक व विद्यार्थीही गोव्यात पोचले. दोन ते तीन महिन्यातच १९११ मध्ये फोंडा येथे आत्मेद महाविद्यालय सुरू झाले. या शाळेचा प्रयोग यशस्वी झाला. माध्यम मराठी असल्यामुळे शाळेला भरपूर विद्यार्थी मिळाले. विद्यार्थी संख्या झपाट्याने वाढली.

टिळकांची सुटका झाल्यानंतर हरिभाऊ–आपटे पुन्हा पुण्यास परतले. त्यानंतर त्यांनी दोन–तीन वर्षे होमरुल लीगचे निरीक्षक म्हणूनही काम केले. ठिकठिकाणची होमरुल लीग–दप्तरे तपासणे, त्यांचे हिशेब पाहणे हीच कामे हरिभाऊंकडे होती. अंगावर घेतलेल्या कामात झोकून देणे हीच त्यांची खरी वृत्ती होती.

टिळकांचे प्रभावी राजकारणच वेगळ्या मार्गाने व पद्धतीने गांधी पुढे नेत आहेत असे पटल्यानेच हरिभाऊ गांधींच्या मागे त्याच निष्ठेने गेले. हरिभाऊंनी गांधीजींच्या विधायक कार्यक्रमांपैकी खादीप्रमाणेच हातसडीचा तांदूळ, घाण्याचे गोडेतेल यांच्या प्रसारासाठी दीर्घकाळ खटाटोप केला. सहकाराशिवाय पर्याय नाही हे जाणवल्यामुळेच सहकार्याने चालवले जाणारे लहानसहान उद्योगधंदे तरुणांनी करावेत यासाठी त्यांनी अनेक प्रयोग केले. कार्यकर्त्यांसाठी हरिभाऊंनी एक सहकारी पतपेढी–सोसायटी चालवली. त्यातून अडीअडचणीच्या वेळी कार्यकर्त्यांना कर्ज दिले जात असे. या सोसायटीचे सर्व काम करणाऱ्या स्त्री कार्यकर्त्याच होत्या.

पुण्यातील विद्यार्थी सहाय्यक समितीच्या कार्याची मूळ प्रेरणा आणि संघटनाही हरिभाऊंचीच होती. आज या संस्थेचे कार्य बरेच विस्तारलेले आहे. आज संस्थेची तीन वसतिगृहे आहेत. त्यातील एक मुलींचे असून उर्वरीत दोन मुलांसाठी आहेत. ही संस्था सध्या पाचशे गरीब व अभ्यासू विद्यार्थ्यांना दरमहा ४०० रुपयांत दोन्ही वेळेच भोजन देते. विद्यार्थ्यांना पुस्तके व अभ्यासाला व राहण्याला जागा मिळवून देणे, काही कामधंदा मिळवून देणे अशी अनेक कामे संस्थेकडून चालू असतात. याशिवाय सध्या संगणकाचे मुलभूत प्रशिक्षणही दिले जाते. विद्यार्थी केंद्रात व्याख्याने, योगासने यांचेही शिक्षण दिले जाते. त्याशिवाय कमवा शिका योजनेतूनही विद्यार्थी घडत आहेत. याही संस्थेत सहाय्यक म्हणून काम करणाऱ्यांमध्ये बहुसंख्य स्त्रीयाच असून त्या कार्यक्षमतेने काम पाहतात.

वयाच्या नव्वदाव्या वर्षी लोकनायक बापूजी अणे यांच्या अध्यक्षतेखाली त्यांचा जाहीर सत्कार करण्यात आला.

– वर्षा जोशी – आठवले

फ

## फुले, जोतीराव गोविंद

***महात्मा जोतिबा फुले***

**समाजसुधारक**

**११ एप्रिल १८२७ – २८ नोव्हेंबर १८९०**

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

समाजातील शुद्रातिशूद्र (बहुजन) बांधवांच्या दुर्दशेचे मूळ ‘अविद्ये’त सामावले असल्याचे मार्मिक विश्लेषण करणारे महात्मा ज्योतिबा फुले यांचे वचन सुविख्यात आहे. हे मूळ दूर करण्यासाठी, पर्यायाने शिक्षणापासून वंचित राहिलेल्या समाजघटकांना शिक्षणाची संधी आणि सोय



उपलब्ध करून देण्याचे कामी ज्योतिबा फुले यांनी अत्यंत महत्त्वाची भूमिका बजावली.

समाजातल्या उच्चभ्रू ब्राह्मण वर्गापुरतेच शिक्षण मर्यादित असण्याचा तो काळ होता. किंबहुना समाजाच्या वरच्या थरातून खालच्या थरात शिक्षण झिरपत जाईल असा समज त्या काळात प्रचलित होता. आपल्या समाजात घट्ट रुजलेल्या जातीव्यवस्थेमुळे हा समज पूर्णपणे भ्रामक आणि पोकळ ठरला होता.

बहुजन समाजातील शेतकरी, अस्पृश्य मानल्या जाणाऱ्या जातींमधील बांधव, महिला इ. दुर्बल घटकांसाठी शिक्षणाची व्यवस्था निर्माण करणारे पहिले सुधारक ज्योतिबा फुलेच आहेत. १८४८ मध्ये ज्योतिबांनी महार मांगांमधील मुलींसाठी शाळा सुरू केली.

पाठोपाठ ३ जुलै १८५१ रोजी पुण्याच्या बुधवार पेठेत मुलींसाठी शाळा सुरू केली. या शाळेत शिकविण्यासाठी त्यांनी आपल्या पत्नीला – सावित्रीबाई यांना प्रशिक्षित आणि उद्युक्त केले. तत्कालीन सनातन वर्गाकडून होणाऱ्या कडव्या आणि संघटीत विरोधाला न जुमानता त्यांनी आपले हे कार्य नेटाने चालविले. त्यासाठी त्यांना आपले वडिलार्जित घरही सोडावे लागले. १८५५ मध्ये कष्टकरी वर्गासाठी रात्रीची शाळा सुरू करणारे पहिले समाज सुधारक महात्मा ज्योतिबा फुले हेच होत. ब्रिटिश सरकारने शिक्षण प्रसारासाठी १८८२ मध्ये स्थापन केलेल्या हंटर आयोगासमोर दिलेल्या सविस्तर साक्षीद्वारेही त्यांनी बहुजन समाज शिक्षित करण्यासाठीच्या अनेक उपयुक्त सूचना केल्या. प्राथमिक शिक्षण सक्तीचे केले जावे अशी मागणी या साक्षीद्वारे करणारे ज्योतिबा हे पहिले भारतीय समाजधुरीण होते.

शिक्षण घेणे सर्वांना सुलभ व्हावे या दृष्टीने मातृभाषा, हिंदी आणि इंग्रजी अशा त्रिभाषा सूत्राचा अवलंब करण्याची महत्त्वपूर्ण सूचना त्यांनी केली. दारिद्र्याने गांजलेल्या आणि शेतकीच्या गुरेढोरे राखण्याच्या कामी मुलांचा उपयोग अपरिहार्यपणे कराव्या लागणाऱ्या शेतकरी वर्गाच्या मुलांसाठी शिष्यवृत्त्या तसेच वार्षिकआणि सहामाही बक्षिसांची योजना करावी. यांत्रिकी, नीतिबोध, आरोग्य, शेतकी या विषयांवरील पाठ पुस्तकांमधून श्रेणीनुसार वाढत्या प्रमाणात देण्यात यावेत, बहुजन वर्गातील मुलांना शिक्षण देण्यासाठी त्याच – कनिष्ठ वर्गातील शिक्षक तयार करावेत, खेड्यातील मुलांना शेतकी आणि तांत्रिक शिक्षण द्यावे, उच्च शिक्षणाची व्यवस्था अशी असावी की ते घेणे सर्वांना सुलभपणे परवडावे या आणि अशा अनेक महत्वपूर्ण सूचना हंटर आयोगासमोर सादर केलेल्या निवेदनाद्वारे ज्योतिबा फुले यांनी केल्या.

साऱ्या पार्श्वभूमीचा विचार करता महात्मा ज्योतिबा फुले यांच्या शिक्षणविषयक कार्याच्या दोन पैलूंचा उल्लेख विशेषत्वाने करण्यासारखा आहे.

एक : त्यांनी केलेल्या सर्व सूचनांना त्यांच्या त्या त्या बाबतीत केलेल्या प्रत्यक्ष कार्याची भक्कम जोड होती आणि दोन : सार्वत्रिक शिक्षण प्रसार व्यवसायाभिमुख शिक्षण, शिक्षणाचे माध्यम आणि शिक्षणाचे अर्थकारण इ. महत्वाच्या पैलूंबाबत दीडशे वर्षापूर्वी ज्योतिबांनी केलेले चिंतन आजही सुसंगत ठरणारे आणि मौलिक आहे.

– अरुण करमरकर

**संदर्भ :**

फ

## फुले, सावित्रीबाई जोतीराव

**शिक्षिका, समाजसुधारक**

**३ जानेवारी १८३१ –१० मार्च १८९७**

एकोणिसाव्या शतकात जन्मलेल्या सावित्रीबाई जोतीराव फुले या अशिक्षित स्त्रीने असामान्य धैर्य दाखविले. स्वतः लिहायला वाचायला शिकून ती शिक्षिका बनली. तळागाळातील लोकांचे उपेक्षित जीवन, शूद्रांच्या व्यथा, पिण्याच्या पाण्याचा प्रश्न, शेतकऱ्यांचा प्रश्न, दुष्काळाची परिस्थिती, अनाथ विधवांचे आणि अनाथ



अर्भकांचे हाल, दत्तक प्रश्न अशा सामाजिक प्रश्नांची सोडवणूक करण्यासाठी त्यांनी अथक परिश्रम केले.

सावित्रीबाई फुले यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील, खंडाळा तालुक्यातील नायगाव येथे झाला. प्रेमळपणा, अन्यायाची चीड, बेडर वृत्ती, कष्टाळू, चपळ, बुद्धिमान असे गुण लहानपणापासून तिच्यामध्ये दिसू लागले.

जोतीराव गोविंदराव फुले यांच्याशी त्यांचा विवाह १८४० मध्ये झाला. घरकाम करून शेतीकामातही त्या मदत करीत. जोतीराव फुल्यांचे एक मित्र सदाशिव गोवंडे यांचे मेहुणे वारले. त्यामुळे गोवंडेच्या बहिणीला सासरच्या लोकांनी जबरदस्तीने सती जायला भाग पाडले. ही बातमी ऐकून सावित्रीबाईंना खूप वाईट वाटले. असे भयानक प्रकार थांबवायचे असतील तर स्त्रियांचे अज्ञान दूर केले पाहिजे आणि स्त्रियांनी व शूद्रांनी शिकायला हवे, असा उपाय जोतीरावांनी सावित्रीबाईंना सांगितला. त्यावर सावित्रीबाईंनी हे कार्य आजन्म करण्याचे वचन त्यांना दिले. सावित्री-जोतीरावांनी नवसमाज निर्माण करण्याची शपथ घेतली.

सावित्रीबाईंनी स्वत:पासून शिक्षणाचा श्रीगणेशा केला. जोतीरावांकडून लिहिणेवाचणे शिकून घेतले. आता इतरांना शिकविण्याचे काम हाती घ्यायचे हा निश्चय केला. मिसेस मिचेल यांच्या शाळेत जाऊन प्रशिक्षण घेतले. त्या उत्तम शिक्षिका झाल्या. जोतीराव फुले यांनी पुण्यातील तात्यासाहेब भिडे यांच्या वाड्यात १ जानेवारी १८४८ रोजी मुलींची पहिली शाळा सुरू केली. सावित्रीबाईंनी तिथे शिकविण्यास सुरुवात केली. एक बाई स्वत: शिकते व इतरांना शिकविते हे त्या वेळच्या कर्मठ लोकांना मानवणारे नव्हते. त्यांनी प्रखर विरोध केला व शिकविण्यासाठी जाणाऱ्या सावित्रीबाईंवर शेण, चिखल फेकला. या विरोधाला न जुमानता त्यांनी शिक्षणकार्य नेटाने चालू ठेवले. त्यामुळे अस्वस्थ झालेल्या कर्मठ लोकांनी जोतीरावांच्या वडिलांना वाळीत टाकण्याची धमकी दिली.

वडिलांना त्रास नको म्हणून जोतीराव आणि सावित्रीबाई घराबाहेर पडले. एका छोट्याशा घरात राहू लागले. पुण्यात त्यांनी १८४८ च्या ऑगस्ट महिन्यात दलितांसाठी शाळा काढली. त्या काळात त्यांनी १८ शाळा काढल्या व समर्थपणे चालवूनही दाखविल्या. सावित्रीबाई या भारतातील आद्य शिक्षिका, मुख्याध्यापिका व ग्रंथपाल होत. त्यांनी भारतीय स्त्रीच्या सार्वजनिक व शैक्षणिक जीवनाचा श्रीगणेशा केला.

स्त्रियांची परिस्थिती सुधारण्यासाठी महिला सेवा मंडळ ही संस्था सावित्रीबाईंनी काढली. या संस्थेतर्फे १४ जानेवारी १८५२ रोजी पुणे जिल्हाधिकारी साहेबांच्या मिसेस जोन्स यांच्या अध्यक्षतेखाली सर्व जातीधर्मांच्या बायकांसाठी हळदीकुंकू व तिळगूळ समारंभ साजरा करण्यात आला.

एक विधवा स्त्री फसवणुकीमुळे गर्भवती राहिली होती. तेव्हा ती आत्महत्येस प्रवृत्त झाली होती. फुले दांपत्याने तिला घरी आणून तिचे बाळंतपण केले. तिच्या मुलास फुले यांनी दत्तक घेतले. त्यांनी आपल्या घरातच बालहत्या प्रतिबंधगृह व विधवाश्रम २८ जानेवारी १८५३ रोजी काढले. जन्मजात बालकांना मारून टाकण्याऐवजी या केंद्रात त्यांना आणून द्या असे आवाहन त्यांनी जनतेस केले. विधवा स्त्रियांचे केशवपन करण्याची प्रथा त्या काळी होती. फुले पती-पत्नींनी पुण्यातील नाभिकांची बैठक बोलावून त्यांना विधवा स्त्रियांचे केशवपन करण्यास नकार देण्यास पटवून सांगितले. सावित्रीबाईंच्या प्रेरणेने नाभिकांनी संप पुकारून भगिनींच्या डोक्यावर वस्तरा न चालविण्याचा निर्धार व्यक्त केला.

तरूण विधवांना विवाह करता यावा यासाठी फुले पती-पत्नीने 'विधवा विवाह महिला संघ' स्थापन केला. विधवांची लग्ने लावून दिली. तसेच विधवांनीही कपाळास कुंकू लावण्याची प्रथा निर्माण केली.

दूरवरून शिक्षणासाठी येणाऱ्या मुलांना राहण्याची सोय नव्हती. ही अडचण लक्षात घेऊन सावित्रीबाईंनी आपल्या घरातच अशा मुलांसाठी वसतिगृह उघडले.

फ

आपण सारी एकाच परमेश्वराची लेकरे आहोत. माणसामाणसात भेदाभेद नसावा ही सावित्रीबाईंची शिकवणूक होती. त्या काळी पाणीटंचाईमुळे अस्पृश्यांना प्यायला पाणी मिळत नव्हते. सार्वजनिक हौदावर अस्पृश्यांना येण्यास मज्जाव होता. यावर मार्ग काढण्यासाठी फुले यांनी आपल्या वाड्यातील हौदाचे पाणी सर्वांसाठी खुले केले.

१८७७ मध्ये महाराष्ट्रात प्रचंड दुष्काळ पडला. लोक अन्नपाण्यावाचून मरू लागले. ज्योतीबा आणि सावित्रीबाई यांनी पुण्यात अन्नछत्र उघडले. सतत ९ महिने १ हजार मुलांना भाकरी दिल्या. त्यांच्या कार्याची वार्ता सर्वदूर पसरली. पंडिता रमाबाई रानडे, बडोद्याचे राजे सयाजीराव गायकवाड यांनी या कार्यास साहाय्य केले. सत्यशोधक समाजाने ब्रिटिश सरकारकडे जनतेची गाऱ्हाणी पोहोचविली. त्यामुळे शेतकऱ्यांवर लादलेला कर वसूल करण्यास स्थगिती मिळाली.

महात्मा ज्योतीबा फुले यांचे निधन झाल्यानंतरही त्यांच्या शिकवणुकीप्रमाणे सावित्रीबाईंनी दलितोद्धाराचे कार्य चालूच ठेवले. पुण्यात प्लेगची साथ आली होती. रोग्यांना सेवा मिळावी म्हणून आपला पुत्र डॉ. यशवंत याच्या मदतीने वानवडी व घोरपडी मध्ये ससाप्याच्या माळाजवळ दवाखाना काढला. रोग्यांची अहोरात्र सेवा केली. त्यातच सावित्रीबाई आजारी पडल्या.आणि या रोगानेच त्यांची प्राणज्योत मालवली.

सावित्रीबाई फुले या साहित्यिकही होत्या. 'काव्यफुले' हा त्यांचा कवितासंग्रह आहे. 'विचारप्रवर्तक निबंध' हे ही त्यांचे पुस्तक प्रकाशित झाले. अत्यंत कठीण परिस्थितीत समाजसेवेचे व्रत अंगिकारलेल्या सावित्रीबाई फुले यांचे जीवनकार्य सदैव प्रेरणादायी राहिले आहे. पंडिता रमाबाई यांनी म्हटले आहे,''एक वेळ असे ज्योतीबा जन्माला येतील. अशी सावित्री जन्माला येईल पण या दोघांच्या कामातील साथ हा एक आदर्श आहे.''

**– श्याम भुर्के**

**संदर्भ :**

* * *

फ




## बत्तिन, पोटयन्ना पापय्या

**शिक्षक, प्राचार्य**

**२५ जून १८८८ – १९७६**



पोटयन्ना बत्तिनांचे वडील पापय्या बत्तिन आपले मामा यलम्मा अंकम यांच्या बरोबर आंध्र प्रदेशातून अहमदनगर येथे सन १८६१ मध्ये उपजिविकेसाठी स्थलांतरित झाले. पापय्यांचे अंगी व्यवसायातील नैपुण्य, कष्टाळूपणा, कुशाग्र बुद्धी, समाजाभिमुखता इ. गुण असल्यामुळे अल्पावधीतच त्यांनी एक सुखवस्तू कारखानदार म्हणून नावलौकिक मिळविला.

पोटयन्ना बत्तिन १९०१ मध्ये वडील पापय्या निवर्तले. थोरले बंधू मेघय्या यांनी कुशाग्र बुद्धी, अफाट स्मरणशक्ती आणि काम करण्याची चिकाटी असणाऱ्या धाकट्या पोटयन्नाच्या शिक्षणाची जबाबदारी घेतली. पोटयन्नान यांनी विद्यालयात शिष्यवृत्ती मिळाली होती. शिक्षणाबरोबरच त्यांनी शरीरसंपदा प्राप्त केली. अनेक मैदानी स्पर्धेत नैपुण्य प्राप्त केले.

१९०३ मध्ये वयाच्या १५ व्या वर्षी लक्ष्मीबाई म्याना हिच्याशी ते विवाहबद्ध झाले. मॅट्रिकची परीक्षा उत्तम रीतीने उत्तीर्ण होऊन महादेव मल्हार जोशी यांच्या कृपाछत्राखाली जुनागढ (गुजरात) मध्ये उच्च शिक्षणासाठी रवाना झाले. परंतु घरच्या बेताच्या आर्थिक परिस्थितीमुळे आणि प्रकृती अस्वास्थ्यामुळे पुण्यास येऊन फर्गसन महाविद्यालयामध्ये दाखल झाले. वार लावून, विविध घरी किरकोळ कामे करून, धनिक मित्रांची आर्थिक मदत घेऊन १९०९ मध्ये पद्मशाली समाजातील पहिल्या पदवीधराचा मान मिळविला.

आर्थिक ओढाताणीमुळे इच्छा व पात्रता असूनही पुढील शिक्षण घेता न आल्याने पूर्व संकल्पानुसार शिक्षकी पेशा पत्करला.१९१२ मध्ये ठाणे विद्यालयामध्ये नोकरी मिळाली. पुढील वर्षी मुंबई येथील एल्फिस्टन विद्यालयामध्ये बदली झाली. याच वेळी एस.टी.सी. परीक्षा उत्तीर्ण केली. तद्नंतर जळगाव येथे नेमणूक मिळाली.

जळगावहून पुण्यास 'क्रीडा शिक्षक' म्हणून नेमणूक झाली. त्यांच्या कार्य – कौशल्यामुळे पुण्यातील विद्यालयाला 'नॉर्थ कोट शील्ड' मिळाली. पुढे पुण्यातीलच प्रशिक्षण महाविद्यालयामध्ये रुजू होऊन आणखी सन्मान मिळविला. परिणामी खात्याने अहमदनगर येथील प्रशिक्षण महाविद्यालयाची मूहूर्तमेढ रोवण्यासाठी नगरला पाठविले. पुढे नगरहून सातारा, नारायणगाव, लोणी काळभोर, बोर्डी, धुळे अशी भ्रमंती केली.

सन १९४० मध्ये पुण्यास उप-प्राचार्य म्हणून बदली झाली. शेवटची दोन वर्षे कै. कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या विद्वानांनी विभूषित केलेल्या ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन्स, पुणे येथे प्राचार्य म्हणून काम करण्याची संधी मिळाली.

आपुलकी, बंधुभाव, निर्भयता, स्वावलंबन इ. गुणांची विद्यार्थ्यांमध्ये जोपासना करणाऱ्या या गुरुवर्यामध्ये शांत वृत्ती, तर्कशुद्ध विचारसरणी, चिकित्सक बुद्धी व कोणताही विषय पटवून देण्याची विलक्षण हातोटी होती. महाविद्यालयाचे कामकाज, सरकार-दरबारची कामे, मराठी बुक कमेटी ''प्राथमिक शिक्षण'' मासिक अशी व्यापाची अनेक कामे त्यांनी लीलया पार पाडली. प्राचार्य

पदावरून ते १९ जून १९४३ रोजी निवृत्त झाले. तत्पूर्वी शेकडो शिक्षक तयार केले,

स्वत: सुशिक्षित व नोकरी पेशातील जीवन जगूनही त्यांनी आपल्या समाजास कधी दूर लोटले नाही. उलटपक्षी समाजामध्ये आमूलाग्र परिवर्तन आणण्यासाठी सतत परिश्रम केले. शासकीय नोकरीची बेडी पायात असूनही साक्षरता प्रसारासाठी १९२० मध्ये 'पद्मशाली विद्या प्रसारक मंडळाची' स्थापना केली.

तेलगु भाषिक मुला – मुलींना शिकविण्यासाठी तेलगु भाषिक परंतु मराठीच्या जाणकार शिक्षकांच्या अहमदनगर स्कूल बोर्डात बदल्या करून घेतल्या. शैक्षणिक संस्था चालविताना येणाऱ्या आर्थिक अडचणींना तोंड देण्यासाठी पद्मशाली बांधवांना एकत्रित करून व घरोघरी जाऊन निधी गोळा केला. आज या संस्थेमार्फत 'श्री मार्कंडेय विद्यालय' अहमदनगरमध्ये कार्यरत असून त्यांचा लौकिक सर्वदूर पसरला आहे.

सामाजिक संघठन, शैक्षणिक प्रसार, सामाजिक स्तर व प्रगल्भता यांच्या वाढीसाठी ३९ प्रतिनिधींची 'पद्मशाली पंचकमेटी, अहमदनगर' ची स्थापना केली. भाषेच्या अडचणीमुळे पद्मशाली समाजावर होणाऱ्या अन्याय व अत्याचारावर उपाय म्हणून नगरपालिकेवर समाजाचे प्रतिनिधी निवडून आणले. समाजाच्या समस्या सोडविण्यासाठी गुरुवर्यांचा आदर्श घेऊन अन्य शहरामंध्येही पंचकमेट्या स्थापन होऊ लागल्या.

त्यांनी पद्मशाली समाजासाठी केलेल्या चौफेर कार्याचा गौरव म्हणून त्यांना मानपत्र देऊन सन्मानित करण्यात आले. पुणे व सोलापूर येथील पद्मशाली समाजासाठी बत्तिन यांनी केलेले कार्य आजही अविस्मरणीय असेच आहे. अखिल भारतीय पद्मशाली समाजाची संघटना आणि त्याद्वारे सुसंस्कार, परस्पर बंधुभाव, विद्याभिरुचीमध्ये वृद्धी व्हावी यासाठी 'अखिल भारतीय पद्मशाली महाजन सभा सुरू करण्यामध्ये गुरुवर्यांचा मोलाचा वाटा होता. अष्टम् महासभा कै. दिकोंडा सायन्ना यांचे अध्यक्षतेखाली अहमदनगर येथे पार पडली. पोटयन्ना बत्तिन महासभेचे उद्घाटक होते.

त्यांच्या मार्गदर्शनाखाली एकेच्छु मंडळ– मुंबई, पद्मशाली समाज सेवा संघ पुणे, आंध्र विद्याश्रम, औंध संस्थान, पद्मशाली युवक मंडळ, गंज पेठ, पुणे इ. संस्था कार्यरत असून शेकडो कार्यकर्ते भारतभर गुरुवर्यांच्या प्रेरणेने कार्य करीत आहेत.

समाज सेवेचे व्रत घेतलेल्या बत्तिन यांनी आपल्या सेवानिवृत्तीनंतर मिळालेल्या भविष्य निर्वाह निधीची रक्कम २० हजार रूपये अहमदनगर येथील पद्मशाली विद्या प्रसारक मंडळाला देणगी म्हणून दिली. गुरुवर्यांची स्मृती म्हणून मंडळाची ''कै. प्राचार्य पोटयन्ना बत्तिन प्राथमिक शाळा'' आज डौलाने उभी आहे.

त्यांच्या मृत्युपत्रानुसार त्यांची सर्व स्थावर-जंगम मिळकतीची विक्री करून त्यांच्या नावाने संस्था स्थापन झाली असून पुणे शहरात संस्थांचे विविधांगी समाज कार्य चालू आहे.

– प्रा. शंकर गागरे

**संदर्भ :**

१. गुरुवर्य पोटयन्ना बत्तिन शताब्दी स्मरणिका १९९०.

## बदलानी, लालचंद खुशीराम
**संस्थापक**
**१२ फेब्रुवारी १९२६**



डॉ. लालचंद खुशीराम बदलानी हे मूळचे पाकिस्तानचे रहिवासी. सिंधमधील सुलतानकोट जिल्ह्यात सक्कर गावी त्यांचा जन्म झाला. बदलानींचे शालेय शिक्षण तिथेच झाले. फाळणीनंतर त्यांचे सर्व कुटुंब भारतात आले. पंजाब विद्यापीठातून एम.ए.एम.एस. (मास्टर ऑफ आयुर्वेदिक मेडिसीन् ॲण्ड सर्जरी) ही पदवी त्यांनी संपादन केली. नाशिकला येऊन लालचंदजींनी वैद्यकीय व्यवसायास प्रारंभ केला. अल्पावधीतच ते आणि त्यांचे सहकारी यांच्या असे लक्षात आले की नाशिकमधील सिंधी समाजातील

ब

मुलांसाठी त्यांच्या मातृभाषेत शिक्षण देणारी शिक्षणसंस्था असणे गरजेचे आहे. डॉ. देवळालकर, शोभराज इसरानी अशा शिक्षणप्रेमी सहकाऱ्यांच्या सहकार्याने १९४८ मध्ये डॉक्टरांनी नाशिक सिंधी शिक्षण मंडळाची स्थापना केली व या संस्थेच्या वतीने सिंध मॉडर्न विद्यालय सुरू केले.

तीनशे मुले, मुली सिंधी माध्यमात शिकू लागली. पण त्यासाठी 'आपण व्यापारउद्दीमच पाहावा' ही सिंधी समाजाची मानसिकता बदलण्यासाठी प्रयत्न करावे लागले. पालकांना शिक्षणाचे महत्त्व समजावून द्यावे लागले. त्यासाठी त्यांना घरोघर हिंडावे लागले. या प्रयत्नांना यश आले.

पाचवी ते अकरावी (एस.एस.सी) पर्यंतचे वर्ग सुरू झाले. शाळेला स्वत:ची इमारत असावी म्हणून डॉक्टरांचे प्रयत्न सुरू होतेच. १९५७ मध्ये नाशिकच्या जुन्या पंडित कॉलनीत जागा विकत घेतली. १९६१ मध्ये, आज जी इमारत आहे तिचा काही भाग बांधून झाला. याच वेळी शिक्षणाविषयी आस्था असलेले श्रीमान आत्मसिंग बजाज पुढे आले. त्यांनी श्रीमती हरदेवींच्या स्मरणार्थ मोठी देणगी दिली व शाळेचे 'हरदेवी आत्मसिंग बजाज विद्यालय' असे नामकरण झाले.

आज अकराशे मुले, मुली शाळेत शिकत आहेत. बालवाडीपासून दहावीपर्यंत वर्ग आहेत. मात्र आता काळाची गरज ओळखून शाळेचे माध्यम इंग्रजी केले आहे. त्यामुळे सर्वभाषक मुलांना शाळेत प्रवेश मिळतो. सिंधी भाषेची, मातृभाषेची ओळख राहावी म्हणून सिंधी भाषा हा ऐच्छिक विषय ठेवलेला आहे. डॉ. बदलानींच्या मार्गदर्शनाखाली सर्व क्षेत्रांत शाळा आघाडीवर आहे. शाळेचे अनेक नामवंत माजी विद्यार्थी विविध क्षेत्रांत यशस्वीपणे वावरत आहेत.

नाशिक महानगरपालिकेचे नगरसेवक म्हणून दहा वर्षे त्यांनी काम केले. नगरपालिकेच्या शिक्षणसभेचे अध्यक्षपदही त्यांनी भूषविले आहे. आज वयाच्या ८२ व्या वर्षी ते रोज स्वत:चा काही वेळ संस्थेसाठी, शाळेसाठी देतात.

– प्रा. सुहासिनी पटेल

## बधेका, गिरिजाशंकर भगवानदास

***गिजुभाई***

**शिक्षक**

**१५ नोव्हेंबर १८८५ – २३ जून १९३९**



गिरिजाशंकर भगवानदास बधेकांनी माँटेसरी पद्धतीच्या बालशाळा भारतीय बालकांसाठी असल्या पाहिजेत, विकसित होऊन लोकप्रिय झाल्या पाहिजेत हेच आपल्या जीवनाचे एकमेव ध्येय ठरवून अहर्निश त्याच्या पूर्तीसाठी प्रयत्न केले व अनेकांना प्रेरित केले.

गिजुभाईंचे वडील वकील होते. गिजुभाई मॅट्रिक परीक्षा १९०५ मध्ये उत्तीर्ण होऊन श्रीमंत होण्याच्या उद्देशाने आफ्रिकेत गेले. तेथे नोकरी करू लागले, परंतु त्यांच्या स्वाभिमानाला धक्का पोहोचल्याने, नोकरी सोडून तीन वर्षांनी ते मायदेशी परतले.

अभ्यास करून उच्चन्यायालयातील प्लीडरची परीक्षा पास करून वकिली करू लागले, परंतु वकिलीत खोट्याचे खरे व खऱ्याचे खोटे करणे त्यांच्या विवेकास पटेना. त्यांनी वकिली सोडली आणि बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड व शिक्षणतज्ज्ञ गोपाळराव विद्वांस यांच्या सल्ल्याने व मदतीने युरोपात जाऊन तेथे त्यांनी फ्रोबेल व माँटेसरी यांच्या बालशिक्षण पद्धतीचा अभ्यास केला. ती पद्धत अतिशय आवडल्यामुळे येताना गिजुभाई काही शिक्षण साहित्यही बरोबर घेऊन आले

भावनगर येथे राहणारे त्यांचे मामा हरगोविंदभाई पंड्या हे व मित्र नानाभाई भट्ट व हरभाई त्रिवेदी अशा तिघांनी मिळून आपले गुरू श्री दक्षिणामूर्ती यांच्या आशीर्वादाने 'कुमार छात्रालय' सुरू केले होते. मुलांचे सुचारित्र्य व सुशिक्षण हे या मंडळींचे ध्येय होते. नंतर त्यांनी कुमार माध्यमिक विद्यालयही उघडले. ध्येयनिष्ठ असे बरेच शिक्षक शाळेत काम करीत. गिजुभाईंनी संस्थेच्या संमतीने ३ ते ६ वयोगटातील मुलांसाठी माँटेसरी पद्धतीवर

ब

पूर्वप्राथमिक शाळेचा विभाग सुरू केला. १९२० मध्ये त्यांनी बालकांच्या विकासासाठी योग्य सोय करण्याच्या पूज्य भावनेने बालमंदिर सुरू केले.

गिजुभाईंचे बालमंदिर सर्वसामान्यांच्या मुलांसाठी होते. माध्यम मातृभाषा होती. सर्व गोष्टी भारतीय चालीरीतींना धरून होत्या. स्वातंत्र्य, स्वयंस्फूर्ती, स्वयंशिक्षण व व्यक्तिगत शिक्षण हे चार मूलभूत सिद्धान्त चालकांच्या डोळ्यांसमोर होते. भारतीय संस्कृतीला पोषक असे बालशिक्षण क्षेत्रात प्रस्थापित करणे ही त्यांची अमोल देणगी म्हटली पाहिजे. गिजुभाई गोष्टी फार चांगल्या सांगत. गोष्टींची नाटके करीत. स्वत: भाग घेत. मुलांमध्ये मूल होऊन ते समरस होत. ते इतके मातृहृदयी होते की मुले त्यांना 'मिशीवाली बाई' म्हणत.

१९२९ मध्ये नूतन बाल शिक्षण संघाची स्थापना झाली. बालशिक्षणाच्या प्रचारासाठी 'शिक्षण पत्रिका' हे मासिक सुरू केले. या मासिकात ते स्वत: पुष्कळ लिहित व ताराबाई मोडक आणि इतर सहकाऱ्यांना लिहायला प्रवृत्त करीत. घरामध्ये पालकांचे मुलांशी वागणे, परस्परांशी वागणे, बोलणे, घरातील वातावरण व त्याचा मुलांच्या चारित्र्य घडणीवर होणारा परिणाम इत्यादीची चर्चा पत्रिकेत असे. गुजराती भाषेतील ही पत्रिका १९५६ पर्यंत चालली. ताराबाईंनी १९३३ मध्ये ती मराठीत सुरू केली.

गिजुभाईंनी ताराबाईंच्या सहकार्याने 'बाल अध्यापन मंदिर' अर्थात पूर्व प्राथमिक प्रशिक्षण केंद्र सुरू केले. त्याचा अभ्यासक्रम १ वर्षाचा होता. पुरुष आणि स्त्रिया दोघांनाही त्यात प्रवेश होता. लिहिता – वाचता येणे व मुलांविषयी प्रेम असणे या दोन गोष्टी प्रवेशासाठी आवश्यक होत्या. अभ्यासक्रमात त्यांनी माँटेसरीबरोबरच किंडरगार्टन मधील हस्तव्यवसाय, गोष्टी, नाटके इत्यादी उपयुक्त भाग समाविष्ट केला होता.

गिजुभाई पालक – शिक्षक – चालक सामंजस्य निर्माण करीत, बालमंदिराचे महत्त्व पटवून देत. त्यांनी लिहिलेल्या छान छान गोष्टींचे 'बाळवार्ताओ' म्हणून ५ भाग आहेत. लहान मुलांनी वाचावे अगर त्यांना वाचून दाखवावे असे लहान सुबोध धडे त्यांनी लिहिले. इंग्रजी बालगीतांच्या पद्धतीवर बडबडगीते लिहिली. त्यांनी मुलांसाठी सुमारे ७५ च्या वर पुस्तके लिहिली. गुजरातमध्ये त्यांना 'बालसाहित्य सम्राट' म्हणतात. बालशिक्षण क्षेत्रातले ते आद्यगुरूच होत.

१९०२ मध्ये गिजुभाईंचा हरिबेन यांच्याशी विवाह झाला. परंतु १९०६ मध्येच या पत्नीचे निधन झाल्यावर त्यांनी जदिबेन यांच्याशी विवाह केला. नरेंद्र हा त्यांचा एकुलता एक मुलगा.

१९३८ मध्ये आजारी पडल्या कारणाने गिजुभाई राजकोटला गेले. तेथेही बिछान्यात पडून ते बाल अध्यापन मंदिर चालवत होते. त्यांनी डॉ. माँटेसरींना भारतात येण्याचे आमंत्रण दिले होते, परंतु त्या येण्यापूर्वीच गिजुभाईंचे मुंबईच्या हरकिसनदास रुग्णालयात निधन झाले.

गुजरात साहित्य सभेने गिजुभाई बधेकांना 'रणजितराम सुवर्णपदक' व दहा हजार रुपयांची थैली अर्पण करून त्यांचा गौरव केला होता.

– वि. ग. जोशी

## बरवे, भालचंद्र लक्ष्मण

**शिक्षक**

**३० ऑक्टोबर १९१८**



महाराष्ट्रातील पहिल्या काही हिंदू पर्शियन भाषा शिक्षकांपैकी एक असलेले भालचंद्र लक्ष्मण बरवे म्हणजेच मधुकाका बरवे. चिपळूणच्या युनायटेड इंग्लिश शाळेमध्ये पर्शियन भाषेचे शिक्षक आणि १९७४ ते १९७७ मुख्याध्यापक म्हणूनही त्यांनी काम पाहिले. मोठे भाऊ वि. ल. बरवे ( कवी आनंद) हे साहित्यिक होते. त्यांच्या आग्रहामुळे अन्य भाषेच्या शिक्षणासाठी त्यांनी पुण्यातील वाडिया महाविद्यालयामधून पर्शियन भाषेत कला शाखेची पदवी मिळविली. त्यानंतर चिपळूण मध्ये शिक्षक म्हणून नोकरीस सुरूवात केली. लक्ष्मण भालचंद्र उर्फ मधुकाका

ब

बरवे यांचा जन्म चिपळूण येथे झाला. त्यांचे मूळ गाव सोनगाव. परंतु शिक्षणासाठी त्यांचे कुटुंब चिपळूणमध्ये राहावयास आले. घरच्या धार्मिक व राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या शाखेतील राष्ट्रीय संस्कारात त्यांची वाढ झाली. यातूनच पुढे ते शिक्षणानंतर काही वर्षं गुजरात मध्ये संघाचे प्रचारक होते.

शिक्षक म्हणून काम करत असतानाच त्यांनी बी.पी.एड ची पदवी प्राप्त केली. पर्शियन भाषा शिक्षक असल्याने त्यांचा मुस्लीम विद्यार्थ्यांशी संबंध येत असे. त्यांना ते वैयक्तिक मार्गदर्शन करीत असत. पर्शियन भाषेबरोबरच शारीरिक शिक्षण व भूगोल हे त्यांचे आवडते विषय. सांस्कृतिक, शारीरिक स्पर्धांमध्ये विद्यार्थ्यांनी भाग घ्यावा यासाठी ते प्रोत्साहन देत. त्याचबरोबर विविध स्पर्धांचे आयोजन देखील करीत. भूगोल विषयात विद्यार्थ्यांना रस निर्माण व्हावा यासाठी शाळेच्या एका खोलीत त्यांनी खास भूगोलाची प्रयोगशाळा तयार केली. त्यात वेगवेगळ्या प्रतिकृती, नकाशे यातून भूगोल विषय सोपा करून शिकविता येत असे.

शाळेचा वार्षिक अंक निघावा यासाठी त्यांचा प्रयत्न असे. हमीद दलवाई, कमलाबेन चितळे यासारख्या लेखकांची सुरुवात 'नवजीवन' या वार्षिक अंकातून झाली. मधुकाका स्वतः उत्तम चित्रकार असल्याने ते अंकांचे मुखपृष्ठ तयार करीत.

याचबरोबर खेड्यातील मुलांच्या शिक्षणाची सोय व्हावी यासाठी शिक्षक मित्रांना घेऊन ते वेगवेगळ्या खेड्यात शिकवायला जात असत. तसेच पुढील शिक्षणासाठी त्या मुलांना शहरात आणून त्यांची सोय स्वतःच्या व ओळखीतील लोकांच्या घरी करायचे.

परशुराम एज्युकेशन सोसायटी, चिपळूणचे अध्यक्ष, शिक्षक संघटनेचे विभागीय अध्यक्ष याचबरोबर अनेक स्थानिक संस्थांवर पदाधिकारी म्हणून त्यांनी काम केले. त्याचबरोबर १९६६ मध्ये चिपळूण येथे महाविद्यालय सुरू करण्यातही त्यांचा सहभाग होता. त्यांच्या शैक्षणिक कार्याबद्दल त्यांना शासनातर्फे 'आदर्श शिक्षक जिल्हा पुरस्काराने ' गौरविण्यात आले. याचबरोबर सामाजिक कामाच्या आवडीतून विविध ठिकाणी वेगवेगळ्या विषयांवर बोलण्यासाठी वक्ते म्हणून जात. मार्डोली या खेडेगावात कायमचे आरोग्य केंद्र ही त्यांनी उभे केले. तसेच रा. स्व. संघाचे विभाग कार्यवाह, विश्व हिंदू परिषदेचे विभाग मंत्री म्हणूनही त्यांचा सामाजिक जीवनात वावर होता. ते उत्तम चित्रकार होते. तबलावादन करीत, तसेच अभिनय व गायनाचीही त्यांना आवड होती.

– विवेक वि. कुलकर्णी

## बाळकृष्ण
**शिक्षणतज्ज्ञ, इतिहासकार, प्राचार्य**
**२२ डिसेंबर १८८२ – २१ ऑक्टोबर १९४०**



नामवंत शिक्षणतज्ज्ञ, थोर इतिहासकार आणि कोल्हापुरातील प्रसिद्ध राजाराम महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. बाळकृष्ण यांचा जन्म पंजाबमधील मुलतान या गावी झाला. पटवेगिरी व शिंपीकाम करीत त्यांनी आपले प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. प्रथमपासून ते अतिशय बुद्धिमान,कष्टाळू आणि होतकरू विद्यार्थी म्हणून नावाजले जात होते. इतकेच नव्हे तर विविध प्रकारचे देशी विदेशी खेळ, वक्तृत्वकला इत्यादींमध्येही त्यांनी आपले प्रावीण्य सिद्ध केले होते.

पंजाब विद्यापीठाच्या प्रवेश परीक्षेत ते पहिले आले होते. लाहोर येथील डी.ए.व्ही महाविद्यालयामधून ते इतिहास, अर्थशास्त्र आणि रसायनशास्त्र हे विषय घेऊन १९०७ मध्ये बी. ए. झाले. यांचा विवाह महाविद्यालयीन शिक्षण चालू असतानाच झाला होता. १९०९ मध्ये ते एम.ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाले.

'हिंदू समाजातील जातीसंस्था आणि अस्पृश्यता नष्ट झाली पाहिजे, वेद सर्वांना खुले असले पाहिजेत आणि हिंदूंचे धर्मांतर रोखण्यासाठी हिंदूंनी आक्रमक होणे आवश्यक आहे' ही विचारप्रणाली मूलाधार असणाऱ्या

ब

आर्य समाजाचे ते विद्यार्थी दशेपासून प्रचारक होते. त्यांना पाश्‍चात्य शिक्षणपद्धतीपेक्षा हिंदूंची गुरुकुल व्यवस्था अधिक मान्य असल्यामुळे एम.ए. झाल्यावर त्यांनी मुन्शीराम उर्फ स्वामी श्रद्धानंद यांच्या कांगडी येथील गुरुकुलामध्ये १९०९ पासून बारा वर्षे अध्यापनाचे काम केले. याच काळात आर्य समाजाच्या विचारांचा प्रचार आणि प्रसार व्हावा म्हणून त्यांनी कराची, क्वेटा, श्रीनगर, अजमेर, पाटणा, कोलकाता, जगन्नाथपुरी इत्यादी ठिकाणी असंख्य व्याख्याने दिली.

ते बहुभाषिक पंडित होते. त्यांची मातृभाषा मुलतानी होती. हिंदी व इंग्रजी या दोन भाषांवर त्यांचे असामान्य प्रभुत्व होते. याखेरीज उर्दू, फारशी भाषाही त्यांना अवगत होत्या. संस्कृतचे ते जाणकार होते. त्याचबरोबर फ्रेंच भाषासुद्धा त्यांनी आत्मसात केली होती. ऐतिहासिक साधनांचे वाचन करण्याइतपत त्यांना मराठीही समजत होते.

आर्य समाजाच्या वार्षिकोत्सवाच्या कार्यात मग्न असतानाच १९१९ मध्ये त्यांच्या पत्नीचे विषमज्वर रोगाने निधन झाले. त्यानंतर थोड्याच दिवसात पुढील शिक्षण प्राप्त करणे आणि युरोपमधील काही देशांची शैक्षणिक, सामाजिक – आर्थिक पाहणी करणे, हे दोन हेतू मनात ठेवून ते इंग्लंडकडे रवाना झाले. तेथेच त्यांनी लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स आणि पॉलिटिक्समध्ये 'भारत आणि इंग्लंडमधील व्यापारी संबंध' या विषयावर प्रबंध सादर करून पीएच.डी. पदवी संपादन केली. लंडनमधील आपल्या अडीच वर्षांच्या वास्तव्यात त्यांनी केवळ वैयक्तिक व शैक्षणिक प्रगतीवर समाधान न मानता आर्य समाजाचा क्रियाशील कार्यकर्ता या नात्याने लंडन, ऑक्सफर्ड, केम्ब्रीज, लिव्हरपूल, मँचेस्टर, एडिंबरो, ब्लॅकबर्न इत्यादी ठिकाणी धार्मिक, आर्थिक आणि शैक्षणिक विषयांवर व्याख्याने दिली. तेथील विद्यापीठांना भेटी दिल्या. युरोपमधील नामवंत पब्लिक स्कूलचे निरीक्षण केले. तेथील शिक्षणतज्ज्ञांशी सुसंवाद साधला.

राजाराम महाविद्यालय चालविणे आर्थिकदृष्ट्या कोल्हापूर संस्थानाला अतिशय ओढाताणीचे होऊन बसले होते. म्हणून ते महाविद्यालय शाहू छत्रपतींनी संयुक्त प्रांतातील (उत्तर प्रदेश) आर्य प्रतिनिधी सभेकडे देण्याचे ठरविले. त्यामुळेच राजाराम महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून डॉ. बाळकृष्ण कोल्हापूर दरबाराकडे १९२२ च्या मे मध्ये रुजू झाले आणि त्यांच्या मृत्यूपर्यंत ते त्या पदावर कार्यरत राहिले.

डॉ. बाळकृष्णांच्या कारकिर्दीत राजाराम महाविद्यालयाची सर्वांगीण अशी खूपच प्रगती झाली.ते प्राचार्य पदावर रुजू झाले तेव्हा विद्यार्थ्यांची संख्या केवळ १७० इतकीच होती. हीच संख्या १९४० मध्ये ९२० एवढी झाली. बी.ए. ऑनर्सचे वर्ग सुरू झाले. १९२७ मध्ये विज्ञान विभागाचा आरंभ झाला. १९३०–३१ मध्ये बी.एस्सी. , एम्. एस्सी., एम्. ए. हे वर्ग उघडण्यात आले. खेळ, अभ्यास, सांस्कृतिक कला इत्यादींबाबत विद्यार्थ्यांना सदैव प्रोत्साहन देणे आणि गरीब विद्यार्थ्यांना आर्थिक मदत देणे यामुळे डॉ. बाळकृष्ण हे विद्यार्थिप्रिय प्राचार्य म्हणून नामवंत ठरले होते.

याखेरीज डॉ. बाळकृष्ण हे करवीर संस्थानातील माध्यमिक शिक्षणाचेही अधीक्षक होते. माध्यमिक शाळांचा अभ्यासक्रम निश्‍चित करणे, पाठ्यपुस्तक नेमणे, विद्यार्थ्यांना खेळ इत्यादीबाबत प्रोत्साहन देणे इत्यादी कार्ये हाती घेण्याच्या हेतूने त्यांनी 'सेकंडरी टीचर्स असोसिएशन' नावाची संस्था सुरू केली.

महाराष्ट्रातील आजचे आघाडीचे विद्यापीठ म्हणून शिवाजी विद्यापीठाकडे पाहिले जाते. कुशल प्रशासन आणि व्यापक प्रयोगशीलता असा नावलौकिक असणाऱ्या शिवाजी विद्यापीठाचे आद्य संकल्पक म्हणून डॉ. बाळकृष्ण यांचा गौरवाने उल्लेख करावा लागेल. १९३१ मध्ये प्रथम त्यांनी त्या विद्यापीठाची संकल्पना समाजापुढे सादर केली. इतकेच नव्हे तर त्याच हेतूने त्यांनी कोल्हापुरात विधी महाविद्यालय आणि शिक्षक महाविद्यालय ही नवीन महाविद्यालये सुरू करण्यात जातीने लक्ष पुरविले. याखेरीज आर्य समाजामार्फत 'शाहू दयानंद मोफत विद्यालय' ही माध्यमिक शाळा कोल्हापुरात सुरू करून गरीब विद्यार्थ्यांना शिक्षणाचा मार्ग खुला केला. १९२५ पर्यंत डॉ. बाळकृष्ण अर्थशास्त्र या विषयाचे अध्यापन आणि ग्रंथलेखन यामध्ये

ब

गुंतून पडले होते. परंतु त्यानंतर त्यांचे लक्ष मराठ्यांच्या इतिहासाकडे आणि विशेष म्हणजे शिवचरित्राकडे अधिक वेधले गेले. त्यामधून सतत १५ वर्षे शिवचरित्र साधनांचा देश आणि परदेशात धांडोळा घेत त्यांची टिपणे काढणे, आणि त्यामधून संशोधनावर आधारित असे निष्कर्ष काढून प्रत्यक्ष शिवचरित्राचे इंग्रजीमध्ये लेखन करणे, यामध्ये घालवली. आपल्या दमाग्रस्त प्रकृतीची चिंता न करता, 'शिवाजी द ग्रेट' हा १६०० पृष्ठांचा चार खंडांचा बृहद्ग्रंथ पूर्ण केला.

ते उत्तम वक्ते होते. विनोद आणि आक्रमकता या दोन वैशिष्ट्याने मंडीत असे त्यांचे वक्तृत्व प्रतिस्पर्ध्याला सहज नामोहरम करीत असे. म्हणूनच स्वामी विवेकानंदांनी शिकागो येथे पार्लमेंट ऑफ रिलिजन्स या नावाने ज्या सर्वधर्म परिषदेत हिंदू धर्माचे प्रतिनिधित्व १८९३ मध्ये केले होते त्याच दुसऱ्या सर्वधर्म परिषदेत डॉ. बाळकृष्णांनी १९३३ मध्ये हिंदू धर्माचे प्रतिनिधित्व केले होते.

पाश्चात्त्य समाजाने पौर्वात्य संस्कृती आत्मसात करण्याच्या हेतूने आपली शैक्षणिक वाटचाल केली तर त्यामध्ये सर्व मानव जातीचे कल्याण होईल असा विचार ते सातत्याने आपल्या वाणी आणि लेखणीद्वारा देश आणि परदेशात मांडत होते.

ते लंडनच्या रॉयल इकॉनॉमिक्स सोसायटी, रॉयल स्टॅटिस्टिकल सोसायटी आणि रॉयल हिस्टॉरिकल सोसायटीचे सन्माननीय सभासद होते. याखेरीज मुंबई विद्यापीठाच्या विविध समित्या – सभा यांचेही ते क्रियाशील सभासद होते.

इतका सर्व व्याप सांभाळून ते हिंदी आणि इंग्रजी भाषेत दर्जेदार ग्रंथांची निर्मिती करीत होते. वेद, द वर्ड ऑफ गॉड, हिंदू फिलॉसॉफर्स ऑन इव्होल्यूशन कमर्शिअल रिलेशन बिट्विन इंडिया अ‍ॅण्ड इंग्लंड, द इंडस्ट्रियल डिक्लाइन इन इंडिया, इकॉनॉमिक्स (हिंदी), कमर्शिअल सर्व्हे ऑफ कोल्हापूर, द इंडियन कॉन्स्टिट्यूशन, शिवाजी अल्बम, डिमांड्स ऑफ डेमॉक्रसी आणि भारतवर्षाचा संक्षिप्त इतिहास अशी काही पुस्तके डॉ.बाळकृष्ण यांच्या नावावर जमा आहेत.

'प्रत्यक्ष कार्य हीच ईश्वरोपासना' हे सूत्र समोर ठेवणारा आणि आपल्या कार्यात सतत मग्न असणारा हा नामवंत शिक्षणतज्ज्ञ, शिवचरित्र लेखनाचे जीवित कार्य पूर्ण होताच एका आठवड्याच्या आत म्हणजे कोल्हापूर मुक्कामी निधन पावला.

– डॉ. रमेश जाधव

**संदर्भ :**


१. *शताब्दी महोत्सव, १८८० – १९८०, स्मरणिका, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर.*
२. *डॉ. बाळकृष्ण, 'माझी जीवनगाथा', किर्लोस्कर, जून, जुलै व ऑगस्ट १९३५.*
३. *वाळिंबे, मो.रा.; 'डॉ. बाळकृष्ण : चरित्र, कार्य व आठवणी', आर्य बुक डेपो, कोल्हापूर, १९४२.*


## बीडकर, गणपत रंगनाथ

**शिक्षक, संस्थापक**

**४ नोव्हेंबर, १९४२ – १६ सप्टेंबर २००२.**



बीड येथे सराफीचा व मोटार सर्व्हिसचा व्यवसाय करणाऱ्या उदार, दानशूर रंगनाथ नाईक (दादा) यांच्या श्रीमंत घराण्यात श्री.गणपत रंगनाथ उर्फ बबनराव बीडकर यांचा जन्म झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण बीड, उस्मानाबाद मार्गावरील कुंथलगिरी येथील जैन साधू पार्श्वसागरमहाराज यांच्या आश्रमात झाले.

येथेच लहानपणी राष्ट्रीयत्व, जातिनिर्मूलन व धार्मिक उदारतेची प्रेरणा मिळाली. शिक्षणामध्ये अनंत अडचणी आल्या परंतु अनेक सामान्य माणसांनी मदतीचा हातही पुढे केला. इ.स. १९३०–३१ ला १ वर्ष नगरला मराठी शाळेत तद्नंतर लातूर, सोलापूर, बार्शी करीत करीत ऑगस्ट १९४५ मध्ये पुन्हा अहमदनगरला द. वि. आवटे यांच्या मार्गदर्शनाखाली मॉडर्न हायस्कूलमध्ये स्थिरावले व जैन बोर्डिंग मध्ये वास्तव्य केले. अहमदनगर येथे उ.

ब

भा. कोठारी मित्र म्हणून लाभले. त्यांच्या समवेत राष्ट्र सेवा दल शाखेत जाऊ लागले. परिणामी स्वातंत्र्य चळवळीबद्दल मनात तीव्र आकर्षण पैदा झाले. विद्यार्थी दशेतच सन १९४२ च्या लढ्यात उडी घेतली. येरवड्याचा कारावास अनुभवला. कृतीला विचारांचे खंबीर अधिष्ठान दिले. सन १९४७ ला भारत स्वतंत्र झाला. त्यावेळी बीडकर रझाकारविरोधी हैद्राबाद संग्रामामध्ये गुंतले होते. याच काळात साने गुरुजींच्या सहवासात राहाण्याची त्यांना संधी मिळाली.

राष्ट्रीय कार्य आणि काळाची गरज म्हणून एकीकडे नियमित शिक्षणामध्ये सातत्याने खंड पडत राहिला, तरीही राष्ट्रभाषा हिंदीच्या विविध परीक्षा देऊन राष्ट्रभाषेवर प्रभुत्व मिळविले. विद्यार्थ्यांचे वर्ग चालविले.

अहमदनगरच्या 'मिलिटरी हिंदी हायस्कूल' मध्ये शिक्षक होऊन अध्यापन कार्याची सुरुवात केली. साधारण एका तपाच्या कालावधीनंतर सदर शाळेतील हिंदी विभाग बंद करण्यात आल्यामुळे अमराठी भाषिक विद्यार्थ्यांची गैरसोय दूर व्हावी म्हणून १४ जून १९६४ रोजी 'पं. नेहरू हिंदी विद्यालयाची' स्थापना आपल्या शिक्षक मित्रांच्या सहकार्याने केली.

विद्यार्थी संख्या वाढती राहिली. तरी सुद्धा 'विंचवाचे बिऱ्हाड पाठीवर' या न्यायाने सुमारे एका तपापेक्षा अधिक काळ नगर पालिकेची सिद्धी बागेतील इमारत, दादा चौधरी विद्यालय व निवासी विद्यालयाच्या इमारतीमध्ये पं. नेहरू विद्यालय सर्कशीच्या तंबूप्रमाणे फिरते राहिले. येथेच बीडकरांच्या जिद्दीची, चिकाटीची व त्यागाची कसोटी लागली.

ब

ज्या नगरमध्ये एक विद्यार्थी म्हणून शिक्षण घेतले त्याच नगरमध्ये पूज्य साने गुरुजींचा आदर्श समोर ठेवून एका आदर्श शिक्षकाचीही भूमिका तन-मन-धनाने वठवली. स्वत:च्या कर्तृत्वाने हिंदी माध्यमाचे स्वतंत्र विद्यालय स्थापन करून ते नावारूपाला आणण्यात आयुष्यातील अनेक वर्षे खर्ची घातली.

प्रवाहाविरुद्ध पोहत असल्याने अनेक फटके बसले तरीसुद्धा स्वत:च्या पूर्णत्वाचा कधी, कोठे आव आणला नाही. कसोटीच्या प्रत्येक क्षणी पत्नी प्रतिभाताई आणि मित्रांचा कस लागला. प्रत्येक कृती आणि निर्णयामध्ये प्रामाणिकपणा ठेवला. 'वेचीत काटे चाललो' हे त्यांचे आत्मचरित्रही प्रसिद्ध आहे.

– प्रा. विश्वास काळे

## बेथूजी गुरूजी

***खेडगीकर, भीमराव भवानराव***

**शिक्षक, मुख्याध्यापक**

**१२ जून १९१२ – २७ जुलै १९९६**



भीमराव भवानराव खेडगीकर हे स्वामी रामानंद तीर्थ यांचे बंधू होत. भगवान श्रीकृष्णाने भीमाला बेथू असे संबोधल्याचा उल्लेख ज्ञानेश्वरीत आहे. आपल्या भावाची प्रकृती भीमासारखी धडधाकट आहे, त्याचे नावही भीमराव आहे, म्हणून स्वामीजी रामानंद तीर्थ यांनी खेडगीकर यांचे नाव 'बेथुजी' ठेवले. ते स्वामी रामानंद तीर्थ यांचे धाकटे बंधु होत. त्यांचा जन्म विजापूर जिल्ह्यातील सिंदगी या गावी झाला. त्यांच्या वडिलांचे नाव भवानराव व आईचे नाव यशोदा.

बेथूजींच्या बालपणीच प्रथम त्यांच्या आईचे नंतर वडिलांचे निधन झाले. त्यामुळे यांचे पुढील शिक्षण त्यांचे काका रामभाऊ खेडगीकर यांनी केले. बेथूजींनीही आपल्या शिक्षणाचा फारसा भार काकांवर पडू दिला नाही. खाजगी शिकवण्या करत ते हैदराबादच्या निजाम महाविद्यालयामधून बी.ए. (ऑनर्स) व एम.ए.(इंग्रजी) झाले. अनेक हालअपेष्टा सोसून शिक्षण पूर्ण केल्यामुळे बेथूजींच्या मनात गरीब आणि मागासवर्गीय विद्यार्थ्यांविषयी आत्मीयता निर्माण झाली. पुढील आयुष्यात त्यांनी शेकडो गरीब आणि गरजू विद्यार्थ्यांना वेळोवेळी मदत केली. कुणाचेही शिक्षण कधीही अडू दिले नाही. मोमिनाबादच्या (अंबेजोगाईच्या) योगेश्वरी नूतन विद्यालयात ते शिक्षक म्हणून इ.स.१९३६

मध्ये रुजू झाले. स्वामीजींच्या खांद्याला खांदा लावून राष्ट्रीय शिक्षणाचे कार्य तनमनधनाने करू लागले. शाळेसाठी मुले जमा करण्यापासून सगळी कामे ते निष्ठेने करत. 'तुमचे रामलक्ष्मण आमच्या शाळेसाठी द्या', या शब्दात ते पालकांकडे मुलांची मागणी करत.

बेथूजींचा विवाह सुलोचनाबाई यांच्याशी १९४० मध्ये झाला. लग्न झाले त्यावेळी बेथुजी योगेश्वरी शाळेचे मुख्याध्यापक होते. त्यांनी हे पद १९७२ पर्यंत सेवाभावी वृत्तीने सांभाळले. निवृत्त झाल्यावरही त्यांची शाळा सुटली नाही.

स्वतःच्या मुलामुलींच्या विकासापेक्षा शाळेतल्या मुलामुलींचा विकास हा त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय होता. इंग्रजी हा त्यांच्या अध्यापनाचा आवडीचा विषय.

त्यांचा ध्येयवाद स्वामी रामानंद तीर्थांच्या आचारांनी आणि विचारांनी भरलेला असायचा. हैदराबाद संस्थान निजामाच्या जुलमी राजवटीतून मुक्त होईपर्यंत हैदराबाद मुक्तिसंग्राम हा या ध्येयवादाचा श्वास होता. हैदराबाद संस्थानाच्या मुक्तीनंतर स्वतंत्र भारताचा विकास हा या ध्येयवादाचा श्वास ठरला.

वर्गात धीरगंभीर असणारे बेथूजी गुरूजी सांस्कृतिक आणि सामाजिक कार्यातही रमायचे. आपला विद्यार्थी ललित कलांमध्येही पुढे जावा. खेळांचे मैदानही त्याने गाजवावे असा त्यांचा कटाक्ष असायचा.

१९७७ ते १९८० या काळात योगेश्वरी शिक्षण संस्थेचे अध्यक्षपद सांभाळत त्यांनी संस्थेचा विकास साधला. याच काळात नांदेड एज्युकेशन सोसायटीचे अध्यक्षपदही त्यांनी सांभाळले. त्यांचा अध्यक्षपदाचा कालावधी म्हणजेच उच्च पातळीवरचा काटेकोरपणा, नियमितपणा, वक्तशीरपणा, राष्ट्रीयत्व या मूल्यांचा करडा आणि गतिमान कालावधी ठरला. आपल्या कार्याचा ध्यास त्यांनी शेवटपर्यंत सोडला नाही.

आपल्या कार्यातून बंधूभावाचे मूल्य कसे रुजवावे याचा कृतिशील आणि प्रेरणादायी वस्तुपाठ बेथुजींच्या जीवनात पाहायला मिळतो.

– प्राचार्य डॉ. संतोष मोतीराम मुळावकर

## बेंडाळे, गोपाळ दोधू

***बेंडाळे अण्णासाहेब***

**शिक्षक**

**२९ सप्टेंबर १९१८ – ३० एप्रिल २०००**



गोपाळ दोधू उर्फ अण्णासाहेब बेंडाळे यांचा जन्म जळगाव जिल्ह्यातील सावद्यासारख्या एका छोट्याशा खेड्यात झाला. अण्णांचे वडील दोधू बेंडाळे व्यवसायाने शेतकरी होते. त्यावेळी त्यांच्या उपजत ज्ञानामुळे व बहुश्रुतपणामुळे गावाच्या कारभारातदेखील त्यांचा सल्ला घेतला जायचा. त्यांना शिक्षणाचे महत्त्व पटलेले होते. अण्णांच्या शिक्षणात त्यांनी लक्ष घातले.

सावद्याच्या प्राथमिक शिक्षणानंतर जळगावच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये माध्यमिक शिक्षण झाले. १९३६ मध्ये ते मॅट्रिकच्या परीक्षेत खानदेशात प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. जमखेडी संस्थानची १४ रुपयांची शिष्यवृत्ती मिळाली व विल्सन महाविद्यालयात जाण्याची संधी मिळाली. त्यानंतर ते एम. बी.बी.एस. आणि एम. एस. झाले.

एक कुशल शल्यचिकित्सक म्हणून अण्णा खानदेशच्या परिसरात प्रसिद्ध झाले. रूग्णाच्या रोगाचे अचूक निदान करण्यात आणि त्यावर सुयोग्य उपाययोजना करण्यात त्यांचा हातखंडा होता. १९५१ मध्ये त्यांनी क्ष-किरण यंत्र आणले. सुरुवातीला हाताला हातमोजे न घालता, क्ष-किरण पट्टीका केल्या त्यामुळे त्यांच्या दोन्ही हातांची बोटे भाजली. त्याचा परिणाम काही बोटे काढावी लागली. त्यामुळे शल्याचिकित्सा करताना त्रास होऊ लागला. तरी त्यांची वैद्यकीय क्षेत्रात प्रगतीच झाली.

जळगाव येथे वैद्यकीय महाविद्यालय सुरू करावे अशी त्यांची तीव्र इच्छा होती. त्यांनी एक चिकित्सा केंद्र सुरू केले. एक अचूक निदान करणारा सिद्धहस्त शल्यचिकित्सक म्हणून नावलौकिक प्राप्त केला.

ब

खानदेशातूनच नव्हे तर खानदेश बाहेरचे रुग्ण ही त्यांच्याकडे येत. त्यावेळी आजच्यासारखे वेगवेगळे तज्ज्ञ नव्हते. सर्व प्रकारच्या केसेस हाताळाव्या लागत. ५० ते ६० खाटांचे रुग्णालय ही झाले.दोन प्रथितयश शिक्षण संस्थांचे अध्यक्ष घेऊनही तांत्रिक अडचणीमुळे वैद्यकीय महाविद्यालयाचे अण्णांचे स्वप्न पुरे होऊ शकले नाही. अण्णांचा एक महत्त्वाचा पैलू म्हणजे योगासन, योगसाधना. ते नियमाने योगासने करीत. अण्णांना पोहण्याची आवड होती. पोहण्याचा व्यायाम एक उत्तम व्यायाम ही त्यांची धारणा होती. त्यासाठी जळगावला हिंदुस्तान सिल्क मिल समोर एक मोठा प्लॉट घेऊन त्यांनी मोठा तलाव बांधला. तो सर्वांना उपयोगात येत आहे.

अण्णांची शिक्षणप्रेमी म्हणून खरी ओळख झाली ती खानदेश कॉलेज एज्युकेशन सोसायटीचे १९५५ पासून अध्यक्ष झाल्यापासून. १९४५ मध्ये या सोसायटीची स्थापना झाली. 'के जी टू पी जी' ही संकल्पना साकार झाली. कला, वाणिज्य, विज्ञान, सामाजिक शास्त्रे, शिक्षणशास्त्र, शारीरिक शिक्षण, व्यवस्थापन, अभियांत्रिकी, विधी या सर्व विद्याशाखांची महाविद्यालये सुरू झाली.

एम्. जे. महाविद्यालय जळगाव ही खानदेशातील विद्यानगरी. महाराष्ट्रातल्या नावाजलेल्या महाविद्यालयांपैकी एक महाविद्यालय नॅक, बंगळुरू तर्फे या महाविद्यालयाला 'अ' श्रेणी मिळाली व यू.जी.सी. ने 'एक्सलंस अ‍ॅवॉर्ड' म्हणून ६० लाख रुपयांचे अनुदान दिले.

अण्णांनी उत्तम शिक्षक लाभावेत म्हणून बी. एड., डी. एड. महाविद्यालय काढले. शिक्षणातील संशोधनही मोठ्या प्रमाणात सुरू झाले. तसेच विधी महाविद्यालय, व्यवस्थापन महाविद्यालय व अभियांत्रिकी महाविद्यालय काढले.

एज्युकेशनल युनियन या खास स्त्रीशिक्षणाला प्राधान्य देणाऱ्या संस्थेचे अध्यक्ष म्हणून १९५२ पासून पद स्वीकारले. पहिल्यांदा सुरू झाले फकिरा हरी सेवा बोर्डिंग हाऊस हे मुलींचे वसतिगृह. बालविकास मंदिर, श्रीमती शांताबाई खडके प्राथमिक विद्यामंदिर, नंदिनीबाई वामनराव मुलींचे विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय विविध कला विभाग, प्रेरणा महिला मंडळ या शाखा सुरू केल्या. मुलांसाठी कला, वाणिज्य, विज्ञान महाविद्यालय सुरू झाले.

अण्णांच्या सन्मानार्थ डॉ. बेंडाळे कला, वाणिज्य, विज्ञान महिला महाविद्यालय हे नामकरण करण्यात आले. जळगावला उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ व्हावे ही अण्णांची इच्छा १५ ऑगस्ट १९९० रोजी पूर्ण झाली. कुलगुरु डॉ. एन. के. ठाकरेंच्या समवेत असलेल्या पहिल्या कार्यकारिणी परिषदेत अण्णांचा समावेश झाला. विद्यापीठाच्या आर्थिक निर्णयांमध्ये अण्णांचा मौलिक वाटा होता.

मितभाषी असलेले अण्णा स्पष्टवक्ते होते. महाविद्यालयांच्या स्थानिक चौकशी समिती च्या वेळी संस्थाचालकांना अटीसंबंधी स्पष्टपणे सांगताना महाविद्यालयांच्या भौतिक सुविधा, प्राध्यापक वृंद, शिक्षकेतर कर्मचारी, प्रयोगशाळा उपकरणे, ग्रंथालय, क्रीडांगण यांत सुव्यवस्थापन असावे असे त्यांचे स्पष्टमत होते.

केंद्रीय प्रवेश प्रक्रिया असावी या मताचे ते असल्यामुळे उत्तर महाराष्ट्र विद्यापीठात बी.एड. प्रवेश केंद्रीय पद्धतीने सुरू झाले.

– म. ल. नानकर

ब

## बेडेकर, वासुदेव नारायण

**संस्थापक**

**२० फेब्रुवारी १९१७ – १४ एप्रिल २००४**

डॉ. वासुदेव नारायण बेडेकर स्त्री रोग तज्ज्ञ होते. पुण्याच्या बी. जे. वैद्यकीय व मुंबईच्या वाडिया महाविद्यालयामध्ये त्यांचे शिक्षण झाले. डॉक्टरांनी १९५५ मध्ये ठाण्यातील विद्याप्रसारक मंडळाचे अध्यक्षस्थान स्वीकारले आणि १९५७ मध्ये डॉ. बेडेकर विद्यामंदिराची स्थापना करून माध्यमिक शिक्षणाची सोय केली. वस्ती वाढू लागली आणि उच्च शिक्षणाची गरजही तीव्रतेने भासू लागल्याने डॉक्टरांनी कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय (१९६९), विधी महाविद्यालय (१९७२)



स्थापन केले. पुढच्याच वर्षी औद्योगिक व्यवस्थापन सुरू केले. इंग्रजी माध्यमाची शाळा (१९७६) स्थापन करून १९८३ मध्ये तंत्रनिकेतन, १९९९ मध्ये व्यवस्थापन पदवी अभ्यासक्रम (बी. एम. एस) आणि २००० मध्ये ग्रंथालय व माहितीशास्त्र पदवी अभ्यासक्रम (बी. लिब.) अशी ज्ञानाची दालने उघडून विद्याप्रसाराचे कार्य केले.

ठाण्यातील या शिक्षण संस्थातून १३ हजारहून अधिक विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय डॉ. बेडेकरांनी केली. भारत सहकारी बँकेच्या मुख्य शाखेनंतर, ठाणे पूर्व, पोखरण, चंदनवाडी येथे शाखा काढल्या. अलीकडेच मुलुंड व घाटकोपर येथेही या बँकेच्या शाखांची स्थापना केली. डॉ. शाहू रसाळांच्या 'सहयोग फाऊंडेशन' ने डॉ. बेडेकरांचा 'रुग्णमित्र' म्हणून गौरव केला. 'स्वार्थ जाळूनी कृतार्थ' अशा शब्दात डॉ. बेडेकरांच्या कार्याचे वर्णन माजी शिक्षणमंत्री सुधीर जोशी यांनी केले. आपल्या जुन्या नव्या सहकाऱ्यांविषयी आणि संस्थांच्या प्राचार्यांविषयी डॉक्टर कृतज्ञता व्यक्त करतात.

डॉक्टरांच्या वयाच्या ८० व्या वर्षी डॉ. शुभा चिटणीसांनी 'स्मृतिलहरी' नावाचे त्यांचे आत्मचरित्र शब्दांकित केले.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *चिटणीस, डॉ. शुभा ; 'यशवंत'; परचुरे प्रकाशन गिरगाव, मुंबई ; १० एप्रिल २००५.*

* * *

ब




## भांडारकर, रामकृष्ण गोपाळ

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललित साहित्येतर खंड

## भागवत, राजाराम रामकृष्ण

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललित साहित्येतर खंड

## भागवत, विद्याधर गंगाराम

**शिक्षक, संस्थापक**

**२७ ऑगस्ट १९३२ – १३ जुलै २००३**



विद्याधर गंगाराम भागवत यांचा जन्म त्यावेळच्या सावंतवाडी संस्थानातील वालावल ( ता. कुडाळ) या खेडेगावात झाला. वडील सतत आजारी असल्याने घरची आर्थिक परिस्थिती अत्यंत गरिबीची होती. त्याच परिस्थितीत प्राथमिक शिक्षण पूर्ण केल्यानंतर सावंतवाडीला सुरुवातीला काका आणि नंतर आत्याकडे राहून मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. आत्याचे यजमान पुजारी होते. त्यांच्या बरोबर भागवत देखील पूजा – अर्चा करण्यासाठी जात असत. सावंतवाडी संस्थानची राजधानी असल्याने दिवाण व सर्व अधिकारी इथेच राहत. या अधिकाऱ्यांकडे भागवत सकाळी सात ते दहा पर्यंत पूजा–अर्चा करायचे आणि अकरा ते साडेपाच शाळेत जायचे.

मॅट्रीक नंतर बहिस्थ विद्यार्थी ( एक्स्टर्नल) म्हणून मराठी व संस्कृत विषयात पदव्युत्तर पदवी ( एम.ए.) व बी.एड. पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. त्यानंतर गोव्यातील म्हापसा गावातील ज्ञानप्रसारक विद्यालयात शिक्षक म्हणून नोकरीस सुरुवात केली. पण एके दिवशी त्यांनी विद्यार्थ्यांना ‘माझा भारत’ या विषयावर निबंध लिहायला सांगितला. त्यात एका मुलाने निबंधाच्यावर तिरंगा ध्वज काढला होता. त्या काळी गोव्यात पोर्तुगीजांचा अंमल असल्याने भागवत यांना मारहाण करण्यात आली व एक दिवसाचा तुरुंगवासही भोगावा लागला. त्यानंतर त्यांच्या वडिलांनी त्यांना लपत–छपत सीमापार करून रत्नागिरी जिल्ह्यात आणले.

त्यानंतर देवगड तालुक्यातील वाडा या खेडेगावात डॉ. नेनेंच्या सहकार्याने भागवत यांनी माध्यमिक शाळा सुरू केली. त्यासाठी स्थानिक आंबा व्यापारी अनंत केळकर यांनी काही एकर जमीन व त्यातील आंबापीक शाळेसाठी मदत म्हणून दिले. यातूनच अनंत कृष्ण केळकर विद्यालयाची सुरुवात झाली. परंतु वडिलांच्या आजारपणामुळे इथली नोकरी सोडून कुडासा या खेडेगावात राहण्यास गेले. कुडासामध्येच नवभारत एज्युकेशन सोसायटीच्या ‘खेमराज विद्यालयात’ त्यांनी सुरुवातीला शिक्षक आणि पुढे मुख्याध्यापक म्हणून काम केले. शिक्षक म्हणून काम करत असताना विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासासाठी विविध उपक्रम राबविले. त्याचबरोबर ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण मिळावे यासाठी प्रयत्न केले. त्यात ॲड. रामनाथ सौदागर यांच्या सहकार्याने शाळेत पाचवी ते सातवी व ११ वी, १२ वी सायन्स विषयाच्या इयत्ता सुरू केल्या. यासाठी विज्ञान विषय साहित्याच्या अटी पूर्ण केल्या. शिवाय दोन खोल्या बांधल्या. वसतिगृह अधिक सुसज्ज करून इमारतीच्या खोल्या, स्वयंपाकघर व भोजनकक्ष वाढविले. यामुळे परिसरातील बत्तीस गावातील मुलांच्या शिक्षणाची व राहण्याची सोय झाली. त्याचबरोबर मुलांची गरज पाहून पेज योजना सुरू केली. तसेच भेडशी विद्यालयासाठी विहीर

भ

व मैदान तयार करून दिले.मडुरा विद्यालयामधील मुलांसाठी देखील पेज योजना सुरू केली. त्याचबरोबर कुडासे विद्यालयामधील १५ हुशार गरीब मुलांना दत्तक घेऊन त्याच्या ८ वीपासून पदव्युत्तरपर्यंतच्या शिक्षणाचा खर्च केला व त्यांचे जीवन घडविले.

कुडासे हे कोकणातील एक छोटेसे खेडे असल्याने तिथे एस.टी थांब्याची व विजेची देखील व्यवस्था नव्हती. गावातील वस्ती कमी या सबबीवर नेते मंडळी येथील सुधारणांकडे दुर्लक्ष करीत. परंतु भागवत यांनी संघर्ष करून व वेळप्रसंगी आर्थिक तूट सोसून गावात एस.टी. व विजेची व्यवस्था केली. त्याचा फायदा आजूबाजूच्या तीस गावांना देखील झाला. त्याचबरोबर शाळेतील मुलांसाठी देखील शाळा भरतेवेळी व सुटल्यानंतर अशा दोन गाड्या सुरू केल्या. तरीही मणेरी या गावातील मुलांना पाच कि.मी. डोंगराळ पायवाटेने चालत शाळेत यावे लागत होते. त्यामुळे शिक्षक, विद्यार्थी व पालक यांच्या सहकार्याने कुडासे व मणेरी दरम्यानची जागा मिळवून पाच कि.मी. लांबीचा कच्चा रस्ता तयार केला.आज तिथे डांबरी रस्ता झाला आहे.

भागवत हे उत्तम लेखक व साहित्यिक होते. त्यांनी लेखनासाठी स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली. स्वतःला लेखनकार्याला वाहून घेतले. भागवत लेखन, संपादनाबरोबरच साहित्य समीक्षाही करीत असत. कविता, कथा, कादंबरी, नभोनाट्य, बालसाहित्य,चरित्रादी प्रकारांमध्ये त्यांनी लेखन केले. त्यांच्या बालकवी ठोंबरे यांच्या वरील ‘ऐलतटावर – पैलतटावर’ या चरित्रात्मक कादंबरीला महाराष्ट्र शासन पुरस्काराबरोबरच अन्य सात पुरस्कार मिळाले आहेत. तसेच त्यांच्या कवितेला साहित्य अकादमी दिल्ली येथील ‘अखिल भारतीय कविता संग्रहात’ स्थान मिळाले आहे.

भागवत यांनी नवसाहित्यिकांना घडविण्याचे काम केले आहे. नवसाहित्यिकांना लेखनासाठी प्रेरणा दिली, मार्गदर्शन केले व सिंधुदुर्ग, रत्नागिरी जिल्ह्यात साहित्य चळवळ उभी केली. वेगवेगळे साहित्यिक मेळावे, कार्यशाळा भरवून मोठ्या साहित्यिकांचे मार्गदर्शन नवसाहित्यिकांना मिळवून दिले. भागवत यांचे चिं.त्र्यं.खनोलकर तथा आरती प्रभू’ हे मित्र. त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ त्यांनी ‘चिंतामणी साहित्य सहयोग प्रकाशन संस्था’ स्थापन केली. याद्वारे नवीन साहित्यिकांचे साहित्य प्रकाशित करून त्यांना प्रसिद्धी मिळवून दिली. तसेच ‘आरती’ या नावाने वाङ्मयीन मासिकाची सुरुवात केली. त्यांचा कोकण मराठी साहित्य परिषदेच्या स्थापनेमध्ये मोठा सहभाग आहे व त्यांनी कोकण विभागाध्यक्ष म्हणूनही काम केले आहे.

या शिक्षक– साहित्यिकाचे निधन गुरुपौर्णिमेच्या दिवशी झाले. त्यांच्या स्मृतीत आरती मासिकातर्फे काव्य स्पर्धेचे आयोजन केले जाते व ‘विद्याधर भागवत शिशु वाटिका’ या नावाने ‘अटल प्रतिष्ठान’ तर्फे सावंतवाडी येथे बालशाळा चालविली जाते.

– विवेक वि. कुलकर्णी

## भागवत, श्रीधर केशव

***भागवत गुरुजी, स्वामी भागवत***

**शिक्षक**

**१९०४ – ५ सप्टेंबर १९८२**



श्रीधर केशव भागवत यांचा जन्म चिपळूण येथील एका मध्यम परिस्थितीत वावरणाऱ्या कुटुंबात झाला. सर्व शिक्षणच मुळी मराठी सातवीपर्यंत. त्यापुढे शिक्षण घेणे हे त्या काळी बऱ्याच कुटुंबांना शक्य नसे. त्यामुळे सातवी उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी चिपळूणलाच प्राथमिक शिक्षकाची नोकरी पत्करली. त्यांनी शिक्षकी पेशा स्वीकारला. त्या वेळी देशभर स्वदेश–स्वधर्म–स्वसंस्कृती व स्वराज्य यांसारख्या विचारांचा समाजावर फार खोलवर परिणाम झाला होता. वर्गखोलीच्या चार भिंतीच्या मर्यादेत केवळ पुस्तकी शिक्षण देऊन विद्यार्थ्यांना कारकुनी पेशा देणारे शिक्षण हे त्यांना कधीच रुचले नाही. देशप्रेमाने व देशभक्तीने भारलेले व शरीराने सुदृढ असे विद्यार्थीच देशाला स्वातंत्र्य मिळवून

भ

देण्याच्या कामी उपयोगी पडतील, असे विद्यार्थी आपण घडविले पाहिजेत हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी आपणही या विषयात पारंगत झाले पाहिजे हे मनाशी पक्के केले. त्या काळी पुणे येथे महाराष्ट्र मंडळात कॅप्टन शि. वा. दामले असे शिक्षण देत असत. प्रत्येक दिवाळीच्या व उन्हाळी सुट्टीत ते पुण्याला जाऊन, मल्लखांब, डबलबार, सिंगलबार, वेत्रचर्म, खड्ग यांचे प्रशिक्षण घेत असत व आल्यावर ते सर्व विद्यार्थ्यांना देत असत. चार भिंतीतून शाळा मैदानावर आली. अनेक विद्यार्थी लाठीकाठी, लेझीम, योगासने, सूर्यनमस्कार यांचा उत्तम सराव करू लागले. त्यांच्या या उपक्रमांमुळे, परिसरातील सर्व खेड्यांत त्यांचा उल्लेख ''लाठीकाठी'' भागवत असा होऊ लागला.

चिपळूण हे अगदी छोटेसे गाव असूनही 'सतत प्रगतिशील' असा लौकिक असल्यामुळे याच काळात नागपूर येथील डॉ. केशव बळीराम हेडगेवार यांनी रा. स्व. संघाचे काम रुजविण्यासाठी ही चांगली भूमी आहे हे

हेरले. कोकणातीलच एक विद्यार्थी माधवराव मुळे यांना संघकार्यासाठी चिपळूण येथे पाठवले. त्यांचा व भागवत यांच्याशी परिचय झाला व भागवत गुरुजींचे लाठीकाठीचे वर्गाचे रूपांतर १९३४ मध्ये संघ शाखेमध्ये झाले. पत्की कुटुंबाने दिलेल्या जागेतील इमारतीच्या तळमजल्यावर हिंदू विद्यार्थी वसतिगृह व पहिल्या मजल्यावर संघ कार्यालय सुरू झाले.

ही इमारत तशी खूपच जुनी होती. दरवर्षी दुरुस्तीसाठी खूपच खर्च येई. त्यामुळे तिची नवीन उभारणी करण्याची जबाबदारी भागवत गुरुजींवर सोपवली गेली. १९४५ मध्ये लोकसहाय्यातून एक नवे कार्यालय उभे राहिले. श्री. के. भागवत यांनी शेजारीच एक इमारत उभी केली व तिला 'समर्थ व्यायामशाळा' असे नाव दिले. तेथे वर्षभर मल्लखांब, सिंगलबार व डबलबार याचे प्रशिक्षण दिले जाई. काही काळ येथे कुस्तीचा हौदा सुद्धा होता. समर्थांच्या शिकवणुकीचा भागवत गुरुजींवर एवढा परिणाम झालेला होता की त्यांच्या तोंडी ''श्रीराम जयराम जयजयराम'' हे नाम भिनले ते अखेरपर्यंत राहिले. त्यांचा तेरा कोटीहून अधिक रामनामाचा जप झाला होता. आजही त्यांच्या कुटुंबियांनी ते व्रत पुढे चालवले आहे. त्यांची दृष्टी एवढी दूरदर्शी होती की याच काळात त्यांनी प्रौढ शिक्षणाचे वर्गही सुरू केले. चिपळूणच्या नगरपरिषदेमध्ये जे झाडूवाले व सफाई कामगार होते ते अशिक्षित होते. त्यांना साक्षर करणे गरजेचे आहे हे ओळखून त्यांनी याच काळामध्ये या लोकांच्या वसाहतीत रात्री जायचे व त्यांना साक्षर करण्याचे व्रत घेतले.

रात्री प्रौढ शिक्षणाचे वर्ग चालायचे व सकाळी लक्ष्मीनारायणाच्या मंदिरात सूर्यनमस्काराचे वर्ग चालायचे. सूर्यनमस्कार घालणाऱ्या मुलांना आकर्षण व प्रोत्साहन म्हणून ते खारका देत असत. त्या खारकांच्या आठवणी सांगणारे व 'आम्हाला त्यामुळे उत्तम आरोग्य लाभले आहे' असे सांगणारे विद्यार्थी आजही भेटतात.

महात्मा गांधींनी त्याच दरम्यान प्रत्येक भारतीयाला हिंदी आलेच पाहिजे, असा आग्रह धरला होता.

त्याला अनुसरून गुरुजींनी स्वत: हिंदीच्या परीक्षा दिल्या व प्राथमिक शाळेतील शिक्षकांनाही ते हिंदी शिकवत असत. नंतर त्यांनी शाळेतील विद्यार्थ्यांनाही हिंदी शिकवण्यास सुरुवात केली. मधल्या सुट्टीनंतर ते शहरातील इतर शाळांमध्येही विद्यार्थ्यांना खास हिंदी शिकविण्यासाठी जात असत. याच काळात त्यांनी उर्दू भाषेचाही अभ्यास केला.

स्त्रियाही या समाजाचा एक महत्त्वाचा घटक आहेत. पुरुषांइतक्याच त्या प्रगत असाव्यात यासाठी स्त्रियांसाठी पोहणे, सायकल चालविणे, घोड्यावर बसणे यासारखे उपक्रम त्यांनी राबवले. त्या काळी कर्मठ वृत्तीचे लोक फार असत. काळाची पावले ओळखून भावी काळात काय करावे लागेल याची जाणीव त्यांना नसे. सनातनी प्रवृत्तीचा पगडा समाजावर फार होता. अशा वेळी स्वा. सावरकर यांची मते सहजासहजी पचनी पडणारी नव्हती. सावरकरांनी त्या वेळी सहभोजनाचा कार्यक्रम आयोजित केला होता. समाज संघटनासाठी त्याची आवश्यकता कशी आहे याची खात्री झाल्यामुळे गुरुजींनी आपल्या धाकट्या बंधू समवेत ( रघुनाथ केशव भागवत) या सहभोजनाच्या कार्यक्रमात स्वत: भाग घेऊन तो यशस्वी केला होता. या त्यांच्या

भ

कृतीचा परिणामही त्यांना सहन करावा लागला होता. ते पागेवर (चिपळूणची एक पेठ) राहात होते. तेथील ब्रह्मवृंदाने एक खास सभा बोलावून या दोन्ही भागवत बंधूंवर बहिष्कार घातल्याचा ठराव मंजूर करून घेतला. कालांतराने लोकांच्या लक्षात आपली चूक आली आणि पुढे सर्व सुरळीत झाले.

त्या वेळी रा. स्व. संघाचा गणवेश खाकी शर्ट, खाकी अर्धी चड्डी, बूट, वगैरे होता. हा सर्व स्वखर्चानेच करावा लागतो. आपल्याला हे कसे परवडणार म्हणून त्यांनी त्या वेळेपासून आपला नेहमीचा वेष बदलला तो अखेरपर्यंत. ते कायमच खाकी शर्ट घालू लागले. तेव्हापासून ''लाठीकाठी भागवतांचे'' नामांतर होऊन ते 'खाकी भागवत' या नावानेच ओळखले जाऊ लागले.

पुढे त्यांनी इतर सामाजिक कार्यांना सुरुवात केली. गावामधले लक्ष्मीनारायणाचे मंदिर (जेथे पूर्वी ते सूर्यनमस्काराचे वर्ग घेत) जीर्ण झाले होते. त्याचा जीर्णोद्धार करण्याचे कार्य त्यांनी हाती घेतले. हे देऊळ ब्राह्मण समाजाचे होते. म्हणून प्रत्येक ब्राह्मण कुटुंबाने महिना चार आणे वर्गणी द्यावी व त्यातून ते बांधावे असे ठरले. घरोघरी जाऊन हे पैसे गोळा करण्याचे काम त्यांनी केले. एखादा सधन जर वर्षाचे एकदम तीन रुपये घ्या म्हणाला तर ते स्वीकारत नसत. 'प्रत्येक महिन्याला तुमच्याशी संपर्क राहिला पाहिजे. मी दरमहा ४ आणेच घेऊन जाईन' असे सांगत. चिपळूणमधील काही ब्राह्मण कुटुंबे मुंबई-पुण्यात राहत असत. त्यांच्याशी संपर्क साधून त्यांच्याकडूनही वर्गणी गोळा करून लक्ष्मीनारायण मंदिराचे बांधकाम पार पडले. याच कालावधीत ते 'पाग' भागात सायंकाळी मल्लखांब शिकवणे व भगवद्गीतेचे अध्याय शिकवण्याचे काम करत. मल्लखांबामध्ये तरबेज असलेल्या त्यांच्या विद्यार्थ्यांना छत्रपती पुरस्कारही मिळालेला आहे आणि ते विद्यार्थीसुद्धा अद्याप मल्लखांब शिकविण्याचे कार्य करत आहेत.

याच दरम्यान त्यांनी चिपळूण येथे 'ब्राह्मण साहाय्यक संघ' स्थापन करून तो नावारूपाला आणला. गरजू ब्राह्मण विद्यार्थ्यांना दरवर्षी पुस्तके, फी, गणवेश यासाठी मदत करणे, ब्राह्मण बटूंचे व्रतबंध संस्कार करणे आदी कार्ये त्या संघाद्वारे आजही चालतात.

चिपळूणमधील 'वाणीआळी' मध्ये एक राममंदिर आहे. त्याचेही नूतनीकरण करण्याची जेव्हा गरज भासली तेव्हा वाणी समाजाने हे काम त्यांच्यावर सोपवले व तेही त्यांनी यशस्वीरीत्या पार पाडले.

श्रीधर केशव भागवत आता भागवत गुरुजी म्हणून ओळखले जाऊ लागले होते.

त्यांनी चालू केलेले शारीरिक शिक्षणाचे कार्य अद्यापही चालू आहे. श्रीमती सुमतीबाई जांभेकर यांनी त्यांच्या नावे स्वतंत्र व्यायामशाळा सुरू करून ते कार्य अद्याप चालू ठेवले आहे. चिपळूण येथील युनायटेड न्यू इंग्लिश स्कूल मध्ये ' श्री. के. भागवत गुरुजी व्यायामशाळा' ही एक सर्व साहित्याने सुसज्ज अशी व्यायामशाळा चालू आहे.

१९८२ मध्ये भागवत गुरुजी यांची पुण्यतिथी प्रतिवर्षी साजरी केली जाते व त्यांचे स्मृत्यर्थ सूर्यनमस्काराच्या स्पर्धा आयोजित केल्या जातात. मल्लखांब, दोरीचा मल्लखांब यांची प्रात्यक्षिके सादर करून त्यांच्या स्मृतीला यथोचित अभिवादन केले जाते.

– एन. सी. भागवत

## भालेराव, एकनाथ काशिनाथ

**शिक्षक ,खगोलशास्त्रज्ज्ञ**

**२७ मार्च १९३२**



एकनाथ काशिनाथ भालेराव ऊर्फ सुधाकर भालेराव हे जागतिक कीर्तीचे खगोलशास्त्रज्ञ आहेतच, पण ते उत्तम शिक्षक आहेत. त्यांचा जन्म चाळीसगावचा. भालेरावांचे प्राथमिक शिक्षण चाळीसगावच्या लोकल बोर्डाच्या शाळेत व माध्यमिक शिक्षण आनंदीबाई बंकट विद्यालयामध्ये झाले. महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी

भ

ते इंदूरच्या ख्रिश्चन महाविद्यालयात दाखल झाले. तेथील इंग्रजी रीतीरिवाज, वातावरण ह्यांचा मोठा प्रभाव त्यांच्यावर पडला. त्यांनी इंग्रजी साहित्याचा अभ्यास करुन त्या भाषेवर प्रभुत्व मिळविले.

त्यानंतर भालेरावांनी मनमाडच्या जी.आय. पी. इंडियन शाळेमध्ये शिक्षक म्हणून काम करण्यास सुरुवात केली. धुळ्याच्या ग्रॅज्युएटस बेसिक ट्रेनिंग सेंटर मधून १९५५ मध्ये ते बी.टी. झाले. त्याच वर्षी लोणी येथे शिक्षणखात्यात त्यांना नोकरी मिळाली. पण त्यांच्यातील शिक्षक या नोकरीत रमला नाही.

भालेराव नाशिकला आले आणि नाशिक एज्युकेशन सोसायटीच्या पेठे विद्यालयात शिक्षक म्हणून रुजू झाले. विषयाचा सखोल अभ्यास, विद्यार्थ्यांविषयीचे प्रेम, अत्यंत परिणामकारक व मुलांना आनंद देणारे अध्यापन यामुळे इंग्रजी, गणित, इतिहास, भूगोल या विषयांचे उत्तम अध्यापक म्हणून काही काळातच त्यांचे नाव झाले. संस्थेच्या विविध माध्यमिक शाळांत त्यांनी शिक्षक, उपमुख्याध्यापक म्हणून काम करीत असताना अनेक उपक्रम राबविले. नवे नवे शैक्षणिक प्रयोग केले. त्यांनी शालेय विद्यार्थ्यांच्या छोट्या छोट्या नियोजनबद्ध सहली काढल्या. नि.सं.विद्यामंदिर या भगूरसारख्या ग्रामीण भागातील शाळेतील मुलांना दगडाच्या खाणीत प्रत्यक्ष चालणारे काम दाखविले तर कधी 'बर्डस् ॲट द रिव्हरसाईड' सारखी कविता शाळेजवळून वाहणाऱ्या दारणा नदीच्या तीरावर नेऊन शिकविली. नाशिकमध्ये पांडवलेणी, चांभारलेणे येथील सहलीतून इतिहास, पर्यावरण, शिल्पकला यांचा मुलांना परिचय करून दिला. त्यांनाही ग्रामीण भागातील मुलांच्या आकलनक्षमतेचा जिवंत अनुभव मिळाला. त्याचा त्यांना लेखन करताना फार उपयोग झाला.

त्यांचे वडील मोठे ज्योतिर्गणिती होते. भालरावांना बालपणीच त्यांनी आकाशातील ग्रहताऱ्यांशी ओळख करून दिली होती. याच काळात त्यांचे ग्रहांशी, ताऱ्यांशी नाते जुळले होते. नाशिकला आल्यावर त्यांनी पहिली दुर्बीण विकत घेतली. जेव्हा सोन्याचा भाव एकशे दहा रुपये तोळा होता तेव्हा भालेरावांनी पंधराशे रूपये किमतीची दुर्बीण आपल्या आपल्या आवडीपोटी विकत घेतली होती. या दुर्बिणीमुळे त्यांच्या भूगोलाच्या अध्यापनास नवे परिमाण लाभले व त्यांचा खगोलशास्त्राचा अभ्यास गतिमान होत गेला. या आकाश निरीक्षणाचा अनुभव व आनंद त्यांनी शाळांमधील मुलांना दिला. चंद्रसूर्यग्रहणे, चंद्राच्या कला, ग्रह, बुध – शुक्राची अधिक्रमणे, धूमकेतू, उल्कापात, कृत्रिम उपग्रह यांच्या निरीक्षण प्रयोगात मुलांना, त्यांच्या पालकांना, इतर लोकांना ते सहभागी करून घेत. त्यांच्या विचारांना नवी दिशा देण्याचे काम करीत. त्यातूनच धूमकेतूविषयीचे अपसमज दूर करण्यात ते यशस्वी झाले. खगोलशास्त्रीय घटनांच्या माहितीच्या माध्यमातून विज्ञानसाक्षरता निर्माण करण्याचा प्रयत्न आपल्या वृत्तपत्रीय लेखनातून, आकाशवाणीवरील कार्यक्रमातूनही केला. यासाठी 'चंदूची मंगळावर स्वारी' यासारख्या श्रुतिका प्रसारित केल्या.

समाजजागृतीसाठी सोबत दुर्बीण घेऊन ते खेडोपाडी हिंडले. अंधश्रद्धा, लोकभ्रम दूर करण्याचा त्यांनी सातत्याने प्रयत्न केला. त्यांनी त्यासाठी हजारो व्याख्याने दिली, स्लाईड शोज केले. १९६३ मध्ये त्यांचे 'विज्ञानाची किमया' हे पहिले पुस्तक प्रकाशित झाले. त्यांची २००७ पर्यंत 'विज्ञान शतपत्रे', 'वेध आकाशाचा', 'एडिसनची आगळी कहाणी' अशी मराठी व 'इन्ट्रोडक्शन टू कॉमेटस्', 'पायोनियर सायंटिस्टस्' अशी इंग्रजी मिळून एकूण बहात्तर पुस्तके प्रकाशित झाली आहेत. त्यातील काही पुस्तकांना राज्यवाङ्मय पुरस्कार लाभले आहेत. एक शिक्षक, एक खगोलशास्त्रज्ञ इंग्रजी, मराठी, संस्कृत साहित्याचा रसिक वाचक म्हणून झालेला त्यांचा प्रवास त्यांनी 'माझे जीवनगाणे'या आत्मचरित्राच्या रूपाने शब्दांकित केला आहे.

१९७८ मध्ये आदर्श शिक्षक राष्ट्रपती पुरस्कार देऊन भारत सरकारने सुधाकर भालेराव यांच्या या महत्त्वपूर्ण कार्याचा गौरव केला, तर १९९२ मध्ये म्हणजे ते सेवानिवृत्त झाल्यानंतरच्या काळात त्यांना राष्ट्रपती विज्ञान लोकप्रियता पुरस्कार मिळाला. रॉयल ॲस्ट्रॉनॉमिकल सोसायटी, लंडन

भ

या संस्थेने त्यांना सन्माननीय सदस्यत्व दिले. अशा एकूण पंधरा महत्त्वाच्या पुरस्कारांचे ते मानकरी झाले आहेत.

ते सध्या सौरडागांच्या निरीक्षणाचे कार्य पद्धतशीरपणे करीत आहेत. या संदर्भातील 'विल्सन परिणाम' सोडविण्याच्या मार्गावर त्यांची वाटचाल सुरू आहे.

– प्रा. सुहासिनी पटेल

## भानोसे, अंबादास यादव

**अध्यापक**

**११ मार्च १९०२ – २६ मार्च १९८३**



वेदमूर्ती अंबादास यादव भानोसे यांचा जन्म नाशिक येथे भानोसे घराण्यातला वेदाध्ययन व वेदाध्यापनाची मोठी परंपरा लाभलेली आहे. वयाच्या आठव्या वर्षी उपनयन संस्कार झाल्यावर घरी म्हणजे वडिलांकडे–वेदभूषण यादव नारायण भानोसे यांच्याकडे–अंबादासशास्त्रींचे प्राथमिक वेदशिक्षण झाले. त्यानंतर वेदभास्कर नारायण केशव देव गुरुजींकडे त्यांनी शुक्ल यजुर्वेद संहिता, पद यांचे व वेदमूर्ती पुरुषोत्तम दीक्षित शौचे यांच्याकडे शतपथ ब्राह्मण, श्रौत यासारख्या विषयांचे अध्ययन केले.

सन १९४२ मध्ये अंबादास शास्त्रींनी स्वयंस्फूर्तीने स्वत:च्या राहत्या घरीच वेदपाठशाळा सुरू केली. अनेक शिष्यांना वेदांचे मौखिक ज्ञान प्राप्त करून दिले. हे अध्यापन तीस वर्षे सातत्याने चालू राहिले, अनेक शिष्योत्तम तयार होत गेले. १९७२ पासून १९८२ पर्यंत दहा वर्षे अहमदनगर जिल्ह्यातील श्रीगोंदा तालुक्यात पिंपरी कोलंदर येथे निवासी गुरुकुल चालविले. या गुरुकुलातही अनेक वैदिक पंडित त्यांनी घडविले. अंबादासशास्त्रींनी सतत चाळीस वर्षे वेदांच्या अध्यापनाचे कार्य केले. या त्यांच्या कार्याबद्दल अनेक संस्थांनी त्यांचा गौरव केला. नाशिकच्या शिक्षक गौरव समितीच्या वतीने कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांच्या उपस्थितीत महाराष्ट्र राज्याचे त्यावेळचे शिक्षणमंत्री मधुकरराव चौधरी यांच्या हस्ते 'आदर्श शिक्षक पुरस्कार' प्रदान करून त्यांचा सन्मान करण्यात आला. चित्पावन मंगल कार्यालयात गुरुजींचा नागरी सत्कार सोहळा संपन्न झाला.

दिल्ली येथील भारतीय वेदशास्त्रसंमेलनात तत्कालीन पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्या हस्ते भानोसेशास्त्रींच्या कार्याबद्दल त्यांचा सन्मानपत्र देऊन गौरव झाला. आजही वेदाध्ययन व वेदाध्यापन कार्याची भानोसे घराण्यातील परंपरा खंडित झालेली नाही. त्यांचे नातू शांताराम शास्त्री भानोसे हे ही परंपरा पुढे चालवत आहेत.

– प्रा. सुहासिनी पटेल

## भावे, वामन प्रभाकर

**संस्थापक**

**१८५० – २९ मे १८९९**



महाराष्ट्रातील पहिली राष्ट्रीय शिक्षण देणारी शाळा वामनराव भावे यांनी सुरू केली. ही शाळा म्हणजेच गेल्या १५० वर्षापासून कार्यरत असलेली शिक्षण क्षेत्रातील अग्रगण्य 'महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी' होय. भावे कुटुंब मुळचे कोकणातील रत्नागिरीजवळील भावे आढंब या गावचे. आजोबा विनायकराव भावे हे प्रथम पुण्यात आले व बांधकाम कंत्राटदाराचा व्यवसाय सुरू केला. त्यांचे पुत्र प्रभाकर हे सावकारी करून सुस्थितीत होते. वामनराव हे प्रभाकररावांचे द्वितीय सुपुत्र. वामनरावांचा जन्म वामन द्वादशीस इ.स. १८५० मध्ये झाला. त्यांचे शालेय शिक्षण विश्रामबागवाड्यातील सरकारी विद्यालयामध्ये झाले. त्यांचे बंधु व ते मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर डेक्कन महाविद्यालया मध्ये गेले. परंतु शिक्षण अर्धवट सोडून देऊन कुटुंबाचा भार पेलावा लागला. वामनरावांनी बोमन साहेबांच्या ख्रिश्चन मिशनरीच्या इंग्रजी शाळेत शिक्षकाची नोकरी पत्करली. परंतु त्या ठिकाणी काही धार्मिक बाबींवरून बोमनसाहेब व त्यांच्यात मतभेद होऊन त्या

भ

नोकरीस रामराम ठोकला व स्वतंत्र शाळा स्थापन करण्याचे ठरविले.

त्यावेळी आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके, लक्ष्मणराव इंदापूरकर व वामनराव भावे या तिघांनी त्यावेळच्या लहान सहान शाळांची पुनर्रचना करून त्यावेळच्या राजकीय आणि सामाजिक परिस्थितीत आपल्या मुलांना उत्तम शिक्षण देण्यासाठी २४ सप्टेंबर १८७४ रोजी 'पुणे नेटिव्ह इन्स्टिट्यूटची' स्थापना केली. राष्ट्रीय वृत्तीच्या शिक्षणासाठी या तिघांनी मिळून स्थापन केलेली ही पहिली बिनसरकारी संस्था होय.

पुढे 'पुणे नेटिव्ह इन्स्टिट्यूशन' या शाळेला सरकारकडून केवळ शिक्षणविषयक मान्यता मिळाली. पण अनुदानरूपाने होणारी मदत मात्र कित्येक वर्ष शिक्षण खात्याकडून मंजूर होईना. याच काळात वामनरावांनी अत्यंत स्वार्थत्यागाने, चिकाटीने, काटकसरीने व धोरणाने वागून संस्थेचे संरक्षण केले.

सुदैवाने त्यांना संस्था स्थापनेमध्ये साह्य करणारी मंडळी देखील तेवढी सामर्थ्यशाली होती. ही मंडळी अनुदान मिळविण्याच्या प्रयत्नात असतानाच ब्रिटिश हिंदुस्थान सरकारचे दक्षिण विभागाचे सेनापती लॉर्ड मार्क केर साहेबांनी 'पुणे नेटिव्ह इन्स्टिट्यूटला' भेट दिली व ते शाळा पाहून खुश झाले. तेव्हा पासून शिक्षण खात्याकडून सरकारी अनुदान सुरू झाले. शाळेला सरकारी अनुदान सुरू होईपर्यंत कित्येक वर्ष ती केवळ लोकाश्रयावरच चालली होती. हळूहळू शाळा चांगली नावारूपाला आली. शाळेत मुलांची संख्या वाढू लागली. तसेच उत्साही, स्वार्थत्यागी शिक्षक मिळाले. पैकी इंदापूरकरांचे त्यांना जास्त सहकार्य मिळाले. त्यामुळेच संस्थेला स्वतःची जागा विकत घेता आली. तशातच पुण्यात १८९६ मध्ये प्लेगने थैमान घातले. अशा प्रतिकूल परिस्थितीत न डगमगता मोठ्या धैर्याने काम चालूच ठेवले.

वामनराव नेहमी संस्थेला थोर लोकांचा कसा आश्रय मिळविता येईल या योजनेत असत. लॉर्ड मार्क केर यासारख्यांच्या परिचयामुळे त्यांच्याच साह्याने बादशाहचे चुलते ड्युक ऑफ कॅनॉट यांच्या भेटीचा योग आला. तसेच लॉर्ड हॅरिस, लॉर्ड रे, इत्यादी गव्हर्नर मंडळी, राजेमहाराजे तसेच इतर थोर मंडळींनीही संस्थेस भेटी दिल्या आणि संस्थेच्या कामाबद्दल समाधान व्यक्त केले.

संस्थेची पुढे भरभराट झाल्याने संस्थेचे एक महाविद्यालय असावे असे वाटल्याने 'महाराष्ट्र कॉलेज' सुरू केले. परंतु त्यावेळच्या परिस्थितीमुळे शाळा टिकविण्यासाठी महाविद्यालय बंद करावे लागले. आपण सुरू केलेल्या संस्थेची उत्तरोत्तर प्रगती व्हावी म्हणून वामनरावांनी आपली संपूर्ण खाजगी मालमत्ता उदारहस्ताने सार्वजनिक स्वरूपाची केली. संस्थेच्या कामासंबंधी नियम ठरवून घेऊन, नेटिव्ह इन्स्टिट्यूट असोसिएशनच्या ताब्यात दिली. संस्थेच्या कामात वामनरावांनी चांगले यश मिळविले व चांगला नावलौकिक मिळविला. त्यांची लोकप्रियता इतकी होती की, त्यांनी स्थापन केलेल्या पुणे नेटिव्ह इन्स्टिट्यूट या शाळेला लोक 'भावे स्कूल' असे म्हणत आणि आजही म्हणतात. वामनरावांनी सुरू केलेल्या शाळेचा आज 'महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी' नावाने शैक्षणिक वटवृक्ष झाला आहे.

शाळेशिवाय इतर सार्वजनिक कामांची देखील वामनरावांना आवड होती. पुणे शहर महानगरपालिकेचे लोकनियुक्त सभासद म्हणून अनेक वेळा ते निवडून आले होते व शाळासमितीचे अध्यक्ष म्हणूनही त्यांनी काम केले होते.१८९६ मध्ये इंदापूरकरांच्या मृत्यूमुळे वामनरावांचा उजवा हातच नाहीसा झाला असे त्यांना वाटले. नंतर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे व पुण्यात प्लेग असल्यामुळे वामनराव कर्जतला हवा पालटण्यासाठी गेले. तेथे नवज्वराने त्यांचा मृत्यू झाला.

– विवेक कुलकर्णी

## भिडे, गोपाळ हरी

**संस्थापक**

**जन्ममृत्यू दिनांक अनुपलब्ध**

भिडे गर्ल्स एज्युकेशन सोसायटीचे आद्य संस्थापक, स्त्रीस्वातंत्र्य आणि स्त्री शिक्षणाचे ज्वलंत पुरस्कर्ते, कट्टर समाजसुधारक, देशभक्त, गोरक्षण आणि गोसंवर्धन

भ



चळवळीचे सूत्रधार, तत्कालीन अनेक सामाजिक चळवळींचे आधारस्तंभ गोपाळराव हरी भिडे.भिडे कुटुंब हे मूळचे कोकणातील नेरळचे आहे. गोपाळराव भिडे हे बी.ए. एलएल. बी. झाले. त्यानंतर त्यांनी नागपुरात वकिलीचा व्यवसाय सुरू केला आणि अल्पशा कालावधीत ते एक नामांकित वकील म्हणून प्रस्थापित झाले. ते गरीब आणि होतकरू विद्यार्थ्यांना तसेच गरजूंना सर्वतोपरी मदत करीत असत. विद्यार्थ्यांना पुस्तके देणे, त्यांची फी भरणे अशा प्रकारची मदत ते सढळ हाताने करीत असत. याशिवाय विविध प्रकारच्या सामाजिक कार्यात त्यांचा नेहमीच पुढाकार असे.

त्यांची दूरदृष्टी आणि स्त्रीशिक्षणाची तळमळ याचेच प्रतिक म्हणजे नागपूर शहरातील 'भिडे कन्याशाळा' होय. गोपाळराव भिडे आणि मोरेश्वरराव पारधी यांनी १८७६ मध्ये आपल्या वाड्यातच ती सुरू केली. मुलींची वाढती संख्या आणि तत्कालीन देशभक्त मंडळींचा पाठिंबा घेऊन या शाळेला रीतसर अधिकृत स्वरूप देण्याचा निर्णय घेण्यात आला. त्याचेच फळ म्हणजे १८७८ मध्ये झालेली 'भिडे गर्ल्स एज्युकेशन सोसायटीची' स्थापना होय.

तत्कालीन मध्य प्रांत आणि वऱ्हाड प्रांतात स्त्रीशिक्षणाला चालना देणाऱ्या संस्थांचे सक्षम केंद्र निर्माण करणे हेच या संस्थेचे मुख्य उद्दिष्ट होते. सुरुवातीच्या प्राथमिक शाळेचे विकसित रूप म्हणजेच आजचे बालक मंदिर, प्राथमिक विभाग, माध्यमिक विभाग, कनिष्ठ महाविद्यालय, क्रीडा विभाग, अभ्यासपूरक आणि अभ्यासेतर विभाग असणारे आजचे हे विद्यामंदिर होय.

भिडे हे आपल्या अतिशय व्यस्त कार्यातून सवड काढून मुलींना शिकवीत असत. त्या काळात भारतात ब्रिटिश राजवट असल्यामुळे संस्थेला सतत आर्थिक अडचणींचा सामना करावा लागला. परंतु प्रस्तुत संस्थेचे काँग्रेसशी सलोख्याचे संबंध होते म्हणून १९२२ मध्ये नागपूर नगर काँग्रेस कमिटीने या संस्थेला ५०० रुपयांची देणगी दिली. एवढेच नव्हे तर त्यानंतरही काँग्रेस कमिटीने शाळेला बरेचसे फर्निचर दिले. मुलींच्या मनावर राष्ट्रप्रेमाचे संस्कार करण्याचे तसेच मुलींना चांगले शिक्षण देण्याचे कार्य ही संस्था सातत्याने करीत आहे.

सुरुवातीला म्हणजे १८७६ मध्ये त्यांनी आपल्या घरीच शाळेला सुरुवात केली. नंतर बर्डीवरील मुख्य रस्त्यावर संस्थेसाठी पहिली इमारत बांधली. सद्यस्थितीत त्या इमारतीत बाल वर्गापासून प्राथमिक शाळेचे वर्ग भरतात. १९१७ मध्ये ही संस्थेची सरकारी नियमानुसार नोंदणी करण्यात आली. १९७५ मध्ये कनिष्ठ महाविद्यालय सुरू झाले. १९६३ मध्ये 'बाँबे पब्लिक ट्रस्ट' अंतर्गत ही संस्था नोंदणीकृत झाली.

'भिडे कन्याशाळा' हे विदर्भातील सर्वात जुने महिला विद्यालय आहे. मुलींसाठी शिक्षणाची सोय स्वतंत्रपणे उपलब्ध करून देणे, स्त्रियांना व्यक्तिमत्त्व विकासाच्या संधी, व पोषक वातावरण निर्माण करणे, त्यांना कर्तृत्वाची विविध दालने उघडून देणे ही गोपाळरावांची या संस्थेच्या स्थापनेची मुख्य उद्दिष्टे होती.

गोपाळरावांनी 'शीलं परं भूषणम्' हे आपल्या संस्थेचे ब्रीदवाक्य निश्चित केले. त्यांनी चारित्र्य संपादन आणि चारित्र्य संवर्धन यांना प्राधान्य दिले.

त्यांचा पिंड मुख्यतः सामाजिक कार्यकर्त्यांचाच होता. भारतीय जीवनात गोवंशाचे महत्त्व आणि योगदान लक्षात घेऊन त्यांनी गोवंश रक्षणासाठी आणि गोवध बंदीसाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. त्यांनी गोरक्षणाचे कार्य सुरू केले. त्यांनी हाती घेतलेले गोरक्षण कार्य नागपूर शहरातील 'गोरक्षण संस्था' किंवा मुंबई आणि आनंद यासारख्या मोठ्या शहरातील 'गोधनालये' एवढ्यापुरतेच मर्यादित नव्हते. त्यांनी गोहत्याविरोधी जनमत तयार करण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी सभा-संमेलने आयोजित केली. गोमाता आणि गोवंश यांचे आपल्या जीवनात असणारे महत्त्व आणि उपयुक्तता लक्षात घेऊन प्रत्येक भारतीयाच्या मनात त्यांच्याविषयी अत्यंत आदर आणि सन्मानाची भावना असली पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. 'गोहत्या विरोधी

कायदा' संमत झाला पाहिजे. यासाठी त्यांनी आटोकाट प्रयत्न केले. भारतीय उद्योगांचा विकास झाला पाहिजे आणि त्यामुळे भारतीयांच्या जीवनावश्यक गरजा भारतीय उद्योगातूनच तयार होणाऱ्या वस्तुंद्वारे भागविल्या गेल्या पाहिजेत. तसेच त्याद्वारे रोजगारनिर्मिती झाली पाहिजे ही गोपाळरावांची भूमिका होती. आर्थिक क्षेत्रात भारत स्वावलंबी व्हावा यासाठी त्यांनी मोठ्या प्रमाणात स्वदेशीचा पुरस्कार केला.

राष्ट्रीय उद्योगाला प्रोत्साहन देण्यासाठी त्यांनी 'स्वदेशी सूतगिरणी' सुरू केली होती. काळाची पाऊले ओळखून त्यांनी सूतकताईला यंत्राचा आधार दिला. पुढे टाटा उद्योग समूहाने गोपाळरावांचा प्रयत्न उचलून धरला. 'एम्प्रेस मिल क्रमांक – ५ च्या' रुपाने आजही तो उपक्रम विकसित स्वरूपात आपणास पहावयास मिळतो.

त्यांनी स्वतः संपादित केलेल्या या भूप्रदेशात उत्कृष्ट संत्री आणि जातिवंत आंबा यांची पैदास करून ती फल संपत्ती परदेशात पाठवावी आणि नागपुरात ही फळांची आंतरराष्ट्रीय बाजारपेठ व्हावी अशी त्यांची मनापासून इच्छा होती. त्यावेळी नागपूरात विमान वाहतूक नसतानासुद्धा त्यांच्या मनातले हे विचार किती धाडसी होते याची आपणाला कल्पना येते.

ही फळबाग चांगल्या प्रकारे विकसित व्हावी यासाठी पाण्याचा सतत पुरवठा व्हावा यासाठी त्यांनी सध्याच्या बाजीप्रभू नगरात एक तलाव बांधला होता. तो तलाव त्यावेळी 'भिडे तलाव' या नावानेच प्रसिद्ध होता.

त्यांच्या कार्याने नागपूर शहरात आणि विदर्भ विभागात स्त्रीशिक्षणाचे आणि मुलींच्या व्यक्तिमत्त्व विकासाचे एक चिरंतन दालन खुले झाले.

– सु. ना. बोधनकर

## भिडे, विष्णू गणेश

☞ मुख्य नोंद – विज्ञान खंड

## भिसे, शंकर आबाजी

☞ मुख्य नोंद – विज्ञान खंड

## भिसे शंकर रामचंद्र

*आचार्य भिसे*

**शिक्षक**

**१० ऑक्टोबर १८९४ – ४ जुलै १९७१**



रायगड जिल्ह्यातील पनवेल तालुक्यातील साई गावात शंकर रामचंद्र भिसे यांचा जन्म झाला. लहानपणीच पितृवियोग झाल्याने ठाणे येथे तात्यासाहेब खारकर यांच्या घरी राहून वी.जे.विद्यालयामध्ये त्यांना शालेय शिक्षण घ्यावे लागले. रात्रशाळेत नोकरी करून, शिकवण्या करून त्यांनी मुंबईच्या विल्सन महाविद्यालयामधून बी.ए. पदवी मिळविली. त्रिंबक अप्पाजी कुलकर्णी यांनी भिसे यांना त्यांच्या गिरगावातील शाळेत नोकरी देऊ केली. भिसे यांना सार्वजनिक शिक्षण संस्था स्थापण्यात अधिक रस होता. त्यातूनच १९१८ मध्ये गोखले एज्युकेशन सोसायटीचा जन्म झाला. भिसे सोसायटीचे पहिले कार्यवाह झाले.

खेडेगावातील मुलांच्या शिक्षणासाठी गोखले एज्युकेशन सोसायटीचे अध्यक्ष प्रा. टी.ए. कुलकर्णी यांनी बोर्डीचे आत्माराव सावे यांच्या सहकार्याने ११ जानेवारी १९२० रोजी बोर्डीला शाळा सुरू केली. भिसे हे बोर्डीला गेले आणि आत्माराम सावे आणि त्यांनी मिळून चित्रे गुरुजी यांच्या प्रयत्नांनी बोर्डीची शाळा रूप धारण करू लागली. घोलवड गावातील उदार पारशी महिला श्रीमती धनबाईजींनी दोन एकर जमीन व पन्नास हजार रुपये दिले. धनबाईजींच्या मातोश्री यांच्या नावाने सुनाबाई पेस्तनजी हकीमजी विद्यालय या नावाने शाळेची उमारत उभी राहिली. भिसे शाळेचे काम पाहू लागले.

भिसे यांच्यावर महात्मा गांधींची राहणी व विचार यांचा खूप मोठा परिणाम झालेला होता. त्यांनी विद्यार्थ्यांना श्रमप्रतिष्ठेचे महत्त्व पटवून देण्यासाठी शाळेच्या अभ्यासक्रमाला शेती, शिलाई, सूतकताई, सुतारकाम अशा व्यावसायिक शिक्षणाची जोड दिली. त्याचबरोबर

भ

परिसर स्वच्छता, ग्रामसफाई, वृक्षारोपण, काटकसर, सहभोजन अशा विविध उपक्रमांतून मुलांमध्ये राष्ट्रीय एकात्मता विकसित करण्याचे प्रयत्न त्यांनी सातत्याने केले. देशापुढील सामाजिक, आर्थिक, राजकीय, सांस्कृतिक आव्हाने पेलण्यास सक्षम असे भावी नागरिक त्यांनी घडविले.

१९४२ च्या 'चले जाव' चळवळीत त्यांनी उंबरगावला वैयक्तिक सत्याग्रह केला. परिणामी त्यांना तुरुंगवास भोगावा लागला. बोर्डी – घोलवड येथील विद्यार्थी, शिक्षक, ग्रामस्थ यांनी त्यांच्या मार्गाचे अनुकरण केले, तुरुंगवास भोगला. आदिवासींच्या विकासाचे कार्य त्यांनी हाती घेतले. २० मे १९४० रोजी पालघर तालुक्यातील मानीवली गावात त्यांनी आदिवासी परिषद भरविली. ठक्कर बाप्पा, बाळासाहेब खेर परिषदेस आले होते. त्याच वेळी 'आदिवासी सेवा मंडळा'ची स्थापना करण्यात आली.

१९५४ मध्ये भिसे निवृत्त झाले तरी सोसायटीच्या कामात ते लक्ष घालीत. प्रा. टी. ए. कुलकर्णींच्या निधनानंतर ते गोखले एज्युकेशन सोसायटीचे अध्यक्ष झाले.

त्यांच्या पुढाकाराने १९५७ मध्ये आदिवासी सेवा मंडळाच्या वतीने डहाणू तालुक्यात तलवाडा गावी आदिवासी मुलांसाठी महाराष्ट्रातील पहिली आश्रमशाळा सुरू करण्यात आली. सावकारी पाशातून आदिवासींची मुक्तता करण्यासाठी ठाणे जिल्ह्यात 'जंगल कामगार सोसायटीज्' निर्माण करण्यात आल्या.भिसे यांनी आदिवासींवरील अत्याचारांचे वास्तव चित्रण 'जंगलची छाया' या पुस्तकात केले आहे. आदिवासींची दारूसारख्या व्यसनातून सुटका व्हावी यासाठी त्यांनी खूप प्रयत्न केले. १९५९ मध्ये त्यांनी बोर्डी येथे अखिल भारतीय आदिम जाती परिषदेचे आयोजन यशस्वीरीत्या केले. या परिषदेचे उद्घाटन तत्कालीन राष्ट्रपती डॉ. राजेंद्र प्रसाद यांनी केले होते. परिषदेसाठी केंद्रीय मंत्रिमंडळातील अनेक मंत्री उपस्थित होते.

बोर्डीला सुरू केलेले शेती शिक्षणाचे वर्ग पुढे कोसबाडला कृषी शिक्षण संस्था सुरू करून तेथे नेण्यात आले. कोसबाड केंद्रात अनेक उपक्रम सुरू झाले. गोखले एज्युकेशन सोसायटीच्या आश्रमशाळा व माध्यमिक शाळांतून कोसबाड, तलासरी येथे हजारो आदिवासी शिक्षण घेऊ लागले. १९६२ मध्ये बोर्डीच्या शाळेत तांत्रिक विभाग सुरू झाला आणि व्यावसायिक शिक्षणाची सोय झाली. १९६५ मध्ये संस्थेच्या रौप्यमहोत्सवी वर्षात ठाणे जिल्ह्यात तीन ठिकाणी आदिवासी परिषदा त्यांनी भरविल्या. हजारोंच्या संख्येने परिषदांत आदिवासी उपस्थित होते. विनोबा भावे यांच्या भूदान चळवळीतून प्रेरणा घेऊन ठाणे जिल्ह्यात त्यांनी ग्रामदान अभियान सुरू केले होते.

भिसे यांनी अनेक शासकीय समित्यांतून मार्गदर्शन केले. मूलोद्योग पद्धतीचे मूल्यमापन करण्यासाठी नेमलेल्या समितीचे ते अध्यक्ष होते. कोठारी आयोगाच्या मागासवर्गीय अभ्यासगटाचे ते सदस्य होते. त्यांनी ह्या शाळेच्या माध्यमातून शिक्षणाचे अनेक प्रयोग केले, सेवाभावी व आदर्श नागरिक घडविले. बोर्डीच्या शाळेच्या रौप्यमहोत्सवी वर्षात त्यांच्या विद्यार्थ्यांनी एक भव्य सभागृह बांधले व त्यांना गुरुदक्षिणा म्हणून 'गुरुदक्षिणा मंदिर' अर्पण केले.

– वि. ग. जोशी

## भोगीशयना के.

**प्राध्यापक, प्रशासक, कुलगुरू**

**६ मे १९२७ – १४ जुलै २००३**



के. भोगीशयना यांचा जन्म कणकणहळ्ळी या कर्नाटकातील बंगळुरू जिल्ह्यातील कनकपुरा या छोट्याशा खेड्यात झाला. त्यांचे वडील के. राघवाचार व्यवसायाने शिक्षक होते. एस.एस.एल.सी. च्या परीक्षेत म्हैसूर बोर्डाच्या गुणवत्ता यादीत ते १५ व्या क्रमांकाने उत्तीर्ण झाले. इंग्लिश विषयातील पदवी परीक्षेत ते म्हैसूर विद्यापीठात दुसरे आले तर म्हैसूर विद्यापीठातूनच एम.ए.,

भ

इंग्लिशच्या परीक्षेत प्रथम क्रमांक पटकावण्याचा बहुमान त्यांनी मिळविला होता. त्याप्रीत्यर्थ पूर्ण कृष्ण सुवर्णपदकाचे ते मानकरी ठरले होते. बेळगावच्या लिंगराज महाविद्यालयात काही काळ अध्यापनाचे कार्य केल्यानंतर त्यांनी १९५३ मध्ये सोलापुरातील संगमेश्वर महाविद्यालयात इंग्रजी विषयाचे प्राध्यापक म्हणून नोकरी स्वीकारली आणि १९६० मध्ये ते या महाविद्यालयाचे प्राचार्य झाले. १९८३ पर्यंत म्हणजे सलग २३ वर्षे त्यांनी प्राचार्यपदाची धुरा समर्थपणे सांभाळली आणि शिक्षण क्षेत्रात कुशल प्रशासक आणि व्यासंगी प्राध्यापक म्हणून आपला ठसा उमटवला. शिक्षणाबरोबरच शिस्त, चारित्र्य आणि मूल्यांवरची श्रद्धा या गुणांचा विकास विद्यार्थ्यांमध्ये व्हावा यासाठी ते अविरत प्रयत्नशील राहिले.

पुणे विद्यापीठाच्या विद्या परिषदेचे ते सदस्य होते. तसेच पुणे विद्यापीठाच्या इंग्लिश अभ्यास मंडळाचे, क्रीडा मंडळाचे, विद्यार्थी कल्याण मंडळाचेही ते सदस्य होते. शिवाजी विद्यापीठाच्या कला शाखेच्या विद्या परिषदेचेही ते सदस्य होते. रेडक्रॉसच्या व्यवस्थापन मंडळाचे सदस्य, रोटरी क्लबचे प्रांतपाल, फॅमिली प्लॅनिंग असोसिएशनच्या सोलापूर शाखेचे अध्यक्ष, कोल्हापूरच्या सायबर इन्स्टिट्यूटचे अध्यक्ष, सोलापूरातील श्री संगमेश्वर एज्युकेशन सोसायटीचे अध्यक्ष म्हणूनही त्यांनी कार्य पाहिले. अशा विविध सामाजिक आणि शैक्षणिक संस्थांच्या माध्यमातून त्यांनी महत्त्वपूर्ण योगदान दिले. १९७२ मध्ये अलाबमा (युनायटेड स्टेटस् ऑफ अमेरिका) येथे गेलेल्या रोटरीच्या अभ्यासगटाचे नेतृत्त्व त्यांनी केले होते. सोलापूरच्या डॉ. वैशंपायन स्मृती वैद्यकीय महाविद्यालयाच्या चौकशी संबंधात नेमलेल्या कुलगुरू टोपे आयोगाचे ते सदस्य होते. सोलापूरचे वैद्यकीय महाविद्यालय शासनाने चालवावे यासाठी महत्त्वपूर्ण भूमिका बजावली.

शैक्षणिक आणि सामाजिक जाणिवेतून त्यांनी केलेल्या कार्याची नोंद घेत महाराष्ट्र शासनाने त्यांना आदर्श शिक्षक पुरस्काराने सन्मानित केले होते. असोसिएशन ऑफ इंडियन युर्निव्हर्सिटीजच्या स्थायी समितीचे सदस्य म्हणूनही त्यांनी काम केले. २२ सप्टेंबर १९८३ रोजी शिवाजी विद्यापीठाच्या कुलगुरुपदी त्यांची नियुक्ती झाली व १९८३ ते १९८६ या कालावधीत कुलगुरुपदाची जबाबदारी त्यांनी समर्थपणे सांभाळली. नवीन शैक्षणिक आराखडा निर्मितीकरिता महाराष्ट्र शासनाने नेमलेल्या राज्यस्तरीय समितीत त्यांनी आपले मौलिक योगदान दिले. महाराष्ट्र शासनातर्फे मागासवर्गीय भरती संदर्भात नेमलेल्या जिल्हा दक्षता समितीतही त्यांनी कार्य केले. संगमेश्वर महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून तसेच शिवाजी विद्यापीठाचे कुलगुरू म्हणून त्यांनी केलेले कार्य सर्वतोमुखी आहे. प्राचार्य के. भोगीशयना यांच्या अमृतसिद्धीप्रीत्यर्थ त्यांचा अमृतमहोत्सवी सत्कार महाराष्ट्र राज्याचे तत्कालीन मुख्यमंत्री विलासराव देशमुख यांच्या उपस्थितीत सोलापुरात झाला होता.

– प्रा. डॉ. सुहास गोविंद पुजारी

## भोपटकर, भास्कर बळवंत

☞ **मुख्य नोंद–पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड.**

## भोसले, शिवराम खेमराज

**संस्थापक**

**१३ ऑगस्ट १९२७ – १३ जुलै १९९५**



शिवराम खेमराज भोसले दहा वर्षांचे असताना त्यांचे पितृछत्र हरपले. खेळण्याच्या वयात कर्तव्याची कठोर वाटचाल नशिबी आली. आपल्या पित्याचे (हि.हा. रायबहादूर सरखेमसावंत तथा बापूसाहेब भोसले) छत्र अल्पकाळ लाभले तरी त्यांच्याकडून मिळालेला 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।' हा वारसा त्यांनी आयुष्यभर जपला. कोकणचे साटम महाराज यांचा अध्यात्मिक प्रभावही राजेसाहेबांच्यावर बालवयातच झालेला दिसतो. डेहराडूनला 'डून' स्कूलमध्ये दाखल झाल्यावर शिस्त व

अभ्यासवृत्ती अंगी बाणवली.'डून' स्कूलमध्ये हुशार मनमिळाऊ, विद्यार्थी म्हणून ते ओळखले जात. तिथे 'सिनिअर केंब्रिज' ही परीक्षा प्रथम वर्गात उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी पुण्याच्या वाडिया महाविद्यालयात दोन वर्ष शिक्षण घेतले. दरम्यान गांधर्व महाविद्यालयातून 'बी. ए. म्युझिक' ही पदवी त्यांनी प्राप्त केली. संगीत विशारद परीक्षेत त्यांनी सुवर्णपदक मिळविले. पंडित कुमारगंधर्व, वसंतराव आचरेकर, पुरुषोत्तम वालावलकर यांच्याशी त्यांचा स्नेह होता. संगीत सभांना तसेच संगीत परीक्षांचे अभ्यासक्रम आखण्याबाबत त्यांचा विचार घेतला जायचा. एवढा त्यांचा अधिकार होता. संगीताप्रमाणे साहित्यावर त्यांचा अपार जीव होता. मालवणी भाषेचे पहिले कवी वि. कृ.नेरुरकर हे त्यांचे गुरु होते. रणजीत देसाई, मुल्कराज आनंद यांच्याशी गाढ मैत्री, तर पुस्तकांवर शिवरामराजेंचा अपार जीव होता. त्यांचे स्वतःचे असे १५,००० पुस्तकांचे वर्गीकृत, अद्यावत ग्रंथालय आजही हिंडलगा येथे आहे. 'पुस्तकासारखा मित्र नाही' असे ते म्हणायचे म्हणूनच शेवटच्या दीड-दोन वर्षाच्या आजारपणातही त्यांचे वाचन, मनन चालू होते. इंग्रजी भाषेवर उत्तम प्रभुत्व हा त्यांचा गुण, सावंतवाडीचे नाव जागतिक कला व्यवसायात करण्यासाठी आणि राजकारणात दोन्हीकडे उपयोगी ठरला.

मराठा लाइट एन्फन्ट्रीमध्ये १९४४-४६ या काळात शिवराम भोसले हे अधिकारी होते. १९४४ मध्ये बडोदे संस्थान मध्ये सन्मान्य कॅप्टन, १९४७ मध्ये ले. कर्नल ही पदे त्यांना मिळाली. जुलै १९६१ मध्ये भारतीय सेनेचे सन्मान्य ले. कर्नल हे पदही त्यांना बहाल करण्यात आले. लहान वयात राज्यकारभाराची सूत्रे त्यांच्याकडे आली. त्यांच्या मातोश्री श्रीमंत राणी पार्वतीदेवी यांच्या मार्गदर्शनाखाली मे १९४७ मध्ये संपूर्ण शासकीय अधिकारासह त्यांचा राज्याभिषेक झाला; आणि राज्यकारभार सुरू झाला. १५ ऑगस्ट १९४७ नंतर देश स्वतंत्र झाला आणि लोकशाहीचे वारे वाहू लागले. जनमत कौलास राजेसाहेब सामोरे गेले आणि भविष्यातील राजकारण, समाजकारणात त्यांनी स्वतःला झोकून दिले.

पुढे १९७१ मध्ये तत्कालीन पंतप्रधान इंदिरा गांधींनी संस्थानिकांचे तनखे रद्द केले त्याचे स्वागत ज्या काही मोजक्या संस्थानिकांनी केले त्यात शिवराम भोसले हेही होते. १९५७ साली राजांनी राजकारणात प्रवेश केला. १९५७ मध्ये शिवरामराजे खेमसावंत भोसले संयुक्त महाराष्ट्र समितीचे पुरस्कृत उमेदवार म्हणून विधानसभेवर निवडून गेले. १९६१ मध्ये त्यांनी काँग्रेसमध्ये प्रवेश केला. १९६२, १९६७, १९८०, १९८५ मध्ये झालेल्या सार्वत्रिक निवडणुकीत शिवरामराजे विधानसभेवर निवडून गेले.

आमदार म्हणून निवडून गेल्यावर ते कोकणचा विकास विसरले नाहीत. 'स्वविकासाबरोबरच वैचारिक पातळीवरून प्रत्यक्ष कृतीपर्यंत समाजाचा, परिसराचा विकास झाल्याखेरीज खरा विकास होणार नाही, याची ठाम खात्री त्यांना होती. सावंतवाडी परिसरात शिक्षणाचा प्रसार झाल्याशिवाय तेथील लोकांचे दुर्भिक्ष्य संपणार नाही याची त्यांना जाणीव होती. याचसाठी १९६१ मध्ये शिवरामराजेंनी 'दक्षिण रत्नागिरी जिल्हा शिक्षण प्रसारक मंडळाची' स्थापना केली. त्यासाठी स्वतःच्या इमारती, जागा, रोख रक्कम ७५,००० रुपये देऊन आपल्या पित्याच्या स्मरणार्थ पंचम खेमराज महाविद्यालयाची सुरुवात केली. आज विज्ञान, कला, वाणिज्य, शाखांचे पदवी पर्यंतचे शिक्षण देणारे २००० हून अधिक विद्यार्थी संख्या असलेले एक जुने, जाणते महाविद्यालय म्हणून सावंतवाडीत उभे आहे. शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूरशी ते संलग्न आहे.

पंचम खेमराज महाविद्यालयाला ९९ वर्षांच्या कराराने त्यांनी ९ एकर जमीन आणि सत्यविलास पॅलेस दिला. स्वतःची मुलेदेखील त्याच महाविद्यालयात शिकली याचा त्यांना अभिमान होता. गोरगरिबांची, समाजातील सर्व थरातील मुले या महाविद्यालयात ताठ मानेने शिकू लागली.

शिवराम भोसले यांना केवळ शैक्षणिक इमारत उभी करायची नव्हती तर सावंतवाडी परिसरात, दक्षिण कोकणात विज्ञान शिक्षण, पुस्तकी शिक्षणाबरोबरच सांस्कृतिक वारसा टिकविणे, वाढविणे आणि त्याद्वारे

नवशिक्षितांना व्यवसाभिमुख करणे एवढा व्यापक विचार होता.

स्त्री शक्ती ही कोकणच्या आर्थिक विकासासाठी आधारस्तंभ आहे हे ओळखून स्थानिक हस्तोद्योगांना स्थानिक काम मिळाले, तर कोकणचा विकास शक्य आहे हे समजून प्रत्येक घरच उद्योगाचे केंद्र कसे होईल हे पाहण्यास हस्तोद्योगांना इलेक्ट्रॉनिक उद्योगांची जोड दिली. त्यासाठी स्वतःच्या पत्नी श्रीमंत सत्वशीलादेवी भोसले यांच्या सहकार्याने 'सावंतवाडी लॅकर वेअर्स' ची स्थापना केली. सावंतवाडीच्या लाकूडकाम, लाखकाम, बुडकाम, गंजीफा खेळाचे सेट यांच्या निर्मितीसाठी प्रशिक्षणाची सोय केलीच पण त्यांना जागतिक हस्तकला बाजारपेठेत स्थान मिळवून दिले. कोकणात उत्पादित होणारी आंबा, फणस, कोकम, काजू यांच्या पद्धतशीर लागवड, उत्पादन आणि त्याची पूरक उत्पादने यांच्या विक्रीसाठी प्रयत्न केले.

सावंतवाडी संस्थानचे शेवटचे, राज्याभिषेक झालेले राजे, एवढीच शिवराम भोसले यांची ओळख राहू शकली असती, पण आपले पिता बापूसाहेब महाराजांचा शैक्षणिक प्रयोग, प्रगतीचा वारसा त्यांनी पुढे चालविला. अनेक सरकारी पदे भूषवूनही त्यांनी जमिनीशी नाळ कधी तुटू दिली नाही. जीवनाकडे पाहण्याची सकारात्मकदृष्टी आणि सतत कार्यमग्न ही त्यांची वैशिष्ट्ये होती.

अगदी शेवटच्या आजारपणात देखील आपल्या 'सुंदरवाडी' (सावंतवाडी) च्या शैक्षणिक विकासाबद्दल ते प्रयत्नशील असत.

– प्राची परांजपे

भ

## भोसले, शिवाजी अनंत

**प्राध्यापक, वक्ता**

**१५ जुलै १९२७**

महाराष्ट्रातील ख्यातनाम वक्ते, लेखक, तत्त्वचिंतक आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाचे माजी कुलगुरू म्हणून सर्वांना शिवाजी अनंत भोसले ज्ञात आहेत. त्यांचा जन्म कराड जवळच्या कलेढोण या गावी त्यांचे वडील अनंतराव भोसले हे थर्ड इअर ट्रेंड प्राथमिक



शिक्षक होते. आई अनसूयाबाई कमी शिकलेल्या असल्या, तरी तत्त्वनिष्ठ होत्या. शिवाजीरावांनी एक दोन वर्षे कलेढोण येथे शिक्षण घेतल्यानंतर त्यांच्या शालेय शिक्षणाचा पूर्वार्ध विटा या गावी, तर उत्तरार्ध साताऱ्यात झाला. कर्मवीर भाऊराव पाटील यांनी स्थापन केलेल्या शाहू बोर्डिंगमध्ये 'कमवा आणि शिका' योजनेचा लाभ घेत त्यांनी आपले शिक्षण पूर्ण केले. साताऱ्यात शालेय शिक्षण पूर्ण केल्यानंतर पुढे महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते कोल्हापूरला आले. मुलाने इंजिनिअर अथवा डॉक्टर व्हावे अशी वडिलांची इच्छा होती. पण शिवाजीरावांचा ओढा कला शाखेकडे होता. त्यामुळे विज्ञान शाखेला प्रवेश घेतला असला तरी मानसशास्त्र, तर्कशास्त्र शिकविणाऱ्या ना. सी. फडके यांच्या तासाला ते बसू लागले. प्रा. ना. सी. फडके यांच्या सांगण्यावरून ते पुढील शिक्षणासाठी पुण्याला आले अणि त्यांनी पुण्याच्या वाडिया महाविद्यालयात प्रवेश घेतला. वाडियाचे विद्यार्थी असले तरी ते सर परशुरामभाऊ आणि फर्गसन महाविद्यालयात होणाऱ्या तासांना आवर्जून उपस्थित रहात. प्रा. न. ग. दामले, प्रा. प्र. रा. दामले, प्रा. सोनोपंत दांडेकर, श्री. म माटे, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे अशा नामवंत प्राध्यापकांचे मार्गदर्शन त्यांना लाभले. महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक स्मारक मंदिर, पुणे नगर वाचन मंदिर ही वक्तृत्वस्थाने जवळ होती. ना. सी. फडके, श्री. म. माटे, जे. कृष्णमूर्ती, महात्मा गांधी, स्वा. सावरकर या नामवंत व्याख्यात्यांबरोबर वसंत व्याख्यानमालेत होणारी अनेक व्याख्याने ते ऐकत होते. तेव्हापासून शिवाजीरावांच्या भाषेला, बोलण्याला एक लय होती तिला पुढे वक्तृत्वाचे कोंदण प्राप्त झाले.

शिवाजीरावांचे वडीलबंधू बाबासाहेब भोसले बॅरिस्टर होते. त्यांच्यासमवेत वकिली करावी म्हणून त्यांनी पुण्याच्या विधी महाविद्यालयातून कायद्याची पदवी घेतली. अचूक शब्दांची निवड, वेधक भाषा, तर्कशुद्ध मांडणी या गोष्टी

वक्तृत्व साधनेने दिलेल्या होत्याच. पण कामात मन रमत नव्हते. तत्त्वज्ञानाने भारलेल्या शिवाजीरावांना कायदा रूचत नव्हता. वकिलांच्या बैठकीत ते तासन्‌तास तत्त्वज्ञानाची पुस्तके वाचू लागले. अखेरीस त्यांनी एम.ए. (तत्त्वज्ञान) ची परीक्षा दिली. आपण प्राध्यापक व्हावे असे त्यांना वाटू लागले.

१९५७ मध्ये महाराष्ट्रातील पहिले ग्रामीण महाविद्यालय फलटण येथे सुरू झाले. मालोजीराजे निंबाळकर त्याचे संस्थापक होते. कर्मवीर भाऊराव पाटील एम.ए. एलएल.बी. झालेल्या शिवाजीरावांना घेऊन मालोजीराजांकडे गेले आणि म्हणाले, ‘श्रीमंत, माझ्या ज्ञानरूपी वटवृक्षाची एक फांदी मी बरोबर आणली असून ती तुम्हाला देत आहे. तुम्ही ही ठेवून घ्या. या फांदीपासून एक वृक्ष तुमच्याकडेही निर्माण होईल.’ कर्मवीरांचे शब्द खरे ठरले आणि प्राध्यापक म्हणून शिवाजीराव रुजू झाले.

विषयज्ञानाची समृद्धता, सखोलता, वक्तृत्वाची अमोघता, अस्खलितवाणी यामुळे तर्कशास्त्राचा तास सुद्धा अवीट गोडी घेऊन यायचा. वर्गातला तास म्हणजे एक सभाच होती. विद्यार्थी मनोभावे त्या सभेचा आस्वाद घेत होते.

१९६३ मध्ये प्राचार्य ओक निवृत्त झाल्यानंतर प्राचार्यपदाची धुरा भोसले यांच्याकडे आली. एक रुपया शुल्क भरण्याची ऐपत नसणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांना प्रवेश देऊन प्राचार्यांनी त्यांचे वक्तृत्व फुलविले. शिकलेले विद्यार्थी त्यांना समारंभाच्या निमित्ताने व्याख्यानासाठी आमंत्रित करीत होते आणि खेडोपाडी त्यांची व्याख्याने होत होती. दळणवळणाची साधने नव्हती. त्यामुळे एकेका व्याख्यानासाठी मोठ्या दिव्यातून जावे लागत होते. विवेकानंद जन्मशताब्दी, शिवछत्रपती राज्यारोहण सोहळ्याची त्रिशताब्दी, योगी अरविंदांची जन्मशताब्दी अशी निमित्ते त्यांना मिळून गेली. विवेकानंद शिलास्मारक निर्मितीच्या वेळी त्यांच्या व्याख्यानामुळे काही लाख रुपयांचा निधी जमा झाला. हातामध्ये कोणत्याही स्वरूपाचे टिपण आणि टाचण न घेता, एका लयीत जराही न अडखळता बोलणारा एक चिंतनशील वक्ता म्हणून त्यांचा नावलौकिक महाराष्ट्रभर पसरू लागला. कॅलिफोर्नियापर्यंतही त्यांना व्याख्यानासाठी आमंत्रण आले. जसे बोलणे तसेच लिहिणे त्यामुळे त्यांच्या ग्रंथांना विलक्षण लोकप्रियता लाभली. मुक्तिगाथा महामानवाची, दीपस्तंभ, यक्षप्रश्न, देशोदेशीचे दार्शनिक, जागर (खंड १), जागर (खंड २), हितगोष्टी, कथा वक्तृत्वाची असे अनेक ग्रंथ त्यांच्या चिंतनातून साकारले. नामांतराच्या प्रश्नावरून मराठवाडा विद्यापीठ धुमसत होते. अशा अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत त्यांनी मराठवाडा विद्यापीठाचे कुलगुरुपद भूषविले. आपला कार्यकालही पुरा केला. साताराभूषण, फलटणभूषण, विद्याध्यास, रोटरी जीवनगौरव, शिवभूषण असे अनेक पुरस्कार त्यांना लाभले. चतुरंग प्रतिष्ठान, मुंबई यांनी त्यांना मानपत्र प्रदान केले. पुण्यातल्या वसंत व्याख्यानमालेत सलग अठ्ठावीस वर्षे व्याख्याने देऊन प्राचार्यांनी विक्रम प्रस्थापित केला. वक्तृत्त्वाच्या माध्यमातून समाजमनाची मशागत करणारे ‘लोकशिक्षक’ असाच त्यांचा उल्लेख करावा लागेल.

– प्रा. मिलिंद जोशी

* * *

# म

**मंडलिक, विश्वनाथ नारायण**
☞ **मुख्य नोंद – राजकारण खंड**

**महाजन, श्रीकृष्ण गोपाळ**
***मामा महाजन***



गोपाळ आणि आनंदी महाजन हे श्रीकृष्ण उर्फ मामांचे आईवडील! त्यांच्या जन्माच्या दोन महिन्यांपूर्वीच वडिलांचे निधन झाले. ओढग्रस्त परिस्थितीत आईने मुलांचे संगोपन केले. प्राथमिक शालेय शिक्षण कोळथऱ्यात झाले. वडील बंधू मुंबईला पोस्टात नोकरीला होते. गावी सोय नसल्याने मॅट्रिकपर्यंतच्या शिक्षणासाठी मामा मुंबईला आले. दादरच्या छबिलदास विद्यालयामधून १९४२ ला मॅट्रिक झाले. विज्ञान पदवीसाठी रुईया महाविद्यालयात प्रवेश घेतला. रुईयात खेळात, तसेच मल्लखांब प्रशिक्षणात प्राविण्य मिळवले. सायंशाळेत शिक्षकाची अर्धवेळ नोकरी केली. इंटर सायन्सपर्यंतचे शिक्षण पहिल्या क्रमांकाने पूर्ण केले.

त्या वेळच्या भारतीय स्वातंत्र्य आंदोलनापासून महाजन अलिप्त राहाणे अशक्य होते. याचवेळी त्यांचा संपर्क रा. स्व. संघाच्या तत्त्वज्ञानाशी आला. ते पूर्णपणे संघ विचारांशी बांधले गेले. काही सहकाऱ्यांसह घरदार, शिक्षण सोडून मामा संघप्रचारक झाले. महात्मा गांधींची १९४८ मध्ये हत्या झाली. हिंसाचार उसळला.मामांना जिवंत जाळण्याचा प्रयत्न झाला. सुदैवाने मामा बचावले. राष्ट्रीय स्वयंसेवक संघावर सरकारने बंदी घातली. संघविरोधी वातावरणामुळे मामा कोळथऱ्याला परतले. तेथे अटक होऊन ते तुरुंगात गेले. बंदीवासात मामांनी व्यायाम, गीता, दासबोध सारख्या धर्मग्रंथांचा आणि कोळथऱ्याच्या विकासाचा अभ्यास केला. कैदेतून सुटल्यावर गावाच्या विकासाचे ध्येय बाळगूनच मामा गावी परतले. त्यांचा विवाह शांताबाईंशी झाला.

तो काळ १९५० च्या आसपासचा होता. खेड्यात मराठीला प्राधान्य असल्याने कोळथऱ्यात सातवीपर्यंतची मराठी शाळा होती. मुलांनी इंग्रजी आणि संस्कृत शिकावे हे मामांचे ठाम मत होते. इंग्रजी आणि संस्कृत भाषेवर प्रभुत्व असल्याने हे विषय ते उत्तम शिकवित. याचाच परिणाम म्हणून ‘व्हिलेज अपलिफ्ट सोसायटी’ तर्फे इंग्रजी शाळेचे पाचवी ते सातवी चे वर्ग मामांनी सुरू केले. तीनही वर्षाचा अभ्यासक्रम एकाच वर्षात पूर्ण करण्याचा स्वतंत्र वर्गही सुरु झाला.

शाळा गावच्या सर्व घटकांसाठी खुली होती. शाळा चार-पाच वर्ष चालली कारण शासनाने इंग्रजी विषय सातवीनंतरच शिकवावा असा आदेश दिला. शासनाचे नवे धोरण पचवणे मामांच्या प्रकृतीला मानवणार नव्हते. मामा काही काळ शिक्षणक्षेत्रापासून दूर झाले. पण १९५८ च्या सुमारास तिकडेच परतले. आठवीचा इंग्रजी वर्ग सुरू केला. आर्थिक व्यवस्थापनाबरोबरच शाळेचे अध्यक्ष, कार्यवाह, मुख्याध्यापक, शिक्षक, शिपाई या सर्व भूमिका केल्या. त्याकाळच्या ग्रामीण प्रवृत्तीनुसार विद्यार्थी संख्या नगण्य होती. हजेरीपटावर किमान विद्यार्थीसंख्येची शासनाची अट होती. परिसरातल्या गावच्या मुलांसाठी

मामांनी घरातच विद्यार्थी आश्रम सुरू केला. तालुक्यातून तीन मुले शाळेत आणली. प्रतिसाद वाढू लागला. गावात ९ वी ते ११ वी चे वर्गही आले. शाळेची सुंदर वास्तू उभी झाली. दरवर्षी शाळेचा ११ वीचा निकाल ६० ते ७० टक्के लागल्याने पालकांचा विश्वास वाढला. पंचक्रोशीच्या सीमा रुंदावल्या आणि परिसराबाहेरचे विद्यार्थीही शाळेत येऊ लागले.

शासनाने शाळेला अनुदान मंजूर केले. अनुदानाने आर्थिक दृष्ट्या शाळा स्थिरावली. मात्र या अपार कष्टांचा विपरित परिणाम मामांच्या प्रकृतीवर झाला. यामुळे मामांनी १९७४ ला शाळेच्या कामकाजातून बाजूला होण्याचा दृढनिश्चय केला. शाळा आणि आश्रमाची जबाबदारी ग्रामस्थांनी घ्यावी असे जाहीर केले. ग्रामस्थांनी प्रतिसाद दिला नाही म्हणून १९७४ च्या जूनपासून शाळा आणि आश्रम बंद पडले. शाळेवरच्या सर्व कर्जाची जबाबदारी मात्र मामांनी स्वतःवर घेतली.

ग्रामस्थांचा पुढाकार नसल्याने दोन्ही संस्था १९८४ पर्यंत बंदच राहिल्या. त्यामुळे महाजन हेच संस्थेचे मूलभूत आधार होते हे सिद्ध झाले. मामाच्या मनातही शाळा पुन्हा सुरू करण्याचे विचार येत होतेच. शाळेसाठी ५०,००० रुपयांची देणगी घेऊन मामांनी १९८५ ला शाळा पुन्हा सुरू केली. या अनुदानित शाळेची विद्यार्थी संख्या आज ५०० पेक्षा जास्त आहे. विद्यामंदिर आणि विद्यार्थी आश्रम या संस्था आज कोकण, मुंबई, ठाणे आणि कल्याण परिसरात दर्जेदार शिक्षण संस्था म्हणून ओळखल्या जातात.

शिक्षणाशिवाय आयुर्वेदीय औषध निर्मिती, राजकीय आणि सामाजिक क्षेत्रातही मामांचे योगदान होते. संघकार्यकर्ते असल्याने १९७५ च्या आणीबाणीत भूमिगत होऊन मुंबईत आले. प्रथमोपचारी औषधांच्या निर्मितीचा वारसा आईकडून मिळाला होता. अर्थार्जनासाठी कोळथऱ्याहून औषधे आणून मुंबईत विक्री सुरू केली. हळूहळू जम बसला आणि कोळथऱ्यातच आगोम औषधालय प्रा. लि. कारखाना उभा राहिला. आनंदी गोपाळ महाजन नावातल्या आद्याक्षरांनी मामांनी त्याचे नामकरण केले. केशरंजना गुटिका आणि तैलार्क या आगोम उत्पादनांनी जगमान्यता मिळवली. स्वतः बागायती फळशेती करून दापोली परिसरात प्रसारही केला. जगप्रसिद्ध उत्तम दर्जाच्या हापूस आंबा रसावर प्रक्रिया करुन तो हवाबंद कॅन्समधून विकण्याची सुरुवात मामांनी १९५५ मध्ये केली. प्रक्रियायुक्त कृषी उत्पादनासाठी शेतकऱ्यांना प्रशिक्षणासह प्रोत्साहन दिले. आजही आगोम उद्योग आयुर्वेदीय औषधांबरोबर हापूस रसाचे कॅन्स विकत आहे.

मामा संघवादीविचारांचे कट्टर पाईक असल्याने गावात त्यांना अनेक हितशत्रू होते. सामाजिक समतेच्या कार्यात ग्रामस्थांचा विरोध झेलावा लागला. सर्व खटल्यात आपली बाजू मामा स्वतः मांडत. सगळ्या आपत्तीतून ते निर्दोष सुटले.

कोळथऱ्यात कुणावर अन्याय झाला तर ते दूर करीत. हिंदूत्वाचे कट्टर अभिमानी असूनही त्यांनी धार्मिक आधारावर भेदभाव केला नाही आणि गावच्या मुस्लीम बांधवांचे हितच जपले. गावातल्या उर्दू शाळेची पक्की इमारत ही महाजनांच्या प्रयत्नांचे फळ आहे. मात्र मशिदीवरून हिंदूंची सवाद्य मिरवणूक जाण्याच्या हक्कासाठी संघर्ष करून तो कायमचा प्रस्थापित केला. परिणामी आज गावी हिंदू-मुस्लिम ऐक्य सुरक्षित आहे. हिंदू धर्मातल्या जाती-उपजाती भेदांनाही मामांचा विरोध होता. त्यांच्या विद्यार्थी आश्रमात जेवण वाढण्याचे काम रोजच्या ठरवून दिलेल्या पाळ्यांप्रमाणे दलित विद्यार्थीही करत. गावच्या राजकारणातही महाजन सक्रिय होते. त्यांच्या सेवावृत्तीची जाण गावाला असल्याने ते सलग १२ वर्ष, १९५६ ते १९६८, सरपंचपदी निवडून आले.

आयुष्याच्या अखेरीस महाजनांनी शब्दशः वानप्रस्थाश्रम स्वीकारला. गावाजवळच्या वनात पर्णकुटीत स्थलांतर केले. या कुटीला ते मठी असे म्हणत. शिक्षण प्रसारक, दीनांचे कैवारी, सेवाव्रती, कठोर, निर्भय, शिस्तप्रिय, गीतेचे अभ्यासक, देशभक्त, प्रामाणिक राजकारणी, यशस्वी उद्योजक, सूक्ष्म आयर्वेद संशोधक आणि कट्टर संघवादी असे मामांच्या व्यक्तिमत्त्वाचे सारांशाने वर्णन करता येईल.

– सुधाकर कुलकर्णी

म

## महाजनी गणेश सखाराम



## मोलेदिना खान बहादूर, महमद हाशम

**संचालक**

**१९०६ – १९५५**

'मोलेदिना' संस्था म्हटले की खान बहादुर महमद हाशम या बद्दल कुणाचेही दुमत असण्याचे कारण नाही. पुण्यात ज्या काही शैक्षणिक संस्था नामांकित झाल्यात त्यापैकी 'मोलेदिना' ही एक म्हटल्यास वावगे ठरू नये. संस्थेने नुकतीच ७५ वर्षे पूर्ण केली असून उर्दू, इंग्रजी आणि तांत्रिक शिक्षण देण्याचे मोलाचे कार्य स्थापनेपासून केले आहे.

१९ व्या शतकाच्या अखेरीस पुण्यातील एक मान्यवर नागरिक पै. सेठ सुलेमान अब्दुल वहिद यांच्या प्रेरणेने 'मदरशा'च्या रूपातून शैक्षणिक सेवेची सुरुवात झाली. एका लहानशा इमारतीत दोन खोल्यात कुराण आणि अरबी चे धडे विद्यार्थ्यांना दिले जात. पुढे १८९१ मध्ये या मदरशाला उर्दू वर्ग जोडला गेला. पण ही व्यवस्था फारशी यशस्वी झाली नाही. १९२८ पर्यंत ती तशीच कार्यान्वित राहिली. पुढे सरकारी तपासणी अधिकाऱ्यांनी या व्यवस्थेला आक्षेप घेतला व संस्थेच्या व्यवस्थापकांना उर्दू वर्ग बंद करण्याचा सल्ला दिला. परंतु लष्कर विभागातील बहुतांशी रहिवाशांचा हा वर्ग पुढे चालू राहावा असा आग्रह होता. मात्र दुसरीकडे संस्थेचे पदाधिकारी व आप्तेष्टांनी संस्थेची जबाबदारी स्वीकारण्यास असमर्थता दर्शवली आणि त्या क्षणी खान बहादूर महंमद हाशम ही जबाबदारी उचलण्यास मोठ्या धीराने पुढे सरसावले.

म

१९०६ मध्ये जन्मलेल्या या युवा तरुणाकडे शिक्षणाविषयी मोठी आस्था होती. गरीब, गरजू विद्यार्थी शिक्षणापासून कदापिही वंचित राहता कामा नये हा त्यांचा कटाक्ष असे. मोलेदिना साहेबांनी उर्दू वर्गाचे रूपांतर शिक्षण देणाऱ्या शाळेत केले. शिवाय शिक्षण अधिकाऱ्यांची मने जिंकली ती वेगळेच, त्याचेच फळ की काय, १९३२ मध्ये 'मोलेदिना' विद्यालयाची बीजे रोवली गेली. स्वखर्चाने चार खोल्या असलेली इमारत बांधून शाळेचे वर्ग चांगल्या व अधिक योग्य वातावरणात भरवण्याची सोय केली. केवळ पुण्यातीलच नव्हे, तर सिंध आणि पंजाब मधून स्थलांतरित झालेल्या विद्यार्थ्यांची शैक्षणिक गरज भागवण्याचे मोठे कार्य खान बहादूर व त्यांच्या संस्थेने केले. खान साहेबांची शिक्षण संस्था हळूहळू विस्तारत होती. खडकीचे पहिले मुस्लीम उपाध्यक्ष होण्याचा मान त्यांना मिळाला. तसेच पूना सब अर्बन म्युनिसिपाल्टीचे नगरसेवक, पूना मुस्लीम स्टुडण्टस् युनियनचे अध्यक्ष, पूना डिस्ट्रीक्ट मुस्लिम एज्युकेशन कॉन्फरन्सचे संघटक व मानद सचिव म्हणूनही त्यांनी काम पाहिले. तसेच ससून संस्था मंडळाचे ते काही काळ सदस्य होते.

संस्थेच्या 'नावारूपासाठी' त्यांचे योगदान लाखमोलाचे आहे. म्हणूनच संस्थेच्या रौप्य महोत्सवाच्या कार्यक्रमात भारताचे पंतप्रधान जवाहरलाल नेहरू तर तांत्रिक शाळा उद्घाटनांच्या कार्यक्रमाच्या (१४ ऑक्टोबर १९६८) यशवंतराव चव्हाण उपस्थित राहिले ते केवळ मोलेदिना खान बहादूर महंमद यांच्या शैक्षणिक कार्याला 'सलाम द्यावा' म्हणूनच.

– अस्लम जमादार

## मुंजे, बाळकृष्ण शिवराम



## मुन्शी, कन्हैय्यालाल माणेकलाल

**☞ मुख्य नोंद–पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड.**

## मुणगेकर, भालचंद्र लक्ष्मण



## मोडक, आत्माराम वासुदेव

**प्रसारक, शिक्षक**

**१८९४ – २० फेब्रुवारी १९८०**

आत्माराम वासुदेव मोडक यांचा जन्म धार संस्थानात ठिकरी या गावी झाला. वडिलांचे नाव वासुदेव वामन मोडक



व आईचे नाव सत्यभामा होते. आत्माराम व त्यांचे दोन बंधू असे तिघे आजन्म ब्रह्मचारी राहिले. ठिकरी व धरमपुरी या दोन गावात बालपण व्यतीत केलेल्या मोडक यांचे मराठी शिक्षण घरीच झाले; कारण त्या भागात मराठी शाळा नव्हती. वयाच्या तेराव्या वर्षांपर्यंत त्यांना शालेय शिक्षण नव्हते. इंदूर येथील २ क्रमांकाच्या शाळेत ते दाखल झाले व ४ थी नंतर इंदूर सिटी विद्यालयामध्ये त्यांचे शिक्षण झाले. गणित विषय इतका चांगला होता की गुरुजी आत्मारामालाच गणित शिकवायला सांगत. या वयात त्यांनी खूप वाचनही केले. २२ व्या वर्षी ते मॅट्रिक झाले व महाविद्यालयात नाव नोंदवले, परंतु ते नाममात्र. चार वर्षांचा अभ्यासक्रम वाचून काढला. वकिलीचा अभ्यास व नोकरी करताना १९२१ पासून त्यांनी उघडपणे राजकारणात भाग घेतला. लोकमान्य टिळक व नंतर म. गांधी हे त्यांचे आदर्श होते. सत्याग्रहात भाग घेतल्याने मोडक तुरुंगात गेले. तेथे कैद्यांना लिहायला, वाचायला शिकविले व पाट्या, पेन्सिली, पुस्तके मागविली. ग्रंथालय स्थापन केले. मुळशी सत्याग्रह चालू असताना मोडक पुणे कचेरीत सचिव होते. खानदेशचा दौरा करताना त्यांनी वंजारी समाजात काम केले. गुरांच्या गोठ्यात राहून ते गुराख्यांना शिकवीत. प्रौढसुद्धा शिकायला येत. ग्रामोन्नतीविषयी ते ग्रामस्थांचे प्रबोधन करीत.१९१७ मध्ये इंदूर येथे झालेल्या अ. भा. हिंदी साहित्य संमेलनात त्यांनी स्वयंसेवक म्हणून काम केले होते. १९३२ – ३५ मध्ये त्यांनी पुण्यात हिंदी शिक्षणाचे वर्ग मोफत चालवून मुलांना अ. भा. हिंदी प्रचार सभेच्या परीक्षांना बसविले.

मोडक बेळगाव जिल्ह्यात मराठी भागात प्रचारक म्हणून गेले. १९३५ पासून रत्नागिरी जिल्ह्यात, आप्पासाहेब पटवर्धनांच्या सूचनेवरून त्यांनी हिंदी प्रचार आरंभ केला. हिंदी प्रचार हे देशकार्य मानून ते पूर्णपणे मोफत शिकवीत. सकाळी ७ ते ९ पर्यंत वर्गात उपस्थित राहणारे बहुसंख्य शाळकरी व नोकरी करणारे असत. रात्रीचा वर्ग ११ वाजता संपत असे. त्यांनी मालवण, चिपळूण, वेंगुर्ले आणि सावंतवाडी येथेही हिंदी केंद्रे स्थापन केली. १९३७ च्या सार्वत्रिक निवडणुकीच्या कामासाठी त्यांनी चिपळूण, खेड, दापोली, गुहागर, मंडणगड या तालुक्यात कार्य केले. मुक्काम रत्नागिरी येथे असे. सेवादल संघटना, रत्नागिरी जिल्हा युवक परिषदेच्या कामात आप्पासाहेब पटवर्धनांना साहाय्य केले. त्यांनी रत्नागिरी जिल्हा काँग्रेस समितीचे चिटणीस पदही भूषविले. साने गुरुजी सत्कार निधी समितीचे अध्यक्ष असताना त्यांनी १० हजार रुपयांचा निधी जमविला. डाकवे दंपती, सामंत गुरुजी वगैरे अनेक माणसे व कार्यकर्ते त्यांनी जोडले.

मोडक यांचे शिक्षणाच्या क्षेत्रात रत्नागिरीचे ‘सर्वोदय छात्रालय’ हे अत्यंत प्रशंसनीय कार्य. बाळासाहेब खेरांनी छात्रालयाच्या निवासाची सोय स्वत:च्या तेथील जागेत विनामूल्य केली. आर्थिक भार खेर व आप्पासाहेबांनी मिळून सांभाळला. हे छात्रालय सर्व जातीजमाती व सर्व धर्मियांसाठी होते. मोडक गुरुजींनी १ एप्रिल १९४९ पासून या सर्वोदय छात्रालयाचा शुभारंभ केला. मुलांच्या बुद्धीचा, कर्तृत्वाचा विकास व्हावा, एकजिनसी समाज निर्माण व्हावा ही त्यांची दृष्टी होती. छात्रालयात पहाटे पासून रात्री १० वाजेपर्यंत आखीव व भरीव कार्यक्रम असे. विद्यार्थ्यांना सकस आहार दिला जाई. सारवणे, पाणी भरणे, स्वयंपाक, बाजारहाट वगैरे कामे आळीपाळीने करविली जात. गुरुजी सर्व वेळ मुलांच्यातच असत. १९५५ मध्ये छात्रालय आप्पासाहेब पटवर्धन यांच्या हवाली करून गुरुजी श्रमदान उपक्रमाकडे वळले. या उपक्रमात मूर – तळवडे रस्ता (१९५१) व वेंगुर्ले तालुक्यात कुडाळ – परुळ रस्त्याला जोडून साडेचार मैल लांबीचा रस्ता सेवापथकाच्या मदतीने करून त्यांनी स्वावलंबन व स्वयंस्फूर्तीने कामे करण्याचा आदर्श उभा केला. त्यांनी प्रत्येक तालुक्यात एक आठवड्याची शेतकरी शिबिरे आयोजित केली. मोडक गुरुजींनी आपल्या कार्याच्या जोरावर व उत्तम चारित्र्याच्या बळावर निवडणुकीस उभे राहून ती जिंकली व आमदार म्हणून लोक प्रतिनिधित्व केले. रत्नागिरी जिल्हा हेच मुख्य

कार्यक्षेत्र निवडून विधायक कार्य करणारे शांत, निष्ठावान आणि कळकळीचे कार्यकर्ते मोडक गुरुजी प्रसिद्धीपराङ्‌मुख होते. कार्याची तळमळ बाळगणारे, महाराष्ट्र व मराठी भाषेवर नितांत प्रेम करणारे मोडक गुरुजी सेनापती बापटांचे अनुयायी असले तरी पु. ल. देशपांडे यांच्या म्हणण्याप्रमाणे 'कणखर पोलादी पुरुष' होते.

– वि. ग. जोशी

## मोडक, ताराबाई

**बालशिक्षणतज्ज्ञ**

**१९ एप्रिल १८९२ – ३१ ऑगस्ट १९७३**



सदाशिवराव व उमा केळकर ताराबाईंचे मातापिता. ताराबाईंचे बालपण व प्राथमिक शिक्षण इंदूर कॅम्पमधील मिशन शाळेत हिंदी माध्यमातून झाले. पुढचे शिक्षण हुजुरपागेच्या कन्याशाळेत झाले. ताराबाई १९०९ मध्ये मॅट्रिक झाल्या. त्याच वर्षी त्यांच्या वडिलांचे निधन झाले. १९१४ मध्ये त्या मुंबई विद्यापीठाच्या बी. ए. झाल्या आणि १९१५ मध्ये त्यांचा विवाह के. व्ही. मोडक यांच्याशी झाला.

१९२१ मध्ये ताराबाई राजकोट येथील बार्टन फीमेल ट्रेनिंग महाविद्यालया प्राचार्या झाल्या. या पदावर नियुक्त झालेल्या त्या पहिल्याच भारतीय महिला होत. १९२३ ते १९३२ या काळात त्यांची कार्यभूमी दक्षिणामूर्ती ही होती. पुढची दोन वर्षे त्या वासदा येथे शिक्षिकेची नोकरी करीत होत्या. नंतरची १३ वर्षे त्यांनी दादर, मुंबई येथे शिशुविहार मधून बालशिक्षण प्रसाराचे कार्य केले. ग्रामीण बालशिक्षणाचे कार्य त्यांनी १९४५ ते ५७ या काळात बोर्डी येथे केले. याच अवधीत १९५२ मध्ये त्यांची कन्या प्रभा हिचा व पुढच्याच वर्षी पती के. व्ही. मोडक यांचा मृत्यू झाला. १९४६ ते ५१ मध्ये त्या महाराष्ट्र विधानसभा सदस्या होत्या. यानंतर म्हणजे १९५५ ते १९७३ पर्यंत त्या कोसबाडशी एकरूप होऊन राहिल्या आणि ''माणसाचं माणूसपण कठीण आणि अशक्यप्राय दिसणारी कामे करण्यातच आहे'' याचा प्रत्यय ताराबाईंनी कोसबाडच्या टेकडीवर फुला-मुलांचा बगीचा फुलवून, विकासवाडीचे आनंदवन निर्माण करून दिला. बोर्डीचे ग्रामीण बाल शिक्षा केंद्र कोसबाडला १९५७ मध्ये स्थानांतरित झाले. विकासवाडी योजना ताराबाईंनी एप्रिल १९५५ मध्ये भारत सरकारच्या शिक्षण खात्याकडे सादर केली होती व दीड वर्षाने ती मंजूर झाली. १० फेब्रुवारी १९५८ ला इंदिरा गांधींच्या हस्ते विकासवाडी योजनेचे औपचारिक उद्‌घाटन झाले.

ताराबाईंना अनुताई वाघ व सरलाताई देवधर यांनी साथ दिली. ताराबाई त्यांना क्रमश: आपला मुलगा व मुलगीच मानत. ठाणे जिल्ह्यात ३ ते ३.१ लाख वारली जमातीचे लोक होते. वारली मुलांची गैरहजेरीची, अनियमितपणाची कारणे शोधून त्यांच्या शिक्षणाच्या मार्गातला अडथळा दूर करून, परकेपणाची भिंत फोडण्याचे काम ताराबाई व त्यांच्या सहाय्यकांनी अविरतपणे केले. आदिवासींना शाळेबद्दल जो दुरावा वाटतो तो नाहीसा करण्यासाठी पाड्या-पाड्यात ओळखी केल्या, आठवड्यातून एकाएका घरी बैठक घेतली, शिक्षिका झोपड्यात जाऊन गप्पा मारू लागल्या, अंगणवाड्या चालवू लागल्या. वारल्यांच्या मुलांना श्रमाचा कंटाळा नाही, हे ताराबाईंनी ओळखले. ताराबाईंची कुरणशाळा गुरे चारणाऱ्या मुलांच्या मागोमाग जाई. श्रम व उद्योगात वारली वरचढ असत म्हणून झाडावर चढणे यासारख्या स्पर्धा घेऊन, रोजच्या भटक्या जीवनाशी सुसंगत असे सहली, प्रवासाचे उपक्रम त्यांनी आखले. माध्यम, अभ्यासक्रम, शिकविण्याची पद्धत, जागा, गती या सर्वांतच ताराबाईंनी आमूलाग्र बदल केला. १९६४ मध्ये 'बालग्राम सेविका विद्यालय' सुरू केले. मुलांना शाळेच्या कार्यक्रमाचे आकर्षण वाटेल आणि त्यांच्या जिज्ञासू वृत्तीला चेतना मिळेल असा अभ्यासक्रम सुरू केला. दारिद्र्य, अंधश्रद्धा, अस्वच्छता, अज्ञान व

म

दारुचे व्यसन यातून व अवहेलनेतून या समाजाला बाहेर काढण्यासाठी त्यांच्याशी समरस झालेल्या ताराबाईंनी आपल्या सहकाऱ्यांच्या सहाय्याने अनेक उपक्रम हाती घेतले, प्रयोग केले.''त्यांना खाता येईल अशा वस्तूंची निर्मिती त्यांना शिकवणं हे सर्वप्रथम काम. गणित, सफाई, मूलोद्योग सुद्धा नंतर !'' अशा निश्चयाने सर्व केले.

तेथील मुलांचे नैसर्गिक गुण लोप पावणार नाहीत याची काळजी विकासवाडी घेई. विकासवाडीने मुलांच्या बुद्धीबरोबर पोटाला खाद्य पुरवायचे प्रयत्न केले. डॉक्टरांकडून सर्व मुलांची शारीरिक तपासणी करून घेतली, त्यांना स्वच्छतेच्या सवयी लावल्या. कोसबाडची माती कोसबाडच्या मुलांची प्रतिभा फुलवू लागली. शेतकरी मूलोद्योग सुरू केला, मुलांचे व मुलींचे वसतिगृह काढले, उद्योगालय चालू केले. कार्यानुभव योजना लागू केली. शिक्षण हे जीवनशिक्षण व्हावे म्हणून व्यवसाय शिक्षण समाविष्ट केले. १९७३ मध्ये विकास मुद्रणालयाची स्थापना केली. ५० पेक्षा अधिक वर्षे ताराबाईंनी बालशिक्षणाचा प्रयोग केला.

सकस आहार योजना, पूरक अन्न योजना, कुरणशाळा, रात्रशाळा, शबरी उद्योगालय (१९७७), प्रौढ शिक्षण वर्ग असे विविध उपक्रम त्यांनी बालवाडी व पाळणाघराबरोबर राबविले. पालक शिक्षणाचा समावेश हा त्यांच्या कार्याचा विशेष मानता येईल. त्यांचे सारे प्रकल्प रिकाम्या तिजोरीच्या आधाराने सोडले जात. त्या म्हणत – ''होईल, सारे होईल, मला वाट पाहायची सवय आहे.'' स्वतःच्या खासगी खर्चासाठी त्यांनी कधी दुसऱ्याचा पैसा घेतला नाही. राष्ट्रीय उत्सव, प्रशिक्षण वर्ग, शिक्षक मेळावे, आदिवासी भगिनींचे मेळावे, रंजन कार्यक्रम, बालशिक्षण विषयक प्रदर्शने इत्यादी कार्यक्रम कोसबाड टेकडीवर वर्षभर चालू असत. ओसाड टेकडी खऱ्या अर्थाने शैक्षणिक पंढरपूर बनवण्याचे श्रेय ताराबाई व त्यांच्यासोबत चिकाटीने परिश्रम करणाऱ्या सहकाऱ्यांना आहे. 'प्रार्थना समाजी' असल्यामुळे ताराबाई कर्मकांडाच्या, देवपूजेच्या विरुद्ध होत्या. तरी त्या समतोल वृत्तीच्या, अत्यंत सहृदय होत्या. त्यांना कामाचा चतुरस्र उरक होता. 'शिक्षणपत्रिका' हे नियतकालिक मराठी, गुजराती व हिंदी या तीन भाषांतून त्यांनी चालविले व चौदा वर्षे त्या माध्यमातून केवळ तात्त्विक विवेचनापेक्षा प्रत्यक्ष कृती, अनुभवचित्रण, चर्चा, उदाहरणे अशा गोष्टींवर त्यांनी भर दिला. अनेक दुखण्यांशी झुंज देणाऱ्या शिक्षणतज्ज्ञ ताराबाईंचा ८१ वा वाढदिवस १९ एप्रिल १९७३ रोजी साजरा झाला. अखेर कर्करोगाने त्यांची इहलोक यात्रा संपविली.

ताराबाईंच्या या बालशिक्षण यज्ञात त्यांचे प्रेरणास्थान व सुरुवातीचे मार्गदर्शक म्हणून गिरिजाशंकर भगवानजी ऊर्फ गिजुभाई बधेका यांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. तसेच आपल्या देहाला अनुताईंनी अग्नी द्यावा अशी इच्छा करणाऱ्या ताराबाईंच्या जीवनकार्याची सांगता अनुताईंच्या उल्लेखावाचून पूर्ण होणार नाही.

ताराबाईंच्या बहुमोल शिक्षण कार्याबद्दल भारत सरकारने १९६२ मध्ये त्यांना 'पद्मभूषण' पुरस्कार व सुवर्णपदक जाहीर केले, परंतु 'स्वतःचा मानसन्मान करून घ्यायला एवढा वेळ व पैसा खर्च करणं' ताराबाईंना परवडणारे नव्हते. म्हणून त्यांचे मानचिन्ह व सनद टपालाने त्यांच्याकडे पाठवले गेले. बालवाडी व प्राथमिक शाळेत ९५ टक्के तर पाळणाघरात १०० टक्के आदिवासी मुले आहेत. काका कालेलकर म्हणतात, ''मी जर हिंदुस्थानच्या शिक्षण कार्याचा इतिहास लिहावयास बसलो तर 'एका नव्या युगाचा आरंभ' म्हणून ताराबाईंच्या कुरणशाळेला एक स्वतंत्र अध्याय देईन.....माँटेसरी व गिजुभाई यांना मागे टाकून ताराबाई कितीतरी पुढे गेल्या आहेत.''

आमचे घर, बालकांचा हट्ट, स्वयंविकास व शिस्त, बिचारी बालके, कुरणशाळा ही पुस्तके ताराबाईंनी पालकांसाठी लिहिली.

नदीची गोष्ट, गंपू आणि लाकूड दंड्या, परोपकारी राजा विक्रम, आजीबाईंच्या गोष्टी भाग १ व २, कावळ्याला लागली तहान, बिरबल बादशहाच्या गोष्टी ही पुस्तके त्यांनी लहान मुलांसाठी लिहिली.

ताराबेनना पाठो, आपणुं घर, बाळकोनुं हठ, स्वयंविकास अने शिस्त, घरमां मॉण्टेसोरी, गंगेशना पोपट. ही त्यांची गुजराती पुस्तके प्रसिध्द आहेत.

बालवाडी इन रूरल एरिया, मिडोव स्कूल हे इंग्रजी पुस्तक त्यांनी लिहिले.

त्यांनी अनुताई वाघ यांच्या सोबत – विकासाच्या मार्गावर (मराठी), विकास के मार्ग पर (हिंदी) ही पुस्तकेही लिहिली आहेत.

– वि. ग. जोशी

## मोडक, वेणूताई विनायक

**संस्थापक**

**१६ नोव्हेंबर १८९५ – २४ फेब्रुवारी १९६८**

सातारा हे वेणूताई विनायक मोडक यांचे जन्मगाव. वेणूताईंचे शालेय शिक्षण पुण्याच्या हुजूरपागेत झाले. विद्यार्थी दशेतच त्यांनी कविता रचण्यास सुरुवात केली होती. पुण्यातील रविकिरण मंडळाच्या त्या सदस्या होत्या. विद्यार्थीदशेतच त्यांचा 'कलिका' हा कविता संग्रह प्रकाशित झालेला होता. १९१६ मध्ये पुण्याच्याच फर्गसन महाविद्यालयामधून इंग्रजी विषय घेऊन त्यांनी एम. ए. पदवी मिळविली. ही पदवी प्राप्त करणाऱ्या महाराष्ट्रातील ख्रिश्चन समाजातील त्या पहिल्या महिला.

याच काळात त्यांनी एस. टी. सी. म्हणजे आजची बी. एड. (बॅचरल ऑफ एज्युकेशन) पदवी मिळविली. त्यानंतर पुणे व मुंबई येथे काही वर्षे त्यांनी अध्यापनाचे काम केले. शैक्षणिक क्षेत्रात मोठे कार्य करण्याच्या हेतूने १९२० मध्ये त्यांनी अहमदनगर येथे गव्हर्नमेंट गर्ल्स स्कूलची स्थापना केली. शाळेच्या मुख्याध्यापिका म्हणून निष्ठेने केलेल्या कामामुळे ही शाळा 'वेणूताई मोडकांची शाळा' म्हणून अहमदनगर जिल्ह्यात ओळखली जाऊ लागली. घरी जाऊन पालकांचे प्रबोधन करून वेणूताईंनी शाळेसाठी मुली जमविल्या. इंग्रजी, मराठी, संस्कृत भाषेवर त्यांचे प्रभुत्व होते. विद्यालयात वेणूताईंनी 'गर्ल गाईड पथक' सुरू केले. अहमदनगर जिल्हा गाइड आयुक्त म्हणून त्या दीर्घ काळ कार्यरत होत्या. ह्या त्यांच्या सेवेची दखल घेऊन भारत स्काऊट गाइड संस्थेने विशिष्ट सेवा पदक प्रदान करून त्यांचा गौरव केला. शासनाने विविध सेवाभावी सामाजिक व शैक्षणिक समित्यांवर वेणूताईंची नियुक्ती केली.

म

शासनाच्या वतीने 'लोकशाळा' ही संस्था स्थापण्यात वेणूताईंचा पुढाकार होता. विद्यार्थिनी आदर्श गृहिणी व्हाव्यात यासाठी त्यांनी उपक्रम राबविले. गुणवत्ता वाढविणाऱ्या शैक्षणिक परीक्षांना बसण्यासाठी त्यांना प्रोत्साहन दिले. 'आरोग्यसेविका' (नर्सिंग) व बालवाडी प्रशिक्षण वर्ग सुरू करून मुलींना स्वत:च्या पायावर उभे राहण्यास समर्थ बनविले. विद्यालयात प्रौढ साक्षरता वर्ग सुरू केले.

१९३५ मध्ये वेणूताईंच्या पुढाकाराने अहमदनगर महिला मंडळ स्थापन झाले. या मंडळाच्या अध्यक्षा म्हणून त्यांनी १९६८ पर्यंत मोठे कार्य केले. या मंडळामार्फत बालवाडी सुरू झाली, मराठी शाळा निघाली. 'दीपिका' हस्तलिखित काढण्यास सुरुवात झाली. विनामूल्य शिक्षणवर्ग, शिवणवर्ग चालवले जातात. हे महिला मंडळ अखिल भारतीय महिला परिषदेची शाखा म्हणून कार्य करीत होते.

१९५२ सालच्या दुष्काळात अन्नछत्र चालविण्यात वेणूताईंचा मोठा सहभाग होता. त्यातून महिलांना उद्योगही मिळाला. गुरांसाठी छावण्या उभारण्यासाठी वेणूताईंनी फंड उभा करण्यासाठी अथक प्रयत्न केले. अहमदनगर जिल्हा लोकल बोर्डाच्या सदस्य म्हणूनही त्यांनी उल्लेखनीय कार्य केले.

'लाखोंनी फंड' जमवून आफ्रिकेतील मिशनऱ्यांना सामाजिक कार्यासाठी त्यांनी मदत केली. विविध नियतकालिकांमधून त्या सामाजिक, शैक्षणिक, धार्मिक विषयांवर लेखन करीत. त्यातूनही त्यांनी समाजप्रबोधन साधले,स्त्रियांच्या व बालकांच्या प्रश्नांना वाचा फोडली. 'साधू सुंदरसिंगा'च्या बोधकथा भाग १ व २ हे त्यांचे कथासंग्रह गाजले.

– ह. शं. भदे

## मोरे, दिनकर रघुनाथ
*दिनाभाई मोरे*



दिनकर रघुनाथ मोरे यांचे मूळ गाव रोहा तालुक्यातील सोनगाव. त्यांनी ५ वर्षे प्राथमिक शिक्षक म्हणून नोकरी केली पण आपण आपली शैक्षणिक गुणवत्ता वाढवली पाहिजे, असा विचार करून नोकरीचा राजीनामा दिला. मुंबई येथे शिक्षण पूर्ण करून सानेगावच्या परिसराचा विकास घडवून आणण्याचे उद्दिष्ट समोर ठेवून परत शैक्षणिक व सामाजिक कार्यात स्वतःला झोकून देऊन कार्यास प्रारंभ. काही काळ जिल्हा सर्वोदय मंडळाचे अध्यक्ष म्हणून काम केले. या कालावधीत 'ग्रामीण भागाच्या विकासासाठी शिक्षण आवश्यक आहे' याची जाणीव झाल्यानंतर ठिकठिकाणी ऐच्छिक शाळा सुरू करून खेड्यापाड्यातून शिक्षणाचा प्रसार करण्याचे व्रत अंगिकारले. तसेच सर्वोदय योजनेअंतर्गत आरोग्य, शेतीसुधार, जपानी पद्धतीच्या भातशेतीसाठी प्रशिक्षण या योजनांची कार्यवाही करण्याचा प्रयत्न दिनाभाईंनी केला.

१९५४ ते १९६३ या कालावधीत ते सानेगावचे सरपंच होते. रोहा पंचायत समितीचे सदस्य म्हणूनही त्यांनी काही काळ कार्य केले आहे. प्राथमिक शिक्षणानंतर विद्यार्थ्यांना माध्यमिक शिक्षण प्राप्त झाले पाहिजे यासाठी दिनाभाई सातत्याने प्रयत्नशील होते. ही कल्पना प्रत्यक्षात यावी यासाठी त्यांनी आपल्या गावी १९६९ मध्ये 'विद्याविकास मंडळ सानेगाव' या शिक्षण संस्थेची स्थापना केली. या संस्थेमार्फत १९७० मध्ये 'साने गुरुजी विद्या निकेतन' ही माध्यमिक शाळा सुरू केली. या शाळेच्या इमारतीसाठी कुंडलिका नदीच्या काठी एक हेक्टर जमीन शासनाकडून मिळवली. तेथे १४ खोल्यांची इमारत बांधली व शाळेस आवश्यक त्या सुविधा प्राप्त करून दिल्या. आज रोजी शाळेत ५ वी ते १० वी चे ११ वर्ग आहेत. विद्यार्थी संख्या ५०० आहे.

सानेगाव येथील शाळा सुव्यवस्थितपणे मार्गक्रमण करू लागल्यानंतर दिनाभाईंनी १९८० मध्ये सुडकोली (ता. अलिबाग) येथे सर्वोदय विद्यालय या नावाने दुसरे विद्यालय सुरू केले. १९८२ मध्ये मुरूड तालुक्यात चोरले या गावी त्यांनी 'महात्मा गांधी विद्यामंदिरा'ची स्थापना केली.

११ जून २००० रोजी साने गुरुजी स्मृती दिनानिमित्त आरे व तिसे ता. रोहा या दोन गावी माध्यमिक शाळा सुरू केल्या. या सर्व शाळा अनुदानित असून त्यांच्या इमारती बांधून पूर्ण झाल्या आहेत. आदिवासी विद्यार्थ्यांना शिक्षण प्राप्त व्हावे यासाठी शासकीय योजनेतून १ ली ते १० वी पर्यंत शिक्षण देणारी आश्रम शाळा सानेगाव येथे स्थापन व्हावी यासाठी त्यांनी प्रयत्न केले आहेत. या शाळेत बालवाडी ते १० वी पर्यंत आदिवासी विद्यार्थी शिक्षण घेत आहेत.

शाळांच्या इमारती पूर्ण व्हाव्यात व विद्यार्थ्यांना विविध सुविधा प्राप्त व्हाव्यात यासाठी दिनाभाईंनी आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीने देणग्या जमवून व वेळप्रसंगी कर्ज काढून त्या उपलब्ध करून दिल्या आहेत.

सानेगाव परिसर व रोहा तालुक्यातील इतर गावातून माध्यमिक शिक्षणाचा प्रसार व्हावा यासाठी दिनाभाई आपल्या सहकाऱ्याच्या सहाय्याने करीत आहेत. आता या कार्यात ग्रामस्थ व सर्व सामान्य कार्यकर्ते यांचे सर्वप्रथम सहकार्य प्राप्त होत आहे.

– यशवंत ब. क्षीरसागर

## मोल्सवर्थ
☞ **मुख्य नोंद– पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

* * *

म




## रानडे, महादेव गोविंद

☞ मुख्य नोंद – प्रशासन व न्यायपालिका

## रानडे, रमाबाई महादेव

**संस्थापक, समाजसुधारक**

**२५ जानेवारी १८६२ – २६ एप्रिल १९२४**



रमाबाई रानडे यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील देवराष्ट्रे या गावात झाला. विवाहापूर्वीचे त्यांचे नाव यमुना कुर्लेकर होय. त्यांचे वडील अण्णासाहेब उर्फ माधवराव कुर्लेकर हे देवराष्ट्रे गावाचे जहागीरदार होते. आईचे नाव रमाबाई होते.

१८५७ मध्ये मुंबई विद्यापीठाची स्थापना झाल्यानंतर तयार झालेल्या पहिल्या पदवीधर पिढीतील व्यासंगी विद्वान म्हणजे न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे होत. १८७१ मध्ये रानडे यांची प्रथम वर्ग न्यायाधीश म्हणून नेमणूक झाली. त्यानंतर त्यांची प्रथम पत्नी सखू उर्फ रमा यांचे निधन झाले. वडील गोविंदराव रानडे यांना न्या. रानडे यांनी द्वितीय विवाह करावा म्हणून आग्रह सुरू केला. अण्णासाहेब कुर्लेकर यांची धाकटी मुलगी यमुना हिचा १८७३ मध्ये न्या. रानडे यांच्याबरोबर विवाह झाला. पत्नीला शिकवून सामाजिक कार्य करण्यास त्यांना तयार करायचे होते.१८७६ पासून रमाबाईंनी इंग्रजी शिकण्यास सुरुवात केली. न्या. रानडे त्यांच्याकडून रोजची वर्तमानपत्रे वाचून घेत. 'दक्षिणा प्राईज कमिटी'ची आलेली पुस्तके वाचायला सांगत. पुढे पुढे त्यांना आलेल्या पत्रांची उत्तरे तयार करण्यास सांगत. घरातील सनातनी, जुन्या विचारांच्या स्त्रियांचा विरोध रमाबाईंना सहन करावा लागे. १९ व्या शतकाचा उत्तरार्ध सामाजिक घडामोडींचा, तसेच राजकीय दृष्ट्याही महत्त्वाचा होता. न्या. रानडे यांचा सर्व घटनांमध्ये सक्रिय सहभाग असल्याने रमाबाईंचा व्यापक अनुभवविश्वाशी सतत संपर्क आला. त्यामुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व सर्वांगाने विकसित झाले. १८८० नंतर सार्वजनिक कार्यात सहभागी होण्यास रमाबाईंनी सुरुवात केली.

१८८१ मध्ये न्यायमूर्तींची मुंबईला बदली झाल्यावर प्रार्थना सभेच्या वतीने दर रविवारी स्त्रियांसाठी होणाऱ्या सभेला रमाबाई जाऊ लागल्या. 'स्त्रियांना आवश्यक विद्या कोणती?' 'स्त्रियांची संसारातील कर्तव्ये' या विषयांवर त्यांनी निबंध वाचले. १ मे १८८२ रोजी पं. रमाबाई यांनी 'आर्य महिला समाजा'ची स्थापना केली तेव्हा त्यामध्ये रमाबाई रानडे होत्याच.

१८८४ मध्ये पुण्यात मुलींसाठी नवीन शाळा सुरू करण्यासंबंधी सभा झाली. 'हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्स' म्हणजे आजची प्रसिद्ध हुजुरपागा शाळा होय. या सभेला रमाबाई आणि अन्नपूर्णाबाई भांडारकर उपस्थित होत्या. शाळेची मागणी करणारे इंग्रजीतील निवेदन रमाबाईंनी सभेत सर्वांसमोर वाचून दाखवले. निवेदन न्या. रानडे यांनी लिहून दिले होते. सराव करून घेतला होता. मोठ्या सभेत इंग्रजीत भाषण करण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. रमाबाईंना या भाषणाने आत्मविश्वास आला. सार्वजनिक कार्यातील त्यांचा सहभाग वाढू लागला.

१८८५ मध्ये 'इंडियन नॅशनल काँग्रेस'ची स्थापना झाल्यानंतर १८८७ पासून प्रत्येक अधिवेशनाला त्या जाऊ लागल्या. १८९० मध्ये संमती वयाचा कायदा गाजत होता तेव्हा कायद्याला अनुकूल असणाऱ्या ६०० स्त्रियांच्या सह्या रमाबाई आणि काशीबाई कानिटकर यांनी गोळा

केल्या. 'शारदा सदन' सारख्या संस्थांतून सार्वजनिक कार्यक्रमांतून त्यांची भाषणे होत. हे एक प्रकारे त्यांचे प्रशिक्षण होते. स्वतंत्रपणे संस्थात्मक कार्य सुरू करण्याची प्रगल्भता त्यांना आली. स्वत:चे विचार, दृष्टिकोन विकसित झाला.

१८९३ मध्ये पुण्यात हरी नारायण आपटे यांनी स्त्रियांच्या कलाकौशल्याचे प्रदर्शन भरवून स्पर्धा आयोजित केली होती तेव्हा परीक्षक म्हणून रमाबाईंनीच काम बघितले होते. १८९४ मध्ये मुंबईला रमाबाईंनी 'हिंदू लेडीज क्लब' ची स्थापना केली. असे नाव असले तरी सर्व धर्माच्या स्त्रियांना क्लबमध्ये प्रवेश दिला जाई.

१६ जानेवारी १९०१ या दिवशी न्या. रानडे यांचे निधन झाले. पतीच्या निधनाच्या दु:खातून सावरण्यास रमाबाईंना एक वर्ष लागले. त्यानंतर १९०२ मध्ये त्यांनी पुण्यात 'हिंदू लेडीज क्लब' ची स्थापना केली. १९०४ मध्ये मुंबईला स्त्रियांची पहिली अखिल भारतीय महिला परिषद आयोजित केली होती. रमाबाई परिषदेच्या अध्यक्षा होत्या. न्या. रानडे यांच्या मृत्यूनंतर प्रथमच त्या जाहीर कार्यक्रमाला आल्या होत्या. या परिषदेनंतरच रमाबाईंच्या जीवनातील महत्त्वाच्या कार्याचे पर्व सुरू झाले. पाश्चात्त्य देशातील 'सिस्टर्स' प्रमाणे आपल्या देशात सुद्धा स्त्रियांनी सामाजिक कार्य करण्यास पुढे यावे. स्त्रियांनी आपली उदासीनता सोडून द्यावी असे आवाहन रमाबाईंनी आपल्या भाषणात केले होते. रमाबाईंच्या विचारांचा बहरामजी मलबारी आणि दयामल गिडुमल यांच्यावर खूप प्रभाव पडला. स्त्रियांना शिक्षणाबरोबर व्यावसायिक मार्गदर्शन करून स्वावलंबी करणारी एखादी संस्था रमाबाई रानडे यांच्या मार्गदर्शनाखाली सुरू करावी असा विचार या दोघांनी केला. १९०८ मध्ये मुंबई येथे प्रथम 'सेवासदन – सिस्टर्स ऑफ इंडिया' या संस्थेची स्थापना केली. रमाबाई संस्थेच्या कायमच्या अध्यक्षा झाल्या. कमिटीत त्यांनी सर्व धर्माच्या स्त्रियांना आवर्जून घेतले.

१९०९ मध्ये त्यांनी पुण्यात सेवासदन सुरू केले. प्रथम प्रयोग म्हणून हिंदू लेडीज क्लबच्या अंतर्गत सेवासदन सुरू केले. उत्तम प्रतिसाद मिळाल्याने ऑक्टोबर १९०९ पासून पुणे सेवासदन स्वतंत्र शाखा म्हणून सुरू झाले. पुणे सेवासदन रमाबाईंचे जीवनच बनले. गोपाळ कृष्ण देवधर यांच्या सहकार्याने त्यांनी सेवासदनचा वेगाने विकास केला. प्रथम सेवासदन रानडे वाड्यातच होते. संख्या वेगाने वाढल्याने स्वतंत्र इमारत बांधायचे ठरले. इमारत निधीसाठी १९१२ मध्ये स्त्रियांच्या कलाकौशल्याचे प्रदर्शन-फॅन्सी फेअर आयोजित करून स्त्रियांनाच स्टॉलवर विक्रीचे काम करण्यास सांगितले. १९१५ ला सेवासदन लक्ष्मी रोड वरील स्वत:च्या जागेत गेले. सेवासदनची कीर्ती ऐकून १५ फेब्रुवारी १९१५ रोजी म. गांधी आणि कस्तुरबा गांधी यांनी सेवासदनला भेट दिली. स्त्रियांसाठी चालणारे काम बघून प्रशंसा केली. सेवासदनच्या कार्याचा रमाबाईंना अखंड ध्यास असला तरी अन्य सामाजिक कार्याकडेही त्यांचे लक्ष होते. स्त्रियांशी संबंधित चळवळीत त्या सहभागी होत. १९०४ नंतर स्त्रियांच्या १९०७ सुरत, १९१२, १९२० सोलापूर येथे भरवलेल्या महिला परिषदांच्या त्या अध्यक्षा होत्या. १९०५ ला ब्रिटिश युवराज्ञी भारतात आल्या होत्या. मुंबईला निवडक स्त्रियांची त्यांनी भेट घेतली. तेव्हा त्या सभेत दुभाषक म्हणून रमाबाईंनी काम केले.

१९१८ मध्ये पटेल कायद्यानुसार स्त्रियांना प्राथमिक शिक्षण सक्तीचे आणि मोफत व्हावे असे मान्य होऊनही महाराष्ट्रात सुरू झाले नव्हते. तेव्हा पुण्यात स्त्रियांनी आंदोलन केले. सेवासदन पासून निघालेल्या मोर्चाचे रमाबाईंनी नेतृत्व केले. १९२० ला स्त्रियांचे शिष्टमंडळ कायदे मंडळाच्या अध्यक्षांना भेटले तेव्हा रमाबाईंनीच पुढाकार घेतला. १९१७ ते १९२१ पर्यंत स्त्रियांनी मतदानाचा हक्क मिळावा म्हणून मार्गारेट कझिन्स यांच्या नेतृत्वाखाली लढा दिला, त्यामध्येही रमाबाईंचा सहभाग होता. १९३० मध्ये नॅशनल फेडरेशनमध्ये स्त्रियांना प्रतिनिधित्व मिळावे अशी त्यांनी मागणी केली. १९२३ मध्ये पुण्यात लिबरल फेडरेशन मध्ये आपल्या भाषणात त्यांनी 'रिमूव्हल ऑफ सेक्स डिसक्वालिफिकेशनचा' ठराव मांडला. हे त्यांचे शेवटचे भाषण होते.

न्या. रानडे यांची पत्नी म्हणूनही अनेक कर्तव्ये त्यांनी निष्ठेने केली. न्या. रानडे यांची प्रार्थना समाजातील धर्मपर

र

भाषणे मिळवून संपादित करून प्रसिद्ध केली. त्यांचे निबंध 'मिसलेनिअस रायटिंग अँड स्पीचेस' ग्रंथरूपाने प्रसिद्ध केला. न. र. फाटक यांना मदत करून न्या. रानडे यांचे चरित्र प्रसिद्ध केले. स्वतः चरित्रास प्रस्तावना लिहिली. सामाजिक संस्थांना मदत करण्यासाठी न्या. रानडे यांनी निधी ठेवला होता. त्याच्या विश्वस्त म्हणून रमाबाईंनी काम केले. 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी : (स्वत: संबंधी काही गोष्टी)' हे आत्मचरित्र रमाबाईंनी १९१० मध्ये प्रसिद्ध केले. ग्रंथरूपाने प्रसिद्ध झालेले मराठीतील स्त्रीचे हे पहिले आत्मचरित्र होय. एकाच वर्षात या पुस्तकाच्या तीन आवृत्या प्रसिद्ध झाल्या.

१९१३ मध्ये सरकारने 'कैसर - ए - हिंद' हे पदक देऊन रमाबाई रानडे यांचा गौरव केला.

१९२४ जानेवारी पासून रमाबाईंची तब्येत बिघडू लागली. पुण्यात रमाबाईंचे निधन झाले. १९२४ साली रमाबाईंच्या अंतयात्रेत २०० हून अधिक स्त्रिया सहभागी झाल्या होत्या. ही स्त्रियांनी त्यांना वाहिलेली उचित श्रद्धांजली होय.

– डॉ. स्वाती कर्वे

**संदर्भ –**

## रुईया, रमाबेन श्रीनिवास

**संस्थापक, शिक्षिका, प्राचार्या**

**४ ऑक्टोबर १९२४**

र

रमाबेन श्रीनिवास रूईया यांचा जन्म वर्धा येथे झाला.त्यांचे वडील गंगाबीसन बजाज हे जमनालाल बजाज यांचे चुलतबंधू होते. जमनालालजींचे महात्मा गांधींशी फार जवळचे संबंध होते. त्यामुळे बजाज कुटुंबाचाही गांधींशी आणि गांधी विचारांशी जवळचा संबंध आला. रमाबेनच्या आई लक्ष्मीदेवी बजाज या रोज चरख्यावर एक दीड तास सूत कातत व त्याच सुताचे कपडे वापरीत असत. खादीचे व्रत त्यांनी आयुष्यभर सांभाळले. महात्मा गांधींच्या संबंधांमुळे स्वातंत्र्य चळवळीचे वारे बजाज परिवारात वाहत होते. त्यामुळे लहानपणीच रमाबेनला राष्ट्रीय वृत्तीचे बाळकडू मिळाले. त्यांचे शिक्षण वर्ध्यातच झाले. हिंदी साहित्य आणि अर्थशास्त्र हे विषय घेऊन त्यांनी बी. ए. ची पदवी मिळवली. राष्ट्रीय शिक्षणाचे महत्त्व ओळखून शिक्षिकेचे काम करता यावे या हेतूने त्यांनी बी. एड. ही पदवीही मिळवली. त्यानंतर वर्ध्याचे महिलाश्रम ही त्यांची कर्मभूमी झाली.

गुजराथ येथील साबरमती आश्रमातील मुलींच्या शिक्षणाची सोय व्हावी म्हणून १९२४ मध्ये गांधींनी 'हिंदू महिला मंडळा'ची स्थापना केली होती. स्वावलंबन आणि श्रमाधारित जीवन जगण्यावर यात भर होता. १९३० च्या मिठाच्या सत्याग्रहानंतर ब्रिटिश सरकारने महात्मा गांधी आणि त्यांचे सहकारी यांना पकडले. त्यामुळे साबरमती येथील मुलींच्या शिक्षणात खंड पडला. नंतर मुंबईचे उपनगर विलेपार्ले इथे १९३१ मध्ये एका भाड्याच्या घरात 'महिलाश्रम' नावाने मुलींसाठी एक संस्था सुरू झाली. ब्रिटिश सरकारने तिच्यावरही जप्ती आणली. त्यानंतर जमनालाल बजाज यांनी पुढाकार घेऊन महात्मा गांधी व विनोबाजी भावे आणि अन्य सहकारी यांच्या सल्ल्याने वर्ध्यात १९३३ साली 'महिलाश्रम' सुरू केला. बजाज कुटुंबातील एक बालविधवा गीताबाई रानीवाला (रूईया) यांच्याकडे महिलाश्रमाचे काम सोपविण्यात आले. त्यांचेच बंधू श्रीनिवास रुईया यांचेशी रमाबेन यांचा विवाह झाला. (पुढे रमाबेन महिलाश्रमाशी इतक्या समरस झाल्या की त्यांना सर्वजण 'मामी' म्हणू लागले.)

महिलांमध्ये शिक्षणाद्वारा आत्मश्रद्धा जागृत करून त्यांच्यामध्ये देश आणि समाजाची सेवा करण्याची योग्यता निर्माण करणे हे संस्थेचे उद्दिष्ट होते. त्या काळात राष्ट्रीय शिक्षणाची निकड लक्षात घेऊन, गुजराथ विद्यापीठ, काशी विद्यापीठ, शांतिनिकेतन, टिळक विद्यालय अशा संस्था आपले काम करीत होत्या. त्या मालिकेत महिलाश्रमाचे मोलाचे योगदान आहे.

विशेषत: महात्मा गांधींच्या सत्याग्रहामध्ये सामील होणाऱ्यांना कारावास झाल्यावर त्यांच्या परिवाराची सुरक्षितता, मुलामुलींचे शिक्षण याकडे लक्ष देण्यासाठी महिलाश्रमाचा मोठाच उपयोग झाला. या काळात १९४२ च्या चळवळीत रमाबेनने भाग घेतला. त्यांना पकडण्यात येऊन ८ महिने कारावासही झाला. त्यांनी स्वत:सोबत अनेक महिलांना सत्याग्रहात सामील होण्याची प्रेरणा दिली आणि गांधीजींच्या विचारप्रणालीशी त्यांना कायमचे जोडले.

स्वातंत्र्यानंतर रमाबेन यांनी स्वत: शैक्षणिक कार्याला वाहून घेतले. १९५२ ते १९५५ पर्यंत महिलाश्रमात शिक्षिका म्हणून व १९५५ ते १९८७ पर्यंत महिला आश्रम डी. एड. महाविद्यालयाच्या प्राचार्य या नात्याने त्यांनी काम केले. १९५२ पासून त्या संस्थेच्या साहाय्यक सचिव आणि १९६७ पासून आजपर्यंत सचिव या नात्याने त्यांनी भरीव काम केले आहे. प्राथमिक शिक्षणापासून उच्च माध्यमिक विद्यालयापर्यंत आणि अध्यापिका विद्यालय असा संस्थेचा व्याप वाढला आहे त्यात रमाबेनचा पुढाकार आहे. महिलाश्रमात गांधींच्या बुनियादी शिक्षणप्रणालीचा अवलंब करण्याचा प्रयत्न आहे. शिवणकाम, बेकरी, प्रशिक्षण, विजेची उपकरणे दुरुस्त करणे इ. कामे शिक्षण घेता घेता विद्यार्थी विद्यार्थिनी करतात. स्वावलंबनाचे शिक्षणही त्यामुळे अनायासे मिळते. आज महिला आश्रमाच्या अंतर्गत ९ विद्यालये कार्यरत आहेत. शिक्षक आणि विद्यार्थी या दोघांचाही विकास व्हावा यासाठी वेगवेगळ्या प्रकल्पांचे आयोजन केले जाते.

संस्थेत विद्यार्थ्यांपासून अध्यापकांपर्यंत सर्वजण खादी वापरतात. प्रत्येक वर्गात फक्त ४० विद्यार्थी असले पाहिजेत असा संस्थेचा कटाक्ष आहे.

संस्थेच्या कामाशिवाय अन्य उपक्रमांमध्येही रमाबेन सक्रीय आहेत. १९६० पासून पूज्य विनोबाजींच्या सांगण्यावरून रमाबेनने महिलाश्रमाच्या द्वारा खादी आणि ग्रामोद्योग विभागाची जबाबदारी घेतली. आजही २०० स्त्री-पुरुषांना या कामातून रोजगार मिळतो. आजूबाजूच्या गावांमध्ये ७ ते ८ छोटी-मोठी विक्रीकेंद्रे सुरू आहेत. वर्षाची ४५ लाख रुपयांची उलाढाल आहे. स्त्रीच्या समस्येत रमाबेनना विशेष रुची आहे. स्त्रीची समस्या ही केवळ स्त्रीची नसून पुरुष व समाजव्यवस्था यांच्याशी ती निगडित आहे असे जाणून स्त्री-पुरुषांसाठी ‘जागृती मंडळ’ या नावाने वर्ध्यात त्यांनी समुपदेशन केन्द्र सुरू केले असून अनेकांना त्याचा लाभ झाला आहे.

आपल्या कुशल नेतृत्वामुळे व संघटन चातुर्यामुळे वर्ध्यातील सामाजिक, शैक्षणिक आणि सांस्कृतिक संस्थांच्या त्या अध्यक्ष, कोषाध्यक्ष, सचिव या नात्याने जवळजवळ १८ संस्थांच्या आधारस्तंभ झाल्या आहेत. शिक्षा मंडळ, राष्ट्रभाषा प्रचार समिती, गांधी ज्ञान मंदिर, महारोगी सेवा समिती - दत्तपूर, मगन संग्रहालय समिती ही त्यातील काही निवडक नावे आहेत.

पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, महाराष्ट्र, पाठ्यक्रम निर्मिती मंडळ (डी. एड. चा अभ्यासक्रम, महाराष्ट्र) यांच्याही त्या सदस्या होत्या. स्काऊट व गाईड असोसिएशनच्या अध्यक्ष होत्या. बाल सुधार गृह, वर्धा च्या त्या मानद न्यायदंडाधिकारी होत्या. त्यांची राहणी साधी असून त्या खादीधारी आहेत. महिलाश्रमाशी त्या एकरूप झाल्या असून तेच त्यांचे निवासस्थानही आहे.

– डॉ. दमयंती पांढरीपांडे

**संदर्भ** :

## रेगे, शिवराम दत्तात्रेय

***दादासाहेब रेगे***

र

शिवराम दत्तात्रेय उर्फ दादासाहेब रेगे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील वेंगुर्ले तालुक्यातील कोचरे गावात एका गरीब, कुटुंबात झाला. १९१२ मध्ये कोचरे गावात सरस्वती विद्या मंदिर येथे ते पहिलीत दाखल झाले. १९२१ मध्ये ते व्हर्नाक्युलर फायनल (७ वी) झाले. १९ जुलै १९२१ पासून दादांनी हेदूल लोकल बोर्डाच्या शाळेत शिक्षक



म्हणून नोकरीस सुरुवात केली. पण मुलांना मारीत नाहीत म्हणून पेंडूर गावी त्यांची बदली करण्यात आली. आधीच्या शाळेत जंगलातील मुलांना, तर या शाळेत शेतकरी मुलांना दादा शिकवू लागले. या मुलांकडूनही दादा खूप काही शिकले.

गावातील नोकरी सोडून दादा मुंबईला आले. ६ सप्टेंबर १९२३ पासून दादा माटुंग्याच्या डेव्हिड ससून इंडस्ट्रिअल अँड रिफॉर्मेटरी स्कूलमध्ये–लहान मुलांच्या तुरुंगात शिक्षक म्हणून काम करू लागले. शाळेवर सरकारची देखरेख असे. शाळेपासून जवळच शिक्षकांच्या राहाण्याची सोय होती. व्यवसाय शिक्षणाबरोबरच मराठी, उर्दू, गुजराती व थोडे इंग्रजी येथे शिकवले जाई. पण मुलांना सुधारण्याच्या प्रयत्नांऐवजी त्यांना गुन्हेगार समजून कठोर शिक्षा केल्या जात. दादांनी या मुलांशी प्रेमाने बोलून, आपुलकीने मुलांना बोलते करून, त्यांच्याशी दोस्ती केली. त्यांना चांगल्या सवयी लावल्या. १९२६ मध्ये त्यांनी जलद इंग्रजी अभ्यासक्रम पूर्ण केला. शाळेवर जमशेटजी मंचरजी देसाई यांची नियुक्ती काही काळाने झाली. शाळेत शैक्षणिक व निरोगी वातावरण निर्माण झाले. मुले दर रविवारी पालकांना भेटत. त्यांच्या बोलण्यातून त्यांच्या परिस्थितीची, संगतीची, वाईट सवयींच्या कारणांची वगैरे माहिती दादांना मिळत असे. देसाईंशी चर्चा होई, खेळ, स्पर्धा, सहली, बागकाम असे अनेक उपक्रम शाळेत सुरू झाले. मुलांमध्ये व्यवसाय शिक्षणाची आवड निर्माण झाली.

विड्या फुंकण्याची मुलांची सवय कमी झाली. अधिकाऱ्यांशी बोलून दादांनी शाळेस पोलिसी वातावरणातून, दहशतीतून मुक्त केले. दादांनी मोठ्या प्रयत्नपूर्वक मुलांचे उच्चार सुधारले, त्यांना तोंडी हिशेब शिकविले. फळ्याचा खूप उपयोग करून त्यांचे अक्षर सुधारले. दादा मुलांचे आवडते शिक्षक झाले. १९३३ मध्ये सातवीच्या परीक्षेत अकराही मुले पास झाली. दादांचे प्रयोग सफल झाले. दादांनी स्काऊट मास्तरचे ट्रेनिंग घेतले. शाळेत बनबरी स्काऊट ट्रूप सुरू केला. तुरुंगातील मुले इतर मुलांसारखीच असतात हे दादांनी सिद्ध केले.

र

१९३९ मध्ये प्रशिक्षण महाविद्यालयामध्ये प्रशिक्षण घेण्यासाठी दादांनी ही नोकरी सोडली. घरच्या गरिबीमुळे शिक्षणासाठी दादांचे घर गहाण पडले. छोटे छोटे व्यवसाय त्यांनी केले. पण दादांच्या जीवनात रिफॉर्मेटरी स्कूलचे स्थान फार वेगळे होते हे सतत त्यांना जाणवत राहिले. प्रशिक्षण महाविद्यालयामध्ये ह्या शाळेतील अनुभवांना शास्त्रीय बैठक मिळाली. येथील प्रशिक्षणातून नवनवीन शैक्षणिक उपक्रम करण्याची प्रेरणा मिळाली. ट्रेनिंग झाल्यानंतर ३ जून १९४० रोजी दादांनी दादरच्या शिवाजी पार्कमध्ये बालमोहन विद्या मंदिराची स्थापना केली. १९४० मध्ये ८ मुले व चार शिक्षक घेऊन सुरू झालेल्या विद्या मंदिरात मुलांची संख्या तेराशे पर्यंत गेली व त्रेपन्न शिक्षक त्यांच्यावर संस्कार करू लागले. शाळेची प्रगती वेगाने होत गेली. बालमोहन विद्या मंदिरातील मुलांनी सर्वात जास्त संख्येने शासकीय शिष्यवृत्ती मिळवाव्यात ही नेहमीची गोष्ट झाली. माध्यमिक शालान्त परीक्षेच्या गुणवत्ता यादीत पंचवीस वर्षांत त्रेसष्ट मुले चमकली.

या सर्व यशाला पोषक असे अत्यंत निरोगी वातावरण शाळेत दादांमुळे असायचे, ते आजही आहे. मुलांचा शारीरिक, बौद्धिक, मानसिक, व्यावहारिक व सांस्कृतिक विकास घडविणारे अनेक उपक्रम दादांनी शाळेत सुरू केले. मुलांना शाळेविषयी आत्मीयता वाटावी म्हणून 'बालदिन' हा सर्व मुलांचा सामुदायिक वाढदिवस म्हणून साजरा होतो.

कुलपद्धतीच्या द्वारा स्वच्छता, शिस्त, सजावट, वक्तृत्व, सेवा, स्वावलंबन यांचे संस्कार मुलांवर होत असतात. क्रीडास्पर्धांना विशेष महत्त्व आहे. 'प्रज्ञाशोध' परीक्षेसाठी खास वेगळी तयारी अनेक वर्षे करून घेतात. शाळेबाहेरील विविध परीक्षांना मुले बसतात व यशस्वी होतात. या सर्व परंपरा दादांनी सुरू केल्या आहेत. सुटीचा सदुपयोग कसा करावा ह्या संबंधीचे मार्गदर्शनपर पत्रक तयार करून दादा ते मुलांना देत असत. दादांनी

शिक्षणविषयक लेखन केले, गणिताची पुस्तके लिहिली, आकाशवाणीवर शैक्षणिक कार्यक्रम दिले, दूरदर्शनवर अनुभव कथन केले.

१९६२ मध्ये दादासाहेब रेगे ह्यांच्या कार्याचा आदर्श शिक्षक राष्ट्रीय पुरस्काराने गौरव झाला. ८ जून १९८२ रोजी दादासाहेब रेगे यांचे निधन झाले.

– जोशी वि. ग.

१.

**रोकडे, वसंत सावळाराम**
**प्राचार्य**
**१५ फेब्रुवारी, १९३२**

वसंत सावळाराम रोकडे त्यांचा जन्म इस्लामपूर जि. सांगली या गावी झाला. पितृछाया लहानपणीच हरपल्याने त्यांचे ७ वी पर्यंतचे शिक्षण आजोळी विटे येथे झाले. माध्यमिक शिक्षण कर्मवीरांनी स्थापन केलेल्या रयत शिक्षण संस्थेच्या महाराजा सयाजीराव मोफत निवासी विद्यालय सातारा येथे झाले. छत्रपती शिवाजी महाविद्यालय सातारा मधून त्यांनी एफ.वाय. व टी.डी. ही पदविका संपादन केली.

टी. डी. नंतर १९५३ मध्ये त्यांनी लोणंद येथे शिक्षक व वसतिगृह व्यवस्थापक म्हणून सेवेस प्रारंभ केला. वसतिगृहातील विद्यार्थ्यांना स्वत्वाची जाणीव करून देऊन त्यांचा विकास घडावा यासाठी त्यांनी नियोजनपूर्वक प्रयत्न केले. त्यामुळे त्यांना साने गुरुजींचे अनुयायी म्हणून लोक संबोधू लागले.

१९५६ मध्ये त्यांची बदली जनता विद्यामंदिर, कान्हूर येथे मुख्याध्यापक म्हणून प्रतिनियुक्ती करण्यात आली. ही शाळा ग्रामस्थांनी चालवली होती. अंतर्गत मतभेदांमुळे ती डबघाईला आली होती. शाळेत दोन वर्ग – ८ वी, ९ वी त्यात ३३ मुले होती. शासनातर्फे शाळेला नोटीस देण्यात आली होती. या पार्श्वभूमीवर त्यांनी काम केले. १९५६ ते ६४ या ८ वर्षाच्या कालावधीत रोकडे यांनी ५



खोल्यांची इमारत बांधली. तसेच आदर्श ग्रंथालय, सुसज्ज प्रयोगशाळा, सुंदर परिसर या सुविधा उपलब्ध करून दिल्या. त्यामुळे पालक व विद्यार्थ्यांना अभ्यासासाठी योग्य मार्गदर्शन, शिस्तबद्धता, नियोजनपूर्वक कामकाज करणे या उपक्रमांमुळे कान्हूरची शाळा ही आदर्श शाळा म्हणून ओळखली जाऊ लागली. पहिल्या वर्षी शाळेचा निकाल ८१ टक्के लागला.

१९६४–६६ या कालावधीत रोकडे यांनी 'न्यू इंग्लिश स्कूल' – सुपे, जि. अहमदनगर येथे काम केले. त्यापूर्वी शिक्षक वर्गातील मतभेदांमुळे शिपाई सोडून सर्वांच्या बदल्या करण्यात आल्या होत्या. दोन वर्षात शाळेसाठी जागा खरेदी, गुणवत्ता वाढीसाठी प्रयत्न, ग्रंथालय व प्रयोग शाळांचा विकास साधून सुपे येथील शाळेला विकसित शाळा हा लौकिक प्राप्त करून दिला. तसेच 'गणेश विद्यालय' गणेश नगर येथे शाळेला दिशा देण्याचे काम केले.

१९६६–६८ या कालावधीत हिंदी व मराठी विषयाचे व्याख्याते म्हणून काम करताना स्वत:च्या व्यासंगामुळे त्यांनी एक चांगले प्राध्यापक म्हणून लौकिक संपादन केला.

रोकडे यांनी १९७०–९२ या २२ वर्षांच्या कालावधीत प्राचार्यपद भूषविले. त्यांनी सहजानंद भारती शिक्षण शास्त्र महाविद्यालय श्रीरामपूर येथे ८ वर्षे प्राचार्य म्हणून काम करताना पहिल्या दिवसापासून कामकाजास प्रारंभ, नियमितपणा, स्वाध्यायपद्धती, रात्रअभ्यासिका, विद्यार्थ्यांना वैयक्तिक मार्गदर्शन, सामूहिक प्रेरणा देणे या उपक्रमांमुळे पहिल्या वर्षी महाविद्यालयाचा निकाल पुणे विद्यापीठात प्रथम क्रमांकाचा लागला. गुणवत्ता यादीत ३ विद्यार्थी आले. हीच परंपरा पुढील कालावधीतही टिकून राहिली. 'बोरावके महाविद्यालय' श्रीरामपूर – येथे (१९८१–८६) गुणवत्ता वाढीसाठी विविध उपक्रम

कार्यवाहीत आणल्याने १२ वीचे निकाल उत्कृष्ट लागत असत. प्रत्येक वर्षी ५ ते ७ विद्यार्थ्यांना एम.बी.बी.एस. ला प्रवेश मिळे.

आयुर्वेद, होमिओपॅथी, इंजिनिअरिंग आदी अभ्यासक्रमांना साधारणपणे ३० विद्यार्थी जात असत. सातत्याने गुणवत्तावाढीसाठी प्रयत्न चालू असल्याने ११ वी ते बी.ए. पर्यंत असणारे जे विद्यार्थी पदवी परीक्षेत बसले त्यांच्यापैकी ७० विद्यार्थी प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. महाविद्यालयाचा भौतिक विकासही झाल्याने परिसर सर्वार्थाने विकसित झाला.

'अण्णासाहेब आवटे महाविद्यालय'- मंचर या महाविद्यालयाचा विकासही त्यांनी केला. भौतिक विकासाचा विचार करता असे दिसून येते की या कालावधीत त्यांनी सुसज्ज प्रयोगशाळा, १२ वर्ग खोल्या, ग्रंथालयाची आदर्श इमारत यांची निर्मिती केली. गुणात्मकतेवर भर देऊन विद्यार्थ्यांचा व पर्यायाने महाविद्यालयाचा दर्जा सुधारला. वनीकरण प्रकल्पातील वृक्षांचे संवर्धन करून नवीन वृक्षांची लागवड केली. रोपवाटिकेद्वारा परिसरात रोपे पुरवून वनीकरणास प्रोत्साहन दिले. या कार्यामुळे महाविद्यालयास महाराष्ट्र शासनाचा वनीकरण पुरस्कार प्राप्त झाला.

महाविद्यालयातील प्रौढ साक्षरता योजनेचे यश पाहून पुणे विद्यापीठाने इतर महाविद्यालयांसाठी ती योजना कार्यवाहीत आणली. मुख्याध्यापक, प्राचार्य, आजीव सदस्य, सहसचिव, मॅनेजिंग कौन्सिलचे सदस्य, विविध समित्यांचे सदस्यत्व या सर्व भूमिका त्यांनी यशस्वीपणे साकारल्या आहेत. त्यांच्या कार्याचे विश्लेषण केल्यानंतर असे दिसून येते की,

१. ते आदर्श व प्रयोगशील शिक्षक आहेत. गुणवत्ता वाढीसाठी त्यांनी केलेल्या प्रयोगामुळे विद्यार्थ्यांची व शिक्षणाची गुणवत्ता वाढीस लागली.
२. उन्हाळी व हिवाळी वर्गांना 'सात्रळ प्रकल्पा'तील यशामुळे सर्वत्र प्रारंभ झाला त्यामुळे विद्यार्थ्यांचे यश वृद्धिंगत होत गेले.
३. स्पर्धा परीक्षेत विद्यार्थी यशस्वी व्हावेत यासाठी 'कर्मवीर विद्याप्रबोधिनी' स्थापन करून कार्यास प्रारंभ केला.
४. विद्यार्थी हा केंद्रबिंदू मानून कार्यवाहीत आणलेल्या योजनांमुळे विद्यार्थ्यांचा दर्जा सुधारण्यास उत्तेजन मिळाले.

विद्यापीठ स्तरावर विविध समित्यांवर काम करून तसेच शैक्षणिक मानसशास्त्र व शिक्षणशास्त्र अभ्यास मंडळाचे चेअरमन या नात्याने त्यांनी भरीव कामगिरी पार पाडली आहे. प्राचार्य रोकडे यांनी ग्रामीण भागात हायस्कूल, महाविद्यालये, वसतिगृहे यांची उभारणी करून आपले कार्य सचोटीने व निष्ठेने केले आहे. संस्थेने व जनतेने सोपवलेली जबाबदारी निःस्पृहपणे व विश्वस्त या नात्याने पार पाडली. हे कार्य करताना विद्यार्थी हित जपणारे शिक्षक म्हणून लौकिक संपादन केला.

प्राचार्य रोकडे यांनी शिक्षण विकासासाठी केलेले कार्य भावी पिढीला दिशादर्शक ठरणारे आहे.

– डॉ. एस. बी. गागरे

**रँगलर, परांजपे**



* * *




**लट्ठे,**
**संस्थापक**
**९ डिसेंबर १८७८ – १६ मे १९५०**



आण्णासाहेबांचा जन्म कुरुंदवाड येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण कुरुंदवाड येथे झाले. त्यानंतर ते सांगली विद्यालयामधून मॅट्रिक झाले. त्यानंतर त्यांनी कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयात प्रवेश घेतला. पुढील शिक्षणासाठी ते पुण्याला डेक्कन महाविद्यालयामध्ये आले. १८९९ मध्ये झालेल्या दक्षिण भारत जैन सभेच्या पहिल्या अधिवेशनास ते उपस्थित राहिले व त्यांनी बालविवाह चालीविरोधी प्रदर्शनही केले.

त्यांचे वास्तव्य पुढे मुंबईच्या हिराचंद वसतिगृहामध्ये होते. त्या काळातच श्रीमंत छत्रपती शाहू महाराजांनी वसतिगृहाला भेट दिली होती. सभेच्या प्रचार व उपदेशाकरिता त्यांनी सर्वत्र संचार केला. सभेतर्फे स्वतंत्र विद्या विभाग सुरू करण्यासाठी त्यांनी पुढाकार घेतला. १९०२ मध्ये त्यांनी ‘श्रीजिन विजय’ मासिकाचा शुभारंभ केला. ते स्वतः संपादक होते. १९०३ मध्ये आण्णासाहेब एम.ए. झाले. आण्णासाहेब लट्ठे हे जैन समाजातील पहिले एम. ए. झाले म्हणून शेठ हिराचंद नेमचंद यांच्या हस्ते त्यांना दक्षिण भारत जैन सभेने मानपत्र दिले. प्राथमिक शिक्षण प्रसारासाठी गावोगावी जाऊन व्याख्याने दिली पाहिजेत असे आण्णासाहेब लट्ठे यांनी सांगितले. ते जैन बोर्डिंग कोल्हापूरचे पहिले अधीक्षक होते. याचकाळात त्यांनी स्वतंत्र स्त्रीशिक्षण विभागाची स्थापना केली. याच काळात त्यांनी कन्याविक्रयाची दुष्ट रूढी बंद करण्याकरिता झंझावाती दौरा केला. १९०७ मध्ये आण्णासाहेब राजाराम महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून रुजू झाले. १९०८ मध्ये आण्णासाहेब यांच्या अध्यक्षतेखाली ‘अस्पृश्य विद्याप्रसारक मंडळ’ स्थापन झाले व त्याच्या कार्यास प्रारंभ झाला.

२४ नोव्हेंबर १९०९ रोजी त्यांनी शेतकरी समाजाच्या प्रगतीसाठी शेती औद्योगिक व कलेचे प्रदर्शन जैन व वसतिगृह कोल्हापूर येथे भरविले होते. ‘जैनिझम’ हा ग्रंथ त्यांनी लिहिला. १९११ मध्ये आण्णासाहेबांची शहर न्यायाधीश म्हणून नियुक्ती झाली. पुढे ते कोल्हापूर संस्थानचे ‘विद्याधिकारी’ ही झाले. १९१४ मध्ये व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्यास डांबर फासल्याच्या आरोपावरून त्यांना अटक झाली. नंतर त्यांनी बेळगांवास स्थलांतर केले. बेळगावांत स्थायिक झाल्यांनतर त्यांनी डेक्कन ब्राह्मणेतर सभेची स्थापना करून गरजूंना मदत देण्याचा प्रारंभ केला. अण्णासाहेबांनी या समाजसेवेबरोबरच शिक्षणावरही लक्ष्य केंद्रित केले होते. १९१६ मध्ये ते पुण्याच्या विधी महाविद्यालयामधून एलएल्. बी.ची परीक्षा उत्तीर्ण झाले व बेळगावी वकीली करू लागले. याच काळात म्हणजे १९१६ ते १९२६ पर्यंतच्या काळात बेळगावात त्यांनी ‘डेक्कन ब्राह्मणेतर पक्ष’ स्थापन करुन‘डेक्कन रयत’ हे साप्ताहिक दोन वर्षे चालविले.

१९२० मध्ये दिल्ली कौन्सिलच्या निवडणुकीत ते प्रचंड मताने निवडून आले. लट्ठे हे डेमॉक्रिटिक पार्टीचे सभासद होते. लष्कर, रेल्वे, मिठावरील कराबद्दल त्यांनी सरकारवर सडकून टीका केली होती. भाषावार प्रांतरचना व्हावी या कर्नाटकच्या इच्छेवरून त्यांनी असेंब्लीत ठराव आणला. पब्लिक अकौन्टस् व फायनान्स कमिट्यात सतत तीन वर्षे

ते सभासद म्हणून निवडून आले. त्याच वेळी ''जोशी वतन नष्ट विधेयक'' आणून महाराष्ट्रात व कर्नाटकात खळबळ उडवून दिली. बेळगाव येथे ब्राह्मणेतर काँग्रेसचे पहिले अधिवेशन आण्णासाहेब लठ्ठे यांनी भरविले. १९२५ मध्ये त्यांची कोल्हापूर संस्थानच्या दिवाणपदी नेमणूक झाली. त्याबरोबर ते संस्थानचे हुजूर सल्लागारही झाले. याच काळात त्यांनी कोल्हापूर स्टेट म्युनिसिपल ॲक्ट १९२५ केला, त्याचबरोबर नगरपालिकेचा अध्यक्ष निवडण्याचा अधिकार नागरिकांना देण्याबरोबरच हरिजन आणि इतर सर्व जातीधर्माचे एकत्र मतदार संघ स्थापन केले.

१९२६ ते १९३० पर्यंत आण्णासाहेब कोल्हापूरचे दिवाण होते. त्यांच्या काळात त्यांनी इलाखा पंचायतीची स्थापना केली, कोल्हापूर बँकेची स्थापना, शाहुपुरी व्यापारी संघटनेची स्थापना केली. त्याबरोबरच साईक्स विधी महाविद्यालयाची स्थापना, ट्रेनिंग कॉलेज आणि छत्रपती राजर्षि शाहू महाराजांचा पूर्णाकृती पुतळा कोल्हापुरात उभारण्यात त्यांचे मोलाचे योगदान आहे. ते सेंट्रल बँकेचे अध्यक्षही झाले. १९२९ च्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाली होती. 'प्रगती जिनविजय' मधून ते लिहित. सायमन आयोगाच्या शिफारसीप्रमाणे झालेल्या 'गोलमेज परिषद' साठी आण्णासाहेब लठ्ठे इंग्लंडला गेले. पुढे त्यांनी ''प्रॉब्लेम्स ऑफ इंडियन स्टेटस्'' हा ग्रंथ लिहिला. आण्णासाहेबांच्या बरोबर डॉ. आंबेडकर, मौलाना महंमद अली, सर तेजबहादूर सप्रू, रँग्लर नारळीकर आदी लोक होते. याचा स्वातंत्र्यानंतर भारताची घटना करण्याच्या कामी फार उपयोग झाला.

मुंबई प्रांताच्या पहिल्या काँग्रेस मंत्रिमंडळातील अर्थमंत्री म्हणून आण्णासाहेब लठ्ठे निवडले गेले. आपल्या अर्थसंकल्पात त्यांनी ग्रामोध्दार, शिक्षण, जोडरस्ते यावर भर दिला होता. मुंबई सरकारच्या या १९३७च्या अर्थसंकल्पाचे कौतुक भारताबाहेरील वृत्तपत्रांनीही केले. दरवर्षी पाऊण लाख रुपयांचे अनुदान देऊन डेक्कन महाविद्यालयाचे पुनरुज्जीवन केले. तेथे पदव्युत्तर अभ्यासक्रम व बी. टी. महाविद्यालय सुरू करण्याचे ठरविले. हाच निर्णय महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन करण्यास सोयीचा ठरला. लठ्ठे यांनी कर्नाटक, गुजराथ व महाराष्ट्र या प्रत्येक प्रांतास स्वतंत्र विद्यापीठ असावे असे सरकारचे धोरण जाहीर करुन जनतेच्या मागणीपेक्षा एक पाऊल पुढे उचलले. डेक्कन महाविद्यालय प्रकरणात अर्थमंत्री आण्णासाहेब लठ्ठे हे विश्वस्त बनले व त्यांनी प्राकृत, संस्कृत, अर्ध मागधी, मराठी इत्यादी भाषांचे संशोधन या महाविद्यालयामध्ये करावयाचे ठरले. शिवाय बी.टी महाविद्यालयाचीही सोय तेथे करण्याचे निश्चित झाले. यामुळे ना. लठ्ठे यांचे पुणेकरांनी अभिनंदन केले.

आण्णासाहेब लठ्ठे यांची ग्रंथ संपदा पुढील प्रमाणे; जैनिझम (इंग्रजी १९११), हिंदुस्थानातील ब्रिटिश साम्राज्याचा उदय (मराठी १९१४), मेमोयर्स ऑफ हिज हायनेस श्री छत्रपती शाहू महाराज ऑफ कोल्हापूर (खंड१, २ इंग्रजी १९२४), हिंदी संस्थानिकांचे प्रश्न (इंग्रजी १९३०), माझ्या विलायतच्या आठवणी (मराठी १९३९), फेडरल कॉनस्टिट्युशन ऑफ द वर्ल्ड – (इंग्रजी), अर्थशास्त्रावरील लेख संग्रह – (मराठी १९३९), इंडियन अनरेस्ट (अनुवाद– मूळ लेखक – चिरोल)

– विजय बक्षी

**संदर्भ** :

***बापूसाहेब लाखनीकर***

भंडारा जिल्ह्यातील त्यावेळच्या साकोली तालुक्यातील लाखनी येथे परशुराम गोविंदबापू लाखनीकर यांचा जन्म झाला. घरात परंपरेने मालगुजारी चालत आल्यामुळे या कुटुंबातील व्यक्तींना प्रौढत्वी नावाला जोडून बापू हे बिरूद लागत असे. त्यांच्या वडिलांचे नाव गोविंद व आईचे नाव जाईबाई होते. त्यांच्या कुटुंबाला समाजात

ल



पूर्वापार प्रतिष्ठित असे स्थान होते. घरात भरपूर पैसा मिळवून देणारा व्यापार होता. त्यामुळे एकीकडे शिक्षण घेत असतानाच ते वडिलांना दुकानदारी सांभाळण्यात मदत करीत असत. पण व्यापाराइतकीच त्यांना शिक्षणातही आवड होती. इयत्ता ४ थी नंतरचे शिक्षण घेण्यासाठी त्यांना भंडारा व नागपूर अशी भटकंती करावी लागली. लाखनीला चौथी नंतरच्या शिक्षणाची सोय नव्हती. त्यामुळे सधन कुटुंबातील मुलेच फक्त भंडारा व नागपूर असा प्रवास करून शिक्षण घेत असत. अशा परिस्थितीत सर्वसाधारण कुटुंबातील मुलांचे चौथी नंतरचे शिक्षण बंद पडत असे.

आपल्या भागाची ही शैक्षणिक दुरवस्था पाहून १० जुलै १९४१ रोजी त्यांनी 'समर्थ विद्यालय' या नावाने स्वत:च्या वाड्यात शाळा सुरू केली व पुढे 'राष्ट्रीय शिक्षण संस्था, लाखनी' या नावाने शिक्षण संस्थेची शासन दरबारी नोंदणी केली.

त्यांच्या आयुष्याची पायाभरणी रा. स्व. संघाच्या शिस्तबद्ध व संस्कारसंपन्न वातावरणात झाल्यामुळे त्यांच्या शिक्षणसंस्थेच्या उभारणीतही अशीच शिस्तबद्ध व संस्कारसंपन्न वातावरणनिर्मिती झाली. मुळातच अंत:करणापासून समाजसेवेची आवड, त्यात संघसंस्कारांची भर व थोरामोठ्यांचा परिचय, तसेच अजोड असे संघटन कौशल्य यांच्या भरवशावर 'राष्ट्रीय शिक्षण संस्था, लाखनीने. अनेक संकटांवर मात करीत प्रगतिपथावर वाटचाल केली.

आजमितीला या शिक्षण संस्थेच्या भंडारा व गोंदिया जिल्ह्यात मिळून ६ विद्यालये, ६ कनिष्ठ महाविद्यालये, ५ प्राथमिक शाळा, ३ बालकमंदिरे, ४ सार्वजनिक वाचनालये, ५ वसतिगृहे तसेच पदवी व पदव्युत्तर शिक्षणाची सोय असलेले १ वरिष्ठ महाविद्यालय असा घटकसंस्थांचा विस्तार आहे. या संस्थेतून शिक्षण घेतलेले अनेक विद्यार्थी महाराष्ट्राच्या विविध कानाकोपऱ्यात मोठमोठ्या पदांवर कार्यरत आहेत. तसेच या संस्थेतून मिळविलेल्या संस्कारांचा वारसा ते अभिमानाने सांगतात.

बापूसाहेबांच्या या यशस्वी शैक्षणिक वाटचालीत प्रामुख्याने अॅड. भास्करराव निनावे, रामभाऊ ढेंगे, गोविंदराव पोहरकर, देवरावजी चेटुले यांचा तसेच घटकसंस्थांच्या विविध पदाधिकाऱ्यांचा मोलाचा वाटा आहे. कोणतेही मोठे कार्य यशस्वी होण्यासाठी एकाचा निर्धार व अनेकांचे सहकार्य आवश्यक असते व असे सहकार्य मिळविण्यासाठी निर्धार करणारी व्यक्ती कुशल संघटक असावी लागते. बापूसाहेब त्या अर्थानेच कुशल संघटक, समाजसेवाव्रती लोकनेते होते.

त्यांनी शिक्षणाबरोबरच अनेक क्षेत्रात तितक्याच तळमळीने आपले अमूल्य योगदान दिले आहे. पत्रकारिता, सहकारक्षेत्र, कृषिक्षेत्र, साहित्य चळवळ, राष्ट्रभाषा प्रचारसमिती यातही त्यांचे शिक्षणक्षेत्राइतकेच भरीव योगदान आहे.

त्यांच्या या उल्लेखनीय कामगिरीबद्दल महाराष्ट्र शासनातर्फे १५ ऑगस्ट १९६७ रोजी त्यांना आदर्श शिक्षकाचा राज्यपुरस्कार देऊन गौरवित करण्यात आले. विमा व्यवसायातही उत्कृष्ट कामगिरी बजावल्याबद्दल ३१ जानेवारी १९८५ ला औरंगाबाद येथे त्यांचा सत्कार करण्यात आला. तसेच २६ सप्टेंबर १९९३ रोजी मा. बा. गांधी प्रतिष्ठानचा 'कुष्ठमहर्षी डॉ. शिवाजीराव पटवर्धन वयोवृद्ध समाजसेवक पुरस्कार' त्यांना प्रदान करण्यात आला. याशिवाय अनेक छोट्या – मोठ्या संस्थांनी त्यांना विविध प्रसंगी गौरवांकित केले आहे.

भंडारा जिल्ह्यातील अनेक संस्थांच्या उभारणीत लाखनीकर यांचे मोलाचे योगदान होते. 'उपासनेला दृढ चालवावे, सत्कर्म योगे वय घालवावे' हे समर्थ रामदासस्वामींचे वचन, हा त्यांचा आवडता श्लोक होता.

– डॉ. संजय गोविंदराव पोहरकर



ल

☞



पूरणमल सूरजमल लाहोटी यांनी तत्कालीन हैदराबाद (निजामशाही) आणि आताचा मराठवाडा या विभागात शिक्षणक्षेत्रासाठी दिलेले योगदान लक्षणीय आहे. व्यवसायात स्वकष्टाने कमावलेल्या संपत्तीचा उपयोग त्यांनी मागासलेल्या मराठवाड्यात शिक्षणप्रसारासाठी केला. सुरुवातीला या विभागाचे तत्कालीन नेते स्वामी रामानंद तीर्थ यांच्या शैक्षणिक संस्थांना आर्थिक मदत दिली.

नंतर १९४० ला त्यांनी लातूरला श्री मारवाडी राजस्थान शिक्षणसंस्था स्थापन करुन श्री मारवाडी राजस्थान विद्यालयाची उभारणी केली. या दोन्ही संस्थांना आवश्यक ते सर्व आर्थिक पाठबळ पूरणमल यांनीच दिले.

आज अनेक दशकानंतरही लातूरचे हे विद्यालय राज्यातले दर्जेदार शिक्षण देणारी शाळा म्हणून ओळखले जाते.

सुमारे ५०/५५ वर्षापूर्वी मुलींच्या शिक्षणाबाबत मराठवाड्यातील समाजाची मानसिकता तशी निरुत्साहीच होती.

राजा पूरणमल यांनी मात्र द्रष्टेपणाने स्त्रीशिक्षणाचे महत्त्व ओळखले होते. राजस्थान विद्यालय स्थापनेच्या सुमारासच त्यांना समजले की, त्यांच्या एका स्नेह्याच्या पत्नी सुशीला दिवाण या आपल्या घरीच काही मुलींना शिकवतात. पूरणमल यांनी दिवाण यांच्याशी चर्चा केली आणि मुलींसाठी वेगळी शाळा उभारण्याचा निश्चय केला. त्यांच्या अथक प्रयत्नांनी १९४६ ला लातूरमध्ये श्रीमती गोदावरीदेवी लाहोटी कन्या विद्यालय सुरू झाले. सुरुवातीची काही वर्षे या विद्यालयाचा आर्थिक भार पूरणमल यांनी स्वतः उचलला. पूरणमल यांनी शिक्षणाविषयीची आस्था त्यांचे स्नेही आणि मराठवाड्याचे अग्रणी नेते बाबुरावजी परांजपे आणि चंद्रशेखर बाजपेयी यांना माहिती होती. पूरणमल यांच्या निधनानंतर त्यांचे स्मारक म्हणून या दोन स्नेह्यांनी १९५६ ला पूरणमल लाहोटी तंत्र निकेतनची स्थापना केली. त्यानंतर ते तंत्रनिकेतन १९६२ ला राज्यशासनाकडे सोपवण्यात आले.

राजा पूरणमल यांनी उभारलेल्या शिक्षणाचा हा वटवृक्ष आता बराच विस्तारला आहे. या संस्था लातूरच्या श्री मारवाडी राजस्थान शिक्षणसंस्थेशी संलग्न आहेत. श्री मारवाडी राजस्थान विद्यालय, श्रीमती गोदावरीदेवी लाहोटी कन्या विद्यालय, श्री बंकटलाल लाहोटी इंग्लिश स्कूल, श्री पूरणमल लाहोटी पाठशाला, श्रीमती गोदावरीदेवी लाहोटी प्राथमिक विद्यालय, सौ. केशरबाई भार्गव प्राथमिक विद्यालय, श्री बंकटलाल लाहोटी इंग्लीश प्रायमरी स्कूल, श्री पूरणमल लाहोटी बालक मंदीर, श्रीमती गोदावरीदेवी लाहोटी बालक मंदीर, श्री मारवाडी राजस्थान बालक मंदीर, श्री मारवाडी राजस्थान तरण तलाव, श्री मारवाडी राजस्थान हेल्थ क्लब.

हैद्राबाद मुक्ती लढा हा भारतीय स्वातंत्रलढ्याचा एक वेगळा पैलू आहे. राजा पूरणमल लाहोटींना हैदराबाद भारतात सामील व्हावे असेच वाटत होते. व्यावसायिक मर्यादांमुळे ते मुक्तिलढ्यात थेट सहभागी होऊ शकले नाहीत पण त्यांनी अप्रत्यक्षपणे मदत भरपूर दिली. स्वातंत्र्यानंतर काँग्रेस पक्षाने १९५२ ला पूरणमल यांची राज्यसभेवर नियुक्ती केली. आपल्या व्यवसायात कामगारांना समाधानी ठेवण्यावर त्यांचा मोठा भर होता.

प्रत्येक स्तरावरच्या कामगारांच्या कुटुंबियांची ते आवर्जून काळजी घेत. मालकीच्या दोन्ही गिरण्यांमध्ये पूरणमल यांनी कामगारांसाठी निवृत्तीवेतनाची प्रथा सुरू केली.

इतकेच नाही तर शक्य तेवढ्या कामगारांना गिरणी परिसरातच निवासस्थाने बांधून दिली. बऱ्याच वेळी ते कारखान्यातल्या सामान्य उपहारगृहात कामगारांबरोबरच जेवत असत.

– सुधाकर कुलकर्णी

ल



शिक्षणाबाबत लक्षणीय जागृती हा महाराष्ट्राचा, गेली अनेक दशकांपासूनचा, गुणधर्म आहे. मात्र राज्यातल्या शिक्षण प्रसारात बऱ्याच त्रुटी जाणवतात. यातली एक आहे ती शिक्षणापासून आजही वंचित राहिलेल्या समाज घटकांना, त्यांच्या दैनंदिन जीवनसरणीच्या गरजांनुसार, शिक्षणसुविधा पुरवण्याची ! म्हणूनच प्रभाकर लिमये यांची १०० दिवसांची शाळा संकल्पना ही शासनासाठीही पथदर्शी ठरली.

राज्यातल्या भटक्या कामगार वर्गातले कुटुंब फक्त रोजंदारीवर गुजराण करत. जिथे रोजगार मिळेल तिथे स्थलांतर करणे. हा त्यांच्या जीवनशैलीचा स्थायीभाव ठरतो. सर्वसाधारण शेतमजूर, ऊसतोडणी मजूर, खाण कामगार, वीट भट्टी मजूर, बांधकाम कामगार आणि इतर भटके मजूर हे प्रामुख्याने या वर्गात येतात. रोजंदारी चक्रात वर्षातले काही दिवस मोकळे असतात. शिक्षण धोरणानुसार या मोकळ्या वेळात मजुरांच्या मुलांना प्रवेश मिळत नाही. पर्याय म्हणून या मुलांना प्रस्थापित इयत्ता पद्धतीच्या शिक्षणाची संधी उपलब्ध करून देणे हे १०० दिवसांच्या शाळेचे मुख्य ध्येय आहे. प्रस्थापित शैक्षणिक अभ्यासक्रमच या शाळेत शिकवला जातो. फरक आहे तो त्याच्या पूर्ततेत शंभर दिवसांच्या शाळेतील मुलांना हा अभ्यासक्रम वेळेची सोय आणि क्षमता यांनुसार केव्हाही पुरा करण्याचे स्वातंत्र्य मिळते.

प्रभाकर लिमयांचा जन्म कोकणात रायगड जिल्ह्यातल्या पाली इथे झाला. याच परिसरातले डोंगरमाथ्यावरचे, अति दुर्गम आणि छोटसे, पडसरे हे लिमये कुटंबांचे वास्तव्याचे परंपरागत ठिकाण. खोतांच्या वतनदार घराणे असल्याने सुखवस्तु कुटुंब; पुरूषोत्तम आणि उषा हे प्रभाकर लिमयांचे आई - वडिल. वडील भारतीय स्वातंत्र्य संग्रामाच्या १९४२ च्या चळवळीतले स्वातंत्र्यसैनिक. लिमये कुटुंब राष्ट्रीय आणि पुरोगामी विचारांनी भारलेले असल्याने प्रभाकर लिमयांवर तेच संस्कार झाले.

त्यांचे प्राथमिक शिक्षण पुण्यात तर माध्यमिक शिक्षण पाली आणि पुणे इथे झाले. पदवीपर्यंतचे शिक्षण पुण्यातल्या सर परशुराम भाऊ महाविद्यालय आणि फर्गसन महाविद्यालया मध्ये झाले, तर बी.एड. ची पदवी त्यांनी टिळक शैक्षणिक महाविद्यालयातून घेतली. बी.एस्सी., बी.ए., बी.एड्, ही त्याची एकूण शैक्षणिक पात्रता. नवीन समर्थ विद्यालय, तळेगाव दाभाडे इथे सहशिक्षक म्हणून नोकरीला सुरुवात केली. त्यानंतर बावळोलीच्या आदिवासी शाळेचे मुख्याध्यापक झाले. एकूण ३४ वर्षांच्या शिक्षक सेवेनंतर लिमये पुण्याच्या आदर्श शिक्षणसंस्था संचालित शाळेच्या मुख्याध्यापक पदावरून २००१ ला निवृत्त झाले.

शंभर दिवसांची शाळा या संकल्पनेचा उगम एका छोट्या घटनेतून झाला. लिमये आपल्या सात-आठ वर्षांच्या मुलाला घेऊन एकदा कॉफीसाठी उपहारगृहात गेले. तिथे जवळपास त्यांच्या मुलाच्या वयाचाच मुलगा, आताच्या भाषेत बालमजूर, ऑर्डर घ्यायला आला. लिमये यांच्या मनात विचार आला की, हा मुलगा शिक्षणापासून वंचित का राहावा? प्रश्नाचे उत्तर शोधतांना आजच्या शालेय शिक्षण पद्धतीचा विचार अपरिहार्य होता. जून ते मार्च या शैक्षणिक वर्षांच्या वेळापत्रकानुसार शाळेत मुलांची दैनंदिन हजेरी अनिवार्य असते. भटक्या वर्गातली मुले अशी हजेरी लावू शकत नाहीत; कारण शालेय वर्ष हे जून - नोव्हेंबर या शेती हंगामाला समांतर असते. नोव्हेंबरनंतरचा वेळ मोकळा असला तरी या मुलांना शाळेत प्रवेश मिळत नाही. हा मोकळा वेळ १०० दिवसांचा असतो. असा निष्कर्ष लिमये यांनी काढला आणि १०० दिवसांची शाळा या शिक्षणक्षेत्रात मूलभूत तसेच नाविन्यपूर्ण ठरलेल्या प्रकल्पाने आकार घेतला.

नियमित शालेय अभ्यासक्रमाचे पहिले सत्र जून ते नोव्हेंबर असते. याउलट नोव्हेंबर ते फेब्रुवारी हा १०० दिवसांचा कालावधी शेतमजुरांच्या मुलांचा मोकळा वेळ

ल

असतो हे लक्षात घेऊन त्याच काळात प्रभाकर लिमयांचा पडसरेचे गावी पहिली ते पाचवी वर्गासाठी शाळा भरवायचा निर्णय झाला. पडसरेच भौगोलिक स्थान अति दुर्गम या वर्गात मोडणारे आहे.

लिमये यांनी रीतसर नोंदणी करुन श्री बल्लाळेश्वर प्रतिष्ठान नावाने संस्था स्थापन झाली. शिक्षकांनी सलग १०० दिवस पडसऱ्याला जाऊन शिकवणे केवळ अशक्य होते. त्यासाठी गटा-गटाने जाण्याचे वेळापत्रक तयार झाले.वर्षभरासाठी अशा १३२ शिक्षकांचे ३३ गट याप्रमाणे नोव्हेंबर १९८१ ते १९८६ असा पाच वर्षाचा कार्यक्रम आखण्यात आला.

या प्रकल्पातला शिक्षकांचा सहभाग हा नुसताच मानधनाशिवाय नाही तर स्वखर्चाने अपेक्षित होता. योजनेने आकार घेतल्यावर मनुष्यबळासाठी पुण्यातल्या निरनिराळ्या शाळामध्ये जाऊन शाळा व्यवस्थापन आणि शिक्षकांना सहकार्याचे आवाहन करण्यात आले. प्रकल्प पाचऐवजी सहा वर्ष चालला. एकूण ४० शाळांतील ४०० महिला-पुरुष शिक्षकांनी योगदान दिले. यात महिलांचे प्रमाण ८५ टक्के होते.

पुस्तकी अभ्यासाशिवाय पडसरे शाळेतील मुलांवर स्वच्छता, व्यायाम, प्रार्थना, खेळ, गाणी, गोष्टी, परवचे, पाढे असे बाल्यसुलभ संस्कार व्हावे अशी कल्पना अंमलात आली. यासाठी रविवार ते रविवार असे ८ दिवस नियमित शाळेतल्या सातवी - आठवीच्या मुलांनी गटा-गटाने स्वखर्चाने सहभाग घेतला. यात त्या मुलांची स्वतःची शाळा काही दिवस चुकणे अपरिहार्य होते. हा चुकलेला अभ्यास भरुन काढण्याच्या निश्चयाने पाच वर्षात पुण्यातल्या ५०० मुलांनी १०० दिवसांच्या शाळेला आपले योगदान दिले.

शंभर दिवसांची शाळा या अभिनव कल्पनेच्या मूर्त स्वरुपाला आर्थिक आधार दिला तो पुण्यातल्या निवडक दानशूर उद्योजकांनी!

पुण्याहून येणाऱ्या शिक्षक आणि विद्यार्थ्यांच्या निवास आणि भोजनाची जबाबदारी पडसरेच्या ग्रामस्थांनी पूर्ण पाच वर्ष आनंदाने स्वीकारली. परतीच्या प्रवासात जागा मिळेल याची काळजी परिवहन मंडळाच्या कर्मचाऱ्यांनी घेतली.

ऊसतोडणी कामगार यांनाही कामासाठी हंगामाप्रमाणे मुला-बाळांसह सतत स्थलांतर करावे लागते. शेतमजुरांच्या मुलांसाठीचा १०० दिवस शाळेचा प्रयोग या ऊसतोडणी मजूरांच्या मुलांसाठीही करावयाचा निर्णय श्री बल्लाळेश्वर प्रतिष्ठानने घेतला. साखर शाळा या नावाने १९८५ ला सुरु झालेला हा प्रकल्प आजही ज्ञानप्रबोधिनी शाळेच्या प्रगती गटातर्फे सुरु आहे. याबरोबर खाण कामगारांसाठी भोंगा शाळा, बांधकाम कामगारांसाठी बांधकाम, तर वीट भट्टी कामगारांसाठी वीटभट्टी शाळा हे उपक्रम काही स्वयंसेवी संस्था विकसित करत आहेत.

श्री लिमयांची शाळा सहा वर्षे सुरू होती. याच काळात शाळेला शासनाची मान्यता मिळण्यासाठी प्रयत्न झाले. त्यानंतर १९९० च्या सुमारास या शाळेचा दाखला नियमित शाळांमध्ये स्वीकारण्याची मान्यता शासनाकडून मिळाली. याचा फायदा मुलांना पुढील शिक्षणासाठी झाला. काही वर्षातच शासनाने प्रशासकीय तरतूद करुन पर्यायी शाळांना मान्यता दिली. आज महाराष्ट्रात असलेले मुक्त विद्यापीठ हे लिमये सरांच्या १०० दिवस शाळेचे 'विस्तारलेले' रूप आहे.

शिक्षणात नाविन्य (इन्होवेशन इन एज्युकेशन) या विषयावर राष्ट्रीय शिक्षण परिषद एन.सी.ई.आर.टी दरवर्षी राष्ट्रीय स्पर्धा घेते. या स्पर्धेत प्रभाकर लिमये यांनी सलग तीन वर्ष पारितोषिके मिळवली आहेत. शंभर दिवसांची शाळा या उपक्रमावर त्यांच्या मुलाखती आणि व्याख्याने राज्यभर आयोजित झाली आहेत. युनिसेफ या संयुक्त राष्ट्र संघटनेने १०० दिवस शाळा प्रकल्पाचा सखोल अभ्यास करुन अहवाल तयार केला आहे.

– सुधाकर कुलकर्णी

ल

रजनी नागेश लिमये ह्या पूर्वाश्रमीच्या रजनी दातिर. त्यांचे प्राथमिक शिक्षण नाशिकच्या सरस्वती मंदिरात झाले. त्यांच्या वडिलांची नोकरी बदलीची असल्याने माध्यमिक शिक्षण पुणे, पंढरपूर, पनवेल येथे झाले. सन १९५४ मध्ये



पनवेलच्या के. व्ही. कन्या विद्यालयातून त्या माध्यमिक शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाल्या. त्यावेळी ठाणे केंद्राच्या गुणवत्ता यादीत त्या प्रथम क्रमांकाच्या मानकरी होत्या. नाशिक येथील एच.पी.टी. महाविद्यालया मधून मराठी व संस्कृत विषय घेऊन त्या एम. ए. झाल्या. कोल्हापूरच्या शिक्षक प्रशिक्षण महाविद्यालयातून त्यांनी बी.एड. पदवी संपादन केली.

१९६४ मध्ये नाशिकच्या पुष्पावती रुंग्टा कन्या विद्यालयात शिक्षक म्हणून त्यांनी कामास सुरुवात केली. इंग्रजी, मराठी व संस्कृत ह्या भाषांच्या उत्तम शिक्षिका म्हणून त्यांचे नाव झाले. माध्यमिक शालान्त परीक्षा मंडळाच्या गुणवत्ता यादीत चमकणाऱ्या अनेक विद्यार्थिनींना त्यांचे मार्गदर्शन लाभले. शिक्षक मार्गदर्शन शिबिरातही तज्ज्ञ मार्गदर्शक म्हणून त्या काम करीत होत्या.

पण याच वेळी नर्सरीत शिकणारा त्यांचा मुलगा गौतम हा मतिमंद आहे हे स्वीकारण्यास अत्यंत कठीण असे वास्तव त्यांच्यासमोर आले. या वास्तवाचा रजनीताईंनी स्वीकार केला आणि हे आव्हान समजून जानेवारी १९७७ मध्ये दातिरांच्या बंगल्यातील एका खोलीत त्यांनी मतिमंद मुलांसाठी शाळा सुरू केली. रजनीताईंबरोबर नागपूरच्या 'नंदनवन' संस्थेत प्रशिक्षण घेऊन आलेल्या अहोर नावाच्या शिक्षिका होत्या. दोघींनी मुलांच्या क्षमतेप्रमाणे शिकविण्यास सुरुवात केली. मुलाचे मतिमंदत्व स्वीकारून मुलांविषयी जागरूक असणाऱ्या पालकांमुळे मुलांची संख्या वाढत गेली. मतिमंद मुलांच्या शिक्षणाच्या संदर्भात विशेष प्रशिक्षण घेतलेल्या शिक्षिकांच्या सहकार्याने शाळेला स्थिरता प्राप्त झाली.

रजनीताईंनी 'प्रबोधिनी न्यास' संस्थेची स्थापना केली व कार्यवाह म्हणून त्या काम पाहू लागल्या. १९८३ मध्ये नगरपालिकेने नव्या पंडित कॉलनीतील जागा संस्थेसाठी दिली. त्या वेळचे महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल लतीफ ह्यांच्या हस्ते भूमिपूजन झाले. अवघ्या दोन वर्षांत आदरणीय तात्यासाहेब शिरवाडकरांच्या हस्ते 'प्रबोधिनी न्यास'च्या इमारतीचे उद्‌घाटन झाले. ह्याच वर्षी म्हणजे १९८६ मध्ये रजनीताईंचा केंद्र सरकारच्या आदर्श शिक्षक राष्ट्रपती पुरस्काराने गौरव झाला, तर १९८८ मध्ये मागासवर्गीय जनतेसाठी केलेल्या कार्याबद्दल त्या 'दलित मित्र पुरस्कारा'च्या मानकरी ठरल्या.

१९८९ मध्ये पुष्पावती रुंग्टा कन्या विद्यालयाच्या उपप्राचार्या म्हणून काम करीत असताना रजनीताईंनी स्वेच्छा निवृत्ती घेतली व संपूर्ण वेळ प्रबोधिनीच्या कार्यास वाहून घेतले. प्रबोधिनी न्यासाच्या त्या कार्यवाह होत्याच. पण 'प्रबोधिनी शिक्षक प्रशिक्षण केंद्रा'ची स्थापना करून त्याच्या प्रमुख समन्वयिका म्हणून त्यांचे काम वेगाने सुरू झाले. पुण्याच्या कामायनी प्रशिक्षण महाविद्यालयातून डी.टी.एम.आर. म्हणजे डिप्लोमा इन टीचिंग ऑफ मेंटली रिटार्डेड ही पदविका प्रथम क्रमांकाने त्यांनी ह्यापूर्वीच मिळविली होती.

या शाळेत मुलांचा शैक्षणिक प्रवास, शारीरिक विकास, स्वावलंबन, मनोसामाजिक कौशल्य, संपर्क कौशल्य या चार प्रमुख उद्दिष्टांच्या पूर्तीच्या दिशेने चालतो. तीन ते अठरा वर्षे वयोगटातील मुले या शाळेत आहेत. त्यांच्या क्षमतेनुसार शिक्षणयोग्य, प्रशिक्षणयोग्य व नुसते सांभाळण्यास योग्य अशा तीन गटांत ही मुले विभागली जातात. त्याप्रमाणे क्रमश: लेखन-वाचन-अंकगणित, व्यवहार करण्यापुरते उद्योग व सांभाळ असे तीन प्रकारचे संस्कार त्यांच्यावर होतात. मानसोपचार, शारिरोपचार या विषयांतील तज्ज्ञांच्या मार्गदर्शनाखाली विद्यार्थ्यांसाठी वेगवेगळ्या अभ्यासक्रमाची योजना करावी लागते. मुलांजवळ असलेल्या बुद्धीचा उपयोग कसा करावयाचा याचे शिक्षण त्यांना देतात. सोपी व पुनरावृत्ती असणारी कामे म्हणजे पॅकिंग, फाईल्स तयार करणे त्यांना शिकवतात. शाळेत इतर सामान्य शाळांप्रमाणेच विविध सणसमारंभ, विविध दिन साजरे केले जातात. ही मुले सहलीचा आनंद घेतात. शिक्षकांच्या खूप मेहनतीमुळे

राख्या, ग्रीटिंग कार्ड्स तयार करतात, धान्ये निवडण्यासारखी कामे करतात. बालवाडीपासून दहावीपर्यंत काही मुले पुढे जातात.

अठरा वर्षे पूर्ण झालेल्या मुलांना शाळेत ठेवता येत नाही. त्यांच्यासाठी नाशिकमधील सातपूर भागात संरक्षित कार्यशाळा आहे. या शाळेत शिवणकाम, बाइंडिंग, सुतारकाम असे व्यवसायशिक्षण दिले जाते. यातून त्यांना स्वत:च्या पायावर काही अंशी उभे राहण्याचा आत्मविश्वास मिळतो. कार्यशाळेच्या शेजारच्या जागेत मुलांसाठी वसतिगृह आहे. तिथे वीस मुलांची सोय आहे. सर्व मिळून दीडशे मुलांची मान्यता संस्थेला मिळाली आहे.

शिक्षक प्रशिक्षण केंद्रातून दरवर्षी वीस शिक्षकांना प्रशिक्षण दिले जाते. या केंद्रास दिल्लीच्या 'राष्ट्रीय पुनर्वास संस्थाना'ची मान्यता मिळाली आहे. शिक्षकांना स्पेशल डी.एड. पदविका मिळते. सर्व शिक्षण अभियानांतर्गत जिल्हा परिषदांच्या, नगरपालिकांच्या शाळांतून मोबाईल टिचर म्हणून नोकरी मिळते. शिक्षकांच्या बरोबरीने पालकांचे मोठे सहकार्य ह्या सर्व गोष्टींत महत्त्वाचे ठरते.

हा सर्व कार्यभार यशस्वीपणे सांभाळणाऱ्या रजनीताईंमधील लेखिका, कवयित्रीही जागी आहे ह्याचा प्रत्यय 'गोधूलि गाणी' (बालकांची गाणी) व 'जागर' (मतिमंदांच्या क्षेत्रात पंचवीस वर्षांत आलेल्या अनुभवांचे चित्रण) ह्या त्यांच्या पुस्तकांतून येतो.

प्रबोधिनी न्यासाच्या विकासासाठी रजनीताईंनी अमेरिका, इंग्लंड, कॅनडा ह्या देशांचा चाळीस दिवसांचा अभ्यासदौरा केला. तेथील विविध प्रशिक्षण व पुनर्वसन केंद्रांना भेटी दिल्या. सिंगापूर, दिल्ली येथील आंतरराष्ट्रीय परिसंवादात 'कौटुंबिक सहानुभूतीची आवश्यकता' ह्या विषयावर त्यांचे निबंध वाचन झाले. राष्ट्रीय न्यासाच्या जिल्हा समिती सदस्या, प्रबोधिनी पालकसमितीच्या अध्यक्षा म्हणून रजनीताई काम करीत आहेत.

रजनीताईंच्या ह्या विशेष कार्यासाठी लोककल्याण पुरस्कार, श्यामची आई पुरस्कार, संस्कृतीवैभव पुरस्कार अशा अनेक पुरस्कारांनी त्यांचा सार्थ गौरव झाला आहे.

– प्रा. सुहासिनी पटेल

ल



वैजयंती दत्तात्रेय लेले ह्या पूर्वाश्रमीच्या प्रभावती विनायक नेने. त्यांचे सर्व शिक्षण नाशिकमध्ये झाले. एन. इ. आय. गर्ल्स हायस्कूल मधून त्या एस.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण झाल्या. त्यानंतर त्यांनी लेडिज टेलरिंग डिप्लोमा हा कोर्स पूर्ण केला. १९५५ मध्ये त्यांचा विवाह नाशिकमधील नाक, कान, घसा तज्ज्ञ डॉ. दत्तात्रेय. ना. लेले ह्यांच्याशी झाला. विवाहानंतर त्यांनी श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठाची बी. ए. पदवी संपादन केली.

त्या काळात नाशिकमध्ये कर्णबधिरांच्या शिक्षणाची कोणतीच सोय नव्हती. अशा मुलांसाठी असणाऱ्या आधुनिक शिक्षण पद्धतींची ओळख करून घ्यावी, त्यांचे श्रवणालेख काढण्याचे तंत्र आत्मसात करता यावे म्हणून डॉ. लेले व वैजयंती लेले इंग्लंडला गेले. तेथे लेस्टर, प्रेस्टन, ब्लॅकबर्ग, लंडन, ड्युसेलडार्फ इत्यादी ठिकाणच्या कर्णबधिर मुलांच्या शाळांना, केंद्रांना त्यांनी भेटी दिल्या. भारतात परत आल्यानंतर वैजयंतीताईंनी डॉ. लेले यांच्या दवाखान्यात येणाऱ्या प्रा. ओझा यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी मिळविलेल्या तंत्राचा उपयोग कर्णबधिर मुलांसाठी करण्यास सुरुवात केली. डॉ. लेले यांच्या 'आदिवासींची श्रवणशक्ती व संबंधित समस्या' या प्रकल्पात वैजयंतीताई काम करू लागल्या.

नाशिकमध्ये कर्णबधिर मुले व त्यांचे पालक यांच्यासाठी त्यांनी अनेक शिबिरे घेतली. पालकांच्या विनंतीवरून व डॉ. लेले यांच्या मातोश्री श्रीमती माई लेले यांच्या प्रेरणेने १९७५ मध्ये वैजयंतीताईंनी 'श्री. माई लेले श्रवणविकास संस्थे'ची स्थापना केली. रचना विद्यालयाच्या एका खोलीत महाराष्ट्र समाज सेवा संघाच्या वतीने शाळा सुरू झाली. त्यावेळी विद्यार्थ्यांची संख्या होती सात आणि वैजयंतीताई

या एकच शिक्षिका. त्यांनी टीचर ऑफ डेफ ही पदविका मिळविली होतीच. कर्णबधिरांचे शिक्षण म्हणजे त्यासंबंधी लोकशिक्षण, व्यवसाय शिक्षण, संशोधन व ग्रामीण विकासासाठी योजना ह्या व्यापक विचारातून कर्णबधिरांच्या शिक्षणास सुरुवात झाली. नाशिक रोटरी क्लबने ग्रुप श्रवण यंत्र, स्पीच ट्रेनर इत्यादी आधुनिक उपकरणांच्या स्वरूपात संस्थेस देणगी दिली. १९७७ मध्ये विद्यालयास सरकारी मान्यता मिळाली. विद्यार्थी संख्या वाढत गेली.

१९७९ मध्ये वैजयंतीताईंनी वॉशिंग्टन येथील गॅलोडेट कॉलेजच्या-विश्वविख्यात-संस्थेच्या निमंत्रणावरून अमेरिकेचा दौरा केला. त्यात कर्णबधिरांचे शिक्षण, त्यांच्या समस्यांविषयी लोकशिक्षण, त्यांचे लैंगिक शिक्षण, प्राथमिक शिक्षण पद्धती यांचा अभ्यास केला. लॉस एंजल्स येथील जगद्विख्यात ‘जॉन ट्रेसी क्लिनिक’ ला भेट देऊन ‘टपालाद्वारे कर्णबधिरांच्या पालकांच्या साहाय्याने त्यांचे शिक्षण’ या अभ्यासक्रमाची माहिती घेतली.

विद्यालयाची विद्यार्थी संख्या एकशे चाळीसपर्यंत गेली. प्रशिक्षित शिक्षक नेमले. वैजयंतीताई शाळेच्या मुख्याध्यापिका म्हणून काम पाहू लागल्या. शाळेत पाचवीपर्यंत शिक्षणाची सोय होती. दृक्‌श्राव्य साधने, संगीतासाठी वाद्ये, स्लाईड शो, अशा शैक्षणिक साहित्याचा वापर होऊ लागला.

इतर सामान्य शाळांसारखेच १५ ऑगस्ट, २६ जानेवारी, गणेशोत्सव, दहीहंडी, रक्षाबंधन असे कार्यक्रम होऊ लागले. सांस्कृतिक कार्यक्रमांतून मुलांमध्ये आत्मविश्वास निर्माण करण्याचे प्रयत्न स्वत: वैजयंतीताईंच्या नियोजनातून होऊ लागले. विविध स्पर्धांमध्ये मुले भाग घेऊन पारितोषिके मिळवू लागली. कलागुणांचा शोध घेण्याच्या हेतूने चित्रे, भेटकार्डे, स्टिकर्स तयार करण्याचे शिक्षण देण्यास सुरुवात केली. त्यातून निधिसंकलनही होऊ लागले. वैजयंतीताईंनी स्वत: शिवणकामाचा डिप्लोमा घेतलेला असल्याने त्या शिवणकाम, कटिंग शिकवीत. त्यांना संगीताची जाण असल्याने त्या माध्यमातून शिक्षणात गोडी निर्माण करण्याचे प्रयत्नही होत होते. सहलींचा उपयोग नव्या अनुभूतीतून नवीन भाषासमृद्धीसाठी करण्याकडे त्यांचा कटाक्ष असे. सूर्यनमस्कार, योगाच्या शिक्षणातून विद्यार्थी शारीरिक व मानसिक दृष्ट्या आरोग्य मिळवू लागले. शिशुगटातील मुलांसाठी शाळापूर्व भाषा शिक्षण उपक्रम त्यांनी सुरू केला. बुद्ध्यांक अधिक असणाऱ्यांसाठी वाचनाची आवड व त्यातून संभाषणास उद्युक्त करण्याची योजना आखली. आज खाद्यपदार्थांची दुकाने, ग्राहक पेठ यांचा अनुभव ही मुले घेतात. साबण, फिनेल सारख्या वस्तूही तयार करतात.

१९७९ मध्ये नाशिकला राज्यस्तरीय कर्णबधिरांच्या शिक्षकांचे शिबीर स्वत: वैजयंतीताईंनी घेतले. एन.सी.ई.आर.टी.दिल्ली या संस्थेने आयोजित राष्ट्रीय स्तरावरील कार्यशाळेत संशोधन प्रकल्प सादर केले. या सर्व शैक्षणिक कार्यासाठी लायन्स क्लब, नाशिक नागरिक शिक्षक गौरव समिती अशा संस्थांच्या वतीने वैजयंतीताईंचा आदर्श शिक्षक पुरस्कारांनी गौरव करण्यात आला होता.जागतिक अपंग दिनाच्या निमित्ताने अंध, मतिमंद मुलांबरोबरही कार्यक्रम करण्याची वेगळी योजना वैजयंतीताईंनी आखली, ती आजही प्रत्यक्षात येते. पालक मेळावे घेतले जातात. राज्यस्तरीय ‘ओष्ठवाचन स्पर्धा’ हा आणखी एक उपक्रम.

१९८१ मध्ये वैजयंतीताईंनी ‘डॉक्टर, बाळ बोलत नाही!’ हा दूरदर्शन चित्रपट तयार केला. कर्णबधिरांचे निदान व शिक्षण ह्या विषयावरील मराठीतील हा पहिला चित्रपट. ‘चंद्रावरील ससा’ व ‘गंगामाय-गंगामाय’ या नाटिका त्यांनी लिहिल्या व सादर केल्या.

आज वैजयंतीताईंच्या प्रयत्नातून नाशिकच्या मध्यवर्ती भागात सात हजार चौरस फुटांच्या जागेत माई लेले श्रवण विकास विद्यालयाची सुसज्ज इमारत उभी आहे. वर्गखोल्यांची रचना वेगळी असून प्रत्येक वर्गात आठ मुले बसतात. कर्णबधिर मुलांच्या गरजांचा विचार करून बांधलेली ही महाराष्ट्रातील एकमेव इमारत आहे. पाचवीपासूनच्या शिक्षणाची सोय रचना विद्यालयात आहे.

एस. एस. सी. परीक्षेला आजपर्यंत पस्तीस मुले बसली व उत्तीर्ण झाली. अनेकजण सर्वसामान्य माणसाचे स्वास्थ्यपूर्ण आयुष्य जगत आहेत. कर्णबधिरांच्या शाळेसाठी विशेष शिक्षण प्रशिक्षण पदविका अभ्यासक्रम सुरू करावा अशी वैजयंतीताईंची इच्छा आता पूर्ण झाली आहे. या महाविद्यालयास दिल्लीच्या भारतीय विकलांग पुनर्वसन संस्थेची मान्यता आहे. जलतरण तलाव, जिमखाना, वसतिगृह, शेतकीप्रधान अभ्यासक्रम, बागकाम शिक्षण या योजना वैजयंतीताईंसमोर होत्या. त्यातील काही प्रत्यक्षात आल्या आहेत.

– प्रा. सुहासिनी पटेल

* * *

ल




## वरखेडे, रमेश नारायण

**शिक्षक, संस्थापक**

**३१ जानेवारी १९५२**



रमेश नारायण वरखेडे यांचा जन्म नाशिक जिल्ह्यातील कळवण तालुक्यातील बेज या गावी झाला. त्यांचे वडील प्राथमिक शिक्षक असल्याने सतत बदल्या होत असत. त्यामुळे वरखेडे यांचे प्राथमिक शिक्षण उमराणे, मोराणे, मुंजवाड, चौंधाणे या गावांच्या जिल्हा परिषदांच्या शाळेत झाले. माध्यमिक शिक्षण बेज गावच्या महात्मा फुले विद्यालयामध्ये झाले. महाविद्यालयीन शिक्षण त्यांनी मालेगाव येथील म.स. गायकवाड महाविद्यालयात घेतले. मराठी विषयात त्यांनी एम. ए. केले त्या वेळी पुणे विद्यापीठात ते पहिले आले व पाच पारितोषिकांचे मानकरी ठरले. 'मराठी काव्यसमीक्षा विचार' या विषयावरील प्रबंध सादर करून वरखेडे त्यांनी पीएच. डी. पदवी संपादन केली.

शिक्षण घेत असतानाच १९७२ ते १९७४ या दोन वर्षांत चाळीसगावच्या आ. वं. विद्यालय येथे लिपिक म्हणून व मालेगावच्या झुं. प. विद्यालयात शिक्षक म्हणून त्यांनी व्यवसायास प्रारंभ केला. नंतर काही वर्षे ठाणे जिल्ह्यातील वाडा येथील वरिष्ठ महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून ते काम करीत होते. १९८८ मध्ये धुळे येथे का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्थेचे संस्थापक संचालक म्हणून वरखेडे यांनी संस्थेच्या कार्याची आखणी व उभारणी केली. खानदेशच्या क्षेत्रमर्यादेतील विविध बोलींचे समाजभाषावैज्ञानिक सर्वेक्षण अभ्यासाचे प्रकल्प सुरू केले. स्थानिक लोकवाङ्मयाचे सर्वेक्षण संपादनाचे काम हाती घेतले. त्यासाठी एम. फिल., पीएच. डी. च्या विद्यार्थ्यांना तयार केले. प्राचीन हस्तलिखितांच्या अभ्यासाचे पायाभूत पुस्तक लिहवून घेतले. महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील मराठीच्या महाविद्यालयीन व विद्यापीठीय शिक्षक-संशोधकांमध्ये वैचारिक अभिसरण व्हावे म्हणून 'भारतीय मराठी अभ्यास परिषद' स्थापन केली. तौलनिक साहित्याभ्यासासारखे अभ्यासक्रम सुरू केले. 'श्रीवाणी' नियतकालिक सुरू केले.

१९९० मध्ये उत्तर महाराष्ट्र विद्यापीठात सामाजिक भाषाविज्ञानाचा अभ्यासक्रम तयार केला. त्यासाठी परिभाषा तयार केली. 'समाजभाषाविज्ञान' 'प्रमुख संकल्पना' हे पाठ्यपुस्तक लिहिले, शिक्षक प्रशिक्षणाची योजना कार्यान्वित केली.

नंतरच्या काळात हा अभ्यासक्रम महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांनी स्वीकारला. प्रसारमाध्यमांतील भाषेचा वापर जनसंज्ञापन व शासन व्यवहारातील मराठीचा वापर लक्षात घेऊन १९८० मध्ये पुणे विद्यापीठात 'व्यावहारिक मराठी' चा अभ्यासक्रम आखण्यात त्यांनी पुढाकार घेतला त्यानुसार पहिले विद्यापीठीय पुस्तक लिहिण्याचा प्रयोग सहलेखकांच्या मदतीने प्रत्यक्षात आणला. असे अभ्यासक्रम यावेत म्हणून विद्यापीठीय अधिकारीमंडळात जाणीव निर्माण करण्यासाठी 'मराठी अन्याय निर्मूलन समिती' स्थापन केली व त्याचे सचिव म्हणून वरखेडे यांनी काम केले.

नाशिक येथील यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांची आखणी, पाठ्यपुस्तकांचे लेखन-संपादन या प्रक्रियेत विद्यापीठाच्या स्थापनेपासून डॉ. राम ताकवले व डॉ. भालचंद्र फडके यांनी वरखेडे

यांना सामील करून घेतले. १९९३ पासून अनुदेशतंत्र विज्ञानाचे प्राध्यापक व 'मानव्यविद्या आणि सामाजिक विद्या शास्त्रे' शाखेचे संचालक म्हणून ते कार्यरत आहेत. स्वयं अध्ययनाच्या पद्धती शिकविण्यासाठी अनुदेशन साहित्याची निर्मिती त्यांनी केली आहे. सामान्यज्ञान व सामाजिक शास्त्रांच्या अधिष्ठान अभ्यासक्रमाची रचना केली. जीवन अभिरुचीसंपन्न करता यावे यासाठी ललितकलांचा अभिजात अभ्यासक्रम तयार केला. नागरिकत्व संस्कारित करणाऱ्या अभ्यासक्रमांची आखणी केली. वृत्तपत्रिका व जनसंज्ञापन, ग्रंथालय व माहितीशास्त्र या क्षेत्रांत महाराष्ट्रांत सर्वप्रथम मराठी पाठ्यपुस्तके उपलब्ध करून दिली. हे सर्व उपक्रम राबवीत असताना सृजनशीलता व सामाजिक बांधिलकी ठेवून नावीन्य निर्माण केले.

नवीन शैक्षणिक तंत्रज्ञान रुजविण्यासाठी नाशिकमध्ये 'इन्स्टिट्यूट ऑफ नॉलेज इंजिनिअरींग' ही संस्था २००२ मध्ये वरखेडे यांनी स्थापन केली. या संस्थेत 'संशोधन कक्ष' निर्माण केला यामुळे नवसंशोधकांच्या प्रशिक्षणास सुरुवात झाली आहे.

'क्रिटिकल एन्क्वायरी' हे आंतर्विद्याशाखीय अभ्यासाचे संशोधनपर नियतकालिक काढून एका नव्या वैचारिक व्यासपीठाची निर्मिती त्यांनी केली आहे.

प्रा. डॉ. वरखेडे यांचे पहिले वैशिष्ट्यपूर्ण संपादन म्हणजे 'अनुष्टुभ्' हे वाङ्मयीन द्वैमासिक होय. त्यांचे संशोधनपर व वाङ्मयीन विषयांवरील अनेक लेख सत्यकथा, आलोचना या नियतकालिकांत प्रकाशित झाले आहेत.

साहित्य अकादमी दिल्ली–मराठी अभ्यासमंडळ, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई–नियामक मंडळ यांचे सदस्य म्हणून व उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, स्वामी रामानंदतीर्थ मराठवाडा विद्यापीठ, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळ व संशोधन मंडळावर ते काम करीत आहेत. यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाचे व्यवस्थापन मंडळ, विद्वत परिषद यांचेही ते सदस्य आहेत. नवीन शैक्षणिक तंत्रज्ञानाच्या दृष्टीने भविष्यातील गरजा लक्षात घेऊन अभ्यासक्रमांची आखणी, पाठ्यपुस्तकांची निर्मिती, अध्ययन–अध्यापन पद्धती, अध्ययन साहित्य निर्मिती, प्रकल्प संयोजन असे विविधांगी कार्य प्रा. डॉ.रमेश वरखेडे आजही करीत आहेत.

– सुहासिनी पटेल

व

## वर्टी, सदानंद गोपाळ

**प्राध्यापक, सामाजिक, राजकीय कार्यकर्ता**

**१ जून, १९१७ – १५ जानेवारी १९९४**



सदानंद गोपाळ वर्टी यांचा जन्म मुंबई इलाक्यातील कारवार तालुक्यातल्या सदाशिव या गावी झाला. कारवारच्या सरकारी विद्यालयामधून ते मुंबई विद्यापीठाची मॅट्रिक परीक्षा कारवार तालुक्यात प्रथम क्रमांक मिळवून उत्तीर्ण झाले. त्यावेळी त्यांना दाभोळकर शिष्यवृत्ती मिळाली होती. वर्टी तल्लख बुध्दीचे असून आपल्या वडिलांचे लाडके होते. वर्टींचे महाविद्यालयीन शिक्षण कर्नाटक महाविद्यालय आणि सेंट झेवियर महाविद्यालयामध्ये झाले. पदवी परीक्षेसाठी त्यांनी इंग्रजी विषय घेतला होता.

शालेय व महाविद्यालयीन जीवनात अभ्यासाव्यतिरिक्त ते सर्व तऱ्हेचे खेळ खेळत, विशेषतः क्रिकेट हा त्यांचा फार प्रिय खेळ होता. गायनाची त्यांना आवड असून कोणत्याही प्रकारच्या गायनाचे त्यांना वावडे नव्हते. शालेय शिक्षण कन्नडमधून झाले. त्यांना कन्नड, कोकणी, मराठी, हिंदी, इंग्रजी भाषा उत्तम अवगत होत्या. मोडी लिपी सुध्दा त्यांना वाचता येत असे. आमदार म्हणून निवृत्त झाल्यावर सहकाऱ्यांच्या आग्रहास्तव त्यांनी एम. ए. ची पदवी घेतली.

१९३९ च्या सुमारास प्राध्यापक वर्टी वसईत आले. प्रथम आर. पी. वाघ महाविद्यालयामध्ये शिक्षक म्हणून दाखल झाले. परंतु स्वातंत्र्य लढ्यात त्यांनी भाग घेतला व त्याबद्दल कारावास भोगला. त्यांचे विचार शाळेत व्यवस्थापनाला पटले नाहीत म्हणून ती नोकरी त्यांना

सोडावी लागली. शैक्षणिक क्षेत्र हे त्यांचे आवडते क्षेत्र होते.

वसई हीच त्यांनी आपली कर्मभूमी मानली. वर्टीसर यांचे जीवन-कार्य म्हणजे वसई तालुक्याचा अर्ध्या शतकाचा इतिहास आहे. मित्रांच्या सहकार्याने वर्टी यांनी वसईत न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना केली. यातूनच शिक्षकी पेशा सांभाळीत नि स्वतःचे शिक्षण पूर्ण करत ते अर्थशास्त्राचे प्राध्यापक बनले. परंतु या क्लिष्ट विषयाबरोबरच मराठी, कानडी, फ्रेंच आणि इंग्रजीवर त्यांचे प्रभुत्व होते. साहित्यावर त्यांचे कमालीचे प्रेम होते. १९५० ते १९७७ पर्यंत माटुंगा येथील पोदार व रुईया महाविद्यालयात त्यांनी अध्यापन केले. न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना त्यांनी विद्यार्थ्यांवर राष्ट्रीय वृत्तीचे संस्कार करावे आणि त्यातून समाजसेवेची आवड निर्माण झालेली नवी पिढी घडवावी या उदात्त उद्देशाने केली. प्राध्यापकी करीत असतानाही त्यांनी अखेरपर्यंत वसईत भाड्याच्या घरात साध्या व सदाचारी राहाणीनेच वास्तव्य केले.

१९७० मध्ये विद्यावर्धिनी या उच्च शिक्षणाला वाहिलेल्या शिक्षण संस्थेची स्थापना भाऊसाहेब वर्तकांनी केली. ते स्वतः या संस्थेचे अध्यक्ष होते. त्यांनी वर्टी यांनी उपाध्यक्ष या नात्याने कार्य करण्यास संमती मिळवली. त्यांनी अखेरपर्यंत उपाध्यक्षपद भूषविले व विद्यावर्धिनीच्या महाविद्यालयाची ग्रंथालये समृध्द केली. शैक्षणिक बाबतीत मोलाचे मार्गदर्शन केले. तंत्रनिकेतन साठी तज्ज्ञ व अनुभवी प्राध्यापकांची निवड करणाऱ्या निवडसमितीची स्थापना केली गेली. या समितीचे अध्यक्ष वर्टीच होते. त्यांनी पोतदार व रुईया महाविद्यालयामध्ये विद्यार्थ्यांना विद्यादानाबरोबर श्रमदानाची दीक्षा दिली. शैक्षणिक क्षेत्राबरोबरच त्यांचे राजकीय क्षेत्रातील कार्य उत्कृष्ट होते.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

## वर्तक, ताराबाई नरसिंह

**सामाजिक कार्यकर्ता, संस्थाचालक**

**१९ ऑगस्ट १९२६ – २९ मे २००८**



ताराबाई या नावाने सर्वत्र ओळखल्या जाणाऱ्या ताराबाई नरसिंह वर्तक यांचा जन्म ठाणे जिल्ह्यातल्या बोर्डी या नयनरम्य निसर्गाच्या सान्निध्यात असलेल्या गावी झाला. त्यांचे वडील आत्मारामपंत सावे व मातोश्री रमाबाई होत.

ताराबाईंचे शालेय शिक्षण बोर्डीच्या सुनाबाई पेस्तनजी हकीमजी विद्यालयामध्ये झाले. आचार्य भिसे गुरुजी, चित्रे गुरुजी व आत्मारामपंत सावे या ध्येयवादी, स्वदेशप्रेमी मंडळीने राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या उद्देशाने स्थापन केलेली व चालवलेली ही शाळा होती. विद्यार्थीदशेतच अभ्यास, खेळ व वक्तृत्व स्पर्धा या सर्वच क्षेत्रात पारितोषिके मिळवून त्यांनी स्वतःचा सर्वांगीण विकास केला. या काळातच ताराबाईंनी स्वातंत्र्य संग्रामात पत्रके घरोघरी वाटून अप्रत्यक्षपणे मदत केली.

१९४४ मध्ये म्हणजे त्यांच्या वयाच्या १८ व्या वर्षी त्यांचा विवाह निष्ठावंत गांधीवादी व थोर स्वातंत्र्य सैनिक अण्णासाहेब वर्तक यांचे सुपुत्र नरसिंह उर्फ भाईसाहेब यांच्याशी झाल्यामुळे शिक्षण तात्पुरते खंडित झाले. दुर्दैवाने त्यांचे पती नरसिंहराव असाध्य रोगाने ग्रस्त आले व ताराबाईंनी अत्यंत निष्ठेने श्रद्धेने व सातत्याने त्यांची शुश्रुषा केली. त्यांची कार्यकुशलता पाहून पद्मभूषण शिक्षणतज्ज्ञ ताराबाई मोडक यांनी या खऱ्या काम करणाऱ्या म्हणून त्यांच्या पाठीवर शाबासकीची थाप दिली. कन्या, गृहिणी व माता या महिलेच्या जीवनातील सर्व भूमिका ताराबाईंनी चोख बजावल्या व त्याचबरोबर शैक्षणिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रात संस्मरणीय कामगिरी केली.

त्यांनी महिला विद्यापीठाची बी.ए. पदवी मिळवली. ताराबाईनी विरार येथे पहिले महिला मंडळ स्थापन करून महिला जागृतीच्या कार्याचा शुभारंभ केला. १९५५ मध्ये

त्यांनी विरार येथे शिशुविहार स्थापन करून बालवाडीचे कार्य प्रारंभ केले. महिला मंडळाच्या कार्याचा विस्तार चालूच होता. त्यांचे प्रोत्साहक व मार्गदर्शक दीर भाऊसाहेब वर्तक यांनी वसई येथे तीन महाविद्यालयांची स्थापना करुन उच्च शिक्षणाची सोय १९७१ मध्ये केली होती.त्यांनीच उच्च तांत्रिक शिक्षणाची योजना आखली व ताराबाईंच्या अथक परिश्रमाने तंत्रनिकेतनची योजना सिद्धीस नेली. डहाणू ते बोरिवली या परिसरात अशा प्रकारची संस्था नव्हत्या.भाऊसाहेब वर्तकांच्या प्रेरणेने स्थापन झालेल्या शिक्षणसंस्था आगाशी – विरार– अर्नाळा या क्षेत्रात आहेत. उच्च तांत्रिक शिक्षणाच्या सोयीमुळे मोठ्या उद्योगधंद्यांमध्ये तंत्रज्ञांच्या नोकऱ्या मिळणे सुलभ झाले. ताराबाईंचे हे कार्य चिरस्थायी स्वरूपाचे आहे. विद्यार्थ्यांना शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देण्याविषयी ताराबाई सतत दक्ष असत. १९५६ मध्ये वर्षभर त्यानी कै. अण्णासाहेब वर्तक स्मारक विद्यामंदिरात विनावेतन अध्यापनाचे कार्य केले होते. विद्यार्थ्यांच्या गुणात्मक प्रगतीकडे ताराबाईंचे कटाक्षाने लक्ष असे.

ग्रामीण व आदिवासी महिलांना सामाजिक न्याय मिळवून देण्यासाठी त्यांनी वनिता विहार मंडळाची स्थापना केली. ग्रामपंचायत ते जिल्हापरिषदेचे अध्यक्षस्थान भूषविण्याचा मान त्यांना मिळाला. समाजकल्याण करणाऱ्या अनेक संस्थांच्या त्या आश्रयदात्या, अध्यक्षा, उपाध्यक्षा, चिटणीस अशा जबाबदारीच्या पदी राहून कार्यरत होत्या. महिलावर्षात त्यांच्या अध्यक्षतेखाली कोसबाड येथे झालेल्या भव्य मेळाव्यात आसपासच्या पाच मैलांच्या परिसरातून सुमारे दोन हजार महिला उपस्थित होत्या. राज्यमंत्री असताना त्यांच्या कारकीर्दीत महिला व बालकल्याणाच्या अनेक कामांना वेग आला. याचे बोलके उदाहरण म्हणजे डहाणूला आज डौलाने उभे असलेले मूक बधिर बालविकास केंद्र होय.

व

कुटुंब नियोजनाच्या उत्कृष्ट कामगिरीबद्दल ताराबाईंना महाराष्ट्र शासनाने १९७३ मध्ये व १९७५ मध्ये असे दोनदा सुवर्ण पदक देऊन त्यांना गौरविले. राज्य व केंद्रीय सामाजिक कल्याण मंडळाच्या त्या सदस्या होत्या. (१९७५ ते १९८०) ठाणे जिल्हा स्त्री शक्ती जागृती समितीच्या १९८० पासून त्या अध्यक्षा होत्या. त्यांनी केलेल्या कार्यामुळेच १९८० मध्ये त्या प्रचंड बहुमताने राज्य विधानसभेवर निवडून आल्या व राज्यमंत्रीपदाची जबाबदारी त्यांनी यशस्वीपणे पेलली.

ताराबाईंचे राजकीय कर्तृत्वही मोठेच होते. संघटना कौशल्य व कार्यक्षमता पाहूनच पक्षश्रेष्ठींनी त्यांना महाराष्ट्र राज्य कॉंग्रेस समितीच्या सरचिटणीसपदी नियुक्त केले होते. इतकेच नव्हे, तर महाराष्ट्र सरकारने त्यांना युरोपातील स्वीडन, नॉर्वे व नेदरलंड देशात अभ्यासासाठी नियुक्त केले होते. (१९८१)

– वि. ग. जोशी

**संदर्भ** :

## वाघ, अनुताई बाळकृष्ण
**शिक्षणतज्ज्ञ**
**१७ मार्च १९१०**



पुण्यातल्या मोरगाव येथील बाळकृष्ण धुंडिराज वाघ व यमुना हे अनुताईंचे जन्मदाते. बुद्धिमान, कष्टाळू, प्रेमळ, उदार व सुधारकी मताच्या वडिलांची वारंवार बदली होत राहिल्याने अनुताईंचे बाळपणचे शिक्षण सुसंगत झालेच नाही. तशातच वयाच्या तेराव्या वर्षी (१९२३) शंकर वामन जातेगावकर यांच्याशी त्यांचा विवाह झाला, परंतु फक्त वरातीच्या दिवशीच सासरचे नाममात्र दर्शन झाले. वय लहान त्यामुळे त्या आपल्या वडिलांकडेच होत्या. मनमाड रेल्वेलाईनवर फिरत असताना जातेगावकरांचे अपघाती निधन होऊन अनुताई विधवा झाल्या. १९२५ ला इगतपुरी येथे व्हर्नाक्युलर फायनल परीक्षेत त्या पहिल्या आल्या. नंतरची तीन वर्षे

पुण्याच्या 'वुमेन्स ट्रेनिंग कॉलेजा'तून शिकताना शिष्यवृत्ती मिळवून जिल्ह्यात पहिली येण्याचा त्यांना मान मिळाला. त्या मोडी शिकल्या, शिवणकामात तरबेज झाल्या.

१९२९ मध्ये प्राथमिक शिक्षक प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण होऊन नाशिकमधील चांदवडच्या शाळेत त्यांनी मुख्याध्यापिका म्हणून नोकरी सुरू केली. १९३३ मध्ये ही नोकरी सोडून त्या पुण्यातल्या हुजुरपागेत गेल्या. तेथे तेरा वर्षात त्यांनी उत्तम शिक्षिका म्हणून नाम कमावले. त्याचबरोबर मुख्याध्यापिका पार्वतीबाई आठवले यांच्या प्रोत्साहनाने रात्रशाळेत जाऊन त्या मॅट्रिक झाल्या.

आचार्य अत्रे यांची कन्या शिरीष पै, डॉ. तारा वनारसे, सिंधु परांजपे, डॉ. सुशीला आगा, मृणालिनी देसाई इत्यादी हुजुर पागेतील आपल्या विद्यार्थिनींचा नामोल्लेख त्या अभिमानाने करतात. यापैकीच कुसुम कारखानीस आता कुसुम नारगोळकर बनून आदिवासींची सेवा करीत आहे. तर लीला गोडबोले या लीला कोसके होऊन कोसबाडच्या संस्थेत प्राध्यापिका म्हणून सेवारत आहेत.

स्वातंत्र्यानंतर 'सुराज्य' निर्माण करण्याच्या स्वप्नाने प्रेरित झालेल्या अनुताई हुजुरपागेतील नोकरी सोडून कस्तुरबा ट्रस्टच्या विद्यमाने मुंबईत बोरिवली येथे आयोजित शिक्षक शिबिरात प्रविष्ट झाल्या. ''म्हणूनच ताराबाईंची भेट झाली. त्या भेटल्या नसत्या तर माझे आयुष्य आज आहे त्यापेक्षा कितीतरी वेगळे झाले असते.'' असे त्या कृतज्ञतेने म्हणतात.

सप्टेंबर १९४५ मध्ये ताराबाईंनी अनुताईंना 'आघाडीचा सैनिक' म्हणून पूर्वतयारीसाठी बोर्डी येथे पाठविले. तेथे त्यांना 'जीवनाचा सूर' सापडला. २४ डिसेंबर १९४५ रोजी बोर्डी येथे बाळासाहेब खेर यांच्या हस्ते बालग्राम केंद्राचे उद्‌घाटन झाले. खेडेगावात बालवाड्या शास्त्रीय रीतीने पण कमी खर्चात कशा चालवाव्यात याचा प्रयोग करणे एवढे उद्दिष्ट होते. त्यातून अनेक समस्या पुढे येत व त्यांची उकल करताना नवे उपक्रम निघत. १९४५ पासून बोर्डीला बारा वर्षे आणि १९५७ पासून आदिवासी वस्तीच्या अंतर्भागात कोसबाड येथे ताराबाई व अनुताई या दोघींनी भारतातील ग्रामीण बालशिक्षणाच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहावे असे प्रयोग केले.

१९४६ मध्ये पाड्यावरची बालवाडी चालवण्यासाठी अनुताईंचा मासिक अर्थसंकल्प तीन रुपये असे. मग त्या कोळशाने भिंतीवर अक्षरे काढीत. माणकूबाई व एक नवतरुणी काकूबाई यांच्याशी मैत्री करून अनुताईंनी गुजराती भाषेशी ओळख करून घेतली व वाचनाने ती वाढवली, प्राथमिक शिक्षिकेचे काम अनुताईंनी अनेक वर्षे केले असले तरी बालमंदिराचे तंत्र त्यांच्यासाठी नवीन होते. शेलतभाईंसारखे अनुभवी व जातिवंत शिक्षक त्यांना लाभले व मोलाचे मार्गदर्शन व सहकार्य मिळाले. १९५० मध्ये अनुताईंनी मुंबईच्या शिशुविहारांचे १ वर्षाचे प्रशिक्षण पूर्ण केले.

या भागातले खरे शिक्षण मुलांना 'माणसात' आणायचेच होते. अनुताईंनी मुलांना आंघोळी घातल्या, मुलींच्या डोक्यातल्या उवा काढल्या, खरजेला औषधं लावली, संडास तयार करून त्याचा वापर कसा करायचा याचे एका लहान मुलाकडून प्रात्यक्षिकही करून घेतलं. साधने मुंबई किंवा बाहेरून विकत न आणता त्यांनी परिसरातूनच करून घेतली.

मातीकाम, टकळीवर सूतकाम, रंगकाम, पिसांच्या जोड्या लावणे, बांगड्यांना दोरे गुंडाळून त्यांच्या रंगजोड्या लावणे, कार्डबोर्डच्या रंगतक्त्या करणे, शंख शिंपले आणून ते निवडणे, फुटके शंख व फुटके दगड ओवणे, शंखांचे आकार व रंगावरून वर्गीकरण करणे, काड्या, पाने, बिया, चिंचोके, पाकळ्या वगैरेंचा उपयोग करून घेतला. बाटलीत रेती भरणे, गोवरी भरडणे, विटकर कुटणे, साबू किसणे असे खेळ सुरू झाले. रंगकामासाठी बांबू फळे व दांतणाचे ब्रश झाले. केळीच्या सोपटाचे बारीक धागे काढून त्याच्या वाट्या-टोपल्या विणणे, खजुराच्या झाडाच्या चटया, डब्या, खुळखुळे करणे, पानांच्या पत्रावळी, द्रोण करणे अशी कामे मुक्त व्यवसायासाठी असत. मातीच्या लहान विटा पाडल्या. छोटी भट्टी मुलांच्या मदतीने केली. रेती-कागदही तयार केला.

व

१९४९ ते ५६ या सात वर्षांत १५ अंगणवाड्या अनुताईंनी चालवल्या. रोज अंगणवाडीत जाताना बादलीत

आरसा, फण्या, तेल, रुमाल, झांजा, हस्तव्यवसायाचे सामान घेऊन, खांद्यावर खराटे, पंखा, झाडू अशा थाटात अनुताई व सहकारी निघत. मुलांची नावेही ठेवलेली नसत. कोणातरी समाजसेविकेला बोलावून सामुदायिक बारसे होऊ लागले. बारा वर्षे हा उपक्रम चालला होता. सापडतील तेथून मुलांना शोधून, स्वच्छ करून आणावे लागे. त्यांना सदा भटकण्याची सवय मग हिंडून परिसर पाहून त्यावर गप्पा, गोष्टी, गाणी, बडबडगीते रचून सांगणे असे उपक्रम केले.

एकदा एका मुलाने म्हटले, ''आम्हाला दिवसा वेळ नाही. रात्री शिकवशील का? तू रात्री बोलावलेस तर आम्ही येऊ.'' मग तो मुलगा २०-२५ मुलांना घेऊन आला व स्वयंभू रात्रशाळा सुरू झाली. मग लेखन, वाचन, नाटक, खेळ, गणित आदी विषयांना सुरूवात झाली. हे विषय सोप्या, मनोरंजक पद्धतीने व कृतीद्वारा घेतले जात. कुरणशाळेच्या कामांबाबत त्या रोजनिशी लिहीत. त्या मुलांना आट्यापाट्या, खोखो, हुतूतू हे मैदानी खेळ आवडायचे. जिल्हा लोकल बोर्डाची कोसबाडची शाळा अनुताईंनी चालवायला घेतली. त्यांनी घरोघरी हिंडून तपास केला.

कॉटेज इंडस्ट्रीजतर्फे ताराबाईंनी २ वर्षांचा सुतारी कामाचा वर्ग चालवला. १७ पैकी १३ विद्यार्थी पास झाले. शाळेत येणाऱ्या मुलांना काम देऊ केले. त्यांना बिल्ला दिला. याचा अनुकूल परिणाम झाला. भाताचे गवत विणून पिशव्या करणे, रद्दी कागदाच्या पिशव्या, पळसाच्या पानांच्या पत्रावळी व द्रोण लावणे अशी कामे काढली. परिसरातील वस्तूंचा उपयोग करून साधने तयार करण्याचे काम शबरी उद्योगालयात होऊ लागले. आदिवासी माणूस स्वाभिमानी, कष्टाळू व प्रामाणिक आहे. त्यांच्या भाकरीचा प्रश्न सोडवणे हे पहिले काम होते. स्वच्छतेची राहणी शिकवणे हेही ओघाने येई. ताईं (ताराबाईं) नी 'विकासवाडी' योजना तयार करून जे.पी. नाईक यांना दाखवून, मंजुरीसाठी पाठवली. ६५ वर्षीय ताईंनी पाऊण लाख रुपये स्वत:च्या हिमतीवर जमवले. राहुरी कृषि विद्यापीठाच्या कृषिकेंद्राकडून अनुताईंना सर्व बाबतीत मदत मिळत असे. रात्रशाळेचे किसानशाळेत रूपांतर झाले होते.

१९६४ मध्ये सुरू केलेले 'ग्रामसेविका विद्यालय (कोसबाड)' हे सबंध भारतात एकमेव होते. १९८० पर्यंत त्यात १७ वर्ग चालले. त्यातल्या प्रशिक्षित मुली महाराष्ट्रभर कामाला लागल्या. युनिसेफच्या मदतीने अनुताईंनी सकस आहार प्रशिक्षण वर्ग चालवला. १० गावात हिंडून महिलांना सकस आहार, बालसंगोपन, बाल आरोग्य वगैरे संबंधी माहिती दिली.

इंडियन कौन्सिल फॉर चाइल्ड वेल्फेअरने 'अंगणवाडी कार्यकर्ता प्रशिक्षण वर्ग' घ्याल का, असे विचारताच अनुताईंनी लगेच होकार दिला. हे चार महिन्यांचे वर्ग आदिवासी वस्तीतून चालवले. सरकारी कागद मिळण्याची व्यवस्था डॉ. चित्रा नाईकांच्या सौजन्याने होताच 'शिक्षक मित्रमालेतर्फे' बालगीते, बडबडगीते, प्रीतिगीते, गोष्टी भाग-२ व भाग-३, सकस आहार गीते, छोटीशी नाटुकली, गंमत जंमत आदी बालवाडी व प्राथमिक शाळेच्या खालच्या वर्गातील मुलांसाठी आणि शिक्षकांसाठी त्यांनी १९८० पर्यंत २५ छोटी पुस्तके प्रकाशित केली. एनसीईआरटी व आयसीसीडब्ल्यूच्या निमित्ताने १९७० ते १९८० या काळात अनुताईंच्या दिल्लीला खूप वाऱ्या झाल्या.

'ऑल इंडिया प्रीस्कूल एज्युकेशन' तर्फे वर्षातून एकदा तीन दिवसांची परिषद असे. हैद्राबाद, इंदूर, बडोदे, अजमेर, बंगलोर इत्यादी ठिकाणी हजर राहून त्यांनी पेपर वाचले, परिसंवादात भाग घेतला, साधनांची प्रदर्शने मांडली. बंगलोर येथे आयोजित अखिल भारतीय शेतकी प्रदर्शनात कोसबाडला पहिले बक्षीस मिळाले. याच परिषदेचे एक अधिवेशन कोसबाडला भरवून ४०० पेक्षा जास्त प्रतिनिधींची सोय करण्यात आली व एकाच प्रकारे कार्यक्रम होतील अशी ५ केंद्रे उभी केली गेली. मुंबई विद्यापीठाचे कुलगुरू त्र्यं. कृ. टोपे या प्रसंगी उपस्थित होते.

ग्रामसेविका, बालसेविका, अंगणवाडी सेविका अशा अनेक प्रकारच्या प्रशिक्षण वर्गातील विद्यार्थिनी 'सर्वच माझ्या मुली' आहेत अशी अनुताईंची आंतरिक भावना

आहे. १८ मार्च १९८० रोजी केंद्रिय समाज कल्याण मंत्रालयातर्फे बाल कल्याण कार्यासाठी राष्ट्रीय पारितोषिक म्हणून २० हजार रुपयांचे रोख पारितोषिक अनुताईंना देऊन त्यांचा गौरव केला गेला. त्यावेळी त्या म्हणाल्या, ''ताराबाई मोडकांनी मला सर्व प्रकारे घडविले. त्या माझ्या ताईंचा आणि त्यांच्या कार्याचाच हा गौरव आहे. ३० ऑगस्ट १९७३ रोजी आपली सर्व प्रेरणा, दुर्दम्य शक्ती आणि आत्मविश्वास माझ्यामध्ये ओतून ताई संस्थेचा भार माझ्या माथी सोपवून निघून गेल्या! त्याच ताईंनी दिलेला पुढील मंत्र मी आजन्म सांभाळून ठेवला.''

'मळलेल्या पायवाटेने कुणीही जाईल. आपल्याला नवी पायवाट पाडायची आहे. तेथे काटेकुटे, खाचखळगे, झाडेझुडपे असणारच ! विषारी जनावरे आणि हिंस्र पशूही असणार. विचाराने आणि निर्धाराने आपण पावले टाकीत गेलो तर हीच (कोसबाड) जागा नंदनवन होईल.'

अनुताईंचे साहित्य (बालसाहित्य व इतर)- टिल्लूची करामत, बाल संवाद, शब्दांची मजा, सकस आहारगीते, प्रौढ शिक्षणमाला, अजब सातभाई, गंमत जंमत, कुरणशाळा, विकासाच्या मार्गावर, आटपाट नगरात, बडबडगीते, बालवाडी कशी चालवावी

– वि. ग. जोशी

**संदर्भ** :

.

## वाघ, कारभारी रंभाजी

**शिक्षक**

**१९ मार्च १८९६ – १९ डिसेंबर १९९२**

नाशिक तालुक्यातील चांदोरी गावात कारभारी रंभाजी वाघ यांचे शिक्षण पुरे होऊन चांदोरीच्या प्राथमिक शाळेत मुख्याध्यापक म्हणून ते काम करीत होते. वाघ गुरुजी म्हणूनच सर्वजण त्यांना ओळखत. कर्मवीर रावसाहेब थोरातांच्या सांगण्यावरून गुरुजींनी मुख्याध्यापक पदाचा राजीनामा दिला आणि नाशिक येथील श्री. उदोजी मराठा विद्यार्थी वसतिगृहांच्या अधीक्षकपदावर १९२६ च्या जून



महिन्यात ते रुजू झाले. वास्तविक मुख्याध्यापक म्हणून त्यांना दरमहा पंचाहत्तर रुपये पगार मिळत होता. पण वसतिगृहाचे अधीक्षक म्हणून केवळ पन्नास रुपयांवर आजन्म सेवा करण्याचा संकल्प त्यांनी केला व तो शेवटपर्यंत पाळला. बहुजनसमाजातल्या शिक्षण प्रसाराला आपला हातभार लागावा व स्वत:ला समाजसेवेला वाहून घेता यावे ह्या उदात्त हेतूनेच गुरुजींनी हे व्रत स्वीकारले. गुरुजी वसतिगृहात गेले आणि वसतिगृहमय होऊन गेले. वसतिगृहात धुळे, जळगाव जिल्ह्यातूनही मुले येत.

वसतिगृहातील 'विद्यार्थ्यांची आई' होऊन गुरुजींनी विद्यार्थ्यांवर प्रेम केले, विद्यार्थ्यांमध्ये वाचनाची गोडी निर्माण व्हावी म्हणून त्यांनी 'तुकाराम वाचनालय' वसतिगृहात सुरू केले. लेखनाची आवड निर्माण व्हावी म्हणून 'श्री उदोजी' नावाचे हस्तलिखित त्रैमासिक काढले. अभ्यासात मागे पडणाऱ्या मुलांना गुरुजी विशेष मार्गदर्शन करीत. देशी खेळांत त्यांना विशेष रस होता. ते स्वत: एक उत्तम आट्यापाट्या खेळाडू म्हणून प्रसिद्ध होते. अनेक देशी खेळ ते मुलांच्या बरोबरीने खेळत. त्यांची शिस्तही अतिशय कडक होती. रात्रीच्या व पहाटेच्या प्रार्थनेला सर्व मुलांनी हजर राहिलेच पाहिजे असा नियम होता.

नुसते पुस्तकी ज्ञान मिळविणे म्हणजे शिक्षण नव्हे ही त्यांची शिकवण. सामाजिक एकतेची व बांधिलकीची जाणीव गुरुजींनी मुलांच्या मनात बिंबवली. धर्म-भेद, जातिभेद त्यांनी मानला नाही. श्रीमंत-गरीब असा भेद केला नाही. मनाला पटलेला चांगला विचार कृतीत आणणे हा त्यांचा स्वभाव होता. महात्मा गांधींनी एका जाहीर सभेत सांगितले, ''आपले दरडोई उत्पन्न केवळ दीड आणा (आजचे दहा पैसे) आहे. त्यात आपण एक वेळचे जेवण घेऊ शकतो.'' हे गुरुजींना पटले आणि त्यानंतर पुढील सर्व वर्षे ते एका वेळचेच जेवण घेत होते.

– प्रा. सुहासिनी पटेल

## वाघमारे, जनार्दन माधव
**प्राचार्य, कुलगुरु**
**११ नोव्हेंबर १९३४**



कौठा ता. औसा जि. लातूर येथे जनार्दन माधवराव वाघमारे यांचा जन्म झाला. निजामाच्या संस्थानिक कालखंडातले इस्लाम रझाकारी यवनी राज्य, शैक्षणिक सुविधांचा अभाव, गावात शाळा फक्त चौथीपर्यंत होती. नंतरचे शिक्षण पानचिंचोली या गावी झाले. १९५७ मध्ये निजाम महाविद्यालय, उस्मानीया विद्यापीठ, औरंगाबाद येथे इंग्रजी अर्थशास्त्र, राज्यशास्त्र हे विषय घेऊन बी.ए. केले. १९५९ मध्ये पुणे विद्यापीठातून इंग्रजीभाषा व साहित्य या विषयात एम.ए.केले. तसेच १९७० मध्ये एलएल.एम. अभ्यास पूर्ण केला. अर्थ, कायदा, राज्यशासन, भा षा अशा विविध विषयांत मुळातच रस असल्याने त्यांनी कायद्यांचा सखोल अभ्यास केला. पुढे १९८० मध्ये 'द प्राब्लेम ऑफ आयडेंटीटी इन द पोस्टवॉर अमेरिकन निग्रो नॉवेल' याविषयात पीएच.डी संपादन केली.

प्राचार्य म्हणून राजर्षी शाहु महाविद्यालय लातूर या पदावर कार्य करण्यासाठी सज्ज झाले.१९७० पासून येथेच प्राचार्य डॉ. जनार्दन वाघमारे यांनी लातूर पॅटर्नची निर्मिती केली. प्राचार्य म्हणून कार्यरत असताना इंग्रजी भाषा आणि साहित्य या विषयांचे पदवीपूर्व, पदवी आणि पदव्युत्तर वर्गास अध्यापन केले. तसेच ३५ वर्षांच्या अध्यापनाच्या अनुभवाबरोबरच शिक्षणक्षेत्रातील प्रशासकीय कामाचा २९ वर्षांचा प्रदीर्घ अनुभव त्यांना आहे. १९७० ते १९९४ कालावधीत तब्बल २५ वर्षे प्राचार्य म्हणुन राजर्षी शाहु महाविद्यालयाचे काम पाहिले.

वाघमारे यांना सर्वच एक विचारवंत म्हणून ओळखतात. नवीन विचार, नवनवीन कल्पना, नवीन प्रकल्प सतत नव्याचा शोध. डॉ. जे. एम. वाघमारे यांची स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड येथे कुलगुरू पदावर नियुक्ती झाली. डॉक्टरांनी कुलगुरु पदावर सन १९९४-१९९९ या कालावधीत अत्यंत सक्रियपणे काम केले. नवीन विद्यापीठात नवनवीन अभ्यासक्रमांचा अंतर्भाव केला. व्यावसायिक व जीवनाभिमुख शिक्षणाची समाजातील गरज लक्षात घेऊन विविध अभ्यासक्रम विद्यार्थ्यांसाठी खुले केले.

शैक्षणिक क्षेत्रातील आपल्या समृद्ध अशा अनुभवातून तसेच शिक्षण, साहित्य, समाजकारण या विषयाचा गाढा अभ्यास यातून जनसामान्यापासून बुद्धिवादी लोकांपर्यंत विचार पोचविण्याकरिता लेखन आणि ग्रंथनिर्मिती केली. यामध्ये -

'अमेरिकन निग्रो, साहित्य आणि संस्कृती', 'महाराष्ट्रातील राजकारण व समाजकारण', 'शिक्षण - समाज परिवर्तन व राष्ट्रीय विकास', 'प्राथमिक शिक्षण - यशापयश आणि भवितव्य', 'साहित्यचिंतन', 'आजचे शिक्षणः स्वप्न आणि वास्तव', 'समाज परिवर्तनाच्या दिशा' इ. होत.

जे.एम.वाघमारे यांनी कादंबरी, व्यक्तिरेखा, प्रवासवर्णन, गौरवग्रंथ, अनुवादन असा साहित्याच्या विविध लेखन प्रकारामध्ये/लेखनशैलीमध्ये साहित्य निर्मिती केली आहे. विविध संशोधन पत्रिका व नियतकालिकातून मराठी आणि इंग्रजी भाषेतून वाङ्मयीन, सामाजिक, राजकीय, शैक्षणिक विषयांवर विपुल प्रमाणात लिखाण प्रसिद्ध झाले आहे.

१९८२ मध्ये 'इंटरनॅशनल एक्सचेंज अँड स्कॉलर्स वॉशिंग्टन' आणि 'युनायटेड स्टेटस् फाऊंडेशन इन इंडिया', न्यू दिल्ली या दोन संस्थांच्या विद्यमाने आयोजित केलेल्या अमेरिका आणि इंग्लंडच्या शैक्षणिक प्रश्नांच्या अभ्यासाच्या फुलब्राईट प्रकल्पात निवड व सहभाग तसेच या प्रकल्पासाठी निवडलेल्या पाच भारतीय शिक्षणतज्ज्ञांच्या गटाचा नेता म्हणून त्यांची निवड झाली. प्रामुख्याने अमेरिकेतील कम्युनिटी कॉलेजांचा आणि इंग्लंडमधील तंत्रनिकेतनाचा विशेष अभ्यास केला. अमेरिका, इंग्लंड या देशातील विविध विद्यापीठ, महाविद्यालयातील शैक्षणिक, सामाजिक, सांस्कृतिक प्रश्नांवर व्याख्याने दिली. काही ठिकाणी शैक्षणिक परिषदा व परिसंवादांमध्ये विचार व्यक्त केले.

ऑगस्ट १९९८ मध्ये कॅनडाची राजधानी ओटा येथे झालेल्या कॉमनवेल्थ राष्ट्रातील विद्यापीठ परिषदेमध्ये (युनिव्हर्सिटीज कॉन्फरन्स)मध्ये सहभाग घेतला.

शिक्षण क्षेत्रात कार्यरत असताना सामाजिक सेवाव्रत त्यांनी सतत लक्षात ठेवले. विविध समाजिक संस्था आणि विविध शासकीय, अशासकीय उच्चस्तरीय महत्त्वाच्या समित्यांवर काम केले आहे. सदस्य, विशेष निमंत्रित, अध्यक्ष, कुलपतींचे प्रतिनिधी म्हणून महाराष्ट्र राज्य नियोजन मंडळ, मुंबई, जिल्हा नियोजन समिती, बीड (परभणी, उस्मानाबाद, लातूर इ.) महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ, समाज प्रबोधन संस्था, पुणे, पुणे विद्यापीठ प्राध्यापक निवड समिती- पुणे.

संपादक मंडळ -महाराष्ट्र शासन गॅझेटीअर्स डिव्हीजन, मुंबई, विद्यापरिषद,सोलापूर विद्यापीठ, यशवंतराव चव्हाण लोकविकास प्रतिष्ठान लातूर, क्वालिटी अॅश्यूरन्स सेल- महाराष्ट्र शासन- मुंबई, मुंबई प्राथमिक शिक्षण अधिनियम मसुदा समिती, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद- पुणे, महाराष्ट्र राज्य उच्च शिक्षण परिषद, मुंबई, सल्लागार समिती-राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण केंद्रशासन, नवी दिल्ली,प्रदेश उपाध्यक्ष-राष्ट्रवादी काँग्रेस पक्ष, मुंबई, यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई ( विभागीय केंद्र , लातूर) या संस्थांमध्ये ते कार्यरत आहेत.

सन १९७०-१९९४ या २५ वर्षांच्या कालावधीमध्ये कुष्ठरोगी,अंध, अपंगांसाठी लातूर येथे सेवा दिली. जाती निर्मूलन, राष्ट्रीय प्रौढ शिक्षण, हमाल पंचायतीची स्थापना व कार्य ( १९८१) यामध्ये सक्रिय सहभाग आहे. १९९३ मध्ये किल्लारी येथे भूकंप झाला. या आपत्तीला तोंड देण्यासाठी सुसज्ज यंत्रणा असायला हवी हे लक्षात घेऊन किल्लारी येथे भूकंपशास्त्र अभ्यास संशोधन केंद्राची स्थापना केली. भूकंपग्रस्तांच्या पुनर्वसनाच्या कार्यासोबत स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाच्या लातुर येथील भूकंपग्रस्त ग्रामपुनर्रचना प्रकल्पाचे कार्याध्यक्ष म्हणून मोलाची कामगिरी त्यांनी केली. भूकंपग्रस्त भागात चलबुर्गा (ता. औसा) येथे जातीपातींना मूठमाती देणाऱ्या ८० घरांच्या राष्ट्रीय सेवाग्राम या अभिनव गावाची राष्ट्रीय सेवा योजनेच्या माध्यमातून निर्मिती (२००१ मध्ये) केली.

सेवानिवृत्तीनंतर बहुमताने ते लातूर नगरपरिषदेचे नगराध्यक्ष झाले. फिरता दवाखाना शहरातील वस्तीमधील गरिबांसाठी सुरु केला, पाणी पुरवठा जलपुनर्भरण योजना, एक खिडकी योजना, नाना - नानी पार्क, लातूर व्हिजन २०२५ यथार्थदर्शी विकास आराखडा इ. अनेक शहराच्या व शहरातील अतिशय शेवटच्या माणसांच्या सेवासुविधांचा विचार करुन योजना राबविण्यात आल्या. अशा या वैशिष्टपूर्ण विविधांगी कार्याचा गौरव म्हणून डॉ. जे. एम. वाघमारे यांना विविध संस्था, व शासनाकडून विविध पुरस्कार व पारितोषिके प्रदान करण्यात आले आहेत. त्यामध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर दलित मित्र पुरस्कार(१९९०) महाराष्ट्र शासन , डॉ. आंबेडकर विशेष सेवा पुरस्कार (१९९४) नवी दिल्ली, मराठवाडा गौरव पुरस्कार(२००१), महाराष्ट्र फौंडेशन पुरस्कार (१९९६), शास्त्री सेवा पुरस्कार, नवी दिल्ली (२००३), महाराष्ट्र भूषण पुरस्कार (२००५) इ. व अनेक पुरस्कारांनी ते सन्मानीत झाले आहेत.

- प्रा. निलिमा साठे - शिंदे

## वाडेगावकर, वामन नारायण

**शिक्षक**

**४ ऑक्टोबर १८९७ -२४ फेब्रुवारी १९६६**



वामनराव वाडेगावकर यांचा जन्म नागपूर येथे झाला. वयाच्या १० व्या वर्षापर्यंत वामनराव वाडेगावकरांना दिसत होते. वयाच्या १० ते १३ वर्षांच्या कालावधीत त्यांची दृष्टी हळू हळू कमी कमी होत गेली. वयाच्या १३ व्या वर्षी त्यांना पूर्णपणे अंधत्व आले. ग्लुकोमा या आजारपणामुळे त्यांची दृष्टी गेली होती. कारण त्या काळात ग्लुकोमावर फारसे प्रभावी वैद्यकीय इलाज नव्हते. वामनरावांचे वडील नारायण दाजीबा वाडेगावकर हे त्याकाळी जिल्हा व सत्र न्यायाधीश

व

होते. त्यांनी वामनरावांना दृष्टिलाभ व्हावा यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. परंतु त्यात त्यांना यश आले नाही. वामनरावांची आई या प्रसिद्ध धोंगे घराण्यातील होत्या.

१९१३ मध्ये वामनरावांनी ब्रेल लिपीचे शिक्षण घेतले. त्यानंतर औपचारिक शिक्षण सुरू झाले. अंध विद्यार्थ्यांमध्ये बोर्डामध्ये मॅट्रिकची परीक्षा देणारे वामनराव हे पहिलेच विद्यार्थी होते. त्यांची परीक्षा घेण्यासाठी स्वतंत्र शिक्षक नेमले गेले.

पुढील शिक्षणासाठी वामनरावांनी मॉरिस महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. बी.ए.एलएल.बी. होऊन वकिली करण्याची त्यांची इच्छा होती. एवढेच नव्हे तर पहिला अंध वकील म्हणून प्रथित यश संपादन करण्याची त्यांची महत्वाकांक्षा होती. परंतु बी. ए. च्या परीक्षेत लेखनिक घेण्याची त्यांना अनुमती मिळाली नाही.

जीवनात आलेल्या अनुभवांनी वामनराव कधीच खचले नाहीत. आपल्या या आगतिक परिस्थितीमुळे १९२८ मध्ये त्यांच्यातील सुप्त कर्तृत्वशक्तीने एकदम उचल घेतली. श्री गणेश चतुर्थीच्या शुभ मुहूर्तावर त्यांनी नागपूर वर्धा मार्गावर एका इमारतीत 'ब्लाईंड रिलीफ असोसिएशन' या संस्थेचा श्रीगणेशा केला. येथे त्यांनी अंध विद्यार्थ्यांसाठी शिक्षणाला सुरुवात केली. सुरवातीला संस्थेत ६ विद्यार्थी होते. अशा प्रकारे त्यांचे निवासी अंध विद्यालय सुरू झाले. विद्यार्थी मिळविण्यासाठी त्यांनी गावोगाव दौरा केला. 'अंध मुलांना जीवानिशी मारू नका. त्यांना माझ्या स्वाधीन करा. त्यांना मी माझ्या अंध विद्यालयात नेतो. त्यांच्या राहण्या खाण्यापासून तर शिक्षणापर्यंतची सर्व व्यवस्था करतो.' अशी आश्वासने ते सतत देत असत. अंध मुलांना एकत्रित करून त्यांना आधार देण्यासाठी त्यांनी जीवाचे रान केले आणि अंध विद्यालयाची संकल्पना पूर्णत्वाला नेली.

अनेक देशात अंधांसाठी राजाश्रयाने चालणारी मोठमोठी अंध विद्यालये आहेत. परंतु अंधत्वाचे दुःख अनुभवणाऱ्या एका तळमळीच्या कार्यकर्त्याने खिशात दिडकी नसतांना सुद्धा समदुःखी मुलांच्या कल्याणासाठी काढलेले अंध विद्यालय हे बहुधा जगातील एकमेव उदाहण असावे.

अंध विद्यार्थ्यांसाठी वाडेगावकरांनी १ ते ७ या वर्गाचा अभ्यासक्रम तयार केला. त्यासाठी त्यांनी लाकडी चौकटीचा उपयोग केला. त्या लाकडी चौकटीत सहा छिद्रे तयार केली. त्या माध्यमातून अंध विद्यार्थ्यांना आकड्यांची ओळख होईल याची व्यवस्था केली. अक्षर ओळख होण्यासाठी दोन लोखंडी चौकटी तयार केल्या त्या चौकटी एकमेकात समाविष्ट होतील याची त्यात व्यवस्था केली. त्यात अनेक छिद्रे करून खिळ्यांच्या माध्यमातून आणि चौकटीत सेंचूरी बोर्ड ठेऊन त्याद्वारे त्यांनी अंध मुलांना अक्षर ओळख करून देण्याची व्यवस्था केली. या पद्धतीमुळे पहिली ते सातवी या वर्गातील अंध विद्यार्थ्यांना लिहिता–वाचता येऊ लागले. त्याचबरोबर त्यांनी अंध विद्यार्थ्यांना चरितार्थासाठी 'व्यावसायिक प्रशिक्षण' दिले. त्यात प्रामुख्याने खुर्च्यांचे केनिंग करणे, खडू तयार करणे इत्यादींचा समावेश होता. अशा प्रकारे अंध मुलांना आपल्या पायावर उभे राहण्याचा आणि सन्मानाने जीवन जगण्याचा मार्ग त्यांनी खुला करून दिला.

१९३६ मध्ये त्यावेळचे आयुक्त स्टेन्ट साहेब यांनी स्वेच्छेने या अंध विद्यालयाला भेट दिली. स्वयंपाकघर, न्हाणीघर, भांडी घासण्याची मोरी, इंधनाची जागा, शौचकूप, अंगण हे सर्वच स्वच्छ, चकाचक असले पाहिजे हा वाडेगावकरांचा आग्रह डोळसांनी निश्चितच शिकण्यासारखा आहे. शौचकूपातील टमरेलाची जागासुद्धा त्यांनी निश्चित केली होती. त्याचे मुख्य कारण म्हणजे अंध मुलाला ते तत्परतेने सापडले पाहिजे. प्रत्येक वस्तू ठराविक जागेवर राहील यासाठी ते आग्रही असत.

वामनराव हे अतिशय शिस्तप्रिय होते. वामनरावांचा व्यवस्थितपणा असा होता की दोन खिडक्यांच्या बरोबर मध्यभागी खुर्ची असली पाहिजे असा त्यांचा आग्रह होता.

वामनरावांनी स्टेन्ट साहेबांना शाळा दाखविली, ब्रेल पुस्तकाचे वाचन, खिळ्यांच्या पाटीवरचे गणित, सुईत दोरा ओवणे, गंजीफ्याची पाने स्पर्शाने ओळखणे, सांगाल त्या क्रमांकाचे गीतेचे आणि मनाचे श्लोक सुरात गाऊन दाखविणे इत्यादी अंध विद्यार्थ्यांची वैशिष्ट्ये आणि संस्थेचे एकूण कार्य पाहून स्टेन्ट साहेब आश्चर्यचकीत झाले. त्यांच्याच पुढाकाराने त्याच वर्षी त्यांना ''रावसाहेब'' हा

व

बहुमानाचा किताब सरकारतर्फे मिळाला. त्यांचा गौरव करण्यात आला. स्वतःच्या विधायक कर्तृत्वाने हा मानाचा किताब मिळविणारे वामनराव हेच पहिले भारतीय अंध कार्यकर्ते होते.

अंध विद्यालय ही अंधांच्या कल्याणासाठी स्थापन झालेली एक मात्र संस्था असली तरी त्यासाठी विद्यार्थी मिळविण्यासाठी सुरुवातीला कित्येक वर्षे वामनरावांना खूप प्रचार करावा लागला. या शाळेत भरती होणाऱ्या अंध मुलांना बाटवून ख्रिश्चन केले जाते असा गैरसमज त्याकाळी अडाणी समाजात पसरला होता. वामनरावांनी ठिकठिकाणी व्याख्याने देऊन आपल्या कार्याचे स्वरूप पटवून देण्यासाठी अपरिमित परिश्रम घेतले.

१९३६ ते १९३८ या काळात ८-१० विद्यार्थ्यांना घेऊन विदर्भातील अनेक गावी वामनरावांनी प्रचाराचा दौरा केला. नागपूरातही नेहमी कोठे ना कोठे अंध विद्यालयाचा मेळा जात असे. त्या प्रसंगी वामनरावांचे कळकळीचे आणि भारदस्त वक्तृत्व ऐकून श्रोते मंत्रमुग्ध होत असत. या प्रचार दौऱ्यात संस्थेविषयी समाजात पसरलेला गैरसमज श्री. वामनरावांनी आपल्या कार्याने, प्रभावाने आणि व्यक्तिमत्वाने दूर केला.

नियतीने वामनरावांना जरी अंध केले असले तरी त्यांची बुद्धिमत्ता, व्यवहारचातुर्य, समजता, स्मरणशक्ती अत्यंत विलक्षण होती. संस्थेच्या सर्व कागदपत्रांची त्यांना खडान्‌खडा माहिती असे. संस्थेचा पत्र व्यवहार, गरजा, प्रगती या सर्व बाबींची माहिती आणि आकडेवारी त्यांना मुखोद्‌गत असे. त्यांच्याशी बोलायला आलेल्या व्यक्तीचे निश्चित वय कोणते हे सुद्धा ते नुसत्या त्याच्या आवाजावरून सांगत असत.

एखाद्या नवीन खोलीत प्रवेश करताच त्या खोलीचे आकारमान ते बिनचूक पणे सांगत असत. परिचित लोक जेव्हा त्यांच्या घरी जाऊन स्वतःची ओळख न देता नुसती त्यांच्याशी हातमिळवणी करीत असत तेव्हा त्यांचा केवळ स्पर्श होताच वामनराव त्या व्यक्तिला न चुकता ओळखीत असत. आपला एखादा अवयव जरी कार्यरत नसला तरी ध्येय पूर्ततेसाठी त्यावर जिद्दीने मात करता येते याचा आदर्श वामनरावांनी समाजासमोर ठेवला आहे.

सार्वजनिक कार्यासाठी वामनरावांनी लोकसंग्रह केला होता. नागपूरातले डॉक्टर, वकील, देशभक्त हे वामनरावांच्या निकट मित्र परिवारात होते. प. पू. सरसंघचालक श्री. गुरूजी, आचार्य दादासाहेब धर्माधिकारी असे अनेक मान्यवर वामनरावांचे परममित्र होते. अंध विद्यालयाच्या प्रारंभी त्यांना या दोघांचे विशेष सहकार्य लाभले.

१९३७ मध्ये क्रांतीकारक 'सेनापती बापट' यांनी अंध विद्यालयास भेट दिली. अंध विद्यालयाचे कार्य पाहून सेनापती बापट अतिशय प्रसन्न झालेत. त्यांनी वामनरावांच्या कार्याची मुक्तकंठाने स्तुती केली. ''वाडेगावकर साहेब, आम्ही जन्मभर केली ती नुसती दांडगाई. तुम्ही करीत आहात तेच खरे कार्य होय''.

वामनरावांनी अंध विद्यालयाचे कार्य अत्यंत निःस्पृहतेने केले. ते अंध विद्यालयाचे मुख्याध्यापक होते परंतु त्यांनी स्वतःचे मानधन मात्र घेतले नाही. शेवटी सर्व विश्वस्तांनी आग्रह केला तेव्हा ते दोन रुपये हे नाममात्र मानधन घ्यावयाचे आणि लगेचच ते अंध विद्यालयाच्या दान पेटीत टाकायचे. ही त्यांची प्रवृत्ती आणि कार्यावरील त्यांची निष्ठा स्पष्ट करते. सामाजिक कार्य करण्याचा एक परमोच्च आदर्श वामनरावांनी समाजासमोर ठेवला.

– मा. त्र्यं. पात्रीकर

**वासवानी, थांबर लिलाराम**
***दादा वासवानी***
***साधू टी.एल. वासवानी***
**२५ नोव्हेंबर १८७९**

☞ **मुख्य नोंद – धर्मकारण खंड**

थांबर लिलाराम ऊर्फ साधू टी. एल. वासवानींचा जन्म हैद्राबादच्या सिंध प्रांतात कार्तिकी एकादशीच्या शुभदिनी झाला. अनेकांशी भ्रातृभाषेने नाते जोडणाऱ्या या मानवतावादी व्यक्तीला सारे 'दादा' या नावानेच ओळखतात. त्यांच्या मनातल्या विश्वबंधुत्वाच्या भावनेपासून कोणतीही जात, पंथ, धर्म, व्यक्ती इतकेच

व



काय पण पशू, पक्षी, निसर्गाचे कोणतेही रूप वंचित राहिले नव्हते.

साधू वासवानी लहानपणापासूनच एकान्तप्रिय होते. सर्वांठायी एकच ईश्वरी तत्त्व आहे अशी त्यांची धारणा होती, म्हणूनच सर्वच प्राणिमात्रांवर त्यांनी आयुष्यभर फक्त निस्सीम प्रेमच केले. लहानपणीच कालिमातेच्या मंदिरात मिळालेल्या प्रसादाचा त्यांनी त्याग केला होता. कारण तो प्रसाद मांसाहारी होता. सर्व प्राणिमात्र आपले बांधव आहेत, या मुक्या प्राण्यांचा घास आपल्या आनंदासाठी घेणे ही गोष्ट त्यांच्या मनाला कदापि रुचणारी नव्हती. म्हणूनच आजन्म शाकाहारी राहण्याची त्यांनी प्रतिज्ञा केली. साधू वासवानी यांचा जन्मदिन जगभरात 'मीटलेस डे' किंवा 'शाकाहारी दिन' म्हणून पाळण्यात येतो. या दिवशी या विश्वातील अनेक लोक आजन्म शाकाहारी राहण्याची प्रतिज्ञा करतात, तशी शपथ घेतात.

लहानपणी शाळेत मास्तरांचा मार खाणाऱ्या थांबरने ठरवून टाकले की मोठे झाल्यावर आपण नव्या शिक्षण प्रणालीने शिक्षण देणारी शाळा काढायची. जिथे मास्तर हातातल्या छडीचा नाही तर प्रेममय वृत्तीचा उपयोग शिक्षण देण्यासाठी करतील. त्यांचे हे स्वप्न 'सेंट मीराज विद्यालयाच्या' रूपाने साकार झाले. ते स्वत: सिंधमधील अ‍ॅकॅडमी नावाच्या शाळेचे विद्यार्थी होते. या शाळेचे मुख्याध्यापक होते संत साधू हिरानंद. त्यांनी व्यसनमुक्तीसाठी शाळेतल्या विद्यार्थ्यांची संघटना बांधली होती, जिचे नाव होते 'बँड ऑफ होप'. साधू वासवानी या संघटनेचे सक्रिय सदस्य होते. सुसंस्कारित जीवनाचा 'श्री गणेशा' अशा प्रकारे शाळेतच गिरवला गेला. शाळेतच ते 'ब्रह्मबांधव' नावाच्या एका ज्ञानी बंगाली व्यक्तीच्या सान्निध्यात आले. या व्यक्तीच्या प्रभावामुळे त्यांना भारतीय तत्त्वज्ञान आणि उपनिषदांच्या अभ्यासाची ओढ निर्माण झाली. त्यांनी आपले सुरुवातीचे एक पुस्तक 'विटनेस ऑफ दि एन्शंट' ब्रह्मबांधवांनाच समर्पित केलेले आहे. असाच प्रभाव डॉ. अ‍ॅनी बेझंट यांच्या वक्तृत्त्वाने त्यांच्यावर टाकला होता. साधू वासवानी यांनी बी. ए. ची परीक्षा उत्तम रीतीने दिली. त्यांना मुंबई विद्यापीठाची 'एलिस शिष्यवृत्ती' प्राप्त झाली होती. ते कराची येथील डी. जे. सिंध महाविद्यालयाचे 'दक्षिणा फेलो' ही होते. १९०२ मध्ये त्यांनी एम. ए. ची पदवी प्राप्त केली.

साधू वासवानींना कोलकत्याच्या प्रसिद्ध मेट्रोपॉलिटन महाविद्यालयाकडून प्रोफेसरच्या सन्माननीय हुद्द्यावर बोलावणे आले. त्यानुसार ते कलकत्ता येथे दाखल झाले. कोलकत्त्यालाच ते चैतन्य महाप्रभूंच्या 'हरि बोल हरि बोल हरि हरि बोल' या मंत्राने मंत्रमुग्ध झाले. त्यांना आपल्या गुरूच्या प्रथम दर्शनाचा लाभ येथेच झाला. हे गुरू होते प्रमोथोलाल सेन; महात्मा केशवचंद्र जैन यांचे पुतणे, ब्राह्मो समाजाचे संस्थापक. ते दिवस 'स्वदेशी' च्या चळवळीचे होते. याच सुमारास टिळक कोलकत्त्याला आले आणि टिळकांच्या व्यक्तिमत्त्वाच्या खोल ठसा त्यांच्यावर पडला. कोलकत्त्यालाच त्यांना रवींद्रनाथ टागोरांच्या सहवासाचा लाभ मिळाला होता. १९०८ मध्ये ते डी. जे. महाविद्यालयाच्या प्रोफेसरच्या हुद्द्यावरच परत रुजू झाले. १९१० मध्ये ते बर्लिनला 'विश्वधर्म' परिषदेस उपस्थित राहिले होते. तेव्हा त्यांनी बर्लिन बरोबरच काही युरोपीय देशांचा दौराही केला होता. १९१४ मध्ये ते लाहोर येथे 'दयालसिंह' महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून नेमले गेले. तेव्हा त्यांचे वय अवघे ३३ वर्षांचे होते. त्यानंतर कुचबिहार ला 'व्हिक्टोरिया महाविद्यालय' आणि पतियाळातही त्यांनी महाविद्यालयात प्राचार्य पद भूषविले. डॉ. शास्त्रींच्या सहयोगाने त्यांनी 'शक्ति आश्रमा'ची स्थापना केली. हा आश्रम खास करून भारतातील युवा शक्तीसाठी कार्यरत होता. 'आजचा तरुण उद्याच्या भारताचा शिल्पकार आहे' या विचारावर त्यांची अढळ श्रद्धा होती म्हणूनच त्यांनी अनेक ठिकाणी 'भारत युवक संघा'ची स्थापना केली.

३ जून १९३३ या दिवशी त्यांनी लहान मुलांच्या शिक्षणांचे स्वप्न पाहिले, त्यांच्यासाठी एक शाळा उघडण्याचे. ४ जून १९३३ रोजी त्यांनी ताबडतोब हे स्वप्न

प्रत्यक्षात उतरवले. वैदिक मंत्रोच्चाराच्या घोषात, पवित्र हवन करून अग्नीच्या साक्षीने त्यांनी 'संत मीरा विद्यालयाची' (सेंट मीराज स्कूल) या मुलीसाठींच्या शाळेची घोषणा केली. संत मीराबाईंचा आदर्श या मुलींसमोर सतत राहावा म्हणून त्यांच्या नावाने 'मीरा मूव्हमेंट' ही शैक्षणिक चळवळ सुरू केली. तिथे मीराबाईंच्या जीवनाला साधेपणा आणि आध्यात्मिक अनुभूतीचा आदर्श मुलींसमोर ठेवण्यात आला. या विद्यालयात मूल्याधिष्ठित ज्ञानप्राप्ती व्हावी म्हणून 'प्रार्थना समयांचे आयोजनही करण्यात आले. ज्याचे निष्ठेने जतन आजही प्रत्येक संत मीरा शाळांतून केले जाते. श्रमदान, पवित्रता, हिंमत, साहस, ज्ञान, साधेपणा ही या शिक्षणप्रणालीची प्रधान अंगे होती, सूत्रे होती. श्रम, बुद्धी आणि भावना यांचा त्रिवेणी संगम या शिक्षण प्रणालीत अभिप्रेत होता. प्राप्त ज्ञानाची परिणती सेवाभावामध्ये व्हावी अशीही त्यांची अपेक्षा होती. मानवतेची सेवा हीच ईश्वर सेवा आहे. अशी त्या मागची शिकवण होती. आज शिक्षण क्षेत्रातल्या या 'मीरा मूव्हमेंट ने (मीरा चळवळ) चांगलाच जोम धरला आहे. आज अनेक सेंट मीराज विद्यालये व महाविद्यालयांच्या कार्याद्वारे 'मीरा मूव्हमेंटचा' वटवृक्ष झाला आहे.

१९३६ मध्ये ऑक्टोबर मध्ये त्यांना उदयपूर येथे एका शिक्षण संमेलनासाठी निमंत्रित करण्यात आले होते तेव्हा साधू वासवानी अत्यंत भावपूर्ण अंत:करणाने चितोडलाही गेले होते. मीरेच्या वास्तव्याने पुनीत झालेल्या वास्तूचे दर्शन तर त्यांनी घेतलेच पण मीरेच्या मंदिराचा जीर्णोद्धारही त्यांनी केला. स्त्रियांमधील चेतनेला स्फुल्लिंगित करून चेतवण्याचे महान कार्य त्यांनी आरंभिले होते. त्याची प्रमुख प्रेरणा 'संत मीराबाई'च होत्या.

१३ फेब्रुवारी १९४९ रोजी साधू वासवानींचे पाय पुण्याला टेकले आणि तेव्हापासूनच 'पुणे' ही त्यांनी आरंभलेल्या महान कार्याची कर्मभूमी झाली. आज पुणेस्थित 'साधू वासवानी मिशन' जगाच्या इतिहासावर एक महनीय कार्य करणारी मानवतावादी सामाजिक संस्था म्हणून गणली जाते. संस्थेची सर्व विद्यालये व पुणे स्थित सेंट मीराज महाविद्यालय आज शिक्षण क्षेत्रात बहुमोल कामगिरी करीत आहे. हजारो मुलींना येथे मूल्याधिष्ठित शिक्षण प्राप्त होत आहे.

या महान संताने १९६६ मध्ये इहलोकाची यात्रा संपूर्ण केली. आज त्यांच्या महान आदर्शांना अनुसरून 'साधू वासवानी मिशन' ची देखभाल त्यांचेच शिष्योत्तम दादा जे. पी. वासवानी करत आहेत.

– डॉ. माधवी वैद्य

## वाळिंबे, सदाशिव चिंतामण

**शिक्षक, संस्थापक**

**१९०८ – ६ मार्च २०००**



स्वभावाने गरीब व कष्टाळू मातोश्रींच्या पोटी एका साधारण कुटुंबामध्ये कोपरगाव जि. अहमदनगर इथे सदाशिव चिंतामण वाळिंबे यांचा जन्म झाला. सुरुवातीपासूनच अभ्यासा बरोबर क्रिकेट व टेनिस यासारख्या खेळांमध्ये त्यांना रुची होती. इ.स. १९२५ मध्ये पुण्याच्या 'नूतन मराठी विद्यालया'तून मॅट्रिकची परीक्षा तर इ.स. १९२७ मध्ये पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामधून इंटर सायन्स व पुढे इ.स. १९२९ मध्ये पदार्थ विज्ञान व रसायन शास्त्र विषय घेऊन बी.एस्सी.ची पदवी संपादिली. सुमारे ५ वर्षे अध्यापनाचे काम केल्यानंतर १९३४ मध्ये बी.टी. चे प्रशिक्षण पूर्ण केले. याच काळात जी.डी.सी. व वी.डी.सी. अँड ए. सारखे लेखा व व्यापारशास्त्राशी संबंधित अभ्यासक्रमही अवगत केले. एक वर्ष कमी वेतन घेऊन मुंबईत त्यांनी बँकेत नोकरी केली.

शिक्षकी पेशाचे हे प्रशिक्षण बी.टी. घेतल्यामुळे शेवटी अहमदनगरच्या 'युनियन ट्रेनिंग कॉलेज'मध्ये गणित व शास्त्र विषयाचे मार्गदर्शक प्राध्यापक म्हणून १९३७ ते १९५२ अशी १५ वर्षे उत्तम शिक्षक घडविण्याचे काम केले. याच काळात 'वाणिज्य पदविके'चा वर्ग चालविण्याचाही प्रयोग

केला. श्रमनिष्ठेवर आधारित व्यावसायिक शिक्षण पद्धती (म. गांधी कृत 'वर्धा योजना') राबविण्याचा प्रयत्न केला. पदवी परीक्षेस 'गणित' स्वतंत्र विषय नसतानाही इ. स. १९४० ते १९६० या कालखंडात व्यावहारिक अंकगणित, स्वावलंबी अंकगणित, प्राथमिक अंकगणित, नागरिकांचे अंकगणित, नवीन व्यावहारिक अंकगणित, अंकगणित, नवीन माध्यमिक भूमिती, नवगणित, भूमिती सारखी पाठ्यपुस्तके (इ. ८ वी ते ११ वी) जोशी, लोखंडे, चितांबर, घारे यांच्या सहकार्याने लिहिली ती सर्व महाराष्ट्रात गाजली.

इ.स. १९५२ ते १९६८ सुमारे १६ वर्षे अहमदनगर येथील 'अमेरिकन मिशन गर्लस् स्कूल'मध्ये गणितासारख्या अमूर्त विषयास मूर्त रूपामध्ये, प्रात्यक्षिकांसह सादर करून मुलींमध्ये आत्मविश्वास रुजविण्याचे काम केले. 'मॅथस् क्लब' व 'वार्ता विहार' सारखे उपक्रम राबवून विद्यार्थिनींमध्ये शिक्षणाविषयीची गोडी निर्माण केली. याच सेवाभावी प्रामाणिक वृत्तीची दखल घेऊन केंद्र शासनाने १९ जाने. १९६० रोजी त्यांना आदर्श शिक्षकाचा पुरस्कार प्रदान केला.

अधिकार आणि हक्काशिवाय केवळ भरपूर काम आणि कमी पगार, नोकरीची शाश्वती नाही अशा विचित्र अवस्थेत असणाऱ्या तत्कालीन शिक्षकांच्या आर्थिक व सामाजिक स्थितीचा अभ्यास करून शैक्षणिक उपक्रमाबरोबरच शिक्षकांच्या आर्थिक स्वस्थतेसाठी प्रयत्न म्हणून इ.स. १९४० मध्ये शहर माध्य. शिक्षक संघांच्या स्थापनेत सदूभाऊंचा पुढाकार होता. इ.स. १९४२ मध्ये या संघाचे जिल्हा माध्य. संघात रूपांतर झाले. इ. स. १९४४ मध्ये शिक्षकांची पतपेढी सुरू होऊन रेशन व कापड दुकाने चालविली गेली. अहमदनगर येथे माध्य. शिक्षक भवनाची कल्पना पुढे आल्यानंतर वाळिंबे, सन १९६० मध्ये रु. ५०० ची देणगी व सन १९६८ मध्ये पुन्हा रु. ५०० ची देणगी देऊन आत्मीक समाधानाचे भागीदार झाले. पुढे मामासाहेब हतवळणेंच्या मार्गदर्शनाखाली रू. ५ लाखाची इमारत उभी राहिली. जिल्हा माध्य. शिक्षक संघाचे कार्यवाह अध्यक्ष, माध्य. शिक्षक सहकारी पतपेढीचे अध्यक्ष, राज्य शिक्षक संघावर जिल्हा प्रतिनिधी इ. विविध पदांचा भार सांभाळीत त्यांनी आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटविला.

शिक्षकांच्या आर्थिक स्थितीचा आढावा घेण्यासाठी सुमारे ७०० शिक्षकांकडून प्रश्नावली भरून घेऊन त्याचा समर्पक अहवाल तत्कालीन 'देसाई समिती' पुढे सादर केला. शिक्षकांच्या भविष्य निर्वाह निधी वेतन उपदान, निवृत्ती वेतन इ. च्या आवश्यकतेवर 'अध्यापक' मासिकामधून वेळोवेळी लेखन केले.

शालान्त परीक्षेच्या वाढीव शुल्का संदर्भात विद्यार्थ्यांची बाजू मांडली. गणित अध्यापन साहित्याचे अहमदनगर येथे प्रदर्शन भरविले. शालान्त परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांना दरवर्षी गणित विषयाचे तसेच एस. टी. सी. च्या विद्यार्थी – शिक्षकांनाही वर्षानुवर्षे मार्गदर्शन केले. पुणे विद्यापीठाचे सिनेट सदस्य व अहमदनगर एज्युकेशन सोसायटीचे कार्यवाह म्हणून १० वर्षे काम पाहिले. शिक्षण विषयक विचार मांडताना ६ ते १४ वर्षे वयोगटातील मुलांना सक्तीचे शिक्षण व मातृभाषेच्या माध्यमाचा आग्रह धरतानाचा कार्यानुभव, हस्तकौशल्य व श्रमप्रतिष्ठा या गोष्टींना महत्त्व देऊन उच्च शिक्षणासाठी किमान गुणांची अट आवश्यक असल्याचे सांगितले. केवळ विद्यार्थी आणि शिक्षकांच्या विश्वात रमलेल्या सदूभाऊंचे ६ मार्च २००० रोजी निधन झाले.

– प्रा. विश्वास काळे

**संदर्भ :**

## विजापूरकर, विष्णू गोविंद

**संस्थापक, प्राध्यापक**

**२६ ऑगस्ट १८६३ – १ ऑगस्ट १९२६**

विष्णू गोविंद विजापूरकर ह्यांचा जन्म कोल्हापुरात झाला. वडिलांच्या बदल्यांमुळे वेगवेगळ्या गावात त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. मॅट्रिक झाल्यानंतर पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधून ते बी.ए. झाले. तेथे महामहोपाध्याय डॉ. रा. गो. भांडारकर त्यांचे गुरू होते. बी.ए. परीक्षेत सेकंड क्लास

व



मिळाल्याने डेक्कन कॉलेजमध्ये दोन वर्षे दक्षिणा फेलो म्हणून त्यांची नियुक्ती झाली. प्राध्यापक म्हणून काम केले. नोकरी करीत असतानाच ते एम.ए. झाले. दोनच वर्षांनी एम.ए.च्या विद्यार्थ्यांसाठी त्यांनी ऋग्वेद, ऋक संग्रह प्रकाशित केला.

विजापूरकरांना सर्वजण 'अण्णा' म्हणत. लोकशिक्षणाचे माध्यम म्हणून १८९४ मध्ये त्यांनी कोल्हापुरात 'ग्रंथमाला' हे नियतकालिक सुरू केले. स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा या सर्वांना जगात मान मिळावा या हेतूने त्यांनी 'ग्रंथमाला' चालविले. त्यांनी १८९८ मध्ये 'समर्थ' साप्ताहिक काढले व दहा वर्षे ते चालविले. पंधरा वर्षे कोल्हापूर सरकारची इमानाने सेवा केली. पण सरकारने 'तुम्ही आपल्या विद्यार्थ्यांवरील वजनाचा उपयोग यथायोग्य रीतीने करीत नाही' असा ठपका अण्णांवर ठेवला व त्यांची नोकरी संपली.

१९०५ च्या राष्ट्रीय अधिवेशनास अण्णा उपस्थित होते. त्या अधिवेशनात राष्ट्रीय शिक्षणाचा ठराव पास झाला. १ जून १९०६ रोजी अण्णांनी कोल्हापूरमध्ये 'समर्थ विद्यालयाची' स्थापना केली. ऑगस्ट १९०६ मध्येच हे विद्यालय त्यांनी 'महाराष्ट्र विद्या प्रसारक मंडळा'च्या स्वाधीन केले.

मंडळाच्या उद्देशपत्रिकेवर दाजी आबाजी खरे, चिंतामण विनायक वैद्य, मोरेश्वर गोपाळ देशमुख, बाळ गंगाधर टिळक व विष्णू गोविंद विजापूरकर ह्यांच्या सह्या होत्या. समर्थ विद्यालयासाठी अनेक ठिकाणी दौरे काढून अण्णांनी निधी जमा केला. हे विद्यालय चौदा महिने चालले. त्यानंतर कोल्हापुरात प्लेगची साथ आली.

त्यानंतरच्या काळात तळेगावला शाळा स्थलांतरित केली. तेहतीस विद्यार्थ्यांनिशी सुरू केलेल्या ह्या विद्यालयात चवथ्या वर्षी दीडशे विद्यार्थी होते. शिक्षक अल्प वेतनात काम करीत. लोकांचा प्रतिसाद उत्तम होता. शाळा तपासनीसांचे शेरे समाधानकारक व उत्तेजन देणारे होते. पण गव्हर्नर क्लार्क ह्यांनी 'राजद्रोहास व खुनास' उत्तेजन देणारे म्हणून आरोप ठेवून प्रो. वा. म. जोशी, विनायकराव जोशी यांच्याबरोबर अण्णांना तीन वर्षांच्या कैदेची शिक्षा ठोठावली. १८ डिसेंबर १९११ रोजी अण्णांची अहमदाबादच्या तुरुंगातून सुटका झाली. पण त्यापूर्वीच १० जून १९१० रोजी सरकारने 'समर्थ विद्यालय' बेकायदा म्हणून जाहीर केले. सरकारला पत्रे देऊनही उपयोग झाला नाही.विद्यालय कायमचे बंद झाले.

अण्णा दिनकरशास्त्री कानडे यांच्याबरोबर दोन महिने महाराष्ट्राबाहेर हिंडून आले. प्रवासात त्यांनी काशीचे 'सेंट्रल हिंदू कॉलेज', संस्कृत पाठशाळा, हरिद्वारचे गुरुकुले व ऋषिकुले पाहिली. ती कशी चालवली जातात ह्याची माहिती करून घेतली. परत आल्यावर पुन्हा एकदा सरकारला पत्र पाठवून आपले म्हणणे मांडले. पण त्याचा काहीही उपयोग झाला नाही.

अण्णांनी सार्वत्रिक प्राथमिक शिक्षणाची चळवळ सुरू केली. ना. गोखले ह्यांच्या शिक्षणविषयक बिलावरील भाषणाच्या शेकडो प्रती मराठीत स्वखर्चाने छापून लोकांना वाटल्या. शैक्षणिक कामं सुरू ठेवण्यासाठी वृत्तपत्रातून मदतीचे आवाहन केले. विद्यालयासंदर्भात गव्हर्नरची मुलाखत मागितली. पण त्यांना नकार मिळाला.

मात्र नंतर २५ ऑक्टोबर १९१८ रोजी सरकारने तळेगाव दाभाडे येथील प्रस्तावित विद्यालयास मान्यता दिली. १३ जानेवारी १९१९ रोजी विद्यालयाचा शुभारंभ झाला. साधी राहणी व उच्च विचारसरणी असलेल्या संयमी, नि:स्वार्थी, निगर्वी अण्णांनी काम करावयास सुरुवात केली. १९२९ पर्यंतच्या त्यांच्या कारकिर्दीत त्यांनी औद्योगिक शिक्षणाची सोय केली. शिक्षक व उपकरणे त्यांची जुळवाजुळव करून शेती, विणकाम, सुतारी, शिवणकाम, वेतकाम, पुस्तकबांधणी, मातीची चित्रे, मूर्ती तयार करणे, साबण-रंग-तेल तयार करणे या व्यवसायांची शिक्षण सुविधा उपलब्ध व्हावी म्हणून देणग्या मिळविल्या. मोठ्या संघर्षानंतर सुरू केलेले समर्थ विद्यालय उत्तम प्रकारे चालू लागले.

– न. म. जोशी, वि. ग. जोशी

## वेलणकर, श्रीराम भिकाजी

*दादा वेलणकर*

**अभ्यासक, संस्थापक**

**२२ जून १९१५ – १ एप्रिल १९९९**



दादांचे वडील शिक्षक होते. दादांचे मातेचे छत्र त्यांच्या वयाच्या आठव्या वर्षीच काळाने हिरावून घेतले. राजापूर हायस्कूल, रत्नागिरीतून १९३१ ला मॅट्रिक झाल्यावर, मुंबईच्या विल्सन महाविद्यालयामधून ते बी.ए (संस्कृत) पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले आणि दक्षिणा फेलो म्हणून त्यांची नियुक्ती झाली. १९३७ मध्ये ते प्रथम क्रमांकाने एम.ए. झाले आणि त्यांनी झाला वेदांत प्राईझ, भगवानदास शिष्यवृत्ती, तसेच सर लॉरेन्स जेन्किन्स शिष्यवृत्ती मिळविली. १९४० मध्ये दादा एलएल. बी. परीक्षा उत्तीर्ण झाले. स्पर्धा परीक्षेस बसून उत्तीर्ण होताच ते डाक-तार खात्यात अधिकारी नियुक्त झाले. त्याचवर्षी सुधा जोशी यांच्याशी त्यांचा विवाह झाला. १९७७ पर्यंत त्यांनी दादांची साथ दिली. त्या शास्त्रोक्त गायिकाही होत्या. शालेय जीवनात रत्नागिरीला असताना दादा स्वातंत्र्यवीर सावरकरांकडे जात असत. ते सावरकर भक्त होते. एम.ए. पर्यंतच्या शिक्षणात त्यांनी पहिला वर्ग कधीच सोडला नाही. फिरतीच्या नोकरीत देशातल्या किमान ३०० जिल्ह्यांच्या ठिकाणी ते गेले. त्यांच्या प्रचंड क्रियाशीलतेचे व सातत्याचे हे निदर्शकच आहे. १५ ऑगस्ट १९७२ पासून भारतभर लागू झालेल्या टपाल खात्याच्या पिनकोड योजनेचे वेलणकर हे जनक आहेत. टपाल विभागासाठी अनेक नियम त्यांनी बनवले ते 'वेलणकर फॉर्म्युला' या नावाने ओळखले जातात. १९७३ मध्ये दळणवळण खात्याचे अतिरिक्त सचिव (पोस्ट खात्याचे प्रमुख) या नात्याने ते निवृत्त झाले.

१९२९ मध्ये विद्यार्थी दशेतच त्यांनी शाळेच्या त्रैमासिकात पहिली संस्कृत कविता लिहिली. तिथूनच दिसामाजी काहीतरी ते लिहावे, ही समर्थ रामदासांची उक्ती अक्षरश: जीवनात उतरवली. ८० व्या वर्षापर्यंत १०० हून अधिक ग्रंथ लिहिले. मराठी, संस्कृत, इंग्रजी, हिंदी, जर्मन, पाली, अर्धमागधी या भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. विख्यात संगीतकार धुंडिराज पलुसकरांकडून ते व्हायोलिन शिकले.

गीर्वाणवाणीच्या झालेल्या व होत असलेल्या उपेक्षेने त्यांना तीव्र दु:ख होई. संजीवनी देणाऱ्या संस्कृत भाषेविषयी अभिरुची निर्माण करण्यासाठी, तिला वाढीस लागून लोकप्रिय करण्यासाठी त्यांनी 'देववाणी मंदिरम्' संस्थेची स्थापना केली. शाळा, महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना हाताशी धरून दरवर्षी संस्कृत संगीत स्पर्धा व नाट्यनृत्यचे प्रयोग केले.

नवनवीन उपक्रमांद्वारे संस्कृतला 'सर्वजन सुलभ' रूप देण्यासाठी 'पथनाट्ये' सादर केली. 'देववाणी मंदिरम्' संस्थेतर्फे 'गीर्वाण सुधा' (१९७९) हे अजूनपर्यंत नियमितपणे निघणारे एकमेव संस्कृत मासिक आहे. संस्कृत कवी या नात्याने दादांनी केलेल्या अपूर्व कामगिरीचे वर्णन करताना श्री. गो. आ. भट म्हणतात, 'संस्कृत अक्षर व मात्रावृत्ता बरोबरच ओवी, अभंग, साकी, पोवाडा, लावणी आदी मराठी रचना प्रकारांचा उपयोग वेलणकरांनी केला आहे. भारतीय संगीतातील ५२५ रागांची यादी व तालांची माहिती त्यांनी दिली आहे. संगीत नाटक, काव्य यावर त्यांचे प्रभुत्व होते. गद्य, पद्य, नाट्य, शास्त्रीय लेखन अशी अनेक प्रकारची अपूर्वाई त्यांच्या लेखनात आढळते.' १९६४ मध्ये दिल्ली येथे झालेल्या प्रथम आंतरराष्ट्रीय संस्कृत संमेलनात दादांनी कालिदासाच्या शाकुंतल नाटकाचे दिग्दर्शन केले.

अखिल भारतीय मराठी नाट्यपरिषदेचे उपाध्यक्ष, मुंबई मराठी साहित्य संघाचे उपाध्यक्ष, 'देववाणी मंदिरम्' चे अध्यक्ष, 'गीर्वाणसुधा' या संस्कृत मासिकाचे प्रमुख संपादक, श्री. ना.दा.ठाकरसी विद्यापीठाच्या अभ्यासमंडळाचे सदस्य, अनेक शासकीय समित्यांचे मान्यवर कर्तबगार सदस्य, साहित्य अकादमीच्या संस्कृत सल्लागार समितीचे सदस्य, सुप्रसिद्ध संस्कृतप्रेमी उद्योगपती सोमैय्या श्रेष्ठींनी संस्कृत प्रचारार्थ स्थापन केलेल्या सुरभारती-सोमैय्या संस्कृत केंद्राच्या मार्गदर्शक मंडळाचे

कार्याध्यक्ष, ठाण्याच्या इन्स्टिट्यूट फॉर ओरिएंटल स्टडीज या संस्थेचे मार्गदर्शक अध्यक्ष अशी ही विविध प्रकारची अध्यक्ष, उपाध्यक्ष, सदस्य पदे त्यांनी भूषविली आहेत.

स्वभावत:च असलेली विद्याव्यासंगाची आवड, काव्यरचनेची हौस आणि संशोधनाची वृत्ती यामुळे दादांनी निवृत्तीनंतर ही सेवा करण्याचा सरकारी आग्रह मानला नाही. दादांनी शिवरायांच्या अनेक पैलूंचे दर्शन 'छत्रपति श्री शिवराज:' मध्ये, तर लोकमान्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्वाचे दर्शन 'श्री लोकमान्य स्मृति:' मध्ये घडविले. राणी लक्ष्मीबाईंच्या जीवनावरील 'स्वातंत्र्यलक्ष्मी:' याचा ही उल्लेख करावा लागेल. आग्नेय आशियात 'बालगीतं रामचरितं' हा बालकलाकारांचा संगीत कार्यक्रम १९८२ मध्ये देववाणी मंदिरम् तर्फे सादर केला गेला. तो खूप यशस्वी झाला. कारण दादांनी आपल्या संस्कृत नाटकांना व नृत्यनाटकांना आधुनिक तंत्रमंत्राचीही जोड दिली.

डॉ. हेडगेवार जन्मशताब्दीच्या वेळी डॉक्टरांच्या जीवनावर 'केशव: संघनिर्माता नावाचे' शाहिरी धर्तीचे काव्यही त्यांनी करून दिले होते. दादांच्या या मौलिक कार्याबद्दल सुरसिंगार परिषद, मुंबई यांनी १९८९ मध्ये 'रसेश्वर पुरस्कार' देऊन त्यांचा गौरव केला व अखिल भारतीय साहित्य संमेलनाने १९९२ मध्ये महाराष्ट्राच्या राज्यपालांच्या हस्ते 'भारत भाषा भूषण' ही पदवी देऊन त्यांचा सन्मान केला, तत्पूर्वी १९७५ मध्ये दादांच्या 'शिवाजी' नाटकाबद्दल भारताच्या तत्कालीन उपराष्ट्रपतींच्या हस्ते त्यांना गौरविण्यात आले. त्यांच्या एका पुस्तकाला भारताच्या राष्ट्रपतींनी प्रस्तावना लिहिली आहे. दादांची ग्रंथसंपदा एकूण १०४ आहे.

काव्ये – गुरुवर्धापनम्, विरहलहरी, संस्कृतभाषा, प्रीतिपथे, देववाणी मंदिरम् व इतर मिळून १७

नाटके – कालिदासचरितम्, राज्ञी दुर्गावती, तत्त्वमसि, स्वातंत्र्यमणि, कल्याणकोप:, शासननीति:, श्री लोकमान्यस्मृति: व इतर मिळून २१

संगीत – गीत गीर्वाणम्, निसर्गसंगीतम्, श्रीरामगानम्, व इतर एकूण ११, याशिवाय गीतनाट्यम् (ऑपेरा) दूरदर्शन मालिका, कथा ग्रंथ, नृत्यनाट्य, चर्चाग्रंथ, नृत्यगी, सुभाषिते, बालवाङ्मय व संपादित ग्रंथ. वरील विविध संस्कृत वाङ्मयासोबत मराठी पाच व इंग्रजी सहा पुस्तके असे त्यांचे मौलिक अनुवादित व संपादित ग्रंथकर्तृत्व आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ** :

## वैद्य, पुरुषोत्तम गणेश

***भैय्या वैद्य***



पुरुषोत्तम गणेश वैद्य ऊर्फ भैय्या वैद्य यांचा जन्म ९ मे १९३४ रोजी सातारा येथे झाला. वडील गणेश भगवंत वैद्य हे समाजकार्यात रस घेणारे, करारी, शिस्तप्रिय आणि राष्ट्रप्रेमी होते. आई इंदिरा, प्रेमळ आणि तत्पर गृहिणी होती. सातारा जिल्ह्यातील कोळे गावातल्या एक शिक्षकी शाळेत त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. कऱ्हाडच्या 'शिवाजी विद्यालया'त माध्यमिक शिक्षण झाले. महाविद्यालयीन शिक्षणासाठी पुण्याच्या 'फर्गसन' महाविद्यालयात ते दाखल झाले.

गणित विषयाची खास आवड असल्याने विज्ञान शाखेत त्यांनी प्रवेश घेतला. चिकाटी, जिद्द, अथक परिश्रम, आत्मविश्वास यांच्या बळावर ते शिकत राहिले आणि बघता बघता एम.एस्सी.,एम.एड.पर्यंत त्यांनी मजल मारली. खेळांची आवड असल्यामुळे खेळांचा सराव करता करता नकळत खिलाडू वृत्ती अंगी बाणली गेली. त्यांना संख्याशास्त्रज्ञ व्हायचे होते. पण शिकण्या-शिकवण्याची त्यांना मुळातच आवड होती. अंगी अध्यापन कौशल्य होतेच. शिवाय मुलांची अचूक नस त्यांना नेमकी ठाऊक

व

होती. एन्. सी. जोशी या मित्राच्या सहकार्याने, सहमतीने सुरुवातीला विद्यार्थ्यांसाठी मार्गदर्शनपर वर्ग सुरू केले. पण मनात ऊर्मी होती ती शाळा काढण्याची! १९६२ साली त्यांनी सुरू केलेल्या आपटे प्रशाला जेमतेम एकवीस मुले होती.

'नापासांची शाळा', 'इतरांनी नाकारलेल्या मुलांची शाळा', 'गावातले गटार' या शब्दांत जी शाळा हिणवली गेली तीच पुढे अनेकांना प्रेरणास्रोत, पथप्रदर्शक, आदर्श वाटली. १९६२ मध्ये धाडसाने पुढे उचललेले पाऊल भैय्या वैद्यांच्या डोळस, हुकमी नेतृत्वामुळे, द्रष्टेपणामुळे, कल्पकतेमुळे पुढे पुढेच पडत राहिले. नवनवीन कल्पना, योजना, प्रयोग आणि उपक्रम यांच्यामुळे त्यांनी विद्यार्थ्यांना आकर्षित केले. पालकांना दिलासा, विश्वास दिला. सहकाऱ्यांना कार्यमग्न राहण्याची प्रेरणा दिली. १९६२ मध्ये भैय्या वैद्य यांनी शाळेचा संसार कौशल्याने सुरू केला. त्याचवेळी नुकतेच लग्न झाल्याने सहधर्मिणी म्हणून जीवनात आलेल्या वसुंधरेवर घरच्या संसाराची जबाबदारी सूज्ञपणे टाकली. वसुंधराताईंनी आपल्या या ध्यासवेड्या पतीला साथ दिली. प्रारंभीची आठ वर्षे भैय्यांनी पगार घेतला नाही. या त्यागात घरच्यांनीही त्यांना सर्वोत्तम साथ दिली. स्पष्ट परंतु मृदुभाषी, उत्साही, प्रसन्न वृत्ती, कल्पकता, संवेदनशील मन, प्रयोग-उपक्रम शीलता, नवनवीन कार्यात झोकून द्यायची सहजता ही त्यांची वैशिष्ट्ये होती. विद्यार्थ्यांना गुणदोषांसकट स्वीकारून त्यांच्यातील नैराश्य, मरगळ घालवत त्यांना आनंददायी शिक्षणानुभव, जीवनानुभव देत उमलवणे, स्वयंअध्ययन करायला प्रवृत्त करणे, सहकाऱ्यांना प्रयोगासाठी स्वातंत्र्य देणे यामुळे आपटे प्रशाला अल्पावधीतच नावारूपाला आली. गुणग्राही वृत्ती, मित्र जोडण्याची कला, पेशावर उदंड प्रेम, अध्यापन कौशल्य, प्रभावी नेतृत्व आणि सामाजिक जाण या गुणांमुळे हातून नेत्रदीपक कार्य घडले शिवाय त्यांचे नाव सर्वतोमुखी झाले. त्यांनी अहर्निश झपाटून, सपाटून कार्य केले. त्यांचे कार्य महाराष्ट्रात विस्तारले. 'धडपड व्यासपीठ', 'आचार्यकुल', 'पालक शिक्षक संघ', 'पुणे म.न.पा. शिक्षण मंडळ', 'बालकुमार साहित्य संस्था', 'ज्ञानदा प्रतिष्ठान', 'ज्ञानेश्वर विद्यापीठ', 'किशोर मित्र', 'महाराष्ट्र राज्य गणित महामंडळ' अशा कितीतरी संस्थांशी आपल्या कार्यशीलतेमुळे त्यांनी कायमचे नाते जोडले. शैक्षणिक, साहित्यिक, सामाजिक क्षेत्रात त्यांचे योगदान मोलाचे आहे.

गणित, शास्त्र आणि शिक्षण या विषयांवर ३०० हून अधिक लेख, पन्नास पेक्षा जास्त पुस्तकांचे लेखन त्यांनी केले. 'शेवग्याच्या शेंगा', 'नापासांची शाळा', 'कथा ही विज्ञानस्फूर्ती'ची इ. पुस्तके खूपच गाजली. एन्. सी. ई. आर. टी. दिल्ली तर्फे घेतल्या जाणाऱ्या निबंध स्पर्धेत (शिक्षकांसाठी) त्यांच्या निबंधांना लागोपाठ दोन वर्षे पारितोषिके मिळाली. (१९६७, १९६८) भैय्या वैद्य यांच्या शिक्षणक्षेत्रातील भरीव, नेत्रदीपक कार्यासाठी त्यांना आदर्श शिक्षक पुरस्कार - शिक्षण क्षेत्रातील सर्वोच्च राष्ट्रपती पुरस्कार (५ सप्टेंबर १९८५) देऊन खास गौरवण्यात आले.

पु.ग.वैद्य हे विद्या महामंडळ आणि आपटे प्रशालेची शान वाढवणारे,तळागाळातील मुलांना, उपेक्षित मुलांना फुलविण्यासाठी नित्य तत्पर असणारे, अनेक सामाजिक संस्थांना आपल्या सर्वोत्तम सहकार्याने आधार-दिलासा देणारे, सर्वांना आपले वाटणारे, कुशल संघटक, प्रेरक मार्गदर्शक होते.

- ललिता गुप्ते

## वैद्य, पुरुषोत्तम रामचंद्र

**शिक्षक, संस्थापक**

**२८ एप्रिल १९२३**

पुरुषोत्तम रामचंद्र वैद्य तथा बाबा वैद्य यांचा जन्म नाशिक येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण सिन्नरच्या प्राथमिक शाळेत झाले. इंग्रजी पहिली ते चौथीचे शिक्षण सिन्नरच्या न्यू इंग्लिश स्कूल म्हणजेच आजच्या ब. ना. सारडा विद्यालयात झाले. मॅट्रिक झाल्यावर १९४२ मध्ये बांद्र्यांच्या प्रशिक्षण संस्थेमधून त्यांनी डिप्लोमा इन लेदर टेक्नॉलॉजीचा कोर्स पूर्ण केला व मिल लेदर इन्स्टिट्यूटमध्ये एक वर्ष सह व्यवस्थापक म्हणून नोकरी केली. रुईया



महाविद्यालयामधून त्यांनी एम. ए. ची पदवी घेतली. महाविद्यालयात शिकत असताना प्रा. गोवर्धनदास पारिख व प्रा. न. र. फाटक यांचा फार मोठा परिणाम त्यांच्यावर झाला. अर्थशास्त्र व इतिहासाच्या अभ्यासाची प्रेरणा त्यांना मिळाली. १९४८ ते १९५३ या काळात दैनिक नवाकाळचे सहसंपादक म्हणून ते काम पाहू लागले. पण स्वतंत्र लिहिण्यास वाव नाही व इंग्रजी शब्दांचे भाषांतर करण्यात रस नाही म्हणून त्यांनी ही नोकरी सोडली व ते नाशिकला आले. नाशिकच्या पेठे विद्यालयात शिक्षक म्हणून नोकरी करू लागले. नोकरीत असतानाच त्यांनी कांदिवलीच्या शारीरिक शिक्षण महाविद्यालयातून डी. पी. एड्. व मुंबईच्या शिक्षक प्रशिक्षण महाविद्यालयातून बी. टी. पदवी मिळविली. पत्रकार व समाजसेवक नवरे यांनी सांगितले म्हणून ते 'श्रद्धानंद अनाथ महिलाश्रमा'त जात असत. त्यावेळी अनाथ स्त्रिया व मुले यांच्या समस्या त्यांना जाणता आल्या. या अनुभवाचा फायदा नाशिकमध्ये १९५४ मध्ये अनाथ महिलाश्रमाची स्थापना करताना झाला. हल्ली ही संस्था 'आधाराश्रम' म्हणून कार्य करीत आहे. पहिली वीस वर्षे वैद्यांनी या संस्थेचे कार्यवाह म्हणून काम पाहिले. ते शारीरिक शिक्षणाचे शिक्षक होते. १९५४ ते १९६४ या काळात महाराष्ट्र राज्य क्रीडा महोत्सवात पंच म्हणून, संघांचे व्यवस्थापक म्हणून त्यांनी स्वत:च्या कार्याचा ठसा उमटविला. भारत सेवक समाज, गेम्स अँड अ‍ॅथलेटिक असोसिएशन, साने गुरुजी कथामाला, शिक्षक गौरव समिती अशा संस्थांना त्यांचे मार्गदर्शन लाभले व लाभत आहे.

मराठी, इतिहास, भूगोल या विषयांचे वैद्य उत्तम अध्यापक होते. सर्वच शाळांतून विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने विविध वैशिष्ट्यपूर्ण उपक्रम त्यांनी अत्यंत नियोजनबद्ध रीतीने राबविले. मॅरेथॉन शर्यत, सूर्यनमस्कार यासारख्या उपक्रमातून शारीरिक व मानसिकदृष्ट्या विद्यार्थी सशक्त व्हावेत हा हेतू होता. नाशिक एज्युकेशन सोसायटीचे कार्यवाह असताना त्यांच्या नेतृत्वाखाली सोसायटीचा सुवर्ण महोत्सव मोठ्या दिमाखात साजरा झाला.

१९५९ मध्ये त्यांच्या नेतृत्वाखाली नाशिक माध्यमिक शिक्षक संघाची स्थापना झाली. तेव्हापासून आठ वर्षे ते संघाचे कार्यवाह होते. या काळात शिक्षकांसाठी उद्‌बोधन चर्चासत्रे, विद्यार्थ्यांसाठी एस.एस.सी. व्याख्यानमाला या बरोबरच शिक्षकांच्या हक्कांसाठी, मागण्यांसाठी उपोषण, मोर्चे, संप यांचेही नेतृत्व त्यांनी केले.

१९८१ मध्ये सी.डी.ओ. मेरी महाविद्यालयाचे मुख्याध्यापक म्हणून वैद्य निवृत्त झाले. पण अजूनही त्यांचे काम चालू आहे. १९८१ पर्यंत नाशिक एज्युकेशन सोसायटीच्या विविध माध्यमिक शाळांतून ते अध्यापक, उपमुख्याध्यापक, मुख्याध्यापक म्हणून कार्यरत होते.

सेवेत असताना आणि नंतरही आदिवासी कल्याणासाठी शरीरशास्त्र, आयुर्वेद यांचा त्यांनी अभ्यास केला. त्याचा उपयोग उपचारातही ते करीत असतात. योगोपचार वर्गातही अनेक वर्षे त्यांची रुग्णसेवा चालू आहे.

– प्रा. सुहासिनी पटेल

## वैशंपायन, काशिनाथ रघुनाथ
**शिक्षक**

**३० मार्च १८९८ – ८ नोव्हेंबर १९८५**

काशिनाथ रघुनाथ वैशंपायन यांचे प्राथमिक शिक्षण नाशिक नगरपालिकेच्या शाळेत झाले. नंतर काही वर्षे मुंबईत राहिल्याने दादरच्या किंग जॉर्ज विद्यालयामधून १९१८ मध्ये ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. १९२० मध्ये नाशिक जिल्ह्यातील येवले गावातील राष्ट्रीय शाळेत त्यांच्या शैक्षणिक कार्याची सुरुवात झाली. ब्रिटिश राजवटीचा तो काळ होता. शाळेला सरकारची मान्यता नव्हती. वैशंपायन शाळेसाठी गावात रोज भिक्षा मागत. लोकांच्या मदतीवर शाळा चालत असे. शाळेत गणेशोत्सव साजरा होत असे. गणेशोत्सवात मेळे होत.



या मेळ्यांसाठी ते स्वत: कवने रचीत, ती मुलांकडून गाऊन घेत, मुलांना क्रांतिकारकांच्या गोष्टी सांगत. इंग्रजांच्या जुलमी सत्तेविरुद्ध ते सार्वजनिक सभांमधूनही व्याख्याने देत. त्यासाठी त्यांना दोन वर्षे कारावासही भोगावा लागला. १९३४ मध्ये ते जळगाव जिल्ह्यातील भालोद गावी गेले व तेथील शाळेत शिक्षक म्हणून काम करू लागले. ते मराठी व संस्कृत विषय शिकवीत. त्यांचा एक वेगळा उपक्रम म्हणजे ते संस्कृत भाषेत मुलांसाठी नाटुकली लिहीत व ती मुलांकडून बसवून घेत. त्या काळात एका खेडेगावात संस्कृत नाटके करणे ही कल्पनाच अभिनव होती.

भालोदच्या शाळेत वैशंपायन यांनी एस.टी.सी. परीक्षा दिली. याच काळात त्यांनी 'काव्यतीर्थ' व 'पुराणतीर्थ' या पदव्या मिळविल्या. या शाळेत त्यांनी 'गीताजयंती' साजरी करण्यास सुरुवात केली. मुलांकडून गीतेचे अध्याय पाठ करून घेतले. ते 'केसरी' वर्तमानपत्राचे अधिकृत वार्ताहर म्हणूनही काम करीत होते. 'फैजपूर' काँग्रेसची वार्तापत्रे ते केसरीमध्ये देत होते.

भालोदमध्ये काही वर्षे नोकरी केल्यानंतर एक वर्ष तळेगावच्या समर्थ विद्यालयात त्यांनी काम केले व ते पुन्हा येवल्यात आले व तेथील मॉडर्न इंग्लिश शाळेमध्ये दाखल झाले. तेथे असताना ते हिंदीचेही अध्यापन करू लागले. त्यांनी 'राष्ट्रभाषारत्न' ही पदवी मिळविली. राष्ट्रभाषा प्रचार समिती, वर्धा या संस्थेचे काम ते करू लागले.

शिक्षक म्हणून काम करीत असतानाच 'छन्द शास्त्र प्रवेश', 'मोहन मंत्र', 'टिळकसूत्रे', 'काव्यमय टिळक' ही स्वतंत्र पुस्तके लिहिली. 'महिम्न स्तोत्र', 'सूर्यस्तोत्र' अशी समश्लोकी भाषांतरे केली. निवृत्तीच्या काळातही त्यांचे लेखन सुरू होते. डॉ. वि. म. भट यांच्या 'योगविद्या व ईश्वरी साक्षात्कार' या पुस्तकाचा हिंदी भाषेत अनुवाद केला. बॅ. न. वि. गाडगीळ यांच्या 'काही मोहोरा आणि काही मोती' ह्या पुस्तकाचा 'कुछ अशरफिया कुछ गौहर' हा हिंदी अनुवाद केला.

– प्रा. सुहासिनी पटेल

## व्यवहारे, विश्वनाथ दामोदर
**संस्थापक, शिक्षक**
**१ जून १९४१**



नाशिक जिल्ह्यातील निफाड गावात एका शेतकरी कुटुंबात विश्वनाथ दामोदर व्यवहारे यांचा जन्म झाला. निफाड इंग्लिश स्कूल या माध्यमिक शाळेतून ते शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाले. महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी ते नाशिकच्या एच.पी.टी. कला व विज्ञान महाविद्यालयामध्ये दाखल झाले. महाविद्यालयीन शिक्षण चालू असताना एस. टी. सी. ही शिक्षणशास्त्रातील पदविका परीक्षा उत्तीर्ण झाले. १९६० ते १९६२ ही दोन वर्षे नवभारत विद्यालय, पंचवटी, नाशिक या प्राथमिक शाळेत शिक्षक म्हणून नोकरी केली. १९६२ मध्ये त्यांनी बी.ए. पदवी मिळविली आणि नवीन इंग्रजी शाळा, ओझर मिग या माध्यमिक शाळेत शिक्षक म्हणून ते रुजू झाले. ही नोकरी करीत असतानाच ते बी. एड. झाले आणि एम.ए. पदवीही त्यांनी मिळविली. कर्मवीर भाऊराव पाटील यांची 'कमवा आणि शिका' ही योजना त्यांनी प्रत्यक्षात आणली.

याच काळात न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांच्या निफाड या जन्मगावी त्यांच्या कार्याला साजेसे शैक्षणिक स्मारक असावे या विचारातून 'न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे विद्या प्रसारक मंडळाची' स्थापना झाली. या कामात व्यवहारे यांचा मोठा सहभाग होता. सन १९६४ मध्ये या मंडळाच्या वतीने निफाडमध्ये वैनतेय विद्यालय व उच्चमाध्यमिक विज्ञान महाविद्यालय या माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालयाची स्थापना झाली.

व

सन १९६७ मध्ये व्यवहारे यांनी या विद्यालयाच्या मुख्याध्यापक पदाची जबाबदारी स्वीकारली. विद्यालयाची प्रगतीच्या दिशेने वेगाने वाटचाल सुरू झाली. लहानपणी झालेले साने गुरुजी व राष्ट्रसेवादलाचे संस्कार, स्वत:चे वाचन, चिंतन व लेखन यामुळे विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास व्हावा म्हणून त्यांनी विविध शैक्षणिक उपक्रमांचे आयोजन केले.

ब्रिलियंट अकादमी, हरित ग्राम प्रकल्प, योगाभ्यासवर्ग, आरोग्य शिबिरे, मातृपितृस्मृतिदिन हे त्यांच्या अनेक उपक्रमांमधील काही वैशिष्ट्यपूर्ण उपक्रम. विद्यालयातीलच, नव्हे तर शाळाबाह्य मुलांना शिक्षणाच्या प्रवाहात आणण्यासाठी 'रानफुले'हा विशेष उपक्रम त्यांनी अनेक वर्षे राबविला. शाळासमूह योजना प्रत्यक्षात आणली व परिसरातील शिक्षकांना नवी प्रेरणा व दिशा दिली.

निफाड तालुक्यातील शाळांसाठी 'नीतिमूल्यशिक्षण' शिबिराचे आयोजन केले. या विविध उपक्रमांमुळे वैनतेय विद्यालय 'उपक्रमांचे मोहोळ' म्हणून ओळखू जाऊ लागले.

सन १९८७ मध्ये निफाड येथे 'सामाजिक परिषदे' चा शताब्दी महोत्सव महाराष्ट्र पातळीवर साजरा झाला. त्याच्या नियोजनात त्यांचा यशस्वी सहभाग होता, तर सन २००१ मध्ये न्या. रानडे स्मृती वर्षाच्या सांगता समारंभाचे नियोजनही व्यवहारे यांचे होते.

त्यांच्या शैक्षणिक, सामाजिक कार्यासाठी नाशिक जिल्हा परिषद व महाराष्ट्र शासनाने 'आदर्श शिक्षक पुरस्कार' देऊन त्यांचा गौरव केला. सन १९९९ मध्ये ते निवृत्त झाले. सेवानिवृत्तीच्या काळात करावयाच्या कार्याचे नियोजन केलेले असल्याने आजही महाराष्ट्र पातळीवर बाल संस्कार व युवा संस्कार योजनेच्या निमित्ताने समाजाच्या जडणघडणीचे त्यांचे कार्य चालू आहे.

– प्रा. सुहासिनी पटेल

* * *

व




## शहा, सुमतीबाई नेमचंद
**संचालिका**
**१ जानेवारी १९१२**



स्त्रीशिक्षण आणि स्त्रियांच्या सर्वांगीण विकासाचे ध्येय ठेवून सुमतीबाई शहा यांनी स्वातंत्र्यपूर्व काळात स्त्री उन्नतीचे कार्य केले. सुमतीबाईंच्या आत्या राजुलमती यांना शिक्षण देण्यासाठी बनारसवरून पेंढारकर गुरुजींना बोलविण्यात आले होते.आत्या सोबत सुमतीबाईंनीही पडद्याआड बसून घरीच शिक्षण घेण्यास प्रारंभ केला.

स्त्रियांच्या दु:स्थितीचे कारण शिक्षणाचा अभाव हेच प्रमुख आहे म्हणून सुमतीबाईंनी आधी स्वत: शिक्षणाचा ध्यास घेतला. त्यांना संतचरित्रे वाचण्याचा छंद जडला. धर्मग्रंथाचे परिशीलन होऊ लागले व 'लोकविलक्षण व्रत अंगीकारावं' असे त्यांनी ठरवले. सोलापुरात सेवासदनमध्ये व्हर्नाक्युलर फायनल परीक्षा पास झाल्यावर नववीसाठी जी. पी. पटवर्धन त्यांना घरी येऊन शिकवीत. धर्मग्रंथ, तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र वगैरेसंबंधी चर्चा होई. पटवर्धनांप्रमाणे आचार्य शांतिसागर महाराजांचे मार्गदर्शन लाभले. सुमतीबाईंना साहित्याप्रमाणे वक्तृत्वाची गोडी लागली. ''वाचनालये ही एक मोठी राष्ट्रीय संपत्ती आहे'' असे त्या म्हणतात. हिंगणे स्त्री शिक्षण संस्थेत महर्षी कर्वे यांच्याकडून त्यांना प्रेरणा मिळाली. वयाच्या १९ व्या वर्षी सुमतीबाईंनी आजन्म ब्रह्मचर्य व्रताची प्रतिज्ञा घेतली. इंदूरला जाऊन त्यांनी संस्कृत परीक्षा दिल्या व पुढे बनारसला जाऊन 'हिंदी साहित्याचार्य' पदवी संपादन केली.

श

निश्चय केल्याप्रमाणे शिक्षण, भरपूर वाचन करून, आजन्म ब्रह्मचर्याचे व्रत आचरताना 'धार्मिक शिक्षणाची शिदोरी' घेऊन त्या स्त्रियांच्या शिक्षणासाठी सज्ज झाल्या. सुदैवाने त्यांचे कुटुंब शिक्षणप्रेमी होते आणि सुमतीबाईंच्या प्रयत्नांना त्यांचा पूर्ण पाठींबा होता. त्यांच्या आत्या राजुलमती पूर्णपणे धर्मप्रचारास लागल्याने श्राविकाश्रमाची सूत्रे सुमतीबाईंकडेच आली. या आश्रमाच्या माध्यमातून त्यांनी मुलींच्या शाळा काढल्या, गृहविज्ञान अभ्यासक्रमात समाविष्ट केले, मुलींसाठी वसतिगृहे काढली, एकट्या नोकरदार महिलांसाठी वसतीगृहाची सोय केली. सढळ हाताने देणग्या दिल्या, देणग्या जमा करण्यासाठी दौरे काढले. श्राविकाश्रमाच्या जागेत विद्यापीठासारखा शैक्षणिक परिसर त्यांनी फुलविला. राष्ट्रीय स्वयंसेवक संघ व राष्ट्रसेविका समितीच्या शिस्तबद्धतेचा आणि निष्ठेचा त्यांच्यावर प्रभाव पडला. त्याच धर्तीवर त्यांनी श्राविकामंडळाची स्थापना केली. या मंडळाच्या अनेक शाखा उघडून त्यांनी व्याख्याने व मार्गदर्शनाद्वारे तरुण-तरुणींना समाजकार्याची प्रेरणा दिली.

खादीचा वसा घेतलेल्या व स्वातंत्र्य चळवळीत सोलापुरात महिलांच्या मिरवणुकीचे नेतृत्व केलेल्या सुमतीबाईंनी कस्तुरबा विश्वस्त संस्थेसाठी जिल्ह्यातून सर्वाधिक निधी जमविला. जिल्हा शाखेच्या त्या अध्यक्ष झाल्या. अ. भा. जैन महिला परिषदेचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले व देशाच्या विविध भागात परिषदेच्या शाखा उघडल्या. सोलापुरातील 'लेडीज क्लब'चा पूर्ण कायापालट करून त्याला 'भगिनी समाजाचे' रूप दिले. या समाजातर्फे साक्षरता, स्वावलंबन, स्त्री प्रबोधन, महिला व्याख्यानमालेचे उपक्रम हाती घेतले. दुर्गाबाई भागवत, सरोजिनी बाबर, लीलावती मुनशी, यमूताई किर्लोस्कर,

हंसाबेन मेहता इत्यादींची व्याख्याने घडवून आणली. अभिजात शिक्षकाचे गुण, निष्ठावंत असे त्यांचे काका वाताचंद देवचंद शहा त्यांना आश्रमाच्या कामात तत्परतेने मदत करीत. देणग्या व निधी जमवून 'उमाबाई विद्यालय व वसतिगृहा'ची इमारत बांधली. दयानंदमहाविद्यालयाचे प्राध्यापक व कन्नड भाषेचे प्रसिद्ध कवी द. रा. बेंद्रे यांनी दिलेल्या उत्तेजनामुळे सुमतीबाईंनी हृदगंध, महापुराण, रामायण, ज्ञानगीता, भावगीता इत्यादी पुस्तके लिहिली. श्राविका प्रकाशनातर्फे अनेक ग्रंथ प्रकाशित केले. महाविद्यालयाचे ग्रंथालय समृद्ध केले.

'गोमटसार' या ग्रंथाचे मराठीत भाषांतर केले. 'षट खडागम' या मूळ अर्धमागधी ग्रंथाची हिंदीतून संक्षिप्त आवृत्ती काढली. निराधार, निराश्रित म्हणून आश्रमात आलेल्या अनेक मुलींनी शिकून पुढे नाव कमावले. सुशीलाताई, त्रिशल्यादेव, विद्युल्लता ही काही उदाहरणे.

इंदूरला झालेल्या अ. भा. महिला परिषदेच्या अधिवेशनात सुमतीबाईंचा 'विदुषीरत्न' हा किताब देऊन गौरव करण्यात आला. श्राविकाश्रमाचा 'श्राविका संस्था नगर' मध्ये झालेला विकास सुमतीबाईंच्या अखंड कार्याचा आलेख म्हणता येईल. भारत सरकारने या विदुषीला 'पद्मश्री' किताब देऊन गौरविले.

– वि. ग. जोशी

**संदर्भ** :

## शाहू महाराज

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## शिंदे, येताळा कृष्णा

**संशोधक, शिक्षक**

**१ जुलै १९४७**

डॉ. येताळा कृष्णा शिंदे हे डॉ. वाय. के. शिंदे म्हणून ओळखले जातात. सांगली जिल्ह्यातील खानापूर



तालुक्यातील पोसेवाडी हे त्यांचे जन्मगाव. पोसेवाडी गावात त्यांचे एस. एस. सी. पर्यंतचे शिक्षण झाले. त्यानंतर ते महाविद्यालयीन शिक्षणासाठी मुंबईस गेले. तेथे त्यांनी शिक्षण पूर्ण करून ठाणे येथील कर्मवीर माध्यमिक विद्यालयात शिक्षकी व्यवसायास सुरुवात केली. पण त्यांना अध्यापनापेक्षा संशोधनात अधिक रस होता.

त्या दृष्टीने शिंदे यांचा संशोधन प्रवास सुरू झाला. १९८३ मध्ये मुंबई विद्यापीठातून शिक्षणशास्त्र विषयात त्यांनी पीएच. डी पदवी मिळविली. नंतर काही काळ कागल, विटा येथील शिक्षण शास्त्र महाविद्यालयात त्यांनी प्राध्यापक म्हणून काम केले. नंतरच्या काळात मुंबई विद्यापीठात संशोधन अधिकारी म्हणून ते होते.

१९८५ मध्ये त्यांनी 'एज्युकेशनल रिसर्च इन्स्टिट्यूट, पोसेवाडी' या संस्थेची स्थापना केली. संशोधनाचे कार्य चालू राहिले. १९९२ मध्ये त्यांनी व्यक्तिमत्त्व मापन कसोट्यांची निर्मिती केली. १९९६ ते २००५ ह्या काळात महाराष्ट्र राज्य अभ्यासक्रम संशोधन सल्लागार परिषद–पुणे, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक व्यासपीठ–औरंगाबाद, शैक्षणिक चिंतन परिषद–कराड, गुरुवर्य चिपळूणकर प्रबोधिनी–औरंगाबाद अशा विविध परिषदांतून सल्लागार म्हणून काम केले.

संशोधन क्षेत्रातील अनुभवातून व्यक्तिमत्त्व संजीवनी, शिक्षक संजीवनी, पालक संजीवनी अशी उपयुक्त पुस्तके लिहिली. शैक्षणिक साहित्य निर्मितीसाठी महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार, डॉ. जे. पी. नाईक गुणवत्ता संवर्धन राज्य पुरस्कार, महाराष्ट्र मानसशास्त्र पुरस्कार, समाज प्रबोधन राज्य पुरस्कार, उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीचा कर्मवीर भाऊराव राज्य पुरस्कार या पुरस्कारांनी शिंदे यांचा गौरव झाला. शिक्षण संशोधन संस्थेमध्ये ते संशोधन अधिकारी म्हणून कार्यरत आहेत.

– विजय बक्षी

## शिंदे , रावसाहेब पांडुरंग

**संस्थापक, संघटक**

**१० जून १९२८**



रावसाहेब पांडुरंग शिंदे यांचा जन्म मु. पाडळी, पोस्ट ठाणगाव, जि. नाशिक येथे झाला. शिंदे घराणे पिढीजात वतनदार. आजोबा वारकरी पंथाचे अनुयायी. वडिलांनीही तोच वारसा जपला.

रावसाहेबांचे प्राथमिक शिक्षण १९३४ – ३८ या कालावधीत पाडळी व देवठाण या गावी झाले. माध्यमिक शिक्षण नाशिक, सिन्नर व संगमनेर येथे झाले. त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण पुणे, कोल्हापूर व अहमदनगर येथे झाले. एलएल.बी. ही पुणे विद्यापीठामधून पदवी त्यांनी प्राप्त केली. त्यानंतर श्रीरामपूर येथे वकिलीस प्रारंभ करून प्रतिथयश वकील म्हणून लौकिक संपादन केला.

विद्यार्थी दशेत त्यांनी स्वातंत्र्य लढ्यात भाग घेतला होता. राष्ट्र सेवादलात ( १९४० ते १९४२) ते सानेगुरुजींच्या संपर्कात आले. नाशिक पंचवटी शाखेचे नायक म्हणून त्यांनी जबाबदारी पार पाडली. स्वातंत्र्य लढ्यात काही काळ भूमिगत राहून काम केले. स्वातंत्र्यानंतर मार्क्सवादी विचारसरणीचा स्वीकार करून समतेच्या लढ्यात त्यांनी हिरिरीने भाग घेतला. वकिली करीत असतानाच त्यांनी सामाजिक व सहकारी क्षेत्रात कामास प्रारंभ केला. १९७६ मध्ये श्रीरामपूर दूध सोसायटीची स्थापना करून ती आदर्शवत केली. १२ वर्षे सोसायटीचे अध्यक्ष म्हणून काम पाहिले. शेती क्षेत्रातही त्यांनी नावलौकिक संपादन केला. त्यामुळे महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहूरी या विद्यापीठाच्या कार्यकारिणीवर त्यांची नियुक्ती केली गेली. ती जबाबदारी त्यांनी यशस्वीपणे पार पाडली.

श

त्यांच्या शैक्षणिक कार्यास विद्यार्थी दशेतच प्रारंभ झाला. १९४४ मध्ये त्यांनी आपल्या काही मित्रांच्या सहकार्याने संगमनेर येथे विद्यार्थी वसतिगृह सुरू केले. तेथे गरीब विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जाई. सर्व जाती धर्मातील मुलांना मुक्त प्रवेश असल्याने सामजिक एकतेचे संस्कार येथे राहणाऱ्यावर होत असत. अभ्यासाशिवाय स्वावलंबन, अवांतर वाचन, चर्चा, खेळ यातील सहभाग महत्त्वाचा मानला जाई. त्यामुळे हे वसतिगृह विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास करणारे वसतिगृह म्हणून ओळखले जाऊ लागले.

रावसाहेबांचे बंधू अण्णासाहेबांना शिक्षण क्षेत्राची आवड होती. कर्मवीर भाऊराव पाटील यांनी रयत शिक्षण संस्थेची विद्यालये नगर जिल्ह्यात काढण्यास प्रारंभ केल्यानंतर ते वारंवार नगर जिल्ह्यात येत असत. परिसरातील गावी ते अण्णांच्या बरोबरीने जात असत. १९६० मध्ये बोरावके महाविद्यालयाची स्थापना झाली. पदव्युत्तर शास्त्र विषयांचे वर्ग सुरू व्हावेत यासाठी त्यांनी मार्गदर्शन केले. या महाविद्यालयाच्या स्थापनेत अण्णासाहेबांच्या बरोबरीने रावसाहेबांचाही वाटा होता.

डाकले वाणिज्य महाविद्यालयाला सुरुवातीच्या काळात आर्थिक अडचणींना तोंड द्यावे लागत असे. प्राचार्य चिटणीसांनी रावसाहेबांच्या सहकार्याने देणग्या जमा करून विद्यापीठ अनुदान मंडळाच्या साहाय्याने ग्रंथालय, कर्मचारी निवास, प्राचार्य निवास, सेवक निवास यांची पूर्तता केली. आज या महाविद्यालयाचा विकासही परिपूर्णतेच्या मार्गावर आहे.

शिक्षण महाविद्यालय प्रारंभी बोरावके महाविद्यालयाच्या एका भागात भरत असे. या महाविद्यालयाला इमारत असावी यासाठी रावसाहेबांनी ९०–९५ या कालावधीत देणग्या मिळवून सुसज्ज इमारत, ग्रंथालय व तीनशे पन्नास प्रेक्षक बसू शकतील असे भव्य सभागृह बांधले. तसेच त्यांच्या पत्नी शशिकला शिंदे यांनी मुलींच्या वसतिगृहासाठी देणगी मिळवून दिली आहे.

श्रीरामपूर येथील जनता विद्यामंदिराच्या (डी.डी.काचोळे विद्यालय) इमारतीचे विस्तारीकरण व्हावे व तेथील विद्यार्थी वसतिगृहाचे कामकाज विद्यार्थी हितास्तव चालावे यासाठी रावसाहेबांनी प्रयत्न करून विद्यालय व वसतिगृह यांची गुणवत्ता सुधारली आहे.परिसरातील लहान मुलांसाठी

संस्कारकेंद्र व प्राथमिक शाळा सुरू करून ती आदर्श व्हावी यासाठी प्रयत्न केले. शांतीलाल सोमय्या यांचेकडून ११ लाख रुपयांची देणगी मिळवून सुंदर इमारत या शाळेसाठी बांधून दिली.

श्रीरामपूर परिसरातील वडाळा महादेव या गावी संस्थेचे विद्यालय आहे. या विद्यालयाचा शेती विभाग यथातथाच चालत असे. रावसाहेब शेती समितीचे अध्यक्ष झाल्यानंतर या शेतीपासून चांगले उत्पन्न मिळू लागले. नाना साळुंखे यांनी त्यासाठी कष्ट केले असल्याने हे घडले असा उल्लेख रावसाहेब वारंवार करतात.

संस्थेच्या सर्व शाखांची गुणवत्ता वाढावी यासाठी चाललेल्या प्रयत्नांना रावसाहेबांनी सदैव प्रोत्साहनच दिलेले आहे. शिक्षण घेणारे विद्यार्थी कृतिशील व्हावेत, त्यांनी श्रम आणि शिक्षण यांची सांगड घालून स्वावलंबी बनावे यासाठी दिशादर्शक प्रकल्पाची निवडक महाविद्यालयात कार्यवाही केली जात आहे. संस्थेच्या कार्याबरोबरच इतरत्रही त्यांचे शैक्षणिक व सामाजिक कार्य चालू असते. श्रीरामपूरच्या गोंदवणी भागात विद्यालय नव्हते. तेथील विद्यार्थ्यांची अडचण ध्यानात घेऊन आण्णासाहेब शिंदे यांनी श्रीरामपूर शिक्षण संस्थेची स्थापना करून विद्यालय सुरू केले . कालांतराने या संस्थेची जबाबदारी रावसाहेबांना स्वीकारावी लागली. इमारतीसाठी जागा मिळवून इमारत पूर्ण करण्याचे कार्य त्यांनी केले व शाळेस स्थैर्य प्राप्त करून दिले. या संस्थेमार्फत श्रीरामपूर व अशोकनगर येथे इंग्रजी माध्यमाच्या शाळा सुरू करून त्या विकसित केल्या.

या कार्याशिवाय इंडियन लॉ सोसायटी, पुणेचे काही काळ उपाध्यक्ष व सध्या अध्यक्ष, भारती विद्यापीठाच्या कार्यकारिणीचे सदस्य ही पदेही ते भूषवित आहेत. बाबा आमटे यांच्या आनंदवन येथील संस्थेला त्यांनी आत्तापर्यंत एक कोटी सत्तावीस लाख रुपयांची मदत मिळवून दिली आहे. हेमलकसा येथील प्रकाश आमटे यांच्या रूग्णालयाच्या प्रतिवर्षी औषधे पाठविण्याचे कार्यासही त्यांनी चालना दिली आहे. श्रीरामपूर येथील अंध शाळेला एक लाखाची देणगी जमवून दिली तसेच कायदेविषयक सल्लागार या नात्याने रूग्णालयाच्या प्रगतीसाठी देणग्या मिळवून दिल्या आहेत. श्री गजानन महाराज संस्थान, शेगाव या संस्थानचे अध्यक्ष शिवशंकर पाटील तथा भाऊ यांच्या संपर्कातून व विचारविनिमयातून अभियांत्रिकी महाविद्यालय, आनंदसागर प्रकल्प, अंध व अपंग शाळा व वारकरी शाळा वृद्धिंगत करण्यास रावसाहेब सहकार्य करीत असतात.

रावसाहेब प्रभावी वक्ते आहेत. त्यांची भाषणे अभ्यासपूर्ण असतात. समाज प्रबोधन व्हावे यासाठी त्यांनी सामाजिक, शैक्षणिक, शेती सुधारणा, गांधी विचार व कार्य, सामाजिक आरोग्य व पर्यावरण आदि विषयावर एक हजाराच्यावर भाषणे दिली आहेत. रावसाहेबांनी शिक्षण व समाज, चरित्र व चारित्र्य, ध्यासपर्व (आत्मचरित्र), भावलेली माणसे या ग्रंथाद्वारे व अभ्यासू लेखाद्वारे समाजप्रबोधनाचे कार्य केले आहे व करीत आहेत.

– प्रा. व. सा. रोकडे

## शिंदे, विठ्ठल रामजी

***महर्षी शिंदे***

☞ **मुख्य नोंद– समाजकारण खंड**

## शितूत, शांताबाई दामोदर

**संस्थापक**

**१९२२ – २० ऑगस्ट १९८४**



चिपळूण मध्ये जन्मलेल्या शांताबाईंचे माहेरचे आडनाव निमकर होते. वडील मामलेदार असल्याने घरची आर्थिक परिस्थिती चांगली होती. मराठी सातवी पर्यंत शिक्षण झाल्यानंतर १९४० मध्ये दामोदर शितूत यांच्याशी त्यांचा विवाह झाला होता. पण त्यांचे वास्तव्य माहेरीच होते. समाजासाठी, महिलांसाठी आपण काहीतरी करावे या उद्देशाने त्यांनी १९४२ मध्ये महिला मंडळाची स्थापना केली. महिलांनी आपल्या पायावर उभे राहावे, निर्भीड बनावे यासाठी त्यांचा

प्रयत्न असे. त्यासाठी त्या महिलांच्या हिंदी, इंग्रजी विषयाचे वर्ग घ्यायच्या, शिवणकाम, भरतकाम शिकवायच्या. महिलांच्या सांस्कृतिक, शैक्षणिक विकासाबरोबरच त्यांनी लघुउद्योग सुरू करण्यास प्रोत्साहन दिले. बचत गटाची सुरुवात केली. त्याचबरोबर त्या महिलांना पोहायला घेऊन जात. विविध कार्यक्रमांसाठी सहलीला त्या भारतभर घेऊन जात.

महिला मंडळातर्फे १९५४ मध्ये शांताबाईंनी बालक मंदिराची सुरुवात स्वतःच्या घरीच केली. मादाम मॉन्टेसरी यांनी मांडलेल्या पूर्व – प्राथमिक शिक्षणासाठी मॉन्टेसरी पद्धतीनुसार सुरू झालेल्या भारतातील पहिल्या आठ बालक मंदिरांपैकी ही एक, ज्याचा उल्लेख भारताचे पहिले राष्ट्रपती डॉ. राजेंद्र प्रसाद यांच्या आत्मचरित्रात आहे. पूर्व प्राथमिक शिक्षण म्हणजे तीन ते पाच वर्षांच्या मुलांची शाळा, ‘खेळातून शिक्षण’ ही संकल्पना नवीन असल्याने खूप गाजली.

सुरुवातीला महिला मंडळाच्या बायकांना घेऊन घरोघर जाऊन शांताबाई मुलांना शाळेत घेऊन यायच्या. पालकांनाही ही संकल्पना आवडल्याने फारसा विरोध होत नसे, उलट आनंदाने लोक मुलांना पाठवायचे. स्वतः कमी शिकलेल्या बायका एकत्र येऊन शाळा चालवायच्या त्याचे कौतुक व्हायचे. सुरुवातीला महिलांनी बिनपगारी काम केले. नंतर १९५५ मध्ये केन्द्रीय सामाजिक कल्याण समितीची मान्यता मिळाल्यानंतर पगारासाठी व मुलांच्या खाऊसाठी पैसे मिळायला लागले.

शांताबाईंनी लहान मुलांसाठी पुण्यावरून रिक्षा आणली; पण काही लोक त्रास द्यायचे, दगड मारायचे त्यामुळे रिक्षा बंद केली. पण त्याचा फायदा असा झाला की शांताबाईंनी गावाच्या वेगवेगळ्या भागात बालक मंदिराची सुरुवात करण्याचे ठरविले. यातूनच पुढे सहा बालक मंदिराची सुरवात झाली. त्यात मुख्य वस्तीबरोबरच कोलेखाजण येथे, चांभारवस्तीमध्ये, वडारवस्तीमध्ये, महारवस्तीमध्ये अशा बहुजन समाजातील मुलांसाठी सुद्धा बालक मंदिराची सुरुवात केली. त्याकाळी अशा प्रकारे काम करताना शांताबाईंना अनेक विरोध व अडचणींना सामोरे जावे लागले. याचबरोबर रावतळे या खेडेगावात गावातील पहिलीच शाळा सुरू केली. तिथेच त्यांनी २५ वर्षे शिक्षिका व नंतर मुख्याध्यापिका म्हणून काम केले.

शांताबाई कामासाठी गावात मोटार लावलेल्या सायकलवर फिरत. तेव्हा काही लोक त्यांना त्रास देत. पण त्यांनी जे व्रत घेतले त्यापासून त्या कधीही डगमगल्या नाहीत. अन्य महिलांसाठी निर्भीडपणाचा आदर्श निर्माण केला.

बालक मंदिराची जागा ही शांताबाईंच्या भावाच्या नावाने होती. भावाच्या निधनानंतर भावजयीने जागा विकायला काढल्याने अडचण निर्माण झाली. त्यावेळी १९६० मध्ये शांताबाई आपल्या काही सहकाऱ्यांना घेऊन मुंबईला गेल्या व भावजयीला समजावून १०,००० रुपयांना जागा विकत घेतली आणि त्या ठिकाणी सरकारी मदत व गावकऱ्यांच्या साहाय्याने दुमजली मोठी इमारत बांधली. त्यात वरच्या मजल्यावर नोकरी करणाऱ्या महिलांसाठी वसतिगृह व खाली बालक मंदिर सुरू केले.

आजही त्यांच्या स्मृती प्रित्यर्थ महिलांच्या निबंध स्पर्धेचे आयोजन त्यांचे शिष्य करतात.

– विवेक वि. कुलकर्णी

## शिरगावकर, अनंत धोंडूशेठ

***अण्णा शिरगावकर***



गुहागर तालुक्यातील विसापूर गावी अनंत धोंडूशेठ ऊर्फ अण्णांचा जन्म झाला. त्यांचा खरा पिंड इतिहास संशोधकाचा होता. कोकणातील असंख्य दुर्मिळ वस्तू-नाणी गोळा करण्याचा छंद जोपासतानाच सामाजिक जाणिवेतून त्यांनी शिडाच्या होड्या बाळगणाऱ्या गरीब खारवी व भोई समाजातील लोकांना एकत्र आणून १९७८

श

मध्ये 'दर्यावदी कामगार संघ' ही संघटना बांधली. त्यांना स्वतंत्र अस्तित्व मिळवून दिले. त्यांच्या मुलांची होणारी शिक्षणाची गैरसोय लक्षात घेऊन त्यांच्यासाठी छात्रालये उघडली. सात वाचनालयेही चालवली. जिल्हा परिषदेमधेही निवडून आल्यानंतर बांधकाम व आरोग्य खात्याचे ते सभापती होते. केवळ सातवी इयत्तेपर्यंत पोहोचलेल्या अण्णांना स्वतःला मनाप्रमाणे शिकता आले नाही, म्हणून त्यांनी वंचितांच्या शिक्षणाचा ध्यास घेतला व 'सागरपुत्र'च्या कार्याला वाहून घेतले. १९८३ मध्ये 'सागरपुत्र विध्याविकास संस्था' स्थापन केली. पुढे १९८९ मध्ये कला छात्रालयाची पंचनदी येथे स्थापना केली. सुमारे दोन हजार मुले-मुली या दोन्ही संस्थांमध्ये राहतात व शिक्षण घेतात. सागरपुत्रला मुख्यमंत्र्यांकडून तीन मोठे पुरस्कार मिळाले. खुद्द अण्णांना १९९४ साली दलितमित्र हा शासनाचा मानाचा पुरस्कार मिळाला. त्याखेरीज भाऊसाहेब वर्तक पुरस्कार, अपंगमित्र पुरस्कार, गुरुवर्य पुरस्कार, अहिल्यादेवी होळकर पुरस्कार, आण्णासाहेब पटवर्धन पुरस्कार, महात्मा फुले शैक्षणिक पुरस्कार, नानासाहेब शेट्ये पुरस्कार असे एकूण ४५ पुरस्कार मिळाले.

आकाशवाणीवरील भाषणे व विविध विषयांवरील पाच पुस्तके यातूनही ते लोकांसमोर आले. पुरस्कारांची रक्कम त्यांनी दान केलीच; परंतु जिवापाड गोळा केलेला प्राचीन वस्तूंचा खजिनाही त्यांनी दान करून टाकला. वयाच्या ७५ व्या वर्षी 'कोकणचा कोहिनूर' असा त्यांचा गौरव केला गेला.

– सुहास द. बारटक्के

## *गोविंदभाई श्रॉफ*



हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा लढासुद्धा 'भारतीय राष्ट्रीय शिक्षणा'ने भारलेला होता. या लढ्यातले गोविंदभाई श्रॉफ हे अग्रगण्य नेतृत्त्व होते. खरंतर भाईजी एम.स्सी. 



एलएल.बी. होते. पण वकिलीपेक्षा शिक्षकी स्वीकारली होती. हा स्विकार मनःपूर्वक होता. म्हणूनच तर औरंगाबादला सरकारी माध्यमिक शाळेत इंग्रजी, गणित हे विषय ते समरसतेने शिकवित, एक उत्कृष्ट शिक्षक म्हणून त्यांची ख्याती होती. हैद्राबाद मुक्तिसंग्रामाचा लढा नेटाने पुढे गतिमान होत होता. भाई त्यात सक्रिय होते. या गतिमानतेला रोध करू पाहणारी सरकारी शिक्षकी भाईजींनी सोडून दिली. शिक्षकी सोडली तरी शिक्षणाचा विचार सोडला नाही तर तो अधिक कृतिपर केला. निजामाने लादलेले शिक्षणाचे उर्दू माध्यम तेवढ्याच कठोर अशैक्षणिक सुविधा यात गुदमरत असलेल्या हैद्राबाद संस्थानातील जनसामान्यांच्या बौद्धिक जीवनाची मुक्ति भाईजींना अपेक्षित होती. त्यासाठी ते तरूणांना राजकारणात येण्यास सांगत होते, त्याचवेळी विद्यार्जनासी असलेली नाळही जपायला सांगत होते आणि म्हणूनच विद्यार्जन व राजकारण यांचा समतोल साधणारा औरंगाबादच्या सरस्वती भुवन शिक्षण संस्थेकडे भाईजींचा ओढा होता. १९३९ मध्ये या संस्थेसाठी इतर कार्यकर्त्यांसमवेत निधी संकलन करण्याचे काम भाईजींनी स्वयंप्रेरणेने केले होते. १९६७ मध्ये भाईजींनी संस्थेचे चिटणीस पद स्विकारले आणि १९७३ मध्ये संस्थेचे अध्यक्षपद स्विकारले. शैक्षणिक नेतृत्त्वाचा हा मापदंड आणि मानदंड सगळ्या शिक्षण क्षेत्रासाठी आदर्श ठरला होता. त्यांच्या कर्तृत्त्वामुळे औरंगाबादला दोन महाविद्यालये, दोन प्रशाला व ग्रामीण भागात नऊ प्रशाला असा संस्थेचा विस्तार झाला.

१९७४ मध्ये भाईजींनी 'स्वामी रामानंद तीर्थ' संस्थेच्या स्थापनेमध्ये पुढाकार घेतला व चिटणीस पदाची जबाबदारी स्विकारली. २००० पासून अध्यक्षपदाची सूत्र सांभाळली.

– डॉ. संतोष मुळावकर

* * *

श




## सराफ, श्रीकृष्ण शंकर

**शिक्षक**
**२० जून १९३०**



श्रीकृष्ण शंकर सराफ हे नाशिकमध्ये बाळासाहेब सराफ म्हणून सर्वांना परिचित आहेत. सराफ यांचे प्राथमिक शिक्षण नाशिक नगरपालिका शाळा क्रमांक दोन मध्ये व माध्यमिक शिक्षण न्यू इंग्लिश स्कूल मध्ये झाले. नाशिकच्या हंसराज प्रागजी ठाकरसी महाविद्यालयामधून ते बी. ए. झाले. पुण्याच्या टिळक कॉलेज ऑफ एज्युकेशन मधून त्यांनी बी. टी. पदवी मिळविली.

१९५५ मध्ये नाशिकच्या पेठे विद्यालयात शिक्षक म्हणून त्यांच्या कारकिर्दीचा प्रारंभ झाला. मराठी, इंग्रजी, संस्कृत, इतिहास हे विषय ते उत्तम शिकवीत. विषयांचा सखोल अभ्यास, विद्यार्थ्यांविषयीची आत्मीयता यामुळे सराफ विद्यार्थिप्रिय शिक्षक झाले. नाशिक एज्युकेशन सोसायटीच्या विविध माध्यमिक शाळांत अध्यापक, उपमुख्याध्यापक, मुख्याध्यापक म्हणून त्यांनी तेहतीस वर्षे काम केले. या सर्व काळात शिक्षकांसाठी व विद्यार्थ्यांसाठी अनेक नावीन्यपूर्ण उपक्रम व प्रकल्प त्यांनी राबविले. नोकरीच्या पहिल्याच वर्षी मोठ्या परिश्रमांनी त्यांनी प्रदर्शन भरविले. मराठी भाषेचे अध्यापन मनोरंजनातून व्हावे या उद्दिष्टाने व्याकरणविषयक विविध तक्ते प्रदर्शनात होते. इतिहास संवादाच्या माध्यमातून शिकविला जावा म्हणून त्यांनी एक पुस्तिका तयार केली होती. ‘नाशिकची साहित्य सेवा’ प्रकल्पात तयार केलेल्या तक्त्यांतून नंतरच्या काळात नाशिकच्या सार्वजनिक वाचनालयात ‘नाशिक जिल्हा साहित्यिक ग्रंथसंपदा’ विभागाची निर्मिती झाली. ‘आराधना’ या पेठे विद्यालयाच्या नियतकालिकाचे संपादक म्हणून पंचवीस वर्षे काम करताना संपादनात महत्त्वपूर्ण सहभाग असावा या आग्रहातून डॉ. यशवंत पाठक, डॉ. रत्नाकर मंचरकर, सुहास पळशीकर असे साहित्यिक तयार झाले. या अंकाचा आशय, रचना, कलात्मक छपाई या सर्व गोष्टींचे इतर महाराष्ट्रातील शाळा, महाविद्यालयामधून अनुकरण झाले.

संस्थेची नाशिकरोडची कोठारी कन्या शाळा ही कामगार वस्तीतील शाळा आहे. या शाळेत मुलींच्या आरोग्यासाठी त्यांनी सातत्याने प्रयोग केले व मुलींमध्ये वर्तनबदल घडवून आणला. दर शनिवारी दुपारी सर्व वर्गांच्या शैक्षणिक गुणदर्शन प्रकल्पातून मुलींना आत्मविश्वास दिला. पेठे विद्यालयात पहिले पुस्तक प्रदर्शन भरवून वाचनालयातून मुलांना पुस्तके मिळण्याची सुविधा त्यांनीच उपलब्ध करून दिली.

नवीन अभ्यासक्रम शिक्षण-प्रशिक्षण शिबिराचे अतिशय नियोजनपूर्वक संयोजन सराफांनी केले. नाशिक जिल्हा मुख्याध्यापक संघ व शिक्षक संघाच्या विविध शिबिरांमध्येही ते पंचवीस वर्षे तज्ज्ञ मार्गदर्शक म्हणून काम करीत होते. नाशिक एज्युकेशन सोसायटीच्या शिक्षक मंडळाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर ज्ञानविकास केंद्राच्या कार्यकारिणीचे ते सतत पंचवीस वर्षे सदस्य होते. अनुभवांतून भविष्यकाळातील संस्थेच्या स्वरूपाचा वेध घेण्याची दृष्टी लाभलेल्या सराफ यांनी अनेक संस्थांच्या घटना निर्मितीचेही काम अभ्यासपूर्वक केले. केंद्र सरकारने त्यांच्या या कार्याचा

गौरव १९८९ मध्ये त्यांना 'आदर्श शिक्षक राष्ट्रपती पुरस्कार' प्रदान करून केला आहे.

सातत्याने चाललेल्या या कार्यात त्यांची सिद्धहस्त लेखणीही चालू आहे. 'देवदत्ताची गोष्ट' ही कुमारांसाठी कादंबरी त्यांनी लिहिली, तर 'सर्वांचे तात्यासाहेब कुसुमाग्रज' हे कुसुमाग्रजांचे छोटेखानी चरित्र २००५ मध्ये प्रकाशित झाले. डॉ. वा. वा. दातार यांच्या 'दोन तात्या' या पुस्तकाचे संपादक सराफ आहेत. १९९१ मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर जन्मशताब्दी गौरवांक, पु. रा. वैद्य अमृत महोत्सव गौरविका संपादनात त्यांचा मोठा सहभाग होता. 'अवसर' नाशिक जिल्हा साहित्यिक मेळावा १९८८ विशेषांक, कुसुमाग्रज अभीष्टचिंतन गौरविका १९९०, वि. वा. शिरवाडकरांचे 'माणुसकीचे आकाश', 'थांब सहेली'– कविता संग्रह, 'प्रकाशाची दारे'– स्फुट लेख संग्रह या पुस्तकांचे संपादन त्यांनी केले. किर्लोस्कर, स्त्री, ललित, अमृत, नवनीत, हंस यासारख्या मासिकांतून तर लोकसत्ता, केसरी, सकाळ, लोकमत यासारख्या वृत्तपत्रांतून ते लेखन करीत होते व आजही करीत असतात.

नाशिकच्या एकशे अडुसष्ट वर्षांची परंपरा असलेल्या सार्वजनिक वाचनालयाचे उपाध्यक्षपद व अध्यक्षपद त्यांनी भूषविले आहे. वाचनालयाने नाशिकमधील गंगापूर रोडवर महाराष्ट्रातील 'पहिले उद्यान वाचनालय' सुरू केले आहे. त्याच्या उभारणीत त्यांचा महत्त्वाचा वाटा आहे. 'आनंद विधान' या वाचनालयाच्या शतकोत्तर सुवर्ण महोत्सव संदर्भ अंकाच्या सुधारित आवृत्तीसाठी त्यांचे मोलाचे मार्गदर्शन लाभले. वाचनालयाच्या वस्तुसंग्रहालयात नामवंत चित्रकारांच्या मूळ चित्रांचा विभाग सराफ यांच्याच प्रेरणेने सुरू झाला आहे.

नाशिकच्या लोकहितवादी मंडळाचे ते संस्थापक सदस्य आहेत. के. ज. म्हात्रे संदर्भ ग्रंथालयाचे कार्यकारिणी सदस्य, कुसुमाग्रज प्रतिष्ठानच्या विविध समित्यांचे सदस्य, 'संवाद: शैक्षणिक, सांस्कृतिक जागर' चे सल्लागार, 'हितगुज मंडळाचे' संस्थापक सदस्य म्हणून ते काम पाहतात. शालेय जीवनापासूनच नाशिकमध्ये होणारी थोर नेत्यांची, विचारवंतांची, साहित्यिकांची व्याख्याने ऐकणे हा त्यांचा छंद आहे. यातून लाभलेली बहुश्रुतता, मराठीतील समीक्षात्मक, वैचारिक ग्रंथांचा साक्षेपी अभ्यास, सर्वांना समजून घेणाऱ्या स्वभावातून जमवलेला गावातील व बाहेर गावातील लोकसंग्रह, निर्व्याज मिष्किलपणा ह्या सर्वांतून त्यांच्या व्यक्तिमत्त्वास उत्तम वक्त्याचेही परिमाण लाभले आहे.

– प्रा. सुहासिनी पटेल

## सहस्रबुद्धे, दिगंबर हरी

**संस्थापक, शिक्षणतज्ज्ञ**

**१२ जून १९११ – १७ जानेवारी १९९७**



दिगंबर हरी तथा बाळासाहेब सहस्रबुद्धे यांचा जन्म मध्यप्रदेशातील छिंदवाडा गावात झाला. त्यांचे शालेय शिक्षण अकोला येथे झाले. विद्यार्थी जीवनात अनेक शिष्यवृत्त्या, पारितोषिके व सुवर्णपदके त्यांनी मिळविली. अमरावती येथील महाविद्यालयातून इंटरची परीक्षा झाल्यानंतर त्यांनी राष्ट्रीय चळवळीत भाग घेतल्यामुळे त्यांना प्राचार्यांनी सरकारी महाविद्यालयामधून काढून टाकले व भारतातील कुठल्याही सरकारी महाविद्यालयात प्रवेश मिळू नये अशी व्यवस्था केली. तेव्हा डॉ. रावसाहेब भट यांनी स्वखर्चाने त्यांना बनारस हिंदू विद्यापीठात पाठविले. तेथून बाळासाहेब बी.ए. झाले. त्यांनाच मॉडेल विद्यालयामध्ये शिक्षक म्हणून नोकरी मिळाली. नोकरी करीत असतानाच त्यांनी एलएल.बी.ची परीक्षा दिली.

शिक्षकी पेशा राष्ट्रीय उत्थानाचे एक साधन म्हणून स्वीकारला असल्याने त्यांनी स्वत:ला शिक्षण कार्याला वाहून घेतले. मुलांवर उत्तम संस्कार व्हावेत म्हणून ते शरीर संवर्धनाचे उपक्रम व शहीद दिन, आचरणदिन, सद्वर्तनदिन, स्वच्छतादिन असे संस्कृतीची ओळख करून देणारे कार्यक्रम घेत असत. १९७१ मध्ये झालेल्या स्वत:च्या सत्कार निधीच्या सत्तावीस हजार रुपयांतून त्यांनी

‘शिक्षक प्रबोधिनी’ संस्था स्थापन केली. शिक्षकांच्या प्रबोधनासाठी शिबीरे, चर्चासत्रे, मार्गदर्शक साहित्याचे प्रकाशन या उपक्रमांतून कृतिपर, जीवनाभिमुख पद्धतीने शिक्षकांना तयार केले. त्यासाठी जीवनशिक्षण, शिक्षण संक्रमण मासिकांतून लेखन केले.

लहान गावांतून मुलांना शिक्षणासाठी प्रवृत्त केले. या सर्व प्रकल्पांचा खर्च शिक्षक प्रबोधिनीतून व स्वत:च्या स्वातंत्र्यसंग्राम निवृत्तीवेतनामधून केला. निवृत्तीनंतरही शिक्षणक्षेत्रात, सामाजिक क्षेत्रात कार्य करणाऱ्या शिक्षकाला ‘शिक्षण प्रबोधिनी’ पुरस्कार देत असत. विद्यार्थ्यांमध्ये स्वातंत्र्यप्रेम जागते ठेवण्यासाठी दर सव्वीस जानेवारीला स्वातंत्र्यदिन पत्रक काढून बाळासाहेब विदर्भातील सर्व शाळांमध्ये पाठवीत. त्यात नवनवीन प्रेरणादायी विचार देत.

शिक्षकांना स्वत:च्या पायावर मान ताठ करून उभे राहता यावे म्हणून त्यांचे प्रश्न सोडविण्यासाठी नोव्हेंबर १९४६ मध्ये ‘प्रॉव्हीन्शीयल फेडरेशन ऑफ सेकंडरी टीचर्स’ ही संघटना सहस्रबुद्धे यांनी स्थापन केली. या संघटनेचे ते पहिले सचिव होते. त्यांनी शिक्षकांना संघटित केले. त्यांच्या समस्यांचा अभ्यास केला. त्यांच्या जीवनात स्थैर्य आणले, निवृत्ती वेतन मिळवून दिले. प्रशिक्षणाच्या सोयी उपलब्ध करून दिल्या. ‘शिक्षण स्वायत्त मंडळा’ची स्थापना केली. ते गांधीवादी असल्याने शिक्षणातील ही क्रांती असहकार, सत्याग्रह या मार्गांनी घडवून आणली. अखिल भारतीय स्तरावरही संघटनांचे कार्य केले. ऑल इंडिया फेडरेशन ऑफ एज्युकेशनल असोसिएशन (ए. आय. एफ. ई. ए) चे १९५४ ते १९६२ पर्यंत सरचिटणीस होते.

याच संस्थेचे प्रतिनिधी म्हणून १९५५ मध्ये चीनला व १९५९ मध्ये रशियात जाऊन तेथील परिषदांमध्ये त्यांनी भारताच्या परराष्ट्र धोरणासंबंधी विचार मांडले. ए. आय. एफ. इ. ए. ही संस्था वर्ल्ड कॉनफडरेशन ऑफ ऑरगनायझेशन ऑफ दी टिचिंग प्रोफेशन (डब्ल्यू. सी. ओ. टी. पी.) या संस्थेशी संलग्न होती. तिच्या निमंत्रणावरून बाळासाहेबांनी वॉशिंग्टन परिषदेत भारताचे प्रतिनिधित्व केले. १९६१ मध्ये जागतिक शिक्षक परिषद भरवली. १९५८ ते १९६८ अशी दहा वर्षे त्यांनी आमदारपद भूषविले. आमदार म्हणून अभ्यासपूर्ण मते ते निर्भीडपणे मांडत.

विदर्भासाठी शैक्षणिक सवलती मिळविण्यासाठी त्यांना मोठा संघर्ष करावा लागला. विदर्भात व्यवयासाभिमुख विद्यालय चालू राहण्यास त्यांचे प्रयत्न कारणीभूत होते. शाळा नियमावली व सरकारी प्रस्तावांचा अत्यंत सूक्ष्म अभ्यास त्यांनी केला होता. याच सुमारास भूगोल पाठ्यपुस्तक मंडळाचे अध्यक्ष म्हणून त्यांची नियुक्ती झाली. सव्वीस जिल्ह्यांची भूगोलाची पुस्तके निर्दोष होण्यासाठी त्यांनी अविश्रांत श्रम घेतले.

विद्यार्थीदशेत मोठमोठ्या वक्त्यांची भाषणे ऐकून ते स्वत:ही उत्तम वक्ते झाले. ते उत्तम संसदपटू होते. त्यांची भाषणे अभ्यासपूर्ण, मुद्देसूद, प्रवाही असत. त्यामुळेच अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांसाठी शिक्षणतज्ज्ञ म्हणून त्यांना निमंत्रित केले जाई.

बाळासाहेबांची लेखनसंपदा विपुल आहे. त्यांनी इंग्रजी, मराठी, हिंदी भाषांतून पंचावन्न पुस्तके लिहिली. भूगोल, नागरिकशास्त्र व समाज जीवन हे त्यांचे आवडते विषय होते. ‘नागरिकत्वाचा ओनामा’ हे त्यांचे पुस्तक अनेक वर्षे हजारो विद्यार्थ्यांना मार्गदर्शक ठरले.

मराठी व हिंदी माध्यमाच्या विद्यार्थ्यांसाठी त्यांनी ‘भूविजय’, ‘भूप्रदर्शन’, ‘भूप्रदीप’ ही पुस्तके लिहिली. इतिहासाच्या पाठ्यक्रमाचे उद्दिष्टनिष्ठ अध्यापन हे सहस्रबुद्धे यांचे आणखी एक महत्त्वपूर्ण पुस्तक आहे. विद्यार्थ्यांसाठी मार्गावरील खुणा भाग १ व २, मराठी व इंग्रजी हस्ताक्षरलेखन, वक्तृत्वसाधन, शिक्षणातून नैतिक मूल्य संवर्धन इत्यादी पुस्तके त्यांनी लिहिली. शिक्षण समीक्षा, भारतीय शिक्षण, किर्लोस्कर अशा मासिकांमधून शैक्षणिक विषयांसंबंधी सांगोपांग अभ्यासपूर्ण लेख त्यांनी लिहिले.

– डॉ. प्रतिभा जयंत सहस्रबुद्धे

**संदर्भ :**

स

## सहस्रबुद्धे, नीळकंठ रघुनाथ

**मुख्याध्यापक**

**३ जुलै १९३४ - १७ फेब्रुवारी १९९२**



'लोकसत्ते' चे माजी संपादक माधवराव गडकरी यांनी 'पार्ल्याचे वैभव' म्हणून ज्यांचा गौरव केला, शिक्षणातील सरस-नीरस भाग दाखवून त्यातील समरसता कशी वाढवता येईल आणि नीरसता दूर कशी करता येईल हे कृतीने सिध्द करुन अनेक 'यशवंत' घडविणारे असे नीळकंठ रघुनाथ सहस्त्रबुध्दे असे हे शिक्षणतज्ज्ञ वि. वि. चिपळूणकरांचे 'अत्यंत कुशाग्र व कष्टाळू' असे विद्यार्थी होते.

विलेपार्ले, मुंबई येथील पार्ले टिळक विद्यालयात १९५८ मध्ये शिक्षक म्हणून प्रवेश केलेले सहस्त्रबुध्दे १९७२ मध्ये मुख्याध्यापक झाले तेव्हा त्यांचे वय फक्त ३७-३८ होते. त्यांच्या वडिलांची रेल्वेच्या नोकरीत वरचेवर बदली होई. त्यामुळे मॅट्रिक पर्यंतचे शिक्षण वेगवेगळ्या ठिकाणी झाले. त्यात सोलापूरच्या हरीभाई देवकरण प्रशालेत वि. वि. चिपळूणकरांसारखे आदर्श शिक्षक लाभल्याने शिक्षक पेशाबद्दल आकर्षण उत्पन्न झाले व शिक्षण हाच त्यांचा ध्यास ठरला. आईच्या आग्रहामुळे त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण मुंबईत रुईया महाविद्यालयात झाले आणि त्यांना प्रा. न. र. फाटक, राम जोशी, द. के. केळकर, विं दा करंदीकर, विठ्ठलराव कुलकर्णी इत्यादींचा सहवास लाभला.

भाऊराव पाटील यांच्या सातारा येथील बी.एड. महाविद्यालयात त्यांनी प्रवेश घेतला. तेव्हा तेथे सर्वांत लहान वयाचे सहस्त्रबुद्धेच होते. बी.ए. ला सुध्दा एकच विशेष विषय न घेता चार सर्वसाधारण विषय घेणारे ते एकटेच होते. शिष्यवृत्ती परीक्षेत उत्तम यश मिळविणारे हुशार विद्यार्थी व वर्गातील हुशार मेहनती विद्यार्थ्यांना निवडून सहस्त्रबुध्दे यांनी अधिक सराव, मेहनत करवून, परीक्षेचे तंत्र दाखवून मुलांमध्ये आत्मविश्वास निर्माण केला.

१९७४ मध्येच त्यांच्या प्रयत्नांना यश आले व पुढे सातत्याने अधिकाधिक विद्यार्थी गुणवत्ता यादीत झळकले. राष्ट्रीय गुणवत्ता शोध परीक्षा उत्तीर्ण होण्यास त्यांनी मुलांना उत्तेजन दिले. विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीचा चांगला फायदा मिळुन उच्च शिक्षणाचा आर्थिक प्रश्न सुटण्यास मदत झाली. सहस्त्रबुद्धे यांनी आठवी, नववी च्या मुलांना बॉंबे टॅलेंट सर्च परीक्षेला बसवले. त्यासाठी अभ्यासवर्ग, शिबिरांचे आयोजन केले. विज्ञान युगाचे आव्हान पेलण्यासाठी नववी पासूनच संगणक व (इलेक्ट्रॉनिक्स, विद्युतयांत्रिकी) या विषयांचा अभ्यासक्रमात समावेश केला. अनुभवसिध्द लेखन, उमलत्या पिढीच्या हिताची कळकळ, भरभक्कम तात्त्विक बैठक आणि नवनवीन वाटांचा शोध घेण्याची कल्पकदृष्टी असलेल्या सहस्त्रबुध्दे यांनी विद्यार्थी, सहकारी शिक्षक व कर्मचारी यांच्या गुणांचा शोध घेऊन त्यांना विकासाची संधी व प्रोत्साहन दिले. इतर शाळांच्या मुख्याध्यापकांना, शिक्षकांना व विद्यार्थ्यांनाही त्यांनी मार्गदर्शन केले व मदतीचा हात दिला; आपल्या देशातील शैक्षणिक धोरणातील व व्यवस्थेतील उणिवांवर बोट ठेवून विधायक दृष्टीने उपायही सुचविले. सहस्त्रबुध्दे यांनी 'नवीन अभ्यासक्रमाची उद्दिष्टे-शोध आणि बोध', 'शालेय विद्यार्थ्यांचे अवांतर वाचन - एक सर्वेक्षण', 'घरकाम करणाऱ्या नोकरांचे कौटुंबिक जीवन-एक अभ्यास', 'दीडशे गुणवंत विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक जीवनातील यशाचा मागोवा' या विषयांवर शैक्षणिक प्रकल्प सादर केले.

'पूर्व प्राथमिक व माध्यमिक शिक्षण', 'परीक्षा पध्दती', 'कॉपीसारखा ज्वलंत प्रश्न', 'शिक्षण संस्थांचा घसरणारा दर्जा', अभ्यासक्रम, पाठ्यपुस्तके, शालान्त परीक्षेच्या प्रश्नपत्रिका इत्यादी बाबतीत जाणवणाऱ्या त्रुटी यांसारख्या अनेक विषयांवर त्यांनी आपले विचार व्यक्त केले.

सहस्त्रबुध्दे आपल्या लेखात म्हणतात, ''लहान वयात शिकवण्याची भूमिका अतिशय महत्त्वाची असून शिक्षक कोणत्याही विषयाचा न असता विद्यार्थ्यांचा असला पाहिजे... विद्यार्थ्यांच्या सर्जनशीलेतला वाव देता येईल असे शिक्षण शाळांमधून देणे जरुर आहे.''

दूरचित्रवाणी, 'शिक्षण संक्रमण' मासिक, महाराष्ट्र टाइम्स, लोकसत्ता इत्यादी माध्यमातून त्यांचे शिक्षणविषयक लेख समाजासमोर आले आहेत. शिष्यवृत्ती परीक्षा मंडळावर सल्लागार सदस्य म्हणून त्यांची नियुक्ती झाली.

तशीच महाराष्ट्र राज्य मुख्याध्यापक महामंडळाच्या कायदेमंडळावरही झाली. विशेष म्हणजे माध्यमिक शालान्त परीक्षा अभ्यास मंडळावर आणि मुंबई महानगरपालिकेच्या शिक्षण समितीवर यांची नियुक्ती झाली होती. त्यांच्या शैक्षणिक कामगिरीबद्दल राज्य शासनाने १९७७ मध्ये त्यांना पुरस्कार देऊन गौरविले होते. १९८२ मध्ये सेऊल (कोरिया) येथे जागतिक शिक्षण परिषदेला गेलेल्या भारतीय शिक्षण तज्ज्ञ मंडळात सहस्रबुद्धे यांचा समावेश होता. त्याचवेळी जपानला जाऊन तेथील पूर्व प्राथमिक ते महाविद्यालयीन स्तरापर्यंतच्या व्यवस्थेचा अभ्यास करुन ते आले.

चौफेर वाचन, सुस्पष्ट विचार, अनुभव सिध्द मते व उत्तम वक्तृत्व या यांच्या गुणामुळे ते शिक्षणतज्ज्ञ व विचारवंत म्हणून महाराष्ट्रात परिचित झाले.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

## सहस्रबुद्धे, पुरुषोत्तम गणेश

☞ **मुख्य नोंद – साहित्य खंड**

## सहस्रबुद्धे , बळवंत चिंतामण

**शिक्षक**

**२३ ऑगस्ट १९१५ – ३१ मे १९९१**

बळवंत चिंतामण तथा बाळासाहेब सहस्रबुद्धे हे नाशिक मधील थोर शिक्षणतज्ज्ञ. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण नाशिकच्या न्यू इंग्लिश स्कूल (रुंग्टा विद्यालया) मध्ये झाले. मॅट्रिक झाल्यानंतर नाशिकच्या एच.पी.टी. महाविद्यालयामध्ये त्यांनी प्रवेश घेतला. तत्त्वज्ञान विषयात त्यांनी बी. ए. ची पदवी घेतली. त्यानंतर मात्र घरच्या



बेताच्या परिस्थितीमुळे बी. टी. ची पदवी घेऊन त्यांनी शिक्षकी पेशात प्रवेश केला. प्रारंभीच्या काळातील नोकरीचे रूपांतर त्यांनी 'व्रता'त केले व शिक्षक या पदवीची प्रतिष्ठा मोठ्या निष्ठेने, सचोटीने जोपासली.

न्यू इंग्लिश स्कूल मध्ये त्यांनी अध्यापन कार्यास सुरुवात केली. इंग्रजी व संस्कृत ह्या विषयांचे कुशल विद्यार्थीप्रिय अध्यापक म्हणून अल्पावधीतच त्यांनी लौकिक मिळविला. सन १९४२ मध्ये रुंग्टा विद्यालयामधील नोकरी त्यांनी सोडली व आजीव सदस्य म्हणून सहस्रबुद्धे नाशिक एज्युकेशन सोसायटीत दाखल झाले. त्यावेळी संस्थेची पेठे विद्यालय ही एकच शाळा होती.

सहस्रबुद्धे संस्थेचे कार्यवाह झाले आणि नऊ वर्षांच्या कार्यकाळात खऱ्या अर्थाने त्यांनी संस्था वाढविली. ओझर येथील नवीन इंग्रजी शाळा धर्मशाळेत एका वर्गाने सुरू केली. भगूर येथील ति. झं. विद्यामंदिर राममंदिरात, तर नाशिक रोडची कन्या शाळा एका छोट्याशा बंगलीत सुरू केली. अनौपचारिक सभा घेऊन निधी जमा केला. इंग्रजी माध्यमाची शाळा तर अनेकांचा विरोध सहन करून सुरू केली.

पण कार्यवाह म्हणून काम करत असताना, मुख्याध्यापक असताना विषय शिक्षक म्हणून असणाऱ्या कर्तव्याचा त्यांनी कधीही विसर पडू दिला नाही. विद्यार्थ्यांच्या विकासाचे विविध नावीन्यपूर्ण उपक्रम त्यांनी सुरू केले. एका वर्षी त्यांनी भरविलेले व्यवसाय मार्गदर्शन शिबीर पाहण्यासाठी तत्कालीन मुख्यमंत्री मारोतराव कन्नमवार आले असताना मुख्यमंत्र्यांनी प्रभावित होऊन शिक्षणमंत्री मधुकरराव चौधरींनाही प्रदर्शनास भेट देण्यासाठी सुचविले. प्रदर्शनाच्या संदर्भात एक पुस्तिकाही काढली होती. प्रदर्शन पाहताच मधुकररावांनी महाराष्ट्रातील शाळांमध्ये पाठवण्यासाठी या पुस्तिकेच्या एक हजार प्रतींची मागणी केली.

स

शुद्धलेखनाच्या बाबतीत त्यांचा मोठा कटाक्ष असे. गावातील दुकानांवर लावलेल्या पाट्यांवरील अशुद्धलेखन मुलांनी पाहू नये म्हणून ते स्वत: आठवड्यातील दोन दिवस पाट्या रंगविणाऱ्या पेंटरांकडे जायचे व मजकूर शुद्ध करून लिहून द्यायचे. नाशिकचे सार्वजनिक वाचनालय सरकारवाड्यात होते. ते नव्या इमारतीत हलवायचे होते. सहस्रबुद्धे त्यावेळी पेठे विद्यालयाचे मुख्याध्यापक होते. त्यांनी मुलांना कामाला लावले व पाऊण लाख पुस्तके नव्या इमारतीत पोहोचवली. ने-आणीचा खर्च वाचला. मुलांना पुस्तकांचे महत्त्व समजले. दरवर्षी शाळेच्या वार्षिक स्नेहसंमेलनासाठी प्रमुख पाहुणे म्हणून ज्येष्ठ साहित्यिकांना बोलवायची प्रथा सहस्रबुद्धे यांनी सुरू केली. त्यामुळे वसंत बापट, विंदा करंदीकर, रणजित देसाई यांच्यासारख्यांची व्याख्याने ऐकायला मिळाली. शाळेविषयी त्यांचा एक दृष्टिकोन असल्यामुळे त्यांनी पेठे विद्यालयाला नाशिकचे सांस्कृतिक केंद्र म्हणून मान्यता मिळवून दिली.

महाराष्ट्रातील एक अग्रेसर सांस्कृतिक संस्था म्हणून प्रसिद्धीस आलेल्या नाशिकच्या लोकहितवादी मंडळाच्या स्थापनेपासून आदरणीय वि. वा. तथा तात्यासाहेब शिरवाडकरांचे उजवे हात म्हणून त्यांना सहस्रबुद्धेंनी साथ दिली.

आधाराश्रम, मतिमंद मुलांसाठी असलेले 'प्रबोधिनी विद्यालय', 'नॅशनल असोसिएशन फॉर ब्लाइंड', 'कुसुमाग्रज प्रतिष्ठान' अशा कितीतरी संस्थांना त्यांचे मार्गदर्शन व सहकार्य लाभले. संघटनकौशल्य, लोकसंग्रह करण्याची हातोटी, माणसे जोडण्याची व सांभाळण्याची कुशलता, अखंड सावधपणा, आर्थिक व्यवहारांतील दक्षता व सचोटी, नि:स्वार्थ वृत्ती, संस्थांच्या उत्कर्षाविषयीची नि:स्सीम तळमळ या सर्व पैलूंबरोबरच एक मिस्किल विनोदबुद्धी सरांना लाभलेली होती.

'स्वल्पविराम' या विनोदी कवितांच्या व वात्रटिकांच्या संग्रहामुळे 'वात्रटिकाकार' म्हणूनही ते समाजापुढे आले. मुलांसाठी स्त्रीपात्रविरहित 'जावईबापू', मुलींसाठी पुरुषपात्रविरहित 'गुलामांची सत्ता'ही छोटी नाटके लिहून सहस्रबुद्धे यांनी ती बसवून घेतली. संस्थेच्या आजीव सदस्य मंडळाच्या कारभारावर उपरोधिक टीका करणारे 'काका मंडळ एक प्रहसन', 'सोसायन' ही विडंबनात्मक काव्ये त्यांच्या निखळ विनोदाची साक्ष देणारी आहेत.

– प्रा. सुहासिनी पटेल

## साठे, लक्ष्मण गणेश

**शिक्षक**

**१२ ऑक्टोबर १८७८ – ९ डिसेंबर १९४१**



लक्ष्मण गणेश साठे यांचा जन्म पुणे येथे झाला. पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूल मधून ते मॅट्रीक झाले. त्यानंतर ते महाविद्यालयीन शिक्षणासाठी कोल्हापूरच्या राजाराम विद्यालयामध्ये दाखल झाले. परीक्षेत त्यांना पहिला वर्ग व पदार्थविज्ञानामध्ये सुवर्णपदक मिळाले. १८९९ मध्ये ते मुंबईत आले व विल्सन महाविद्यालयामधून संस्कृत विषय घेऊन बी.ए. झाले. संस्कृतमधील 'भाऊ दाजी' पारितोषिकाचे मानकरी ठरले व महाविद्यालयात प्रथम आल्याने दक्षिणा फेलोशिप मिळाली. नंतर रसायन विषयात त्यांनी एम. ए. पदवी संपादन केली. त्याच वर्षी त्यांना सौराष्ट्रातील जुनागड येथील बाहुद्दीन विद्यालयामध्ये प्राध्यापकाची नोकरी मिळाली आणि अध्यापकी जीवनास प्रारंभ झाला.

साठे हे उत्तम शिक्षक होते. शिक्षणाच्या दृष्टीने मागे पडलेले काठेवाडमधील विद्यार्थी त्यांच्या मार्गदर्शनामुळे पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र हे ऐच्छिक विषय घेऊन पास होऊ लागले. १९०६ मध्ये ते अजमेरच्या पेथो महाविद्यालयामध्ये विज्ञान शिक्षक म्हणून काम करू लागले. १९१८ पासून निवासी शिक्षकाची जबाबदारी त्यांनी सांभाळली. राजपुत्रांनाही शिकविण्याचे काम ते करीत होते. विद्यार्थ्यांच्या खेळावर लक्ष ठेवण्यासाठी ते स्वत: संध्याकाळी मैदानावर हजर असत. मुलांना टेनिसचे

स

मार्गदर्शन करीत. त्यांची अध्यापनाची तयारी उत्तम असायची. पाठांची टिपणे काढणे, प्रात्यक्षिकांची तयारी करणे, उत्तम शिकविणे या सर्व गोष्टी ते कटाक्षाने करीत. १९३३ मध्ये त्यांनी नोकरी सोडण्याचे ठरविले. पण जयपूरच्या सवाई मानसिंह या विद्यार्थ्याच्या विनंतीला मान देऊन जयपूरच्या 'मान नोबल्स स्कूल' चे काम त्यांनी सात वर्षे मोठ्या धडाडीने केले. शाळेत शिस्त आणली. स्वत:च्या संघटना चातुर्याचा व खंबीरपणाचा परिचय सर्वांना करून दिला. ही शाळा गोनेर या लहानशा गावातील होती.

सर्व गावकरी साठे यांना ओळखत. स्वखर्चाने त्यांनी गावकऱ्यांच्या पाण्याची अडचण दूर केली, शंकराच्या मंदिराचा जीर्णोद्धार केला.

अध्यापनाचे काम चालू असतानाच राष्ट्रीय शिक्षणमालेसाठी राष्ट्रीय शिक्षणाचा ओनामा, रसायन प्रवेश, सृष्टशक्तिशास्त्र ही पुस्तके लिहिली. रसायनशास्त्राची परिभाषा तयार करून ती त्यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे प्रकाशित केली होती. विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासासाठी सतत झटणारे प्रा. लक्ष्मण गणेश साठे यांची शिक्षण क्षेत्रातील महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील कामगिरी निश्चितच अभिमान वाटावा अशीच आहे.

– वि. ग. जोशी

## साने गुरुजी

☞ **मुख्य नोंद–पत्रकारिता व ललितेतर साहित्य**

## सामंत, दत्तात्रेय सीताराम

**१० डिसेंबर १८८४ – ११ जानेवारी १९६५**
**संस्थापक, शिक्षक**

कृष्णाबाई व सीताराम यांच्या पोटी दत्तात्रय सामंत यांचा जन्म झाला. दुतोंड या खेडेगावी राहणाऱ्या या सामंतांच्या घरापासून चार मैल दूर असलेल्या परुळ्याच्या शाळेत दत्ताचे प्राथमिक शिक्षण झाले. गरिबीमुळे चार



चार वार लावून शिक्षण चालू ठेवून दत्ता पाचवी इयत्ता पास झाला.

१९०० – १९०१ च्या आसपास दत्ता वेंगुर्ल्याच्या एका व्यापाऱ्याकडे नोकरी करीत असताना तेथे परुळ्याच्या शाळेचे सहाय्यक व तृतीय वर्ष शिक्षित श्री. वामन बाळकृष्ण सामंत यांची भेट घडली. त्यांच्या घरी शनिवारी व रविवारी जाऊन दत्ता त्यांचे मार्गदर्शन घेत असे. पण तेथे पुस्तके उपलब्ध नसल्याने केवळ दोन पैशांच्या आधारावर पाऊणशे मैलांची पायपीट करत बेळगावला बहिणीकडे जाऊन तिच्या मदतीने दत्ता जुनी पुस्तके घेऊन परतला. वेंगुर्ल्याला वामनरावांकडे तो सहावी शिकला व बाहेरून सातवीच्या (म्हणजे त्यावेळची व्ह. फा. च्या) परीक्षेस बसून तो पहिला आला. १९०४ मध्ये तो पुण्याला गेला व प्रशिक्षण महाविद्यालयाचे प्राचार्य कृष्णाजी गणेश केळकर यांच्या मार्गदर्शनाने, स्वत:च्या चिकाटी व दुर्दम्य इच्छेने, मेहनत करून १९०७ मध्ये तृतीय वर्ष शिक्षित होऊन महाविद्यालयामधून बाहेर पडला. घरी परतला पण वडील सीतारामपंतांचे निधन झाले होते.त्यानंतर त्यांनी आयुष्यभर विद्यादानाचे व्रत घेतले. लोक त्याला 'सामंत मास्तर' म्हणून ओळखू लागले. १९०८ ते १९६५ पर्यंत त्यांचा विद्यादान यज्ञ अहर्निश चालू होता.

सामंत यांना संस्कृतची गोडी होती. रघुवंश व अमरकोश त्यांना मुखोद्गत होते. मुलांची सर्वांगीण वाढ व्हावी, प्राथमिक शिक्षणाचा प्रसार व्हावा व शिक्षणाचा कसही वाढावा, कुणबी मुलांना व इतर मागास मुलांना शिकण्याची संधी मिळावी यासाठी त्यांनी जीवाचे रान केले. मालगुंड, मसुरे, आचरे येथे त्यांच्या बदल्या झाल्या व पुढे रत्नागिरीला बरेच वास्तव्य झाले. मुख्याध्यापक या नात्याने रत्नागिरीला शाळा क्र.एक ची शाळा त्यांनी खरीखुरी क्र. एक ची करून दाखवली. तेथून ते क्र. दोन च्या शाळेत गेले. शाळेच्या वेळाबाहेर ते मुलांना मल्लखांब,

स

आट्यापाट्या शिकवत असत. हस्ताक्षर सुंदर व वळणदार असावे याबद्दल त्यांचा कटाक्ष असे. पुण्याच्या अध्यापन विद्यालयाचे प्राचार्य सी. रा. तावडे यांच्या विद्यमाने भरविलेल्या अखिल महाराष्ट्रातील शाळांमधील मुलांच्या हस्ताक्षरांच्या प्रदर्शनात दिलेल्या २५ प्रशस्तिपत्रकांपैकी १५ एकट्या रत्नागिरी शहराच्या वाट्याला येऊन त्यातील पहिल्या पारितोषिकासकट दहा सामंत मास्तरांच्या शाळेला मिळाली. होतकरू विद्यार्थ्यांसाठी त्यांचा हात सदैव पुढे असे.

प्राथमिक शिक्षक या नात्याने राष्ट्रपती पुरस्काराचा पहिला मान मिळविणारे गो. गो. ऊर्फ नाना पाटकर यांना प्रशिक्षित होण्यासाठी गुरूजींनी उत्तेजन दिलेच शिवाय रत्नागिरीला सहा महिने आपल्या घरी नानांची राहायची व्यवस्था केली. रत्नागिरीच्या शिक्षक पतपेढीच्या जनकांमध्ये वि. गो. खेर यांच्यासह गुरूजींचीही भूमिका होती. १९२८ मध्ये स्थापन झालेल्या या पतपेढीचे पाच वर्षांनी बँकेत रूपांतर झाले. तोपर्यंत सामंत गुरुजीच तिचे अध्यक्ष होते. १९३३ मध्ये भाग शिक्षणाधिकारी म्हणून त्यांची नेमणूक झाली. तेव्हापासून अचानक जाऊन शाळा तपासणीचा झपाटा कधीच चुकला नाही. पहाटे उठून कंदील घेऊन डोंगराळ, खडकाळ पायवाटांनी अनेक मैलांच्या परिसरातील शाळांची तपासणी करताना त्यांचा बारकावा वाखाणण्यासारखा असे. शिक्षक वर्गाबद्दल योग्य ती सहानुभूती असली तरी त्यांनी शिस्त पाळलीच पाहिजे असा त्यांचा कटाक्ष असे.

शारीरिक शिक्षणासाठी त्यांनी स्वखर्चाने एका शिक्षकाची योजना करून तीन ते चार आठवड्यांचे वर्ग चालवले. जवळपासच्या शिक्षकांना एकत्र करून त्यांना लेझीम, लाठीकाठी इत्यादीचे शिक्षण दिले. १९३९ मध्ये निवृत्त झाल्यावर त्यांनी अप्पासाहेब पटवर्धनांच्या मदतीने १९४० मध्ये कुणबी सेवासंघाची स्थापना केली. पुढच्याच वर्षी लांजे येथे कुणबी मुलांसाठी छात्रालय सुरू झाले. त्यावेळी खादीचा पंचा, साधा सदरा, बंद जाकीट व डोक्यावर खादीचीच टोपी चढली ती अखेरपर्यंत. गुरुजी छात्रांबरोबरच असत. आवारात भाजीपाला, झाडे – माड लावत. काटकसरीचे, शिस्तीचे, कष्टाचे, नम्रतेचे संस्कार त्यांनी मुलांत राहूनच त्यांच्यावर केले. १९४४ मध्ये साठी निमित्त त्यांचा बाळासाहेब खेरांच्या हस्ते गौरव करण्यात आला. त्यांना मिळालेल्या थैलीत स्वत:चे १००रु. घालून ती त्यांनी कुणबी सेवा संघासाठी अप्पासाहेब पटवर्धनांच्या हवाली केली. त्यानंतर ते दापोलीला आले व तेथे नवभारत छात्रालयाची वाढ केली. डॉ. ग. वा. मंडलीक पति-पत्नी,शिवप्रताप मालूशेट यांच्याशी गुरुजींचे जिव्हाळ्याचे, घरोब्याचे संबंध होते.

छात्रालयात गुरुकुल शिक्षण पद्धती प्रमाणे दिनक्रम असे. नवभारत छात्रालयाची सुमारे पाच एकर जमीन आहे. त्यात भातशेती, केळी, फळझाडे यांची लागवड केली जाई. ते मुलांबरोबर असत. मुलांना दिले जाणारे पूर्णान्न दिसायला साधे, करायला कटकट कमी, उत्तम सत्त्वांशयुक्त असे. मुलांना सकाळी पावडरचे दूध किंवा कांजी मिळे. शरीरसौष्ठव स्पर्धेत कुणबी मुलांनी दोनदा पहिला नंबर पटकावला. छात्रांची नखे, केस, दात तसेच कपड्यांकडे त्यांचे जातीने लक्ष असेच. आजारी पडल्यास त्याची शुश्रूषा ते मातेच्या ममतेने करीत. गुरूजी मुलांना चित्रकला, हिंदी, संस्कृत परीक्षांना बसवीत. गावातल्या तज्ज्ञ शिक्षकांकडून त्या त्या विषयात मार्गदर्शन करत असत.

१६-१७ वर्षांच्या कालखंडात एखाद दुसरे वर्ष वगळल्यास छात्रालयातील मुलांचा शालान्त परीक्षेचा निकाल १०० टक्के लागत असे.

त्यांनी १९४८ पासून जिल्हा शाळा समिती सदस्य या नात्याने आपल्या अनुभवाच्या आधारावर भरीव कामगिरी केली. सक्तीचे प्राथमिक शिक्षण सुरू झाल्यावर १९५१ मध्ये जिल्ह्यातील शाळांची संख्या व शिक्षकांची संख्या तिप्पट झाली परंतु शाळागृहांच्या व प्रशिक्षित शिक्षकांच्या अभावी अनेक गावी दयनीय स्थिती निर्माण झाली. यातून स्वस्त शाळागृह योजना निर्माण झाली. त्यांच्या प्रेरणेने इयत्ता चौथी ते सहावीचे प्रश्नपत्र जिल्हा बोर्ड छापील काढून सर्व शाळांना पुरवू लागले. त्यामुळे चुरस व स्पर्धा निर्माण झाली. शिक्षणाचा कस वाढीस लागला. भूमितीची उपकरणे, नकाशे, पृथ्वीचा गोल नाणी व तत्सम वस्तू,

मुलांना समजून सांगण्यासाठी त्या त्या प्रकारचे तक्ते ही साधने शाळांकडे असली पाहिजेत असा गुरुजींनी आग्रह धरला.

बोर्डाच्या बैठकीत येणाऱ्या ठरावांचा ते कसोशीने अभ्यास करीत, सहकाऱ्यांशी चर्चा करीत, अधिकाऱ्यांना भेटत, शाळांना भेट देऊन तपशीलवार माहिती घेत, इतर तालुक्यातील शाळांच्या परिस्थितीचे तुलनात्मक चित्र पाहत. मसुद्यावरील प्रत्येक विषयाचे ते स्वतंत्र टाचण करीत. १९५७ पर्यंत ते समिती सदस्य राहिले. १९५० व १९५२ या काळात त्यांनी अनेक शाळांना आकस्मिक भेट देऊन त्यांतील काही ठिकाणचे विदारक चित्र पाहिले. त्यांच्या प्रयत्नाने शिष्यवृत्ती परीक्षेसाठी दापोली हे केंद्र मिळाले. त्यांना ८० वर्षे पूर्ण झाली तेव्हा १९६४ मध्ये मुंबईत मधुकरराव चौधरी यांच्या हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१.

## सावंत, मोहन वासुदेव

**शिक्षक**

**१ फेब्रुवारी १९५१**

कणकवली तालुक्यातील सह्याद्रीच्या कुशीमध्ये बसलेल्या भीरतंडे या खेडेगावात मोहन सावंत यांचा जन्म झाला. घरात अठराविश्‍व दारिद्र्य, वडील व्यसनी अशा परिस्थितीत आई सरस्वतीने मोलमजुरी करुन त्यांचे एस.एस.सी. पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. त्यानंतर त्यांनी राजापूर, कणकवली येथे सुरुवातीला प्राथमिक शिक्षक व पुढे पदवीधर शिक्षक म्हणून २० वर्षे काम केले. नोकरी करत असतानाच त्यांनी एम.ए. एम.एड्. पर्यंतचे शिक्षण घेतले. त्यानंतर शिक्षण विस्तार अधिकारी व प्रभारी गटशिक्षण अधिकारी म्हणूनही काम पाहिले.

शिक्षक ते शिक्षण क्षेत्रातील प्रशासकीय अधिकारी हा प्रवास करीत असताना त्यांनी शिक्षण क्षेत्रात अनेक उपक्रम



राबविले. प्रयोग केले व ग्रामीण भागातील शैक्षणिक दर्जा कसा सुधारेल यासाठी प्रयत्न केला. त्यात शैक्षणिक व मूल्यशिक्षण पथक, आदर्श पाठ लेखन व अध्यापन, शाळा समूह योजना, शैक्षणिक शिबिरे व नवी दिशा, ग्रामवाचनालय, जादा तासांचे नियोजन, बोलके व्हरांडे, स्वाध्याय निर्मिती व व्यापार असे अनेक उपक्रम राबविले, ज्यामध्ये शिक्षक, विद्यार्थी व पालकांचा प्रचंड प्रतिसाद लाभला व या उपक्रमांमुळे शाळांमध्ये चैतन्य निर्माण झाले. याचबरोबर विविध राज्यव्यापी प्राथमिक शिक्षण भरीव प्रशिक्षण कार्यक्रमांत राज्य विभाग जिल्हा स्तरावर तज्ज्ञ मार्गदर्शक म्हणून काम केले आहे. आणि या कामात त्यांनी उत्कृष्ट नियोजन व कार्यवाही केल्याबद्दल त्यांचा संचालक महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषदेने गौरव केला आहे.

याबरोबर त्यांनी प्रशासक म्हणूनही शाळेतील शिक्षकांची सेवा पुस्तके अद्ययावत व बायंडिंग करून त्याची एक प्रत प्रत्येक शिक्षकाकडे दिली. त्याचप्रमाणे शिक्षकांच्या देय रकमांचा पाठपुरावा करुन व आवश्यक कागदपत्रांची पूर्तता करुन अनेक प्रकरणे निकालात काढली आहेत. नवीन नवीन गोष्टी शिकायच्या व त्या शिकवायच्या हा त्यांचा छंद. यातूनच त्यांनी अनेक राज्य व राष्ट्रस्तरीय प्रशिक्षण शिबिरातून प्रशिक्षण घेतले आहे. त्याबरोबरच प्रौढ निरंतर शिक्षण, श्रमसंस्कार शिबिरांचे आयोजन, प्राथमिक शाळांना प्रयोग व अन्य साहित्याची उपलब्धता, साक्षरता अभियान, अल्पबचत, अभियान, त्याचबरोबर कुंभवडे येथे ग्रामविकास मंडळातर्फे शिक्षक व विद्यार्थ्यांना प्रोत्साहन देण्यासाठी शिक्षक पुरस्कार व विद्यार्थी गौरव पुरस्काराची व शिष्यवृत्तीची प्रथा पाडून दिली.

मोहन सावंतांना इतिहास संशोधनाची आवड आहे. गो. नी. दांडेकर, बाबासाहेब पुरंदरे यांच्याबरोबर अनेक गड-किल्ल्यांची भ्रमंती करून त्याच्या संशोधन कार्यात

स

मदत केली आहे. तसेच पुराण वस्तु संशोधक अण्णासाहेब शिरगावकर यांच्या सोबत पुराण वस्तु, संशोधनाचे कार्य केले आहे. तसेच ऐतिहासिक व पुराणवस्तूंची प्रदर्शने भरवून व त्यावरील व्याख्याने देऊन समाजाला सामाजिक व राष्ट्रीय परंपरांचे स्मरण करून दिले आहे. याचबरोबर साने गुरूजी कथामालेतून ‘शाळा तेथे कथामाला’ उपक्रम राबविण्यामध्ये प्रमुख भूमिका बजावली आहे.

आजही राष्ट्रपुरुषांचे चरित्र, ऐतिहासिक परंपरा, संस्कृती आपल्या व्याख्यानातून संपूर्ण समाजापर्यंत पोहचविण्याचे त्यांचे काम व्रत घेतल्याप्रमाणे अविरत चालू आहे.

– विवेक कुलकर्णी

## साळुंखे, गोविंद ज्ञानोजी

**संस्थापक**

**९ जून १९१९ – ८ ऑगस्ट १९८७**



गोविंद ज्ञानोजीराव तथा बापूजी साळुंखे यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील पाटण तालुक्यातील रामापूर गावातील सरदार घराण्यात झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण रामापूरमध्ये झाले. हे शिक्षण सुरू असतानाच त्यांच्या आई-वडिलांचे अकाली निधन झाल्याने त्यांचे माध्यमिक शिक्षण इस्लामपूरला झाले. महाविद्यालयीन शिक्षण त्यांनी कोल्हापूरला पूर्ण केले. पदवीसाठी इतिहास हा त्यांचा एक विषय असल्याने प्रा. डॉ. आप्पासाहेब पवार यांच्या सांगण्यावरून बापूजी सोंडूर येथील घोरपडे राजघराण्याचा इतिहास लिहिण्यासाठी सोंडूरला गेले व काही काळ त्यांनी तेथेच राजगुरू म्हणून काम केले. १९४२ च्या चळवळीत सहभागी होण्यासाठी त्यांनी नोकरी सोडून दिली. काँग्रेसची विद्यार्थी संघटना, सेवादल यांचे कार्य केले. याच काळात कर्मवीर भाऊराव पाटील ह्यांच्या शिक्षणकार्यास मदत म्हणून विद्यार्थी काँग्रेसने लाख रुपयांची थैली देण्याचे ठरविले. या समितीचे बापूजी अध्यक्ष होते.

१९४८ ते १९५४ या काळात बापूजींनी रयत शिक्षण संस्थेत शिक्षक-मुख्याध्यापक म्हणून कार्य केले. ते संस्थेचे आजीव सेवक झाले. पण तात्त्विक मतभेद झाल्याने त्यांनी संस्था सोडली व मोजके सहकारी, विद्यार्थी यांच्या सहकार्याने ‘श्री स्वामी विवेकानंद शिक्षण संस्था’ स्थापन केली. सामान्य समाजात सुसंस्कारी शिक्षण प्रसारातून समाजाचे परिवर्तन घडवून आणण्याच्या मुख्य उद्दिष्टाच्या पूर्तीसाठी ६ जून १९५५ रोजी संस्थेची पहिली पाच माध्यमिक विद्यालये कोल्हापूर, तासगाव (जिल्हा सांगली), चाफळ, तारळे, उंडाळे (जिल्हा सातारा) या ठिकाणी सुरू केली. कराड येथे स्त्रियांचे अध्यापक विद्यालय, कोल्हापूर व चाफळ येथे वसतिगृहे काढली.

ग्रामीण भागातील मुले महाविद्यालयीन शिक्षणापासून वंचित राहू नयेत यासाठी संस्थेचे पहिले महाविद्यालय मराठवाड्यात उस्मानाबाद येथे सुरू केले. त्यानंतर मिरज, सातारा, तळमावले अशी महाविद्यालये स्थापन केली. कोल्हापूर येथील विवेकानंद महाविद्यालय महाराष्ट्रात गुणवत्तेत अव्वल दर्जाचे महाविद्यालय ठरले आहे. उस्मानाबाद, कराड, तासगाव येथे शिक्षणशास्त्र महाविद्यालये व काही अध्यापक विद्यालये सुरू केली.

हे सर्व करीत असताना खेडोपाडी हिंडून बापूजींनी शिक्षणाचे महत्त्व पटवून दिले. मुलांना शाळेत पाठवण्यास पालकांना उद्युक्त केले. अनेक शाळा ग्रामस्थांच्या, समाजाच्या मदतीने उभ्या केल्या. नि:स्पृहपणे कार्य करणारे कार्यकर्ते निर्माण केले. संस्थेचा विस्तार करीत असताना बापूजी अनेक अडचणींना सामोरे जात होते.

बापूजींच्या हयातीत संस्थेचा रौप्यमहोत्सव साजरा होईपर्यंत संस्थेचा व्याप अकरा जिल्ह्यात पसरला होता. दहा महाविद्यालये व शिक्षणशास्त्र महाविद्यालये, आठ अध्यापक विद्यालये, अठ्ठावीस उच्च माध्यमिक शाळा, एकशे चाळीस माध्यमिक विद्यामंदिरे,सराव शाळा, विस्तार सेवा केंद्रे, मुलांची बावीस व मुलींची तीन वसतिगृहे एवढी संस्कृती केंद्रे कार्यरत होती. महात्मा गांधींच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे बापूजींची राहणी साधी, आचरण शुद्ध

होते. संस्थेचे संस्थापक व नंतर कार्याध्यक्ष म्हणून काम करीत असतानाही त्यांनी अखेरपर्यंत स्वत: बी. ए. बी. एड. शिक्षकाचे वेतन घेतले. स्वत:चे शैक्षणिक तत्त्वज्ञान स्पष्ट करणारी व सर्वधर्मसमभाव शिकविणारी संस्थेची प्रार्थना बापूजींनी रचली, तिला चालही लावली. आज ही प्रार्थना संस्थेच्या सर्व संस्कृतीकेंद्रांतून म्हटली जाते.

बापूजींना समाजाकडून, शासनाकडून अनेक सन्मान मिळाले. भारत सरकार व महाराष्ट्र शासनाने त्यांना स्वातंत्र्य सैनिकाचे मानपत्र दिले. महाराष्ट्र शासनाचा 'दलित मित्र पुरस्कार' त्यांना मिळाला. १९८६ मध्ये शिवाजी विद्यापीठाने त्यांना डी. लिट. ही सन्माननीय पदवी प्रदान केली. १९८० मध्ये सर्व संस्था सेवकांनी त्यांना षष्ट्यब्दीपूर्तीनिमित्त पाच लाख रुपयांची थैली अर्पण केली. बापूजींनी त्यात स्वत:चे एकशे एक रुपये घालून ती संस्थेच्या कार्यासाठी दिली.

बापूजी शिक्षक होते, कवी होते, लेखक होते, स्वातंत्र्यसैनिक होते, संत साहित्याचे अभ्यासक होते, भगवद्‌गीतेचे उपासक होते, स्थितप्रज्ञ कर्मयोगी होते, मानवतेचे पुजारी होते, खऱ्या अर्थाने आधुनिक काळातील शिक्षण महर्षी होते. आज त्यांच्या संस्थेची तीनशे त्रेपन्न केंद्रे आहेत. या संस्कृती केंद्रांच्या माध्यमातून समाजातील नाकारल्या गेलेल्या शेवटच्या माणसापर्यंत शिक्षण नेण्याचे ह्या शिक्षणमहर्षींचे स्वप्न संस्था साकार करीत आहे.

– प्रा. महेश गायकवाड

## साळुंखे, हणमंत काशिनाथ

**१ एप्रिल १९२९**

**संस्थापक, मुख्याध्यापक**

हणमंत काशिनाथ साळुंखे उर्फ एच. के. यांचा जन्म कलेढोण येथे झाला. लहानपणीच वडिलांचे छत्र हरवले, त्यामुळे मातेनेच त्यांचा सांभाळ केला. त्यांचे प्राथमिक शिक्षण कलेढोण येथेच झाले. सातवीची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर पुढील शिक्षणासाठी ते नाशिक येथील अनाथ विद्यार्थी वसतिगृहात गेले. आठवीसाठी ते पुण्याच्या



अनाथ विद्यार्थी वसतिगृहात गेले. तेथूनच त्यांनी ११ वी ची परीक्षा दिली व उत्तीर्ण झाले.

महाविद्यालयीन शिक्षणासाठी एच.कें.नी सातारा येथील छत्रपती शिवाजी महाविद्यालयमध्ये प्रवेश घेतला. कमवा व शिका या योजनेत सहभागी होऊन त्यांनी इंटरची परीक्षा दिली. इंटरनंतर पदवीसाठी प्रवेश घेणे त्यांना आर्थिक अडचणीमुळे शक्य नसल्याने त्यांनी लवकरात लवकर स्वावलंबी बनण्यासाठी १९५६ मध्ये टी.डी.ची परीक्षा दिली.

टी.डी झाल्यानंतर रयत शिक्षण संस्थेने त्यांना कोल्हापूर जिल्ह्यातील हुपरी येथे मुख्याध्यापक (१९५४-५६) म्हणून काम करण्यास सांगितले. त्यांनी या विद्यालयाच्या विकासाचा पाया घातला. त्यांची प्रयोगशीलता व अंत:करणपूर्वक काम करण्याची जिद्द यामुळे ते सतत कार्यरत होते, तरीही ते अस्वस्थ असत. त्यांचा स्वभाव त्यांना नोकरीच्या चाकोरीतून बाहेर पडण्यासाठी खुणावू लागला. त्यांनी संस्थेकडे नोकरीचा राजीनामा पाठविला.

त्यानंतर त्यांनी राष्ट्रसेवा दल व प्रजा समाजवादी पक्षाचे कार्य पूर्णवेळ कार्यकर्ता म्हणून केले. (१९५६-१९६०) या कालावधीत गोवा मुक्ती आंदोलन व संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत सहभाग घेतला. या कार्यात मग्न असतानाच त्यांना आपण आपल्या गावासाठी काहीतरी केले पाहिजे असे प्रकर्षाने वाटू लागले. कलेढोण हे गाव खटाव तालुक्यात एक मोठे गाव म्हणून ओळखले जाते. मायणीनंतर पंचवीस मैलाच्या परिसरात विद्यालयीन शिक्षणाची सोय नव्हती. या परिसरातील मुला-मुलींसाठी माध्यमिक शिक्षणाची सुविधा आपण उपलब्ध करून दिली पाहिजे असे एच. कें ना. प्रकर्षाने जाणवू लागले. आपल्या काही समवयस्क मित्रांशी व परिसरातील प्रमुख कार्यकर्त्यांशी चर्चा करून त्यांनी 'हनुमान शिक्षण संस्था, कलेढोण' ची स्थापना केली. या संस्थेचे सचिव पद एच.

कें. नी कार्यकर्त्यांच्या आग्रहामुळे स्वीकारले व आजतागायत ते या पदावर काम करीत आहेत.

विद्यालयास परवानगी मिळाल्यानंतर पूर्वीचा अनुभव असल्याने मुख्याध्यापक म्हणून काम करण्याची जबाबदारी एच. कें. नी सर्वांच्या आग्रहामुळे स्वीकारली व ती कर्तव्य भावनेने पार पाडली (१९६०-१९८७). सुरुवातीला शाळा भाड्याच्या इमारतीत भरत असे, मुलांची अपुरी संख्या असे, स्थानिक राजकारण, या सर्व अडचणींवर मात करून त्यांनी संस्थेच्या विद्या विकास मंदिरास स्थैर्य प्राप्त करून दिले. विद्यालयाची शैक्षणिक गुणवत्ता टिकून राहावी यासाठी त्यांनी प्रारंभापासूनच विविध उपक्रम राबविले आहेत. विद्यार्थ्यांची गुणवत्ता वाढावी यासाठी शिष्यवृत्तीचे तास नियमितपणे घेतले जातात. शाळेसाठी माजी विद्यार्थी, ग्रामस्थ, सोने-चांदीच्या क्षेत्रात भारतभर पसरलेले लोक यांच्याकडून देणग्या गोळा करून शाळेला भव्य इमारत बांधली आहे. शाळेत आज १३ तुकड्या असून विद्यार्थी संख्या ७५० ते ८०० च्या दरम्यान असते. या विद्यालयामुळे परिसरातील विद्यार्थी, विशेषत: मुली, यांच्या शिक्षणाची सोय झाली आहे. विद्यालयास जोडूनच महात्मा फुले यांच्या नावे वसतिगृह सुरू केले आहे.

शिक्षण प्रसाराबरोबरच कलेढोण परिसरातील गावांचा विकास व्हावा या हेतूने एच. कें. नी सातत्याने प्रयत्न केले आहेत. परिसरातील लोकांना आरोग्य सेवा उपलब्ध व्हावी यासाठी कॉटेज हॉस्पीटल कलेढोण येथे चालू करण्यात आले आहे. हनुमान सहकारी संस्था- कलेढोण, महाराष्ट्र राज्य सहकारी देखरेख संघ, पश्चिम महाराष्ट्र प्रादेशिक मंडळ, सातारा जिल्हा मध्यवर्ती बँक या सहकारी संस्थेंद्वारा परिसराचा विकास साधण्याचा प्रयत्न एच. कें. नी केला आहे. १९८२ मध्ये त्यांनी स्वत: द्राक्ष लावण्याचा प्रयोग यशस्वीपणे कार्यवाहीत आणला आहे. त्यामुळे कलेढोण परिसरात द्राक्षांची लागवड सुरू झाली. आज कलेढोणची द्राक्षे प्रसिद्ध असून लंडनच्या बाजारात त्यांना मागणी आहे.

१९९९ मध्ये एच. कें. नी 'स्टेशनरी पॉईंट इंडिया लिमिटेड' या कंपनीची स्थापना कलेढोण येथे करून ती चांगल्या प्रकारे चालविली जाईल इकडे लक्ष पुरविले आहे. या प्रकल्पात आज कलेढोण परिसरातील ३५० तरुणांना नोकरी मिळाली आहे.

त्याच्या शैक्षणिक क्षेत्रातील कामगिरीमुळे त्यांना तालुका व जिल्हास्तरावरील आदर्श शिक्षक पुरस्कार मिळालेला आहे. नुकताच सेवानिवृत्त मुख्याध्यापक संघाने त्यांना 'उत्कृष्ट मुख्याध्यापक' हा पुरस्कार प्रदान केला आहे.

शिक्षण, सामाजिक, राजकीय व सहकार क्षेत्रातील त्यांच्या कामाचा गौरव तालुका व जिल्ह्यातील जनतेने २००२ मध्ये करून त्यांना ११ लाखांची थैली अर्पण केली होती. त्यात १११११ रु. घालून ती रक्कम समाजहितासाठी वापरली जावी यासाठी त्यांनी परत केली आहे.

एच. के. हे एक धडपडणारे व्यक्तिमत्व होय. आपल्या जीवनात त्यांनी नैतिकता व निःस्पृहपणा या मूल्यांची जपणूक केल्याने परिसरातील जनता त्यांना मानते हीच त्यांची खरी ओळख होय.

– प्रा. वसंत रोकडे

## सुखटणकर, यशवंत हणमंत

**संस्थापक**

**२४ फेब्रुवारी १८९२ – १८ जानेवारी १९७५**



गोव्यामधील चिंचणी गावात यशवंत ऊर्फ नानासाहेबांचा जन्म झाला. गावात मराठी शाळा नसल्याने यांचे शिक्षण वेंगुर्ले तालुक्यातील शिरोडे येथे झाले. त्यांना लहानपणापासून वाचनाचा छंद होता. त्यांनी इंग्रजी शिक्षण मुंबईत मुगभाटात चुलत्यांच्या घरी राहून केले. १९१० मध्ये नाना स्कूल फायनल परीक्षा पास झाले. नोकरी अपरिहार्य होती. ३० मार्च १९१० रोजी राजापूर तालुक्यातील बाळाजी आत्माराम पत्की यांच्या कन्येशी त्यांचा विवाह झाला. विल्सन महाविद्यालयात नाना ग्रंथपाल म्हणून नोकरी करीत व वाचनाचा छंदही जोपासत.

'सारस्वत विद्यार्थी साहाय्यक मंडळी' ची स्थापना काशिनाथ रघुनाथ मित्र व त्यांच्या सहकाऱ्यांनी १९०२ मध्ये केली. नानासाहेब सुखटणकर व इतरांच्या श्रमांमुळे या मंडळीचा पुढे विकास झाला. नानांनी १९११ मध्ये वरील सारस्वत विद्यार्थी साहाय्यक मंडळीच्या कार्याची धुरा वाहिली. त्यानंतरच्या अर्धशतकात सुमारे २८०० विद्यार्थ्यांना ९ लाख रुपयांहून अधिक मदत दिली व संस्थेची गंगाजळी १० लाख रुपयांपर्यंत नेली. एवढा दीर्घ काल अविरतपणे या संस्थेसाठी झटलेला दुसरा कार्यकर्ता संस्थेच्या इतिहासात नाही. नाना संस्थेचे स्वयंसेवक, चिटणीस, अध्यक्ष व नंतर विश्वस्त होते.

जुलै १९२३ मध्ये नाना, रा. ब. सखाराम विश्वनाथ राजाध्यक्ष, दि. ब. डॉ. ज. शं. नेरूरकर या तिघांनी मिळून, राजाध्यक्ष फॉरिन एज्युकेशन सोसायटीची स्थापना केली. शंभराहून अधिक विद्यार्थ्यांना याचा फायदा मिळाला.

लिंगभेद किंवा ज्ञातीतील पोटभेद लक्षात न घेता गरजूंना शिक्षणात मदत करण्याच्या उदार धोरणातून संस्थेचे काम चालते. या सत्कार्याच्या प्रचारासाठी नानांना पायपीट करून वर्गणीदार वाढवणे, त्यांची यादी करणे, वर्गणी गोळा करणे, अर्जाचे फॉर्म देऊन भरून घेणे, वृत्तान्ताच्या प्रती घेऊन जिन्यांची चढउतार करीत उत्साह टिकवून काम करण्याचा आदर्श निर्माण केला. मानापमान दूर ठेवून, चिकाटीने व निरलस, निःस्वार्थीपणे नानांनी लोकांच्या वारंवार भेटी घेऊन संस्थेचे महत्व पटवून, सहानुभूती मिळवून वर्गणीदार वाढवले व देणगीदार मिळवले. १९१६ मध्ये सभासद संख्या ९३८ होती व वार्षिक मदत ४१०० रु. दिली जाई.

नानांच्या पुढे अण्णासाहेब कर्वे यांचा आदर्श होता. नानांनी 'अनाथ विधवा शिक्षण फंड' निर्माण करण्यासाठी खूप कष्ट केले. वक्तृत्व स्पर्धांचे आयोजन केले. पु. ल. देशपांडे, मंगेश पाडगावकरांसारखे त्यात भाग घेऊ लागले व बक्षिसे पटकावू लागले. सदानंद लक्ष्मण कापडी यांनी नानांना १९०९ ते १९६७ पर्यंत अखंड साथ दिली.

गरीब विद्यार्थ्यांना मदत करणारी एकमेव आदर्श ज्ञातीय संस्था असा सारस्वत विद्यार्थी साहाय्यक मंडळी व राजाध्यक्ष फॉरिन एज्यु. सोसायटीचा लौकिक झाला. त्याग व निष्ठेने शैक्षणिक कार्यात साहाय्यभूत झालेल्या नानांविषयी थोर मराठी साहित्यिक पु. ल. देशपांडे लिहितात,

"सारस्वत ज्ञातीत जन्मलेल्या गरीब विद्यार्थ्यांच्या अभ्युदयासाठी नानांनी आपल्या अवघ्या जीवनाचे भिक्षापात्र केले.... एका विशिष्ट जातीतल्या विद्यार्थ्यांपुरते त्यांनी आपल्या सेवेचे क्षेत्र मर्यादित केले म्हणून त्यांच्या सेवेला गौणत्व येत नाही. माझ्यासारख्या लहानांनी पितृतुल्य नानांचे अभिनंदन न करता पदवंदन करायला हवे."

– वि. ग. जोशी

**संदर्भः**

## सुखात्मे, पांडुरंग वासुदेव

☞ **मुख्य नोंद – विज्ञान खंड**

## सोनोपंत, दांडेकर

☞ **मुख्य नोंद – धर्मकारण खंड**

## सोमण, लक्ष्मण पांडुरंग

**संस्थापक, प्रशासक**

**२२ ऑगस्ट १८९४ – २८ डिसेंबर १९८४**



नाशिक जिल्ह्यातील पिंपळगाव बसवंत या गावात लक्ष्मण पांडुरंग सोमण यांचा जन्म झाला. त्यांचे लहानपण भुसावळ येथे गेले. त्यांचे वडील मामलेदार होते. सोमण यांच्या वयाच्या आठव्या वर्षीच पितृछत्र हरपले. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत त्यांचे शालेय शिक्षण चालू होते. अशा परिस्थितीतच ते पहिल्या वर्गात मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. महाविद्यालयीन शिक्षणासाठी त्यांना पुण्यास जावे लागले. फर्गसन महाविद्यालयामधून ते बी. ए. झाले.

स

स्वातंत्र्यपूर्व काळचे वातावरण होते. टिळक-आगरकरांचा काळ होता. मुंबईत एका अकाउंट्स कंपनीत मोठ्या पगाराची नोकरी मिळाली. पण 'राष्ट्रीय शाळा' काढण्याच्या विचाराने सोमण झपाटलेले होते. नोकरी सोडून ते नाशिकला आले. समविचारी सहकाऱ्यांच्या मदतीने सन १९१४ मध्ये त्यांनी नाशिक शिक्षण प्रसारक मंडळाची स्थापना केली. 'न्यू इंग्लिश स्कूल' ही शाळा सुरू केली. शाळा सांभाळत असतानाच ते बी.टी. झाले. कायद्याची बाजूही माहीत असावी म्हणून एलएल.बी. पदवी मिळविली. इंग्रजी, गणित, इतिहास, भूगोल सर्वच विषयांवर सोमण यांचे प्रभुत्व होते. ते स्वत: उत्तम खेळाडू होते. आट्यापाट्या, हुतूतू असे देशी खेळ, क्रिकेट, व्हॉलीबॉल हे विदेशी खेळ ते उत्तम खेळत. पंचवीस वर्षे ते मुख्याध्यापक असल्याने शाळेची प्रगतीच्या दिशेने घोडदौड चालू होती. याच काळात मुंबईतील दानशूर, शिक्षणप्रेमी जु. स. रुंग्टा यांच्याकडून त्यांनी देणगी मिळविली. शाळेचे 'जु. स. रुंग्टा विद्यालय' असे नामकरण झाले. मुलींसाठी 'पुष्पावती रुंग्टा कन्या विद्यालय' ही स्वतंत्र शाळा सुरू केली. नाशिक रोडच्या परिसरातील 'पुरुषोत्तम इंग्लिश स्कूल' ही आणखी एक नवी शाळा काढली. या सर्वच शाळा प्रयोगशाळा, चित्रकला, भूगोलासाठी स्वतंत्र वर्ग, मोठे क्रीडांगण, सुसज्ज जिमखाना यांनी संपन्न होत्या. नाशिकमध्ये उत्तम विद्यार्थी घडविण्याचे कार्य चालू होते. तात्यासाहेब शिरवाडकर तथा कुसुमाग्रज हे सोमण यांचे विद्यार्थी होते. नंतरच्या काळात इगतपुरी, नांदगाव, सिन्नर ह्या तालुक्यांत त्यांनी शाळा सुरू केल्या.

– प्रा. सुहासिनी पटेल

## स्वामी रामानंद तीर्थ

**शिक्षक, संस्थापक**

**३ ऑक्टोबर १९०३ – २२ जानेवारी १९७२**

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

स्वामी रामानंद तीर्थांचे मूळ नाव व्यंकटेश होते. सध्याच्या कर्नाटक राज्यातील विजापूर जिल्ह्यातील सिंदगी



हे त्यांचे जन्मगाव. त्यांच्या वडिलांचे नाव भवानराव तर आईचे नाव यशोदाबाई. विजापूर जिल्ह्यातील खेडगी हे त्यांचे मूळ गाव.

भवानराव सिंदगीच्या प्राथमिक शाळेत शिक्षक होते. भवानरावांचा ओढा वैराग्याकडे अधिक होता. वडिलांच्या वैराग्यवृत्तीचा प्रभाव व्यंकटेशांवर बालपणीच अधिक पडला.

व्यंकटेशाचे प्राथमिक शिक्षण गाणगापूर येथे झाले. त्यानंतर मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण सोलापूरच्या नॉर्थकोट विद्यालयामध्ये झाले. सोलापूरला लोकमान्य टिळकांचे भाषण ऐकून ते प्रभावित झाले. आपणही देशकार्य करावे, असे त्यांनी मनोमन ठरविले. एक ऑगस्ट १९२० ला लोकमान्य टिळकांचे निधन झाले. या घटनेने व्यथित झालेल्या व्यंकटेशांनी आजन्म ब्रह्मचारी राहून मातृभूमीची सेवा करण्याचा संकल्प केला. याच दरम्यान महात्मा गांधी सोलापूरला आले. गांधीजींच्या दर्शनाने व्यंकटेशांच्या मनात देशसेवेचा संकल्प अधिक दृढ झाला. मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी अमळनेरच्या राष्ट्रीय महाविद्यालयात पुढील शिक्षणासाठी प्रवेश घेतला. तेथे त्यांनी क्रमिक अभ्यासक्रमाबरोबर महात्मा गांधी, स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांच्या लेखनाचा सखोल अभ्यास केला. त्यामुळे त्यांच्या वैचारिक जडणघडणीला राष्ट्रीय आणि आध्यात्मिक वळण लाभले. स्वतःचे शिक्षण सांभाळत ते सूतकताई, स्वयंसेवक दल, संचलन अशा राष्ट्रीय कार्यक्रमांमध्ये आत्मीयतेने सहभागी होत राहिले. १९२३ मध्ये त्यांनी इंटरची परीक्षा उत्तीर्ण केली, आणि पुढील शिक्षणासाठी पुण्याचे टिळक महाविद्यालय गाठले. तिथे ते वाङ्मय पारंगत झाले.

व्यंकटेश खेडगीकरांनी १९२९ मध्ये उस्मानाबाद जिल्ह्यातील हिप्परगा येथील राष्ट्रीय शाळेत शिक्षक व मुख्याध्यापक या नात्याने शैक्षणिक कार्याला प्रारंभ केला.विद्यार्थी हा त्यांचा शैक्षणिक कार्याचा केंद्रबिंदू होता.

स

विद्यार्थ्यांना शिक्षा करण्यापूर्वी स्वतःच्या हातावर स्वतः छड्या मारणारा, विद्यार्थ्यांमध्ये सुधारणा व्हावी म्हणून उपोषणाला बसणारा, आजारी विद्यार्थ्याची सेवा करताना त्याला थोपटत देशभक्तीपर गीते म्हणणारा मातृहृदयी शिक्षक त्याचप्रमाणे विद्यार्थ्यावर शिस्तीचे संस्कार स्वतःच्या नैतिक दराऱ्यातून करणारा पितृहृदयी शिक्षकही व्यंकटेश खेडगीकरांच्या रुपाने हिप्परग्याने अनुभवला. शिक्षक मातृपितृहृदयी असावा, हा नवा शैक्षणिक सिध्दांत स्वतःच्या आचरणातून त्यांनी सिध्द केला. त्यांच्या इंग्रजीच्या सहजसुंदर, मंत्रमुग्ध अध्यापनामुळे हिप्परग्याची राष्टीय शाळा अध्यापनाची प्रयोगशाळा ठरली. त्यांच्या अध्यापनातून विद्यार्थ्यांवर होत असलेले मूल्यसंस्कार त्यांच्या स्वतःवरही होऊ लागले. या मूल्यसंस्कारामुळे जानेवारी १९३२ हा मकरसंक्रमणाचा दिवस त्यांच्यासाठी उदात्त संक्रमणाचा ठरला. संन्यस्त होण्याचा आपला निश्चय त्यांनी या दिवशी कृतीत संक्रमीत केला. स्वामी रामतीर्थांचे शिष्य नारायण स्वामी यांच्याकडून संन्यास घेतलेले व्यंकटेश भगवानराव खेडगीकर, स्वामी रामानंद तीर्थ झाले. लोक त्यांना 'स्वामीजी' म्हणू लागले. स्वामीजींच्या दिक्षित जीवनाचा हेतू जनकल्याण व देशकार्य हाच होता. त्यासाठीच विद्यार्थ्यांना शिक्षित करण्याचे पवित्र कार्य स्वामीजींनी पुढेही अविरत चालू ठेवले. हिप्परग्याच्या शाळेत देशभक्तीने भारलेली पिढी घडते आहे. हे निजाम राजवटीला परवडण्यासारखे नव्हते. स्वाभाविकच या शाळेवर निजामाची वक्रदृष्टी होती. तशातच हिप्परग्याला प्लेगची साथ सुरु झाली. हिप्परग्याची राष्ट्रीय शाळा सोलापूरला स्थलांतरीत झाली.

स्वामीजी व त्यांच्या सहकाऱ्यांनी आपले कार्य पुढे चालू ठेवण्यासाठी अंबाजोगाई (त्याकाळचे मोमीनाबाद) हे क्षेत्र निवडले. अंबाजोगाईला नारायणराव जोशी व त्यांच्या सहकाऱ्यांनी १९१८ मध्येच योगेश्वरी नूतन विद्यालय सुरु केले होते. ५ मे १९३५ ला स्वामीजी या शाळेत मुख्याध्यापक म्हणून रुजू झाले. या शाळेत त्यांनी माध्यमिक शिक्षणाचा विभाग सुरु केला. 'तेन त्यक्तेन भुंजीता' –कुठलाही उपभोग त्याच भावनेन घ्या–हे ब्रीद समोर ठेवून त्यागाचा व राष्ट्रीय शिक्षणाचा उर्जित प्रयोग या शाळेने स्वामीजींच्या नेतृत्वाखाली सुरु केला. या स्वामाजींच्या विचाराचा आचार या शाळेत घडू लागला. शाळेला जोडून असलेल्या वसतिगृहात सर्व जातीधर्माची मुले ताटाला ताट लावून जेवू लागली. ह्या शाळेतली ही समता शाळेपुरतीच मर्यादित राहिली नाही. शाळेतले शिक्षक दलित वस्तीमध्ये प्रौढ निरक्षरांसाठी साक्षरता वर्ग घेऊ लागले. या समतेच्या आचाराला प्रेरित करणारा कृतिविचार अर्थातच स्वामीजींचा होता.

शिक्षणाशिवाय स्वातंत्र्य आणि स्वातंत्र्याशिवाय शिक्षण अपूर्ण आहे. या जाणिवेने ते स्वातंत्र्य चळवळीकडे खेचले गेले. त्यांनी १९३८ मध्ये शाळेच्या मुख्याध्यापक पदाचा राजीनामा दिला. जुलमी निजामी राजवटीच्या विरोधी लढ्यात ते इतके अग्रेसर झाले की, या लढ्याचे नेतृत्व त्यांच्याकडे आले. 'माझी संस्था राष्ट्राच्या स्वातंत्र्य यज्ञात दिव्य मरण पत्करण्यासाठी जन्माला आली आहे'. या त्यांच्या तेजस्वी विचाराने शाळेतल्या राष्ट्रीय शिक्षणाला उदात्त पातळीवर नेले. अंबाजोगाईच्या योगेश्वरी शाळेतील सर्व शिक्षक निजामाच्या जुलमास न जुमानता विद्यार्थ्यांना राष्ट्रीय शिक्षणाचे धडे बेधडकपणे देऊ लागले. शाळेच्या प्रार्थनेत वंदे मातरमचे गगनभेदी राष्ट्रगान निनादू लागले. त्यामुळे निजामाच्या दप्तरात या शाळेची नोंद बागी मदरसा अशी घेण्यात आली. जनमानसासाठी ही बाब अभिमानाची होती. अशा शाळेत आपल्या मुलांना शिक्षणासाठी पाठविणे, ही बाब लोकांना गौरवाची वाटत होती. शाळेतले बाबासाहेब परांजपे, ए. मा. कुलकर्णी, किंबहुने, आचार्य ग.धो. देशपांडे, बाबूराव कानडे, अहंकारी, लाला बिंदाप्रसाद, व्यंकटराव देशपांडे, बेथूजी, हरबाजी, रामपूरकर इत्यादी गुरुजन या ना त्या मार्गाने हैद्राबाद मुक्तीसंग्रामात सहभागी होत होते. या लढ्यात गुरुजनांसोबत शाळेतले अनेक विद्यार्थीही अग्रेसर होते. १९४२ च्या चले जावच्या आंदोलनानंतर हैद्राबाद मुक्तिसंग्रामाची चळवळ अधिकच तीव्र झाली. गोविंदभाई श्रॉफ, माणिकचंद पहाडे, गोविंदराव नानल, दिगंबरराव बिंदू, श्यामराव बोधनकर, भगवानराव गांजवे, राघवेंद्र दिवाण, पुरूषोत्तमराव चपळगावकर, देवराव

स

कांबळे, विनायकराव चारठाणकर, विजयेंद्र काबरा, नागनाथराव परांजपे, शांतिनाथ लुंगाडे इत्यादी स्वातंत्र्य सैनिकांच्या समर्पित सहकार्याने स्वामीजींनी ही चळवळ नेटाने पुढे चालविली. ही चळवळ एका अर्थाने स्वातंत्र्य संग्रामाचे लोकशिक्षण ठरली. स्वतंत्र भारताचे गृहमंत्री वल्लभभाई पटेलांच्या पोलिस कार्यवाहीमुळे १७ सप्टेंबर १९४८ ला हैद्राबाद संस्थान भारतीय संघराज्यात विलीन झाले. हैदराबाद मुक्तिसंग्रामाचे हे यश होते. या संग्रामातील स्वामीजींचे योगदान लक्षात घेऊन लोक स्वामीजींना 'मुक्तिदाता' असे श्रद्धेने संबोधू लागले.

मिळविलेल्या स्वातंत्र्याला समृद्ध करण्यासाठी समृद्ध शिक्षणाची गरज होतीच. समृद्ध शिक्षणाचा वसा घेतलेल्या स्वामीजींनी व्हिजन हे इंग्रजी साप्ताहिक सुरू केले. २८ जून १९५० ला नांदेड येथे पीपल्स कॉलेजची स्थापना केली. दलितांचे पीडितांचे मन जवळ बाळगणारा परिपूर्ण माणूस उत्क्रांत करण्याचा ध्यास त्यांनी घेतला होता.

भारताच्या लोकशाहीसाठी ज्ञान व चारित्र्याची साधना करणारा स्वतःचे व्यक्तिमत्व स्वतंत्र वृत्तीने घडविण्यास सिद्ध असलेला विद्यार्थी घडविणे ही या महाविद्यालयाची इति कर्तव्यता स्वामीजींनी निश्चित केली. स्वातंत्र्यप्राप्तीच्या ध्येयाने प्रेरित झालेली त्यांची शिक्षण प्रणाली स्वातंत्र्यप्राप्तीनंतर स्वातंत्र्याच्या समृद्धीकरणासाठी सिद्ध झाली.

स्वामीजींचा शिक्षणाचा हाच उदात्त विचार त्यांनी जून १९५५ मध्ये लातूर येथे स्थापन केलेल्या तंत्र विद्यालयातून, २९ जून १९५६ ला अंबेजोगाई येथे स्थापन केलेल्या योगेश्वरी महाविद्यालयातून इ. स. आणि १९६६ मध्ये आंध्र प्रदेशातील चिंतलूरजवळ स्थापन केलेल्या रामतीर्थ शांती महाविद्यालयात व्यक्त होऊ लागला.

स्वामीजी संन्यस्त होते. त्यांनी स्वतःचा संसार सुरू केला नव्हता. पण समाजाचा संसार सोडला नव्हता. समाजकारणासाठी आवश्यक असलेल्या राजकारणाचा त्यांना अंतराय नव्हता. १९५२ मध्ये गुलबर्गा मतदार संघातून आणि इ.स. १९५७ मध्ये औरंगाबाद मतदार संघातून विजयी होऊन खासदार झालेल्या स्वामीजींनी लोकसभेलाही मूल्यसंस्कार दिले. त्यांच्या गतिमान कार्यप्रणालीमुळे मात्र त्यांच्या शारीरिक स्वास्थ्याची हेळसांड झाली.

– प्राचार्य डॉ. संतोष मोतीराम मुळावकर

* * *

स




## हर्षे, माई
**संस्थापक**
**जन्ममृत्यु दिनांक अनुपलब्ध**



पश्चिम महाराष्ट्रातील पराडकर नावाच्या एका शिक्षकाच्या कुटुंबात त्यांचा जन्म झाला. सात भावंडातील हे मोठे अपत्य. लग्न लवकर झाले. त्यांचे पती लवकर मृत्यू पावले. त्यांच्या आत्यांनी माईंना शिक्षणासाठी आपल्या घरी आणले. पण मॅट्रिक होण्यापूर्वीच त्यांना शाळा सोडावी लागली कारण त्यांच्या वडिलांना अर्धांगाचा झटका आला. आपल्या आई-वडिलांची, भावंडांची जबाबदारी स्वीकारून सेवासदनमध्ये शिक्षिकेचे प्रशिक्षण घेतले. यवतमाळला शिक्षिकेची नोकरी केली. भावंडांचे शिक्षण पूर्ण केले.

उत्तम शिक्षिका म्हणून त्यांचा लौकिक होता. मुलांबद्दल जिव्हाळा आणि दुसऱ्याला मदत करण्याचा त्यांचा स्वभाव त्यामुळे अडचणीत असलेल्या एका मुलाला, मुलीला त्यांनी सांभाळले. चौंडीकर बाईंना आसरा दिला. या सर्वांनी त्यांचे हे नाते जपले हे विशेष.

अमरावतीला मुलींचे पहिले विद्यालय शासनातर्फे काढण्यात आले. शेजारी वसतिगृहाचीही व्यवस्था होती. सुरूवातीला मुख्याध्यापिका व मेट्रन अँग्लो इंडियन होत्या. पण मराठी मुलींशी संवाद साधण्याच्या दृष्टीने त्या मराठी असणे अगत्याचे होते. म्हणूनच माईंची मेट्रन म्हणून नेमणूक झाली. मुलींना आनंद झाला. माई स्वभावाने प्रेमळ पण त्यांची शिस्त कडक. मुलींनी शांतपणे अभ्यास करणे, संध्याकाळी प्रार्थना, अभंग म्हणणे यावर त्यांची नजर असे. त्यांना 'स्वच्छ, रूचकर जेवण मिळावे' याकडे त्यांचे लक्ष असे. आपले जेवण मात्र त्या स्वतःच बनवायच्या. त्यांना गाण्याची, खेळण्याची हौस होती.

१९४३ मध्ये माई निवृत्त झाल्या. काही दिवस त्यांनी सरकारच्या नर्सेस ट्रेनिंग सेंटरवरही देखरेखीचे काम केले. पुढे तेही बंद झाले. थोडे दिवस शिक्षणतज्ज्ञ ताराबाई मोडक यांच्याबरोबर मागास वस्तीत साक्षरता प्रसाराचे काम केले. ताराबाईंनी अमरावती सोडले. पण माईंना स्वस्थ बसवेना.

अमरावतीतल्या आपल्या शाळेतील शिक्षिकांच्या लहान मुलांना शिकविण्याचे काम त्यांनी स्वीकारले. त्यामुळे शिक्षिका निर्धास्त झाल्या. ५,६ मुलांना घेऊन वयाच्या साठीतही नव्या जोमाने त्यांनी 'बालशिक्षण मंडळ' याची मुहूर्तमेढ रोवली. शाळेसाठी लागणारी पुस्तके व साधने, लागणारा पैसा त्यांनी पेइंग गेस्ट ठेवून मिळविला. शाळेच्या गरजा जशा वाढू लागल्या तसा मार्ग माईंनी काढला. त्यांना चौंडीकर बाई, विद्याधर देशपांडे, राजवाडे पतिपत्नी यांचे साहाय्य मिळाले. राजवाडे यांनी खापर्डे बगीचातील त्यांच्या प्लॉटवर एक मोठा हॉल व दोन खोल्या बांधून दिल्या. शाळा स्थिरावली, मुलांची संख्या वाढू लागली. मुलांच्या विकासात शाळेबरोबर त्यांच्या मातांचाही सहभाग आवश्यक आहे हे त्यांना जाणवले. शाळेत काही उपक्रम चालू केले. वाचनालय, गृह विज्ञानाचे वर्ग, प्रथमोपचाराचे वर्ग सुरू केले. त्यांच्या ख़ेळाचीही सोय केली. मातांचा विकास झाला तर मुलांच्या सर्वांगीण विकासास चालना मिळेल हाच त्यामागचा हेतू होता.

शाळा एक खांबी तंबू न राहता त्याला व्यापक स्वरूप यावे यासाठी संस्थेची रीतसर नोंद केली. तिची घटना लिहिली. कार्यकारी मंडळाची निवड झाली. त्यात

दादासाहेब राजवाडे, निळूभाऊ, राजदेकर यांची निवड झाली. अशा रीतीने 'बालशिक्षण मंडळ' ही संस्था स्थापन झाली.

शाळेची फी नाममात्र होती. सकाळच्या कल्याण केंद्रामध्ये मुलांना दूध व कडधान्यही दिले जाई. मुलांची संख्या वाढू लागली. इयत्ता पहिली, दुसरी नंतर तिसरीची गरज भासू लागली. माईंची शिक्षणाविषयीची तळमळ, अखंड प्रयत्न व जिद्द पाहून समाजही त्यांना मदत करू लागला. शाळेजवळ राहणाऱ्या 'रियासतबी' या मुसलमान स्त्रीने आपले स्वतःचे घर रू. ४०,०००/- ना देऊ केले. पण माई डगमगल्या नाहीत. विविध मार्गांनी त्यांनी काही पैसा उभा केला व उरलेला दर महिन्याच्या बचतीतून फेडण्याचे मान्य केले. शेजारी राहणारे राजवाडेबंधू हेही आपल्या मुलांकडे राहावयास जाणार असल्याने त्यांचे घरही ४०,००० रु. ना विकत घेतले. कर्जफेड अर्थातच हप्त्याहप्त्याने. पण आपणास पूर्ण रक्कम मिळणार याचा (माईंविषयी) त्यांना पूर्ण विश्वास होता. पुढे भागिरथीबाई कलंत्री यानी देणगी दिली. मात्र यावेळी त्यांच्या अटीनुसार शाळेचे नाव भागीरथीबाई कलंत्री बालक मंदिर असे झाले. शाळा इयत्ता चौथी पर्यंत वाढली. पुढे अनेक तुकड्याही काढल्या. शाळेच्या विस्तारात अमरावती येथील शिक्षणप्रेमी मंडळी, दरवर्षी सिनेमाच्या तिकिटांची विक्री करणाऱ्या भगिनी, पालकवर्ग आणि अल्पवेतनावर काम करणाऱ्या शिक्षिका या सर्वांचा सहभाग होता.

शाळेचे कार्य, यश हे केवळ समाजाच्याच नव्हे तर शासनाच्याही नजरेत भरले. शाळेला शिक्षणखात्याकडून ६६% अनुदान मिळू लागले. शाळेच्या वाढीस चालना मिळाली. स्टेजसारखा उपयोग करता येईल असा हॉल बांधला. तेथे मुलांचे कार्यक्रम होत, प्रदर्शन असे.

संस्था चांगली चालली म्हणून माई स्वस्थ बसल्या नाहीत. अमरावतीला भाजीबाजारामध्ये लक्ष्मीनारायण मंदिराच्या जागेमध्ये शाळा सुरू केली. पालक मुलींना महाविद्यालयामध्ये पाठवत नाहीत हे लक्षात घेऊन 'किशोरी मंडळ' काढले. तिथे मुलींच्या सुप्त गुणांना वाव मिळाला. त्यातल्याच एक भगिनी विमलाताई हिर्लेकर (पूर्वाश्रमींच्या विमल नगरनाईक) अधिकार वाणीने ज्ञानेश्वरीची प्रवचने करू लागल्या. अशा कामासाठी अनेक माणसांची मदत लागते. माणसे जोडणे, त्यांच्याकडून काम करवून घेणे ही फार मोठी कला त्यांना साध्य होती.

– रोहिणी गाडगीळ

## हतवळणे, सदाशिव विनायक

**मुख्याध्यापक**

**१० ऑक्टोबर १९१०**



सदाशिव उर्फ मामासाहेब यांचा जन्म वाई (जि.सातारा) येथे झाला. मूळ गाव नगरपासून ३५ कि. मी. अंतरावरील 'हतवळण'. आजोबा शंकरराव डेक्कन महाविद्यालयाचे पदवीधर व पेशाने शिक्षक तर वडील विनायकराव भूमिअभिलेख खात्यात अधिकारी होते. सततच्या बदल्यांमुळे मामासाहेबांना शिक्षण विविध गावी किंवा जवळच्या नातलगांकडे राहून करावे लागले. शेवटी कराची (पाकिस्तान) च्या डी.जे.सिंध महाविद्यालयामधून बी.एस्सी. पूर्ण केले. तर मुंबईच्या एस.टी. महाविद्यालयामधून बी.टी.पूर्ण झाले. या सर्व प्रवासात डॉ. अप्पासाहेब पंत, प्रा. एन.डी.नगरवाला, डॉ. द्वारकानाथ कोटणीस अशा अनेक जिवलग मित्रांचा लाभ झाला. पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामधील सहाध्यायी मित्र सातारचे मुतालिक यांनी दिलेले टोपण नाव 'मामा' पुढे सर्वांनीच स्वीकारले.

'हिंद सेवा मंडळ' हे स्वातंत्र्य चळवळीतील सक्रिय 'राष्ट्रीय पाठशाळा' या संस्थेचे भावंड. मंडळाच्या कार्यकर्त्यांनी प्रारंभी अनाथ विद्यार्थीगृह सुरू केले. कालांतराने विद्यार्थीगृहातील विद्यार्थ्यांना मोफत शिक्षण देण्याच्या उद्देशाने तेलीखुंटावर मंडळाचे कार्यकर्ते नानासाहेब देवचके, नानासाहेब सप्तर्षी आदींच्या पुढाकाराने इ.स. १९३५ मध्ये अहमदनगर येथे मॉडर्न विद्यालय

स्थापन झाले. इ.स. १९४० मध्ये मामासाहेबांना शास्त्र व गणित विषयाचे शिक्षक म्हणून मुख्याध्यापक अण्णासाहेब आपटे यांनी नोकरी दिली. आपटे-हतवळणे यांच्या नेतृत्वाखाली बाबा गोसावी, अष्टेकर, आगाशे, गिते, प्रसिद्ध गायक राम फाटक आदी शिक्षकांनी विद्यार्थी घडविण्याच्या कार्यात स्वत:स झोकून दिले. मामासाहेबांच्या अथक परिश्रमामुळे शिक्षक प्रतिनिधी म्हणून त्यांचा हिंद सेवा मंडळाच्या कार्यकारिणीमध्ये प्रवेश झाला. पुढे दीर्घकाळ संस्थेचे सहचिटणीस म्हणून काम करताना संस्थेचे मॉडर्न विद्यालय, नवभारत विद्यालय (सीताराम सारडा विद्यालय), दादा चौधरी विद्यालय, श्रीरामपूर, अकोले, मिरजगाव येथील शाळांच्या स्थापना, उभारणी व प्रगतीमध्ये, जागा मिळविण्यापासून इमारती बांधण्यापर्यंत व शाळांचा दर्जा उंचावण्यामध्ये बहुमोल योगदान दिले.

संस्थेच्या शाळांसाठी जागा मिळविण्याचे अत्यंत अवघड काम मामासाहेबांच्या पुढाकाराने व भगीरथ प्रयत्नाने यशस्वी होत गेले. नगरच्या कोर्टाजवळील, पेशवाईतील किल्लेदार नारो बाबाजी नारकर (अभ्यंकर) यांचा पाऊण एकरावरील पडीक वाडा, मॉडर्न विद्यालयासाठी जागा मिळविण्यासाठी ३२ हिस्सेदारांशी सतत सात वर्षे संपर्कात राहण्याचे काम त्यांनी यशस्वीपणे केले. तसेच सरदार मिरीकरांलगतची तबेल्याची जागा त्यांनी दादा चौधरी मराठी शाळेला देणगी स्वरूपाने मिळवून दिली. शाळेच्या तीन मजली दगडी इमारतीच्या उभारणीत संस्थेचे चिटणीस नानासाहेब निसळ, मुख्याध्यापक मामासाहेब व इंजिनियर द. धो. नानल यांनी अपूर्व योगदान दिले. या इमारतीचे उद्घाटन १५ मे १९५१ रोजी तत्कालीन पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या हस्ते झाले, तर नवभारत विद्यालयाच्या इमारतीचे उद्घाटन तत्कालीन उपराष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन यांच्या हस्ते २८ डिसेंबर १९५४ ला झाले. अशा अनेक कार्यक्रमात व उपक्रमात मामासाहेबांचा सिंहाचा वाटा राहिला. १९५० ते ७५ या काळात मामासाहेबांनी स.चि. वाळिंबे यांच्या सहकार्याने लिहिलेली गणित विषयाची क्रमिक पुस्तके राज्यात आदर्श मानली गेली. १९५२ ते ७५ याच काळात नगर जिल्हा माध्य. शिक्षक सोसायटीचे कार्य व इमारत उभारणीत मोलाचे योगदान दिले. याच सोसायटीचे प्रतिनिधी म्हणून नगर अर्बन बँकेच्या संचालक मंडळावर प्रदीर्घ काळ काम केले. सरदार बाबासाहेब मिरीकर व दत्तोपंत डावरे यांच्या स्नेहामुळे दीर्घकाळ रिमांड होम व नगर ऐतिहासिक वस्तू संग्रहालयाचे काम पाहिले. १९६१ मध्ये दिल्लीतील जागतिक शिक्षक परिषदेला (वर्ल्ड टीचर्स कॉन्फरन्सला) उपस्थित राहिले. राज्यशासनाचा आदर्श शिक्षक पुरस्कार त्यांना १९६८ मध्ये प्रदान करण्यात आला. राज्य पाठ्यपुस्तक मंडळाने तळेगाव दाभाडे येथे भरविलेल्या आदर्श शिक्षकांच्या शिबिरातून प्रेरणा घेऊन स्वत:च्या आत्मचरित्राची २० प्रकरणे लिहून पूर्ण केली. पुढे १९८९ मध्ये 'जीवनश्रद्धा' या नावाने आत्मचरित्रही प्रकाशित केले. एक उत्तम संदर्भ ग्रंथ म्हणून सदर ग्रंथाचा लौकिक आहे.

इ. १९६१ मध्ये धर्मपत्नी प्रभावती यांच्या दु:खद निधनानंतरही चिकाटीने केलेली शिक्षणसेवा, त्यातून घडत गेलेले हजारो मुलामुलींचे व्यक्तिमत्व अशा अनेक जमेच्या बाबी मामासाहेबांच्या जीवनाच्या ताळेबंदात दिसून येतात.

अहमदनगरच्या सार्वजनिक आणि शैक्षणिक क्षेत्रात सुमारे सहा तपे समरसून 'काया वाचा मने' योगदान देणारे ऋषितुल्य व्यक्तिमत्व होते. हिंद सेवा मंडळाचे अध्यक्ष, मॉडर्न व दादा चौधरी विद्यालयाचे शिल्पकार, मुख्याध्यापक, गणित विषयाच्या शासनमान्य क्रमिक पुस्तकांचे लेखक, जिल्हा माध्यमिक शिक्षक सहकारी सोसायटीचे संस्थापक, महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, पुणे, जिल्हा ऐतिहासिक वस्तू संग्रहालय, सिटी गेम्स असोसिएशन अशा अनेक संस्थांचे ते पदाधिकारी होते.

– विश्वास काळे

## हिवाळे, भास्कर पांडुरंग

**संस्थापक**

**२२ जानेवारी १८८९ – ७ सप्टेंबर १९६१**

१९१२ च्या एस.सी.एम. (स्टुडंटस् ख्रिश्चन मुव्हमेंट) च्या त्रैवार्षिक अधिवेशनात, जे सेरायपूर (बंगाल) येथे



संपन्न झाले, त्यात भारत, सिलोन व ब्रह्मदेशातील अनेक ख्रिस्ती युवक सहभागी झालेले होते. त्यावेळी जॉन मॉट (ज्यांना १९४६ साली शांतता नोबेल पुरस्कार मिळाला) यांनी या महाविद्यालयीन युवकांना प्रश्न विचारला, ''येथे बसलेल्यांपैकी किती जणांची आपले जीवन देशाच्या सेवेकरिता देण्याची इच्छा आहे ?'' त्यावेळी फक्त सहा हात वर आले. त्यापैकी एक डॉ. भा. पां. हिवाळे यांचा होता आणि त्यांनी हे वचन आयुष्यभर पाळले.

डॉ. भा. पां. हिवाळे, ज्यांना त्यांचे विद्यार्थी 'बाप्पा' म्हणूनच ओळखत, यांचा जन्म १८८९ मध्ये सोलापूर येथे २२ जानेवारी रोजी झाला. शिकण्याकरिता त्यांना अमेरिकन मराठी मिशनच्या वसतिगृहात ठेवले गेले. केवळ चौदा वर्षांचे असताना साथीच्या रोगाने आई-वडिलांचे छत्र गेले आणि सहा भावंडांची जबाबदारी घेणे त्यांना भाग पडले.

मॅट्रिक परीक्षेनंतर ते एक वर्ष काम करून पैसे जमा करीत. नंतर दुसऱ्या वर्षी महाविद्यालयीन शिक्षण घेत. आपल्या भावंडांच्या प्रत्येक गरजेचा विचार करीत. फर्गसन महाविद्यालय पुणे येथील एका वर्षानंतर विल्सन महाविद्यालय मुंबई येथे त्यांनी तत्त्वज्ञान हा विषय घेऊन पदवी मिळविली.

त्यांचा हा संघर्ष व निश्चय अमेरिकन मराठी मिशनच्या मिशनऱ्यांच्या नजरेत भरला आणि 'अॅडोवर थिऑलाजिकल सेमिनरी' अमेरिका येथे धर्मशास्त्राची पदवी (बी.थिओ) घेण्यासाठी त्यांना पाठविण्यात आले. तेथे असतानाच या निश्कांचन अशा महत्त्वाकांक्षी तरुणाने हॉवर्ड विद्यापीठात पदव्युत्तर शिक्षण घेण्याचे स्वप्न पाहिले. याचवेळी उच्चशिक्षण प्राप्त भारतीय ख्रिस्ती समाजातील होतकरु तरुणांवर अमेरिकन मराठी मिशनच्या जबाबदाऱ्या टाकण्याचा स्वागतार्ह असा निर्णयही मिशनच्या पदाधिकाऱ्यांनी घेतला आणि डॉ. हिवाळे यांच्यावर मराठी ज्ञानोदयांच्या संपादनाची जबाबदारी टाकली होती.

जून १९२१ ला त्यांचा विवाह 'रुथ मालिनी' हिच्याशी झाला. त्या अमेरिकन मराठी मुलींची शाळा अहमदनगर येथे शिक्षिका म्हणून रुजू झाल्या होत्या.

त्यानंतर काही महिन्यातच पदव्युत्तर पदवी व पीएच. डी. करिता अमेरिकेस जाण्याचे ठरले. त्याकरिताही त्यांना संघर्षातूनच जावे लागले. तेथील शिक्षणाचा आणि कुटुंबाचा खर्च भागविण्याकरिता ते व्याख्याने देत.

त्यांच्या या कालावधीतच त्यांना विल्सन महाविद्यालय, मुंबई येथे अध्यापनाची जबाबदारी देण्याचे ठरले होते. मात्र १९२३ च्या या निर्णयाला प्रत्यक्षात येण्यास काही वर्षे गेली. दरम्यान त्यांनी जर्मन व फ्रेंच या भाषांचेही ज्ञान मिळविले आणि १९२८ ला हॉवर्ड विद्यापीठाची डॉक्टरेट मिळविली.

भारतात परतल्यावर त्यांना विल्सन महाविद्यालय, मुंबई येथे प्राध्यापक म्हणून घेण्यात आले. त्या काळातच 'पूर्ण मिशनरी' हे पदही मिळाले. अमेरिकन मराठी मिशनने एक स्वतंत्र विचारांचा भारतीय ख्रिस्ती म्हणून त्यांना ओळखले होते. हा काळ असहकार चळवळीचा होता. त्यावेळी ब्रिटिश कापडांचे सूट वापरण्याऐवजी ते खादीचे सूट वापरू लागले. अर्थात त्यानंतर त्यांना गर्व्हनरच्या निवासस्थानी चहा अथवा चर्चेला बोलावणे थांबले.

विल्सन महाविद्यालयामध्ये त्यांनी विद्यार्थी व शिक्षकांसाठी अनेक सामाजिक प्रकल्प हाती घेतले. त्याचवेळी त्यांच्यावर ह्युम मेमोरियल चर्च, नागपाडा येथे 'मॉडरेटर' ही जबाबदारी देण्यात आली.

मात्र त्यांच्या आयुष्यातला महत्त्वाचा काळ १९४५ हा होता. 'युनायटेड चर्च ऑफ नॉर्थ इंडिया' यांची अजमेर येथे सभा झाली. त्यावेळी झालेल्या चर्चेमध्ये मराठी भाषिक सहभाग घेऊ शकले नाहीत कारण त्यांना इंग्रजी येत नव्हते. रात्री ही मंडळी डॉक्टर साहेबांना भेटली आणि म्हणाली, ''तुम्हीच मदत करू शकता, डॉक्टरसाहेब, अहमदनगर येथे महाविद्यालय सुरू करून ....''

डॉ. हिवाळे मुंबई विद्यापीठाच्या रजिस्ट्रारांना भेटले,

विल्सन महाविद्यालय व अहमदनगर येथे सुरू होणारे महाविद्यालय एकाच व्यवस्थापनाखाली असावे ही त्यांची संकल्पना होती. सोलापूर येथील अमेरिकन मराठी मिशनच्या १९४५ च्या सभेमध्ये हा विचार त्यांनी मांडला. त्यामध्ये एका गटाने तीव्र विरोध केला. डिपॉझिट म्हणून रु. १,००,०००/- उभारणे अवघड होते. त्यांनी एका वर्षाची रजा घेतली आणि अमेरिकेस प्रयाण केले. प्लीमथ चर्चने त्यांना पूर्ण पाठिंबा अगदी सहभागासह दिला. मात्र डिपॉझिटसाठी आवश्यक असलेले एक लाख रु. अद्याप मिळालेले नव्हते. डॉ. भा. पां. हिवाळे यांनी, नावाजलेले दानशूर विल्यम् डॅनफोर्थ यांच्या 'आय डेअर यू' या पुस्तकाचे भाषांतर केले होते. त्यांनी या डिपॉझिट करिता एक लाख रुपये दिले.

शेवटी १९४७ मध्ये मराठी मिशनच्या ''पिवळी माडी'' या इमारतीत अहमदनगर महाविद्यालयाची सुरुवात झाली. २२ जून १९४७ ला अहमदनगरच्या दुष्काळी भागात ज्ञानगंगा अवतरली. डॉक्टरांच्या सहचारिणीने आपले दागिने देऊन या वाटचालीत सक्रिय भाग घेतला. कला व विज्ञान शाखांचे वर्ग सुरू झाले. पहिल्या वर्षी आणि नंतरही काही वर्षे संमिश्र वयोगटाचा विद्यार्थीवर्ग असे.

हा भाग दुष्काळी असल्याने शिक्षण घेण्याची ऐपत नसणाऱ्या पण शिक्षणाची इच्छा असणाऱ्यांना 'कमवा आणि शिका' या योजनेखाली शिकवले गेले. दुष्काळाच्या काळात स्वत: रुथबाईंनी खीर/शिरा यासारखे पदार्थ तयार करून नाममात्र शुल्क घेऊन विद्यार्थ्यांस न्याहारी पुरविली. त्याचवेळी विद्यार्थ्यांना महाबळेश्वर सारख्या ठिकाणी राहून काही शिकता यावे म्हणून जागा व इमारती घेतल्या.

जानेवारी १९५१ ला निवृत्त झाल्यावरही त्यांचे महाविद्यालय व विद्यार्थी विकासाचे प्रयत्न चालूच होते. डॉ. थॉमस बार्नबस व ख्रि. रेव्ह. जोसेफ बार्नबस यांच्या कुशल नेतृत्वाखाली आणि डॉ. मनोरमा व डॉ. सरला बार्नबस यांच्या सक्रिय सहभागाने महाविद्यालय विकसित होत राहिले.

याच काळात डॉ. हिवाळे यांनी 'उषा' हे द्वैभाषिक साप्ताहिक संपादित केले. विद्यार्थ्यांसाठी इंग्रजी-मराठी शब्दकोश स्वत: तयार करून अल्प किमतीमध्ये उपलब्ध करून दिला. निवृत्त झाल्यावरही ते 'नीती-प्रशिक्षणाचे वर्ग स्वत: घेत असत.

महाविद्यालयातील प्राध्यापकांना स्वतः उत्तेजन देऊन त्यांनी लिखाण करावयास लावले आणि ते 'अहमदनगर महाविद्यालय प्रकाशना'तर्फे प्रकाशितही केले. 'ख्रिस्तपुराणातील सौंदर्यस्थळे' हे याच मालिकेतील पुस्तक होय. प्राध्यापकांना संशोधनासाठी सतत संधी उपलब्ध करून दिली जाई. अहमदनगर महाविद्यालय, अहमदनगर मधील केवळ मातृशिक्षण संस्थाच नसून प्रयोगशील, सामाजिक समरसतेच्या विचारांना वाव देणारी, नव्या प्रकल्पांना जन्म देणारी व आंतरराष्ट्रीय पातळीवरील अग्रगण्य अशी संस्था झाली आहे.

– विश्वास काळे

**संदर्भ :**

१. अहमदनगर महाविद्यालय वार्षिक १९६१/६२; संपादक मंडळ, प्राचार्य, अहमदनगर महाविद्यालय, अहमदनगर
२. बार्नवस, डॉ. सरला; 'विंग्ज ऑफ द मॉर्निंग'.
३. बार्नबस, डॉ. सरला; 'सच प्रेशियस थिंग्ज'.
४. रुथबाई, खि. ख्रि; 'आमचे कृतार्थ सहजीवन.'
५. अहमदनगर महाविद्यालय सुवर्ण महोत्सवी स्मरणिका- १९४७ - १९९७,अहमदनगर महाविद्यालय.

* * *




## क्षीरसागर, शंकर धोंडो

**२३ सप्टेंबर १९०३ - ८ एप्रिल १९८१**



रायगड जिल्ह्यात रोहे या गावी मामांचा जन्म झाला. शंकर धोंडो क्षीरसागर हे त्यांचे संपूर्ण नाव होते. कालांतराने मामा जेव्हा दर्यापुरला आले, तेव्हा प्रा. मनूताई नातू यांनी त्यांना प्रथम 'मामा' हे नाव पाडले आणि मग नंतर सर्वच त्यांना मामाच म्हणू लागले. मामांचे प्राथमिक शिक्षण रोह्यालाच झाले. नंतर ते १९२६ मध्ये पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूल मध्ये दाखल झाले आणि १९१९ मध्ये विशेष गुणवत्ता प्राप्त करुन मॅट्रिक झाले. त्यानंतर त्यांनी मुंबई येथील एलफिन्स्टन महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. लो. टिळकांच्या व्यक्तिमत्वाचा त्यांच्या तरुण मनावर विलक्षण प्रभाव पडला होता. १९१४ मध्ये मंडालेच्या तुरुंगातून लोकमान्य सुटून आले आणि पुनश्च 'हरिः ॐ' म्हणून स्वराज्याचे यज्ञकुंड त्यांनी पेटविले. त्याच वेळी तरुण मामांनी देशसेवेचे कंकण हाती बांधले.

१ ऑगस्ट १९२० रोजी लोकमान्यांचे प्राणोत्क्रमण झाले. आपल्या प्राणप्रिय नेत्याची पेटलेली चिता पहाताच, शंकर धोंडो क्षीरसागर यांनी देशसेवेसाठी आजन्म ब्रह्मचारी राहून फकिरीचे व्रत स्वीकारण्याची प्रतिज्ञा केली आणि त्याचक्षणी वयाच्या अवघ्या १७ व्या वर्षी मामांनी त्या महाविद्यालयाला आणि घराला 'राम राम' ठोकला तो कायमचाच ! १९२१ च्या सुमारास म.गांधींजीचे असहकार आंदोलन सुरु झाले आणि त्यात स्वातंत्र्य सैनिक म्हणून ते सामील झाले. १९२६ मध्ये मामा मसुराश्रमात दाखल झाले आणि विविध उपक्रम सुरु केले. समर्थ रामदासांच्या 'दासबोध' ग्रंथाच्या एक लक्ष प्रती, १२० सूर्य नमस्कार व १३ पारायणे या अटीवर विनामूल्य वाटण्याचा आश्रमाचा संकल्प होता. मामा त्याचे प्रमुख कार्यकर्ते होते. मामांनी 'दासबोध' या मासिकाचे पाचवर्षापर्यंत संपादन केले होते.

सुमारे ४०० वर्षांपूर्वी गोव्यातील सक्तीने ख्रिश्चन केलेल्या हजारो गावकऱ्यांचे शुद्धीकरण केले. या शुद्धीकरण आंदोलनात मामांचा सिंहाचा सहभाग होता. या घटनेचे सांगोपांग विवेचन करणारा 'गोमंतक शुद्धीचा इतिहास' हा ४०० पानांचा स्वतंत्र विस्तृत ग्रंथ मामांनी लिहिला. विशेष म्हणजे या ग्रंथाला, स्वातंत्र्यवीर सावरकर यांची सुंदर प्रस्तावना लाभली.

या आणि अशा सर्व कार्यांमधील त्यांच्या शांत वृत्तीमुळे तेथे मामांना सर्व 'शांतमूर्ती' म्हणत असत. म. गांधींच्या १९३२ च्या चळवळीत सरकारी वट हुकुमाने मसुराश्रम जप्त करण्यात आला. अर्थात् मामांच्या तेथील कार्याला पूर्णविराम मिळाला.

त्या नंतर मामांनी १९३३ मध्ये महाराष्ट्र व बृहनमहाराष्ट्र विभागात गीताधर्माच्या प्रचारासाठी दौरा सुरु केला. शाळा कॉलेजातील विद्यार्थ्यांसाठी हिंदूधर्म शिक्षकांचे व बालोपासनेचे वर्ग अनेक ठिकाणी चालविले, उदा. बोरीवली (जिल्हा ठाणे)१९३३, चांदीर रेल्वे(जिल्हा-अमरावती) १९३५, चाळीसगांव मे १९३६, देवांस, डिसेंबर १९३६, तळोदे (जिल्हा धुळे) मे, १९३७ संगमनेर, नोव्हेंबर १९३७, अकोला १९३८, हैद्राबाद-१९४०. तरुण पिढीशी सतत संपर्क राखून त्यांचे जीवन सुसंस्कारित करण्याच्या दृष्टिने एखादे विद्यालय स्थापन

करावे अशी मामांना प्रेरणा झाली आणि त्यानुसार योजना बनवून बाबा रेडीकरांसह ते १९३८ मध्ये विदर्भातील दर्यापूर येथे आले. सुरवातीला मामांनी बाबांसह रस्त्यावरुन खणखणीत आवाजात मनाचे श्लोक म्हणत भिक्षा स्वीकारावी आणि बालकांमध्ये जागृती करावी. जोडीला सूर्यनमस्कार व्यायाम आणि गुरुकुलाच्या रुपाने विद्यार्थ्यांना अभ्यासात मार्गदर्शन करावे.अशा उपक्रमांनी पार्श्वभूमी तयार झाल्यावर तेथील प्रतिष्ठीत मान्यवर अण्णासाहेब पुरंदरे, अण्णासाहेब धर्माधिकारी, भाऊसाहेब खरे, आदींच्या सहकार्याने १५ जून १९३९ रोजी रामराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली 'प्रबोधन विद्यालयाची' स्थापना झाली.

'सामाजिक प्रबोधन' हे मुख्य उद्दिष्ट समोर ठेवून, उत्तम नागरिक घडविण्यासाठी मामांनी शाळेत विविध उपक्रम राबविले. ध्येयनिष्ठ शिक्षक मिळविले आणि मॅट्रिक परीक्षेत विद्यार्थ्यांचा उत्तम निकाल लागण्यात मामांना यश मिळाले. विद्यार्थी संख्या वाढू लागली. जागा अपुरी पडू लागली आणि मग विद्यालयाचे विस्तीर्ण जागेत स्थलांतर झाले. चिंतामणराव देशमुखांपासून तर पू. विनोबांपर्यंत अशा थोर व्यक्तींचे शाळेला मार्गदर्शन लाभत गेले.

मामांची दूरदृष्टी विलक्षण होती. विद्यार्थ्यांना लोकशाहीची कल्पना यावी म्हणून विद्यार्थी मंत्रीमंडळाची योजना करुन दर महिन्यात विद्यार्थी संसद भरवीत असत. विद्यार्थी निवासी संमलने भरवीत असत. तसेच 'स्वयंशासित शाळा' या उपक्रमाचा प्रयोग दर्यापुरात मामांनी प्रथमच केला व शाळा नावारुपास आली. दर्यापुरातील समाज सुधारणेच्या दृष्टीने मामांनी बाबांसह हरिजन वस्तीत जाऊन तेथील सर्व परिसर स्वच्छ केले. आणि आरोग्याचे महत्त्व पटविले. रात्री साक्षरतेचा उपक्रम राबविला, महिलोन्नती व बाल संस्कार या दृष्टीनी मामांनी 'प्रबोधन गीता मंडळाचा' स्थापना केली ती आजही मोठ्या स्वरुपात कार्यरत आहे.

इ.स. १९४६ मध्ये कोरगांवकर ट्रस्टची स्थापना झाली आणि शंकरराव देवांनी, मामांना बाबा रेडीकरांसह कोल्हापुरला बोलावून घेतले व त्या ग्रामसेवा श्रमाची जबाबदारी मामांवर सोपवली. आर्थिक अडचणीपायी १९५३ मध्ये तो सेवाश्रमही बंद पडला. तरीही त्या कोरगांवकर ट्रस्टतर्फे 'भातृसेवक संघाची' वार्षिक संमेलने भरतच होती. आणि कार्यवाह या नात्याने मामा अखेरपर्यंत ते कार्य करीतच होते.

सत्तेच्या राजकारणात मामांना कधीच रस नव्हता. त्यामुळे सक्रिय राजकारणापासून पूर्णपणे अलिप्त असलेल्या 'सर्वोदय समाजात' ते सामील झाले. इतकेच नव्हे, तर १९५५ मध्ये 'गोमंतक' मुक्ती लढ्यात मामा सक्रिय सहभागी झाले. १९६०-६१ पर्यंत शंकरराव देव यांच्या बरोबर केरळच्या भूदान यात्रेत सहभागी झाले. तसेच आसाममध्येही १५ दिवस राहिले, आणि १९६४ मध्ये मामांनी पू. विनोबाजींच्या पदयात्रेचे व्यवस्थापक राहून कार्य केले.

१९६६ मध्ये प्रबोधन विद्यालयाला २५ वर्षे पूर्ण झाली होती. एक उत्कृष्ट शाळा म्हणून प्रबोधन विद्यालयाचा नाव लौकिकही झाला होता. कोरगावकर ट्रस्टच्या पुणे येथील संमेलनात १९६६ मध्ये बाबा आमटे यांनी 'युवक प्रगती सहयोग' ही अभिनव कल्पना मांडली. आणि मामांनी ती लगेच उचलून धरली. त्याचे पहिले श्रमशिबीर आनंदवन वरोडा येथे घेण्यात आले आणि १९७४ पर्यंत मामांचा त्यात सहभाग असे.

१९६७ च्या सुमारास शिक्षकांच्या दुर्दशेने व्यथित झालेले तत्कालीन राष्ट्रपती डॉ. झाकीर हुसेन पू. विनोबाजींना भेटले आणि 'शिक्षण व शिक्षक' या विषयावर त्यांच्याशी चर्चा केली. तेव्हाचे बिहारचे शिक्षण मंत्री कर्पूरा ठाकूर यांनी त्या गोष्टीला मूर्त स्वरुप दिले. १९६८ मध्ये बिहारमध्ये कहोळ मुनींच्या कहोळ गावी आचार्यकुलाची स्थापना केली. आणि त्याच्या संयोजकत्वाची जबाबदारी पू. विनोबाजींनी मामांवर सोपविली.

आचार्यकुलाची संघरचना जीवनन्यायी आहे. आचार्य हा निर्भय, व निपक्ष असावा. तसेच तो विद्यार्थीनिष्ठ, ज्ञाननिष्ठ आणि समाजनिष्ठ असावा. त्याचप्रमाणे शिक्षक विद्यार्थी परायण असावा. दोघे ज्ञान परायण असावेत आणि ज्ञान सेवा परायण असावे हे तर आचार्यकुलाचे बोधवाक्यच आहे. विचार, उच्चार, आचार, संचार व प्रचार

करीत जो जीवनात निष्ठापूर्वक वागेल तोच खरा ‘आचार्य’ संज्ञेला प्राप्त होईल. अशा आचार्यांनी संघटना वाढवून आचार्य शक्ती वाढवली तर देशाचे चित्र निश्‍चित बदलेल असा पू. विनोबाजींप्रमाणे मामांनाही विश्वास होता. महाराष्ट्र आचार्यकुलाची परिषद १९७२ मध्ये पवनारला भरली आणि १९७४ मध्ये अखिल भारतीय संमेलन भरविण्यात आले. मामा विद्वान असून प्रभावी वक्ते व उत्तम लेखक होते. तसेच उत्कृष्ट प्रवचनकार असून क्वचित कीर्तनही करत असत. ते ईश्वरनिष्ठ होते पण धार्मिक कर्मकांडात ते कधी अडकले नाहीत. प्रत्येकाच्या गुणदोषांसह ते त्याचा स्वीकार करुन त्यावर प्रेमाचा वर्षाव करीत असत.

– दुर्गा कानगो

* * *

विद्येविना मती गेली,
मतीविना नीती गेली,
नीतीविना गती गेली,
गतीविना वित्त गेले,
वित्ताविना शुद्र खचले,
हे सारे अनर्थ एका अविद्येने केले.

**– महात्मा फुले**

''आमची पूर्वीची विद्यामंदिरें किंवा गुरुंचे आश्रम यांचा हळूहळू ऱ्हास होऊन ते आता नामशेष झाले आहेत; व त्याऐवजी ज्या संस्था अस्तित्वांत आल्या आहेत त्या जशा असाव्यात तशा नसल्यामुळे कोणत्याही शास्त्राचा अथवा विद्येचा शोधक बुद्धीनें आस्थापूर्वक अभ्यास करणारे गृहस्थ आमच्या देशांत अलीकडे पैदा होत नाहींत. नवीन शोध करण्याइतकी बुद्धि अथवा योग्यता आमच्या अंगांत नाही असे नाहीं. ज्या देशात पाणिनी, कणाद, शंकराचार्य, भास्कराचार्य वगैरे विद्वान पूर्वकांली होऊन गेले त्यांत सध्यांचें कांळी पास्चूर, एडिसन, स्पेन्सर, मिल्ल वगैरे गृहस्थांप्रमांणे विद्वान कां निपजूं नयेत यांचे खरें कारण शोधून याचा प्रतिकार करणें हे प्रत्येक विद्यावृद्धीं इच्छिणाऱ्यांचे कर्तव्य आहे.''

**– लोकमान्य टिळक यांच्या 'खरे विद्यापीठ कोणते?' या 'केसरी'मधील दि.२५ फेब्रुवारी १८९६ रोजीच्या अग्रलेखातून.**

# विना अनुदान शिक्षण संस्था



## पार्श्वभूमी

महाराष्ट्रातील शिक्षणसंस्कृतीचा विचार करीत असताना, स्वातंत्र्यपूर्वकाळातील त्याग आणि मूल्यांवर आधारित शिक्षणसंस्कृती व विद्यमान प्रभावशाली व्यवसायाधिष्ठित शिक्षणसंस्कृती यांची स्वाभाविक तुलना लोकांच्या मनात होते. एकेकाळी शिक्षण हे समाजप्रबोधनाचे माध्यम मानून त्याच्या प्रसारासाठी आपल्या जीवनाचा अक्षरश: होम करणाऱ्या नेत्यांची व कार्यकर्त्यांची फळी महाराष्ट्राने पाहिलेली आहे. त्यानंतरच्या स्वातंत्र्योत्तरकाळात शासनाने शैक्षणिक जबाबदारी स्वीकारून विद्यार्थ्यांना परवडेल या दराने शिक्षण देण्याचे धोरण आखले.

या पार्श्वभूमीवर गेल्या पंचवीस वर्षात उदयाला आलेल्या शिक्षणसंस्कृतीसंबंधी, त्यात आकारल्या जाणाऱ्या शिक्षणशुल्कासंबंधी एक प्रकारचा आकस केवळ सर्वसामान्य लोकांच्याच मनात नव्हे तर अनेक तज्ज्ञांच्याही मनात आहे. त्यामुळे ही शिक्षणसंस्कृती कशी निर्माण झाली आणि तिचा विकास कसा झाला यासंबंधीचे विवेचन करणे आवश्यक आहे.

स्वातंत्र्यपूर्व काळातील व स्वातंत्र्योत्तर काळातील शैक्षणिक विकास व शासकीय धोरणे यांचा विस्तृत आढावा या खंडाच्या प्रारंभिक प्रस्तावनेत घेतला आहे. शासकीय शाळा व शासनाने अनुदान दिलेल्या खाजगी शाळा सुरू असतानाही विनाअनुदानित शिक्षणसंस्था सुरू करण्याची गरज का भासली आणि त्यांना एवढी लोकप्रियता का मिळाली या मागची कारणे पाहणे आवश्यक आहे. विनाअनुदानित शिक्षणाची पहिली सुरूवात कर्नाटकात पंडित नेहरूंच्याच पंतप्रधान पदाच्या कालखंडात तत्कालीन अर्थमंत्री टी. एन. पै यांनी केली.

पं. नेहरूंच्या काळात भारताच्या औद्योगिकरणाचा पाया घातला गेला. परंतु त्या काळात शिक्षणावर अंदाजपत्रकातील ६.६ टक्के रक्कम खर्च होत असे, परंतु या रकमेतील ८५ टक्के रक्कम व्यावसायिक शिक्षण देणाऱ्या शिक्षणसंस्थावर खर्च होवूनही त्या रकमेतून एकही नवी संस्था उभी राहू शकली नाही. त्यामुळे प्रशिक्षित मनुष्यबळाची आवश्यकता व शासनाची नव्या शिक्षणसंस्था सुरू करण्याची अक्षमता यातून मार्ग काढण्याकरिता खाजगी क्षेत्राला व्यावसायिक शिक्षणसंस्था काढण्याची परवानगी द्यावी अशी विनंती टी.एन.पै यांनी पंडित नेहरूंना केली व त्यानुसार कर्नाटकात खाजगी क्षेत्रात तंत्रज्ञान, वैद्यकीय, वास्तुशास्त्र, औषधनिर्मिती शास्त्र या सारख्या आधुनिक व्यावसायिक शिक्षण देणाऱ्या संस्था सुरू झाल्या. या संस्थांचा खर्च प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या शुल्कामधूनच भागविला जाणे अपेक्षित होते.

अशा प्रकारच्या शिक्षणाची सुरुवात महाराष्ट्रातही व्हावी अशी मागणी महाराष्ट्रातही होवू लागली. परंतु त्याला येथील राजकीय, शैक्षणिक व सामाजिक क्षेत्रांतून कडवा विरोध झाला. मात्र त्याचा परिणाम असा झाला की महाराष्ट्रातून मोठ्या प्रमाणात विद्यार्थी शिक्षणासाठी कर्नाटकात जाऊ लागले व प्रतिवर्षी सुमारे ७५ कोटी रू. या विद्यार्थ्यांच्या शिक्षण शुल्काच्या रूपाने महाराष्ट्रातून कर्नाटकात जाऊ लागले असा अंदाज व्यक्त केला गेला. त्यामुळे वसंतदादा पाटील मुख्यमंत्री असताना महाराष्ट्रात विनाअनुदानित व्यावसायिक शिक्षणसंस्थांना अनुमती देण्याचा निर्णय घेतला. परंतु हा निर्णय घेताना कर्नाटकमध्ये जी धोरणे अंगीकारण्यात आली होती त्याच धोरणांचा जसाचा तसा स्वीकार केला

नाही.

हे खाजगीकरण शिक्षण क्षेत्रात घडवून आणताना विद्यार्थ्यांसाठी प्रवेशाचे निकष व संस्थांनी आकारण्याचे शुल्क याचेही धोरण शासनाने नक्की केले.

या धोरणात प्रवेश क्षमतेच्या ८० टक्के विद्यार्थ्यांना गुणवत्तेप्रमाणे, उर्वरित २० टक्के प्रवेश खाजगी शिक्षणसंस्थांच्या अखत्यारीत ठेवण्यात आले ज्यात त्यांना प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांकडून देणगी स्वीकारण्यास अनुमती होती. सर्वांना शासकीय शुल्कानुसार आकारणी करण्याचे बंधन होते. पहिल्याच वर्षी या धोरणाअंतर्गत महाराष्ट्रात२५ अभियांत्रिकी विद्यालये, ५० तंत्रनिकेतने, तीन वैद्यकीय महाविद्यालये सुरू करण्यात आली. या संस्था सुरू करण्यात प्रामुख्याने राजकीय नेत्यांचा पुढाकार होता. या संस्था सुरू करताना जागतिकीकरणातून येणाऱ्या नव्या अभ्यासक्रमांना प्राधान्य द्यावे असे सांगण्यात आले. या धोरणांतर्गत स्थापन झालेल्या वैद्यकीय महाविद्यालयांना महाराष्ट्र निवासी डॉक्टर्सच्या संघटनेने शैक्षणिक दर्जा घसरण्याची शक्यता व्यक्त करून विरोध दर्शविला आणि न्यायालयाचे दरवाजे ठोठावले व न्यायालयानेही त्यांना स्थगिती दिली.

या खटल्यात महाराष्ट्र शासनाला प्रथम पक्ष बनविले होते. परंतु तत्कालीन सरकारने या संबंधात कोणताच रस घेतला नाही. त्यामुळे विद्यार्थ्यांची प्रचंड प्रमाणात मागणी असूनही एकही वैद्यकीय महाविद्यालय वा दंत वैद्यकीय महाविद्यालय स्थापन होवू शकले नाही. १९८९ मध्ये शरद पवार मुख्यमंत्री असताना सरकारने ही बाब न्यायालयाच्या लक्षात आणून दिली गेली व त्यानंतर न्यायालयाने या महाविद्यालयांना अनुमती दिली.

विनाअनुदानित संस्थांनी करण्याची शिक्षण शुल्क आकारणी हा प्रारंभापासूनच वादग्रस्त मुद्दा राहिला. कर्नाटकात राज्याबाहेरच्या विद्यार्थ्यांना दुप्पट शिक्षण शुल्क आकारण्याचा मुद्दा न्यायालयाने रद्द केला. खाजगी शिक्षणसंस्था घेत असणाऱ्या देणग्यांबाबत टीका होऊ लागताच महाराष्ट्र शासनाने कॅपिटेशन फीच्या विरोधात कायदा केला. त्यामुळे आपल्या शिक्षण संस्थेचा खर्च भागविण्याकरिता शुल्क वाढवून देण्याची मागणी खाजगी संस्थाचालक करू लागले. या संस्थांच्या शुल्क आकारणी संबंधात, देणग्या स्वीकारण्याच्या संबंधात, प्रवेशपध्दतीच्या संबंधात शासकीय धोरणे व न्यायालयीन निकाल यांनी एकच गोंधळ उडवून दिला. या संबंधात अनेक याचिका विविध न्यायालयांत तसेच सर्वोच्च न्यायालयात पडून होत्या. त्या सर्व याचिकांवर एकत्रित विचार करण्याचा निर्णय सर्वोच्च न्यायालयाने घेतला व ती जबाबदारी न्यायमूर्ती उन्नीकृष्णन यांच्याकडे सोपवली.

जर संस्थेला मिळणाऱ्या उत्पन्नाचा देणगीचा मार्ग बंद केला तर शिक्षणसंस्थांचा खर्च केवळ शुल्कामधूनच भागवणे क्रमप्राप्त होते. तरीही प्रत्येक विद्यार्थ्यावर शिक्षणासाठी नेमका किती खर्च येतो यासंबंधी संस्थाचालक व विविध संघटनांचे प्रतिनिधी यांच्यात काही मतभेद होते. त्यामुळे न्यायालयाने 'फर्गसन आणि कंपनी' या खाजगी संस्थेला या प्रश्नावर तपशीलात जाऊन अभ्यास करून अहवाल देण्यास सांगितले.

या अहवालानुसार असे निदर्शनास आले की, १९९३ सालामध्ये, एका वैद्यकीय विद्यार्थ्यामागे सरकार प्रतिवर्षी ३,७५,००० रू. खर्च करते, आणि अभियांत्रिकी विद्यार्थ्यांमागे हा खर्च ६०,००० रू. एवढा असतो तर आय.आय.टी.बाबत तो ६० लाख एवढा होतो. खर्चाचे हे आकडे सामान्य माणसाच्या आवाक्याबाहेरचे आहेत असे न्यायालयाला वाटले आणि गुणवत्ताप्राप्त विद्यार्थ्यांना रास्त खर्चात शिक्षण मिळण्यासाठी व शिक्षणसंस्थांनाही त्यांचा खर्च भागविण्यासाठी कोणते धोरण स्वीकारावे यावर विचारमंथन झाले. त्यातून ५० टक्के गुणवत्ता प्राप्त विद्यार्थ्यांना नाममात्र शुल्क आकारावे, ३५ टक्के कमी गुणवत्ता प्राप्त विद्यार्थ्यांना अधिक शुल्क आकारावे व उर्वरित १५ टक्के विद्यार्थ्यांना, दुसऱ्या गटाच्या पाचपट शुल्क आकारावे व त्यांचा प्रवेश व्यवस्थापनाच्या अखत्यारीत ठेवावा.

न्यायालयाच्या हा निर्णय आल्यानंतर त्याचे संमिश्र स्वागत करण्यात आले. वास्तविक न्यायालयाच्या या

निर्णयामुळे अशी सोय झाली होती की दोन खाजगी महाविद्यालयांना परवानगी दिली की एकही रुपया शासनाने खर्च न करता गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांना, शासकीय शुल्कानुसार शिक्षण शुल्क आकारणाऱ्या एका नव्या व्यावसायिक शिक्षण संस्थेची भर पडत होती. परंतु उर्वरित विद्यार्थ्यांना खूपच अधिक शुल्क भरावे लागणार असल्याने नवा वाद सुरू झाला. जे ५० टक्के गुणवत्ताधारक विद्यार्थी होते ते आर्थिकदृष्ट्या दुर्बळ होते अशी स्थिती मुळीच नव्हती. न्यायालयाने हे गृहित धरले की, श्रीमंतांची मुले अभ्यास करीत नाहीत व गुणवत्ताधारक विद्यार्थी फक्त गरीब असतात. याउलट वाटेल तेवढे शुल्क देवून श्रीमंत विद्यार्थी खाजगी क्लासेसना जातात व अधिक गुण मिळवितात, अशीही स्थिती होती.

त्यामुळे असे चित्र निर्माण झाले की आर्थिकदृष्ट्या सक्षम विद्यार्थी नाममात्र शुल्क घेवून शिक्षण घेतात व आर्थिकदृष्ट्या दुर्बळ विद्यार्थ्यांना मात्र शिक्षणासाठी अधिक शुल्क द्यावे लागते. त्यामुळे सर्वोच्च न्यायालयाने आपल्या निर्णयाचा फेरविचार करून खर्चाधारित शिक्षण खर्चाप्रमाणे जे शुल्क ठरेल ते सर्वांना समान आकारावे व एकूण प्रवेश क्षमतेच्या १५ टक्के विद्यार्थ्यांचे प्रवेश अनिवासी किंवा व्यवस्थापन कोट्यातून असावेत, परंतु त्यांचे शिक्षण शुल्क संस्थेच्या माहितीपत्रकात नमूद केलेले असावे हे स्पष्ट केले. खर्चाधारित शिक्षण शुल्क निश्चित करताना झालेल्या खर्चाच्या २५ टक्के इतका जादा खर्च विकास खर्च म्हणून गृहित धरावा व दर तीन वर्षांनी आढावा घेवून शिक्षण खर्च नक्की करावा असेही ठरविण्यात आले.

न्यायालयातील झालेली ही सर्व चर्चा शिक्षणाच्या अर्थकारणावर होती. त्याचबरोबर खाजगी विद्यापीठांशी संलग्न असलेले प्रशिक्षित प्राध्यापक वर्ग व पायाभूत सुविधा हे आणखी दोन महत्त्वाचे प्रश्न आहेत. त्यात शहरी भागातील शिक्षणसंस्थांनी इमारती, प्रयोगशाळा, अद्ययावत यंत्रसामुग्री याबाबत चांगली प्रगती केली आहे. ग्रामीण भागातील संस्थाबाबत हेच विधान करता येईल असे नाही. आजवर शिक्षण क्षेत्र आर्थिक दृष्ट्या फारसे आकर्षक वाटत नसे. परंतु सहाव्या वेतन आयोगाच्या तरतुदींनी बराचसा चांगल्या दर्जाचा तंत्रज्ञ वर्ग शैक्षणिक कामाकडे आकृष्ट होताना दिसतो आहे.

**अभिमत विद्यापीठे**

भारतासारख्या प्रचंड लोकसंख्या व आकारमान असलेल्या देशात खाजगी अभिमत विद्यालयांची गरज आहे असे डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांच्या समितीने नमूद केले होते. जगात भारत वगळता अन्य सर्व देशात व्यावसायिक शिक्षण सवलतीत मिळत नसल्याने प्रचंड महाग आहे व याला चीनसारखा साम्यवादी देशही अपवाद नाही. त्यामुळे खर्चाधारित व्यावसायिक शिक्षणाच्या संकल्पनेनेच लोकांना धक्का बसला.

आता परिस्थिती अशी आहे की, विद्यापीठांचा पसारा वाढत चालला आहे. वाढत्या खर्चामुळे पुरेसे मनुष्यबळ त्यांना मिळत नाही. त्यामुळे त्याचा दर्जा घसरत चालला आहे. आधुनिक काळातील जागतिकीकरणामुळे अनेक परदेशी शिक्षण संस्था भारतात आल्या आहेत, तर काही येऊ घातल्या आहेत. त्यांची कार्यपध्दती व दर्जा यांच्याशी आपल्याला स्पर्धा करायची आहे. परदेशी विद्यापीठात उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या कमी असल्याने आपल्याकडील संख्या त्यांना व्यापारी दृष्टीने आकर्षित करीत आहे. आपल्याला असलेल्या गोऱ्या कातडीच्या आकर्षणाचा लाभही त्यांना मिळणार आहे. या पार्श्वभूमीवर सरकार, खाजगी अभिमत विद्यापीठांना (विनाअनुदानित) प्रोत्साहन देत आहे कारण या क्षेत्रासाठी आवश्यक असलेली आर्थिक तरतूद करण्याची सरकारची तयारी नाही.

या सर्व चर्चेत एक महत्त्वाचा मुद्दा बाजूला पडला आहे. विद्यापीठांचे प्रमुख काम पदव्यांचे वाटप करण्याचे नसून संशोधन करणे हे आहे. अन्य देशात अनेक प्रकारचे संशोधन, मग ते वैद्यकीय असो, सामाजिक असो की औद्योगिक, ते विद्यापीठांच्या माध्यमातून चालते. त्यातून या विद्यापीठांना देणग्या व शुल्क रूपाने उत्पन्न मिळते. अशी खाजगी अभिमत विद्यापीठे डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांना अपेक्षित होती. केंद्र शासनाचे मनुष्यबळ विकास खाते व विद्यापीठ

अनुदान आयोग यांच्या मदतीने खाजगी विनाअनुदानित अभिमत विद्यापीठावर दबाव आणणे आवश्यक आहे. नॅशनल ॲक्रॅडिटेशन कौन्सिलच्या माध्यमातून तसे शासनाचे प्रयत्नही सुरू आहेत.

सहाव्या वेतन आयोगामुळे शैक्षणिक क्षेत्राच्या खर्चात बरीच वाढ होणार आहे व त्याचा भार साहजिकच विद्यार्थ्यांवर पडणार आहे. शिक्षण एवढे महागडे होऊनही त्याचा दर्जा काय? असा प्रश्न विचारला जाणे साहजिकच आहे. परंतु सारा समाजच अनैतिकता, कामचुकवेगिरी, भ्रष्टाचार, वशिलेबाजी यांनी ग्रस्त झाला आहे असा अनुभव येतो. अर्थात यालाही काही अपवाद आहेतच.

विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शिक्षणसंस्थामागची कल्पना वाईट नव्हती, किंबहुना आवश्यक व अपरिहार्य होती. अशा शिक्षणसंस्था निघाल्या नसत्या तर जागतिकीकरणाच्या प्रक्रियेत भारताला एवढे तंत्रशिक्षित मनुष्यबळ उभे करून आपला प्रभाव टाकता आला नसता. शासकीय संस्थांची ती क्षमता नव्हती. या शिक्षणसंस्थांच्या माध्यमातून जेवढ्या पायाभूत सुविधा उत्पन्न झाल्या आहेत त्या शासन उभ्या करू शकले नसते. त्यामुळे या क्षेत्रातील ज्या त्रुटी आहेत त्या दूर करायच्या असतील तर या क्षेत्राच्या नियंत्रणाची पध्दत नि:पक्षपाती व पारदर्शक असणे गरजेचे आहे.

– प्रभाकर भागवत

# आ

## आठरे, विलास बाळाजी

**संस्थापक, प्राचार्य**

**१५ फेब्रुवारी १९२९**



विलास बाळाजी आठरे यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील पाथर्डी तालुक्यातील कौडगाव येथे झाला. लहानपणीच त्यांचे पितृछत्र हरपले. पण कुटुंबियांच्या प्रोत्साहनाने प्राथमिक व माध्यमिक शिक्षण विलासरावांनी अहमदनगर येथे पूर्ण केले. पुण्यात १९५५ मध्ये रसायनशास्रात पदवी मिळविली व कोळपेवाडीच्या साखर कारखान्यात प्रयोगशाळेत रसायनतज्ज्ञ म्हणून ते रुजू झाले. शिक्षक पेशाची आवड असल्याने १९५८ मध्ये त्यांनी सातारा येथील ‘आझाद कॉलेज ऑफ एज्युकेशन’ मधून बी.टी. पदवी मिळविली. या परीक्षेत पुणे विद्यापीठात प्रथम आल्यामुळे त्यांना विद्यापीठाचे गंगूनाना कानिटकर पारितोषिक मिळाले. १९५९ मध्ये ते एम.एड. झाले व एका लष्करी शिस्तीच्या शाळेत शिक्षक म्हणून रुजू झाले.

१९६२ मध्ये युनायटेड स्टेट्स एज्युकेशनल फाउंडेशनची ‘फुल ब्राइट स्कॉलरशिप’ मिळाली. विलासरावांनी अमेरिकेतील ओहयो राज्यातील अथेन्स विद्यापीठात शिक्षणशास्त्रातील आंतरराष्ट्रीय दर्जाचा अभ्यासक्रम पूर्ण केला. त्यानंतर काही काळ इंग्लंडमध्ये राहून तेथील शिक्षणपद्धतींचा त्यांनी अभ्यास केला.

भारतात परत आल्यावर ग्रामीण भागातील मुलांना दर्जेदार शिक्षण देण्यासाठी आदर्श पब्लिक स्कूल काढावे हा विचार त्यांच्या मनात होता. जून १९६४ मध्ये पद्मश्री डॉ. विठ्ठलराव विखे पाटील व डॉ. अण्णासाहेब शिंदे ह्यांच्या मदतीने विलासरावांनी प्रवरानगरमध्ये ‘प्रवरा पब्लिक स्कूल’ हे ग्रामीण भागातील पहिले पब्लिक स्कूल काढले. ह्या स्कूलचे पहिले प्राचार्य म्हणून विलासरावांनी पदभार स्विकारला.

याच काळात ‘प्रवरा एज्युकेशन सोसायटी’चे सचिव म्हणून काम करताना, प्रवरा कन्या विद्या मंदिर, पद्मश्री विखे पाटील महाविद्यालय सुरू केले व आश्व दाढ, पाथरे, राजुरी येथील माध्यमिक शाळा, प्रवरा परिसरात चार ठिकाणी इंग्रजी माध्यमाच्या प्राथमिक शाळांच्या उभारणीसाठी त्यांनी विशेष प्रयत्न केले. विलासरावांच्या ह्या शैक्षणिक कार्याचा १९७७ मध्ये केंद्र सरकारच्या आदर्श शिक्षक राष्ट्रपती पुरस्काराने गौरव करण्यात आला.

राज्याच्या इतर भागातही म्हणजे ‘राहुरी पब्लिक स्कूल’, ‘मुळा पब्लिक स्कूल’, ‘तेरेजा पब्लिक स्कूल’, ग्रीन फिंगर्स पब्लिक स्कूल ह्यांच्या उभारणीसाठीही विलासरावांनी मार्गदर्शन केले. विलासरावांनी त्यांचे बंधू माजी खासदार कै. चंद्रभान आठरे पाटील यांच्या नावाने ‘ग्राम नवोदय ट्रस्ट’ ही संस्था स्थापन करून अहमदनगर येथे ‘आठरे पाटील पब्लिक स्कूल’ सुरू केले. या सर्व प्रयत्नांच्या मागे विद्यार्थ्यांचा शारीरिक, मानसिक, बौद्धिक सांस्कृतिक विकास घडावा हाच हेतू आहे.

१९८४ पासून अहमदनगर जिल्हा मराठा प्रसारक समाज या शैक्षणिक कार्यात विलासरावांचे योगदान मोठे आहे.

पुण्यातील ‘एच. ओ. एस. चिल्ड्रेन व्हिलेज’ बालग्राम या संस्थेचे विश्वस्त, अध्यक्ष म्हणून दहा वर्षे ते कार्यरत होते. त्याबद्दल त्यांना बालग्राम संस्थेने मानपत्र दिले. ‘प्रवरा एज्युकेशन सोसायटी’, ‘गौतम एज्युकेशन सोसायटी’ या संस्थेचे सचिव, ‘शिव-पार्वती एज्युकेशन ट्रस्ट’,

अकलूजचे विश्वस्त व संगमनेरच्या ‘सह्याद्री एज्युकेशन सोसायटी’चे शिक्षण सल्लागार म्हणून त्यांचे काम मोठे आहे.

राज्य अपंग संघटनेचा ‘कर्मयोगी पुरस्कार’, नवी दिल्लीच्या ‘इंटिग्रेटेड कौन्सिल फॉर सोशिओ इकॉनॉमिक प्रोग्रेस’ या संस्थेचा ‘राष्ट्र प्रतिभा’ पुरस्कार अशा पुरस्कारांनी विलासरावांचा सन्मान करण्यात आला आहे.

– प्रा. शंकर गागरे

**संदर्भ :**

## आहेर, रामराव पुंजाजी

**संस्थापक**

**८ जून १९३२ – १ जानेवारी १९९४**



रामराव पुंजाजी तथा अण्णासाहेब आहेर ह्यांचे जन्मगाव बागलाण तालुक्यातील सरस्वती वाडी होय. रामरावांचे बालपण अतिशय गरीबीत गेले. प्रतिकूल परिस्थितीशी झगडत ते एस. एस. सी. झाले. महाविद्यालयीन शिक्षण घेणे शक्य नसल्याने मालेगावच्या‘ म. गांधी विद्या मंदिरा’त त्यांनी शिक्षक म्हणून नोकरी करण्यास सुरुवात केली. १९५४ मध्ये कै. भाऊसाहेब हिरे ह्यांनी ‘नूतन त्र्यंबक विद्यालया’ची पूर्ण जबाबदारी रामरावांवर सोपविली. ह्या शाळेच्या प्रगतीसाठी रामरावांनी विविध उपक्रम सुरू केले. स्नेहसंमेलन, सांस्कृतिक कार्यक्रम, क्रीडास्पर्धा, विशेषत: परीक्षांचे उत्तम निकाल यातून काही काळातच शाळा नावारूपास आली. या काळात आदिवासी वसतिगृहाचे संचालक म्हणून रामराव विनावेतन काम करीत होते. १९५४ पासूनच ‘महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा’, पुणे ह्या संस्थेचे प्रचारक व अधिकृत शिक्षक म्हणूनही पगार न घेता ते कार्य करीत होते. देश आणि देशबांधवांविषयीच्या प्रेमाचे मूल्य मुलांच्या मनात रूजावे ह्यासाठी गोवा आंदोलनाच्या वेळी विविध कार्यक्रम आयोजित करून त्यांनी निधिसंकलन केले. त्यांचे अध्यापनाचे कार्य चालू असतानाच अध्ययनही चालू होते. रामरावांनी एम. ए. व बी. एड. पदव्या मिळविल्या.

१९५८ मध्ये देवळा गावात ‘श्री शिवाजी मराठा इंग्लिश शाळे’ मध्ये ते शिक्षक होते. सुरुवातीपासूनच सर्व विषय ते उत्तम शिकवीत. पण हिंदी भाषा हा त्यांचा हातखंडा विषय होता. विद्यार्थ्यांविषयीची आत्मीयता, शिकवण्यातील तळमळ, परिणामी साधलेली शाळेची प्रगती यामुळे रामरावांची गणना नावाजलेल्या शिक्षकांमध्ये होऊ लागली. पण नंतरच्या काळात रामरावांच्या कर्तृत्वाला अधिक मोठे क्षेत्र खुणावीत होते. १९६१ मध्ये देवळा ग्रामपंचायतीचे सदस्य म्हणून ते निवडून आले. १९६५ मध्ये ग्रामवासीयांनी रामरावांना सरपंचपदी बिनविरोध निवडून दिले. अनेक लोकोपयोगी कामे करून ग्रामवासियांनी दाखविलेला विश्वास सार्थ करीत रामरावांनी देवळा गाव व ग्रामपंचायत आदर्श केली. म. गांधी जन्मशताब्दी वर्षात कळवण तालुक्यातील आदर्श गाव म्हणून देवळा गावाला पारितोषिक मिळाले.

१९६८ मध्ये रामरावांनी जियाउद्दीन ह्यांच्या ऑईल मिलच्या जागेत ‘जिल्हा परिषद विद्या निकेतन’ सुरू केले. अपुरी जागा, अस्वच्छ परिसर, मोठेमोठे खड्डे, पिण्याच्या पाण्याची सोय नाही. अशा परिस्थितीत शिक्षक व विद्यार्थ्यांच्या मदतीने श्रमदान करून पंधरा दिवसांत रामरावांनी परिसर स्वच्छ केला. त्यांच्या प्रयत्नांनीच विद्या निकेतनची सुसज्ज वास्तू उभी राहिली.

१९७२ मध्ये जिल्हा परिषदेत निवडून आल्यावर शिक्षण व अर्थ समितीचे सभासदपद रामरावांना मिळाले. त्याचा उपयोग त्यांनी जिल्ह्याची शैक्षणिक प्रगती घडवून आणण्यासाठी केला. शिवराज्याभिषेक त्रिशतसंवत्सरी महोत्सवाच्या निमित्ताने ग्रामीण भागात शिवचरित्र प्रदर्शने, मेळावे, लोकनाट्ये, नाटके ह्यातून रामरावांनी शिवकाल उभा केला. राष्ट्रीयत्वाची भावना वाढीस लावली. स्वत: शिक्षक असल्याने शिक्षकांच्या अडचणी सोडविण्यासाठी

रामराव प्रयत्नशील होते. उत्तम प्रशासनामुळे त्यांची कारकीर्द शिक्षणखात्याचा सुवर्णकाळ ठरली. आदर्श प्रशासक, आदर्श सभापती म्हणून त्यांचा गौरव करण्यात आला.

'देवळा एज्युकेशन सोसायटी'चे अध्यक्ष म्हणून रामरावांचे शैक्षणिक क्षेत्रातील काम फार मोठे आहे. ग्रामीण भागातील, तळागाळातील मुलांसाठी गावात महाविद्यालयीन शिक्षणाची सुविधा उपलब्ध व्हावी म्हणून १९७८ मध्ये रामरावांनी 'देवळा महाविद्यालया'ची स्थापना केली.

त्यावेळी अनेक अडचणी समोर उभ्या होत्या. रामराव स्वत: खेडोपाडी हिंडले. मुलांना, पालकांना शिक्षणाचे महत्त्व त्यांनी समजावून सांगितले. परिणामी पहिल्या वर्षी एकशे वीस मुलांनी महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. अनेक मुलांची आर्थिक परिस्थिती चांगली नव्हती. त्यांची राहण्याजेवणाची सोय रामरावांनी केली. काही वर्षांतच मुलांची संख्या सातशेपर्यंत गेली. कला आणि वाणिज्य शाखांमधील पदवीपर्यंतच्या शिक्षणाची उत्तम सोय झाली. महाविद्यालयाच्या सर्व गोष्टींकडे रामरावांचे बारीक लक्ष असायचे. चर्चासत्रे, शिबिरे, विविध स्पर्धा ह्यांसारखे उपक्रम, जिमखाना, ग्रंथालय अशा आवश्यक सोयींनी महाविद्यालय सुसज्ज होत गेले. याच काळात डांग, सौंदाणे, नांदगाव अशा ठिकाणीही रामरावांनी विद्यालये काढली.

हे कार्य चालू असतानाच देवळ्याच्या व्यापारी बँकेचे संचालक, 'नाशिक जिल्हा ग्रंथालय संघा'चे चिटणीस, 'नाशिक जिल्हा माध्यमिक शिक्षक संघा'चे अध्यक्ष, 'नाशिक जिल्हा राष्ट्रभाषा प्रचार समिती', 'महाराष्ट्र राज्य प्रौढ शिक्षण सुकाणू समिती' अशा समित्यांचे सदस्य म्हणून रामराव काम करीत होते. एक हाडाचा शिक्षक, शिक्षकांचा कैवारी, दलितांचा मित्र, धडपडणारा शेतकरी, माणसे जोडणारा सेवाभावी कार्यकर्ता, समाजहितासाठी झटणारा आदर्श नेता अशा विविध भूमिका समर्थपणे बजावणारे रामराव आहेर हे सर्वार्थाने देवळा गावाचे शिल्पकार होते.

– प्रा. सुहासिनी पटेल

* * *

# क

## कदम, अंकुशकुमार नानासाहेब
**संस्थापक**
**१५ जून १९४६**



कदम अंकुशकुमार नानासाहेब ऊर्फ बाबूराव कदम हे मूळचे नांदेड तालुक्यातील लिंबगाव येथील रहिवासी. त्यांनी बी.ई. मेकॅनिकल ही पदवी संपादन केली. साखर कारखान्यांची उभारणी, यंत्रसामग्रीची उभारणी अशा क्षेत्रात त्यांनी काही काळ काम केले. नंतर त्यांचे भाऊ कमलकिशोर कदम यांच्यासोबत महात्मा गांधी मिशनची स्थापना करून शिक्षण क्षेत्रात काम करण्याचे ठरविले. औरंगाबाद येथे महात्मा गांधी मिशनचे वैद्यकीय महाविद्यालय, अभियांत्रिकी महाविद्यालय, परिचारिका महाविद्यालय, फिजीओथेरेपीची संस्था, व्यवस्थापन शास्त्रातील सर्व कोर्सेस घेणारी संस्था, हॉटेल मॅनेजमेंटची संस्था, कृषी व तंत्रज्ञान महाविद्यालय, जैवतंत्रशास्त्राची संस्था, संगणकशास्त्र महाविद्यालय, शिक्षणशास्त्र महाविद्यालय, चित्रकला महाविद्यालय, निसर्गशास्त्र व योग, पत्रकारिता महाविद्यालय, मुलांसाठी संस्कार विद्यालय ही चांगली शाळा, क्लोव्हरडेल इंग्लिश स्कूल, असा शिक्षण क्षेत्रातील सर्वस्पर्शी शिक्षणाची सोय त्यांनी उभी केली आहे.

केजी टू पीजी उत्तम शिक्षणाची सोय एका एमजीएम संकुलात उपलब्ध असल्याचे तेथील मंडळी अभिमानाने सांगतात. नांदेड, मुंबई येथेही एमजीएमचा विस्तार झालेला आहे. या संस्थेचे सेक्रेटरी अशी बाबूराव कदम यांच्याकडे जबाबदारी आहे. मुख्यतः औरंगाबाद येथील विस्तिर्ण शैक्षणिक संकुलाचे प्रमुख म्हणून त्यांनी या परिसराचा विकास, वाढ यात जातीने लक्ष दिले आहे. दै. लोकपत्र हे वृत्तपत्र सुरू करून त्यांनी लोकशिक्षणाच्या प्रबोधनाच्या क्षेत्रातही काम केले आहे. दै. लोकपत्रचे ते संचालक व संपादक आहेत.

टेक्सास लाईफ स्टाईल फर्निचर्स या व्यावसायिक संस्थेचे ते अध्यक्ष असून संगणकाशी निगडित सीनएनसी मशिनचा वापर करून शाळेसाठी सुंदर फर्निचर तयार करण्याची कल्पना त्यांनी साकार केली आहे. अनेक शाळांमध्ये नेक्स्ट फर्निचरचे अत्याधुनिक, आकर्षक व सुविधाजनक फर्निचर मुलांना उपयुक्त ठरत आहे. याशिवाय योग, खेळ, निसर्गोपचार, विपश्यना, पर्यावरं अशा क्षेत्रातही प्रशिक्षण, उपक्रम, प्रचार असे काम मोठ्या तडफेने त्यांनी केले आहे. औरंगाबाद येथे विपश्यना केंद्र व निसर्गोपचार केंद्र त्यांनी पुढाकार घेवून सुरू केले आहे. पर्यावरणाच्या क्षेत्रातही त्यांनी जागृती करण्याच्या दृष्टीने खूप प्रभावीपणे काम केले आहे. त्या कामामुळे त्यांना जागतिक पर्यावरण कॉंग्रेस व भारतीय पर्यावरण संस्थेच्या वतीने तत्कालीन राष्ट्रपती शंकर दयाळ शर्मा यांच्या हस्ते पर्यावरण पुरस्कार देण्यात आला आहे.

अमर अर्बन बँकेचे ते संस्थापक अध्यक्ष आहेत. सर्वसामान्यांच्या मुलांना शिक्षणाच्या व व्यावसायिक शिक्षणाच्या संधी उपलब्ध व्हाव्यात यासाठी महात्मा गांधी मिशनसारखी संस्था उभी करून त्यांनी शिक्षणक्षेत्रात उभे केलेले काम वाखाणण्यासारखे आहे. ते रोज या संस्थेच्या कामकाजात आणि विकासासाठी प्रत्येक गोष्टीत स्वतः लक्ष देतात.

– दिलीप धारूरकर

## कदम, पतंगराव श्रीपत

**संस्थापक, राजकारणी**

**८ जानेवारी १९४४**

☞ **मुख्य नोंद – राजकारण खंड**



पतंगराव श्रीपतराव कदम यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील सोनसळ या गावी झाला.त्यांचे वडील श्रीपतराव कदम शेतकरी होते. मातोश्री बयाबाईंनी त्यांच्यावर ज्ञानसाधनेचे संस्कार केले. पतंगरावांचे चौथीपर्यंतचे शिक्षण सोनसळला झाले. सातवीपर्यंतचे शिक्षण शिरस गावी झाले. त्यासाठी दोन मैल पायपीट करून ते जात असत. पुढील शिक्षणासाठी ते कुंडलला गेले. कर्मवीर भाऊराव पाटील यांच्या 'शाहू वसतिगृह' मध्ये कमवा-शिका योजनेचा लाभ घेत त्यांनी आपले पुढील शिक्षण पूर्ण केले. महाविद्यालयीन शिक्षण घेत असताना कोयना प्रकल्पाच्या कार्यालयामध्ये त्यांनी छोटीशी नोकरीही केली. पुढे हडपसरला 'साधना विद्यालयात' त्यांनी अर्धवेळ शिक्षकाची नोकरी केली. ग्रामीण समाजाच्या वाट्याला येणाऱ्या अडीअडचणींची झळ पतंगरावांना बसली होती. ग्रामीण समाजाचा उत्कर्ष हा त्यांच्या चिंतनाचा विषय बनत होता. 'शिक्षण साधनांचा आणि संधीचा अभाव हे ग्रामीण मागासलेपणाचे कारण असून शिक्षण प्रसारातूनच या समाजाला समृद्धीचा प्रकाश लाभू शकेल' हे जाणलेल्या पतंगरावांनी १० मे १९६४ रोजी पुण्याच्या कसबा पेठेतील रहाळकर मंदिराच्या वरच्या माडीवर एका छोट्या खोलीत 'भारती विद्यापीठा'ची स्थापना केली. त्यावेळी ते एकोणीस वर्षांचे होते. विद्यापीठ स्थापनेच्या वेळी अकरा रुपये भरणारी अकरा माणसेही मिळाली नव्हती. गणित, इंग्रजी या विषयांच्या बाह्यपरीक्षा घेऊन या विषयात विद्यार्थ्यांची गोडी वाढविण्याच्या प्रयत्नातून 'भारती विद्यापीठा'ची स्थापना झाली.पुढे पुणे, मुंबई, दिल्ली, सोलापूर, कोल्हापूर, सांगली, सातारा, रायगड या ठिकाणी भारती विद्यापीठाच्या शाखा विस्तारित झाल्या. केवळ विस्तारावर भर न देता गुणवत्ता विकासावरही तेवढेच लक्ष दिल्यामुळे भारती विद्यापीठाचे नाव देशभर पसरले. वैद्यकीय, विधी, अभियांत्रिकी, व्यवस्थापन, वास्तुरचना, औषधनिर्माण, जैवतंत्रज्ञान, कला, कृषी या व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या शाखा निर्माण करून भारती विद्यापीठाने महाराष्ट्रात व्यावसायिक शिक्षणाला महत्त्व प्राप्त करून दिले. परंपरागत शिक्षणाबरोबरच आधुनिक शिक्षणाची गंगोत्री खेड्यापाड्यापर्यंत पोहोचविण्याचे काम डॉ. पतंगराव कदम यांनी केले. १९९७ मध्ये भारती विद्यापीठाला विश्वविद्यालयाचा दर्जा प्राप्त झाला. केवळ महिलांसाठी महाविद्यालये आणि तंत्रनिकेतने उभी करून भारती विद्यापीठाने 'स्त्री-शिक्षणा'च्या कामी महत्त्वाचे योगदान दिले. आज भारती विद्यापीठात पाच लाख विद्यार्थी ज्ञानार्जन करीत आहेत.

ग्रामीण विभागाच्या आर्थिक विकासात सहकारी संस्था महत्त्वपूर्ण योगदान देऊ शकतात हे जाणलेल्या पतंगरावांनी साखर कारखाना, बँक, ग्राहक भांडार, कुक्कुटपालन संस्था, सूतगिरण्या स्थापन केल्या. या सहकारी संस्थांचा नफ्याचा काही वाटा भारती विद्यापीठाच्या शैक्षणिक कार्यासाठी उपलब्ध होईल अशी तरतूद या संस्थांच्या घटनेमध्ये केली. शिक्षण व सहकार ही सामाजिक परिवर्तनाची दोन माध्यमे एकत्र आणून एक नवा प्रयोग त्यांनी केला. ग्रामीण विभागातील सर्वसामान्य शेतकऱ्यांना शेतीविषयक शासकीय योजनांची माहिती व्हावी, तसेच त्यांच्या समस्यांवर संशोधन व्हावे या हेतूने 'ग्रामीण विकास प्रतिष्ठान व संशोधन संस्थे'ची स्थापना त्यांनी केली. 'भारती कला अकादमी' आणि 'भारती क्रीडा प्रतिष्ठान' या दोन संस्थांच्या माध्यमातून क्रीडापटू, कलावंत, आणि साहित्यिकांना गौरववृत्ती देण्याची योजना राबविली जाते. 'मानव' ही जात, 'मानवता' हा धर्म आणि 'गतिमान शिक्षणातून समाजपरिवर्तन' हे ध्येय उराशी बाळगून बहुजन समाजाच्या शेवटच्या स्तरापर्यंत शिक्षण नेले. भारती विद्यापीठाने दुबईत शिक्षणकेंद्र सुरू केले.

– प्रा. मिलिंद जोशी

## कराड, विश्वनाथ दादाराव
**संस्थापक**
**३ फेब्रुवारी १९४१**



विश्वनाथ दादाराव कराड ह्यांचा जन्म बीड जिल्ह्यातील केज तालुक्यातील टाकळी गावी झाला. अतिशय प्रतिकूल परिस्थितीत सोलापूर जिल्ह्यातील माढा ह्या गावात वसतिगृहामध्ये राहून त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. बार्शीमधील 'सिल्व्हर ज्युबिली हायस्कूल'मध्ये माध्यमिक शिक्षण त्यांनी पूर्ण केले. सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयातून पदवीपूर्व शास्त्रशाखेचे शिक्षण घेऊन पुण्याच्या अभियांत्रिकी महाविद्यालयामधून ते एम. ई. झाले. याच महाविद्यालयात उत्तम प्राध्यापक म्हणूनही त्यांनी लौकिक मिळविला. ते पीएच. डी. झाले. पण सुखासीन शासकीय नोकरीत त्यांचे मन रमले नाही. नव्या औद्योगिक युगाची आव्हाने स्वीकारण्यासाठी अभियांत्रिकी पदवीधर मोठ्या संख्येने निर्माण होण्यासाठी तंत्रशिक्षणाच्या सुविधा उपलब्ध नाहीत ह्याची त्यांना खंत वाटे.

याच काळात सरकारने खाजगी संस्थांना तांत्रिक महाविद्यालये चालविण्यास अनुमती दिली. कराड यांनी सरकारी नोकरी सोडली व 'महाराष्ट्र इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी' (एम.आय.टी.) ह्या संस्थेची १९८३ मध्ये पुण्यात उभारणी केली. पुण्यातील पौड रस्त्यावर संस्थेची भव्य वास्तू, अद्ययावत शैक्षणिक सुविधा, व्यासंगी व निष्ठावंत प्राध्यापक व शैक्षणिक वातावरण यामुळे अल्पावधीतच संस्थेने मोठा लौकिक संपादन केला. त्यामागे कराड यांची तपश्चर्या आहे. वास्तविक उद्योगक्षेत्र त्यांना खुणावीत होते. पण आपला पिंड अध्यापकाचा आहे हे ओळखून त्यांनी शिक्षणक्षेत्र हेच स्वत:चे कर्तृत्वक्षेत्र मानले. शहरी व ग्रामीण भागांतील विद्यार्थ्यांना शिक्षणाची कवाडे खुली करून दिली. एम.आय.टी.मध्ये प्रारंभीच्या काळातच पॉलिमर, पेट्रोलियम, पेट्रोकेमिकल इंजिनियरिंग इत्यादी नवीन अभ्यासक्रम सुरू केले. मुलांमधील उद्योजकतेला प्रोत्साहन देण्यासाठी उत्पादन केंद्र उभारले. ग्रंथालये, प्रयोगशाळा सुसज्ज व समृद्ध केल्या.

एम.आय.टी. बरोबरच सावित्रीबाई फुले तंत्रनिकेतन, एम.आय.टी. स्कूल ऑफ मॅनेजमेंट अँड कॉम्प्युटर स्टडीज, एम.आय.टी. विमेन कॉलेज ऑफ इंजिनियरिंग, महाराष्ट्र ॲकेडमी ऑफ एज्युकेशन अँड ट्रेनिंग, शारदा प्राथमिक विद्यालय, संत ज्ञानेश्वर माध्यमिक विद्यालय अशी तीस पेक्षा अधिक शिक्षण केंद्रे निर्माण केली. रुई रामेश्वर हे कराड यांचे मूळ गाव. या गावात त्यांनी शाळेची देखणी इमारत उभारली. गावातील मुलांना उत्तम शिक्षणाची सुविधा उपलब्ध करून दिली. लातूरला वैद्यकीय महाविद्यालय सुरू केले. सध्या अंबेजोगाई, औरंगाबाद, अहमदनगर, तळेगाव दाभाडे, आळंदी, बार्शी, लातूर, पुणे ह्या ठिकाणी महाराष्ट्र ॲकेडमीचे एकूण पंचेचाळीस प्रकल्प राबविले जात आहेत.

शिक्षणक्षेत्राइतकीच मोलाची कामगिरी त्यांनी अध्यात्माच्या क्षेत्रात केली आहे. विश्वशांती, समन्वय, संत ज्ञानेश्वर महाराज अशा विषयांवरील त्यांची सहा पुस्तके इंग्रजी भाषेत प्रकाशित झाली आहेत. एम.आय.टी.च्या त्रैमासिकात शिक्षण, लोकसंख्यावाढ, ऊर्जा, एकविसाव्या शतकातील भारतीय कृषी व्यवसाय, सागरी किनाऱ्यांच्या पर्यावरणाचे व्यवस्थापन यासारख्या विषयांवर विपुल लेखन केले आहे. राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये त्यांनी शिक्षण, मानवी हक्क, शांती, विज्ञान अशा विषयांवरील साठपेक्षा अधिक निबंधाचे वाचन केले आहे.

जागतिक तत्त्वज्ञान परिषद, सर्वधर्मपरिषद अशा परिषदांचे आयोजन त्यांनी यशस्वीपणे केले आहे. पसायदानातील विश्वकल्याणाचा संदेश जगात पोहोचविण्याच्या त्यांच्या योजनेला युनेस्कोने मान्यता दिली आहे. मानवी हक्क, लोकशाही व शांतता ह्यांचे अध्यासन त्यांच्या आळंदी येथील जागतिक केंद्रात स्थापन केले आहे. श्रीक्षेत्र आळंदी व देहू परिसर विकास समिती स्थापन

करून त्यांनी ही दोन्ही तीर्थक्षेत्रे स्वच्छ व सुंदर करण्याचा प्रकल्प प्रत्यक्षात आणला आहे.

इंद्रायणीच्या पाण्याचे शुद्धीकरण, प्रशस्त घाट व सुरेख कमानींची बांधणी, सांडपाणी नदीपात्रात जाऊ नये म्हणून घेतलेली दक्षता, अस्थिविसर्जनासाठी वेगळी व्यवस्था यातून हे साधले आहे. शिक्षण, समाजकार्य, अध्यात्म या विविध क्षेत्रांत त्यांनी केलेल्या अजोड कामगिरीबद्दल 'राजा राममोहन रॉय पुरस्कार' , 'भारत गौरव पुरस्कार', 'यशवंतराव चव्हाण शिक्षक आणि विद्यार्थी पुरस्कार', 'मराठवाडा गौरव', 'शिक्षणरत्न' , 'अ‍ॅवॉर्ड फॉर एक्सलन्स इन एज्युकेशन' असे पुरस्कार प्रदान करून त्यांचा गौरव करण्यात आला आहे.

– डॉ. सरोज शरद भडभडे

* * *

प



## पटेल, मनोहर बाबर

**संस्थापक**

**९ फेब्रुवारी १९०६ – १७ ऑगस्ट १९७०**



गुजरात राज्यातील खेडा जिल्ह्यातील नादियाड गावात मनोहरभाई बाबरभाई पटेल यांचा जन्म झाला. त्यांच्या वडिलांचे नाव बाबरभाई पटेल तर आईचे नाव जीताबेन पटेल असे होते. एका गरीब कुटुंबात जन्माला आलेल्या या बालकास शिक्षणाची अत्यंत आवड होती. पण परिस्थितीमुळे ती पूर्ण करता आली नाही. कामाच्या शोधात ते आपल्या मित्रांसह जबलपूरला आले. मोहनलाल हरगोविंददास यांच्याकडे ते कामास लागले. अहोरात्र मेहनत व कष्ट करून त्यांनी आपल्या अर्थार्जनाची सुरुवात स्वबळावर केली.

परिस्थितीअभावी केवळ चौथ्या वर्गापर्यंत शिक्षण घेतलेल्या या मनोहरभाईंनी सर्वांसाठी शिक्षणाची कवाडे खुली करून दिली. शिक्षणाचे महत्त्व जाणून १९५८ रोजी गोंदिया शिक्षण संस्था स्थापन केली. या संस्थेचे तेथे अध्यक्ष होते. या शिक्षणसंस्थेच्या अनेक शाखा कार्यरत झाल्या आहेत. ज्या अंतर्गत कला, वाणिज्य, विज्ञान, अभियांत्रिकी, औषधीशास्त्र, सैनिकशाळा, संगणक, शिक्षण इ. अभ्यासक्रम तर मनोहरभाई पटेल हार्ट फाऊंडेशन, मनोहरभाई पटेल अकादमी, मनोहरभाई पटेल धर्मादाय संस्था इ. चा समावेश आहे. गुजराती राष्ट्रीय केळवणी मंडळाची स्थापना करून त्यांनी एक स्तुत्य उपक्रम सुरू केला तो आजतागायत सुरू आहे. जिल्ह्यातील मेधावी विद्यार्थ्यांना सुवर्णपदक व प्रमाणपत्र देऊन सत्कार करण्याची परंपरा म्हणजे सरस्वतीला शिरसावंदन करण्याचे एक अप्रतिम उदाहरण आहे.

उद्योगातील त्यांची कर्मठता, कार्यकुशलता आणि व्यावहारिकतेमुळे शेठ हरगोविंददास प्रभावित झाले आणि त्यांना तिरोड्यास घेऊन आले. प्रबळ इच्छाशक्ती आणि परिश्रमातूनच सी. जे. पटेल कंपनीची स्थापना केली. उद्योग क्षेत्रात त्यांचे मामा जेठाभाई पटेल यांनी त्यांना मोलाची मदत केली.राजकीय क्षेत्रात देखील त्यांचे योगदान महत्त्वपूर्ण आहे. १९२७ मध्ये त्यांची गोंदिया येथे महात्मा गांधीशी भेट झाली. गांधीजींचे व्यक्तिमत्त्व व उच्च विचारामुळे त्यांना नवीन प्रेरणा मिळाली. १९३७ मध्ये ते गोंदिया नगर परिषदेचे सदस्य झाले व शेवटपर्यंत या पदावर कार्यरत राहिले. १९४६ ते १९६७ या काळात सलग पाच वेळा ते नगराध्यक्ष पदावर निवडून आले. १९५६ मध्ये भंडारा जिल्हा काँग्रेस समितीचे अध्यक्ष व पुन्हा १९६२ मध्ये कुशल नेतृत्वामुळे अध्यक्षपदावर निवडून आले. १९६२ मध्ये महाराष्ट्र विधानसभेसाठी गोंदिया क्षेत्रातून पुन्हा निवडून आले होते.

– प्रा. वर्षा गंगणे – नवदेवे

## पाटील, झुलाल भिलाजी

**प्रशासक**

**१४ फेब्रुवारी १९१४ – १७ फेब्रुवारी २००६**

श्री शिवाजी विद्याप्रसारक संस्थेच्या स्थापनेत झुलाल भिलाजी ऊर्फ झेड. बी. नाना यांचा सहभाग होता. खोंडामाळी सारख्या एका छोट्याश्या गावात जन्मलेल्या झुलाल यांचे प्राथमिक शिक्षण जळोद, खोंडामळी व प्रकाशे येथे झाले. मॅट्रिक परीक्षा धुळ्याच्या जे. आर.



सिटी विद्यालयमधून दिली. बी.ए.(ऑनर्स) पदवीसाठी फर्गसन महाविद्यालयात लाभले. एलएल. बी. सुद्धा पुण्यात पूर्ण केले. १९४० ते १९८० दरम्यान वकिली व्यवसाय केला. नाना सत्यशोधक समाजाचे ते पुरस्कर्ते होते. त्यामुळे त्यांनी हुंडा न घेता गाजावाजा न करता कै. कॅप्टन विश्वासराव देवरेंच्या कन्येशी लग्न केले.

ते जिल्हा स्थानिक समितीचे मुख्यधिकारी झाले. आठ वर्ष त्यांनी हे काम केले. उत्तम प्रशासक म्हणून काम करतानाच स्वातंत्र्य सैनिकांना ते मदत करीत.

प्रथम काँग्रेसमध्ये असणारे नाना शेतकरी कामगार पक्षात सक्रिय झाले. 'जयहिंद को – ऑपरेटिव्ह हौसिंग सोसायटी' त्यांनी उभी केली. महाराष्ट्रातील अग्रगण्य संस्था म्हणून आजही मानले जाते. 'महाराष्ट्र हाऊसिंग फायनान्स सोसायटी'च्या अध्यक्षपदाची त्यांची कारकीर्द एका उत्कृष्ट प्रशासकाला साजेशी होती.

त्याचबरोबर धुळे मार्केट समिती, तालुका खरेदी विक्री संघ, भूविकास बँक, सहकारी ग्राहक भांडार वगैरे सहकारी संस्थांतून शेतकऱ्यांसाठी बहुमोलाचे काम केले.

सहकारातून शिक्षणाकडे वळतांना नानांनी 'जयहिंद शिक्षण संस्था' सुरू केली. बाल शिक्षणापासून उच्च शिक्षणापर्यंत संस्थेच्या शाखा सुरू केल्या. 'जयहिंद मराठी शाळा' 'जयहिंद हायस्कूल' शिष्यवृत्तीधारकांचे माहेरघरच आहे. 'जयहिंद महाविद्यालय' हे महाराष्ट्रातील एक अग्रगण्य महाविद्यालय आहे. या महाविद्यालयाने अनेक प्रज्ञावंत, गुणवंत दिले. अभियांत्रिकी व वैद्यकीय शाखेकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांमध्ये जयहिंदची संख्या प्रचंड असते. शिस्तीचे भोक्ते असलेल्या नानांना कडक अनुशासन आवडत असे.

चांगल्या शिक्षकांबद्दल आदर असे. नेहमी शाळेत आल्यानंतर शिक्षकांची चौकशी सुरू होई. कोण शिक्षक कसे शिकवितात त्यांचे शिकविणे मुलांना समजते काय? शिक्षक तयारी करून येतात काय? अशी चौकशी करीत. शिक्षकांच्या गुणवत्तेबद्दल त्यांना नेहमीच अभिमान वाटे. जयहिंद महाविद्यालयास लाभलेल्या प्राचार्यांची मालिका वाखाणण्यासारखी आहे. डॉ. एन. के. ठाकरे, प्राचार्य एन. के. पाटील, डॉ. के. बी. पाटील अशी तज्ज्ञ मंडळी जयहिंद महाविद्यालयाला लाभली. याचे श्रेय नानांनाच जाते. महाराष्ट्रातील कला, वाणिज्य, विज्ञान महाविद्यालयांत मुलाखती घेऊन रोजगार उपलब्ध करून देणारे हे एकमेव महाविद्यालय म्हणता येईल. स्थानिक चौकशीचे वेळी महाविद्यालयांची टेप घेऊन खोल्यांची लांबीरूंदी मोजणारे, फाईलमध्ये दिलेली बाकांची संख्या मोजणारे संस्था चालकांना परखडपणे त्रुटी सांगणारे उत्तम बाबींचे कौतुक करणारे, नाना नवीन सदस्यांना अनेक धडे देत असत.

– म. ल. नानकर

## पाटील, ज्ञानेश्वर यशवंतराव

**संस्थापक**
**२२ ऑक्टोबर १९३५**



पद्मश्री डॉ. ज्ञानेश्वर यशवंतराव पाटील यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यांतील 'अंबप' या छोट्याशा खेड्यात एका सधन शेतकरी कुटुंबात झाला. त्यांचे वडील हे कसबा बावडा येथील गाव कामगार पाटील होते. प्राथमिक ते महाविद्यालयीन सर्व शिक्षण कोल्हापूरातच झाले. कोल्हापूर हे मल्लांचे शहर असल्याने लहानपणापासून कुस्तीची आवड.

कोल्हापूरच्या रगेल मातीत बालपण घालविलेले हे व्यक्तिमत्त्व आज शिक्षण विश्वात जगमान्य झाले आहे. ऐन तारुण्यात राजकारणात त्यांनी धडाडीने उडी घेतली. वयाच्या २० व्या वर्षी ते बावड्यांच्या 'श्रीराम को. ऑप.

सोसायटी' या कोल्हापूर जिल्ह्यांतील सर्वात मोठ्या सहकारी संस्थेचे अध्यक्ष झाले. १९५७ मध्ये कोल्हापूर नगरपालिकेवर निवडून गेलेले एकमेव काँग्रेस उमेदवार आणि त्यावेळी तर संयुक्त महाराष्ट्र समितीचा झंझावात होता. समाजकारणाचे व्रत घेऊनच ते राजकारणात उतरले. 'सत्तारूढ' पक्षात असूनसुद्धा त्यांनी कोल्हापूरचा खाजगी साखर कारखाना सहकारी करण्यासाठी, शेतकऱ्याच्या उसाला वाजवी दर मिळवण्यासाठी काळम्मावाडी धरणाच्या पूर्ततेसाठी प्रत्यक्ष रस्त्यावर उतरून सामान्य शेतकऱ्यांचे प्रश्न तडीस लावले. हाडाचा शेतकरी असलेला हा राजकारणी शेतकऱ्यांचा अनभिषिक्त नेता बनला. १९६७ ते १९७८ अशी सलग ११ वर्षे ते महाराष्ट्र विधानसभेमध्ये आमदार म्हणून निवडून गेले.

या आमदारकीच्या काळात ते शासकीय व निमशासकीय अशा वेगवेगळ्या राज्य व राष्ट्रीय पातळीवरील १८-१९ समित्यांवर सदस्य म्हणून नियुक्त झाले होते. त्यामुळे त्यांना विविध क्षेत्रांतील मान्यवरांचा व तज्ज्ञांचा सहवास त्या काळात मिळाला. या कुशाग्र बुद्धीच्या चळवळ्याने या काळात विविध विषयांचा सखोल अभ्यास केला. डॉ. डी. वाय. पाटील यांना कर्नाटकामध्ये सुरू झालेल्या विनाअनुदान तत्त्वाधारित खाजगी शिक्षण संस्थांनी आकृष्ट केले. शिक्षणाची गंगा सामान्य माणसापर्यंत कशी नेता येईल यासाठी त्यांनी चिंतन-मनन केले व त्यासाठी शासनाकडे त्याचा पाठपुरावा सुरू केला. १९७५ मध्ये गारगोटी येथील जगप्रसिद्ध 'मौनी'' विद्यापीठात त्यांची अध्यक्ष म्हणून नियुक्ती झाली. ही घटना त्यांच्या आयुष्याला कलाटणी देणारी ठरली. शिक्षण क्षेत्रातील योजनांच्या आराखड्यांस यामुळे बळ मिळाले.

१९८१ मध्ये डॉ. डी. वाय. पाटील यांनी सक्रिय राजकारणांतून निवृत्ती जाहीर केली व स्वत:ला संपूणपणे शिक्षण कार्यासाठी वाहून घेतले. आज त्यांनी स्थापन केलेल्या शिक्षण समूहामध्ये तीन विद्यापीठे, तीन वैद्यकीय महाविद्यालये, ३ दंत महाविद्यालये, सहा अभियांत्रिकी महाविद्यालये, सहा अभियांत्रिकी तंत्र निकेतने, २ वास्तूशास्त्र अभियांत्रिकी महाविद्यालये, अशा तऱ्हेच्या जवळ जवळ १६५ शैक्षणिक संस्था कार्यरत आहेत. त्यामध्ये हजारो विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. नवी मुंबई, पुणे आणि कोल्हापूर येथे अद्यावत उपकरणांनी सुसज्ज अशी तीन इस्पितळे सामान्य माणसांना ज्ञात सेवा पुरवीत आहेत.

१९८३ मध्ये पद्मभूषण वसंतदादा पाटील हे महाराष्ट्राचे मुख्यमंत्री असताना डी. वाय. पाटील यांनी कर्नाटक राज्याच्या धर्तीवर विनाअनुदानाने खाजगी शिक्षण संस्थाचा ढाचा महाराष्ट्र शासनाच्या गळी उतरवला. आज महाराष्ट्रात जी शैक्षणिक क्रांती झाली आहे, त्याचे जनक पद्मभूषण वसंतदादा पाटील हेच आहेत. अशी डॉ. डी. वाय. पाटील यांची धारणा आहे व त्यांचे हे ऋण ते सातत्याने मान्य करतात.

स्वत:च्या आधुनिक विचारप्रणाली व कार्याद्वारे स्वप्नपूर्ती करताना शिक्षणाच्या माध्यमातून विविध योजना दाखवित व यातूनच आधुनिक जगात भारत स्वावलंबीपणे सर्व जगाचे नेतृत्व करेल अशी स्वप्ने पाहिली. आजचे शिक्षण व आरोग्य सेवा गरजू अशा सामान्य माणसापर्यंत कसे पोहोचेल याचा त्यांनी ध्यास घेतला.

त्यांच्या कार्याचा गौरव म्हणून १९९० मध्ये भारत सरकारने त्यांना 'पद्मश्री' हा किताब देऊन गौरव केला. तसेच 'नॉटिंगहॅम ट्रेंट युनिव्हर्सिटी, युनायटेड किंगडम' यांनी सन्माननीय डॉक्टरेट बहाल करून गौरविले आहे. याशिवाय अनेक गौरव त्यांना प्राप्त झाले आहेत.

याबरोबर डॉ. डी. वाय. पाटील स्पोर्टस ॲकॅडमी नेरुळ-नवी मुंबई येथे एक जागतिक दर्जाचे प्रचंड स्टेडियम उभे करून त्यांनी भारताच्या क्रीडा क्षेत्रात उज्ज्वल नाव निर्माण करणारी आदर्श कृती केली आहे.

त्यांनी स्वत:बरोबरच या शिक्षण क्षेत्रात कार्यकर्त्यांची एक प्रचंड फळीच उभी केली आहे. त्यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांचे चिरंजीव विजय, डॉ. अजिंक्य, संजय व सतेज चौघेही हे त्यांचे कार्य अत्यंत जोमाने

विस्तारित आहेत. परमेश्वरावर नितांत श्रद्धा हा त्यांना त्यांच्या वडिलांच्याकडून मिळालेला वारसा श्री संत गजानन महाराज शेगाव व गजानन महाराज पट्टेकर, संत धुळगांवकर पाटील महाराज, प. पू. हरीकाका यासारखे संतमहात्मे हे त्यांचे नुसतेच श्रद्धास्थान नाही तर प्रेरणास्थानसुद्धा आहेत.

नुकतीच केंद्रशासनाने त्यांची त्रिपुराच्या राज्यपालपदी नियुक्ती केली आहे. तेथेही जाऊन तेथील लोकांसाठी काय करता येईल याबद्दल त्यांचे सतत चिंतन सुरू असते.

–प्रभाकर भागवत

## पाटील, पुरुषोत्तम काळू

***पी. के. अण्णा***

**संस्थापक**

**९ ऑक्टोबर १९२३**



पूर्वीच्या धुळे व आताच्या नंदुरबार जिल्ह्यातील शहादे तालुक्यातील छोट्याश्या गावात पुरुषोत्तम काळू पाटील तथा पी. के. अण्णा यांचा जन्म झाला. त्यांचे माध्यमिक शिक्षण लोकमान्य टिळक विद्यालय, नंदुरबार येथे झाले. स्वातंत्र्य चळवळीत काम करण्याची संधी मिळाली. महाविद्यालयातीन शिक्षणासाठी त्यांनी बडोदा येथील गायकवाड महाविद्यालय गाठले. बी. कॉम. पदवी प्राप्त केली व विधी शाखेचे शिक्षण घेण्यासाठी त्यांना पुणे येथे यावे लागले. बी.कॉम., एलएल.बी. असलेले ॲड. पी. के. पाटील नंदुरबारला वकिली करू लागले.

शहादा परिसरातील विद्यार्थी विद्यार्थिनींना महाविद्यालयीन शिक्षणासाठी धुळे, अंमळनेर, पुणे, मुंबई या शहरांवर विसंबून रहावे लागे. परिसरातील विद्यार्थी शिक्षणापासून वंचित राहू नये हा उद्देश डोळ्यासमोर ठेवून त्यांनी २९ डिसेंबर १९६९ रोजी ‘पूज्य साने गुरुजी विद्या प्रसारक मंडळाची’ स्थापना केली. २६ फेब्रुवारी १९७० रोजी कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय उघडून महाविद्यालयीन शिक्षणाचे द्वार खुले केले. शहाद्यासारख्या महाराष्ट्राच्या राजधानीपासून शेवटच्या टोकावर असलेल्या व सातपुडा पर्वताच्या तिसऱ्या रांगेत असलेल्या लोणखेडे गावात शिक्षणाची गंगा खेचून आणली. त्यामुळेच आज दहा विद्याशाखांचे शिक्षण प्रशिक्षण देण्याचे कार्य घडत आहे. यात कला, विज्ञान, वाणिज्य, सामाजिक शास्त्रे, शिक्षणशास्त्र, औषधनिर्माण शास्त्र, अभियांत्रिकी, कृषी, व्यवस्थापन, तौलनिक भाषा व प्रगत अध्ययन या विद्याशाखांचे शिक्षण कार्य होत आहे. सर्व शाखांच्या उत्तम इमारती तज्ञ प्राध्यापकवृंद, ग्रंथालये, प्रयोगशाळा यामुळे विद्यार्थ्यांना आनंद मिळतो.

केंद्रीय ग्रंथालय उभारणे ही अण्णासाहेबांनी कल्पना होती. या ग्रंथालयाच्या इमारतीचा पायाभरणी समारंभ १९९० मध्ये भारताचे तत्कालीन पंतप्रधान चंद्रशेखर यांच्या हस्ते व महाराष्ट्राचे मुख्यमंत्री शरद पवार तसेच हरियाणाचे नेते चौटाला यांच्या प्रमुख उपस्थितीत संपन्न झाला होता. या ग्रंथालयात सुमारे २ लाख ग्रंथ आहेत. भारतीय व परदेशी एक हजार नियतकालिके, दैनिके येतात. २०० विद्यार्थी अभ्यास करतील असा भव्य कक्ष, अनेक संशोधक काम करतील असा संशोधन कक्ष, संगणक कक्ष, झेरॉक्स, इंटरनेट सुविधा सर्व विद्याशाखांचे अनेक प्रबंध असलेले हे केंद्रीय ग्रंथालय आशिया खंडात प्रसिद्ध झाले आहे.

अण्णासाहेबाचा पिंड सहकार आणि राजकारणाचा असल्यामुळे सातपुडा तापी सहकारी साखर कारखाना, रत्नागिरी पार्टिकल बोर्ड, दूध संघ, शेतकरी सहकारी संघ, जनता सहकारी बँक यांच्या सहकार्याने ग्रामीण जनतेची सेवा करण्याची संधी अण्णासाहेबांना लाभली. म्हणूनच जनतेने त्यांना आमदार म्हणून निवडून दिले.

अण्णासाहेबांची आमदार पदाची कारकीर्द पुरुषोत्तम सेनेमुळे गाजली. उत्तम अभ्यासक असल्यामुळे ते विधानसभा गाजवत असत. महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाचे अध्यक्ष म्हणून महाराष्ट्रातील वाहतूक व्यवस्थेला वळण लावण्याचे त्यांचे कार्य

वाखाणण्यासारखेच झाले. महात्मा गांधी, सरदार वल्लभभाई पटेल, पूज्य साने गुरुजी व लोकनेते जयप्रकाश नारायण यांच्या विचारांचा त्यांच्यावर सखोल प्रभाव पडला. बॅ. वल्लभभाईंच्या निर्धाराने पक्के निर्णय घेणे, कमीत कमी बोलणे, समाजाशी सदैव सक्रिय नाते ठेवणे असे आदर्श विचारपूर्वक स्वीकारले. साने गुरुजींच्या आदर्शामुळे त्यांच्या नावाचे शिक्षण संकुल उभारले. जयप्रकाश नारायणांमुळे समाजवादी विचारसरणी बनली. या चौघांच्या आदर्शामुळे आजही अण्णासाहेब शिक्षण, सहकार, राजकारण यात आघाडीवर आहेत. त्यांच्यावर 'पुरूषोत्तमनामा' हा ग्रंथही प्रसिद्ध झाला आहे.

– म. ल. नानकर

## पाटील, विश्वनाथ तुकाराम

**संस्थापक**

**३१ जुलै १९००**



विश्वनाथ तुकाराम पाटील यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील शिगाव येथे झाला. प्राथमिक शिक्षण शिगाव येथे झाल्यानंतर मॅट्रिक आणि महाविद्यालयीन शिक्षणासाठी त्यांनी कोल्हापूर येथील राजाराम महाविद्यालय (१९२३) प्रवेश घेतला.१९२९ मध्ये मुंबई विद्यापीठातून कायदा विषयातील पदवी घेऊन कोल्हापूरमध्ये वकिलीचा व्यवसाय सुरू केला. व्ही. टी. पाटील यांचा हा शैक्षणिक प्रवास वरवर सरळ वाटत असला तरी तो अत्यंत खडतर असा झाला. केवळ शिक्षण पूर्ण करण्याची जिद्द, चिकाटी व वाट्टेल ते कष्ट करण्याची तयारी यामुळेच त्यांचे शिक्षण पूर्ण होऊ शकले.

कोल्हापूरमध्ये वकिलीचा व्यवसाय सुरू केल्यानंतर सातत्याने शैक्षणिक कार्यासंबंधी विचार त्यांच्या मनात घोळत होते. या जाणिवेतूनच २० वर्षांचा वकिली व्यवसाय सोडून पूर्णवेळ शिक्षणकार्यासाठी त्यांनी स्वत:ला वाहून घेतले. घरातील वारकरी संप्रदायाची परंपरा, शिक्षण घेताना जिद्द यामुळे मा. व्ही. टी.पाटील यांच्या जीवनाला एक वेगळीच कलाटणी मिळाली.

व्ही. टी. पाटील लौकिक अर्थाने शिक्षक होऊन वर्गात अध्यापन करू शकले नाहीत, परंतु समाजाला आवश्यक असणाऱ्या शैक्षणिक संस्थांची उभारणी करून समाजातील सर्वसामान्य माणसाला ज्ञानाची संजीवनी दिली. प्रिन्स शिवाजी एज्युकेशन सोसायटीच्या स्थापनेमध्ये त्यांनी मोलाचे योगदान दिले. त्यांचे हे कार्य कोल्हापूरच्या शिक्षण क्षेत्रातील मानदंड ठरावा एवढे महत्त्वाचे ठरले. ग्रामीण भागातील बहुजन समाज विशेषतः स्त्री शिक्षित व्हावी, यासाठी ताराराणी विद्यापीठाची स्थापना करून स्त्रीशिक्षणाच्या कार्याची मोठी परंपरा व्ही. टी. पाटील यांनी निर्माण केली. बहुजन समाजातील मुलींना शिक्षण मिळाले तर त्या ताठ मानेने उभ्या राहू शकतील. या विचारामुळे मुलींच्या शिक्षणाला त्यांनी प्रोत्साहन दिले. मागासवर्गीय मुला-मुलींना अधिकाधिक संधी कशी मिळेल यासाठी प्रयत्न केले. एक पुरुष शिकला तर तो स्वत:चा विकास साधू शकतो मात्र एक स्त्री शिकली तर संपूर्ण कुटुंब साक्षर होऊ शकते ही विचारसरणी या पाठीमागे होती.

ताराराणी विद्यापीठाच्या माध्यमातून प्राथमिक, माध्यमिक, ललित कला, गृहविज्ञान, डी. एड., कला व वाणिज्य पदवी शिक्षण, कमला महाविद्यालय, वसतिगृह या वेगवेगळ्या विद्याशाखांमधून आज हजारो विद्यार्थी-विद्यार्थिनी ज्ञानार्जनाचे पवित्र कार्य करीत आहेत. शिक्षकाने वर्गात अध्यापन करण्यासाठी जात असताना पूर्ण तयारी करून गेले पाहिजे, समाजातील नवनवीन ज्ञान त्यांनी विद्यार्थ्यांना दिले पाहिजे याकडे त्यांचा कटाक्ष होता.

महिलांसाठी स्वतंत्र विद्यापीठ असावे असे स्वप्न व्ही. टी. पाटील अनेक वर्षे उराशी बाळगून होते. पारंपरिक शिक्षणाबरोबरच काळाला अनुरूप असणारे, समाजातील स्पर्धेला तोंड देणारा विद्यार्थी घडविणारे शिक्षण असले पाहिजे. याकडे ते स्वत: लक्ष घालत असत. संशोधन, शास्त्रीय चिकित्सा यांसारखे उपक्रम त्यांनी आपल्या शिक्षण संस्थेमधून सुरू केले. स्वत:कडील वैभवाकडे पाठ फिरवून,

तन-मन-धन अर्पण करून संस्थेचा विस्तार वाढविण्यासाठी चंदनाप्रमाणे झिजून, आपली संपत्ती ट्रस्टच्या रूपाने ताराराणी विद्यापीठातील मुलींसाठी प्रदान करून शैक्षणिक कार्याचा आदर्श मा. व्ही. टी. पाटील यांनी समाजापुढे ठेवला आहे.

शैक्षणिक कार्याला अपेक्षित परिणाम देण्यासाठी व्ही. टी. पाटील यांनी आपल्या सामाजिक कार्याचा पाया मजबूत केला. महानगरपालिकेतील लोकप्रतिनिधीपासून सामाजिक कार्याला प्रारंभ करुन पुढे याच महानगरपालिकेचे अध्यक्ष, महालक्ष्मी देवस्थान मंडळाचे कार्याध्यक्ष, पन्हाळा हिल स्टेशन कमिटीचे कार्याध्यक्ष, कोल्हापूर बार असोसिएशनचे अध्यक्ष अशा विविध क्षेत्रांत त्यांनी आपल्या कार्याचा वेगळा ठसा निर्माण केला.

– डॉ. शिवलिंग मेनकुदळे

## पोटदुखे, शांताराम राजेश्वर

**संचालक**

**३० जानेवारी १९३३**



शांताराम राजेश्वर पोटदुखे यांचा जन्म चंद्रपूरला झाला. शेती व कारखानदारीच्या व्यवसायात आपल्या कर्तृत्वाने आघाडीवर असलेल्या पोटदुखे परिवाराची उद्यमशीलता व सर्वसंग्राहक मनोवृत्ती यामुळे संपन्नता व त्यातून येणारी लोककार्याची आवड उन्नत होत गेली. पोटदुखे यांचे प्राथमिक शिक्षण नगर परिषदेच्या प्राथमिक शाळेत झाले. माध्यमिक शिक्षण शासकीय ज्युबिली विद्यालयामध्ये तर महाविद्यालयीन शिक्षण नागपूर येथील हिस्लॉप महाविद्यालयामध्ये झाले. सार्वजनिक जीवनातील महत्त्वाच्या घडामोडींचे आकर्षण व आकलन त्यांना सतत राहिले. त्यामुळे म. गांधींना ऐकण्यासाठी ते बदलापूर रेल्वे स्थानकावर १६ किलोमीटर पायपीट करून गेले. १९५५ मध्ये गोवामुक्ती लढा सुरू झाला. त्यात भाग घेण्यासाठी नागपूरहून गेलेल्या विद्यार्थी – युवकांच्या तुकडीत ते होते. त्यांचे वडील नगर परिषदेचे उपाध्यक्ष होते.

लोकमानस घडविण्यासाठी त्यांनी २ ऑक्टोबर १९५८ रोजी 'विविध भारती' नावाचे साप्ताहिक सुरू केले. यातून लोकसंपर्काचे प्रभावी माध्यम त्यांना गवसले. जिल्हा पत्र म्हणून विविध भारती विश्वासार्हता त्यांनी कायम केली. त्याचवेळी शिक्षण संस्था संचालनाचा निर्धार करून त्यांनी सर्वोदय शिक्षण मंडळाचे संचालन कायम आपल्याकडे घेतले. त्याचवेळी सुरु असलेल्या संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत त्यांनी उडी घेतली.

वृत्तपत्र प्रकाशन, शिक्षण संस्था संचालन व सांस्कृतिक पार्श्वभूमी असलेल्या उपक्रम – कार्यक्रमांचे आयोजन यातून हिरिरीने ते कार्य करू लागले. १९६४ मध्ये अखिल भारतीय मराठी पत्रकार परिषदेच्या १९ व्या वार्षिक अधिवेशनाचे त्यांनी चंद्रपूरला आयोजन केले. स्वागताध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली. तरुण संघटक म्हणून महाराष्ट्राला शांताराम पोटदुखे यांचा परिचय झाला. वाङ्मयीन संस्था संचालनात त्यांनी भाग घेतला.

विदर्भ साहित्य संघाच्या केंद्रीय कार्यकारिणीत त्यांचा समावेश झाला. महाराष्ट्र शासनाने विटा व कौले उद्योगासाठी नेमलेल्या किमान वेतन समितीच्या अध्यक्षपदी त्यांची नेमणूक केली. एव्हाना त्यांनी काँग्रेस पक्षाचे रितसर सदस्यत्व स्वीकारले होते.

१९७० मध्ये सर्वोदय शिक्षण मंडळाचे सरदार पटेल महाविद्यालय सुरू झाले. कला – वाणिज्य – विधी, समाजकार्य आणि व्यवस्थापन विद्याशाखा असलेले हे महाविद्यालय नागपूर विद्यापीठातील एक मोठे महाविद्यालय आहे. यातून शांताराम पोटदुखे विधी महाविद्यालय आणि श्रीमती सुशीलाबाई रामचंद्रराव मामीडवार समाजकार्य महाविद्यालय असे दोन स्वतंत्र महाविद्यालये सुरू झाली आहेत. सरदार पटेल महाविद्यालयात ५० अभ्यासक्रम असून सहा हजारावर विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. चंद्रपूर – गडचिरोली भागातील विदर्भ साहित्य संघांच्या शाखांचा विस्तार

लक्षात घेऊन जानेवारी १९७९ मध्ये ५३ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन चंद्रपूर येथे घेण्यात आले. शांतारम पोटदुखे यांची स्वागताध्यक्ष म्हणून निवड झाली. आज विदर्भ साहित्य संघाच्या विश्वस्तपदी ते आहेत.

१९८० मध्ये चंद्रपूर लोकसभा मतदार संघातून ते काँग्रेस पक्षाचे अधिकृत उमेदवार म्हणून निवडून आले. १९८० ते १९९१ ते सतत ४ वेळा विजयी झाले. १९९१ च्या नरसिंहराव यांच्या मंत्रिमंडळात अर्थखात्याचे राज्यमंत्री झाले. विद्यमान पंतप्रधान डॉ. मनमोहनसिंग अर्थमंत्री होते. आर्थिक सुधारणातून खुल्या अर्थव्यवस्थेचा पुरस्कार भारताने केला. खासदार म्हणून आपल्या मतदार संघातील अनेक प्रश्न त्यांनी सोडविले.

१९८३ मध्ये अहेरी येथे सर्वोदय शिक्षण मंडळाचे महाविद्यालय सुरु झाले. आदिवासी लोकसंख्यांबद्दल क्षेत्रातील पहिले महाविद्यालय म्हणून त्याची नोंद आहे. यापूर्वी गडचिरोली जिल्ह्यात गडचिरोली व आरमोरी येथेच महाविद्यालये होती. १९८३ सालीच सरदार पटेल मेमोरियल सोसायटीचे नेतृत्व त्यांच्याकडे आले.

चंद्रपूर – गडचिरोली जिल्ह्यातील पहिले अभियांत्रिकी महाविद्यालय सुरु झाले. आज आठ विषय असलेले राजीव गांधी अभियांत्रिकी महाविद्यालय महाराष्ट्रात अग्रगण्य आहे. सर्वोदय शिक्षण मंडळाची सहा विद्यालये, तीन कनिष्ठ महाविद्यालयासह चंद्रपूर जिल्ह्यात सुरू असून ग्रामीण भागात शिक्षण प्रसाराचे काम ती करीत आहेत.

१६ वर्षांच्या खासदारकीच्या कार्यकाळात अनेक संसदीय सल्लागार समित्यावर त्यांनी काम केले. श्रेष्ठ प्रशासक व ज्येष्ठ अर्थतज्ज्ञ यांच्यासोबत काम करण्याची संधी त्यांना लाभली तरी त्यांचे पहिले व शेवटचे आकर्षण शिक्षण व सांस्कृतिक कार्यक्षेत्रच आहे. सरदार पटेल महाविद्यालयाचा रौप्य महोत्सव भारताचे तत्कालिन उपराष्ट्रपती डॉ. के. आर. नारायणन् यांच्या उपस्थितीत १९९६ साली साजरा झाला.

वाङ्मय, कला, क्रीडा, लोककल्याणासाठी संघटन आणि संस्कारशील उपक्रमात भरीव कार्य करणाऱ्या संस्था आणि व्यक्ती यांचा गौरव करण्याची प्रथा त्यांनी सुरू केली आहे. त्यासाठी लोकसेवा आणि विकास संस्थांची स्थापना करून गेल्या वीस वर्षांपासून ते कस्तुरबा गांधी (महिलांसाठी), डॉ. पंजाबराव देशमुख (आदिवासी), लोकनेते दादासाहेब कन्नमवार व क्रांतिवीर बाबूराव शेंडमाके यांच्या स्मृतीप्रित्यर्थ त्यांच्या नावाने पुरस्कार दिले जातात.

शांताराम पोटदुखे यांनी अमृतमहोत्सवी वर्षात पदार्पण केले तेव्हा व ७५ वर्षे पूर्ण झाली तेव्हा त्यांचा भव्य सत्कार करण्यात आला.

– मदन धनकर

* * *






## बुटाला, हिराचंद पर्शराम
**सामाजिक कार्यकर्ता, संस्थापक**
**२१ जाने १९४६**



**हि**राचंद पर्शराम बुटाला यांचा जन्म रुक्मिणीबाई यांच्या पोटी रायगड जिल्ह्यातील पोलादपूर येथे झाला. गरिबीची झळ सोसतच त्यांचे चौथी पर्यंत रावतळ्याला आणि पुढे आठवी पर्यंत खेडला शिक्षण झाले. पण काही कारणास्तव त्यांना शाळा सोडावी लागली आणि मग पुढे पोटासाठी कधी उपाहारगृहामध्ये, रस्त्याच्या कामावर मुकादम म्हणून तर कधी खाजगी शिकवणीचे मास्तर असे मार्गक्रमण करीत छोटेसे किराणा मालाचे दुकान खेड मध्येच सुरू केले.

व्यवसाय थोडा स्थिर झाल्यानंतर आपल्या कर्मभूमीसाठी आणि लोकांसाठी काहीतरी केले पाहिजे या भावनेतून सामाजिक आणि राजकीय कामात ते ओढले गेले. त्याच बरोबर शिक्षणाच्या सुप्त इच्छेतून १९६९ मध्ये 'सहजीवन शिक्षण संस्थे'च्या उभारणी मध्ये सहभाग घेतला. खेड शहराचा वाढता व्याप आणि विस्तार लक्षात घेता आतापर्यंत असलेली एकच माध्यमिक शाळा अपुरी असल्याने माध्यमिक शाळेचीच नव्हे तर उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थेची गरज निर्माण झाली होती. ती सहजीवन शिक्षण संस्थेने पूर्ण केली. परंतु सुरुवातीच्या दोन – तीन वर्षांतच संस्था अडचणीत आली आणि त्याच वेळी तरुण हिराभाई संस्था सावरण्यासाठी पुढे आले. आज ही संस्था सामान्य लोकांसाठी वरदानच ठरली आहे. गेली चाळीस वर्षे ते या संस्थेचे अध्यक्ष आहेत.

प्रामाणिक, पारदर्शक व्यवहार आणि मुलांना स्वस्त व दर्जेदार शिक्षण देण्यासाठी अनेक दानशूर व्यक्तींना व सहकाऱ्यांना सोबत घेऊन हिराभाईंनी या संस्थेचा विस्तार केला आहे. नगर परिषदेच्या एका खोलीत सुरू झालेल्या या शाळेचा विस्तार आज आधुनिक सुविधांनी परिपूर्ण अशा स्वतंत्र इमारतीत माध्यमिक विद्यालय, उच्चमाध्यमिक विद्यालय, महाविद्यालयाबरोबरच टेक्नीकल इन्स्टिट्यूट ऑफ कॉम्प्युटर एज्युकेशन आणि एम.बी.ए. पर्यंतच्या शिक्षणाची सोय उपलब्ध करून दिली आहे.

हे करत असतानाच चिपळूणच्या डी.बी.जे. महाविद्यालय व दापोलीच्या वराडकर – बेलोसे महाविद्यालयाचे ते कायदे मंडळाचे सन्माननीय सभासद आहेत. तसेच सावर्डे, आबलोली, भरणे येथे डी.एड. आणि बी.एड. महाविद्यालय सुरू करण्यात सहभाग, त्याचबरोबर जिल्ह्यातील अनेक शाळा, महाविद्यालयांना सढळ हाताने मदत भाऊंनी केली आहे.

सामाजिक, राजकीय जीवनातही त्यांनी अनेक जबाबदाऱ्या सांभाळल्या. ग्रामविकास परिषदेचे संस्थापक अध्यक्ष, इंटक संघटनेचे अध्यक्ष, खादी ग्रामोद्योग रत्नागिरीचे चेअरमन, सात वर्षे रत्नागिरी जिल्हा काँग्रेसचे अध्यक्ष आदी पदांबरोबरच विविध शासकीय योजनांच्या अंमलबजावणीस प्रेरणा दिली व लोककल्याणार्थ अनेक योजना राबविल्या. या त्यांच्या कामासाठी त्यांना राष्ट्रीय स्तरावरील 'इंदिरा गांधी प्रियदर्शनी' पुरस्काराने २००० मध्ये सन्मानित करण्यात आले.

भाई सावंत यांच्या हाताखाली त्यांचे राष्ट्रीय शिक्षण झाले तर हुसेन दलवाई – शरद चिटणीस यांच्याकडून सामाजिक कार्याची प्रेरणा मिळाली. यशवंतराव चव्हाणांच्या विचारांचा प्रभाव त्यांच्यावर आहे. वैयक्तिक आयुष्यात

ब

देखील त्यांनी आपल्या भावंडांचे व मुलांचे उच्च शिक्षण पूर्ण केले व स्वतःच्या पायावर उभे केले. याचबरोबर ते स्वतः यशस्वी उद्योजक म्हणून प्रसिद्ध आहेत.

– विवेक वि. कुलकर्णी

## बेलोसे, रामचंद्र विठ्ठल

***बाबूराव बेलोसे***

**संस्थापक**

**२१ जानेवारी १९२१ – २ मे १९८६**



कोकणातील युवकाने शिक्षणासाठी पुण्या – मुंबईला जाता कामा नये, हाच एक उद्देश ठेवून रामचंद्र विठ्ठल बेलोसे उर्फ बाबूराव यांनी कोकणला शैक्षणिक क्षेत्रातही आघाडीवर नेले. दापोली येथील पालगड येथे रामचंद्र विठ्ठल बेलासे जन्म झाला. लहान वयात लाभलेल्या सानेगुरुजींच्या सहवासामुळे वाचन आणि सामाजिक कार्याची आवड बाबूरावांमध्ये निर्माण झाली. पुण्यातील फर्गसन महाविद्यालयातून त्यांनी बी.ए. ची पदवी घेतली. त्यानंतर सहज सरकारी नोकरी मिळत असताना, त्यांनी समाजसेवेचे व्रत हाती घेऊन आपले गाव गाठले.

कोकणातील मुलांनी शिक्षण घेतले पाहिजे हा बाबूराव यांचा आग्रह होता. त्यातूनच त्यांनी सर्वप्रथम १९५१ मध्ये मंडणगड आणि लाटवण येथे शाळा बांधल्या.

प्राथमिक शिक्षणाबरोबर मुलांना उच्च शिक्षणही मिळाले पाहिजे, त्यासाठी त्यांनी २५ मे १९७३ रोजी दापोली मंडणगड शिक्षण प्रसारक मंडळाची स्थापना केली व सर्वप्रथम १९७४ मध्ये दापोली येथे कला व वाणिज्य महाविद्यालय स्थापन करण्यात आले. त्या शिक्षणसंस्थेचे ते अध्यक्ष ही झाले. त्यापाठोपाठ देव्हारे, वेळवी या मागासलेल्या भागात दोन माध्यमिक विद्यालये सुरू केली. याच शिक्षणसंस्थेने कालांतराने म्हणजे १ जून १९७८ मध्ये इंग्लिश माध्यमाची शाळा सुरू करून कोकणात इंग्रजीचा पाया रुजविला. त्यानंतर १ जून १९८३ मध्ये देव्हारे पंचक्रोशी विद्यालय आणि १ जून १९७८ मध्ये हर्णे इंग्लिश माध्यम प्राथमिक शाळा स्थापना, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या परीक्षा मार्गदर्शन केंद्राची स्थापनाही बाबूराव यांनी दापोली येथे केली.

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाचे अभ्यास केंद्रही सुरू करण्यात त्यांचा मोलाचा वाटा आहे. याशिवाय त्यांनी ज्युडो – कराटे प्रशिक्षण केंद्र, संगणक प्रशिक्षण केंद्र विद्यार्थी कल्याण मंडळ, कर्मचारी कल्याण मंडळ, सावित्रीबाई फुले विद्यार्थिनी स्वयंसिद्ध योजना सुरू केली. बाबूराव यांनी सुरू केलेल्या ‘सानेगुरुजी समृद्ध ग्रंथालय योजने’च्या माध्यमातून रत्नागिरी जिल्ह्यात अनेक ग्रंथालये उभी राहिली.

बाबूराव यांच्या शैक्षणिक कार्यात सर्वात महत्त्वाचे योगदान म्हणजे दापोली येथील कृषी महाविद्यालय, कालांतराने त्याचे कोकण कृषी विद्यापीठात रूपांतर झाले. दापोलीसारख्या एका ग्रामीण भागात विद्यापीठ स्थापन व्हावे ही कोकणवासीयांच्या दृष्टीने अभिमानास्पद गोष्ट ठरली. या विद्यापीठामुळे कोकणचा कायापालट झाला. बाबूरावांबरोबर या विद्यापीठासाठी माजी मंत्री पी.के.सावंत यांचेही मौलिक सहकार्य लाभले.

ते काँग्रेसमध्ये सामील झाले. त्यानंतर १९६२ मध्ये ते आमदारही झाले तर १९७५ मध्ये ते राज्यमंत्री बनले. शैक्षणिक कार्याबरोबर बाबूराव यांनी आमदार आणि मंत्रिपदाच्या आपल्या कारकिर्दीत अनेक लोकोपयोगी कामे केली. अनेक खेड्यांमध्ये त्यांनी रस्ते नेऊन बससेवा सुरू केली. धरणे आणि बांध बांधून लहान शेतकऱ्यांच्या शेतीसाठी आणि पिण्याच्या पाण्याची सोय केली. कोकणचा कॅलिफोर्निया व्हावा असे त्यांना सतत वाटत असे. सानेगुरुजी आणि यशवंतराव चव्हाण यांच्याबरोबर स्वातंत्र्यलढ्यातही बाबूराव बेलोसे हे सहभागी झाले होते. गणपतीपुळे येथे विश्रामगृह उभारून त्यांनी सर्वप्रथम कोकणच्या पर्यटनाची मुहूर्तमेढ केली.

– समीर कोडीलकर

* * *






## देशमुख, दिगंबर किशन

**शिक्षक, संस्थापक**

**११ सप्टेंबर १९४२**

दिगंबर किशन देशमुख यांचा परळी तालुक्यातील सिरसाळा गावी झाला. मराठीत एम.ए. पदवी घेऊन प्राथमिक शिक्षक म्हणून त्यांनी काम सुरू केले. विद्यार्थी दशेपासूनच सामाजिक अन् शैक्षणिक कार्याची त्यांना आवड होती. त्यांची अन्यायाच्या विरोधात उभी राहण्याची वृत्ती होती. १९७२ मध्ये बी. एड. चे सेवा अंतर्गत प्रशिक्षण अर्ध्यावर सोडून शिक्षक कर्मचाऱ्यांच्या संपात सक्रिय सहभाग घेतला. महाराष्ट्र शिक्षक संघटनेची मजबूत बांधणी केली. शिक्षक संघटनेचा आदेश घेऊन नोकरीचा राजीनामा दिला व मराठवाडा शिक्षक मतदार संघाची निवडणूक लढवली अन् विजयी झाले.

काही शैक्षणिक संस्था त्यांनी सुरू केल्या. सन १९६९ मध्ये त्यांनी नव विकास मंडळाची स्थापना केली. माजलगाव येथील या संस्थेचे ते कार्यवाह आहेत. या मंडळातर्फे माजलगाव येथे स्वतंत्र व सुसज्ज असे म. गांधी आदर्श वाचनालय, म. फुले प्राथमिक विद्यालय, जवाहर माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, साने गुरूजी वाचनालय, अशा काही शैक्षणिक संस्था सुरू करून ग्रामीण भागात सर्व सामान्य मुलांची शिक्षणाची सोय केली. हेमाद्री शिक्षण संस्था परभणीचे ते अध्यक्ष असून या संस्थेमार्फत दोन विद्यालये कार्यरत आहेत. १९७४ मध्ये देशमुख हे मराठवाडा शिक्षक मतदार संघाचे पहिले आमदार होते. आपल्या पेशावर निष्ठा ठेवून शिक्षकाचे प्रश्न अत्यंत समर्थपणे विधान परिषदेत मांडून शिक्षकांना न्याय मिळवून दिला. त्यांच्या या कामाची पावती म्हणून शिक्षकांच्या आग्रहाखातर १९८० मध्ये भरघोस मतांनी ते दुसऱ्यांदा निवडून आले. बारा वर्ष त्यांनी विधान परिषदेत शिक्षकांचे नेतृत्व केले. शिक्षण क्षेत्रात मराठवाडा अग्रेसर रहावा म्हणून त्यांनी विशेष प्रयत्न केले. महाराष्ट्र शिक्षण संस्था चालक संघाचे विभागीय कार्यवाह झाले. खाजगी शैक्षणिक संस्थाचे वाढते प्रश्न शासनासमोर मांडण्याच्या व्यासपीठाचे ते कार्यवाह होते.

महाराष्ट्रात कर्मचाऱ्यांचा जो ५४ दिवसांचा संप झाला त्या आंदोलनातील समन्वय समितीचे सन्माननीय सदस्य म्हणून त्यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली. ते ''शिक्षक प्रतिनिधी'' या नियतकालिकाचे संपादक होते. ''बिना सहकार नही उद्धार'' हा मंत्र घेऊन संपूर्ण मराठवाड्यात गृहनिर्माण व पतसंस्थांचे जाळे वाढविण्यात त्यांचा सिंहाचा वाटा होता. मराठवाडा विद्यापीठ नामांतर आंदोलनात त्यांचा सक्रिय सहभाग होता. मराठवाडा रेल्वे प्रश्नासाठी सातत्याने धरणे, उपोषण, आंदोलन केले.

विधान परिषदेच्या अधिवेशनात व नंतर काम करताना शैक्षणिक प्रश्नासोबत सामाजिक मन, राष्ट्रीय प्रश्नाची दखल त्यांनी घेतलेली आहे. वृक्षारोपण, अल्पबचत, साक्षरता अभियान, राष्ट्रीय एकात्मता, सामाजिक सामंजस्य व वैज्ञानिक जाणीवांसाठी उपक्रम, मेळावे, ग्रामसभा व्याख्याने इत्यादी कार्यक्रमाचे आयोजन केले. आमदारकीच्या काळात पंचायत राज समिती, शिक्षण युवक सल्लागार समिती, ग्रंथालय समिती, इत्यादी संस्थेवर कार्य केले. या शिवाय मराठवाडा साहित्य परिषद माजलगावचे अध्यक्ष, साने गुरूजी कथा मालेचे विभागीय अध्यक्ष, सद्गुरू स्वामी शंकरानंद विश्वस्त संस्था संस्थापक अध्यक्ष, मराठवाडा जनता विकास परिषदेचे संस्थापक सदस्य, विभागीय उपाध्यक्ष, डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मारक समिती माजलगावचे अध्यक्ष, माजलगाव इथे

संपन्न झालेल्या, ६ व्या मराठी ग्रामीण साहित्य संमेलनाचे कार्याध्यक्ष, मराठवाडा साहित्य संमेलनाचे कार्याध्यक्ष अशा कितीतरी संस्थांवर त्यांनी काम केले व आजही करीत आहेत. अनंत भालेराव व गोविंदभाई श्रॉफ यांच्या मार्गदर्शनाखाली सामाजिक व शैक्षणिक कार्यात त्यांनी सक्रिय सहभाग घेतला.

**– प्रा. भगवान काळे**

* * *

द




म

**मानकर, लक्ष्मणराव बिसनलाल**
☞ **मुख्य नोंद – राजकारण खंड**

## मुझुमदार, शांताराम बळवंत
**संस्थापक, संचालक**
**३१ जुलै १९३५**



पुणे शहर हे विद्येचे माहेरघर म्हणून प्रसिद्ध आहे. गेल्या काही वर्षात पुण्यात अनेक नवीन शिक्षणसंस्था सुरू झाल्या. अभियांत्रिकी स्थापत्यशास्त्र, जैवतंत्रज्ञान तसेच व्यवस्थापन शास्त्र या व अशा इतर अनेक विषयांसाठी महाविद्यालये सुरू झाली. आंतरराष्ट्रीय शाळा पुण्यात सुरू झाल्या त्यामुळे अलीकडच्या काळात पुण्याला 'पूर्वेकडील ऑक्सफर्ड' म्हणून गौरविले जाते. अनेक देशातील विद्यार्थी शिक्षणासाठी पुण्यात येतात.

ऐंशीच्या दशकात पुण्यात परदेशी विद्यार्थी येण्यास सुरूवात झाली होती. त्यावेळी या मुलांना राहण्यासाठी जागा, संपर्काची भाषा, जेवण अशा अनेक अडचणी येत. परदेशातून पुण्यात शिक्षणासाठी आलेल्या मुलांना पुण्यात घरच्यासारखे वाटले पाहिजे, जेणे करून त्यांचे शिक्षण संपवून हे विद्यार्थी जेव्हा आपल्या देशात परत जातील तेव्हा पुण्याबद्दल, भारताबद्दल आणि भारतीय लोकांबद्दल चांगले मत घेऊन जातील या एका छोट्याशा कल्पनेतून मुझुमदार यांनी 'सिंबायोसिस'ची स्थापना केली आणि आता त्याचे सिंबायोसिस आंतरराष्ट्रीय विद्यापीठ या अभिमत विद्यापीठात त्याचे रूपांतर झाले आहे. सिंबायोसिस विद्यापीठाचे कुलगुरू आहेत डॉ. शांताराम बळवंत मुजुमदार.

मुजुमदार यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील गडहिंग्लज या गावी झाला. त्यांचे शालेय शिक्षण गडहिंग्लज येथे तर महाविद्यालयीन शिक्षण कोल्हापूर येथे झाले. त्यांनी एम.एस्सी. (वनस्पतीशास्त्र) ही पदवी पुणे विद्यापीठातून प्रथम क्रमांकाने प्राप्त केली. सूक्ष्मजीवशास्त्रात त्यांनी पीएच.डी. केले. पुण्यातील फर्गसन महाविद्यालयात सुरुवातीला वनस्पतीशास्त्राचे प्राध्यापक व त्यानंतर विभागप्रमुख म्हणून वीस वर्षे काम केले. डॉ. मुजुमदार यांचे वडील गडहिंग्लज येथे वकिली करत असत.

डॉ. मुजुमदार हे फर्गसन महाविद्यालयात अध्यापन करत असताना त्यांना परदेशातून इथे शिक्षणासाठी आलेल्या विद्यार्थ्यांना राहताना येणाऱ्या अडीअडचणींची जाणीव झाली. या मुलांना परके वाटू नये तसेच त्यांच्या अडचणी सोडविल्या जाव्यात या हेतूने डॉ. मुजुमदार यांनी १९७१ मध्ये 'सिंबायोसिस इंटरनॅशनल कल्चरल अँड एज्युकेशनल सेंटर' ची स्थापना केली. सिंबायोसिस याचा अर्थ एकमेकांच्या खुशालीसाठी परस्परांवर अवलंबून असणारे दोन जीव असा आहे. इथले स्थानिक विद्यार्थी व परदेशातून आलेले विद्यार्थी यांच्यात सौहार्द व बंधुभाव वाढावा आणि त्यायोगे परदेशी मुलांचे येथील वास्तव्य सुखकर व्हावे असा त्या मागील हेतू होता.

काही काळानंतर डॉ. मुजुमदार यांना वाटले की ही सर्व मुले एकत्र, एका वर्गात शिकली, एका वसतीगृहात राहिली तर हा हेतू जास्त चांगल्याप्रकारे साध्य होईल. त्या दृष्टीने त्यांनी सिंबायोसिस या संस्थेची स्थापना केली. आज सिंबायोसिसच्या वेगवेगळ्या ३४ शैक्षणिक संस्था आहेत. यामध्ये अगदी शिशुवर्गापासून, प्राथमिक, माध्यमिक

शाळा, वाणिज्य, कला, विधी, परिचारिका, जन संज्ञापन, दूरसंपर्क (टेलिकम्युनिकेशन), मनुष्यबळ विकास, परदेशी व्यापार, व्यवस्थापन, संगणकशास्त्र या व अशा सुमारे २०० अभ्यासक्रमांचा समावेश आहे.

सैन्यातील निवृत्त अधिकारी आणि त्यांच्या कुटुंबियांसाठी व्यवस्थापन शास्त्राचे शिक्षण देणारी, एकमेव संस्था सिंबायोसिसने स्थापन केली आहे. सिंबायोसिस संस्थेचे ध्येयवाक्य 'वसुधैव कुटुंबकम्' असे आहे. आज या संस्थांमधून भारतातील व इतर ८० देशातील सुमारे तीस हजार मुले शिक्षण घेत आहेत. याशिवाय सिंबायोसिसच्या दूरशिक्षण योजनेसाठी दोन लाख विद्यार्थ्यांनी नावनोंदणी केली आहे. शिक्षणक्षेत्रातील उत्कृष्ट योगदानामुळे सिंबायोसिसला २००२ मध्ये अभिमत विद्यापीठाचा दर्जा देण्यात आला आहे. महाराष्ट्राव्यतिरिक्त बंगळुर, हैद्राबाद व नोएडा येथे या विद्यापीठाच्या शाखा सुरु झाल्या आहेत. भारतातील इतर राज्यांत तसेच परदेशातही या विद्यापीठाच्या शाखा सुरु करण्याचे डॉ. मुजुमदार यांचे स्वप्न आहे.

डॉ. मुजुमदार यांनी अनेक शैक्षणिक तसेच सामाजिक संस्थांमध्ये महत्त्वाची पदे भूषविली आहेत. शिक्षणेत्रातील त्यांच्या कार्याचा गौरव अनेक पुरस्कारांनी करण्यात आला आहे. पुण्यभूषण व महाराष्ट्रगौरव हे पुरस्कार डॉ. मुजुमदार यांनी प्राप्त केले आहेत.

पुणे महानगरपालिकेने सर्वोत्कृष्ट महाविद्यालयीन शिक्षक पुरस्कार व अतिशय प्रतिष्ठेचा असा यशवंतराव चव्हाण पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला आहे. २००५ मध्ये भारत सरकारने पद्मश्री ही पदवी देऊन त्यांच्या कार्याचा गौरव केला आहे.

सानेगुरुजींची आंतरभारती, गुरुदेव रवींद्रनाथ टागोरांची विश्वभारती आणि संत ज्ञानेश्वरांची हे विश्वाचे माझे घर ही संकल्पना प्रत्यक्षात आणण्यासाठी आलेल्या मुलांकरिता घरापासून दूर असलेले घर निर्माण करण्यासाठी आज वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षीही डॉ. शांताराम बळवंत मुजुमदार कार्यरत आहेत.

– सौ. स्वाती क्षीरसागर

## मुनघाटे, गोविंद नारायण

**शिक्षक, संस्थापक**

**१२ जानेवारी १९३२**



'दंडकारण्य शैक्षणिक व सांस्कृतिक विकास संशोधन संस्था' गडचिरोलीचे अध्यक्ष गोविंद नारायण मुनघाटे यांचा जन्म देसाईगंजपासून दहा किलोमीटर असलेल्या तुळशी गावी झाला. मुनघाटे कुटुंब गडचिरोली पासून पाच किलोमीटरवर असलेल्या गोगाव-अडपल्लीचे. गोविंदरावांचे वडील तलाठी होते. गडचिरोली जिल्ह्यातील एकमेव रेल्वे स्थानक व नगर परिषद मुख्यालय वडसा (देसाईगंज) परिसरात त्यांनी काम केले.

दुर्गम व डोंगराळ भागात गोविंदराव शिकले. त्यांना शिक्षणाची अमाप हौस होती. आपल्या परिसरातील आरमोरी तालुक्यातील वैरागड येथून प्राथमिक चौथीची परीक्षा उत्तीर्ण केल्यावर गडचिरोलीस माध्यमिक शिक्षण घेतले. मॅट्रिकची परीक्षा चंद्रपूरच्या न्यू इंग्लिश विद्यालयामधून उत्तीर्ण केल्यावर १९५५ मध्ये पोर्ला जनपद माध्यमिक शाळेत शिक्षक म्हणून ते रुजू झाले. शिक्षकाचे प्रशिक्षण घेतले. म. गांधी विद्यालय, आरमोरी येथे अध्यापक म्हणून काम केले. शिक्षण प्रसाराची तळमळ व अध्यापनाची आवड जपण्यासाठी परिसरात ते संस्काराची साधने शोधू लागले. रम्य वनश्री, निष्कपट आदिवासी व स्वत:मध्ये दडून असलेला कवी यांच्याशी त्यांनी संवाद सुरू केला.

कवितांची रचना त्यांनी याच काळात सुरू केली. गोंडवनातील वाङ्मयीन चळवळीचे प्रवर्तक साहित्य भूषण तु. ना. काटकर यांनी चंद्रपूर परगण्यातील कवींचा प्रातिनिधिक कविता संग्रह प्रकाशित करण्याचे जाहीर केले. १९५४ मध्ये हा काव्यसंग्रह प्रकाशित झाला. त्यातून गोविंदराव कवी म्हणून पुढे आले. स्वत:ला शिक्षक म्हणून घडविताना त्यांनी भरपूर वाचन केले. आजूबाजूचे

जनजीवन न्याहाळले. परिसर निरीक्षणातून व्यक्तिमत्त्व विकास घडविण्याचा डोळस धडा त्यांनी गिरवला.

१९६२ मध्ये शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळाची त्यांनी स्थापना केली. ते या संस्थेचे सचिव होते.गडचिरोली येथे शिवाजी विद्यालयची स्थापना करून शिक्षक झाले. एकीकडे शिक्षण संस्थेचा प्रपंच पाहायचा तर निर्वाहासाठी दुसरीकडे शिक्षक म्हणून राबायचे असा नवा अध्याय सुरू झाला. ज्येष्ठ विधिज्ञ ना. सं. गंगूवार व आमदार जे. टी. पाटील यांचे सहकार्य लाभले. गडचिरोली परिसरात योग्य गावांची निवड करून शैक्षणिक सोयी देण्याचा प्रयत्न शिवाजी शिक्षण संस्थेने सुरू केला. १९७० मध्ये गडचिरोली जिल्ह्यातील पहिले महाविद्यालय सुरू झाले.

१९७२ मध्ये धानोरा तालुक्यात गिरोला येथे संस्थेची आश्रमशाळा सुरू झाली. मुख्याध्यापक म्हणून गोविंदराव रुजू झाले. पुन्हा निसर्गाशी संवाद साधण्याची संधी त्यांना लाभली. आंतरराष्ट्रीय सारस फेडरेशनचे संचालक डॉ. रोनाल्ड साये या पक्षीतज्ज्ञाने जॉर्ज व क्रेन पक्षाच्या मादीची कुतूहलपूर्ण सत्यकथा प्रसिद्ध केली. पक्षी जीवनाचा अभ्यास करण्याची प्रेरणा गोविंदरावांना यातून मिळाली. त्यांनी चक्क घरी मोर पाळला. त्याच्या वर्तनाचा शास्त्रीय अभ्यास केला. स्वत:च्या अनुभवातून त्याला माणसाळण्याच्या प्रयत्नातील अनेक प्रयोग टिपले. त्यावर त्यांनी लिहिलेला विस्तृत लेख मुंबईच्या 'महाराष्ट्र टाईम्स' ने प्रकाशित केला.

पक्षी व प्राणीजीवनाच्या आधाराने बहरलेल्या अनेक लोककथांचा त्यांनी संग्रह केला. त्यातून लोकसाहित्याच्या अभ्यासाची नांदी झाली व ते दालन त्यांच्यापुढे उभे झाले. शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळाचे काम करताना त्यांनी गडचिरोली येथे शिवाजी वाचनालय सुरू केले. १९८२मध्ये गडचिरोली स्वतंत्र जिल्हा झाला. शिवाजी वाचनालय 'अ' श्रेणीत असून शासनाने त्यास जिल्हा वाचनालयाचा दर्जा दिला आहे. हे वाचनालय म्हणजे गडचिरोली जिल्ह्याला गोविंदरावांची देणगी आहे. दरम्यान गोविंदरावांनी दंडकारण्य शैक्षणिक व सांस्कृतिक विकास संस्थेची स्थापना केली. शिवाजी शिक्षण संस्थेचा बहरलेला संसार नव्या व्यवस्थापक मंडळाकडे सोपवून त्यांनी दंडकारण्याची वाट धरली. एखादी शिक्षण संस्था उभी करताना घेतलेले कष्ट व सोसलेले घाव विसरून त्यांनी नवी संस्था सुरू केली.

'दंडकारण्य' नावाने नवी संस्था सुरू करताना आदिवासींसाठी शिक्षण हे पहिले सूत्र स्वीकारले. ग्रामीण व आदिवासी लोकसंख्याबहुल क्षेत्रात मुलींची वसतिगृहे सुरू करण्याचा विचार प्राधान्याने बाळगला. त्यातून दुर्गम व डोंगराळ भागात चांदाळा व मुरमाडी येथे आश्रमशाळा सुरू केल्या. वाचनाची शिस्त, निसर्गप्रेम, परिसर परिचय व लोकजीवन उन्नत करण्याचा ध्यास प्रामुख्याने तेथे आढळून येतो.

आपल्या कुटुंबासह गिरोला येथे राहण्याचा अनुभव असल्यामुळे या दोन्ही आश्रमशाळांना त्यांनी प्रारंभापासूनच शैक्षणिक दिशा दिली आहे. १९८८ मध्ये महाराष्ट्र शासनाने आदर्श शिक्षक पुरस्कार देऊन त्यांचा सन्मान केला. एवढेच नव्हे तर पुढे १९९४ मध्ये शासनाने 'आदिवासी सेवा संस्था' म्हणून दंडकारण्य संस्थेचा रु. २५,०००/– पुरस्कार देऊन गौरव केला. झाडीपट्टीत रंगभूमीला लोकांनी अजून अंतर दिले नाही. 'खेड्यातील माणसं' नाटक लिहून त्यांनी रंगमंचावर त्याची प्रयोगशीलता सिद्ध केली. नाणी संकलन व पोस्टाची तिकीटे संग्रहित करण्याचा छंद त्यांनी जोपासला. चार भिंतीतील औपचारिक व रूढ शिक्षणाला अनौपचारिक शिक्षणाची जोड दिल्याशिवाय मुलांच्या संस्काराला आयाम प्राप्त होत नाही, अशी त्यांची धारणा असल्यामुळे ग्रामीण पार्श्वभूमीचा त्यांनी संस्काराचे साधन म्हणून उपयोग करून घेतला.

१९९१ मध्ये संस्थेने कुरखेडा आदिवासी क्षेत्रात विद्याभारती पदवी महाविद्यालय सुरू केले. संस्थेतर्फे १३ संस्था सुरू असून गडचिरोली येथे स्वतंत्र कन्या माध्यमिक विद्यालय व प्राथमिक शाळा आहे. जिजामाता बालभवन व एसएनडीटी महिला प्रशिक्षण केंद्र यांचा समावेश आहे. गडचिरोली जिल्हा झाला. जिल्हा मुख्यालयाचा परिसर साकार झाला. या भागात गोविंदरावांनी जिल्हा कॉम्प्लेक्स विद्यालय सुरू केले. तेथील वातावरण शांत व अध्ययन–

म

अध्यापनाला पोषक आहे. तेथे गोविंदरावांनी चांगले उद्यान तयार केले आहे. ग्रेस व बी कवी हे त्यांचे आवडते कवी आहेत. ग्रेस यांनी या परिसरास भेट दिली.

दोन शिक्षण संस्थांची स्थापना, संगोपन व संवर्धन यात त्यांनी अर्धशतक घालवले. २००० मध्ये महाराष्ट्र शासनाकडून राज्यातील सर्वोत्कृष्ट शिक्षण संस्था म्हणून राज्यपाल यांच्या हस्ते दंडकारण्य शैक्षणिक व सांस्कृतिक विकास संस्था, गडचिरोलीचा एक लक्ष रुपयांचा पुरस्कार देऊन गौरव करण्यात आला. २००४ मध्ये 'माझी काटेमुंढरीची शाळा' या त्यांच्या कादंबरीस राज्य शासनाचा अण्णाभाऊ साठे वाङ्मय पुरस्कार प्राप्त झाला. हे पुस्तक ग्रामीण भागातील शाळांचे जीवन रेखाटणारे आहे.

– मदन धनकर

## मेघे, दत्ता राघोबाजी

☞ मुख्य नोंद – राजकारण खंड

## म्हस्के, गणपत राजाराम

**संस्थापक, संस्थाचालक**

**२१ जुलै १९१४ – २९ जुलै १९७७**



गणपत राजाराम म्हस्के यांचा जन्म श्री वृद्धेश्वर – देवराई परिसरातील निंबोडी (ता. पाथर्डी) या लहानशा खेड्यात झाला. रावसाहेब लहानपणीच मातृसुखाला पारखे झाले. वडील राजाराम पाटील सत्यशोधक चळवळीत होते. त्यांनी शैक्षणिक कार्याचा प्रारंभ शेवगाव येथे शेतकरी वसतिगृहाच्या माध्यमातून केला. खेड्यापाड्यातील अगदी तळागाळातील मुलांना वसतिगृहामध्ये घेऊन शिक्षणाची सोय करून दिली. सरकारी मदत नाही. प्रसंगी स्वत:च्या घरातील भांडीकुंडी विकून वसतिगृहाचा खर्च करीत. रावसाहेबांना समाजसेवेचे बाळकडू घरातूनच मिळाले. रावसाहेबांनी शेवगाव व नगर येथील वसतिगृहामध्ये राहून शिक्षण घेतले. महाविद्यालयीन शिक्षण मात्र त्यांना मधूनच सोडावे लागले. त्यांचे इंग्रजी उत्तम होते.

सत्यशोधक पत्रकार मुकुंदराव पाटील (१८८५–१९६७) यांनी सोमठाणे (तिसगाव परिसर) येथे 'दीनमित्र' हे वृत्तपत्र सुरू केले. समाजप्रबोधनाचा हा वारसा रावसाहेबांना मिळाला. तसेच सामाजिक, शैक्षणिक, धार्मिक हाही वारसा व त्याचे संस्कार रावसाहेबांना प्राप्त झाले. विचारांची जडणघडण झाली. कार्याची दिशा स्पष्ट झाली.

रावसाहेबांनी चरितार्थासाठी नगर जिल्हा लोकल बोर्डात लेखनिक, गोदाम निरीक्षक सहाय्यक अधिकारी अशा पदांवर सुमारे २४ वर्षे नोकरी केली. ही नोकरी करीत असताना त्यांचा हुतात्मा श्री करवीर छत्रपती चौथे शिवाजी महाराज मराठा वसतिगृह, नगर या संस्थेशी संबंध आला. तेथील व्यवस्थापन ते पाहू लागले. तसेच या वसतिगृहामधूनच अहमदनगर जिल्हा मराठा विद्या प्रसारक समाज या शैक्षणिक संस्थेचा जन्म झाला. या संस्थेच्या विस्ताराला, विकासाला रावसाहेबांनी वाहून घेतले. ते जवळ जवळ ४५ वर्षे या संस्थेचे सरचिटणीस होते. रावसाहेब मराठा वसतिगृहाचेच विद्यार्थी होत. अनेक नामवंत विद्यार्थी येथून उदयास आले. तेथेच १९४१ मध्ये टागोर विद्यालय सुरू केले. तेच आजचे निवासी विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय होय. पुढे साधारण १९५९ पासून या संस्थेने नगर जिल्ह्यात ग्रामीण विभागात व शहरात शाळा, महाविद्यालये, वसतिगृहे, आश्रमशाळा इ. ६९ शैक्षणिक शाखा सुरू केल्या. अति दुर्गम भागात हे शैक्षणिक जाळे विणले. या सर्व उभारणीत रावसाहेबांनी समर्पण भावनेने कार्य केले, चिकाटी ठेवली व व्यवहार स्वच्छ ठेवले. ते संस्थेकडून प्रवास खर्चही घेत नसत. संस्थेला चोख हिशोबाची व काटकसरीची सवय त्यांनी आखून दिली. संस्थाचालक व सेवक यांच्यात जिव्हाळा निर्माण केला. ग्रामीण विभागातील सर्वसामान्यांना संस्थेच्या कार्यात सहभागी करून घेतले. शैक्षणिक विकास हेच रावसाहेबांच्या जीवित कार्याचे अविभाज्य अंग होते.

स्वत:ची शेती जुजबी ठेवली व संस्थेच्या प्रपंचासाठी स्वत: झीज सोसली.

इतर सामाजिक - राजकीय कार्य - नगर डि. अर्बन सेंट्रल को.ऑप.बँकेचे संचालक १९४६ - ४७ व १९४९ - ५३, नगर जिल्हा लोकल बोर्ड सोसायटी - संस्थापक व चेअरमन ७ वर्षे, नगर जिल्हा लोकल बोर्ड कामगारांची पहिली युनियन - स्थापना १९५४ (राज्यात पहिली), तालुका पंचायत समिती पाथर्डी - सभापती १९६२ - ६४ पुणे विभागात या कामास प्रथम क्रमांक प्राप्त. अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषदेचे अधिवेशन, नगर सेक्रेटरी - १९६६, पाथर्डी येथे जनता महा विद्यालय स्थापन करण्यात सहभाग - १९६६, नगर जिल्हा परिषद सदस्य उत्कृष्ट कार्य १९६४ - १९६७,पाथर्डी तालुका दुष्काळी कार्याचे नियोजन - भारतरत्न इंदिरा गांधींकडून गौरव, १९७२, श्रीवृद्धेश्वर सहकारी साखर कारखाना प्रमोटर १९६९ (कासार पिंपळगाव, तिसगाव), जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक संचालक १९७२ - १९७७, पाथर्डी विधानसभेवर आमदार (अपक्ष) १९७२ - १९७७.

– प्रा. भिकाजी दहातोंड

* * *

म

र



र

## राणे, केशव व्यंकटेश

**संस्थापक**

**१५ डिसेंबर १९२७**



केशव राणे यांचा जन्म दक्षिण कोकणातील वाघेरी या खेडेगावातील सामान्य शेतकरी कुटुंबात झाला. वडिलांनी प्राथमिक शिक्षणासाठी त्यांना बावडा संस्थानाची राजधानी गगनबावडा येथे ठेवले. शिक्षणाच्या आकांक्षेने ते पुढे कोल्हापूरात गेले व आयर्विन ख्रिश्चन विद्यालयामधून मॅट्रिक झाले. त्यानंतर त्यांनी राजाराम महाविद्यालय कोल्हापूर येथून बी.ए. एल.एल.बी. पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. कोल्हापूरला शाहु महाराजांनी उभ्या केलेल्या मराठा वसतिगृहामध्ये राहून त्यांनी शिक्षण घेतले. त्यावेळी बाळासाहेब भोसले, यशवंतराव चव्हाण, बाळासाहेब देसाई यांच्या राजकीय चर्चेतून सगळ्यांनाच राजकारणाची आवड निर्माण झाली होती. त्यातून शिक्षणानंतर वकीली व्यवसायाकडे वळत असतानाच दै. पुढारीचे संपादक ग. गो. जाधव, भाऊसाहेब हिरे यांच्या आग्रहावरून राजकारणात सक्रीय सहभाग घेण्याचे ठरविले व १९५२ मध्ये कणकवली – मालवण मतदार संघातून आमदार म्हणून विजयी झाले.

एकीकडे राजकीय कारकीर्द बहरत असतानाच त्यांनी कणकवली परिसराच्या विकासाचा ध्यास घेतला. त्यात त्यांचा प्रमुख ओढा होता तो शैक्षणिक विकासाकडे होता. १९५९ मध्ये कार्यकर्त्यांच्या सहकार्याने शिक्षण प्रसारक मंडळाची स्थापना करुन त्यांनी कणकवलीत विद्यामंदिर प्रशाला नावाची इंग्रजी शाळा सुरू केली. यानंतर आजुबाजुच्या खेड्यातील मुलांची महाविद्यालयीन शिक्षणाची सोय व्हावी यासाठी १५ जून १९७२ मध्ये कणकवली महाविद्यालयाची सुरुवात करण्यात आली. महाविद्यालयाची स्थापना करताना विद्यापीठाकडे ठेवावा लागणारा एक लाख रूपयांचा निधी उभा करणे ही त्यावेळी अवघड गोष्ट होती. परंतु राणे त्यावेळी रत्नागिरी जिल्हा परिषदेचे अध्यक्ष होते त्यांनी फोंडाघाट, ओरसगाव, वागदे व शिवडाव या चार ग्रामपंचायतींना प्रत्येकी २५ हजार रूपयांचे कर्ज दिले व ती रक्कम विद्यापीठाकडे जमा केली. त्यावेळी त्या ग्रामपंचायतीच्या सरपंचांना महाविद्यालयीन शिक्षणाची आवश्यकता पटवून देऊन त्यांनी हे अवघड काम सहज पूर्ण केले.

आज कणकवली महाविद्यालयामध्ये कला, वाणिज्य व विज्ञान शाखेच्या पदवी शिक्षणाबरोबरच पदव्युत्तर शिक्षणाची सुविधाही देखील त्यांनी उपलब्ध करून दिली आहे. त्याचबरोबर यशवंतराव चव्हाण मुक्तविद्यापीठाचे विभागीय केंद्र व दोन जिल्ह्यातील विद्यार्थी वर्गासाठी स्पर्धा परीक्षा मार्गदर्शनासाठी सुसज्ज स्टडी सर्कल कार्यान्वित केला आहे. त्यासाठी आवश्यक निधी, इमारत व साहित्याच्या गोष्टींची पूर्तता करण्यासाठी आपला राजकीय मित्र परिवार, व्यापारी, सहकारी कार्यकर्ते यांची वेळोवेळी मदत मिळवून कणकवली परिसरातील मुलांसाठी शैक्षणिक आधारवड निर्माण केला. या सगळ्यामागे प्रेरणा होती ती म्हणजे आपल्याला शिक्षणासाठी गाव सोडावे लागले, वणवण फिरावे लागले ते आज आपल्या मुलांना करायला लागू नये.

शिक्षणाबरोबरच त्यांनी विद्यार्थ्यांना शेतीची आवड निर्माण व्हावी व त्यांनी पुढे जाऊन अभ्यासपूर्ण शेती करावी

यासाठी वेगवेगळे प्रयोग केले. उपक्रम राबविले. त्यामुळे कणकवली महाविद्यालय शेती व वनौषधी विषयक प्रयोगाची शाळा म्हणूनही प्रसिद्ध आहे.

त्याचबरोबर त्यांनी जिल्हापरिषद अध्यक्ष म्हणून अनेक गावात प्राथमिक शाळा व प्रमुख गावांमध्ये माध्यमिक शाळांची सुरुवात केली. फलोद्यानातून ग्रामीण विकास या विषयाला केंद्रस्थानी ठेवून त्यांनी अनेक खेडेगावात व्याख्याने दिली व याबद्दल जागृती करण्याचा प्रयत्न केला. त्याच बरोबर काजू, आंबा, नारळ यांचे बी व कलमे जिल्हापरिषदेच्या माध्यमातून मोफत वाटली. तीनवेळा आमदार, जिल्हापरिषद अध्यक्ष, परिवहन मंडळ अध्यक्ष, सिंधुदुर्ग सहकारी मध्यवर्ती बँकेचे अध्यक्ष, शिक्षण प्रसारक मंडळ कणकवलीचे अध्यक्ष अशा अनेक पदांवर त्यांनी काम केले व करत आहेत. त्यातून त्यांनी अनेक लोकांना रोजगार उपलब्ध करुन दिला. अनेक उद्योगांना प्रोत्साहन दिले.

कणकवलीत सर्व सोईनी युक्त एस.टी.स्थानक उभे केले. खेड्यापाड्यातून एस.टी. धावावी यासाठी गाव तेथे एस.टी.सुरु केली व त्यासाठी चांगले रस्ते तयार केले आणि या भागाच्या विकासाच्या गतीला हातभार लावला.

– विवेक कुलकर्णी

* * *

र



# १ – वगळलेले चरित्र नायक

पुढील नावांचा विचार शिक्षण खंडासाठी करण्यात आला होता. परंतु पुरेश्या माहिती अभावी किंवा नोंद वेळेवर मिळू न शकल्याने त्यांचा समावेश या आवृत्तीत करण्यात आला नाही. वाचकांपैकी ज्यांना या चरित्रनायकांची पुरेशी माहिती असेल त्यांनी संपादकांशी संपर्क साधावा. पुढील आवृत्तीत या नोंदीचा समावेश करता येईल. या कोशामध्ये चरित्र नायकांचा वैयक्तिक परिचय असल्यामुळे शासनाच्या पुढाकाराने सुरू झालेल्या संस्थांचा समावेश केलेला नाही.

आॅल्फेड गडने
ओगले गोपाळ अनंत उर्फ दादासाहेब
काळे सुग्रीव
कुंदनलालजी
कुलकर्णी डॉ. एस. आर.
कुळकर्णी भाई
गव्हाणे अण्णासाहेब
गांधी भाऊसाहेब
गोडबोले का. रा.
घाटे अण्णासाहेब
चिटणीस म. भि.
जाधव प्रा. अनिरुद्ध
ठवरे रावसाहेब
ताडादी अप्पासाहेब
डोंगरे सुखदेव
देशमुख के. ना.
देसाई अ. आ.
नंदनपवार बाबा
पटवर्धन शंकरराव
पंधे गुरूजी
परिहार निर्मलदादा
पाटील डॉ. सुरेश
पाटील विनायकराव
पाटील लिला
बर्न्सन मॅक्झिम
भोंडे भाऊसाहेब
भोंडवे सुदाम
मिचेल जेम्स
मुळे माधव
रणधीर व्यंकटराव
लोहारेकर नारायणराव
वझलवार तात्याजी
वाघमारे आशाताई
सर्जे गुरूजी
साने सुंदरा
सोमण शिदूबाबा
हिस्पॉप रेव्हरॅड
पाटील जी. टी.
मंगळवेढेकर के. पं.
साळी व्हि. झेड.
नायकम् आर्य
नायकम आशा
बेबंळकर
गोसावी गुरूजी
देशमुख के. ना.

* * *

# २ – लेखक परिचय

**मल्हार अरणकल्ले**
संपादक, साप्ताहिक सकाळ, पुणे

**राजेश अहिरे**
प्राध्यापक, गोगटे जोगळेकर महाविद्यालय, रत्नागिरी.

**मंजिरी ओगले–मुळे** बी.कॉम.
पुणे

**आ.ब. कंग्राळकर** बी.ए., बी.कॉम, बी.एड
मुख्याध्यापक न्यू. इंग्लिश स्कूल – सातारा (डेक्कन एज्युकेशन)

**अरुण करमरकर** बी.कॉम., डी.बी.एम.बी.जे
माजी संपादक, सोलापूर तरुण भारत

**निर्मला करमरकर** एम.ए. (हिंदी/मराठी) बी.एड
निवृत्त प्राध्यापक, सेंट मिराज, पुणे

**डॉ. स्वाती कर्वे,** एम.ए., बी.एड., एमफिल., पी.एचडी.,
निवृत्त प्राध्यापक मॉडर्न कॉलेज, पुणे

**दुर्गा कानगो** एम.ए., बी.एड्.
माजी मुख्याध्यापक, हिराबाई गोयका कन्या विद्यालय, धामणगांव

**भगवान काळे**
लेखक, साकेत प्रकाशन, जालना

**विश्वास काळे** एम.ए. (हिंदी)
माजी प्राचार्य, रयत शिक्षण संस्था, सातारा

**डॉ. मंदाकिनी अशोक किंजवडेकर** एम्.ए., पी.एचडी
डेक्कन कॉलेज, सहाय्यक संपादक – संस्कृत शब्दकोश विभाग

**डॉ. शरद कुंटे** एम् एस.सी, पी.एच.डी (रसायन)
जनकल्याण समिती, पुणे प्राध्या. वाडिया कॉलेज. पुणे,

**जयंत कुळकर्णी** बी.एस्सी.
डोंबिवली

**योगेश कुलकर्णी**
पाबळ विज्ञानाश्रम

**विवेक कुलकर्णी** एम्.ए. (हिंदी)
पत्रकार, मुंबई तरुण भारत, मुंबई

**डॉ. श्री. वा. कुलकर्णी** एम्.ए.एम.एड. साहित्य विशारद
निवृत्त शिक्षक – भावे मुलांचे हायस्कूल, पुणे.
मानद संचालक म.ए.सो. शिक्षण प्रबोधिनी.

**सुधाकर कुलकर्णी** एम्.ए. (अर्थशास्त्र)
निवृत्त अर्थसल्लागार, पुणे.

**हरिभाऊ केदार**
माजी कुलगुरु नागपूर विद्यापीठ, नागपूर.

**समीर कोडीलकर** बी.एड., पत्रकारिता पदवी,
वरिष्ठ उपसंपादक, 'प्रभात' पुणे.

**डॉ. ज्योत्स्ना कोल्हटकर** एम.ए., पी.एच.डी,
कार्यवाह, सातारा नगर वाचनालय, सातारा.

**अभिजीत कोळपे,** बी.ई. (मेकॅनिक्स)
सातारा.

**यशवंत ब. क्षीरसागर**
संपादक बालविकास, मुंबई.

**स्वाती क्षीरसागर** एम.ए.–मानसशास्त्र
पत्रकार पुणे

**रमेश खटावकर** एम.ए., बी.एड.
निवृत्त प्राध्यापक, रहेजा महाविद्यालय, मुंबई.

**वर्षा गंगणे–नवदेवे,**
अर्थशास्त्र विभाग, मनोहरभाई पटेल कला वाणिज्य महाविद्यालय–देवरी, जि. गोंदिया

**डॉ. दिलीप गरुड,** बी.एस्.सी., एम.ए., एम.पी.एच.डी,
उपशालाप्रमुख, यशवंतराव चव्हाण माध्यमिक विद्यालय, पुणे.

**डॉ. शंकर गागरे,** बी.एस्सी., एम्.फिल.पी.एच.डी.,
प्रभारी प्राचार्य, स्वामी सहजानंद भारती शिक्षणशास्त्र महाविद्यालय, श्रीरामपूर

**रोहिणी गाडगीळ** एम्.ए., बी.एड.,
निवृत्त शिक्षिका

**महेश गायकवाड** एम.एस.सी., एम्.ए. (मराठी), एम.ई.डी
कनिष्ठ अधिव्याख्याता, लालबहादुरशास्त्री महाविद्यालय, सातारा

**डॉ. ललिता गुप्ते** एम.ए.पी.एच.डी., साहित्यरत्न (हिंदी)
निवृत्त मुख्याध्यापिका, न्यू इंग्लिश स्कूल रमणबाग, पुणे.
अध्यक्ष ''आपुलकी'' पुणे.

**डॉ. व्ही.टी. घारपुरे** एम.ए., एम.फील., पी.एच.डी.
प्राचार्य, महिला महाविद्यालय, कराड

**डॉ. पराग चोळकर** बी.टेक., एम.ए., पी.एच्डी.
''परागधाम प्रकाशन'' नागपूर

**प्रा. अस्लम जमादार**
पुणे

**डॉ. रमेश जाधव** एम.ए., पी.एच.डी.,
समाजशास्त्र विभाग, कोल्हापूर

**डॉ. न.म. जोशी** एम.ए., एम.ई.डी., पी.एच.डी
बालसाहित्यिक, पुणे

**प्रा. मिलिंद जोशी** एम.टेक.(सिव्हिल)
कार्यवाह : महाराष्ट्रसाहित्य परिषद पुणे
प्राध्यापक, भारती विद्यापीठ अभियांत्रिकी महाविद्यालय

**वि.ग. जोशी** एम.ए.
अनुवादक, मुंबई

**वर्षा जोशी-आठवले** एम.ए.(मराठी) पत्रकारिता पदविका
मुक्त पत्रकार, पुणे

**श्रीनिवास श्रीकांत जोशी**
औरंगाबाद

**डॉ. कुमार शास्त्री,** एम.ए., पी.एच.डी. (अर्थशास्त्र)
प्राध्यापक, पोरवाल महाविद्यालय - कामठी

**डॉ. भिकाजी दहातोंड**
**अहमदनगर**

**मालती देऊळगांवकर** बी.एस्सी., एम.ए.
निवृत्त शिक्षिका, लातूर.

**डॉ. एस. जी देगावकर** एम.ए. राज्यशास्त्र, एम.ए. लोकप्रशासन, एलएल.एम., पी.एच.डी.,
निवृत्त राज्यशास्त्र विभागप्रमुख, आनंद निकेतन महाविद्यालय, बरोश 'राज्य मागास वर्ग' आयोगाचे नागपूर विभाग प्रमुख, राज्य दर्शनिक विभाग संपादक मंडळ सदस्य.

**प्रकाश देशपांडे**
कार्याध्यक्ष, लोकमान्य टिळक स्मारक वाचन मंदिर,
चिपळूण आणि समर्थ साहित्य परिषद

**डॉ. अ.ल देशमुख** एम.एस्सी., पी.एच.डी.,
सचिव विद्यामहामंडळ संस्था. पर्यवेक्षक. आपटे प्रशाला, पुणे

**मदन हरिभाऊ उर्फ पुरूषोत्तम धनकर** एम.ए.
निवृत्त प्राचार्य, सरदार पटेल महाविद्यालय, चंद्रपूर

**सुधा धामणकर** एम.ए., बी.एड.,
निवृत्त शिक्षिका, हिंगणे स्त्री शिक्षण महिलाश्रम, पुणे.
राष्ट्रीय कीर्तनकार, संचालक सचिव, तपोधाम प्रतिष्ठान पुणे,

**दिलीप धारूरकर**
औरंगाबाद

**आदिती नातू**
सचिव ग्राममंगल, सचिव महाराष्ट्र बालशिक्षण परिषद

**म. ल. नानकर** बी.एस्सी., एम.ए., एम.एड् (मॅथ)
प्राचार्य, श्री मार्तंड भैरव अध्यापक महाविद्यालय, बालेवाडी, पुणे,
राज्यपाल नियुक्त कार्यकारी परिषद सदस्य उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ
अधिसभा सदस्य, वैदिक गणित व्याख्याता

**शिरीष पटवर्धन** बी.कॉम., एलएल.बी
स्वरुपवर्धिनी, पुणे

**सुहासिनी पटेल** एम.ए.बी.एड.
निवृत्त प्राध्यापिका, पेठे हायस्कूल, नाशिक

**प्राची परांजपे** बी.एस्सी., एम.बी.ए.
पत्रकारिता पदविका/संपादन मुद्रीत शोधन, सांगली

**डॉ. दमयंती पांढरीपांडे** एम.ए. पी.एचडी (मराठी) एम्.ए.(तत्त्वज्ञान)
माजी सचिव सर्वोदय आश्रम, नागपूर

**श्रीकांत पाटील** एम्.ए. (मराठी), एम.फील., बी.एड्.,
मराठी विभाग प्रमुख, आनंद निकेतन कला, विज्ञान, वाणिज्य महाविद्यालय, विद्याभारती, विदर्भप्रांत प्रमुख, चंद्रपूर

**डॉ. माधव त्र्यंबकराव पात्रीकर** एम.ए. पी.एच.डी. एम्.एल्.आय.एस् सी, आर.एस. मुंडले धरमपेठ महाविद्यालय ग्रंथालय विभाग कार्यरत, नागपूर

**प्रभाकर पारखी**
नागपूर

**ऋजुता पितळे** बी.एस्सी., डिप्लोमा डी.टी.डी.सी.
कर्णबधीर मुलांसाठी विशेष शिक्षिका

**डॉ. संजय गो. पोहरकर** एम.ए., पी.एच.डी.,
प्राचार्य, समर्थ महाविद्यालय, लाखनी जि. भंडारा

**जयंत फाळके** एम. एस्सी.
भाभा अणु संशोधन केंद्रात विज्ञान वाहिनीचे विश्वस्त व सचिव
पुणे

**डॉ. रा. गो. प्रभुणे** एम.एम.ई.डी. पी.एच.डी

प्रमुख - कराड शिक्षण मंडळ, कराड

**डॉ. श्रीकृष्ण गोविंद फडके**

माजी प्राचार्य, आर्यांग्ल वैद्यक महाविद्यालय, सातारा

**विजय बक्षी** एम.ए.बी.लिब.

ग्रंथपाल, सहकार्यवाह. महाराष्ट्र राज्य माध्यमिक शाळा ग्रंथपाल महासंघ, सांगली

**डॉ. वि. म. बाचल** बी.ए. (अर्थशास्त्र/राज्यशास्त्र), पी.एच.डी

माजी प्राचार्य, फर्गसन महाविद्यालय, माजी कुलगुरु टि. म. वि.

**डॉ. नीळकंठ ग. बापट** एम.कॉम., पीएच डी.

माजी प्रमुख संगणक विभाग, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ

**सुहास बारटक्के** एम.कॉम., डी.एच.ई.

प्राध्यापक, डी.बी.जे. महाविद्यालय, चिपळूण

**डॉ. सुधीर बोधनकर**

सेवानिवृत्त प्राचार्य, सी.पी.एन्. दयाल महाविद्यालय, नागपूर.

अध्यक्ष ज्ञानवर्धिनीगीता प्रबोधन प्रकल्प, नागपूर.

कार्याध्यक्ष ग्रंथालय भारती

**सुहासकुमार बोबडे**

प्राध्यापक, महिला महाविद्यालय, कराड

**डॉ. सरोज भडभडे** बी.एस्.सी.

पुणे

**ह.शं.भदे** बी.एस्सी., बी.जे.,

पत्रकार, राहता जि, अहमदनगर

**श्रीधर आनंद भागवत** एम.ए.बी.टी.

निवृत्त प्राचार्य, कन्याशाळा, कराड

**प्रभाकर भागवत**

मुंबई

**डॉ. एन.एस. भागवत**

चिपळूण

**श्रीमती उषा भागवत** बी.ए.बी.एड.

सेवानिवृत्त विस्तार अधिकारी

चिपळूण

**डॉ. सविता भावे** बी.ए., एलएल.बी,

लेखक, पुणे

**डॉ. स्वर्णलता भिशीकर** पी.एच.डी.

ज्ञानप्रबोधिनी, सोलापूर

**श्याम भुरके** एम.कॉम., एल.एल.बी., सी.ए.,आय.आय.बी.

माजी उपमहाव्यवस्थापक, बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे

**प्राची मचे** एम.ए., एम.एड. सेट.

प्राध्यापिका, स्वामी सहजानंद भारती शिक्षणशास्त्र महाविद्यालय

**डॉ. कल्पना मुळावकर**

एम.कॉम., एम.ए.एम.एड., पी.एच डी.

अधिव्याख्याता, शासकीय अध्यापक महाविद्यालय, अंबाजोगाई

**डॉ. संतोष मुळावकर** एम.एस्सी., एम.एड., पी.एच.डी.

प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय. अंबाजोगाई जि.बीड

**डॉ. विश्वास मेहंदळे**

पुणे

**डॉ. शिवलिंग मेनकुदळे** एम.ए., एमफील., पीएच.डी.

अधिव्याख्याता, शिवाजी महाविद्यालय, सातारा

**विठ्ठल कुबेर म्हेत्रे** बी.ए.बी.एड.,

मुख्याध्यापक , एकलव्य प्राथमिक शाळा, यमगरवाडी

**गणेश राऊत** एम.ए., एमफील., बी.सी.जे

इतिहास विभागप्रमुख. एच.व्ही.देसाई महाविद्यालय, पुणे

**प्रा. वसंत रोकडे** एम.ए.एम.एड.

माजी प्राचार्य, सातारा

**यशवंतराव लेले** एम.ए.

ज्ञानप्रबोधिनीचे संस्थापक सदस्य, पौरोहितांना मार्गदर्शन, ज्ञानप्रबोधिनीच्या संस्कृत संशोधन संशोधिकेमार्फत अनेक संस्कार पोथ्यांची निर्मीती, पुणे

**डॉ. माधवी वैद्य**

कार्यवाह साहित्यपरिषद पुणे

**पुरुषोत्तम उमरचंद शेठ** एम्.ए.,एम.एड.,

माजी प्राचार्य, लालबहादुरशास्त्री महाविद्यालय, सातारा

**डॉ. प्रतिभा जयंत सहस्रबुध्दे** एम.एस्.सी., पी.एच.डी.,

माजी विभागप्रमुख, सेंट फ्रांसिस डीसेल महाविद्यालय, नागपूर

**नीलिमा साठे-शिंदे**

लोकभारती समाजसेवा संस्था, नाशिक

**विद्या साने** बी.एस्.सी., स्त्री अभ्यास प्रमाणपत्र, एम्.एस्.डब्ल्यू.

ज्ञानप्रबोधिनी ''संवादिनी'' गटातर्फे समतोल मासिकाचे संपादन

**प्रा. राजकुंवर सोनावणे** एम.ए.एम.एड.
माजी शिक्षिका, लेखिका, पुणे

**सौ. एस.पी हिरगळ**
प्राध्यापिका, स्वामी सहजानंद भारती शिक्षणशास्त्र महाविद्यालय
श्रीरामपूर जि. अहमदनगर

**उत्तम हुंडेकर** प्रा.एम.ए. (अर्थशास्त्र) एम.फिल,
लक्ष्मीबाई भाऊराव पाटील महिला महाविद्यालय, सोलापूर

## संपादक व सहाय्यक परिचय

**आशा बापट**
बी.एस्सी., स्त्री अभ्यास प्रमाणपत्र
ज्ञान प्रबोधिनी ‘संवादिनी’ गट, स्फुट लेखन
‘दृष्टी’ स्त्री अध्ययन केंद्र

**वर्षा जोशी - आठवले**
एम. ए. (मराठी), पत्रकारिता पदविका
मुक्त पत्रकार

**अनघा देऊळगावकर**
एम.ए. (मराठी), एम.ए. (संगीत),
स्त्री अभ्यास प्रमाणपत्र
आकाशवाणी निवेदिका

**अनुराधा देशपांडे**
बी.ए. (मराठी)
ज्ञान प्रबोधिनी ‘संवादिनी’ गट, स्फुट लेखन

**विद्या साने**
बी.एस्सी., स्त्री अभ्यास प्रमाणपत्र
ज्ञान प्रबोधिनी ‘संवादिनी’ गट, ‘समतोल’ संपादिका
स्फुट लेखन

**मानसी बोडस**
बी.कॉम., एलएल. बी., पत्रकारिता पदविका
ज्ञान प्रबोधिनी ‘संवादिनी’ गट, स्फुट लेखन

* * *





"मानवी संस्कृतीच्या प्रगतीचे प्रत्येक पाऊल हे कुणीतरी एखाद्या व्यक्तीने उचलेले असते.
अशी व्यक्ती हीच प्रेरक व पथदर्शक राहते. मानवी संस्कृतीचा विकास हा अशा व्यक्तींच्या
परिश्रमांची अंतिम परिणतीच आहे. कारण व्यक्तीमध्येच नवोन्मेषी प्रतिभा
व ती साकार करण्याची ऊर्जा आणि प्रत्यक्षात आणण्यासाठी
आवश्यक ती कार्यपद्धती विकसित करण्याची क्षमता असते." - योगी अरविंद









साप्ताहिक विवेक

१२, कामत औद्योगिक वसाहत, ३९६, स्वातंत्र्यवीर सावरकर मार्ग, प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५.
दूरध्वनी: (९१-२२) २४२२ ९४५१ / १४४०, फॅक्स : (९१-२२) २४३६ ३७५६
Email: charitrakosh@gmail.com Website: www.maharashtranayak.com